सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ५८ वें

जागतिक

# इतिहासाचें ओझरतें दर्शन

(खंड १ ला)

लेखक

पं. जवाहरलाल नेहरू

अनुवादक

शिवराम गोविंद भावे




जुलै, १९५१ ]

[ मूल्य ७॥ रुपये

# मूळ आवृत्तीची प्रस्तावना

हीं पत्रें केव्हां आणि कोठें प्रसिद्ध होणार आहेत, किंवा तीं मुळीं प्रसिद्ध होणारच आहेत कीं नाहींत हें मला कांहीं ठाऊक नाहीं. कारण, हिंदुस्थान हा आजकाल एक फार मोठा चमत्कारिक देश आहे आणि तेथें पुढच्या काळांत अमुकच एक गोष्ट होईल असें भाकीत करणें कठिण आहे. परंतु सवड आहे तोंच, सभोंवार घडत असलेल्या प्रसंगांनीं माझ्याविरुद्ध आघाडी साधण्यापूर्वीच, या चार ओळी मी लिहून घेत आहें.

ऐतिहासिक विषयासंबंधीं ही जी पत्रमालिका मीं लिहिली आहे, ती लिहिण्याची आवश्यकता सांगावयाला हवी आणि तिच्या स्वरूपाबद्दल खुलासा करायला हवा. हीं पत्रें अखेरपर्यंत वाचण्याचे परिश्रम जे वाचक करतील, त्यांना ही आवश्यकता व हा खुलासा या पत्रामध्येंच सांपडण्याचा संभव आहे. विशेषतः यासाठीं अशा वाचकाला मी शेवटचें पत्र वाचायला सांगेन; आणि आपल्या या उफराट्या जगांत वाचायला सुरुवात शेवटून केली, तरी कांहीं मोठेंसें बिघडणार नाहीं.

या पत्रांची वाढ स्वाभाविकपणें झालेली आहे. त्याच्यासाठीं पूर्वरचित अशी योजना फारशी आंखलेली नव्हतीच; आणि त्यांचा विस्तार हा एवढा वाढेल अशी माझी केव्हांच कल्पना नव्हती. सुमारें सहा वर्षांपूर्वी, माझी मुलगी दहा वर्षांची होती तेव्हां तिला म्हणून मीं बरींचशीं पत्रें लिहिलीं व त्यांमध्यें जगाच्या प्राथमिक अवस्थेचा वृत्तांत थोडक्यांत आणि समजायला सोप्या अशा स्वरूपांत लिहिला. हीं पूर्वी लिहिलेलीं पहिलीं पत्रें नंतर पुढें पुस्तकाच्या स्वरूपांत प्रसिद्ध झालीं आणि त्यांचें स्वागत फार मोठ्या प्रेमानें व उत्साहानें करण्यांत आलें. ही पत्रमाला पुढें चालू ठेवण्याची कल्पना माझ्या मनात घोळत होती; परंतु राजकीय क्षेत्रांत चालू असलेल्या माझ्या कार्यामुळें मी कामामध्यें इतका गुंतून गेलों होतों कीं ती कल्पना प्रत्यक्ष रूप धारण करूं शकली नाहीं. तुरुंगांत हवी होती ती संधि मला मिळाली व ती मीं हातची दवडली नाहीं; तिचा मीं चांगला उपयोग करून घेतला.

तुरुंगामधील जीवनांतही कांहीं अनुकूलता आहेत. मोकळा वेळ आणि काहीं अंशीं निर्लेप बुद्धि या दोन्ही गोष्टी तुरुंगांतील जीवनांत मिळतात. परंतु तेथील अडचणी या तर उघडच आहेत. कैद्याच्या हाताशीं तेथें ग्रंथसंग्रहालयें किंवा संदर्भग्रंथ नसतात आणि अशा परिस्थितींत कांहीं लिहिण्याचा उद्योग करणें, आणि त्यांतही विशेषतः इतिहासाचें लेखन करणें हें अविचारी धाडस ठरतें. माझ्याकडे बरींचशीं पुस्तकें येत असत पण तीं कायम जवळ ठेवून घेतां येत नसत. तीं पुस्तकें यायचीं आणि जायचीं. तथापि, बारा वर्षांपूर्वीपासून माझे पुष्कळ देशबांधव व देशभगिनी यांच्याप्रमाणेंच व त्यांच्या समवेत हा तुरुंगाच्या यात्रा करण्याचा उद्योग जेव्हां मीं सुरू केला, तेव्हांपासून वाचलेल्या पुस्तकांमधून लिहून ठेवावयाची ही संवय मीं जडवून घेतली. अशी ही टिपणी-पुस्तकें बरींचशीं वाढलेलीं होतीं आणि लिहिण्याला जेव्हां मी लागलों, तेव्हां या टिपणी-पुस्तकांनीं वरील अडचणींतून मला सोडविलें. ( या टिपणी-

पुस्तकाचा मला मोठाच आधार मिळाला.) या टिपणी-पुस्तकाखेरीज कांहीं इतर ग्रंथांचाही मला फार मोठा उपयोग झाला. अशा पुस्तकांत 'इतिहासाची रूपरेखा' (Outline of History) या एच्. जी. वेल्स् यांच्या पुस्तकाची मदत ही तर अत्यावश्यक अशीच होती. असें जरी असलें, तरी चांगल्या संदर्भग्रंथांचा अभाव ही मोठीच वास्तविक अडचण होती आणि त्यामुळें या कथेंतील कांहीं भाग पुष्कळदां उडत उडत सांगण्याची पाळी येई; आणि कांहीं वेळीं तर विशिष्ट कालखंड डोळ्यां-आड करून गाळूनच टाकावे लागत.

हीं पत्रें विशिष्ट व्यक्तीला उद्देशून लिहिलेलीं, अगदीं वैयक्तिक स्वरूपाचीं आहेत. त्यामुळें केवळ माझ्या मुलीच्यासाठींच लिहिलेल्या अशा पुष्कळ सलगीच्या छटा त्यांमध्यें आहेत. त्यांचें काय करावें हें कांहीं कळत नाहीं. कारण, त्या त्या ठिकाणामधून या छटा काढून टाकायचें म्हटलें, तर तें फार मोठ्या परिश्रमाचें काम आहे. म्हणून या छटा आहेत तशाच मीं ठेवून दिल्या आहेत.

शारीरिक काम नसलें म्हणजे माणसाला अंतर्निरीक्षण करावेंसें वाटतें आणि त्याच्या मनःस्थितींत वेगवेगळे विचारप्रवाह सारखे बदलत राहतात. मला वाटतें, असे हे बदलते विचारप्रवाह या पत्रांमध्यें ठिकठिकाणीं फार आढळून येतील आणि त्यामधील विषयाची चर्चा, मांडणी ही इतिहासकाराप्रमाणें निर्मम, केवळ वस्तुनिष्ठ आहे असें आढळणार नाहीं. मी स्वतःला इतिहासकार असें म्हणतच नाहीं. या पत्रां-मध्यें लहान वयाच्या वाचकांकरितां अगदीं प्राथमिक स्वरूपाचें लेखन आणि प्रौढ माणसांच्या विचारांची चर्चा अशी भेसळ झालेली दुर्दैवानें आढळेल. पुष्कळच वेळां त्याच त्याच गोष्टी लिहिलेल्या आहेत. वास्तविक पाहिलें तर या पत्रांमधील दोषाना अंतच नाहीं. हीं पत्रें म्हणजे भिन्न भिन्न ऐतिहासिक प्रसंगांचीं अगदीं वरवरचीं अंधुक चित्रें असून अगदीं बारीक अशा धाग्यानें तीं एकमेकांना जोडलेलीं आहेत. योगायोगानें हातीं येतील त्या पुस्तकांतून माझ्या कल्पना व प्रसंग यांची मीं उसनवारी केली आहे आणि त्यामध्यें पुष्कळ चुकांना अवसर मिळाला असण्याचा संभव आहे. एखाद्या तज्ज्ञ इतिहासकाराकडून हीं पत्रें दुरुस्त करून घ्यावींत असा माझा हेतु होता; परंतु तुरुंगाच्या बाहेर मिळालेल्या अगदींच थोड्या काळांत ही व्यवस्था करण्याला मला सवड सांपडली नाहीं.

या पत्रांमध्यें पुष्कळदां माझे विचार मीं थोडेसे चढाऊपणानें व्यक्त केलेले आहेत. तीं तीं माझीं मतें कायमच आहेत; परंतु पत्रें लिहीत असतांनाच ऐतिहासिक घटनांविषयींची माझी मनोभूमिका पालटत गेलेली आहे. आज जर हीं पत्रें पुन्हां लिहायला बसावें लागलें असतें, तर तीं मीं निराळ्या रीतीनें लिहिलीं असतीं किंवा निदान त्यां-मध्यें निराळ्याच गोष्टींवर भर दिला असता. परंतु लिहिलें आहे तें फाडून टाकून पुन्हां नवीनच लिहावयाला सुरुवात करणें माझ्याच्यानें होण्यासारखें नाहीं.

१ जानेवारी, १९३४ }

— जवाहरलाल नेहरू

# अनुक्रमणिका


| | | पृष्ठ |
|---|---|---|
| | वाढदिवसाचें पत्र | १ |
| १. | नव्या वर्षाची देणगी | ६ |
| २. | इतिहासाची शिकवण | ९ |
| ३. | इन्किलाब झिंदाबाद | १२ |
| ४. | आशिया आणि यूरप | १५ |
| ५. | प्राचीन संस्कृती आणि आमचा वारसा | १७ |
| ६. | हेलन लोक | २१ |
| ७. | ग्रीक नगर-राज्यें | २५ |
| ८. | पश्चिम आशियांतील साम्राज्यें | २८ |
| ९. | जुन्या परंपरेचें ओझें | ३२ |
| १०. | प्राचीन हिंदुस्थानांतील ग्रामीण लोकराज्यें | ३६ |
| ११. | चीनचीं एक हजार वर्षे | ४१ |
| १२. | गतकालाची गुणगुण | ४५ |
| १३. | संपात्ति जाते कोठें ? | ४९ |
| १४. | ख्रिस्तपूर्व सहावें शतक आणि धर्म | ५४ |
| १५. | इराण आणि ग्रीस ( यूनान ) | ६० |
| १६. | एका काळचें वैभवशाली हेलास | ६६ |
| १७. | विख्यात जेता पण घमेंडखोर तरुण | ७० |
| १८. | चंद्रगुप्त मौर्य आणि कौटिलीय अर्थशास्त्र | ७५ |
| १९. | तीन महिने | ८० |
| २०. | आरबी समुद्र | ८२ |
| २१. | सुटीचा काळ आणि एक स्वप्नयात्रा | ८४ |
| २२. | मनुष्याची उपजीविकेची धडपड | ८७ |
| २३. | सिंहावलोकन | ९१ |
| २४. | 'देवानाम् प्रिय' राजा अशोक | ९४ |
| २५. | अशोकाच्या काळचें जग | ९९ |
| २६. | चिन व हान घराणीं | १०३ |
| २७. | रोम विरुद्ध कार्थेज | १०७ |
| २८. | रोमचें लोकसत्ताक राज्य साम्राज्य बनतें | ११२ |
| २९. | दक्षिण हिंदुस्थानची उत्तर हिंदुस्थानवर मात | ११८ |
| ३०. | सरहद्दीवरील कुशानांचें साम्राज्य | १२३ |

| | पृष्ठ |
|---|---|
| ३१. ख्रिस्त आणि ख्रिस्ती धर्म - - - - | १२७ |
| ३२. रोमचें साम्राज्य - - - - - | १३३ |
| ३३. रोमन साम्राज्य दुभंगतें, आणि अखेरीस त्याची धुळधाण होते - | १३८ |
| ३४. जागतिक राज्याची कल्पना - - - - | १४३ |
| ३५. पार्थिया आणि सस्सन लोक - - - - | १४७ |
| ३६. दक्षिण हिंदुस्थानच्या वसाहती - - - - | १५० |
| ३७. गुप्तांच्या अमलांतील हिंदु-साम्राज्यशाही - - - | १५६ |
| ३८. हूण लोक हिंदुस्थानांत येतात - - - - | १६१ |
| ३९. हिंदुस्थानचा परकी बाजारपेठांवरील ताबा - - | १६३ |
| ४०. देशांच्या आणि संस्कृतींच्या भाग्याचे चढउतार - - | १६५ |
| ४१. तंग राज्याच्या अमलाखालीं चीनचा उत्कर्ष होतो - - | १७१ |
| ४२. चोसेन आणि दै निपॉन - - - - | १७७ |
| ४३. हर्षवर्धन आणि ह्यूएन चँग - - - - | १८४ |
| ४४. दक्षिणेंत कितीएक राजे, योद्धे आणि एक श्रेष्ठ पुरुष उदयाला येतात | १९१ |
| ४५. मध्ययुगीन भारत - - - - - | १९७ |
| ४६. डौलदार अङ्कोर नगरी आणि श्रीविजय - - - | २०१ |
| ४७. रोम अंधकारांत गडप होतें - - - - | २०७ |
| ४८. इस्लामचा उदय - - - - - | २१४ |
| ४९. आरबी लोक स्पेनपासून मंगोलियापर्यंतचा प्रदेश जिंकतात - | २२० |
| ५०. बगदाद आणि हरून-अल्-रशीद - - - | २२६ |
| ५१. उत्तर हिंदुस्थानांत हर्षापासून महमुदापर्यंत - - - | २३२ |
| ५२. यूरपांतील देशांचीं स्वरूपें निश्चित होतात - - - | २३९ |
| ५३. सरंजामी पद्धति - - - - - | २४६ |
| ५४. चीनमधून भटक्या टोळयांना पश्चिमेकडे पिटाळून देण्यांत येतें - | २५३ |
| ५५. जपानमधील शोगूनांचें राज्य - - - - | २५८ |
| ५६. मानवाची ज्ञानलालसा - - - - | २६२ |
| ५७. ख्रिस्तानंतर पहिल्या एक हजार वर्षांच्या अखेरीस - - | २६६ |
| ५८. आशिया व यूरप यांकडे आणखी एक दृष्टिक्षेप - - | २७४ |
| ५९. अमेरिकेंतील मय-सुधारणा - - - - | २८० |
| ६०. मोहेंजोदारोकडे आणखी एक उडी - - - | २८५ |
| ६१. कोर्डोबा आणि ग्रॅनाडा - - - - | २८८ |
| ६२. क्रूसेड किंवा ख्रिस्ती धर्मयुद्धें - - - - | २९५ |
| ६३. ख्रिस्ती धर्मयुद्धांच्या काळांतील यूरप खंड - - - | ३०२ |

पृष्ठ

६४. यूरपमधील शहरांचा उदय - - - - ३१०
६५. अफगाण लोक हिंदुस्थानवर स्वारी करतात - - - ३१८
६६. दिल्ली येथील गुलाम राजे - - - - ३२५
६७. चेंगीजखान आशिया आणि यूरप खंडाना हादरा देतो - - ३३०
६८. मोंगल लोक सर्व जगावर प्रभुत्व मिळवितात - - ३३९
६९. महान् प्रवासी मार्को पोलो - - - - ३४५
७०. रोमन धर्मपीठ लढाऊ बाणा स्वीकारतें - - - ३५१
७१. जोहुकुमी अमलाविरुद्ध झगडा - - - - ३५७
७२. मध्ययुगाचा अंत - - - - - ३६०

## नकाशे

१. पश्चिम आशिया खंड व आग्नेय यूरप खंड यांमधील सुधारणा - २४
२. चीन देशांतील सुधारणेचा प्रारंभ - - - ४२
३. ग्रीक लोक आणि इराणी लोक - - - ६४
४. ॲलेक्झांडरचें साम्राज्य - - - - ७३
५. अशोक २६८–२२६ ख्रिस्तपूर्व - - - १०१
६. रोमच्या राज्याचें साम्राज्य बनतें - - - ११६
७. कुशान साम्राज्याच्या काळीं हिंदुस्थान - - - १२४
८. हिंदुस्थान देश वसाहती स्थापतो - - - १५२
९. तंग वंशाचें साम्राज्य - - - - १७४
१०. आरबी लोकांचे विजय - - - - २२३
११. नवव्या शतकांतील यूरप खंड - - - - २४०
१२. इ. स. १००० च्या सुमारास आशिया खंड व यूरप खंड - २६८
१३. अमेरिकेंतील मय-सुधारणा - - - - २८२
१४. तेराव्या शतकांतील यूरप खंड - - - - ३०३
१५. चेंगीझखान – "परमेश्वराचा कोरडा" - - - ३३४

# वाढदिवसाचें पत्र

इंदिरा प्रियदर्शिनीस
तुझ्या १३ व्या वाढदिवसानिमित्त

*सेंट्रल प्रिझन, नैनी*
*२६* ऑक्टोबर, १९३०*

दरवर्षी वाढदिवसाच्या प्रसंगानें तुला भेटी आणि आशीर्वाद मिळत असतात. या नैनीच्या तुरुंगांतून आशीर्वाद काय, अगदीं भरपूर तुला मी पाठवूं शकेन. परंतु येथून बक्षीस मी तुला काय पाठविणार? येथून एखादा पदार्थ – खाण्यापिण्याजोगी – वापरण्या-ठेवण्याजोगी जड वस्तु – भेटीदाखल पाठविणें शक्यच नाहीं मला. तथापि अशी कांहीं एक भेट मी तुला खास पाठवूं शकेन, कीं जिला तुझ्यापर्यंत पोंचण्याला तुरुंगाच्या उंच भिंतीसुद्धां अटकाव करूं शकणार नाहींत. अर्थात् ही भेट विचारात्मक – भावनात्मक – आत्मिक स्वरूपाच्या वस्तूंचीच असूं शकणार. तूं अद्भुतरम्य अशा पऱ्यांच्या गोष्टी वाचल्या आहेस. त्या जशा कांहीं अदृश्य वस्तूंच्या भेटी देतात तशाच अदृश्य, मनोमय, अंतःकरणालाच फक्त समजणाऱ्या, दिसणाऱ्या, व्यक्त होणाऱ्या अशा वस्तूंचीच भेट मला येथून पाठवितां येण्यासारखी आहे.

पण कोणालाही उपदेशाचे घुटके पाजण्याची किंवा नीतीचीं व्याख्यानें झोडण्याची मला किती चीड आहे हें बाळ, तुला चांगलें ठाऊक आहे. असें कांहीं करण्याचा विचार एखादे वेळीं मनांत आला, कीं महापंडिताची – 'अत्यंत शहाण्या गृहस्थाची' – जी एक गोष्ट मीं पूर्वी वाचली आहे ती माझ्या मनांत उभी राहते. ज्या पुस्तकांत ही गोष्ट आहे तें पुस्तक पुढेंमागें तुझ्याही वाचनांत येईलच. तेराशें वर्षांपूर्वीं चीन देशांतून एक महान् प्रवासी हिंदुस्थानांत आला. येथें येण्यांत त्याचा हेतु, ज्ञान आणि शहाणपण हीं संपादावीं एवढाच होता. त्याचें नांव ह्युएन चँग. प्रवासामध्यें त्याला उत्तरेकडचे पर्वत आणि वैराण प्रदेश ओलांडावे लागले; कित्येक संकटांना तोंड द्यावें लागलें; कित्येक अडचणींशीं झगडून त्यांचा परिहार करावा लागला; पण त्याची ज्ञानाची तहान इतकी मोठी होती, कीं या सर्वांची त्यानें कांहीं फिकीर केली नाहीं. येथें आल्यानंतर स्वतः ज्ञान संपादन करीत आणि

* इंदिरेचा वाढदिवस इसवी सनाप्रमाणें नवंबर १९ ला पडतो. परंतु या सालीं तो २६ ऑक्टोबरला पाळण्यांत आला. याचें कारण हिंदी संवताप्रमाणें या दिवशीं जन्मतिथि पडली.

दुसऱ्याला आपल्याजवळचें ज्ञान देत देत त्यानें पुष्कळ वर्षें या देशांत घालविलीं. त्या वेळीं पाटलिपुत्र म्हणून प्रसिद्ध असलेलें जें पाटणा शहर त्याच्या शेजारीं नालंदाचें महान् विद्यापीठ होतें. विशेषतः त्या ठिकाणीं त्यानें बराच काळ घालविला. तेथें ह्युएन चँगनें पुष्कळच विद्या संपादन केली आणि त्याला "धर्मशास्त्रपारंगत" या अर्थाची वाचक अशी 'आचार्य' ही पदवी देण्यांत आली – अर्थात् धर्मशास्त्र म्हणजे त्या काळीं बुद्धधर्म होय. नंतर त्यानें साऱ्या भरतखंडभर प्रवास केला. प्राचीन काळीं या महान् देशामध्यें सर्व ठिकाणीं राहणाऱ्या निरनिराळ्या लोकसमाजांचें त्यानें निरीक्षण केलें. व त्यांच्या रीतीभातींचा व स्वभावविशेषांचा अभ्यास केला. पुढें आपल्या प्रवासाबद्दलचा एक ग्रंथ त्यानें लिहिला – माझ्या मनांत एक गोष्ट उभी राहते म्हणून जें मीं लिहिलें ती गोष्ट आपल्या या ग्रंथांत ह्युएन चँगनें लिहिलेली आहे. बिहारमध्ये हल्लीं भागलपूर म्हणून शहर आहे. त्याच्या आसपास कोठें तरी पूर्वी कर्णसुवर्ण नांवाची एक नगरी होती. त्या नगरींत दक्षिण हिंदुस्थानांतून कोणी एक गृहस्थ आला होता. त्याच्याविषयींची ती गोष्ट आहे. चँगनें असें लिहिलें आहे कीं, या मनुष्यानें आपल्या पोटाभोंवतीं तांब्याचे पत्रे बांधलेले असत आणि त्याच्या डोक्यावर एक पेटती मशाल असे. हातांत सोटा घेऊन मोठ्या अक्कडबाजपणानें आणि ऐटींत लांब लांब ढेंगा टाकीत या अशा विचित्र वेषांत तो सगळीकडे उन्मत्तपणें संचार करीत असे. आणि कोणीं जर त्याला या असल्या चमत्कारिक पेहरावाचें कारण विचारलें तर तो म्हणे, "माझ्या ठिकाणचें शहाणपण इतकें प्रचंड आहे कीं, जर पोटाभोंवतीं पत्र्याचें आवरण घातलें नाहीं तर तें शहाणपण पोटांत सामावून ठेवणें पोटाला शक्य होणार नाहीं; तर पोट फुटून तें शहाणपण बाहेर पडून जाईल अशी मला भीति वाटते; आणि माझ्या आजूबाजूंस राहणारे लोक इतके अज्ञानांधकारांत राहत आहेत, कीं त्यांच्या अज्ञानाची कींव येऊन त्यांना प्रकाश देण्यासाठीं मी मस्तकावर मशाल धारण करून हिंडतों."

आतां, शहाणपण पोटांत मावेनासें होऊन माझें पोट फुटण्याचें संकट उपस्थित होईल इतका मोठा शहाणपणाचा गड्डा मजजवळ नाहीं, याबद्दल मला खात्री आहे. त्यामुळें तांब्याचे पत्रे किंवा दुसरें कसलें चिलखत वापरण्याची मला आवश्यकता नाहीं. दुसरें असें, कीं जें कांहीं थोडेंफार शहाणपण माझ्या ठिकाणीं आहे तें कांहीं माझ्या पोटांत सांठविलेलें नाहीं हें खास. शरीराच्या कोणत्याही भागांत तें राहिलेलें असो, त्या ठिकाणीं आणखी पुष्कळ शहाणपणाला प्रवेश मिळण्याइतकी विपुल जागा आहे. आणि आतां जागा संपली, असें सांगण्याचा प्रसंग येण्याचा संभवच नाहीं. तेव्हां ज्या ठिकाणीं माझ्या स्वतःजवळचा शहाणपणाचा सांठाच इतका मर्यादित आहे, त्या ठिकाणीं कोणा मोठ्या ज्ञानी माणसाचा आव आणून लोकांना सदुपदेश करीत सुटणें हें मला कसें शोभेल? तेव्हां न्याय्य काय आणि अन्याय्य काय, काय करावें आणि काय करूं नये हें निश्चित करण्यासाठीं नीतिप्रवचनें झोडणें हा कांहीं खरा मार्ग नव्हे, असेंच माझें कायमचें मत बनलें आहे. त्यासाठीं परस्पर-संभाषण आणि संवाद यांचाच

खरा उपयोग आहे. कारण संवादांतूनच केव्हां तरी सत्याचा थोडासा तरी अंश बाहेर पडण्याचा संभव असतो. तुझ्याशीं अशीं संभाषणें करीत असतांना मला आनंद वाटत आला आहे आणि आपल्यामध्यें संवादही अनेक विषयांवर झालेले आहेत. परंतु आपल्याला दिसतें आहे हेंच जग किती विशाल आहे, आणि या जगाच्या पलीकडे दुसरीं चमत्कारमय आणि अज्ञात अशीं आणखी जगें कितीक आहेत; त्यामुळें आपलीं संभाषणें किंवा संवाद कंटाळवाणे होण्याचा मुळींच संभव नाहीं, अथवा ह्युएन चँगनें आपल्या गोष्टींत वर्णन केलेल्या अत्यंत मूर्ख आणि गार्विष्ठ माणसाप्रमाणें, जगांत शिकण्यासारखें होतें तें तें आपण सर्व शिकलों आहोंत, आतां आपलें ज्ञान परिपूर्ण झालें आहे, अशीही आपली समजूत होण्याचें कारण नाहीं. शिवाय, अशा तऱ्हेनें आपण पूर्ण ज्ञानी झालों असें वाटण्याचा आपल्या बाबतींत संभव नाहीं हेंच एकापरी बरें आहे. कारण अशा पूर्ण ज्ञानी माणसांना – अर्थात् अशीं कोणी माणसें खरोखरच असतील तर – आतां नवीन समजून घेण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं, या जाणिवेनें पुष्कळदां खेदच होण्याचा संभव असतो. नवीन गोष्टी शोधून काढण्यांत, नवीन गोष्टी समजून घेण्यांत जो आनंद आहे – अर्थात् ज्या कोणाची तशी इच्छा असेल त्याला या नवीन ज्ञानसंशोधनाच्या किंवा संपादनाच्या मार्गांत हवा तेवढा अचाट पराक्रम करण्याची संधि आहे – तो आनंदही अनुभवावयास मिळणें अशा पूर्ण ज्ञानी लोकांना सर्वतोपरि अशक्य असतें.

म्हणून मला नीतीवर कसलेंही प्रवचन झोडण्याची इच्छा नाहीं. तर मग मी करणार आहें तरी काय? संभाषणाचें काम कधीं पत्रानें का होऊं शकणार आहे? अगदीं संभाषणाचा भाव वठविल्यासारखें पत्र लिहिण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, तरी त्यांत बोलणें सगळें होणार तें केवळ एका बाजूनें. म्हणून माझ्या पत्रांत कांहीं भाग तुला उपदेशामृताच्या घुटक्यासारखा वाटला तरी ती एक कडू गोळी नाइलाज म्हणून गिळली पाहिजे अशी तूं समजूत करून घेऊं नकोस. तर जणुं कांहीं आपण परस्परांशीं बोलतोंच आहोंत, आणि बोलतां बोलतां तुझ्या विचारासाठीं म्हणून एखादा प्रश्न मीं तुझ्यापुढें मांडला आहे, अशा कल्पनेनें तूं माझ्या लिहिण्याकडे पाहा.

इतिहासामध्यें आपण राष्ट्राराष्ट्रांच्या जीवनांतील अत्यंत महत्त्वाच्या कालखंडांचे वृत्तांत वाचतों, त्या त्या ठिकाणच्या व काळच्या महान् स्त्रीपुरुषांचीं चरित्रें व त्यांनीं केलेलीं श्रेष्ठ कृत्यें यांचा आपण अभ्यास करतों; मग कधीं कधीं स्वप्नांत किंवा जागेपणींही विचारलहरींमध्यें जणुं कांहीं आपणच त्या प्राचीन काळांत गेलों आहों आणि त्या प्राचीन वीरपुरुषांप्रमाणें किंवा वीरस्त्रियांप्रमाणें आपणही मोठीं पराक्रमाचीं कामें करीत आहोंत, असें कल्पनासुख आपण अनुभवतों. आठवतें कां तुला, कीं अगदीं पहिल्यानें जेव्हां तूं जोन ऑफ आर्केची गोष्ट वाचलीस तेव्हां तुझें मन कसें भारल्यासारखें झालें होतें आणि आपण पण एक प्रकारें तिच्यासारखेंच व्हावें अशी तुझ्या मनांत महत्त्वाकांक्षा कशी उत्पन्न झाली होती? सामान्य पुरुष किंवा स्त्रिया हीं कांहीं नेहमींच अशीं वीरवृत्तीचीं नसतात. त्यांचे विचार आपली रोजची मीठभाकर, आपलीं

मुलेंबाळें, आपल्या कुटुंबाचीं सुखदुःखें या किंवा अशाच गोष्टींवर खिळलेले असतात. पण केव्हां तरी एक काळ असा येतो, कीं सगळा समाजच्या समाज एखाद्या श्रेष्ठ कार्याच्या निष्ठेनें भारला जातो आणि मग अगदीं सामान्य, साध्यासुध्या अशा स्त्रिया आणि पुरुष सुद्धां वीर बनतात आणि मग त्या समाजाचा इतिहास अंतःकरण खळबळून सोडणारा आणि क्रांतिकारक होतो. महान् नेत्यांच्या ठिकाणीं असेंच कांहीं असतें, कीं त्यामुळें सर्व समाजाला स्फूर्ति मिळते आणि त्यामधील सर्वांनाच महत्कार्यें करण्याची शक्ति येते.

ज्या वर्षी तुझा जन्म झाला-१९१७-तें वर्ष इतिहासातील असेंच एक संस्मरणीय वर्ष आहे. त्या वर्षी, गरीब, दलित, दीन, यांच्याविषयींच्या सहानुभूतीनें आणि प्रेमानें ज्याचें अंतःकरण ओथंबलेलें होतें अशा एका महान् नेत्यानें, इतिहासामध्यें कधींही विसरलें जाणार नाहीं असें एक उदात्त प्रकरण आपल्या समाजाकरवीं लिहविलें. ज्या महिन्यांत तुझा जन्म झाला त्याच महिन्यांत त्यानें – लेनिननें – तें मोठें क्रांतीचें कार्य सुरू केलें. आणि त्यामुळें आज रशिया व सायबेरिया यांचें सारेंच रूप पालटून गेलें आहे. तर आज इकडे आपल्या भारतवर्षांत दुसरा एक असाच महान् पुढारी कार्य करीत आहे. त्याच्याही अंतःकरणांत दुःखानें गांजलेल्यांबद्दल असेंच प्रेम ओथंबून राहिलें आहे आणि त्यांना साहाय्य करण्यासाठीं त्याच्या अंतःकरणाला सारखी तळमळ लागून राहिलेली आहे. आपल्या समाजानें पुन्हां पूर्ण स्वतंत्र व्हावें आणि भुकेनें मरणाऱ्या आणि गरीब, दीन, दलित अशा जनतेवरील दुःख व अन्याय यांचें दडपण नाहींसें व्हावें यासाठीं त्या आपल्या नेत्यानें आपल्या समाजाला एक प्रचंड पराक्रम आणि उदात्त त्याग करण्याची स्फूर्ति दिली आहे. आज बापूजी भले तुरुंगांत असोत, परंतु त्यांच्या संदेशाची जादू भारतवर्षांतील कोट्यवधि लोकांचीं अंतःकरणें नकळत भारून टाकीत आहे; आणि स्त्रीपुरुषच काय, परंतु लहान लहान बालकें सुद्धां जणुं आपल्याभोंवतींचें दुर्बलतेचें कवच फोडून आपलीं लहान लहान खुराडीं सोडून बाहेर येऊन भारतवर्षाच्या स्वातंत्र्याच्या लढाईंतील शिपाई होत आहेत. आज हिंदुस्थानांत आपण असा इतिहास घडवीत आहोंत; आपल्या डोळ्यांदेखत हें सारें घडत आहे. या सर्व भव्य इतिहास-नाटकांत आपल्यालाही थोडा भाग घ्यावयास सांपडत आहे, हें आपलें भाग्य आहे.

या प्रचंड चळवळीमध्यें आपली भूमिका कोणती असावी, त्यांत आपण कोणता भाग घ्यावा, कोणतें काम आपल्या वांट्यास येईल हें मला नाहीं सांगतां येणार. पण, कोणतें का काम येईना, एक गोष्ट आपण लक्षांत बाळगली पाहिजे ती ही, कीं जीमुळें आपल्या कार्याला कमीपणा येईल किंवा आपल्या समाजाच्या कीर्तीला – सन्मानाला – अब्रूला धक्का लागेल अशी कोणतीही कृति आपल्या हातून होतां कामा नये. आपल्यालाही भारतवर्षाचे शिपाई व्हायचें आहे ना? तर मग भारतवर्षाची अब्रू आपल्या हातांत आहे आणि ही अब्रू आपण एक पवित्र ठेव म्हणून संभाळली पाहिजे,

हें आपण नेहमीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. आपण काय करावें याबद्दल आपल्याला पुष्कळदां संशय उत्पन्न होईल. योग्य काय आणि अयोग्य काय याचा निर्णय करणें हो कांहीं सोपी गोष्ट नाहीं. तुला जेव्हां असा संशय उत्पन्न होईल, तेव्हां तुला एक कसोटी मी सांगून ठेवतों. तिचा तुला उपयोग होईल. कोणतीही गोष्ट तूं गुप्त रीतीनें करूं नको. किंवा जी गोष्ट दुसऱ्यापासून लपवून ठेवावीशी वाटते अशी कोणतीही गोष्ट करूं नको. कारण एखादी गोष्ट लपवावी अशी इच्छा होणें म्हणजे भीति वाटणें होय. पण भीति वाटणें ही फारच वाईट गोष्ट आहे. तुझ्यासारखीला ती मुळींच शोभण्यासारखी नाहीं. तूं निर्भय – शूर राहा, मग बाकीचें सगळें कांहीं आपोआप सुरळीत होईल. तूं शूर वृत्तीनें वागलीस म्हणजे तुला कधीं कशाची भीति वाटणार नाहीं. आणि मग ज्याबद्दल लाज वाटावी असें तुझ्या हातून कांहीं घडणार नाहीं. बापूजींच्या नेतृत्वाखालीं आपला जो प्रचंड स्वातंत्र्याच्या संग्राम चालला आहे, त्यांत गुप्तता किंवा लपवाछपवी कांहीं नाहीं हें तुला ठाऊकच आहे. लपवावें असें आमच्या-जवळ कांहीं नाहींच. आम्ही जें कांहीं करतों किंवा बोलतों, त्याचें भय वाटण्याचें आम्हांला कांहींच कारण नाहीं. आम्ही दिवसांढवळ्या पूर्ण प्रकाशांत – सूर्यदेवाच्या साक्षीनेंच जणुं – सारें कांहीं करीत आहोंत. याच रीतीनें आपल्या खाजगी जीवनांतही आपण सूर्याची मैत्री संपादन केली पाहिजे. जें करावयाचें तें सर्व प्रकाशांत केलें पाहिजे आणि कोणतीही गोष्ट गुप्तपणें किंवा लपूनछपून, चोरून करतां कामा नये. अर्थात् केवळ आपल्यापुरता खासगी म्हणून जीवनांत कांहीं भाग असणें शक्य आहे, किंबहुना असावाही; परंतु अशी खासगत गोष्ट गुप्त किंवा लपूनछपून केल्या जाणाऱ्या गोष्टींहून अगदीं निराळी आहे. अशी जर तूं वागलीस, तर बाळ, तूं तेजस्वी मुलगी होशील, आणि कसाही प्रसंग आला तरी तूं निर्भय, प्रशांत आणि निर्विकार राहूं शकशील.

हें पत्र केवढें तरी लांब झालें आहे. आणि तरी सुद्धां तुला सांगावेंसें वाटतें असें किती तरी शिल्लकच आहे अजून. पत्रामध्यें तें सगळें मावेल तरी कसें ?

आज आपल्या देशामध्यें जें मोठें स्वातंत्र्ययुद्ध चालू आहे तें तुला प्रत्यक्ष तुझ्या-समोर पाहायला मिळत आहे हें तुझें भाग्य आहे हें वर मीं लिहिलेंच. तुझें आणखी एक मोठें भाग्य आहे, कीं तुला मोठी शूर आणि अत्यंत गोड, प्रेमळ स्वभावाची आई लाभली आहे. आणि जेव्हां केव्हां तुला एखाद्या प्रश्नाबद्दल संशय उत्पन्न होईल किंवा कोठली अडचण वाटेल, तेव्हां तिच्याहून जास्त चांगली मदत इतर कोणाकडूनही तुला होणार नाहीं.

म्हणून आतां पुरें करतों. भारतवर्षाच्या सेवेसाठीं तूं एक शूर शिपाई व्हावीस, हीच माझी मनांतील एक इच्छा आहे बाळ !

अत्यंत प्रेमपूर्वक आशीर्वाद.

# १

# नव्या वर्षाची देणगी

*नववर्षदिन (१ जानेवारी), १९३१*

दोन वर्षांपूर्वी तूं मसूरीला राहत होतीस. आणि मी अलाहाबादला राहत होतों. त्या वेळीं मीं तुला लिहिलेलीं पत्रें तुला आठवतात का? तुला तीं पत्रें आवडलीं होतीं असें तेव्हा तूं म्हणाली होतीस. त्यामुळें पुष्कळदां माझ्या असें मनांत येई कीं, ती पत्र-मालिका तशीच पुढें आणखी चालू ठेवली तर? त्यायोगें आपल्या या जगाविषयीं आणखी जास्त कांहीं तरी सांगण्याचा प्रयत्न मला करतां येईल. परंतु आतांपर्यंत त्य कामाला हात घालण्याची माझ्या मनाची तयारी होईना. जगताची भूतकालीन हकीकत, त्यामधील श्रेष्ठ स्त्रीपुरुष, त्यांचीं महान् कार्यें यांबद्दलचें चिंतन करणें ही मोठी मनोरंजक गोष्ट आहे. इतिहास वाचणें हें केव्हांही आनंददायक आहे. परंतु इतिहास घडविण्याला मदत करणें हें त्याहून किती तरी अधिक आनंददायक आणि मनोवेधक आहे. आजच्या घटकेला आपल्या देशांत इतिहास घडविला जात आहे हें तुला ठाऊकच आहे. हिंदुस्थानचा भूतकाल फारच मोठा आहे; कल्पना करता येणार नाहीं इतका तो दीर्घकालीन आहे; त्याचे पहिले पहिले भाग इतिहासकालाच्या पूर्वीच्या अज्ञानांधकारांत गडप झालेले आहेत. त्या इतिहासांत असे कांहीं थोडे खेददायक आणि दुःखमय भाग अवश्य आहेत, कीं ज्यामुळें आपल्याला मान खालीं घालावी लागावी किंवा आपलें मन खट्टू व्हावें; परंतु सामान्यतः आपला भूतकाल इतका चांगला वैभवशाली आणि तेजस्वी आहे, कीं त्याचा आपल्याला अभिमानच वाटावा आणि आपलें मन आनंदानें भरून जावें. तरी सुद्धां आजच्या घटकेला भूतकालाविषयीं विचार करीत बसण्याला आपल्याला रिकामा वेळ नाहीं. कारण आज आम्ही आमच्या भविष्यकाळाची घडण घडविण्यांत गुंतलों आहों; आमचा सर्व वेळ आणि कर्तृत्व हीं वर्तमानकालावर त्या दृष्टीनें परिणाम करण्यासाठीं सर्वतोपरि खर्च होत आहेत; आमचीं मनें सर्वस्वीं भविष्यकालच्या चित्रांनीं भारलेलीं आहेत.

येथें या नैनीच्या तुरुंगांत मनाला वाटेल तें वाचायला आणि लिहायला मला भरपूर वेळ आहे. परंतु लिहिण्या-वाचण्यावर माझें मन स्थिर होत नाहीं. तें येथून निसटून बाहेर भटकतें; आणि बाहेर जो मोठा संग्राम चालला आहे त्याचेच सर्व विचार मनात येऊं लागतात; लोक काय करीत आहेत, आपण बाहेर असतों तर काय काय केलें असतें, याचींच चित्रें डोळ्यांपुढें येतात. वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ यांनीं माझें मन इतकें भरून गेलें आहे, कीं भूतकाळचा विचारच माझ्या मनांत येत नाहीं. परंतु हें माझें चुकतें आहे असें मात्र मधून मधून मला जरूर वाटतें. कारण बाहेरच्या कार्यांत मला जर कांहीं भाग घेतां येण्यासारखा नाहीं तर त्याबद्दल मीं व्यर्थ चिंता करीत कां बसावें?

पण पत्रें लिहिण्याचें आजवर मी टाळीत आलों याचें खरें कारण मात्र निराळेंच आहे. सांगूंच का तें तुला? मात्र अगदीं गुपित आं! केवळ तुलाच आणि अगदीं कानांत सांगेन. कारण खरें असें आहे, कीं बाईसाहेब, तुम्ही आतां झपाट्यानें मोठ्या होऊं लागलां आहांत; आणि केवढ्या बड्या पंडिता होऊं लागलां आहांत! त्यामुळें मी शाळेंत आणि कॉलेजांत किंवा त्यानंतर जें कांहीं शिकलों तें तुम्हांला पुरेसें वाटेल कीं नाहीं कोणास ठाऊक? निदान बहुतेक सारें तुम्हांला अगदीं शिळें–जुनाट वाटायचें! फार कशाला, आणखी थोडे दिवस जाऊं द्या, म्हणजे तुम्हीच माझ्या शिक्षक व्हाल आणि कितीक नव्या गोष्टी मला शिकवूं लागाल. तुझ्या गेल्या वाढदिवसाच्या दिवशीं मीं तुला पत्र लिहिलें त्यांतच मीं तुला लिहिलें नव्हतें का, कीं ज्ञान मावत नाहींसें होऊन पोट फुटूं नये यासाठीं तांब्याचे पत्रे शरीराभोंवतीं बांधून फिरणाऱ्या त्या महान् ज्ञानी पुरुषाप्रमाणें मी मुळींसुद्धां नाहीं म्हणून?

तूं मसूरीला होतीस त्या वेळीं मीं जगाच्या अगदीं पहिल्या पहिल्या काळाबद्दल लिहीत होतों; हें लिहिणें मला अगदीं सोपें वाटे. कारण या काळाबद्दलचें आपलें सर्वांचेंच ज्ञान अगदींच अंधुक आणि ढोबळ आहे. परंतु हा अतिप्राचीन काळ सोडून आपण पुढें येऊं लागलों म्हणजे हळूहळू इतिहासकालाला सुरुवात होते; आणि जगाच्या निरनिराळया भागांत मनुष्याच्या अगदीं नवीन प्रकारच्या विलक्षण विविध जीवनाला आरंभ होऊं लागतो. मनुष्याचा हा जीवनक्रम केव्हां केव्हां मोठा शहाणपणाचा झालेला दिसतो, तर केव्हां केव्हां त्यांत साराच मूर्खपणा आढळतो; या त्याच्या अशा जीवनक्रमाचा मागोवा घेत पाहत जाणें—पहिल्यापासून शेवटपर्यंत क्रमाक्रमानें त्याचें नीट निरीक्षण करणें—हें कांहीं वाटतें तितकें सोपें काम नाहीं. म्हणून जागतिक इतिहासाची एक सुसंगत कथा तुला सांगावी अशी माझ्या मनांत पुष्कळ तीव्र इच्छा असली, तरी येथून तें कार्य करतां येईल असें कांहीं मला वाटत नाहीं. मुलामुलींनीं फक्त एखाद्या देशाच्याच इतिहासाचा अभ्यास करावयाचा; आणि तो अभ्यास म्हणजे तरी काय, तर पुष्कळदां नुसत्या कांहीं तारखा व सन आणि थोड्या अवांतर गोष्टी यांची फक्त घोकंपट्टी करावयाची, या प्रकाराचा मला अगदीं तिटकारा आहे: खरें म्हणजे साऱ्या जगाचा इतिहास ही सलग अशी एक गोष्ट आहे; आणि जगाच्या बाकीच्या इतर भागांत काय काय घडलें हें जर तुम्हांला ठाऊक नसेल, तर एका विशिष्ट देशाच्या इतिहासाची सुद्धां तुम्हांला चांगलीशी समजूत करून घेतां येणार नाहीं. तूं तरी, एखाददुसऱ्या देशाच्या पलीकडे पाह्यचेंच नाहीं, अशा कोत्या दृष्टीनें इतिहासाचा अभ्यास करूं नयेस असें मला वाटतें; तर साऱ्या जगाच्या इतिहासाचें तूं निरीक्षण करावेंस. आपली पुष्कळदां कल्पना असते तितका निरनिराळया ठिकाणच्या लोकांत मोठा फरक खरोखर नसतो हें तूं नेहमीं लक्षांत बाळग. नकाशांत आणि भूगोलाच्या पुस्तकांत निरनिराळया देशांचे निरनिराळे रंग दाखविलेले असतात. परंतु नकाशांतील देशांचे रंग किंवा सरहद्दी यामुळें आपण आपली दिशाभूल करून

घेतां उपयोगी नाहीं. कारण निरनिराळ्या लोकांत कांहीं कांहीं फरक असतात हें जरी खरें असलें, तरी त्यांच्यामध्यें सारखेपणाच फार मोठ्या प्रमाणांत असतो हें लक्षांत ठेवणें अत्यंत आवश्यक आणि हिताचें आहे.

इतिहास जसा लिहावा असें मला वाटतें, तसा इतिहास मला येथून लिहितां येणार नाहीं. त्यासाठीं तुला मधून मधून निराळीं पुस्तकें वाचलीं पाहिजेत. परंतु मी तुला भूतकालासंबंधीं थोडें थोडें कांहीं कांहीं लिहीत जाईन. पूर्वीच्या काळांत वेळोवेळीं कोण कोण लोक होऊन गेले आणि जगताच्या रंगभूमीवर कोणीं कोणीं मोठ्या भूमिका केल्या हें थोडेंसें मला सांगतां येईल.

माझ्या पत्रांनीं तुझ्या मनाचें रंजन होईल कीं नाहीं किंवा त्यांमुळें तुझी जिज्ञासा जागृत होईल कीं नाहीं, हें मला सांगतां येणार नाहीं. खरें म्हणजे हीं पत्रें तुला केव्हां पाहायला मिळतील, का तुला तीं कधीं दिसणारच नाहींत, हेंही मला सांगतां येणार नाहीं. आपणां दोघांचें राहणें इतकें जवळ असावें, आणि तरीही आपल्या-मधील अंतर इतकें प्रचंड असावें, हें किती चमत्कारिक आहे! मसूरीमध्यें तूं माझ्यापासून शेंकडों मैल दूर राहत होतीस. तरी सुद्धां तुला मी हवीं तितकीं पत्रें लिहूं शकत असें आणि तुला भेटायची इच्छा तीव्र झाली कीं तडक तुझ्या-कडे मी निघून येत असें. आणि आज आपण राहतों कसे, तर यमुनेच्या एका बाजूला तूं आणि दुसऱ्या बाजूला मी – आणि दोघांमधील अंतर किती तरी थोडें. तरी पण नैनीच्या तुरुंगाच्या या उंच भिंती आपल्याला चांगल्याच दूर ठेवीत आहेत. येथून पंधरा दिवसांनीं फक्त एक पत्र मला लिहितां येणार आणि पंधरा दिवसांनीं एक बाहेरचें पत्र मला मिळणार; तशीच पंधरा दिवसांनीं एकदां भेट मिळणार; ती तरी किती वेळ, तर फक्त वीस मिनिटें. बाकी हीं बंधनेंही एका दृष्टीनें चांगलींच आहेत म्हणायचीं. कारण सहजासहजीं जी वस्तु आपल्याला मिळते तिची नीट किंमत आपल्याला सहसा समजत नाहीं; आणि प्रत्येकाच्या शिक्षणक्रमांत तुरुंगवासाचा कांहीं काळ असावा ही मोठीच इष्ट गोष्ट आहे, असें आतांशा मला वाटूं लागलें आहे. केवढी भाग्याची गोष्ट आहे, कीं आपल्या देशांत हजारो लोकांच्या शिक्षणक्रमांतील हाच भाग सध्यां चालू आहे.

हीं पत्रें तूं वाचशील तेव्हां तुला तीं आवडतील कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. तरी पण तीं लिहावयाचीं असें मीं ठरविलें आहे. त्यामुळें माझ्या मनाला तरी खास आनंद होईल. या पत्रामुळें तूं माझ्याजवळ आल्यासारखें वाटतें आणि जणुं कांहीं मी तुझ्याशींच गप्पागोष्टी करीत आहें, अशी माझी भावना होते. वारंवार मला तुझी आठवण येते; पण आज सारा दिवस तूं माझ्या मनापुढून हालतच नाहींस. आज वर्षाचा पहिला दिवस. मोठ्या पहांटे अंथरुणांत पडून पडूनच मी आकाशांतील तारकांकडे पाहत होतों. त्या वेळीं नुकतेंच संपलेलें तें महान् वर्ष, त्यामधील आमच्या आशा, अंतःकरणाची तगमग, आनंद आणि वर्षाच्या अवधींत करण्यांत आलेलीं तीं सर्व भव्य

आणि धीरोदात्त कृत्यें यांचा विचार माझ्या मनांत घोळत होता. स्वाभाविकच त्या क्षणीं, ज्यांनीं आपल्या जादूच्या स्पर्शानें आमच्या जीर्ण देशाला पुन्हां तारुण्य आणि नवचैतन्य दिलें, परंतु आज जे येरवड्याच्या तुरुंगाच्या कोठडींत बसलेले आहेत, त्या बापूजींचें स्मरण मला झालें. आपल्या दादूंची आणि दुसऱ्याही इतर मंडळींची मला आठवण झाली. तुझ्या आणि तुझ्या आईविषयींचे विचार तर माझ्या मनांत विशेषच घोळत राहिले. पुढें सकाळ होऊन बराच वेळ गेल्यावर बातमी आली, कीं तुझ्या आईला पकडून तुरुंगांत नेण्यांत आलें. मला ती नव्या वर्षाची सुखद देणगीच वाटली. पुष्कळ दिवसांपासून असें होणार ही अपेक्षाच होती. आज तुझ्या आईला आतां संपूर्ण समाधान आणि सुख झालें असेल याबद्दल मला मुळींच संदेह नाहीं.

पण तुला मात्र आतां विशेषच एकटें एकटें वाटणार. पंधरवड्यांतून एकदां आईची आणि एकदां माझी अशी तुला भेट घेतां येईल, आणि आमचे निरोप एकमेकां-कडे नेतां-आणतां येतील. पण मला मात्र हातांत कागद आणि पेन घेऊन बसावें लागणार आणि तुझें चिंतन करीत राहावें लागणार. अर्थात् अशा वेळीं तूं अगदीं हळूच माझ्याजवळ येत जाशील आणि मग आपण खूप खूप बोलूं. मग आपण भूतकालीन इतिहासाचीं चित्रें मनश्चक्षूंपुढें रंगवूं आणि भूतकालापेक्षांही श्रेष्ठ असा भविष्यकाळ आपणांस कसा घालवितां येईल याचा मार्ग आपण शोधून काढूं. म्हणून या नववर्षाच्या दिवशीं आपण प्रतिज्ञा करूं या, कीं हळूहळू हेंही वर्ष संपून जाईल त्या वेळीं तेजस्वी भविष्यकाळचें हें आपलें मनोराज्य आपण वर्तमानकाळाच्या अधिक जवळ आणूं आणि हिंदुस्थानच्या गत इतिहासाच्या ग्रंथांत एका नवीन देदीप्यमान् पानाची भर घालूं.

## २

## इतिहासाची शिकवण

*५ जानेवारी, १९३१*

काय बरं लिहूं मी तुला बाळ? कोठून सुरुवात करूं? पूर्व कालाचा विचार करूं लागलों कीं माझ्या मनापुढें असंख्य चित्रें गर्दी करूं लागतात. त्यांतील कांहीं चित्रें बाकीच्यांपेक्षां मनांत अधिक काळ घोळत राहतात. तीं माझीं मोठीं आवडतीं चित्रें आहेत. सहजच त्यांच्यामध्यें माझें मन अतिशय गुंतून जातें व नकळतच भूतकाळाचे प्रसंग आणि आज जें कांहीं घडत आहे तें, यांची मी तुलना करूं लागतों; आणि मीं कसें वागावें याबद्दल कांहीं मार्गदर्शक शिकवण त्यांतून मला मिळते का हें पाहूं लागतों. पण माणसाचें मन म्हणजे कशी एक अजब खिचडी आहे. त्याच्यामध्यें किती ते विचार खेचून भरलेले असतात, पण त्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नसतो. आणि असंख्य

कल्पनाचित्रें तरी किती अस्ताव्यस्त पडलेलीं असतात; एखाद्या चित्रशाळेमध्यें उगीच हवीं तशीं इकडे तिकडे चित्रें टाकून ठेवलेलीं चित्रें असावींतना, तशा चित्रशाळेसारखाच जणुं आपल्या मनाचा पसारा असतो. परंतु तसें पाहिलें तर हा कांहीं सगळाच आमचा दोष नव्हे. घडलेले प्रसंग सुसंगतवार क्रमानें जुळवून आपल्या मनामध्यें पुष्कळच चांगल्या रीतीनें सांठविणें आपल्यापैकीं बहुतेकांना खात्रीनें शक्य आहे. परंतु कांहीं कांहीं वेळां हे प्रसंगच अतिशय विलक्षण असतात आणि सर्वसामान्य इतिहासाच्या सुसंगत क्रमांत ते बसवितांच येत नाहींत.

मला वाटतें, मीं पूर्वी एकदां तुला इतिहासापासून आपण काय शिकावें हें लिहिलें आहे. हळूहळू का होईना पण जगाची प्रगतिच कशी होत आली आहे; प्रथम अगदीं साधे प्राणी जगांत होते, ते जाऊन त्यांच्या जागीं अधिक गुंता-गुंतीचीं शरीरें असलेलीं आणि अधिकाधिक प्रगत व कर्तृत्ववान् जीवसृष्टि कशी निर्माण होत गेली, त्यांत शेवटीं सर्वांहून अधिक श्रेष्ठ व सामर्थ्यवान् असा प्राणी म्हणजे मनुष्य कसा अस्तित्वांत आला, आपल्या बुद्धीच्या बळावर त्यानें इतर सर्व प्राणिमात्रावर प्रभुत्व कसें संपादन केलें, या गोष्टी मीं तुला लिहिल्या आहेत. रानटी अवस्थेतून मनुष्य संस्कृति व सुधारणा यांनीं संपन्न कसा झाला हें दाखविणें हाच इतिहासाचा विषय होय असें मानण्यांत येतें. सहकार्याची किंवा एकमेकांच्या जोडीनें काम करण्याची कल्पना कशी वाढत आली आणि सर्वांच्या हितासाठीं एकमेकांनीं सहकार्यानें वागणें हेंच आपलें ध्येय असणें कसें आवश्यक आहे, हेंही कांहीं पत्रांत मीं तुला दाखविलें आहे. परंतु भिन्न भिन्न कालांतील इतिहासांच्या विशाल क्षेत्रांचें अवलोकन करीत असतां कधीं कधीं असा संदेह उत्पन्न होतो, कीं सहकार्याच्या या ध्येयाची म्हणण्याजोगी अशी खरीच कांहीं प्रगति झाली आहे का? किंवा माणसामध्यें कांहीं विशेष मोठी सुधारणा झाली आहे का? संस्कृति वाढली आहे का? आज जगांत भरपूर काय आढळतें—तर परस्पर-सहकार्याचा अभाव; एका देशानें अथवा समाजानें दुसऱ्या देशावर अथवा समाजावर जुलूम करणें किंवा एका माणसानें दुसऱ्याची पिळणूक करणें याच गोष्टी. कोट्यवधि वर्षांच्या प्रगतीनंतर आपण अद्यापिही जर इतके मागासलेले आणि अपूर्ण आहों, तर शहाण्या आणि न्यायी माणसासारखें वागूं लागण्याचें शिकावयाला आपल्याला याहूनही आणखी किती दीर्घ काळ लागावयाचा आहे? आपल्याहूनही अधिक चांगले, अधिक सुसंपन्न आणि अधिक सुसंस्कृतही वाटावेत अशा कांहीं भूतकालीन कालखंडांचा इतिहास केव्हां केव्हां आपल्या वाचनांत येतो, तेव्हां तर आपलें जग पुढें जात आहे कीं मागें जात आहे याचाच आपल्याला संशय पडतो. आपल्या देशाच्या इतिहासांत तर हल्लींच्यापेक्षां एकूण एक बाबतींत अतिशय श्रेष्ठ असे पुष्कळच कालखंड भूतकालीं होऊन गेलेले आढळतात.

हिंदुस्थान, ईजिप्त, चीन, ग्रीस या किंवा इतरही पुष्कळ देशामध्यें प्राचीन काळीं मोठे वैभवशाली कालखंड होऊन गेले आहेत आणि यांपैकीं पुष्कळ देश माघार खाऊन

मागें सांदीकोपऱ्यांत जाऊन पडले आहेत. असें असूनही आपण धीर सोडतां उपयोगी नाहीं. जग अत्यंत विशाल आहे आणि मधून मधून कांहीं काळ एखाद्या राष्ट्राचा उत्कर्ष झाला किंवा ऱ्हास झाला, तरी त्यानें सबंध विश्वाच्या जीवनांत कांहीं विशेषसा फरक होण्यासारखा नाहीं.

आजकाल जगामध्यें आपली प्रचंड आधुनिक सुधारणा, व संपन्न आणि शास्त्रीय चमत्कार यांबद्दल पुष्कळ मंडळींना मोठा गर्व वाटत असतो. शास्त्रानें खरोखरच मोठे चमत्कार केले आहेत आणि जगांतील महान् श्रेष्ठ शास्त्रज्ञ सर्वतोपरि आपल्या आदरास पात्रच आहेत. याबद्दल जे फुशारकी मारतात ते स्वतः मात्र क्वचितच कधीं खरे श्रेष्ठ असलेले आढळतात. तसेंच कितीएक बाबतींत माणसाला इतर प्राण्यांहून कांहीं विशेष मोठी प्रगति अद्यापही करतां आली नाहीं हेंही लक्षांत घेण्यासारखें आहे. तसें पाहिलें तर कांहीं बाबतींत कांहीं कांहीं मनुष्येतर प्राणीच माणसापेक्षांही अधिक श्रेष्ठ आहेत अद्यापि. वरवर पाहतां हें विधान खुळचटपणाचें भासेल आणि ज्यांचें ज्ञान पुरेसें नाहीं तें हें ऐकून हंसतील. परंतु तूं स्वतः मेटरलिंकचा "मुंगी, वाळवी व मधमाशी यांचें जीवन" हा ग्रंथ वाचला आहेस आणि या कीटकांच्या जीवनांतील अत्यंत आश्चर्यकारक सामाजिक संघटनेची ओळख तुला पटली आहे. जगांतील प्राणिमात्रामध्यें अगदीं क्षुद्र कीटक म्हणून या जीवांची आपण हेटाळणी करतों; परंतु या राईएवढ्या जीवांनीं मनुष्यापेक्षां किती तरी श्रेष्ठ दर्जाची परस्पर-सहकार्याची कला व सर्वांच्या हितासाठीं त्यागाची संथ्य आत्मसात् करून घेतली आहे. वाळवी आणि ती करीत असलेली आपल्या जोडीदारासाठींचा त्याग यांचा वृत्तांत मीं वाचला तेव्हांपासून या प्राण्याबद्दल माझ्या मनांत एक विशेष जिव्हाळा उत्पन्न झाला आहे. परस्पर-सहकार्य आणि सामाजिक हितासाठीं स्वार्थत्याग या गोष्टी जर सुसंस्कृतपणाच्या कसोट्या असतील, तर या बाबतींत वाळवी ही माणसाहून अधिक श्रेष्ठ आहे असें म्हणण्यास आपल्याला कांहीं हरकत नाहीं.

संस्कृतमध्यें एक श्लोक[1] आहे; त्याचा अर्थ असा आहे: कुटुंबाकरितां व्यक्तीचा त्याग करावा, समाजासाठीं कुटुंबाचा त्याग करावा, आणि आत्म्यासाठीं सर्व जगताचा त्याग करावा. आत्मा म्हणजे काय याचे ज्ञान आपल्यापैकीं क्वचितच कोणाला असेल किंवा त्याची माहिती क्वचितच कोणाला सांगतां येईल; आपल्यापैकीं प्रत्येकाची त्याबद्दलची भूमिका अगदीं वेगवेगळी असूं शकेल. परंतु या संस्कृत श्लोकांत जो उपदेश आहे, तो वर म्हटलेल्या परस्पर-सहकार्याबद्दल आणि सार्वत्रिक हितासाठीं करावयाच्या त्यागाबद्दलच आहे. हिंदुस्थानांतले आम्ही लोक खऱ्या श्रेष्ठपणाचा हा अत्यंत प्रभावशाली पंथ पार विसरून गेलों होतों. आणि म्हणूनच आपली अवनति झाली होती. पण या सद्गुणाची आतां आम्हांला पुन्हां पुसट पुसट ओळख होऊं

---

[1] त्यजेदेकं कुलस्यार्थे । ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्यार्थे । आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥
— पंचतंत्र

लागली आहेसें दिसूं लागलें आहे आणि त्या योगानें सारा देश खडबडून गेला आहे. असंख्य स्त्री-पुरुष, मुलें-मुली हंसतमुखानें भारताच्या ध्येयसाधनाच्या मार्गावर पुढें पाऊल टाकीत आहेत. आणि त्या कामांत कष्टांची, व्यथेची किंवा हालांची रतिभरही पर्वा तीं करीत नाहींत. हें पाहिलें म्हणजे केवढा विस्मय व अभिमान वाटतो. त्यांच्या तोंडावर हास्य झळकावें हें किती स्वाभाविक आहे; कारण एका प्रचंड कार्याला हातभार लावण्याचा महदानंद त्यांना लाभत आहे. आणि त्यांच्यापैकीं जे भाग्यवान् आहेत त्यांना त्याग करण्याची संधिही मिळत आहे. आज आपण भारताला दास्यमुक्त, स्वतंत्र करण्याठीं झटत आहोंत ही मोठीच गोष्ट आहे. परंतु सर्व मानवजातीच्या सुखाचें कार्य हें त्याहूनही मोठें आहे. आणि आमचा हा झगडा हाही अखिल मानवजातीचें दुःख व दैन्य नाहींसें करण्यासाठीं सर्व विश्वभर चाललेल्या झगड्याचाच एक भाग आहे, हीच आपली भावना असल्यामुळें जागतिक प्रगतीच्या कार्मी आपलाही थोडाफार हातभार लागत आहे, याबद्दल आपल्याला आनंद होणें साहजिक आहे.

परंतु त्याच काळांत तूं तिकडे आनंदभवनांत, तुझी आई मलाका तुरुंगांत आणि मी येथें नैनीच्या तुरुंगांत अशीं आपण बसलों आहों, आणि एकमेकांची भेट होत नाहीं म्हणून कधीं कधीं अतिशय खिन्न होऊन जात आहों—खरें कीं नाहीं? पण आपण तिघे जण पुन्हां एकत्र येऊन भेटूं त्या दिवसाचा विचार केला तर? मी तरी त्याकडेच दृष्टि लावून राहीन आणि त्या विचारांत माझें हृदय थोडें तरी हलकें होईल व माझा उत्साह थोडा तरी वाढेल.

## ३

## इन्किलाब झिंदाबाद[1]

७ जानेवारी, १९३१

**प्रियदर्शिनी**[2]—दर्शनाला प्रिय तर खरीच, परंतु तें दर्शन अशक्य झालें असतांना त्याहूनही अधिक प्रिय! आज मी तुला पत्र लिहावयाला म्हणून जो बसलों तोंच दूर आभाळ गडगडल्यासारख्या कांहीं गर्जना माझ्या कानांवर आल्या. या गर्जना कसल्या याची पाहिल्यानें मला नीटशी कल्पना करतां येईना; परंतु त्यांतील तो नाद मात्र माझ्या ओळखीचासा वाटला आणि माझ्या हृदयांतून त्याचा प्रतिध्वनीच उमटतो आहे असें मला वाटूं लागलें. हळूहळू या गर्जना जवळ जवळ येतातसें वाटूं लागलें. व त्यांचा आवाजही चढत चालला; पुढें लौकरच या गर्जना कसल्या याबद्दल कसलाच

१ इन्किलाब झिंदाबाद म्हणजे "क्रांति चिरायु होवो."

२ प्रियदर्शिनी हें इंदिरेचेंच दुसरें नांव.

संशय राहिला नाहीं. 'इन्किलाब झिंदाबाद, इन्किलाब झिंदाबाद' अशा त्या उत्साही आरोळ्यांनीं सारा तुरुंग दणाणून गेला. आणि आमच्या अंतःकरणांत आनंद उचंबळला. तुरुंगाच्याबाहेर आमच्यापासून इतक्या जवळ, आमच्या लढ्यामधील ही गर्जना करणारी मंडळी कोण होती, अलाहाबाद शहरांतलेच कोणी स्त्रीपुरुष ते होते कीं खेडेगांवांतले शेतकरी होते हें मला माहीत नाहीं. आणि आज या गर्जना करण्याचें निमित्त काय होतें हेंही मला माहीत नाहीं. पण ते कोणी जरी असले तरी त्यांनीं आमचीं अंतःकरणें उत्साहानें भारलीं हें खरें. आम्ही कांहीं न बोलतांच त्यांच्या त्या अभिवादनाला मूक संदेश पाठविला, आणि मनानेंच त्यांना मूक आशीर्वाद चिंतिले.

आपण "इन्किलाब झिंदाबाद" अशी गर्जना कां करावी? क्रांति आणि बदल आम्हांला हवींशीं कां वाटावीं? साऱ्या भारतवर्षाला फार मोठा बदल आज हवा आहे, ही गोष्ट अगदीं निःसंशय आहे. परंतु आम्हांला जो मोठा बदल हवा आहे तो घडून आला आणि भारतवर्ष स्वतंत्र झाला, तरीही आम्हांला स्वस्थ बसून राहतां येणार नाहीं. जगांत जें जें कांहीं जिवंत आहे त्यामध्यें नित्य बदल होत राहिल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. प्रत्येक दिवशीं, प्रत्येक क्षणीं सारी सृष्टि बदलत आहे; ज्यांच्यांत जीव उरला नाहीं अशा गोष्टींचीच वाढ फक्त बंद होते. व त्या स्थिर पडून राहूं लागतात. जिवंत पाणी हें वाहत असतें, आणि त्याला बांध घालून अडविण्याचा प्रयत्न तुम्हीं केलात, तर कोंडल्यामुळें त्याच्यावर नीळ आणि शेवाळ सांठतें. मनुष्याचें जीवन किंवा राष्ट्राचें जीवन यालाही हाच न्याय लागू आहे. आपली इच्छा असो वा नसो, आपल्याला म्हातारपणी हें येणारच. लहान बालिकांच्या छोट्या मुली होतात; छोट्या मुलींच्या मोठ्या मुली, त्यांच्या प्रौढ स्त्रिया आणि त्यांच्या आजीबाई होतात. असे हे बदल होतात हें समजून, सोसूनच आपणांला जगांत राहणें भाग आहे. परंतु जग हें बदलत आहे ही गोष्ट मान्य करण्याची ज्यांची तयारी नाहीं, अशीही पुष्कळ मंडळी आहे. हे लोक आपलीं मनें, दारें-कपाटें लावून कुलुपें ठोकून बंद करून ठेवतात आणि कोणत्याही नवीन गोष्टीचा त्यामध्यें शिरकाव होऊं देत नाहींत. विचार करण्याची इतकी भीति त्यांना वाटते, कीं तितकी दुसऱ्या कशाचीही त्यांना भीति वाटत नाहीं. याचा परिणाम काय होतो? त्यांच्यासाठीं जगाची प्रगति थोडीच थांबते? त्यांची फिकीर न करतां जगाचें पुढचें पाऊल चालूच असतें; आणि हे लोक किंवा त्यांच्यासारखीच इतर मंडळी बदलत्या परिस्थितीबरोबर जुळतें होण्यासारखा आपल्या जीवनांत बदल करीत नाहींत; यामुळें जगांत मधून मधून मोठाले स्फोट होतात. म्हणूनच १४० वर्षांपूर्वी झालेली फ्रेंच राज्यक्रांति किंवा तेरा वर्षांपूर्वींची रशियन राज्यक्रांति यांसारख्या क्रान्त्या होतात. अगदीं याच पद्धतीनें आपल्या देशांतही आज आपण एक प्रकारें क्रांतीच्या प्रवाहांत मध्यभागीं येऊन पोंचलों आहोंत. स्वातंत्र्य तर आम्हांला जरूर हवें आहे; परंतु त्याहूनही अधिक असें कांहीं आम्हांला हवें आहे. देशांत जागोजागीं जीं कुजलेल्या पाण्याचीं डबकीं झालेलीं आहेत तीं सगळीं उपसून

आम्हांला साफ करायचीं आहेत आणि ताजें जिवंत पाणी मोकळेपणें सगळीकडे खेळेल असें आम्हांला करावयाचें आहे. आमच्या देशांत सांचून राहिलेली सगळी घाण, सगळें दारिद्य, सगळीं दुःखें पार झाडून नाहींशीं केल्यावांचून आम्हांला समाधान होणार नाहीं. विचारशक्तीच्या कार्याला प्रतिबंध करणारीं आणि आमच्यापुढें जें प्रचंड कार्य उभें आहे त्यांत त्यांना आमच्याशीं सहकार्य न करूं देणारीं अशीं कुकल्पनांचीं जीं जळमटें आमच्यापैकीं कितीएक लोकाच्या मनांत सांचलीं आहेत, तीं पण सारीं झाडून टाकणें आम्हांला अवश्य आहे. हें काम फार मोठें आहे. आणि तें पुरें करायला कदाचित् थोडा कमीअधिक काळही लागणें शक्य आहे. पण निदान आपण त्याचा गाडा होईल तितका जरा जोरानें पुढें तर ढकलूं या. " इन्किलाब झिंदाबाद!"

जी क्रांति आपल्याला करावयाची आहे तिच्या प्रवेशद्वाराशीं आपण उभे आहों. भविष्यकाळ आम्हाला कशाकशाची जोड करून देणार आहे हें आज आपल्याला कांहीं सांगतां येणार नाहीं. परंतु वर्तमानकाळापुरतें पाहिलें तरी आमच्या प्रयत्नांचें आम्हांला मिळालेलें फळ चांगलें घसघशीत आहे. आजच्या भारतवर्षांतील स्त्रियाच पहा ना — स्वातंत्र्याच्या लढ्याच्या आघाडीवर त्या किती अभिमानानें पावलें टाकीत आहेत. त्यांच्या ठिकाणीं विनयही आहे आणि शौर्यही आहे. दृढनिश्चयी कणखरपणा आहे. देशकार्यामध्यें केवढ्या धडाडीनें पुढें धांव घेतली पाहिजे, याची जणुं शिकवणच त्या इतरांना देत आहेत. आणि आमचा तो पडदा ? — ज्याच्यामागें आमच्या शूर आणि सुंदर स्त्रिया दडपून राहत असत, जो जणुं त्यांना आणि आमच्या देशालाही एक प्रकारचा शापच होता — कोठें गेला तो पडदा आज ? आजच्या काळांत त्याची खरी जागा म्हणजे पदार्थसंग्रहालयांतील शिड्या; ज्यांच्यावर आपण गतकालांतील वस्तू नमुन्यासाठीं म्हणून सांठवून ठेवीत असतो अशा शिड्या; तेथें त्याची किती झपाट्यानें रवानगी होत आहे नव्हे आज ?

तशींच मुलेंही पहा — मुलगे आणि मुली दोन्ही — त्यांच्या त्या वानरसेना, बालसभा, बालिकासभा बघा. या मुलांच्या आईबापांनीं म्हणजे पूर्वीच्या पिढीनें भलें गुलामासारखें किंवा दुर्बळासारखें वर्तन केलेलें असो, पण आमच्या चालू पिढींतील मुलें असली गुलामगिरी किंवा दुर्बळपणा यापुढें मुळींच सहन करणार नाहींत, याबद्दल शंका घेण्याची आतां कोणाला छाती होईल का ?

अशा रीतीनें जगांतील बदलाचें चक्र चालू आहे. काल जे खालीं होते ते आज वर येत आहेत. जे वर होते ते खालीं जात आहेत. आमच्याही देशांत हें चक्र यापूर्वीच फिरूं लागायला हवें होतें. पण आतां आम्ही त्याला इतका जोराचा धक्का देऊन सुरू केलें आहे, कीं यापुढें मात्र त्याला कोणी थांबवूं शकणार नाहीं.

*इन्किलाब झिंदाबाद !*

## ४

# आशिया आणि यूरप

*८ जानेवारी, १९३१*

जगांतील प्रत्येक वस्तु बदलत असते असें मीं मागच्या पत्रांत म्हटलें. इतिहास म्हणजे तरी काय, तर अशा या बदलाचा वृत्तांतच आणि जगांत आजवर घडून आलेले बदल जर थोडे असते, तर फारच थोडा इतिहास आपणांस लिहितां आला असता.

शाळेंत किंवा कॉलेजांत आपण जो इतिहास शिकतों त्यांत विशेषसा कांहीं अर्थ नसतो. इतरांचा काय अनुभव असेल तो असो, पण मला तरी शाळेंत फारच थोडें इतिहासाचें ज्ञान झालें हें मला चांगलें ठाऊक आहे. हिंदुस्थानचा इतिहास आणि इंग्लंडचा इतिहास यांसंबंधीं मी कांहीं थोडें शिकलों. पण तेंही अगदींच थोडें. आणि हिंदुस्थानचा म्हणून जो इतिहास मी शिकलों, तो पुष्कळशा प्रमाणांत चुकीचा किंवा विकृत आणि आमच्या देशाला जे हीन समजतात अशा लोकांनीं लिहिलेला असा होता. बाकीच्या देशांच्या इतिहासासंबंधींचें माझें ज्ञान मुळींच कांहीं नाहीं, इतकें म्हणण्यासारखें पुसट पुसट होतें. कॉलेजांतून बाहेर पडल्यानंतर खरा इतिहास म्हणून ज्याला म्हणतां येईल असा थोडा इतिहास माझ्या वाचनांत आला. आणि सुदैवानें माझ्या तुरुंगाच्या वाऱ्यामुळें माझ्या ज्ञानामध्यें भर घालावयाला मला चांगली संधि मिळत आली आहे.

माझ्या पूर्वीच्या कांहीं पत्रांत मीं तुला हिंदुस्थानची प्राचीन संस्कृति, द्रविड लोक आणि आर्यांचें हिंदुस्थानांत आगमन यांबद्दल लिहिलें आहे. आर्यांच्या पूर्वीच्या काळा-बद्दल मीं तुला फारसें लिहिलें नाहीं; कारण मलाच त्यासंबंधींची फारशी माहिती नाहीं. पण अलीकडे कांहीं वर्षांत मात्र त्या काळासंबंधीं तुला सांगण्यासारखी एक गोष्ट घडलेली आहे. हिंदुस्थानांतील एका अति प्राचीन संस्कृतीचे अवशेष अलीकडे शोधून काढण्यांत आलेले आहेत. हिंदुस्थानच्या वायव्य भागांत मोहेंजोदारो नांवाच्या ठिकाणीं हे अवशेष सांपडले आहेत. खोदून काढलले हे अवशेष सुमारें ५००० वर्षांपूर्वींचे आहेत. त्यांमध्यें प्राचीन मिसर देशांतल्याप्रमाणें ममी म्हणजे मसाला भरून जशींच्या तशीं टिकवून ठेवलेलीं प्रेतेंही सांपडलीं आहेत. लक्षांत घे! हजारों वर्षांपूर्वींचा हा सारा प्रकार आहे; आर्य या देशांत येण्याच्यापूर्वीं किती तरी आधींच्या काळचा. यूरप म्हणजे तर त्या वेळीं नुसतें अरण्य असेल.

आज यूरप बलवान् आहे; सत्ताधीश आहे. आपणच सर्वांत अधिक सुसंपन्न आणि सुसंस्कृत आहों असें या खंडांतील लोकांना वाटत असतें. आशिया खंड व त्यांतील लोकांना ते हीन लेखतात आणि इकडे येऊन या खंडांतील देशांमधून हाताला लागेल तें सगळें लुबाडून ते नेतात. काळ केवढा बदलला आहे पहा! आशिया व यूरप यांचें जरा आपण खोल निरीक्षण करूं या. उघडा नकाशा. त्या तिथें इवलेंसें तें यूरप खंड

प्रचंड आशिया खंडाला कसें चिकटून राहिल्यासारखें दिसतें आहे पहा. जणुं कांहीं आशिया खंडाच्या विस्ताराचाच हा छोटासा एक भाग असा भासतो आहे. इतिहास वाचल्यावर तुला कळून येईल, कीं अत्यंत दीर्घ कालपर्यंत – कितीएक युगेंच जणुं – आशिया खंडाचेंच जगांत सर्वत्र प्राबल्य होतें. या खंडांतील लोकांच्या लाटामागून लाटा जाऊन यूरप पादाक्रांत करीत आल्या आहेत. त्यांनीं यूरपची पुष्कळ नासधूस केली आणि त्यांनींच यूरपला सुसंस्कृतही केलें. आर्य, सिथियन, हूण, अरब, मोंगल, तुर्क हे सगळे आशिया खंडांतूनच कोठून तरी निघाले आणि साऱ्या आशिया खंडांत व यूरप खंडांत पसरले. टोळासारखी जणुं आशिया खंडांत त्यांची विपुल उत्पत्ति होत होती. अर्थात् फार दीर्घ कालपर्यंत यूरप म्हणजे आशिया खंडाची एक निव्वळ वसाहत होती आणि आजचे युरप खंडांतील पुष्कळसे समाज हे याच आशिया खंडांतून यूरपवर स्वारी करून गेलेल्या समाजांचेच वंशज आहेत.

आशिया खंड नकाशावर एखाद्या प्रचंड अस्ताव्यस्त राक्षसाप्रमाणें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत पसरलेलें दिसतें. यूरप खंड अगदींच छोटें आहे. परंतु आकारानें मोठें आहे म्हणून आशिया खंड श्रेष्ठ, आणि लहान म्हणून यूरप खंडाची कांहीं विशेष किंमतच नाहीं, असा कांहीं त्याचा अर्थ नव्हे. मनुष्याच्या काय किंवा देशाच्या काय श्रेष्ठत्वाची आकार ही अगदींच क्षुद्र कसोटी होय. आज आपण पाहतोंच आहों, कीं जगांतील सर्वांत लहान खंड यूरप खंड आहे. आणि तरी सुद्धां तें श्रेष्ठ आहे. या खंडांतील कितीएक देशांत इतिहासांत मोठे वैभवशाली कालखंड होऊन गेलेले आहेत, हेंही आपण पाहतों. त्या वेळीं या देशामध्यें मोठमोठे शास्त्रज्ञ निर्माण झालेले आहेत; जगांतील अज्ञात वस्तूंचे व प्रदेशांचे शोध लावून आणि नवीन नवीन शास्त्रीय संशोधन करून त्यांनीं मानवी सुसंपन्नतेंत प्रचंड वाढ केली आहे. आणि कोट्यवधि लोकांचें जीवन अधिक सोपें आणि सुखमय केलें आहे. त्यांच्यामध्यें मोठेमोठे ग्रंथकार, तत्त्वज्ञ, चित्रकार, शिल्पी, संगीतज्ञ आणि वीरपुरुषही निर्माण झालेले आहेत. तेव्हां यूरप खंडाचें श्रेष्ठत्व नाकबूल करणें म्हणजे निव्वळ मूर्खपणा आहे.

परंतु आशिया खंडाच्या श्रेष्ठत्वाची आठवण विसरणें हेंही तितकेंच मूर्खपणाचें आहे. यूरपच्या झगझगाटानें आपले डोळे दिपल्यासारखे होतात आणि पूर्वकाळाचा आपल्याला विसर पडल्यासारखा होतो. परंतु आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जगांत कोणाहीपेक्षां जास्त किंवा कोठल्याही ठिकाणच्यापेक्षां जास्त ज्यांच्या विचारांचा परिणाम झालेला आहे, असे महान् तत्त्वज्ञ, विचारक्षेत्रांतील नेते, म्हणजेच जगांतील सर्व प्रमुख धर्मांचे संस्थापक, हे जगाला आशिया खंडानें निर्माण करून दिलेले आहेत. जगांतील श्रेष्ठ धर्मांपैकीं सर्वांत प्राचीन असा हिंदु धर्म हा तर स्वाभाविकच हिंदुस्थानांतच निर्माण झाला, त्याचप्रमाणें याच धर्माचें पाठचें भावंड असा महान् बुद्धधर्म, जो आज चीन, जपान, ब्रह्मदेश, तिबेट, सीलोन यांमध्यें सर्वत्र प्रसार पावला आहे, तोही हिंदुस्थानांतच उगम पावलेला आहे. यहुदी लोकांचा धर्म आणि ख्रिस्ती धर्म हेही खरोखर आशियांतील

धर्म आहेत, कारण त्यांचा उगम आशिया खंडाच्या पश्चिम किनाऱ्यावरील पॅलेस्टाइन-मध्यें झालेला आहे. पारशी लोकांचा झोरोआस्ट्रियानिझम्–झरथुष्ट्राचा धर्म–हा तर इराणांतलाच आहे; आणि इस्लाम धर्माचा प्रेषित महंमद पैगंबर याचा जन्म अरबस्तानांत मक्केत झाला हेंही तुला ठाऊक आहे. कृष्ण, बुद्ध, झरथुष्ट्र, ख्रिस्त, महंमद, चीनचे महान् तत्त्वज्ञ कॉन्फ्यूशियन व लौचे, अशा तऱ्हेनें आशियांतील या श्रेष्ठ विचारवंतांची यादी तूं लिहूं लागलीस तर पानेंच्या पानें तुला लिहीत बसावें लागेल. आणखीसुद्धां कितीक दृष्टीनें तरी पूर्वीच्या काळीं आपलें हें प्राचीन खंड किती श्रेष्ठ आणि किती जिवंत रसरसलेलें होतें हें मी तुला दाखवूं शकेन.

अर्थात् तो काळ किती बदलून गेलेला आहे! तथापि प्रत्यक्ष आपल्या डोळ्यां-पुढें सुद्धां काळ आतां पुन्हां एकदां बदलूं लागला आहे. इतिहासांतील बदल हळूहळू होत असतात–शतकेंच्या शतकें त्यांमधें जात असतात. परंतु कधीं कधीं हे बदल अतिशयच वेगानें होऊं लागतात आणि जगताच्या संथ प्रगतींत एकदम स्फोटाचे धक्के बसत असतात. आमचें हें प्राचीन खंड आजपर्यंत दीर्घकालपर्यंत झोंपेंत गुंग होतें. परंतु आतां मात्र कालचक्र आशिया खंडांतही फार वेगानें फिरूं लागलेलें दिसत आहे आणि हें सारें खंड झोंपेंतून जागें होत आहे. साऱ्या जगाचे डोळे आशिया खंडाकडे लागले आहेत. कारण भविष्यकाळांत आशिया अत्यंत महत्कार्य करणार आहे, याबद्दल प्रत्येकाची खात्री झालेली आहे.

## ५

# प्राचीन संस्कृती आणि आमचा वारसा

*९ जानेवारी, १९३१*

**भारत** हें हिंदी वर्तमानपत्र आम्हांला मिळत असतें. त्यांतून बाहेरच्या जगाची कांहीं कांहीं वार्ता आठवड्यांतून दोनदां आम्हांला समजते. त्यामध्यें काल वाचलें, कीं मलाक्का तुरुंगांत तुझ्या आईच्या आजारीपणांतील व्यवस्था नीटशी होत नाहीं, आणखी तिला लखनौच्या तुरुंगांत पाठविण्यांत येणार आहे. हें वाचून मला कांहींसा संताप आला आणि काळजी वाटूं लागली. कदाचित् 'भारत'मध्यें ही जी अफवा म्हणून दिली आहे ती खरीही नसेल. परंतु असा कांहीं प्रकार असावा असा संशय सुद्धां मनाला त्रासदायकच होतो. स्वतःपुरत्या गैरसोयी किंवा दुःख सहन करणें हें पुष्कळच सोपें आहे. त्यामुळें उलटा माणसाचा फायदाच होतो. त्याच्या अभावीं मनुष्य अगदींच हळवा होण्याची भीति असते. परंतु आपल्या प्रिय माणसाला यातना सहन कराव्या

लागतात, ही गोष्ट सहन करणें तितकें सोपें नाहीं किंवा सुखाचें नाहीं; विशेषतः ह्या यातना दूर करावयासाठीं आपण कांहीं करूं शकत नाहीं अशा परिस्थितींत तर ही गोष्ट अधिकच कष्टकारक वाटते. आणि म्हणून 'भारत'मधील बातमी वाचून तुझ्या आईच्या प्रकृतीबद्दल जो संशय उत्पन्न झाला, त्यानें माझ्या मनांत फारच काळजी उत्पन्न झाली. मला ठाऊक आहे, ती मनानें फार धीराची आहे – जणुं सिंहीणच आहे. परंतु तिचें शरीर दुबळें आहे. आणि तें अधिकच दुबळें व्हावें हें कांहीं माझ्या मनाला पटत नाहीं. मनानें पुष्कळ आपण अगदीं बलभीम असलों, तरी शरीरच जर नाहीं म्हणूं लागलें, तर कोणी झालें तरी काय करणार? आपल्याला जर कांहीं सत्कार्य करायचें असेल तर आपलें शरीर निरोगी, सुदृढ आणि निर्दोष असणें अत्यंत जरूर आहे. तुझ्या आईला लखनौला पाठविणार असले तर एका दृष्टीनें तें बरेंच होईल. तिथें हल्लींच्याहून तिची अधिक चांगली सोय होईल. त्यामुळें तिचें मनही अधिक प्रसन्न राहील आणि लखनौंत तिला कदाचित् बोलाचालायला कोणी तरी सोबतिणी भेटतील. मलाक्का तुरुंगांत मला वाटतें, ती अगदींच एकटी आहे. परंतु तेथें ती असतांना एकपरीनें बरें वाटे; वाटे, आम्ही एकमेकांच्या पुष्कळ जवळ आहों; फार फार तर चारपांच मैलांचें तेवढें अंतर. परंतु किती खुळी कल्पना आहे ही! दोन तुरुंगांच्या उंच भिंती जोंपर्यंत मध्यें उभ्या आहेत, तोंपर्यंत पांच मैल काय किंवा दीडशें मैल काय, दोन्ही एकच!

दादू अलाहाबादला परत आले असून त्यांची प्रकृति आतां बरी आहे हें ऐकून मात्र आज मला किती तरी बरें वाटलें. तुझ्या आईला भेटण्यासाठीं ते मलाक्का तुरुंगांत गेले होते हें ऐकूनही मला फार आनंद झाला. योगायोग असला, तर कोणीं सांगावें तुमची सर्वांची व माझी उद्यांच भेट होईल. कारण उद्यांचा माझा भेटीचा दिवस आहे. आणि तुरुंगांत तर **मुलाकातका दिन** म्हणजे मोठीच पर्वणी असते. दादूंची-माझी आज जवळजवळ दोन महिने भेट नाहीं. त्यांची पण उद्यां भेट होईल आणि स्वतःच्या डोळ्यांनीं त्यांची प्रकृति सुधारलेली मला पाहायला मिळेल, अशी आशा मी करतों आहें. तुझी-माझी भेट होऊन तर आतां किती तरी मोठा लांबच लांब काळ, एक सबंध पंधरवडा होत आला. तूं भेटलीस म्हणजे मला तुझ्या किती तरी हकीकती समजतील, आणि तुझ्या आईच्या पण.

वाहवा! गतकालीन इतिहासाबद्दल तुला थोडें कांहीं लिहावें म्हणून मी बसलों आणि त्याऐवजीं काय या खुळचट गोष्टी लिहितों आहें मी पाहा! तेव्हां आज-कालच्या या गोष्टी घटकाभर विसरूं या आपण, आणि दोन ते तीन हजार वर्षांच्या मागें जाऊं या. माझ्या पूर्वीच्या कांहीं पत्रांत ईजिप्त आणि क्रीट बेटांतील नोसस शहर याबद्दल थोडें मीं तुला लिहिलें आहे. प्राचीन काळच्या मानवी सुधारणांचें बीज या देशांत, त्याचप्रमाणें आज इराक किंवा मेसापोटेमिया म्हणून ओळखल्या जाणाऱ्या देशांत आणि चीन, हिंदुस्थान, ग्रीस या देशांत रुजलें हेंही मीं तुला सांगितलें आहे.

बाकीच्या देशांपेक्षां ग्रीसमध्यें, तसेंच पाहिलें तर हें बीज थोडें मागाहून रुजलें. तेव्हां कालाच्या दृष्टीनें पाहतां भारतीय सुधारणा ही ईजिप्त, चीन आणि इराक यांमधील सुधारणा-भगिनींशीं समकालीन ठरते. आणि प्राचीन म्हणून गणली जाणारी ग्रीक-सुधारणा ही सुद्धां यांची धाकटी बहीण ठरते. आज सर्व प्राचीन सुधारणांची काय अवस्था आहे? नोसस तर आज अस्तित्वांतच नाहीं. आजकाल नव्हे, तर जवळजवळ गेलीं ३००० वर्षें तें अस्तित्वांतून नाहींसें झालें आहे. त्याच्यामागून आलेल्या ग्रीक-सुधारणेच्या लोकांनीं तेथें जाऊन त्याचा नाश केला. ईजिप्तची संस्कृति हजारों वर्षें मोठ्या वैभवांत नांदली; पण तीही आज नाहींशी झाली आहे; ते प्रचंड पिरामिड, स्फिन्क्सचा स्त्रीमुखी सिंहाचा पुतळा, मोठमोठ्या देवालयांचे पडके अवशेष, ममी, या आणि अशा कांहीं वस्तूंशिवाय ईजिप्तच्या संस्कृतीची खूण म्हणून आज कांहीं शिल्लक नाहीं. अर्थात् ईजिप्त देश पृथ्वीवरून नाहींसा झाला असें नव्हे. तो देश आहे, त्यामध्यें पूर्वीप्रमाणेंच नाइल नदी वाहते आहे, इतर देशांतल्याप्रमाणेंच तेथेंही स्त्रीपुरुष नांदत आहेत. परंतु हे आधुनिक लोक आणि त्या देशांतील प्राचीन संस्कृति यांना सांधणारा असा कोणताच दुवा तेथें शिल्लक नाहीं.

नंतर इराक आणि इराण. किती साम्राज्यें या ठिकाणीं उदयास आलीं आणि एकामागून एक विस्मृतिसागरांत पार कोठच्या कोठें गडप झालीं! बॅबिलोनिया, असीरिया, खाल्डिया हीं त्यांतलीं अगदीं प्राचीनांतील प्राचीन साम्राज्यें, बॅबिलॉन व निनेवे हीं त्यांतील अगदीं प्राचीनांतील प्राचीन मोठीं शहरें. बायबलमधील जुन्या करारांत या काळच्या लोकांबद्दल जागोजागीं उल्लेख आहेत. या प्राचीन देशांत यांच्या-मागून दुसरीं साम्राज्यें उदयास येऊन भरभराटलीं आणि पुढें नष्टही झालीं. अरेबियन नाइटस्मधील ती जादूची नगरी म्हणजे बगदाद शहर, हें याच देशामधलें. अर्थात् साम्राज्यें जशीं निर्माण होणार तशीं तीं नष्टही होणार; राजे किंवा महाराजे, कोणी कितीही मोठे बलिष्ठ आणि वैभवशाली झाले, तरी जगाच्या रंगभूमीवर ते कांहीं दिवसच काय ते नांदणार. परंतु संस्कृतीच्या ठिकाणीं त्यापेक्षां पुष्कळ दीर्घकाल टिकण्याचें सामर्थ्य असतें. असें असूनही ईजिप्तमधील प्राचीन संस्कृतीप्रमाणेंच इराक व इराण-मध्येंही प्राचीन संस्कृति अगदीं अजीबात नाहींशी झाली.

ग्रीस देश आपल्या काळीं फारच श्रेष्ठ पदवीला चढलेला होता, यांत तिळमात्र संशय नाहीं; आज सुद्धां त्याच्या वैभवाचीं वर्णनें वाचून माणसाचें मन चकित होतें. त्यामधील ते संगमरवरी पुतळ्यांचें सौंदर्य पाहून आजही आश्चर्यानें आणि आदरानें आपण मूढ होऊन जातों; तसेंच ग्रीसचें जें कांहीं वाङ्मय आपल्याला आज अर्धेमुर्धे उपलब्ध आहे, तें वाचूनसुद्धां मनाला त्यांतील सामर्थ्याबद्दल अचंबा वाटतो आणि मन त्या ग्रंथकारांबद्दल आदरानें नम्र होतें. आधुनिक यूरप हें कितीएक बाबतींत प्राचीन ग्रीसचें अपत्य आहे असें म्हणतात – आणि तें खरेंही आहे, इतका ग्रीक-आचार-विचारांचा यूरपवर खोलवर परिणाम झाला आहे. परंतु ज्या ऐश्वर्यामुळें – तेजामुळें ग्रीसला

ग्रीसपण प्राप्त झालें तें ऐश्वर्य आज कुठें आहे? ती प्राचीन संस्कृति नष्ट होऊन आज कितीक युगें लोटलीं आहेत, ग्रीसमध्यें आज निराळीच प्रवृत्ति, निराळेच रीतिरिवाज चालू आहेत आणि यूरपच्या आग्नेय कोपऱ्यांतला एक छोटासा देश, एवढीच आतां त्याची ओळख जगाला आहे.

ईजिप्त, नोसस, इराक आणि ग्रीस – सारीं विलयास गेलीं आहेत. बॅबिलॉन आणि निनेवेमधील संस्कृतीप्रमाणेंच त्यांच्यामधील संस्कृतीही आज अस्तित्वांत नाहींत. पण त्यांच्याच तोडीच्या आणखी ज्या दोन संस्कृती होत्या, चीनची एक आणि भारतांतील एक, त्यांचें पुढें काय झालें? इतर देशांतल्याप्रमाणें याही देशांत साम्राज्यामागून साम्राज्यें होऊन गेलीं. त्यांच्यावर कितीक स्वाऱ्या झाल्या आणि तेथें प्रचंड प्रमाणावर नासधूस झाली. शेंकडों वर्षेंपर्यंत कांहीं कांहीं राजवंशांनीं येथें राज्यें केलीं; त्यांना उखडून दुसरेही राजवंश प्रस्थापित झाले. जगांत इतर ठिकाणीं घडले, त्याप्रमाणें चीन आणि हिंदुस्थानमध्यें हे सारे प्रकार घडले आहेत. परंतु हिंदुस्थान आणि चीन यांमध्यें संस्कृतीचा खराखरा अखंडपणा जसा टिकून राहिला आहे, तसा मात्र तो जगांत इतर कोठेंही टिकलेला नाहीं. नाना तऱ्हेचे बदल होत आले; पुष्कळ लढाया आणि स्वाऱ्या झाल्या; तथापि या दोन्ही देशांत त्यांच्या त्यांच्या प्राचीन संस्कृतीचा धागा केव्हांही तुटलेला नाहीं – तो अखंडपणें चालू आहे. हें खरें आहे, कीं त्यांच्या त्या प्राचीन वैभवाला पुष्कळच अवकळा आलेली आहे. त्यांची ती प्राचीन संस्कृति युगानुयुगें सांचत आलेल्या धुळीच्या ढिगांनीं – नव्हे, कोठें कोठें त्या धुळीच्या उकिरड्यांनीं – दडपून जाऊन दिसत नाहींशी झाली आहे. परंतु अजूनही त्या संस्कृती जीव धरून टिकून आहेत आणि आजचें हिंदी जीवनसुद्धां प्राचीन भारतीय संस्कृतीच्या पायावरच आधारलेलें आहे. अर्थात् अलीकडे जगांत नवीन परिस्थिति उत्पन्न झालेली आहे. आगबोटी व आगगाड्या आणि मोठाले कारखाने यांच्या उदयानें जगाचें सारें स्वरूपच पालटून टाकलेलें आहे. कोणी सांगावें, त्यामुळें हिंदुस्थानचेंही सर्व स्वरूप बदलून जाईल. नव्हे, तसें होण्याचाच बराच मोठा संभव आहे. तशी थोडी सुरुवातही झालेली आहे. तरीसुद्धां इतिहासकालाच्या उदयापासून अनेक युगायुगांतून थेट आपल्यापर्यंत सतत वाहत आलेल्या भारतीय सुधारणेच्या व संस्कृतीच्या या प्रचंड प्रवाहाचा विचार मन गुंगवून टाकणारा आणि मोठें आश्चर्य उत्पन्न करणारा आहे. एका अर्थी आपण आजचे भारतीय लोक गेलीं हजारों वर्षें अखंड चालत आलेल्या परंपरेचे वारसदार आहोंत. आपले जे पूर्वज प्राचीन काळीं वायव्य प्रांतामधील पर्वतांच्या रांगांतील घाट ओलांडून आधीं ब्रह्मावर्त, मग आर्यावर्त, नंतर भारतवर्ष आणि आतां हिंदुस्थान म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या देशाच्या सृष्टिदेवीच्या प्रसादानें पुलकित झालेल्या विशाल मैदानांत उतरले, त्यांच्यापर्यंत थेट आमचा वंशावळीचा धागा पोंचण्यासारखा आहे. पर्वतांचीं खिंडारें पायींच ओलांडून खालच्या अज्ञात प्रदेशाकडे हळूहळू येणारी त्यांची ती अखंड रांगच रांग तुझ्या डोळ्यांपुढें नाहीं उभी राहत? ते लोक शूर होते, पराक्रमाची आवड त्यांच्या चित्तांत

मुसमुसत होती ; आणि यशापयशाची बिलकुल पर्वा न करतां आगेकूच करण्याची धमक त्यांच्या ठिकाणीं होती. मृत्यु आला तरी त्याचें त्यांना कांहीं वाटत नव्हतें, हंसत हंसत त्याचें स्वागत करायला ते तयार होते. परंतु संसाराची आवड मात्र त्यांना जरूर होती; आणि संसारसुखाचा उपभोग घेण्याचा एकमेव मार्ग म्हणजे निर्भयवृत्ति ठेवणें, अपयश अथवा हानि याबद्दल मुळींच मन खट्टू होऊं न देणें हाच आहे, हें त्यांनीं चांगलें ओळखलें होतें. त्यांना माहीत होतें, कीं जे निर्भय असतात त्यांच्यापासून अपयश आणि हानि हीं नेहमीं दूर दूरच राहत असतात. क्षणभर तें चित्र डोळ्यांपुढें आण. आपले ते प्राचीन पूर्वज पुढें पुढें मार्ग आक्रमण करीत असतां एकाएकीं जेव्हां समुद्राकडे धों धों वेगानें वाहत जाणाऱ्या आणि दूरवर पसरलेल्या प्रांताची महाराणीच जणुं अशा दिमाखानें शोभणाऱ्या त्या महान् गंगादेवीच्या तीरावर आले असतील तेव्हां तिच्या दर्शनानें त्यांचीं हृदयें आनंदानें किती भरून गेलीं असतील ! अशा तिच्यापुढें जर त्यांनीं डोकें लवविलें असेल, तिला नमस्कार केला असेल आणि आपल्या प्रौढ, संपन्न आणि स्वरमधुर भाषेंत तिचीं त्यांनीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं असतील, तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें असें काय आहे ?

अशा या अनंत युगायुगांतील संस्कृतीच्या ठेव्याचा वारसाहक्क आजच्या घटकेला अद्यापिही आपण उपभोगीत आहों, ही मात्र जगांतील एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. अर्थात् यामुळें गर्वानें चढून जाण्याचें मात्र कारण नाहीं. कारण या सर्व प्राचीन काळांतील वारसा आपल्याकडे चालत आला आहे असें म्हटलें, म्हणजे त्यांत चांगल्या-बरोबर वाइटाचाही वारसा आलाच. आणि वारसाहक्कानें प्राप्त झालेल्या आमच्या या मिळकतींत वाइटाचा भाग फारच मोठा आहे; त्याचमुळें जगामध्यें आम्हांला हीन दशा प्राप्त झाली आहे ; त्याचमुळें आमच्या या धनधान्यसंपन्न देशाला घोर दारिद्र्य प्राप्त झालें आहे ; त्याचमुळें तो इतरांच्या हातचें खेळणें होऊन राहिला आहे. कांहीं हरकत नाहीं. या सर्व वाईट भागाला आपल्या देशांत मुळींच जागा राहूं द्यावयाची नाहीं, असाच आतां आपला निश्चय झालेला नाहीं का ?

६

## हेलन लोक

*१० जानेवारी, १९३१*

आज तुम्ही कोणीच भेटीला आलां नाहीं आणि बिचारा मुलाकातका दिन अगदींच सुना सुना गेला. माझी फार निराशा झाली. त्यांतल्या त्यांत आणखी दादूंची प्रकृति बरी नाहीं हें मुलाखत न होण्याचें कारण म्हणून सांगण्यांत आलें. त्यानें मन

अधिकच कष्टी झालें. अधिक कांहीं तपशील विचारावा तर कांहींच कळेना. पण शेवटीं जेव्हां पक्कें ठरलें, कीं आज आतां कांहीं भेट होणार नाहीं, तेव्हां चरख्यावर जाऊन बसलों आणि थोडेंसें सूत कांतलें. चरख्यावर सूत काढण्यानें आणि नवार विणण्यानें मनाला मोठी गोड शांति प्राप्त होते, असा माझा अनुभव आहे. तात्पर्य, मन संशय-चक्रांत सांपडेल, तेव्हां सूत कांता.

माझ्या मागच्या पत्रांत आपण यूरप आणि आशिया यांची तुलना केली. प्राचीन काळचा यूरप म्हणून ज्याला समजत असतात, त्या प्राचीन यूरपकडे आज थोडा वेळ आपण नजर टाकूं या. पुष्कळ काळपर्यंत भूमध्यसमुद्राच्या आजूबाजूच्या देशांचा मिळूनच जेवढा प्रदेश आहे त्यालाच फक्त यूरप खंड समजत असत. यूरपच्या उत्तरेकडील देशांची त्या काळची कांहीं हकीकत आपणांला उपलब्ध नाहीं. जर्मनी, आणि इंग्लंड, आणि फ्रान्स यांमध्यें रानटी आणि क्रूर लोकांची वसाहत आहे, अशीच त्या काळच्या भूमध्य-समुद्रावरच्या लोकांची समजूत होती. फार काय, पण पहिल्यांदां सुधारणा किंवा संस्कृति ही फक्त भूमध्य-समुद्राच्या पूर्व बाजूच्या भागांतच केंद्रित झालेली होती, असें मानण्यांत येतें. सुधारणेच्या मार्गावर पहिलें पाऊल टाकलें तें ईजिप्त व नोसस यांनीं टाकलें, हें तर तुला ठाऊक आहे. पैकीं ईजिप्त तर यूरपमध्यें नसून आफ्रिकेंत आहे. हळूहळू आर्य लोकांची लाट पश्चिमेकडे पसरूं लागली. त्यांनीं ग्रीसवर आणि आसपासच्या प्रदेशावर स्वारी केली. प्राचीन काळचे ग्रीक म्हणून ज्यांना आपण ओळखतों आणि मान देतों, ते हेच ग्रीक आर्य होत. परंतु त्यांच्या आचारविचारांत कालांतरानें बदल होत जाणें स्वाभाविकच होतें. आणि त्यामुळें हळूहळू आर्यांच्याच या दोन शाखा एकमेकींपासून अधिकाधिक भिन्न होत गेल्या. हिंदुस्थानांत आर्यांच्यावर हिंदुस्थानांतल्या तत्कालीन प्राचीन संस्कृतींचा पुष्कळच मोठा परिणाम झाला. उदाहरणार्थ, द्राविड संस्कृति व हल्लीं मोहेंजेदारोपाशीं जिचे अवशेष आपल्याला आढळतात ती संस्कृति, यांचा. आर्यांनीं आणि द्रविडांनीं परस्परांना दिलेंही पुष्कळ आणि परस्परांपासून घेतलेंही पुष्कळ; अशा रीतीनें दोघांनीं मिळून भारतांत एक संमिश्र संस्कृति निर्माण केली.

त्याच रीतीनें ग्रीक आर्यांच्यावर सुद्धां त्यांच्या काळीं ग्रीक देशामधील घरींदारीं जी नोससची प्राचीन वैभवशाली संस्कृति खेळत होती तिचाही पुष्कळ परिणाम झालेला असला पाहिजे. पण असा परिणाम झाला असला तरी त्यांनीं नोससचा आणि तेथील संस्कृतीच्या बाह्य चिह्नांचा पूर्ण नाश केला आणि त्या छिन्नविच्छिन्न संस्कृतीच्या पायावर त्यांनीं आपली संस्कृति उभी केली. प्राचीन काळचे भारतीय आणि ग्रीक आर्य दोघेही मोठे उग्र आणि जबरे लढवय्ये होते, हें आपण विसरतां उपयोगी नाहीं. तसेंच ते स्वतः अत्यंत चिकट आणि चिवट होते म्हणून त्यांच्याहून अधिक सुधारलेल्या आणि अधिक मृदु अशा ज्या ज्या लोकांशीं त्यांचा संबंध आला, त्यांना त्यांनीं एक तर आपल्यांत एकजीव तरी करून टाकलें किंवा नष्ट तरी करून टाकलें.

अशा रीतीनें ख्रिस्ताच्या जन्मापूर्वी १००० वर्षे नोससचा नाश झाला. आणि या नव्या ग्रीकांनीं ग्रीस व त्याभोंवतालचीं बेटें यांवर आपली वसाहत थाटली. समुद्रावरून पुढें आशिया मायनरचा पश्चिम किनारा, दक्षिण इटली, सिसिली आणि थेट फ्रान्सचा दक्षिण भाग येथपर्यंत ते पोंचले. फ्रान्समधील मार्सेल्सची प्रस्थापना त्यांनीं केली. परंतु ते तेथें पोंचण्यापूर्वीच फिनीशियन लोकांनीं तेथें वसाहत केलेली असावी असा संभव वाटतो. फिनीशियन लोक हे आशिया मायनरमधील मोठे दर्यावर्दी लोक होत, हें तुला आठवतच असेल. व्यापारासाठीं हे लोक जगभर लांब लांब सफरी करीत असत. इंग्लंड देश ज्या वेळीं अगदीं रानटी अवस्थेंत होता आणि जिब्राल्टरच्या सामुद्र-धुनींतून तेथपर्यंत प्रवेश करणें ज्या काळीं मोठेंच संकटाचें असलें पाहिजे, त्या वेळीं इंग्लंडपर्यंत पोंचण्याची धमकसुद्धां त्यांनीं दाखविली होती.

ग्रीक-आर्यांच्या आगमनानंतर ग्रीसच्या मुख्य भूमीवर शहरें उदय पावलीं. उदारणार्थ, ॲथेन्स, स्पार्टा, थीब्स आणि कॅरिंथ या ग्रीक लोकांच्या पहिल्या काळच्या वृत्तांताचे दोन पवाडे विख्यात महाकाव्यांत ग्रथित करण्यांत आले आहेत. ईलियड आणि ओडेसी हीं तीं काव्यें. या सुमारास या ग्रीकाना हेलन लोक असें नांव पडलेलें होतें. या काव्यांची थोडीफार माहिती तुला आहे. आपल्याकडचीं महाकाव्यें — रामायण आणि महाभारत — यांच्यासारख्या स्वरूपाचींच हीं काव्यें आहेत. त्यांचा कर्ता होमर नांवाचा अंध कवि होता अशी समजूत आहे. ईलियडमध्यें पॅरिसनें हेलन या सुंदरीला पळवून आपल्या ट्रॉय नगरींत कसें नेलें आणि तिला परत मिळविण्यासाठीं ग्रीक राजे आणि सरदार यांनीं ट्रॉयला वेढा कसा घातला, याची कथा वर्णन केली आहे. ट्रॉयचा वेढा उठल्यानंतर ओडिसस उर्फ यूलिसिस यानें जें देशपर्यटण केलें, त्याची कथा ओडेसीमध्यें वर्णन केली आहे. ट्रॉयची छोटी नगरी आशिया मायनरमध्यें समुद्र-किनाऱ्यापासून आंत जवळच वसलेली होती. आज कांहीं ही नगरी अस्तित्वांत नाहीं. तिचा नाश होऊन कितीएक युगें लोटलीं, पण कविप्रतिभेनें तिला अमर करून ठेवलें आहे.

एकीकडे हे ग्रीक किंवा हेलन लोक झपाट्यानें वाढीस लागून मोठे होऊन अल्पकाळच टिकलेल्या परंतु मोठ्या वैभवशाली अशा आपल्या तारुण्याच्या बहरांत प्रवेश करीत होते, त्याच वेळीं दुसरीकडे आणखी एक सत्ता कोणाच्या लक्षांतही येणार नाहीं अशा रीतीनें उदय पावत होती, ही मोठी लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. याच सत्तेनें पुढें ग्रीसला जिंकलें आणि त्याची सत्ता उखडून तिच्या जागीं आपली सत्ता प्रस्थापित केली. रोमची प्रस्थापना याच सुमारास झाली असें म्हणतात. परंतु तेव्हांपासून कितीएक शतकेंपर्यंत जगाच्या रंगभूमीवर रोमकडून कांहीं विशेष काम व्हावयाचें नव्हतें. तथापि, ज्या नगरीचा यूरपीय जगतावर पुढें शतकानुशतकें पगडा बसावयचा होता, जिला सर्व जगताची सम्राज्ञी, आणि ‘ अमरपुरी ’ अशीं नांवें प्राप्त व्हावयाचीं होती, त्या रोम नगरीचा उदय ग्रीकांच्या ऐन भरभराटीच्या काळांतच झाला होता, ही गोष्ट

नमूद करण्यासारखी आहे. रोमच्या स्थापनेबद्दलच्या गोष्टी मोठ्या अजब आहेत. त्याची संस्थापना करणारे रेमस आणि रोम्युलस म्हणे एका लांडगीनें पळवून नेऊन बाळगिले होते! ही गोष्ट बहुतेक तुला माहीत असेल.

रोमची स्थापना झाली त्या वेळीं किंवा त्याच्याआधीं कांहीं काळ प्राचीन काळच्या आणखी एका शहराची स्थापना झाली. तें म्हणजे कार्थेज. फिनीशियन लोकांनीं हें शहर आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर वसविलें. तें एक मोठें दर्यावर्दी सत्तेचें केंद्र म्हणून प्रसिद्धीस आलें आणि त्याच्यामध्यें आणि रोममध्यें अत्यंत कट्ट चुरस उत्पन्न होऊन अनेक लढाया झाल्या. शेवटीं रोमचा विजय झाला आणि त्यानें कार्थेज पार जमीनदोस्त करून टाकलें.

आजची हकीकत संपण्यापूर्वीं आपण एकदां पॅलेस्टाइनवर नजर टाकूं या. पॅलेस्टाइन अर्थातच यूरपमध्यें नाहीं; आणि त्याला फारसें ऐतिहासिक महत्त्वही नाहीं. परंतु त्याचा इतिहास जुन्या करारांत दिला आहे, म्हणून त्याच्या प्राचीन इतिहासाचें कितीएक मंडळींना कौतुक वाटतें. हा इतिहास म्हणजे त्या भागांत राहणाऱ्या ज्यूंच्या कांहीं टोळ्या आणि त्यांच्या आपल्या मोठमोठ्या शेजारी सत्तांशीं, बॅबिलोनिया, ॲसीरिया आणि ईजिप्त यांच्याशीं झालेल्या कटकटी यांचा वृत्तांत आहे. हा वृत्तांत ज्यूंचा धर्म आणि ख्रिस्ती धर्म यांचें एक अंग जर समजला गेला नसता, तर त्याची माहिती आज क्वचितच कोणाला असती.

नोससचा नाश करण्यांत आला, त्या वेळीं पॅलेस्टाइनमध्यें इझराएल विभागांत सॉल नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानंतर डेव्हिड (याचा उच्चार दाविद किंवा कोठें कोठें दाऊद असाही करतात) हा राजा झाला. त्याच्यामागून सालोमन; हा सालोमन मोठा ज्ञानी होता अशी त्याची ख्याति आहे. हीं नांवें मी येथें सांगतों याचें कारण एवढेंच, कीं केव्हां केव्हां तुझ्या कानावर तीं आलेलीं असतील किंवा तूं कोठें कोठें तीं वाचलेलीं असतील.

## ७

# ग्रीक नगर-राज्यें

*११ जानेवारी, १९३१*

माझ्या गेल्या पत्रांत मीं तुला ग्रीक म्हणजेच हेलेन लोकांविषयीं थोडी माहिती सांगितली. हे लोक होते तरी कशा प्रकारचे याची थोडी चांगली कल्पना यावी, यासाठीं आणखी एकदां आपण त्यांच्याच इतिहासावर थोडी नजर टाकूं या. ज्या वस्तू किंवा जे लोक आपण प्रत्यक्ष पाहिलेले नसतात, अशांच्याबद्दल अगदीं यथातथ्य आणि

बिनचूक कल्पना करणें आपल्याला फार कठिण पडतें. आपली सभोंवतालची परिस्थिति आणि रोजचे व्यवहार यांची आपल्यावर इतकी छाप पडलेली असते, कीं त्याहून सर्वतोपरि निराळ्या अशा जगाची नीटशी कल्पनाच आपल्याला करतां येत नाहीं. आणि खरी गोष्ट अशी आहे, कीं प्राचीन जग — मग तें हिंदुस्थानांतलें असो कीं चीनमधलें असो, किंवा ग्रीसमधलें असो — हें हल्लींच्या जगाहून सर्वच दृष्टींनीं अगदींच निराळें होतें. तेव्हां त्या काळचे लोक कशा प्रकारचे असतील याबद्दल त्यांचेच जे कांहीं ग्रंथ, किंवा बांधकामें किंवा इतर अवशेष आपल्याला उपलब्ध आहेत, त्यावरून कांहीं तर्क करून पाहणें एवढेंच फक्त आपल्याला शक्य आहे.

ग्रीकांच्याविषयींची एक गोष्ट विशेष लक्षांत येण्यासारखी आहे. असें दिसतें, कीं या ग्रीक लोकांना मोठमोठ्या राज्यांचा किंवा साम्राज्यांचा लोभ नव्हता. त्याना छोटीं छोटीं नगर-राज्येंच आवडत — म्हणजे काय, तर प्रत्येक शहर म्हणजे एक स्वतंत्र राज्यच ते मानीत. मध्यभागीं शहर व त्याच्या आजूबाजूचा शहराला अन्नाचा पुरवठा करणारा शेतीचा प्रदेश एवढ्याचें मिळून एक राज्य, अशीं त्यांचीं छोटीं छोटीं लोकसत्ताक राज्यें असत. लोकसत्ताक राज्य म्हणजे तेथें राजा नसावयाचा हें माहीतच आहे तुला. या ग्रीक नगरराज्यांमध्येंही राजा नसे; त्यांचा कारभार त्यामधील श्रीमंत नागरिक चालवीत. त्यामध्यें सामान्य मनुष्याला राज्यव्यवस्थेसंबंधीं कांहीं बोलण्या-करण्याचा हक्क जवळजवळ मुळींच नसे. त्यांच्यामध्यें गुलामांची पुष्कळच संख्या होती. या गुलामांना राज्यव्यवस्थेंत कांहींच अधिकार नव्हते. त्याचप्रमाणें स्त्रियांनाही असे कांहीं अधिकार नव्हते. तात्पर्य, या नगर-राज्यांतील लोकांपैकीं कांहीं थोड्या लोकांनाच फक्त नागरिकत्वाचे हक्क असत; आणि त्यांनाच सार्वजनिक प्रश्नाबाबत मत देतां येई. हे सर्व नागरिक मतदार सहज एका ठिकाणीं जमा होऊं शकत असत. त्यामुळें त्यांना कोणत्याही गोष्टीवर मत देणें अगदींच सोपें पडत असे. त्या ठिकाणीं एकाच राज्याच्या आधिपत्याखालीं भला मोठा भूप्रदेश नव्हता; तर प्रत्येक छोटें नगर-राज्य स्वतंत्र होतें यामुळेंच ही गोष्ट त्या ठिकाणीं शक्य होती. अशा रीतीनें सगळ्या हिंदुस्थानांतील मतदार — फार कशाला, फक्त बंगाल किंवा आग्रा यासारख्या एखाद्याच प्रांतांतील सुद्धां मतदार — सगळेच एकत्र जमा करावयाचे म्हटलें तर कसें काय होईल, याची तूं कल्पना कर. कांहीं करूं म्हटलें, तरी ती गोष्ट स्वभावतःच शक्य नाहीं. इतर देशांमध्यें पुढच्या काळांत हीच अडचण दत्त म्हणून उभी राहिली आणि म्हणूनच 'प्रातिनिधिक राज्यव्यवस्थे'चा तोडगा तिच्यावर शोधून काढण्यांत आला. प्रातिनिधिक राज्यव्यवस्था म्हणजे काय, तर देशांतील साऱ्या मतदारांनीं कोणत्याही प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं एकत्र न येतां आपले प्रतिनिधि निवडावयाचे. या प्रतिनिधींनीं एकत्र जमून देशांतील सार्वजनिक बाबींची चर्चा करावयाची आणि समाजासाठीं कायदे करावयाचे. अशा रीतीनें प्रत्येक सामान्य मतदाराला आपल्या देशाच्या राज्यकारभारांत अप्रत्यक्ष रीतीनें भाग घेतां येतो, अशी समजूत आहे.

पण या प्रकाराचा ग्रीसशीं कांहीं संबंध नाहीं. ग्रीसनें या अडचणीवर निराळाच तोडगा शोधून काढला. छोट्याशा नगरराज्यांहून विस्तृत अशीं राज्येंच निर्माण करावयाचीं नाहींत असें तेथें ठरविण्यांत आलें. मीं तुला सांगितलेंच आहे, कीं ग्रीकांचा एकूण राज्यविस्तार कांहीं थोडा नव्हता. सारा ग्रीस देश, दक्षिण इटली, सिसिली, भूमध्यसमुद्रीच्या किनाऱ्याचे इतरही भाग येथपर्यंत हें राज्य पसरलेलें होतें. परंतु आपल्या ताब्यांतील या सर्व भिन्न भिन्न प्रदेशांवर एक साम्राज्य किंवा एक मध्यवर्ती राज्यसत्ता निर्माण करण्याचा ग्रीकांनीं प्रयत्नच केला नाहीं. तर जेथें जेथें ते गेले, तेथें तेथें त्यांनीं स्थानिक स्वतंत्र नगर-राज्येंच स्थापन केलीं.

हिंदुस्थानांतही प्राचीन काळीं कांहींशीं या ग्रीक नगर राज्यांसारखींच छोटीं छोटीं लोकराज्यें किंवा राजशाह्या होत्या असें तुला आढळून येईल. पण त्यांचें तें तसें स्वरूप म्हणावें असें फार काळ टिकलें नाहीं. लौकरच तीं जास्त जास्त विस्तृत अशा राजशाह्यांमध्यें समाविष्ट झालीं. तथापि, त्याहून पुष्कळ दीर्घकाळपर्यंत आमच्या ग्रामपंचायतींच्या हातीं मात्र अशा प्रकारची बरीच मोठी सत्ता टिकून राहिली होती. प्राचीन आर्यांचीही अगदीं पहिली ऊर्मि, जेथें जेथें जावें तेथें तेथें छोटीं नगरराज्यें प्रस्थापित करावयाचीं, अशीच बहुधा असावी. परंतु भौगोलिक परिस्थितीमुळें आणि स्थानिक प्राचीन संस्कृतीशीं आलेल्या संबंधामुळें त्यांनीं व्यापलेल्या पुष्कळशा प्रदेशांत हळूहळू पुढें त्यांना ही कल्पना सोडून द्यावी लागली असली पाहिजे. विशेषतः इराण-मध्यें मोठमोठीं राज्यें आणि साम्राज्यें उदयास आल्याचें आपणांस आढळतें; हिंदुस्थानांतही मोठमोठीं राज्यें प्रस्थापित होण्याकडेच कल आढळून येतो. परंतु फार दीर्घकाळपर्यंत, इतिहासामध्यें विख्यात अशा एका ग्रीक गृहस्थानें आपल्या कल्पनेप्रमाणें सारें जग जिंकण्याचा पहिला प्रयत्न केला तोंपर्यंत, ग्रीसमध्यें मात्र नगर-राज्येंच चालू होतीं. हा जग जिंकण्याचा प्रयत्न करणारा ग्रीक गृहस्थ म्हणजे अलेक्झांडर-दी-ग्रेट अथवा शिकंदर बादशहा. त्याच्याबद्दल पुढें आपल्याला थोडेंफार बोलावयाचें आहे.

तात्पर्य काय, कीं आपलीं सर्व नगर-राज्यें एकत्र आणून त्यांचें एक मोठें मध्य-वर्ती सरकार, राजशाही किंवा लोकराज्य स्थापन करण्याचा मार्ग ग्रीकांनीं पत्करला नाहीं. आपलीं हीं नगर-राज्यें त्यांनीं निरनिराळीं आणि स्वतंत्र ठेवलीं. एवढेंच नव्हे, तर त्यांच्यामध्यें जवळजवळ नित्य परस्परांशीं प्रचंड स्पर्धा असे आणि त्यामधून वारंवार युद्धेंही उत्पन्न होत.

असें होतें तरी सुद्धां या सर्व नगरराज्यांना एकत्र बांधणारे असे अनेक दुवे होते. त्यांची भाषा एक होती; त्यांची संस्कृति एक होती आणि त्यांचा धर्म एक होता. त्यांच्या धर्मांत पुष्कळ देवदेवता होत्या आणि आपल्या प्राचीन भारतीय पुराण-कथांप्रमाणें त्यांच्यामध्येंही प्रगल्भ, रसाळ आणि सुंदर पुराणकथा होत्या. ग्रीक लोक सौंदर्योपासक होते. आजही त्यांच्या काळचे कांहीं संगमरवरी किंवा साध्या दगडाचे पुतळे उपलब्ध आहेत. आणि त्यांच्या ठिकाणचें सौंदर्य खरोखरच आश्चर्यानें मन मुग्ध

करून टाकणारें आहे. शरीर निरोगी आणि सुंदर असावें अशी त्यांना मोठी आवड होती. आणि त्यासाठीं अनेक खेळ आणि शर्यती यांची त्यांनीं योजना केली होती. ग्रीसमधील ऑलिंपिया नगरींत वेळोवेळीं हे खेळ फार मोठ्या प्रमाणावर करून दाखविण्यांत येत आणि साऱ्या ग्रीसमधील लोक ते पाहण्यासाठीं तेथें जमत. हल्लींसुद्धां ऑलिंपिक सामने म्हणून खेळ होत असतात हें तूं ऐकलें असशील. ऑलिंपियामधील प्राचीन ग्रीक सामन्यांवरूनच हें नांव घेतलेलें आहे आणि भिन्न भिन्न देशांतील खेळाडूंच्या सांघिक किंवा वैयक्तिक सामन्यांना उद्देशून या नांवाचा उपयोग केला जातो.

अशा रीतीनें हीं ग्रीक नगर-राज्यें स्वतंत्रपणें नांदत असत. सामन्यांच्या निमित्तानें तीं एकत्र येत; किंवा वारंवार त्यांच्यामध्यें परस्परांशीं लढायाही होत. परंतु बाहेरून जेव्हां परकीयांचें एक मोठें संकट प्राप्त झालें, तेव्हां मात्र हीं सर्व राज्यें एकत्र झालीं व त्या संकटाचा त्यांनीं प्रतिकार केला. हें संकट म्हणजे इराणची ग्रीसवर स्वारी. त्याबद्दलही पुढें आपल्याला थोडेंसें बोललें पाहिजे.

## ८

# पश्चिम आशियांतील साम्राज्यें

*१३ जानेवारी, १९३१*

काल तुमची सर्वांची भेट झाली त्यामुळें फार बरें वाटलें. परंतु दादूंना पाहून मात्र मला धक्काच बसला! किती आजारी आणि अशक्त झाले आहेत ते! त्यांची चांगली काळजी घ्या बरं का. लौकरच ते पुन्हां चांगले धट्टेकट्टे आणि पहिल्यासारखे हुशार झाले पाहिजेत. काल तुझ्याशीं धड बोलायलासुद्धां झालें नाहीं मला. एवढ्याशा छोट्या भेटींत मनुष्य काय काय करणार? ज्या भेटी व्हाव्याशा वाटतात पण होत नाहींत, जीं संभाषणें करावींशीं वाटतात परंतु करतां येत नाहींत, त्या साऱ्यांची भरपाई करण्यासाठीं तर हें पत्र लिहिण्याचें तंत्र मीं काढलें आहे. पण या पत्रांनीं का कोठें खऱ्या भेटींची आणि संभाषणांची उणीव भरून निघणार आहे? असें हें सोंग किती वेळ पुरें पडणार? परंतु अशा सोंगानें सुद्धां कांहीं कांहीं वेळां मनाचें समाधान होतें थोडें थोडें.

तेव्हां पुन्हां आपण प्राचीन लोकांकडे जाऊं या. नुकतेच आपण प्राचीन ग्रीकांकडे जाऊन आलों. त्याच काळांत इतर देशांची हालहवाल कशा प्रकारची होती? यूरपच्या त्या काळांत इतर देशांच्या भानगडींत पडण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं. त्यांच्याबद्दल विशेष लक्षांत ठेवण्यासारखी फारशी माहितीच आपणांस नाहीं—निदान मला तरी नाहीं. बहुधा उत्तर यूरपचें हवामान एकसारखें बदलत

होतें आणि त्यामुळें तेथें नवी नवी परिस्थिति निर्माण होत होती. तुला आठवत असेल, कीं फार फार प्राचीन काळीं यूरपचा सर्व उत्तर भाग व आशियाचा सर्व उत्तर भाग यांमध्यें अतिशय थंडी होती. या काळाला हिमयुग म्हणत; आणि बर्फाचे प्रचंड खडक–हिमखंड–हळूहळू घसरत घसरत थेट मध्य यूरपपर्यंत येत. त्या वेळीं तेथें मनुष्याची वस्तीच बहुधा नसावी; आणि असलीच तर त्या काळच्या मनुष्याला मनुष्य म्हणण्या-पेक्षां पशूच म्हणणें अधिक शोभलें असतें. तूं म्हणशील, त्या काळीं बर्फाचे खडक घसरत खालीं येत होते हें आज तुम्हांला कसें हो सांगतां येतें? त्या वेळीं तर कोणी ग्रंथकार नव्हते किंवा ग्रंथही नव्हते. तेव्हां त्याबद्दलचा त्या काळीं लिहून ठेवलेला असा कांहीं वृत्तांत थोडाच सांपडण्यासारखा आहे? परंतु सृष्टीच्या ग्रंथाशीं झालेली तुझी ओळख तूं सगळीच विसरून गेलेली नसशील, असें मला वाटतें. सृष्टीला सुद्धा आपला स्वतःचा इतिहास आपल्या खडकांवर आणि दगडांमध्यें लिहून ठेवण्याची कला अवगत आहे. एक प्रकारचें तिचें तें आत्मचरित्रच आहे. आतां हे घसरणारे बर्फाचे खडकच घ्या ना–आपल्या अस्तित्वाचीं अगदीं खास अशीं चिह्नें ते मागें ठेवीत असतात. एकदां हीं चिह्नें ओळखण्याची कला साधली म्हणजे पाहतां क्षणीं दिसून येऊं लागतें, कीं ही घसरत्या हिमखंडांची खूण आहे म्हणून. या चिह्नांचा अभ्यास करायला कांहीं फार दूरचा प्रवास करायला नको. हल्लींही हिमालयांत किंवा आल्प्स पर्वतावर किंवा इतरही ठिकाणीं असे घसरते हिमखंड आढळतात. तेथें गेलें म्हणजे झालें. आल्प्समधील मॉंट ब्लॉकच्या आसपासचे असले हिमखंड तूं स्वतः पाहिलेलेही आहेस; पण ते मागें ठेवीत असलेल्या या खास खुणांबद्दलें तुला त्या वेळीं कोणीं सांगितलें नसावें. काश्मीरमध्यें किंवा हिमालयांत इतरही ठिकाणीं मोठे सुंदर घसरते हिमखंड आढळतात. आपल्याला अगदीं जवळांत जवळ म्हणजे गढवाल भागातील पिंडर नदीच्या खोऱ्यांतील हिमौघ होय. आल्मोऱ्यापासून तेथें चालत जायला फक्त एक आठवडा लागतो. लहानपणीं एकदां मी तेथें गेलों होतों. तुझ्यापेक्षांही त्या वेळीं मी लहान होतों. परंतु मला त्याची अजून चांगली आठवण आहे. त्या वेळचें तें चित्र अजून जसेंच्या तसें माझ्या डोळ्यां-पुढें उभें आहे.

पण प्राचीन काळचा इतिहास सोडून हा पहा मी घसरते हिमखंड आणि पिंडारी यांच्याकडे वाहवलों आहें. भेट आणि संभाषण यांचें सोंग आणण्याचा प्रयत्न करतों आहें ना मी, त्याचा हा परिणाम! जणुं कांहीं तूं माझ्याजवळच बसली आहेस आणि मी तुझ्याशींच बोलतों आहें अशी मला माझ्या मनाची समजूत करून द्यायची आहे. त्यामुळें मधून मधून हे हिमौघ किंवा अशाच कांहीं गोष्टी यांच्याकडे आपल्याला थोडा वेळ फेरफटके करावे लागणारच.

हिमयुगाचा मीं उल्लेख केला आणि त्यावरून आपण या हिमौघाच्या चर्चेंत शिरलों. मध्य यूरपपर्यंत आणि इंग्लंडपर्यंतही असे घसरते बर्फाचे ओघ येऊन पोंचले होते असें आपणांस म्हणतां येईल. कारण त्यांसंबंधींच्या त्या विशिष्ट खुणा या

प्रदेशांमधून सांपडतात. या खुणा प्राचीन खडकांमधून आहेत आणि त्यावरून असें मानावें लागतें, कीं त्या काळीं सबंध मध्य यूरपांत व उत्तर यूरपांत अत्यंत थंडी असली पाहिजे. पुढें पुढें तेथें उष्णता वाढली व हे हिमौघ वितळूं लागले. भूगर्भशास्त्रज्ञ — पृथ्वीच्या इतिहासाचा अभ्यास करणारे लोक — सांगतात, कीं प्रथमतः या ठिकाणीं अत्यंत थंडीचा कडाका होता आणि त्यापाठीमागून तेथें 'कांहीं काळ अत्यंत उष्णतेचा भडका उडाला. या उष्णतेच्या परिणामामुळें यूरपमध्यें दाट अरण्यें उत्पन्न झालीं.

आर्य लोक भ्रमण करीत करीत मध्य यूरपपर्यंतही पोंचले होते. पण या काळीं त्या ठिकाणीं आर्यांनीं विशेष डोळ्यांत भरण्याजोगे असे कांहींच पराक्रम केलेले आढळत नाहींत. तेव्हां त्यांच्याकडे क्षणभर आपण दुर्लक्ष करूं या. ग्रीस आणि भूमध्यसमुद्रावरचे लोक मध्य यूरप आणि उत्तर यूरपमधील या रहिवाशांना बर्बर म्हणजे रानटी म्हणून हीन लेखीत असत. पण रानटी म्हणून समजल्या जाणाऱ्या या लोकांचें जीवन जंगलांत व लहान लहान झोंपड्यांत राहिल्यामुळें आरोग्यसंपन्न होतें. तसाच त्यांच्या ठिकाणीं लढवय्येपणा आलेला होता. हळूहळू स्वतःला नकळतच दक्षिणेकडील अधिक सुधारलेल्या लोकांच्या राज्यसत्तांवर लोंढ्याप्रमाणें चालून जाऊन त्यांना उध्वस्त करण्याच्या भविष्यकाळांतील दिवसाची त्यांची तेथें तयारी होत होती. पण हा सारा प्रकार फारच पुढच्या काळांत घडलेला आहे. त्याची चर्चा आतांच कशाला ?

उत्तर यूरपबद्दलची आपली माहिती अगदींच तुटपुंजी आहे असें आपण म्हणतों. पण जगांतील इतर मोठमोठ्या खंडांविषयीं किंवा विशाल प्रदेशांविषयीं आपल्याला तिळमात्र सुद्धां माहिती नाहीं. अमेरिका खंड कोलंबसनें शोधून काढलें असें म्हणतात पण त्याचा अर्थ कोलंबस तेथें जाण्यापूर्वी त्या ठिकाणीं सुधारलेल्या माणसांची वस्तीच नव्हती असें नव्हे, असें आतां आढळून येऊं लागलें आहे. परंतु प्राचीन ग्रीस किंवा तत्पूर्वीच्या ज्या काळांबद्दल आपण विचार करतों आहों, त्या काळच्या अमेरिकेसंबंधीं मात्र आज आपणांस कांहीं माहिती नाहीं, ही गोष्ट कांहीं म्हटलें तरी खरी आहे. ईजिप्त तेवढा वगळला, तर आफ्रिका खंडाबद्दलही आपल्याला अशीच कांहीं माहिती नाहीं. तशीच भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावरील प्रदेशासंबंधींही.

या सुमारास आशिया खंडांत काय चाललें होतें हें आतां आपल्याला पहावयाचें आहे. या खंडांत संस्कृतीचीं तीन केंद्रें होतीं, हें तूं पाहिलें आहेस. मेसापोटेमिया, भारतवर्ष आणि चीन हीं तीं केंद्रें होत.

मेसापोटेमिया, इराण आणि आशिया मायनर या विभागांत त्या अत्यंत प्राचीन काळींसुद्धां साम्राज्यामागून साम्राज्यें आलीं आणि गेलीं. पहिलें असीरियाचें किंवा असुर-राज्य. नंतर मीडियन ( म्हणजे अमदाई लोकांचें राज्य — यांतील पुरोहितवर्गाला मग म्हणत ) व नंतर बॅबिलोनचें साम्राज्य. आणि त्यानंतर बऱ्याच पुढच्या काळांत इराणचें साम्राज्य. या साम्राज्यांचीं परस्परांशीं कशा प्रकारें युद्धें झालीं, कांहीं काळ शेजारीं

शेजारीं राहून तीं शांतपणें कशीं नांदलीं किंवा त्यांनीं एकमेकांचा कसा नाश केला, हें पाहत बसण्याची आपल्याला गरज नाहीं. ग्रीक नगर-राज्यें आणि पश्चिम आशियामधील हीं साम्राज्यें यांच्यामधील फरक मात्र तूं लक्षांत ठेवणें जरूर आहे. पश्चिम आशियांतल्या या देशांत अगदीं प्राचीन काळापासून मोठमोठीं राज्यें किंवा साम्राज्यें स्थापण्याचें जणुं वेडच होतें असें दिसतें. कदाचित् त्यांची संस्कृति निर्माण होऊन बराच काळ लोटलेला होता हें त्याचें कारण असावें, किंवा आणखी कांहीं निराळीं कारणें असावीं.

या काळचें एक नांव तुझ्या विशेष मनांत भरण्यासारखें आहे. तें म्हणजे क्रीसस. तुझ्या वाचनांत हें नांव आलें असेल. 'क्रीससप्रमाणें संपत्तिमान्' अशी इंग्रजी भाषेंत प्रख्यात म्हणच झालेली आहे. हा क्रीसस किती संपन्न होता, कसा गर्वानें चढलेला होता आणि पुढें त्याचें गर्वहरण कसें झालें, याच्या हकीकती तूं वाचलेल्या असतील. आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावर आज जेथें आशिया मायनर आहे, तेथें पूर्वी लिडिया नांवाचा देश होता. त्याचा हा क्रीसस राजा होता. हा प्रदेश समुद्रकिनाऱ्यावर असल्यामुळें तेथें बहुधा पुष्कळ व्यापार होत असावा. क्रीससच्या काळींच सायरसच्या नेतृत्वाखालीं इराणचें साम्राज्य वाढीला लागून प्रबळ होऊं लागलें होतें. क्रीसस आणि सायरस यांच्यामध्यें वितुष्ट येऊन युद्ध झालें. त्यांत सायरसनें क्रीससचा पराभव केला. त्याच्या या पराजयाचा वृत्तांत ग्रीक इतिहासकार हिराडोटस यानें लिहून ठेवला आहे; आणि त्याच्या या दौऱ्याच्या काळांत क्रीससची सद्बुद्धि जागृत होऊन त्याला ज्ञान कसें प्राप्त झालें, याचें त्यानें वर्णन केलें आहे.

सायरसचें साम्राज्य प्रचंड असून पूर्वेकडे तें जवळजवळ हिंदुस्थानपर्यंत पसरलें होतें. परंतु त्याच्याच वंशांतील जो दारियस त्याचें साम्राज्य याहूनही अधिक विशाल होतें. सबंध ईजिप्त, मध्य आशियाचा कांहीं भाग आणि सिंधु नदीच्यालगतचा हिंदुस्थानचा प्रत्यक्ष कांहीं भाग त्याच्या साम्राज्यांत सामील होता. हिंदुस्थानच्या त्याच्या ताब्यांतील या प्रांतांतून खंडणी म्हणून सोन्याचा रवा फारच मोठ्या प्रमाणांत पाठविण्यांत येत असे असें म्हणतात. आज कांहीं अशी सोन्याची माती त्या प्रांतांत सांपडत नाहीं; बहुतेक हा सारा प्रदेश आज निव्वळ वालुकामय, ओसाड प्रदेश मात्र आहे. यावरून हवामानामध्यें केवढा बदल झाला असला पाहिजे हें दिसून येण्यासारखें आहे.

तूं जसजशी इतिहास वाचूं लागशील, प्राचीन काळच्या परिस्थितीची आधुनिक काळच्या परिस्थितीशीं तुलना करूं लागशील, तसतशी जी एक गोष्ट तुझ्या चित्ताची विशेष पकड घेईल, ती म्हणजे मध्य आशियामध्यें घडून आलेला बदल. याच देशांतून असंख्य टोळ्या आणि स्त्रीपुरुषसमुदाय बाहेर पडले आणि लांब लांबच्या खंडांपर्यंत जाऊन ते पसरले. याच प्रदेशांत प्राचीन काळचीं प्रचंड आणि प्रबल शहरें होतीं. हीं शहरें एवढीं प्रचंड, इतकीं संपन्न, आणि लोकसंख्येच्या दृष्टीनें एवढीं मोठीं होतीं, कीं त्यांच्याशीं फक्त आजच्या यूरप खंडांतील मोठमोठ्या राजधान्यांचीच काय ती तुलना करतां येईल. आमचीं कलकत्ता आणि मुंबई शहरें हीं त्यांच्यापेक्षां किती तरी लहान! या साऱ्या

प्रदेशांत जिकडे तिकडे उद्यानें आणि सस्यश्यामल भूमि ( गोड हिरवळ ) पसरलेली होती आणि हवाही फार उष्णही नाहीं फार थंडही नाहीं अशी आणि मोठी सुखकारक होती. हें असें सर्व एकदां होतें. आणि आतां कितीएक शतकें हा प्रदेश साफ उजाड झाला आहे. तेथें कसलींही जीवनसाधनें उरलीं नाहींत. जणुं निर्मनुष्य वैराण मैदान असा तो प्रदेश बनला आहे. प्राचीन काळचीं त्यामधील समरकंद, बुखारा, यांसारखीं कांहीं शहरें अजून कशींबशीं जीव धरून आहेत; पण त्यांच्या ठिकाणीं त्यांच्या पूर्ववैभवाचा रतिमात्र सुद्धां अंश उरलेला नाहीं. त्या वैभवाची आपल्या नांवानें स्मृति मात्र उत्पन्न करणारीं त्या शहरांचीं जणुं पिशाचेंच हीं शहरें आज झालीं आहेत !

परंतु हा सारा पुढचा इतिहास मी पुन्हां तुला सांगूं लागलों. ज्या प्राचीन काळचा आपण विचार करतों आहों, त्या काळीं समरकंद शहरही नव्हतें किंवा बुखारा शहरही नव्हतें. हें सगळें अजून पुढें व्हावयाचें होतें. अद्याप त्यावर भविष्यकाळचा पडदा पडलेला होता आणि मध्य आशियाचें वैभव व ऱ्हास घडून येण्याला अद्यापि पुष्कळच अवकाश होता.

## ९

## जुन्या परंपरेचें ओझें

*१४ जानेवारी, १९४२*

तुरुंगामध्यें मला कांहीं कांहीं विचित्र संवयी जडल्या आहेत. त्यांतली एक संवय म्हणजे फार लौकर, अरुणोदयाच्यासुद्धां अगोदर निजून उठण्याची. एकीकडे अरुणोदय होऊं लागावा आणि दुसरीकडे चांदण्यांचें तेज मावळत जात असावें या दृश्यानें माझें मन मोहून गेलें आणि त्या मोहामुळें गेल्या उन्हाळ्यांत हा क्रम सुरू झाला. अरुणोदयाच्या पूर्वींचें चांदणें आणि तें विरत जाऊन त्याचें प्रातःकालच्या प्रकाशामध्यें होणारें परिवर्तन हें या संधिकालांतील मधुर दृश्य तूं कधीं पाहिलें आहेस का? अरुणोदय आणि चंद्रप्रकाश यांच्यामधील ही झटापट मी अनेकदां पाहत आलों आहें; त्यांत नेहमीं उषेचा जय व्हायचा हें ठरलेलें आहे. त्या वेळच्या त्या विलक्षण, कांहींशा उदासवाण्या आणि मंदधूसर प्रकाशांत, कांहीं काळपर्यंत हें चांदणें आहे कीं उगवत्या दिवसाचा तो प्रकाश आहे हेंच सांगणें कठिण पडतें. पण मग पाहतां पाहतां एकदम 'अरे, हा तर दिवसाचाच प्रकाश' असें होऊन त्याबद्दल कांहींच शंका राहत नाहीं आणि लढाईंत पराजय झाल्यामुळें मंदतेज झालेला चंद्र रणक्षेत्रांतून माघार घेतो.

या संवयीप्रमाणें आजही मी लौकर उठलों होतों. आकाशांत तारका अजून

चमकत होत्या. उषःकालापूर्वी सर्व वातावरणामध्येंच कांहीं तरी अवर्णनीय असा भास होऊं लागतो. त्यावरूनच काय ती आतां लौकरच उजाडणार आहे असें मानायला जागा होती. वाचीत बसलों होतों मी त्या वेळीं. तोंच पहांटेच्या त्या प्रशांततेचा, लांबून ऐकूं येणारे प्रतिक्षणीं वाढते आवाज आणि गर्दीची सळसळ यांमुळें भंग झाला. माझ्या लक्षांत आलें, कीं आज संक्रांतीचा दिवस. माघ-मेळयाचा आरंभाचा आजचा पर्वणीचा दिवस. तेव्हां गंगा, यमुना आणि लोकांच्या समजुतीप्रमाणें अदृश्य अशी सरस्वती या तिघींचाही ज्या ठिकाणीं संगम होतो, त्या ठिकाणीं त्रिवेणी-संगमावर प्रातःस्नान करण्यासाठीं हे हजारों यात्रेकरू जात असले पाहिजेत. जातां जाता ते भजन करीत होते आणि मधून मधून ‘ गंगामाई की जय ’ असा गंगेचा जयघोष करीत होते. नैनीच्या तुरुंगाच्या भिंतीपलीकडूनसुद्धां त्यांचा आवाज माझ्या कानांवर येत होता. तो ऐकत असतां माझ्या मनांत विचार आला, कीं ज्या श्रद्धेमुळें आपलें सर्व दारिद्र्य, दुःख, दैन्य पार विसरून हे सारे असंख्य लोक या नदीच्या कांठीं जमा होतात, त्या श्रद्धेचें सामर्थ्य केवढें विशाल असलें पाहिजे! बरें, हा प्रकार कांहीं दहावीस वर्षांचा का आहे? आज कितीक शतकें, नव्हे, कितीक हजारों वर्षें दरसाल हे यात्रेकरू या त्रिवेणी-संगमावर येतच आहेत. मनुष्याच्या पिढ्यान् पिढ्या येवोत आणि जावोत ; आज हें राज्य झालें ; उद्यां हें साम्राज्य आलें ; कांहीं काळ वैभवांत राहून तीं नष्ट होऊन त्यांची आठवणही बुजून गेली. तरीसुद्धा प्राचीन परंपरा मात्र चालूच आहे ; आणि पिढ्यांमागून पिढ्या तिच्यापुढें वांकत आहेत. परंपरेमध्येंही पुष्कळदां चांगला अंश असतो. पण कधीं कधीं परंपरेचें हें ओझें फारच भयंकर अवघड होतें आणि प्रगति करणें आपल्याला कठिण होऊन बसतें. आपल्याला आपल्या अगदीं दूरच्या अंधुक भूतकाळाशीं जोडणाऱ्या या परंपरेविषयीं अखंड सांखळीचा विचार मनांत आला म्हणजे मन भारल्यासारखें होतें. १३०० वर्षांपूर्वी लिहिलेले या माघमेळ्याचे वृत्तांत वाचले आणि त्याहीवेळीं मेळ्याची ही परंपरा एक अति प्राचीन परंपराच होऊन गेली होती, हा विचार मनांत आला म्हणजे एक प्रकारचे हर्षरोमांच उपस्थित होतात. परंतु ही सांखळी आपल्याला ज्या वेळीं प्रगतीचा मार्ग चोखाळावयाचा असतो अशा वेळीं सुद्धां आपल्याला चिकटून राहते, आणि आपल्या पकडींत ती आपल्याला जणुं बंदिवानच करून टाकीत असते. भूतकाळाशीं आपल्याला जोडणारे पुष्कळ दुवे आपल्याला राखून ठेवावे लागतील हें खरें ; परंतु त्याबरोबर ज्या ज्या प्रसंगीं परंपरेमुळें आपल्या प्रगतीच्या मार्गांत आपल्याला अटकाव होऊं लागेल, त्या त्या प्रसंगीं तिचा बंदिवास सोडून आपल्याला बाहेर अवश्य यावें लागेल.

गेल्या तीन पत्रांत, आपण ३००० ते २५०० वर्षांपूर्वीच्या काळांत जगांत काय परिस्थिति होती, याचें चित्र डोळ्यांपुढें उभें करण्याचा प्रयत्न करीत होतों. त्यामध्यें प्रत्यक्ष तारीख किंवा सन यांचा मीं कांहींच उल्लेख केला नाहीं. मला हे तारीख-सनांचे

उल्लेख आठवत नाहींत, आणि तूंसुद्धां त्यांची विशेष फिकीर करून स्वतःला त्रास करून घ्यावा असें मला वाटत नाहीं. शिवाय, या प्राचीन काळीं केव्हां काय घडलें हें सनवार किंवा तारीखवार नेमकें सांगणेंही कठिण आहे. पुढच्या पुढच्या इतिहासांत भिन्न भिन्न हकीकतींचे परस्पर-क्रम नीट व्यवस्थितपणें ध्यानांत राहावे म्हणून अशा कांहीं तारखा सांगाव्या लागतील व कांहीं कांहीं तारखा-सन ध्यानांतही ठेवावे लागतील. परंतु सध्यां आपल्याला त्याची गरज नाहीं. आतां आपण फक्त प्राचीन जगाचें एक सर्वसामान्य चित्रच तेवढें पाहण्याचा प्रयत्न करीत आहोंत.

आतांपर्यंत ग्रीस आणि भूमध्यसमुद्राच्या आसपासचे प्रदेश, ईजिप्त, आशिया मायनर आणि इराण यांचें ओझरतें दर्शन आपण घेतलें. आतां आपल्या स्वदेशाकडे परत येऊं या. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचा अभ्यास करण्यामध्यें एक मोठी अडचण आहे. या देशांतील प्राचीन आर्यांमध्यें, ज्यांनाच भारतीय आर्य म्हणून म्हणतात त्यांच्यामध्यें, इतिहास लिहून ठेवण्याकडे लक्षच नव्हतें. पूर्वीच्या कांहीं पत्रांमध्यें हे आर्य किती श्रेष्ठ पदवीला पोंचलेले होते हें आपण पाहिलेलें आहे. उदाहरणार्थ, त्यांचे ग्रंथच पहा – वेद, उपनिषदें, रामायण, महाभारत आणि इतरही ग्रंथ. हे निर्माण करणारे लोक फार श्रेष्ठ दर्जाचेच लोक असले पाहिजेत. या ग्रंथांतून आणि दुसऱ्या कांहीं वस्तूंतून प्राचीन इतिहासाचा अभ्यास करण्यासाठीं पुष्कळ उपयुक्त साधनें सांपडतात हें खरें. आपल्या प्राचीन पूर्वजांची राहणी आणि चालीरीती, आचार आणि विचार यांबद्दल त्यांतून माहिती मिळते. परंतु हे ग्रंथ म्हणजे बिनचूक इतिहास नव्हेत. ज्याला खराखुरा इतिहास म्हणतां येईल असा जो एकच ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे, तो काश्मीरच्या इतिहासाबद्दल आहे. त्यांतही बऱ्याच अलीकडच्या काळचा इतिहास आहे. हा ग्रंथ म्हणजे कल्हण कवीनें लिहिलेला 'रजतरंगिणी' नांवाचा ग्रंथ. ही काश्मीरच्या राजांची बखरच आहे एक. इकडे मी हीं पत्रें लिहीत असतों, तर त्याच वेळीं येथें रणजित फूफा* संस्कृत भाषेंतलि काश्मीरच्या या महान् इतिहासग्रंथाचें इंग्रजी भाषांतर करीत आहेत, हें वाचून तुला मोठी मौज वाटेल. अर्धें भाषांतर त्यांचें पुरें होत आलें आहे. फारच प्रचंड ग्रंथ आहे तो मुळांत. हें सगळें भाषांतर तयार झालें म्हणजे आपण सगळींच जणें तें अत्यंत उत्सुकतेनें वाचूं यांत कांहींच संशय नाहीं. कारण मुळांतून वाचण्याइतकें चांगलें संस्कृतचें ज्ञान आपल्यांत फारसें कोणालाच नाहीं. एक मोठा सुंदर ग्रंथ म्हणूनच केवळ हें भाषांतर वाचावेंसें वाटेल असें नव्हे; तर त्यामध्यें जुन्या काळचा पुष्कळ इतिहास लिहिला आहे म्हणून. तुला आतां माहीत झालेलें आहे, कीं आपल्या घराण्याची मूळ भूमि काश्मीर आहे म्हणून; त्यामुळें विशेषतः त्या काश्मीरच्या भूतकाळाचा वृत्तांत त्यांत आहे यासाठीं तो वाचण्याची उत्सुकता आपल्याला वाटेल.

आर्यांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केला तेव्हां हा देश आधींच सुधारलेला – संस्कृतियुक्त

---

* श्री. रणजित एस्. पंडित, नेहरूंचे मेहुणे, हे या वेळीं याच तुरुंगांत त्यांच्याबरोबर होते.

असा – होता. इतकेंच काय, पण वायव्य हिंदुस्थानांत मोहेंजोदारोपाशीं जे अवशेष आतां सांपडले आहेत, त्यावरून आर्य या देशांत येण्यापूर्वींही पुष्कळ दीर्घकाळपर्यंत या देशांत एक श्रेष्ठ संस्कृति नांदत होती ही गोष्ट आतां निश्चित झाली आहे. परंतु तिच्यासंबंधीं अद्यापि आपणांला विशेष माहिती मिळालेली नाहीं. कदाचित् आमच्या पुराणवस्तुसंशोधकांनीं – जुन्या काळच्या अवशेषांचा खास अभ्यास करणारांना हें नांव आहे – त्या ठिकाणीं सांपडण्याजोगें जें जें आहे, तें सारें खणून काढल्यानंतर कांहीं वर्षांत आपल्याला यासंबंधीं पुष्कळ अधिक माहिती मिळण्याचा संभव आहे.

पण ही प्राचीन संस्कृति क्षणभर बाजूला ठेवली, तरी द्रविड लोकांची मोठी संपन्न संस्कृति त्या काळीं दाक्षिणेंत आणि बहुधा उत्तरेकडेही होती यांत आतां कांहींच शंका राहिलेली नाहीं. त्यांच्या भाषा संस्कृतांतून जन्म पावलेल्या नाहींत. त्या फार फार प्राचीन आहेत आणि त्यांमध्यें सुंदर वाङ्मय रचलेलें आहे. तामीळ, तेलगू, कानडी आणि मल्याळी या त्यांच्या प्रमुख भाषा. दक्षिण हिंदुस्थानांत आजही या भाषा चांगल्या नांदत्या आहेत. हिंदी राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानचे जे भाग पाडले आहेत, ते ब्रिटिश-राज्यसत्तेप्रमाणें उगीच कांहीं तरी पाडलेले नसून ते भाषेच्या पायावर पाडलेले आहेत हें तुला ठाऊक असेल. ही पद्धत किती तरी जास्त चांगली आहे. कारण त्यामुळें एक भाषा बोलणारे, सामान्यतः सारख्या चालीरीती असणारे एका प्रकारचे लोक एका प्रांतिक गटांत येतात. दाक्षिणेंतील कॉंग्रेसचे प्रांत म्हणजे एक आंध्र देश, म्हणजे मद्रास इलाख्यांतील आंध्र प्रांत, यांत तेलगू भाषा आहे. दुसरा तामीळनाड अथवा तामीळ प्रांत, यांत तामीळ भाषा आहे; तिसरा कर्नाटक हा मुंबई इलाख्याच्या दाक्षिणेस असून त्याची भाषा कन्नड म्हणजेच कानडी आहे आणि चौथा केरळ; सामान्यतः मलबारचा भाग म्हणजेच केरळ असून त्याची भाषा मल्याळी आहे. भविष्यकाळीं जेव्हां हिंदुस्थानचे राजकीय विभाग पाडण्याचा प्रसंग येईल, तेव्हां भिन्न भिन्न प्रदेशांतलि भाषांच्य दृष्टीनें फार विचार करावा लागेल यांत मुळींच संशय नाहीं.

याच ठिकाणीं हिंदुस्थानांतल्या भाषांसंबंधीं आणखी कांहीं थोडेंसें लिहून टाकलेलें बरें असें मला वाटतें. यूरपमध्यें आणि इतरत्रही कांहीं लोकांची अशी कल्पना आहे, कीं हिंदुस्थानांत शेंकडों भाषा आहेत. ही अगदीं सर्वस्वीं खुळचट कल्पना आहे. आणि जे कोणी असें म्हणतात, त्यांचें त्यामध्यें अज्ञान मात्र दिसून येतें. हिंदुस्थान हा देश इतका अवाढव्य आहे, कीं त्यांत एका भाषेची लिहिण्याबोलण्याची वेगळी वेगळी ढब स्थानभेदाप्रमाणें आढळून येणें अपरिहार्य आहे. तसेंच देशांत कांहीं डोंगरी टोळ्या आणि जागोजाग कांहीं छोट्या जमाती अशा आहेत, कीं ज्यांच्या स्वतःच्या खास भाषा आहेत. पण साऱ्या हिंदुस्थानचा विचार करीत असतां त्यांचें महत्त्व लक्षांत-सुद्धां घेण्यासारखें नाहीं. केवळ खानेसुमारीपुरतेंच काय तें त्यांचें महत्त्व आहे. मला वाटतें, मागें एका पत्रांत मीं तुला लिहिलें असावें, कीं हिंदुस्थानच्या खऱ्याखुऱ्या भाषांचीं दोन घराणीं आहेत : एक द्रविडांचें. त्यांच्याबद्दल नुकतेंच आपण बोलत होतों; आणि

दुसरें भारतीय आर्यांचें. भारतीय आर्यांची प्रमुख भाषा म्हणजे संस्कृत; आणि भारतीय आर्यांच्या इतर भाषा संस्कृतपासूनच निघालेल्या आहेत. हिंदी, बंगाली, गुजराथी आणि मराठी या त्या भाषा. यांचींच आणखीही थोडीं वेगळीं रूपें आहेत. उदाहरणार्थ, आसामांत आसामी आहे. ओरिसा किंवा उत्कल प्रांतांत उडिया आहे. उर्दू हीही हिंदीचेंच एक वेगळें रूप आहे. हिंदुस्थानी या शब्दानें उर्दू आणि हिंदी या दोन्ही भाषा दर्शविल्या जातात. अशा रीतीनें हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांची संख्या फक्त दहा भरते : हिंदुस्थानी, बंगाली, गुजराथी, मराठी, तामीळ, तेलगू, कानडी, मल्याळी, उडिया आणि आसामी. यांमध्यें आपली मातृभाषा जी हिंदुस्थानी ती पंजाब, संयुक्तप्रांत, बिहार, मध्यप्रांत, राजपुताना, दिल्ली आणि मध्य हिंदुस्थान यांच्यामध्यें म्हणजे साऱ्या उत्तर हिंदुस्थानांत बोलली जाते. केवढा अवाढव्य हा प्रदेश आहे! त्याची लोकसंख्या सुमारें १५ कोटी आहे. म्हणजे पहा, कीं १५ कोटी लोकांची आजच हिंदुस्थानी ही रोजची बोलण्या-लिहिण्याची भाषा आहे; अर्थात् तिच्यांत प्रांताप्रांतांत थोडे थोडे फरक आहेत हें खरें. तसेंच हिंदुस्थानांत इतरही बहुतेक प्रांतांत हिंदुस्थानी समजते हेंही तुला ठाऊक आहे. हिंदुस्थानची ती एकमेव राष्ट्रभाषा होण्याचा संभव आहे. याचा अर्थ असा नव्हे, कीं वर ज्या बाकीच्या प्रमुख भाषा म्हणून सांगितल्या त्या अजीबात नाहींशाच होतील किंवा व्हाव्यात म्हणून. प्रांतीय भाषा म्हणून त्या राहिल्याच पाहिजेत. कारण त्यांच्यामध्यें सुंदर वाङ्मयसंपत्ति आहे आणि कोणाही लोकांची चांगली प्रौढ वाढलेली भाषा त्यांच्यापासून हिरावून घेण्याचा केव्हांच कोणीं प्रयत्न करणें बरें नव्हे. कोणत्याही लोकांचें स्वतःची अधिकाधिक प्रगति करण्याचें एकमेव साधन म्हणजे त्यांची मातृभाषाच होय. याच भाषेंतून त्यांच्या नव्या पिढीचें, लहान बालकांचें शिक्षण होणें अपरिहार्य व स्वाभाविक आहे. हिंदुस्थानांत आज सगळ्याच गोष्टींमध्यें खालीं डोकें वर पाय अशी अवस्था झाली आहे; सगळेंच उलटें-पालटें झालें आहे. म्हणून आम्ही आपापसांमध्यें इंग्रजी भाषा वापरतों. मी सुद्धां तुला इंग्रजींत पत्र लिहावें ही किती हास्यास्पद गोष्ट आहे; पण तरीही माझ्या हातून तसें घडतेंच आहे! लौकरच या संवयींतून आपण मुक्त होऊं, अशी मला आशा आहे.

## १०

# प्राचीन हिंदुस्थानांतील ग्रामीण लोकराज्यें

१५ जानेवारी, १९३१

अशा रीतीनें प्राचीन इतिहासाचें आपलें हें निरीक्षण नीटपणें पुढें कसें चाला-वयाचें कोण जाणे! कारण मुख्य सूत्र सोडून उगीच इकडे तिकडे भटक्या मारीत

राहण्याची मला खोड लागली आहे. गेल्याच पत्रांत पहा—अगदीं मुख्य विषयावर मी येऊन ठेपलों होतों, तोंच एकदम माझा मोर्चा हिंदुस्थानांतल्या भाषांकडे वळला.

तेव्हां पुन्हां एकदां आपण प्राचीन हिंदुस्थानकडे वळूं या. आज ज्याला अफगाणिस्तान म्हणतात तो प्रदेश त्या काळीं आणि त्यानंतर पुष्कळ काळपर्यंत हिंदुस्थानचाच एक विभाग होता हें तुला ठाऊक आहे. हिंदुस्थानच्या वायव्य भागाला त्या वेळीं गांधार म्हणत. उत्तरेकडच्या सर्व प्रदेशांत, सिंधु नद आणि गंगा नदी यांच्या आसपासच्या मैदानांमध्यें आर्यांच्या मोठमोठ्या वसाहती त्या काळीं होत्या—हिंदुस्थानांत वसाहत करावयास आलेले हे आर्य इराण व मेसापोटेमिया यांमधील मूळच्या त्याच्या वसाहतींतून निघूनच इकडे आलेले असावेत. त्या काळींसुद्धां त्या प्रदेशांत मोठमोठीं शहरें उदयास आलेलीं होतीं. त्यावरून हिंदुस्थानांतील या काळच्या वसाहतवाल्या आर्यांना शिल्पकलेचें व बांधकामाचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे. आर्यांच्या या वसाहतींमध्यें पुष्कळ अरण्यें होतीं आणि विशेषतः उत्तर हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान यांच्या मध्यभागीं एक फारच मोठें अरण्य होतें. हें अरण्य ओलांडून दक्षिणेकडे वसाहत करण्यासाठीं सामुदायिक रीतीनें फारसे कोणी आर्य गेले असतील हें संभवत नाहीं. परंतु पुष्कळसे लोक व्यक्तिशः तेथील परिस्थिति समजावून घेण्यासाठीं, त्या ठिकाणीं व्यापारधंदा पाहण्यासाठीं, तसेंच आर्यसंस्कृति व आर्यपरंपरा यांचा प्रसार करण्यासाठीं दक्षिणेंत गेले असतील, हें खास. जुनी परंपरागत कथा अशी आहे, कीं दक्षिणेकडे जाणारा पहिला आर्य म्हणजे अगस्त्य ऋषि होय व त्यानेंच आर्यांचा धर्म संस्कृति यांचा संदेश दक्षिणेंत पोंचविला.

या सुमारास हिंदुस्थान व बाहेरचे देश यांच्यामध्यें पुष्कळ मोठ्या प्रमाणावर व्यापारधंदा भरभराटीला आला होता. दक्षिणेकडील मिरीं, सोनें आणि मोतीं यांमुळें समुद्राच्या पलीकडचे लोक तिकडे ओढले जात होते. तांदुळाचीही निर्गत बहुधा त्या काळीं होत होती. मलबारांतील सागवानही बाबिलोनियाच्या प्राचीन राजवाड्यांतून वापरलेलें आढळण्यांत आलें आहे.

हळूहळू आर्यांनीं आपली विशिष्ट प्रकारची ग्रामव्यवस्था हिंदुस्थानांत प्रस्थापित केली. मूळची द्रविड-ग्रामपद्धति आणि नवीन आर्यांच्या कल्पना यांच्या मिश्रणांतून ही नवी व्यवस्था निर्माण झाली होती. हीं ग्रामें जवळजवळ अगदीं स्वतंत्र सत्ताधीश अशीं असत आणि त्यांचा कारभार लोकनियुक्त पंचायतींच्यामार्फत चाले. बरींचशीं गांवें किंवा छोटीं छोटीं शहरें एका राजाच्या किंवा प्रमुखाच्या सत्तेखालीं एकत्र आलेलीं असत. हा राजा किंवा प्रमुख कधीं कधीं वंशपरंपरेनें गादीवर येत असे, तर कोठें कोठें त्याची निवडणूक होत असे. असे भिन्न ग्रामसंघ एकमेकांशीं सहकार्य करून रस्ते, धर्मशाळा, शेतीसाठीं कालवे—हीं किंवा अशीं सर्वांच्या मालकीचीं व सार्वजनिक उपयोगासाठींच असलेलीं अशीं बांधकामें करीत. राजा हा जरी राज्यांतील प्रमुख व्यक्ति म्हणून समजला जात असे, तरी त्याच्यावरही आर्यांचे कायदे आणि रूढी यांचें

बंधन असे आणि त्याची प्रजा त्याला पदच्युत करूं शके किंवा त्याला दंड करूं शके, असें दिसतें. त्यामुळें मन मानेल तसें वागण्याची सवड त्याला होती, असें आढळत नाहीं. माझ्या मागच्या पत्रांत " L'etat C'est Moi — राजा म्हणजेच राष्ट्र " या सिद्धांताचा उल्लेख केला, तशा प्रकारची पद्धति यांच्यामध्यें अस्तित्वांत नव्हती. अशा रीतीनें आर्यांच्या या वसाहतींत एक प्रकारची लोकशाही नांदत होती. म्हणजे काय, तर या आर्य वसाहतवाल्यांचें आपल्या राज्यकारभारावर कांहीं अंशीं प्रभुत्व चालत होतें.

हे भारतीय आर्य आणि ग्रीक आर्य यांच्यामध्यें तुलना करून पहा. त्यांच्यामध्यें जसे कांहीं फरक होते, तशाच पुष्कळ गोष्टी त्यांच्यांत सारख्याही होत्या. दोन्ही ठिकाणीं एक प्रकारची लोकशाही अस्तित्वांत होती. पण हे मात्र अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं ही लोकशाही फक्त आर्यांच्यापुरती मर्यादित होती. त्यांचे गुलाम किंवा ज्या लोकांना त्यांनीं खालच्या जातींत — वर्गात — बसविलें होतें असे लोक, यांना कांहीं लोकशाही किंवा स्वातंत्र्य यांचा लाभ झालेला नव्हता. आज जे वर्णभेद आणि त्याच्या पोटीं उत्पन्न झालेले असंख्य जातिभेद आपण पाहतों, तसे त्या वेळीं अस्तित्वांत नव्हते. त्या काळीं भारतीय आर्यांनीं आपल्या समाजाचे चार विभाग किंवा वर्ण कल्पिलेले होते. एक ब्राह्मण किंवा ज्ञानी, उपाध्याय आणि ऋषि यांचा ; दुसरा क्षत्रिय किंवा राजे लोकांचा. तिसरा वैश्य म्हणजे व्यापारधंदा व द्रव्योत्पादन करणाऱ्यांचा आणि चौथा शूद्र म्हणजे कामगार आणि मजूर यांचा. हे विभाग अशा रीतीनें धंद्यांवर आधारलेले होते. जित मानववंशापासून आपला समाज अलिप्त ठेवण्याचा असा जो आर्यांचा हेतु नेहमीं असे, तो सुद्धां अंशतः ही वर्णव्यवस्था निर्माण होण्याच्या बुडाशीं असेल कदाचित्. आर्य हे इतके गर्विष्ठ आणि आढ्यतेखोर होते, कीं इतर मानववंशीयांना ते अगदींच हीन लेखीत आणि त्यांचा आपल्या वंशाच्या लोकांशीं संकर होऊं नये अशीच त्यांची मोठी खटपट असे. संस्कृतमधला वर्ण हा विभागवाचक शब्दच मुळीं रंगाचा वाचक आहे. त्यावरून हेंही दिसून येतें, कीं हिंदुस्थानांत वसाहत करावयास आलेल्या या आर्यांचा वर्ण तेथील मूळच्या रहिवाशांपेक्षां अधिक गोरा होता.

तेव्हां एक गोष्ट आपण चांगली लक्षांत बाळगावयाची, कीं एका बाजूला या आर्य लोकांनीं मजूरवर्गाला दडपून ठेवलें होतें व त्यांना आपल्या लोकशाही व्यवस्थेंत मुळींच वांटा दिलेला नव्हता, तर दुसऱ्या बाजूला ते आपल्या स्वतःपुरतें मात्र पूर्ण स्वातंत्र्य उपभोगीत होते. आपले राजे किंवा राज्यकर्ते यांना ते कोणतीही अयोग्य गोष्ट करूं देत नसत. कोणी राज्यकर्ता अयोग्य कर्म करूं लागलाच, तर त्याला ते काढून टाकीत असत. राजे हे सामान्यतः क्षत्रियच असत ; परंतु युद्धाच्या वेळीं किंवा संकटाच्या वेळीं आणि धोक्याच्या प्रसंगीं अंगीं तसें सामर्थ्य असेल तर शूद्र म्हणजे अगदीं खालच्या वर्गातील व्यक्तीलाही राज्यपद प्राप्त होऊं शकत असे. पुढच्या पुढच्या काळांत आर्यांना उतरती कळा लागली. आणि त्यांची वर्ण व जातिव्यवस्था अगदींच लांकडाच्या

ओंडक्यासारखी निर्जीव आणि बिनलवचिक बनली. त्यांच्या जातिभेदांची संख्या इतकी मोठी झाली, कीं त्यामुळें देश अगदीं दुर्बळ बनला आणि त्याचा ऱ्हास झाला. त्यांची आपल्या प्राचीन काळच्या स्वातंत्र्यविषयक निष्ठेची जाणीव सुद्धां नष्ट झाली. कारण पूर्वीच्या काळीं असें म्हणत, कीं आर्य हा कधींही गुलाम होणार नाहीं. आणि आपल्या आर्य या नांवाला, कीर्तीला काळिमा लागण्यापेक्षां मरण पुरवलें, अशी प्रत्येकाची भावना होती.

आर्यांच्या या वसाहती, त्यांचीं खेडीं किंवा शहरें हीं आपोआप वाटेल तशीं वाढलीं नाहींत. त्यांची रचना मुद्दाम योजना आंखून करण्यांत येत असे आणि या योजलेल्या आराखड्यांत भूमितीचा पुष्कळच उपयोग केला जात असे, हें वाचून तुला मोठेंच कौतुक वाटेल. फार कशाला, वैदिक पूजेमध्येंसुद्धां त्या काळीं भूमितींतील आकृतींचा उपयोग करण्यांत येत असे. आजसुद्धां पुष्कळ हिंदू घरांतून निरनिराळ्या पूजाकर्मांच्या वेळीं तशा आकृत्यांचा उपयोग करीत असतात. घरें बांधणें किंवा शहरांची उभारणी करणें या कामीं भूमितीचा फारच निकट संबंध आहे, हें तर स्पष्टच आहे. प्राचीन आर्यांचें खेडेगांव म्हणजे पहिल्या-पहिल्यांदां एक प्रकारचा तटबंदी केलेला लष्करी तळच जणुं असे; कारण त्या काळीं नेहमीं हल्ला होण्याचें भय असे. परंतु पुढें शत्रूंच्या हल्ल्यांचें भय नाहींसें झालें तरी सुद्धां गांवाच्या रचनेचा नमुना जो पूर्वी होता तोच पुढें चालू राहिला. ही रचना चौकोनाच्या स्वरूपाची असे. चारी बाजूंना मोठाले तट असत आणि त्यांमध्यें चार मोठ्या वेशी आणि चार लहान वेशी असत. या तटभिंतींच्या आंत विशिष्ट क्रमानें रस्त्यांची व दारांची रचना असे. गांवाच्या मध्याला पंचायत-घर असे. त्यामध्यें गांवच्या वृद्ध लोकांच्या बैठकी होत असत. लहान गांवांत अशा पंचायत-घराऐवजीं एखादा मोठा वृक्ष असे. या जागीं दरवर्षी गांवांतील सर्व स्वतंत्र नागरिकांनीं जमावयाचें आणि आपली पंचायत निवडावयाची, अशी पद्धति होती.

विद्यार्जन केलेले पुष्कळ लोक शहरांच्या किंवा खेड्यांच्या आसपासच्या जंगलांत जाऊन एकांतवासांत राहत. तेथें अत्यंत साधेपणानें जीवन घालवून शांतपणें अभ्यास किंवा इतर कार्य करावें, असा त्यांचा हेतु असे. परंतु हळूहळू त्यांच्याभोंवतीं शिष्यवर्ग जमा होऊं लागला आणि हे गुरू व त्यांचे शिष्य यांच्या या आणखी नव्या वसाहती निर्माण होऊं लागल्या. या वसाहती म्हणजे हल्लीं जशीं मोठमोठीं विद्यापीठांचीं शहरें असतात तशीं विद्यापीठेंच जणुं, असें आपणांस म्हणतां येईल. त्या ठिकाणीं नाना प्रकारच्या सुंदर सुंदर इमारती नसत ह खरें; परंतु ज्ञानार्जनाची इच्छा असणारे लोक फार लांबलांबून या विद्यार्जनाच्या ठिकाणीं येत असत.

आपल्या आनंदभवनाच्या समोरच भारद्वाज आश्रम आहे. तुला तो चांगला ठाऊक आहे. भारद्वाज हा रामायणाच्या काळचा एक अत्यंत ज्ञानी पुरुष होता आणि वनवासांत आल्यावर प्रत्यक्ष रामचंद्र त्याच्या भेटीला गेले होते, ही गोष्टही तुला बहुतेक ठाऊक असेल. त्याच्या आश्रमांत हजारों विद्यार्थी आणि शिष्य राहत होते

असें लिहिलेलें आहे. त्यावरून असें वाटतें, कीं भारद्वाज ऋषीच्या आधिपत्याखालीं तेथें एक चांगलें विद्यापीठच असावें. त्या काळीं हा आश्रम गंगेच्या कांठीं वसलेला होता. आज जरी तो गंगातीरापासून एक मैलावर दूर आहे, तरी त्या वेळीं तो गंगेच्या तीरावर असणें अगदीं संभवनीय आहे. आपल्या बागेंतली जमीन कितीक जागीं अतिशय वालुकामय आहे आणि त्या काळीं या ठिकाणीं गंगेच्या पात्रांचा एखादा भाग असावा.

हा प्राचीन काळ म्हणजे भारतीय आर्यांच्या मोठ्या वैभवाचा काळ होता. दुर्दैवानें या काळचा कांहीच प्रत्यक्ष इतिहास आपल्याला उपलब्ध नाहीं; जी काय थोडीफार माहिती त्यासंबंधीं आपणांला मिळते, ती सगळी जे ग्रंथ इतिहासाचे नव्हत अशा ग्रंथांच्या आधारावरच मिळविलेली आहे. त्या काळीं जीं राजांचीं किंवा लोकांचीं राज्यें होऊन गेलीं त्यांत दक्षिण बिहारमधील मगध राज्य, उत्तर बिहारमधील विदेह राज्य, काशी अथवा बनारसचें राज्य, कोशल राज्य, ज्याची राजधानी अयोध्या (म्हणजे हल्लींचें फैजाबाद) नगरी होती, आणि गंगा व यमुनांच्या दुआबांतील पांचाल राज्य हीं प्रसिद्ध आहेत. पांचालांच्या राज्यांतच मथुरा आणि कान्यकुब्ज हीं प्रमुख शहरें होतीं. पुढील काळच्या इतिहासांत सुद्धां हीं शहरें प्रसिद्धीस आलेलीं आहेत. आजही तीं दोन्ही अस्तित्वांत आहेत — फक्त कान्यकुब्जाचें नांव कनोज असें झालें आहे. कानपूरजवळचें कनोज शहर तेंच हें. या प्राचीन काळीं उज्जयिनी नगरी पण अस्तित्वांत होती. आज मात्र तिला ग्वाल्हेर संस्थानांतील एका छोट्याशा शहराचें स्वरूप आलेलें आहे.

पाटण्याला त्या वेळीं पाटलिपुत्र म्हणत. त्याच्याच शेजारीं वैशाली ही नगरी होती. प्राचीन इतिहासांत अतिशय प्रसिद्धीस आलेल्या लिच्छवी वंशाची ही राजधानी होती. त्यांचें राज्य हें लोकसत्ताक राज्य होतें. त्याचा कारभार राज्यांतील प्रतिष्ठित गृहस्थांच्या हातीं असे. त्यांच्या प्रमुखस्थानीं निवडलेला अध्यक्ष असे व त्याला नायक म्हणत असत.

कालांतरानें पुढें मोठमोठीं शहरें व नगरें उदयास आलीं, व्यापार वाढला आणि कारागिरांच्या कलाकौशल्याला भरभराटीचे दिवस आले. शहरें हीं व्यापाराचीं मोठमोठीं केंद्रस्थानें बनलीं. जंगलांतले ते पूर्वीचे आश्रम, जेथें ब्राह्मण गुरू आणि त्यांचे शिष्य राहत असत, त्यांचेंही रूपांतर मोठमोठ्या विद्यापीठांच्या नगरांत झालें. या शिक्षणाच्या केंद्रामधून त्या काळीं माहीत असलेल्या प्रत्येक विषयाचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था असे. हे ब्राह्मण गुरू युद्धशास्त्राचेंसुद्धां शिक्षण देत. महाभारतामध्यें वाचलेलें तुला आठवतच असेल, कीं पांडवांचे महान् गुरु द्रोणाचार्य हे ब्राह्मणच होते आणि इतर अनेक विषयांबरोबर कौरव-पांडवांना ते युद्धकलेचेंही शिक्षण देत असत.

## ११

# चीनचीं एक हजार वर्षे

१६ जानेवारी, १९३१

बाहेरच्या जगांतून जी बातमी आली आहे ती जशी अंतःकरणांत खळबळ उडविणारी आणि दुःख उत्पन्न करणारी आहे, तशीच अभिमान आणि आनंद यांनीं मन उचंबळून टाकणारी पण आहे. सोलापूरच्या मंडळींची अखेरची ही बातमी – ही दुःखकारक वार्ता बाहेर पडल्यावर साऱ्या देशभर काय काय प्रकार घडले, याचीं थोडीं थोडीं वर्णनें आम्हांला वाचावयाला मिळालीं. तिकडे आमची जवान मंडळी प्राणार्पण करीत असतांना आणि हजारों स्त्रीपुरुष पाशवी लाठीपुढें धैर्यानें तोंड देत असताना येथें नुसतें कांहीं न करीत स्वस्थ बसून राहणें हें फारच त्रासदायक होतें. पण एकदरी हेंही आम्हांला एक चांगलें शिक्षणच आहे म्हणायचें. मला माहीत आहे, कीं केव्हां ना केव्हां तरी आपल्यापैकीं प्रत्येक स्त्री-पुरुषावर निर्वाणीची परीक्षा देण्याची संधि जरूर येणार आहे. दरम्यान आपले लोक कसे धीरानें दुःख सहन करायला पुढें येत आहेत, आणि शत्रु जों जों नवीं नवीं अस्त्रें वापरीत आहे आणि अधिकाधिक तडाखे देत आहे, तों तों आमच्या लोकांचें सामर्थ्य अधिकाधिक वाढून त्यांचा प्रतिकाराचा निश्चय अधिकाधिकच दृढ होत आहे, हें पाहून आपल्याही हृदयाचा उत्साह, या तुरुंगाच्या आंतही कायम राहतो हाही एक फायदाच आहे.

अशा एखाद्या बातमीनें चित्त वेधून गेलें म्हणजे इतर कशाचा विचार करणें कठिण होतें. परंतु नुसतें कल्पनाजाल विणीत राहिल्यानें कांहींच फायदा नाहीं; आणि कांहीं तरी उपयुक्त कार्य जर आपल्याला करावयाचें आहे, तर मनाला आवर घातलाच पाहिजे. तेव्हां पुन्हां एकदां आपण आपल्या प्राचीन काळाकडे परत जाऊं या आणि कांहीं काळ आपल्या वर्तमानकाळाच्या दुःखदायक भानगडींपासून थोडें दूर जाऊं या.

आज आपण प्राचीन काळांतील भारताचा पाठचा जोडीदारच असा जो चीन देश त्याचा विचार करूं या. चीनमध्यें किंवा पूर्व आशियांतील जपान, कोरिया, इंडोचायना, सयाम, बर्मा यांसारख्या देशांमध्यें आपला आर्यांशीं संबंध येत नाहीं. येथें आपल्याला मंगोलियन वंशाचे लोक आढळतात.

सुमारें पांच हजार वर्षांपूर्वीं चीन देशावर पश्चिमेकडून येणाऱ्या लोकांची पहिली स्वारी झाली. हल्ला करणाऱ्या या टोळयाही मध्य आशियांतूनच आलेल्या होत्या आणि साधनसंपत्तीच्या बाबतींत त्यांची पुष्कळच सुधारणा झालेली होती. त्यांना शेतकीचें ज्ञान होतें आणि शेळयामेंढ्यांचे व गायींचे मोठाले कळप ते बाळगीत असत. ते चांगलीं घरें बांधीत आणि त्यांच्यामध्यें चांगली व्यवस्थित अशी समाजपद्धति निर्माण झालेली

होती. व्हांग हो किंवा पीत नदी[1] म्हणतात, तिच्या आसपास त्यांनीं वसाहत केली व आपलें राज्य स्थापिलें. पुष्कळ शतकेंपर्यंत ते चीनभर पसरत वाढत होते. आणि त्यांच्यांतील कलाकौशल्याची चांगली वाढ होत होती. हे चिनी लोक बहुतांशीं शेतीच करून राहणारे लोक होते आणि त्यांचे राजे म्हणजे माझ्या पूर्वीच्या कांहीं पत्रांतून ज्यांचा कुलपती म्हणून मीं उल्लेख केला आहे, असे जमीनदार असत. वसाहतीची सुरुवात होऊन ६-७ शें वर्षे होऊन गेल्यानंतर म्हणजे आजपासून सुमारें ४००० वर्षांपूर्वी याओ नांवाच्या एका सद्‌गृहस्थानें आपल्याला बादशहा म्हणवून घ्यावयास सुरुवात केली असें दिसून येतें. परंतु केवळ अशी पदवी धारण केल्यामुळें त्याच्या ठिकाणीं ईजिप्त किंवा मेसापोटेमियामधील सम्राटाप्रमाणें सामर्थ्य किंवा सत्ता प्राप्त झाली असें नव्हे. तर त्याची स्थिति कुलपतीं ( टोळीचा नायक ) हून कांहींच निराळी झाली नाहीं. चिनी लोकही अद्यापि शेतीच करणारे राहिले होते आणि त्यांच्यामध्यें सर्वांना एकत्र आणणारी अशी एखादी मध्यवर्ती सत्ताही स्थापन झालेली नव्हती.

प्रथम प्रथम हे कुलपती लोकांकडून निवडले जात असत; परंतु पुढें पुढें ते आनुवंशिक कसे होत गेले हेंही मीं तुला सांगितलें आहे. चीनमध्येंही हाच प्रकार घडून आलेला आढळतो. स्वतःला बादशहा म्हणवून घेणाऱ्या याओच्या पाठीमागून त्याचा मुलगा कांहीं सत्ताधीश झाला नाहीं ; तर त्या काळीं सर्वांत अधिक सामर्थ्यवान् असा समजला जाणारा दुसराच एक मनुष्य स्वतः याओनें अधिकारावर नियुक्त केला. पण लौकरच हे सम्राट् सुद्धां वंशपरंपरागत झाले आणि त्यांच्या या शिया घराण्यानें पुढें ४०० वर्षेपर्यंत चीनमध्यें राज्य चालविलें असें सांगतात. शिया घराण्यापैकीं शेवटचा राजा हा अतिशय क्रूर होता. म्हणून लोकांनीं राज्यक्रांति करून त्याला उलथून टाकलें. त्यानंतर शँग उर्फ यिन नांवाच्या घराण्याच्या हातीं सत्ता गेली व सुमारें ६५० वर्षेपर्यंत त्या घराण्याच्या हातीं ती राहिली.

दोनतीन छोट्या छोट्या वाक्यांच्या एका लहानशा परिच्छेदांत चीनचा एक हजाराहून अधिक वर्षांचा इतिहास मीं अशा रीतीनें कसा उडवून टाकला आहे पहा. एवढ्या मोठ्या विशाल काळाचा इतिहास आणि त्याची आम्ही ही दशा करून टाकतों हें किती विचित्र आहे, नाहीं ? परंतु माझ्या छोट्याशा परिच्छेदामुळें या १००० किंवा १२०० वर्षांची लांबी कांहीं प्रत्यक्षांत कमी होऊं शकत नाहीं, हा विचार तूं कर. रोजच्या व्यवहारांत आपला संबंध फक्त दिवस, महिने आणि वर्षे यांच्या गणतीशींच येत असतो. शंभर वर्षे म्हणजे काय याची नीटशी स्पष्ट कल्पना करणेंसुद्धां तुला कठिण पडेल. तेरा वर्षे आतांशीं कुठें तुला झालीं आहेत, तोंच आपण केवढी मोठी झालों असें तुला वाटतें आहे. एकेका वर्षानें तुला आपण अधिकाधिकच

---

[1] उत्तर चीनमध्यें नदीला हो म्हणतात. दक्षिण चीनमध्यें कियांग म्हणतात. तेव्हां व्हांग हो म्हणजे व्हांग नदी ; यांगचे कियांग म्हणजे यांगचे नदी.

मोठी झालेंसें वाटणार आहे, तेथें इतिहासांतील एखाद्या हजार वर्षांच्या कालखंडाची कल्पना मनामध्यें आणून उभी करणें हें तुला कसें शक्य होणार? खरोखरच हा फार मोठा काळ आहे. एवढ्या अवधींत पिढ्यांमागून पिढ्या येतात आणि जातात; छोट्या छोट्या शहरांचीं मोठमोठीं नगरें बनतात आणि तीं मोडकळीस येऊन धुळीसही मिळून जातात; आणि त्यांच्या जागीं नवीं नवीं शहरें उभीं होतात. गेल्याचं एक हजार वर्षांचा इतिहास क्षणभर मनांत आण; म्हणजे एक हजार वर्षें म्हणजे केवढा दीर्घकाळ आहे याची कदाचित् कांहींशी कल्पना येईल तुला. जगामध्यें गेल्या हजार वर्षांमध्यें जे अनेक बदल घडून आले, ते खरोखर किती परमावधीचे आश्चर्यकारक आहेत.

चीनचा इतिहास–त्याच्यांतील ती संस्कृतीची दीर्घकालीन परंपरा, आणि पांच-पांचशें, आठआठशें किंवा त्याहूनही अधिक काळ सत्ता भोगणारीं तीं राजघराणीं–सारेंच मोठें नवलाईचें प्रकरण आहे.

ज्या ११०० वर्षांची वासलात मीं अशा रीतीनें एका परिच्छेदांत लावून टाकली, त्या दीर्घकालांत चीनची वाढ आणि प्रगति किती मंदगतीनें झाली, हें आतां थोडेंसें पहा. हळूहळू कुलपतींची पद्धति मागें पडली आणि एक मध्यवर्ती सत्ता प्रस्थापित होऊं लागली. सुसंघटित असें राज्ययंत्रही निर्माण झालें. या एवढ्या प्राचीन काळींसुद्धां चीनमध्यें लिहिण्याची कला अवगत होती. पण चिनी लोकांची लेखनपद्धति – लिपि – आपल्याहून किंवा इंग्लिश किंवा फ्रेंच पद्धतीहून फारच निराळी आहे. त्याच्या लिपींत वर्णमाला नाहीं. चिन्हें आणि चित्रें यांवर ती लिपि रचलेली आहे.

६४० वर्षें राज्यावर राहिल्यानंतर क्रांति होऊन शँग घराणें पदच्युत झालें आणि चौ नांवाच्या नव्याच एका घराण्याच्या हातीं राज्यसत्ता झाली. या घराण्याचें राज्य ८६७ वर्षें चाललें. चौ घराण्याच्या काळांतच चीनमध्यें सुसंघटित असें राज्ययंत्र अस्तित्वांत आलें. याच घराण्याच्या काळांत चीनचे दोन महान् तत्त्वज्ञ, कॉन्फ्यूशियस आणि लौ चे हे उदयास आले. या दोघांबद्दल पुढें आपणांला आणखी कांहीं बोलावें लागणार आहे.

शँग घराण्याला राज्यसत्तेवरून जेव्हां हांकलण्यांत आलें, तेव्हां त्या राज्यांतील कि चे नांवाच्या एका मोठ्या अधिकाऱ्यानें चौ राजांची नोकरी करण्याऐवजीं देशत्यागाचा स्वीकार केला. त्यासाठीं सुमारें ५००० अनुयायांसह त्यानें चीन देश सोडला व तो कोरियांत निघून गेला. या देशाला त्यानें प्रभातकालीन शांतीचा प्रदेश – चोसन – असें नांव दिलें. कोरिया किंवा चोसन हा देश चीनच्या पूर्व दिशेला आहे. त्यामुळें कि चेचा प्रवास पूर्व दिशेला उदयास येणाऱ्या सूर्याच्या सन्मुख असा झाला. कदाचित् त्याला वाटलें असेल, कीं पूर्वेच्या अतिशय शेवटच्या टोकाच्या देशांत आपण पोंचलों, म्हणून त्यानें हें असें नांव दिलें असेल. अशा रीतीनें ख्रिस्ती सनाच्या पूर्वी ११०० वर्षें कि चेचें आगमन कोरियांत झालें. तेव्हांपासून त्या देशाच्या इतिहासास सुरुवात झाली. कि चेनें आपल्याबरोबर या नव्या देशात चिनी कला व कारागिरी, शिल्पकला, वास्तुशास्त्र, शेती

आणि रेशीम तयार करण्याची कला याही गोष्टी आणल्या. कि चेच्या मागून आणखीही कांहीं लोक चीनमधून निघून तेथें आले. कि चेच्या वंशांतील राजांनीं चोसनवर ९०० वर्षांहून अधिक कालपर्यंत राज्य केलें.

अर्थात् चोसन हा कांहीं पूर्वेकडील अगदीं शेवटचा देश वास्तविक नव्हता. आपण पाहतोंच, कीं त्याच्याही पूर्वेला जपान आहे. परंतु कि चे कोरियांत आला त्या वेळीं जपानमध्यें काय अवस्था होती याची आपल्याला कांहींच माहिती नाहीं. जपानचा इतिहास चीनच्याइतका प्राचीन तर नाहींच, पण कोरियाइतका सुद्धां तो जुना नाहीं. जपानी लोकच म्हणतात, कीं जपानचा पहिला सम्राट् जिम्मू टेन्नो या नांवाचा असून खिस्तापूर्वी ६०० ते ७०० वर्षांच्या सुमाराला तो राज्य करीत होता. जपानमध्यें सूर्याला एक देवता – स्त्री – मानतात. या सूर्यदेवतेपासून आपल्या या बादशहाचा वंश निर्माण झाला अशी जपानी लोकांची समजूत आहे. हल्लींच्या जपानच्या बादशहाचा जन्म थेट या जिम्मू टेन्नोच्याच वंशामध्यें झालेला आहे व अशा रीतीनें तोही एक प्रकारें सूर्याचाच वंशज आहे, अशीही जपानी लोकांची निष्ठा आहे.

तुला माहीतच आहे, कीं आपल्या देशांतही रजपूत लोक अशाच प्रकारें आपले वंशवृक्ष सूर्य किंवा चंद्र यांच्यापर्यंत मागें नेतात. सूर्यवंशी म्हणजे सूर्यापासून झालेले व चंद्रवंशी म्हणजेच चंद्रापासून झालेले, अशीं त्यांचीं दोन मुख्य घराणीं आहेत. उदेपूरचे महाराजे हे सूर्यवंशी घराण्याचे प्रमुख असून मागें फार लांबपर्यंत ते आपली वंशावळ सांगतात. हे रजपूत लोक म्हणजे मोठे बहादूर लोक असून त्यांचें शौर्य आणि धीरोदात्तपणा यांच्या कथांना अंतच नाहीं.

## १२

# गतकालाची गुणगुण

*१७ जानेवारी, १९३१*

आतांपर्यंत आपण सामान्यतः २५०० वर्षांपूर्वीच्या सुमारास जगाची जी अवस्था बहुधा असावी, तिचें थोडेंसें निरीक्षण केलें. आपलें हें निरिक्षण अगदींच तोटकें आणि मर्यादित स्वरूपाचें झालें आहे. त्यांतसुद्धां ज्या देशांची पुष्कळशी सुधारणा झालेली होती किंवा ज्यांचा कांहीं तरी स्पष्टसा इतिहास आपल्याला माहीत आहे. अशाच देशांचा फक्त आपण विचार केला. ईजिप्तमध्यें तर ज्या संस्कृतींतून पिरामिड किंवा स्फिन्क्सचा पुतळा आणि अशाच इतर – ज्यांची यादीसुद्धां येथें देणें आपल्याला शक्य नाहीं अशा – गोष्टी निर्माण झाल्या त्या संस्कृतीचा नुसता नामनिर्देशच तेवढा आपण करूं शकलों. ज्या काळाचा आपण विचार करतों आहों त्या सुमारास, इतक्या प्राचीन

काळींच, या संस्कृतींच्या वैभवाचा दिवस वर येऊन उताराला सुद्धां लागला होता. नोससच्याही अंताचा काळ या सुमारास अगदीं जवळ येऊन ठेपला होता. चीनमध्यें केवढ्या मोठ्या दीर्घ काळच्या इतिहासाचा आपण शोध घेतला. त्या काळांत चीनमध्यें साम्राज्यसत्ता कशी उदयास आली, लेखनकला, रेशीम व त्यासारख्या कितीक सुंदर वस्तू निर्माण करण्याच्या कला तेथें कशा निर्माण झाल्या, हेंही आपण पाहिलें. कोरिया व जपान यांचें ओझरतें दर्शन आपण घेतलें. हिंदुस्थानमध्यें सिंधु नदीच्या खोऱ्यांत मोहेंजोदारोपाशीं जे अवशेष खणून काढण्यांत आले आहेत, त्यांवरून दिसून येणाऱ्या संस्कृतीचा अगदींच ओझरता उल्लेख मात्र आपण केला. त्यानंतर द्रविड-संस्कृति व त्या लोकांचा परदेशांशीं होणारा व्यापार यांबद्दल थोडा उल्लेख करून आपण आर्यांचा थोडा इतिहास पाहिला. त्यांत आर्यांनीं निर्माण केलेले उपनिषदें व वेद यांसारखे ग्रंथ व रामायण-महाभारत यांसारखीं महाकाव्यें यांचा आपण उल्लेख केला; तसेंच साऱ्या उत्तर हिंदुस्थानभर आर्यांच्या वसाहती कशा पसरल्या, दक्षिणेकडेही त्यांनीं प्रवेश कसा केला, प्राचीन द्रविडांशीं त्यांचा संबंध कसा आला आणि कांहीं अंशीं द्रविड परंतु बहुतांशीं आर्य अशी एक मिश्र सामाजिक व्यवस्था व संस्कृति त्यांनीं या देशांत कशी निर्माण केली, हें थोडेंसें आपण पाहत गेलों. विशेषतः लोकशाहीच्या पायावर आधारलेलीं अशीं त्यांचीं गांवराज्यें कशीं निर्माण झालीं, त्यांतून मोठमोठालीं शहरें व नगरें कशीं निर्माण झालीं व अरण्यांतील आश्रमांतून विश्वविद्यापीठें कशीं उदयास आलीं, याचें आपण निरीक्षण केलें. मेसापोटेमिया व इराण यांच्यामध्यें साम्राज्यांमागून साम्राज्यें उदयास येऊन लय पावलीं या गोष्टीचा अगदीं थोडक्यांत उल्लेख मात्र आपण केला; त्यांतच पुढच्या काळांत दारियसचें साम्राज्य थेट हिंदुस्थानांत सिंधु नदापर्यंत कसें पसरलें होतें हें विशेषतः आपण पाहिलें. पॅलेस्टाइनमध्यें आपण हिब्रू किंवा ज्यू लोकांचें ओझरतें दर्शन घेतलें. वास्तविक जगाच्या एका एवढ्याशा कोपऱ्यांत राहणारे हे लोक, परंतु जगाचें फार मोठें लक्ष त्यांनीं वेधून घेतलेलें आहे. त्यांचे राजे डेविड व सालोमन यांच्यापेक्षां श्रेष्ठ असे राजे जगांत पुष्कळ होऊन गेले. परंतु अशांची जगाला आठवण राहिली नाहीं आणि यांची मात्र आठवण चांगली राहिली आहे. याचें कारण एवढेंच, कीं या इतिहासाचा व राजांचा उल्लेख बायबलमध्यें करण्यांत आलेला आहे. ग्रीसमध्यें त्यापूर्वीच्या नोससच्या नष्ट केलेल्या संस्कृतीच्या थडग्यावर नवी आर्यांची संस्कृति कशी रुजली आणि फुलली, तेथें मग नगरराज्यें स्थापन झालीं व भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर ग्रीकांच्या वसाहती कशा झाल्या, हाही इतिहास आपण पाहिला. रोम शहर त्या वेळीं अजून वैभवाला चढलेलें नव्हतें आणि त्याचें अत्यंत कडवें प्रतिस्पर्धी शहर जें कार्थेज, तें नुकतेंच इतिहासाच्या क्षितिजावर डोकें वर काढूं लागलें होतें.

या सर्व घटनांचें अगदींच ओझरतें दर्शन आपण घेतलें. यामध्यें ज्यांचा उल्लेख केला नाहीं, अशा देशांसंबंधींही कांहीं कांहीं माहिती मी तुला सांगूं शकलों असतों.

उदाहरणार्थ, उत्तर यूरपमधील देश व आग्नेय आशियातील देश. या प्राचीन काळीं सुद्धां दक्षिण हिंदुस्थानांतील दर्यावर्दी लोक बंगालच्या उपसागराच्यापलीकडे मलाया द्वीपकल्प व त्याच्या दक्षिणेचीं बेटें येथपर्यंत जाण्याचें धाडसी काम यशस्वीपणें करीत असत. परंतु काय सांगायचें आणि काय नाहीं याची कांहीं तरी एक मर्यादा आंखून घेऊन आपण ती संभाळलीच पाहिजे. नाहीं तर आपलें गाडें पुढें म्हणून कधीं जाणारच नाहीं.

आपण ज्या देशांचा विचार केला ते देश प्राचीन काळच्या एका जगाचे विभाग होत, असें आज मानण्याची वहिवाट आहे. परंतु हें लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं त्या काळीं दूरदूरच्या देशांमध्यें दळणवळणाचीं म्हणण्याजोगीं साधनेंच नव्हतीं. व्यापारासाठीं अथवा अन्य हेतूनें धाडसी दर्यावर्दी लोक समुद्र ओलांडून या देशांहून त्या देशांत जात असत किंवा कांहीं लोक जमिनीवरूनही लांबलांबचे प्रवास करीत असत हें खरें; परंतु या कामांत धोका फार असल्यामुळें असे प्रवास फारच क्वचित् होत. भूगोलाचें वर्णन त्या काळीं जवळजवळ मुळींच ठाऊक नव्हतें. पृथ्वी वाटोळी नसून सपाट आहे, असें मानीत असत. अशा स्थितींत अगदीं जवळजवळच्या देशांखेरीज निरनिराळ्या देशांची कोणाला कांहींच माहिती नसे. उदाहरणार्थ, ग्रीसमधील लोकांना चीन अगर हिंदुस्थान यांची जवळजवळ कांहीं माहिती नव्हती; तर चिनी किंवा हिंदी लोकांना भूमध्यसमुद्रालगतच्या देशांविषयीं क्वचितच कांहीं माहिती असावयाची.

प्राचीन हिंदुस्थानचा एखादा नकाशा मिळाला, तर तो एकदां चांगला पहा. प्राचीन ग्रंथकारानीं केलेलीं जगाचीं कांहीं कांहीं वर्णनें वाचून किंवा त्यांनीं रेखाटलेले नकाशे पाहून मोठी गंमत वाटते. त्या नकाशात दिलेले कितीएक देशाचे आकार मोठेच विचित्र आणि कांहींच्या बाहींच आढळतात. जुन्या काळच्या जगाचे आधुनिक काळीं तयार केलेले नकाशे त्यापेक्षां पुष्कळच अधिक उपयुक्त असतात; आणि या काळचा इतिहास वाचीत असतांना अशा नकाशांचा तूं वेळोवेळीं उपयोग करीत जावास असें मला वाटतें. नकाशाचा फार उपयोग होतो. त्याच्यावांचून इतिहासाची खरी कल्पना येणें अशक्य आहे. खरें म्हणजे इतिहासाचा अभ्यास करावयाचा, तर मिळतील तितके नकाशे व जुन्या इमारती आणि बांधकामें, मोडतोड झालेलीं ठिकाणें व अशाच आजवर टिकून राहिलेल्या अवशेषांचीं मिळतील तितकीं चित्रें माणसानें मिळविलीं पाहिजेत. इतिहासाच्या निर्जीव सांगाड्यामध्यें अशा चित्रांमुळें एक प्रकारें जिवंतपणा व भरीवपणा उत्पन्न होतो. इतिहासापासून आपल्याला खरोखरच कांहीं बोध मिळावयाचा असेल, तर इतिहासांतील सर्व प्रसंगांचीं चित्रें आपल्या डोळ्यांपुढें एका मागोमाग इतकीं प्रत्यक्ष उठून उभीं राहिलीं पाहिजेत, कीं वाचीत असतांना जणुं कांहीं त्याच क्षणीं ते ते प्रसंग प्रत्यक्ष आपल्यापुढेंच घडत आहेत असा भास होत असावा. अत्यंत चित्तवेधक नाटकाप्रमाणें त्यांनीं आपल्या मनाची पक्की पकड घेतली पाहिजे. मग केव्हां तें हास्यरसपर नाटक असेल, केव्हां शोकरसपूर्ण असेल; त्यांतील रंगभूमि म्हणजे हें सारें जग आणि पात्रें म्हणजे प्राचीन काळांतील श्रेष्ठ स्त्री-पुरुष.

इतिहासाच्या या चित्रपटाचें स्वरूप चांगल्या रीतीनें डोळ्यांत भरावयाला चित्रें आणि नकाशे यांचा बराच उपयोग होतो. प्रत्येक मुलाला किंवा मुलीला अशीं चित्रें व नकाशे सहज मिळण्याची सोय असली पाहिजे. परंतु चित्रांपेक्षांही प्राचीन इतिहासांतील निरनिराळे अवशेष व मोडतोड झालेलीं ठिकाणें प्रत्यक्ष पहायला मिळणें हें त्याहून केव्हांही चांगलें. अर्थात् या गोष्टी साऱ्या जगभर पसरलेल्या असतात. त्या सगळ्याच आपल्याला पहायला मिळणें शक्य नाहीं. परंतु डोळे उघडे ठेवले, तर आपल्यापैकीं प्रत्येकाला कांहीं ना कांहीं तरी अवशेष पहायला मिळणें शक्य आहे. मोठमोठ्या पदार्थ-संग्रहालयांतून असे कांहीं छोटे छोटे अवशेष व संस्मरणीय वस्तू संग्रहीत केलेल्या असतात. हिंदुस्थानमध्यें पूर्वींच्या इतिहासाचे असे विपुल अवशेष आहेत; परंतु त्यांत अगदीं प्राचीन काळांतील अवशेष फारच थोडे आहेत. मोहेंजोदारो आणि हरप्पा हीं दोनच ठिकाणें काय तीं अशा अति प्राचीन काळच्या अवशेषांचीं दाखविण्याजोगीं उदाहरणें सध्यां तरी आहेत. असें असेल, कीं पूर्वींच्या काळच्या पुष्कळशा इमारती येथील उष्ण हवेंत मोडून धुळीस मिळून गेल्या असतील. परंतु याहूनही खरा संभव असा आहे, कीं अशा पुष्कळ इमारती जमिनीखालीं गाडून गेलेल्या अशा अद्यापही शाबूत असाव्या. फक्त त्यांचें उत्खनन होणें जरुरीचें आहे. त्या जसजशा आपण खणून काढूं आणि जुने शिलालेख आणि निरनिराळ्या संस्मरणीय वस्तू जसजशा आपल्याला उपलब्ध होत जातील, तसतशीं आपल्या देशाच्या प्राचीन इतिहासग्रंथाचीं अधिकाधिक पानें आपल्याला वाचावयाला मिळतील. दगड, विटा व चुना यांच्यावर लिहिलेल्या इतिहासांतल्या त्या वृत्तांतामध्यें प्राचीन, अति प्राचीन अशा काळीं आपले पूर्वज काय करीत होते, याचीं वर्णनें आपणांस वाचावयास मिळतील.

तूं दिल्लीस गेलेली आहेस. हल्लींच्या दिल्ली शहराच्या आसपासचे जुन्या शहराचे मोडतोड झालेले कांहीं भाग व कांहीं जुन्या इमारती तूं पाहिल्या आहेस. पुन्हां जेव्हां तेथें जाऊन पाहशील तेव्हां प्राचीन काळचा विचार मनांत आण, म्हणजे या इमारती व हे अवशेष तुला भूतकाळांत ओढून नेतील आणि कोणत्याही ग्रंथांतल्या इतिहासापेक्षां अधिक चांगला इतिहास ते तुला सांगतील. थेट महाभारताच्या काळापासून दिल्लीमध्यें किंवा त्याच्या आसपास लोक राहत आलेले आहेत; वेळोवेळीं त्यांनीं तेथील नगरीला वेगवेगळीं नांवें दिलेलीं आहेत. इंद्रप्रस्थ, हस्तिनापूर, तुघलखाबाद, शहाजहानाबाद, हीं चार नांवें तेवढीं आतां आठवतात मला. सगळीं कांहीं आठवत नाहींत. परंतु परंपरा मात्र अशी आहे, कीं दिल्ली शहर सात वेळां सात निरनिराळ्या ठिकाणीं वसवावें लागलेलें आहे. कारण यमुनेचें वेळोवेळीं आकस्मिकपणें बदलणारें पात्र. आज आपण पाहतों तें रेझीना किंवा नवी दिल्ली, हें या देशाच्या सध्यांच्या राज्यकर्त्यांच्या हुकुमावरून बांधलेलें आठवें शहर होय. दिल्लीमध्यें साम्राज्यामागून साम्राज्यें वैभवाला चढत आलीं आहेत आणि नष्ट झालेलीं आहेत.

आपल्या देशांतील प्राचीनांतील प्राचीन शहर जें वाराणशी ( बनारस ) किंवा

काशी, तेथें जा आणि ती नगरी काय गुणगुणते, तें नीट कान देऊन ऐक. ‘ कितीक साम्राज्यें गेलीं, तरी मी उभीच आहें ; बुद्धदेव आपला नव्या धर्माचा संदेश घेऊन माझ्याच ठिकाणीं आले ; शांति आणि समाधान प्राप्त करून घेण्यासाठीं आजपर्यंत कोट्यवधि लोकांनीं माझा आसरा घेतला ’ हेंच ती तुला सांगेल, नव्हे ? वाराणशी क्षेत्र जुनाट आहे, पांढरे केस झालेल्या म्हाताऱ्यासारखें जख्खड आहे, मोडकें-तोडकें आहे, घाणीचें आगर आहे, हें सगळें खरें; तथापि त्याच्यामध्येंही एक प्रकारचा जिवंतपणा आहे, युगानुयुगाचें सामर्थ्य जणुं त्यामध्यें एकवटलेलें आहे; असें हें वाराणशीचें क्षेत्र आहे. काशीचें सौंदर्य आणि अलौकिकत्व सदैव लोभनीय आहे; कारण तिच्या विस्तारामध्यें आपल्याला प्रत्यक्ष प्राचीन हिंदुस्थानचें दर्शन घ्यावयाला मिळतें आणि तिच्या नदीच्या मंद निनादांत प्राचीन, अति प्राचीन काळाचे आवाज आपल्याला ऐकूं येतात.

इतकें लांब नको असेल, तर आपल्या अलाहाबाद किंवा प्रयागमधील अशोकाच्या स्तंभाकडे जा. त्याच्यावर तो अशोकाच्या आज्ञेवरून कोरलेला लेख वाच. म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वीच्या अशोकाचाच आवाज जणुं प्रत्यक्ष आपल्या कानीं येतो आहे, असें तुझ्या प्रत्ययाला येईल.

## १३

## संपत्ति जाते कोठें ?

*१८ जानेवारी, १९३१*

तूं मसूरीस असतांना तुला मीं जीं पत्रें पाठविलीं त्यांमध्यें मनुष्याची जसजशी सुधारणा होऊं लागली तसतसे त्यांत भिन्न भिन्न वर्ग कसे पडत गेले, हें दाखविण्याचा प्रयत्न मीं केला होता. अगदीं पहिल्या पहिल्या काळांतील माणसाला अन्न मिळविण्यासाठीं साऱ्या आयुष्यभर फार कष्ट पडत. दिवसानुदिवस शिकार तरी करायची किंवा फळेंमुळें शोधीत बसावयाचें; अशा रीतीनें अन्नासाठीं एकसारखें रानोमाळ भटकत राहावयाचें, असें त्या काळीं माणसांना करावें लागे. हळूहळू मग त्यांच्यामध्यें टोळ्या निर्माण झाल्या. वस्तुतः मोठमोठीं कुटुंबें म्हणजेच एकेक टोळी होई; ही सर्व मंडळी एकत्र राहायची व एकत्र शिकार करायची; कारण एकट्यानें राहण्यापेक्षां यांत धोका कमी. यानंतर एक फार मोठा बदल घडून आला. शेतकीचा शोध लागला व त्यामुळें फारच प्रचंड घडामोड झाली. सदासर्वकाळ शिकार करून राहण्यापेक्षां शेतीच्या मार्गानें शेतावरच राहून अन्न उत्पन्न करणें हें माणसांना जास्त सोपें

वाटूं लागलें. नांगरटी करायची, पेरणी-कापणी करायची म्हणजे शेतावरच राहिलें पाहिजे हें ओघानेंच आलें. पहिल्याप्रमाणें माणसांना आतां मन मानेल तसें भटकतां येईनासें झालें; शेताशेजारींच वसती करणें त्यांना भाग पडलें. अशामुळें खेडीं आणि शहरें निर्माण झालीं.

शेतकीबरोबर आणखीही कित्येक बदल घडून आले. शेतात जें अन्न निर्माण होत असे, तें कांहीं ताबडतोब खाऊन फस्त करणें शक्य नव्हतें. रोजच्या गरजेपेक्षां पुष्कळच अधिक खाद्य-पदार्थ शेतींतून निर्माण होत व तो वाढावा सांठवून ठेवण्याची आवश्यकता असे. शिकारीच्या काळांतल्यापेक्षां आतां जीवन अधिकाधिक गुंतागुंतीचें होऊं लागलें; काम करणारांचे निरनिराळे वर्ग होऊं लागले. कोणी प्रत्यक्ष शेतांत काम करीत; कोणी बाहेरचें काम करीत; कोणी देखरेखीचें आणि संघटनेचें काम करीत. हे जे देखरेख करणारे आणि संयोजक लोक होते, ते हळूहळू अधिक प्रबळ झाले आणि त्यांच्यांतूनच पुढें मुखी, कुलपती, सत्ताधारी राजे आणि रजवाडे निर्माण झाले. त्यांच्या हातांत सामर्थ्य आणि सत्ता असे; त्यामुळें प्रत्यक्ष गरजेहून अधिक निर्माण झालेल्या खाद्य-पदार्थांपैकीं बराचसा मोठा हिस्सा ते आपल्या स्वतःकरितां राखून ठेवीत. अशा रीतीनें ते अधिकाधिक श्रीमंत होऊं लागले, तर जे लोक प्रत्यक्ष शेतांत काम करीत असत त्यांना फक्त जेमतेम पोटापुरतेंच मिळूं लागलें. पुढें असा एक काळ आला, कीं हे देखरेख करणारे आणि व्यवस्थापक अतिशय आळशी किंवा नालायक बनले; आपले हे उद्योग नीट व्यवस्थित चालविण्याचें कामसुद्धां त्याना करतां येईनासें झालें. ते करायचे नाहींत कांहीं; परंतु कामकऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या खाद्य-पदार्थांपैकीं भला मोठा हिस्सा मात्र स्वतःला घेण्यास कधीं चुकावयाचे नाहींत; एवढेंच नव्हे, तर ते असेंही मानूं लागले, कीं आपण स्वतः कांहीं न करतां दुसऱ्यांनीं केलेल्या श्रमावर अशा रीतीनें जगण्याचा आपल्याला पुरेपूर हक्कच आहे.

अशा रीतीनें शेतीच्या उदयामुळें जीवनांत फारच प्रचंड फरक झाला हें तुला दिसून येईल. खाद्य-पदार्थ निर्माण करण्याचीं साधनें — पद्धति — सुधारलीं; पहिल्याहून हें काम सुलभ झालें. शेतीनें जसें हें केलें, तसाच समाजाचा सर्व पायाच तिनें बदलून टाकला. माणसाला त्यामुळें अधिक फुरसतीचा वेळ मिळूं लागला. निरनिराळे वर्ग निर्माण झाले. प्रत्येकालाच कांहीं खाद्य-पदार्थ निर्माण करण्यांत गुंतून राहावें लागत नाहींसें झालें; कांहीं लोकांना दुसरीं कामें करण्याला सवड मिळूं लागली. हरएक प्रकारचे हस्तव्यवसाय, कारागिरी सुरू झाली आणि त्यांतून निरनिराळे धंदे उत्पन्न झाले. तथापि, समाजांतील सत्ता मात्र मुख्यतः व्यवस्थापकांचा जो वर्ग होता त्याच्याकडेच राहिली.

पुढच्या काळच्या इतिहासांत सुद्धां खाद्य-पदार्थ किंवा इतर उपयुक्त वस्तू निर्माण करण्याच्या नव्या नव्या पद्धतींनीं किती मोठाले बदल समाजात घडवून आणले, हें तुला पुढें दिसून येईल. पुढें पुढें आतांइतकीच दुसऱ्या कितीएक वस्तूंची गरज

मनुष्याला भासूं लागली. त्यामुळें उत्पादनपद्धतींत मोठमोठाले फरक होऊं लागले. असा कोणताही मोठा फरक उत्पादनपद्धतींत झाला, कीं त्याचा परिणाम म्हणजे समाजपद्धतींतही तितकाच मोठा बदल व्हावयाचा. एक उदाहरण देतों तुला : वाफेचा उपयोग जेव्हां कारखान्यांचीं यंत्रें, आगगाड्या आणि बोटी चालविण्यासाठीं होऊं लागला, तेव्हां वस्तू उत्पन्न करण्याची पद्धति आणि त्यांच्या वांटणीची पद्धति यांच्यामध्यें फार मोठा बदल घडून आला. कारागीर किंवा कसबी लोक हातानें किंवा आपल्या साध्या साध्या हत्यारांनीं करूं शकत, त्यापेक्षां वाफेवर चालणारे कारखाने किती तरी पटीनें वस्तू जलद निर्माण करूं लागले. मोठें यंत्र म्हणजे असें एकेक प्रचंड हत्यारच होतें. बरें, इकडे आगगाड्या आणि आगबोटी खाद्य-पदार्थ आणि कारखान्यांतून तयार झालेला माल दूरदूरच्या देशात जलद नेऊं लागल्या. यामुळें साऱ्या जगांत केवढी घडामोड झाली असेल, केवढा बदल झाला असेल, याची तुला सहज कल्पना करतां येईल.

खाद्य-पदार्थ आणि इतर वस्तू अधिकाधिक जलद उत्पन्न करण्याच्या नव्या नव्या पद्धती इतिहासांत वेळोवेळीं शोधून काढण्यांत आलेल्या आहेत. त्यावरून तुझी स्वाभाविक अशी समजूत होईल, कीं जसजशा अधिक अधिक चांगल्या उत्पादनाच्या पद्धती निर्माण होतील, तसतशा पुष्कळच अधिकाधिक वस्तू निर्माण होतील; त्यामुळें जगांतील संपत्ति वाढेल आणि प्रत्येक माणसाला पहिल्यापेक्षां अधिकाधिक प्राप्ति होऊं लागेल. एक पक्षीं तुझी समजूत बरोबर आहे; तर दुसऱ्या पक्षीं चुकीची आहे. जगांत उत्पादनाच्या चांगल्या पद्धती आल्यामुळें जगांतील संपत्ति खरोखरच वाढली आहे. पण कोणत्या जगाची ? आमच्या देशामध्यें तर अजूनही दारिद्र्य आणि दैन्य प्रचंड प्रमाणांत आहे, हें कोणालाही सहज दिसण्यासारखें आहे. पण इंग्लंड एवढा सुसंपन्न देश आहे ना ! तेथें सुद्धां हीच दशा आहे. कां ? कोठें जात असेल ही संपत्ति ? मोठी नवलाची गोष्ट आहे नव्हे, कीं एकसारखी जास्त जास्त संपत्ति निर्माण होत आहे आणि तरी सुद्धां गरीब ते गरीबच राहिले आहेत ! कांहीं कांहीं देशांत त्यांची स्थिति थोडी थोडी सुधारली आहे खरी. परंतु नवीन निर्माण झालेल्या संपत्तीचें प्रमाण पाहिलें, तर ही सुधारणा म्हणजे कांहींच नव्हे. तथापि थोडा विचार केला तरी पुष्कळ अंशीं ही सर्व संपत्ति कोणाकडे जाते, हें आपल्याला सहज समजून येण्यासारखें आहे. ज्यांचा नेहमींचा धंदा व्यवस्थापकाचा किंवा संघटकाचा आहे, ते लोक जगातील प्रत्येक चांगल्या वस्तूचा भला मोठा हिस्सा आपल्याच हातीं पडावा यासाठीं दक्ष असतात आणि त्यांच्याचकडे ही सारी संपत्ति जाते. त्यांतही विशेष चमत्कार असा, कीं जे लोक प्रत्यक्ष कष्ट करणें तर दूरच राहूं द्या, पण नांवाला म्हणून काम करण्याचें नुसतें नाटकसुद्धां केल्यासारखें करीत नाहींत आणि तरीही दुसऱ्याच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या संपत्तीचा अधिकांत अधिक हिस्सा मात्र स्वतःकडे घेतात, अशा लोकांचे वर्गच आजकाल समाजांत निर्माण झालेले आहेत. आणखी कदाचित् तुला खरें सुद्धां वाटणार नाहीं, कीं समाजांत अशा

लोकांचीच केवढी मानमान्यता असते आणि कितीएक मूर्ख लोकांची अशी श्रद्धा असते, कीं स्वतःच्या उपजीविकेकरितां कांहीं काम करावें लागणें हें मोठें कमीपणाचें आहे; त्यांत मानहानि आहे. अशा प्रकारें 'आधीं कळस मग पाया रे' अशी उलटीपालटी अवस्था झाली आहे जगाची आजकाल. त्यामुळें शेत कसणारा शेतकरी आणि कारखान्यांत काम करणारा कामगार हे जरी जगांतील सारें अन्न आणि सारी संपत्ति निर्माण करीत असले तरी ते स्वतः मात्र गरीबच राहतात, यांत काय नवल? आज आपण आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या गोष्टी बोलत असतों; पण त्या स्वातंत्र्यानें ही उलटी बांगडी जर सरळ व्हायची नसेल, आणि जो प्रत्यक्ष श्रम करतो त्याला त्याच्या श्रमाचें सारें फळ मिळायचें नसेल, तर काय उपयोग आहे अशा स्वातंत्र्याचा? काय किंमत आहे त्याची? राज्यशास्त्र, राज्यकारभार, अर्थशास्त्र, आणि देशांतील संपत्तीच्या विभागणीचें शास्त्र, इत्यादि विषयांवर केवढाले भले मोठे ग्रंथ लिहिले गेले आहेत व जात आहेत. विद्वान् प्राध्यापकांची या विषयांवर प्रवचनें चालू आहेत. पण ही सर्व मोठी खोल चर्चा आणि संशोधन इकडे चालू आहे, तर तिकडे जो काम करतो तो हालच काढतो आहे! दोनशें वर्षांपूर्वी व्हाल्टेअर नांवाचा एक प्रख्यात फ्रेंच गृहस्थ होऊन गेला. राजकारणी मुत्सद्दी आणि त्यांच्याच जातीचे लोक यांविषयीं त्यानें लिहिलें आहे, "जे लोक जमिनीची मेहनत-मशागत करून दुसऱ्या लोकांना जगण्याचीं साधनें निर्माण करून देतात, त्यांना उपासमारीनें मृत्युपंथाला घालविण्याची कला आपल्या सुंदर राजनीतीच्या योगें या राज्यकार्यधुरंधरांनीं शोधून काढलेली आहे."

परंतु मुळींच प्रगति झाली नाहीं, असा मात्र याचा अर्थ नव्हे. रानटी अवस्थेंतूनही मनुष्य हळूहळू सुधारतच गेला आणि भयाण अशा आजूबाजूच्या सृष्टीवरही त्यानें क्रमाक्रमानें आक्रमण केलें. अरण्यें त्यानें तोडून टाकलीं, घरें बांधलीं, शेती करण्यास सुरुवात केली. कांहीं अंशीं माणसानें आतां सृष्टीला जिंकून आपल्या कबजात आणलें आहे अशी एक लोकांची समजूत आहे. परंतु हें सारें भोंगळ बोलणें आहे; तें तितकेंसें वस्तुस्थितीला धरून नाहीं. असें म्हटलें असतां अधिक चांगलें, कीं माणसाला आतां सृष्टीचें पुष्कळच चांगलें ज्ञान होऊं लागलें आहे, आणि जसजसें त्याचें सृष्टीविषयक ज्ञान वाढत गेलें, तसतसें सृष्टीशीं अधिकाधिक सहकार्य संपादन करून आपल्या कामासाठीं तिचा उपयोग करून घेण्यांत त्याला यश आलें आहे. जुन्या काळीं माणसांना निसर्ग व निसर्गांतील निरनिराळ्या घटना यांची भीति वाटे. त्यांचा अर्थ समजून घेण्याऐवजीं त्यांची पूजाअर्चा करण्याचा, त्यांना शांत करण्यासाठीं आहुती अर्पण करण्याचा ते प्रयत्न करीत; सृष्टि म्हणजे कोणी एक रानटी हिंस्र पशु आहे, त्याला शांत ठेवलें पाहिजे, चुचकारलें पाहिजे असें त्यांना वाटे. उदाहरणार्थ, मेघनाद, विद्युत्, सांथीचे रोग यांचें त्यांना अतिशय भय वाटे व त्यांच्यापुढें दानधर्म करून, नैवेद्य अर्पण करून ते शांत होतील असें त्यांना वाटे. सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण म्हणजे एक फार मोठी आपत्ति आहे, असें कितीक साध्या-भोळ्या लोकांना अजूनही वाटतें. निसर्ग-

क्रमांतील ही एक अगदीं साधी स्वाभाविक घटना आहे हें नीट समजून न घेतां हे लोक त्यासाठीं केवढी धावाधाव करतात, उपास करतात, स्नानें करतात; कशासाठीं, तर सूर्य किंवा चंद्र यांना संकटांतून सोडविण्यासाठीं! पण चंद्र आणि सूर्य स्वतःची काळजी घ्यायला पुरेसे समर्थ आहेत कीं. आपण त्यांच्याबद्दल चिंता करीत बसण्याचें कांहीं कारण नाहीं.

अशा रीतीनें सुधारणा आणि संस्कृति यांची उत्पत्ति व वाढ यांबद्दल आतांपर्यंत आपण थोडें बोललों. लोक भटकण्याचें सोडून शहरांत किंवा खेड्यांत राहूं लागले, तेव्हांपासून सुधारणा व संस्कृति यांची सुरुवात झाली हें आपण पाहिलें. खाद्य-पदार्थ जसजसे अधिकाधिक निर्माण होऊं लागले, तसतसा शिकार किंवा खाणेंपिणें यांहून इतर गोष्टींचा विचार करण्यास माणसाला फुरसत मिळूं लागली. विचाराबरोबरच कलाकौशल्य आणि संस्कृति यांचीही सामान्यतः वाढ होण्यास सुरुवात झाली. पुढें लोकसंख्या वाढली, तसें लोकांना अधिकाधिक जवळजवळ राहणें भाग पडूं लागलें. माणसांच्या नित्य परस्परांशीं गांठीभेटी होऊं लागल्या, त्यांचे एकमेकांशीं व्यवहार सुरू झाले. माणसांनीं एकमेकांशेजारीं राहावयाचें म्हटलें कीं त्यांनीं एकमेकांतील एकमेकाना संभाळून घेणें हें आवश्यकच झालें. आपला सोबती किंवा शेजारी याला ज्यापासून दुःख होईल तें न केलें पाहिजे, अशी प्रत्येकाच्या वागण्यांत आवश्यकता उत्पन्न झाली; नाहीं तर सामाजिक जीवन शक्यच होणार नाहीं. उदाहरणार्थ, कुटुंबाचीच गोष्ट घ्या. कुटुंब म्हणजे तरी एक अत्यंत लहान असा समाजच आहे; आणि त्यामधील मंडळी एकमेकांना संभाळून घेतील तरच त्यांत चांगलें सुख नांदेल. कुटुंबांतील मंडळींत स्वाभाविकच एक प्रेमाचें बंधन असतें; त्यामुळें एकमेकांबद्दल सद्भाव असणें कुटुंबात फारसें कठिण नाहीं. तरी सुद्धां कुटुंबामध्येंही आपण दुसऱ्याबद्दल सद्भाव बाळगण्याचें विसरतो आणि वाटतें तितके मोठे सुधारलेले किंवा सुसंस्कृत आपण नाहीं, हें उघड होतें. कुटुंबापेक्षां अधिकाधिक मोठे मनुष्यसंघ जरी घेतले—उदाहरणार्थ, शेजारी-शेजारी, एका शहरांतले लोक, एका देशांतले लोक, किंवा भिन्न भिन्न देशांतील लोक घ्या—तरी त्या सर्वांनाही हाच न्याय लागू आहे. तात्पर्य, लोकसंख्या वाढली तसें सामाजिक जीवन वाढलें आणि त्याचा परिणाम आत्मसंयमन आणि परक्यांबद्दल सद्भाव यांचीही वाढ होण्यांत झाला. संस्कृति आणि सुधारणा यांची व्याख्या करणें कठिण आहे आणि त्या भानगडींत मी पडतही नाहीं. परंतु संस्कृतीमध्यें ज्या कित्येक गोष्टींचा समावेश होतो, त्यांत आत्मसंयम आणि दुसऱ्यांबद्दलचा सद्भाव या गोष्टी मात्र आहेतच आहेत. माणसाच्या अंगीं जर असें आत्मनियंत्रण नसेल किंवा दुसऱ्यांबद्दल सद्भाव नसेल, तर तो मनुष्य असंस्कृत आहे असें आपणांस खात्रीनें म्हणतां येईल.

## १४

# ख्रिस्तपूर्व सहावें शतक आणि धर्म

२० जानेवारी, १९३१

चला, इतिहासाच्या या प्रचंड लांबीच्या प्रवासाला पुन्हां एकदां आपण लागूं या. आतांशा कोठें आपल्या या प्रवासांतील एका मोठ्याशा खुणेच्या दगडाशीं आपण येऊन पोंचलों आहों. हा काळ सुमारें पंचवीसशें वर्षांपूर्वीचा आहे. अथवा दुसऱ्या प्रकारें बोलायचें तर खिस्ताच्या पूर्वी सुमारें सहा शतकांचा हा काळ आहे. अमुक एक निश्चित घटना या सुमारास अमक्या विशिष्ट वर्षी घडली असें कांहीं म्हणावयाचें नाहीं मला. तर एका विशिष्ट कालखंडाची एक कालमर्यादा मी तुला सांगतों आहें. याच काळाच्या सुमारास चोन आणि हिंदुस्थानपासून तों इराण आणि ग्रीसपर्यंत पुष्कळच अत्यंत श्रेष्ठ पुरुष, महान् विचारवंत, धर्मसंस्थापक निरनिराळ्या देशांत होऊन गेलेले आढळतात. हे सगळेजण अगदीं एकाच काळीं झाले असें नव्हे. परंतु खिस्तपूर्व सहाव्या शतकाच्या अगदीं जवळ आगें मागें ते उदयास आलेले असल्यानें हा काळ विशेष लक्ष देण्यासारखा असा भासतो. विचारांची एक प्रकारची लाटच साऱ्या जगभर त्या काळीं उसळली असली पाहिजे असें भासतें. चालू परिस्थितीबद्दल असंतोष आणि त्याहून कांहीं तरी श्रेष्ठतर अशा जीवनाची उत्कंठा, यांनीं त्या काळांत सगळीकडे खळबळ माजली असली पाहिजे. कारण लक्षांत ठेव, कीं जगांतील सर्व श्रेष्ठ धर्मोपदेशकांचा आहे त्याहून कांहीं तरी श्रेष्ठतर असें संपादन करण्याचा, आपल्या लोकांच्या जीवनांत बदल करण्याचा, त्यांना सुधारण्याचा, त्यांचें दुःख नाहींसें करण्याचाच प्रयत्न नेहमीं होत आलेला आहे. ते सारेजण क्रांतिकारकच होते ; आणि आपापल्या काळच्या दोषांवर हल्ला करण्यास ते मुळींच भीत नव्हते. पूर्वीची परंपरा जर चुकीची ठरूं लागली असेल, पुढच्या प्रगतीला ती जेव्हां आडकाठी होऊन राहत असेल, त्या वेळीं निर्भयपणें ते तिच्यावर हल्ला करीत व ती नाहींशी करीत. याहूनही विशेष म्हणजे आदर्श जीवनाचा एक नमुनाच ते आपल्या स्वतःच्या जीवनामध्यें निर्माण करीत. आणि पुढच्या पिढ्यान् पिढ्यांतील असंख्य जीवांना ध्येयभूत होऊन तो आदर्श त्यांना उत्साह देऊं लागे.

खिस्तपूर्व सहाव्या शतकाच्या आसपासच्या श्रेष्ठ पुरुषांमध्यें आपल्या हिंदुस्थानांत बुद्ध आणि महावीर हे झाले. चीनमध्यें कॉन्फ्यूशिअस ( कांङ् फू चे ) आणि लौ चे ; इराणमध्यें झरतुष्ट्र किंवा झोरोआस्टर व ग्रीसमधील सॅमॉन बेटांत पॅयथागोरास हे महापुरुष उदयास आले. तुझ्या कानावर हीं नांवें आलेलीं असतील. अर्थात् वेगवेगळ्या प्रसंगांमुळें व कारणांमुळें. शाळेंत जाणाऱ्या सामान्य मुलांमुलींना वाटत असतें, कीं पॅयथागोरास हा कुडाला तुंबड्या लावून रिकामटेकडे उद्योग करीत बसणारा कोणी तरी रिकामा न्हावी असावा आणि म्हणूनच भूमितीमध्यें त्यानें शोधून काढलेल्या सिद्धांताची घोकंपट्टी करण्याचें

आपल्या कपाळीं आलें असावें ! काटकोन त्रिकोणाच्या तिन्ही बाजूंवरील चौकोनासंबंधींचा तो त्याच्या नांवावर मोडला जाणारा सिद्धांत युक्लिडच्या किंवा इतरही भूमितीच्या सर्व पुस्तकात दिलेला असतो. परंतु पॅयथागोरासनें भूमितिशास्त्रांत कांहीं नवे सिद्धांत शोधून काढले एवढ्यावरच त्याचें महत्त्व संपत नाहीं; तर तो एक महान् विचारवंत तत्त्वज्ञ होता असें मानलें जातें. त्याच्याबद्दल आपल्याला फारशी माहिती नाहीं. आणि कोणी कोणी मानतात, कीं या नांवाचा मनुष्य कोणी मुळीं झालाच नाहीं.

इराणमधील झोरोआस्टर (झरतुष्ट्राचा काळ बहुधा इसवी सनापूर्वीं आठवें शतक हा असावा) हा झोरोऑस्ट्रियन धर्माचा संस्थापक होय असें समजतात. परंतु त्याला या धर्माचा संस्थापक म्हणणें कितपत बरोबर आहे, याबद्दल मला शंका आहे. इराणमधील जुना धर्म व जुनी विचारपरंपरा यांना त्यानें नवें वळण लावलें, असें म्हटलें तर अधिक बरें दिसेल. हा धर्म आज किती तरी दीर्घकाळपर्यंत इराणमध्यें अस्तित्वांतच नाहीं. पुष्कळ काळापूर्वीं पारशी लोक हिंदुस्थानांत आले, तेव्हां त्यांनीं हा धर्म आपल्याबरोबर आणला व तेव्हांपासून ते त्याचें येथेंच पालन करीत आहेत.

चीनमध्यें या काळांत दोन श्रेष्ठ पुरुष झाले : कॉन्फ्यूशियस व लौ चे. कॉन्फ्यूशियसचें नांव खरें म्हटलें म्हणजे कांङ् फू चे असें लिहिणें अधिक प्रशस्त आहे. या दोघांपैकीं कोणालाही खरोखर सर्वसामान्य अर्थानें धर्मसंस्थापक म्हणतां येणार नाहीं. मनुष्यानें काय करावें आणि काय करूं नये यांबद्दल व्यवहाराचे कांहीं नीतिनियम त्यांनीं घालून दिले, परंतु त्यांच्या मृत्यूनंतर लोकांनीं त्यांच्या स्मरणार्थ मंदिरें उभारलीं आणि हिंदू लोक वेदांना किंवा ख्रिस्ती लोक बायबलला मान देतात, तसा मान त्यांच्या ग्रंथांना चीनमध्यें मिळूं लागला. कॉन्फ्यूशियसच्या शिकवणीचा एक परिणाम असा झाला आहे, कीं चिनी लोक हे साऱ्या जगांतील जास्तींत जास्त सभ्य, जास्तींत जास्त शिष्टाचारसंपन्न आणि जास्तींत जास्त सुसंस्कृत असे झाले आहेत.

हिंदुस्थानांत या काळांत महावीर आणि बुद्ध हे महापुरुष झाले. आज जो जैन धर्म म्हणून अस्तित्वांत आहे त्याची स्थापना महावीरानें केली. ह्याचें खरें नांव 'वर्धमान' असें होतें. आणि महावीर ही श्रेष्ठत्वनिदर्शक पदवी त्यास देण्यांत आलेली होती. जैनांची वस्ती आज पश्चिम हिंदुस्थानांत व काठेवाडांत आहे; आणि अलीकडे पुष्कळदां त्यांचा हिंदूंत समावेश केला जातो. काठेवाडामध्यें आणि राजपुतान्यांतील अबूच्या पहाडांत त्यांचीं सुंदर मंदिरें आहेत. जैनांची अहिंसेवर परम निष्ठा आहे, आणि कोणत्याही जीवमात्राला यत्किंचितही इजा देण्याच्या ते विरुद्ध असतात. याच संबंधांत पॅयथागोरास हाही अगदीं पक्का शाकाहारी होता, व आपले शिष्य व चेले यांनींही शाकाहारी असले पाहिजे अशी त्याची कडक शिस्त असे, हें वाचून तुला मोठीच गंमत वाटेल.

त्यानंतर आपण गौतम बुद्धाकडे येऊं. तुला ठाऊक आहे चांगलें, कीं तो क्षत्रिय होता, राजपुत्र होता, आणि सिद्धार्थ असें त्याचें नांव होतें. त्याच्या आईचें नांव

महाराणी माया असें होतें. नवचंद्राप्रमाणें सर्वांची जिच्या ठायीं उल्हासयुक्त भक्ति होती, पृथ्वीप्रमाणें जी सामर्थ्यवान् आणि दृढनिश्चयी होती, आणि कमलाप्रमाणें जिचें अंतःकरण शुद्ध होतें अशी माया महाराणी—असें तिचें जुन्या बखरकारांनीं वर्णन केलें आहे. बुद्धाच्या मातापित्यांनीं त्याला अत्यंत सुखांत आणि ऐश्वर्यांत वाढविलें आणि दुःख किंवा दैन्य हीं त्याच्या दृष्टीसही पडूं नयेत अशी व्यवस्था ठेवली. परंतु ही व्यवस्था पुरी यशस्वी झाली नाहीं. आणि लोककथा अशी चालत आलेली आहे, कीं दारिद्य, दुःख आणि मृत्यु यांचीं दृश्यें अखेर त्याच्या दृष्टीस पडलींच आणि त्यांचा त्याच्यावर आतिशय परिणाम झाला. राजवाड्यामध्यें चोहों बाजूंना नाचत असलेल्या ऐश्वर्यांतही त्याच्या मनाला शांति वाटेनाशी झाली; त्याचें आपल्या सुंदर तरुण स्त्रीवर प्रेम होतें, परंतु तिच्या सहवासांतसुद्धां त्याच्या मनाला मानवी दुःखाचा विसर पडेना. नित्य हाच एक विचार त्याच्या चित्तांत सारखा वाढूं लागला आणि मानवी दुःखाच्या परिहाराचा उपाय शोधून काढण्याची इच्छा त्याच्या अंतःकरणांत बळावत चालली. शेवटीं त्याच्या मनावरील हा ताण त्याला असह्य झाला आणि रात्रीच्या प्रशांत समयीं त्यानें राजप्रासाद व आपलीं प्रिय माणसें यांचा त्याग केला व त्याच्या अंतःकरणांत ज्या प्रश्नांचें काहूर माजलें होतें, त्यांचीं उत्तरें शोधून काढण्यासाठीं सर्व बंधनें तोडून एकाकी असा तो पृथ्वीच्या विशाल पाठीवर बाहेर पडला. या उत्तरांचा शोध करण्यांत त्यानें अत्यंत दीर्घकाल घालविला व अनंत कष्ट भोगले. असें म्हणतात, कीं पुढें पुष्कळ वर्षांनीं गयेमध्यें एका पिंपळाच्या झाडाखालीं बसला असतांना त्याच्या ठिकाणीं 'सम्यक् ज्ञान' स्फुरण पावलें आणि तेव्हांपासून त्याला 'बुद्ध' हें नांव प्राप्त झालें, आणि ज्या झाडाखालीं तो बसला होता त्या वृक्षाला बोधिवृक्ष—ज्ञानाचा वृक्ष—असें नांव मिळालें. प्राचीन काशी क्षेत्राच्या सावलीलाच असलेल्या, त्या काळीं ज्याचें नांव इसीपत्तन म्हणजेच ऋषिपत्तन असें होतें, त्या हल्लींच्या सारनाथ या गांवीं मृगया-वनांत बुद्धानें आपल्या उपदेशाला सुरुवात केली. त्यानें सज्जीवनाचा मार्ग लोकांना दाखविला. देवांना यज्ञामध्यें ज्या अनेक वस्तू अर्पण करण्याचा प्रघात होता, त्याचा त्यानें निषेध केला आणि त्याऐवजीं आपल्या ठिकाणचा क्रोध, द्वेष, मत्सर आणि कुविचार यांचें हवन आपण केलें पाहिजे, असें तो सांगूं लागला.

बुद्धाच्या जन्मकाळीं हिंदुस्थानमध्यें प्राचीन वैदिक धर्म प्रचलित होता. परंतु त्यामध्यें पुष्कळ बदल होऊन त्याची प्रथमारंभींची श्रेष्ठ अवस्था या सुमारास केव्हांच नष्ट झाली होती. ब्राह्मणांनीं त्यामध्यें नाना प्रकारचें कर्मकांड, पूजाअर्चा आणि अंधश्रद्धा यांचें स्तोम माजविलें होतें. कारण उघडच आहे, कीं पूजेअर्चेचें बंड वाढलें कीं भिक्षुकांचें चांगलेंच फावतें. तशींच जातिबंधनें अधिकाधिक कडक होत चाललीं होतीं, आणि सामान्य लोकांना शकुन, मंत्र, चेटकें, जादूटोणा यांच्या भीतीनें ग्रासलेलें होतें. उपाध्याय-वर्गानीं या साधनांच्या साहाय्यानें लोकांवर वर्चस्व मिळविलें होतें व क्षत्रियाच्या सत्तेलाही ते खो देऊं लागले. होते. त्यामुळें क्षत्रिय आणि ब्राह्मण यांच्या-

मध्यें त्या काळीं स्पर्धा निर्माण झाली होती. अशा वेळीं बुद्ध हा बहुजनसमाजाचा महान् समाजसुधारक पुढारी सामान्य जनतेला लाधला आणि उपाध्याय-वर्गाचा हा जुलूम व वैदिक धर्मामध्यें शिरलेले हे दोष यांवर त्यानें हल्ला चढविला. लोकांनीं पूजाअर्चा करण्यापेक्षां किंवा कर्मकांडापेक्षां सदाचारानें जीवन कंठावें, सत्कृत्यें करावीं, या गोष्टींवर त्यानें अधिक भर दिला. त्याच्या उपदेशाची दीक्षा घेतलेले भिक्षू आणि भिक्षुणी यांचे बौद्ध-संघ त्यानें स्थापन केले.

कांहीं काळपर्यंत हिंदुस्थानांत बुद्धधर्माचा म्हणण्यासारखा प्रसार झाला नाहीं. पुढच्या काळांत हिंदुस्थानांत या धर्माचा कसा प्रसार झाला व एक स्वतंत्र धर्म या नात्यानें पुढें येथें त्याचें स्थान नाहींसेंही कसें झालें हें आपण नंतर पाहूं. तिकडे लंकेपासून चीनपर्यंत बुद्धधर्माचा विजयी प्रसार झाला; तरी इकडे हिंदुस्थानांत मात्र—जेथें त्याचा जन्म झाला तेथेंच—त्याला ब्राह्मणधर्मांत अथवा हिंदुधर्मांत पूर्ण गडप करून टाकण्यांत आलें. तथापि ब्राह्मणधर्मावर त्याचा फारच मोठा परिणाम झाला. त्यामुळें ब्राह्मणधर्मामधील कर्मकांड व अंधश्रद्धा कांहीं अंशानें तरी नाहींशीं झालीं.

जगांतील जास्तींत जास्त लोकांचा धर्म आज बुद्धधर्म आहे. असेच अनुयायांची अत्यंत मोठी संख्या असलेले दुसरे धर्म म्हणजे ख्रिस्ती धर्म, इस्लाम धर्म व हिंदुधर्म हे होत. याशिवाय हिब्रू (ज्यू) लोकांचा धर्म, शीखांचा धर्म, पारशांचा धर्म हे आणि असेच कांहीं धर्म आहेत. धर्म आणि त्यांचे संस्थापक यांनीं जगाच्या इतिहासांत पुष्कळ महत्त्वाचें कार्य केलेलें आहे. आणि इतिहासाचे कशाही प्रकारचें निरीक्षण केलें, तरी त्यांत त्यांना विसरून चालणार नाहीं. पण त्यांच्याबद्दल लिहिणें मला मात्र थोडें अवघड पडतें. आजपर्यंत जगामध्यें ज्या ज्या कोणी अत्यंत श्रेष्ठ व लोकोत्तर, उदारचरित व्यक्ती होऊन गेल्या, त्यांच्यामध्येंच सर्व मोठमोठ्या धर्मांचे संस्थापक हेही येतात यामध्यें बिलकुल कांहींही संशय नाहीं. परंतु त्यांचे शिष्य व त्यांच्या जागेवर आलेले त्यानंतरचे लोक हे मात्र पुष्कळदां अशा प्रकारचे समर्थ किंवा सज्जन मुळींच निघालेले नाहींत. धर्माचा उदय मनुष्याला अधिकाधिक चांगला, अधिकाधिक उन्नत, अधिकाधिक उदार करण्याकरितां म्हणून व्हावा. परंतु त्यानें उलट लोकांना पशुकोटीस न्यावें, असेंच पुष्कळदां इतिहासांत घडलेलें आढळून येतें! लोकांना ज्ञान प्राप्त करून देण्याऐवजीं धर्मांनीं त्यांना पुष्कळदां अज्ञानांधकारांतच दडपून ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे. लोकांचीं मनें विशाल करण्याऐवजीं त्यांनीं तीं पुष्कळदां आकुंचित आणि इतरांबद्दल असहिष्णु केलेलीं आहेत. धर्माच्या नांवानें पुष्कळ श्रेष्ठ आणि उज्ज्वल कार्यें करण्यांत आलेलीं आहेत आणि धर्माच्याच नांवानें लाखों, कोट्यवधि माणसें मारण्यांतही आलेलीं आहेत, व शक्य त्या सर्व प्रकारचे गुन्हे करण्यांत आलेले आहेत.

तेव्हां अशा धर्माबद्दल आपलें धोरण काय असावें? कित्येक लोकांच्या मनांत धर्म म्हटला, कीं धर्माच्या अंगभूत परलोकाची कल्पना असते. मग त्याला स्वर्ग म्हणा, नंदनवन म्हणा, नाहीं तर आणखी कांहीं नांव द्या. धार्मिक राहावयाचें किंवा कांहीं विशिष्ट

व्रतवैकल्यें करावयाचीं तीं ते या स्वर्गांत जावयाला मिळावें याच आशेनें करतात. हें पाहिलें म्हणजे लाडू, जिलबी किंवा मिठाईच्या बक्षिसाच्या आशेनें कोणतेंही काम करणाऱ्या लहान मुलाची मला आठवण होते. एखाद्या मुलाच्या मनापुढें सदासर्वकाळ लाडू-जिलबीचाच विचार राहत असेल, तर त्या मुलाचें शिक्षण कांहीं नीटपणें झालेलें नाहीं असेंच तूं म्हणशील, खरें कीं नाहीं ? आणि जर कोणी मुलगे किंवा मुली चांगली गोष्ट करावयाची झाली तर ती केवळ लाडू-जिलबीच्या खाऊच्या आशेनें करावयाची असें करतील, तर तुला कांहीं तीं मुलें पसंत पडणार नाहींत. मुलांची ही कथा; तर मग चांगलीं मोठीं शिकलीसवरलेलीं माणसें जर अशींच विचार करूं लागलीं किंवा अशींच वागूं लागलीं तर त्यांना काय म्हणूं आपण ? कारण, कांहीं म्हटलें तरी लाडू-जिलबीच्या खाऊची कल्पना आणि स्वर्गाची कल्पना यांत तत्त्वतः कांहीं सुद्धां फरक नाहीं. आपण सगळींच माणसें थोड्याफार प्रमाणांत स्वार्थी असतों. तरीपण आम्ही आपल्या मुलांना मात्र अशी शिकवण देण्याचा प्रयत्न करीत असतों, कीं त्यांनीं शक्य तितकें निःस्वार्थी व्हावें; निदान आपलें ध्येय तरी सर्वस्वीं स्वार्थरहित असावें, म्हणजे तें साध्य करीत असतांना त्याप्रमाणें स्वार्थरहित वागण्याचा प्रयत्न तरी आपण करीत राहूं.

आपण जें कांहीं करतों त्याचें फळ मिळवावें, अनुभवावें अशी आपली सगळ्यांचीच इच्छा असते. ही स्वाभाविक प्रवृत्ति आहे. परंतु आपलें ध्येय काय असावें ? साऱ्या जीवनांत आपण काय केवळ आपलाच विचार करीत राह्यचें, कीं समाजहित, आपल्या देशाचें हित किंवा अखिल मानवसमाजाचें हित अशा कांहीं तरी जास्त विशाल कल्याणाचा विचार करावयाचा ? तसें पाहिलें, तर या अधिक विशाल कल्याणामध्यें आपल्या वैयक्तिक कल्याणाचा अंतर्भाव होणारच आहे कीं ! मला वाटतें, कांहीं दिवसांपूर्वीं एका पत्रात मीं तुला एक संस्कृत श्लोक सांगितला होता. त्यांत असें सांगितलें होतें, कीं कुटुंबासाठीं व्यक्तीचा त्याग करावा, समाजासाठीं कुटुंबाचा त्याग करावा, आणि देशासाठीं समाजाचा त्याग करावा. आज आणखी एका संस्कृत श्लोकाचें भाषांतर मुद्दाम तुझ्याकरितां मी देतों. भागवतामधला श्लोक आहे हा. त्यांत म्हटलें आहे कीं, "अष्टसिद्धींनीं युक्त अशी परमानंदाची अवस्था मला नको; पुनर्जन्मांतून सुटका मला नको; दुःखतप्त लोकांचें दुःखच मला प्राप्त होवो; त्यांच्याशीं समरस होऊन त्यांचें दुःखविमोचन करावयास मला सांपडो." *

जगांत एक धार्मिक मनुष्य एक मत सांगतो, तर दुसरा दुसरेंच सांगतो. आणि बहुतेक प्रसंगीं एक दुसऱ्याला मूर्ख तरी समजतो किंवा लुच्चा तरी मानतो. त्यांच्यापैकीं खरा कोण ? ते ज्या गोष्टीबद्दल बोलत असतात त्या पाहायला सांपडत नाहींत; पुराव्यानें सिद्ध करतां येत नाहींत. तेव्हां त्यांच्या वादाचा निकाल करणें कठिणच आहे.

---

*या बाबतींत भागवतांतील पुढील दोन श्लोक लक्षांत घेण्यासारखे आहेत :

(१) को नु स्यादुपायोत्र येनाहं दुःखितात्मनाम् । अन्तःप्रविश्य भूतानां भवेयं दुःखभाक् सदा ॥

(२) न त्वहं कामये राज्यं न स्वर्गं नापुनर्भवम् । प्राणिनां दुःखतप्तानां कामये दुःखनाशनम् ॥

परंतु अशा गोष्टींबद्दल त्यांनीं इतक्या निश्चयपूर्वक विधानें करावीं आणि त्याबद्दल एकमेकांचीं डोकीं फोडावीं हें मात्र धृष्टपणाचें वाटतें. आपल्यापैकीं बहुतेक मंडळी संकुचित विचाराची असतात आणि फारशी ज्ञानीही नसतात. तेव्हां मलाच सारें सत्याचें दर्शन झालें आहे असें म्हणून तें आपल्या शेजाऱ्यांवर लादण्याचा प्रयत्न करण्याचा आपल्याला कांहीं अधिकार आहे काय? आपलें म्हणणें कदाचित् खरें असेल. कदाचित् आपल्या शेजाऱ्याचेंही म्हणणें खरें असेल. झाडावरचें एखादें फूलच फक्त तुम्हांला दिसेल, तर तें फूल म्हणजेच झाड असें कांहीं तुम्हांला म्हणतां येणार नाहीं. दुसऱ्या एखाद्याला फक्त पानच दिसलें, आणखी एकाला खोडच दिसलें; प्रत्येकाला झाडाचा फक्त एखादा भागच दिसला, आणि त्यापैकीं प्रत्येक जण म्हणूं लागला, कीं फूल म्हणजेच झाड, पान म्हणजेच झाड, खोड म्हणजेच झाड; आणि असें म्हणून आणखी वर त्यासाठीं जो तो झगडा करायला लागला, तर तें किती मूर्खपणाचें आहे!

मला तर बुवा परलोकाबद्दल कांहीं आस्था वाटत नाहीं. या जगांत काम काय करावें, हाच एक विचार माझ्या मनांत भरून राहिलेला आहे आणि या जगांतला माझा मार्ग मला नीट समजला, तर माझें समाधान आहे. या जगातलें माझें कर्तव्य मला चागलें समजलें असेल, तर दुसऱ्या कोणत्या जगाची मला मुळींच भानगड नको आहे.

तूं मोठी झालीस म्हणजे तुला अनेक प्रकारचे लोक भेटतील. कोणी धर्मनिष्ठ असतील, कोणी धर्मविरोधक असतील, तर कोणाला या संबंधानें कांहीं विचारच नसेल. मोठमोठीं धर्ममंदिरें आणि धर्मसंस्था जगांत आहेत. त्यांच्याजवळ प्रचंड संपत्ति आहे आणि सत्ताही आहे. कधीं कधीं त्यांचा उपयोग चांगल्यासाठीं होतो, तर कधीं कधीं वाइटासाठीं होतो हेंही तुला दिसेल. अत्यंत सज्जन आणि उदारचरित अशीं धार्मिक प्रवृत्तीचीं माणसें तुला आढळतील, तर धर्माच्या पांघरुणाखालीं लोकांना लुबाडणारे व फसविणारे लुच्चे व लफंगे बदमाष लोकही तुला आढळतील. या सर्व गोष्टींचा विचार करून तुला आपलें स्वतःचें मत बनवावें लागेल. इतरांकडून मनुष्याला पुष्कळच शिकतां येतें खरें; पण प्रत्येक महत्त्वाची गोष्ट माणसाला स्वतःच शोधून काढावी लागते, किंवा अनुभवून पारखावी लागते. कांहीं गोष्टी अशा आहेत, कीं त्यांबद्दलचें होय-नाहीं हें ज्याचें त्यानेंच ठरवावें लागतें.

अर्थात् कोणतेंही मत बनविण्याची एव्हाच घाई करूं नको. कोणत्याही मोठ्या किंवा मर्माच्या गोष्टीसंबंधीं एखादा निर्णय करण्यापूर्वी असा निर्णय करण्याच्या पद्धतीचें माणसानें चांगले शिक्षण घेतलें पाहिजे. ज्यानें त्यानें स्वतंत्र विचार करावा आणि स्वतःचें मत स्वतः बनवावें हें खरें आहे. परंतु तसें करण्याचें सामर्थ्य अंगीं आलेलें असलें पाहिजे. पाळण्यांतल्या पोराला कांहीं कोणी कोठल्या गोष्टीचा निर्णय करायला सांगणार नाहीं. आणि जगांत अशीं पुष्कळ माणसें आहेत, कीं वयानें जरी तीं पुष्कळ मोठीं झालीं असलीं, तरी बुद्धीच्या बाबतींत तीं जवळजवळ पाळण्यांतल्या मुलाइतकींच मोठीं असतात!

नेहमींपेक्षां बरेंच लांब पत्र आज मीं तुला लिहिलें आहे. कदाचित् तुला तें कंटाळवाणेंही वाटेल. पण या विषयाबद्दल एकदां थोडेंसें माझें मत सांगायचेंच होतें मला. आज तुला त्यांतलें कांहीं समजलें नाहीं, तरी कांहीं हरकत नाहीं. लौकरच तें तुला समजूं लागेल.

## १५

## इराण आणि ग्रीस (यूनान)

*२१ जानेवारी, १९३१*

आज तुझें पत्र आलें. तुझ्या आईचें आणि तुझें ठीक चाललें आहे हें पाहून बरें वाटलें. परंतु दादूंच्या पाठीमागचा हा तापाचा त्रास एकदां लौकर नाहींसा व्हायला हवा. साऱ्या जन्मभर त्यांना इतकी कांहीं दगदग करावी लागली आहे आणि तरी या वयांत सुद्धा त्यांना शांति आणि विश्रांति मिळत नाहीं.

एकूण तुझें म्हणणें काय, कीं पुस्तकालयांतलीं पुष्कळशीं पुस्तकें तूं वाचलीं आहेस आणि आतां आणखी कांहीं पुस्तकांचीं नांवें मीं तुला सुचवायला हवीं. पण काय काय वाचलेंस हें कोठें तूं मला लिहिलें आहेस? पुस्तकें वाचायची संवय चांगली खरी, पण भराभर आणि भाराभर पुस्तकें वाचणाराबद्दल मला आपली जरा शंकाच वाटते. हे लोक हीं पुस्तकें नीटपणें वाचीत नसले पाहिजेत असा मला संशय येतो; उगीच आपलें वरवर चाळोत चाळीत वाचीत असतील; आज वाचायचें आणि उद्यां विसरायचें! एखादें पुस्तक चांगलें वाचण्याजोगें आहे म्हटलें, तर मग तें नीट काळजीपूर्वक आणि खोल विचारपूर्वक वाचण्यासारखेंच असलें पाहिजे. पण जगांत मुळींच वाचूं नयेत अशींच खंडीभर पुस्तकें आहेत. आणि खरीं चांगलीं पुस्तकें निवडून काढण्याचें काम सोपें नाहीं तितकें. तूं म्हणशील, "मी तर सगळीं आपल्या घरच्याच पुस्तकसंग्रहांतील पुस्तकें वाचतें, आणि घरचीं हीं सगळीं पुस्तकें चांगलीं असलींच पाहिजेत; नाहीं तर आपल्या घरीं तीं कशाला आणलीं असतीं?" ठीक, ठीक, वाचा बुवा; आणि येथून नैनी तुरुंगांतून मला ज्या कांहीं सूचना करतां येतील त्याही मी करीत जाईन. पुष्कळदां मी विचार करीत असतों, कीं तुझ्या शरीराची आणि बुद्धीची किती झपाट्यानें वाढ होत आहे. या काळांत मी तुझ्याजवळ असतों, तर किती चांगलें झालें असतें! तुला म्हणून हीं जीं पत्रें मीं लिहीत असतों, तीं तुझ्या हातीं पडण्याचा जेव्हां योग येईल, तेव्हां त्यांच्या मानानें तुझें ज्ञान किती तरी अधिक वाढलेलें असेल. हरकत नाहीं. तोंपर्यंत चांदला[१] तीं वाचतां येऊं लागतील; तूं नाहीं तर ती, कोणी तरी त्यांचा परामर्श–आस्वाद–घ्यायला उभें राहीलच ना!

[१] इंदिरेची छोटी आतेबहीण, चंद्रलेखा पंडित.

तेव्हां पुन्हां एकदां आपण ग्रीस आणि इराण यांच्याकडे जाऊं या आणि थोडा वेळ त्यांच्यामधील युद्धाचा विचार करूं या. एका पत्रांत आपण ग्रीक नगर-राज्यें आणि ग्रीक लोक ज्याला दरायस म्हणत त्याच्या (दाराच्या) अमलाखालील इराणचें प्रचंड साम्राज्य यांच्याबद्दल चर्चा केली आहे. दरायसचें हें साम्राज्य नुसतें विस्तारानेंच मोठें होतें असें नव्हे, तर संघटनेच्या दृष्टीनेंही तें श्रेष्ठ होतें. आशिया मायनरपासून सिंधु नदापर्यंत तें पसरलेलें होतें. ईजिप्त आणि त्याचप्रमाणें आशिया मायनरमधील कांहीं ग्रीक नगरें यांचाही त्यामध्यें समावेश होत होता. या एवढ्या विशाल साम्राज्याच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चांगले रस्ते बांधलेले होते आणि त्यावरून त्या साम्राज्यशाहीचें टपाल नियमितपणें येत-जात असे. कोणत्या ना कोणत्या तरी सबबीवर ग्रीकांच्या नगर-राज्यांवर स्वारी करावी, असें या दरायसनें ठरविलें. त्यांच्या या परस्परांमधील युद्धांत इतिहासांतील कांहीं प्रसिद्ध लढाया घडून आल्या.

या लढायांचे वृत्तांत आपल्याला जे आज वाचायला सांपडतात, ते हिरॉडेटस नांवाच्या ग्रीक इतिहासकारानें लिहिलेले आहेत. ज्या प्रसंगांचा वृत्तांत त्यानें लिहिला आहे, ते घडून आल्यानंतरच्या अगदीं नजिकच्या काळांतच हिरॉडेटसचा जन्म झाला होता. त्याची वृत्ति ग्रीकांविषयीं पक्षपाती आहे हें खरें आहे; परंतु त्यानें लिहिलेले वृत्तांत अत्यंत चित्तवेधक आहेत, आणि माझ्या पत्रांत अधून मधून त्याच्या इतिहासांतले कांहीं उतारे तुझ्यासाठीं मी देणार आहें.

इराणची ग्रीसवरील पहिली स्वारी यशस्वी झाली नाहीं. कारण चालून जात असतांना वाटेंतच रोगराईमुळें आणि अन्नाच्या कमरतेमुळें इराणी सैन्याचा फार नाश झाला. त्या सैन्याला ग्रीसपर्यंत न पोंचतांच परतावें लागलें. नंतर इराणची दुसरी स्वारी खिस्तपूर्व ४९० या वर्षी झाली. त्या वेळीं जमिनीच्या मार्गानें जाण्याचें सोडून समुद्रमार्गानें अथेन्सजवळील मॅराथॉन नांवाच्या ठिकाणीं इराणी लोकांनीं आपलें सैन्य उतरविलें. इराणच्या साम्राज्याचा लौकिक फारच मोठा असल्यामुळें अथेन्समधील लोक हें सैन्य उतरलेलें पाहून भयभीत झाले. या भीतीमुळें अथीनियन लोकांनीं आपले जुने शत्रू जे स्पार्टाचे लोक, त्यांचा व आपला तंटा मिटविण्याचा प्रयत्न केला. आणि या आपल्या दोघांच्याही समान शत्रूविरुद्ध आम्हांस मदत करा, अशी त्यांनीं स्पार्टाच्या लोकांना विनंति केली. परंतु स्पार्टाचे लोक येऊन पोंचण्यापूर्वीच इराणी सैन्याचा पराभव करण्यांत अथेन्सच्या लोकांना यश आलें. हीच ती खिस्तपूर्व ४९० सालीं झालेली प्रसिद्ध मॅराथॉनची लढाई.

एका लहानशा ग्रीक नगर-राज्यानें एका मोठ्या साम्राज्याच्या सैन्याचा पराभव करावा, ही गोष्ट मोठी चमत्कारिक भासते. पण वाटते तितकी ही गोष्ट आश्चर्य करण्याजोगी नाहीं. ग्रीक लोक हे आपल्या स्वतःच्या घरीं आणि स्वतःच्या घरासाठीं लढत होते; तर इराणी सैन्य हें आपल्या घरादारापासून अगदींच दूर आलेलें होतें. तसेंच इराणी सैन्य एकजिनसी नव्हतें. त्यांत इराणच्या साम्राज्यांतील नाना प्रदेशांतील

शिपायांची भरती झालेली होती. ते लढत होते ते केवळ त्या कामासाठीं त्यांना पगार मिळत होता म्हणून; ग्रीसला जिंकण्यामध्यें कांहीं त्यांचा जीव एवढा गुंतला नव्हता. उलट पक्षीं अथीनियन लोक आपल्या स्वातंत्र्यासाठीं लढत होते. मरूं पण स्वातंत्र्य गमावणार नाहीं, अशी त्यांच्या मनांत ईर्ष्या होती; आणि कोणत्याही ध्येयासाठीं मरायला जे लोक तयार होतात, त्यांचा क्वचितच कधीं पराभव होतो.

तात्पर्य, दरायसचा मॅराथॉन येथें पराभव झाला. पुढें इराणमध्यें तो मरण पावल्यानंतर त्याच्यामागून क्सर्क्सीझ हा बादशहा झाला. ग्रीस देश जिंकावा ही महत्त्वाकांक्षा क्सर्क्सीझलाही होतीच. आणि म्हणून त्यानें स्वारीची तयारी केली. आतां यापुढें याबद्दलची हिरॉडेटसनें जी अत्यंत चित्तवेधक कथा लिहिली आहे, ती मी तुला सांगणार आहें. या क्सर्क्सीझचा आर्टाबेनस नांवाचा एक चुलता होता. ग्रीसमध्यें जाण्यांत इराणी सैन्याला धोका आहे असें त्याचें मत होतें आणि म्हणून ग्रीसशीं युद्ध न करण्याबद्दल आपल्या पुतण्याचें मन वळविण्याचा त्यानें प्रयत्न केला. क्सर्क्सीझनें आपल्या चुलत्याला जें उत्तर दिलें, तें हिरॉडेटसच्या शब्दांत पुढीलप्रमाणें आहे:—

"तुम्ही म्हणता त्यांत पुष्कळच तथ्य आहे. परंतु जेथें तेथें संकटाचीच शंका घेऊन डरावयाचें, धोका म्हणून केव्हां पत्करावयाचाच नाहीं, असें करून चालणार नाहीं. एकसारखें माझें कसें होईल याच्याबद्दल रडव्या कल्पना करीत दुःखापासून दूर दूर राहण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां आशावादी होऊन हंसतमुखानें जगांतील अर्धेंअधिक दुःख सहन करण्यांतच अधिक पुरुषार्थ आहे. कोणी कांहीं सूचना केली, कीं तिच्यावर हल्ला करावयाचा आणि स्वतः मात्र कांहींच बिनचूक मार्ग दाखवावयाचा नाहीं, असें जर तुम्ही करूं म्हणालां, तर ज्यांना तुम्ही विरोध करतां त्यांच्याप्रमाणेंच तुमच्याही कपाळीं अपेशच येणार. भविष्यकाळांतील यशापयशाचीं दोन्ही पारडीं आज सारखीं आहेत. कोणतें पारडें कोणत्या बाजूला झुकेल हें कोणाला सांगतां येईल काय? मुळींच नाहीं. परंतु ज्यांची कांहीं तरी धडपड करण्याची तयारी आहे, कार्य करण्याची ज्यांना हिंमत आहे, त्यांना सामान्यतः यश मिळतें; जे भित्रे असतात आणि सदैव हें चांगलें कीं तें चांगलें याचा नुसता विचारच करीत बसतात, अशांच्या वांट्याला यश केव्हांच येत नाहीं. आज इराणचें सामर्थ्य केवढें वाढलें आहे पाहा; माझ्या पूर्वजांचे विचार जर तुमच्यासारखे असते; अथवा त्यांचे तसे विचार नसले तरी त्यांचे सल्लागार जर तुमच्यासारखे असते, तर आपलें राज्य एवढें मोठें झालेलें तुम्हांला पाहायला मिळालें नसतें. त्यांनीं धोक्याची पर्वा केली नाहीं, धैर्यानें धोके पत्करले, यामुळेंच आज आम्ही या पदवीला पोंचलों आहों. महत्कार्यें हीं नेहमीं महान् संकटांमधून जाऊनच साधतां येतात."

एवढा लांब उतारा देण्याचें कारण, त्यावरून या इराणी राजाच्याबद्दल जितकी चांगली कल्पना येते, तितकी दुसऱ्या कोणत्याही वर्णनावरून येणार नाहीं. घडलें मात्र

असें, कीं आर्टाबेनसचा सल्लाच शेवटीं खरा ठरला आणि ग्रीसमध्यें इराणी सैन्याचा पराभव झाला. क्सर्क्सीझचा जरी पराभव झाला, तरी त्याच्या शब्दांतील सत्याचें नाणें आजच्या घटकेलाही जसेंच्या तसें खणखणणारें असून आपल्याला सगळ्यांनाच त्यातून चांगला धडा घेण्याजोगा आहे. आज आपण फार मोठें कार्य यशस्वी करण्याच्या खटापटींत आहोंत, आणि आपलें ध्येय गांठीपर्यंत आपल्याला पुष्कळ मोठमोठ्या संकटांतून जावें लागणार आहे, ही खूणगांठ आपण त्यावरून बांधली पाहिजे.

बादशहा – शहेनशहा क्सर्क्सीझ यानें आपलें विशाल सैन्य आशिया मायनरमधून पार नेलें आणि डार्डानेल्सची खाडी – हिलाच पूर्वी हेलस्पांट हें नांव होतें – ओलांडून त्यानें यूरपमध्यें प्रवेश केला. ग्रीक योद्धयांनीं प्राचीन काळीं ज्या ठिकाणीं हेलनकारितां युद्ध केलें, त्या ट्रॉय शहराच्या मोडक्या अवशेषांना जातां जातां क्सर्क्सीझनें भेट दिली असें म्हणतात. हेलस्पांट सामुद्रधुनीवर सैन्याला पार होण्यासाठीं एक प्रचंड पूल उभारण्यांत आला होता; आणि सैन्य त्यावरून पार होत असतां जवळच एका टेकडीच्या माथ्यावर संगमरवरी सिंहासनावर बसून क्सर्क्सीझ तें पाहत होता. या प्रसंगाचें वर्णन करतांना हिरॉडेटसनें लिहिलें आहे :—

"आणि अशा रीतीनें सारी हेलस्पाट सामुद्रधुनी आपल्या जहाजांनीं व्यापलेली बघून आणि अबिडासचीं सारीं विशाल मैदानें आपल्या सैनिकांनीं भरून गेलेलीं पाहून क्सर्क्सीझ म्हणाला, कीं 'आज मी मोठा सुखी झालों.' आणि असें बोलून तो रडूं लागला. म्हणून आर्टाबेनसनें त्याच्याकडे पाहिलें. याच आर्टाबेनसनें प्रथम हेलासवर स्वारी करून न जाण्याचा सल्ला क्सर्क्सीझला मोठ्या धैर्यानें दिला होता. त्यानें जेव्हां क्सर्क्सीझला रडतांना पाहिलें तेव्हां त्याला त्यानें विचारलें, 'राजा, आतां तूं जें कांहीं करीत आहेस तें आणि यापूर्वी एक क्षणच जें कांहीं तूं केलेंस तें, ह्या गोष्टी एकमेकींहून किती तरी भिन्न आहेत बरें! त्या क्षणीं तूं म्हणालास, आज मी सुखी मनुष्य आहें; आणि या क्षणीं तूं अश्रुपात करीत आहेस, हें कसें काय?' क्सर्क्सीझनें उत्तर दिलें, 'बरोबर आहे तुमचें म्हणणें; कारण मीं जेव्हां जास्त खोल विचार केला तेव्हां मनुष्याचें एकंदर आयुष्य किती अल्प आहे, आणि माझ्यापुढील या प्रचंड सेना-समुदायापैकीं आजपासून शंभर वर्षांनीं कोणीही जिवंत असूं शकणार नाहीं, या गोष्टी लक्षांत येऊन माझें मन दयार्द्र झालें.'"

अशा रीतीनें त्या पुलाच्या साहाय्यानें जमिनीवरूनच तें मोठें थोरलें सैन्य पुढें सरकलें आणि त्याच्याच बरोबरीनें जहाजांचा प्रचंड समुदायही समुद्रावरून जाऊं लागला. परंतु समुद्रानें ग्रीकांची बाजू घेतली व मोठें तुफान होऊन हीं बहुतेक सारीं जहाजें नष्ट होऊन गेलीं. हेलन लोक म्हणजेच ग्रीक लोक या प्रचंड सैन्यापुढें भयभीत होऊन गेले होते; त्यामुळें आपल्यांतील सारीं भांडणें विसरून या स्वारीला तोंड देण्यासाठीं ते सारे एक झाले होते. इराणी सैन्याच्या दाबापुढें त्यांनीं माघार घेण्यास सुरुवात केली आणि थर्मापिलीच्या खिंडीपाशीं त्या सैन्याला रोखून धरण्याचा त्यांनीं

प्रयत्न केला. ही खिंड म्हणजे एक अत्यंत अरुंद असा मार्ग असून तिच्या एका बाजूला उभा पर्वत आणि दुसऱ्या बाजूला खोल समुद्र आहे. त्यामुळें केवढेंही मोठें सैन्य आलें तरी त्याला अगदीं थोडीं माणसेंसुद्धां येथें अडवून धरूं शकतात व मागच्या सैन्याचें संरक्षण करूं शकतात. या ठिकाणीं लिओनिअसच्या हाताखालीं ३०० स्पार्टन लोक देऊन त्यांनीं या खिंडीचा मार्ग मरेपर्यंत रोखून धरावा हें काम त्यांच्यावर सोंपविण्यांत आलें. त्या अत्यंत आणीबाणीच्या दिवशीं शौर्याची शर्थ करून आपल्या देशाची मोठीच सेवा त्या वीरांनीं केली. मॅराथॉनच्या लढाईनंतर दहा वर्षांनंतरचा हा प्रसंग. वर दुसरीकडे ग्रीक सैन्य माघार घेत होतें, अशा वेळीं इराणी सैन्याचा लोंढा या तुकडीनें अडवून धरला ; त्या अरुंद खिंडींत त्यांच्यापैकीं एक मनुष्य पडला, कीं तत्क्षणीं त्या जागेवर दुसरा वीर उभा राहत होता. इराणी सैन्याला एक हातभरही पुढें जातां येत नव्हतें. लिओनिअस आणि त्याचे ३०० वीरभाई हे सर्वच्या सर्व थर्मापिलींत धारातीर्थी पडेपर्यंत त्यांना पुढें जाण्याला मार्ग मिळाला नाहीं. २४१० वर्षांपूर्वी, खिस्तपूर्व ४९० या वर्षी हा प्रसंग घडून आला. तथापि, या वीरांच्या त्या दुर्दम्य धैर्याचा विचार मनांत येतांच आजही हृदय थरारून जातें. आजही कोणी प्रवासी थर्मापिलीच्या खिंडींत गेला, तर तेथील दगडाधोंड्यांमध्येंच जणुं कोरलेला असा लिओनिअस आणि त्याचे साथीदार यांचा पुढील संदेश पाण्यानें भरलेल्या डोळ्यांनीं त्याला वाचावयास मिळेल :

**जाशीं येथुनि तूं तरी वद गड्या, स्पार्टासि हें जाउन**
**आम्ही राहतसों इथेंच शिरसा आज्ञा तिची वंदुन**

मृत्यूवरही जें विजय मिळवितें तें धैर्य खरोखरच अद्‌भुत होय ! त्यामुळें लिओनिअस आणि थर्मापिली हीं जगांत चिरंजीव झालीं असून त्यांचें स्मरण झालें असतांना आपणां हिंदुस्थानच्या दूरच्या लोकांचेंही अंतःकरण थरारून जातें. तर मग ज्या आपल्याच लोकांनीं, आपल्या पूर्वजांनीं, हिंदुस्थानच्याच स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं आपल्या दीर्घकालीन इतिहासाच्या थेट सुरुवातीपासून हंसतमुखानें मृत्यूची एवढीसुद्धां कदर केली नाहीं, अपमान किंवा गुलामगिरी यांहून मृत्यु ज्यांना अधिक पसंत पडला, आणि जुलमापुढें मान वांकविण्यापेक्षां मोडून जाण्यालाच जे तयार झाले, अशांच्याबद्दल आपण किती पोवाडे गावे आणि आपल्याला किती अभिमान वाटावा ! उदाहरणार्थ–चितोड, त्याची ती अनुपमेय कथा, रजपूत स्त्री-पुरुषांची आश्चर्यकारक मर्दुमकी या गोष्टींचा विचार करा ! तसेंच आजच्या काळींही पाहा ! आजही आपले भाई, अगदीं आपल्या अंगांत जें रक्त खेळत आहे तसलेंच रक्त अंगीं खेळणारे लोक, हिंदी स्वातंत्र्यासाठीं मृत्यूशीं सामना करतांना रतिमात्रही कचरत नाहींत, हें आपण पाहतोंच आहों.

थर्मापिलीशीं इराणी सैन्याला कांहीं काळ अटकाव झाला. पण फारसा दीर्घकाळपर्यंत हा अटकाव टिकून राहूं शकला नाहीं. इराणी सैन्याच्या दाबापुढें ग्रीकांनीं

माघार घेतली आणि कांहीं नगर-राज्यें त्या सैन्यापुढें शरणही आलीं. अभिमानी अथीनियन लोकांनीं मात्र शत्रूंनीं आपलें नगर मोडून तोडून टाकलें तरी हरकत नाहीं, परंतु शरण जावयाचें नाहीं असा निर्धार केला. आणि त्या नगरींतील सर्वच्या सर्व जनता निघून जाऊन बहुतांशीं जहाजांवर जाऊन राहिली. इराणी सैन्य त्या निर्जन शहरांत शिरलें व त्यांनीं तें जाळून टाकलें. अथीनियन आरमाराचा मात्र अजूनही पराभव झाला नव्हता; त्यामुळें सालामीसच्याजवळ आणखी एक तुंबळ युद्ध झालें. त्यामध्यें इराणी जहाजांचा नाश झाला आणि या विपत्तीमुळें क्सर्क्सीझ संपूर्ण निरुत्साह होऊन इराणला परत गेला.

यापुढेंही कांहीं काळ इराणचें मोठें साम्राज्य टिकून राहिलें; परंतु मॅराथॉन व सालामीस येथील लढाया म्हणजे त्याच्या ऱ्हासाचीं पूर्वचिह्नेंच होतीं. हा ऱ्हास कसकसा घडला हें पुढें आपण पाहणार आहों. त्या ऱ्हासाच्या काळीं जे प्रत्यक्ष हजर होते, त्यांना तें एवढें थोरलें प्रचंड साम्राज्य हादरून पडताना पाहून मोठाच विस्मय वाटला असेल. या गोष्टीचा पुष्कळ विचार करून हिरॉडेटसनें एक तात्पर्य काढलें आहे. तो म्हणतो, कोणत्याही देशाच्या इतिहासाचे तीन टप्पे असतात: पहिला टप्पा यश. त्यानंतर यशाचा परिणाम म्हणूनच उन्मत्तपणा आणि अन्याय; आणि शेवटीं यांचा परिणाम म्हणून अवनति, ऱ्हास.

## १६

# एका काळचें वैभवशाली हेलास

*२३ जानेवारी, १९३१*

हेलन किंवा ग्रीक लोकांनीं इराणी लोकांवर हे जे विजय मिळविले, त्याचे दोन परिणाम झाले: एक इराणच्या साम्राज्याला हळूहळू उतरती कळा लागून तें दुर्बळ होत गेलें आणि दुसरें म्हणजे ग्रीकांच्या इतिहासांतील अत्यंत तेजस्वी कालखंडास सुरुवात झाली. राष्ट्रांच्या आयुष्याच्या मानानें पाहता हें तेज किंवा वैभव अल्पकालीनच ठरलें. सर्व मिळून पुरीं दोनशें वर्षें सुद्धां तें टिकलें नाहीं. इराणचें साम्राज्य किंवा त्यापूर्वीचीं इतर साम्राज्यें यांच्या वैभवामध्यें दूरवर प्रचंड पसरलेल्या साम्राज्यांचें विशालत्व होतें. तशा प्रकारचें विस्तारवैभवही ग्रीकांच्या ऐश्वर्यामध्यें नव्हतें. यानंतरच्या काळांत कांहीं थोडा वेळ ॲलेक्झांडर उदयास येऊन त्यानें पुष्कळसे प्रदेश जिंकून जगाचे डोळे दिपवून टाकले हें खरें; परंतु त्याच्याबद्दल आज आपण विचार करीत नाहीं आहों. इराणी युद्धें आणि ॲलेक्झांडरचा उदय यांच्या दरम्यानचा जो काळ, म्हणजे थर्मापिली, सालामीस येथील लढायांनंतरचा १५० वर्षांचा काळ, त्याच्या-

बद्दल आपण आज बोलतों आहों. इराणी स्वाऱ्यांच्या संकटानें ग्रीक लोकांची एकी झालेली होती. परंतु हें संकट दूर होतांच पुन्हां त्यांचे गट वेगवेगळे पडले आणि त्यांचे परस्परांशीं तंटे सुरू झाले. विशेषतः अॅथेन्स आणि स्पार्टा या दोन नगर-राज्यांमध्यें फारच तीव्र वैर होतें. परंतु त्यांच्या या तंट्यांशीं आपल्याला कांहीं करावयाचें नाहीं. तसें त्यांना कांहीं विशेष सांगण्यासारखें स्वतःचें म्हणून महत्त्व नाहीं. त्या काळीं ग्रीसला जें इतर अनेक दृष्टींनीं श्रेष्ठत्व प्राप्त झालें होतें, त्यामुळें या तंट्यांची आपल्याला आठवण तरी राहते. या काळच्या ग्रीसमधील अगदीं थोडे ग्रंथ, व थोडे पुतळे आणि कांहीं थोडे मोडकेतोडके अवशेष आज आपल्याला उपलब्ध आहेत. पण जें आहे तें पाहूनही आपलें अंतःकरण आदरानें भरून येतें आणि हेलासमधील लोकांच्या विविध प्रकारच्या श्रेष्ठत्वाबद्दल आपल्याला कौतुक वाटतें. इतके सुंदर पुतळे आणि इतकीं सुंदर बांधकामें तयार करणाऱ्या मंडळींचे हात किती प्रचंड कसबी असले पाहिजेत आणि मन किती विशाल आणि संपन्न असलें पाहिजे! फिडिआस हा त्या काळचा एक प्रसिद्ध शिल्पकार होता. दुसरेही असेच पुष्कळ प्रसिद्ध शिल्पकार होते. त्या काळचीं ग्रीकांचीं करुणरसपर आणि हास्यरसपर नाटकें आजही अत्यंत श्रेष्ठ नाटकांमध्यें मोडतात. सोफॉक्लीस, ईस्किलस, यूरिपिडस, आरिस्टोफेनीस, पिंडार, मीनांदर आणि सॅफो, इत्यादि त्याच्या नाटककारांचीं नांवें आज तूं नुसतीं ऐकून मात्र ठेवायचीं. अर्थात् मोठी झालीस म्हणजे त्यांचीं नाटकें तूं वाचशीलच आणि मग त्या काळचें ग्रीसचें वैभव केवढें श्रेष्ठ असलें पाहिजे, याची कांहींशी कल्पना तुला येईल.

ग्रीक इतिहासांतला हा काळ म्हणजे कोणत्याहि देशाचा इतिहास आपण खरोखर कशा पद्धतीनें वाचला पाहिजे, हें दाखविणारी एक धोक्याची सूचनाच आहे. त्या वेळच्या ग्रीक नगर-राज्यांमधील क्षुद्र लढाया आणि इतर अशाच क्षुद्र गोष्टी याच फक्त आपण पाहूं गेलों तर या नगर-राज्यांबद्दल आपणांला खरी कल्पना कितीशी येईल? त्यांची खरी माहिती आपल्याला करून घ्यावयाची असेल, तर आपण त्यांच्या मनोव्यापारांत प्रवेश केला पाहिजे व त्यांचे विचार-विकार कोणते होते, त्यांच्या क्रिया कोणत्या प्रकारें घडत होत्या, याचें खरें संपूर्ण आकलन केलें पाहिजे. अशा मनोव्यापाराच्या इतिहासाला, वैचारिक इतिहासालाच, खरी किंमत आहे; आणि त्या वैचारिक कारणांच्या भावामुळेंच आधुनिक यूरप कितीएक प्रकारांनीं प्राचीन ग्रीक संस्कृतीचेंच एक बालक असल्याचें दिसून येत आहे.

राष्ट्रांच्या आयुष्यांत असे वैभवाचे काळ येतात आणि नाहींसे होतात, ही मोठी विचित्र आणि अंतःकरण गुंगवून टाकणारी घटना आहे. अशा काळीं प्रत्येक वस्तूलाच जणुं थोडा वेळ तेज चढल्यासारखें होतें आणि त्या काळीं त्या देशांत राहणाऱ्या सर्वच स्त्री-पुरुषांच्या ठिकाणीं सौंदर्य, सामर्थ्य निर्माण होतें. लोक जणुं भारल्यासारखे होतात. आपल्या देशांत सुद्धां अशीं वैभवाचीं युगें येऊन गेलेलीं आहेत. त्यातील अत्यंत प्राचीन युग म्हणजे ज्या काळीं वेद, उपनिषदें अशांसारखे ग्रंथ निर्माण झाले तें युग.

दुर्दैवानें या काळाचा नीटसा लिहिलेला वृत्तांत कांहींच उपलब्ध नाहीं आपल्याला; त्या काळचे कितीएक ग्रंथ किंवा बांधकामें नष्टच झालीं असतील आणि कितीएक अजून संशोधन न झाल्यामुळें तशींच कोठें तरी गडप होऊन राहिलेलीं असतील. परंतु जें कांहीं थोडें उपलब्ध आहे, तेवढ्यावरून सुद्धां प्राचीन काळच्या त्या भारतीयांची बुद्धि व मन यांचें सामर्थ्य केवढें प्रचंड असलें पाहिजे हें दिसून येतें. यापुढील हिंदी इतिहासांतही अशीं पुष्कळ युगें होऊन गेलेलीं असून निरनिराळ्या काळांतून आपण हा असा प्रवास करीत असतांना वाटेंत मधून मधून तींही आपल्याला आढळतील.

या काळांत अथेन्स शहराचें राज्य हें त्यांतल्या त्यांत विशेषच प्रसिद्धीला आलें. त्या वेळचा तेथील पुढारी मोठा श्रेष्ठ मुत्सद्दी व राजकारणधुरंधर होता. त्याचें नांव पेरिक्लीस. अथेन्समध्यें सुमारें तीस वर्षें त्याचा अधिकार चालत होता. त्याच्या काळांत अथेन्स हें अत्यंत भव्य शहर बनलें; हरएक प्रकारच्या सुंदर बांधकामांनीं तें फुलून गेलें; मोठमोठे कलावंत आणि प्रज्ञावंत लोक तेथें उदयास आले. आजही पेरिक्लीसचें अथेन्स म्हणून तें शहर ओळखलें जातें आणि त्या काळालाही पेरिक्लीसचें युग असें आपण म्हणतों.

आपला दोस्त, इतिहासकार हिरॉडॉटस या काळच्या सुमारास अथेन्समध्यें राहत होता. कोणत्याही घटनेमधून एकादें विशेष तात्पर्य किंवा नीतिबोध हुडकण्याच्या त्याच्या नित्याच्या संवयीप्रमाणें अथेन्सच्या विकासाचा चांगला विचार करून त्यांतूनही त्यानें एक तात्पर्य शोधून काढलें आहे. आपल्या इतिहासांत तो लिहितो :—

"अथेन्सचें सामर्थ्य वाढलें; हा एक पुरावाच आहे–आणि असा पुरावा इतरही सर्व ठिकाणीं सांपडेल–कीं स्वातंत्र्य ही चांगली गोष्ट आहे. अथीनियन लोकांवर जेव्हां अनियंत्रित सुलतानी सत्ता चालू होती, त्या वेळीं त्यांच्यामध्यें आपल्या आजूबाजूच्या लोकांपेक्षां श्रेष्ठ युद्धसामर्थ्य नव्हतें. परंतु त्यांनीं जेव्हां या सुलतानशाहींतून आपली सुटका करून घेतली तेव्हां बाकीच्या सर्वांच्यावर त्यांची कडी झाली. यावरून एवढेंच दिसतें, कीं गुलाम असतांना ते स्वतःच्या प्रेरणेनें कांहींएक करीत नव्हते; मालकाकरितां म्हणून ते हातपाय हालवीत होते. पण स्वतंत्र झाल्यावर प्रत्येक व्यक्तीनें आपण होऊन स्वतःच्या प्रयत्नांची व पराक्रमाची शिकस्त केली."

या काळच्या श्रेष्ठ लोकांपैकीं कांहींचा उल्लेख आतांपर्यंत मीं केला आहे. पण त्या काळच्या सर्वश्रेष्ठ मंडळींपैकीं एकाचें नांव अजून मीं तुला सांगितलेलें नाहीं. त्याचें नांव सॉक्रेटीस. हा तत्त्वज्ञ होता आणि नित्य त्याचा सत्याचा शोध चालू होता. जगांत त्याला खऱ्या ज्ञानावांचून दुसऱ्या कशाची किंमत नव्हती; मिळविण्यासारखी अशी त्याला काय ती तेवढी एकच गोष्ट होती. आपल्या मित्रांशीं आणि परिचितांशीं तो नेहमीं वादविवाद करीत असे. हेतु असा, कीं त्या वादांतून जें सत्य असेल तें कदाचित् निष्पन्न होण्याचा संभव. त्याचे पुष्कळ शिष्य किंवा चेले होते. प्लेटो हा त्यांपैकीं सर्वश्रेष्ठ. प्लेटोनें लिहिलेले पुष्कळ ग्रंथ आज आपल्याला उपलब्ध आहेत आणि त्यांवरूनच त्याचा गुरु जो सॉक्रेटीस याच्याबद्दल आपल्याला पुष्कळशी माहिती मिळते. राज्यकर्त्यांना

केव्हांही असे सर्व गोष्टींचें खरें स्वरूप शोधून काढणारे लोक आवडत नाहींतसें दिसतें. सत्याचा शोध त्यांना रुचत नाहीं. पेरिक्लीसच्या काळानंतर थोड्याच दिवसांनीं अथीनियन सरकारला सॉक्रेटीसचें कार्य पसंत पडेनासें झालें. त्यांनीं त्याची चौकशी केली व त्याला देहांताची शिक्षा फर्माविली. त्यांनीं त्याला सांगितलें, कीं लोकांबरोबर वादविवाद करण्याचें जर तूं सोडून देशील आणि पहिल्यापेक्षां निराळ्या रीतीनें वागूं लागशील, तर तुला सोडून देण्यांत येईल. पण सॉक्रेटीसनें तसें करण्याचें नाकारलें आणि त्याला जें स्वतःचें कर्तव्य वाटत होतें तें सोडून देण्यापेक्षां मृत्युदायक विषाचा पेलाच त्यानें पसंत केला. अगदीं मृत्यूच्या क्षणीं आपल्यावर आरोप करणारे लोक आणि त्याचा खटला चालविणारे न्यायाधीश व अथीनियन जनता यांना उद्देशून तो म्हणाला :—

" मीं माझा सत्याचा शोध सोडून द्यावा या शर्तीवर तुम्ही मला दोषमुक्त करून सोडून द्यावयास तयार आहां, असें तुमचें म्हणणें असेल, तर त्यावर माझें म्हणणें असें आहे : तुमच्या या सूचनेबद्दल मी तुमचा ऋणी आहें ; परंतु तुमची आज्ञा मान्य करण्यापेक्षां ज्यानें मला या सत्यसंशोधनाच्या कार्याला प्रवृत्त केलें, त्या परमेश्वराचीच आज्ञा मी मान्य करीन आणि या शरीरांत शक्ति आणि जिवांत जीव आहे तोंपर्यंत तत्त्वज्ञानाचा माझा उद्योग मी सोडणार नाहीं. जो जो कोणी मला भेटेल त्याच्याशीं संभाषण करण्याची माझी पद्धति मी चालूच ठेवणार आणि प्रत्येकाला मी विचारणार, कीं ज्ञान आणि सत्य व तुमच्या आत्म्याची उन्नति यांची तुम्ही कांहींच फिकीर करीत नाहीं आणि तुमचें सारें मन संपत्ति व मानसन्मान यांवरच फक्त खिळून राहतें, याची तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं? मनुष्य मरतो म्हणजे काय होतें हें मला ठाऊक नाहीं. कदाचित् ती एक हितकारकही गोष्ट असेल—आणि मला त्याची भीति पण वाटत नाहीं. पण आपलें कर्तव्याचें स्थान सोडून पळून जाणें ही मात्र वाईट—अहित-कारक—गोष्ट आहे हें मला पक्कें माहीत आहे. आणि जी गोष्ट वाईट आहे हें मला माहीत आहे, तिचा स्वीकार करण्याऐवजीं जी कदाचित् चांगली असण्याचा संभव आहे ती गोष्ट स्वीकारणेंच मला युक्त वाटतें. "

जिवंतपणीं तर सॉक्रेटीसानें सत्य आणि ज्ञान याच्या कार्याला साहाय्य केलेंच ; परंतु आपल्या मृत्यूच्या योगानें त्यानें या कार्याची त्याहूनही अधिक चांगली सेवा केली.

आजकाल निरनिराळ्या प्रश्नांवरील—समाजवाद, भांडवलशाही या व अशा कित्येक विषयांवरील—वादविवाद तूं वाचीत असशील किंवा ऐकत असशील. जगांत अन्याय व दुःख यांचें फारच मोठें प्रमाण आहे. पुष्कळांना त्याबद्दल फार असमाधान वाटतें. आणि हें बदलून टाकण्याचा अशी मंडळी प्रयत्न करतात. याच रीतीनें राज्य-व्यवस्था कशी असावी याबद्दल विचार करून राज्यव्यवस्थेंतील पुष्कळ प्रश्नांबद्दल प्लेटोनें लेखन केलें आहे. त्यावरून त्या काळींसुद्धां सर्वत्र अधिकाधिक सुख नांदावें यासाठीं समाजाची आणि राज्याची व्यवस्था कशी असावी, याबद्दलचे विचार त्या काळचे लोकही करीतच होते असें दिसतें.

प्लेटोचें उतारवय झालें त्या सुमारास पुढें ज्याचें नांव विशेषच प्रसिद्धीला आलें, असा एक ग्रीक गृहस्थ उदयास येत होता. त्याचें नांव ॲरिस्टॉट्ल्; तो ॲलेक्झांडर दी ग्रेटचा खाजगी शिक्षक होता. आणि ॲलेक्झांडरनें त्याला त्याच्या काळांत पुष्कळ साहाय्य केलें. सॉक्रेटीस किंवा प्लेटो यांच्याप्रमाणें ॲरिस्टॉट्ल् तत्त्वसंशोधनाच्या भानगडींत पडला नाहीं. निसर्गाचें निरीक्षण करून निसर्गाच्या व्यवहाराचे नियम समजून घ्यावे ही त्याला अधिक आवड होती. यालाच **निसर्गज्ञान** म्हणतात किंवा अलीकडे नुसतें शास्त्र–विज्ञान–म्हणतात. म्हणजे ॲरिस्टॉट्ल् हा अगदीं प्राचीन काळचा एक वैज्ञानिक होता.

त्यानंतर आपण आतां ॲरिस्टॉट्ल्चा शिष्य ॲलेक्झांडर याच्याकडे येऊन त्याच्या अत्यंत वेगवान् कारकीर्दीचें अवलोकन केलें पाहिजे. पण आतां तें उद्या. आज आतां पुष्कळ लिहून झालें.

आज वसंत पंचमी. वसंत ऋतूच्या आगमनाचा अग्रदूत असा हा हिंवाळा किती हां हा म्हणता संपून गेला. आणि हवेंतील गार बोंचकपणाही नाहींसा झाला आहे. पक्ष्यांचे थवे अधिकाधिक येऊं लागले आहेत. आणि साऱ्या दिवसभर आता त्यांच्या गाण्याचा रंग चालू झाला आहे. या दिवसाचा आणखी एक विशेष म्हणजे बरोबर पंधरा वर्षांपूर्वी याच दिवशीं दिल्ली शहरांत तुझी आई व मी विवाहबंधनानें एकजीव झालों.

## १७

# विख्यात जेता पण घमेंडखोर तरुण

*२४ जानेवारी, १९३१*

माझ्या मागच्या पत्रांत आणि त्याच्याआधींही मीं ॲलेक्झांडर दी ग्रेटचा–शिकंदरचा–उल्लेख केला आहे. तो ग्रीक होता असें मीं म्हटलें आहेसें वाटतें. परंतु तसें म्हणणें तितकेंसें बरोबर नाहीं. ग्रीसच्या उत्तरेच्या लगत असलेल्या मॅसिडोनिया या देशांतील तो रहिवासी असल्यानें त्याला खरोखर मॅसिडोनियनच म्हटलें पाहिजे. हे मॅसिडोनियन लोक पुष्कळ बाबतींत ग्रीकासारखेच होते. ग्रीकांच्या भाऊबंद घराण्यांतल्यासारखेच ते होते असें म्हटलें तरी चालेल. ॲलेक्झांडरचा बाप फिलिप हा मॅसिडोनियाचा राजा होय. तो चांगला कर्तबगार राजा असून त्यानें आपलें राज्य मोठें प्रबळ केलें होतें आणि अत्यंत प्रभावशाली व कुशल सैन्य उभारलें होतें. ॲलेक्झांडरला दी ग्रेट, म्हणजे श्रेष्ठ–महान्–म्हणतात व इतिहासांत त्याची प्रसिद्धि फार मोठी आहे. परंतु त्यानें जें कांहीं करून दाखविलें त्यापैकीं फार मोठा भाग,

त्याच्यापूर्वी त्याच्या बापानें जें पुष्कळ कार्य काळजीपूर्वक उभारून ठेवलें होतें, त्याच्या जोरावरच त्याला साधतां आला. ॲलेक्झांडर खरोखर श्रेष्ठ पुरुष होता कीं नाहीं ही संशयास्पद गोष्ट आहे. मला तरी तो कोणी आदर्श पुरुष किंवा विभूति वाटत नाहीं. परंतु अगदीं थोडक्या आयुष्यांत दोन खंडांत आपल्या नांवाचा दरारा बसविण्यात त्याला यश मिळालें हें खरें; आणि इतिहासामध्यें पहिला जगज्जेता असें त्यास समजतात. ग्रीसपासून दूरवर मध्य आशिया खंडांत शिकंदर म्हणून अजूनही लोकांना त्याची आठवण आहे. आणि खरोखर तो श्रेष्ठ पुरुष असो वा नसो, इतिहासांत तरी त्याच्या नांवाभोंवतीं कीर्तीचें मोठेंच तेजोवलय उभारण्यांत आलें आहे. कितीएक शहरांना त्याचें नांव देण्यांत आलेलें आहे. त्यांपैकीं पुष्कळ आजकालही अस्तित्वात आहेत. त्यांतलें पूर्वीच्या काळचें सर्वांत मोठें शहर म्हणजे ईजिप्तमधील अलेक्झांड्रिया हें होय.

ॲलेक्झांडर राजा झाला तेव्हां तो अवघा वीस वर्षांचा होता. श्रेष्ठत्व संपादण्याच्या महत्त्वाकांक्षेनें त्याचें सारें मन भारून गेलेलें होतें. त्यामुळें त्याच्या बापानें त्याच्यासाठीं आपल्यामागें तयार करून ठेवलेलें नामी शेलकें सैन्य घेऊन आपल्या देशाचा जुना शत्रु जो इराण त्याच्यावर स्वारी करण्यासाठीं तो उतावीळ होऊन गेला होता. ग्रीक लोकांना फिलिपही आवडत नव्हता किंवा ॲलेक्झाडरही आवडत नव्हता. परंतु त्या दोघांच्या सामर्थ्यापुढें ते कांहींसे दबून गेले होते. आणि म्हणून इराणवर स्वारी करणाऱ्या ग्रीक सैन्याचें प्रमुख सेनापतिपद धारण करणारे म्हणून त्या दोघानाही एकामागून एक त्यांनीं मान्यता दिली. अशा रीतीनें उदयास येत असलेल्या नव्या सत्तेपुढें ग्रीकांनीं मान लवविली. एका ग्रीक राज्यानें, थीब्सनें शिकंदरचें आधिपत्य न मानून त्याच्याविरुद्ध बंड केलें, तेव्हां त्यानें अत्यंत क्रूरपणें आणि निर्दयपणें त्याच्यावर मोठाच तडाखा मारला. त्या विख्यात शहराचा त्यानें नाश केला, त्यांतील इमारती धुळीस मिळविल्या; त्यांतील असंख्य लोकांची त्यानें कत्तल केली आणि कितीकांना गुलाम करून विकून टाकलें! अशा रानटीपणानें वागून साऱ्या ग्रीसला त्यानें भयभीत करून टाकलें. परंतु त्याच्या जीवनांतील या किंवा इतर अशाच रानटीपणाच्या उदाहरणांनीं त्याच्याबद्दल आपल्या मनांत आदर कांहीं उत्पन्न होत नाहीं. तर उलट, आपलें मन त्याच्याविरुद्धच होतें आणि त्याच्याविषयीं आपल्याला तिटकाराच वाटूं लागतो.

क्सर्क्झीझच्या पाठीमागून इराणचा तिसरा राजा दारियस हा झाला होता. त्याचा थोड्याच काळांत ॲलेक्झांडरनें पराभव केला. त्यापाठोपाठ इराणच्या राज्याच्या अमलाखालील ईजिप्त देशही त्यानें सहजासहजीं जिंकून घेतला. त्यानंतर तो पुन्हां इराणवर चालून गेला व दारियसचा त्यानें दुसऱ्यांदां पराभव केला. शहेनशहा दारियसचा महान् राजवाडा ॲलेक्झांडरनें नष्ट करून टाकला. अशा रीतीनें अथेन्स जाळल्याचा सूड आपण घेतला असें तो म्हणे.

फारसी भाषेमध्यें सुमारें १००० वर्षांपूर्वी फिर्दोसी नावाच्या कवीनें लिहिलेला

एक जुना ग्रंथ आहे. या ग्रंथाला 'शहानामा' म्हणतात. त्यामध्यें इराणच्या राजाची बखर लिहिलेली आहे. ॲलेक्झांडर आणि दारियस यांच्यामधील लढायांची या ग्रंथांत मोठीं कल्पनाप्रचुर वर्णनें आहेत. त्यांत लिहिलेलें आहे, कीं दारियसचा जेव्हां पराभव झाला, तेव्हां त्यानें हिंदुस्थानांतून मदत आणविण्याचा प्रयत्न केला. हिंदुस्थानच्या वायव्य भागांत त्या वेळीं पुरु किंवा पोरस या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या-कडे त्यानें 'वायुवेगानें जाणारा एक उंट ( सांडणीस्वार ) पाठविला.' परंतु पोरस राजा त्याला कांहींच मदत करूं शकला नाहीं. लौकरच त्यालाच स्वतः ॲलेक्झांडरच्या हल्ल्याला तोंड द्यावें लागलें. फिर्दोसीच्या या शहानामा नांवाच्या ग्रंथांत इराणचे राजेरजवाडे हिंदी तरवारी व जंबिये वापरीत असत अशाबद्दल जागोजाग उल्लेख येतात, तें पाहून मोठें कौतुक वाटतें. त्यावरून असें दिसून येतें, कीं ॲलेक्झांडरच्या काळींसुद्धां हिंदुस्थानांत पाणीदार पोलादाच्या तरवारी तयार होत असत आणि परदेशामध्यें सुद्धां त्यांची चहा होत असे.

इराणमधून ॲलेक्झांडरनें दूरवर पुढेंही आक्रमण केलें. सध्यां ज्या भागांत हिरात, काबूल, समरकंद हीं शहरें आहेत, त्या प्रदेशांतून कूच करीत करीत तो थेट सिंधु नदीच्या उत्तरेच्या खोऱ्यापर्यंत येऊन ठेपला. या ठिकाणीं त्याला विरोध करावयाला उभा राहिलेला अगदीं पहिला सामनेवाला ॲलेक्झांडरला भेटला. हा एक हिंदी राजा होता. ग्रीक इतिहासकार त्याचें नांव पोरस असें ग्रीक पद्धतीचें देतात. यासारखेंच कांहीं त्याचें नांव असेल, परंतु आपल्याला तें नक्की ठाऊक नाहीं. असें म्हणतात, कीं पोरस फार शौर्यानें लढला आणि त्याचा पराभव करण्यास ॲलेक्झांडरला फार सायास पडले. पोरस चांगला उंचनिंच आणि उमदा वीर होता आणि त्याच्या शौर्यावर ॲलेक्झांडर इतका मोहित होऊन गेला, कीं ॲलेक्झांडरनें त्याचा पराभव केल्यानंतरही आपण काबीज केलेलें राज्य त्यानें पोरसच्या ताब्यांत ठेवलें. मात्र आतां पोरस राजा न राहतां सत्रप किंवा ग्रीक लोकांचा मुख्य अमलदार ( गव्हर्नर ) या नात्यानें त्या राज्यांत राहूं लागला.

ॲलेक्झांडरनें हिंदुस्थानांत प्रवेश खैबर खिंडींतून रावळपिंडीच्या जरा उत्तरेस असलेल्या तक्षशिलेच्या मार्गानें केला. या प्राचीन शहराचे पडके अवशेष आजही आपल्याला पाहायला सांपडतात. पोरसचा पराभव केल्यानंतर ॲलेक्झांडरनें दक्षिणेस गंगेकडे चालून जाण्याचा विचार केला असावा. परंतु प्रत्यक्ष त्यानें तसें केलें नाहीं आणि सिंधु नदाच्या खोऱ्यापुरतेंच भ्रमण करून तो परत फिरला. हिंदुस्थानच्या अगदीं मध्यभागापर्यंत तो चालून येता तर काय काय घडलें असतें, हा विचार मोठा कुतूहलजनक आहे. त्याला असेच सारखे विजय मिळत राहिले असते, का आमच्या हिंदी फौजानीं त्याचा पराभव केला असता ? पोरससारख्या सरहद्दीवरच्या एका राजानें सुद्धां त्याला इतकें भरपूर सळो कीं पळो करून सोडलें होतें, कीं त्यावरून मध्य-भागांतील मोठमोठ्या राजांनीं त्याला यशस्वी रीतीनें रोखून धरलें असतें असेंच वाटतें. परंतु पुढें जावें असें ॲलेक्झांडरच्या मनांत असो किंवा नसो, त्या प्रश्नाचा

निर्णय त्याच्या शिपायांनींच केला. ते थकले होते आणि इतक्या दिवसांच्या भटकण्यानें त्यांना अगदीं कंटाळा आला होता. कदाचित् हिंदी शिपायांची लढाईतील शक्ति पाहूनही त्यांच्या मनावर परिणाम झाला असेल आणि उगीच नसता पराभव कशाला अंगावर ओढून घ्या, असेंही त्यांना वाटलें असेल. कांहींही कारण असो; ॲलेक्झांडरच्या सैन्यानें परत जाण्याचा हट्ट धरला आणि ॲलेक्झांडरला त्याचें म्हणणें मान्य करण्यावांचून मार्ग राहिला नाहीं. परंतु त्याचा परत जाते वेळचा हा प्रवास फारच हानिकारक झाला; अन्नपाण्यावांचून त्याच्या सैन्याचे फार हाल झाले. यानंतर लौकरच खिस्तपूर्व ३२३ या वर्षीं बॅबिलॉन येथें ॲलेक्झांडरचा अंत झाला. इराणच्या स्वारीवर निघाल्यानंतर आपला मायदेश जो मॅसिडोनिया त्याचें त्याला पुन्हां दर्शन झालें नाहीं.

अशा रीतीनें अवघ्या तेहतिसाव्या वर्षीं ॲलेक्झांडरचा अंत झाला. या एवढ्या छोट्या आमदानींत या 'ग्रेट' म्हणजे महान् पुरुषानें केलें तरी काय? तर त्यानें डोळे दिपवून टाकण्यासारख्या कांहीं लढाया जिंकल्या. तो फार मोठा सेनापति होता यांत मुळींच संशय नाहीं. परंतु तो मोठा गर्विष्ठ आणि घमेंडखोर गृहस्थ होता. पुष्कळदां त्याचें वागणें क्रूरपणाचें आणि अत्याचारी असे. आपण जणुं परमेश्वरच आहों, असें तो स्वतःला समजे. रागाच्या भरांत किंवा क्षणिक लहरींत त्यानें आपल्या कितीएक उत्तमोत्तम मित्रांना ठार केलें व श्रीमंत, गरीब अशा सर्व रहिवाशांसह शहरेंच्या शहरें नष्ट केलीं. त्याच्यामागें त्याची स्मृति राहील असें एकही भरीव कार्य त्यानें केलें नाहीं. राज्यांत चांगलेसे रस्ते बांधण्यासारखें साधेंसें कार्यसुद्धां त्याच्या हातून घडलें नाहीं. आकाशांतून एखादा तारा तुटून खालीं यावा त्याप्रमाणें तो आला आणि गेला आणि मागें त्याच्या नावाहून अधिक कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या घराण्यातील लोकांनीं एकमेकांना ठार केलें, आणि त्याच्या महान् साम्राज्याचे तुकडे तुकडे झाले. त्याला जगज्जेता म्हणतात आणि असें सांगतात, कीं आतां जगांत जिंकायला कांहीं राहिलें नाहीं यासाठीं एकदां तो रडत बसला! परंतु वायव्येकडील एक एवढासा कोपरा सोडला तर बाकीचा सारा हिंदुस्थान देश त्यानें मुळींच जिंकला नव्हता; चीन देशाचें त्या वेळीं एक फार महत्त्वाचें राज्य होतें. त्याच्या तर जवळपाससुद्धां ॲलेक्झांडर फिरकला नव्हता.

त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या साम्राज्याच्या त्याच्या सेनापतींमध्यें वांटण्या झाल्या. त्यांत ईजिप्त देश टॉलेमीच्या वाट्याला आला. टॉलेमीनें तेथें मोठें प्रबळ राज्य स्थापन केलें व आपल्या राजवंशाची प्रस्थापना केली. या घराण्याची राजधानी जें अलेक्झांड्रिया हें शहर तें त्या काळांत शास्त्रें व तत्त्वज्ञान यांकरितां फार प्रसिद्ध होतें. आणि ईजिप्त देशही चांगला सामर्थ्यवान् देश म्हणून विख्यात होता. इराण, मेसापोटेमिया आणि आशिया मायनरचा कांहीं भाग हा प्रदेश ॲलेक्झांडरचा दुसरा एक सेनापति सेल्युकस याच्या वांट्याला आला. ॲलेक्झांडरनें काबीज केलेला हिंदुस्थानचा वायव्येकडील भागही याच्याच वांट्यास आला. परंतु हिंदुस्थानचा कांहींही भाग त्याला हातांत

ठेवतां आला नाहीं. कारण अॅलेक्झांडरच्या मृत्यूनंतर येथील ग्रीक सैन्य हुसकावून लावण्यांत आलें.

अॅलेक्झांडर हिंदुस्थानांत ख्रिस्तपूर्व ३२६ या वर्षी आला. त्याचें येणें म्हणजे नुसती एक स्वारी मात्र झाली. तिचा हिंदुस्थानवर कायमचा कांहीं परिणाम झाला नाहीं. कांहीं लोकांची अशी समजूत आहे, कीं या स्वारीमुळें हिंदुस्थान व ग्रीस यांच्या-मधील दळणवळण सुरू होण्यास मदत झाली. परंतु खरी गोष्ट अशी आहे, कीं अॅलेक्झांडरच्या उदयापूर्वींच पूर्व आणि पश्चिम यांच्यामध्यें एक चांगला वाहता रस्ता होता. आणि हिंदुस्थानचा इराणशींच नव्हे, तर प्रत्यक्ष ग्रीसशींही नित्य संबंध चालू होता. हा संबंध अॅलेक्झांडरच्या स्वारीपासून वाढला असेल; आणि तेव्हांपासून हिंदी आणि ग्रीक या दोन्ही संस्कृतींचा मिलाफही अधिक झाला असेल, असें मात्र म्हणतां येईल.

अॅलेक्झांडरची स्वारी व त्याचा मृत्यु यातून हिंदुस्थानांत एका प्रचंड साम्राज्याची प्रस्थापना झाली. पण हिंदुस्थानच्या इतिहासांतील तो एक अत्यंत श्रेष्ठत्वाचा काळ आहे, म्हणून त्यावर थोडा जास्त वेळ खर्च केला पाहिजे.

## १८

# चंद्रगुप्त मौर्य आणि कौटिलीय अर्थशास्त्र

२५ जानेवारी, १९३१

आपल्या एका पत्रांत मीं मगधाचा उल्लेख केला आहे. हल्लींचा जो बिहार प्रांत आहे, त्यावर पसरलेलें हें एक प्राचीन राज्य होतें. हल्लीं ज्याला पाटणा हें नांव आहे तें मूळचें पाटलीपुत्र शहर या राज्याची राजधानी होतें. ज्या काळचा आपण विचार करीत आहों, त्या काळीं मगधावर नंदवंशांतील एका शाखेच्या राजाचें राज्य होतें. अॅलेक्झांडरनें हिंदुस्थानच्या वायव्य भागावर स्वारी केली त्या वेळीं एक नंद राजाच पाटलिपुत्रांत राज्य करीत होता. चंद्रगुप्त नावाचा एक तरुण त्या वेळीं त्या राज्यामध्यें होता. तो या राजाचा नातेवाईक असावा असें दिसतें. तसेंच हा चंद्रगुप्त फारच कुशाग्र बुद्धीचा, उत्साही, आणि महत्त्वाकांक्षी मनुष्य असावा असें दिसतें. परंतु नंद राजाला हा एवढा बुद्धिमान् मनुष्य धोक्याचा वाटला असेल म्हणून म्हणा, किंवा इतर कांहीं कारणानें त्याची त्याच्यावर गैरमर्जी झाल्यामुळें म्हणा, राजानें त्याला आपल्या देशांतून हद्दपार केलें होतें. चंद्रगुप्त हा तक्षशिलेच्या बाजूला गेला. अॅलेक्झांडर व ग्रीक यांच्यासंबंधींच्या वार्तांमुळें कुतूहल होऊन कदाचित् तो तिकडे वळला असावा. त्याच्या-बरोबर अत्यंत कर्तबगार असा एक ब्राह्मण होता. त्याचें नांव विष्णुगुप्त अथवा चाणक्य. चंद्रगुप्त आणि चाणक्य हे दोघेही दैवाला दोष लावीत बसणारे कोणी

दर्दुबाई शेळपट लोक नव्हते. कसलेंही संकट आलें, तरी त्याची त्यांना यत्किंचितही डर नव्हती. त्यांच्या डोक्यांत महत्त्वाकांक्षा भरलेली होती आणि कित्येक योजना भविष्यकाळांत घडवून आणण्याचीं स्वप्नें त्यांच्या डोळ्यासमोर नाचत होतीं. आणि स्वस्थ न बसतां विजय मिळविण्यासाठीं धडपड करण्याला ते उत्सुक झालेले होते. असेंही असेल, कीं ॲलेक्झांडरच्या विजयानें चंद्रगुप्ताचे डोळे दिपून गेले असतील व आपणही त्याचेंच अनुकरण करावें असें त्याला वाटूं लागलें असेल. या कामीं चाणक्य हा चंद्रगुप्ताला अत्यंत आदर्श असा मित्र आणि सल्लागार लाधला होता. ते दोघेही डोळे उघडे ठेवून तक्षशिलेमध्ये घडणाऱ्या प्रत्येक घटनेकडे नजर रोखून योग्य संधीचीच जणुं वाट पाहत होते.

ही संधि त्यांना लौकरच मिळाली. ॲलेक्झांडरच्या मृत्यूची बातमी तक्षशिलेंत येताक्षणींच चंद्रगुप्तानें जाणलें, कीं हीच वेळ हालचाल करण्याला योग्य आहे. त्यानें आजूबाजूच्या लोकांना उठविलें. आणि त्यांच्या मदतीनें त्यानें ॲलेक्झांडरनें त्या भागांत ठेवलेल्या सैन्यावर हल्ला करून तें पार हांकलून लावलें. तक्षशिलेचा ताबा घेऊन चंद्रगुप्त आणि त्याचे दोस्त दक्षिणेकडे पाटलिपुत्रावर चालून गेले व नंद राजाचा त्यांनीं पराभव केला. हा प्रकार ख्रिस्तपूर्व ३२१ या वर्षीं म्हणजे ॲलेक्झांडरच्या स्वारीनंतर पांच वर्षें सुद्धां लोटलीं नाहींत तोंच घडला. याच वेळेपासून मौर्य कुळाच्या राज्याला सुरुवात झाली. चंद्रगुप्ताला मौर्य कां म्हणत, याचें नीटसें कारण उमगत नाहीं. कांहींची कल्पना अशी आहे, कीं त्याच्या आईचें नांव मुरा असें होतें म्हणून हें नांव पडलें, तर कांहींच्या मतें त्याच्या आईचा बाप नंद राजांच्या मोरांचा रक्षक होता, तेव्हां संस्कृतमधील मयूर या शब्दावरून हें नांव पडलें असावें. नांवाची ही पूर्वपीठिका कांहींही असली, तरी त्याला चंद्रगुप्त मौर्य म्हणत ही गोष्ट निश्चित आहे; पुढें कित्येक शतकांनंतर चंद्रगुप्त नांवाचा आणखी एक मोठा राजा हिंदुस्थानांत झाला. त्याच्याहून हा निराळा होता हें दाखविण्यासाठींही मौर्य हें उपपद त्याच्या नांवापुढें मुद्दाम लावण्यांत येऊं लागलें असेल.

साऱ्या भारतावर राज्य करणाऱ्या मोठमोठ्या राजांचीं—चक्रवर्ती राजांचीं वर्णनें महाभारतामध्यें किंवा प्राचीन कथांतून आपण वाचतों. परंतु या काळचें चांगलेंसें ज्ञान आपल्याला मिळत नाहीं ; आणि ज्याला भारत किंवा भारतवर्ष म्हणत, तो देश तरी कोठपासून कोठपर्यंत होता याची सुद्धां नीटशी कल्पना आपल्याला येत नाहीं. आपल्याला आज ज्या कथा उपलब्ध आहेत, त्यांमध्यें या राजांच्या सामर्थ्या-बद्दल अतिशयोक्ति केली गेली असण्याचाही संभव आहे. तें कसेंही असो ; परंतु हिंदुस्थानमध्यें विशाल विस्तार पावलेलें आणि अत्यंत प्रबळ असें इतिहासांतील पहिलें स्पष्ट नजरेंत भरणारें साम्राज्य म्हणजे चंद्रगुप्त मौर्याचेंच साम्राज्य होय. हें राज्य फारच सुधारलेलें आणि सामर्थ्यवान् होतें, हें दिसेलच पुढें आपल्याला. ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे, कीं अशा तऱ्हेचें राज्य आणि राज्यव्यवस्था हीं कांहीं अकस्मात् एका दिवसांत

उत्पन्न होणारीं नाहींत. त्याच्याआधीं किती तरी काळपर्यंत अनेक घटना घडत आलेल्या असणें आवश्यक आहे; विशेषतः लहान लहान राज्यें एकमेकांशीं संलग्न होऊन त्यांचें एक राज्य होत जाण्याची क्रिया बराच काळ होत आली असली पाहिजे. आणि राज्य-व्यवस्थेचें तंत्र अधिकाधिक सुधारण्याची क्रियाही हळूहळू पुष्कळ काळपर्यंत चालत आली असली पाहिजे.

आशिया मायनरपासून हिंदुस्थानपर्यंतचा प्रदेश शिकंदरच्या ज्या सेनापतीच्या वांटणीला आलेला होता, त्या सेल्युकसनें चंद्रगुप्ताच्या अमदानींत मोठ्या सैन्यानिशीं सिंधु नद ओलांडून हिंदुस्थानवर हल्ला केला. परंतु या अविवेकाचें प्रायश्चित्त त्याला चांगलेंच भोगावें लागलें. चंद्रगुप्तानें त्याचा प्रचंड पराभव केला आणि आल्या वाटेनें त्याला परत जावें लागलें. नवीन कांहीं प्रांत तर त्याला मिळाला नाहींच; उलट गाधार म्हणजेच अफगाणिस्तानमधील काबूल आणि हिरातपर्यंतचा भाग त्याला चंद्रगुप्ताला द्यावा लागला. तसेंच चंद्रगुप्तानें त्याच्या मुलीशीं विवाहही केला. चंद्रगुप्ताचें साम्राज्य आतां उत्तर हिंदुस्थानचा सर्वच्या सर्व प्रांत आणि अफगाणिस्तानचा कांहीं भाग एवढ्या विस्तीर्ण प्रदेशावर काबूलपासून बंगालपर्यंत आणि आरबी समुद्रापासून तों बंगालच्या उपसागरापर्यंत पसरलें. दक्षिण हिंदुस्थान तेवढें त्याच्या ताब्यांत नव्हतें. या प्रचंड साम्राज्याची राजधानी पाटलिपुत्र हें शहर होतें.

सेल्युकसनें चंद्रगुप्ताच्या दरबारांत आपल्यातर्फे प्रतिनिधि म्हणून मेगॅस्थेनीस नांवाचा वकील पाठविला होता. त्या काळची मोठी चित्तवेधक हकीकत मेगॅस्थेनीसनें लिहून ठेवलेली आहे. परंतु याहूनही अधिक चित्तवेधक व कुतूहल उत्पन्न करणारा आणखी एक वृत्तांत आपल्याला उपलब्ध आहे. त्यामध्यें चंद्रगुप्ताच्या राज्याबद्दल अत्यंत संपूर्ण व तपशीलवार माहिती दिलेली आहे. हा वृत्तांत म्हणजे 'कौटिल्याचें अर्थशास्त्र' हा ग्रंथ होय. अर्थशास्त्र म्हणजे संपत्तीचें शास्त्र आणि हा कौटिल्य म्हणजे दुसरा कोणी नसून आपल्या ओळखीचा विष्णुगुप्त किंवा चाणक्य हाच होय.

या अर्थशास्त्रग्रंथांत इतके विपुल विषय आहेत आणि इतक्या विविध गोष्टींची त्यामध्यें चर्चा केलेली आहे, कीं त्याबद्दल थोडक्यांत तुला कांहीं फारसें सांगतां येणार नाहीं मला. त्याच्यामध्यें चर्चा केलेल्या विषयांत राजांचीं कर्तव्यें, त्यांचे मंत्री व सल्लागार यांचीं कर्तव्यें, मंत्रिमंडळाच्या बैठकी, राज्याचीं निरनिराळीं खातीं, व्यापार आणि उद्योगधंदे, शहरांचे व खेडेगांवांचे कारभार, कायदा आणि न्यायालयें, सामाजिक रूढी, स्त्रियांचे हक्क, वृद्ध आणि अशक्त यांचें पालनपोषण, लग्न आणि घटस्फोट, करांची आकारणी, सैन्य आणि आरमार, युद्ध आणि तह, राजकारणी मुत्सद्यांचे डावपेंच व कर्तव्यें, शेती, सूत काढणें आणि कापड विणणें, कारागीर लोक, प्रवासाचे परवाने, एवढेंच नव्हे, तर तुरुंगसुद्धां, असे इतके असंख्य विषय आहेत, कीं अशी ही यादी मला आणखी किती तरी लांबवर वाढविता येईल. परंतु कौटिल्याच्या ग्रंथातील प्रकरणांच्या मथळ्यांनींच कांहीं हें सारें पत्र मला भरून टाकायचें नाहीं!

या ग्रंथावरून असें दिसतें, कीं राज्यारोहणाच्या वेळीं राजाला राज्याधिकार लोकांच्या हातून मिळत असे. त्या अधिकाराचा स्वीकार करतांना राजाला लोकांची सेवा करण्याबद्दल प्रतिज्ञा करावी लागे, कीं "मीं जर तुमच्यावर जुलूम केला, तर मला स्वर्गप्राप्ति न होवो आणि माझा संसार व माझी संपत्ति यांचा नाश होवो." या ग्रंथात राजाचा रोजचा व्यवहार व दिनचर्या यांबद्दलची माहिती आढळत. तातडीच्या कामासाठीं वाटेल त्या वेळीं त्यानें तयार असलें पाहिजे. त्याच्या मर्जीस येईल तोंपर्यंत कामाचा खोळंबा व्हायचा, किंवा काम होणें न होणें हें त्याच्या लहरीवर अवलंबून राहायचें हें चालत नसे. "राजा जर उत्साही, कर्तव्यतत्पर असेल, तर प्रजाही तितकीच कर्तव्यतत्पर राहते," "लोकांच्या सुखांत, लोकांच्या कल्याणांत राजाचें सुख आहे, त्याला जें आवडतें तें चांगलें असें त्यानें मानतां कामा नये; तर प्रजेला जें जें आवडतें तेंच चांगलें, असेंच त्यानें मानलें पाहिजे." आजकाल आपल्या जगांतून राजे नाहींसे होत आहेत—आतां फारच थोडे राजे शिल्लक राहिले आहेत आणि लौकरच तेही जातील. परंतु प्राचीन हिंदुस्थानांत राजपदाचें ध्येय प्रजेची सेवा हें होतें हें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. राजाला कांहीं दैवी अधिकार असतात असें इकडे मानलें जात नव्हतें किंवा त्यांना एकतंत्री सत्ताही नव्हती. राजाकडून अधर्माचरण झालें तर त्याला काढून टाकण्याचा व त्याच्या जागीं दुसरा राजा बसविण्याचा प्रजेला हक्क होता. अर्थात् हें ध्येय होतें; असा धर्मशास्त्रार्थ होता. परंतु प्रत्यक्षांत पुष्कळ राजे असे झाले, कीं त्यांच्या हातून या धर्माचें पालन झालें नाहीं आणि त्यांनीं आपल्या मूर्खपणामुळें आपल्या देशावर आणि प्रजेवर दुर्भाग्याची संक्रांत आणली.

'आर्य कधींही गुलामगिरी पत्करणार नाहीं'* या प्राचीन तत्त्वाचा पुरस्कार अर्थशास्त्रांतही आहे. परदेशांतून आणलेले किंवा या देशांतल्या लोकांपैकींही कांहीं लोक गुलाम म्हणून आर्यांजवळ होते असें दिसतें. पण आर्यांपुरतें पाहिलें तर त्यांच्यापैकीं कोणी कधीं गुलाम होऊं नये याबद्दल मात्र दक्षता घेतली जात असे.

मौर्यांची राजधानी पाटलिपुत्र हें नगर होतें. गंगेच्या कांठावर नऊ मैल लांब पसरलेलें हें शहर अत्यंत ऐश्वर्यसंपन्न व भव्य होतें. त्याच्या चौसष्ट मुख्य वेशी होत्या आणि छोट्या वेशी तर शेंकडों होत्या. घरें मुख्यतः लांकडाचीं बांधलेलीं होतीं. त्यामुळें आगीचें भय फार असे. त्यासाठीं काळजीपूर्वक संरक्षक योजना आधींपासून करून ठेविलेल्या होत्या. मुख्य मुख्य रस्त्यांवर हजारों भांडीं नेहमीं पाण्यानें भरून ठेवलेलीं असत. तसेंच प्रत्येक घरमालकानें आगीच्या वेळीं उपयोगी पडावीं म्हणून पाण्यानें भरलेलीं भांडीं, शिड्या, आकड्या, आणि इतर अशाच जरुरीच्या सर्व वस्तू तयार ठेवल्याच पाहिजेत असा दंडक होता.

कौटिल्यानें नमूद केलेला एक नियम वाचून तुला मोठें कौतुक वाटेल. जो कोणी रस्त्यांत घाण टाकील त्याला दंडाची शिक्षा असे. जो कोणी रस्त्यांत चिखल

* न त्वेवाऽऽर्यस्य दासभावः।

अथवा पाणी सांचूं देईल त्यालाही शिक्षा असे. हे नियम जर प्रत्यक्ष अमलांत असतील, तर पाटलिपुत्र आणि इतरही शहरें मोठीं उमदीं, स्वच्छ आणि निरोगी असलीं पाहिजेत. आमच्या नगरपालिकांनीं असे कांहीं नियम केले तर किती चांगलें होईल !

पाटलिपुत्रामध्यें शहराच्या व्यवस्थेकरितां एक नगर-मंडळ होतें. या मंडळाची निवड लोक करीत असत. त्यांमध्यें तीस सभासद असत व पांचपांचाचें एक अशी त्याचीं सहा पोटमंडळें केलेलीं असत. त्या पोटमंडळांकडे शहरांतील उद्योगधंदे आणि हस्तव्यवसाय, प्रवासी व यात्रेकरूंसाठीं करावयाच्या सोयी, कराच्या दृष्टीनें जन्म आणि मृत्यूंची नोंद, कारखाने, या आणि अशा इतर बाबींचा कारभार सोंपविलेला असे; आणि सगळें मंडळ मिळून शहराचें आरोग्य, जमाबंदी, पाणीपुरवठा, उद्यानें आणि सार्वजनिक इमारती यांची व्यवस्था पाहात असे.

न्यायदानाकरितां पंचायती असत आणि त्यांच्या निकालांचे फेरविचार करण्यासाठीं वरिष्ठ न्यायकचेऱ्या असत. दुष्काळासाठीं विशेष उपाय योजण्यांत येत आणि सर्व सरकारी कोठारांमध्यें निम्मा माल नेहमीं दुष्काळासाठीं म्हणून शिल्लक राखून ठेवण्यांत येत असे.

२२०० वर्षांपूर्वीं चंद्रगुप्त व चाणक्य यांनीं सुसंघटितपणें प्रस्थापित केलेलें मौर्यांचें साम्राज्य हें अशा प्रकारचें होतें. कौटिल्य व मेगॅस्थेनीस यांनीं लिहिलेल्या गोष्टींपैकीं कांहीं थोड्याच फक्त मीं तुला सांगितल्या आहेत. त्यावरून त्या वेळच्या उत्तर हिंदुस्थानची ढोबळ अशी कल्पना तुला येईल. पाटलिपुत्र राजधानी आणि साम्राज्यांतील इतर मोठीं नगरें व हजारों खेडीं हीं या काळीं यशस्वी व उत्साही जीवनानें नुसतीं गजबजून गेलीं असलीं पाहिजेत असें दिसतें. साम्राज्याच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत मोठमोठे रस्ते होते. मुख्य राजपत्र (राजपथ) किंवा राजरस्ता पाटलिपुत्रांतून वायव्य सरहद्दीपर्यंत गेलेला होता, कितीएक कालवे तयार करण्यांत आले होते, आणि मुद्दाम एक खास पाणीपुरवठा-खातें त्यांची व्यवस्था पाहण्याकरितां निर्माण करण्यांत आलेलें होतें. तसेंच बंदरें, तरी, पूल, आणि या ठिकाणाहून त्या ठिकाणीं ये-जा करण्याला असंख्य नावा आणि जहाजें यांची व्यवस्था पाहण्यासाठीं एक आरमार-खातेंही उघडलेलें होतें. जहाजें समुद्र ओलांडून थेट ब्रह्मदेश आणि चीन येथपर्यंतही जात असत.

अशा या साम्राज्यावर चंद्रगुप्तानें चोवीस वर्षें राज्य केलें. तो ख्रिस्तपूर्व २९६ सालीं मरण पावला. मौर्यांच्या साम्राज्याची पुढची हकीकत आपण आतां पुढच्या पत्रांत सांगूं.

## १९

# तीन महिने

एस्. एस्. ॲकोव्हिया
२१ एप्रिल, १९३१

तुला मागचें पत्र लिहिल्याला आज किती दिवस होऊन गेले. जवळजवळ तीन महिने झाले म्हणायचे. पण या तीन महिन्यांत केवढें दुःख, किती अडचणी, किती मानसिक ताण अनुभवावा लागला! हिंदुस्थानांत या तीन महिन्यांत केवढी घडामोड झाली. आणि तशीच आपल्या कुटुंबांतही. हिंदुस्थानमध्यें काहीं काळ सत्याग्रहाची, कायदेभंगाची मोहीम तूर्त बंद ठेवली आहे. परंतु आमच्यापुढें जे प्रश्न उभे आहेत त्यांचा निकाल करणें फार अवघड आहे. आणि इकडे आपल्या कुटुंबाचा तर अत्यंत प्रिय आधारच तुटून पडला आहे. त्याच्यापासून आपल्याला स्फूर्ति मिळत होती, सामर्थ्य प्राप्त होत होतें; त्यांच्याच काळजीच्या सांवलीखालीं आम्ही वाढलों आणि आपल्या मातृभूमीसाठीं–भारतासाठीं–आपापल्या शक्तीप्रमाणें काम करण्यास आम्ही त्यांच्याच-पासून शिकलों. नैनी तुरुंगांतला तो दिवस मला किती चांगला आठवतो आहे! तो २६ जानेवारीचा दिवस होता. आणि रोजच्याप्रमाणें मी प्राचीन कालाबद्दल तुझ्यासाठीं कांहीं लिहावें म्हणून बसलों होतों. आदल्याच दिवशीं मीं चंद्रगुप्त व त्यानें प्रस्थापित केलेलें मौर्यांचें साम्राज्य यांबद्दल लिहिलें होतें. आणि चंद्रगुप्त मौर्याच्या पाठीमागून झालेले लोक–उदाहरणार्थ, महात्मा अशोक, ज्याला देवांचा प्रिय म्हणत, जो हिंदी इतिहासाच्या आकाशांत एखाद्या ताऱ्याप्रमाणें चमकला आणि जो आपल्यामागें अमर कीर्ति ठेवून गेला–त्यांच्याबद्दल पुढें लिहिण्याचें तुला वचनही मीं दिलें होतें. अशोकाचा विचार मनांत येऊन मी जरा बसलों होतों, तों माझें मन तेथून निघून भ्रमण करीत करीत मी हातांत पेन आणि कागद घेऊन तुला लिहावयाला बसलों होतों, त्या दिवसाशीं येऊन ठेपलें. आम्हांला हा दिवस फार महत्त्वाचा दिवस आहे. कारण एक वर्षापूर्वी हाच दिवस सर्व हिंदुस्थानभर शहरोंशहरीं आणि खेडोंपाडीं आम्ही स्वातंत्र्य-दिन–पूर्ण स्वराज्य-दिन–म्हणून पाळला होता, आणि आम्हीं लाखोंनीं त्या दिवशीं जमून पूर्ण स्वातंत्र्याची प्रतिज्ञा केली होती; त्याला आज वर्ष झालें होतें. या वर्षांत केवढी झटापट झाली होती, किती हाल सोसावे लागले होते, किती विजय प्राप्त झालेला होता! आणि आजही पुन्हां हिंदुस्थानांत हा महत्त्वाचा दिवस पाळला जाणार होता. नैनी तुरुंगाच्या त्या सहा नंबरच्या बराकींत मी बसलों होतों तरी माझ्या डोळ्यांपुढें साऱ्या देशभर त्या दिवशीं होणाऱ्या त्या जाहीर सभा, त्या मिरवणुका, ते लाठीहल्ले, ती पकडापकड यांचेंच चित्र उभें राहिलें होतें. त्या विचारानें मला आनंद होत होता, अभिमान वाटत होता, आणि हळहळही वाटत होती. तोंच

एकाएकीं माझा ध्यानभंग झाला. बाहेरच्या जगांतून मला असा निरोप आला, कीं दादू फार आजारी आहेत आणि त्यांच्याकडे जाण्यासाठीं म्हणून तुरुंगांतून मला ताबड-तोब सोडून द्यावयाचें आहे. काळजीनें माझें अंतःकरण भरून गेलें. त्या साऱ्या कवि-कल्पनेच्या भराऱ्या संपल्या. तुला लिहायला घेतलेलें तें पत्र मीं तसेंच दूर ठेवून दिलें आणि नैनी तुरुंगांतून निघून मी आनंदभवनाच्या मार्गाला लागलों.

दादू आपल्याला सोडून जाण्यापूर्वीं दहा दिवस मला त्यांच्या सान्निध्यांत काढण्यास सांपडले. दहा दिवस आणि रात्री त्यांचें तें दुखणें, तळमळणें आणि यमदूताबरोबर चाललेली नेटाची लढाई आम्ही पाहत होतों. स्वतःच्या जीवनांत त्यांनीं कितीएक लढाया केल्या आणि कितीएक विजयही मिळविले. हार घेणें हें त्यांच्या चित्ताला कधीं माहीतच नव्हतें! आणि आज प्रत्यक्ष मृत्यूशीं समोरासमोर झुंजत असतांना माघार घेण्याची त्यांची इच्छा नव्हती. ही त्यांची शेवटची झटापट पाहत असतां त्यांच्यावर आपलें इतकें प्रेम असूनही आपल्याला त्यांना कसलीच मदत करतां येत नाहीं, या विचारानें माझ्या मनाची तळमळ होत होती. फार पूर्वी एडगर ॲलन पोच्या गोष्टींत वाचलेलीं कांहीं वाक्यें माझ्या डोळ्यांपुढें उभीं राहिलीं. त्यानें लिहिलें होतें, " माणूस स्वतः होऊन देवदूतांच्याही पुढें मान वांकविणार नाहीं किंवा मृत्यूपुढें सुद्धां भरपूर झगडा केल्याविना सर्वस्वीं हार जाणार नाहीं; तसें जर त्याच्या हातून घडत असेल, तर त्याचें कारण केवळ एकच आहे. तें म्हणजे त्याची जात्याच बलहीन असलेली इच्छाशक्ति ढिली पडते हें होय."

फेब्रुवारीच्या सहा तारखेस पहांटेच्या सुमारास दादू आम्हांला सोडून गेले. त्यांना अत्यंत प्रिय अशा निशाणांत त्यांचा देह गुंडाळून लखनौहून आनंदभवनांत आम्ही घेऊन आलों. प्रहरभराच्या आंत त्यांची मूठभर राख झाली आणि गंगेनें तो मौल्यवान् ठेवा सागराकडे वाहून नेला.

लाखों लोकांना त्यांच्या मृत्यूमुळें दुःख झालें आहे; मग आम्ही त्यांचीं मुलें, त्यांच्याच मांसांतून, त्यांच्याच हाडांतून जन्मास आलेलीं आम्ही मुलें, आमची अवस्था काय सांगावी! आणि नवें आनंदभवन—आमच्यासारखेंच तेंही त्यांचें एक अपत्यच आहे; त्यांनींच इतक्या प्रेमानें आणि काळजीनें त्याला जन्मास घातलें आहे; त्याचें पुढें काय? आज तें किती सुनें सुनें, निर्मनुष्य झालें आहे. त्यांतील प्राणच जणुं निघून गेला आहे! त्याच्यामधील व्हरांड्यामधून इकडे तिकडे हिंडत असतां त्याला निर्माण करणाऱ्या त्यांचीच मूर्ति सदैव जणुं आमच्या मनापुढें उभी राहते आणि त्यांच्या शांतीचा भंग तर आमच्या पदरवामुळें होणार नाहीं ना, अशीच जणुं भीति वाटून आम्ही पाऊल मुळींच न वाजवतां तेथें चालत असतों.

त्यांच्यासाठीं आम्ही दुःखानें तळमळतों. पावलोंपावलीं त्यांच्यावांचून आम्हांला चुकल्याचुकल्यासारखें होतें. दिवस भराभर निघून जात आहेत, तरी दुःख कांहींसुद्धां

कमी होत नाहीं किंवा त्यांचा अभाव सहन होत नाहीं. परंतु खरा विचार केला, तर आमच्या मनाची अशी स्थिति व्हावी हें त्यांना कांहीं आवडलें नसतें. दुःखाच्या आम्हीं इतकें आहारीं जाणें त्यांना पटलें नसतें. त्यांनीं ज्याप्रमाणें आपल्या आयुष्यांत अडचणींशीं झगडा केला त्याप्रमाणें आम्हींही दुःखाशीं झगडा करावा आणि त्यावर मात करावी अशीच त्यांची इच्छा असती. त्यांचें अपुरें राहिलेलें काम आम्हीं पुढें चालू ठेवण्यानेंच त्यांना आनंद झाला असता. कामाचे डोंगर पुढें पडले असतांना, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या कार्यांत आमच्या सेवेची गरज असतांना आम्हांला स्वस्थ राहून कसें चालेल? किंवा व्यर्थ दुःख कसें करीत बसतां येईल? हें कार्य करीत असतांनाच त्यांना मृत्यु आला; त्याच कार्यासाठीं आम्हीं आपलें आयुष्य घालविलें पाहिजे आणि जरूर तर मेलेंही पाहिजे. कशीं झालीं तरी आम्ही त्यांचींच मुलें आहोंत आणि त्यांच्या अंगचें तेज, सामर्थ्य आणि निश्चय यांचा कांहीं तरी अंश आमच्या अंगीं आहेच.

हें मी लिहीत असतांना माझ्या दृष्टीसमोर अगाध आरबी समुद्राचें निळें पाणी दूरवर पसरलेलें आहे आणि इकडच्या बाजूला खूप खूप लांब हिंदुस्थानचा किनारा चालतो आहेसें दिसतें आहे. माझ्या पुढचा हा प्रचंड आणि जणुं अमर्याद असा विस्तार पाहिला म्हणजे नैनी तुरुंगातील ती छोटीशी बराक, तेथल्या त्या उंच उंच भिंती—जिथें बसून मीं पूर्वींचीं पत्रें तुला लिहिलीं—यांची मला आठवण येते; दोहोंमध्यें किती फरक! येथें क्षितिजाची रेषा—जेथें समुद्र आकाशाशीं भिडलेला दिसतो आहे—कशी सरळ स्वच्छ दिसते आहे; तर तेथें तुरुंगात कैद्यापुढचें क्षितिज म्हणजे त्याच्याभोंवतींच्या उंच भिंतींचें वरचें टोंक! आज तुरुंगांतून पुष्कळसे लोक आम्ही बाहेर आलों आहों व बाहेरच्या मोकळ्या हवेंत वावरतों आहों. परंतु अजून आमचे कित्येक सहकारी तुरुंगांतच आहेत; आणि तेथील त्या अरुंद खोल्यांतून समुद्र, पृथ्वी किंवा क्षितिज यांचे दर्शन होणें त्यांना बंद आहे. तसेंच प्रत्यक्ष हिंदुस्थानही अजून कैदीच आहे, त्याचें स्वातंत्र्य अजून यायचेंच आहे. आणि हिंदुस्थान स्वतंत्र नसताना आम्ही तुरुंगाच्या बाहेर आहों या गोष्टीला कितीशी किंमत आहे?

## २०

## आरबी समुद्र

क्रॅकोव्हिया जहाज,

२२ एप्रिल, १९३१

मुंबईहून कोलंबोपर्यंत आम्ही या क्रॅकोव्हिया जहाजांतून प्रवास करतों आहों, हा किती विचित्र योगायोग आहे! चार वर्षांपूर्वी हीच क्रॅकोव्हिया बोट व्हेनिस बंदरांत

केव्हा येते याची मी किती वाट पाहत बसलों होतों, तें मला चांगलें आठवतें आहे. त्या बोटीवर दादू होते. आणि तुला स्वित्झर्लंडमध्यें बेक्स येथें शाळेंतच ठेवून त्यांना भेटण्यासाठीं मी व्हेनिसला आलों होतों. पुन्हां कांहीं महिन्यांनीं दादू याच बोटीनें यूरपमधून परत मायदेशीं आले तेव्हा त्याची-माझी मुंबईस या बोटीवर भेट झाली. त्या वेळीं त्यांच्याबरोबर प्रवास करीत असलेले लोक आजही या बोटीवर आमच्या-बरोबर आहेत. ते दादूंच्या किती तरी तऱ्हेतऱ्हेच्या हकीकती सांगत असतात.

गेल्या तीन महिन्यांत झालेल्या घडामोडींबद्दल काल तुला मी लिहीत होतों. त्या गेल्या कांहीं आठवड्यांत एक अशी गोष्ट घडली आहे, कीं तिचें स्मरण तूं सतत ठेवावेंस अशी माझी इच्छा आहे; सारा हिंदुस्थान ती पुष्कळ काळपर्यंत विसरूं शकणार नाहीं. अजून महिनासुद्धां झाला नाहीं. कानपुरामध्यें हिंदुस्थानचा एक सच्चा उमदा शिपाई मृत्युमुखीं पडला. त्याचें नांव गणेश शंकर विद्यार्थी. दुसऱ्यांना मृत्यूपासून वांचवीत असतां त्यांचा खून करण्यांत आला. गणेशजी माझे अत्यंत प्रिय मित्र होते. माझे अत्यंत उदार, निःस्वार्थी आणि उमदे सहकारी होते. त्यांच्याबरोबर खाद्याला खांदा लावून काम करण्यात मला मोठा अभिमान वाटत होता. गेल्या महिन्यांत कानपूरमध्यें जेव्हां वेडाची लाट उसळली आणि हिंदी मनुष्यच हिंदी माणसाचे प्राण घेऊं लागला, तेव्हां गणेशजींनीं त्या मारामारींत उडी घेतली; आपल्याच कोणाही देशबांधवाला ठार करण्याच्या हेतूनें नव्हे, तर त्याला मृत्यूपासून वांचविण्यासाठीं. शेंकडों प्राण त्यांनीं वांचविले. स्वतःचे प्राण मात्र त्यांना वांचवितां आले नाहींत. आणि ते वांचविण्याची त्यांनीं फिकीरही केली नाहीं. ज्याना वांचविण्याची ते धडपड करीत होते, त्यांच्याच हातून त्यांना मृत्यु आला. त्यांच्या मृत्यूमुळें कानपूर आणि आपला प्रांत यांचा एक ताराच गमावला आहे. आणि आम्ही आमच्या एका प्रिय आणि सुजाण मित्राला मुकलों आहों. परंतु त्यांचा मृत्यु किती तेजस्वी, किती वैभवशाली! गर्दींतील माथेफिरूपणाला त्यांनीं यत्किंचितही न कचरतां आणि अविचालित, शांत वृत्तीनें तोंड दिलें, आणि स्वतः धोक्यामध्यें व प्रत्यक्ष मृत्यूच्या खाईंत असतांनाही इतरांच्या जीवांची, ते कसे वांचवावे याचीच, फक्त चिंता त्यांनीं केली.

तीन महिन्यांतलि घडामोड! तीन महिने म्हणजे काल-समुद्रांमधील एक बिंदु, राष्ट्राच्या जीवितांतील एक पळ मात्र. तीनच आठवड्यांपूर्वी मी सिंधमधील सिंधु नदीच्या खोऱ्यामधील मोहेंजोदारो येथें सांपडलेले अवशेष पाहावयास गेलों होतों. माझ्या डोळ्यापुढें जमिनींतून वर येत असलेलें एक प्रचंड नगरच मीं पाहिलें; नगर म्हणजे असें तसें नव्हे, तर त्यांतील घरें चांगलीं पक्कया विटांचीं आणि रस्ते चांगले मोठे रुंद; आणि किती वर्षांपूर्वींचें बांधकाम हें सारें, तर म्हणतात, कीं ५००० वर्षांपूर्वींचें. त्या प्राचीन शहरांत हातीं लागलेले सुंदर दागदागिने आणि मातीचीं भांडीं मीं पाहिलीं. आणि माझ्या डोळ्यांपुढें जणुं कल्पनाचित्र थोडा वेळ उभें राहिलें, कीं त्या प्राचीन शहराच्या

मोठ्या रस्त्यांतून आणि गल्ल्यातून छान छान पोशाख केलेल्या स्त्री-पुरुषाची ये-जा चालली आहे. मुलें—मुलेंच तीं—रस्त्यामध्यें खेळत आहेत. बाजार नानातऱ्हेच्या विकाऊ वस्तूंनीं फुलले आहेत, लोक माल विकीत आहेत, विकत घेत आहेत आणि देवळांमधून घंटा निनादत आहेत.

गेलीं ५००० वर्षें हिंदुस्थाननें आपला संसारशकट चालविला आहे—आणि कितीएक बदल होत आलेले आहेत. आणि म्हणून कधीं कधीं माझ्या मनांत असा विचार येतो, कीं आमची ही इतकी प्राचीन असूनही इतकी नवतरणी आणि सुंदर अशी माता आपल्या मुलांची धांवपळ आणि उतावीळपणा व आज आहेत तर उद्यां नाहींत अशीं त्यांचीं क्षणजीवी सुखदुःखें, यांकडे पाहून मनांतल्या मनांत हंसत असेल, नाहीं?

## २१

## सुटीचा काळ आणि एक स्वप्नयात्रा

*२६ मार्च, १९३२*

नैनी तुरुंगांत मीं तुला प्राचीन इतिहाससंबंधीं शेवटचें पत्र लिहिलें, त्याला आज चौदा महिने झाले. त्यानंतर तीन महिन्यांनीं त्याच पत्रमालिकेंत आणखी दोन पत्रें मीं आरबी समुद्रावर लिहिलीं. आपण त्या वेळीं ॲकोन्ह्या बोटींतून वेगानें लंकेकडे चाललों होतों. मी लिहीत असतांना त्या ठिकाणीं तो प्रचंड सागर माझ्यापुढें लांबवर पसरला होता. आणि त्याच्याकडे किती डोळे भरून पाहिलें तरी तृप्तीच होत नव्हती. नंतर लंका आली; तेथें एक महिनाभर आपण गोड विश्रांतीची मौज उपभोगली आणि आपलीं दुःखें व काळज्या विसरून जाण्याचा प्रयत्न केला. तें अतिशय सुंदर बेट आपण या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हिंडून सारें पालथें घातलें. तेथलें सृष्टीचें तें अपार देणें आणि अतुलनीय रमणीयता पाहून आपण मोहून गेलों. कँडी, नुवर एलिया आणि प्राचीन वैभवाचे निदर्शक असे अवशेष आणि चिह्नें जिच्यामध्यें भरपूर आहेत अशी अनुरुद्धपूर नगरी, अशा त्या आपण पाहिलेल्या अनेक स्थळांची आठवण झाली म्हणजे किती आनंद होतो! पण या सगळ्यांत उष्ण कटिबंधांतील तीं गार अरण्यें, त्यांतील ती गर्द वन्य संपत्ति, जणुं कांहीं हजारों डोळेच तुमच्याकडे लागले आहेत असा भास ज्यामुळें व्हावा अशीं ताजींतवानीं पानें, फुलें-फळें यांचा विचार मनांत आला, म्हणजे तर मन आनंदानें उड्या मारूं लागतें. तेथलीं तीं सुपारीचीं, पातळ शेलाटी, सरळ रेखीव झाडें, असंख्य नारळीचीं झाडें, तालवृक्षाच्या झालरीनें शोभिवंत झालेला तो किनारा आणि त्या ठिकाणीं एका बाजूनें बेटावरील तो पाचूसारखा

हिरवा रंग; आणि दुसऱ्या बाजूनें समुद्र व आकाश यांच्यामधील नीलिमा यांचा होणारा संगम; किनाऱ्यावरील भूमीशीं खिळगारें आणि तुषारांनीं चमकणारें समुद्राचें पाणी आणि तालवृक्षांच्या पानांमधून सळसळ करीत जाणारा वारा, साऱ्याच गोष्टी किती लोभनीय वाटतात!

तुझी तर ती या उष्ण प्रदेशाला पाहिलीच भेट होती; मी पूर्वी एकदां येथें थोडे दिवस राहिलों होतों; परंतु ती आठवण माझी जवळजवळ बुजून गेलेली होती; त्यामुळें मला सुद्धां आज आपण कांहीं नवाच अनुभव घेत आहों असें वाटलें. या उष्ण प्रदेशांचें मला फारसें आकर्षण वाटत नसे; कारण उष्ण हवेची मला भीति वाटे. समुद्र, पर्वत आणि सर्वांत अधिक म्हणजे तें बर्फ आणि वाहते बर्फखंड यांचेंच मला विशेष वेड आहे. तथापि सीलोनमध्यें आपण जो अगदीं थोडासाच मुक्काम केला, तेवढ्यातही या उष्ण प्रदेशामधील विशेष मोहकता आणि जादू यांचा थोडाफार अनुभव मला येऊन गेला आणि मी मनांत थोड्याशा अतृप्तीच्या बोंचणीनें म्हणालों, कीं पुन्हां एकदा केव्हां तरी इकडे येऊन या प्रांताची मौज जास्त मोकळेपणीं अनुभवलीच पाहिजे.

सीलोनमधील आपला सुटीचा–विश्रांतीचा–महिना हां हां म्हणतां संपून गेला आणि तो छोटासा समुद्राचा पट्टा ओलांडून आपण हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकावर आलों. आपण कन्याकुमारीला जाऊन आलों तें आठवतें का तुला? या ठिकाणीं म्हणे ती कुमारी देवी राहते व या दिशेचें संरक्षण करीत असते. पाश्चात्य लोक आमचीं नांवें वेडींवांकडीं करण्यांत आणि त्यांच्यामधील सगळ्या अर्थाचा अनर्थ करण्यात मोठे वाकबगार आहेत. त्यांनीं या कन्याकुमारीचें रूपांतर केप कामोरीन असें केलें आहे. त्या ठिकाणीं आपण अगदीं यथार्थत्वानें हिंदमातेच्या पायाशीं बसलों होतों; एका बाजूनें आरबी समुद्र व एका बाजूनें बंगालचा उपसागर तेथें येऊन एकमेकांना मिळाले होते; ते दोघेही जणुं भारतमातेच्या पायाशीं बसून तिची पूजाच करीत आहेत अशी कल्पना मनांत येऊन आपल्याला त्या वेळीं किती मौज वाटली! त्या ठिकाणची शांतता अत्यंत आश्चर्यकारक होती आणि एकदम माझें मन हजारों मैल भरारी मारून ज्या ठिकाणीं हिमालयाच्या शिखरावर बर्फाचा चिरकालीन शाश्वत मुकुट आहे व जिथेंही अशीच अथांग शांतता आहे, त्या भारताच्या दुसऱ्या टोंकाकडे गेलें. पण या दोन प्रशांत टोंकांच्या मध्यें मात्र दैन्य आणि दारिद्र्य यांना पारावार नाहींसा झालेला आहे.

कन्याकुमारीपासून मग आपण उत्तरेला निघालों. त्रावणकोर व कोचीनमधून प्रवास केला. तसाच मलबारच्या किनाऱ्यावरील खाड्यांमधून पण. किती सुंदर होत्या त्या खाड्या! आणि आपली होडी गर्द छाया असलेल्या त्या दोन्ही किनाऱ्यांच्या मधून त्या चंद्रप्रकाशांत सरसर चालली असताना आपण जणुं स्वप्नांतच जल-प्रवास करीत आहों असा भास झाला. नंतर म्हैसूर आणि हैद्राबाद करून आपण मुंबईस आलों आणि अखेरीस अलाहाबादला पोंचलों. जून महिन्यांत आलों आपण परत. आज नऊ महिने झाले त्या गोष्टीला.

परंतु आजकाल हिंदुस्थानांतले सर्वच रस्ते केव्हा ना केव्हां तरी एकाच मुक्कामाला जाऊन पोंचतात. सगळ्या प्रवासांचा शेवट, मग ते खरेखुरे प्रवास असोत वा स्वप्नमय प्रवास असोत, तुरुंगांत होतो आणि म्हणून हा मी इथें पुन्हां आमच्या जुन्या ओळखीच्या भिंतींच्या आड आलों आहें; आतां तुझ्या आठवणी करीत बसायला आणि तुला पत्रें लिहायला वेळच वेळ; मग तीं पत्रें तुला कधीं पोंचोत वा न पोंचोत! पुन्हां झगडा चालू झाला आहे. आणि आतां आमचे लोक, स्त्रिया, पुरुष, मुलगे आणि मुली सगळे जण स्वातंत्र्ययुद्धांत धडाडीनें सामील होत आहेत आणि या देशाला लागलेला दारिद्र्याचा शाप धुऊन काढण्यासाठीं झटत आहेत. परंतु स्वातंत्र्यदेवीला प्रसन्न करणें ही मोठीच कठिण गोष्ट आहे. आपल्या भक्तांकडून पूर्वींच्याप्रमाणें आजही ती नरबलींची मागणी करीत आहे; आत्मत्यागाची अपेक्षा करीत आहे.

आज माझे तुरुंगांतले तीन महिने पुरे होतात. आज डिसेंबर २६ ; या दिवशीं तीन महिन्यांपूर्वीं मला सहाव्या वेळीं अटक झाली. इतके दिवसपर्यंत मी तुला पत्रें लिहायला सुरुवात करूं शकलों नाहीं. परंतु चालू काळच्या विचारांनीं मन भरून गेलेलें असतें, अशा वेळीं दूरच्या काळाचा विचार करणें कधीं कधीं किती कठिण होतें हें तुला ठाऊक आहे. तुरुंगामधल्या वातावरणाशीं स्थिरस्थावर होण्याला आणि बाहेरच्या घडामोडींबद्दलची चिंता करण्याचें सोडून देण्याला मला थोडाबहुत अधिक काळ लागतो. नियमानें तुला लिहिण्याचा यापुढें मी प्रयत्न करीन. पण या वेळीं मी निराळ्याच तुरुंगांत आहें ; हा बदल मला कांहीं पसंत नाहीं आणि त्यामुळें माझ्या कामांत थोडा व्यत्यय येतो. पूर्वींपेक्षांही इथें माझें क्षितिज अधिक उंच गेलें आहे. माझ्यासमोरची जी भिंत आहे, ती निदान उंचीच्या बाबतींत तरी चीनमधल्या त्या प्रचंड भिंतीशीं कांहींशी बरोबर करूं शकेल. ती जवळजवळ २५ फूट उंच आहे आणि सूर्यप्रकाश रोज सकाळीं आमच्यापर्यंत येऊन पोंचेपावेतों सूर्याला बाहेरच्याहून दीड तास अधिक प्रवास करावा लागतो.

कांहीं हरकत नाहीं. कांहीं काळ आमचें क्षितिज जरी आकुंचित झालें असलें, तरी सुद्धां तो महान् नीलसागर, तीं निर्जन मैदानें, ते पर्वत आणि त्यांमधून तूं, मी आणि तुझी आई यानीं दहा महिन्यांपूर्वीं केलेला तो स्वप्नांतल्यासारखा वाटणारा प्रवास – येथें बसलों असतां आपण खरोखरच केला का अशीच शंका वाटूं लागते – यांचें स्मरण करून समाधान करून घ्यायला तर येथें कशाची हरकत नाहीं!

# २२

# मनुष्याची उपजीविकेची धडपड

२८ मार्च, १९३२

पुन्हां आपण जागतिक इतिहासाचा ताणा पकडूं या आणि प्राचीन काळाचें थोडेंसें ओझरतें दर्शन मिळविण्याचा प्रयत्न करूं या. ताण्याची गुंतागुंत झालेली आहे; तो नीट मोकळा करायला कठिण आहे आणि सगळाच्या सगळा एकदम पाहायलाही कठिण आहे. पुष्कळदां काय होतें, कीं त्यांतल्या एकाद्या लहान भागांत आपण गुंगून जातों आणि वाजवीपेक्षांही जास्त महत्त्व त्याला देऊं लागतों. आपल्यापैकीं बहुतेक साऱ्या लोकांना असें वाटतें, कीं आपल्या स्वतःच्या देशाचा इतिहास, मग तो कोणताही का देश असेना, हा इतर सर्व देशांपेक्षां अधिक तेजस्वी आहे आणि त्याचाच अभ्यास करणें हें अधिक उपयुक्त आहे. पूर्वी एकदां याबद्दल मीं तुला धोक्याची सूचना दिली आहे. आणि पुन्हां मला तीच सूचना तुला द्यायची आहे. कारण मनुष्य या सांपळ्यांत सांपडणें हें फार सोपें आहे. तुझ्या बाबतींत हें असें घडूं नये म्हणून तर हीं पत्रें तुझ्यासाठीं लिहावयाला मीं सुरुवात केली आणि तरी सुद्धां मी स्वतःच ती चूक करतों आहें, असा संशय मला वाटतो आहे. पण माझें स्वतःचें शिक्षणच जर अयोग्य प्रकारचें झालेलें आहे, आणि मला सगळाच उलटाच्या सुलटा इतिहास जेथें शिकविण्यांत आलेला आहे, तेथें मी तरी काय करणार? ही उणीव भरून काढण्याचा आणि हा दोष सुधारण्याचा प्रयत्न तुरुंगवासाच्या एकांतांत अधिक अभ्यास करून मी करतों आहें. परंतु निरनिराळ्या व्यक्तींचीं आणि प्रसंगाचीं जीं चित्रें माझ्या बालपणापासून आणि प्रौढ विद्यार्थीदशेपासून माझ्या मनातील चित्रशाळेंत मीं टांगलेलीं आहेत, तीं तेथून काढून टाकण्याचें मला जमत नाहीं. आधींच माझें इतिहासाचें ज्ञान अपुरें आहे; इतिहासाविषयींचा दृष्टिकोन पुष्कळसा संकुचित आहे; आणि या चित्रांची छायाही त्या दृष्टिकोनाला बाधल्यावांचून राहत नाहीं. तेव्हा मी जें कांहीं लिहीन, त्यात माझ्याकडून चुका होण्याचा संभव आहे. कितीक बिनमहत्त्वाच्या क्षुल्लक गोष्टींचे उल्लेख मी करीन, तर पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टींबद्दल लिहिण्याचें मला भान राहणार नाहीं. परंतु हीं पत्रें म्हणजे कांहीं एखादा इतिहासाचा ग्रंथ नव्हे. तुझ्या-माझ्यामध्यें आज हें १००० मैलांचें अंतर आणि या भल्या मोठ्या भिंती उभ्या आहेत. त्या जर नसत्या तर जशा आपण एकमेकांशीं एकत्र बसून गुजगोष्टी केल्या असत्या, तशा प्रकारच्या गुजगोष्टीच हीं पत्रें आहेत. निदान तीं तशीं आहेत अशी माझी आपली गोड कल्पना आहे.

इतिहास-ग्रंथांत ज्यांच्याविषयींच सगळीं पानेंच्या पानें भरून गेलेलीं असतात, अशा पुष्कळ पुरुषांविषयीं तुला लिहिल्यावांचून माझें चालत नाहीं. पुष्कळदां व्यक्ती

म्हणूनही त्यांचें जीवन पाहण्यासारखें असतें आणि त्यांच्या त्याच्या काळाची यथार्थ कल्पना आणून देण्यालाही आपल्याला त्यांचा उपयोग होतो. परंतु इतिहास म्हणजे कांहीं राजे-महाराजे किंवा अशींच इतर मोठमोठीं माणसें याच्याच कामांचा केवळ वृत्तात नव्हे ; तसें असेल तर इतिहासाचा हा कारखाना आतां बंदच करून टाकावयास हवा. कारण जगाच्या रंगभूमीवर नाचायला राजे-महाराजाना आतां फारसा अवकाश राहिलेला नाहीं. परंतु जे स्त्री-पुरुष खरे श्रेष्ठ असतात, त्याच्या अंगचें पाणी चमकून दिसण्याला सिंहासनें, मुकुट, जडजवाहीर किंवा पदव्या यांची कांहीं जरूर लागत नसते. राजेरजवाडेच फक्त खरोखरच असे असतात, कीं वरचें राजपद किंवा सरंजाम यांवांचून आत त्याच्यापाशीं कांहींच नसतें ; आंतला तो सारा उजाडपणा लपविण्या-साठीं त्यांना पट्टे-दुपट्टे आणि अधिकारवस्त्रें यांच्या झुली अंगावर चढवाव्या लागतात! दुःखाची गोष्ट मात्र ही, कीं आपल्यापैकीं पुष्कळांची त्यामुळें फसगत होते; या बाहेरच्या प्रदर्शनानें त्यांना मोह पडतो. आणि जो मनुष्य राजपदावर आहे त्याच्या ठिकाणीं खरोखरच राजत्व – राजा होण्याची पात्रता – राजाचे अंगीं असावे ते गुण आहेत, असें मानण्याची चूक ते करतात. एका इंग्रज कवीनें म्हटलें आहे :

**मुकुट मस्तकीं, नामें राजा, एकही न गुण अन्य**
**राजतेजयुत अशाहि पुरुषा गणिति तयांची धन्य !**

खऱ्या इतिहासांत इकडच्या तिकडच्या चार व्यक्तींचा विचार करून चालणार नाहीं. तर ज्या लोकांचे मिळून राष्ट्र बनतें, जे श्रम करतात आणि आपल्या श्रमानें जीवितांतील आवश्यक आणि चैनीच्या वस्तू निर्माण करतात, ज्यांच्या जीवनाचा हजारों प्रकारानीं परस्परांच्या जीवितावर परिणाम होत असतो, अशा लोकांबद्दल इतिहासांत विचार केला पाहिजे. मानवजातीचा इतिहास अशा रीतीनें लिहिला, तर ती एक अत्यंत मनोवेधक कथा होईल. आज युगानुयुगें मानवाचा निसर्ग आणि निसर्गशक्तींशीं जो झगडा चालत आलेला आहे त्याचा तो वृत्तांत होईल. सुरुवातीला रानटी पशू व अरण्यें यांच्याविरुद्ध त्याला सामना करावा लागला ; असेच इतर पुष्कळ झगडे करतां करतां अगदीं सरते शेवटीं सगळ्यात कठिण असा झगडा आपल्या स्वतःच्याच जाती-पैकीं जे लोक त्याला आपल्या स्वार्थासाठीं दडपून टाकून नागविण्याचा प्रयत्न करीत होते त्यांच्याविरुद्ध माणसाला करावा लागला आहे. जगण्यासाठीं अन्न, राहायला निवारा, आणि थंड हवेमध्यें कपडे अशांसारख्या कांहीं वस्तू माणसाला अत्यावश्यक आहेत ; आणि म्हणूनच ज्याच्या ताब्यात या वस्तू होत्या ते लोक मानवजातीवर आपलें प्रभुत्व गाजवीत आले आहेत. राज्यकर्ते किंवा पुढारी यांना अधिकार का प्राप्त झाला ?– तर मनुष्याच्या उपजीविकेसाठीं आवश्यक असलेल्या वस्तूंपैकीं कोणत्या ना कोणत्या वस्तूवर त्यांची मालकी होती म्हणून, किंवा अशी एखादी वस्तु त्यांच्या ताब्यांत होती म्हणून. या मालकी हक्कामुळें लोकांना अशा वस्तूंवांचून भुकें मारून आपल्याला शरण आणण्याचें सामर्थ्यच त्यांना प्राप्त झालें होतें. त्यामुळेंच कांहीं लोकांनीं मुळींच कांहीं

श्रम न करतां संपत्ति मिळवावी, आणि असंख्य जनसमुदायानें जवळजवळ कांहींच न मिळवतां श्रम मात्र करावे, आणि दिसायला केवळ मूठभर लोकांनीं आपणांहून किती तरी पटीनें प्रचंड अशा लोकसमुदायाची नागवणूक करावी, हें विचित्र दृश्य आपणास पाहावयास मिळूं लागलें.

मनुष्य अगदीं प्रथम रानटी, एकाकी राहून शिकारीवर उपजीविका करणारा असा होता; हळूहळू कुटुंबें अस्तित्वांत आलीं; पुष्कळशीं कुटुंबें एकमेकांशीं सहकार्य करूं लागून खेडेगांव निर्माण झालें; निरनिराळ्या खेडेगांवांतील कामकरी, व्यापारी आणि कारागीर एकत्र होऊन कारागिरांचे संघ उत्पन्न झाले. हळूहळू समाज म्हणून एक विशिष्ट संघटना वाढीस लागली. सुरुवातीला मनुष्य एकटा एक, आपल्यापुरता पाहणारा, अरण्यवासी होता. कसल्याच प्रकारचें सामाजिक जीवन अस्तित्वांत नव्हतें. त्यानंतरचा पहिला संघटित सामाजिक घटक म्हणजे कुटुंब, त्यानंतर खेडेगांव व नंतर खेडेगांवांचा संघ. असे हे सामाजिक घटक निर्माण होण्याचें कारण तरी काय? जगण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या धडपडींतून ही वाढ होणें अपरिहार्य होतें; हें परस्पर-सहकार्य होणें अपरिहार्य होतें. समान शत्रूंपासून संरक्षण करण्यासाठीं अथवा त्यावर हल्ला करण्यासाठीं, एकेकट्यानें आपापलें संरक्षण करण्यापेक्षां त्या सर्वांनीं एकत्र येऊन सहकार्य करणें हें किती तरी पटींनीं अधिक परिणामकारक होतें. श्रमाच्या बाबतींत हें सहकार्य याहूनही अधिक उपयुक्त होतें. एकेकट्यानें काम करण्यापेक्षां पुष्कळांनीं एकत्र येऊन काम करण्यानें अन्न आणि इतर जीवनावश्यक वस्तू किती तरी अधिक प्रमाणांत निर्माण करणें शक्य होतें. कामामध्यें हें परस्पर-सहकार्य होऊं लागलें कीं विशिष्ट प्रकारचा आर्थिक घटक संघटित होत जाणें हें ओघानें आलेंच; एकटा एक राहून जंगलांत शिकार करीत राहणारा मनुष्य जाऊन त्याच्या जागीं मनुष्य-संघ अशी संस्था मग निर्माण होणारच. तेव्हां उपजीविकेसाठीं माणसाला जो नित्य झगडा करावा लागतो आहे त्याच्या दडपणानेंच हा प्राथमिक आर्थिक घटक वाढत वाढत शेवटीं समाजांत किंवा समाजसंस्थेंत बहुधा त्याची परिणति झाली असली पाहिजे असेंच म्हणणें प्राप्त आहे. इतिहासाच्या विस्तीर्ण पटावर सुरुवातीपासून थेट आतांपर्यंत ही वाढ होत आलेली आपल्याला दिसून येते. अर्थात् असें होत असतांना अखंड झगडे व दुःख याच्या परंपरेंतूनच पुढें पुढें पाऊल पडत आलेलें दिसेल. तर केव्हां केव्हां या चक्राची गति उलटून माघार आलेलीही आढळेल. परंतु अशी ही वाढ होत आली आहे याचा अर्थ जगाची फार मोठी प्रगति झालेली आहे किंवा होतें त्यापेक्षां त्यांत पुष्कळ सुख वाढलें आहे असें मात्र समजूं नकोस. पहिल्यापेक्षां आतां कांहीं थोडें बरें आहे म्हणूं या आपण. परंतु पूर्णत्वापासून आज जग किती तरी दूरच आहे आणि जिकडे तिकडे दुःखाला आजही कांहीं कमी नाहीं.

या आर्थिक आणि सामाजिक संस्था जसजशा वाढत जातात, तसतसें मानवी जीवन अधिकाधिक गुंतागुंतीचें होत जातें. व्यापार आणि दळणवळण हीं वाढतात.

फुकट कोणी कोणाला देत नाहींसे होऊन देवघेव सुरू होते; त्याच्यामागोमाग पैसा उत्पन्न होतो आणि सर्व प्रकारच्या व्यवहारांत प्रचंड बदल होऊन जातो. सोन्याचीं अथवा चांदीचीं नाणीं किमतीऐवजीं देतां येऊं लागल्यानें देवघेव सुलभ होऊन व्यापाराची जलद प्रगति होते. पुढें पुढें पुष्कळ प्रसंगीं माणसें नाणींही वापरत नाहींशीं होतात; त्यांऐवजीं कांहीं प्रतीकेंच – खूणवजा वस्तू – मात्र वापरलीं जाऊं लागतात. एखाद्या कागदावर पैसे देण्याचें वचन लिहून दिलें म्हणजे सुद्धां तें पुरेसें होऊं लागतें. अशा रीतीनें बँकांच्या नोटा आणि हुंड्या (चेक) अस्तित्वांत आल्या. याचाच अर्थ पतीवर व्यवहार होऊं लागला. पतीचा उपयोग होऊं लागला म्हणजे विशाल प्रमाणा-वरील व्यापारी उलाढाली आणि उद्योगधंदे व दळणवळण यांना आणखी पुन्हां भरती येते. तुला ठाऊकच आहे, कीं आजकाल बँकेच्या नोटा व चेक यांचाच व्यवहारांत वारंवार उपयोग होत असतो आणि जाणते लोक आपल्याबरोबर सोन्याचांदीचे बटवे बाळगीत नाहींत.

अशा रीतीनें अगदीं अज्ञात अशा प्राचीन काळापासून आजपर्यंतचा इतिहास आपण पाहत आलों, तर लोक हळूहळू अधिकाधिक उत्पादन कसे करूं लागले, निरनिराळ्या धंद्यांत निरनिराळे लोक कसे वाकबगारी मिळवूं लागले, एकमेकांशीं आपापल्या वस्तूंची देवघेव कशी करूं लागले, आणि अशा रीतीनें व्यापार कसा वाढला हें प्रगतीचें चित्र आपल्यापुढें उभें राहतें. आपण असेंही पाहतों, कीं हळूहळू दळण-वळणाचे मार्गही अधिकाधिक चांगले होत गेले; वाफेचें एंजिन निघाल्यानंतर तर त्यांमध्यें गेल्या शंभर वर्षांत फारच मोठी प्रगति झाली. उत्पादन जसजसें वाढतें तसतशीं जगांतील संपत्ति वाढते; आणि कांहीं लोकांना तरी अधिकाधिक फुरसतीचा वेळ मिळूं लागतो. आणि अशा रीतीनें जिला सुधारणा म्हणून म्हणतात तिची वाढ होते.

हें असें सगळें घडून आलें म्हणजे केवढें हें आमचें ज्ञानयुक्त आणि प्रगतिमय युग, आधुनिक सुसंपन्नतेचे केवढाले हे चमत्कार, केवढें अद्भुत आमचें विज्ञान आणि केवढ्या महान् आमच्या विद्या व संस्कृती असा गर्व लोक वाहूं लागतात. पण इकडे गरीब गरीबच राहतात, त्यांचें दुःख आणि दैन्यही तसेंच कायम राहतें; मोठमोठीं राष्ट्रें एकमेकांशीं लढाया करूं लागतात आणि कोट्यवधि माणसें कापून काढतात; आमच्या घरीं-दारीं जर आम्हांला स्वातंत्र्य नसेल, तर या खऱ्या सुसंपन्नतेचा आणि संस्कृतीचा आम्हांस काय उपयोग? पण आतां मात्र आम्ही जागे झालों असून कंबर कसून हें सगळें नाहींसें करायला सिद्ध झालों आहों.

आपण या मोठ्या धामधुमीच्या काळामध्यें हजर आहों; हा जो संग्राम चालू आहे त्यानें केवळ हिंदुस्थानातच नव्हे, तर साऱ्या जगांत प्रचंड बदल घडवून आणण्याचें कार्य चालू होणार आहे; त्यामध्यें आपल्यालाही प्रत्येकाला भाग घेण्याला मिळतो आहे, ही केवढी भाग्याची गोष्ट आहे! तूं मोठी दैववान् मुलगी आहेस. रशियात नवयुग निर्माण करणाऱ्या क्रांतीच्या वर्षीं आणि त्या क्रांतीच्याच महिन्यांत

तुझा जन्म झाला. आज अशीच एक क्रांति तुझ्या स्वतःच्या देशांत तुझ्या डोळ्यां-समोर घडत आहे आणि लौकरच त्या क्रांतीच्या कार्यांत तूंही स्वतः भाग घेऊं लाग-शील. आज साऱ्या जगभर मोठी धामधूम आणि घडामोड चालू आहे. इकडे अति-पूर्वेकडे जपाननें चीनच्या गळ्याला हात घातला आहे; पश्चिमेकडे, नव्हे साऱ्या जगभरच, जुनी समाजव्यवस्था हादरली आहे, कोलमडून पडण्याच्या बेतांत आहे. निरनिराळे देश निःशस्त्रीकरणाच्या गप्पा मारताहेत, परंतु एकमेकांकडे संशयी नजरेनें पाहून नखशिखान्त सशस्त्र होत आहेत. दीर्घकाळपर्यंत जगावर प्रभुत्व गाजवीत आलेल्या भांडवलशाहीची ही शेवटची घटका आहे; भांडवलशाहीच्या अस्तकाळचा हा संधिप्रकाश आहे; ती नष्ट होणार यांत मुळींच संशय नाहीं. आणि असा तिचा नाश झाला, म्हणजे तिच्याबरोबर आणखी किती तरी वाईट गोष्टी पण निघून जातील.

## २३
## सिंहावलोकन

*२९ मार्च, १९३२*

प्राचीन युगांतून प्रवास करीत आपण कोठपर्यंत येऊन पोंचलों बरें! ईजिप्त, हिंदुस्थान, चीन आणि नोसस यांमधील प्राचीन काळाबद्दल कांहीं कांहीं आपलें बोलून झालें आहे. जिच्यामध्यें पिरामिडसारखीं बांधकामें होऊं शकलीं, अशी ईजिप्त-मधील प्राचीन आणि अत्यंत आश्चर्यकारक संस्कृति हळूहळू कशी ऱ्हास पावली, तिच्यांतील सामर्थ्य कसें नष्ट झालें, आणि बाहेरच्या खाणाखुणा आणि देखावा पहिल्यासारखा राहिला तरी तिच्यांत जिवंतपणा कसा राहिला नाहीं, हें आपण पाहिलें ग्रीसच्या मुख्य भूमीमधीलच एका वंशाच्या लोकांनीं आपल्याच बांधवांचें नोसस बेट व त्यामधील संस्कृति नष्ट करून टाकली, हें आपण पाहिलें. हिंदुस्थानांत आणि चीन-मध्यें अगदीं अंधुक अंधुक आणि इतिहासकालाच्या सुरुवाती-सुरुवातीचा जो प्राचीनतम काळ तेथपर्यंत आपण नजर टाकली. प्रत्यक्ष पुरावा किंवा तत्कालीन वृत्तांत यांच्या अभावीं त्या काळचें फारसें स्पष्ट ज्ञान आपल्याला झालें नाहीं. परंतु इतक्या प्राचीन काळींसुद्धां या देशांतील लोकांची संस्कृति किती संपन्न आणि भव्य होती, याची जाणीव आपणांस होऊं शकली आणि या दोन्ही देशांत हजारों वर्षांपूर्वीच्या संस्कृतीचा धागा प्राचीन काळ आणि आधुनिक काळ यांचा संबंध अद्यापिही कसा अबाधित ठेवीत वाहतो आहे ही गोष्ट पाहून आपण चकित झालों. मेसापोटेमियामध्यें साम्राज्यांमागून साम्राज्यें थोडा थोडा काळ कशीं भरभराटलीं व जगांतील सर्व साम्राज्यांच्या परंपरेप्रमाणें विलयासही कशीं गेलीं, याचेंही अगदीं ओझरतें दर्शन आपण घेतलें.

हिंदुस्थानांत बुद्ध आणि महावीर, चीनमध्यें कॉन्फ्यूशियस व लौ चे, इराणमध्यें झोरोआस्टर (झरतुष्ट्र) आणि ग्रीसमध्यें पायथागोरास अशांसारखे खिस्ताच्यापूर्वी ५।६ शतकें निरानिराळया देशांत जे कितीएक महान् व विचारवंत लोक होऊन गेले, त्यांच्याबद्दलही आपण थोडेंसें बोललों. बुद्धानें हिंदुस्थानांतली तत्कालीन भिक्षुकशाही व वैदिक धर्मातील कर्मकांड यांवर हल्ला चढविला हें आपण पाहिलें. कारण हरएक प्रकारची अंधश्रद्धा व पूजाअर्चा यांच्या जोरावर लोक बनविले जात आहेत, फसविले जात आहेत, असें त्याच्या अनुभवास आलें. जातिसंस्थेवरही त्यानें हल्ला केला आणि समतेचा उपदेश केला.

त्यानंतर आपण पुन्हां पश्चिमेकडे ज्या ठिकाणीं यूरप आणि आशिया एकमेकांशीं मिळतात, त्या ठिकाणीं परत गेलों; आणि ग्रीस व इराण यांच्या इतिहासांतील उलाढालींचा विचार केला. तेथें इराणमध्यें बादशहांचा बादशहा, शहेनशहा, म्हणून गाजलेल्या दारियस याच्या अमलाखालीं एक प्रचंड साम्राज्य उदयास येऊन तें थेट हिंदुस्थान-सिंधपर्यंत कसें पसरलें, हें आपण पाहिलें. या साम्राज्यानें छोट्याशा ग्रीसला गिळून टाकण्याचा प्रयत्न केला, परंतु तो एवढासा चिमुरडा देश उलटून लढाईचें तोंड द्यायला उभा राहिला, एवढेंच नव्हे, तर त्यानें आपलें राज्य चांगलेंच सांभाळलें. हें पाहून हे साम्राज्यवाले लोक हतबुद्ध होऊन गेले. यानंतर ग्रीक इतिहासांतील तो अत्यंत तेजस्वी परंतु अल्प असा काळ आला. त्याबद्दल मीं तुला थोडेंसें लिहिलें आहे. याच काळांत तेथें प्रतिभावान् व श्रेष्ठ लोकांची मोठीच संख्या उदयास आली; व त्यांनीं सौंदर्यसंपन्न असें वाङ्मय व कला यांना जन्म दिला.

ग्रीसचें हें सुवर्ण-युग फार काळ टिकलें नाहीं. मॅसिडोनियाचा अॅलेक्झांडर यानें लांबलांबपर्यंतचे अनेक देश जिंकून ग्रीसची कीर्ति चहूंकडे पसरविली; परंतु त्याच्या उदयापासूनच ग्रीक संस्कृतीचा हळूहळू ऱ्हास होण्याला सुरुवात झाली. अॅलेक्झांडरनें इराणचें साम्राज्य नष्ट करून टाकलें व विजेता म्हणून हिंदुस्थानची सरहद्द ओलांडूनही तो आत आला. तो फार मोठा सेनापति होता हें निःसंशय. परंतु लोकांत परपरेनें त्याच्याबद्दल असंख्य दंतकथा प्रचलित झाल्या असून त्याच्या लायकीपेक्षां फारच मोठी कीर्ति त्याला मिळाली आहे. सॉक्रेटीस किंवा प्लेटो, किंवा फिडियास, किंवा सोफॉक्लीस किंवा ग्रीसमधील इतर श्रेष्ठ पुरुष यांचीं नांवें फक्त चांगल्या बहुश्रुत माणसानाच काय तीं माहीत असतात. पण अॅलेक्झाडरचें नांव माहीत नाहीं, असा एक तरी मनुष्य कोणी असेल का?

अॅलेक्झांडरनें तसें पाहिलें तर केलें असें फार थोडें. इराणचें साम्राज्य जीर्ण होऊन आधींच डळमळूं लागलें होतें आणि तें फारसें त्यापुढें टिकून राहण्याचा संभव नव्हता. हिंदुस्थानातील अॅलेक्झांडरची स्वारी म्हणजे एक नुसता धांवता हल्लाच केवळ आला आणि त्याचा विशेषसा कांहींच परिणाम झाला नाहीं किंवा त्याला इतिहासांत विशेष असें कांहींच महत्त्व प्राप्त झालें नाहीं. अॅलेक्झांडर आणखी कांहीं

काळ जगता, तर कदाचित् त्यानें याहून अधिक भरीव असें कांहीं करून दाखविलेंही असतें. पण तो अल्पवयांतच वारला. आणि त्याच्या साम्राज्याचे ताबडतोब तुकडे तुकडे झाले. तथापि त्याचें साम्राज्य जरी टिकलें नाहीं, तरी त्याची कीर्ति मात्र अजून टिकून आहे.

ॲलेक्झांडरच्या पूर्वेकडील स्वारीचा एक मोठा परिणाम हा झाला, कीं त्यामुळें पूर्व व पश्चिम यांमधील दळणवळण पुन्हां जोरानें चालू झालें. पुष्कळ ग्रीक लोक पूर्वेकडे आले आणि तेथल्याच प्राचीन शहरांत राहूं लागले; किंवा त्यांनीं आपल्या नवीन वसाहती त्या भागांत स्थापन केल्या. ॲलेक्झांडरच्या पूर्वीसुद्धां पूर्व आणि पश्चिम यांच्यामध्यें दळणवळण होतेंच; नव्हतें असें नाहीं. परंतु त्यानंतर तें पुष्कळ वाढलें.

ॲलेक्झांडरच्या स्वारीचा आणखी एक परिणाम झाला म्हणतात. तो खराच तसा झाला असेल, तर ग्रीक लोकांचें तें मोठेंच दुर्भाग्य समजलें पाहिजे. अशी एक कल्पना सुचविण्यांत आली आहे, कीं ॲलेक्झांडरच्या शिपायांनीं आपल्याबरोबर मेसापोटेमियांतील दलदलीच्या प्रदेशांतून ग्रीसच्या खोलगट भागामध्यें मलेरियाचे जंतू नेले; त्यामुळें मलेरियाचा प्रसार होऊन सारे ग्रीक लोक (ग्रीक वंश) दुर्बल आणि निःसत्त्व होऊन गेले. ग्रीसला उतरती कळा लागण्याचें हें कारण होय असें सांगण्यांत येतें; पण अजून ही नुसती कल्पनाच आहे; तिच्यांत सत्य कितपत आहे हें कुणालाच सांगतां येत नाहीं.

ॲलेक्झांडरचें साम्राज्य फारच थोडा काळ टिकून नष्ट झालें आणि त्यांतून पुष्कळ छोटीं छोटीं साम्राज्यें उदयास आलीं. टॉलेमीचें ईजिप्तमधील साम्राज्य आणि पश्चिम आशियामधील सेल्युकसचें साम्राज्य हीं दोन्ही त्याच्यापैकींच. टॉलेमी व सेल्युकस हे दोघेही ॲलेक्झांडरच्या हाताखालचे सेनापती होते. सेल्युकसनें हिंदुस्थानवर आक्रमण करण्याचा प्रयत्न केला; परंतु हिंदुस्थान आपल्याला चांगलाच नेटानें प्रतिकार करूं शकतो हें प्रत्ययाला येऊन त्याची सारी आशा लयाला गेली. त्या सुमारास चंद्रगुप्त मौर्यानें सर्व उत्तर हिंदुस्थान व मध्य हिंदुस्थान यांमध्यें एक चांगलें सामर्थ्यवान् राज्य स्थापन केलेलें होतें. चंद्रगुप्त, त्याचा सुप्रसिद्ध ब्राह्मण मंत्री चाणक्य, आणि त्याचा अर्थशास्त्र हा ग्रंथ यांबद्दल यामागच्या पत्रांत मीं बरेंच तुला लिहिलें आहे. २२०० वर्षांपूर्वीच्या हिंदुस्थानांतील तत्कालीन परिस्थितीचें फार चांगलें चित्र या ग्रंथात सुदैवानें आपल्याला पाहावयास सापडतें.

सिंहावलोकन संपलें. आतां यापुढच्या पत्रांत याच्या पुढच्या काळचें मौर्यांचें साम्राज्य आणि राजा अशोक, यांबद्दल आपण लिहूं. कबूल आहे, कीं हें आतां लिहूं असें वचन नैनी तुरुंगांत २५ जानेवारी १९३१ च्या पत्रांतच मीं दिलें होतें; त्याला आतां चौदा महिने होऊन गेले आणि अद्यापि तें वचन पुरें व्हायचेंच आहे.

## २४

# ‘देवानाम् प्रिय’ राजा अशोक

३० मार्च, १९३२

मला वाटतें, राजेरजवाड्याच्या विरुद्ध लिहिण्याची मला जरा अधिक हौस आहे. या लोकांमध्यें कौतुक करण्यासारखें किंवा आदर वाटण्यासारखें मला फारसें कांहीं आढळत नाहीं. परंतु आतां मात्र आपण अशा एका पुरुषापाशीं आलों आहों, कीं तो राजा आणि सम्राट् असून सुद्धां फार श्रेष्ठ व आदरणीय पुरुष होता. त्याचें नांव अशोक. चंद्रगुप्त मौर्याचा हा नातू. एच्. जी. वेल्सच्या कांहीं अद्भुतरम्य कथा तूं वाचल्या असशील. त्यानेंच लिहिलेल्या Outline of History या ग्रंथांत अशोकाबद्दल म्हटलें आहे, कीं “इतिहास-ग्रंथांच्या पानापानांतून हजारों, लाखों राजांच्या नांवांची मारे गर्दी उसळलेली असते; कुणी राजे, कुणी महाराजे, कुणी राजाधिराजे, कुणी राजर्षि, कुणी नृपकुलावतंस; किती त्या त्यांच्या मोठमोठ्या पदव्या सांगाव्या? पण त्या साऱ्यांमध्यें कुणाचें नांव जर खरेंखुरें ताऱ्याप्रमाणें चमकून दिसत असेल, तर तें एकट्या एक अशोकाचेंच असें म्हणतां येईल. व्होल्गापासून जपानपर्यंत त्याला आजपर्यंत सर्वत्र फार मानतात. चीन व तिबेट यांमध्यें आणि खुद्द हिंदुस्थानामध्यें आज त्याचें तत्त्वज्ञान मान्य नसलें, तरी तेथेंही त्याच्या मोठेपणाची परंपरा अद्यापि अखंड चालू आहे. कॉन्स्टंटाइन किंवा शार्लमेन हे फार मोठे बादशहा समजले जातात; पण त्यांचीं नांवें जगांत आज नुसतीं ऐकून माहीत असणारे जेवढे लोक असतील, त्यांच्यापेक्षां किती तरी अधिकपट लोक अशोकाची स्मृति अंतःकरणांत भक्तियुक्त रीतीनें जतन करणारे असे आज जगामध्यें आहेत.”

ही फारच मोठी स्तुति आहे हें खरें आहे. परंतु ती सर्वथा योग्यच आहे; आणि या काळच्या हिंदी इतिहासाबद्दल कोणाही हिंदी माणसाला विशेष आनंद वाटणें स्वाभाविक आहे.

ख्रिस्ती शक सुरू होण्यापूर्वी ३०० वर्षांच्या सुमारास चंद्रगुप्त मरण पावला. त्याच्यामागून त्याचा मुलगा बिंदुसार हा गादीवर आला. परंतु त्याच्या पंचवीस वर्षांच्या कारकीर्दींत कोठें कांहीं विशेष घडामोड झाल्याचें दिसत नाहीं. ग्रीकांच्या राज्याशीं त्यानें संबंध मात्र चालू ठेवला होता आणि त्याच्या दरबारांत ईजिप्तचा टॉलेमी व पश्चिम आशियांतील सेल्युकसचा मुलगा अँटिओकस यांचे वकील असत. बाहेरच्या जगाशीं व्यापारही चालू होता आणि असें सांगतात, कीं ईजिप्तमधील लोक हिंदुस्थानांतल्या निळीचा उपयोग आपलें कापड रंगविण्याकडे त्या वेळीं करीत असत; तसेंच त्यांच्या ममीजच्या ( टिकवून ठेवलेल्या प्रेतांच्या ) भोंवतीं गुंडाळण्यासाठीं हिंदी मलमलीच्या कापडाचाच ते उपयोग करीत. बिहारमध्यें कांहीं प्राचीन अवशेष सांपडले

आहेत. त्यांवरून असें दिसतें, कीं त्या भागांत मौर्यांच्या आधींच्या काळीं सुद्धां कांहीं तरी प्रकारची कांच तयार होत असावी.

चंद्रगुप्ताच्या दरबारांत वकील म्हणून आलेल्या मेगॅस्थेनिस नांवाच्या महान् पुरुषानें या काळच्या भारतीयांबद्दल लिहिलेल्या कांहीं गोष्टी वाचून तुला मोठी गंमत वाटेल. त्यानें लिहिलें आहे, कीं हिंदी लोकांना छानछोकी आणि सौंदर्य यांची फार आवड असे आणि विशेष म्हणजे आपण आहों त्यापेक्षां अधिक उंच दिसावें अशा प्रकारचीं पादत्राणें ते वापरीत असत. म्हणजे उंच टाचांचे बूट हा कांहीं अगदींच आधुनिक शोध नाहीं असें म्हटलें पाहिजे.

बिंदुसाराच्या मागून ख्रिस्तपूर्व २६८ या वर्षीं अशोक गादीवर आला. त्या वेळींही त्यांचें साम्राज्य फार प्रचंड होतें; सारा उत्तर व मध्य हिंदुस्थान व्यापून तें थेट मध्य आशियापर्यंत जाऊन भिडलें होतें. आग्नेयीकडील व दक्षिणेकडील उरलेला प्रदेशही आपल्या साम्राज्यांत सामील करण्याच्या इच्छेनेंच बहुधा, आपल्या अमलाच्या नवव्या वर्षीं त्यानें कलिंग प्रांत जिंकण्यास सुरुवात केली. कलिंग देश हा हिंदुस्थानच्या पूर्वकिनाऱ्याकडील महानदी, गोदावरी, आणि कृष्णा या नद्यांमधील प्रदेश होय. कलिंगांतील लोक अत्यंत शौर्यानें लढले. परंतु त्यांचीं फार माणसें कापलीं गेलीं व शेवटीं त्यांचा पराभव झाला. ही लढाई व त्यातील मनुष्यवध यांचा अशोकाच्या मनावर इतका परिणाम झाला, कीं त्याला युद्धें आणि त्यांतून निष्पन्न होणाऱ्या सर्व घटना यांचा तिटकारा येऊन गेला. आतां यापुढें युद्ध म्हणून करावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय झाला. त्या वेळीं दाक्षिणेकडील एक छोटासा पट्टा सोडला, तर सारा हिंदुस्थान त्याच्या ताब्यांत होता; आणि उरलेला एवढासा तुकडा काबीज करून अखिल हिंदुस्थान आपला करणें त्याला कांहींच अवघड नव्हतें. परंतु तो नादच त्यानें सोडून दिला. विजय मिळाला असतांनाही ज्यानें युद्धकार्य पुढें चालू ठेवण्याचें सोडून दिलें, असा हा एकच एक लढाऊ राजा होय असें एच्. जी. वेल्सनें लिहिलें आहे.

मोठी भाग्याची गोष्ट ही आहे. कीं अशोकाला स्वतः याबद्दल काय वाटत होतें याबद्दल आणि त्यानें काय केलें याबद्दल त्यानें स्वतःच जें कांहीं लिहिलें आहे, तें आपल्याला आज उपलब्ध आहे. दगडांवर आणि धातूंवर कोरलेलीं त्याचीं अनेक आज्ञापत्रें सांपडलीं आहेत. आणि त्यांमधून आपल्या प्रजेला व त्यापुढील पिढ्यांना दिलेले त्याचे संदेश आपल्याला आज वाचावयास मिळत आहेत. अलाहाबादच्या किल्ल्यांत असा एक अशोकाचा स्तंभ आहे हें तुला माहीतच आहे. दुसरे असे पुष्कळ स्तंभ आपल्या प्रांतांत आहेत.

युद्धें आणि देश जिंकणें या पायीं होणाऱ्या मनुष्यवधामुळें आपल्याला किती शिसारी आली आणि केवढा पश्चात्ताप वाटला, हें या लेखांतून अशोकानें लिहिलें आहे. तो म्हणतो, "खरा जय फक्त एकच आहे—तो म्हणजे आपल्या आत्म्यावरील विजय आणि धर्माचा मनुष्याच्या अंतःकरणावरील विजय होय." परंतु असें कशाला!

त्यातील कांहीं लेखांचें भाषांतरच मी तुझ्यासाठीं देतों. वाचायलाही ते मोठे मौजेचे लेख आहेत; आणि त्यांमुळें अशोकाचा तुला जास्त निकट परिचय होईल.

एक लेख असा आहे : "राज्याभिषेक झाल्याला आठ वर्षे झालीं; त्या वेळीं पूज्यपाद महाराजाधिराजांनीं कलिंग देश जिंकला. दीड लक्ष लोक तेथून कैद करून आणण्यांत आले आणि दीड लक्ष लोक प्रत्यक्ष ठार करण्यांत आले. याहून किती तरी पट लोक तसेच मरण पावले.

"कलिंग देश आपल्या राज्यांत समाविष्ट केल्याच्या क्षणापासूनच पूज्यपाद महाराजांनीं सद्धर्माच्या रक्षणाचें कार्य सुरू केलें; तेव्हांपासूनच या धर्माबद्दल त्यांना भक्ति निर्माण झाली व त्या धर्माचा उपदेश लोकांच्या अंतःकरणांवर ठसविण्यासाठीं प्रचार करण्यास त्यांनीं सुरुवात केली. अशा प्रकारें कलिंग देश काबीज केल्याबद्दल महाराजाच्या चित्तांत अनुताप उत्पन्न झाला. कारण पूर्वी न जिंकलेला असा देश जिंकावयाचा म्हणजे त्यापायीं लोकाना ठार करावें लागतें, कितीक लोक त्यामुळें इतर रीतींनेंही मरण पावतात, आणि कितीकाना कैदी करून न्यावें लागतें. हा प्रकार महाराजांना अतिशय दुःखकारक आणि अनुतापकारक वाटतो."

कलिंगामध्यें जेवढे लोक मारले गेले किंवा कैद केले गेले, त्याच्या एक-हजारांश किंवा एक-लक्षांशसुद्धा लोक मारले जाणें किंवा कैद केले जाणें ही गोष्ट अशोकाला यापुढें तिळभर सहन होणार नाहीं, असें या लेखांत पुढें म्हटलें आहे. त्यानंतर पुढें असा मजकूर आहे :

"त्याखेरीज, जरी कोणीं आपला कांहीं अपराध केला, तरी तो सुद्धां पूज्यपाद महाराजांनीं जितका म्हणून सहन करणें शक्य आहे, तितका सहन केला पाहिजे. आपल्या राज्यातील जंगली लोकांकडेसुद्धां महाराज दयार्द्र दृष्टीनेंच बघतात आणि त्यांचे विचार शुद्ध व्हावेत अशासाठीं खटपट करतात. असें जर त्यांनीं न केलें, तर महाराजांना फारच पश्चात्ताप होईल. कारण महाराजांची अशी इच्छा आहे, कीं सर्व जीवमात्रांना सुरक्षितपणा, आत्मनिग्रह, चित्तशांति आणि आनंद हीं मिळणें आवश्यक आहे."

पुढें अशोकानें असें लिहिलें आहे, कीं सदाचार आणि ईश्वरभक्ति यांवर आधारलेल्या सद्धर्माचा मनुष्यांच्या चित्तावर विजय होणें हा खरा विजय होय. आणि आपल्या राज्यांतच नव्हे, तर दूरदूरच्या राज्यांतही हा विजय आपण मिळविला आहे, असें तो सांगतो.

या लेखामधून धर्म म्हणून ज्याचा पुनः पुनः उल्लेख करण्यांत आला आहे, तो बुद्धधर्म होय. अशोक हा अत्यंत कडवा बुद्धधर्मीय झाला होता व त्या धर्माचा प्रसार करण्यासाठीं त्यानें आपली पराकाष्ठा केली. पण त्यासाठीं त्यानें कोणावर सक्ती केली नाहीं किंवा जुलूम केला नाहीं. लोकांचीं हृदयें जिंकूनच केवळ त्यानें नव्या धर्माला अनुयायी मिळविण्याचा यत्न केला. जगामध्यें धार्मिक लोक हे अशोकाइतके सहिष्णु

असलेले क्वचित्–फारच क्वचित् आढळतील. आपापल्या धर्माला परधर्मातील अनुयायी मिळविण्यासाठीं बळजोरी, दंगेधोपे, अत्याचार आणि फसवणूक यांचा उपयोग करावयाला असे धार्मिक लोक यत्किंचित् मागेंपुढें पाहत नाहींत, असेंच नेहमीं आढळून येईल. सारा इतिहासच धार्मिक जुलूम आणि धार्मिक युद्धें यांनीं भरून गेलेला आढळून येतो; आणि इतर कोणाच्याही नांवानें झाला नसेल, इतका रक्तपात एका परमेश्वराच्या नांवानें झालेला आहे. अशा स्थितींत एका श्रेष्ठ हिंदपुत्रानें, स्वतः अतिशय तीव्र धर्मनिष्ठ असतांना आणि एका समर्थ साम्राज्याचें आधिपत्य स्वतःकडे असतांनाही, लोकांना आपल्या विचाराकडे–मताकडे–वळवून घेण्याच्या कामीं कोणत्या प्रकारचें आचरण केलें, हें खरोखरच मोठें लक्षांत घेण्यासारखें आहे. धर्म आणि श्रद्धा या गोष्टी तरवार किंवा बंदूक यांच्या जोगवर कोणाच्याही घशाखालीं उतरवितां येतील, असें मानण्याचा मूर्खपणा लोकांनीं करावा हें किती विस्मयकारक आहे!

म्हणून अशोकानें (लेखांमध्यें त्याला 'देवानाम् प्रिय' देवांचा आवडता असें म्हटलें आहे) पश्चिम आशिया, यूरप व आफ्रिका यांमधील राज्यांमध्यें या कार्यासाठीं आपले दूत व वकील पाठविले. तुझ्या लक्षांत असल, कीं सीलोनमध्यें तर त्यानें प्रत्यक्ष आपला भाऊ महेंद्र व बहीण संघमित्रा यांना पाठविलें होतें. त्यांनीं जातांना आपल्याबरोबर गयेमधील पवित्र अश्वत्थ वृक्षाची एक शाखा नेली होती म्हणतात. अनुरुद्धपुरांतील मंदिरामध्यें आपण जो अश्वत्थ वृक्ष पाहिला, तो आठवतो का तुला? त्यांनीं त्या प्राचीन काळीं नेलेल्या शाखेंतूनच हा वृक्ष निर्माण झाला, असें लोक सांगतात.

हिंदुस्थानांत बुद्धधर्माचा प्रसार अत्यंत त्वरेने झाला. अशोकाच्या दृष्टीनें धर्म म्हणज कांहीं निव्वळ पोकळ जपजाप्य, पूजाअर्चा आणि इतर संस्कार आणि कर्मकांड या गोष्टी नव्हत्या; तर सत्कार्य आणि समाजोन्नति यांना तो धर्म मानीत होता. त्यामुळें साऱ्या देशभर सार्वजनिक उद्यानें, रुग्णालयें, विहिरी आणि रस्ते निर्माण झाले. चार महान् विद्यापीठें उत्कर्ष पावलीं. एक उत्तरेकडे पेशावरनजिक तक्षशिला येथें; दुसरें मथुरा येथें (इंग्लिश लोक खुळ्यासारखें याचें स्पेलिंग Muttra असें करतात); मध्य हिंदुस्थान येथें उज्जयिनीस तिसरें; आणि बिहारमध्यें पाटण्याजवळ नालंदा येथें चौथें. या ठिकाणीं हिंदुस्थानांतलेच तेवढे विद्यार्थी येत असें नव्हे, तर त्यांच्या कीर्तीनें आकर्षित होऊन चीन, पश्चिम आशिया यांसारख्या दूरदूरच्या देशांतूनही तेथें विद्यार्थी येत. आणि हे विद्यार्थी परत जातांना बुद्धाच्या उपदेशाचा संदेश आपल्याबरोबर आपल्या घरीं घेऊन जात. साऱ्या देशभर मोठमोठे मठ स्थापन झाले. त्यांना विहार म्हणत. पाटलिपुत्राच्या म्हणजेच पाटण्याच्या आसपास या विहारांची संख्या बहुधा इतकी मोठी असली पाहिजे, कीं त्यामुळेंच त्या प्रदेशाचेंच नांव विहार असें पडून गेलें; आज त्याचेंच रूपांतर बिहार असें झालें आहे. परंतु नेहमींच्या परंपरेप्रमाणें याही मठांतील

शिक्षा व साधना यांच्यामुळें उत्पन्न होणारी स्फूर्तीची शक्ति लौकरच नाहींशी झाली आणि विशिष्ट कर्मकांड व पूजाअर्चाचा कोरडा घोष माजविण्याचीं स्थानेंच मात्र ते बनून गेले.

जीवरक्षणाबद्दलची अशोकाची तळमळ केवळ माणसापाशींच थांबली नाहीं, तर ती प्राणिमात्रापर्यंत जाऊन पोंचली होती. त्याच्या राज्यांत पशूंसाठीं म्हणून खास रुग्णालयें बांधण्यात आलीं होतीं; आणि पशुयज्ञ कायद्यानें बंद करण्यात आला होता. या दोन्ही बाबतींत तो आमच्या काळाच्याही बराच पुढें गेलेला होता. तथापि, पशुयज्ञ अजूनही या देशांत थोड्या प्रमाणांत आस्तित्वांत आहे; आणि पशूंच्या रोगराईवर उपचार करण्याची व्यवस्था जवळजवळ मुळींच शिल्लक राहिलेली नाहीं, ही खेदाची गोष्ट आहे.

बुद्धधर्माचा प्रसार आणि स्वतः अशोकाचें उदाहरण यांमुळें शाकाहार अधिकाधिक लोकप्रिय झाला. त्या काळापर्यंत हिंदुस्थानांत क्षत्रिय आणि ब्राह्मणसुद्धां मांसभक्षण करीत असत आणि दारू किंवा इतर मादक पेयें घेत असत. या वेळेपासून मांसभक्षण व मद्यपान पुष्कळच कमी झालें.

अशा रीतीनें अशोकानें अडतीस वर्षें राज्य करून शांततेनें लोकहित साधण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला. राज्याच्या ( सार्वजनिक ) कामासाठीं तो सदैव तयार असे. तो म्हणतो, " मी जेवत असो किंवा अंतःपुरांत असो, शयनागारांत असो किंवा एकांतस्थळीं असो, रथामधून मी कोठें जात असो किंवा राजवाड्याच्या आसपासच्या उद्यानामध्यें विहार करीत असो, मी कोठेंही असलों, किंवा वेळ कोणतीही असली, तरी प्रत्येक ठिकाणीं आणि प्रत्येक वेळीं सरकारी वार्ताहरांनीं लोकव्यवहाराबद्दलची मला सदैव माहिती देत राहिलेंच पाहिजे." कसलीही अडचण उत्पन्न झाली, कीं त्याची वर्दी तात्काळ दिलीच पाहिजे. मग " मी कोठेंही असो आणि वेळ कोणतीही असो." कारण तो म्हणतो, " लोकहितार्थ मला काम केलेंच पाहिजे."

खिस्तपूर्व २२६ या वर्षी अशोक मरण पावला. मृत्यूपूर्वी कांहीं काळ त्यानें बुद्धभिक्षूची दीक्षा घेतली होती.

मौर्यांच्या काळचे प्राचीन अवशेष आपल्याला हल्लीं फारच थोडे आढळून येतात. जे कांहीं अवशेष आढळून येतात, ते हिंदुस्थानांतील आर्यसंस्कृतीचे प्राचीनांतले प्राचीन असे उपलब्ध अवशेष आहेत. ( अर्थात् मोहेंजोदारो येथील भग्नावशेषांचा विचार हें लिहितांना आपण थोडा बाजूला ठेवला पाहिजे. ) उदाहरणार्थ, काशीजवळ सारनाथ येथें टोंकावर सिंहाचे पुतळे असलेला तो अशोकाचा स्तंभ आपल्याला पाहावयास सांपडतो. अशोकाची राजधानी जी महान् पाटलिपुत्र नगरी, तिच्यापैकीं आज कांहींही अंश शिल्लक उरलेला नाहीं. सुमारें १५०० वर्षांपूर्वी म्हणजे अशोकाच्या नंतर ६०० वर्षांनीं फाहिआन नांवाचा एक चिनी प्रवासी या शहरामध्यें येऊन गेल्याचा उल्लेख आढळतो. त्या काळीं मात्र हें शहर चागलें सुसंपन्न आणि भरभराटींत होतें. परंतु त्या

वेळीं सुद्धा अशोकाचा शिलाप्रासाद मोडून तोडून पडलेलाच होता. तथापि, त्या मोडक्या-तोडक्या राजवाड्याचेंसुद्धां फाहिआनला इतकें आश्चर्य वाटलें, कीं ही मानवी कृति नसली पाहिजे असें त्याबद्दल त्यानें आपल्या प्रवासवृत्तांत लिहिलें आहे.

भरभक्कम शिलांचा तो अशोकाचा राजप्रासाद आतां पार नाहींसा झाला आहे. एवढीसुद्धां कोठें त्याची खूण शिल्लक नाहीं! परंतु अशोकाची स्मृति मात्र साऱ्या आशिया खंडांत आजही जिवंत आहे; आणि त्याच्या लेखांमधील भाषा आजही आम्हांला चांगली कळूं शकते व त्याच्या विचारांचेंही आम्ही आदरानें ग्रहण करूं शकतों. एवढेंच नव्हे, तर आपल्याला त्यांतून शिकण्यासारखेंही पुष्कळ आहे. आतां हें पत्र फारच लांबलें. तुला कदाचित् त्यामुळें कंटाळा सुद्धां येईल. तेव्हां अशोकाच्या लेखांतून आणखी एक उतारा देऊन पत्र पुरें करतों. तो म्हणतो :

" कोणत्या ना कोणत्या कारणासाठीं सर्वच धर्मपंथ आदरणीय असतात. दुसऱ्या धर्मांबद्दल अशा रीतीनें आदर बाळगण्याच्या योगानें मनुष्य आपल्या पंथाची उन्नति साधतो आणि त्याच वेळीं इतरांच्या पंथालाही उन्नत करण्याला त्याचें साहाय्य होतें. "

## २५

# अशोकाच्या काळचें जग

*३१ मार्च, १९३२*

अशोक दूरदूरच्या देशांत आपले वकील व धर्मप्रचारक-मंडळें पाठवीत असे व त्याच्या काळीं हिंदुस्थान आणि हे देश यांच्यामध्यें अखंड दळणवळण व व्यापार चालू असे, हें आपण पाहिलें. परंतु हें दळणवळण व व्यापार यांसंबंधीं जेव्हां मी लिहितों, त्या वेळीं त्यांत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, कीं आजच्या काळीं ज्या प्रकारचें दळणवळण व व्यापार आहे त्यांसारख्या कांहीं यापूर्वीच्या काळच्या गोष्टी असणें शक्य नाहीं. आज व्यापाऱ्यांना किंवा इतरांनाही आगगाड्या, आगबोटी व विमानें यांच्यांतून वाटेल तिकडे जाणें हें फारच सोपें होऊन गेलेलें आहे. पण त्या अतिप्राचीन काळीं कोणचाही प्रवास म्हटला कीं त्याला फार दिवस लागावयाचे. जे कोणी तितकेच धडधाकट, काटक आणि धाडसी असतील तेच फक्त अशा प्रवासाला जाण्याचा विचार करूं शकत. त्यामुळें त्या काळचा व्यापार आणि आजचा व्यापार यांमध्यें तुलनाच करणें शक्य नाहीं.

अशोकानें ज्यांचा 'दूरदूरचे देश' म्हणून उल्लेख केला आहे, ते देश कोणते? त्याच्या काळीं जगाचें एकंदर स्वरूप किंवा कल्पना तरी काय होती? ईजिप्त किंवा भूमध्यसमुद्रालगतच्या किनाऱ्याचा भाग हे प्रदेश सोडले, तर त्या काळच्या

आफ्रिका खंडाबद्दल आपल्याला कांहींच माहिती नाहीं. उत्तर, मध्य किंवा पूर्व यूरपबद्दल आपल्याला फारच थोडी माहिती मिळते; तशीच उत्तर व मध्य आशिया-बद्दलही. अमेरिकेबद्दलही एवढीसुद्धां माहिती नाहीं; परंतु कितीक मंडळींची अशी कल्पना आहे, कीं दक्षिण व उत्तर या दोन्ही अमेरिकन खंडांत अत्यंत समृद्ध व पुढारलेल्या अशा संस्कृती अगदीं प्राचीन काळापासून नांदत असल्या पाहिजेत. तथापि पुष्कळच पुढच्या काळांत, इतिहासकालानंतर किती तरी शतकांनीं, ख्रिस्तानंतर पंधराव्या शतकांत, कोलंबसानें अमेरिकेचा 'शोध' लावला असें म्हटलें जातें. परंतु त्याच सुमारास दक्षिण अमेरिकेंतील पेरू देशांत व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत एक चांगली उच्च संस्कृति नांदत होती, हें आज आपल्याला ठाऊक आहे. त्यावरून असें म्हणतां येईल, कीं ख्रिस्ताच्या पूर्वी तीन शतकें हिंदुस्थानांत जेव्हां अशोकाचें राज्य होतें, त्या वेळीं अमेरिकेंत चांगले सुसंस्कृत लोक राहत असावे आणि त्यांच्यामध्यें चांगली सुसंघटित समाजव्यवस्थाही स्थापन झालेली असावी. परंतु त्याबद्दल प्रत्यक्ष पुरावा असा आज आपल्यापाशीं कांहीं नाहीं, आणि व्यर्थ नुसते तर्क करीत बसण्यापासून काहीं उपयोग नाहीं. ज्या देशांबद्दल आपण कांहीं वाचतों किंवा ऐकतों त्याच देशांत फक्त सुधारलेले लोक राहत आहेत अशी पुष्कळदां आपली समजूत होत असते; ती तितकीशी बरोबर नाहीं, एवढें दाखविण्यासाठींच फक्त या तर्कांचा मीं उल्लेख केला. पुष्कळ काळपर्यंत यूरपीय लोकांची तर कल्पना अशी असे, कीं प्राचीन इतिहास म्हणजे फक्त ग्रीक, रोमन व ज्यू लोक यांचाच इतिहास. त्यांच्या जुन्या समजुतीप्रमाणें बाकीचें सगळें जग म्हणजे त्या काळीं निर्जन अरण्य मात्र होतें. पुढें मग त्यांच्यामधीलच विद्वानांनीं आणि पुराण-वस्तुसंशोधकांनीं हिंदुस्थान आणि चीन आणि इतरही देश याच्याबद्दल लिहिण्यास सुरुवात केली. त्या वेळीं आपलें पूर्वीचें ज्ञान किती कोतें आहे हें त्यांना आढळून आलें. म्हणून आपणही नेहमीं सावध असलें पाहिजे; आणि आज जें आपलें कांहीं मर्यादित ज्ञान आहे त्यांत आपल्या या जगांत जें जें कांहीं घडलें त्या सर्वांचा समावेश झालेला आहे, अशी आपण आपली समजूत करून घेतां कामा नये.

हें लक्षांत ठेवून सामान्यतः सध्यांपुरतें आपणांला असें म्हणतां येईल, कीं अशोकाच्या काळीं म्हणजे ख्रिस्ताच्या पूर्वीं तिसऱ्या शतकांत प्राचीन सुधारलेलें जग म्हणजे यूरप आणि आफ्रिका यांमधील मुख्यतः भूमध्यसमुद्रालगतचे देश, पश्चिम आशिया, चीन आणि हिंदुस्थान एवढे प्रदेश होत. त्या काळीं चीनच्या पश्चिमेकडील देशांशीं, नव्हे, खुद्द पश्चिम आशियाशीं सुद्धां, थोड्याफार अंशीं संबंध तुटून गेला होता. आणि पश्चिमेकडील देशांत चीन किंवा कॅथे यांच्याबद्दल कांहींच्या बाहीच चमत्कारिक कल्पना पसरलेल्या होत्या. चीन आणि पश्चिमेकडील प्रदेश यांच्यामधील दुवा त्या वेळीं हिंदुस्थान असावा असें दिसतें.

आपण पाहिलेंच आहे, कीं ॲलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याच्या सेनापतींनीं त्याचें साम्राज्य आपसांत वांटून घेतलें. यांत तीन हिस्से प्रमुख होते : एक सेल्युकसच्या




अमलाखालील पश्चिम आशिया, इराण व मेसापोटेमिया हा भाग ; दुसरा टॉलेमीच्या नियंत्रणाखालील ईजिप्त देश; आणि ॲंटिगॉनसच्या अमलाखालील मॅसिडोनियाचा भाग हा तिसरा. यांपैकीं पहिलीं दोन राज्यें पुष्कळ काळपर्यंत टिकलीं. सेल्युकस हा हिंदुस्थानचा शेजारी होता; आणि हिंदुस्थानचा कांहीं भाग आपल्या साम्राज्याला जोडण्याचा लोभही त्याला सुटला होता, हे तुला आठवतच असेल. परंतु त्याला चंद्रगुप्त हा आपल्याहूनही प्रबळ असा प्रतिस्पर्धी भेटला. त्यानें सेल्युकसला हांकलून लावलें. एवढेंच नव्हे, तर आजच्या अफगाणिस्तानपैकीं कांहीं भागही आपल्याला देण्यास त्यानें सेल्युकसला भाग पाडलें.

मॅसिडोनियाच्या राज्याला मात्र यांच्याइतकें दैव फारसें अनुकूल नव्हतें. त्याच्यावर उत्तरेकडून गॉल व इतर लोकांकडून हल्ले झाले आणि सगळ्या राज्यापैकीं थोडासा भागच मात्र या हल्ल्याला तोंड देऊन टिकून राहूं शकला; त्याचेंच तेवढें स्वातंत्र्य कायम

राहिलें. हा भाग म्हणजे आशिया मायनरमधील पेर्गामम हा प्रांत; याच ठिकाणीं सध्यां तुर्कस्तान देश वसलेला आहे. सुरुवातीला हें एक छोटेंसेंच ग्रीक राज्य होतें. तरी पण शंभर वर्षांहून अधिक काळपर्यंत तेथें ग्रीक संस्कृति व कला याची चांगलीच जोपासना व वाढ झाली, आणि तेथें सुंदर इमारती बांधल्या गेल्या. थोड्याफार प्रमाणांत समुद्रापलीकडील अलेक्झांड्रियाच्या वैभवाशीं स्पर्धा करण्याइतकें वैभव या राज्याला प्राप्त झालें होतें.

ईजिप्तमधील टॉलेमीच्या राज्याची राजधानी म्हणजे अलेक्झांड्रिया हें शहर. हें शहर फार श्रेष्ठ झालें; प्राचीन जगांत मोठेंच प्रसिद्धीला आलें. या सुमारास अथेन्सचें वैभव व कीर्ति फारच खालावली होती; ग्रीक लोकांचें संस्कृतीचें केंद्रस्थान म्हणून जें अथेन्सचें मानाचें स्थान तें हळूहळू अलेक्झांड्रियाला प्राप्त झालें. तेथील तें प्रचंड ग्रंथसंग्रहालय आणि पदार्थसंग्रहालय यांच्या आकर्षणामुळें तेथें दूरदूरच्या देशांतून पुष्कळच विद्यार्थी येत; आणि तेथें तत्त्वज्ञान, गणित, धर्म आणि त्या प्राचीन काळच्या लोकांच्या मनांत खळबळत असलेले अनेक प्रश्न यांबद्दलच्या चर्चा ते करीत. तुम्हां शाळेंत जाणाऱ्या सर्व मुलांमुलींना युक्लिडचें नांव माहीत झालेलें असतें. हा युक्लिड अशोकाचा समकालीन असून या अलेक्झांड्रिया शहराचाच रहिवासी होता.

टॉलेमीचे लोक हे खरोखरच ग्रीक लोक होते, हें तुला ठाऊक आहे. परंतु त्यांनीं ईजिप्शियन लोकांच्या पुष्कळ रीतीभाती उचलल्या. ईजिप्तचे कितीएक प्राचीन देवसुद्धां त्यांनीं आपल्यामध्यें समाविष्ट केले. महाभारतामध्यें जसे वैदिक वाङ्मयांतील देव आपल्याला आढळतात, तसेंच होमरच्या महाकाव्यामध्यें पण ज्युपिटर, अपोलो आणि ग्रीकांच्या इतर प्राचीन देवदेवता पुनः पुनः येतांना आढळतात. पण या सर्व देवतांचा टॉलेमियन लोकांमध्यें लोप तरी झाला किंवा आपलें नामरूप बदलून त्यांना त्यांच्यामध्यें राहावें लागलें. प्राचीन ईजिप्तमधील देवदेवता – उदाहरणार्थ, इसिस, ओसिरिस आणि होरस – आणि ग्रीसच्या प्राचीन देवदेवता यांची सरभेसळ झाली, गल्लत झाली; एकमेकांचा एकमेकांमध्यें अंतर्भावही झाला; आणि त्यांमधून लोकांपुढें पूजनासाठीं नवेच देव पुढें आले. आपण कोणापुढें डोकें वांकवितों किंवा कोणाची पूजा करतों किंवा त्याचें नांव काय, याची त्या लोकांना कोठें मोठीशी फिकीर होती? पूजा करायला कांहीं तरी पुढें असलें म्हणजे त्यांना पुरें होतें! या नव्या देवांपैकीं सगळ्यांत अधिक प्रसिद्धीस आलेल्या देवाचें नांव सेरॅपिस हें होय.

अलेक्झांड्रिया शहर हें व्यापाराचेंही फार मोठें केंद्र होतें आणि जगामधील सुसंस्कृत अशा इतर सर्व देशांतून तेथें व्यापारी येत असत. अलेक्झांड्रियामध्यें हिंदी व्यापाऱ्यांची एक वसाहतच होती म्हणतात. तसेंच अलेक्झांड्रियांतील व्यापाऱ्यांचीही एक वसाहत दक्षिण हिंदुस्थानांत मलबारच्या किनाऱ्यावर होती, हेंही आतां सिद्ध झालें आहे.

ईजिप्तपासून जवळच समुद्राच्या पलीकडे रोमचें शहर व राज्य होतें. या

सुमारासही तें पुष्कळ श्रेष्ठ दर्जाला पोंचलें होतें; आणि याहूनही पुष्कळ श्रेष्ठ, समर्थ असें होण्याचीं बीजें त्यांत एव्हांना निर्माण झालीं होतीं. त्याच्या समोरच्या बाजूला रोमचें प्रतिस्पर्धी व शत्रु असलेलें असें कार्थेजचें राज्य होतें. प्राचीन जगताची नीटशी कल्पना करून घ्यावयाची, म्हणजे आपल्याला या दोहोंचा वृत्तांत थोडासा विस्तारपूर्वक पाहिला पाहिजे.

पश्चिमेकडील रोमचें श्रेष्ठत्व जसें वाढत होतें, तसेंच या सुमारास इकडे पूर्वेकडे चीनचें महत्त्व वाढत होतें; आणि अशोकाच्या काळच्या जगाचें संपूर्ण आणि यथायोग्य चित्र डोळयांपुढें यावयाचें, तर चीनचाही आपल्याला विचार केला पाहिजे.

## २६

## चिन व हान घराणीं

*३ एप्रिल, १९३२*

गेल्या वर्षी नैनीच्या तुरुंगांतून तुला मीं पत्रें लिहिलीं. त्यामध्यें चीनच्या सुरुवातीच्या काळचा वृत्तांत थोडासा मीं तुला लिहिला होता. व्हांग नदीवर झालेल्या प्राथमिक वसाहती, अगदीं प्राचीन काळचे शिया, शँग उर्फ यिन आणि चौ हे राजवंश, यांबद्दल आणि या राजवंशांच्या मोठमोठ्या दीर्घकालीन राजवटींमध्यें एक मध्यवर्ती राज्यसत्ता चीनमध्यें कशी वाढत गेली, याबद्दल उल्लेख मीं केला होता. त्यानंतर एक बराच मोठा कालखंड असा गेला, कीं राज्य अजून नांवाला जरी चौ घराण्याचेंच चालू होतें, तथापि राज्यसत्तेचें केंद्रीकरण होण्याची क्रिया मात्र थांबली होती आणि देशांत गैरव्यवस्था माजूं लागली होती. या काळांत एका एका स्थानिक विभागांतील छोटे छोटे राज्यकर्ते हे जवळजवळ स्वतंत्रच झाले आणि एकमेकांशीं भांडूं लागले. ही खेदकारक अवस्था शेंकडों वर्षांपर्यंत चालूच राहिली. चीनमध्यें जणुं कांहीं प्रत्येक गोष्ट हजार हजार वर्षे चालू राहावयाची असा नियमच दिसतो. शेवटीं एकदां या स्थानिक राज्यकर्त्यांपैकीं चिन प्रांताच्या सरदारानें अत्यंत निःसत्त्व झालेल्या चौ राजवंशाला हुसकून लावलें. या सरदाराच्या घराण्यालाच चिन राजवंश हें नांव प्राप्त झालें आणि या चिनपासूनच चीन देशाचें नांव निर्माण झालेलें आहे.

चिन घराण्याच्या अमलाला चीनमध्यें अशा रीतीनें खिस्तपूर्व २५५ या वर्षी सुरुवात झाली. याच्यापूर्वी तेरा वर्षें अशोकाची कारकीर्द सुरू झाली होती. तेव्हां अशा रीतीनें आपण चीनमधील अशोकाच्या समकालीन लोकाचाच विचार करीत आहों. चिन घराण्यांतील पहिल्या तीन राजांच्या कारकीर्दी फारच अल्पकालीन झाल्या. त्यानंतर खिस्तपूर्व २४६ या वर्षी त्यांच्यापैकीं चौथा राजा गादीवर

आला. हा मनुष्य आपल्यापरी एक मोठा विशेष प्रकारचा मनुष्य होता. त्याचें मूळचें नांव वांग चेंग हें होतें. परंतु पुढें त्यानें तें बदलून 'शी व्हांग टी' असें नांव धारण केलें. या नांवाचा अर्थ 'पहिला बादशहा' असा आहे आणि याच नांवानें सामान्यतः लोक त्याला ओळखीत आले आहेत. आपल्या स्वतःबद्दल व स्वतःच्या काळाबद्दल त्याला विशेष अभिमान असला पाहिजे, असें दिसतें; आणि भूतकाळाबद्दल त्याला मुळींच आदर नव्हता. फार काय, पण लोकांनीं भूतकाळ अजीबात विसरून जावा आणि इतिहासाची सुरुवात पहिल्या बादशहाच्या काळापासून म्हणजे स्वतःच्या राज्या-पासून झाली असें मानावें, अशी त्याची इच्छा होती. त्याच्याआधीं एकामागून एक अशा पुष्कळ बादशहांची दोन हजार वर्षांहून अधिक काळपर्यंत चालत आलेली दीर्घ परंपरा देशांत होऊन गेलेली होती, या गोष्टीची त्याला कांहींच किंमत नव्हती. त्यांची स्मृतीसुद्धां साऱ्या देशांतून त्याच्या मनांतून पार पुसून टाकावयाची होती. या प्राचीन बादशहांचीच काय, पण स्वतःपूर्वी होऊन गेलेल्या सगळ्या श्रेष्ठ पुरुषांची स्मृतीसुद्धां नाहींशी व्हावी, असा त्याचा प्रयत्न होता. म्हणून राजेसाहेबांचा हुकूम जारी झाला, कीं भूतकालचा वृत्तात ग्रथित करणारे सर्व ग्रंथ, विशेषतः इतिहासाचे ग्रंथ आणि कॉन्फ्यूशियसचे घरोघरीं पूजिले जाणारे महान् ग्रंथ, हे सर्व पार जाळून नष्ट करून टाकावयाचे. वैद्यकशास्त्रासंबंधीं पुस्तकें आणि कांहीं शास्त्रीय पुस्तकें याच्यापुरता काय तो थोडा त्यानें अपवाद केला होता. त्याच्या आज्ञेंत म्हटलें होतें:—

"आधुनिक काळाचें कमीपण दाखविण्याकरितां म्हणून जे कोणी भूतकाळाचा उपयोग करतील, त्यांना आणि त्यांच्या नातेवाइकांना ठार करण्यांत येईल."

आणि हें आपलें म्हणणे त्यानें प्रत्यक्ष खरें करून दाखविलें. आपले ग्रंथ दडवून ठेवण्याचा ज्यांनीं प्रयत्न केला अशा शेंकडों विद्वान् लोकांना जिवंत पुरण्यांत आलें. तेव्हां हा पहिला बादशहा केवढा सज्जन, दयार्द्र अंतःकरणाचा आणि गोड स्वभावाचा असला पाहिजे, नाहीं? तथापि हिंदुस्थानच्या प्राचीन काळची अवास्तव स्तुति करतांना मीं कोणाला पाहिलें, म्हणजे नेहमीं मला या पहिल्या बादशहाची आठवण येते आणि त्यानें जें केलें तें कांहीं अगदींच चुकलें नसावें, असें मला वाटूं लागतें. आमच्यांतल्या कांहीं लोकांची नजर सदासर्वकाळ भूतकाळाकडे वळलेली असते; त्या काळच्या मोठेपणाचेच पवाडे ते सर्वदा गात असतात आणि त्यांतून आपल्याला कांहीं प्रेरणा मिळावी अशी ते सदैव धडपड करीत असतात. भूतकाळांत आपल्याला महत्कार्यें करण्याची स्फूर्ति देण्यासारखें खरोखर कांहीं असेल, तर तशी स्फूर्ति त्यापासून जरूर घ्यावी. परंतु कोणाही व्यक्तीनें अथवा देशानें वेळीं-अवेळीं एकसारखें भूतकाळाकडेच डोळे लावून बसावें, हें कांहीं मला हितकारक वाटत नाहीं. कोणी तरी म्हटलें आहे, कीं मनुष्यानें मागच्या चालीनें चालावें किंवा नित्य मागच्या बाजूलाच पाहावें अशी गरज असती, तर त्याचे डोळे त्याच्या मागच्याच बाजूला आले असते. तेव्हां आपण आपल्या भूतकालीन इतिहासाचा जरूर अभ्यास करावा; त्याच्यामध्यें प्रशंसनीय

असें जें कांहीं असेल त्याची प्रशंसा करावी; परंतु आपली दृष्टि मात्र नेहमीं पुढच्या काळावर असली पाहिजे आणि पायही पुढच्या दिशेनें चालत राहिले पाहिजेत.

शी व्हांग टीनें जुने ग्रंथ जाळून नष्ट केले, किंवा ते ग्रंथ वाचणारांना जाळून किंवा पुरून टाकलें, हें त्याचें करणें अगदीं रानटीपणाचें होय, यांत कांहींच संशय नाहीं. याचा एक परिणाम असा झाला, कीं त्यानें जें जें कांहीं करून ठेवलें त्या सगळ्याचा त्याच्याबरोबरच अंत झाला. तो आपल्याला पहिला बादशहा म्हणवीत होता; आणि आपल्यापाठीमागून दुसरा, तिसरा, चौथा अशा बादशहांची अनंत काळपर्यंत परंपरा चालावी, असा त्याचा हेतु होता. परंतु झालें असें, कीं चिन घराण्याची आमदानी ही चीनमधील सर्व राजघराण्यांपेक्षां अतिशय अल्पकालीन ठरली. मीं मागें सांगितलेंच तुला, कीं यांतलीं कित्येक घराणीं शतकानुशतकें राज्य करून गेलीं. चिन घराण्याच्या पूर्वींच्याच घराण्याचें राज्य तर ८६७ वर्षेपर्यंत चाललें. परंतु हें महान् चिन घराणें मात्र उदयास आलें, उत्कर्षाला चढलें, आणि एक मोठें समर्थ साम्राज्य संघटित करून त्यावर त्यानें अमलही चालविला, तें ऱ्हास पावूं लागलें आणि नष्ट झालें वगैरे हा सगळा कारभार अवघ्या पन्नास वर्षांत आटपून गेला! शी व्हांग टीच्या मनांतून आपण महान् समर्थ अशा सम्राटांच्या एका दीर्घकालीन परंपरेचा जनक व्हावें असें होतें. परंतु तो मेल्यानंतर तीनच वर्षांनीं, ख्रिस्तपूर्व २०९ या वर्षी त्याचें घराणें नष्ट झालें आणि त्यानें केलेले सर्व सायास व्यर्थ होऊन ताबडतोब कॉन्फ्यूशिअसचे पुरून ठेवलेले ग्रंथ भराभर उकरून बाहेर काढण्यांत आले आणि पुन्हां त्यांना पहिल्याइतकेंच मानाचें स्थान प्राप्त झालें.

राज्यकर्ता या दृष्टीनें शी व्हांग टी हा चीनच्या राज्यकर्त्यांमध्यें अत्यंत बलिष्ठ राज्यकर्ता होऊन गेला. असंख्य स्थानिक सरदार-दरकदारांनीं, राज्याधिकाऱ्यांनीं आपण स्वतंत्र राजे आहोंत, असें जें बंड माजविलें होतें तें त्यानें पार मोडून काढलें आणि सरंजामशाही नष्ट करून एक प्रबळ मध्यवर्ती सत्ता प्रस्थापित केली. सबंध चीन देश आणि पलीकडील आनाम (आतां व्हाएटनाम) प्रांतसुद्धां त्यानें काबीज केला. चीनमधील प्रचंड भिंत बांधविण्यास त्यानेंच सुरुवात केली. हें फार खर्चाचें काम होतें. परंतु परकीय शत्रूपासून संरक्षण करण्यासाठीं कायमचें मोठें सैन्य ठेवून त्याचा नित्य खर्च चालविण्यापेक्षां अशी भिंत बांधण्याचा खर्चच बरा, असें चिनी लोकांना वाटलें. या भिंतीमुळेंच शत्रूपासून पुरेसें संरक्षण होईल, असें त्यांना वाटत होतें. परंतु मोठमोठ्या स्वाऱ्यांना कांहीं ही भिंत प्रतिबंध करूं शकली नाहीं. छोट्या छोट्या हल्ल्यांनाच फार तर अटकाव करण्याला तिचा उपयोग झाला. पण यावरून एक गोष्ट दिसते, कीं चिनी लोक हे शांतताप्रिय लोक होते; आणि स्वतः सामर्थ्यवान् असूनही लष्करी विजय आणि ऐश्वर्य यांची त्यांना आवड नव्हती.

शी व्हांग टी—पहिला बादशहा—मेल्यानंतर त्याच्यापाठीमागून त्याच्या घराण्यांतला कोणी गादीवर आलाच नाहीं, असें म्हटलें तरीसुद्धां चालेल. पण त्याच्या काळापासून चीनच्या एकराष्ट्रीयत्वाची परंपरा मात्र कायमची सुरू झाली.

यानंतर आणखी एक घराणें चीनच्या रंगभूमीवर आलें. तें म्हणजे हान घराणें. या घराण्याचेंच राज्य ४०० वर्षें चांगलें भरभराटलें. आणि विशेष म्हणजे त्यामध्यें एका स्त्रीनें राज्यपद उपभोगलें. या वंशांतला सहावा राजा वू टी हा होता. हाही चीनच्या इतिहासांत एक अतिशय बलाढ्य व सुप्रसिद्ध राज्यकर्ता होऊन गेला. पन्नासाहूनही अधिक वर्षें त्यानें राज्य केलें. उत्तरेकडील तार्तार लोक चीनवर नेहमीं स्वाऱ्या करीत असत. त्यांचा यानें पराभव केला. पूर्वेकडे कोरियापासून तों पश्चिमेकडे थेट कॅस्पियन समुद्रापर्यंत या बादशहाचा अमल अबाधितपणें चालू होता; आणि मध्य आशियांतील अर्धवट स्वतंत्र टोळ्या त्यालाच आपला अधिराजा मानीत. आशियाचा नकाशा नीट पाहिलास, तर ख्रिस्तपूर्व पहिल्या आणि दुसऱ्या शतकांत चीनचें सामर्थ्य किती प्रचंड असलें पाहिजे आणि या बादशहाचें राज्य किती अफाट प्रदेशावर पसरलेलें होतें, याची तुला कल्पना येईल. याच काळांतील रोमन साम्राज्याच्या श्रेष्ठत्वाबद्दल किती तरी पवाडे लिहिलेले आपण पाहतों. रोमच्या श्रेष्ठत्वाच्या तेजाखालीं सर्व जगाचें तेज लुप्त होऊन गेलें होतें, अशी माणसाची पुष्कळदां समजूत होऊन जाते. "जगताची स्वामिनी" असें नांव रोमनगरीला देण्यात आलें होतें. परंतु रोम हें त्या काळीं पुष्कळच मोठें राज्य होतें आणि तें आणखी वाढत होतें हें खरें असलें, तरी चीनचें साम्राज्य त्यापेक्षां विस्तारानें किती तरी प्रमाणांत अफाट आणि पुष्कळच श्रेष्ठ असें होतें.

या वू टीच्या अमदानींतच बहुधा रोम आणि चीन यांचे परस्परांशीं संबंध जडले. आज आपण ज्यांना इराण आणि मेसापोटेमिया म्हणतों त्या प्रदेशांत त्या काळीं पार्थियन लोकांची वसाहत होती; त्यांच्यामार्फत या दोन देशांमध्यें व्यापार-उदीम होत असे. पुढें रोम आणि पार्थिया यांच्यामध्यें युद्ध झालें तेव्हां हा व्यापार बंद झाला. म्हणून रोमनें समुद्राच्या मार्गानें व्यापार सुरू करण्याचा प्रयत्न केला आणि एक रोमन जहाज प्रत्यक्ष चीनपर्यंत आलेंही. पण ही ख्रिस्तानंतर दुसऱ्या शतकांतील गोष्ट. सध्यां अजून आपण ख्रिस्तपूर्वकाळांतच वावरत आहोंत.

हान घराण्याच्या आमदानींतच चीनमध्यें बुद्धधर्माचा प्रवेश झाला. ख्रिस्ताच्या पूर्वींच चीनमध्यें बुद्धधर्माचें वळण थोडें थोडें पडूं लागलें होतें, परंतु त्याचा प्रसार मात्र पुढें पुष्कळ काळानंतर झाला. त्याबद्दल अशी एक दंतकथा आहे, कीं तत्कालीन एका बादशहाला एक आश्चर्यकारक स्वप्न पडलें; त्यांत त्याला १६ फूट उंचीचा एक मनुष्य दिसला; त्याच्या मस्तकाभोंवतीं तेजोवलय होतें; हें दर्शन त्याला पश्चिमेच्या दिशेस झालें; म्हणून जागें झाल्यानंतर त्या बाजूला त्यानें शोधार्थ दूत पाठविले. हे दूत एक बुद्धाची मूर्ति व त्याचे ग्रंथ घेऊन परत आले. आणि तेव्हांपासून बुद्धधर्माचा प्रचार सुरू झाला. बुद्धधर्माबरोबर हिंदी कलेचेंही वर्चस्व चीनमध्यें सुरू झालें; आणि चीन-मधून कोरियापर्यंत आणि तेथून जपानमध्येंही तें पसरलें.

हान घराण्याच्या आमदानींतील आणखी दोन घटना लक्षांत ठेवण्यासारख्या

आहेत : एक म्हणजे त्या वेळींच लांकडी ठशावरून छापण्याच्या कलेचा शोध लागला; परंतु त्यानंतर पुढें सुमारें १००० वर्षेपर्यंत या शोधाचा प्रत्यक्षांत फारसा उपयोग करण्यांत आला नाहीं; पण उपयोग करण्यांत येऊं लागला तो काळ पाहिला, तरी छपाईच्या बाबतींत चीननें युरोपवर ५०० वर्षांची आघाडी मारलेली दिसते.

दुसरी विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे सरकारी अमलदारांसाठीं—नोकरांसाठीं—एका परीक्षेच्या पद्धतीची झालेली संस्थापना. मुलांमुलींना परीक्षांची कांहीं आवड नसते; आणि माझ्या मतानें यांत त्यांची कांहीं फारशी चूक नाहीं. पण त्या काळच्या मानानें पाहतां सरकारी अमलदारांची निवड करण्याची ही चिनी व्यवस्था विशेष महत्त्वाची समजली पाहिजे. इतर देशांत अलीकडच्या काळापर्यंत अमलदारांची नेमणूक व्हायची ती म्हणजे मुख्यतः वशिलेबाजीनें; नाहीं तर एखाद्या विशिष्ट जातीला किंवा वर्गाला ही मिरास दिलेली असावयाची. चीनमध्यें परीक्षा पास होईल त्याला नेमणूक मिळावयाची. मग तो कोणीही असो. ही कांहीं मोठी आदर्श व्यवस्था आहे असें नव्हे. कारण परीक्षा द्यायची कशाबद्दल? तर कॉन्फ्यूशियसच्या ग्रंथांबद्दल. आणि एखादा मनुष्य ही परीक्षा चांगली पास झाला असें धरलें, तरी तेवढ्यानें म्हणजे तो मोठा चांगला सरकारी अमलदार होईल असें कांहीं नव्हे. परंतु वशिलेबाजी किंवा जातीची मिरासदारी, अशांसारख्या व्यवस्थेपेक्षां ही व्यवस्था किती तरी पटीनें चांगली म्हटली पाहिजे. सुमारें २००० वर्षेपर्यंत चीनमध्यें ही व्यवस्था चालू राहिली. आतां अलीकडे नुकतीच ती रद्द करण्यात आलेली आहे.

## २७

## रोम विरुद्ध कार्थेज

५ एप्रिल, १९३२

अतिपूर्वेकडून आतां आपण पश्चिमेकडे जाऊं आणि रोमच्या वाढीचें चित्र रेखाटूं. ख्रिस्तपूर्व आठव्या शतकांत रोम नगरीची प्रस्थापना झाली असें म्हणतात. हे अति-प्राचीन रोमन लोक बहुतेक आर्यवंशाचेच होते. टायबर नदीच्या आसपासच्या सात टेंकड्यांवर ते अधून मधून वसाहत करून राहिले होते. या वसाहतींतून पुढें रोम नगरी निर्माण झाली. आणि या नगर-राज्याचा विस्तार व सामर्थ्य वाढत वाढत इटलीचें थेट दक्षिणेचें सिसिली बेटाच्या समोरचें जें मेसिनाचें टोंक तेथपर्यंत तें जाऊन पोंचलें.

ग्रीकांचीं नगर-राज्यें तुझ्या आठवणींत असतील. जेथें जेथें हे ग्रीक गेले, तेथें तेथें त्यांनीं आपली नगर-राज्याची कल्पना आपल्याबरोबर नेली. त्यामुळें साऱ्या भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर ग्रीक वसाहती व ग्रीक नगर-राज्यें बारीक बारीक

ठिपक्यांसारखीं पसरून गेलीं. परंतु आतां रोममध्यें आपल्यापुढें अगदींच वेगळा प्रकार दिसून येतो. सुरुवातीला रोमचें स्वरूपही या ग्रीक नगर-राज्यांहून फारसें निराळें नव्हतें. परंतु आसपासच्या टोळयांचा पराभव करीत करीत तें लौकरच विस्तार पावलें. अशा रीतीनें रोमन राज्याचा प्रांत वाढत जाऊन इटलीचा बहुतेक भाग त्यामध्यें समाविष्ट झाला. एवढ्या मोठ्या प्रदेशाचें एक नगर-राज्य होणें शक्यच नव्हतें. या सगळयाचा कारभार रोममधून होई आणि खुद्द रोममध्यें तर एक कांहीं वेगळीच राज्यव्यवस्थेची तऱ्हा होती. तिच्यामध्यें कोणी मोठा बादशहा नव्हता, किंवा राजाही नव्हता; परंतु आधुनिक पद्धतीप्रमाणें तें लोकसत्ताक राज्यही नव्हतें. तथापि त्याला एक प्रकारचें लोकराज्यच म्हटलें पाहिजे. मात्र त्या-मध्यें जमीनदार-वर्गापैकीं थोड्याशा श्रीमान् घराण्यांचें विशेष वर्चस्व असे. राज्यकारभार सीनेट नांवाच्या सभेनें करावयाचा असा संकेत होता; दोन लोकनियुक्त ‘कॉन्सल्स’ म्हणून असत, ते त्या सीनेटची नेमणूक करीत असत. पुष्कळ काळपर्यंत वरिष्ठ वर्गीय लोकच फक्त सीनेटचे सभासद होऊं शकत. रोमन प्रजेचे दोन वर्ग केलेले होते. एक पॅट्रिशियन म्हणजे श्रीमान्, वरिष्ठ वर्गीय व सामान्यतः जमीन-मालक लोक; आणि दुसरे प्लीबियन म्हणजे बाकीची सामान्य जनता. रोमच्या राज्याचा किंवा लोक-राज्याचा म्हणा, कित्येक शतकांचा इतिहास म्हणजे या दोन वर्गांतील आपसांतील झगड्यांचाच वृत्तांत होय. पॅट्रिशियन लोकांच्या हातांत सारी सत्ता असायची. सत्ते-बरोबर संपत्ति आलीच; आणि प्लीबियन किंवा प्लीब लोक म्हणजे केवळ जी-हुकूमवाले. त्यांना कसलीही सत्ता नाहीं किंवा संपत्ति नाहीं. प्लीबियन लोकांनीं सत्तेसाठीं पुष्कळ झगडा केला आणि हळूहळू त्यांच्या तोंडांवर कांहीं कांहीं तुकडे पण पडत गेले. या त्याच्या दीर्घकालीन झगड्यांमध्ये प्लीब लोकांनीं एक प्रकारच्या असहकारितेचा अवलंब केला होता, हें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. सगळयांनीं मिळून रोम शहर सोडलें व जवळच एक नवीन शहर वसविलें. यामुळें पॅट्रिशियन लोक फार भयभीत झाले; त्यांची फार तारांबळ उडाली. प्लीबियन लोकांशिवाय त्यांचा कोणताच व्यवहार चालण्या-सारखा नव्हता. म्हणून त्यानीं प्लीबांशीं तडजोड केली, आणि त्यांना कांहीं थोडेसे अधिकार दिले. हळूहळू प्लीबियन लोकांना मोठ्या अधिकाराच्या जागा मिळूं लागल्या व सीनेटचे सभासदही होणें त्यांना शक्य झालें.

आपण विचार करतों तो नेहमीं या पॅट्रिशियन व प्लीबियन यांच्यामधील तंट्यांचा. त्यामुळें यावांचून कोणाचा कांहीं या काळच्या इतिहासांत संबंधच नव्हता, अशी पुष्कळदां आपली समजूत होऊन जाते. परंतु या दोन वर्गांखेरीज रोममध्यें अत्यंत प्रचंड संख्येचा असा तिसरा एक वर्ग होता. तो म्हणजे गुलामांचा. यांना तर कसल्याच प्रकारचे हक्क नव्हते. नागरिक म्हणून त्यांना समजतच नसत; मतदानाचा हक्क त्यांना नव्हता. हे गुलाम म्हणजे गायी किंवा कुत्रे यांच्याप्रमाणें त्यांच्या मालकांची निव्वळ खाजगी मालमत्ताच असत. त्यांची खरेदी-विक्री होत असे आणि मालक

आपल्या लहरीला येईल ती शिक्षा त्यांना करूं शकत असत. कांहीं कांहीं शर्तींवर त्यांना स्वतंत्रही होतां येत असे. अशा स्वतंत्र झालेल्या गुलामांचा आणखी एक चौथा वर्ग रोमन समाजांत असे. यांना फ्रीड मेन किंवा मुक्त मानव असें म्हणत. प्राचीन काळीं पश्चिमेकडे गुलामांना फार मोठी मागणी होती. त्यामुळें गुलामांच्या प्रचंड बाजारपेठाच निर्माण झाल्या आणि स्त्रीपुरुषांना आणि मुलांना सुद्धां गुलाम म्हणून पकडून आणण्यासाठीं व विकण्यासाठीं लोक बाहेरदेशांवर स्वाऱ्या करून जाऊं लागले. प्राचीन ग्रीस व रोम यांना आणि प्राचीन इजिप्तलासुद्धां जें वैभव आणि राजैश्वर्य प्राप्त झालें, तें अत्यंत विस्तृत प्रमाणावर पसरलेल्या या गुलामगिरीच्या पायावरच उभारलेलें होतें.

ही गुलामगिरीची पद्धत त्या काळीं हिंदुस्थानांतही अशीच प्रचारांत होती का? बहुतांशीं नसावी. चीनमध्येंही ती नव्हती. याचा अर्थ प्राचीन काळीं चीनमध्यें किंवा हिंदुस्थानांत कसल्याच प्रकारची गुलामगिरी नव्हती असा नव्हे. पण जी होती ती थोड्याफार प्रमाणांत घरगुती गरजांपुरतीच होती. कांहीं घरगुती नोकरांना गुलाम म्हणून समजलें जात असे. इतर बाहेरच्या कामासही मजूर म्हणून — जमिनीवर किंवा इतर ठिकाणींही मोठ्या टोळ्यांनीं काम करणारे कामकरी म्हणून—असे गुलाम हिंदुस्थान किंवा चीनमध्यें होते, असें दिसत नाहीं. म्हणून गुलामगिरीचे जे मनुष्याला अत्यंत हीन दशेला पोंचविणारे प्रकार, त्यांपासून हे दोन्ही देश मुक्त राहिले.

जसजशी इकडे रोमच्या राज्याची वाढ होऊं लागली, तसतसा पॅट्रिशियन-वर्गाला फायदा होऊं लागला; त्यांची संपत्ति पुष्कळ वाढली व त्याची हरतऱ्हेची भरभराट झाली. प्लीबियन-वर्ग मात्र या सर्व घडामोडींत गरीबचा गरीबच राहिला आणि पॅट्रिशियन लोक त्याच्या डोक्यावर नाचतच राहिले; तसेंच हे पॅट्रिशियन व प्लीबियन दोघे मिळून गुलामांच्या डोक्यावर नाचत राहिले.

रोमची ही वाढ होत होती तेव्हां त्याची राज्यव्यवस्था कशा प्रकारची होती? वर सांगितलेंच मीं तुला, कीं राज्यकारभार प्रत्यक्ष हांकला जाई सीनेटकडून आणि या सीनेटची नेमणूक दोन लोकनियुक्त कॉन्सलसकडून होत असे. या कॉन्सलसची निवडणूक कोणाकडून होत असे? त्यासाठीं नागरिक हे मतदार असत. सुरुवातीला रोम हें जेव्हां एक छोटें नगर-राज्य होतें, तेव्हां सारेच नागरिक रोममध्यें किंवा जवळपासच राहत असत. त्यामुळें सर्वांनीं मिळून एकत्र येऊन मतदान करणें त्यांना तेव्हां अवघड नव्हतें. पण पुढें रोमचें राज्य मोठें वाढलें, पुष्कळ नागरिक रोमपासून फार दूर राहूं लागले व त्यांना मतदान करणें तितकें सोपें राहिलें नाहीं. हल्लीं ज्याला प्रातिनिधिक राज्यव्यवस्था म्हणून आपण म्हणतों, तशा प्रकारची व्यवस्था त्या वेळीं तेथें व्यवहारांत नव्हती किंवा कल्पनेंतही तिची मांडणी झालेली नव्हती. हल्लींची पद्धति तुला ठाऊक आहे. निरनिराळे स्थानिक गट किंवा मतदार-संघ आपापला प्रतिनिधि राष्ट्रीय कायदे-मंडळासाठीं (कोठें त्याला ॲसेंब्ली म्हणतात, कोठें पार्लमेंट, कोठें कॉंग्रेस) निवडतात;

आणि अशा रीतीनें या थोड्याशा लोकानियुक्त प्रतिनिधींची ही सभा म्हणजेच एक प्रकारें सर्व राष्ट्र, असें समजलें जातें. ही कल्पना प्राचीन रोमन लोकांना सुचली नसावी. म्हणून लांबलांबच्या मतदारांना रोममध्यें येऊन मत देणें हें सर्वस्वीं अशक्य होत गेलें, तरी सुद्धां त्यांनीं आपली रोममध्यें मतदान करून कॉन्सलची निवणूक करण्याचीच पद्धति चालू ठेवली. दूरचे मतदार मत द्यायला येऊं शकत नसत; एवढेंच नव्हे, पण रोममध्यें काय चाललें आहे याची सुद्धां त्यांना कल्पना नसे. त्या वेळीं वर्तमानपत्रें नव्हतीं किंवा पत्रकें काढण्याची सोय नव्हती; किंवा छापील ग्रंथही नव्हते. त्यामुळें मतदानाचा हा हक्क रोमपासून दूर राहणारांना असून नसल्यासारखाच होता. मतदानाचा हक्क कायद्यानें त्यांना होता; पण मधल्या अंतरानें त्यांचा हा हक्क काढून घेतला होता.

तेव्हां खुद्द रोममध्यें राहणाऱ्या लोकांनाच काय तो निवडणुकींत खरा भाग घेतां येई व महत्त्वाच्या प्रश्नावर मतदान करतां येई, हें तुझ्या लक्षांत येईल. उघड मैदानावर हें मतदान होत असे. दोन वेगवेगळीं मैदानें करावयाचीं व त्यांत वेगवेगळ्या बाजूंच्या मतदारांनीं जावयाचें अशी पद्धत होती. या मतदारांत पुष्कळ गरीब प्लीबियन लोकही असत. मोठ्या अधिकाराची अपेक्षा करणारे श्रीमंत पॅट्रिशियन लोक या गरीब लोकाना त्यांनीं आपल्याला मत द्यावें म्हणून लांच देत. अशामुळें आधुनिक काळच्या निवडणुकींत जे लांचलुचपतीचे व लफंगेगिरीचे बरेच प्रकार चालतात, ते प्रकार रोमन निवडणुकांतही पुष्कळ प्रमाणांत चालत असत.

इकडे इटलींत रोमचें राज्य वाढत होतें, तर तिकडे उत्तर आफ्रिकेंत कार्थेजच्या राज्याचेंही सामर्थ्य वाढत होतें. कार्थेजियन लोक हे फिनीशियन लोकांचे वंशज; त्याची दर्यावर्दीपणाची व व्यापाराची परंपराही कार्थेजियन लोकांमध्यें कायम होती. त्यांचेंही एक प्रकारचें लोकराज्यच होतें; परंतु रोमपेक्षांही पुष्कळ अधिक प्रमाणांत तें श्रीमंतांचें लोकराज्य होतें. मात्र हें एक लोकसत्ताक नगर-राज्य होतें व त्यामध्यें गुलामांची संख्या प्रचंड होती.

अगदीं सुरुवातीच्या काळांत रोम आणि कार्थेज यांच्या दरम्यान दक्षिण इटली व मेसिना यामधील ग्रीक वसाहती होत्या. परंतु तेथून ग्रीकांना हांकलून लावण्यासाठीं रोम व कार्थेज या दोन्ही राज्यांनीं एक होऊन जो प्रयत्न केला, त्यांत त्यांना यश आलें व सिसिलीचें बेट कार्थेजला देण्यांत येऊन इटलीच्या बुटाच्या अगदीं टोंकापर्यंत रोमचें राज्य झालें. परंतु रोम व कार्थेज यांच्यामधील ही मैत्री व हा दोस्तीचा करार फार काळ टिकला नाहीं. लौकरच त्या दोहोंमध्यें लहान लहान झगडे होऊं लागले व दोघांत अत्यंत तीव्र स्पर्धा उत्पन्न झाली. भूमध्यसमुद्रासारखा लहानसा समुद्र, त्या अरुंद अशा समुद्राच्या दोन्ही बाजूंना एकमेकांकडे तोंड करून उभ्या राहिलेल्या या दोन्ही राज्यांना वाढीला किंवा वावरण्याला अपुरा पडूं लागला. दोन्ही राज्यें महत्त्वाकांक्षी होतीं. रोम चांगलेंच

वाढीला लागलें होतें आणि तारुण्यसुलभ अशी महत्त्वाकांक्षा व आत्मविश्वास त्याच्या ठिकाणीं होता. सुरुवातीसुरुवातीला कार्थेज रोमच्या राज्याला कोठलें तरी एक उपटसुंभ राज्य म्हणून कमी लेखीत असे. आपल्या दर्यावर्दी सामर्थ्याबद्दल त्याला अभिमान होता. मधले मधले शांततेचे कांहीं दिवस सोडले, तर या दोन राज्यांत शंभराहूनही अधिक वर्षेपर्यंत सतत युद्ध चालू होतें. रानटी पशूंसारखें त्यांचें हें युद्ध चाले आणि असंख्य लोकांना त्यामुळें दैन्यभार सहन करावा लागे. मुख्यतः तीन युद्धें त्यांच्यामध्यें झालीं. या युद्धांना प्यूनिक युद्धें म्हणतात. पहिलें प्यूनिक युद्ध खिस्तपूर्व २६४ पासून २४१ पर्यंत तेवीस वर्षे चाललें व त्यांत शेवटीं रोमचा जय झाला. त्यानंतर बावीस वर्षांनीं दुसरें प्यूनिक युद्ध सुरू झालें. त्या वेळीं या युद्धावर कार्थेजनें इतिहासप्रसिद्ध हॅनिबॉल हा सेनापति पाठविला. पंधरा वर्षे हॅनिबॉलनें रोमला नको-नकोसें केलें व रोमन लोकांची तारांबळ केली. त्यानें रोमच्या सैन्याचा पराभव केला व त्यांची खूप कत्तल केली; त्यांतल्या त्यांत खिस्तपूर्व २१६ व्या वर्षी कॅनाच्या लढाईंत त्यानें रोमच्या सैन्याचा फारच मोठा नाश केला. विशेष म्हणजे कार्थेजकडून कांहींही मदत मिळणें बंद झालें असतांना त्यानें हा पराक्रम केला. रोमचें साऱ्या समुद्रावर वर्चस्व दृढ झालें होतें आणि त्यामुळें हॅनिबॉलचा कार्थेजशीं संबंधच तुटला होता. वारंवार पराभव होत होते आणि नाश होत होता, आणि हॅनिबॉलचें संकट एकसारखें दत्त म्हणून पुढें उभें होतें. तरीही रोमन लोकांनीं माघार घेतली नाहीं, आणि आपल्या कट्टया शत्रूशीं ते लढतच राहिले. हॅनिबॉलशीं उघड मैदानांत सामना देण्याची त्यांची छाती नव्हती. यामुळें ते अशी लढाई करण्याचें टाळीत आणि त्याचें दळणवळण तोडून त्याला जगणें अशक्य व्हावें अशी खटपट करीत. अशा रीतीनें उघड लढाई टाळण्याचें कसब ज्याला विशेष पसंत होतें असा रोमचा सेनापति फेबियस या नांवाचा होता. तो कोणी मोठा श्रेष्ठ पुरुष होता किंवा संस्मरणीय पुरुष होता म्हणून कांहीं त्याचा मीं उल्लेख केलेला नाहीं; तर त्याच्या नांवावरून इंग्रजी भाषेंत एका विशेष शब्दाचा जन्म झाला आहे, म्हणूनच केवळ त्याचा उल्लेख मीं केलेला आहे. हा शब्द म्हणजे फेबियन हा होय. ज्यामध्यें प्रत्यक्ष निर्णायक युद्ध केलें जात नाहीं, त्या हालचालींना फेबियन युद्धशास्त्र किंवा व्यूहरचना म्हणतात. शत्रूला प्रत्यक्ष तोंड देण्याचें टाळावयाचें; आणीबाणीचा प्रसंग, शत्रूशीं प्रत्यक्ष झटापटीचा प्रसंग येऊं द्यावयाचा नाहीं आणि हळूहळू चिवटपणानें शत्रूला दमवून दमवून आपला हेतु साधावयाचा, असें हें धोरण आहे. इंग्लंडमध्यें एक फेबियन सोसायटी नांवाची संस्था आहे. या संस्थेला समाजवादाचें ध्येय मान्य आहे; परंतु कोणतेही सामाजिक बद्दल अत्यंत वेगानें किंवा एकदम करण्यावर त्यांचा विश्वास नाहीं.

हॅनिबॉलनें इटलीचा फार मोठा प्रदेश निर्जन व वैराण करून टाकला. परंतु रोमच्या दीर्घ प्रयत्नाला व चिकाटीला शेवटीं यश आलें. खिस्तपूर्व २०२ सालीं झामा येथील लढाईंत हॅनिबॉलचा पराभव झाला; तेथून तो ठिकठिकाणीं पळत सुटला;

पण अखंड द्वेषानें जळणाऱ्या रोमन लोकांनीं त्याची पाठ म्हणून सोडली नाहीं. अखेरीस विष घेऊन त्यानें प्राणत्याग केला.

यामुळें कार्थेजचें बळ फारच कमी झालें. आतां रोमशीं स्पर्धा करण्याची ताकदच त्याला राहिली नाहीं. तेव्हां त्यापुढें अर्धशतकपर्यंत रोम व कार्थेज यांच्यामध्यें शांतता राहिली. परंतु एवढ्यावर रोमचें मात्र समाधान झालेलें नव्हतें. त्यानें पुन्हां कार्थेजवर तिसरें प्यूनिक युद्ध लादलेंच. त्यांत कार्थेजची फारच प्रचंड मनुष्यहानि झाली आणि कार्थेजच्या राज्याचा पूर्ण नाश झाला. एवढेंच नव्हे, तर भूमध्यसमुद्राची स्वामिनी म्हणून जी कार्थेज नगरी मोठ्या अभिमानानें विलसत होती, ती नाहींशी करून तेथें प्रत्यक्ष नांगर फिरविण्यांत आले.

## २८

# रोमचें लोकसत्ताक राज्य साम्राज्य बनतें

*९ एप्रिल, १९३२*

कार्थेजचा शेवटच्या युद्धांत पराभव झाला आणि त्याचा पूर्ण नाश झाला. त्यानंतर पश्चिमेकडील जगांत रोमचेंच सर्वत्र अबाधित वर्चस्व चालू झालें. त्याला कोणीच प्रतिस्पर्धी म्हणून राहिला नाहीं. त्याच्याआधींच रोमनें ग्रीक राज्यें पादाक्रांत केलीं होतीं. आतां त्यानें कार्थेजच्या स्वामित्वाखालील सर्व मुलखाचा ताबा घेतला. अशा रीतीनें दुसऱ्या प्यूनिक युद्धानंतर स्पेन देश रोमच्या कबजांत आला. परंतु एवढ्यानें कांहीं सारा यूरप रोमच्या ताब्यांत आला नाहीं. सर्वच्या सर्व उत्तर यूरप आणि मध्य यूरप हे प्रदेश रोमच्या राज्यापासून अगदीं स्वतंत्र होते. आणि रोमचें राज्य अद्यापि फक्त भूमध्यसमुद्रालगतच्या प्रदेशांवरच चालू होतें.

या विजयाचा व देश काबीज करण्याचा परिणाम म्हणजे रोममध्यें संपत्ति आणि चैनबाजी यांची वाढ झाली; काबीज केलेल्या देशांतून सोनें आणि गुलाम यांचा नुसता लोंढाच्या लोंढा रोममध्यें वाहूं लागला. पण हें सगळें गेलें कोणाच्या हातीं? मागें सांगितलेंच मीं तुला, कीं रोममध्यें कारभार सगळा सीनेटच्या हातीं असे. आणि या सीनेटमध्यें श्रीमंत वरिष्ठ वर्गीय घराण्यांमधीलच सगळी मंडळी असत. रोमचें लोकसत्ताक राज्य व लोकजीवन यांची सर्व नाडी खरोखर या श्रीमंत लोकांच्या हातांत असे. आणि जसजसें रोमचें सामर्थ्य आणि विस्तार हीं वाढत गेलीं, तसतशी या लोकांची श्रीमंतीही वाढत गेली. म्हणजे काय, कीं आधींच श्रीमंत होते ते अधिक श्रीमंत झाले; आणि मुळांत जे गरीब होते ते गरीबच राहिले, किंवा तसें पाहिलें तर अधिकच गरीब झाले. गुलामांची संख्या वाढली आणि एका बाजूला ऐश्वर्योपभोग

व दुसऱ्या बाजूला दैन्यावस्था यांची बरोबरीनेंच वाढ होत गेली. असें झालें कीं त्यांच्यापाठोपाठ अशांतता–खवदव ही यायचीच. मनुष्याची अडचणी व दुःख सहन करण्याची शक्ति एवढी मोठी आहे, कीं मन त्यामुळें चकित होतें. परंतु या सहनशीलतेलाही कांहीं मर्यादा आहेच; आणि या मर्यादेच्या बाहेर सहन करावें लागलें कीं स्फोट हे होणारच.

श्रीमंत लोकांनीं खेळ आणि शर्यती व चढाओढी यांच्या योगानें लोकांच्या मनाला विरंगुळा पाडण्याचा प्रयत्न केला. क्रीडांगणें मुद्दाम तयार केलीं गेलीं होतीं. त्यामध्यें तरवारीचे खेळ खेळणारे लोक एकमेकांशीं लढत आणि एकमेकांना ठार करीत. कशासाठीं, तर केवळ प्रेक्षकांची करमणूक व्हावी म्हणून. किती तरी गुलाम व लष्करी कैदी अशा रीतीनें मारले जात आणि यालाच त्या काळचे लोक Sport, क्रीडानैपुण्य म्हणतसें दिसतें.

परंतु तरी सुद्धां रोममध्यें गडबड अधिक वाढतच गेली. निवडणुकांचे वेळीं बंडें आणि कत्तली होऊं लागल्या. लांचलुचपत आणि वशिलेबाजी वाढत गेली. अगदीं गरीब व दडपले गेलेले जे गुलाम त्यांनीं सुद्धां स्पार्टेकस नांवाच्या तरवारीचे खेळ करणाऱ्या पहिलवानाच्या नेतृत्वाखालीं बंड उभारलें. परंतु त्यांचा अगदीं निर्दयपणें चक्काचूर करण्यात आला. रोममधील ॲपियन रस्त्यावर त्याच्यापैकीं सहा हजार लोकांना सुळावर देण्यांत आलें असें म्हणतात.

महत्त्वाकांक्षी, साहसी लोक आणि सेनापती यांचें प्रस्थ हळूहळू वाढूं लागलें. आणि सीनेटपेक्षांही यांचेंच खूड अधिक जड होऊं लागलें. यादवी सुरू झाली, आपापसांत स्पर्धा असणाऱ्या भिन्न भिन्न विरोधी गटांतील सेनापतींच्या परस्परांशीं लढाया होऊं लागल्या. प्रदेश सारा उजाड होऊं लागला. पूर्वेस पार्थियामध्यें – म्हणजे मेसापोटेमियामध्यें हल्लींचा इराक – ख्रिस्तपूर्व ५३ या वर्षीं कऱ्हा येथील लढाईत रोमन सैन्याचा प्रचंड पराभव झाला. पार्थियन लोकांनीं आपल्याविरुद्ध आलेलें सारेंच रोमन सैन्य नष्ट करून टाकलें.

रोमचे जे असंख्य सेनापती होऊन गेले त्यांमध्यें दोघे जण विशेष नजरेंत भरण्यासारखे आहेत: एक पॉंपी व दुसरा ज्यूलिअस सीझर. ज्यूलिअस सीझरनें फ्रान्स (त्या वेळीं त्याला गॉल म्हणत) व ब्रिटन हे देश काबीज केले होते, हें तुला माहीत आहे. पॉंपीचा मोर्चा पूर्वेकडे वळला होता व तिकडे त्याला मोठे विजय मिळाले. पण या दोघांमध्यें अत्यंत कटु स्पर्धा होती. दोघेही महत्त्वाकांक्षी होते आणि आपल्यावांचून दुसरा कोणी सत्ताधारी झालेला त्यांपैकीं एकालाही सहन होण्यासारखा नव्हता. ते दोघेही सीनेटची सत्ता संपूर्ण मान्य असल्यासारखें दाखवीत. परंतु त्यांच्यापुढें बिचाऱ्या सीनेटला कांहींच महत्त्व उरलें नव्हतें. पुढें सीझरनें पॉंपीचा पराभव केला व अशा रीतीनें साऱ्या रोमन राज्यांत तोच एक प्रमुख मनुष्य झाला. परंतु रोमचें राज्य होतें प्रजासत्ताक. त्यामुळें सर्वच बाबतींत त्याला आपला अप्रतिहत अधिकार, वरचष्मा चालविणें

शक्य नव्हतें. त्यासाठीं त्याला राजा किंवा बादशहा म्हणून नियुक्त करावें, असे प्रयत्न करण्यांत आले. त्याच्याही मनांतून अशीच इच्छा होती मोठी प्रबळ; परंतु रोम-मधील फार दिवसांपासून चालत आलेल्या प्रजासत्तेच्या परंपरेमुळें तो जरा कांकूं करीत होता. आणि अखेरीस ही परंपराच त्याच्याहीपेक्षां अधिक बलिष्ठ ठरली. ब्रूटस् व इतर मंडळींनीं तो राज्यसभामंदिराच्या पायऱ्या चढत असतांना पायरीवरच तरवार भोंसकून त्याला ठार केलें. शेक्स्पियरचें ज्यूलिअस सीझर हें नाटक तूं वाचलें असशीलच. त्यांत हा प्रसंग चितारलेला आहे.

खिस्तपूर्व ४४ या वर्षी ज्यूलिअस सीझरचा खून झाला. परंतु तो मेल्यानें प्रजा-सत्ताक राज्य मात्र कांहीं टिकाव धरूं शकलें नाहीं. सीझरच्या पुतण्याचा मुलगा—ज्याला त्यानें दत्तक घेतलें होतें—ऑक्टेव्हियन नांवाचा होता. त्यानें व सीझरचा मित्र मार्क अँटनी यानें सीझरच्या मृत्यूचा सूड घेतला. आणि त्यामधून रोममध्यें राजपद परत प्रस्थापित झालें. ऑक्टेव्हियन हा राज्याचा प्रमुख शासनकर्ता—प्रिन्सेप झाला व प्रजासत्ताक राज्य नष्ट झालें. सीनेट तेवढी चालू राहिली; परंतु तिच्या हातांत खरी सत्ता अशी कांहींच राहिली नाहीं.

ऑक्टेव्हियन जेव्हां प्रिन्सेप म्हणजे प्रमुख शासनकर्ता झाला, तेव्हां त्यानें आपल्याला ऑगस्टस सीझर असें नांव घेतलें. यापुढें सीझर ही एक पदवीच झाली व तिचा अर्थ बादशहा असा होऊन गेला. कैसर आणि झार हे शब्द याच सीझर शब्दा-पासून निघालेले आहेत. कैसर हा शब्द हिंदुस्थानमध्यें सुद्धां फार दिवसांपासून प्रचलित झालेला आहे. उदाहरणार्थ, कैसर-ई-रूम, कैसर-ई-हिंद हे शब्द पहा. इंग्लंडचा पांचवा जॉर्ज राजा कैसर-ई-हिंद ही पदवी लावून घेण्यांत मोठें भूषणच आज मानीत असतो. जर्मन कैसर आतां नाहींसा झाला आहे. तीच गत ऑस्ट्रियाच्या कैसरची झाली आहे. तुर्कस्तानचा कैसरही आतां संपला आहे. आणि तसाच रशियाचा झार पण. अशा स्थितींत ज्या ज्यूलिअस सीझरनें रोमच्या वतीनें ब्रिटन देश पादाक्रांत केला होता, त्याचेंच नांव पदवी म्हणून लावणारा आजच्या काळीं फक्त त्या इंग्लंडचाच राजा तेवढा बाकी असावा, ही घटना किती विचित्र, किती विचार करण्याजोगी आहे!

अशा रीतीनें ज्यूलिअस सीझरचें नांव हें साम्राज्यशाही ऐश्वर्याचें निदर्शक होऊन राहिलें आहे. ग्रीकमध्यें फार्सेलसच्या लढाईत पॉंपीनें त्याचा पराभव केला असता, तर काय परिणाम झाला असता बरें? बहुतकरून मग पॉंपी हाच प्रिन्सेप म्हणजे बादशहा झाला असता. मग पॉंपी या शब्दाचाच अर्थ बादशहा असा झाला असता. मग विल्हेल्म दुसरा याला आम्ही जर्मन पॉंपी असें म्हटलें असतें. आणि खुद्द पांचवा जॉर्ज हाही बहुधा पॉंपी-ई-हिंद झाला असता.

लोकसत्ताक राज्यातून साम्राज्यांचा उदय होत होता; अशा या काळीं, रोम-मधील या संधिकाळाच्या वेळेला, ईजिप्तमध्यें पुढें इतिहासात सौंदर्यासाठीं जी विख्यात होऊन राहिली अशी एक स्त्री राहत होती. तिचें नांव 'क्लिओपात्रा.' हिची कीर्ति

कांहीं मोठीशी नाव घेण्याजोगी नाहीं हें खरें; परंतु आपल्या सौंदर्याच्या बळावर ज्यांनीं जागतिक इतिहासात पुष्कळ घडामोडी केल्या म्हणून म्हणतात, अशा थोड्याशा स्त्रियांपैकीं एक ही स्त्री होती. ज्यूलिअस सीझर ईजिप्तमध्यें गेला होता, तेव्हां हिचें अगदींच पोरवय होतें. पुढें तिचा मार्क अँटनीशीं फार स्नेह जमला. परंतु त्यामुळें त्याचा कांहीं फायदा झाला तर नाहींच; पण उलट एका मोठ्या आरमारी युद्धाच्या ऐन भरांत ती आपलीं सारीं जहाजें घेऊन आयत्या वेळीं त्याला सोडून गेली. असा त्याचा तिनें विश्वासघात केला. पुष्कळ काळापूर्वी पास्कल या प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकारानें लिहिलें आहे, "परंतु क्लिओपाट्राचें नाक थोडेंसें लहान म्हणजे नकटें असतें, तर सर्व जगाचें स्वरूप कांहीं वेगळेंच झालें असतें!"

यामध्यें थोडीशी अतिशयोक्ति आहे. क्लिआपाट्राचें नाक थोडेंसें वेगळ्या प्रकारचें असतें, तर तेवढ्यानें जगांत कांहीं मोठा बदल खास झाला नसता. परंतु ईजिप्तला जाऊन आल्यानंतर आपण राजे आहों, सम्राट् आहों, किंवा देवाचा अंश असलेले राज्यकर्ते आहों, अशी कल्पना सीझरच्या मनांत उत्पन्न झाली असावी, असा मात्र पुष्कळसा संभव आहे. ईजिप्तमध्यें कांहीं प्रजासत्ताक राज्य नव्हतें. तेथें राजेशाहीच होती. आणि राजा नुसता सर्वसत्ताधीश होता, एवढेंच नव्हे, तर त्याला लोक जवळजवळ देवच मानीत. ईजिप्तमध्यें ही कल्पना प्राचीन काळापासून होती आणि टॉलेमीच्या वंशांतील ग्रीक लोकांनीं सुद्धां, अॅलेक्झांडरच्या मृत्यूनंतर ईजिप्तचें राज्य स्वतःच्या कबजांत आल्यानंतर ईजिप्शियन लोकांच्या बहुतेक साऱ्या रूढी व विचारपरंपरा स्वीकारल्या होत्या. क्लिओपाट्राही या टॉलेमीच्या कुळांतीलच होती. म्हणजे खरोखर ती एक ग्रीक किंवा मॅसिडोनियन राज्यकर्त्री होती.

क्लिओपाट्राचा त्या कामीं प्रत्यक्ष हात असो किंवा नसो, परंतु राजा म्हणजे देव ही ईजिप्तमधील कल्पना वाट चालत चालत रोममध्यें आली आणि तेथें तिला आसरा मिळाला हें खरें. ज्यूलिअसच्या काळीं तर लोकसत्ताक राज्य भरभराटींत होतें. पण त्या काळीं सुद्धां सीझरचे पुतळे उभे करून त्यांची पूजा करण्याचा प्रघात सुरू झाला होताच. नंतर रोमन बादशहांच्या बाबतींत हा एक नित्याचा क्रम कसा झाला आहे, हें आपल्याला पुढें दिसेलच.

रोमच्या इतिहासातील एका मोठ्याच उलाढालीच्या काळाशीं—प्रजासत्ताक राज्याच्या अंतकाळाशीं—आपण येऊन ठेपलों आहों. ऑक्टेव्हियन, ऑगस्टस सीझर ही पदवी धारण करून राजा किंवा प्रिन्सेप झाला, तें साल खिस्तपूर्व २७ हें. त्याच्या पुढची रोमची व रोमच्या बादशहांची हकिगत अजून बरीच पाहायची आहे आपल्याला. परंतु त्याआधीं रोमन प्रजासत्ताक राज्याच्या शेवटच्या दिवसांत रोमन राज्यांचा विस्तार कसा कसा होता हें थोडेंसें आपण पाहूं या. रोमचें राज्य साऱ्या इटली देशावर होतें हें तर कांहीं सांगायलाच नको. तसेंच पश्चिमेकडील स्पेन व गॉल (फ्रान्स) हे देशही या राज्यामध्यें होते. पूर्वेकडे ग्रीस देश व आशिया मायनरचा प्रदेश हेही या


रोमच्या राज्याचें
साम्राज्य बनतें
गॉल
डान्यूब
स्पेन
डालमेशिया
रोम
पेरगामम
ग्रीस
ईजिप्त
रोम व कार्थेज
५००
खि. पू.
आगस्टसच्या मृत्यूचे वेळीं
रोमन साम्राज्य

राज्यांत सामील होते. आशिया मायनरच्या या प्रदेशाला पूर्वी परगॅमम म्हणत व रोमच्या पूर्वी तेथें ग्रीकांचें राज्य होतें, हें मीं मागें एकदां सांगितलेले तुझ्या ध्यानात असेलच. उत्तर आफ्रिकेंत ईजिप्तचें राज्य हें मित्रराज्य आणि मांडलिक राज्य असें समजलें जाई. कार्थेज आणि भूमध्यसमुद्राच्या लगतचे इतरही कांहीं देशांचे भाग रोमच्या राज्याखालीं होते. अशा रीतीनें रोमच्या राज्याची उत्तरेकडील सरहद्द ऱ्हाइन नदीच्या निटोप्यानें होती. त्यापलीकडील सर्व जर्मन व रशियन लोक आणि उत्तर व मध्य युरोपांतील लोक हे रोमच्या राज्याच्या बाहेर होते. त्याचप्रमाणें मेसापोटेमियाच्या पूर्वेकडीलही कोणी रोमच्या साम्राज्यांत सामील नव्हते.

रोमचें राज्य त्या काळांत फार मोठ्या पदाला चढलें होतें यांत कांहीं वाद नाहीं. परंतु इतर देशांच्या इतिहासाचें ज्यांना ज्ञान नाहीं अशा पुष्कळ यूरपीयन लोकांची अशी कल्पना आहे, कीं रोमचा तत्कालीन सर्व जगावर ताबा होता, प्रभुत्व होतें. पण खरोखर अशी वस्तुस्थिति नव्हती. तुझ्या लक्षांत असेल, कीं अगदीं याच काळांत चीनमध्यें महान् हान घराण्याचें राज्य चालू होतें. याचाच अर्थ असा, कीं आशियाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, थेट कास्पियन समुद्रापर्यंत त्यांचें अधिराज्य चालू होतें. मेसापोटेमियांत (इराक) कऱ्हाच्या लढाईंत पार्थियन लोकांनीं रोमन लोकांचा चांगला प्रचंड पराभव केला, त्या वेळीं या मंगोलियन लोकाचीही पार्थियन लोकाना मदत मिळाली असण्याचा संभव आहे.

परंतु रोमचा इतिहास—विशेषतः रोमन प्रजासत्ताक राज्याचा इतिहास—हा प्रत्येक यूरपीयन माणसाला फार प्रिय आणि आपलासा वाटतो. प्राचीन रोमन राज्य हें आधुनिक यूरपीय राज्याचें एका प्रकारें पूर्वजच आहे, असें त्यांना वाटत असतें. आणि कांहीं अंशानें तें खरेंही आहे. म्हणून तर इंग्लंडमधील शाळांतील मुलांना आधुनिक इतिहास येवो अगर न येवो, पण ग्रीक आणि रोमन इतिहास त्यांना माहीत असलाच पाहिजे अशी त्यांच्यावर सक्ती होते. माझ्यावर सुद्धां मूळ लॅटिन भाषेमधून ज्यूलिअस सीझरच्या गॉलवरील स्वारीचा वृत्तांत वाचण्याची सक्ती करण्यांत कशी आली होती, हें मला चांगलें आठवतें. सीझर हा केवळ एक योद्धाच होता असें मात्र नव्हे; तर तो एक चांगला गुणी आणि डौलदार ग्रंथकारही होता. त्याचा De Bello Gallico, गॉलचें युद्ध हा ग्रंथ यूरपमधील हजारों शाळांमधून आजही वाचला जातो.

अशोकाच्या काळच्या जगाची पाहणी करण्याचें काम आपण थोड्या वेळापूर्वी सुरू केलें. तें पुरें तर आपण केलेंच, पण चीन व यूरपमध्यें त्या काळाच्याही पुष्कळ पुढें येऊन आपण पोंचलों आहों. ख्रिस्ती शकाच्या अगदीं दाराशीं येऊन आपण आतां पोंचलों आहों. म्हणून आतां परत हिंदुस्थानांत जाऊन तेथल्या लोकांची हकीकत आपणांला या काळापर्यंत आणून पोंचविली पाहिजे. कारण तिकडे अशोकाच्या मृत्यूनंतर पुष्कळच मोठमोठ्या घडामोडी झालेल्या आहेत व दक्षिणेकडे व उत्तरेकडे नवीं साम्राज्यें उदयास आलेलीं आहेत.

सगळ्या जगाच्या इतिहासाची एकच अशी तुला कल्पना यावी, असा प्रयत्न मीं केला आहे. परंतु एक गोष्ट तुला लक्षात ठेवणें जरूर आहे, कीं या प्राचीन काळीं दूरदूरच्या देशांचे एकमेकांशीं संबंध अगदींच मर्यादित स्वरूपाचे होते. रोमची इतर पुष्कळ दृष्टींनीं प्रगति झाली होती, तरी भूगोलशास्त्र किंवा नकाशे यांचें तेथें जवळ-जवळ कांहींच ज्ञान नव्हतें आणि तें ज्ञान मिळविण्याचाही कोणी विशेष प्रयत्न करीत नव्हते. त्या काळचे मोठमोठे सेनापती किंवा रोमन सीनेट (लोकसभे) मधील शहाणे लोक यांच्यापेक्षा आज शाळेंतल्या मुलांमुलींना भूगोलाचें किती तरी ज्ञान असतें. आणि तरी सुद्धां या रोमन सेनापतींना व सीनेटमधील लोकांना आपण साऱ्या जगाचे अधिपति आहों असें वाटत असे. त्यांना जसें आपण जगाचे स्वामी आहों असें वाटे, तसें त्याच वेळीं, हजारों मैल पलीकडे, चीनमधील राज्यकर्त्यांनाही असेंच वाटे, कीं आपणच अखिल जगाचे अधिराजे आहों!

## २९

# दक्षिण हिंदुस्थानची उत्तर हिंदुस्थानवर मात

*१० एप्रिल, १९३२*

अतिपूर्वेकडे चीनमध्यें आणि पश्चिमेकडे रोममध्यें पुष्कळ वेळपर्यंत प्रवास करून आपण आतां हिंदुस्थानांत परत आलों आहों.

अशोकाच्या मृत्यूनंतर मौर्यांचें साम्राज्य फार काळ टिकलें नाहीं. कांहीं वर्षांतच तें विरून गेलें. उत्तरेकडील प्रांत साम्राज्यांतून एकेक फुटून गेले आणि दक्षिणेकडे नवीनच एक सत्ता निर्माण झाली; ही आंध्राची सत्ता होय. त्या मावळत्या साम्राज्यावर अशोकाच्या वंशजांनीं पुढें पन्नास-एक वर्षेंपर्यंत राज्य केलें; परंतु शेवटीं त्याचाच एक प्रमुख सेनापति ब्राह्मणवर्णीय पुष्यमित्र यानें जबरदस्तीनें त्यांना राज्यावरून उडवून लाविलें. त्यानंतर त्यानें स्वतःलाच राज्याभिषेक करून घेतला व त्यामुळें त्याच्या काळीं कांहीं काळ ब्राह्मणधर्माला पुनर्जीवन प्राप्त झालें. बुद्ध भिक्षूंचा छळही कांहीं अंशीं होऊं लागला. परंतु इतिहासाचा अभ्यास करतांना तुला आढळून येईल, कीं ब्राह्मण-धर्मानें बुद्धधर्मावर जो हल्ला केला, तो आडमुठेपणानें न करतां मोठ्या कौशल्यानें आणि हिकमतीनें — कोणाला नीट समजणारसुद्धां नाहीं अशा रीतीनें — केला. त्याचा छळ करावयाचा असा त्यांनीं फारसा दडपेगिरीचा प्रयत्नच केला नाहीं. कांहीं थोडाफार छळ अर्थातच झाला. पण तो राजकीय स्वरूपाचा होता. धार्मिक स्वरूपाचा नव्हे. बुद्धधर्मीयांचे जे मोठमोठे संघ होते ते फारच प्रबळ होते. आणि त्यांच्या राजकीय सामर्थ्याबद्दल राजे लोकांना पुष्कळदां भय वाटे. यासाठीं त्यांचें हें सामर्थ्य कमी

करण्याचा प्रयत्न असे राजे करीत. परंतु शेवटीं ब्राह्मणधर्मानें बुद्धधर्माला त्याच्या या जन्मभूमींतून जवळजवळ जें पार नाहींसें करून टाकलें, तें कांहीं अंशीं त्याचा-आपला एकजीव करून आणि त्यांतील कांहीं तत्त्वें आत्मसात् करून; म्हणजेच आपल्या घरांतच त्याला थोडीफार जागा देऊन, त्याला आपलासाच करून!

अशा तऱ्हेनें जो ब्राह्मणधर्म पुन्हां प्रस्थापित झाला, तो कांहीं अगदीं जसाच्या तसा पहिलाच ब्राह्मणधर्म नव्हता किंवा बुद्धधर्मानें जें जें कांहीं केलें त्या सगळ्याचाच कांहीं त्यांत अभाव किंवा विच्छेद नव्हता. ब्राह्मणधर्माचे प्राचीन काळचे नेते हे फारच हुशार आणि चतुर लोक होते; आणि नवीन नवीन गोष्टी आत्मसात् करण्याचें, आपल्यामध्यें मिसळून घेण्याचें कौशल्य त्यांना फार पहिल्यापासून साधलेलें होतें. आर्य लोक प्रथम हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांनीं द्रविड लोकांची संस्कृति व आचारविचार यांपैकीं पुष्कळ भागाचा आपल्यांत समावेश करून घेतला; त्यांच्या पहिल्यापासूनच्या इतिहासात, जाणून किंवा अजाणतां असो, पण त्याचा नेहमींचाच हा परिपाठ चालत आलेला आहे. बुद्धधर्माच्या बाबतींतही त्यांनीं असेंच केलें. हिंदू लोकांच्या धर्मात अवतारांची मोठी मालिका आहे, देवदेवताचें प्रचंड भाडार आहे; त्यामध्येंच एका अवताराची जागा त्यांनीं बुद्धाला देऊन टाकली. लोकसमाजाला बुद्ध हा एक पूजेचा आणि भक्तीचा विषय त्यांनीं करून ठेविला. पण त्यानें जो विशेष धर्मसंदेश म्हणून सांगितलेला होता, तो मात्र हळूच बाजूस सारून कांहीं लहानसहान फरकांनिशीं ब्राह्मणधर्माचा किंवा हिंदु धर्माच्या आचारविचाराचा पूर्वीचाच ओघ पुन्हां आपला जसाच्या तसा संथपणें अखंड वाहूं लागला. पण ही फार पुढच्या काळचा गोष्ट आपण बोलतों आहों. कारण बुद्धधर्माच्या ब्राह्मणीकरणाची क्रिया पूर्ण होण्याला बराच दीर्घ काळ लागलेला आहे; अशोकाच्या मृत्यूनंतर कितीक शतकांपर्यंत हिंदुस्थानांत बुद्धधर्माचेंच वर्चस्व चालू राहिलेलें होतें.

अशोकानंतर मगधामध्यें एकापाठोपाठ एक जे राजे किंवा वंश झाले, त्यांच्या-बद्दल विशेष विचार करण्याचें आपल्याला कारण नाहीं. परंतु त्या काळीं सुद्धां बुद्ध-धर्मीय संस्कृतीचें तें एक फार मोठें केंद्र मात्र अवश्य होतें.

दरम्यान उत्तरेकडे आणि दक्षिणेकडे दोन्ही बाजूंस पुष्कळ महत्त्वाच्या घटना घडत होत्या. उत्तरेकडून मध्य आशियांतील बक्त्यार, शक, सीथियन, तुर्क, कुशान या लोकांच्या वारंवार स्वाऱ्या होत होत्या. मला वाटतें, मागें एकदां तुला मीं लिहिलें आहे, कीं हा मध्य आशियाचा प्रदेश म्हणजे भटकणाऱ्या मनुष्यांच्या झुंडीच्या झुंडी निर्माण होण्याची जागाच आहे; जणुं पुनः पुनः अशा लोकांच प्रचंड थवेच्या थवे येथून बाहेर पडले व ते सर्व आशिया खंडभर व यूरपमध्येंही पसरले, असें इतिहासांत आढळून येतें. ख्रिस्तपूर्व २०० या वर्षाच्या सुमारास अशा लोकांच्या कितीएक स्वाऱ्या हिंदुस्थानवर झाल्या. पण एक लक्षांत ठेवलें पाहिजे : या स्वाऱ्या निव्वळ विजय मिळवावयाचा आणि लूट मारून निघून जावयाचें या धोरणानें झालेल्या नव्हत्या. तर

त्यांमध्यें येथें येऊन वसाहत करण्याचा उद्देश होता. मध्य आशियांतील या बहुतेक टोळया गुरेंढोरें बरोबर घेऊन भटकणाऱ्या, घरदार नसलेल्या, अशा होत्या. आणि जसजशी त्यांची संख्या वाढूं लागली, तसतसा ते ज्या देशांत भटकत असत तो प्रदेश त्याना अपुरा पडूं लागला. तेव्हां तेथून दुसरीकडे जाऊन नवीन प्रदेश शोधून काढणें त्यांना भाग पडलें. परंतु त्याच्या देशत्यागाला एक त्याहूनही अधिक प्रबळ कारण झालें; तें म्हणजे त्याच्यापाठीमागून येणाऱ्या टोळयांचें दडपण. एखादी नवीन मोठी टोळी किंवा वंश येऊन इतरांना जबरदस्तीनें हांकलून लावी. मग अशांना आपल्यापरी दुसऱ्या देशांवर हल्ला करावा लागे. अशा रीतीनें हिंदुस्थानवर स्वारी करावयाला म्हणून जे लोक येत, ते पुष्कळदां आपापल्या देशांतून पळून जाऊन कोठें तरी आश्रयार्थ भटकणारे असेच लोक असत. चीनच्या साम्राज्यामध्यें सुद्धां जेव्हा राज्यसत्ता चांगली प्रबळ असे ( उदाहरणार्थ, हान घराण्याच्या कारकीर्दीतल्याप्रमाणें ) त्या वेळीं तेथूनही अशा भटकत्या टोळयांना हाकून देण्यांत येत असे आणि त्यांना दुसरीकडे कोठें तरी राहण्याला आसरा शोधणें प्राप्त होई.

दुसरें एक तूं असें लक्षांत ठेवलें पाहिजेस, कीं मध्य आशियांतील या भटक्या टोळयांना हिंदुस्थान देश म्हणजे कोणी आपला सर्वस्वीं शत्रु आहे असें कांहीं वाटत नसे. त्यांना इतिहासांत रानटी लोक असें नांव दिलें जातें, आणि त्या काळच्या हिंदुस्थानच्या मानानें ते तितकेसे सुधारलेले नव्हते हें खरेंही आहे. परंतु त्यांच्यापैकीं बहुतेक लोक अत्यंत भाविक बुद्धधर्मीय असत आणि हिंदुस्थान म्हणजे आपल्या धर्मोची जन्मभूमि अशा दृष्टीनें एक प्रकारच्या आपुलकीनें ते हिंदुस्थानकडे पाहात असत.

प्रत्यक्ष पुष्यमित्राच्या काळीं सुद्धां वायव्येकडून बाक्ट्रियाच्या मीनांदरनें हिंदुस्थानवर स्वारी केली होती. हा मीनांदर स्वतः निष्ठावंत बुद्धधर्मीय होता. बाक्ट्रिया म्हणजे बख्त्यारांचा देश. हा हिंदुस्थानची सरहद्द ओलांडल्याबरोबरचा पलीकडचा प्रदेश. एका काळीं हा प्रदेश सेल्युकसच्या साम्राज्याचाच एक भाग होता. परंतु पुढें तो स्वतंत्र झाला होता. मीनादरचा हल्ला परतवून लावण्यांत आला खरा; परंतु सिंध प्रांत आणि काबूल हे त्यानें काबीज केलेच.

यानंतर शकांची स्वारी आली. त्यांची संख्या फारच प्रचंड होती आणि हिंदुस्थानच्या साऱ्या उत्तर आणि पश्चिम भागावर हे लोक पसरले होते. या ठिकाणीं त्यांनीं वाढविलेल्या वनचराईच्या रानांतून आणखी एका मोठ्या टोळीनें त्यांना हुसकून काढलें. ही टोळी कुशान उर्फ येश्वांग लोकांची होय. त्यांनीं बाक्ट्रिआ आणि पार्थिया हे देश व्यापून हळूहळू उत्तर हिंदुस्थानांतही पाय रोवला. विशेषतः, पंजाब, राजपुताना व काठियावाड हे प्रदेश त्यांनीं आपलेसे केले. हिंदुस्थानांत आल्यावर हे लोक पुष्कळ सुधारले आणि त्यांची भटकण्याची प्रवृत्ति सुटून गेली.

हिंदुस्थानच्या कांहीं कांहीं भागांत या बख्त्यार व तुर्क लोकांचीं राज्यें होतीं, तरी त्यांच्यामुळें भारतीय आर्यांच्या समाजव्यवस्थेंत म्हणण्यासारखा कांहीं बदल झाला

नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हे परकी राज्यकर्ते स्वतः बुद्धधर्मीय होते, त्यामुळें बुद्धधर्मांचे आचार व धर्मसंस्थेची व्यवस्था व तंत्रच ते पाळीत. आणि ही बुद्धधर्माची संघटना स्वतःच मुळांत भारतीय आर्यांच्या लोकशाहीप्रधान ग्रामसंघाच्या कल्पनेच्या पायावरच आधारलेली होती. त्यामुळें या राज्यकर्त्यांच्या अमदानींत सुद्धां हिंदुस्थानचें स्वरूप म्हणजे वरच्या बाजूला एक मध्यवर्ती सत्ता आणि तिच्या नेतृत्वाखालीं एकत्र येऊन राहणारे सर्वत्र विखुरलेले स्वतंत्र ग्रामीण समाज किंवा ग्रामराज्यें, अशा प्रकारचेंच शिल्लक राहिलें. त्या काळांतही तक्षशिला आणि मथुरा हीं दोन्ही बुद्धधर्माच्या अध्ययनाचीं स्थानें पाहिल्याइतकींच महत्त्वाचीं राहिलीं आणि चीन व पश्चिम आशिया यांतून सुद्धां विद्यार्थी तेथें येत राहिले.

परंतु वायव्येकडून वारंवार होणाऱ्या या स्वाऱ्या होतच राहिल्या. मगधांचें राज्ययंत्रही हळूहळू खिळखिळें होऊन मोडकळीस आलें. याचा एक परिणाम मात्र जरूर झाला : हिंदुस्थानांतील दक्षिणेकडील राज्यें हींच प्राचीन भारतीय आर्यपरंपरा अधिक खऱ्या अर्थानें सांभाळणारीं अशीं ठरूं लागलीं. पुढें एक हजार वर्षांनंतर मुसलमानांची हिंदुस्थानवर स्वारी झाली तेव्हां सुद्धां याच प्रकाराची पुनरावृत्ति झालेली तुला आढळून येईल. आजसुद्धां उत्तरेकडील या स्वाऱ्या व त्यामुळें आलेले परकीयाशीं संबंध व व्यवहार यामुळें उत्तर हिंदुस्थानवर जितका परिणाम झालेला आढळेल, तितका दक्षिण हिंदुस्थानवर झालेला आढळणार नाहीं. आपण उत्तरेकडे राहणारे जे लोक आहोंत त्यांपैकीं बहुतेक जण एक प्रकारच्या संमिश्र संस्कृतींत वाढलेले आहोंत; हिंदु व मुसलमान संस्कृतींचा मिलाफ आणि त्यांत पश्चिमेकडील संस्कृतीचा थोडासा शिंतोडा, असें हें मिश्रण आहे. प्रत्यक्ष आमची भाषा सुद्धां, मग तिला तुम्ही हिंदी, उर्दू किंवा हिंदुस्थानी, कांहीं म्हणा, एक संमिश्र भाषा आहे. पण दक्षिण हिंदुस्थानचे लोक मात्र अद्याप बहुतांशीं हिंदु संस्कृतीचे आणि सनातन प्रवृत्तीचे आहेत, हें तूं स्वतःच पाहिलें आहेस. कितीक शतकांपर्यंत प्राचीन आर्यपरंपरेचें संरक्षण करून ती जिवंत ठेवण्याची धडपड त्यांनीं केली आणि अशी एक कडक समाजसंघटना केली, कीं तिच्यामध्यें आजसुद्धां अढळणारी असहिष्णुता बघून मन स्तिमित होऊन जातें. उंच तटांच्या आश्रयानें राहणें हें मोठें भयावह आहे. कांहीं प्रसंगीं बाह्य संकटांपासून हे तट आपल्याला बचावूं शकतील, किंवा आपल्याला नको असलेल्या परक्याला आंत येण्याला प्रतिबंधही करूं शकतील. परंतु त्यामुळें आपण स्वतःच एक प्रकारचे कैदी आणि गुलाम होऊन जातों! शुद्धता आणि संसर्गदोषरहितता म्हणून म्हणतात, ती त्यामुळें आपणांस मिळत असेलही; परंतु त्यासाठीं किंमत द्यावी लागते आपल्या स्वातंत्र्याची. त्यांतही सगळ्यांत अधिक भयंकर तट म्हणजे आपल्या बुद्धीभोंवतीं उंच वाढणारे तट. या तटांच्यामुळें वाईट अशी जुनी परंपरा सुद्धां, ती प्राचीन आहे एवढ्या कारणासाठीं, आपल्याला बाहेर टाकणें अशक्य होतें आणि नवीन विचार, तो नवीन आहे एवढ्याच कारणामुळें आंत घेण्याला प्रतिबंध होतो!

परंतु हजार वर्षांहून अधिक काळपर्यंत भारतीय आर्यांची परंपरा केवळ धार्मिक क्षेत्रांतच नव्हे, तर कला व राज्यव्यवस्था याच्या क्षेत्रांतही कायम राखून दक्षिण हिंदुस्थाननें फार महत्त्वाची व उपयुक्त कामगिरी केली हें खास. प्राचीन हिंदी कलेचे नमुने पाहायला हवे असले, तर आज आपल्याला दक्षिण हिंदुस्थानकडेच जावें लागतें आणि राज्यव्यवस्थेच्या बाबतींत तर खुद्द ग्रीक वकील मेगॅस्थिनीसनेंच लिहिलेला पुरावा आढळतो, कीं दक्षिणेकडील राजावर लोक-सभांचें नेहमीं नियंत्रण असे.

मगध राज्याचा ऱ्हास होऊं लागला तसतसे केवळ विद्वान् लोक नव्हे, तर कलावंत, बांधकाम करणारे, स्थापत्यशास्त्रज्ञ, शिल्पी, कारागीर आणि छोटे छोटे उद्योगधंदे करणारे लोक हे सुद्धां दक्षिणेकडे गेले. दक्षिण हिंदुस्थान व यूरप याच्यामध्यें या काळीं फार मोठा व्यापार भरभराटीस आला होता. इकडून मोतीं, हस्तिदंत, सोनें, तांदूळ, मिरीं, मोर, आणि माकडेंसुद्धा बॅबिलॉन, ईजिप्त, ग्रीक यांमध्यें आणि पुढें पुढें रोममध्यें सुद्धां पाठविण्यांत येत असत. मलबारांतील सागवानी लांकूड तर याही पूर्वीपासून खाल्डिया व बॅबिलोनिया यांमध्यें पाठविलें जात असे. हा सर्व व्यापारी माल, निदान त्यापैकीं फार मोठा भाग, हिदी जहाजांमधून वाहिला जात असे आणि या जहाजां-वरील सर्व दर्यावर्दी द्राविड लोक असत. तेव्हां प्राचीन काळच्या जगांत दक्षिण हिंदुस्थानची केवढी पुढारलेली अवस्था होती, हें यावरून तुला दिसेल. दक्षिणेकडे रोमन नाणीं पुष्कळच प्रमाणात सांपडलीं आहेत. तसेंच मलबारच्या किनाऱ्यावर अलेक्झाड्रियांतील लोकांची वसाहत होती, तर अलेक्झांड्रियामध्यें हिंदी वसाहती होत्या हें वर मीं तुला सांगितलेंच आहे.

अशोकाच्या मृत्यूनंतर लौकरच दक्षिणेंतील आंध्रांचें राज्य स्वतंत्र झालें. सध्यांही आंध्र हा मद्रासच्या उत्तरेकडे हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरचा कॉंग्रेसचा एक स्वतंत्र प्रांत आहे हें तुला ठाऊकच आहे. आंध्र देशाची भाषा तेलगू आहे. अशोकानंतर आध्रांची सत्ता फारच वेगानें वाढली आणि अखेरीस तिनें बंगालच्या उपसागरापासून आरबी समुद्रापर्यंतचा दक्षिण हिंदुस्थानचा सर्व भाग व्यापला.

दक्षिण हिंदुस्थानांतून बाहेरच्या देशांमध्यें वसाहती करण्यासाठीं मोठमोठ्या मोहिमा काढण्यांत आलेल्या आहेत. परंतु त्यांबद्दल आपण पुढें बोलूं.

हिंदुस्थानावर स्वारी करून आलेले व येथेंच उत्तरेकडे स्थायिक झालेले शक, सीथियन आणि इतर लोक याचा मीं उल्लेख केला आहे. पुढें ते हिंदुस्थानांतच पूर्ण मिसळून गेले. आणि म्हणून आम्ही उत्तर हिंदुस्थानचे लोक जितक्या अर्थानें आर्यांचे वंशज आहों, तितक्याच अर्थानें या लोकांचेही वंशज आहोंत. विशेषतः, शूर आणि उमद्या बांध्याचे रजपूत लोक आणि काठेवाडांतील रहिवासी हे तर मुख्यतः त्यांचेच वंशज आहेत.

## ३०

# सरहद्दीवरील कुशानांचें साम्राज्य

*११ एप्रिल, १९३२*

शक आणि तुर्क लोकांनीं हिंदुस्थानवर वारंवार हल्ले केले, हें मीं तुला गेल्या पत्रांत सांगितलें. तसेंच दक्षिणेमध्यें आंध्रांचें प्रबल राज्य उदयास येऊन त्याचा विस्तार इकडे बंगालच्या उपसागरापासून तिकडे आरबी समुद्रापर्यंत कसा पसरला, हेंही त्याच पत्रांत मीं तुला सांगितलें. या शकांना कुशानांनीं पुढें हिंदुस्थानकडे लोटलें. नंतर कांहीं काळानें तेही स्वतः या रंगभूमीवर येऊन दाखल झाले. त्यांनीं ख्रिस्तापूर्वी पहिल्या शतकांत हिंदुस्थानच्या सरहद्दीवर आपलें राज्य स्थापिलें आणि या राज्याचें पुढें एक मोठें साम्राज्य बनलें. कुशानांच्या या साम्राज्याचा विस्तार दक्षिणेस बनारस व विंध्य पर्वत, उत्तरेस काशगर, यारकंद आणि खूतानपर्यंत आणि पश्चिमेस इराण व पर्शिया यांच्या सरहद्दीपर्यंत वाढला होता. अशा रीतीनें उत्तर हिंदुस्थानचा संयुक्त प्रांत, पंजाब व काश्मीर हा सारा भाग आणि मध्य आशियापैकीं बराचसा भाग कुशान राजांच्या अमलाखालीं होता. इकडे दक्षिणेंत आंध्रांचें साम्राज्य ज्या काळीं भरभराटीला आलें होतें, त्याच काळांत हें कुशानांचें साम्राज्य सुमारें ३०० वर्षें टिकून राहिलें. कुशानांची राजधानी प्रथम काबूल हीच होतीसें दिसतें. परंतु पुढें ती बदलून पेशावर येथें आणण्यांत आली. या शहराचें नांव त्या वेळीं पुरुषपुर असें होतें व येथेंच त्यांची राजधानी पुढें अखेरपर्यंत राहिली.

या कुशानांच्या साम्राज्याचा इतिहास पुष्कळ दृष्टींनीं लक्षांत घेण्यासारखा आहे. हें बुद्धधर्मीय साम्राज्य होतें. त्यापैकीं विख्यात राज्यकर्ता सम्राट् कनिष्क याची या धर्मावर विशेष निष्ठा होती. पेशावरांतील राजधानीपासून जवळच तक्षशिला नगरी वसलेली होती; आणि येथें फार प्राचीन काळापासून बुद्ध संस्कृतीचें मोठें केंद्रच होतें. हे कुशान लोक मंगोलियन किंवा त्यांचेच भाईबंद होते, हें मागें मला वाटतें मीं तुला सांगितलेंच आहे. त्यामुळें स्वाभाविकच या कुशानांच्या राजधानीपासून त्यांच्या मूळ मंगोलियन भूमीपर्यंत ये-जा चालू असली पाहिजे; आणि त्यांतून बुद्ध-संस्कृति व बुद्ध-विद्या चीन आणि मंगोलियापर्यंत जाऊन पोंचल्या असल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें यामुळें पश्चिम आशियांतील प्रदेशांचाही बुद्धांच्या विचारपरंपरेशीं अत्यंत निकट संबंध आला असला पाहिजे. तेथें जी मूळची ग्रीकांची व आशियांतील स्थानिक संस्कृति होती, तिचें भारतीय बुद्ध-संस्कृतीशीं अशा रीतीनें या काळीं मिश्रण झालें.

अशा रीतीनें चीन आणि पश्चिम आशिया यांच्यावर हिंदुस्थानचा परिणाम घडून आला. परंतु तसाच हिंदुस्थानवरही त्यांचा परिणाम झाला. कुशानांचें साम्राज्य हें एखाद्या राक्षसाप्रमाणें — पश्चिमेच्या बाजूला ग्रीक व रोमन लोकांचें साम्राज्य, पूर्वेच्या




बाजूला ग्रीस व चीन साम्राज्य आणि दक्षिणेच्या बाजूला दक्षिण हिंदुस्थानचा प्रांत यांमध्यें असलेल्या साऱ्या आशियाच्या प्रदेशावर जेठा मारून पसरलें होतें. एका बाजूनें अर्धवट हिंदी आणि अर्धवट रोमन, तर दुसऱ्या बाजूनें अर्धवट हिंदी व अर्धवट चिनी असें या महाराक्षसाचें रूप होतें. अथवा एका बाजूनें हिंदुस्थान आणि रोम व दुसऱ्या बाजूनें हिंदुस्थान आणि चीन या दोहोंच्यामधली एक प्रकारची ही धर्मशाळा किंवा टप्प्याची जागा होती म्हटलें तरी चालेल.

अशा रीतीनें मध्यवर्ती स्थान प्राप्त झालेलें असल्यामुळें हिंदुस्थान आणि रोम यांचे अत्यंत निकट संबंध येण्याला त्या राज्याचा उपयोग झालेला असला पाहिजे, हें तुझ्याही लक्षांत येईल. ज्यूलिअस सीझर हयात होता तो रोमन प्रजासत्ताक राज्याचा शेवटचा काळ आणि त्यानंतरचा रोमन साम्राज्याचा २०० वर्षांचा काळ हाच या कुशान साम्राज्याचाही काळ होय. कुशानांच्या महान् सम्राटाचा वकील ऑगस्टस सीझरच्या दरबारीं होता असें म्हणतात. दोन्ही देशांत खुष्कीच्या मार्गानें आणि जलमार्गानें व्यापार भरभराटीस आला होता. हिंदुस्थानांतून रोमकडे जाणाऱ्या पदार्थांत अत्तरें, मसाल्याचे जिन्नस, रेशमाचे कपडे व कापड, जरतारी माल, किनखाब, मलमल, जरीचें

कापड आणि हिरेमाणकादि जवाहारं हे पदार्थ असत. प्लिनी नांवाच्या रोमन ग्रंथकारानें तर रोममधून हिंदुस्थानकडे सोनें नुसतें धुऊन नेलें जात आहे, अशी खास तक्रार केलेली आहे. हिंदुस्थानच्या या चैनीच्या पदार्थांच्या पायीं रोमचे सालीना दहा कोटी सेस्टर्स खर्चीं पडतात असें त्यानें म्हटलें आहे. यांची किंमत सुमारें दीड कोटी रुपये किंवा दहा लाख पौंड होईल.

या काळांत बुद्ध-भिक्षूंच्या मठांत आणि बौद्ध संघाच्या सभांमध्यें मोठे वाद-विवाद आणि चर्चा चालत असत. दक्षिणेकडून आणि पश्चिमेकडून नवे नवे विचार किंवा जुनेच विचार पण नव्या पोशाखांत येऊं लागले होते आणि त्यांच्यामुळें बुद्धांच्या साध्यासुध्या विचारपरंपरेंत हळूहळू बदल होऊं लागला होता. असा बदल होतां होतां शेवटीं बुद्धधर्मीयांचे दोन वेगवेगळे पंथ पडले. एक महायान (म्हणजे मोठें वाहन) आणि दुसरा हीनयान (म्हणजे छोटें वाहन). या नवनव्या कल्पना किंवा जुन्या कल्पनांवर बसविलेले नवनवे अर्थ यांमुळें धर्म आणि जीवन यांबद्दलची दृष्टीच हळूहळू बदलत गेली आणि या कल्पनांचें कला आणि शिल्प यांमध्यें व्यक्त होणारें स्वरूपही असेंच पालटत गेलें. हे बदल कसकसे होत गेले, हें सांगणें तितकें सोपें नाहीं. बुद्धांच्या विचारपरंपरेला धक्का देऊन तिला दुसऱ्या एका दिशेला वळविण्याचें कार्य मुख्यतः दोन संस्कृतींच्या परिणामामुळें — दाबामुळें — घडलें असलें पाहिजे. एक ब्राह्मण-संस्कृति व दुसरी हेलनिक म्हणजेच ग्रीक-संस्कृति. या दोन्ही भिन्न संस्कृतींचा परिणाम मात्र एकच झाला.

मी तुला वेळोवेळीं सांगत आलों आहे, कीं बुद्धधर्म हें जातिभेद, भिक्षुकशाही आणि कर्मकांड यांच्या विरुद्ध केलेलें एक बंड होतें. गौतम बुद्धाला मूर्तिपूजा मान्य नव्हती. आपल्याला लोकांनीं देव मानावें आणि आपली पूजाअर्चा करावी असें त्याचें केव्हाच म्हणणें नव्हतें. तो आपल्याला फक्त बुद्ध — म्हणजे ज्याला ज्ञान झालेलें आहे असा — एवढेंच म्हणत असे.

अशी त्याच्या विचाराची मांडणी असल्यामुळें तिला अनुसरून बुद्धाच्या प्रतिमा तयार केल्या नव्हत्या; एवढेंच नव्हे, तर त्या काळच्या शिल्पकार्यांत सर्वच प्रकारच्या मूर्ती किंवा प्रतिमा टाळण्यांत येत असत. परंतु ब्राह्मणधर्मीयांच्या मनांतून हिंदु धर्म व बुद्धधर्म यांच्यामधील अंतर नाहींसें करावयाचें होतें; म्हणून बुद्धाच्या विचार-परंपरेंत आपल्या कल्पना व आपल्या धर्माचीं प्रतीकें घुसविण्याचा ते नित्य प्रयत्न करीत असत. बरें, ग्रीक आणि रोमन या जगांतील कारागीर घेतले, तरी त्यांनाही देवांच्या प्रतिमा करण्याची संवय होतीच. त्यामुळें हळूहळू बुद्धधर्मीय मंदिरांत मूर्ती — प्रतिमा — यांचा शिरकाव झाला. प्रथम प्रथम या मूर्ती बुद्धाच्या नव्हत्या, तर बोधिसत्त्वांच्या होत्या; बुद्धधर्माच्या परंपरेप्रमाणें हे बोधिसत्त्व म्हणजे बुद्धाचेच पूर्वीचे अवतार होत. परंतु ही पद्धत वाढतां वाढतां खुद्द बुद्धापर्यंत येऊन थडकली आणि त्याच्याही प्रतिमा करण्यांत येऊं लागल्या व त्यांचें पूजनही होऊं लागलें !

हे बदल महायान पंथाला मान्य होते. महायान पंथ ब्राह्मण-विचारपद्धतीला अधिक जवळ होता. कुशान सम्राटांनीं हा महायान पंथ स्वीकारला आणि त्याचा प्रसार करण्याचें कार्य केलें; परंतु याचा अर्थ ते हीनयान पंथाचा किंवा इतर धर्मांचा-सुद्धां द्वेष करीत असत, असें मात्र मुळींच नव्हे. कनिष्कानें तर झरथुष्ट्राच्या धर्मालाही प्रोत्साहन दिल्याचें सांगतात.

महायान पंथ आणि हीनयान पंथ यांच्यांत श्रेष्ठ कोणता आणि कनिष्ठ कोणता यांबद्दलचे जे मोठमोठे वादविवाद विद्वानाच्यामध्यें होत, ते मोटे वाचण्यासारखे आहेत. या कामासाठीं बौद्ध संघाच्या प्रचंड सभा होत असत. कनिष्कानें काश्मीरमध्यें सर्व संघांचें मिळून एक असें संमेलन भरविलें होतें. या प्रश्नाबद्दलच्या चर्चा व वाद कितीएक शतकें होत राहिले. त्यांत महायानांचें वर्चस्व उत्तर हिंदुस्थानांत वाढलें आणि हीनयानाचें दक्षिण हिंदुस्थानांत वाढलें; परंतु अखेरीस हिंदु धर्मानें दोघांनाही आपल्यांत पचवून टाकलें. आज बुद्धधर्माचा महायान पंथ चीन, जपान व तिबेट यां-मध्यें प्रचलित आहे आणि हीनयान पंथ सिलोन आणि ब्रह्मदेश यामध्यें आहे.

कला हें कोणत्याही समाजाच्या मनाचें खरेंखुरें प्रतिबिंब आहे; त्यामुळें बुद्ध-धर्माचा पहिला साधेपणा जाऊन त्याच्या जागीं जसजसा विविध प्रकारचा कृत्रिम सायासांनीं साधलेला प्रतीकवाद आला, तसतशी हिंदी कलाही अधिकाधिक संमिश्र, गुंतागुंतीची आणि अलंकारपूर्ण होऊं लागली. विशेषतः, वायव्येकडील गांधार प्रदेशांतील महायान पंथीयांच्या शिल्पकलेंत तर अलंकार आणि मूर्तींचा सफाईदार कोरीवपणा यांचा फार मोठा भर उसळला. प्रत्यक्ष हीनयान पंथीयांच्या शिल्पकलेला-सुद्धां या नव्या प्रवृत्तीपासून स्वतःला सर्वस्वीं अलिप्त ठेवतां आलें नाहीं; हळूहळू त्यांच्यामधील मूळच्या पद्धतींतील साधेपणा आणि संयम यांचा लोप झाला आणि तेही भरदार नक्षीकाम आणि प्रतिमानिर्मिति करूं लाग े.

या काळच्या शिल्पाचे नमुने आजही आपल्याला उपलब्ध आहेत. अजंठ्याच्या लेण्यांमधील कांहीं कांहीं सुंदर भिंतींवरील चित्रांचे नमुने हे त्यांत सर्वांत जास्त लक्षांत घेण्यासारखे मनोवेधक आहेत.

आतां आपण या कुशानांची रजा घेऊं या. पण एक गोष्ट लक्षांत ठेव : कुशान लोक हे शकांप्रमाणें किंवा इतर तुर्की लोकांप्रमाणें परकी म्हणून हिंदुस्थानांत आले नाहींत किंवा हिंदुस्थानांत परकीयांनीं जेते म्हणून जेत्यांवर राज्य करावें तसें राज्यही त्यांनीं केलें नाहीं. त्यांच्यामध्यें आणि हिंदुस्थानच्या लोकांमध्यें समान धर्माचें बंधन तर होतेंच; परंतु त्याशिवाय त्यांनीं हिंदुस्थानांतील राज्यव्यवस्थेचे सिद्धांतही स्वीकारले होते. अशा प्रकारें आर्यांच्या जीवनपद्धतीशीं ते पुष्कळ अंशांनीं समरस झाल्यामुळेंच उत्तर हिंदुस्थानांत जवळजवळ ३०० वर्षेपर्यंत त्यांना राज्य करतां आलें.

## ३१

# ख्रिस्त आणि ख्रिस्ती धर्म

१२ एप्रिल, १९३२

हिंदुस्थानांतील वायव्य भागातील कुशानांचें साम्राज्य आणि चीनमधील हान घराणें यांच्या विचारामध्यें आपण इतिहासांतील एका फार मोठ्या युगप्रवर्तक घडामोडी-पासून बरेच पुढें आलों आहों. म्हणून आतां आपल्याला थोडें मागें गेलें पाहिजे. आतांपर्यंत सर्व काळ आपण खिस्तापूर्वीचें अमुक शतक अशा रीतीनें सांगत होतों. आतां यापुढें खिस्तानंतरच्या काळांत आपण प्रवेश करीत आहों. ही कालगणना खिस्तापासून म्हणजे त्याच्या जन्माची जी तारीख मानतात तेथपासून सुरू झालेली आहे, हें तिच्या नांवावरूनच दिसून येतें. खरें पाहिलें असतां या तारखेच्या पूर्वी चार वर्षें खिस्ताचा जन्म झाला असावा. पण त्यानें कांहीं असा म्हणण्यासारखा फरक होत नाहीं. खिस्तानंतरच्या काळाची गणना करतांना वर्षांच्या आकड्यापाठी-मागें ए. डी. म्हणजे ॲनो डॉमिनी या शब्दांचीं आद्याक्षरें जोडण्याचा प्रघात आहे. त्याचा अर्थ प्रभूच्या शकाचें वर्ष असा आहे. हा सगळीकडे पसरलेला प्रघात स्वीकारण्याला कांहींच हरकत नाहीं. पण त्याऐवजीं ए. सी. अशीं अक्षरें वापरणें मला अधिक शास्त्रीय वाटतें. कारण खिस्तपूर्वकाळ दर्शविण्यासाठीं जशीं आपण बी. सी. म्हणजे Before Christ या शब्दांचीं वाचक अक्षरें वापरतों, तशींच खिस्तानंतर म्हणजे ए. सी. After Christ अशीं अक्षरें वापरणें अधिक युक्त आहे. म्हणून मी तसें करणार आहें.

खिस्ताचा, अथवा जीझसचा (कारण तेंच त्याचें खरें नांव आहे) वृत्तांत बायबलच्या नव्या करारांत दिला आहे. तुला तो थोडाफार ठाऊक आहे. त्यामध्यें गॉस्पेल्स या प्रकरणामध्यें जी हकीगत दिली आहे, तिच्यांत त्याच्या लहानपणची हकीगत फारशी नाहींच. नॅझरेथ येथें त्याचा जन्म झाला; गॅलिलीमध्यें तो धर्मप्रवचनें करूं लागला; आणि तीस वर्षांचा होऊन गेल्यानंतर तो जेरुसलेममध्यें आला. लौकरच त्याच्यावर खटला करण्यांत आला आणि रोमन गव्हर्नर पॉंटिअस पायलेट यानें त्याला शिक्षा केली. धर्मप्रवचनें सुरू करण्यापूर्वी जीझस काय करीत असे व तो कोठें कोठें गेला होता याबद्दल कांहीं नीटशी कल्पना येत नाहीं. सर्व मध्य आशिया-भर, काश्मीरमध्यें, लडाखमध्यें, तिबेटमध्यें आणि त्याहूनही पलीकडे उत्तरेकडे दूरवरच्या देशात अद्यापिही अशी श्रद्धा आहे, कीं जीझस म्हणजेच ईसा हा आपल्या देशांत येऊन गेलेला होता. कित्येकांची श्रद्धा तो हिंदुस्थानांत येऊन गेला होता अशीही आहे. निश्चित असें या बाबतींत कांहीं सांगतां येण्यासारखें नाहीं; आणि एवढें खरें, कीं खिस्ताच्या जीवनाचा ज्यांनीं अभ्यास केला आहे, अशा बहुतेक अधिकारी व्यक्तींचें मत जीझस हिंदुस्थानांत किंवा मध्य आशियांत आलेला नव्हता असेंच आहे. पण तो

इकडे आलेला असणें यामध्यें इतकें असंभवनीय असें कांहींच नाहीं. त्या काळीं हिंदुस्थानच्या मोठमोठ्या विश्वविद्यालयांमध्यें, विशेषतः तक्षशिलेमध्यें, दूरदूर देशचे जिज्ञासु विद्यार्थी मुद्दाम येत असत; त्याप्रमाणें जीझसही विद्यार्जनाच्या लालसेनें इकडे आला असणे पुष्कळ संभवनीय आहे. जीझसचा धर्मोपदेश हा पुष्कळच बाबतींत गौतम बुद्धाच्या धर्मोपदेशाशीं इतका जुळता आहे, कीं त्याला बुद्धधर्माची चांगली माहिती असलीच पाहिजे असें दिसतें. अर्थात् बुद्धधर्माचें ज्ञान इतरही देशांत पसरलेलें होतें; आणि हिंदुस्थानांत न येतांही जीझसला त्याची माहिती मिळाली असणें शक्य आहे.

शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थिनीला माहीत आहे, कीं धर्मापासून तंटे आणि तीव्र झगडे जगामध्यें निर्माण झालेले आहेत. तथापि, जागतिक धर्म निर्माण कसे झाले आणि त्यांच्यांत सारखेपणा आणि भिन्नपणा कोणता कोणता आहे, हें पाहणें चांगलें मनोरंजक आहे. सर्व धर्मांच्या दृष्टिकोणामध्यें आणि शिकवणीमध्यें किती तरी साम्य आहे. त्यामुळें बारीक तपशिलाच्या आणि बिनमहत्त्वाच्या गोष्टींबद्दल लोक इतके मूर्खांसारखे तंटे करतात हें पाहून मोठेंच चमत्कारिक वाटतें मनुष्याला. पण होतें काय, कीं धर्मप्रस्थापनेच्या वेळची पहिली जी शिकवण असते, तिच्यामध्यें पुढें पुढें भर पडत जाते; तिची पुष्कळ ओढाताणही होते; आणि अखेरीस मूळ शिकवणीचा मागमूसही लागेनासा होतो; आणि धर्मसंस्थापकाच्या स्थानावर कोणी तरी संकुचित बुद्धीचा आणि परमतासहिष्णु धर्मवेडा आलेला असतो. पुष्कळाना धर्माचा उपयोग राजकारण व साम्राज्यशाही यांच्या दासीसारखा झालेला आढळून येतो. प्राचीन रोमन लोकांचें धोरणच मुळीं यांच्या म्हणण्याप्रमाणें जनतेच्या हितासाठीं—परंतु खरें म्हटलें असतां जनतेला लुटण्यासाठीं—धर्मश्रद्धा मुद्दाम निर्माण करावी असें होतें. कारण लोकांत धर्मश्रद्धा असली म्हणजे त्याना दडपून ठेवणें अधिक सोपें जातें. रोममधील वरिष्ठ वर्गीयांची स्वतःपुरती तत्त्वज्ञानाच्या चर्चेंत शिरावयास हरकत नव्हती; परंतु त्यांच्या स्वतःच्या बाबतींत जी गोष्ट हिताची अशी त्यांना वाटत होती, ती जनतेच्या हिताची आहे असें त्यांस वाटत नव्हतें! पुढच्या काळांत इटलीमध्यें मॅकिआव्हेली नांवाचा प्रसिद्ध पुरुष होऊन गेला. त्यानें राजकारणावर ग्रंथ लिहिला आहे. त्यात तो म्हणतो, "राज्याला धर्माची जरूर आहे आणि स्वतः राज्यकर्त्याला धर्म जरी खोटा वाटला, तरी त्याला पाठिंबा देणें हें राज्यकर्त्याचें कर्तव्य आहे." अगदीं अलीकडच्या काळांतसुद्धा धर्माच्या पांघरुणाखालीं साम्राज्यशाहीचा प्रसार झाल्याचीं असंख्य उदाहरणें सांपडतात. तेव्हां धर्म म्हणजे जनतेला घातलेली अफू आहे, असें जें मार्क्स् म्हणतो यांत कांहींच आश्चर्यकारक नाहीं.

जीझस हा ज्यू होता. हे लोक पूर्वीपासून अगदीं आजपर्यंत मोठे विशेष उद्योगी प्रवृत्तीचे आणि अतिशय चिवट आहेत; मोठे जीव धरून राहणारे लोक आहेत. डेविड आणि सालोमन यांच्या अमदानींत कांहीं थोडा काळ त्यांना वैभवाचा गेला.

परंतु पुढें त्याना वाईट दिवस आले. त्यांचें पूर्वीच्या काळचें वैभवसुद्धां वास्तविक तितकेंसें मोठें होतें असें नव्हे. परंतु त्यांच्या कल्पनासृष्टींत त्याचें फारच भव्य स्वरूप करून दाखविण्यांत आलेलें आहे. प्राचीन काळचें तें आपलें सुवर्णयुगच होय अशी त्यांची समजूत आहे. नेमल्या वेळीं असें तें सुवर्णयुग पृथ्वीवर पुन्हां अवतरेल आणि ज्यू लोक पुन्हां श्रेष्ठत्वाला चढतील व सामर्थ्यवान् होतील असें ते मानतात. आपल्या पडत्या काळांत साऱ्या रोमन साम्राज्यभर ते इकडे तिकडे पसरले गेले. पण तरी सुद्धां आपले ऐश्वर्याचे दिवस पुन्हां येणार आहेत व तो काळ आपला प्रभु ( Messiah ) पुन्हां प्रवर्तित करणार आहे, या श्रद्धेच्या जोरावर ते टिकून राहिले आहेत. या ज्यूंना घर नाहीं, दार नाहीं, स्वतःचा म्हणायला प्रदेश नाहीं, अशा स्थितींत दिवस काढावे लागले; त्यांना कल्पनातीत त्रास व छळ सहन करावा लागला, कित्येकदां त्यांचे खून झाले; तरीही दोन हजारांहूनही अधिक वर्षेपर्यंत त्यांनीं आपलें वैशिष्टय व निराळेपणा कायम ठेविला आहे आणि एकत्वाची भावना सांभाळून ते जिवंत राहिले आहेत, हें जगांतलें एक मोठें आश्चर्यच आहे.

आपला प्रभु पुन्हा येणार आहे अशी ज्यूंची श्रद्धा होती. त्यामुळें जीझसबद्दल त्यांना मोठी आशा वाटत होती. परंतु लौकरच त्यांची निराशा झाली. आपल्या काळची लोकस्थिति व सामाजिक व्यवहार यांविरुद्ध बंडाची कांहीं चमत्कारिक भाषा जीझस बोलूं लागला. त्याचा विरोध विशेषेंकरून श्रीमंतांना आणि ज्या लोकांनीं धर्माला फक्त कांहीं उत्सव आणि संस्कार यांमध्यें म्हणजेच निव्वळ कर्मकांडांत बुडवून टाकलें होतें अशा भोंदू लोकांना होता. लोकांना तो तुम्हांला संपत्ति आणि वैभव मी प्राप्त करून देतों असें मुळींच सांगेना ; तर उलट, तुमच्याजवळ जें कांहीं आहे त्याचाच त्याग करा असें तो त्यांना सांगूं लागला. आणि हें करून मोबदल्यांत मिळणार काय, तर स्वर्गाचें राज्य यासारखी गूढ आणि अस्पष्ट, संशयित वस्तु! त्याच्या भाषणांत पुष्कळ दंतकथा आणि दृष्टांत असत ; तथापि हें निःसंशय, कीं तो जात्याच क्रांतिकारक होता; तत्कालीन परिस्थिति त्याला बिलकुल सहन होत नव्हती आणि ती बदलून टाकण्याचा त्यानें चंग बांधला होता. परंतु ज्यू लोकांना तर हें नको होतें ; त्यामुळें पुष्कळसे ज्यू त्याच्या विरुद्ध झाले आणि त्यांनीं त्याला रोमन अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केलें.

धर्माच्या बाबतींत पाहिलें तर रोमन लोकांची वृत्ति असहिष्णु नव्हती, म्हणून रोमन साम्राज्यांत सर्व धर्मांना नांदूं दिलें जात होतें आणि कुणीं जरी कुठल्या एखाद्या देवाची निंदा केली किंवा अपमान केला, तरी त्याला कांहीं शिक्षा होत नसे. त्यांचा एक बादशहा टायबेरियन हा तर म्हणे, " देवांचा जर अपमान होत असेल, तर त्याबद्दल काय करावयाचें तें त्यांचें त्यांनीं पाहावें. " यामुळें ज्याच्यापुढें जीझसला खटल्यासाठीं उभें केलें त्या पाँटिअस पायलेट या रोमन गव्हर्नराला त्याच्यावरच्या धार्मिक आरोपाच्या प्रकरणाची मोठीशी काहीं फिकीर वाटली नसती. परंतु जीझसला ज्यू लोक

सामाजिक बंडखोर मानीत, तसाच राजकीय बंडखोर पण तो आहे अशीही समजूत होती. असा बंडखोर म्हणूनच त्याच्यावर खटला झाला आणि चौकशीअंतीं गोलगोथा येथें त्याला क्रूसावर चढविण्यात आलें. त्याच्या प्राणांतिक यातनांच्या समयाला त्याच्या शिष्यांनीं सुद्धां त्याला सोडलें, त्याचें गुरुत्व नाकारलें, त्याच्या पंथाचा त्याग केला; त्याचें त्याला इतकें वाईट वाटलें, कीं मरणाच्या अगोदर "देवा, परमेश्वरा, मला असा तूं सोडून कां बरें गेलास?" असा अंतःकरण पिळवटून टाकणारा उद्गार त्यानें काढला.

मृत्यूच्या वेळीं जीझस वयानें फारच लहान होता. नुकतींच त्याला तीस वर्षें होऊन गेलेलीं होतीं. गॉस्पेल्समध्यें त्याच्या मरणाची अत्यंत करुण कथा दिलेली आहे. ती वाचतांना आपलें अंतःकरण भरून येतें. पुढच्या काळांत ख्रिस्ती धर्माचा पुष्कळच प्रसार झालेला आहे. आणि लाखों लोक जीझसच्या नांवाला फार मान देतात. परंतु त्याच्या शिकवणीप्रमाणें वागतात मात्र क्वचितच कोणी! तथापि हें विसरतां उपयोगी नाहीं, कीं त्याला क्रूसावर चढविलें या गोष्टीची पॅलेस्टाइनच्या बाहेर त्याच्या काळीं फारशी कोणाला माहिती नव्हती. रोमच्या लोकांना तर त्याच्याबद्दल काहींच ठाऊक नव्हतें आणि प्रत्यक्ष पॉंटिअस पायलेटला सुद्धां या प्रसंगाचें विशेष असें कांहींच महत्त्व वाटलें नसेल; रोज पुढें येणाऱ्या खटल्यांपैकीं एक खटला, याहून निराळी अशी त्याबद्दल त्याची कांहींच भावना झाली नसेल.

जीझसचे निकटचे अनुयायी व शिष्य यांनीं भिऊन जाऊन जीझसच्या शिकवणीचा त्याग केला; त्याचा पंथच ते मानीत नाहींसे झाले. परंतु त्याच्या मृत्यूनंतर लौकरच पॉल नांवाच्या नवीनच एका गृहस्थानें आपल्या मतानें ख्रिस्ताचें म्हणून जें कांहीं तत्त्वज्ञान होतें, त्याचा प्रचार करण्यास सुरुवात केली. यानें स्वतः जीझसला पाहिलेलेंही नव्हतें. पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे, कीं पॉलनें ज्या ख्रिस्ती धर्माचा प्रचार केला तो जीझसच्या शिकवणीहून फार निराळा होता. पॉल हा मोठा समर्थ आणि विद्वान् मनुष्य होता. परंतु जीझसप्रमाणें तो सामाजिक बंडखोर नव्हता. मात्र पॉलला त्याच्या प्रयत्नात यश प्राप्त झालें आणि ख्रिस्ती धर्माचा हळूहळू प्रसार होऊं लागला. रोमन लोकांनीं या प्रचाराला प्रथम फारसें महत्त्व दिलें नाहीं. त्यांना वाटे, कीं हे ख्रिस्ती लोक म्हणजे ज्यूमधलाच पोटपंथ आहेत; परंतु ख्रिस्ती लोकांनीं लौकरच चढाईचें धोरण सुरू केलें. इतर सर्वच धर्मांशीं त्यांचें शत्रुत्व होतें. आणि सम्राटाच्या प्रतिमेचें पूजन करण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. रोमन लोकांना या मनःप्रवृत्तीचा अर्थच समजेना. त्यांना ही अगदींच संकुचित प्रवृत्ति वाटे. म्हणून हे ख्रिस्ती लोक म्हणजे केवळ माथेफिरू असून असंस्कृत, तंटेबाज आणि मानवी प्रगतीचे विरोधकही ते आहेत असें त्यांना भासूं लागलें. निव्वळ एक धर्म म्हणून ख्रिस्ती धर्माला त्यांनीं मुळींच विरोध केला नसता. परंतु ख्रिस्ती लोक रोमन बादशहाच्या प्रतिमेला मान देण्याचें नाकारीत हा त्यांना राजकीय द्रोह वाटे व या अपराधाला

त्यांनीं देहान्ताची शिक्षा ठरविली. तसेंच रोमन लोकांचे शक्तीच्या कसरतीचे जे खेळ असत, त्यांच्या विरुद्धही ख्रिस्ती लोक तीव्र टीका करीत असत. अशा कारणांमुळें यापुढें ख्रिस्ती लोकांचा छळ होऊं लागला; त्यांच्या मिळकती जप्त होऊं लागल्या आणि त्यांना सिंहाच्या तोंडावर टाकण्यांत येऊं लागलें. या ख्रिस्ती हुतात्म्यांच्या कथा तूं वाचलेल्या असशील आणि त्याबद्दलचे चित्रपटही तूं पाहिले असशील. परंतु मनुष्य जेव्हां आपल्या कार्यासाठीं मरायला तयार होतो, एवढेंच नव्हे, तर त्या मरणांत तो आपणांला मोठा विजयच प्राप्त झाला असें मानूं लागतो, त्या वेळीं त्याला किंवा तो ज्या कार्याचा पाईक असतो त्या कार्याला दडपून टाकणें अशक्य होतें. अर्थात् रोमन साम्राज्यालाही ख्रिस्ती लोकांना दडपून टाकण्यात असेंच सर्वस्वीं अपयश आलें. एवढेंच नव्हे, तर या झगड्यांत शेवटीं ख्रिस्ती धर्मच विजय पावून पुढें आला; आणि ख्रिस्तानंतर चौथ्या शतकाच्या सुरुवातीलाच एक रोमन बादशहाच स्वतः ख्रिस्ती झाला व ख्रिस्ती धर्म हा रोमन साम्राज्याचा अधिकृत धर्म झाला. हा बादशहा म्हणजे कॉन्स्टांटिनोपल शहराची प्रस्थापना करणारा कॉन्स्टन्टाइन हा होय. त्याच्याबद्दल पुढें आपल्याला आणखी पुष्कळ बोलायचें आहे.

ख्रिस्ती धर्म वाढत गेला तसे जीझसच्या देवत्वाविषयीं तीव्र वाद सुरू झाले. तुला आठवतच असेल मीं मागें सांगितलेलें, कीं स्वतः गौतम बुद्धही आपल्या ठिकाणीं देवत्व किंवा दैवी शक्ति आहे असें मानीत नसे; परंतु पुढें लोक त्याला देव मानूं लागले व अवतार म्हणून त्याचें पूजन करूं लागले. त्याचप्रमाणें जीझसही स्वतःच्या ठिकाणीं देवत्व किंवा दैवी अंश आहे असें मुळींच म्हणत नव्हता. मी देवपुत्र आहें आणि मानवयोनिज आहें, असें जरी तो वारंवार सांगत आलेला असला, तरी त्यांत आपल्या अंगीं कांहीं दैवी किंवा अतिमानुष शक्ति किंवा अंश आहे असें प्रतिपादण्याचा त्याचा हेतु होता असें दिसत नाहीं. परंतु आपल्यामधील श्रेष्ठ पुरुषांना देव बनविण्याची माणसांना मोठी खोड जडलेली आहे. त्यांना देव म्हणून प्रस्थापित करावयाचें आणि त्यांच्या शिकवणीप्रमाणें वागण्याचें मात्र टाकून द्यावयाचें, हा माणसांचा क्रम आहे. यानंतर सहाशें वर्षांनीं महंमद पैगंबरानें आणखी एक मोठा धर्म प्रवर्तित केला; परंतु आपल्या पूर्वींच्या अनेक तशा उदाहरणांनीं तो शहाणा झालेला असल्यामुळेंच बहुधा त्यानें पुनः पुनः व स्पष्टपणें सांगितलेलें आहे, कीं आपण केवळ मनुष्य आहों, दैवी नाहीं.

अशा रीतीनें ख्रिस्ताची शिकवण का होती हें नीट समजून घेऊन ती प्रत्यक्ष आचरण्याचें सोडून देऊन ख्रिस्ताचें देवत्व आणि ख्रिस्ती धर्मातील त्रयीची कल्पना यांबद्दल वादविवाद आणि झगडे करण्यातच ख्रिस्ती लोकांचा काळ जाऊं लागला. आपल्यांतील निरनिराळ्या मतांना ते एकमेक पाखंडी म्हणूं लागले, एकमेकांचा छळ करूं लागले आणि एकमेकांचीं डोकीं उडवूं लागले. एका शब्दामध्यें एक जोडाक्षर कसें असावें याबद्दल एका काळीं निरनिराळ्या ख्रिस्ती धर्मपंथांत प्रचंड वाद होऊन

त्याचा अंत सशस्त्र झगड्यामध्यें झाला! एक पंथ म्हणे, कीं प्रार्थनेमध्यें वापरावयाचा तो शब्द Homo-ousion असा असावा; तर दुसऱ्याचें म्हणणें तो Homoi-ousion असा असावा. या फरकाचा संबंध जीझसच्या देवत्वाशीं होता. या जोडाक्षराच्या निमित्तानें एक भयंकर लढाई झाली आणि किती तरी लोक प्राणाला मुकले.

खिस्ती धर्म ज्या वेळीं इंग्लंडमध्यें किंवा पश्चिम यूरपमध्यें आला सुद्धा नव्हता आणि प्रत्यक्ष रोममध्यें सुद्धां तिरस्कृत आणि कायद्यानें निषिद्ध असा एक पंथ एवढेंच केवळ ज्या वेळीं त्याचें स्वरूप होतें, त्याच्या पुष्कळच पूर्वीं खिस्ती धर्माचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला होता हें पाहिल्यावर तुला फार नवल वाटेल. जीझसच्या मृत्यूनंतर शंभर-एक वर्षांच्या आतच खिस्ती धर्मप्रचारक समुद्रमार्गानें दक्षिण हिंदुस्थानांत आले. त्यांना येथें अतिशय सभ्यपणें वागविण्यांत आलें आणि त्यांच्या नवीन धर्माचा प्रचारही त्यांना करूं देण्यांत आला. पुष्कळ लोकांना त्यांनीं आपल्या धर्मांत मिळवून घेतलें आणि या धर्मांतील लोकांचे वंशज आजच्या काळापर्यंत कधीं बऱ्या, कधीं वाईट अशा अवस्थेंत या भागांत राहत आले आहेत. आज युरोपांत जे पंथ अस्तित्वांत नाहींत अशा कांहीं प्राचीन खिस्ती पंथाचेच हे बहुतेक सगळे अनुयायी आहेत. या पंथांपैकीं कांहींचें मुख्य पीठ हल्लीं आशिया मायनरमध्यें आहे.

राजकीय दृष्ट्या आजकाल खिस्ती धर्म हाच अत्यंत मोठी सत्ता उपभोगणारा धर्म आहे; कारण जिकडे तिकडे प्रभुत्व गाजविणाऱ्या यूरपीय लोकांचा तो धर्म आहे. परंतु एका बाजूला अनत्याचार आणि अहिंसा याची शिकवण देणारा आणि तत्कालीन समाजव्यवस्थेविरुद्ध बंड उभारणारा जात्याच बंडखोर असा जो जीझस, त्याचा विचार केला, आणि आज आपण त्याचे अनुयायी आहोंत म्हणून कंठशोष करून सांगणारे लोक, त्यांचा साम्राज्यवाद, त्यांचीं शस्त्रास्त्रें, त्यांचीं युद्धें आणि त्यांची द्रव्यपूजा यांच्या जोडीला त्याचें तें चित्र ठेवून पाहिलें, म्हणजे किती चमत्कारिक वाटतें! त्याचें तें पर्वतावरील प्रवचन आणि आधुनिक यूरपांतील आणि अमेरिकेंतील खिस्ती धर्म, दोहोंमध्यें कांहीं तिळमात्र तरी साम्य असावयाचें होतें; त्यांच्यामधील तें भिन्नत्व पाहून मन मूढ होऊन जातें. अशा स्थितींत पश्चिमेंतील खिस्ताच्या अनुयायी म्हटल्या जाणाऱ्या लोकांपेक्षां खिस्ताच्या शिकवणीला बापू हेच किती तरी अधिक जवळ आहेत असें जर पुष्कळांना वाटलें, तर त्यांत कांहींच आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं.

# ३२
# रोमचें साम्राज्य

२३ एप्रिल, १९३२

आज पुष्कळ दिवस मीं तुला कांहीं लिहिलें नाहीं बाळ. अलाहाबादकडून आलेल्या बातम्यांमुळें माझें मन थरारून गेलें आहे आणि क्षुब्धही झालें आहे. विशेषतः तुझ्या आजीच्या – आपल्या डोल अम्माच्या – बातमीनें माझ्या मनाला फारच त्रास झाला आहे. इकडे तुरुंगांतच का होईना, पण तसें पाहिलें तर सुखासमाधानांत मीं असावें आणि तिकडे माझ्या नाजुक आणि अशक्त अशा आईला पोलिसांच्या लाठीशीं सामना द्यावा लागून त्या लाठीचा मारही खायला लागावा, यानें मला कांहींसें आंतल्या आंत गुदमरल्यासारखें झालें आहे. परंतु मन असें भडकून देऊन आपल्या कथालेखनांत खंड पडूं देणें बरें नाहीं.

तेव्हां पुन्हां आपण रोमकडे परतूं या. संस्कृत ग्रंथांत हें नांव रोमक असें दिलेलें आढळतें. रोमन प्रजासत्ताक राज्याचा अंत आणि रोमन साम्राज्याचा उदय यांसंबंधीं आपण बोलत होतों तें तुला आठवत असेल. ज्यूलियस सीझरचा दत्तक मुलगा ऑक्टेव्हियन हा या साम्राज्याचा पहिला राजा. त्यानें नांव मात्र ऑगस्टस सीझर असें धारण केलें होतें. तो आपल्याला राजा असें म्हणवीत नसे. कारण राजा ही पदवी त्याला तितकीशी मोठी वाटली नाहीं हें एक, आणि प्रजासत्ताक राज्याची बाहेरची ती सजावट शक्य तों कायम राखून काम करण्याची त्याची इच्छा होती हें दुसरें. म्हणून तो आपल्याला इंपेरेटॉर म्हणजे सेनापति असें म्हणवी. अशा रीतीनें इंपेरेटॉर ही राज्यांतील सर्वांत श्रेष्ठ पदवी समजण्यांत येऊं लागली. आणि इंग्रजीमधला एम्परर हा शब्द या मूळ शब्दापासूनच निघालेला आहे, हें कदाचित् तुला ठाऊक असेलही. अशा रीतीनें रोमन साम्राज्याच्या पहिल्या पहिल्या दिवसांत दोन शब्द अस्तित्वांत आले; आणि त्या शब्दांबद्दल जगामधील राजे लोकांना इतका लोभ वाटूं लागला, कीं बहुतेक सारे लोक ते आपल्या नावांशीं जोडण्याचा प्रयत्न करीत आले. हे शब्द म्हणजे एम्परर आणि सीझर. सीझरपासूनच पुढें कायसर व झार हे शब्द निघाले. प्रथम प्रथम अशी कल्पना होती, कीं साऱ्या जगात एका वेळीं एकच बादशहा असावयाचा आणि त्यालाच सर्व जगाचा अधिपति मानावयाचें. रोम नगरीला सर्व जगाची स्वामिनी म्हणत; आणि साऱ्या जगावर रोमचें अधिराज्य चालतें अशी पश्चिमेकडील लोकांची समजूत होती. अर्थात् ही समजूत चुकीची आहे. तिच्यावरून त्या लोकांचें भूगोलाचें आणि इतिहासाचें अज्ञान मात्र दिसून येतें. रोमन साम्राज्य हें मुख्यतः भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या देशांचें बनविलें असून पूर्वेकडे मेसापोटेमियाच्या पलीकडे त्याचा विस्तार केव्हांच गेलेला नव्हता. त्याच्याहून मोठीं, जास्त प्रबळ आणि अधिक

सुसंस्कृत अशीं साम्राज्यें चीनमध्यें आणि हिंदुस्थानांत एकामागून एक किती तरी झालीं. तरी पण पश्चिमेपुरताच विचार केला, तर रोमन साम्राज्य हेंच काय तें एक तिकडचें साम्राज्य होतें आणि त्या दृष्टीनें प्राचीन काळच्या तेथल्या लोकांच्या दृष्टीनें तेंच जगाचें साम्राज्य होतें. त्याची छाप व प्रतिष्ठा फारच प्रचंड होती.

रोमच्या साम्राज्याच्या बाबतींत सर्वांत लक्षांत राहण्यासारखी गोष्ट असेल तर त्याच्या पाठीमागची ही कल्पना, कीं आपल्या साम्राज्याचें प्रभुत्व साऱ्या जगावर आहे; साऱ्या जगाचें प्रमुखत्व, नेतृत्व आपल्या साम्राज्याकडे आहे. रोमच्या साम्राज्याचा पाडाव झाला, त्या वेळीं सुद्धां या कल्पनेच्या जोरावर त्याचे पुष्कळ काळ संरक्षण झालें आणि त्याचें सामर्थ्य टिकून राहिलें. पुढें या कल्पनेचा खुद्द रोममध्यें अगदींच मागमूसही राहिला नाहीं, तरी सुद्धां ती कल्पना मात्र नष्ट झाली नाहीं. साम्राज्य नाहींसें झालें, भूतकाळात विलीन झालें; तरी पण ही जगाच्या प्रभुत्वाची कल्पना शिल्लकच राहिली; इतकी ती दृढमूल झालेली होती.

रोमचें साम्राज्य आणि त्यामागून आलेलीं राज्यें यांची हकीगत लिहिणें मला जरा अडचणीचें व कठिण झालें आहे. त्या इतिहासांतील कोणती गोष्ट निवडून तुला सांगावी हेंच मनांत निश्चित करणें तितकें सोपें नाहीं. आणि शिवाय मुख्यतः तुरुंगामध्यें जीं कांहीं जुनींपुराणीं पुस्तकें मीं वाचलीं, त्यांतून माझ्या मनात अनेक प्रसंगांच्या चित्राची नुसती खिचडी होऊन गेली आहे. आणि विचारांची सगळी गुंतागुंत झाली आहे. रोमच्या इतिहासावरचें एक सुप्रसिद्ध पुस्तक अलीकडे मीं वाचलें, तें खरोखर मी तुरुंगात जर आलों नसतों तर केव्हांच वाचलें नसतें. बहुतेक तो ग्रंथ एवढा मोठा आहे, कीं बाहेरच्या हरएक प्रकारच्या कामाच्या गडबडींत एवढा मोठा ग्रंथ या टोकापासून त्या टोंकापर्यंत वाचायला वेळच मिळणें अशक्य आहे. या ग्रंथाचें नांव 'रोमन साम्राज्याचा ऱ्हास व अंत'—The Decline and Fall of the Roman Empire असें असून तो गिबन नांवाच्या इंग्रज ग्रंथकारानें लिहिलेला आहे. त्यानें हा ग्रंथ स्वित्झर्लंडमध्यें लेक लेमानच्या किनाऱ्यावर लिहिला. ह्या गोष्टीला आतां फार काळ होऊन गेला. सुमारें दीडशें वर्षे झालीं त्याला. परंतु आज सुद्धां वाचायला तो ग्रंथ अत्यंत मनोरंजक आहे आणि कांहींशा अलंकारप्रचुर परंतु नादमधुर अशा भाषेंत लिहिलेला हा इतिहास कोठल्याही कादंबरीपेक्षां मला अधिक मनोवेधक वाटला. लखनौ डिस्ट्रिक्ट जेलमध्यें हा ग्रंथ मीं वाचला. त्याला आतां दहा वर्षे होत आलीं. त्या वेळीं एक महिनाभर सारा वेळ गिबनला बरोबर घेऊन मी राहत होतों आणि तो आपल्या भाषेच्या सामर्थ्यानें प्राचीन काळचीं जीं चित्रें निर्माण करतो त्यामध्यें दंग होऊन बुडून जात होतों. पण तो ग्रंथ अगदीं पुरा वाचून होण्यापूर्वींच एकाएकीं माझी तुरुंगांतून सुटका झाली. त्यासरशीं मंत्राचा प्रभाव जणुं संपला, आणि प्राचीन रोम व कॉन्स्टांटिनोपलकडे जायला वेळ मिळणें कठिण होऊं लागलें; किंबहुना, तिकडे मनाचा कल जाऊन उरलेलीं शंभर-एक पानें वाचून टाकणेंही मग शक्य झालें नाहीं.

पण या गोष्टीला झालीं आतां दहा वर्षे. अर्थात् त्या वेळीं वाचलेलें बहुतेक सारें मी आता विसरून गेलों आहें. तरी पण जें आठवणींत राहिलें आहे तेंही इतकें आहे, कीं तेवढ्यानेंच माझ्या मनाचा सगळा गोंधळ उडतो आहे आणि तसा तुझ्या मनांतही गोंधळ उत्पन्न करावा अशी अर्थातच माझी इच्छा नाहीं.

तेव्हां प्राचीन काळापासून वेळोवेळीं रोमच्या साम्राज्याची – किंवा निरनिराळया रोमन साम्राज्यांची म्हणा – घडामोड कशी होत आली, हें थोडेंसें प्रथम आपण पाहूं या. मग वाटल्यास या प्रकारें आपल्यापुढें आलेल्या चित्रांत कोठें कोठें थोडे रंग भरण्याची खटपट करता येईल आपल्याला.

रोमन साम्राज्याची सुरुवात ख्रिस्ती शक सुरू होण्याच्या सुमारास ऑगस्टस सीझरपासून होते. सुरुवातीला कांहीं काळ रोमन बादशहा सीनेटला काहींसा मान देताना आढळतात. परंतु लौकरच प्रजासत्ताक राज्याच्या छटा नाहींशा होऊन जातात आणि बादशहा हा सर्वसत्ताधीश सर्वस्वीं एकतंत्री राज्यकर्ता बनतो; नव्हे, जवळ-जवळ त्याला परमेश्वरच मानलें जाऊं लागतें. मेल्यानंतर तर त्याला पूर्ण देवपद प्राप्त होऊं लागलें. त्या काळचे सर्व ग्रंथकार पहिल्या पहिल्या सर्व बादशहांच्या अंगीं, विशेषतः ऑगस्टसच्या अंगीं, एकूण एक सद्गुणांची संपत्ति एकवटलेली होती असें लिहिताना आढळतात. ऑगस्टसचें युग म्हणजेच सुवर्ण-युग असें ते म्हणतात; या काळीं सर्व सद्गुणाचा उत्कर्ष झालेला होता, सज्जनांना जीवनांत साफल्य प्राप्त होत होतें, आणि दुर्जनांना दंड म्हणजे शिक्षा केली जात होती. सर्व एकतंत्री देशातील ही नेहमींचीच पद्धत आहे; आणि राजाची स्तुति केली म्हणजे द्रव्यप्राप्ति होते, पुष्कळ फायदा होतो हें उघड आहे. व्हर्जिल, ओव्हिड, होरेस अशांसारखे लॅटिन भाषेतील कांहीं प्रख्यात ग्रंथकार या काळच्या सुमाराचेच आहेत. शाळेमध्यें त्यांचे ग्रंथ आपण मंडळी वाचीत असतों. प्रजासत्ताक राज्याच्या शेवटच्या शेवटच्या काळात रोमन राज्यामध्यें जी यादवी माजली आणि एकसारखे लोकांना जे हाल सोसावे लागले ते संपून त्यांच्यामागून जो शांततेचा आणि विश्रांतीचा काळ आला, व्यापाराची व कांहीं प्रमाणात संस्कृतीची भरभराट होण्याला जी सवड मिळाली, त्यामुळे लोकाना एक प्रकारें हायसें वाटलें; त्यामुळें ही स्तुतीची प्रवृत्ति वाढली असेल, असाही बराच संभव आहे.

पण ही जी संस्कृति म्हणून म्हटलें तिचें स्वरूप तरी काय होतें? हीही श्रीमंतांचीच संस्कृति होती आणि हे श्रीमंत लोकसुद्धां प्राचीन ग्रीसमधील श्रीमंतांप्रमाणें कुशाग्र बुद्धीचे आणि कलाप्रिय नव्हते, तर अगदींच सामान्य आणि मंदबुद्धि लोकांचा हा एक असंघटित जमाव होता आणि सुखोपभोग घ्यावयाचा एकच धंदा त्यांना माहीत होता. त्यांच्या ऐषआरामासाठीं जगांतून सर्व ठिकाणांहून निरनिराळया तऱ्हेचे खाद्य-पदार्थ आणि चैनीच्या वस्तू येत असत आणि जिकडे तिकडे त्याचा झोकनोक आणि दिमाख चमकून उठत असे. अशा लोकांची जात जगांत आजही कांहीं अगदींच नष्ट झालेली नाहीं. जिकडे तिकडे मोठा डामडौल आणि रोषणाई असावयाची. मोठमोठ्या

मिरवणुकी निघावयाच्या; क्रीडांगणांत अनेक प्रकारचे खेळ चालावयाचे आणि पहिलवानांना मृत्युमुखीं दिलें जावयाचें! परंतु या सर्व डामडौलांच्या मागें सामान्य जनतेचें दुःखच दडलेलें होतें. कराचें फार मोठें ओझें असे आणि तें बहुतेक सारें सामान्य जनतेच्याच डोक्यावर लादलें जाई; आणि कामाचा, श्रमाचा बोजा तर जे असंख्य गुलाम होते त्यांच्यावरच पडे. फार कशाला, आपल्यामधील रोगचिकित्सा व शुश्रूषा यांचें काम, तत्त्वचिकित्सेचें व ज्ञानसंपादनाचें काम, आणि विचारप्रवर्तनाचें काम या गोष्टीसुद्धां हे बडे लोक आपल्या गुलामावरच सोंपवीत. ज्या जगाचे ते आपल्याला स्वामी समजत, त्या जगाचें एकंदर स्वरूप तरी काय आहे हें पाहण्याचा किंवा शिक्षणाचा एवढासासुद्धां प्रयत्न ते क्वचितच करीत.

बादशहांमागून बादशहा पुष्कळ झाले. त्यांमध्यें कांहीं चांगले होते, तर कांहीं वाईट होते. हळूहळू सर्व सत्ता सैन्याच्या हातांत येत गेली, आणि बादशहा बनविण्याचें किंवा नाहींसें करण्याचें सामर्थ्य लष्करशाहीला प्राप्त झालें. अर्थातच मग असें झालें, कीं ज्यानें त्यानें लष्करशाहीची कृपा संपादन करण्याची धडपड करायची. आणि लोकांना पिळून काढून जो पैसा मिळेल, किंवा जिंकलेल्या प्रदेशांतून जी लूट आणतां येईल ती सारी सैन्यालाच देण्याच्या कामांत लावावयाची. उत्पन्नाचें एक मोठें साधन म्हणजे गुलामांचा व्यापार हें असे. त्यामुळें रोमन सैन्यें पूर्वेकडे अगदीं पद्धतशीर गुलामाची शिकार करण्यासाठीं म्हणून चालून जात असत. सैन्याबरोबर जागच्या जागीं गुलाम खरेदी करण्यासाठीं गुलामांचे व्यापारी पण जात असत. प्राचीन लोकांनीं पवित्र मानलेलें डेलॉसचें बेट हें गुलामांच्या बाजारपेठेचें मोठेंच ठिकाण बनलें. तेथें एकेक दिवशीं दहा-दहा हजार गुलामाची खरेदी-विक्री होई. रोमच्या कोलोझियम नांवाच्या अतिप्रचंड अर्ध-वर्तुळाकृति क्रीडागणामध्यें लोकप्रिय रोमन बादशहा एकेका वेळीं बाराबाराशें तरवारबहाद्दरांचे खेळ करवून दाखवीत. हे सर्व गुलाम असत आणि बादशहा व त्याचे लोक यांच्या क्रीडा-कौतुकासाठीं त्यांचा जीव घेतला जायचा असे.

रोमन साम्राज्याच्या काळांत रोमन लोकांची संस्कृति ही अशा प्रकारची होती. आणि तरीसुद्धां आमचा दोस्त गिबन काय लिहितो पहा: "जगामध्यें मनुष्यजाति जास्तींत जास्त सुखी आणि संपन्न जेव्हां होती असा काळ निश्चितपणें दाखवा, असें जर आपण म्हटलें, तर डॉमिशियनच्या मृत्यूपासून कोमोडसच्या राज्यारोहणाच्या काळापर्यंतच्या जो काळ त्याकडेच कोणीही अगदीं निःसंशयपणें बोट दाखवील." हा काळ म्हणजे इसवी सन ९६ पासून १८० या सालापर्यंतच्या चौऱ्यायशीं वर्षांचा काळ आहे. गिबन हा कितीही विद्वान् ग्रंथकार असला तरी या बाबतींत मला तरी वाटतें, कीं बहुतेक साऱ्या लोकांचें मत त्याच्या मताशीं जुळणार नाहीं. तो मनुष्यजाति असा शब्दप्रयोग करतो; परंतु त्याच्या मनांतला अर्थ भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या जगांतील मनुष्यजाति एवढाच असला पाहिजे; कारण हिंदुस्थान, चीन किंवा प्राचीन ईजिप्त यांबद्दल त्याला जवळजवळ कांहींच माहिती असण्याचा संभव नाहीं.

तथापि रोमबद्दलचा माझा हा अभिप्राय कदाचित् थोडा फाजिल कडक झाला असण्याचा संभव आहे. रोमन साम्राज्यातल्या लोकाना कांहीं अंशीं तो शांततेचा काळ लाभला. त्यामुळें मागच्या मानानें हा नवा काळ त्याना खरोखरच सुखकर वाटला असेल. सरहद्दीच्या आंतबाहेर वारंवार लढाया होतच होत्या, तरीही खुद्द साम्राज्याच्या अंतर्भागात, निदान पहिल्या पहिल्या काळीं तरी ज्याला Pax Roman म्हणतात तो रोमन लोकांचा शांततेचा काळच होता. थोडीशी सुरक्षितता होती आणि त्यामुळें व्यापार वाढूं शकत होता. रोमच्या नागरिकत्वाचें क्षेत्र आतां सगळ्या रोमन जगाला मोकळें झालें होतें. परंतु हें मात्र विसरूं नकोस, कीं या नागरिकत्वाशीं बिचाऱ्या गुलामाचा कांहीं संबंध नव्हता! तसेंच सारी सत्ता बादशहाच्या हातीं केंद्रीभूत झाली असून नागरिकांनाही विशेष म्हणण्यासारखे हक्क नव्हते, हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. राजकारणविषयक कसल्याही प्रकारची चर्चा करणें म्हणजे इंपेरेटरचा, बादशहाचा, द्रोह करण्यासारखें समजलें जात असे. वरच्या वर्गाच्या लोकांना मात्र एक प्रकारचा सर्वसाधारण असा कायदा आणि सर्वांना सारखी राज्यव्यवस्था लागू होती. त्यापूर्वीच्या काळीं अनियंत्रित राज्यकारभारामुळें ज्यांचें नुकसान होत असे, अशा लोकांना यांत आपल्याला फारच मोठा फायदा झाला, असें खरेंच वाटलें असेल.

हळूहळू रोमन लोक अतिशयच आळशी बनले आणि स्वतःच्या सैन्यात जाऊन लढण्यालाही निकामी झाले. खेडेगांवांमधील शेतकरी लोक आपल्या डोक्यावर लादल्या गेलेल्या कराच्या ओझ्याखालीं अधिकाधिक दरिद्री झाले; शहरांतल्या लोकांचीही तीच अवस्था झाली. परंतु शहरातल्या लोकांना खूष ठेवण्याचा बादशहाचा प्रयत्न असे; हेतु असा, कीं त्यांनीं कांहीं गडबड उत्पन्न करूं नये. यासाठीं रोममधील लोकांना फुकट अन्न वांटण्यांत येई आणि क्रीडांगणात त्यांना फुकट खेळ दाखविण्यांत येत. अशा रीतीनें त्यांना संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न होई; परंतु हे फुकट अन्नसुद्धा फक्त काहीं थोड्या ठिकाणींच काय तें वांटतां येई; आणि त्यासाठींही ईजिप्तसारख्या परकी देशांतील गुलाम जनतेला दुःख व दैन्य भोगावें लागे. कारण त्यांनाच काहीं किंमत न देता रोमला पीठ पुरवावें लागे.

रोमचे लोक सैन्यांत सामील होण्याची टाळाटाळ करूं लागले, तेव्हां साम्राज्याच्या बाहेरच्या लोकाना–यांना रोमचे लोक बर्बर (Barbarians) म्हणत–सैन्यांत दाखल करून घ्यावें लागलें. अशा रीतीनें रोमन सैन्यें हीं रोमचे जे शत्रू होते त्या बर्बर म्हणजे रोमन लोक ज्यांस असंस्कृत समजत अशा किंवा अशांशीं संबंध अथवा सख्य असणाऱ्या लोकांनींच पुष्कळ अंशीं भरून गेलीं. सरहद्दीवर या बर्बर लोकांच्या टोळ्या नेहमीं रोमन लोकांना आंत रेटण्याचा किंवा त्यांचा बाहेरचा मार्ग बंद करण्याचा प्रयत्न करीतच असत. रोमचें सामर्थ्य जसजसें कमी होत गेलें, तसतसे हे बर्बर लोक अधिकाधिक प्रबळ आणि अधिकाधिक निर्भय होऊं लागल्याचें दिसून येतें. अशी ही पूर्वेकडून संकटाची विशेष धास्ती होती. आणि ही सरहद्द रोमपासून फार लांब

असल्यामुळें तिचें संरक्षण करणें तितकें सोपें नव्हतें. ऑगस्टस सीझरच्या नंतर कॉन्स्टंटाइन नांवाच्या बादशहानें यासाठीं एक नवीनच उपक्रम केला व त्याचे फार दूरवर परिणाम झाले. त्यानें आपल्या साम्राज्याची राजधानीच पश्चिमेकडून पूर्वेकडे बदलली. काळा समुद्र व भूमध्यसमुद्र यांना जोडणारी जी बॉस्फरसची सामुद्रधुनी, तिच्या तीरावर एक बायझांटियम नांवाचें प्राचीन शहर होतें त्याच्याशेजारींच त्यानें एक नवीन शहर वसविलें व त्याला आपल्याच नांवावरून कॉन्स्टांटिनोपल असें नांव दिलें. हेंच कॉन्स्टांटिनोपल शहर – ज्यालाच नवीन रोम असेंही म्हणत – रोमच्या साम्राज्याची राजधानी झालें. आजकालही आशियामध्यें कित्येक जागीं कॉन्स्टांटिनोपललाच – कुस्तुंबियालाच – लोक रूम म्हणजेच रोम म्हणून समजतात.

# ३३

# रोमन साम्राज्य दुभंगतें, आणि अखेरीस त्याची धुळधाण होते

२४ एप्रिल, १९३२

रोमन साम्राज्याची आपली पाहणी आपण आज आणखी पुढें चालवूं या. आपण पाहिलेंच, कीं ख्रिस्ती शकाच्या सुरुवातीलाच इ. स. ३२६ या वर्षी कॉन्स्टंटाइन बादशहानें पूर्वीच्या बायझांटियम शहराच्या जवळ बॉस्फरसच्या सामुद्रधुनीवर कॉन्स्टांटिनोपल हें शहर वसविलें आणि साम्राज्याची राजधानी जुन्या रोममधून काढून त्यानें इतकी दूर या नव्या रोममध्यें आणून स्थापन केली. जरा नकाशा पहा. हें कॉन्स्टांटिनोपल शहर यूरप खंडाच्या अगदीं टोकावर प्रचंड आशिया खंडाकडे तोंड करून उभें राहिलेलें तुला आढळेल. या दोन खंडाना जोडणारा एक प्रकारचा दुवाच हें शहर आहे. आणि समुद्रावरून येणारे निरनिराळ्या दिशांचे पुष्कळ मोठमोठे खुष्कीचे आणि समुद्रावरील वाहतुकीचे व्यापारी मार्ग या शहरांतून जात असत. शहरासाठीं काय किंवा राजधानीसाठीं काय, ही जागा फारच सुंदर आहे. कॉन्स्टन्टाइननें निवड खरोखरच चांगली केली; परंतु त्याला किंवा त्याच्या वंशजांना ही राजधानी बदलल्याचे फार दुर्घट परिणाम भोगावे लागले. कारण पूर्वी जसें जुनें रोम शहर हें आशिया मायनर व इतर पूर्वेकडील देश यांपासून फारच दूर पडलें होतें, तसेंच आतांही पूर्वेकडील राजधानी गॉल किंवा ब्रिटन यांसारख्या देशांपासून फार दूर गेल्याप्रमाणें झाली.

या अडचणीचा परिहार करण्यासाठीं कांहीं काळ जोडीनें दोन बादशहाचा अमल चालू करण्यांत आला. एक जण रोममध्यें बसून राज्य करी आणि दुसरा कॉन्स्टान्टि-नोपलमध्यें. यामुळें साम्राज्याची जवळजवळ प्रत्यक्ष वाटणीच झाल्यासारखी झाली.

एक पूर्वेकडचें साम्राज्य आणि एक पश्चिमेकडील साम्राज्य. रोम ज्या विभागाची राजधानी होतें, त्या पश्चिमेकडील साम्राज्यावर हा खरोखर एक मोठाच आघात होता. आणि या आघातानंतर या बाजूचें साम्राज्य फार काळ जिवंत राहूं शकलें नाहीं. ज्याना या भागांतील लोक रानटी, बर्बर म्हणून म्हणत, त्याच्यापुढें रोमन लोकांना टिकाव धरवला नाहीं. प्रथमतः जर्मन टोळ्यांपैकीं गॉथ लोकांनीं येऊन रोमची लूटमार केली. त्यांच्यामागून व्हँडाल लोक आले; त्यांच्यामागून हूण आले; आणि पश्चिमेकडील रोमन साम्राज्य कोलमडून पडलें. हूण शब्द पुष्कळ ठिकाणीं वापरलेला तुझ्या आढळांत आलेला असेल. जर्मन लोक हे फार निर्दय आणि रानटी आहेत असें दर्शविण्यासाठीं इंग्रज लोक हा शब्द जर्मनाना गेल्या लढाईंत नेहमीं लावीत असत. खरी गोष्ट अशी आहे, कीं लढाईच्या दिवसांत सगळ्याच जणांचीं निदान बहुतेक सगळ्या जणांचीं डोकीं फिरलेलीं असतात, आणि लढाई सुरू होण्याच्या आधींच्या काळीं जी कांहीं सुसंस्कृति अंगीं बाणलेली असते आणि ज्या भल्या चालीरीती शिकलेल्या असतात त्या साऱ्या पार विसरून जाऊन लढाईंत लोक क्रूरपणें आणि रानटी पद्धतीनें वागत असतात. जर्मन लोकांचें असेंच वर्तन झालें; आणि इंग्रज व फ्रेंच लोकाचेंही तशाच प्रकारचें झालें. दोघांमध्यें काळें-गोरें निवडण्यासारखें काहींच नव्हतें.

हूण ही एक आतां फार भयंकर शिवीच होऊन बसली आहे. तीच गत व्हँडाल शब्दाची झालेली आहे. संभव आहे, कीं हे हूण आणि व्हँडाल लोक बरेच क्रूर आणि रानवट असतील आणि त्यांनीं नासधूस बरीच केली असेल; परंतु आपण विसरून चालणार नाहीं, कीं त्यांच्याबद्दलची हकीकत जी आपण वाचतों ती सगळी त्याचे शत्रू जे रोमन लोक त्यांनीं लिहिलेली आहे आणि त्यांनीं ती अगदीं निःपक्षपातीपणानें लिहिली असेल असें मानणें कठिण आहे. एवढी गोष्ट खरी, कीं या गॉथ लोकांनीं, व्हँडालांनीं आणि हूणांनीं रोमचें पश्चिमेकडील साम्राज्य पत्त्याच्या बंगल्यासारखें उडवून लावलें. या लोकांना इतका सहज जय मिळाला याचे एक कारण बहुतेक असें असण्याचा संभव आहे, कीं रोमन साम्राज्यामध्यें रोमन शेतकरी अतिशयच हीन दशेला पोचले होते; अवजड करांच्या ओझ्याखालीं दडपून गेलेले होते आणि कर्जांत बुडून गेले होते. इतकें, कीं कोठचेंही नवीन राज्य किंवा व्यवस्था आली तरी त्याना तें बरें वाटलें असेल, त्यांचें त्यांनीं स्वागतच केलें असेल. उदाहरणार्थ, आजही गरीब बिचारा हिंदी शेतकरी दारिद्र्यानें आणि दैन्यानें इतका गांजला आहे, कीं याहून दुसरी म्हणाल ती राज्यव्यवस्था तो मान्य करील.

अशा रीतीनें पश्चिमेकडील साम्राज्य गडगडलें. त्यानंतर कांहीं शतकानीं पुन्हां एकदां नवीनच स्वरूपात त्याचा उदय व्हायचा होता. पूर्वेकडील रोमन साम्राज्याला सुद्धा या हूणांच्या आणि इतरांच्या हल्ल्यांना तोंड देतां देतां प्रयास पडले; तरी पण तें साम्राज्य टिकून राहूं शकलें. केवळ या हल्ल्यांनाच तोंड देऊन तें जगलें असें नव्हे,

तर दुसऱ्या बाजूलाही कित्येक शतकेंपर्यंत प्रथम आरबांशीं आणि नंतर तुर्कांशीं त्या साम्राज्याला लढत राहावें लागलें आणि त्यांतही त्यानें टिकाव धरला. शेवटीं इ. स. १४५३ मध्यें त्याचा अंत झाला. म्हणजे सुमारें ११०० वर्षें इतक्या आश्चर्य वाटण्याजोग्या दीर्घ काळपर्यंत तें टिकलें. त्याचा अंत उस्मानी किंवा उस्मानली तुर्क लोकांनीं कॉन्स्टांटिनोपल शहराचा पाडाव केला त्या वेळीं झाला. तेव्हांपासून आज सुमारें ५०० वर्षेंपर्यंत कॉन्स्टांटिनोपल शहर—यालाच इस्तंबूल असेंही म्हणतात—हें तुर्कांच्या ताब्यांत आहे. या शहरांतून निघून तुर्कांनीं यूरपवर वारंवार स्वाऱ्या केल्या. एकदां तर ते थेट व्हिएन्नाच्या तटाशीं येऊन भिडले होते. पुढच्या ३-४ शतकात हळूहळू त्यांना मागें रेटण्यांत आलें आणि गेल्या महायुद्धात त्याचा पराभव झाल्यानंतर सुमारें बारा वर्षांपूर्वी कॉन्स्टांटिनोपल शहरही त्यांच्या हातून जाण्याची वेळ आली होती. शहराचा ताबा इंग्रजांकडे गेला होता आणि तेथील सुलतान त्यांच्या हातचें एक खेळणें होऊन राहिलेला होता. परंतु एक श्रेष्ठ नेता, कमाल पाशा, हा त्याच्या संरक्षणार्थ उभा राहिला आणि मोठ्या शौर्यानें लढून त्यानें जयही मिळविला. आज तुर्कस्तानात प्रजासत्ताक राज्य असून सुलतान कायमचा नाहींसा झाला आहे. कमाल पाशा हा या प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्ष आहे. पहिल्याप्रथम पूर्वेकडील रोमन साम्राज्य आणि नंतर तुर्कांचें साम्राज्य अशा दोन्ही साम्राज्यांच्या राजधानीचें वैभव ज्या कॉन्स्टान्टिनोपल शहरानें पंधराशें वर्षें उपभोगिलें, तें कॉन्स्टान्टिनोपल शहर तुर्की राज्याचा एक भाग आजही आहे; परंतु त्या ठिकाणीं आज राजधानी मात्र नाहीं. त्या शहराच्या साम्राज्यशाही परंपरेपासून दूर राहण्याचें ठरवून तुर्कांनीं आपली राजधानी दूर आशिया मायनरमध्यें अंगोरा (अथवा अंकारा) या ठिकाणीं स्थापन केली आहे.

म्हणजे आपण जवळजवळ दोन हजार वर्षांचें अंतर घाईघाईनें तोडलें म्हणावयाचें. आणि कॉन्स्टान्टिनोपल शहराची संस्थापना, मूळची रोम येथील राजधानी बदलून तेथें रोमन साम्राज्याची राजधानी येणें वगैरेसारख्या एकामागून एक होत आलेल्या घडामोडी आपण फारच जलदीनें अवलोकन केल्या. ही राजधानी बदलली त्याचप्रमाणें कॉन्स्टंटाइननें आणखी एक मोठाच नवीन उपक्रम केला. त्यानें स्वतः ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला, आणि तो बादशहा असल्यामुळें स्वाभाविकच रोमन साम्राज्याचा अधिकृत धर्म म्हणजे ख्रिस्ती धर्म असें झालें. काल ज्या पंथाचा छळ होत होता, तो आज एकदम मोठ्या साम्राज्याचा अधिकृत धर्म झाला; ख्रिस्ती धर्माच्या परिस्थितींत एकाएकीं झालेला हा बदल किती चमत्कारिक आहे—त्या काळींही तो केवढा आश्चर्यकारक वाटला असला पाहिजे! मात्र हा बदल कांहीं काळपर्यंत ख्रिस्ती धर्माला तसा विशेष सुखाचा झाला नाहीं. निरनिराळ्या धर्मपंथांमध्यें या सुमारास भांडणें सुरू झालीं आणि शेवटीं त्यांच्यामधील दोन अत्यंत मोठे गट म्हणजे एक ग्रीक आणि दुसरा लॅटिन गट यांची एकमेकापासून मोठ्या प्रमाणांत कायमची फारकत झाली. लॅटिन गटाचें प्रमुख पीठ रोममध्यें होतें; रोमचा बिशप हा या गटाचा प्रमुख

समजला जाई. यालाच पुढें रोमचा पोप असें म्हणूं लागले. ग्रीक लोकांचें प्रमुख पीठ कॉन्स्टान्टिनोपल येथें राहिलें. लॅटिन धर्मसंस्थेचा ( चर्चचा ) फैलाव सगळ्या उत्तर आणि पश्चिम यूरपभर झाला आणि त्याला रोमन कॅथॉलिक चर्च असें नांव मिळालें. ग्रीक चर्चला सनातन चर्च ( Orthodox church ) असें म्हणूं लागले. पूर्वेकडील रोमन साम्राज्याचा पाडाव झाल्यानंतर या सनातन चर्चचा अमल व प्रसार ज्या ठिकाणीं चालू राहिला, असा रशिया हा एक देश मुख्यतः होता. आतां रशियामध्ये बोल्शेविझम् झाल्यानंतर या धर्मपीठाला किंवा इतर कोणत्याच धर्मपीठाला या देशांत अधिकृत स्थान नाहीं.

पूर्वेकडील रोमन साम्राज्य असे शब्द मी वापरतों आहे खरा; परंतु या साम्राज्याशीं रोमचा संबंध जवळजवळ कांहींच नव्हता. त्यामध्यें भाषा वापरीत ती सुद्धां लॅटिन नव्हती, तर ग्रीक. एका अर्थी ॲलेक्झांडरचें ग्रकि साम्राज्यच या नव्या नांवाखालीं चालू होतें असें बहुतांशीं म्हणतां येईल. पुष्कळ काळपर्यंत पश्चिमेकडील देशांच्या स्वातंत्र्याचा हक्क हें साम्राज्य मान्य करण्यास तयार नव्हतें ; तरी पश्चिमेकडील यूरपशीं या साम्राज्याचा जवळजवळ कांहीं संबंध राहिलेला नव्हता आणि तरी सुद्धां हें साम्राज्य रोमन या शब्दाला घट्ट चिकटून राहिलेलें होतें. त्यामधील लोकांना सुद्धां रोमन लोकच म्हणत; जणुं रोमन या शब्दांत कांहीं विशेष जादूच असावी ! याहूनही आश्चर्याची गोष्ट म्हणजे रोम शहरामधून साम्राज्याच्या प्रमुख पदाचें वैभव जरी नाहींसें झालें, तरी ही त्याची जगांतील छाप कांहीं नाहींशी झाली नाहीं. तें शहर जिंकण्यासाठीं चालून आलेले रानटी बर्बरादि लोक सुद्धां त्याच्यापुढें थोडेसे थबकले आणि त्याचा त्यांनींही मान राखला. मोठ्या नांवामध्यें असें कांहीं चमत्कारिक सामर्थ्य असतें ; आणि कल्पनांचें सामर्थ्यही हें इतकें प्रभावी असतें ! दुसरें काय !

एक साम्राज्य नष्ट झालें, तेव्हां रोमनें राहिल्यासाहिल्यांतूनच नवीन प्रकारचें दुसरें एक साम्राज्य उभें करण्यास सुरुवात केली. जीझसचा पीटर नांवाचा शिष्य प्रथम रोममध्यें आला व तोच रोमचा पहिला बिशप झाला असें म्हणतात. पुष्कळ खिस्ती लोकांच्या मनांत त्यामुळें रोमबद्दल एक विशेष पावित्र्याची भावना निर्माण झाली आणि रोमच्या बिशपच्या स्थानाला एक विशेष महत्त्व प्राप्त झालें. सुरुवातीला रोमचा बिशप हा इतर ठिकाणच्या बिशपांहून कांहीं वेगळा नव्हता. परंतु रोममधून बादशहांचें वास्तव्य कॉन्स्टान्टिनोपलमध्यें गेल्यानंतर या बिशपचें महत्त्व वाढलें. त्याच्यापेक्षां मोठें मग तेथें कोणी राहिलें नाहीं आणि मग पीटरच्या पीठाचा वारस या नात्यानें सर्व बिशपांचा प्रमुख असें त्याला मानण्यांत येऊं लागलें. पुढें त्याला पोप म्हणूं लागले. आजही पोपची परंपरा चालू आहे आणि पोपलाच रोमन कॅथॉलिक धर्मपीठाचा प्रमुख समजतात हें तुला माहीतच आहे.

रोमन धर्मपीठ आणि ग्रीक सनातन धर्मपीठ यांच्यामधील फुटीचें एक कारण मूर्तीचा उपयोग करण्याबद्दलचा मतभेद हें होतें, हें पाहून तुला मोठेंच आश्चर्य वाटेल.

रोमन धर्मपीठाचें साधूंच्या प्रतिमांच्या, विशेषतः जीझसची आई मेरी हिच्या प्रतिमेच्या पूजनाला प्रोत्साहन होतें, तर ग्रीक धर्मपीठाचा या गोष्टीला प्रबल विरोध होता.

रोम शहर काबीज केल्यावर पुष्कळ पिढ्यांपर्यंत उत्तरेकडील टोळयांच्या नायकांचेंच राज्य रोममध्यें चालू असून रोम शहरही त्यांच्याच ताब्यांत होतें. परंतु पुष्कळ प्रसंगीं ते सुद्धां कॉन्स्टान्टिनोपलच्या बादशहाचें अधिराज्य मान्य करीत असत. दरम्यान धर्मपीठाचा प्रमुख या नात्यानें रोमच्या बिशपची सत्ता वाढतच होती; शेवटीं ती इतकी वाढली, कीं कॉन्स्टान्टिनोपलची सत्ता नाकारण्याची शक्यता त्याला वाटूं लागली आणि प्रतिमापूजनाची ही भानगड जेव्हां उपस्थित झाली, तेव्हा त्यानें रोमचा व पूर्वेच्या साम्राज्यशाहीचा संबंध अजीबात तोडून टाकला. या दरम्यानच्या काळांत आणखी किती तरी घडामोडी झालेल्या आहेत. उदाहरणार्थ, याच काळांत अरबस्तानांत नवीनच इस्लामधर्म उदयास आला. या अरबांनीं सर्व उत्तर आफ्रिका व स्पेन यांवर आक्रमण केलें; उत्तर आणि पश्चिम यूरपमध्यें नवीन राज्यांची स्थापना होत गेली आणि पूर्वेकडील रोमन साम्राज्यावर अरबांचा अत्यंत भयंकर हल्ला सुरू झाला; वगैरे वगैरे कितीक घटना. परंतु त्याबद्दल आपणांस पुष्कळ जें बोलायचें तें आज नव्हे; पुढें केव्हां तरी.

उत्तरेकडील जर्मन टोळयांमध्यें फ्रँक नांवाची एक टोळी होती. या लोकांतील एका मोठ्या नायकाचें साहाय्य पोपनें मागितलें आणि पुढें कांहीं काळानंतर या फ्रँक लोकांच्या कार्ल् किंवा चार्लस् नांवाच्या पुढाऱ्याला रोमच्या बादशहाच्या गादीवर बसविण्यांत आलें. खरोखर, हें आतां एक अगदींच नवीन साम्राज्य किंवा राज्य होतें. परंतु त्याला रोमन साम्राज्य हेंच नाव रूढ झालें आणि पुढें त्यालाच पवित्र रोमन साम्राज्य असें म्हणूं लागले. रोमन या विशेषणाशिवाय साम्राज्य असूंच शकणार नाहीं, अशीच जणुं या लोकांची भावना होती; आणि म्हणूनच शार्लेमेन बादशहाचा – यालाच चार्ल्स् दि ग्रेट असें म्हणतात – रोमशीं कांहीं संबंध नव्हता, तरी सुद्धां त्याला हे लोक इंपेरेटर, सीझर, ऑगस्टस या नांवानें ओळखूं लागले. हें नवें सम्राज्य म्हणजे मूळचेंच रोमन साम्राज्य पुढें चालू होतें असें समजत. मात्र त्याच्या नांवांत एक भर तेवढी पडली. हें साम्राज्य आतां Holy म्हणजे पवित्र झालें होतें. पोप हा आतां God-father, धर्मपिता झाला होता, म्हणून तें साम्राज्य एक खास ख्रिस्ती साम्राज्य झालें होतें; हें त्याला आतां पवित्रपण येण्याचें कारण.

यामध्येंही कल्पनांचें सामर्थ्य किती आश्चर्यकारक असतें, हेंच तुला पुन्हां दिसून येईल. त्याचमुळें मध्य यूरपात राहणारा मूळचा फ्रँक अथवा जर्मन मनुष्य स्वतःला रोमन बादशहा म्हणवूं लागतो. या पवित्र रोमन साम्राज्याचा पुढचा इतिहास याहूनही आश्चर्यकारक आहे. साम्राज्य म्हणून पाहिलें तर त्याला फारसें अस्तित्व कांहीं उरलें नाहीं. पूर्वेकडचें रोमन साम्राज्य तिकडे चांगला सुरळीत अमल चालवीत होतें. पण या पश्चिमेकडील साम्राज्यांत मात्र पुष्कळच घडामोडी झाल्या. मधून मधून तें नाहींसेंही

होई आणि पुन्हा उदयास येई. तें आतां साम्राज्य राहिलें नव्हतें. तर साम्राज्याचें भूत किंवा पिशाच जणुं तें झालें होतें; आणि रोमचें नांव आणि ख्रिस्ती धर्म यांच्या पतीच्या जोरावर नुसतें नाव सागण्यापुरतें तें टिकून राहिलें होतें. तें एक कल्पनेंतलें साम्राज्य होतें; प्रत्यक्षांत त्याला कांहीं अस्तित्व राहिलें नव्हतें. एका लेखकानें – मला वाटतें तो बहुधा व्हॉल्टेअरच असावा – या पवित्र रोमन साम्राज्याची गमतीची व्याख्या केली आहे. तो म्हणतो, " पवित्र रोमन साम्राज्य म्हणजे असें एक कांहीं तरी, कीं जें पवित्र नाहीं, रोमनही नाहीं आणि साम्राज्य तर त्याहूनही नाहीं!" दुर्दैवानें ज्या सिव्हिल सर्व्हिसचा छळ, जाच, अद्यापही या देशात आमच्या पाठीमागचा सुटला नाहीं, त्या इंडियन सिव्हिल सर्व्हिसची अशीच कोणीशी व्याख्या केली आहे; हा व्याख्याकार म्हणतो, कीं इंडियन म्हणजे हिंदी नाहीं, आणि सिव्हिल म्हणजे नम्र किंवा सोज्वळ नाहीं, आणि सर्व्हिस म्हणजे सेवाप्रवण नाहीं, ती इंडियन सिव्हिल सर्व्हिस!

तेव्हा प्रत्यक्षांत या पवित्र रोमच्या साम्राज्याचें स्वरूप कसाही प्रकारचें असो, या नावानें तें सुमारें एक हजार वर्षे चालू राहिलें. अखेरीस शंभर-एक वर्षांपूर्वी नेपोलियनच्या काळीं तें नाहींसें झालें. त्याचा अंत होतांना विशेष लक्षांत येण्यासारखें किंवा चमत्कृतिमय असें कांहींच घडलें नाहीं. खरें म्हटलें तर प्रत्यक्षात असें एखादें राज्य किती दीर्घ काळापासून मुळीं अस्तित्वातच नव्हतें. तेव्हा आता तें कायमचें नाहींसें केव्हां झालें, असें कोणाच्या फारसें लक्षांत सुद्धां आलें नसेल. हें पिशाच त्या वेळीं एकदांचें गाडलें गेलें तर खरेंच; परंतु तें कायमचें गाडलें गेलेलें दिसत नाहीं. कायसर, झार अशा भिन्न भिन्न रूपांनीं तें पुनः पुनः डोकें वर काढतेंच आहे. चौदा वर्षांपूर्वी महायुद्धांत मात्र यापैकीं बहुतेक पिशाचांना शात करून गाडून टाकण्यांत आलें आहे.

## ३४

# जागतिक राज्याची कल्पना

२५ एप्रिल, १९३२

मला वाटतें, माझ्या या पत्रांमुळें पुष्कळदां तुला कंटाळल्यासारखें होत असेल, तर पुष्कळदां तुझ्या मनाचा गोंधळ उडून जात असेल. विशेषतः रोमन साम्राज्या-विषयींच्या माझ्या गेल्या दोन पत्रांनीं तर तुझी विशेषच तारांबळ केली असेल. त्या पत्रांमध्यें मीं हजारों वर्षांवरून मागे-पुढें उड्या मारल्या आहेत आणि हजारों मैलाचा प्रदेश इकडून तिकडे ओलांडला आहे. त्यामुळें कशाचा कांहीं थांगपत्ताच तुला लागेनासा झाला असला तर त्यांत सारा दोष माझा आहे. म्हणून तूं नाउमेद होऊं नकोस. अशीच पुढें वाचीत जा. कुठें कुठें मीं लिहिलेलें तुझ्या नीटसें ध्यानांत आलें नाहीं तरी त्याची

फिकीर करूं नकोस, तर तशीच पुढें वाचीत रहा. हीं पत्रें कांहीं तुला इतिहासाचें बिन-चूक परिपूर्ण ज्ञान देण्यासाठीं लिहिलेलीं नाहींत; तर इतिहासाचें ओझरतें दर्शन तुला करवावें आणि त्या संबंधांत तुझी जिज्ञासा जागृत करावी एवढाच त्यांचा हेतु आहे.

या रोमन साम्राज्यांचा मात्र आतां तुला कांहींसा कंटाळा आला असेल. निदान मला तरी आला आहे खास. तरी पण आजच्या दिवस आपण त्यांचा सहवास सहन केला पाहिजे. मग आपण त्यांची कांहीं काळ रजा घेऊं.

राष्ट्रीयत्व, देशभक्ति – म्हणजेच आपल्या स्वतःच्या देशाबद्दलचें प्रेम – याबद्दल आजकाल फार मोठमोठ्या गोष्टी बोलल्या जात असतात, हें तूं पाहिलेंच असशील. आज हिंदुस्थानात तर आम्ही बहुतेक सर्व जण अगदीं कट्टे राष्ट्रवादीच आहों. हा राष्ट्रवाद ही एक जगांतलि नवीन चीज आहे. आणि तिचा उगम व वाढ यांबद्दल या पत्रांमधून पुढें आपण बहुधा विचार करूंच. रोमन साम्राज्याच्या वेळीं मात्र अशा प्रकारची भावना अस्तित्वांत नव्हती. तें साम्राज्य म्हणजे सगळ्या जगावर अमल गाजविणारें एक अधिराज्य अशीच कल्पना होती. खरें म्हणजे साऱ्या जगावर राज्य असणारें एक साम्राज्य असें आजपर्यंत केव्हांच झालेलें नाहीं. परंतु भूगोलाचें अज्ञान, मालवाहतुकी-मधील आणि दूरदूरच्या अंतराच्या प्रवासांमधील प्रचंड अडचणी यांमुळें प्राचीन काळीं लोकाना असें राज्य अस्तित्वांत आहे, असें वाटे मात्र. उदाहरणार्थ, यूरपमध्यें भूमध्य-समुद्राच्या आसपास रोमचें एक छोटेंसें राज्य प्रथम होतें; अद्यापि त्याचें साम्राज्यही वाढलें नव्हतें; त्या वेळीं सुद्धां हें एक इतर सर्वांहून श्रेष्ठ असें राज्य असून बाकीचीं राज्यें त्याच्या अधिराज्याखालचीं आहेत, अशी समजूत होतीच. या राज्याची प्रतिष्ठा एवढी वाढलेली होती, कीं आशिया मायनरमधील ग्रीकांचें पेरगॅमम प्रदेशांतील राज्य आणि ईजिप्तचें राज्य येथील राज्यकर्त्यांनीं आपण होऊन आपलीं राज्यें रोमन लोकांना बहाल केलीं; नजराणा म्हणून अर्पण केलीं. त्यांना रोमचें राज्य हें एक सर्वसत्ताधीश आणि अजिंक्य राज्य आहे असें वाटलें. पण खरी गोष्ट मीं तुला सांगितलीच आहे, कीं भूमध्यसमुद्राच्या लगतच्या देशांहून फारशा मोठ्या प्रदेशावर रोमचें राज्य कधींच नव्हतें. उत्तर यूरपमधील बर्बर (रानटी) लोकांनीं रोमची सत्ता कधींच कबूल केली नाहीं, आणि रोमनेंही त्यांचा पाडाव करण्याची कधीं खटपट केली नाहीं. परंतु रोमच्या राज्याचा विस्तार केवढाही असो, तें एक सर्व जगाचें राज्य आहे, अशी त्याच्यामागची कल्पना होती आणि पश्चिमेकडील त्या काळच्या लोकांनीं ही कल्पना मान्य केली होती. या कारणामुळेंच रोमन साम्राज्यें इतक्या दीर्घ काळपर्यंत टिकून राहिलीं आणि त्यांच्यांत अंगचें त्राण कांहीं शिल्लक राहिलेलें नव्हतें, तरीही त्यांचा नांवलौकिक आणि प्रतिष्ठा फार मोठी राहिली.

साऱ्या जगावर प्रभुत्व गाजविणाऱ्या एक साम्राज्याची कल्पना एकट्या रोममध्येंच होती असें नव्हे. प्राचीन काळीं ही कल्पना चीनमध्यें आणि हिंदुस्थानांतही असलेली आढळते. तुला माहीतच आहे, कीं चीनचें राज्य हें पुष्कळ काळ रोमच्या

साम्राज्यापेक्षा किती तरी मोठें होतें आणि त्याचा विस्तार थेट कास्पियन समुद्रापर्यंत पसरलेला होता. चीनच्या बादशहाला स्वर्गपुत्र (किंवा देवपुत्र) अशी संज्ञा असे आणि चिनी लोक त्याला सर्व जगताचा स्वामी मानीत. आतां या बादशहाला त्रास देणाऱ्या आणि त्याचें राज्य न मानणाऱ्या कांहीं टोळ्या अवश्य होत्या. पण रोमन लोक उत्तर यूरपमधील लोकांना 'रानटी' म्हणत त्याप्रमाणें चिनी लोकांच्या दृष्टीनेंही या टोळ्या रानटी, असुधारलेल्या होत्या.

अशाच प्रकारें हिंदुस्थानांतही अगदीं प्राचीनतम काळापासून चक्रवर्ती राजांचा — जागतिक राज्यकर्त्यांचा — उल्लेख आपल्याला आढळतो. अर्थात् त्यांच्या कल्पनेंतलें जग हें स्वाभाविकच एक प्रकारें फार संकुचितच होतें. हिंदुस्थानचाच विस्तार इतका मोठा होता, कीं हिंदुस्थान म्हणजेच सारें जग असें त्यांना वाटे; आणि ज्याचें अधिराज्य हिंदुस्थानवर असेल तो साऱ्या जगाचा स्वामी असें ते मानीत. याच्या बाहेरचे लोक म्हणजे रानटी, असुधारलेले; त्यांनाच ते म्लेंच्छ म्हणत. ज्याच्या नांवावरून आपल्या देशाला भारतवर्ष हें नांव प्राप्त झालें आहे तो पुराणकाळांतील भरत राजाही चक्रवर्ती होता, असेंच मानण्याची परंपरा आहे. महाभारतांत सांगितल्या-प्रमाणें युधिष्ठिर व त्याचे बंधू यांनींही जगताचें अधिराज्य मिळविण्यासाठीं लढाया केल्या. अश्वमेध यज्ञ म्हणजे अशा प्रकारच्या जागतिक अधिराज्याचें इतरांना आव्हानच होतें. हा यज्ञ करणें म्हणजे अशा अधिराज्यत्वाचें एक चिह्न होतें. पश्चात्ताप होऊन अशोकानें युद्धच अजीबात बंद केलें, पण त्याच्यापूर्वी त्याचाही हाच हेतु असावासें दिसतें. पुढच्या काळांत गुप्तांसारख्या हिंदुस्थानांतील सम्राटांचीही हीच मनीषा होती हें पुढें तुला दिसेलच.

तेव्हां तात्पर्य काय, कीं प्राचीन काळीं लोकांच्या मनांत जागतिक राज्यें आणि सर्व जगाचें सम्राट्पद अशा कल्पनाच बहुतेक सर्वत्र होत्या. यानंतर पुष्कळच काळ लोटल्यावर राष्ट्रवादाची कल्पना उद्भवली आणि अगदीं अलीकडे नव्याच प्रकारच्या साम्राज्यवादाची कल्पना निघाली, आणि या दोन कल्पनांनीं मिळून साऱ्या जगांत हवा तेवढा अनर्थ माजवून ठेवलेला आहे. अलीकडे पुन्हां एकदां लोक आणखी एका जागतिक राज्याची भाषा बोलूं लागले आहेत; पण ही कल्पना, आधुनिक पद्धतीचेंच पण फार मोठें साम्राज्य किंवा एका राज्याचें अथवा पृथ्वीपरतीचें सर्व जगावर अधिराज्य अशा प्रकारची नाहीं. तर सर्व जगाचें मिळून एक प्रजासत्ताक राज्य असावें आणि त्याच्या स्थापनेमुळें एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राची किंवा एका वर्गानें दुसऱ्या वर्गाची पिळणूक करणें अशक्य व्हावें, अशी ही कल्पना आहे. नजिकच्या भविष्य-काळांत यासारखें कांहीं घडून येईल कीं नाहीं हें सांगणें कठिण आहे. परंतु जगाची आज जी आहे ही अवस्था रोगग्रस्त अशी आहे आणि या आजारांतून त्याला मुक्त करायला या कल्पनेवांचून दुसरा कांहीं उपाय नाहीं.

उत्तर यूरपांतील बर्बर म्हणजे रानटी लोकांचा मीं पुनः पुनः उल्लेख ' रानटी ' अशा रीतीनें केला आहे. या लोकांना रोमन लोकांनीं हें नांव दिलेलें आहे म्हणूनच केवळ तें नांव मी वापरतों.

मध्य आशियांतील फिरत्या किंवा इतर टोळयांप्रमाणें हे लोकही थोडेसे सुधारणेंत आपल्या रोमन किंवा हिंदी शेजाऱ्यांपेक्षां मागें होते हें खरें; परंतु मोकळया हवेंतच सदैव राहत असल्यानें ते अधिक शरीरसामर्थ्यवान् होते. पुढें त्यांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. आणि त्यांनीं पुढें रोमचें साम्राज्य जिंकलें त्या वेळीं प्रत्येकच प्रसंगीं किंवा प्रत्येकच ठिकाणीं त्यांनीं तेथील लोकांशीं शत्रूप्रमाणें निर्दय वर्तन केलें असें कांहीं नव्हे. आधुनिक यूरपांतील राष्ट्रांचा उदय गॉथ, फ्रँक अशांसारख्या यांच्या टोळयांमधूनच झालेला आहे.

रोमच्या बादशहांचीं नांवें मी तुला सांगत बसलों नाहीं. रोमच्या इतिहासांत या बादशहांची मोठी खेंच गर्दी आहे. आणि त्यातले बहुतेक कोणी नांव घेण्यासारखे नाहींत. पुष्कळसे बादशहा दुर्जनच होते. कांहीं कांहीं तर पापी राक्षसच होते. नीरोचें नांव तूं बहुतेक ऐकलेलें असशील. परंतु त्यांच्याहून किती तरी वाईट असलेले महापुरुष यांच्यामध्यें होऊन गेले आहेत. आयरीन नांवाच्या बाईनें तर स्वतः सम्राज्ञी होण्याच्या अभिलाषेनें आपल्या प्रत्यक्ष मुलाचा तो बादशहा असतांना खून केला; ही गोष्ट कॉन्स्टान्टिनोपलमधली आहे.

एक रोमन बादशहा मात्र बाकीच्या इतरांहून फार श्रेष्ठ होऊन गेला, त्याचें नांव मार्कस् ऑरेलियस ॲटोनिनस. तो तत्त्वज्ञ होता अशी समजूत आहे; त्याचे विचार व अनुभूति यांचा एका ग्रंथांत संग्रह केलेला असून तो ग्रंथ चांगला अभ्यास करण्यासारखा आहे. पण या मार्कस् ऑरेलियसनें अशा रीतीनें या बादशहांच्या मालिकेंत स्वतः गुणी होऊन जें एक प्रकारचें पापच केलें, त्याची भरपाई त्याच्या पाठीमागून गादीवर आलेल्या त्याच्या मुलानेंच केली. साऱ्या रोमच्या इतिहासात इतका पाजी, नीच इसम दुसरा कोणीही झाला नसेल.

रोमन साम्राज्याच्या पहिल्या तीनशें वर्षांच्या काळांत रोम शहर हें पाश्चिमात्य जगाचें केंद्र होतें. त्या वेळीं तें फार श्रेष्ठ शहर असलें पाहिजे; त्याच्यामध्यें प्रचंड इमारती असाव्या, सर्व साम्राज्यातून आणि त्याच्याही पलीकडून लोक तेथें येत असावे. जहाजेंच्या जहाजें भरून दूर दूर देशांतून नानाविध सुंदर पदार्थ, खाद्यपेयें आणि कापडचोपड तेथें येई. असें म्हणतात, कीं तांबड्या समुद्रांतील ईजिप्तच्या एका बंदरांतून दर वर्षी १२० जहाजांचा एक काफिला हिंदुस्थानकडे जाई. पावसाळी वाऱ्याचा फायदा मिळावा अशा नेमाच्या हिशेबानें ते निघत असत आणि त्याची त्यांना फार मदत होई. सामान्यतः ते दक्षिण हिंदुस्थानकडेच जात. अत्यंत मौल्यवान् माल भरून पुन्हां अनुकूल वारा मिळतांच हीं जहाजें ईजिप्तला परत जात. ईजिप्तमधून हा माल खुष्कीच्या मार्गानें रोममध्यें पाठविला जाई.

पण हा सर्व व्यापार बहुतांशीं श्रीमंतांच्या फायद्यासाठींच होता. थोड्या लोकांच्या चैनीच्या मागें पुष्कळांचें दैन्य लपलेलें होतें. तीनशें वर्षेंपर्यंत रोम हें अशा रीतीनें पश्चिमेकडे एकमेव श्रेष्ठ पद उपभोगीत होतें. पुढें कॉन्स्टान्टिनोपल शहराची स्थापना झाल्यावर त्याच्या श्रेष्ठत्वांत कॉन्स्टान्टिनोपलला पण भागीदारी मिळाली. प्राचीन ग्रीसनें आपल्या अगदीं अल्पकालीन अमदानीमध्यें विचारक्षेत्रांत केवढी महत्त्वाची भर घातली; परंतु रोमची अमदानी इतकी दीर्घकाळ चालूनही त्याच्या हातून या क्षेत्रांत म्हणण्यासारखें महत्त्वाचें कांहींच कार्य झालें नाहीं, हीं मात्र मोठी विचित्र गोष्ट आहे. तसें पाहिलें तर रोमन संस्कृति म्हणजे पुष्कळ बाबतींत हेलनिक संस्कृतीची निव्वळ अंधुक छाया मात्र होती. एका बाबतींत मात्र रोमनें नवीनच पुढाकार घेतला असें मानतात. तो म्हणजे कायद्याच्या क्षेत्रांत. आज पश्चिमेकडे वकिलांना रोमन कायद्यांचा अभ्यास करावा लागतो; कारण यूरपमधील बहुतेक साऱ्या कायद्यांचें मूळ रोमन कायद्यांमध्यें आहे.

ब्रिटिश साम्राज्य हें रोमन साम्राज्यासारखें आहे असें मानलें जातें. विशेषतः इंग्रजांची अशी समजूत आहे आणि त्याबद्दल त्यांना मोठें समाधान वाटत असतें. तसें पाहिलें तर सगळींच साम्राज्यें थोड्याफार प्रमाणांत एकमेकांसारखीं असतात. पुष्कळांची पिळणूक करूनच तीं पुष्ट होत असतात. पण याहून आणखी एक मोठें प्रबळ साम्य इंग्लिश आणि रोमन लोकांमध्यें आहे; दोघांच्याही ठिकाणीं कल्पनाशक्तीचा विशेषच आश्चर्यकारक अभाव आहे. राहणी मोठी टापटिपीची, मनानें आपलें जें आहे तेवढ्यावरच संतुष्ट; आणि सारें जग जणुं कांहीं खास आपल्याच उपयोगासाठीं आहे अशी पक्की श्रद्धा; अशा या लोकांच्या जीवितांत कधीं म्हणून संशयाच्या किंवा अडचणीच्या लाटांची खळबळ क्षणमात्रही उत्पन्न होत नाहीं.

## ३५

# पार्थिया आणि सस्सन लोक

*२६ एप्रिल, १९३२*

रोमचें साम्राज्य आणि यूरप यांची रजा घेऊन आपल्याला आतां जगाच्या इतर भागांना भेट द्यायला गेलें पाहिजे. इकडे आशियांत काय घडलें हें आपल्याला पाहिलें पाहिजे आणि चीन व हिंदुस्थान यांची गोष्ट पुढें सांगितली पाहिजे. ज्ञात इतिहासाच्या प्रांतांत आतां यामध्यें दुसऱ्या आणखी देशांचा उदय होतो. त्यांच्याबद्दलही थोडें थोडें बोलणें आपल्याला करायला हवें. अशा रीतीनें पुढें जात असतां खरोखर इतक्या पुष्कळ ठिकाणांबद्दल लिहिण्याचा प्रसंग येणार आहे, कीं आपल्याला कांहीं हें काम

जमत नाहीं म्हणून निराशेनें मी लिहिण्याचेंच बंद करीन कीं काय अशी मला भीति वाटते.

माझ्या एका पत्रामध्यें पार्थिया देशांत कऱ्हा येथें रोमच्या प्रजासत्ताक राज्याच्या सैन्याचा मोठा पराभव झाला असा उल्लेख मीं केला आहे. हे पार्थियन लोक कोण, कुठले आणि आज जेथें इराण आणि मेसापोटेमिया आहेत त्या प्रदेशांत त्यांनीं एक राज्य कसें स्थापन केलें होतें, हें मात्र तुला सांगण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं. ॲलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याचा सेनापति सेल्युकस व त्याचे वंशज यांचें एक साम्राज्य हिंदुस्थानपासून पश्चिमेकडे आशिया मायनरपर्यंत पसरलेलें होतें हें तुला आठवत असेल. सुमारें ३०० वर्षेपर्यंत त्यांचा अमल चालू होता. परंतु अखेरीस मध्य आशियांतील पार्थियन नांवाच्या एका टोळीच्या लोकांनीं त्यांना या प्रदेशांतून हुसकून लावलें. इराणला त्या वेळीं पर्शिया किंवा पार्थिया (पृथुराष्ट्र) म्हणत. तेथें या पार्थियन लोकांनींच रोमन प्रजासत्ताक राज्याच्या अखेरच्या काळांत रोमन लोकांचा पराभव केला; आणि मागून आलेल्या रोमन साम्राज्यालाही या पार्थियन लोकांचा पुरा पराभव केव्हांच करतां आला नाहीं. या लोकांचें राज्य पार्थियामध्यें अडीचशें वर्षें चाललें. पुढें अखेरीस आपसांतील यादवीमुळें त्यांचें राज्य तेथून नाहींसें झालें. पार्थियांतील इराणमधील मूळचे जे लोक होते त्यांनींच या परकी राज्यकर्त्यांविरुद्ध बंड केलें. आपल्याच वंशांतील व धर्मांतील एकाची त्यांच्या जागीं त्यांनीं स्थापना केली. हाच पहिला आर्देशीर राजा होय व त्याच्या घराण्याला सस्सन राजवंश म्हणतात. आर्देशीर हा झोरोॲस्ट्रियन धर्माचा, म्हणजेच पारशी लोकांच्या धर्माचा कट्टा पुरस्कर्ता होता आणि हे सस्सन लोक आणि रोमन लोक यांच्यामध्यें अगदीं सतत युद्ध जुंपलेलें होतें. एका रोमन बादशहाला त्यांनीं पकडून सुद्धां आणलें होतें. पुष्कळ पार्थियन सैन्यें अगदीं थेट कॉन्स्टान्टिनोपलपर्यंत सुद्धां जाऊन पोंचलीं होतीं. एकदा त्यांनीं ईजिप्त देश जिंकला होता. सस्सनांचें साम्राज्य हें झोरोॲस्ट्रियन धर्माबद्दलच्या निष्ठेसाठीं विशेष प्रसिद्ध आहे. पुढें सतराव्या शतकांत इस्लाम धर्माचा उदय झाला. तेव्हां त्यानें सस्सन साम्राज्य आणि त्याचा अधिकृत धर्म या दोघांचाही नाश केला. देशांतील धर्मांत झालेल्या या बदलामुळे व छळ होण्याच्या भीतीनें कितीएक झोरो-ॲस्ट्रियन लोकांनीं देशत्यागाचा मार्ग पत्करला आणि ते हिंदुस्थानांत आले. जे जे कोणी आसऱ्याला आले, त्यांचें हिंदुस्थान आजपर्यंत नेहमींच स्वागत करीत आला आहे. त्याप्रमाणें त्यांचेंही त्यानें स्वागत केलें. हिंदुस्थानांतले आजचे पारशी लोक हे त्याच झोरोॲस्ट्रियन लोकांचे वंशज होत.

निरनिराळ्या धर्मांची इतर देशांत कशी संभावना झाली आणि त्यांची हिंदुस्थानांत कशी संभावना झाली या गोष्टीची तुलना केली असतां मोठा चमत्कार वाटतो; आणि हिंदुस्थानचा कांहीं एक विशेष स्वभाव नजरेंत भरतो. बहुतेक सर्व ठिकाणीं आणि विशेषतः यूरपमध्यें पूर्वी अधिकृत धर्माचा स्वीकार जे कोणी करीत नसत, ते इतर

कोणत्याही मताचे असले तरी त्या सर्वांना अत्यंत असहिष्णुतेनें वागविण्यांत येई व त्यांचा फार छळ होई असें तुला आढळून येईल. धर्माबद्दल सर्वत्रच जवळजवळ सक्तीचा अवलंब केला जात असे. यूरपमध्यें अत्यंत भयंकर असा जो इन्क्विझिशनचा (धार्मिक शिक्षासत्रांचा) प्रकार होता त्याबद्दल आणि चेटक्या म्हणून स्त्रियांना जाळण्याची जी पद्धति होती तीबद्दल पुढें तूं इतिहासांत वाचशीलच. परंतु हिंदुस्थानांत मात्र प्राचीन काळीं धर्माबद्दल पूर्ण सहिष्णुता नांदत होती. हिंदुधर्म व बुद्धधर्म यांच्यामध्यें थोडासा विरोध झाला हें खरें; परंतु पश्चिमेकडील निरनिराळ्या धर्मपंथांतील अत्याचारपूर्ण झगड्यांच्या मानानें हा विरोध म्हणजे कांहींच नव्हे, ही गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. कारण अलीकडे आपल्या देशांत धार्मिक आणि जातीय तंटे सुरू झाले आहेत; आणि इतिहासाच्या अज्ञानामुळें कांहीं लोकांची समजूत अशी आहे, कीं हिंदुस्थानच्या नशिबाला हे असले झगडे थेट प्राचीन काळापासून लागलेले आहेत. तुला आढळून येईल, कीं इस्लामच्या उदयानंतर कितीक शतकेंपर्यंत मुसलमान लोक हिंदुस्थानांत सर्व प्रांतांत आपल्या हिंदू शेजाऱ्यांबरोबर अत्यंत गुण्यागोविंदानें राहत होते. व्यापार करायला म्हणून मुसलमान लोक इकडे आले तेव्हां या देशांतील लोकांनीं त्यांचें स्वागतच केलें आणि त्यांना येथें वसाहत करायला प्रोत्साहन दिलें. परंतु पुन्हां मी फार पुढच्या काळच्या गोष्टी सांगायला लागलों.

तेव्हां मी सांगत काय होतों, कीं हिंदुस्थाननें झोरोऑस्ट्रियन लोकांचें स्वागत केलें; यापूर्वी कांहीं शतकें, खिस्तानंतर पहिल्या शतकांत छळाला कंटाळून ज्यू लोक रोममधून पळून आले होते, त्यांनाही हिंदुस्थाननें असाच आसरा दिला होता.

पर्शियामध्यें—इराणमध्यें—सस्सन घराण्याचा अमल चालू होता. त्याच काळांत सीरिया प्रांतांतील निर्जन प्रदेशांतच पामीर डोंगराच्या पठारावर एक लहानसें राज्य स्थापन झालें होतें; व कांहीं काळ त्यानें वैभवही भोगलें. सीरियांतील वालुकामय प्रदेशामध्यें पामीरा उर्फ ताडमोर नगरी ही एक व्यापारी पेठ होती. त्या ठिकाणच्या इमारती केवढ्या प्रचंड असल्या पाहिजेत हें आज जे त्यांचे मोडकेतोडके अवशेष पाहायला सांपडतात, त्यांवरून सहज दिसून येतें. एकदां या राज्याची झेनोबिया नांवाची स्त्री राणी होती. परंतु तिचा रोमन लोकांनीं पराभव केला; आणि हे लोक इतके स्त्रीदाक्षिण्यविरहित किंवा शिष्टाचारविरहित होते, कीं त्यांनीं तिला बेड्या घालून रोमला नेलें!

खिस्ती शकाच्या सुरुवातीला सीरिया हा मोठा मनोहर प्रदेश होता. नव्या करारामध्यें त्यासंबंधीं माहिती सांपडते. जरी येथलें राज्य जुलमी आणि बेबंदशाहीचें होतें, तरी त्या काळीं या देशांत मोठमोठीं शहरें होतीं आणि लोकसंख्याही बरीच दाट होती. त्यामध्यें मोठाले कालवे होते आणि व्यापारधंदाही फार मोठा होता. परंतु सहाशें वर्षांच्या सततच्या लढ्यांमुळें व बेबंद राज्यकारभारामुळें हा प्रदेश अगदीं वैराण बनून गेला; सगळीं मोठीं शहरें उजाड झालीं आणि इमारतींचा विध्वंस झाला.

हिंदुस्थानांतून यूरपकडे तूं कधीं विमानांतून गेलीस, तर तुला या पामीरा आणि बालबेक यांच्या आसपासच्या निर्जन मैदानावरून जावें लागेल. तसेंच बॅबिलॉन शहर ज्या ठिकाणीं होतें आणि दुसरींही कितीएक इतिहासप्रसिद्ध स्थळें ज्या ठिकाणीं होतीं तीं ठिकाणेंही पहावयास मिळतील ; पण आतां आज हें पत्र येथेंच पुरे.

# ३६

# दक्षिण हिंदुस्थानच्या वसाहती

*२८ एप्रिल, १९३२*

अलीकडे आपण फार दूर दूर भटकतों आहों. आता जरा आपल्या हिंदुस्थानकडे परत येऊं या आणि आमचे पूर्वज या देशांत काय करीत होते तें पाहूं या. सरहद्दीवरील कुशानांच्या साम्राज्याबद्दल आपण बोलत होतों तें तुला आठवत असेल. हें एक मोठें बुद्धधर्मीय राज्य होतें. जवळजवळ सर्व उत्तर हिंदुस्थान व मध्य आशियाचा कांहीं भाग त्यानें व्यापलेला होता आणि पुरुषपूर किंवा हल्लींचें पेशावर हे त्याची राजधानी होतें. तसेंच याच सुमारास दक्षिणेमध्येंही एक या समुद्रापासून त्या समुद्रापर्यंत पसरलेलें मोठें राज्य होतें हेंही बहुधा तुला आठवत असेल. हें आंध्रांचे राज्य होय. कुशान आणि आंध्र यांचीं राज्यें ३०० वर्षेपर्यंत भरभराटींत राहिलीं. ख्रिस्तानंतर तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास हीं दोन्ही साम्राज्यें नष्ट झालीं आणि मग कांहीं काळपर्यंत हिंदुस्थानांत बरींचशीं छोटीं छोटीं राज्येंच राज्य करीत होतीं. परंतु शंभर वर्षांच्या आंतच पाटलिपुत्रामध्यें दुसरा एक चंद्रगुप्त राजा झाला आणि त्याच्यापासून हिंदूंच्या साम्राज्यशाही आक्रमणाला सुरुवात झाली. या घराण्याचें नांव गुप्त असें होतें. परंतु त्याच्याकडे जाण्यापूर्वी दक्षिणेकडील लोकांनीं जे मोठमोठे अचाट साहसी उद्योग केले आणि ज्यामुळें हिंदी कला आणि संस्कृति पूर्वेकडील दूरवरच्या बेटांपर्यंत जाऊन पोंचली, त्या त्यांच्या सुरुवातीच्या काळाकडे आधीं आपण थोडीशी नजर टाकून आलों तर ठीक होईल.

उत्तरेकडे हिमालय आणि खालीं दोन बाजूंना दोन समुद्र हें हिंदुस्थानचें स्वरूप तुझ्या चांगल्या परिचयाचें आहे. उत्तरेकडचा भाग समुद्रापासून फारच दूर आहे. तिकडच्या लोकांचें सर्व लक्ष तिकडच्या भूमिगत सरहद्दीकडेच लागलेलें असे ; याच सरहद्दीपलीकडून शत्रू आणि स्वाऱ्या करणारे लोक येत असत; परंतु आपल्या पश्चिमेकडे, पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे केवढा प्रचंड समुद्रकिनारा आहे; दक्षिणेकडे तेवढा देश निमुळता होत गेला असून अखेरीस केप कामोरीन म्हणजेच कन्याकुमारीपाशीं पूर्व आणि पश्चिम यांचा संगम झाला आहे. या सर्व मोठ्या किनाऱ्यावर राहणाऱ्या लोकांचें

लक्ष समुद्राकडे लागलेलें असणें स्वाभाविकच होतें; आणि त्यांच्यापैकीं पुष्कळ जण दर्यावर्दी लोक असावेत अशी सहजच कोणाचीही अपेक्षा असणार. अगदीं प्राचीन काळापासून दक्षिण हिंदुस्थानचा पश्चिमेकडील प्रदेशांशीं फार मोठा व्यापार चालू होता हें तुला मीं सांगितलेंच आहे. त्यामुळें प्राचीन काळापासूनच हिंदुस्थानांत जहाजें बांधण्याचे कारखाने अस्तित्वांत होते आणि व्यापाराच्या किंवा साहसजन्य अकल्पित लाभाच्या शोधार्थ लोक निरनिराळे समुद्र ओलांडून इकडे तिकडे जात असत यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. इकडे गौतम बुद्ध हयात होता त्याच काळीं दक्षिणेकडील विजय नांवाच्या राजानें सिलोनमध्यें जाऊन तें बेट जिंकलें होतें अशी सर्वसाधारण समजूत आहे. अजंठ्याच्या लेण्यामध्यें याबद्दलचें एक चित्र आहे. त्यामध्यें विजय राजा समुद्र ओलांडून सिलोनमध्यें जातो आहे व त्याच्याबरोबर पुष्कळ घोडे व हत्ती जहाजांवरून पलीकडे नेले जात आहेत असें दाखविलें आहे. विजयानें या बेटाला सिंहल – सिंहलद्वीप – असें नांव दिलें. सिंहल हें नांव सिंह या शब्दापासून निघालेलें आहे; या सिंहाच्या संबंधीं सिलोनमध्यें एक जुनी दंतकथाही प्रचलित आहे. परंतु ती माझ्या लक्षांत नाहीं आतां. मला वाटतें, सिलोन हा शब्दही या सिंहल शब्दापासूनच निघालेला असावा.

हिंदुस्थानांतून सिलोनमध्यें जाण्यासाठीं एवढासा अरुंद समुद्र ओलांडून जाणें हें कांहीं विशेष पराक्रमाचें काम होतें असें मुळींच नाहीं. परंतु या देशामध्यें जहाजें बांधण्याचा धंदा चालू होता आणि बंगालच्या उपसागरापासून तों थेट गुजरातपर्यंत किनाऱ्यावर माळेंतील मण्यांप्रमाणें जीं अनेक बंदरें होतीं त्यांमधून लोक समुद्रापलीकडे सफरी करायला नेहमीं जात असत, याबद्दलही आपल्याला भरपूर पुरावा सांपडतो. चाणक्यानें ( चंद्रगुप्त मौर्याचा मंत्री ) आपल्या अर्थशास्त्र या ग्रंथांत आरमाराबद्दल थोडें-फार लिहिलेलें आपणांस आढळतें. त्याबद्दल नैनीच्या तुरुंगांतून मीं तुला लिहिलें होतें. चंद्रगुप्ताच्या दरबारांतील ग्रीक वकील मेगॅस्थिनीस यानेंही या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे. त्यावरून असें दिसतें, कीं मौर्यांच्या काळाच्या सुरुवातीलासुद्धां जहाजें बांधण्याचा धंदा हिंदुस्थानांत चांगला भरभराटींत होता. आणि एवढीं जहाजें बांधलीं जात होतीं तीं कांहीं निव्वळ पाहून ठेवण्यासाठीं कोणी बांधणार नाहीं. त्यांचा उपयोग होतच असला पाहिजे, ही उघड गोष्ट आहे. तेव्हां या जहाजांतून पुष्कळच लोक समुद्रपार जात असले पाहिजेत. या गोष्टीचा विचार केला आणि आजच्या घटकेला आमच्यांपैकीं कांहीं लोक समुद्रपार प्रवास करण्याला भितात, तें त्यांना आपल्या धर्माच्या विरुद्ध वाटतें, हें पाहिलें म्हणजे मोठेंच आश्चर्य वाटतें; हे असले लोक जुन्या पुराण्या काळच्या अवस्थेचे नमुने आहेत असें सुद्धा आपल्याला म्हणतां येणार नाहीं. कारण आमचे पूर्वज लोक यांच्यापेक्षां पुष्कळच शहाणे होते असें दिसतें. आनंदाची गोष्ट इतकीच, कीं असल्या अलौकिक विचारांचे लोक आतां जवळजवळ नाहींसे होत आले आहेत, आणि अगदींच थोड्या लोकांच्या मनावर आतां अशा विचारांचा पगडा राहिलेला आहे.

उत्तरेकडच्यापेक्षां स्वाभाविकच दक्षिणेकडील लोक दर्यावर्दीपणाकडे अधिक झुकले. परदेशाचा व्यापार हा बहुतेक सर्व दक्षिण हिंदुस्थानशींच होई. तामीळ वाङ्मयांत यवनांची दारू, भांडीं आणि दिवे यांबद्दल जागोजाग उल्लेख सांपडतात. 'यवन' हा शब्द मुख्यतः ग्रीक लोकांचा वाचक म्हणून वापरीत, परंतु इतरही परकी लोकांचा त्यामध्यें अंतर्भाव केला जाई. दुसऱ्या आणि तिसऱ्या शतकांतील आंध्रांच्या नाण्यावर दोन शिडांच्या जहाजाचा ठसा आढळतो. त्यावरून जहाजें बांधणें आणि समुद्रावरून व्यापार करणें याबद्दल आंध्र लोकांना किती मोठी आस्था वाटत असली पाहिजे, हें चांगलें दिसून येण्यासारखें आहे.

अशा स्थितींत हिंदुस्थानच्या वसाहती पूर्वेकडील सर्व बेटांवर वसविण्याच्या कार्याची सुरुवात ज्यामधून झाली तें मोठें अचाट साहसकर्म करण्याचा मान दक्षिण हिंदुस्थानला मिळाला हें सहजच आहे. वसाहतीसाठीं स्वाऱ्या करण्याची ही प्रथा खिस्तानंतर पहिल्या शतकांत सुरू झाली आणि पुढें कितीएक शतकांपर्यंत ती चालू राहिली. मलाया (मलयु किंवा मलयद्वीप), जावा (यावा किवा यवद्वीप), सुमात्रा, कँबोडिया (उर्फ कांबोजद्वीप), बोर्निओ, इकडे सगळीकडे या स्वाऱ्या झाल्या. त्या ठिकाणीं हिंदी वसाहती स्थापन झाल्या आणि त्याबरोबरच हिंदी कला, संस्कृति यांचाही तेथें प्रवेश झाला. ब्रह्मदेश, सयाम, इंडोचायना यांमध्येंही मोठमोठ्या हिदी वसाहती होत्या. त्या ठिकाणच्या आपल्या नव्या शहरांना आणि वसाहतींना या स्वाऱ्या करणारांनीं नांवें दिलीं तीं सुद्धा हिदुस्थानमधील होतीं; उदाहरणार्थ, अयोध्या, हस्तिनापूर, तक्षशिला, गांधार हीं नांवें पहा. इतिहासाची किती चमत्कारिक पुनरावृत्ति होते पहा! अँग्लो-सॅक्सन वसाहतवाले अमेरिकेंत गेले त्यांनीं अगदीं हाच प्रकार केला; आज सुद्धां जुन्या इंग्लंडमधील शहरांचीं त्यांनीं अमेरिकेंतील शहराना दिलेलीं नांवें प्रचलित आहेत.

वसाहती करायला जाणारे लोक जिकडे तिकडे नेहमींच करतात, त्याप्रमाणें या हिंदी वसाहतवाल्यांनींही पुष्कळ प्रकारें अयोग्य वर्तन केलें यांत कांहींच शंका नाहीं. त्यांनींही या बेटांतील लोकांची पिळणूक केली आणि त्यांच्यावर प्रभुत्व गाजविलें. परंतु त्या त्या ठिकाणांहून हिंदुस्थानशीं अगदीं एकसारखा अप्रातिहत संबंध ठेवणें शक्य नसल्यामुळें हळूहळू हे वसाहतवाले व तेथील मूळचे लोक हे एकमेकांत मिसळून गेले असले पाहिजेत. या पूर्वेकडच्या बेटांत प्रथम हिंदू राज्यें व साम्राज्यें स्थापन झालीं, मागून बुद्धधर्मीय राज्यकर्ते तेथें आले; आणि तेथल्या स्वामित्वाबद्दल या हिंदू आणि बुद्ध राज्यांमध्यें झगडा सुरू आला. बृहद्भारताची किंवा विशाल भारताची ही कथा मोठी मनोरंजक आहे आणि फार प्रचंडही आहे. जुन्या मोठमोठ्या मंदिरांचे-इमारतींचे जे प्रचंड अवशेष आजही पहायला मिळतात, त्यांवरून या वसाहतींमधील सुंदर आणि भूषणभूत बांधकामाची कल्पना येते. हिंदी शिल्पकारांनीं आणि कारागिरांनीं तिकडे कांबोज, श्रीविजय, अंकोरथोम, किंवा शानदार (डौलदार) अंकोर, मज्झपाहित (मध्यमाहित) अशांसारखीं मोठमोठीं शहरें बांधलीं होतीं.

सुमारें १४०० वर्षेपर्यंत हिंदू आणि बुद्ध धर्मीय राजांचा अमल या बेटांमध्यें चालू राहिला. या काळांत वर्चस्वासाठीं या दोन धर्मांच्या राज्यांमध्यें झगडा चालूच असे; कधीं हे तर कधीं ते असे तेथें प्रमुखत्वानें राज्य करीत; केव्हां केव्हां कांहीं कालपर्यंत एकमेक एकमेकांचा संपूर्ण पाडाव करीत. पंधराव्या शतकांत मात्र त्या दोघांनाही जिंकून मुसलमान लोकांनीं तेथें आपली संपूर्ण सत्ता स्थापन केली. त्यांच्या नंतर लौकरच तेथें पोर्तुगीज आणि स्पॅनिश लोक आले; त्यांच्यापाठोपाठ डच आणि इंग्रज आले. सगळ्यांच्या शेवटीं अमेरिकनही आले. चिनी लोक तर या प्रदेशाचे कायमचे आणि जवळचेच शेजारी. तेही मधून मधून आपला हात त्यामध्यें शिरकविण्याचा प्रयत्न करीतच असत; केव्हां केव्हां त्यांनीं तो प्रदेश जिंकलाही होता. परंतु सामान्यतः चिनी लोक या प्रदेशाशीं सख्यत्वानेंच वागत आणि केव्हां केव्हा कांहीं भेटीही त्यांच्यामधील लोकांना पाठवीत. अर्थात् चिनी लोकांच्या महान् संस्कृतीचा, विद्याचा आणि सुधारणेचा येथील लोकांवर परिणाम मात्र सदैव होतच होता.

हिंदुस्थानच्या या पूर्वेकडील वसाहतींच्या बाबतींत आपलें चित्त वेधून घेण्यासारख्या पुष्कळच गोष्टी आहेत. त्यांतली सगळ्यांत अधिक डोळ्यांत भरण्यासारखी गोष्ट ही आहे, कीं हें वसाहतीचें कार्य उघड उघड त्या काळच्या दक्षिण हिंदुस्थानांतील एका प्रमुख राज्यानें आपल्या अंगावर घेतलेलें होतें. अर्थात् त्यापूर्वी एकेकट्या व्यक्ती संशोधनबुद्धीनें त्या प्रदेशांत पुष्कळच गेलेल्या असणार. पुढें पुढें व्यापार वाढला तसतशीं कांहीं कुटुंबें किंवा समूहही आपल्याच जबाबदारीवर तेथें जाऊन वसाहतीही करून राहिले असतील. अशा तऱ्हेचे अगदीं पहिले वसाहतवाले हे कलिंगामधील ( ओरिसा ) होते असें म्हणतात. बंगालमधीलही कांहीं लोक त्यांत होते. अशीही एक परंपरागत समजूत आहे, कीं गुजरातमधलेही कांहीं लोक देशांतून हांकलून दिल्यामुळें या बेटांत राहायला गेले होते. पण हे सारे तर्क आहेत. वसाहतवाल्यांचा खरा मुख्य ओघ हा पल्हवांच्या देशांतून गेलेला आढळतो. हा देश म्हणजे तामीलनाडचा दक्षिणेकडील भाग असून त्यावर महान् पल्हव वंशाचें राज्य होतें. या पल्हवांच्या राज्यानेंच मॅलेशियाच्या वसाहतीचें कार्य योजून घडवून आणलें असें दिसतें. उत्तर हिंदुस्थानांतील लोक दक्षिणेकडे अधिकाधिक घुसूं लागल्यामुळें वाढत्या लोकसंख्येच्या दडपणामुळेंही त्यांना असें करावें लागलें असेल. कारण कांहींही असो, हिंदुस्थानपासून दूरच्या भागांत आणि एकमेकांपासून दूर दूर पसरलेल्या या भूमिभागांत वसाहती स्थापण्याची ही योजना जाणूनबुजून विचारपूर्वकच आंखण्यांत आली आणि या सर्व ठिकाणीं एकाच वेळीं वसाहतींची सुरुवात करण्यांत आली. या वसाहती इंडोचायना, मलाया द्वीपकल्प, बोर्निओ, सुमात्रा, जावा या व इतर ठिकाणींही पसरल्या होत्या. या सर्व वसाहती पल्हव राजांच्या होत्या आणि त्यांचीं नांवें हिंदुस्थानमधीलच होतीं. इंडोचायनांतील वसाहतीस कांबोज हें नांव होतें ( यालाच आज कँबोडिया असें म्हणतात). हें नाव दूर गांधार देशांतील

काबूलच्या खोऱ्यामधील कांबोज या गांवापासून इतका दूर प्रवास करीत आलेलें आहे.

सुमारें ४०० ते ५०० वर्षें या वसाहती धर्मानें हिंदू राहिल्या. नंतर हळूहळू त्यांमध्यें सर्वत्र बुद्धधर्म फैलावला. यानंतर पुष्कळ काळानें इस्लाम धर्म येऊन तो चोहोंकडे तेथें पसरला आणि कांहीं थोड्या भागांतच मात्र बुद्धधर्म शिल्लक राहिला.

मॅलेशियामध्यें पुष्कळ निरनिराळ्या साम्राज्यांचे अमल होऊन गेले. परंतु दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांच्या या वसाहतींच्या कार्याचा एक म्हणण्यासारखा परिणाम हा, कीं भारतीय आर्यांच्या संस्कृतीचा प्रवेश त्यामुळें जगाच्या या भागांत झाला; आणि आजकालचे मॅलेशियांतील लोक हेही कांहीं अंशीं आम्ही ज्या संस्कृतीचे वंशज आहों त्याच भारतीय आर्यसंस्कृतीचे वंशज आहेत, असें म्हणतां येण्यासारखें आहे. त्यांच्यावरही आमच्याप्रमाणेंच इतरही दुसऱ्या संस्कृतींचा परिणाम झालेला आहे. चिनी संस्कृतीचा तर विशेषच; आणि मॅलेशियांतील निरनिराळ्या भागांत दिसून येणारें या दोन्ही संस्कृतींचें – चिनी आणि भारतीय संस्कृतींचें – मिश्रण मोठें पाहण्यासारखें आहे. कांहींमध्यें भारतीय संस्कृतीचा प्रभाव अधिक आहे; तर कांहींत चिनी संस्कृतीचे स्वरूप अधिक आढळून येतें. ब्रह्मदेश, सयाम, इंडोचायना या सलग प्रांतांत चिनी संस्कृतीचा प्रभाव अधिक आढळतो, पण तसा तो मलायांत दिसून येत नाहीं. जावा, सुमात्रा आणि इतरही बेटांमधून मात्र भारतीय संस्कृतीचा ठसा अधिक आढळतो, आणि अधूनमधून वरवरचें आवरण तेवढें इस्लामी संस्कृतीचें दिसून येतें.

पण चिनी आणि भारतीय संस्कृतीच्या या वर्चस्वाच्या वाढींत झगडा झालेला आढळत नाहीं. या दोन्ही संस्कृती परस्परांहून आहेत अगदींच निराळ्या. परंतु कांहीं तंटा-बखेडा न होतां दोन्ही संस्कृतींचें कार्य येथें जोडीनें चालू राहूं शकलें. तेथील धर्मांच्या बाबतींत मात्र हिंदुस्थान हें एकच मूळ उगमस्थान होतें. मग तो हिंदुधर्म असो वा बुद्धधर्म असो. कारण खुद्द चीनमधल्या धर्माचें मूळही हिंदुस्थानांतच होतें. कलेच्या प्रांतांतही मॅलेशियामध्यें हिंदुस्थानचेंच संपूर्ण आणि अबाधित वर्चस्व होतें. इंडोचायनामध्यें तर चिनी संस्कृतीचें प्रभुत्व फार मोठें. परंतु तेथेंही शिल्पकला सर्वथा भारतीयच होती. चीनच्या सुधारणेचा परिणाम या खंडांतील देशांत मुख्यतः राज्यव्यवस्था आणि जीवनविषयक तत्त्वज्ञान या बाबतींत घडून आला. त्यामुळें इंडोचायना, ब्रह्मदेश आणि सयाम यांमधील लोक आचारविचारानें हिंदी लोकांपेक्षां चिनी लोकांना अधिक जवळचे भासतात. अर्थात् वांशिक दृष्ट्याही त्यांच्यामध्यें मंगोलियन रक्त अधिक आहे. त्यामुळें दिसायला कांहीं प्रमाणात ते चिनी लोकांसारखेच दिसतात.

जावा बेटांत बोरोबदूर येथें हिंदी कारागिरांनीं बांधलेल्या बुद्ध मंदिरांचे अवशेष आहेत. बुद्धाच्या जीवनाची संपूर्ण कथा या इमारतींच्या दर्शनी भिंतीवर कोरलेली आहे आणि बुद्धांचें स्मारक म्हणून नव्हे, तर त्या काळच्या हिंदी कलेचा नमुना म्हणूनही हे अवशेष अलौकिक आहेत.

हिंदी सत्तेचा फैलाव या प्रदेशांच्याही पलीकडे पुष्कळ दूरवर झाला होता. फिलिपाइन्समध्यें आणि फोर्मोसा बेटामध्येंही तिचा शिरकाव झाला होता. कांहीं काळपर्यंत हीं दोन्ही बेटें सुमात्रामधील श्रीविजयाच्या हिंदु राज्यांचाच एक भाग होतीं. त्यानंतर पुष्कळ काळानें फिलिपाइन्समध्यें स्पॅनिश लोकांचा अमल सुरू झाला आणि आज तीं अमेरिकेच्या ताब्यांत आहेत. फिलिपाइन्स बेटांची राजधानी मॅनिला हें शहर आहे. नुकतीच तेथें नवीन कायदेमंडळासाठीं एक इमारत बांधण्यांत आली. तिच्या दर्शनी भिंतीवर फिलिपाइन्समधील संस्कृतीच्या उगमाच्या निदर्शक अशा चार आकृती उभारण्यांत आल्या आहेत. या आकृतींपैकी दोन प्राचीन हिंदुस्थानचा धर्मशास्त्रकार मनु व चिनी तत्त्वज्ञ लौ चे यांच्या असून दुसऱ्या दोन अँग्लो-सॅक्सन व स्पॅनिश कायदा व न्याय यांच्या निदर्शक आहेत.

## ३७

## गुप्तांच्या अमलांतील हिंदु-साम्राज्यशाही

*२९ एप्रिल, १९३२*

दक्षिणेकडचे लोक इकडे समुद्रपार होऊन दूरदूरच्या देशांत जाऊन वसाहती आणि शहरें स्थापन करीत होते, तर तिकडे उत्तर हिंदुस्थानांत कांहीं निराळीच चमत्कारिक धामधूम व खळबळ सुरू होती. कुशानांच्या साम्राज्याचें सामर्थ्य आणि महत्त्व दोन्ही नाहींशीं झालीं होतीं आणि तें विस्तारानेंही लहान लहान होत जाऊन विरून जाण्याच्या पंथाला लागलें होतें. सगळ्या उत्तर हिंदुस्थानभर छोटीं छोटीं राज्यें प्रस्थापित झालीं होतीं आणि त्यांमध्यें बहुतेक ठिकाणीं वायव्य सरहद्दीपलीकडून हिंदुस्थानांत आलेल्या शक, सिथियन, तुर्क यासारख्या लोकांचा अमल चालू होता. मीं सांगितलेंच आहे तुला, कीं हे लोक बुद्धधर्मीय असून हिंदुस्थानांत शत्रू म्हणून लूटमार करण्यासाठीं नव्हे, तर येथें वसाहत करून राहण्यासाठीं आलेले होते. मध्य आशियांतील दुसऱ्या टोळ्यांनीं त्यांना मागून येऊन निर्दयपणें खालीं रेटलें होतें; आणि या दुसऱ्या टोळ्यांना चिनी राज्यानें पुढें रेटलें होतें. हिंदुस्थानांत आल्यावर या लोकांनीं भारतीय आर्यांच्या रीतीभाती आणि परंपरा यांचा पुष्कळ प्रमाणांत स्वीकार केला. आपला धर्म, विद्या, संस्कृति यांची जन्मभूमि या दृष्टीनें हिंदुस्थानकडे हे लोक आदरभावानेंच पाहत. प्रत्यक्ष कुशान लोकांनीं सुद्धां भारतीय आर्यांच्या चालीरीतींचाच फार मोठ्या प्रमाणांत अवलंब केलेला होता. त्यामुळेंच तर त्यांना हिंदुस्थानांत वसाहत करतां आली आणि इतक्या दीर्घकाळपर्यंत येथें एवढ्या विस्तीर्ण प्रदेशावर राज्य करतां आलें. भारतीय आर्यांप्रमाणेंच राहणी ठेवण्याचा ते प्रयत्न करीत आणि आपण परकी

आहोंत ही गोष्ट येथील लोकाच्या लक्षात सुद्धा राहूं नये, अशी त्यांची इच्छा होती. थोडेंफार यशही जरी त्यांना या प्रयत्नामध्यें आलें, तरी संपूर्ण यश मात्र त्यांना लाभलें नाहीं. कारण आपल्यावर परकीयांचें राज्य चालू आहे ही गोष्ट देशात, विशेषतः क्षत्रियांच्या मनांत, फार सलत होती. परकी अमलाखालीं त्यांचा कोंडमारा होऊन जात होता; त्यामुळें त्यांच्यामध्यें खळबळ वाढत होती आणि लोकांचीं मनें त्रस्त होऊन गेलीं होतीं. शेवटीं या असंतुष्ट लोकांना एक पुढारी मिळाला आणि त्याच्या निशाणा-खालीं जमा होऊन या लोकांनीं आर्यावर्ताला स्वतंत्र करण्यासाठीं एक प्रकारचें धर्मयुद्धच सुरू केलें.

या पुढाऱ्याचें नाव चंद्रगुप्त. अशोकाचा आजा चंद्रगुप्त आणि हा चंद्रगुप्त यांचा गोंधळ मात्र करूं नकोस. या दुसऱ्या सद्गृहस्थाचा मौर्य घराण्याशीं कांहीं संबंध नाहीं. हें खरें, कीं पाटलिपुत्रांतच त्याचें एक अगदीं छोटेंसें राज्य होतें. परंतु त्या सुमारास अशोकाचे वंशज मात्र पार कोठें लोपून गेलेले होते. अर्थात् हें विसरतां उपयोगी नाहीं, कीं आतां आपण खिस्तानंतर चौथ्या शतकाच्या सुरुवातीला म्हणजे सुमारें इ. स. ३०८ च्या आसपास आलों आहों. अशोकाच्या मृत्यूनंतर ५३४ वर्षां-नंतरचा हा काळ आहे.

हा दुसरा चंद्रगुप्त महत्त्वाकांक्षी आणि कर्तबगार होता. उत्तरेकडील इतर आर्य राजे आपल्याकडे वळवून घ्यावयाचे आणि त्या सर्वांचें मिळून एक प्रकारचें संयुक्त राज्य स्थापन करावयाचें या उद्योगाला त्यानें सुरुवात केली. अत्यंत प्रसिद्ध आणि प्रबळ अशा लिच्छवी वंशांतील कुमारीदेवीशीं त्यानें विवाह केला. आणि अशा रीतीनें या वंशाच्या लोकांचा पाठिंबा मिळविला. प्राथमिक तयारी सावधानपणें पुरी करून जमीन तयार झालीसें दिसल्यावर त्यानें हिंदुस्थानमधील सर्व परकी राज्यकर्त्यांविरुद्ध 'धर्मयुद्ध' पुकारलें. सर्व क्षत्रिय आणि आर्यांमधील वरिष्ठ वर्ग यांची सत्ता आणि अधिकारस्थानें या परकीयांच्यामुळें नाहींशीं झालेलीं होतीं. तेव्हां ते सर्व या लढाईच्या पाठीशीं होते. सुमारें बारा वर्षांच्या युद्धानंतर चंद्रगुप्ताच्या ताब्यांत, आज ज्याला आपण संयुक्त प्रांत म्हणतों त्या प्रदेशासह उत्तर हिंदुस्थानचा कांहीं भाग आला आणि त्यानें आपल्याला राजराजेश्वर अशी पदवी धारण करून राज्याभिषेक करवून घेतला.

अशा रीतीनें गुप्तांचें म्हणून म्हणतात तें घराणें सुरू झालें. हूण लोकांनीं येऊन त्याला त्रास द्यायला लागेपर्यंत सुमारें १०० वर्षें या घराण्याचा अमल चालू राहिला-कांहीं अंशीं हिंदुधर्म आणि हिंदुराष्ट्रवाद यांच्या आक्रमक प्रवृत्ताचा हा काळ होता. या काळांत भारतवर्षांत तुर्क, पार्थियन इत्यादि अनार्य असे जे परकी राजे होते, त्या सर्वांना मुळासकट उखडून काढून तरवारीच्या जोरावर बाहेर हांकलून देण्यांत आलें. अशा रीतीनें या काळांत वांशिक शत्रुत्व उदयास येऊन तें लोकांच्या हालचालींवर परिणाम करूं लागलें असें दिसतें. भारतीय आर्यांना आपल्या वंशाबद्दल अभिमान

उत्पन्न झाला आणि बाकीच्या या लोकांना रानटी ( बर्बर ), अनार्य, म्लेंच्छ म्हणून ते तुच्छ मानूं लागले. यामुळें गुप्तांनीं जेव्हां भारतीय आर्य राजांना जिंकून त्यांचीं राज्यें पादाक्रांत केलीं, तेव्हां त्यांच्याशीं त्यांनीं नरमाईचें व गोडीचें धोरण ठेवलें. परंतु अनार्यांच्या बाबतींत मात्र त्यांनीं कसलीही सवलत दिली नाहीं.

चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रगुप्त हा बापापेक्षांही अधिक आक्रमणशील योद्धा होता. तो श्रेष्ठ दर्जाचा सेनापति होता आणि सम्राट्पदावर आल्यावर त्यानें साऱ्या देशभर, दक्षिण हिंदुस्थानांत सुद्धां, विजयी स्वाऱ्या केल्या. गुप्तांच्या साम्राज्याचा विस्तार त्यानें इतका वाढविला, कीं हिंदुस्थानचा बहुतेक भाग त्यानें व्यापला. परंतु दक्षिणेंतील राज्यावरचें त्याचें प्रभुत्व अर्थात् नुसतें नांवालाच होतें. उत्तरेस मात्र कुशानांना त्यानें सिंधु नदीच्या परतीरावर पिटाळून लावलें होतें.

समुद्रगुप्ताचा मुलगा दुसरा चंद्रगुप्त हा राजाही मोठा योद्धा होता. पुष्कळ दिवसपर्यंत शक किंवा तुर्की राजांच्या अमलाखालीं असलेले काठेवाड व गुजरात हे प्रांत यानें काबीज केले. यानें आपल्याला विक्रमादित्य हें नांव घेतलें व याच नांवानें तो प्रसिद्ध आहे. परंतु हें नांव सीझरच्या नांवाप्रमाणें पुढें पुष्कळशा राजांची एक पदवीच होऊन गेलें. त्यामुळें निरनिराळ्या विक्रमादित्यांचा मोठा गोंधळ होतो.

दिल्लीच्या कुतुबमीनारजवळ एक प्रचंड लोखंडी स्तंभ तूं पाहिलेला आहेस, तो तुला आठवतो का? हा स्तंभ विक्रमादित्यानें विजयस्तंभ म्हणून बांधला असें सांगतात. कलेच्या दृष्टीनें त्याचें काम फार सुंदर केलेलें आहे आणि त्याच्या शेंड्यावर विजयाचें चिह्न म्हणून कमलपुष्प बसविलेलें आहे.

गुप्तांचा काळ हा हिंदुस्थानांतील हिंदु-साम्राज्यशाहीचा काळ आहे. या काळांत आर्य संस्कृति, आर्य विद्या, यांचें फार मोठें पुनरुज्जीवन झालें. हिंदी जीवन आणि संस्कृति यांमध्यें ग्रीक किंवा कुशान लोकांनीं कांहीं कांहीं हेलनिस्टिक म्हणजेच ग्रीक आणि मंगोलियन गोष्टींचा अंतर्भाव केलेला होता; त्यांना या काळांत उत्तेजन मिळणें तर दूरच, परंतु उलट भारतीय आर्य परंपरेवर अधिक भर देऊन त्या प्रकारांना उखडून काढण्याचें काम जाणूनबुजून करण्यांत आलें. दरबारची भाषा ही संस्कृत होती. पण या काळामध्यें सुद्धा सामान्य लोकांची बोलण्याची भाषा संस्कृत ही राहिली नव्हती. बोलण्याची भाषा ही संस्कृतशीं पुष्कळच निकट संबंध असलेली अशी एक प्राकृत भाषा होती. अर्थात् संस्कृत ही जरी त्या वेळीं लोकभाषा नसली, तरी ती कांहीं मृतभाषा झालेली नव्हती. अद्यापि तिचा चांगलाच प्रसार होता. गुप्तसाम्राज्याच्या काळामध्यें संस्कृत काव्य व नाटक यांना फार मोठा बहर आला आणि भारतीय कलांचीही मोठीच चलती झाली. वेदांच्या आणि रामायण-महाभारतादि महाकाव्यांच्या काळानंतर संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांत हाच काळ बहुधा अत्यंत श्रेष्ठ व सुसंपन्न काळ असें म्हणतां येईल. आपल्या देशांतील अत्यंत अलौकिक ग्रंथकार कालिदास हा या काळामधलाच. विक्रमादित्याचा दरबार फारच वैभवशाली होता असें

म्हणतात. त्याच्या दरबारांत तत्कालीन सर्व श्रेष्ठ ग्रंथकार आणि कलावंत यांची बैठक असे. त्याच्या दरबारांतील नवरत्नांबद्दलची कथा तुला माहीत नाहीं का ? कालिदास या नवरत्नांपैकींच एक होता असें म्हणतात.

समुद्रगुप्तानें आपली राजधानी पाटलिपुत्राहून बदलून अयोध्येस आणली. आपल्या भारतीय परंपरेच्या चढाईच्या कार्याला वाल्मीकीच्या अमर महाकाव्यामुळें अमर झालेल्या रामचंद्राच्या कथेशीं संलग्न होऊन पावन झालेली अयोध्यानगरी ही त्याला कदाचित् अधिक सोयीची वाटली असेल.

गुप्तांनीं सुरू केलेली आर्यत्व आणि हिंदुत्व यांच्या पुनरुजीवनाची ही प्रवृत्ति स्वाभाविकच बुद्धधर्माला अनुकूल नव्हती. एक तर ही चळवळ वरिष्ठ-वर्गीय चळवळ होती; मुख्यतः तिला क्षत्रिय-वर्गाचा पाठिंबा होता; आणि बुद्धधर्मीय परंपरेंत तर सामान्य लोकांचाच विशेष भर होता. दुसरें म्हणजे बुद्धांच्या महायानपंथाचा उत्तरेकडील कुशान आणि इतर परकी राज्यकर्त्यांशीं अत्यंत निकट संबंध होता. असें जरी होतें तरी या काळांत बुद्धधर्मीयांचा छळ मात्र झालेला आढळत नाहीं. बुद्ध भिक्षूंचे मठ चालूच राहिले, आणि त्या ठिकाणीं विद्यार्जनाचे मोठाले आश्रमही राहिले. सिलोनमध्यें बुद्धधर्मच पसरलेला होता. पण तेथील राजांशीं गुप्तसम्राटांचे मैत्रीचे संबंध होते. सिलोनचा राजा मेघवर्ण यानें अत्यंत मौल्यवान् नजराणे समुद्रगुप्ताला पाठविल्याचें आढळतें; आणि गयेला त्यानें सिंहली विद्यार्थ्यांसाठीं एक मठही स्थापन केला होता.

तरी पण हिंदुस्थानांत मात्र बुद्धधर्माला ओहोटीच लागली. या ओहोटीचें कारण ब्राह्मणांनीं कांहीं बाह्य दडपण आणलें किंवा राजे लोकांनीं जुलूम केला हें नसून हिंदुधर्माच्या ठिकाणीं तो धर्म आपल्यामध्यें पचवून घेण्याची जी शक्ति होती तिच्यामुळें असें घडलें, हें मीं पूर्वी तुला सांगितलेंच आहे.

याच सुमारास चीनमधील एक अत्यंत प्रसिद्ध प्रवासी हिंदुस्थानास भेट देऊन गेला. तो म्हणजे पूर्वी एकदां ज्याच्याबद्दल मीं तुला सांगितलें तो ह्युएन चँग नव्हे, तर फाहियान हा होय. हा बुद्धधर्मीय असून बुद्धधर्मीयांच्या पवित्र ग्रंथांचा शोध करण्यासाठीं तो इकडे आला होता. त्यानें लिहिलें आहे कीं, "मगधांतील लोक फार सुखी आणि संपन्न होते; न्यायाची अमलबजावणी फार दयाबुद्धीनें करण्यांत येत असे; आणि देहान्त शिक्षा मुळीं अस्तित्वांतच नव्हती. गया क्षेत्र हें वैराण आणि निर्जन झालेलें होतें; कपिलवस्तु शहर तर अरण्यमय झालें होतें; परंतु पाटलिपुत्रांतील लोक संपन्न, वैभवशाली आणि सदाचरणी होते. राज्यामध्यें पुष्कळ संपन्न आणि विशाल बौद्ध मठ होते. राजरस्त्याच्या कडेला धर्मशाळा असत; त्या ठिकाणीं वाटसरूंना राहतां येई व सार्वजनिक खर्चांतून त्यांची तेथें खाण्यापिण्याची सोय होई. मोठमोठ्या शहरांतून फुकट रुग्णालयें असत."

हिंदुस्थानांत पुष्कळ हिंडल्यावर फाहियान सिलोनमध्यें गेला व तेथें तो दोन वर्षें राहिला. त्याचा एक सोबती तौ चिंग म्हणून होता. त्याला मात्र हिंदुस्थानच फार

आवडलें आणि येथील बुद्ध भिक्षूंच्या धार्मिक वृत्तीचा त्याच्या मनावर फारच परिणाम झाला. त्यामुळें त्यानें मात्र हिंदुस्थानांतच राहण्याचें ठरवलें. फाहियान समुद्रमार्गानें चीनला परत जाण्यास निघाला, आणि वाटेंत पुष्कळ चित्रविचित्र अनुभव घेत घेत फारा दिवसांनीं तो आपल्या मायभूमीला पोंचला.

दुसरा चंद्रगुप्त म्हणजेच विक्रमादित्य याची कारकीर्द तेवीस वर्षें झाली. त्यानंतर त्याचा मुलगा कुमारगुप्त याची कारकीर्द मात्र बरीच दीर्घ मुदतीची म्हणजे चाळीस वर्षांची झाली. त्याच्यानंतर स्कंदगुप्त हा इ. स. ४५२ या सालीं गादीवर आला. त्याला एका नवीनच संकटाला तोंड द्यावें लागलें व त्यांतूनच अखेरीस गुप्तांच्या साम्राज्याची कंबर मोडली. पण त्याबद्दल मी पुढच्या पत्रांत लिहीन.

अजंठ्याच्या लेण्यांमधील कितीएक भिंतींवरील चित्रें, तसेंच त्यांतील दिवाणखाने आणि प्रार्थनागृहें हे गुप्ताच्या काळच्या कलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. प्रत्यक्ष पाहिल्यावरच तें किती अलौकिक काम आहे हें तुला समजेल. दुःखाची गोष्ट अशी, कीं हीं भिंतींवरील चित्रें हळूहळू नाहींशीं होत आहेत. कारण उघड्या हवेंत, उन्हा-पावसांत तीं सदासर्वकाळ जशींच्या तशीं टिकून राहणें शक्य नाहीं.

हिंदुस्थानात गुप्ताचा अमल चालू होता त्या वेळीं बाकीच्या जगांत काय घडामोडी चालू होत्या बरें? गुप्त घराण्यांतील पहिला चंद्रगुप्त हा तिकडे कॉन्स्टान्टिनोपल शहराची स्थापना करणारा रोमचा बादशहा कॉन्स्टंटाइन दि ग्रेट याचा समकालीन होता. गुप्तांच्या यापुढील राजाच्या अमदानींतच रोमन साम्राज्याचें पश्चिमेकडील रोमन साम्राज्य व पूर्वेकडील रोमन साम्राज्य असे तुकडे झाले आणि उत्तर यूरपांतील रानटी टोळ्यांनीं पश्चिमेकडील रोमन साम्राज्य अखेरीस उलथून टाकलें. तेव्हां ज्या वेळीं रोमच्या साम्राज्याचा तिकडे ऱ्हास होत होता, त्याच काळीं हिंदुस्थानांत एक अत्यंत प्रबळ राज्य अस्तित्वांत असून त्यामध्यें श्रेष्ठ सेनापती आणि प्रचंड शौर्यशाली सैन्यें नांदत होतीं. समुद्रगुप्ताला कधीं कधीं 'हिंदी नेपोलियन' असें म्हणण्यांत येतें; परंतु समुद्रगुप्त महत्त्वाकांक्षी असला तरी देश जिंकण्यासाठीं हिंदुस्थानच्या सरहद्दीच्या पलीकडे केव्हांच त्याची नजर वळली नाहीं.

गुप्ताचा काळ हा एक प्रकारें आक्रमक साम्राज्यशाहींचा, देश पादाक्रांत करण्याचा, विजयाचा काळ होता. प्रत्येक देशाच्या इतिहासांत असे साम्राज्यशाहीच्या वैभवशाली उदयाचे अनेक काळ येत असतात; तरी एकंदर देशाच्या इतिहासाच्या ओघाच्या दृष्टीनें अखेरीस त्यांचें विशेषसें महत्त्व असत नाहीं. परंतु गुप्तांचा काळ या अशा सर्व काळांहून अगदीं निराळा असा उठून दिसतो, आणि हिंदुस्थानमध्यें त्याचें थोडें अभिमानपूर्वक स्मरण करणें उचित वाटतें. याचें कारण त्या काळांत कला व वाङ्मय याचें जें अभूतपूर्व पुनरुज्जीवन झालेलें आढळून येतें तें होय.

३८

# हूण लोक हिंदुस्थानांत येतात

४ मे, १९३२

नवीनच एक संकट आलें म्हणून म्हटलें तें म्हणजे वायव्य सरहद्दीकडील पर्वत ओलांडून हिंदुस्थानांत खालीं आलेल्या हूण लोकांच्या हल्ल्याचें संकट होय. रोमन साम्राज्यासंबंधीं आपण विचार करीत असतांना मागें एका पत्रांत मीं या हूणांबद्दल थोडेंफार तुला सांगितलें आहे. यूरपमध्यें यांचा सर्वांत श्रेष्ठ पुढारी ॲटिला या नावाचा होऊन गेला. त्यानें कितीएक वर्षेंपर्यंत रोम आणि कॉन्स्टान्टिनोपल येथील दोन्ही साम्राज्यांना सळो कीं पळो करून सोडलें होतें. त्याच सुमारास हिंदुस्थानांत आलेले हूण लोक हे या युरपांतील हूणांचेच भाईबंद होत. यांना श्वेत हूण असें म्हणत असत. हेही मध्य आशियातील भटक्या टोळ्यांपैकींच लोक होत. हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं किती तरी काळपर्यंत हे लोक हिंदी सरहद्दीवर घिरट्या घालीत होते आणि तेथल्या सर्वच लोकांना त्यांच्यापासून त्रास पोंचत होता. हळूहळू त्यांची लोकसंख्या वाढली म्हणून आणि त्यांच्या पाठीमागून येणाऱ्या दुसऱ्या टोळ्यांनीं त्यांना पुढें रेटलें असेल म्हणूनही, पुढें त्यानीं हिंदुस्थानवर प्रत्यक्ष स्वारीच केली.

गुप्त घराण्यांतील पांचवा राजा स्कंदगुप्त याला त्या हूण लोकांच्या स्वारीला तोंड द्यावें लागलें. त्याने त्यांचा पराभव केला व त्यांना सरहद्दीपलीकडे हुसकून लावलें. परंतु बारा वर्षांनीं ते लोक पुन्हां स्वारी करून आले. हळूहळू त्यांनीं सर्व गांधार देश आणि उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग व्यापला. बुद्धधर्मीय लोकांना त्यानीं फार छळलें आणि सर्वच लोक भयभीत होतील अशी भयंकर अत्याचाराचीं कृत्यें करावयास सुरुवात केली.

त्याच्याशीं गुप्तांनीं सतत युद्ध सुरू ठेवलें होतें, परंतु त्यांना हांकलून लावण्यांत यापुढें त्यांना यश आलें नाहीं. आणखीच नव्यानव्या हूणांच्या टोळ्यांच्या लाटांवर लाटा आल्या आणि त्यानीं मध्य हिंदुस्थानही व्यापला. तसेंच त्यांचा पुढारी तोरमाण यानें आपणांस राजा (महाराजाधिराज) म्हणूनही जाहीर केलें. हा कांहीं कमी दुष्ट मनुष्य होता असें नव्हे; परंतु त्याच्यामागून त्याचा मुलगा मिहिरगुल हा आला. तो तर अगदीं निर्भेळ शंभर नंबरी रानटी आणि अत्यंत क्रूर सैतानच जणुं होता. मिहिरगुलाच्या करमणुकीचा एक प्रकार म्हणजे मोठमोठ्या कड्यांवरून हत्तींना खालीं खोल दऱ्यांत लोटून द्यावयाचें हा होता, असें राजतरंगिणी या आपल्या काश्मीरच्या इतिहासग्रंथांत कल्हण कवीनें वर्णन केलें आहे. त्याच्या अत्याचारामुळें अखेरीस आर्यावर्ताचा संताप जागृत झाला आणि गुप्तांच्या घराण्यांतील राजा बालादित्य आणि

मध्य हिंदुस्थानांतील राजा यशोधर्मा या दोघांच्या निशाणाखालीं आर्यांनीं एकत्र येऊन हूण लोकांचा पराभव केला आणि मिहिरगुल यास कैद केलें. परंतु हूणांप्रमाणें त्याच्याशीं आर्यांनीं क्रूरपणाचें वर्तन केलें नाहीं. राजा बालादित्य हा उदार होता. त्यानें मिहिरगुलाला मुक्त केलें व या देशामधून निघून जाण्यास सांगितलें. परंतु पळून न जातां मिहिरगुल काश्मीरमध्येंच दडून राहिला आणि ज्यानें त्याला इतक्या सभ्यपणानें आणि औदार्यानें वागविलें होतें त्याच बालादित्यावर त्यानें अचानक विश्वासघातपूर्ण हल्ला केला.

परंतु लौकरच हूणांची हिंदुस्थानांतील सत्ता दुर्बळ होत गेली. त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक मात्र येथेंच राहिले आणि आर्यलोकांच्या समाजांतच हळूहळू मिसळून गेले. मध्य हिंदुस्थान व राजपुताना यांमधील आपल्या रजपूत लोकांच्या रक्तामध्यें या हूण लोकांच्या रक्ताची कांहीं छटा असण्याचा संभव आहे.

हूणाचें राज्य फारच थोडा काळपर्यंत उत्तर हिंदुस्थानांत चाललें; फक्त सुमारें पन्नास वर्षेंच. त्यानंतर या देशांत ते शांतपणें वसाहत करून राहिले. परंतु हीं हूण लोकांचीं युद्धें आणि त्यांचे भयंकर अत्याचार, यांचा भारतीय आर्यांवर मात्र फार मोठा परिणाम झाला. हूण लोकांची राहणी व राज्यव्यवस्था ही आर्यांहून अगदींच निराळी होती. आर्य लोक या सुमारासही अजून पुष्कळच प्रमाणांत स्वातंत्र्यप्रेमी लोक होते. त्यांच्या राजांना सुद्धां लोकांच्या इच्छेपुढें नमावें लागे. त्यांच्या ग्रामपंचायतींची सत्ता फारच मोठी असे. परंतु हे हूण लोक येऊन येथें वसाहत करून राहिले व हिंदी समाजांतच मिसळले, याचा मात्र आर्यांच्या जिवनांतील या आदर्शांवर विपरीत परिणाम झाला; त्याच्यात हीनत्व आलें.

गुप्तांच्या घराण्यांतील बालादित्य हा शेवटचा श्रेष्ठ राजा. त्याचा अंत इ. स. ५३० या वर्षी झाला. एका गोष्टीचें मात्र विशेष कौतुक वाटतें, कीं हा बालादित्य राजा एका खास हिंदुधर्मीय वंशांतला असूनही त्याचा कल मात्र बुद्धधर्माकडे होता आणि त्याचा स्वतःचा गुरु एक बुद्ध भिक्षु होता. गुप्तांचा काळ हा हिंदुस्थानांतील कृष्णभक्तीच्या उदयाचा काळ होय; तरी सुद्धां त्यामध्यें बुद्धधर्माशीं तसा म्हणण्यासारखा झगडा झालेला आढळून येत नाहीं.

गुप्तांच्या दोनशें वर्षांच्या अमलानंतर उत्तर हिंदुस्थानांत पुन्हां एकदां छोटीं छोटीं, वेगवेगळीं, कोणाही मध्यवर्ती सत्तेचा अम्मल न मानणारीं स्वतंत्र राज्यें अस्तित्वांत आलीं. पण याच काळांत दक्षिण हिंदुस्थानांत एक महान् राज्य उदयास आलेलें आढळतें. आपण रामचंद्राच्या वंशांतील आहों असें म्हणणारा पुलकेशी नांवाचा राजा तेथें झाला. त्यानें इतिहासांत चालुक्यांचें साम्राज्य म्हणून प्रसिद्ध असलेलें साम्राज्य दक्षिणेंत स्थापन केलें. दक्षिणेंतील या राज्यांतील लोकांचा पूर्वेकडील बेटांमधील हिंदी वसाहतींशीं संबंध असलाच पाहिजे आणि त्या वसाहती आणि हिंदुस्थान यांमध्यें सतत दळणवळण असलें पाहिजे. एवढेंच नव्हे, तर हिंदी जहाजांतून इराणमध्यें सुद्धां नेहमीं माल वाहून नेण्यांत येत असे अशीही माहिती

आपणांला मिळते. इराणांतील ससन घराण्यांच्या अम्मलाच्या वेळीं, त्यांच्यापैकीं एक श्रेष्ठ राजा दुसरा खुशरू याच्या कारकीर्दीत, या दोन्ही देशांचे वकील सुद्धा एकमेकांच्या दरबारांत असत.

## ३९

# हिंदुस्थानचा परकी बाजारपेठांवरील ताबा

५ मे, १९३२

ज्या प्राचीन काळच्या इतिहासाची चर्चा आपण करतों आहों त्या काळांत अगदीं प्रथमपासून तों थेट हजार वर्षांहून अधिक काळपर्यंत, हिंदी लोकांचा व्यापार सर्व पश्चिम यूरप व पश्चिम आशिया यांमध्यें आणि पूर्वेकडे थेट चीनपर्यंत सतत जोमानें चालू असलेला आढळून येतो. कशाच्या जोरावर हें असें घडून आलें असेल? हिंदी लोक उत्कृष्ट दर्यावर्दी होते आणि उत्कृष्ट व्यापारी होते यांत तर खरोखरच कांहीं शंका नाहीं. पण तेवढ्यामुळेंच कांहीं त्यांचा व्यापार हा असा दूरवर भरभराटला असें नव्हे. तसेंच त्यांच्या ठिकाणीं हस्तव्यवसाय व कारागिरी यांच्यामधील अत्यंत श्रेष्ठ कौशल्य होतें हेंही खरें असलें, तरी तेवढ्यानें केवळ हें साधलें असेंही नव्हे. कांहीं प्रमाणांत या दोन्ही गोष्टींचा उपयोग या कामीं झाला हें खरें. परंतु दूरदूरच्या देशांतील बाजारपेठांवर हिंदुस्थानचें हें जें वर्चस्व चालत होतें याचें एक विशेष प्रमुख कारण हिंदुस्थानमध्यें रसायनशास्त्रांत, विशेषतः रंगविण्याच्या कलेंत करण्यांत आलेली प्रगति, हें असावें असें दिसतें. कापडासाठीं पक्के रंग तयार करण्याच्या कांहीं खास पद्धती त्या काळच्या हिंदी लोकानीं शोधून काढलेल्या होत्या असें दिसतें. निळीच्या झाडापासून एक विशेष प्रकारचा रंग करण्याची खास कृतीही त्यांना अवगत होती. या रंगाचें इंडिगो हें परकी भाषेंतील नांव सुद्धां इंडिया, हिंदुस्थान या शब्दापासून निघालेलें आहे, हें तुझ्या ध्यानांत येईल. त्याचप्रमाणें पोलादाला चांगलें तेजदार पाणी देण्याची कलाही बहुधा त्या लोकांना माहीत असावी; आणि त्यांना छानदार पोलादी शस्त्रें तयार करतां येत असावीं. तुला आठवतच असेल मागें एकदां मीं सांगितलेलें, कीं ॲलेक्झांडरच्या स्वारीसंबंधीं इराणमध्यें ज्या प्राचीन कथा प्रचलित आहेत त्यांमध्यें जेव्हां जेव्हां उत्कृष्ट तरवार किंवा जंबिया यांचा उल्लेख येतो, तेव्हां तेव्हां तें हत्यार हिंदुस्थानांत तयार झालेलें होतें असें सांगितलेलें असतें.

हिंदुस्थानमध्यें हे रंग आणि इतर वस्तू इतर देशांतल्यापेक्षां जास्त चांगल्या दर्जाच्या तयार होत असत. तेव्हां हिंदुस्थानचें सर्व बाजारपेठांवर प्रभुत्व चालावें हें अगदीं स्वाभाविक होतें. ज्या देशाजवळ अथवा मनुष्याजवळ हत्यार चांगलें असेल,

किंवा ज्याला कोणतीही वस्तु अधिक चांगल्या रीतीनें किंवा स्वस्त भावांत तयार करण्याची कृति अवगत असेल, तो देश किंवा तो मनुष्य आज ना उद्यां केव्हां तरी, ज्याच्याजवळ असें हत्यार किंवा अशी कृति नाहीं अशा देशाला किंवा मनुष्याला बाजारांतून हाकलून लावणार, ही गोष्ट अपरिहार्य आहे. गेल्या दोनशें वर्षांत यूरप खंड आशियाच्या पुष्कळच पुढें गेलें आहे याचें हेंच कारण आहे. तिकडच्या लोकांनीं नवनवे प्रदेश शोधून काढले आणि नवनवे शास्त्रीय शोध लावले; त्यामुळें यूरपजवळ नवीं आणि प्रचंड सामर्थ्यवान् हत्यारें निर्माण झालीं. आणि उत्पादनाच्या नवनव्या पद्धतीही अमलांत आल्या. याच्या सहाय्यानें यूरपनें सर्व जगांतील व्यापारी पेठा काबीज केल्या आणि तें खंड संपन्न आणि सत्ताधीश झालें. त्या कामीं इतरही आणखी कांहीं कारणांची मदत झाली, नाहीं असें नाहीं. परंतु सध्यांच्या क्षणीं हत्यार, यंत्र हें किती महत्त्वाचें आहे ही गोष्ट मला तुझ्या ध्यानांत आणावयाची आहे. एका श्रेष्ठ पुरुषानें म्हटलें आहे, कीं मनुष्य हा यंत्र ( tool ) निर्माण करणारा प्राणी आहे आणि मनुष्याचा अगदीं प्राचीनतम काळापासून तों आजपर्यंतचा इतिहास म्हणजे सुरुवातीच्या अश्मयुगांतील दगडी टोंकांचे बाण आणि दगडी हातोडे याच्यापासून आजचीं आगगाडीचीं इंजिनें आणि महाप्रचंड यंत्रें येथपर्यंत, एकाहून एक अधिकाधिक कार्यक्षम होत गेलेल्या अवजारांचा, यंत्राचा ( tool ) च इतिहास आहे. खरोखर, एवढीशी कांहीं गोष्ट करावयाची म्हटली तरी हत्यारावांचून आपलें चालत नाहीं. हत्यारें नसतीं तर आपण आज कोणत्या अवस्थेंत असतों कोण जाणे!

मुळांत हत्यार, यंत्र ही एक चांगली वस्तु आहे. त्यामुळें आपलें काम कमी श्रमांत होतें. परंतु हत्याराचा दुरुपयोग होणें शक्य आहे हेंही अर्थात् खरें आहे. करवत हें एक उपयुक्त हत्यार आहे. पण लहान मुलाच्या हातांत ती पडली तर तें तिच्यापासून स्वतःला दुखापत करून घेण्याचा संभव आहे. चाकूइतकी उपयुक्त वस्तु तर फारच क्वचित् असेल; प्रत्येक स्काउटजवळ तो असलाच पाहिजे असा तर नियम आहे. पण एखादा मूर्ख मनुष्य तोच चाकू घेऊन एखाद्याचा प्राणही घेईल. हा कांहीं बिचाऱ्या त्या चाकूचा दोष नव्हे. दोष त्या हत्याराचा दुरुपयोग करणाऱ्या माणसाचा आहे.

अशाच रीतीनें आधुनिक काळची यंत्रसामग्री मुळांत चांगली उपयुक्त असूनही अनेक रीतींनीं तिचा दुरुपयोग करण्यांत येत आहे. वास्तविक या यंत्रसामग्रीचा उपयोग जनतेवरील कामाचा बोजा कमी करण्यासाठीं व्हावयास पाहिजे होता; पण उलट तिच्यामुळें पुष्कळ अंशीं पूर्वीपेक्षाही जनतेची स्थिति अधिक बिकट आणि दुःखमय झाली. लाखों लोकांना या यंत्रसामग्रीमुळें वास्तविक सुख आणि सोयी यांचा लाभ व्हावयास पाहिजे होता. त्याऐवजीं तिच्यापासून पुष्कळांच्या वांट्याला दैन्यच आलें आहे आणि शिवाय त्यामुळें राज्यकर्त्यांच्या राज्ययंत्रांच्या हातीं एवढें मोठें सामर्थ्य उत्पन्न झालें आहे, कीं आपल्या लढायांमध्यें कोट्यवधि लोकाचे बळी देणें आज त्यांना शक्य झालें आहे.

परंतु हा कांहीं त्या यंत्रसामग्रीचा दोष नव्हे ; दोष आहे त्या यंत्रसामग्रीचा दुरुपयोग केला जातो हा. ही सारी यंत्रसामग्री ज्यांना तिच्यापासून आपलाच सगळा फायदा करून घ्यावयाचा आहे अशा बेजबाबदार लोकांच्या ताब्यांत जर नसती आणि तिचें सर्व कार्य लोकांच्याच प्रतिनिधींनीं लोकांच्या हिताच्या दृष्टीनें चालविलें असतें, तर आज जगात केवढा मोठा तरी फरक झालेला आढळून आला असता.

तेव्हा मी सांगत होतों काय, कीं त्या काळीं हिंदुस्थान आजच्यासारख्या अवस्थेंत नव्हता ; तर त्या वेळीं तो उत्पादनपद्धतींत सर्व जगांत आघाडीच्या स्थानीं होता. आणि म्हणूनच हिंदी कापड, हिंदी रंग, आणि इतर हिंदी वस्तू दूरदूरच्या देशांमध्यें जात असत आणि या वस्तू त्या त्या देशांत आपल्याला मिळाव्या यासाठीं लोकांची मोठी धडपड असे. या व्यापारामुळें हिंदुस्थानला संपत्तीचा मोठा लाभ झाला. या वस्तूंच्या व्यापाराखेरीज दक्षिण हिंदुस्थानांतून बाहेरच्या देशांत मिरीं आणि इतर मसाल्याचे जिन्नस यांचाही पुरवठा होत असे. हे मसाल्याचे जिन्नस अर्थात् येत पूर्वेकडच्या बेटांमधून आणि हिंदुस्थानच्या मार्गानें पश्चिमेकडे जात. रोममध्यें आणि पश्चिम यूरपांत या मिऱ्यांची मोठी चहा असे, आणि गॉथ लोकांचा एक नेता ॲलॅरिक यानें इ. स. ४१० मध्यें रोम शहर पादाक्रांत केलें, तेव्हां तेथून त्यानें ३००० पौंड मिरीं लुटून नेलीं असें सांगतात. हीं सर्व मिरीं तेथें हिंदुस्थानांतून किंवा हिंदुस्थानच्या मार्गानेंच आलेलीं असलीं पाहिजेत.

## ४०

# देशांच्या आणि संस्कृतींच्या भाग्याचे चढउतार

६ मे, १९३२

चीनला अलीकडे आपण फार दिवस दूर ठेवलें आहे. तेव्हां आतां पुन्हां तिकडे जाऊन चीनची थोडी हकीकत पुढें सांगूं या. आणि इकडे पश्चिमेस रोमचें साम्राज्य गडगडून पडत असतां आणि गुप्तांच्या अम्मलाखालीं हिंदुस्थानांत राष्ट्रीय पुनरुज्जीवन होत असताना चीनमध्यें काय घडामोडी होत होत्या तें पाहूं या. रोमचा उदय व ऱ्हास याचा चीनवर तसा कांहींच परिणाम झाला नाहीं. हीं दोन्ही राज्यें एकमेकांपासून फारच दूर आणि अलग होतीं. तथापि चिनी राज्याकडून मध्य आशियांतलि टोळ्यांना हुसकून लावण्यांत आल्यामुळें यूरपमध्यें आणि हिंदुस्थानांत फार घातक परिणाम घडून आले, हें मीं तुला सांगितलेंच आहे. या टोळ्या स्वतः, किंवा त्यांनीं ज्याना हुसकून लावलें त्या टोळ्या, एक तर पश्चिमेकडे गेल्या किंवा दक्षिणेकडे गेल्या. तेथील राज्यें आणि राज्यव्यवस्था त्यांनीं उखडून टाकिल्या आणि सगळा गोंधळ

निर्माण केला. त्यांपैकीं पुष्कळसे लोक पूर्व यूरपमध्यें आणि हिंदुस्थानात वसाहत करून स्थिर झाले.

दोन्ही देश परस्परापासून फार दूर असले तरी रोम व चीन यांमध्यें प्रत्यक्ष दळणवळणाचे संबंध मात्र जरूर होते आणि एकमेकांचे वकीलही एकमेकांकडे असत. चिनी ग्रंथांमध्यें अशा अगदीं जुन्यांत जुन्या वकिलातीचा उल्लेख सापडतो, तो म्हणजे इ. स. १६६ सालीं रोमचा बादशहा आनटून यानें पाठविलेल्या वकिलाचा. हा आनटून म्हणजे दुसरातिसरा कोणी नसून बादशहा मार्कस् ऑरेलियस अँटोनिनस हाच होय. मागें एका पत्रांत मीं तुला त्याच्याबद्दल सांगितलें आहे.

रोमचा पाडाव व ऱ्हास ही यूरपमधील एक फारच प्रचंड घटना होती. एखादें शहर किंवा साम्राज्यच काय तें नाहींसें झालें, एवढाच याचा अर्थ नव्हता. तसें पाहिलें तर रोमचें साम्राज्य यानंतर पुष्कळ काळपर्यंत कॉन्स्टान्टिनोपल येथें चालूच होतें; आणि जवळजवळ १४०० वर्षेंपर्यंत रोमच्या साम्राज्याचें पिशाचही यूरपमध्यें वावरतच होतें. परंतु रोमचा पाडाव म्हणजे एका युगाचा अंत होता. प्राचीन ग्रीक आणि रोमन जगताचा तो अंत होता. रोमच्या नष्ट झालेल्या त्या संस्कृतीच्या पायावर एक नवीनच जग, नवीनच संस्कृति, नवीनच भौतिक सुधारणा व साधनसंपत्ति पश्चिमेकडे त्या वेळीं उदयास येऊं लागली. पूर्वीच्या काळीं वापरले जाणारे शब्द व संप्रदायच नव्या काळीं वापरले जात असतात; आणि त्यामुळें आपली फसगत होत असते. आपल्याला असें वाटतें, कीं पूर्वी त्यांचा जो अर्थ होता तोच आजही आहे. रोमचें राज्य पडल्यानंतरही पश्चिम यूरपांतील लोक रोमच्या संप्रदायांतलिच भाषा बोलत; परंतु त्या भाषेच्या पाठीमागे आतां निराळयाच कल्पना आल्या होत्या, शब्दांना निराळेच अर्थ प्राप्त झालेले होते. लोक असें म्हणतात, कीं आजची यूरपांतील राष्ट्रें हीं ग्रीस आणि रोम यांचीच प्रजा—अपत्यें—आहेत. कांहीं अंशीं हें खरेंही आहे. तरी पण या विधानामुळें फार गैरसमज होण्याचा संभव आहे. कारण ग्रीस व रोमचीं राज्यें ज्या विशिष्ट संस्कृतींचीं निदर्शक होतीं, त्यांहून अगदींच भिन्न संस्कृतींचीं निदर्शक आजचीं यूरपीय राष्ट्रें आहेत. ग्रीस आणि रोम यांचें जुनें जग त्यांच्याबरोबर जवळजवळ पार रसातळाला गेलें. एक हजार वर्षें किंवा त्यांहून अधिक काळपर्यंत संवार्धित झालेल्या सुधारणेचा तो वृक्ष म्हातारा होऊन वठून गेला. आणि त्यानंतरच मग पश्चिम यूरपमधील अर्धवट सुधारलेले व अर्धवट रानटी लोक इतिहासाच्या ग्रंथाच्या एका पानावर अवतीर्ण झाले, आणि हळूहळू त्यांनीं नवीनच विद्या आणि नवीनच संस्कृति संपादन केली. रोमपासून ते पुष्कळच शिकले; जुन्या जगापासून पुष्कळच गोष्टी त्यांनीं घेतल्या. परंतु हें शिकण्यासाठीं त्याना सायास फार पडले व काळही फारच मोठा लागला. कितीएक शतकें विद्या आणि संस्कृति या यूरपमध्यें झोंपीं गेल्या, असें होऊन गेलें. सगळीकडे अज्ञानांधकार आणि धर्मवेड याचाच धुमाकूळ माजला. म्हणूनच या कांहीं शतकांच्या काळाला तमोयुग, कृष्णयुग असें

म्हणण्याचा प्रघात पडला आहे. हें कशामुळें झालें? जग पुढें जाण्याचें सोडून असें मागें कां गेलें? शेंकडों वर्षांच्या परिश्रमानें संपादिलेलें सगळें ज्ञान नाहींसें कां झालें, किंवा विसरलें का गेलें? हे फार मोठमोठे प्रश्न आहेत. जगातील मोठमोठ्या शहाण्या लोकांचें चित्त भांबावून सोडणारें हें एक कोडें आहे. म्हणून मी कांहीं त्याचें उत्तर देण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. आपल्या हिंदुस्थानचेंच उदाहरण पहा ना: आचार आणि विचार दोन्ही दृष्टींनीं श्रेष्ठ असलेलें हें राष्ट्र—ह्याला इतकी भिकार अवदशा प्राप्त व्हावी आणि किती तरी दीर्घ काळपर्यंत त्याला गुलाम, परतंत्र देश होऊन पडावें लागावें, ही किती चमत्कारिक गोष्ट आहे! तीच गत चीनची. त्याचा भूतकाळ किती ऐश्वर्यसंपन्न, किती ओजस्वी आहे! आणि आज तें राष्ट्र ज्याला कधीं अंतच नाहीं, अशा युद्धांच्या तावडींत सांपडावें! मनुष्यानें युगानुयुगें परिश्रम करून कणाकणानें संपादन करून एकत्र केलेलें ज्ञान व विद्या या स्वतःच मुळांतच अजीबात नष्ट होऊन जात नसतील हें खरें; परंतु कशानें तरी आमचेच डोळे जणुं मिटल्यासारखे होतात आणि आम्हांला कांहींच दिसेनासें होतें. घराच्या खिडक्या बंद केल्या म्हणजे नाहीं का आंत अंधारगुडुप होत? तशी अवस्था आमच्या मनाची झाली आहे. बाहेरच्या अंगाला सगळीकडे भरपूर प्रकाश असतांना आम्हींच जर आपले डोळे मिटले किंवा खिडक्या लावून घेतल्या, तर त्याचा अर्थ प्रकाशाचाच अंत झाला असें कांहीं नव्हे.

कांहीं लोक म्हणतात, कीं यूरपांतील तमोयुगाचें मूळ कारण ख्रिस्ती धर्म हा आहे. हा ख्रिस्ती धर्म जीझसनें प्रतिपादिलेलें नवें धर्मतत्त्व नव्हे; तर रोमचा बादशहा कॉन्स्टन्टाइन यानें या धर्माचा स्वीकार केल्यानंतर भरभराटीला आलेलें अधिकृत ख्रिस्ती धर्मपीठ हें होय. हे लोक स्पष्टच असें म्हणतात, कीं कॉन्स्टन्टाइननें चौथ्या शतकांत ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला तेव्हापासून एक निराळेंच 'हजार वर्षांचें युग' सुरू झालें. या युगामध्यें बुद्धीला बेड्या घालण्यांत आल्या, विचाराला गुलाम करून टाकण्यांत आलें, ज्ञानाची मुळींच प्रगति झाली नाहीं. या युगाबरोबर छळ, धर्मवेड, असहिष्णुता यांचाच जीवनांत प्रवेश व वाढ होऊन आटोपलें नाहीं, तर शास्त्रामध्यें किंवा इतर कशामध्यें प्रगति करणें कोणालाही अत्यंत दुर्धर करून टाकलें गेलें. धर्मविषयक ग्रंथ हेच पुष्कळदां प्रगतीच्या मार्गांतील धोंडे होऊन बसूं लागले. हे ग्रंथ लिहिले गेले त्या वेळचें जग कशा प्रकारचें असेल याची या ग्रंथांवरून चांगली कल्पना येते. त्या काळच्या कल्पना व आचार-विचार काय असतील यांचीही त्यांमधून आपल्याला माहिती मिळते. परंतु या सर्व कल्पना आणि हे आचार-विचार धार्मिक ग्रंथांमध्यें ग्रथित केलले असल्यामुळें त्यांच्याबद्दल विरोध प्रकट करणें, त्यांच्या उपयुक्तत्वाबद्दल शंका प्रकट करणें, हें कोणालाही शक्य असत नाहीं. जगामध्यें वाटेल तेवढा प्रचंड बदल होवो, तरी या बदलत्या परिस्थितीला जुळती अशी एक राहणी व विचारसरणी यांचा अवलंब, या धार्मिक ग्रंथांशीं आमचीं मनें जखडून गेल्यामुळें आम्हांला करता येत नाहीं. याचा परिणाम

असा होतो, कीं आमचें सारें जीवन सभोंवतालच्या परिस्थितीशीं अगदींच जुळेनासें होतें. आणि मग अर्थातच अनवस्था निर्माण होते.

म्हणून कितीएक लोक यूरपमध्यें हें अंधकाराचें युग–तमोयुग – आणल्याबद्दल खिस्ती धर्मावर आरोप करतात; तर दुसरे कांहीं लोक असें म्हणतात, कीं या तमोयुगात खिस्ती धर्म, खिस्ती धर्मोपदेशक, खिस्ती भिक्षू यांनींच ज्ञानदीप तेवता ठेवला. त्यांनींच लौकिक विद्या वा चित्रकलादि कला जिवंत ठेवल्या आणि मोठमोठ्या मौल्यवान् ग्रंथांच्या नकला करून त्यांनींच त्यांचें संरक्षण केलें.

अशीं भिन्न भिन्न मतें लोक माडतात. कदाचित् दोघांच्याही म्हणण्यांत तथ्य असेल. परंतु रोमच्या पाडावानंतर घडून आलेल्या सर्वच वाईट गोष्टींना केवळ एक खिस्ती धर्मच जबाबदार आहे, हें म्हणणें हास्यास्पद वाटतें. खरी गोष्ट अशी, कीं या वाईट गोष्टींनींच तर रोमचा पाडाव झाला.

परंतु हें फारच मोठें विषयांवर झालें. मी सांगत होतों काय, कीं तिकडे यूरपमध्यें एकाएकीं एक सामाजिक घडी विस्कटली; आणि आकस्मिक सगळीच उलथापालथ झाली. असा आकस्मिक बदल इकडे चीनमध्यें किंवा हिंदुस्थानमध्यें झाला नाहीं. यूरपमध्यें या सुमारास एका सुधारणेचा अजीबात अंत होऊन तिच्या जागीं एका नव्याच संस्कृतीचा जन्म होत असलेला आपणांस दिसतो. पुढें हळूहळू वाढून तीच संस्कृति आजच्या प्रकट अवस्थेला येऊन पोंचली आहे. परंतु चीनमध्यें पहिलीच उच्च दर्जाची संस्कृति आणि सुधारणा जशीच्या तशीच, मध्यें कसलाही विघात किंवा बदल न होतां, चालू राहिलेली आपल्याला दिसून येते. त्याच्यामध्यें चढउतार पुष्कळ झाले. भरभराटीचे काळ आले व गेले. चांगले व वाईट राजे आले व गेले. राजवंश पुष्कळ बदलले. परंतु संस्कारांचा, परंपरेचा, वारसा कोठेंही तुटला नाहीं. पुढें चीनचीं छकलें होऊन तेथें पुष्कळ निरनिराळीं राज्यें स्थापन झालीं. आणि या राज्यांत आपापसांत यादवीसुद्धा सुरू झाली. तरीसुद्धां कला आणि साहित्य यांचा बहर कमी झाला नाहीं. उत्कृष्ट चित्रें रंगविलीं जातच राहिलीं; आणि सुंदर भांडीं घडत राहिलीं व सुंदर इमारतीही बांधल्या जात राहिल्या. चीनमधील यादवीच्या काळांतच छपाईची कला उपयोगांत आली, चहा पिण्याची चाल पडली आणि तिचें गुणगान काव्यांतही होऊं लागलें. कलाकौशल्य आणि माधुर्य यांचा चिनी जीवनात असा कांहीं एक सुंदर अखंड ओघ चालत आलेला आहे, कीं उच्च दर्जाच्या संस्कृतीशिवाय तो निर्माण होऊन चालू राहणें शक्यच नव्हतें.

हिंदुस्थानांतही हाच प्रकार आढळतो. येथेंही रोममधल्याप्रमाणें आकस्मिक ओघ तुटलेला आढळत नाहीं. कांहीं काळ चांगला तर कांहीं वाईट, असा चढउतार येथेंही झाला, यांत कांहींच संशय नाहीं. कांहीं काळ साहित्य आणि कला यांच्या निर्मितीस बहर आला, तर कांहीं काळ मोडतोड आणि नासधूस याचा गेला. पण एक तऱ्हेनें संस्कृतीचा ओघ मात्र कायम राहिला. तो हिंदुस्थानांतून पूर्वेकडच्या प्रदेशांत प्रसारही

पावला. आणि हा देश लुटण्याकरितां आलेले रानटी लोकही या ओघात शिकून शहाणे होऊन त्या संस्कृतीशीं एकजीव व समरस होऊन गेले.

चीन व हिंदुस्थान यांची स्तुति करून मला पश्चिमेकडील लोकांचें उणें काढावयाचें आहे, अशी मात्र समजूत करून घेऊं नकोस. चीनमध्यें काय किंवा हिंदुस्थानांत काय, जगाला ओरडून टाळ्या पिटून सांगण्यासारखें या दोन्ही देशांत आजच्या घटकेला कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं. भूतकाळीं हे देश कितीही श्रेष्ठ होऊन गेलेले असले, तरी आजच्या जगांत त्यांचा राष्ट्रीय दर्जा फारच खालच्या प्रतीचा आहे. हें आंधळ्याला सुद्धां दिसण्यासारखे आहे. त्यांचा आपल्या प्राचीन संस्कृतीशी केव्हांही आकस्मिकपणें किंवा अजीबात संबंध तुटून गेला नाहीं ही गोष्ट खरी असली, तरी या देशांत कांहीं वाईट घडत आलेंच नाहीं, किंवा त्यांचें श्रेष्ठत्व कमी होत गेलेंच नाहीं, असा कांहीं त्याचा अर्थ नव्हे. एकदां आपण उच्च स्थानीं होतों आणि आज अगदीं तळाशीं आहोंत. याचा उघड अर्थ हाच, कीं जगाच्या इतिहासात आम्ही खालींच घरंगळत गेलों आहों, आमची अवनतीच झाली आहे. आमच्या संस्कृतीचा ओघ सारखा कायम आहे म्हणून पुष्कळ आम्हीं फुशारकी मारली, तरी जर ह्या संस्कृतीच्या मुळाशींच कीड लागली असेल तर ह्या फुशारकींत समाधान मानण्याजोगें काय आहे? उलट, आमच्या प्राचीन काळच्या परंपरेपासून आमची आकस्मिक ताटातूट झाली असती तरच बरें झालें असतें, असेंच म्हणावें लागेल. त्यामुळें आम्हांला चांगला हादरा बसला असता. नवीन जीवन आणि नवीन जोम त्यामुळें आमच्या ठिकाणीं निर्माण झाला असता. आज हिंदुस्थानांत व जगामध्यें ज्या घडामोडी चालू आहेत, त्यामुळें मात्र आमच्या देशाला अशी जरूर ती जोराची ढकली मिळत आहे व त्याच्या ठिकाणीं नवचैतन्य आणि तारुण्य निर्माण होत आहेसें वाटतें.

प्राचीन काळीं हिंदुस्थानात जी चिकाटी आणि सामर्थ्य आढळून येतें त्याचें मूळ या देशात सर्वत्र परसलेल्या स्वायत्त, आपल्यापुरत्या स्वतंत्र अशा पंचायतींतील लोकराज्यांत असावे असें दिसतें. आज आपल्यामध्यें आहेत असे मोठमोठे जमीनदार, सरंजामदार त्या काळीं नव्हते. जमीन ही खेडेगांवची समाईक मालकीची म्हणजेच पंचायतीच्या मालकीची असे; किंवा जे प्रत्यक्ष जमीन कशीत अशा शेतकऱ्यांच्या मालकीची असे. या पंचायतींच्या हातीं फार मोठी सत्ता आणि अधिकार असे. खेडेगावांतील लोकांकडून या पंचायतींची निवड होत असे, आणि अशा रीतीनें या पद्धतींत एक प्रकारें लोकशाहीचा पायाच मुळाशीं होता. पुष्कळ राजे झाले आणि गेले. त्यांच्या आपापसांत झटापटी झाल्या. परंतु त्यानीं कोणीं या ग्रामराज्याच्या पद्धतीला हात लावला नाहीं; त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ केली नाहीं, किंवा या पंचायतींच्या स्वातंत्र्यावर गदा घालण्याचेंही त्यांनीं कधीं धाडस केलें नाहीं. त्यामुळें निरनिराळीं साम्राज्यें जरी बदललीं, तरी या ग्रामराज्यांच्या पद्धतीवर आधारलेली समाजव्यवस्था विशेष फरक न होतां तशीच कायम राहिली. निरनिराळ्या स्वाऱ्या, लढाया आणि

वेळोवेळीं बदलणारे राजवंश यांचे वृत्तांत वाचून आपली अशी गैरसमजूत होत असते, कीं या गोष्टींचा सर्वच लोकसमाजावर परिणाम झालेला असला पाहिजे. अर्थात् कधीं कधीं या गोष्टींचा सर्व समाजावर परिणाम झालाही. विशेषतः उत्तरेकडील भागांत हा परिणाम मोठ्या प्रमाणांत झाला. परंतु सामान्यतः असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं, कीं समाजाच्या वरच्या भागांत घडून आलेल्या या धामधुमीनें सामान्य लोकसमाजाला फारसा त्रास कधींच पोंचला नाहीं आणि त्याचें जीवन जसेंच्या तसें चालू राहिलें.

हिंदी समाजव्यवस्थेमध्यें पुष्कळ काळपर्यंत दृढता टिकून राहण्याचें आणखी एक कारण म्हणजे या देशामधील जातिसंस्था. अर्थात् आजच्या स्वरूपांत ही संस्था आढळते तशी नव्हे ; तर मुळांत तिची ज्या प्रकारची आंखणी करण्यांत आलेली होती तशा प्रकारची जातिसंस्था. त्या वेळीं पुढच्या काळातल्याप्रमाणें जातिसंस्थेचीं बंधनें कडक झालेलीं नव्हतीं. तसेंच निव्वळ जन्मावरून जात ठरवण्याची पद्धति तेव्हां नव्हती. या जातिसंस्थेमुळें हिंदी समाजजीवनाची घडी हजारों वर्षेपर्यंत टिकून राहिली. अर्थात् जातिसंस्थेकडून हें कार्य जें झालें, तें जातिसंस्थेमध्यें कांहीं वाढ होऊं नये किंवा फरक होऊं नये असा प्रयत्न करून नव्हे ; तर उलट, या गोष्टी होण्याला अनुकूलता उत्पन्न करून देऊनच झालें. हिंदुस्थानांतील धर्माची व जीवनाची परंपरा ही नेहमींच सहिष्णुतेची आहे. नवीन प्रयोग करून पाहण्याची त्यांत दृष्टि आहे आणि बदल घडवून आणावयाला त्यात नित्य अवसर असे. यामुळेंच त्या धर्माला व समाजव्यवस्थेला शक्ति प्राप्त झाली. परंतु परकी स्वाऱ्या व इतर धामधुमी यांच्यामुळें हळूहळू जातिसंस्था ही अगदीं कडक झाली आणि सर्वच हिंदी सामाजिक परंपरेंतील लवचिकपणा नाहींसा होऊन ती मुळींच वांकेनाशी झाली, बदलेनाशी झाली. ही प्रवृत्ति इतक्या दीर्घकाळपर्यंत सुरू राहिली, कीं अखेरीस हिंदी लोकांना सध्याची दैन्यावस्था प्राप्त झाली आणि आमची जातिसंस्था ही सर्व प्रकारच्या प्रगतीची शत्रु बनून गेली. सर्व सामाजिक यंत्राची एकदृढता आणि एकसूत्रीपणा कायम ठेवण्याऐवजीं जातिसंस्थेनें समाजयंत्राचीं शेंकडों शकलें केलीं आहेत, आम्हांला दुर्बल करून टाकलें आहे आणि भावाला भावाशीं शत्रुत्व करायला लावलें आहे.

अशा रीतीनें प्राचीन काळीं जातिसंस्थेनें हिंदी समाजव्यवस्थेंत सामर्थ्य निर्माण केलें. पण त्याच वेळीं या समाजव्यवस्थेच्या ऱ्हासाचीं बीजेंही या जातिसंस्थेंतच सामावलेलीं होतीं. जी केव्हांही नष्ट होऊं शकणारच नाहीं अशा प्रकारची विषमता अखंड चालू ठेवण्याचा हा प्रयत्न अखेरीस फसणार हें ठरलेलेंच होतें. विषमता किंवा अन्याय अथवा एका वर्गाकडून किंवा गटाकडून दुसऱ्या वर्गाची किंवा गटाची होत राहणारी लूट यांच्या पायावर दृढ आणि दीर्घकाळ टिकून राहणारी समाजव्यवस्था कधींच स्थापन करता येणार नाहीं. जगामध्यें आजही अजून अशा प्रकारची अन्याय्य पिळणूक चालूच आहे आणि त्यामुळेंच जगांत सर्वत्र दुःख आणि धडपड दिसून येत

आहे; पण सर्वत्र लोकांना आतां हें समजून चुकलें आहे आणि या पिळणुकीपासून मुक्तता करून घेण्यासाठीं लोक कसून प्रयत्न करीत आहेत.

हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच चीनमध्येंही समाजव्यवस्थेच्या सामर्थ्याचें मूळ तेथील खेड्यांमध्यें आणि स्वतःची जमीन कसून राहणाऱ्या लाखों शेतकऱ्यांमध्यें होतें. तेथेंही असे मोठमोठे जमीनदार नव्हते. धर्माचें स्वरूप तेथील लोकांनीं हटवादीपणाचें, वेदवाक्याप्रमाणें अढळ असें किंवा परमतासहिष्णु केव्हांच होऊं दिलें नाहीं. जगांतील इतर कोणत्याही लोकांपेक्षा चिनी लोक पूर्वींही धर्माच्या बाबतींत कमींत कमी हटवादी किंवा अंधश्रद्धायुक्त होते आणि आजच्या घटकेलाही ते तसेच सर्वांत कमी धर्मवेडे आहेत.

तसेंच हिंदुस्थानांत आणि चीनमध्येंही ग्रीस अथवा रोममधल्यासारखी किंवा त्यापूर्वींही ईजिप्तमधल्यासारखी मजुरांची गुलामगिरी नव्हती हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गुलाम असलेले कांहीं घरगुती नोकर या देशांत असत खरे; परंतु त्यामुळें येथील एकंदर समाजव्यवस्थेंत फारसा फरक होण्यासारखा नव्हता. असे हे गुलाम नसते, तरीही ती समाजव्यवस्था जशीच्या तशीच चालू राहिली असती. ग्रीस किंवा रोममध्यें मात्र असें होऊं शकलें नसतें. तेथील ते असंख्य गुलाम हे समाजव्यवस्थेचा एक अत्यंत आवश्यक भाग होते. समाजांतील साऱ्या श्रमांचा खरा भार केवळ याच लोकांवर असे. तसेंच ईजिप्तमध्येंही हे मजूर गुलाम नसते, तर तेथले ते पिरॅमीड आपल्यासमोर कोठून उभे राहते?

या पत्राची सुरुवात मीं चीनपासून केली आणि चीनची हकीकत पुढें सांगण्याचा माझा हेतु होता. पण मी दुसऱ्याच विषयाकडे वाहवलों. बाकी माझी ही नेहमींचीच खोड आहे म्हणा. निदान पुढच्या पत्रांत आपण चीनला धरून राहूं या.

## ४१

# तंग राज्याच्या अम्मलाखालीं चीनचा उत्कर्ष होतो

७ मे, १९३२

चीनमधील हान घराण्याबद्दल मीं तुला सांगितलें आहे; तसेंच तेथें झालेला बुद्धधर्माचा उदय, छापखान्याच्या कलेचा शोध आणि सार्वजनिक अम्मलदार निवडण्याकरितां करण्यांत आलेली परीक्षेच्या पद्धतीची योजना, यांबद्दलही मी तुझ्याशीं बोललों. ख्रिस्तानंतरच्या तिसऱ्या शतकांत हान घराण्याचा अंत झाला आणि चिनी साम्राज्याचे तीन तुकडे झाले. हा त्या "त्रिराज्याचा" काळ कांहीं शतकें चालला. परंतु पुनः एकदां तंग नांवाच्या वंशाच्या राजांनीं चीनमध्यें सर्व देशाचें मिळून एक प्रबळ राज्य स्थापन केलें. सातव्या शतकाच्या सुरुवातीची ही गोष्ट.

चीनच्या विभागणीच्या काळांतही, आणि उत्तरेकडून तार्तरी लोकांचे हल्ले होतच होते तरीही चिनी संस्कृति आणि विद्या व कला यांचा ओघ जसाच्या तसा कायम राहिला. तत्कालीन मोटमोठीं ग्रंथालयें आणि सुंदर चित्रें याबद्दलचीं वर्णनें आपल्याला पुष्कळच आढळतात. हिंदुस्थानांतून चीनमध्यें निवळ तलम कापड आणि इतर अशा जातीचा माल यांचीच फक्त निर्यात होत होती असें नव्हे; तर येथील तत्त्वविचार, धर्म, कला यांचीही निर्यात होत होती. हिंदुस्थानमधून पुष्कळ बुद्धधर्म-प्रचारक चीनमध्यें, जात असत. अर्थात् ते आपल्याबरोबर हिंदी कलेची परंपराही नेतच असत. एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील कलावंत व श्रेष्ठ कारागीरही तिकडे गेलेले असावे. बुद्धधर्माचा उदय आणि हिंदुस्थानातून आलेल्या नवनव्या कल्पना यांचा चीनवर फार परिणाम झाला. चीन देश अर्थातच मुळापासून फार सुधारलेला असाच देश होता. तेव्हा हिंदुस्थानांतील विद्या, धर्म, कला यानीं म्हणजे एखाद्या मागासलेल्या देशांत जाऊन तो सर्व देशच पूर्ण व्यापून टाकावा असा कांहीं प्रकार चीनमध्यें झाला नाहीं. चीनमध्यें या सर्वांना तेथील प्राचीन कला आणि विचारपद्धति याच्याशीं दोन हात करावे लागले. या दोहोंच्या संघर्षातून कांहीं अंशीं या दोहोपेक्षा निराळें असेंच जीवन तेथें निर्माण झालें. हिंदुस्थानांतील धर्म, तत्त्वविचार व कला यांची त्यांत पुष्कळशी छाप जरी शिल्लक राहिली, तरी पण त्याचा गाभा हा चिनीच राहिला. आणि त्याचें बाह्य स्वरूपही बहुतांशीं चिनी जीवनाच्या धर्तीवरच राहिलें. अशा रीतीनें हिंदुस्थानांतून आलेल्या या विचारप्रवाहानीं चीनमधील कलात्मक आणि वैचारिक जीवनाला एक प्रकारें धक्का देऊन चागली चालना दिली.

चीनप्रमाणेंच त्याहीपलीकडे पूर्वेस कोरिया आणि जपान यांमध्येंही बुद्धधर्म आणि हिंदी कला यांच्या संदेशाचें लोण जाऊन पोंचलें. त्या देशांवर याचा काय परिणाम झाला हेंही पाहण्यासारखें आहे. त्यांपैकीं प्रत्येक देशानें आपल्या मूळ स्वभावाला जुळेल अशा प्रकारें त्याचा उपयोग करून घेतला. त्यामुळें चीन आणि जपान यांमध्यें आज बुद्धधर्माचाच प्रसार असला, तरी त्या धर्माचें स्वरूप मात्र दोन्ही देशांत वेगवेगळें आहे. तसेंच हिंदुस्थानांतून मुळात जो बुद्धधर्म तिकडे गेला त्याहूनही हीं दोन्ही स्वरूपें बरींचशीं निरनिराळीं आहेत. कलेच्या परंपरेंत सुद्धां हवामान आणि लोकसमाज यांच्या अनुरोधानें येथें फरक झालेले आढळतात. हिंदुस्थानमध्यें सर्वसामान्य लोकसमाजाच्या दृष्टीनें पाहिलें, तर कला आणि सौंदर्य यांची आमची ओळख बुजली आहे. कित्येक शतकांमध्यें महान् सौंदर्यशाली असें कांहीं आम्ही निर्माण तर करूं शकलेलों नाहींच, पण सुंदर वस्तूंचें गुणग्रहण करण्याची शक्ति सुद्धां आमची लोपून गेलेली आहे. जो देश स्वतंत्र नाहीं, त्यांत सौंदर्य आणि कला यांचा उत्कर्ष कसा व्हावा? पारतंत्र्याच्या आणि बंधनाच्या काळोखात सौंदर्य व कला पार कोमेजून जातात. परंतु आतां स्वातंत्र्याची उगवती कला डोळ्यासमोर दिसूं लागल्यापासून मात्र आमच्यामधील सौंदर्यदृष्टि हळूहळू जागृत होते आहेसें दिसतें. स्वातंत्र्य आलें म्हणजे आपल्या या देशांत सौंदर्य आणि कला

यांचें प्रचंड पुनरुज्जीवन झालेलें तुला आढळेल आणि मग आपलीं घरें, शहरें, आणि जीवन यांमधील हेंगाडेपण पार कोठच्या कोठें झाडून उडून जाईल. या बाबतींत चीन आणि जपान हे देश हिंदुस्थानपेक्षा अधिक दैववान् आहेत. त्यांच्यामध्यें कलाकौशल्य आणि सौंदर्य यांबद्दल अद्यापि पुष्कळच जागृत भावना शिल्लक आहे.

चीनमध्यें बुद्धधर्माचा प्रसार जसजसा अधिकाधिक वाढला, तसतसे हिंदुस्थानांतून जास्त जास्त बुद्ध भिक्षू चीनमध्यें जाऊं लागले आणि चिनी भिक्षूही हिंदुस्थानांत व इतरही देशात संचार करूं लागले. फाहियानबद्दल मी तुला मागें बोललोंच आहें. तशीच ह्यूएन चँगचीही तुला माहिती आहे. हे दोघेही हिंदुस्थानमध्यें येऊन गेले होते. हुई शेंग नांवाच्या एका चिनी भिक्षूनें पूर्वसमुद्रपार प्रवास केला. त्याबद्दलचाही एक मोठा मनोरंजक वृत्तान्त उपलब्ध आहे. इ. स. ४९९ या सालीं तो चीनच्या राजधानीस परत आला आणि म्हणूं लागला, कीं चीनच्या पूर्वेकडे कित्येक हजार मैल दूर असलेल्या एका देशांत मी जाऊन आलों आहें. आणि त्या देशाचें नांव फूसाग असें आहे. चीन आणि जपान यांच्या पूर्वेला आहे पॅसिफिक समुद्र. बहुधा हा महासागर ओलांडून हुई शेंग हा मेक्सिकोंत गेला असावा. कारण त्या काळींसुद्धां मेक्सिकोंत एक प्राचीन संस्कृति अस्तित्वांत होती.

चीनमध्यें बुद्धधर्माचा मोठा प्रसार झालेला पाहून हिंदुस्थानातील बुद्धधर्मीयांचा एक प्रमुख आचार्य आणि धर्मगुरु दक्षिण हिंदुस्थानातून चीनमधील कॅंटन बंदराकडे जाण्यासाठीं समुद्रप्रवासास निघाला. बोधिधर्म हें त्याचें नांव होतें किंवा कदाचित् ही त्याची पदवी असेल. कदाचित् या सुमारास हिंदुस्थानात बुद्धधर्माचा प्रभाव हळूहळू कमी होऊं लागला असावा. यामुळें तिकडे जावें असें त्याच्या मनांत आलें असेल. तो तिकडे इ. स. ५२६ सालीं गेला; त्या वेळीं त्याचें उतार वय झालेलें होतें. त्याच्याबरोबर आणि त्याच्यामागूनही पुष्कळ बुद्ध भिक्षू चीनमध्यें गेले. असें सांगतात, कीं या सुमारास लो यांग नांवाच्या केवळ एका चिनी प्रांतांत तीन हजारांहून अधिक हिंदी बुद्ध भिक्षू होते आणि दहा हजाराहून अधिक हिंदी कुटुंबें होतीं.

यानंतर लौकरच हिंदुस्थानात बुद्धधर्माचा पुन्हां एकदां उत्कर्ष झाला. त्यामुळें, तसेंच बुद्धाची जन्मभूमि आणि बुद्धधर्मीय ग्रंथांचें संग्रहस्थान म्हणून, पुष्कळ श्रद्धाळू बुद्धभिक्षू बाहेरदेशांतून हिंदुस्थानांत येत राहिले. तथापि बुद्धधर्माचें वैभव मात्र हिंदुस्थानांतून अजीबात नाहींसें झालें आणि चीन हाच पुढें प्रमुख बुद्धधर्मीय देश होऊन राहिला असें आढळून येतें.

तंग राजघराण्याची स्थापना इ. स. ६१८ या वर्षी सम्राट् कौ चू याच्या हातून झाली. त्यानें सर्व चीन एका राजवटीखालीं आणला. एवढेंच नव्हे, तर त्याहून किती तरी विशाल अशा प्रदेशावर त्याचें प्रभुत्व चालूं लागलें. दक्षिणेस अनाम (आतां व्हाएटनाम) आणि कांबोडिया (कांबोजद्वीप) येथपर्यंत आणि पश्चिमेस थेट इराण




आणि कास्पियन समुद्रापर्यंत त्याचे राज्य पसरलें होतें. त्याच्या साम्राज्याची राजधानी सि-आन-फू हें शहर होतें. पूर्व आशियांत हें शहर ऐश्वर्य, शोभिवंतपणा, संस्कृति व शोभा याकरितां फार सुप्रसिद्ध होतें. तेथील कला, तत्त्वज्ञान, आणि संस्कृति यांचा अभ्यास करण्यासाटीं त्या ठिकाणीं कितीएक मंडळें आणि वकिलाती जपानमधून आणि त्या वेळीं स्वतंत्र असलेल्या दक्षिण कोरियामधून येत असत.

तंग बादशहा परदेशीय व्यापार व परदेशीय प्रवासी यांना उत्तेजन देत असत. चीनमध्यें वसाहत करून राहणाऱ्या किंवा येणाऱ्या-जाणाऱ्या परदेशीय लोकांकरितां म्हणून त्यांनीं स्वतंत्र कायदे केले होते; अशासाटीं, कीं शक्य तोंवर त्याना आपापल्या देशाच्या रीतीरिवाजानुसार न्याय मिळावा. चीनमध्यें वसाहत करून राहणारांमध्यें इ. स. ३०० च्या सुमारास दक्षिण चीनमध्यें कँटनच्याजवळ आरबी लोकांनीं केलेली वसाहत ध्यानात घेण्यासारखी आहे. इस्लाम धर्माचा उदय होण्यापूर्वीची, म्हणजेच महंमद पैगंबराचा जन्म होण्यापूर्वींची ही गोष्ट आहे. या आरबांच्या मदतीनें चीनचा समुद्रापलीकडील देशांशीं व्यापार वाढला; तेथील माल-वाहतूक आरबी तशीच चिनी जहाजांतून होऊं लागली.

खानेसुमारीची म्हणजे देशांतील लोकसंख्या किती आहे हें मोजण्याची पद्धति चीनमधील एक जुनी पद्धति आहे हें ऐकून तुला मोठेंच आश्चर्य वाटेल. इ. स. १५६

इतक्या जुन्या काळीं चीनमध्यें एक खानेसुमारी झाली असें म्हणतात. म्हणजे हा हान राजवंशाचा काळ; त्या वेळीं ही गोष्ट घडली असावी. मोजदाद एकेका व्यक्तीची करीत नसत, तर कुटुंबांचीच संख्या मात्र मोजीत. प्रत्येक कुटुंबांत सामान्यतः पांच माणसें असा हिशेब धरीत असत. या हिशेबाप्रमाणें इ. स. १५६ या वर्षीं चीनची लोकसंख्या सुमारें ५० कोटी असावी असें दिसतें. ही पद्धति विशेषशी बिनचूक नाहीं हें खरें; परंतु पाश्चिमेंत तरी खानेसुमारीची पद्धति अगदीं किती अलीकडची आहे हें लक्षांत आण. मला वाटतें, पहिली खानेसुमारी फक्त सुमोर १५० वर्षांपूर्वी अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांमध्यें घेण्यांत आलेली आहे.

तंग राजवंशाच्या अम्मलाच्या सुरुवातीच्या काळांत चीनमध्यें आणखी दोन धर्मांचा प्रवेश झाला. ते म्हणजे ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम धर्म. पश्चिमेकडे नास्तिक व पाखंडी ठरवून हांकलून दिलेल्या एका पंथामार्फत ख्रिस्ती धर्म चीनमध्यें आला. या पंथाच्या लोकांना नेस्टोरियन म्हणत असत. कांहीं दिवसांमागे ख्रिस्ती पंथोपपंथांमधील वाद आणि झगडे याबद्दल एकदां मीं तुला लिहिलें आहे. या अशाच एका झगड्यांतून अखेरीस या नेस्टोरियन लोकांचें रोममधून उच्चाटन झालें. पण त्याचा पंथ मृत झाला नाहीं. ते लोक तेथून निघून चीन व इराण यांमध्यें आणि आशियामधील इतरही भागात पसरले. हिंदुस्थानांतही ते आले होते. परंतु पुढें ख्रिस्ती धर्माचे इतर पंथ व इस्लामी धर्म यांनीं नेस्टोरियन लोकांना आपल्यामध्यें पचवून टाकलें आणि आज आतां त्यांची ओळखसुद्धा कोठें फारशी शिल्लक उरलेली नाहीं. गेल्या वर्षी आपण दक्षिण हिंदुस्थानांत प्रवास करीत असताना या लोकांची एक छोटीशी वस्ती तिकडे एका ठिकाणीं पाहून मला फारच आश्चर्य वाटलें. आठवतें का तुला? त्यांच्या बिशपनें आपल्याला चहाला बोलाविलें. तो मोठा गोड आणि भला गृहस्थ होता.

ख्रिस्ती धर्माची स्थापना झाल्यापासून पुष्कळच काळानंतर त्याचा चीनमध्यें प्रवेश झाला. त्या मानानें इस्लाम धर्म तेथे फारच लौकर आला. नेस्टोरियन पंथाच्या पाठोपाठच, खुद्द महंमद पैगंबर जिवंत असतांच, इस्लामचा चीनमध्यें प्रवेश झाला. चिनी बादशहानें नेस्टोरियन पंथ आणि इस्लाम धर्म या दोघांच्याही प्रतिनिधींचे आदरपूर्वक स्वागत केलें आणि त्यांचें सर्व म्हणणें ऐकून घेतलें. त्यानें त्यांच्या धर्ममतांतील गुण ग्रहण केले आणि दोघांनाही सारख्या सवलती दिल्या. आरब लोकांना कॅटनमध्यें एक मशीद बांधण्यास परवानगी मिळाली. ती बांधून आज तेराशें वर्षें होऊन गेलीं असलीं, तरीही ही मशीद नीट उभी आहे आणि जगांतील प्राचीन मशिदींपैकीं ही एक मशीद आहे.

त्याचप्रमाणें तंग बादशहानें एक ख्रिस्ती प्रार्थनामंदिर (चर्च) आणि धर्ममठ बांधण्यासही परवानगी दिली. सहिष्णुतेची ही प्रवृत्ति आणि यूरपमधील त्या काळची असहिष्णुतेची प्रवृत्ति यांमधील विरोध ठसठशीतपणें नजरेंत भरण्यासारखा आहे.

कागद तयार करण्याची कला आरब लोक प्रथम चिनी लोकांपासून शिकले

आणि त्यांनीं ती कला यूरपमधील लोकाना शिकवली असें म्हणतात. इ. स. ७५१ मध्यें तुर्कस्तान आणि मध्य आशिया या प्रदेशात चिनी लोक आणि आरबी मुसलमान यांच्यामध्यें युद्ध झालें. त्यांत आरबानीं पुष्कळ चिनी सैनिकांना कैद करून नेलें; या कैदी लोकानीं त्याना कागद कसा तयार करावा हें शिकविलें.

तंग राजघराणें इ. स. ९०७ पर्यंत सुमारें ३०० वर्षे चालू राहिलें. कितीएकांच्या मताप्रमाणें हा ३०० वर्षांचा काळ चीनच्या इतिहासांतील अत्यंत श्रेष्ठ काळ होय. त्या काळांत चीनमध्यें संस्कृति आणि विद्या यांचा तर फार मोठा उत्कर्ष झालाच; परंतु त्याचबरोबर सर्वसामान्य जनतेच्या सुखाचे प्रमाणही फार उंच वाढलें होतें. ज्या गोष्टींचा शोध पश्चिमेकडील लोकांना फार पुढें लागला, अशा पुष्कळ गोष्टी चीनमध्यें त्या वेळीं माहीत होत्या. कागदाबद्दल तुला मीं मागें सांगितलेंच आहे. दुसरी गोष्ट म्हणजे बंदुकीची दारू. चिनी लोकांमध्यें या काळीं मोठे यंत्रशास्त्रज्ञही झाले होते आणि बहुतेक प्रत्येक बाबतींत यूरपपेक्षां हे लोक पुष्कळच पुढारलेले होते. इतके जर ते यूरपच्या पुढें गेले होते, तर ते यूरपच्या पुढें कां राहिले नाहींत? आणि शास्त्रांत आणि संशोधनांत यूरपच्यापुढें त्यांनीं आघाडी कां मारली नाहीं? परंतु तरुण माणसानें हळूहळू मागून येऊन वृद्ध माणसाला गांठावें व त्याच्यापुढें आघाडी मारावी, तसेंच यूरपनें चीनच्या पाठीमागून येऊन कांहीं बाबतींत तरी चीनच्या पुढचा पल्ला गांठला. राष्ट्राच्या इतिहासामध्यें हा असा प्रकार कां घडून येतो, हा मोठा बिकट प्रश्न आहे व तत्त्वज्ञ लोकांनीं त्याचें चिंतन करण्यासारखें आहे. परंतु या प्रश्नानें डोकें पिकवून घेण्याजोगी कोणी मोठी तत्त्वज्ञ तूं कांहीं अजून झाली नाहींस. तेव्हा मी तरी उगाच माथेफोड कशाला करूं?

चीनच्या या मोठेपणाचा त्या काळीं आशियांतील बाकीच्या प्रदेशावर स्वाभाविकच फार मोठा परिणाम झाला. कलाकौशल्य आणि ज्ञानसंपादन यांच्या बाबतींत चीनकडूनच मार्गदर्शन व्हावें, अशी या लोकांची अपेक्षा व खटपट असे. इकडे हिंदुस्थानात गुप्तांच्या साम्राज्याचा काळ आता संपला होता. त्यानंतर हिंदुस्थानचा तारा कांहीं तेजानें आसमंतात् आतां फारसा चमकत नव्हता. तथापि, इतिहासातील नित्यक्रमाप्रमाणें सुधारणा आणि संपन्नता यांच्यामधून चीनमध्यें पण अमर्याद चैनबाजी आणि आरामशीर खुशालचेंडू राहणी यांचा प्रादुर्भाव झाला. त्याच्यापाठोपाठ राज्य-व्यवस्थेंत लाचलुचपतीचा प्रवेश झाला. त्यासाठीं अवजड करांची आवश्यकता उत्पन्न झाली. त्यामुळें लोकांना तंग घराण्याचा अम्मल नकोसा झाला. आणि त्यांनीं तें घराणें नष्ट करून टाकलें.

## ४२
# चोसेन आणि दै निपॉन

८ मे, १९३२

जगाच्या इतिहासाची आपली ही गोष्ट जसजशी पुढें जाईल, तसतसे आणखी आणखी देश आपल्या नजरेसमोर येत जाणार. म्हणून आतां आपल्याला थोडा वेळ कोरिआ व जपान यांच्याकडे जराशी नजर वळविली पाहिजे. हे देश चीनचे अगदीं जवळचे शेजारी असून पुष्कळ बाबतींत चिनी सुधारणेचींच जणुं हीं अपत्यें आहेत. हे देश म्हणजे आशिया खंडाचें पूर्वेच्या बाजूचें अगदीं शेवटचें टोंक होत. म्हणूनच या भागाला अतिपूर्व म्हणतात. त्याच्या पलीकडे महान् पॅसिफिक सागर आहे. अगदीं अलीकडेपर्यंत अर्थातच या देशाचा अमेरिका खंडाशीं कांहींच संबंध नव्हता. यामुळें त्यांचा जो कांहीं संबंध आला तो सगळा जवळच्याच आशिया खंडाच्या मुख्य भूमीवरील चीन या महान् राष्ट्राशीं. त्याचा धर्म, कला, सुधारणा, हीं सर्व त्यांना चीनपासून किंवा चीनच्या मार्गानें प्राप्त झालीं. या दृष्टीनें चीनच्या ऋणाचें फार प्रचंड ओझें कोरिआ आणि जपान या दोन्ही राष्ट्रांवर आहे. थोडेंफार हिंदुस्थानचें ऋणही त्यांच्या माथ्यावर आहे; परंतु हिंदुस्थानकडून त्यांना जें कांहीं मिळालें, तें सर्व चीनच्या मार्फत आणि त्यावर चिनी परंपरेचा छाप मारून.

कोरिआ आणि जपान यांना प्राप्त झालेली जागाच अशी स्वतंत्र आहे, कीं आशिया खंडांतील किंवा इतरही ठिकाणच्या मोटमोठ्या घडामोडींशीं या दोन्ही देशांचा जवळजवळ मुळींच संबंध आला नाहीं. या सर्व घडामोडींच्या प्रमुख क्षेत्रां-पासून हे देश फारच दूर होते; आणि ही गोष्ट त्यांच्या, विशेषतः जपानच्या कांहीं अंशीं फायद्याचीच ठरली. याच कारणामुळें त्यांच्या अगदीं बऱ्याच अलीकडच्या काळापर्यंतच्या इतिहासाकडे आपण जरी दुर्लक्ष केलें, तरी विशेष अडचण होण्याचें कांहीं कारण नाहीं. आशिया खंडांतील बाकीच्या प्रदेशाचा इतिहास समजून घेण्याच्या आपल्या कामात त्यामुळें कांहींच कमीजास्त होण्याचें कारण नाहीं. पण मॅलेशिया आणि पूर्वेकडील त्या बाजूचे प्रदेश यांच्या प्राचीन इतिहासाचा सुद्धां जेथें आपण विचार केला, तेथें या देशांचाच प्राचीन इतिहास तेवढा नजरेआड करण्याचें आपल्याला कांहीं प्रयोजन नाहीं. गरीब बिचाऱ्या कोरिआ देशाची तर आजकाल जवळजवळ कोणाला आठवणसुद्धां नाहीं. (जपाननें सध्यां तो देश गिळंकृत करून आपल्या साम्राज्याला जोडून टाकलेला आहे.) परंतु कोरिआपुढेंही अजून स्वातंत्र्याचें ध्येय खडें आहे. आणि दास्यविमोचनासाठीं त्याचा झगडा चालू आहे. आजकाल ज्याच्या त्याच्या डोळ्यांपुढें जपानचेंच नांव आहे; जपाननें केलेल्या चीनवरील हल्ल्याच्या वृत्तान्तानेंच सगळीं वर्तमानपत्रें भरून जात आहेत.

मी हें येथें बसून लिहितों आहे त्याच वेळीं तिकडे मँचुरियांत चागलेंच युद्ध जुंपलेलें आहे. म्हणून कोरिआ आणि जपान यांच्या प्राचीन इतिहासाची थोडीफार माहिती आपल्याला असावी हें बरें. त्यामुळें आजच्या त्या भागांतील घडामोडी समजण्यास मदत होईल.

त्यांच्याविषयीं पहिली गोष्ट लक्षांत ठेवावयाची म्हणजे हे देश फार दीर्घकाळपर्यंत सर्वांपासून अलग, अगदीं एकटे राहिलेले आहेत ही होय. जपानच्या बाबतींत हा अलगपणा आणि त्या देशावर किती तरी काळपर्यंत कोणाचाही हल्ला झाला नाहीं ही गोष्ट, हे जपानच्या इतिहासाचे दोन मोठे लक्षांत घेण्यासारखे विशेष आहेत. आजपर्यंतच्या जपानच्या सर्व इतिहासांत जपानवर बाहेरून स्वारी करण्याचे अगदींच हाताच्या बोटावर मोजण्याइतके प्रयत्न झाले आहेत, आणि त्यांत एकही हल्ला यशस्वी झाला नाहीं. अगदीं अलीकडच्या काळापर्यंत जपानपुढें जर कांहीं अडचणी उभ्या राहिल्या असतील, तर त्या सर्व अंतर्गत अडचणी होत्या. कांहीं काळपर्यंत तर जपाननें बाकीच्या जगापासून आपला संबंध पार तोडून टाकला होता. जपानमधून क्वचितच कोणाला बाहेर पडतां येई. आणि कोणाही परकीयाला, प्रत्यक्ष चीनमधून सुद्धा कोणाला, जपानमध्यें प्रवेश करतां येत नसे. यूरपांतील परदेशस्थ लोक आणि ख्रिस्ती धर्मप्रचारक यांचा त्रास वांचविण्यासाठीं हा निर्बंध घालण्यांत आलेला होता. पण हें करणें मूर्खपणाचें आणि धोक्याचेंही होतें. कारण त्याचा अर्थ आपण होऊनच आपल्या सर्व देशाला तुरुंगांत डांबणें आणि बाहेरच्या वाईट गोष्टींबरोबर चांगल्या गोष्टींपासूनही त्याचा संबंध अजीबात तोडून टाकणें असा होत होता. पण मग पुढें जपाननें एकाएकीं आपल्या या तुरुंगाचीं दारें व खिडक्या पार सताड उघडल्या आणि यूरपपासून जें कांहीं शिकण्यासारखें होतें तें सारें आत्मसात् करण्यासाठीं प्रचंड धांवपळ सुरू केली. यूरपांतील सर्व नव्या गोष्टी शिकून घेण्याचा हा प्रयत्न जपाननें इतक्या कांहीं चमत्कारिक चिकाटीनें केला, कीं अवघ्या एकदोन पिढ्यांत बाह्यतः जपानचें स्वरूप कोणत्याही यूरपीय राष्ट्राच्यासारखें होऊन गेलें आहे; एवढेंच नव्हे, यूरपीय लोकांच्या सगळ्या वाईट संवयीही जपाननें उचलल्या आहेत. ही सर्व घडामोड अवघ्या सत्तर वर्षांमध्यें घडून आलेली आहे.

चीनच्या इतिहासाला सुरुवात झाल्यावर पुष्कळ काळानंतर कोरिआचा इतिहास सुरू होतो. आणि जपानचा इतिहास कोरिआनंतरही पुष्कळ काळानें सुरू होतो. गेल्या वर्षी एका पत्रांत मीं लिहिलेलें तुला आठवत असेल, कीं कि चे नांवाचा एक चिनी गृहस्थ चीनमध्यें आलेल्या नवीन राजवंशाला त्याची मान्यता नव्हती म्हणून आपल्या पांच हजार अनुयायांनिशीं देश सोडून पूर्वेकडे निघून गेला होता. त्यानें ह्या देशांत, कोरिआंत वसाहत केली आणि त्या देशाला चोसेन–'प्रातःशांति'–हें नांव दिलें. ही गोष्ट इ. स. पूर्वी ११२२ मध्यें घडली. कि चेबरोबर चिनी कलाकौशल्य, शेतकीचा उद्योग, रेशीम तयार करण्याचा व्यवसाय याही गोष्टी या नव्या प्रदेशांत आल्या. सुमारें नऊशेंहूनही अधिक वर्षें कि चेच्या वंशजांनीं चोसेनवर राज्य केलें. वेळोवेळीं पुष्कळ

लोक चीन सोडून चोसेनमध्यें येऊन राहत असत आणि अशा रीतीनें चोसेनचा चीनशीं चागलाच निकट संबंध चालू होता.

चीनमध्यें शी हुआंग टी हा बादशहा होता. त्या वेळीं चिनी लोकांचा एक बराच मोठा गट चोसेनमध्यें येऊन राहिला. हा बादशहा अशोकाचा समकालीन होता, हें बहुतेक तुझ्या लक्षांत असेलच. आपल्याला जो चीनचा 'पहिला बादशहा' म्हणवीत असे आणि ज्यानें प्राचीन ग्रंथांची होळी केली तो हा गृहस्थ. शी हुआंग टीच्या या निर्दय व जुलमी राज्यपद्धतीमुळें ज्यांना आपलीं घरेंदारें सोडून पळून जाण्याचा प्रसंग आला, अशा पुष्कळ चिनी लोकांनीं कोरिआंत आसरा घेतला आणि कि चेच्या दुर्बल झालेल्या वंशजांची राजपदावरून त्यांनीं हकालपट्टी केली. त्यानंतर चोसेनचीं बरींच छकलें होऊन त्या ठिकाणीं कितीएक लहानलहान राज्यें झालीं. सुमारें ८०० वर्षें ही अवस्था टिकून राहिली. या निरनिराळया राज्यांचें एकमेकात नेहमीं तंटे असत. एकदां त्यांपैकीं एका राज्यानें एकदां चीनची मदत मागितली. पण अशी ही मदत मागणें म्हणजे मोठ्या थोरल्या संकटाला आमंत्रणच होतें तें. मदत जरूर आली. पण मदत घेऊन येणारे परतच जाईनात! प्रबळ देशांची ही नेहमींचीच रीत आहे. म्हणून चीननें चोसेनमध्यें एकदां टाकलेला पाय कांहीं मागें घेतला नाहीं आणि चोसेनचा कांहीं प्रदेश त्यानें आपल्या साम्राज्यांतच सामील करून टाकला. चोसेनचा बाकीचा जो भाग राहिला, तो सुद्धां शेंकडों वर्षेंपर्यंत चीनच्या तंगवंशीय सम्राटांचें अधिराज्य मान्य करीत होताच.

शेवटीं इ. स. ९३५ मध्यें चोसेनमध्यें एकच अखंड राज्य स्थापन झालें. हें राज्य स्थापन करण्याचा मान वँग कीन याचा असून त्याच्या वंशांतील लोकांचा अम्मल त्यानंतर ४५० वर्षें त्या राज्यावर राहूं शकला.

या दोनतीन परिच्छेदांमध्यें मीं तुला कोरिआचा २००० हून अधिक वर्षांचा इतिहास सांगून टाकला आहे. यामध्यें विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे चीनचें कोरिआवरील महान् ऋण. लिहिण्याची कला कोरिआमध्यें चीनमधूनच आली. एक हजार वर्षें तेथें चिनी लिपीच वापरांत होती. ही चिनी लिपि आपल्यासारखी अक्षरांची नसून निरनिराळया कल्पना, शब्द आणि संप्रदाय यांचीं निदर्शक अशीं अगणित चित्रें व खुणा यांची ती लिपि आहे, हें तुला ठाऊक असेलच. हजार वर्षांनंतर मग त्यांतूनच आपल्या भाषेला जुळेल अशी एक लिपि चोसेनमधील लोकांनीं तयार केली.

त्या ठिकाणीं बुद्ध धर्मही चीनच्या मार्गानेंच आला आणि चीनच्या कॉन्फ्यु-शिअसच्या तत्त्वज्ञानाचाही तेथें प्रवेश झाला. भारतीय कलेचें वळण कोरिआ व जपान यांच्यापर्यंत चीनमधूनच जाऊन पोंचलें. कोरिआमध्यें कलेचे, विशेषतः शिल्पकलेचे अत्यंत सुंदर नमुने त्या काळीं निर्माण झालेले आढळतात. त्यांच्या शिल्पकलेचें वळण चिनी शिल्पकलेच्या धर्तीवरच आहे. जहाजें बांधण्याचा धंदासुद्धां तेथें चांगला भरभराट-

लेला होता. इतका, कीं एका काळीं कोरिआजवळ मोठें प्रबल आरमार सुसज्ज असून तें घेऊन त्यानें जपानवर हल्लाही केला होता.

आजच्या जपानी लोकांचे पूर्वज या कोरिआ म्हणजे चोसेन देशांतूनच आले असावेत. त्यांच्यापैकीं कांहीं लोक दक्षिणेकडून मॅलेशियामधूनही आलेले असतील. तुला माहीत आहे, कीं जपानी लोक हे मंगोलियन वंशाचे आहेत. आजही जपानमध्यें अइनु नांवाच्या जातीचे कांहीं लोक आहेत; ते लोक त्या देशांतले अगदीं मूळचे रहिवासी होत असें समजतात. हे लोक वर्णानें गोरे, थोडे केसाळ असे असून सर्व-सामान्य जपानी लोकांपेक्षां अगदींच निराळे आहेत. आज या अइनु लोकांची जपानी बेटांच्या अगदीं उत्तरेकडे हकालपट्टी करण्यांत आलेली आहे.

इ. स. २०० च्या सुमारास जपानमध्यें यामाटो नांवाच्या राज्यांत जिंगो नावाची सम्राज्ञी होती, असा उल्लेख आढळतो. यामाटो हें जपानचें मूळचें नाव असावें किंवा बाहेरदेशाहून आलेले लोक ज्या भागांत वसाहत करून राहत त्यांचें तें नाव असावें. या राणीचें जिंगो हें नांव नीट लक्षांत घे. जपानच्या एका अत्यंत प्राचीन राज्यपदस्थ व्यक्तीचें नाव जिंगो हें असावें, हा एक मोठा अजब योगायोग आहे. जिंगो या शब्दाला इंग्रजी भाषेंत एक विशेष अर्थ प्राप्त झालेला आहे. घमेंडखोर, चढेल, दडप्या साम्राज्य-वादी असा त्याचा अर्थ आहे; किंवा नुसता साम्राज्यवादी असा त्याचा अर्थ केला तरी हरकत नाहीं. कारण साम्राज्यवादी म्हटला म्हणजे तो स्वतःच्या फुशारक्या सांगणारा, अहंमन्य, चढेल असा माणूस कांहीं प्रमाणांत तरी असावयाचाच. जपानलाही अलीकडे हा साम्राज्यवादाचा, किंवा जिंगोवादाचा म्हणा, रोग जडलेला दिसतो. आणि त्यामुळें अलीकडच्या काहीं वर्षांत त्यानें चीन व कोरिआ यांच्या बाबतींत गैरवर्तन चालविलें आहे. तेव्हां इतिहासकालातील जपानच्या पहिल्या राज्यकर्त्या व्यक्तीचें नाव जिंगो असावें हा किती विचित्र योगायोग आहे!

यामाटोचे कोरिआशीं अगदीं निकट संबंध होते. आणि चिनी सुधारणेचा प्रवेश यामाटोमध्यें कोरिआमार्फत झाला. चिनी लोकांची ग्राथिक भाषा (लिखित भाषा) हीही इ. स. ४०० च्या सुमारास कोरिआतून तेथें आली. बुद्धधर्मही याच मार्गानें आला. इ. स. ५५२ मध्यें पाकचेच्या राजानें (या सुमारास कोरिआमध्यें तीन वेगळीं वेगळीं राज्यें स्थापन झालीं होतीं, त्यांपैकीं हें एक राज्य होतें) यामाटोच्या राजाकडे एक बुद्धाची सुवर्णमूर्ति आणि बुद्धधर्मीय प्रचारक त्यांच्या धर्मग्रंथांसह पाठवून दिले.

जपानच्या पूर्वीच्या धर्माचें नांव शिंटो धर्म असें होतें. हा चिनी शब्द असून त्याचा अर्थ 'देवांचा पंथ' असा होता. निसर्गपूजा आणि पूर्वजपूजा यांचें एक प्रकारचें मिश्रण या धर्मामध्यें होतें. पारलौकिक जिवन किंवा सृष्टीचे गूढ या किंवा अशा कूट प्रश्नांशीं या धर्माचा फारसा संबंध नव्हता. लढाऊ लोकांचा हा धर्म होता. जपानी लोक हे चिनी लोकांचे इतके जवळचे शेजारी आहेत आणि चिनी सुधारणांची त्यांनीं इतकी उसनवारी केलेली आहे; तरी पण चिनी लोकांपासून ते अगदींच निराळे राहिले

आहेत. चिनी लोक हे पूर्वीपासून तों थेट आतांपर्यंत स्वभावतः अगदीं शांतताप्रिय आहेत. त्यांची सर्व सुधारणा, जीवित, तत्त्वज्ञान हें शांतिमय आहे. उलटपक्षीं, जपानी लोक हे पहिल्यापासूनच लढवय्ये लोक आहेत. सैनिकाचा मुख्य गुण म्हणजे आपल्या नेत्याशीं आणि जोडीदाराशीं एकनिष्ठ राहणें हा आहे. जपानमध्यें या गुणाचें वास्तव्य प्रथमपासून चालत आलेलें आहे; त्यांतच त्याच्या सामर्थ्याचें फार मोठें मूळ आहे. शिंटो धर्मानें त्याना हाच गुण शिकविला, कीं परमेश्वराला मान द्या आणि त्याच्यापासून उत्पन्न झालेल्या वंशाशीं एकनिष्ठ राहा! असा हा शिंटो धर्म आजही जपानात जिवंत आहे. आणि बुद्धधर्माच्या बरोबरीनें त्याचाही प्रभाव तेथें चालू आहे.

पण याला सद्‌गुण म्हणता येईल का? आपल्या जोडीदाराशीं किंवा आपल्या कार्याशीं एकनिष्ठ राहणें हा खरोखरच सद्‌गुण आहे. परंतु शिंटो किंवा इतरही धर्मांनीं नेहमीं आमच्या एकनिष्ठ वृत्तीचा फायदा आमच्यावर राज्य करणाऱ्या लोकानाच लुटूं दिला आहे. जपानमध्यें, रोममध्यें, इतरही ठिकाणीं, अधिकारावरील लोक म्हणजे प्रभु किंवा देव, आणि म्हणून त्याच्याशीं एकनिष्ठ राहणें हाच धर्म, एवढेंच लोकांना शिकविलें जात असे. आणि या गोष्टीचा केवढा दुष्परिणाम झालेला आहे, हें पुढें दिसून येईलच तुला.

बुद्धधर्माचा जेव्हां जपानमध्यें प्रवेश झाला, तेव्हां त्याचा आणि मूळच्या शिंटो धर्माचा परस्परांशीं थोडासा झगडा झाला. परंतु लौकरच त्याची समजी होऊन ते एक-मेकांच्या जोडीनें नांदूं लागले आणि मूळच्या शिंटो धर्माचा ऱ्हास झाला नाहीं. दोहोंमध्यें शिंटो हाच अधिक लोकप्रिय धर्म असून राज्यकर्ते लोकही त्यालाच प्रोत्साहन देत असतात. कारण तो धर्म लोकाना राज्यकर्त्यांविषयीं एकनिष्ठ राहण्याला आणि राज्यकर्त्यांच्या आज्ञा पालन करण्याला शिकवीत असतो. शिवाय, बुद्धधर्म हा त्याना थोडासा धोक्याचा धर्म वाटतो. कारण त्याचा संस्थापक हा स्वतः बंडखोर होता.

जपानमधील कलाकौशल्याच्या इतिहासाला बुद्धधर्माच्या प्रवेशापासून सुरुवात होते. जपान उर्फ यामाटो देशाचा तेव्हांपासून चीनशीं प्रत्यक्ष संबंध वाढण्यास सुरुवात होते. तंग राजांच्या काळांत त्याच्या नवीन राजधानीची, सि–आन–फू या शहराची कीर्ति साऱ्या पूर्व आशियाभर पसरली होती; त्या काळीं जपानमधून चीनमध्यें नेहमीं वकील पाठविले जात असत. एवढेंच नव्हे, तर या जपानी उर्फ यामाटो लोकांनीं आपल्या देशांतही नारा नांवाच्या नवीन राजधानीची स्थापना केली. आणि हें नारा शहर म्हणजे अगदीं थेट सि–आन–फूची हुबेहूब प्रतिकृति करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. दुसऱ्यांची नक्कल करण्याचें किंवा प्रतिकृति वठविण्याचें मोठें आश्चर्यकारक सामर्थ्य या जपानी लोकांत पहिल्यापासून आहेसें दिसतें.

जगाच्या साऱ्या इतिहासात आपल्याला मोठमोठ्या घराण्यांचें परस्पराशीं शत्रुत्व आणि सत्तेसाठीं धडपड, याच गोष्टी मुख्यत्वें आढळून येतात. प्राचीन काळीं इतर देशांतही तुला हाच प्रकार आढळून येईल. त्या देशातील या राज्यघराण्यांमध्यें प्राचीन

काळची ती कुलाभिमानाची पद्धति कायम राहिलेली दिसते. त्यामुळें जपानचा इतिहास म्हणजे मुख्यतः या घराण्यांच्या परस्पर-स्पर्धेचा वृत्तान्तच होय. त्यांचा बादशहा मिकॅडो हा सर्वसत्ताधीश, अनियंत्रित, देवाचा अंश आणि सूर्यकुलोत्पन्न आहे, अशी भावना चालत आलेली आहे. शिंटो धर्म आणि पूर्वजपूजेची परंपरा यांमुळें लोकांमध्यें बादशहाची अनियंत्रित सत्ता मानण्याची आणि देशातील सत्ताधारी उच्च वर्गाच्या आज्ञा पालन करण्याची प्रवृत्ति उत्पन्न झालेली आहे. परंतु बादशहा मात्र स्वतः जपानच्या इतिहासांत कितीएक प्रसंगीं दुसऱ्याच्या हातचें बाहुलें झालेला, हातीं मुळींच सत्ता नसलेला, असा आढळतो. खरी सत्ता असायची एखाद्या मोठ्या घराण्याच्या किंवा कुळाच्या हातीं. कोणाला राज्यपदावर आणावयाचें ही सत्ताही त्यांच्या हातीं असावयाची; राजा किंवा बादशहा त्यांच्या मतानुसार ठरावयाचा.

जपानच्या इतिहासांत अशा रीतीनें राज्याची सत्ता चालविणारें पहिलें मोठें घराणें आढळून येतें तें सोगा घराणें होय. या घराण्यानें बुद्धधर्माचा स्वीकार केला व त्यामुळें बुद्धधर्म हा दरबारचा आणि राज्याचा अधिकृत धर्म झाला. या घराण्यांतील एक नायक, शोतुकू तैशी, हा जपानच्या इतिहासांतील एक अत्यंत श्रेष्ठ पुरुष होऊन गेला. हा अत्यंत निष्ठावंत बुद्धधर्मानुयायी असून मोठा कलावंत होता. चीनमधील कॉन्फ्यूशिअसच्या ग्रंथांतील विचारांचा त्याच्या मनावर फार परिणाम झालेला आहे. त्यामुळें निव्वळ शक्तीवर आधारलेल्या राज्यव्यवस्थेऐवजीं न्यायावर, नीतीवर आधारलेली राज्यव्यवस्था प्रस्थापित करण्याचा त्यानें प्रयत्न केला. जपानमध्यें या काळीं सत्ता खरोखर निरनिराळ्या कुळांमध्यें विभागलेली असून त्यांच्या घराण्यांचे नायक जणुं कांहीं स्वतंत्र राज्यकर्तेच असत; ते परस्परांशीं लढत आणि कोणतीच वरिष्ठ सत्ता मानीत नसत. बादशहाला नांवाला मात्र खूप मोठा मान असे. पण तो झाला तरी अशा एखाद्या मोठ्या घराण्याचा नायक असे एवढेंच. ही परिस्थिति बदलून मध्यवर्ती सत्ता प्रबळ करण्याचा प्रयत्न शोतुकू तैशी यानें केला. निरनिराळ्या कुळांचे नायक आणि अमीर-उमराव यांना त्याने बादशहाच्या अमलाखालीं आणून मांडलिक किंवा दुय्यम सरदार बनविलें. ही हकीकत सुमारें इ. स. ६०० च्या सुमाराची होय.

शोतुकू तैशीच्या मृत्यूनंतर त्याच्या घराण्याची हकालपट्टी करण्यात आली. त्यानंतर थोड्याच काळांत जपानी इतिहासाच्या रंगभूमीवर आणखी एक फार प्रख्यात पुरुष येतो. त्याचें नाव काका तोमीनो कामातोरी. त्यानें राज्यव्यवस्थेंत हरएक प्रकारचे आमूलाग्र फरक करून चिनी राज्यव्यवस्थेची नक्कल करण्याचा प्रयत्न केला. पण चीनमधील विशेष अशी जी अधिकाराच्या जागेवर नेमण्यासाठीं उमेदवार निवडण्याची परीक्षेची पद्धति, तिचें मात्र त्यानें अनुकरण केलें नाहीं. या काळात बादशहा म्हणजे केवळ एका कुळाचा प्रमुख न राहतां बराच बलाढ्य झाला आणि मध्यवर्ती सरकार प्रबळ झालें.

याच काळांत नारा शहर हें राजधानीचें शहर झालें. पण तेथें राजधानी फारच

थोडा काळ टिकली. इ. स. ७९४ मध्यें ही राजधानी कियोटो या शहरांत आणण्यांत आली. आणि तेथेंच सुमारें ११०० वर्षें ती राहिली. अगदीं अगदीं अलीकडे तेथून बदलून टोकिओ शहरांत राजधानी आणण्यांत आली. टोकियो हें एक भलें मोठें आधुनिक पद्धतीचें शहर आहे. परंतु जपानच्या खऱ्या अंतरंगाची थोडीफार साक्ष आपणांस कियोटो शहरात पाहायला सापडते. सुमारें एक हजार वर्षांच्या घडामोडींचें स्मरणही कियोटो शहराच्याभोंवतींच घुटमळत आहे.

काका तोमीनो कामातोरी हाच जपानमधील फुजीवारा घराण्याचा संस्थापक. जपानच्या इतिहासात या घराण्याच्या हातून फार मोठ्या घडामोडी झाल्या आहेत. सुमारें २०० वर्षें या घराण्यानें सत्ता उपभोगिली. बादशहाना निव्वळ आपल्या हातचीं बाहुलीं बनवून त्यांना आपल्या घराण्यांतील मुलींशीं विवाह करावयास लावलें. दुसऱ्या घराण्यांतील कर्तबगार लोकाची भीति नको म्हणून ते त्याना भिक्षू होऊन मठामध्यें जाऊन राहावयाला सक्तीनें भाग पाडीत.

राजधानी नारा येथें होती त्या वेळीं चिनी बादशहानें जपानच्या बादशहाला एक पत्र पाठविलें होतें; त्यांत जपानच्या बादशाला तैनी पुङ्कोकचा सम्राट् असें संबोधिलें होतें. त्याचा अर्थ, 'श्रेष्ठ सूर्योदयाचा सम्राट्' असा आहे. जपानी लोकाना या नांवांतील कल्पना विशेष आवडली. नुमत्या यामाटो या नांवापेक्षा हें नांव जरा अधिक भारदस्त आहेसें वाटलें. म्हणून त्यांनीं आपल्या देशाला '**दै निपॉन**' 'सूर्योदयाची भूमि' असें नांव दिलें. आणि जपानी लोकांमध्यें जपानचें खरें घरचें नाव अद्यापिही हेंच चालू आहे. निपॉनपासून जपान या नावाची उत्पत्ति मोठ्या विचित्र रीतीनें झाली. हें नवे नांव घेतल्यानंतर सहाशें वर्षांनीं एक मोठा इटालियन प्रवासी मार्को पोलो, हा चीनमध्यें गेला होता. तो खुद्द जपानला नाहींच गेला. परंतु आपल्या ग्रंथांत जपानबद्दल मात्र त्यानें लिहिलें आहे. जपानचें नांव चीनमध्यें त्याच्या कानावर चै-पुङ्-कोङ् असें पडलें होतें. तें त्यानें आपल्या ग्रंथांमध्यें **छिपँगो** असें लिहिलें आणि या शब्दावरून जपान हें नांव निघालें.

आपल्या देशाला हिंदुस्थान आणि इंडिया हीं नांवें कशीं पडलीं हें मीं तुला कधीं सांगितलें आहे का? अथवा तुला तें दुसरीकडून कोठून समजलें आहे? हीं दोन्ही नांवें इंडस म्हणजेच सिंधु नदीच्याच नांवापासून निघालेलीं आहेत. त्यामुळें सिंधु हीच हिंदुस्थानची खरीखुरी अशी नदी समजली पाहिजे. सिंधु नदीवरून आपल्या देशाला ग्रीक लोक इंडॉस म्हणूं लागले आणि त्यावरून इंडिया हें नांव निघालें. या सिंधूपासूनच पर्शियन लोकांनीं हिंदु हा शब्द बनविला आणि त्यावरून हिंदुस्थान हें नांव निघालें.

# ४३

# हर्षवर्धन आणि ह्यूएन चँग

११ मे, १९३२

पुन्हा एकदां आपण हिंदुस्थानकडे जाऊं या. हूण लोकांचा पराभव करून त्यांना मागें हांकून देण्यात आलेलें आहे. तथापि त्याच्यापैकीं पुष्कळसे लोक कोनाकोपऱ्यात राहिलेच आहेत. बालादित्यानंतर गुप्तांचें महान् कुल निस्तेज होऊन जातें आणि उत्तर हिंदुस्थानांत अनेक स्वतंत्र राज्यें निर्माण होतात. इकडे दक्षिणेकडे पुलकेशीनें चालुक्यांचें साम्राज्य स्थापन केलेलें आहे. येथपर्यंत आपली गाडी येऊन ठेपलेली आहे.

कानपूरपासून जवळच कनोज हें छोटेंसें शहर आहे. कानपूर हें शहर आतां मोठें शहर झालेले आहे. पण त्यांतले ते कारखाने आणि गिरण्यांचीं धुराडीं यामुळें त्याचें स्वरूप हेंगाडें वाटतें. कनोज तर आजकाल फारच लहान शहर झालेलें आहे; जवळजवळ एखादें खेडेंच. आपण ज्या काळाबद्दल बोलतों आहों, त्या काळीं कनोज हें महान् राजधानीचें शहर होतें. त्या ठिकाणीं प्रख्यात कवी, कलावंत आणि तत्त्वज्ञ राहत होते. कानपूर शहर त्या वेळीं तर जन्मालाही आलें नव्हतें. पण पुढेंही पुष्कळ शतकें अजून त्याचा जन्म होईपर्यंत जावयाचीं होतीं.

कनोज हें अलीकडचें नांव आहे. खरें नांव कान्यकुब्जा म्हणजे कुबड आलेली मुलगी. त्याबद्दलची गोष्ट अशी सांगतात, कीं फार प्राचीन काळीं एका ऋषीचा कांहीं अपमान झाला. त्यामुळें संतप्त होऊन राजाच्या शंभर मुलींना त्यानें शाप देऊन सर्वांच्या पाठीला कुबड आणलें. तेव्हांपासून त्याच्या नगरीला कुबड्या मुलींची म्हणून कान्यकुब्जा हें नाव मिळालें.

परंतु आपण आपलें कनोज हेंच सुटसुटीत नांव वापरूं. हूण लोकांनीं कनोजच्या राजाला ठार केलें व त्याची पत्नी राज्यश्री हिला कैद केलें. त्यानंतर राज्यश्रीचा भाऊ राज्यवर्धन हा हूणांशीं लढून राज्यश्रीला सोडविण्यासाठीं पुढें झाला. त्यानें हूणांचा पराभव केला. परंतु विश्वासघातानें त्याचा कोणीं खून केला. त्यानंतर त्याचा धाकटा भाऊ हर्षवर्धन हा आपली बहीण राज्यश्री हिच्या शोधार्थ निघाला. दरम्यान ती बिचारी राजपत्नी कशी तरी हूणांच्या तडाक्यांतून निसटून डोंगरकपारींतून दडून राहिली होती. आणि हाल व दुःख यांना कंटाळून जाऊन जीव देण्याचा निश्चय तिनें केला होता. सती म्हणून स्वतःला जाळून घेण्याच्या ती अगदीं बेतांत होती. अशा स्थितींत हर्षवर्धनाला ती सांपडली व त्यानें तिला त्या विचारापासून परावृत्त केलें; अशी कथा लोकांत प्रचलित आहे.

अशा रीतीनें बहिणीचा शोध करून तिला संकटांतून सोडविल्यानंतर ज्या त्या क्षुद्र राजानें विश्वासघातानें आपला भाऊ राज्यवर्धन याचा खून केला होता, त्याला

शिक्षा करण्याचें कार्य हर्षवर्धनानें प्रथम हातीं घेतलें. त्या राजाला तर शिक्षा त्यानें केलीच; पण तेवढ्यावरच तो स्वस्थ बसला नाहीं. पूर्वेस बंगालच्या उपसागरापासून तों पश्चिमेस आरबी समुद्रापर्यंत आणि दक्षिणेस विंध्य पर्वतापर्यंत सारा उत्तर हिंदुस्थानचा प्रदेश त्यानें जिंकला. विंध्य पर्वताच्या पलीकडे चालुक्यांचे साम्राज्य होतें, तेथें मात्र हर्षवर्धनाचा पुढचा मार्ग खुंटला.

हर्षवर्धनानें कनोज येथें आपली राजधानी स्थापिली. हर्ष हा स्वतः कवि आणि नाटककार होता. त्यामुळें त्यानें आपल्याभोंवती अनेक कवी आणि कलावंत यांचा संच जमविला होता. यामुळें कनोज शहराची जिकडेतिकडे फार ख्याति झाली. हर्ष हा निष्ठावंत, कडवा, बुद्धधर्मीय होता. त्या सुमारास बुद्धधर्माचें एक स्वतंत्र धर्म या दृष्टीनें महत्त्व हिंदुस्थानांतून बहुतेक नाहींसें झालें होतें. ब्राह्मणांनीं त्याचा हिंदु-धर्मांत बहुतेक अंतर्भाव करून टाकला होता. हर्ष हा हिंदुस्थानांतील शेवटचाच मोठा बुद्धधर्मीय सम्राट् म्हटला पाहिजे.

हर्षवर्धनाच्या आमदानींतच आपला जुना दोस्त ह्यूएन चँग* हा हिंदुस्थानांत आला होता. परत गेल्यावर त्यानें आपल्या प्रवासवर्णनाचा जो ग्रंथ लिहिला, त्यात हिंदुस्थान आणि तेथपर्यंत येताना वाटेंत ओलांडावे लागलेले मध्य आशियांतील देश यांबद्दल पुष्कळच माहिती दिलेली आहे. ह्यूएन चँग हा स्वतः मोठा श्रद्धावान् बुद्ध-धर्मीय होता. बुद्धधर्माच्या तीर्थस्थानाची यात्रा करावी आणि आपल्या धर्माचे पवित्र ग्रंथ इकडून मिळवून न्यावे, या उद्देशानें तो हिंदुस्थानांत आला होता. येतांना वाटेंत त्याला तें गोबीचें प्रचंड निर्जन मैदान या टोकापासून त्या टोंकापर्यंत ओलांडून यावें लागलें. प्रवासांत ताष्कंद, समरकंद, बल्ख (बाल्हीक, बॅक्ट्रा किंवा झैनिस्पा), खूतान, यारकंद यासारखीं अनेक शहरें त्यानें पाहिलीं. त्यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला. सिलोनलाही बहुधा तो गेला असावा. त्याचा ग्रंथ म्हणजे, त्यानें पाहिलेल्या देशांची अत्यंत सूक्ष्म दृष्टीनें केलेलीं वर्णनें; हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील लोकांचीं आजकालच्या त्या त्या प्रांतातील लोकांना सुद्धां अगदीं हुबेहुब जुळण्यासारखीं विस्मयकारक स्वभाववर्णनें; त्याच्या कानांवर आलेल्या विलक्षण कहाण्या आणि बुद्ध आणि बोधिसत्त्व यांच्या चमत्कारांसंबंधींच्या असंख्य कथा यांची एक मोठी खुमासदार, लज्जतदार अशी अलौकिक खिचडी आहे. त्यानें सांगितलेल्या तांब्याच्या पत्र्याचें पोटाला वेष्टण घालून फिरणाऱ्या त्या महान् ज्ञानी माणसाची गोष्ट मीं तुला सांगितलीच आहे.

त्यानें हिंदुस्थानांत, विशेषतः पाटलिपुत्राच्या जवळच्याच नालंदाच्या विद्यापीठांत बरींचशीं वर्षे घालविलीं. नालंदा येथें धर्ममठ आणि विद्यापीठ यांचें मीलन झालेलें होतें. त्या एकाच ठिकाणीं दहा हजार विद्यार्थी व भिक्षू वास्तव्य करीत असत, असें

* ह्यूएन चँगच्या नांवाचा उच्चार यू एन् चँग, युआन चाँग किंवा शुआंगशंग असाही करतात.

म्हणतात. काशी हें जसें ब्राह्मणधर्मीयांचें विद्यार्जनाचें प्रमुख असें आधारस्थान होतें, तसेंच नालंदा हें बुद्धधर्मीयांचें तितक्याच तोलाचें श्रेष्ठ विद्यापीठ होतें.

मागें एकदा मीं तुला सांगितलें आहे, कीं एका काळीं हिंदुस्थानची ख्याति चंद्राची भूमि–इंदु-भूमि–अशी होती. ह्यूएन चँगनेंही या गोष्टीचा उल्लेख केला आहे; आणि हें नांव आपल्या देशाला किती अनुरूप आहे हें त्यानें लिहिलें आहे. चीनमध्येंही चंद्राला इनतु हें नांव असावें. तेव्हा तुला चिनी नांव धारण करावें असें वाटलें, तर तसें करणें किती सोपें आहे, नाहीं ? †

ह्यूएन चँग हा हिंदुस्थानांत इ. स. ६२९ या वर्षी आला. चीनमधून तो इकडे यावयास निघाला त्या वेळीं त्याचें वय २६ वर्षांचें होतें. एका जुन्या चिनी बखरींत असें लिहिलेलें आढळतें, कीं ह्यूएन चँग हा उंच आणि दिसायला उमदा होता. त्याचा रंग नाजुक होता. डोळे तेजस्वी होते. त्याची अंगलट गंभीर आणि ऐटदार होती. त्याच्या सर्वांगांतून माधुर्य आणि तेज यांचा प्रकाश जणुं बाहेर पडतो आहेसें वाटे. त्याच्या ठिकाणीं पृथ्वीच्या भोंवतीं असणाऱ्या महासागरांचें ऐश्वर्य आणि पाण्यामध्यें जन्मास येऊन विलसणाऱ्या कमलाच्या ठिकाणीं असणारें तेज आणि विमलत्व होतें, असें त्यात लिहिलेलें आहे.

बुद्ध भिक्षूचा केशरी रंगाचा पोषाख करून तो अगदीं एकटाच, चिनी बादशहानें त्याला जाण्यास परवानगी दिली नव्हती तरीही, या दीर्घ प्रवासाला निघाला. जेमतेम कसाबसा जीव राखून त्यानें एकदांचें गोबीचें निर्जन मैदान ओलांडलें आणि त्या मैदानाच्या अगदीं टोंकाला वसलेलें जें तुर्फान राज्य तेथें तो येऊन पोंचला. त्या सर्व निर्जन मरुभूमीमध्यें हें लहानसें राज्य म्हणजे एक लहानशी संस्कृतीची रम्य हिरवळच होती. आज तें राज्य नष्ट होऊन गेलेलें असून पुराणवस्तु-संशोधक आणि प्राचीन इतिहाससंशोधक जुन्या काळचे कांहीं अवशेष सांपडतील या आशेनें येथें उत्खनन करीत असतात. परंतु सातव्या शतकांत ह्यूएन चँगनें त्यामधून प्रवास केला, त्या वेळीं तें उच्च संस्कृतीनें युक्त असें गजबजलेलें एक राज्य होतें. तेथील त्या संस्कृतीमध्यें हिंदुस्थान, चीन, इराण आणि कांहीं अंशीं यूरपसुद्धां, यांच्या संस्कृतींचें मोठें पाहण्यासारखें मीलन झालेलें होतें. त्या काळीं तेथें बुद्धधर्माचा प्रभाव होता. आणि संस्कृत भाषेच्या द्वारानें हिंदु संस्कृतीचें वर्चस्व विशेष लक्षांत येण्यासारखें तेथें होतें; आणि तरीही लोकाची राहणी मात्र बहुतांशीं चीन किंवा इराण येथील राहणीवरून उचललेली होती. कुणाची कल्पना होईल, कीं मग यांची भाषाही मंगोलियन असेल. पण तशी ती नव्हती; तर ती भारतीय आणि यूरपीय भाषाच्या वळणाची भाषा असून यूरपमधील केल्टिक भाषांशीं तिचें पुष्कळ बाबतींत साम्य होतें. आणि याहूनही आश्चर्याची गोष्ट म्हणजे तेथें दगडी भिंतींवर कोरलेलीं जीं चित्रें

† इंदिरेचे लाडकें नांव इंदु हे आहे.

आढळतात त्यांतील मनुष्याकृती या यूरपांतील शरीराच्या ठेवणीच्या आढळतात. या चित्रांत बुद्ध आणि बोधिसत्त्व यांचीं, तशींच देवदेवतांचीं चित्रें मोठीं सुंदर आहेत. या देवतांचे पोषाख बरेचसे भारतीय पद्धतीचे आहेत. तर बऱ्याच ठिकाणीं त्यांच्या मस्तकावरील आवेष्टणें व इतर पोषाख ग्रीक पद्धतीचे आढळतात. त्यावरून प्रसिद्ध फ्रेंच टीकाकार एम्. ग्राउसे म्हणतो, " या ठिकाणीं या चित्रांमध्यें भारतीय अंगलालित्य, हेलनिक म्हणजे ग्रीक भावदर्शकत्व आणि चिनी माधुर्य यांचा सुखकर संगम आढळून येतो."

तुर्फान गांव अजूनही अस्तित्वांत असून नकाशामध्यें तें तुला सांपडेल. आजकाल त्याला कांहींच महत्त्व नाहीं. परंतु त्या दूरच्या प्राचीन काळीं, सातव्या शतकांत, दूरदूरच्या प्रदेशातील संस्कृतींचे महान् संपन्न ओघ या ठिकाणीं वाहत येऊन त्यांचा संगम तेथें झालेला असावा आणि त्यांतून त्या सर्वांचा एकजीव झालेली निराळी एक मधुर नवसंस्कृति निर्माण झालेली असावी, ही घटना किती अद्भुत आणि मनोहर आहे.

तुर्फानहून आपला यात्रेकरू ह्यूएन चँग हा कूचा येथें गेला. हेंही त्या काळचें मध्य-आशियांतील एक प्रसिद्ध केंद्रस्थान होतें. मोठें संपन्न आणि सुधारणायुक्त असें हें स्थान तेथील संगीतप्रवीण लोक आणि मधुर सौंदर्यसंपन्न स्त्रिया यासाठीं विशेष प्रख्यातीस आलेलें होतें. तेथील धर्म व कला हीं तेथें हिंदुस्थानांतून आलेलीं होतीं; इराणमधून व्यापारधंद्यांचा माल व विद्या यांची त्याला प्राप्ति झाली होती. तेथील भाषेचा संस्कृत, जुनी पर्शियन, लॅटिन व केल्टिक या भाषांशीं संबंध होता. मनोहर संस्कृतिमीलनाचा हा आणखी एक नमुना!

अशाच रीतीनें पुढें मग ह्यूएन चँगनें तुर्कांच्या प्रदेशांतून प्रवास केला. त्या ठिकाणीं एक महान् खान राज्य करीत होता. तो बुद्धधर्मी असून मध्य आशियाच्या बहुतेक भागांवर त्याचा अम्मल चालत असे. प्रथम ह्यूएन चँग हा समरकंद येथें गेला; सुमारें एक हजार वर्षांपूर्वी अॅलेक्झांडर या शहरावरून गेला होता. ह्यूएन चँगच्या वेळेला तें एक जुनाट शहर झालें होतें. अॅलेक्झांडरच्या आठवणीच काय त्या तेथें शिल्लक होत्या. तेथून तो बलखला गेला आणि तेथून काबूल नदीचें खोरें ओलांडून काश्मीरमध्यें आला व तेथून खालीं हिंदुस्थानांत त्यानें प्रवेश केला.

चीनमधील तंग घराण्याच्या प्रारंभींचा हा काळ होता. त्याची राजधानी सि-आन-फू नगरी ही कला व विद्या यांचें त्या काळीं केंद्रस्थान होती आणि चीन देश जगामध्यें सर्व सुधारणांच्या आघाडीला होता. तेव्हां ह्यूएन चँग हा अशा या अत्यंत सुधारलेल्या देशांतून आलेला होता हें तूं विशेष लक्षांत घेतलें पाहिजेस. त्यामुळें त्याची तुलनेची कसोटी फार उंच प्रकारची असली पाहिजे. म्हणून तत्कालीन हिंदी परिस्थितीबद्दलची त्याची साक्ष ही फार महत्त्वाची आणि किंमतवान् समजली जाते. हिंदी लोक व त्यांची राज्यव्यवस्था यांची त्यानें स्तुति केली आहे. तो म्हणतो: " सामान्य जनतेसंबंधीं

पाहायचें तर, हे लोक स्वाभाविक थोडे हलक्या मनोवृत्तीचे असले तरी ते मोठे प्रामाणिक आणि अब्रूदार लोक आहेत. पैशाच्या बाबतींत त्यांच्यामध्यें लबाडी मुळींच नाहीं आणि न्यायदानाच्या बाबतींत ते दयाळू आहेत. व्यवहारांत वागणुकींत ते फसवे किंवा विश्वासघातकी नाहींत. ते आपला शब्द व वचन प्रामाणिकपणे पाळणारे आहेत. त्यांच्या राज्यविषयक नियमांमध्यें मोठी पाहण्यासारखी नीतिप्रियता–निर्मळता आढळते. आणि त्यांच्या वागणुकींत माधुर्य आणि मार्दव आढळतें. गुन्हेगार किंवा बंडखोर लोक पाहिले तर फारच थोडे आढळतात. आणि त्यांच्यापासून क्वचितच केव्हां त्रास होतो."

पुढें एका ठिकाणीं तो म्हणतो, "राज्याची व्यवस्था ही लोकहितकर तत्त्वावर आधारलेली असल्यामुळें अधिकारी लोक साधे असतात. सक्तीनें कोणालाही काम करावयास लावलें जात नाहीं." "अशा रीतीनें लोकावरील कर हलके आहेत आणि त्याना करावी लागणारी सेवाचाकरीही बेताची आहे. प्रत्येकाला आपली चीजवस्तही निर्वेध बाळगतां येते आणि सर्व जण शेती करून आपली उपजीविका करतात. राज्याच्या जमिनी जे करतात त्यांना उत्पन्नाच्या एक-षष्ठांश राजाला नजराणा म्हणून द्यावा लागतो. व्यापारधंदा करणारे वैश्य लोक व्यापारासाठीं चोहोंकडे प्रवास करीत असतात." वगैरे.

ह्यूएन चँगला असें आढळून आलें, कीं लोकांच्या शिक्षणाची येथें चांगली सुसंघटित व्यवस्था होती. शिक्षणाचें काम फार लहान वयापासून सुरू होत असे. अक्षरओळख करून देणारें पहिलें पुस्तक शिकून झाल्यावर प्रत्येक मुलाला किंवा मुलीला सात वर्षें वयाला होतांच शास्त्राच्या अभ्यासाला सुरुवात करावी लागे. शास्त्रें म्हणजे सर्व प्रकारच्या विद्या असा अर्थ असे. त्या काळीं पांच प्रमुख शास्त्रें मानीत असत : ( १ ) व्याकरण, ( २ ) कलाकौशल्य, ( ३ ) वैद्यक ( आयुर्वेद ), ( ४ ) तर्कशास्त्र ( न्याय ), ( ५ ) तत्त्वज्ञान ( दर्शनें ). विद्यापीठांतून या शास्त्रीय विषयाचा अभ्यास होत असे आणि सर्व अध्ययन तीस वर्षांच्या वयाला पुरें होई. अर्थात् मला नाहीं वाटत, फारशी कोणी मंडळी इतक्या मोठ्या वयापर्यंत अध्ययन करीत असतील असें. परंतु प्राथमिक शिक्षणाचा मात्र फार मोठ्या प्रमाणावर सर्वत्र प्रसार झालेला होता असें दिसतें. कारण सर्वच भिक्षू आणि उपाध्याय यांचें काम शिक्षण देण्याचें असे आणि या लोकांची संख्याही काहीं थोडीथोडकी नव्हती. ह्यूएन चँगच्या मनावर भारतीयांच्या विद्याप्रेमाचा फार मोठा परिणाम झाला. इतका, कीं त्यानें आपल्या ग्रंथांत जागोजाग त्या गोष्टीचा पुन्हां पुन्हां उल्लेख केला आहे.

ह्यूएन चँगनें प्रयाग येथील प्रचंड कुंभमेळ्याचें वर्णन दिलें आहे. आतां पुन्हा तूं हा मेळा पाहशील तेव्हा १३०० वर्षांपूर्वी हाच मेळा ह्यूएन चँगनें पाहिला होता, आणि त्याच्या काळीं सुद्धां थेट वैदिक काळापासून चालत आलेल्या या मेळ्याची परंपरा प्राचीन समजली जात होती, या गोष्टी तुझ्या डोळ्यांपुढें उभ्या राहतील. त्या

प्राचीन प्रयाग शहराच्या मानानें त्यांतील त्या अतिप्राचीन अखंड परंपरेच्या मानानें आमचें अलाहाबाद शहर म्हणजे कालचें शहरसें वाटतें. ४०० वर्षांपूर्वी अकबरानें तें वसविलें. प्रयाग शहर त्याच्यापेक्षां किती तरी जुनें, आणि त्या ठिकाणीं गंगा आणि यमुना याच्या संगमावर आज हजारों वर्षें ज्या आकर्षणामुळें वर्षानुवर्षे लाखों लोक जमा होत आलेले आहेत, तें आकर्षण तर त्याहूनही किती तरी जुनें.

स्वतः बुद्धधर्मीय असूनही हर्षवर्धन या खास हिंदु उत्सवाला जात असे, असें ह्यूएन चँगनें लिहिलें आहे. त्याच्यातर्फे एक बादशाही आज्ञापत्र काढण्यांत येऊन त्यामध्यें पांची खंडांतील सर्व गरीब व गरजू लोकांनीं या मेळयाला आपले पाहुणे म्हणून यावें असें सार्वत्रिक आमंत्रण असे. बादशहा झाला म्हणून काय झालें? त्याच्या दृष्टीनें हें फार मोठें आमंत्रण आहे. बरें, लोकही पुष्कळ येत असत हें सांगावयाला नको. एक लक्ष लोक येत होते. ते तेथें हर्षाचे पाहुणे म्हणून जेवीत असत असे उल्लेख आहेत. या मेळयामध्यें हर्षवर्धन दर पाच वर्षांनीं आपल्या खजिन्यांतील सर्वच्या सर्व सोनेंनाणें, मोतीं, रत्नें, रेशमि जें काय जवळ असेल नसेल तें सारें लोकाना वाटून टाकीत असे. प्रत्यक्ष आपला राजमुकुट, आणि किमती वस्त्रें हीं पण तो देत असे. आणि स्वतःसाठीं आपली बहीण राज्यश्री हिच्याकडून एक साधें आणि वापरून जुनें झालेलें वस्त्र मागून घेत असे.

श्रद्धाळू बुद्धधर्मीय असल्यामुळें अन्नासाठीं होणारा पशुवध हर्षानें बंद केला. ब्राह्मणांनीं त्या बाबतींत त्याला म्हणण्यासारखा कांहीं विरोध केला नाहीं. कारण ते स्वतःच बुद्धाच्या उदयापासून शाकाहारीच बनले होते.

ह्यूएनच्या ग्रंथांत एक थोडीशी जमतीची माहिती आहे. ती वाचून तुला मौज वाटेल. तो म्हणतो, कीं हिंदुस्थानांत कोणी मनुष्य आजारी पडला कीं लगेच तो सात दिवसांचा उपास करीत असे. या उपासाच्या काळांत पुष्कळसे लोक बरे होऊन जात. पण त्यानंतरही जर आजार चालू राहिला तर ते औषध घेत. यामुळें आजारी पडणें ही कांहीं त्या वेळीं कोणाच्या आवडीची गोष्ट असणें शक्य नाहीं. किंवा वैद्यांचीही त्या काळीं फारशी मागणी असणें शक्य नाहीं.

त्या वेळच्या हिंदुस्थानांतील एक विशेष नजरेंत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे राजे लोक आणि योद्धे हे विद्वान् आणि सुसंस्कृत लोकांशीं अतिशय आदरानें व लीनतेनें वागत असत. समाजांत सन्मानांचें स्थान विद्या आणि सुसंस्कृति यांना द्यावयाचें, पाशवी शक्ति किंवा संपत्ति यांना द्यावयाचें नाहीं, असा प्रयत्न हिंदुस्थानांत आणि चीनमध्यें विचारपूर्वक करण्यांत आला होता आणि त्या प्रयत्नाला या दोन्ही देशांत मोठें यशही आलें होतें.

हिंदुस्थानांत पुष्कळ वर्षें राहिल्यानंतर ह्यूएन चँग उत्तरेकडील पर्वत ओलांडून पुन्हा आपल्या मायभूमीला जाण्यास निघाला. जातांना सिंधु नदींत तो बुडता बुडता वांचला. परंतु त्याच्याजवळचे पुष्कळसे मौल्यवान् ग्रंथ मात्र वाहून गेले. तरी पण

पुष्कळसे हस्तलिखित ग्रंथ त्याला आपणांबरोबर नेता आले आणि त्या ग्रंथांचें चिनी भाषेंत भाषांतर करण्यांत पुढें त्यानें कित्येक वर्षें घालविलीं. सि-आन-फू येथील तंग कुलातील बादशहानें त्याचें मोठें प्रेमादरपूर्वक स्वागत केलें आणि याच बादशहानें त्याला आपल्या प्रवासाचा वृत्तान्त लिहिण्यास उद्युक्त केलें.

ज्या तुर्की लोकांनीं पुढें पश्चिमेकडे राज्यें बुडवून टाकलीं त्या मध्य आशियामध्यें आढळलेल्या तुर्की लोकांबद्दलही ह्यूएन चँगनें लिहिलें आहे. मध्य आशियांत सर्वत्र बुद्धधर्मीय मठ होते; त्यांबद्दलही त्यानें लिहिलें आहे. मध्य आशियतलेंच काय, पण इराण, इराक, मेसापोटेमिया, खोरासान, मोसल या प्रदेशांत – नव्हे, थेट सीरिआच्या सरहद्दीपर्यंत बौद्धांचे मठ पसरले होते. पर्शियन – इराणी – लोकांबद्दल ह्यूएन लिहितो, कीं " या लोकांना विद्येची मोठीशी आवड नसून ते कलाविलासातच आपला सर्व काळ घालवतात. त्यांनीं तयार केलेल्या सर्व वस्तूंना शेजारच्या देशांमधून फार किंमत मिळते. "

किती असामान्य प्रतीचे हे प्रवासी त्या काळांत होऊन गेले. आजच्या आफ्रिकेच्या दाट अरण्यांमधील आणि दक्षिण अथवा उत्तर ध्रुवाकडच्या सफरी यासुद्धां प्राचीन काळच्या साहसी प्रचंड प्रवासापुढें अगदीं फिक्या वाटूं लागतात. निव्वळ पायाखालीं पर्वत आणि निर्जन मैदानें ओलांडीत, बरोबर कोणी एकही स्नेहीसोबती नाहीं, कोणाशीं कसला संबंध ठेवण्याची सोय नाहीं, अशा स्थितींत हे लोक वर्षानुवर्ष प्रवास करीत असत. मधून मधून त्यांना घरीं जाण्याची ओढ वाटून प्रवासाचा कंटाळा खास आला असेल; परंतु कष्ट सहन करण्यांत त्यांना इतका अपूर्व अभिमान वाटत होता, कीं तसें ते केव्हांच स्वतःच्या तोंडानें सांगत नाहींत. त्यांच्यापैकीं एकानें मात्र दूरच्या प्रदेशांत असतांना घराची आठवण होऊन तेथें जाण्याची उत्कंठा वाटूं लागली असतांना आपल्या मनाची काय अवस्था झाली, याची थोडीशी ओळख आपणांस दिली आहे. त्याचें नांव सुंग युन. ह्यूएन चँगच्या पूर्वी शंभर वर्षें हा हिंदुस्थानांत आला होता. वायव्येकडील गांधार प्रदेशांतील डोंगराळ मुलखांत तो होता, त्या वेळच्याबद्दल तो लिहितो – वातावरणातील नाजुक वायुलहरी, पक्ष्यांचें गान, वसंत ऋतूंतील सौंदर्यानें बहरलेले वृक्ष, अगणित पुष्पांवर उड्या मारणारीं फुलपांखरें – ही सर्व त्या दूर देशामधील रम्य वनश्री व निसर्गशोभा पाहून सुंग युनच्या मनाचें सुकाणूं स्वतःच्या घराकडे वळलें. आणि त्यामुळें त्याच्या मनांत इतके खिन्नतेचे विचार आले, कीं तेवढ्यानें तो फार मोठ्या आजाराच्या तावडींत सांपडला!

## ४४

# दक्षिणेंत कितीएक राजे, योद्धे आणि एक श्रेष्ठ पुरुष उदयाला येतात

१३ मे, १९३२

हर्ष राजा इ. स. ६४८ मध्यें मरण पावला. परंतु त्याच्या मृत्यूपूर्वीच हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर बलुचिस्तानांत एका लहानशा काळ्या ढगानें डोकें वर काढलें होतें. पश्चिम आशिया, उत्तर आफ्रिका आणि दक्षिण यूरपमध्यें अगदीं उसळायला आलेल्या प्रचंड वादळाचा हा ढग म्हणजे आघाडीवरचा दूतच होता जणुं. अरबस्तानांत या सुमारास परमेश्वराचा एक नवा प्रेषित उदयास आलेला होता, त्याचे नांव महंमद. तो नवीनच इस्लाम धर्माचा प्रचार करूं लागला होता. या नव्या धर्मश्रद्धेनें वेडे झालेले आणि आत्मविश्वासानें भरलेले असे ते आरबी लोक सगळीं खंडें पालथीं घालीत जात होते. आणि जेथें जातील तेथील प्रदेश जिंकीत जात होते. त्यांचा हा पराक्रम बुद्धि गुंग करून टाकणारा असून ही नवीनच उत्पन्न झालेली व जगाचें स्वरूप इतकें पुष्कळ बदलून टाकणारी शक्ति होती तरी कशा स्वरूपाची, हें आपण नीट तपासून पाहिलें पाहिजे. पण त्याच्या आधीं आपल्याला एकदां दक्षिण हिंदुस्थानात जाऊन आतांपर्यंतच्या दरम्यानच्या काळांत तेथें काय अवस्था होती याचा कांहीं सुगावा लागतो का, तें पाहिलें पाहिजे. आरबी मुसलमान हर्षाच्या काळांतच बलुचिस्तानांत येऊन पोंचले होते व लौकरच त्यांनीं सिंधचाही ताबा मिळविला होता. पण तेथेंच ते थांबून राहिले. आणि त्यानंतर तीनशें वर्षेपर्यंत मुसलमानांची हिंदुस्थानांत स्वारी झाली नाहीं. पुढें सुद्धां जेव्हां स्वारी झाली ती कांहीं या आरबी लोकांकडून झाली नाहीं, तर इस्लाम धर्माचा स्वीकार केलेल्या मध्य आशियांतील कांहीं टोळ्यांकडून झाली.

म्हणून तूर्त आपण दक्षिण हिंदुस्थानात जाऊं या. त्या सुमारास दक्षिण भारतांत पश्चिम दिशेला आणि मध्य विभागांत चालुक्यांचें राज्य पसरलेलें आढळतें. बहुतेक सर्व महाराष्ट्राचा त्यांत समावेश झालेला असून बदामी ही त्यांची राजधानी होती. ह्यूएन त्सँग महाराष्ट्रीय लोकांची स्तुति करतो आणि त्यांचें धैर्य आणि दिलदारपणा यांबद्दल फार प्रशंसेचे उद्गार काढतो. तो म्हणतो, " हे लोक लढवय्ये, तेजस्वी, स्वाभिमानी, जो त्यांच्याशीं चागलें वागतो त्याच्याशीं कृतज्ञ आणि अपकृत्याचा सूड घेणारे असे आहेत. " चालुक्य राजाना उत्तरेकडे हर्षाला, दक्षिणेकडे पल्लव राजांना आणि पूर्वेकडे कालिंग ( ओरिसा ) देशाच्या राजांना थोपवून धरावें लागत होतें. पुढें त्यांची सत्ता वाढून पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पसरली आणि नंतर राष्ट्रकूटांनीं त्यांची हकालपट्टी केली.

अशा रीतीनें या काळांत दक्षिणेंत मोठीं साम्राज्यें भरभराटीस आलेलीं होतीं.

कधीं कधीं त्यांचें सामर्थ्य समसमान असे. कधीं कधीं त्यांच्यापैकीं एखादें साम्राज्य अधिक बलिष्ठ होऊन त्या मानानें इतर साम्राज्यें अगदींच फिकी पडत. त्यांपैकीं पांड्यांच्या राज्यांत मदुरा हें विद्येचें माहेरघर झालें होतें आणि तामीळ भाषेंतील कवी आणि ग्रंथकार तेथें येऊन राहत असत. तामीळ भाषेंतील बहुतेक श्रेष्ठ अभिजात ग्रंथ इसवी सनाच्या सुरुवातीनंतरच्या काळांत लिहिले गेलेले दिसतात. पल्लव राजांची राजधानी कांचीपुर येथें होती. हेंच हल्लींचें कांजीवरम् शहर होय. हे पल्लव राजेही एका काळीं मोठ्या वैभवाला चढलेले होते. मॅलेशियांत वसाहत करण्याच्या कामांत याच लोकाचा पुष्कळसा हात होता.

त्यापुढें चोल राजांच्या साम्राज्याचा उदयकाळ आला. नवव्या शतकाच्या मध्याला त्याचेंच साऱ्या दक्षिण हिंदुस्थानभर प्रभुत्व होतें. हें राज्य दर्यांवर्दी लोकांचें असून त्यांच्याजवळ मोठें आरमार असे. हें आरमार बंगालचा उपसागर आणि आरबी समुद्र यावर अम्मल गाजवीत असे. कावेरीच्या मुखाजवळ काविरी पट्टिनम् या नांवाचें त्यांचें मुख्य बंदर होतें. या कुलांतील पहिला राजा विजयालया या नांवाचा होता. यांचें राज्य झपाट्यानें उत्तरेकडे पसरत होतें. परंतु मध्येंच राष्ट्रकूटांनीं त्यांचा पराभव केला. तथापि, राजराज नांवाच्या त्यांच्या राजाच्या आमदानींत त्यांनीं पुन्हां डोकें वर काढलें. आणि राजराजानें चोलांचें पूर्ववैभव पुन्हां संपादन केलें. ही हकीकत जवळजवळ दहाव्या शतकाच्या अखेरची असून याच वेळीं उत्तरेंत मुसलमानाच्या स्वाऱ्या सुरू झाल्या होत्या. अर्थात् उत्तरेकडे दूर चाललेल्या या घडामोडींचा राजराजावर कांहींच परिणाम झाला नाहीं. त्याचे आपले साम्राज्य वाढविण्याचे उद्योग चालूच राहिले. त्यानें सिलोन बेट जिंकलें. आणि सत्तर वर्षें त्या ठिकाणीं चोलाचा अम्मल चालू राहिला. त्याचा मुलगा राजेंद्र हाही लढवय्या आणि बापासारखाच विजेता होता. आपले लढाऊ हत्ती जहाजांमधून बरोबर घेऊन तो गेला आणि ब्रह्मदेशाचा दक्षिण भाग त्यानें जिंकला. त्यानें उत्तर हिंदुस्थानमध्येंही स्वारी केली व बंगालच्या राजांचा पराभव केला. अशा रीतीनें चोलाच्या साम्राज्याचा विस्तार फार वाढला. गुप्तांच्या नंतरच्या काळांतलें हिंदुस्थानमधील हेंच सर्वांत मोठें साम्राज्य होय. पण हें साम्राज्य पुढें फार काळ टिकलें नाहीं. राजेंद्र हा मोठा योद्धा होता हें खरें; परंतु तो मोठा क्रूर होता असें दिसतें; जिकलेल्या देशाना आपल्याला अनुकूल करून घेण्याचा त्यानें कांहींच प्रयत्न केला नाहीं. त्याची कारकीर्द इ. स. १०१२ पासून १०४४ पर्यंत चालली; परंतु त्याच्या मृत्यूनंतर चोलांच्या साम्राज्यांतील पुष्कळ मांडलिकांनीं बंडें केलीं आणि चोलांच्या साम्राज्याचे तुकडे-तुकडे झाले.

युद्धामधील विजयाखेरीज समुद्रावरील व्यापारासाठीं चोलाची फार ख्याति होती. त्यांच्या तलम कापसाच्या कापडाला जिकडून तिकडून फारच मागणी असे आणि काविरी पट्टिनम् हें त्यांचें बंदर दूरदूरच्या प्रदेशात माल घेऊन येणाऱ्या जहाजांनीं

गजबजलेलें असे. यवन म्हणजेच ग्रीक लोकांची या बंदरामध्यें वसाहत होती. महाभारतामध्येंसुद्धां चोलांच्या राज्याचा उल्लेख आहे.

दक्षिण हिंदुस्थानचा कितीएक शतकांचा इतिहास असा अगदीं थोडक्यांत सांगण्याचा मीं प्रयत्न केला आहे. इतक्या थोडक्यांत सांगण्याच्या या प्रयत्नानें, उलट तुझा गोंधळ मात्र उडून जाण्याचा संभव आहे. पण काय करणार? या प्रदेशांतील भिन्नभिन्न राज्यें आणि राजवंश यांच्या चक्रव्यूहांत गुंतून राहण्याला आपल्याला सवड नाहीं. आपल्याला साऱ्या जगाचा इतिहास पाहायचा आहे. तेव्हां त्यांतल्या एखाद्या लहानशा भागातच जर आपला पुष्कळ वेळ जाऊं लागला तर—मग तो भाग जरी अगदीं आपण ज्यांत राहतों असाच असला तरी—त्यामुळें बाकीच्या इतिहासाकडे पाहायला मग आपल्याला बहुधा वेळच मिळणार नाहीं.

परंतु राजे आणि त्यांचे विजय यांच्या वृत्तांतापेक्षां त्या काळच्या विद्या व कला यांचा वृत्तांत अधिक महत्त्वाचा आहे. उत्तरेकडे सांपडतात त्याहून किती तरी अधिक प्रमाणात दक्षिणेकडे प्राचीन कालांचे अवशेष पाहायला आज सांपडतात. उत्तरेकडील पुष्कळशा स्मारक-स्थळांच्या इमारती आणि दगडी पुतळे आणि कोरकामें, यांचा मुसलमानांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं नाश झाला. दक्षिणेकडे मुसलमानांचा प्रवेश होऊनसुद्धां या सर्व गोष्टी त्यांच्या तडाक्यातून वांचल्या. उत्तरेंत मात्र दुर्दैवानें अगणित स्मारक-स्थळांचा पूर्ण नाश करण्यांत आला. उत्तरेंत जे मुसलमान आले ते अरबी मुसलमान नव्हते, तर मध्य आशियांतील ते लोक होते हें ध्यानात आण. हे लोक धर्माच्या वेडानें भारलेले असून मूर्तिभंजनासाठीं ते उत्सुक झालेले होते. परंतु त्यांच्या या मोडतोडीच्या प्रवृत्तीचें एक कारण, प्राचीन मंदिरांचा एक प्रकारें किल्ल्यासारखा लढण्यासाठीं उपयोग करण्यांत येत असे, हें असण्याचा संभव आहे. आजचीं दक्षिण हिंदुस्थानांतील पुष्कळशीं देवालयें—पुष्कळशीं मंदिरें—म्हणजे जणुं किल्लेच आहेतसें भासतें. हल्ला झाला तर त्यांत राहून लोकांना आपला चांगला बचाव करता येईल. अशा रीतीनें देवपूजेशिवाय या मंदिरांचा इतरही अनेक रीतींनीं उपयोग होत असे. गांवाचें शालागृहही देवालयच असे; गांवाच्या सभेचें स्थान, पंचायत-घर, ग्रामराज्याची दरबारची जागाही देवालयच असे आणि तसाच प्रसंग पडला तर शत्रूविरुद्ध लढण्यासाठीं खेडेगावचा किल्लाही—भुईकोटही या देवालयाचाच होत असे. अशा रीतीनें गांवच्या सर्व जीवनाचा देवालय हा मध्यबिंदु होता. स्वाभाविकच मग पुजारी, उपाध्याय, यांचेंच सर्वांवर आणि सर्व बाबतींत प्रस्थ माजलेलें असणार. ते कसेंही असलें तरी देवळांचा उपयोग केव्हां केव्हां किल्ल्यांप्रमाणें होत असे या गोष्टीवरून मुसलमान मंदिरें मोडून तोडून कां टाकीत, याचें कारण कळून येण्यासारखें आहे.

चोल राजा राजराज यानें त्या काळीं बांधलेलें एक सुंदर मंदिर तंजावर येथें आहे. बदामी येथें फार सुंदर मंदिरें आहेत; त्याप्रमाणेंच कांजीवरम् येथेंही. परंतु त्या काळचें

सर्वांत अत्यंत प्रेक्षणीय आणि मनोहर असें देवालय आज आपल्याला पाहायला मिळतें तें म्हणजे वेरूळ येथील कैलासमंदिर होय. कठिण दगडांतून केवळ कोरून तयार केलेली जंगलांतील ही एक अजब कलाकृति आहे. आठव्या शतकाच्या दुसऱ्या अर्ध्यांत हें काम सुरू झालें. त्याचप्रमाणें दक्षिणेंत तांब्याच्या अत्यंत सुंदर मूर्तीही ओतलेल्या आढळतील; उदाहरणार्थ, शिवाच्या तांडवनृत्याचें दर्शन करवणारी प्रसिद्ध नटराजाची मूर्ति.

चोल राजा पहिला राजेंद्र यानें चोलपुरम् येथे बांधविलेलें कालव्याचें काम मोठें प्रेक्षणीय आहे. त्याचा तो नुसत्या दगडांनीं खालपासून वरपर्यंत बांधलेला बंधाराच सोळा मैल लांब आहे. हें बांधकाम पुरें झाल्यावर अल्बेरुणी हा आरबी प्रवासी तिकडे गेला होता. हीं कामें पाहून तो तर चकित होऊन गेला. त्यानें त्या संबंधांत लिहिलें आहे, “आमच्या लोकांनीं हीं कामें पाहिलीं म्हणजे त्यांना अत्यंत अचंबा वाटतो, त्यांना त्यांचें नीटसें वर्णनसुद्धां करतां येत नाहीं; मग त्यासारखें कांहीं बांधकाम त्यांना करतां येण्याची गोष्टच दूर.”

या पत्रांत कितीएक राजे आणि राजवंश याच्या नांवांचा मीं उल्लेख केला आहे. कांहीं अल्पकाळ यांनीं वैभव भोगलें; परंतु पुढें त्यांचा अंत होऊन त्यांची स्मृतीही राहिली नाहीं. परंतु या सर्व राजा-महाराजांपेक्षांही अधिक लक्षांत राहण्यासारखा व ज्याच्या हातून हिंदी जीवनांत त्यांच्याहून आधिक जिवंत आणि प्रेरक कार्य घडावयाचें होतें असा एक महापुरुष या काळीं दक्षिण हिंदुस्थानात जन्मास आला. अगदीं तरुण वयांतच प्रभाव दाखवून अन्त पावलेली ही व्यक्ति म्हणजे शंकराचार्य होत. त्यांचा जन्म बहुधा आठव्या शतकाच्या अखेरीस झाला असावा. या पुरुषाला अलौकिक, मति गुंग करून टाकणाऱ्या प्रतिभेची देणगी होती असें दिसतें. त्यानें हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनाच्या कार्याला हात घातला. अथवा खरें म्हणजे हिंदुधर्मांतीलच एका बुद्धिनिष्ठ अशा पंथाचा प्रसार करण्याचें कार्य अंगावर घेऊन त्यानें पार पाडलें. शैवमत या नांवानें हा पंथ प्रसिद्ध आहे. शिवपूजा हें या पंथाचें मुख्य बाह्य चिह्न आहे. बुद्धधर्माशीं त्यानें सामना केला. अर्थात् केवळ आपली बुद्धि आणि तर्कचातुर्य याच साधनांनीं बुद्ध-धर्मीय भिक्षुसंघाच्या धर्तीवर त्यानें एक सर्व वर्णांना मोकळा असा संन्यासमार्ग प्रस्थापित केला. या संन्यासपंथाचीं त्यानें चार भिन्न केंद्रें, धामें, हिंदुस्थानच्या पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर या चारी दिशांना प्रस्थापित केलीं. सर्व हिंदुस्थानभर त्यानें प्रवास केला आणि जेथें तो गेला तेथें त्याचा विजयच झाला. बनारसमध्यें – काशीमध्यें – विजयी वीराचें अधिष्ठान त्याला लाभलें; पण त्याचा हा विजय मुलूखगिरीचा नव्हता; तर अंतःकरणें जिंकण्याचा आणि तर्कचातुर्याचा विजय होता. शेवटीं तो जेथें सतत बर्फमय प्रदेशाला सुरुवात होते, त्या केदारनाथाच्या स्थळीं गेला आणि तेथेंच त्याला मृत्यु आला. आणि एवढें सगळें करून मृत्युसमयीं त्याचें वय किती म्हणशील, तर ३२ च्या आगेंमागें!

शंकराचार्यांच्या कामगिरीची हकिकत मोठी अद्भुत आहे. त्या सुमारास बुद्धधर्म

उत्तरेकडून खालीं दक्षिणेंत लोटला गेला होता. परंतु शंकराचार्यांच्या वेळीं तो हिंदुस्थानांतून जवळजवळ पारच नाहींसा झाला. तेव्हांपासून हिंदुधर्म आणि विशेषतः त्यांतील शैवपंथ या नांवानें ओळखला जाणारा पंथ हाच साऱ्या देशांत प्रभावी होऊन गेला. शंकराचार्यांचे ग्रंथ, टीका आणि वादविवाद यांच्यामुळें साऱ्या देशांत बौद्धिक क्षेत्रांत खालपासून वरपर्यंत नुसती खळबळ माजून गेली. ब्राह्मणवर्गाचे अत्यंत श्रेष्ठ नायक तर ते झालेच ; पण सामान्य जनतेचीं अंतःकरणेंही त्यांनीं आपल्याकडे वेधून घेतलीं. एखाद्या गृहस्थानें केवळ आपल्या बुद्धीच्या बळावर समाजाचा महान् नेता व्हावें आणि लाखों लोकांच्या अंतःकरणांवर आणि प्रत्यक्ष इतिहासाच्या ओघावर आपली छाप पाडावी, ही एक अलौकिक घटना आहे. इतिहासांत मोठमोठ्या योद्धयांना आणि विजेत्यांना महत्त्वाचें स्थान मिळालेलें आढळतें ; ते लोकांना प्रिय होतात किंवा कोणी त्यांचा द्वेषही करतात ; आणि केव्हां केव्हां इतिहासाला वळण देण्यांत त्यांचा हातभार लागतो. मोठमोठ्या धार्मिक नेत्यांनींही लाखों लोकांना हालवून त्यांचीं मनें उत्साहानें भारल्याचीं इतिहासांत उदाहरणें आढळतात. पण त्यांच्या साऱ्या कर्तृत्वाचा आधार लोकांच्या श्रद्धाबुद्धीवर होता. लोकांच्या भावना जाग्या करून आणि त्या भडकवून त्यांनीं आपलें कार्य साधलें.

परंतु मनुष्याचें मन आणि बुद्धि यांच्यावर परिणाम करून फार मोठें कार्य साधणें, हें मात्र कठिण आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी आहे, कीं बहुतेक लोकांना विचार करण्याची संवय आणि शक्तीच नसते ; त्यांना फक्त भावना असतात आणि आपल्या भावनाच्या अनुरोधानेंच त्यांचा व्यवहार चालत असतो. परंतु शंकराचार्यांना तर केवळ मन, बुद्धि, आणि विवेकशक्ति यांना जागृत करूनच आपलें सर्व कार्य साधायचें होतें. प्राचीन ग्रंथांतील एखादे आप्तवाक्य घेऊन त्याचाच केवळ जप करीत बसून त्यांना राहायचें नव्हतें. त्यांचा सिद्धांत बरोबर आहे कीं चुकीचा आहे, याच्याशीं आपणांस कर्तव्य नाहीं. परंतु धार्मिक प्रश्नाचा बुद्धिवादी दृष्टीने विचार करण्याची त्यांची प्रवृत्ति आणि त्यापेक्षांही अशा पद्धतीचा अवलंब करीत असूनही धर्माच्या क्षेत्रांत त्यांना मिळालेलें यश, या गोष्टी यांत आपल्याला विशेष लक्षांत घेण्यासारख्या आहेत. त्यावरून त्या काळचा राज्याधिकार चालविणाऱ्या वर्गाच्या मनोभूमीची थोडीशी ओळख आपल्याला पटते.

हिंदी तत्त्वज्ञान्यांमध्यें—दार्शनिकामध्यें चार्वाक नावाचा जो एक तत्त्वज्ञ होऊन गेला तो नास्तिकवाद प्रतिपादीत असे ; म्हणजे परमेश्वर नाहीं असें म्हणत असे ; हें ऐकून तुला बहुधा मोठेंच नवल वाटेल. जगामध्यें, विशेषतः रशियात, आजकाल खूप लोक असे आहेत, कीं त्यांचा परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास नाहीं. या प्रश्नाचा मूलभूत विचार कांहीं आपल्याला येथें करण्याचें कारण नाहीं. परंतु विशेष ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट आहे ती ही, कीं प्राचीन काळीं हिंदुस्थानांत विचारस्वातंत्र्य व प्रतिपादनस्वातंत्र्य होतें. ज्याला धर्मविषयक स्वातंत्र्य—श्रद्धास्वातंत्र्य—विवेकबुद्धीचें स्वातंत्र्य

म्हणतात तें या देशात होतें. अगदीं अलीकडेपर्यंत यूरपमध्यें अशी स्थिति नव्हती; आणि सध्यां सुद्धा देशांतील प्रचलित किंवा अधिकृत धर्म अमान्य करणारांना तेथें पुष्कळ हक्कांना मुकावें लागतें.

शंकराचार्यांच्या अल्पायुषी परंतु मोठ्या धामधुमीच्या व धकाधकीच्या आयुष्यांतून आणखी एक गोष्ट प्रत्ययाला येते; ती म्हणजे हिंदुस्थानातील सांस्कृतिक ऐक्य. अगदीं थेट प्राचीन इतिहासकालापासून ही गोष्ट मान्य झालेली आढळते. भौगोलिक दृष्ट्या तूं पाहशील, कीं हिंदुस्थान हा पुष्कळ अंशीं एक सलग तुकडा आहे. राजकीय दृष्ट्या या देशाचे पुष्कळच प्रसंगीं अनेक विभाग पडलेले आढळतात. परंतु मधूनमधून जवळ-जवळ एकाच मध्यवर्ती सत्तेच्या अमलाखालीं हा देश आलेलाही आढळतो. परंतु सांस्कृतिक दृष्ट्या मात्र हा देश पूर्वीपासून एकजीव झालेला आहे. कारण या देशामध्यें विचारांची पार्श्वभूमि एक, परंपरा, रूढी, प्राचीन काळचा धर्मही एक, वीर पुरुष व वीर स्त्रिया सर्व एक, सर्व ठिकाणच्या लोकांचे पवित्र पुराणग्रंथ एक, प्रौढ ग्रंथभाषा सर्वांची एकच म्हणजे संस्कृत, राज्यव्यवस्थेच्या पायाशीं मुख्य अंग म्हणून ग्रामपंचायतींची रचना सगळीकडे सारखी, यात्रा-ठिकाणेंही सर्वांचीं एक आणि समाजरचनेची भूमिका आणि राज्यव्यवस्थेचें धोरणही एक, असा विशेष सारखेपणा आढळून येतो. सर्वसामान्य भारतीयाला सर्व हिंदुस्थान ही पुण्यभूमि वाटायची आणि बाकी सगळीकडे म्लेंच्छ आणि अनार्य लोक भरलेले आहेत असें वाटावयाचें! त्यामुळें लोकांत एकभारतीयत्वाची जाणीव निर्माण झाली आणि त्यापुढें राजकीय विभागांचा फारसा प्रादुर्भाव राहूं शकला नाहीं. विशेषतः वरतीं राज्यकर्त्यांत कितीही बदल झाले, तरीही तळचा ग्रामपंचायतींचा कारभार सर्वत्र सारखाच चालू राहिल्यानें हें एकत्व जास्तच दृढ झालें.

शंकराचार्यांनीं आपले मठ, म्हणजे आपल्या नव्या संन्यासधर्मीयाचीं प्रमुख केंद्रस्थानें, धामें, हिंदुस्थानच्या चारी दिशांच्या चार टोंकांना स्थापिलीं; यावरून हिंदुस्थान हा त्यांनाही सांस्कृतिक दृष्ट्या एक सलग गट वाटत होता हें स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणें साऱ्या देशभर त्यांच्या बौद्धिक स्वारीला इतक्या थोड्या काळांत इतकें मोठें यश लाभलें या गोष्टीवरूनही बौद्धिक आणि सांस्कृतिक प्रवाह देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत किती जलदीनें पोंचत असत, हेंही दिसून येतें.

शंकराचार्यांनीं शैवपंथाचा प्रचार केला; त्यामुळे या पंथाचा दक्षिणेंत विशेष प्रसार झाला असून तिकडचीं मंदिरें शंकराचीं, शिवाचीं आहेत. उत्तरेकडे गुप्तांच्या काळांत वैष्णवपंथ आणि कृष्णभक्ति यांना फार बहर आला होता. हिंदुधर्मांतील या दोन पंथांचीं – शाखांचीं – मंदिरें एकमेकांहून अगदीं भिन्न पद्धतीचीं आहेत.

हें पत्र फारच लांबलें आहे. आणि तरी पण मला हिंदुस्थानातील मध्ययुगीन परिस्थितीबद्दल अजून पुष्कळच सांगावयाचें आहे; पण त्यासाठीं पुढच्या पत्राची वाट पाहिली पाहिजे.

## ४५

# मध्ययुगीन भारत

१४ मे, १९३२

अशोकाचा आजा चंद्रगुप्त याचा मुख्य मंत्रि कौटिल्य उर्फ चाणक्य यानें लिहिलेल्या अर्थशास्त्र या ग्रंथाबद्दल मागें मी तुला सांगत होतों, तें तुला आठवत असेल. तत्कालीन लोकाबद्दल आणि राज्यव्यवस्थेबद्दल नानाविध गोष्टी या ग्रंथामध्यें सांगितलेल्या आढळतात. ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकांतील भारताच्या मंदिरांत डोकावून आत काय काय दिसतें हें पाहण्यासाठीं ही एक खिडकीच जणुं मुद्दाम उघडून ठेवलेली आहे. आपल्यासारख्यांच्यासाठीं राज्यव्यवस्थेचे अगदीं बारीकसारीक तपशील देणारे हे अशा प्रकारचे ग्रंथ राजे लोकांचीं आणि त्यांच्या विजयांचीं भलीं मोठीं अतिशयोक्त वर्णनें देणाऱ्या ग्रंथांपेक्षां केव्हाही पुष्कळच अधिक उपयुक्त असतात.

असाच आणखी एक ग्रंथ आपल्याला उपलब्ध आहे. त्याच्यावरून मध्ययुगीन भारताची आपल्याला कल्पना येण्यासारखी आहे. शुक्राचार्यांचा 'नीतिसार' हा तो ग्रंथ होय. अर्थशास्त्राइतका काहीं हा ग्रंथ परिपूर्ण किंवा उपयुक्त नाहीं; परंतु हा ग्रंथ, तत्कालीन कांहीं शिलालेख आणि इतर वृत्तांत, यांच्या साहाय्यानें ख्रिस्तानंतरच्या नवव्या किंवा दहाव्या शतकातील भारताच्या दालनांत डोकावून त्याचें थोडेंसें ओझरतें दर्शन आपल्याला घेतां येतें का पाहूं.

नीतिसारांत सांगितलें आहे, कीं "ब्राह्मणत्वाला योग्य असें तेज शरीराच्या वर्णामुळेंही निर्माण होत नाहीं किंवा विशिष्ट कुलांत जन्म घेतल्यानेंही होत नाहीं." म्हणजे नीतिसाराच्या मताप्रमाणें जाति किंवा वर्णभेद हा जन्मावर अवलंबून नसून गुणावर अवलंबून आहे. तसेंच पुन्हा त्यांत म्हटलेलें आहे: "अधिकाराच्या स्थानावर नेमणूक करताना आचरण (शील), कार्यक्षमता आणि गुण याचाच विचार करून नेमणूक केली पाहिजे; जाति किंवा कुल यांचा विचार करून नव्हे." राजानें केवळ स्वतःच्याच मताप्रमाणें चालतां उपयोगी नाहीं; तर बहुसंख्य लोकांच्या विचाराप्रमाणें त्यानें वागलें पाहिजे, असा त्या काळचा दंडक दिसतो. "लोकमत हें राजापेक्षां अधिक सामर्थ्यवान् आहे; कारण लहान लहान धाग्यांनीं तयार झालेला दोर सिंहालासुद्धा बांधून ओढावयाला समर्थ असतो," असें नीतिसाराचें म्हणणें आहे.

तत्त्व म्हणून हे सारे उपदेश आजच्या काळालासुद्धां अत्यंत उत्कृष्ट आहेत. परंतु वास्तविक पाहिल्यास प्रत्यक्ष व्यवहारांत आपल्याला त्याचा तसा कांहीं उपयोग होत नाहीं. अंगीं गुण आणि योग्यता असली म्हणजे मनुष्याला उच्च स्थान प्राप्त व्हावें असें म्हणणें. परंतु गुण आणि योग्यता प्राप्त करून घेण्याच्या मार्गाचें काय? कोणी मुलगा अथवा मुलगी जात्या हुशार असली आणि त्याना योग्य प्रकारचें शिक्षण

आणि संस्कार लाभले, तर तीं मोटीं चतुर आणि कर्तबगार माणसें होतील हें खरें; पण असें शिक्षण किंवा संस्कार घडविण्याची कांहीं व्यवस्थाच नसली, तर तीं बिचारीं मुलें-मुली काय करणार?

त्याचप्रमाणें लोकमत म्हणजे तरी काय? कोणाचें मत लोकमत म्हणून विचारांत घेतलें जावयाचें? अगणित अशा शूद्र कामगारांना मत देण्याची पात्रता आहे, असें कांहीं नीतिसाराच्या कर्त्याचें मत असावेंसें दिसत नाहीं. तत्कालीन समाजांत अशा लोकांना जवळवळ कांहीं स्थानच नव्हतें. तेव्हां लोकमत म्हणजे काय, तर वरिष्ठ व राज्यकारभार करणाऱ्या वर्गांमधील व्यक्तींचें मत, अशीच बहुधा त्याच्याही मतानें व्यवस्था असली पाहिजे.

तथापि, एक गोष्ट मात्र विशेष कौतुक करण्याजोगी आहे, कीं मध्ययुगांत काय किंवा त्यापूर्वींही काय, भारतीय समाजव्यवस्थेंत राजांचे परमेश्वरसिद्ध अधिकार किंवा अनियंत्रित सत्ता याना मुळींच स्थान नव्हतें.

यानंतर नीतिसारांत आपल्याला मंत्रिसभा, सार्वजनिक बांधकामें, उद्यानें, शहरें आणि अरण्यें याच्यावर देखरेख ठेवणारे वरिष्ठ अधिकारी, शहरें आणि खेडीं यांमधील जीवनक्रम, पूल, नावा, धर्मशाळा, रस्ते, आणि कोणत्याही शहरांतील अथवा खेड्यां-तील जीवनाच्या दृष्टीनें सर्वांत अधिक लक्ष पुरविण्यासारखी गोष्ट म्हणजे सांडपाण्याचा निकाल करण्यासाठीं गटारांची व्यवस्था, अशा अनेक विषयांसंबंधीं माहिती दिलेली आढळते.

गांवांतील सर्व व्यवहारांवर ग्रामपंचायतीची सर्व सत्ता असून राजाचे अधिकारी पंचांना फार मान देऊन वागत. गांवच्या जमिनीची वांटणी (लागवडीसाठीं) पंचायतीं-कडूनच होत असे. पंचायतच कर वसूल करून गांवच्या वतीनें ती रक्कम सरकारांत भरीत असे. या सर्व पंचायतींच्यावर देखरेख करण्यासाठीं एक मोठी पंचायत किंवा महासभा असे, असें दिसतें. जरूर तर खालच्या पंचायतींच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार या महासभेला असे. या पंचायतींना न्यायदानाचाही अधिकार असून त्यांच्यापुढें खटले चालत व गुन्ह्यांची चौकशी होई.

दक्षिण हिंदुस्थानांतील कांहीं लेखांमध्यें आपल्याला या पंचायतींतील पंचांची निवड कशी होत असे, त्यांच्या ठिकाणीं कोणते गुण असावे लागत, आणि कोणत्या कारणामुळें निवडून देण्याला प्रतिबंध होत असे, याबद्दल माहिती आढळते. जर कोणी सभासदानें सार्वजनिक पैशांचा हिशेब दिला नाहीं, तर त्याचा निवडून येण्याचा हक्क नष्ट होत असे. दुसरा एक विशेष ध्यानांत घेण्यासारखा नियम असा होता, कीं पंचांच्या जवळच्या नातेवाइकांना अधिकाराच्या जागेवर येण्यास प्रतिबंध असे. आमचीं सारीं कौन्सिलें, असेंब्ल्या, आणि म्युनिसिपालिट्या यांच्यामध्ये हा नियम जारी केला तर किती उत्तम होईल. एका पोटमंडळांत एका स्त्रीच्या नावाचा उल्लेख आढळतो. त्यावरून पोटमंडळ किंवा पंचायतीवर निवडून येण्याचा अधिकार स्त्रियानाही होता असें दिसतें.

निवडून आलेल्या पंचायतींमधून पोटमंडळें स्थापन होत असत. यांची मुदत एक वर्षाची असे. कोणत्याही सभासदाच्या हातून दुर्वर्तन झालें, तर त्यास सभासदाच्या जागेवरून ताबडतोब कमी करतां येत असे.

ही ग्रामराज्याची पद्धति आर्यांच्या समाजव्यवस्थेचा पायाच होती. याचमुळें त्या समाजव्यवस्थेला दृढत्व प्राप्त झालेलें होतें. ग्रामपंचायती आपल्या स्वातंत्र्याबद्दल व हक्कांबद्दल इतक्या जागरूक असत, कीं प्रत्यक्ष राजाची आज्ञा असल्याखेरीज कोणाही सैनिकाला गांवांत प्रवेश करण्याचा अधिकार नाहीं, असा सक्त नियम होता. नीतिसारांत लिहिलें आहे, कीं प्रजा जेव्हां अधिकाऱ्यांविरुद्ध तक्रार करील तेव्हां "राजानें अधिकाऱ्यांची बाजू घेतां उपयोगी नाहीं, प्रजेची घेतली पाहिजे;" आणि फारच बहुसंख्य लोकांची तक्रार असेल तर अधिकाऱ्याला कामावरून काढून टाकलें पाहिजे. "कारण अधिकारमदाच्या पानानें उन्मत्त होणार नाहीं असा कोण आहे?" असें नीतिसाराचें म्हणणें आहे. किती शहाणपणानें भरलेले शब्द आहेत हे! आणि आज आमच्या देशांत अयोग्य प्रकारचा राज्यकारभार करणाऱ्या आणि गैरवर्तणूक करणाऱ्या अधिकाऱ्यांची जी गर्दी माजलेली आहे, तिला हे शब्द किती जुळण्यासारखे आहेत!

मोठमोठ्या शहरांत, ज्या ठिकाणीं कारागीर व व्यापारी असत तेथें त्यांचे संघ बनविलेले असत. अशा रीतीनें कारागिरांचे संघ, पेढीवाल्यांचे संघ, व्यापारी लोकांचे संघ असे वेगवेगळे संघ असत. स्थानिक कारभारावर या संघांचा मोठ्या प्रमाणात ताबा चालत असे.

लोकांना कष्ट होऊं नयेत किंवा ओझें वाटूं नये अशा बेतानें हलके कर राजानें लोकांवर बसवावे, असा राजावर निर्बंध होता. मालाकार मालांच्यासाठीं वनामध्यें जशीं हलक्या हातानें पानें आणि फुलें गोळा करतो तसे राजानें कर वसूल करावे, एखाद्या कोळशाच्या भट्टीवाल्याप्रमाणें नव्हे, असा दंडक होता.

मध्ययुगीन भारताबद्दल अशी कांहीं तुटक माहिती कोठें कोठें आपल्याला जमा करतां येते. ग्रंथामध्यें वर्णन केलेल्या या सिद्धांतांशीं प्रत्यक्ष व्यवहार कितीसा जुळता होता हें समजून येणें मात्र फार बिकट आहे. ग्रंथांमध्यें मोठमोठे सिद्धांत आणि ध्येयें यांबद्दल लिहिणें फार सोपें आहे. त्याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहार करणें हें अधिक बिकट आहे. आतां हें खरें, कीं ग्रंथांवरून निदान लोकांचे विचार आणि सामाजिक आदर्श काय होते हें आपल्याला चांगलें समजतें. मग त्यांचा प्रत्यक्ष व्यवहार अगदीं संपूर्णपणें लिहिल्याबोलल्याप्रमाणें होत असो वा नसो. त्या दृष्टीनें मध्ययुगीन भारतांत आपल्याला असें आढळतें, कीं राजाच्या अथवा अधिकाऱ्यांच्या हातीं अनियंत्रित सत्ता मुळीच नव्हती. लोकनियुक्त पंचायतींचें त्यांच्या सत्तेवर नियंत्रण होतें. शहरांमध्यें किंवा खेड्यांमध्यें स्थानिक कारभारांत स्वायत्ततेची अत्यंत पुढारलेली पद्धति अस्तित्वांत होती आणि या स्वायत्ततेंत मध्यवर्ती सत्तेकडून सहसा ढवळाढवळ होत नसे, असेंही आपल्याला आढळतें.

परंतु तत्कालीन लोकाच्या समाजव्यवस्थेचा आदर्श किंवा स्वायत्तता यांबद्दल एवढें हें सगळें मी सांगतों, तेव्हां खरोखर माझ्या सांगण्याचा अर्थ काय आहे? हिंदुस्थानातील सर्वच समाजव्यवस्था, जाति व वर्णव्यवस्था यांच्या पायावर त्या काळींही आधारलेली होती. तत्त्वतः जातिभेद किंवा वर्णभेद कठोर मानले जात नव्हते; किंवा नीतिसारात म्हटल्याप्रमाणें लायकी व गुण यांवरून जाति व वर्ण ठरत असत, असें म्हणतां येईल. परंतु व्यवहारात या म्हणण्यामध्यें जवळजवळ कांहीं अर्थ नव्हता. राज्याधिकार चालविणारा वर्ग खरोखर ब्राह्मण आणि क्षत्रिय याचाच होता. कधीं कधीं प्रभुत्वाबद्दल याच्यामध्यें झगडा उत्पन्न झालेला आढळतो; परंतु बहुतेक प्रसंगीं हे दोन्ही वर्ण मिळूनच सत्ता चालवीत आणि त्यांची आपसांत देवाण-घेवाण चालत असे. बाकीच्यांना मात्र हे नेहमीं आपल्या सत्तेखालीं दडपून ठेवीत. हळूहळू व्यापार आणि उद्योगधंदे वाढूं लागले तसतसा वैश्यवर्ग हा संपन्न होऊं लागला, त्याचें महत्त्वही वाढूं लागलें. वाढत्या महत्त्वाबरोबर वैश्यवर्गाला कांहीं अधिकारही मिळत गेले व त्यांना त्याच्या व्यापारी संघांचा अंतर्गत कारभार चालविण्यासंबंधीं अधिकाधिक स्वातंत्र्य मिळत गेलें. तरी पण इतकें होऊनही प्रत्यक्ष राज्यसत्तेंत त्यांना खरा हिस्सा असा नाहीं मिळाला. शूद्रांकडे पाहिलें, तर ते बिचारे पाहिल्यापासून अखेर-पर्यंत तळाशीं दडपलेले दासच राहिले. आणि त्यांच्याही खालच्या अवस्थेला कांहीं लोक असतच.

अधूनमधून हीनवर्णीय लोकानींही वरचा पल्ला गांटलेला आढळतो. शूद्र लोक केव्हां केव्हां राजे झालेलेही ऐकिवांत येतें. पण हा अगदींच अपवादात्मक प्रकार. सामाजिक दर्जामध्यें वाढ होण्याचा नित्याचा मार्ग म्हणजे एखाद्या सबंधच्या सबंध पोटजातीला एक वरची पायरी प्राप्त होणें. नवे नवे समाज हिंदु-समाजांत अंतर्भूत करून घेण्यांत येत, तेव्हां त्यांना अगदीं खालच्या पायरीवर स्थान मिळे. पुढें हळूहळू आपल्या कर्तबगारीनें हे समाज वरच्या वरच्या पायरीवर चढत.

तेव्हां तुझ्या आतां लक्षात येईल, कीं पश्चिमेंतल्याप्रमाणें हिंदुस्थानांत जरी मजुरी करणाऱ्या गुलामांची संस्था नव्हती, तरी आमची सर्व समाजव्यवस्था खालपासून वरपर्यंत एकावर एक चढत जाणाऱ्या निरनिराळ्या थरांची बनलेली होती. अगदीं तळाशीं जे कोट्यवधि लोक होते, त्यांना वर शिखराशीं जे लोक होते त्यांच्या दडपणा-खालीं राहावें लागे व त्यांच्याकडून त्या बिचाऱ्यांची पिळवणूक होई. शिडीच्या तळाशीं असणाऱ्या या लोकांना शिक्षण किंवा संस्कार प्राप्त करून घेण्याची संधि हे वरच्या पायरीवर असणारे लोक मिळूं देत नसत आणि अशा रीतीनें ही उच्च-नीच अवस्थांची पद्धति चिरकाल चालू राहावी आणि खरी सत्ता आपल्याच केवळ हातांत राहावी, अशी ते काळजीपूर्वक व्यवस्था करीत असत. ग्रामपंचायतींमध्यें मात्र या शेत-काम करणाऱ्या लोकांना बोलण्याचा थोडाफार अधिकार असावा आणि त्यांच्याकडे अजीबातच दुर्लक्ष करणें शक्य होत नसावें. परंतु या पंचायतींमध्यें कांहीं चतुर ब्राह्मणांचेंच प्रस्थ माजलेलें असण्याचा पष्कळसा संभव.

आर्य लोक हिंदुस्थानात येऊन त्याचा आणि द्रविडाचा परस्परांशीं संबंध आला तेव्हापासून आतां आपण बोलतों आहों त्या मध्ययुगीन कालापर्यंत ही प्राचीन भारतीय समाजव्यवस्था चालत आलेली दिसते. परंतु जसजसा काळ गेला, तसतशी ती कमी दर्जाची आणि दुर्बळ होत चाललेली दिसते. ती म्हातारी होत चालली हें कदाचित् याचें कारण असावें ; किंवा बाहेरून जे वारंवार हल्ले झाले त्यानें तिच्यातील जोम नाहींसा झाला असेल.

प्राचीन काळीं हिंदुस्थान देश गणितशास्त्रांत मोठ्या श्रेष्ठ पदवीला पोंचलेला असून भारतीय श्रेष्ठ गणितशास्त्रज्ञांच्या यादींत लीलावती नांवाच्या एका स्त्रीचें नांव आढळतें. असें म्हणतात, कीं ही लीलावती, तिचा पिता भास्कराचार्य आणि तसेंच बहुतकरून ब्रह्मगुप्त हा आणखी एक गृहस्थ यांनीं प्रथम दशांशपद्धति शोधून काढली. बीजगणिताचा उगमही हिंदुस्थानांतच झाला म्हणतात. येथून तें शास्त्र अरबस्तानांत गेलें आणि तेथून यूरपमध्यें. ऑल्जिब्रा हा इंग्रजी शब्द मूळ आरबी भाषेंतून आलेला आहे.

## ४६

# डौलदार अङ्कोर नगरी आणि श्रीविजय

१७ मे, १९३२

आतां आपण बृहद्भारताला म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांनीं स्थापन केलेल्या मॅलेशिया व इंडोचायना यामधील वसाहतींना जरा धांवती भेट देऊन येऊं या. या वसाहती मुद्दाम, सहेतुक, योजनापूर्वक कशा वसविल्या गेल्या, हें मीं यापूर्वी तुला सांगितलेंच आहे. एकाच वेळीं इतक्या अनेक ठिकाणीं अशा अगदीं रेखीव नमुन्याप्रमाणें या वसाहती स्थापन झाल्या याचा अर्थ त्या वेळीं लोक वारंवार समुद्रावर सफरी करीत असले पाहिजेत आणि समुद्रावर त्यांनीं चांगलेंच वर्चस्व संपादन केलें असलें पाहिजे. या वसाहती ख्रिस्ती शकाच्या पहिल्या आणि दुसऱ्या शतकांमध्यें सुरू झाल्या हेंही मीं तुला सांगिलेंच आहे. या सर्व हिंदू वसाहती असून दक्षिण हिंदुस्थानाकडील नांवें त्यांना दिलेलीं होतीं. कांहीं शतकानंतर तेथें बुद्धधर्माचा प्रसार होऊं लागला आणि जवळजवळ सर्व मॅलेशियाच्या वसाहतींचा भाग बुद्धधर्मीय झाला.

प्रथम आपण इंडोचायनामध्यें जाऊं या. अगदीं पहिली वसाहत या भागांत झाली. तिचें नांव चंपा असून ती अनाम प्रांतामध्यें होती. ( याच प्रांताला आतां नवीन व्हाएटनाम अथवा वैतनाम असें नांव दिलेलें आहे. ) याच वसाहतींत पुढें तिसऱ्या शतकांत पांडुरंगम् नांवाचें शहर उदयास आलेलें आढळतें. त्यानंतर दोनशें वर्षांत कांबोज नगर भरभराटीस आलें. दगडी मंदिरें व इमारती यांनीं हें शहर गजबजलेलें

होतें. या सर्व भारतीय वसाहतींत तुला जेथें तेथें भल्या भक्कम इमारती बांधल्या गेलेल्या आढळतील. त्यासाठीं शिल्पकाम आणि बांधकामांत प्रवीण असलेले कारागीर हिंदुस्थानमधूनच तिकडे न्यावे लागले असणार. त्यांनीं शिल्प व वास्तुशास्त्र यांमधील हिंदी परंपरा आपल्याबरोबर तिकडे नेली. या प्रदेशांतील निरनिराळ्या राज्यांमध्यें आणि बेटांमध्यें बांधकामाची फार प्रचंड लाटच उसळली. आणि त्याचा परिणाम म्हणजे कलाकौशल्याला तेथें सुंदर बहर आला.

या वसाहतींमध्यें राहणारे लोक स्वाभाविकच दर्यावर्दी होते. ते किंवा त्यांचे पूर्वज यांना तेथें वसाहत करावयाला येण्यासाठीं समुद्र ओलांडूनच यावें लागलें होतें. तसेंच त्याच्या चारी बाजूंना समुद्रच होता. दर्यावर्दी लोकांची व्यापारधंदा करण्याकडे अगदीं सहज प्रवृत्ति होते. त्यामुळें हे लोक लौकरच धंदेवाले, कारखानदार, व्यापारी बनले; आणि आपला माल समुद्रावरून निरनिराळ्या आजूबाजूंच्या बेटांत, हिंदुस्थानांत आणि पूर्वेकडे चीनमध्यें घेऊन जाऊं लागले. अशा रीतीनें मॅलेशियांतील निरनिराळ्या राज्यांवर मोठ्या प्रमाणात या वैश्य – व्यापारी – वर्गाचेंच वर्चस्व चालू लागलें. या राज्यांमध्यें वारंवार मोठालीं युद्धें होत आणि मनुष्यवध फार मोठ्या प्रमाणावर होई. कधीं कधीं हें युद्ध एका बाजूला एक हिंदुराज्य आणि दुसऱ्या बाजूला एक बुद्धराज्य अशा प्रकारें चालू असलेलें दिसे. परंतु त्या वेळीं युद्धामागें खरें कारण ही व्यापारी स्पर्धा हेंच होतेंसें दिसतें. आजही अशाच रीतीनें मोठमोठ्या राजसत्तांमध्यें जीं युद्धें होतात तींही त्या राष्ट्रांत उत्पन्न होणाऱ्या मालाला हव्या असणाऱ्या बाजारपेठांसाठीं, हें आपण पाहतोंच.

सुमारें तीनशें वर्षें – म्हणजे आठव्या शतकापर्यंत – इंडोचायनामध्यें तीन वेगवेगळीं हिंदू राज्यें होतीं. नवव्या शतकांत जयवर्मा नावाचा एक मोठा राजा उदयास आला. त्यानें हीं तिन्ही राज्यें एका छत्राखालीं आणिलीं आणि मोठें साम्राज्य प्रस्थापित केलें. हा राजा बहुधा बुद्धधर्मीय असावा. त्यानें अङ्कोर येथें आपल्या राजधानीचें नगर वसविण्यास सुरुवात केली व त्याच्यामागून गादीवर आलेला यशोवर्मा यानें तें पुरें केलें. या साम्राज्यालाच कँबोडियन (कांबोजचें) साम्राज्य म्हणत. याचा अम्मल जवळजवळ चारशें वर्षें चालला. साम्राज्य म्हटलें कीं तें प्रबळ आणि वैभवशाली असायचेंच. या दृष्टीनें हेंही साम्राज्य मोठें प्रबळ आणि वैभवशाली होतें अशीच त्या काळीं समजूत होती. राजधानीची नगरी अङ्कोर थोम ही साऱ्या पूर्व प्रदेशांत "डौलदार अङ्कोर" या नांवानें विख्यात होती. १० लाखांहून अधिक वस्तीचें हें शहर सीझरांच्या (रोम बादशहांच्या) काळांतील रोमपेक्षांही मोठें होतें. त्याच्याच शेजारीं 'अङ्कोरवाट' या नांवाचें अत्यंत विलोभनीय मंदिर होतें. तेराव्या शतकांत कँबोडियावर चोहों बाजूंनीं हल्ले झाले. पूर्वेकडून अनाम (वैतनाम) प्रांतातील लोकांनीं हल्ला केला, तर पश्चिमेकडून स्थानिक रानटी लोकांनीं हल्ला केला. उत्तरेकडून मंगोलियनांनीं शान प्रांतांतील रहिवाशांना खालीं लोटलें. तेव्हां त्यांना संरक्षणासाठीं

दुसरा आसराच न राहिल्यामुळें त्यांनींही कँबोडियाकडेच मोर्चा वळविला. या सर्व एकसारख्या चाललेल्या लढाया खेळतां खेळतां आणि आपलें संरक्षण करतां करतां तें राज्य अगदीं मेटाकुटीस आलें. तथापि अङ्कोर नगरीचें वैभव व ऐश्वर्य मात्र शिल्लक राहिलें. इ. स. १२९७ मध्यें चीनच्या दरबारचा एक वकील काबोजच्या राजाच्या दरबारांत आला होता. त्यानें तेथील आश्चर्यचकित करून टाकणाऱ्या इमारतींचें मोठें रसभरित, गौरवपूर्ण वर्णन केलें आहे.

परंतु एकाएकीं अङ्कोर नगरी एका भयाण उत्पाताच्या तावडींत सांपडली. इ. स. १३०० च्या सुमारास मेकांग नदीच्या मुखाशीं फारच गाळ सांचून तिचें मुख बंद झालें. पाणी पुढें समुद्रांत वाहून जाईनासें होऊन तें मागेंच वाढूं लागलें आणि त्यामुळें त्या महान् नगरीच्या भोंवतीं सगळीकडे पुराचें पाणीच पाणी होऊन गेलें. आसपासच्या सगळ्या अत्यंत पिकाऊ शेतजमिनीची नुसती निरुपयोगी दलदल बनून गेली. त्यामुळें नगरीमधील प्रचंड लोकसंख्येचा अन्नाचा पुरवठा कमी होऊन लोकांची उपासमार होऊं लागली. लोकांना तेथें राहणेंच अशक्य झालें आणि म्हणून ते शहर सोडून जाऊं लागले. अशा रीतीनें वैभवशाली अङ्कोरमधील लोकवस्ती नाहींशी झाली; तेथें निर्जन अरण्याचें साम्राज्य सुरू झालें; कांहीं काळ तेथल्या त्या मनोहर आणि भव्य इमारतीं-मध्यें रानटी पशूंचें वास्तव्य होतें. परंतु लौकरच त्या अरण्याच्या वाढींत सगळे राजवाडे आणि इमारती धुळीस मिळून गेल्या आणि मग अरण्याला तेथें कोणीही प्रतिस्पर्धी म्हणून राहिला नाहीं !

या उत्पाताच्या धक्क्यानंतर काबोजचें साम्राज्य फार काळ तग काढूं शकलें नाहीं. हळूहळू त्याची सर्व सत्ता पार नष्ट झाली आणि एका दुय्यम प्रांताचें स्थान त्याला प्राप्त झालें. हा प्रांत मग कधीं सयामच्या तर कधीं अनामच्या (वैतनाम) राजवटीच्या अमलाखालीं असे. परंतु तेथील त्या अङ्कोरवाट मंदिराचे अवशेष अद्यापही उपलब्ध आहेत. त्यावरून दूरदूरच्या देशांतील व्यापारी आपापला माल विकण्यासाठीं जेथें येत असत आणि जेथल्या कारागिरांनीं आणि नागरिकांनीं तयार केलेल्या सुंदर सुंदर कलाकुसरीच्या वस्तू दूरदूरच्या देशांमध्यें पाठविल्या जात असत, अशा त्या त्याच्याच शेजारच्या गौरवशाली व ऐश्वर्यानें धुंद झालेल्या नगरीच्या वैभवकाळची थोडीफार कल्पना आपल्याला येऊं शकते.

इंडोचायनापासून जवळच समुद्राच्या पलीकडे सुमात्राचें बेट आहे. त्या ठिकाणीं सुद्धां ख्रिस्तानंतर पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतच दक्षिणेंतील पल्लवानीं आपल्या अगदीं पहिल्या पहिल्या नव्या वसाहती स्थापल्या होत्या. पुढें त्या हळूहळू वाढल्या. मॅले द्वीपकल्प हें अगदीं पूर्वीपासूनच सुमात्राच्या राज्याचा भाग झालेलें होतें आणि पुढें पुष्कळ काळपर्यंत सुमात्रा आणि मॅले द्वीपकल्प यांचा सगळा इतिहास परस्परांशीं अतिशय निकट बांधलेला आहे. या राज्याची राजधानी श्रीविजय नांवाचें शहर होतें. सुमात्रामधील पर्वतांत आंतल्या अंगाला हें शहर असून पालेमबांग नदीच्या मुखाशीं

या नगराचें बंदर होतें. पाचव्या-सहाव्या शतकानंतर सुमात्रांत बुद्धधर्माचेंच वर्चस्व चालू लागलें. एवढेंच नव्हे, तर सुमात्राच्या राज्यानें बुद्धधर्माचा प्रचार करण्याचें प्रत्यक्ष कार्य आपल्या अंगावर घेतलें आणि अखेरीस मॅलेशियांतील बहुतेक सारा हिंदुधर्मीय प्रदेश त्याच्या प्रयत्नानें बुद्धधर्मीय होऊन गेला. त्यामुळें या सुमात्राच्या साम्राज्याला श्रीविजय येथील बुद्धांचें ( बुद्धधर्मीय ) साम्राज्य असें म्हटलें जातें.

श्रीविजयाचें हें साम्राज्य वाढतां वाढता इतकें वाढलें, कीं सुमात्रा आणि मलाया यांच्या जोडीला त्यामध्यें बोर्निओ, फिलिपाइन बेटें, सेलीबीस, जावाचा अर्धा भाग, फोर्मोसा बेटाचा अर्धा भाग ( आज हें बेट जपानच्या ताब्यांत आहे ) व सिलोन यांचा समावेश होऊं लागला. एवढेंच नव्हे, तर दक्षिण चीनमधील कँटन बंदराजवळील एक बंदरही त्यामध्यें सामील होतें. सिलोनच्या समोरचा हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकाचा कांहीं भागही त्यांत बहुधा असावा. अशा रीतीनें साऱ्या मॅलेशियावर पसरलेलें एक विस्तीर्ण असें साम्राज्य होतें हें तुला दिसून येईल. व्यापारधंदा, मालवाहतूक आणि जहाजें बांधणें हे या देशाचे प्रमुख व्यवसाय होते. तत्कालीन आरबी आणि चिनी ग्रंथकारांनीं सुमात्राच्या राज्याच्या अमलाखालीं आलेलीं बंदरें आणि नवीन नवीन वसाहती यांचीं नांवें दिलेलीं आपल्याला आढळतात. त्यांच्या या याद्या पुढें पुढें वाढतच गेलेल्या दिसतात.

ब्रिटिश साम्राज्य आज साऱ्या जगावर पसरलेलें असून प्रत्येक ठिकाणीं त्याचीं बंदरें आणि कोळसा भरण्याचीं ठिकाणें आहेत. उदाहरणार्थ, जिब्राल्टर, सुएज कालवा ( हा बहुतांशीं ब्रिटिशांच्याच प्रभुत्वाखालीं आहे ), एडन, कोलंबो, सिंगापूर, हाँगकाँग वगैरे. गेलीं तीनशें वर्षें ब्रिटिश लोक हे व्यापारी लोकांचें राष्ट्र म्हणून नादत आहेत आणि व्यापार व सामर्थ्य हीं त्यांच्या आरमारी शक्तीवर अवलंबून आहेत. त्यासाठीं स्वाभाविकच त्यांनीं सोयीसोयीच्या अंतरावर बंदरें आणि कोळसा भरण्याचीं ठिकाणें हातीं आणलेलीं आहेत. श्रीविजयचें साम्राज्यही व्यापारावरच उभारलेलें अशाच प्रकारचें एका दर्यावर्दी सत्तेचें राज्य होतें. त्यामुळें जिथें म्हणून थोडासा पाय शिरकवावयाला जागा मिळेल तेथें त्यांनीं आपलें बंदर केलेलें आढळेल. त्यांच्या वसाहतींची एक विशेष गोष्ट तुला आढळून येईल, कीं त्या सर्व महत्त्वाच्या मोऱ्याच्या जागीं होत्या ; म्हणजे काय, तर जेथून आजूबाजूच्या सर्व समुद्रावर चांगलें प्रभुत्व चालवितां येईल अशा जागीं मुद्दाम काळजीपूर्वक या वसाहती उभारण्यांत आलेल्या होत्या. कोठें कोठें तर सुमात्राच्या या बंदरी वसाहती जोडीजोडीनें उभारलेल्या असत. त्यांचा तर समुद्रावरील वर्चस्व आणि सत्ता मजबूत होण्यासाठीं विशेषच उपयोग होई.

उदाहरणार्थ, आजचें खूप मोठें झालेलें सिंगापूर शहर ! हें मुळांत सुमात्रामधील वसाहतवाल्यांनीं वसविलेलें एक ठिकाण होतें. सिंगापूर हें नांवही अगदीं खास हिंदी आहे असें तुला आढळेल. सिंगापूर म्हणजे सिंगपूर अथवा सिंहपूर. सिंगापूरच्या समोरच्या सामुद्रधुनीच्या पलीकडच्या तीरावर सुमात्राच्या लोकांची आणखी एक वसाहत

होती. मधूनमधून ते एक लोखंडी सांखळी या सामुद्रधुनीमध्यें या कांठापासून त्या कांठापर्यंत बांधीत असत आणि भलाभक्कम कर घेतल्याशिवाय जहाजांना पलीकडे जाऊं देत नसत.

तेव्हां श्रीविजयचें साम्राज्य ब्रिटिश साम्राज्याहून कांहीं निराळें नव्हतें. अर्थात् तें त्याच्याहून बरेंच लहान होतें हें खरें. परंतु ब्रिटिश साम्राज्य जितका काळ अस्तित्वांत राहण्याचा संभव आहे, त्याच्यापेक्षां त्याचा अम्मल मात्र अधिक काळ चालू होता. श्रीविजयाच्या वाढीची अगदीं शेवटची सीमा अकराव्या शतकांत, म्हणजे इकडे दक्षिणेंत चोलांचें राज्य भरभराटीला आलें होतें त्याच सुमारास गाठली गेली. परंतु चोल राजांच्यानंतरही पुढें किती तरी काळपर्यंत श्रीविजयचें साम्राज्य चालू राहिलें. या दोन्ही राज्यांमध्यें पुष्कळ काळपर्यंत मैत्रीचे संबंध होते. परंतु दोन्हीमधील लोक आक्रमक वृत्तीचे दर्यावर्दी लोक होते; दोघांच्याजवळ प्रबळ आरमारें होतीं आणि लांबलांबपर्यंत व्यापारधंद्यांचीं साधनें होतीं. अकराव्या शतकाच्या सुरुवातीला या दोन राज्यांत झगडा उत्पन्न होऊन युद्धाला सुरुवात झाली. चोल राजा पहिला राजेंद्र यानें सैन्य समुद्रपार पाठवून श्रीविजयच्या साम्राज्यावर स्वारी केली व त्या राज्याचा पराभव केला. परंतु या धक्क्यांतून श्रीविजयानें पुन्हां लौकरच डोकें वर काढलें.

अकराव्या शतकाच्या सुरुवातीला चिनी बादशहानें सुमात्राच्या राज्याकडे पुष्कळ तांब्याच्या घंटा भेट म्हणून पाठविल्या. परतभेट म्हणून सुमात्राच्या राजानें मोती, हस्तिदंत आणि संस्कृत ग्रंथ पाठविले. बरोबर सुवर्णाच्या पत्र्यावर "**हिंदी लिपीं**"त कोरलेलें एक पत्रही होतें म्हणतात.

श्रीविजयचें साम्राज्य फार काळपर्यंत भरभराटत राहिलें. त्याची अगदीं पहिली पहिली जमवाजमव खिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकापासून पांचव्या शतकापर्यंत झाली. या सुमारास तेथें बुद्धधर्माचा उदय झाला. नंतर त्याची क्रमाक्रमानें अकराव्या शतकापर्यंत सारखी वाढच होत गेली. त्यापुढें तीनशें वर्षेपर्यंत हें मोठें साम्राज्य मॅलेशियामधील सर्व व्यापार व दळणवळण यांवर प्रभुत्व गाजवीत टिकून राहिलें. अखेरीस पुढें इ. स. १३७७ मध्यें पल्लवांच्याच एका दुसऱ्या प्राचीन वसाहतीनें त्याचा पाडाव केला.

मीं तुला सांगितलेंच आहे, कीं श्रीविजयचें साम्राज्य सिलोनपासून चीनमधील कॅंटनपर्यंत पसरलेलें होतें. दरम्यानचीं बहुतेक सर्व बेटें या साम्राज्यांत सामील होतीं. पण एक लहानसा तुकडा मात्र या साम्राज्याला जिंकतां आला नाहीं. तो म्हणजे जावाचा पूर्व भाग. या भागांतील राज्य तेवढें स्वतंत्र राहिलें आणि हिंदुधर्मानुयायी राहिलें. बुद्धधर्माचा स्वीकार करण्याचें त्यानें नाकारलें. अशा रीतीनें पश्चिम जावावर श्रीविजयाच्या राज्याचा अम्मल होता, तर पूर्व जावा हें स्वतंत्र राज्य होतें. पूर्व जावाचें हें हिंदु राज्यही व्यापारी राज्य होतें आणि व्यापार व वाहतुकीच्या भरभराटीवर त्याची

भरभराट अवलंबून होती. सिंगापूरला मोठी मान्याची जागा लाभल्यामुळें तेथें आतां मोठेंच व्यापाराचें केंद्र निर्माण झालेलें होतें. त्यामुळें त्याकडे पूर्व जावाच्या राज्याची लोभी नजर स्वाभाविकच वळली असली पाहिजे. त्यामुळें श्रीविजय आणि पूर्व जावा यांमध्यें स्पर्धा उत्पन्न होऊन तिचें पर्यवसान अत्यंत तीव्र शत्रुत्वांत झालें. बाराव्या शतकापासून पुढें हें पूर्व जावाचें राज्य श्रीविजयच्या राज्याचा थोडा थोडा भाग बळकावीत बळकावीतच वाढत गेलें आणि शेवटीं मीं मागें म्हटल्याप्रमाणें चौदाव्या शतकांत इ. स. १३७७ मध्यें त्यानें श्रीविजयचा पूर्ण पाडाव केला. हें युद्ध अतिशयच क्रूर प्रकारचें झालें आणि त्यांत हानि फार झाली. श्रीविजय आणि सिंगापूर हीं दोन्ही शहरें त्यांत नष्ट झालीं. अशा रीतीनें मॅलेशियांतील दुसरें मोठें साम्राज्य समाप्त झालें. आणि त्याच्या मोडतोडींतून मॅलेशियांतील तिसरें साम्राज्य – मज्झपहित साम्राज्य हें उदयास आलें.

पूर्व जावांतील लोकांनीं श्रीविजयाशीं झालेल्या त्याच्या या युद्धांत पुष्कळच क्रौर्य आणि रानटीपणा दाखविला ही गोष्ट खरी असली, तरीही त्या काळचे जावामधील जे पुष्कळ ग्रंथ आजही उपलब्ध आहेत त्यावरून या हिंदु राज्यानें सुधारणेची फार उच्च पायरी गांठली होती असें दिसून येतें. त्याच्यामध्यें बांधकामाची, विशेषतः मंदिरें बांधण्याची कला सर्वांत अधिक उत्कर्षाला पोंचली होती. त्या राज्यांत ५०० मंदिरें असून त्यांपैकीं कितीएक जगामधील अत्यंत सुंदर आणि कलायुक्त अशा दगडी शिल्पकलेचे नमुने होतीं असें म्हणतात. यांपैकीं बहुतेक भव्य मंदिरें सातव्या शतकाच्या मध्यापासून तों दहाव्या शतकाच्या मध्यापर्यंत (म्हणजे इ. स. ६५० पासून ९५० पर्यंत) बांधण्यांत आलीं. हीं एवढीं भव्य मंदिरें बांधण्यासाठीं या जावांतील लोकांनीं अगणित कारागीर, सुतार, गवंडी व शिल्पशास्त्रज्ञ आणि वास्तुशास्त्रनिपुण लोक हिंदुस्थानांतून आणि इतरही प्रदेशांतून आणले असले पाहिजेत. परंतु जावा आणि हें मज्झपहित साम्राज्य यांचा पुढचा इतिहास आपण दुसऱ्या एका पत्रांत लिहूं.

येथें एवढें सांगून ठेवतों, कीं बोर्निओ आणि फिलिपाइन बेटें येथील लोक लेखनकला हिंदुस्थानपासूनच या पल्हवांच्या प्राचीन वसाहतीमार्फत शिकले. दुःखाची गोष्ट ही, कीं फिलिपाइन्समधील पुष्कळच प्राचीन हस्तलिखितांचा पुढें स्पॅनिश लोकांनीं नाश केला.

त्याचप्रमाणें हेंही तूं लक्षांत ठेव, कीं या भागांत आरबी लोकांच्याही वसाहती पुष्कळ पूर्वीपासून, इस्लामच्याही उदयाच्या पूर्वीपासून होत्या. हे आरबी लोक मोठे व्यापारी होते. आणि जेथें जेथें कांहीं व्यापाराचें संधान असेल तेथें ते हटकून असावयाचेच.

## ४७

# रोम अंधकारांत गडप होतें

१९ मे, १९३२

प्राचीन इतिहासाच्या या चक्रव्यूहामध्यें मी तुझ्या वाटाड्याचें काम मुळींच चांगल्या रीतीनें करूं शकत नाहीं, असें कितीक वेळां मला वाटतें. मला स्वतःलाच वाटेचा मागमूस राहत नाहीं, तेथें मी तुला योग्य वाट दाखवून पलीकडे कसा नेऊं शकणार? तरी पण अगदींच कांहीं नाहीं त्यापेक्षां कांहीं तरी मदत तुला होईल ना असें वाटून हीं पत्रें लिहिण्याचें मी चालू ठेवतों. मला स्वतःला मात्र या पत्रांचा फारच मोठा उपयोग होतो. पत्र लिहीत बसलों आणि तुझी मूर्ति डोळ्यांपुढें आली कीं नाहीं बाळ, म्हणजे मग – मी बसतों त्या ठिकाणचें उष्णतामान सावलीमध्यें सुद्धां ११२ अंशावर आहे, उन्हाच्या उष्ण झळा वाहत आहेत, याची मला आठवण सुद्धां राहत नाहीं. कधीं कधीं तर मी बरेलीच्या डिस्ट्रिक्ट जेलमध्यें आहें, हें सुद्धां मी विसरतों.

माझ्या गेल्या पत्रांत तूं मॅलेशियामध्यें थेट चौदाव्या शतकाच्या अखेरीला येऊन पोंचलीस. तरी पण उत्तर हिंदुस्थानांत आपण हर्षाच्या काळाच्या म्हणजे सातव्या शतकाच्या पलीकडे पोंचलों नाहीं, आणि यूरपमध्यें तर आपल्याला अजून केवढा तरी मोठा काळ ओलांडावयाचा आहे. सगळीकडे एकच वेळापत्रक, किंवा काळाचें एकच कोष्टक पाळणें हें कठिण पडतें. तसा प्रयत्न मी करतों, परंतु केव्हां केव्हा, उदाहरणार्थ, या अङ्कोर आणि श्रीविजय साम्राज्यांच्या बाबतींत झालें त्याप्रमाणें, हातीं घेतलेली गोष्ट पुरी करावी म्हणून मी पुढच्या कितीएक शतकांपर्यंत भरारी मारतों. म्हणून तुला ध्यानात ठेवणें जरूर आहे, कीं इकडे पूर्वेकडे कांबोज आणि श्रीविजय हीं साम्राज्यें भरभराटीस आलेलीं होतीं त्या काळांत हिंदुस्थान, चीन आणि यूरपमध्येंही हरएक प्रकारच्या घडामोडी चालू होत्याच. तसेंच हेंही लक्षांत ठेव, कीं माझ्या गेल्या पत्रांत थोड्याशाच पानांमध्यें इंडोचायना व मॅलेशिया यांचा एक हजार वर्षांचा इतिहास दिलेला आहे. आशियाच्या आणि यूरपच्या इतिहासाच्या मुख्य ओघापासून हीं राष्ट्रें काहींशीं अलग पडलेलीं असल्यामुळें त्यांच्याकडे कोणाचें फारसें लक्ष जात नाहीं, पण त्याचाही इतिहास फार मोठ्या काळाचा आणि भरीव असाच आहे; कर्तबगारी, यशःप्राप्ति, व्यापारधंदा, कला आणि शिल्प यांमध्यें तर त्यांच्या हातून विशेष भरीव कामागिरी झालेली असून त्यांचा इतिहास चांगला अभ्यास करण्यासारखा आहे. हिंदी लोकांना तर त्यांचा वृत्तांत विशेषच कौतुकाचा आहे. कारण हीं साम्राज्यें म्हणजे जणुं हिंदुस्थानचाच एक भाग आहेत. आमच्या देशांतील लोक समुद्र ओलांडून हिंदी संस्कृति, कला, धर्म घेऊन तेथें जाऊन राहिलेले होते.

परंतु अशा रीतीनें मलायांत जरी आपण पुष्कळ पुढल्या काळांत गेलों असलों, तरी

खरोखर आपण अजून सातव्या शतकाशींच आहों असें म्हटलें पाहिजे. अरबस्तानात जाऊन आपल्याला अद्यापि तेथें इस्लामचा उदय कसा झाला आणि त्यामुळें यूरप आणि आशिया यामध्यें केवढाले प्रचंड फरक घडून आले, हें पाहावयाचें आहे. तसेंच यूरपमधील सर्वच घडामोडींचा सलग वृत्तांत आपणाला सांगावयाचा आहे.

म्हणून आपण थोडेंसें मागें जाऊन यूरपकडे जरा नजर टाकूं या. बॉस्फरसच्या सामुद्रधुनीवर ज्या ठिकाणीं बायझांटियम शहर होतें तेथें रोमचा बादशहा कॉन्स्टंटाइन यानें कॉन्स्टॉन्टिनोपल हें शहर वसविलें, हें तुला आठवत असेल. या शहरामध्यें, या नवीन रोममध्यें,त्यानें आपल्या साम्राज्याची राजधानी जुन्या रोममधून काढून आणली. त्यानंतर लौकरच रोमन साम्राज्याचे दोन भाग पडले. एक पश्चिमेकडचें साम्राज्य, त्याची राजधानी रोम शहर; व दुसरा पूर्वेकडील साम्राज्य आणि त्याची राजधानी कॉन्स्टॉन्टिनोपल हें शहर. पूर्वेकडच्या साम्राज्याला पुष्कळच शत्रूंना तोंड द्यावें लागलें आणि त्यावर अडचणीही फार आल्या; तरी आश्चर्य हें, कीं अशाही स्थितींत शतकां-मागून शतकें अशा रीतीनें ११०० वर्षेंपर्यंत तें साम्राज्य टिकलें. अखेरीस तुर्की लोकांनीं तें नष्ट करून टाकलें.

पश्चिमेकडल्या साम्राज्याला इतकें दीर्घायुष्य लाभलें नाहीं. रोमच्या नांवाचा तो एवढा मोठा दरारा, आणि साम्राज्यवैभव भोगणाऱ्या रोम नगरीनें पश्चिमेकडील जगावर इतक्या दीर्घकाळपर्यंत उपभोगलेलें तें प्रभुत्व, यांचें कांहीं न चालून पश्चिमे-कडचें साम्राज्य पाहतां पाहतां त्वरेनें नाहींसें झालें. उत्तरेकडच्या कोणाही टोळ्यांचा हल्ला त्यांना परतविता आला नाहीं. गॉथ लोकांचा नायक अलॅरिक इटलीवर चालून आला आणि इ. स. ४१० मध्यें त्यानें रोम काबीज केलें. पुढें व्हँडॉल लोक येऊन त्यांनींही रोमची लूट केली. हे व्हँडॉल लोक जर्मन वंशाचे असून फ्रान्स ओलांडून ते आफ्रिकेंत गेले होते; व तेथें मोडून पडलेल्या कार्थेजच्या जागीं आपलें एक राज्य त्यांनीं स्थापन केलें होतें. पूर्वीच्या त्या कार्थेजकडच्या बाजूनेंच समुद्र ओलांडून येऊन त्यांनीं रोम शहर काबीज केलें. इतक्या दीर्घ काळानंतर का होईना, पण रोमन लोकांनीं प्यूनिक युद्धामध्यें कार्थेजवर मिळवलेल्या विजयाचा हा एक प्रकारचा सूडच घेतला गेला म्हणावयाचा.

याच सुमारास हूण लोक प्रबल झाले. हे लोक मुळांत मध्य आशियामधून किंवा मंगोलियांतून तिकडे गेलेले होते. पशुधन घेऊन भटकणाऱ्या लोकाचा हा समाज होता. डान्यूब नदीच्या पूर्वेला आणि पूर्व रोमन साम्राज्याच्या उत्तरेला आणि पश्चिमेला हे वसती करून राहिले होते. त्याचा नायक ॲटिला याच्या अमदानींतच आजूबाजूच्या प्रदेशावर त्यांनीं आक्रमण करावयाला सुरुवात केली. कॉन्स्टॉन्टिनोपलचा बादशहा व त्याचें सरकार यांना त्यांचें सतत भय वाटत असे. ॲटिला त्यांना धमक्या देई आणि त्यांच्याकडून मोठमोठाल्या रकमा उकळीत असे. अशा रीतीनें पूर्वेकडील 'रोमन साम्राज्याची पुरेशी रग जिरविल्यानंतर ॲटिलानें पश्चिम रोमन साम्राज्यावर स्वारी

करण्याचा बेत केला. त्यानें प्रथम गॉल प्रांतावर हल्ला करून दक्षिण फ्रान्समधील पुष्कळशीं शहरें उध्वस्त केलीं. केवळ साम्राज्याच्या सैन्याचें त्याच्यापुढें कांहींच चाललें नसतें. परंतु रोमन लोक ज्यांना रानटी (बर्बर) म्हणत अशा ज्या त्या भागांत जर्मनवंशीय फ्रँक आणि गॉथ लोकांच्या टोळ्या होत्या, त्यांना या हूणांच्या स्वारीचें भय वाटून ते रोमन साम्राज्याच्या सैन्याला मिळाले आणि त्या सर्वांनीं ॲटिलाशीं ट्रॉय येथें फार मोठी निकराची लढाई दिली. यांत दीड लक्षांहून अधिक लोक मेले. ॲटिलाचा या ठिकाणीं पाडाव झाला आणि या मंगोलियन हूणांना पिटाळून लावण्यांत आलें. इ. स. ४५१ मधील ही हकीकत. पण ॲटिलाचा पराभव झाला असला तरी त्याचा लढण्याचा दम कायम होता. त्यानें इटलीवर मोर्चा फिरविला आणि उत्तरेकडील पुष्कळ शहरें लुटलीं. लौकरच तो मरण पावला. परंतु त्याच्यामागें त्याचा क्रूरपणा आणि निर्दयपणा यांचा महिमा मात्र कायम शिल्लक राहिला. आजच्या काळांतही हूणांच्या ॲटिलाला निर्दय व निर्घृण नाशकारकतेचा मूर्तिमंत अवतारच मानतात. त्याच्या मृत्यूनंतर हूण लोकांची खुमखुम थोडी शांत झाली, आणि भटकणें सोडून ते तेथेंच जमीन करून राहिले व तेथल्या इतर बऱ्याचशा लोकांमध्यें मिसळून गेले. तुला आठवतच असेल, कीं सामान्यतः याच सुमारास श्वेतवर्णीय हूण लोक हिंदुस्थानमध्यें आले.

यानंतर चाळीस वर्षांनीं थिओडोरिक नावाचा एक गॉथ गृहस्थ रोमचा राजा झाला आणि तेथून रोमचें पश्चिम साम्राज्य संपलेंच म्हणावयाचें. यापुढें थोड्याच काळानंतर पूर्वेकडील साम्राज्याचा बादशहा जस्टिनियन याचा इटली आपल्या साम्राज्यांत सामील करून घेण्याचा प्रयत्न यशस्वी झाला. इटली व सिसिली हे दोनही देश त्यानें जिकले होते. परंतु लौकरच ते दोन्ही पूर्व साम्राज्यांतून फुटले. आणि पूर्व साम्राज्याला इकडे स्वतःचें संरक्षण करतां करतांच पुरेसें झालें.

कोठलीही टोळी येऊन तिनें रोमवर हल्ला करण्याचें मनांत आणावें आणि एवढी साम्राज्यवैभव उपभोगणारी रोम नगरी आणि तिचें तें साम्राज्य प्रत्येक हल्ल्यापुढें इतक्या सहज रीतीनें आणि हां हां म्हणतां कोसळून पडावें, ही किती आश्चर्याची गोष्ट वाटते, नव्हे? रोम म्हणजे एक पोकळ डोलारा किंवा निव्वळ आवळ्याभोपळ्याची कशी तरी बांधलेली मोट तर नव्हती ना, त्याचे सगळे सांधे खिळखिळे झाले नव्हते ना, असा विचार मनांत येतो. हीच कल्पना बहुतांशीं खरी मानली पाहिजे. पुष्कळ काळपर्यंत रोमचें सगळें सामर्थ्य एक काय तें त्याच्या नांवाच्या प्रतिष्ठेमध्ये, कीर्तीमध्येंच शिल्लक राहिलेलें होतें. त्याच्या प्राचीन इतिहासामुळें तें साम्राज्य साऱ्या जगाच्या आघाडीवर आहे असें लोक समजत होते, त्याला ते मोठेपणाचा मान देत होते; त्याच्या भीतीचें एक प्रकारचें भूत त्यांच्या मानगुटीला बसलेलें होतें. म्हणून बाह्यतः एका प्रबळ साम्राज्याची स्वामिनी म्हणून रोमचा दिमाख

चालू राहिला होता; परंतु खरोखर तिच्या पाठीशीं बळ असें कांहींच नव्हतें. बाहेरून सगळी शातता होती. नाट्यगृहांत, क्रीडांगणामध्यें, बाजारपेठेंत पुष्कळ गर्दी गजबजत होती; परंतु ती अगदीं निःसंशय आणि अपरिहार्यपणें नाशाच्या वाटेला लागलेली होती. तिच्या ठिकाणीं सामर्थ्य उरलें नव्हतें. रोमच्या कोलमडण्याचें हें एक कारण असलें, तरी तेवढेंच एक कारण त्याचें होतें असें नव्हे. तर जनतेची गुलामगिरी आणि दैन्य याच्या पायावर आधारलेली श्रीमंतांची, धनिकांची संस्कृति रोमनें निर्माण केली होती हें त्याचें दुसरें आणि मोठें कारण आहे. पूर्वीच्या एका पत्रांत मीं सांगितलेंच आहे तुला, कीं तेथें गरीब लोकांचीं बंडें आणि हल्ले होऊं लागलेले होते; तसेंच गुलामांचेंही एक मोठें बंड होऊन त्याचा मोड करावा लागला होता. हीं सगळीं बंडें रोमची समाजव्यवस्था किती किडून गेली होती हेंच दाखवितात. आंतूनच ती मोडकळीला आलेली होती. गॉथ आणि इतर उत्तरेकडील टोळ्या आल्यामुळें ती मोडण्याचें कार्य लौकर पुरें होण्याला मदतच झाली आणि म्हणूनच त्या ठिकाणीं फारसा विरोध झालाच नाहीं. रोमन शेतकऱ्याला आपल्या नशिबीं आलेल्या दैन्याची इतकी चीड आणि किळस आली होती, कीं ही स्थिति कांहींही होऊन बदलावी, मग तिच्या जागीं नवीन कांहीं येवो, अशी त्याची वृत्ति झाली होती. आणि गरीब बिचारे कामगार व गुलाम जे होते त्यांची अवस्था तर यांच्याहूनही अधिक वाईट होती.

पश्चिम रोमन साम्राज्याचा अंत झाल्याच्या वेळेपासून पश्चिम यूरपांतील नवनवे लोक काळाच्या आघाडीवर पुढें येऊं लागलेले आढळतात. त्यांत गॉथ होते, फ्रॅंक लोक होते, आणखी इतरही कांहीं लोक होते. त्यांचीं सर्वांचींच नांवें येथें सांगून मी तुला त्रास देत नाहीं. आजचे पश्चिम यूरपमधील जर्मन, फ्रेंच वगैरे जे लोक आहेत त्यांचेच हे लोक पूर्वज होत. पुढें हळूहळू यूरपमध्यें या लोकांच्या देशांच्या मर्यादा निश्चित होत गेलेल्या आपल्याला आढळतात. पण त्याच काळांत समाजव्यवस्था मात्र अगदींच हीन प्रकारची अशी अस्तित्वांत असलेली आढळते. रोमच्या साम्राज्याच्या अंताबरोबर रोममधील सगळा दिमाख आणि ऐश्वर्योपभोग यांचाही नाश झाला. आणि रोममध्यें कशीबशी चालू राहिलेली वरची सुधारणा, तिचें मूळ पूर्वीच निःसत्त्व होऊन गेलें असल्यामुळें, पाहतां पाहतां जणुं एका दिवसांत विलयाला गेली. अशा रीतीनें या ठिकाणीं मनुष्यसमाजानें सुधारणेच्या मार्गांत मागचें पाऊल टाकल्याचें एक विचित्र उदाहरण प्रत्यक्ष आपल्या नजरेस येतें. हिंदुस्थान, चीन, ईजिप्त, रोम यांत व इतरही ठिकाणीं हा प्रकार घडून आलेला आपणांस दिसतो. पुष्कळ दिवसपर्यंत अत्यंत परिश्रमानें ज्ञान आणि अनुभव संपादला जातो; संस्कृति आणि सुधारणा निर्माण होतात. आणि मग हें कार्य बंद पडतें. नुसतें बंदच पडून राहत नाहीं, तर एक प्रकारची माघारच सुरू होते. भूतकालावर, आजपर्यंत मिळविलेल्या यशावर, एक प्रकारचा पडदा टाकला जातो. आणि अधूनमधून त्याचें ओझरतें दर्शन आपणांला जरी होऊं शकलें, तरी ज्ञानाचा आणि अनुभवाचा तो सारा पर्वत पुन्हां तळापासून

वरपर्यंत चढावा लागतो. आतां असें मात्र होत असावें बहुधा, कीं प्रत्येक नवीन चढण्याच्या प्रसंगीं समाज पहिल्याहून थोडा अधिक वर चढत असावा, आणि पुन्हां चढण्याचें कामही अधिक सुकर होत असावें. माउंट एव्हरेस्टचें शिखर गांठण्यासाठीं नाहीं का स्वाऱ्यांमागून स्वाऱ्या चालल्या आहेत? तसाच हा प्रकार. प्रत्येक पुढची स्वारी शिखराच्या अधिकाधिक जवळ जवळ जात आहे आणि कोणीं सांगावें, लौकरच अगदीं शेवटचें टोंक गांठलें जाईलही.

तात्पर्य, यूरपमध्यें या सुमारास सगळा अंधकार पसरलेला आपणांस दिसतो. या वेळीं तमोयुग सुरू होतें; जीवन अगदींच गांवढळ आणि नीरस होतें; शिक्षणाचा जवळजवळ मागमूसही कोठें राहत नाहीं आणि लढणें हाच एक काय तो लोकांचा धंदा किंवा करमणुकीचें साधन होऊन राहिलेलें आढळतें. सॉक्रेटीस आणि प्लेटो यांचा काळ आतां फार फार लांब गेलासा वाटूं लागतो.

ही झाली पश्चिमेकडील रोमन साम्राज्याची हकिकत. आतां पूर्वेकडील साम्राज्याचें काय झालें तेंही पाहूं या. तिकडे कॉन्स्टंटाइननें ख्रिस्ती धर्म हा साम्राज्याचा अधिकृत धर्म केला होता हें तुला ठाऊक आहे. पण त्याच्यानंतरचा एक बादशहा ज्यूलियन यानें ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्याचें नाकारलें. जुन्या देवदेवतांच्या पूजेचा धर्म त्याच्या मनांतून पुन्हां प्रस्थापित करावयाचा होता. परंतु त्या कामांत त्याला यश आलें नाहीं. कारण जुन्या देवांच्या सद्दीचा काळ आतां संपला होता आणि ख्रिस्ती धर्माचें बळ आता त्यांच्यापेक्षां फार मोठें वाढलें होतें. ज्यूलियनला ख्रिस्ती लोक व्रात्य किंवा धर्मभ्रष्ट, काफीर ज्यूलियन ( Julian the Apostate ) असें म्हणत आणि याच पदवीनिशीं आज तो इतिहासांत ओळखला जातो.

ज्यूलियनच्यानंतर लौकरच एक बादशहा झाला. तो ज्यूलियनहून अगदीं वेगळ्या प्रवृत्तीचा होता. त्याचें नांव थिओडोसियस असून त्याला ग्रेट म्हणजे श्रेष्ठ, महान् ही पदवी लावतात. प्राचीन मंदिरें आणि देवदेवतांच्या प्राचीन मूर्ती नष्ट करण्याचें महत्कार्य त्यानें केलें, म्हणून त्याला ही पदवी मिळाली असावी. ख्रिस्ती नव्हते अशानाच त्याचा केवळ प्रबळ विरोध होता असें नव्हे; तर ख्रिस्ती लोकांतही त्याच्या कल्पनेप्रमाणें जुन्या–सनातन–मताचे जे नव्हते, त्यांच्यावरही तो तितकाच कडक हात चालवीत असे. त्याला पसंत नाहीं असें कोणतेंही मत किंवा धर्म यांना तो मुळींच थारा देत नसे. या थिओडोसियसनें काहीं काळ पूर्व आणि पश्चिम, दोन्ही रोमन साम्राज्यें एकत्र केलीं होतीं व दोहोंचाही तो एकटाच बादशहा झाला होता. रोमवर रानटी लोकांचे हल्ले सुरू होण्यापूर्वींची, इ. स. ३९२ मधली ही हकिकत.

यापुढें ख्रिस्ती धर्माचा प्रसार वाढतच राहिला. यापुढें त्याला ख्रिस्ती नव्हते अशांशीं झगडावें लागलें नाहीं; तर जे झगडे झाले, ते सगळे ख्रिस्ती धर्मांतीलच निरानिराळ्या पंथांचे आपापसांत झाले. या पंथांनीं परस्परांबद्दल जें असहिष्णुत्व दाखविलें, तें पाहून काय म्हणावें कांहीं समजत नाहीं. सर्व उत्तर आफ्रिका व पश्चिम

आशिया येथें आणि यूरपमध्येंही त्यांनीं रणमैदानें उघडलीं; आणि त्यांवर तरवारींचे घाव व दंड्यांचे तडाखे या व अशासारख्या मतपरिवर्तनाच्या अत्यंत मृदु साधनांनीं ख्रिस्ती लोकांनीं आपल्या या ख्रिस्ती धर्मबांधवांना खऱ्या धर्माचें सत्यस्वरूप समाजावून देण्याचें कार्य चालू केलें!

यानंतर इ. स. ५२७ पासून ५६५ पर्यंत जस्टिनियन हा कॉन्स्टान्टिनोपलचा बादशहा होता. नुकतेंच मीं तुला सांगितलें, कीं त्यानें गॉथ लोकाना इटलींतून घालवून लाविलें आणि कांहीं काळपर्यंत इटली आणि सिसिली हे देश पूर्व रोमन साम्राज्यांत सामील झाले. पुढें कांहीं काळानें गॉथ लोकांनीं पुन्हां इटली देश काबीज केला.

जस्टिनियननें कॉन्स्टान्टिनोपल येथील अतिसुंदर असें सॅक्टा सोफायाचें कॅथेड्रल, बिशपचें पीठ असणारें मंदिर, बांधलें. बायझंटाइन पंथाच्या मंदिरांत हें एक अत्यंत मनोहर मंदिर आहे. तसेंच जस्टिनियननें त्या काळचे सर्व कायदेकानू एकत्र करविले आणि चांगल्या वाकबगार कायदेपंडितांकडून त्यांची विषयवार नीट जुळणी केली. पूर्व रोमन साम्राज्य आणि बादशहा यांचा इतिहास वाचण्याच्या आधीं पुष्कळ दिवस मला जस्टिनियनचें नांव माहीत झालेलें होतें, तें त्याच्या या कायद्याच्या ग्रंथावरून. या पुस्तकाचें नांव इन्स्टिट्यूटस् ऑफ जस्टिनियन, जस्टिनियनचे कायदे, असें असून तें मला माझ्या अभ्यासक्रमांत वाचणें भाग झालें होतें. परंतु इकडे कॉन्स्टांटिनोपलमध्यें जरी जस्टिनियननें एक विद्यापीठ स्थापन केलें, तरी अथेन्समधील प्लेटोनें स्थापन केलेली ॲकॅडमी किंवा तत्त्वज्ञानाच्या प्राचीन शाळा, ज्या आतां जवळजवळ हजार वर्षांपासून चालू होत्या, त्या मात्र त्यानें बंद केल्या. अंधश्रद्धेवर आधारलेल्या कोणत्याही धर्माला तत्त्वज्ञान हें फार भयंकर वाटतें; कारण तें लोकांना स्वतंत्र विचार करावयास शिकवीत असतें.

अशा रीतीनें सहाव्या शतकापर्यंत आपण येऊन पोंचलों. या दरम्यान रोम आणि कॉन्स्टान्टिनोपल एकमेकांपासून दूर दूर होत गेल्याचें आपण पाहिलें. रोमवर उत्तरेकडील जर्मनवंशीय टोळ्यांचा ताबा चालू लागला, तर कॉन्स्टान्टिनोपलचें नांव जरी रोमन साम्राज्य राहिलें, तरी तें वास्तविक ग्रीक साम्राज्याचेंच एक केंद्र होऊन गेलें; इकडे रोम पार मोडून तोडून पडलें आणि वैभवकाळीं ज्या लोकांना तें रानटी म्हणत असे, त्या आपल्या विजेत्यांच्याच सुधारणेपर्यंत खालीं घसरून जगण्याइतकी रोमची अधोगति झाली; तर तिकडे कॉन्स्टान्टिनोपलनें मात्र जुनी परंपरा एक प्रकारें टिकविण्याचा प्रयत्न केला; अर्थात् सुधारणेच्या शिखरावरून तेथेंही हळूहळू घसरगुंडी सुरू झालीच होती. ख्रिस्ती धर्मपंथ नंतर आपापसांत वर्चस्वासाठीं झगडूं लागले; आणि थेट तुर्कस्तान, चीन, ॲबिसिनियापर्यंत पसरलेला पूर्वेकडील ख्रिस्ती धर्म रोम व कॉन्स्टान्टिनोपल या दोन्ही साम्राज्यांपासून फुटून अलग पडला. यापासून या वेळीं तमोयुगाला सुरुवात झाली. हा काळ सुरू होण्याच्या पूर्वी अध्ययन, विद्यार्जन म्हणजे पूर्वींच्या महान् ग्रंथांचें वाचन, असा क्रम चालू होता. हे ग्रंथ ग्रीक भाषेंत किंवा ग्रीक

भाषेपासून निर्माण झालेल्या प्राचीन लॅटिन भाषेंत असत. परंतु देवादिकांचीं वर्णनें असलेले किंवा तत्त्वज्ञानाची चर्चा असलेले हे प्राचीन ग्रीक ग्रंथ हे त्या पहिल्या काळच्या श्रद्धाळू, धर्मनिष्ठ आणि असहिष्णु ख्रिस्ती लोकांना वाचण्यास योग्य ग्रंथ नव्हेत, असें वाटूं लागलें. म्हणून त्यांच्या अध्ययनाला प्रोत्साहन मिळेनासें झालें. त्यामुळें विद्यार्जनाला ओहोटी लागली ; तशीच कितीएक प्रकारच्या कलांनाही ओहोटी लागली.

अर्थात् ख्रिस्ती धर्मानेंही विद्या आणि कला यांचें संरक्षण करण्याचा थोडाफार प्रयत्न आपल्या परीनें केलेला आहे. बुद्धाच्या संघाच्या धर्तीवर त्यांनीं मठ स्थापिले; अशा मठांचा प्रसार फार त्वरेनें झाला. या मठातून प्राचीन विद्यांना केव्हां केव्हां स्थान मिळे. आणि पुढें पुष्कळ शतकांनंतर जी एक नवीन कलेची परंपरा बहराला येऊन सौंदर्यानें प्रफुल्लित झाली, तिची प्रारंभींचीं बीजेंही मठांतूनच पेरलीं गेलीं. विद्या आणि कला यांचा दीप त्या मठवासी भिक्षूंनीं जेमतेम कसाबसा तेवत ठेवला. तो दीप अजिबात मालवूं न देण्यांत त्यांनीं मानवी समाजाची मोठीच सेवा केली हें खरें. पण हा दीप त्यांनीं अगदींच संकुचित क्षेत्रात कोंडून ठेवला. बाहेर मात्र सगळीकडे पूर्ण अंधारच पसरून राहिला.

ख्रिस्ती धर्माच्या त्या पहिल्या काळांत आणखी एक मोठी प्रवृत्ति निर्माण झाली होती. धर्मनिष्ठेनें भारलेले पुष्कळ लोक समाज सोडून दूर दूर जेथें मनुष्याचें वारें देखील फिरकणार नाहीं अशा निर्जन अरण्यांत किंवा निवांत ठिकाणीं जाऊन राहत आणि तेथें अगदींच असुधारलेलें, पशुवत् जीवन घालवीत. स्वतःच्या शरीराचे हाल करीत. स्नान मुळींच करीत नसत. आणि जितकें म्हणून दुःख सहन करवेल, तितकें सहन करीत. ईजिप्तमध्यें हीच प्रथा चालू होती; तेथें निर्जन मैदानामध्यें असे पुष्कळ वनवासी लोक राहत असत. त्यांची अशी कल्पना दिसते, कीं आपण जितके अधिक कष्ट सहन करूं आणि शरीराची स्वच्छता जितकी कमी ठेवूं, तितकें आपल्याला अधिक पुण्य लागेल! हळूहळू हे वनवासी लोक नाहींसे झाले. परंतु त्यानंतर पुष्कळ काळ धर्मनिष्ठ ख्रिस्ती लोकांची अशी श्रद्धा असे, कीं कोणत्याही प्रकारचा सुखोपभोग घेणें हें पाप आहे. या कष्ट सोसण्याच्या कल्पनेची छाया ख्रिस्त्यांच्या साऱ्या समाजप्रवृत्तीवर पडली. अर्थात् आजच्या यूरपांत या प्रकाराचा कांहीं मागमूस नाहीं. उलट, आज तेथें जो तो जणुं वेड्यासारखा सुखाच्या मागें धांव घेण्याशिवाय आणि जिवाची मुंबई करायची म्हणून ज्याला म्हणतात, तसें जविन घालविण्याशिवाय दुसरें कांहीं ओळखीतच नाहींसा झाला आहे.

परंतु हिंदुस्थानमध्यें आजही कांहीं लोक कधीं कधीं ईजिप्तमधील हे ख्रिस्ती प्रवासी लोक वागत त्याप्रमाणें कांहीं अंशीं वागतांना आढळतात. कोणी एक हात उचलून धरतो; अशा रीतीनें, कीं शेवटीं तो सुकून लाकडासारखा निर्जीव होऊन जातो; कोणी अणकुचीदार भाल्याच्या टोंकावरच बसतो. असे कोणी कांहीं कोणी कांहीं पुष्कळ विचित्र आणि मूर्खपणाचे प्रकार करीत असतात. कोणी कोणी या गोष्टी

केवळ अज्ञानी लोकांच्या भावना झुलवून त्यांच्या मनांत आपल्याबद्दल भ्रामक निष्ठा उत्पन्न करून पैसे उपटण्याच्या बुद्धीनें करीत असतात; तर कांहीं लोक आपणांस पुण्य लागेल या बुद्धीनें तें करतात. त्यांची अशी समजूत असावी, कीं कोणत्याही प्रकारची नीट चांगली हालचाल करायला शरीर असमर्थ करणें, हीच एक मोठी इष्ट गोष्ट आहे!

येथें मला बुद्धाची एक गोष्ट आठवते; आपला जुना दोस्त ह्युएन चँग याच्याकडे या गोष्टीसाठीं आपल्याला जायला हवें आहे. बुद्धाचा एक तरुण शिष्य तप करीत होता. बुद्धानें त्याला विचारलें, "अरे प्रिय तरुण मनुष्या, तूं जेव्हा संसार करीत होतास तेव्हां तुला वीणा वाजविता येत असे काय?" त्यानें उत्तर दिलें, "होय, येत असे." "तर मग" बुद्ध म्हणाला, "यावरून मला एक दृष्टांत सुचतो. वीणेच्या तारा जेव्हां अतिशय ताणलेल्या असतील तेव्हां त्यांतून मंदमृदु ध्वनी निघूं शकत नसतील. तारा जेव्हां अतिशय सैल असतील तेव्हां त्यांतून निघणाऱ्या ध्वनीत स्वरसंगति किंवा माधुर्य निर्माण होत नसेल. परंतु तारा फार ताणलेल्या नाहींत किंवा फार सैलही नाहींत, अशा स्थितींत ध्वनीमध्यें उत्कृष्ट लय निर्माण होत असेल. त्याचप्रमाणें" बुद्धदेव पुढें म्हणाले, "शरीराचेंही आहे. त्याला कष्ट दिले तर तें श्रांत होतें आणि मन स्थिर राहत नाहीं. त्याला अत्यंत मृदु वागविलें तर त्याच्या ठिकाणच्या वासना लाडावून माजतात आणि माणसाची इच्छाशक्ति दुर्बल होते."

## ४८

## इस्लामचा उदय

२१ मे, १९३२

आतांपर्यंत आपण पुष्कळ देशांच्या इतिहासाचा विचार केला. कितीएक राजांचे आणि राज्यांचे उत्कर्षापकर्ष पाहिले. पण आपल्या गोष्टींत अरबस्तानला कांहीं अजून जागा मिळाली नाहीं. या देशांतून दर्यावर्दी खलाशी आणि व्यापारी जगांत दूरदूरच्या प्रदेशांत जात असत, एवढाच फार तर आपण एकदोन वेळां त्याच्याविषयीं उल्लेख केला. आतां जरा नकाशा पाहा. या देशाच्या पश्चिमेला ईजिप्त आहे; उत्तरेला सीरिया आणि इराक; आणि त्यांच्या थोडे पूर्वेला पार्शिया उर्फ इराण; वायव्येला जरा पलीकडे आशिया मायनर आणि कॉन्स्टान्टिनोपल. ग्रीसही कांहीं येथून फार दूर नाहीं. आणि या इकडच्या बाजूला समुद्र ओलांडला, कीं समोरच हिंदुस्थान आहे. एक चीन आणि आशियाच्या अतिपूर्वेकडील भाग सोडला, तर अरबस्तान हें प्राचीन सुधारलेल्या जगाच्या अगदीं ऐन मध्यभागींच होतें. इकडे इराकमधील तैग्रीस आणि युफ्रेटीस नद्यांच्या कांठीं मोठालीं शहरें उदयास आलेलीं होतीं. तर ईजिप्तमध्यें ॲलेक्झांड्रिया,

सीरियामध्यें दमास्कस आणि आशिया मायनरमध्यें अँटिऑक, हीं शहरें भरभराटलीं होतीं. आरबी लोक हे जात्याच व्यापारी आणि प्रवासकुशल असल्यामुळें या शहरामध्यें त्यांना वारंवार जाण्याचा प्रसंग आला असावा. असें असूनसुद्धां त्या काळच्या इतिहासांत अरबस्तानकडून म्हणण्यासारखें कांहींच घडलेलें दिसत नाहीं. शेजारच्या देशांतल्याइतकी उच्च सुधारणाही या देशांत उत्पन्न झालेली दिसत नाहीं. त्यानें इतर कोठले देश पादाक्रांत करण्याचा प्रयत्न केला नाहीं आणि त्याचा पाडाव करणेंही कोणाला साधलें नाहीं.

अरबस्तान हा वालुकामय मैदानांचा प्रदेश आहे. पर्वत आणि वालुकामय मैदानें यांमध्यें वाढणारीं माणसें हीं स्वभावतःच स्वातंत्र्यप्रिय असतात आणि तीं सहसा कोणाच्या काबूंत जात नाहींत. तसेंच हा कांहीं मोठा संपन्न देशही नव्हता. त्यामुळें परकीय विजेत्यांना किंवा साम्राज्यवाद्यांना त्याचें आकर्षण वाटावयाला कांहीं विशेष कारण नव्हतें. त्यामध्यें नांव घेण्यासारखीं दोनच लहान लहान शहरें होतीं; मक्का आणि समुद्राच्या कांठावरील येथ्रीब. बाकी मग वालुकामैदानांत इकडे तिकडे पसरलेल्या वसत्या मात्र होत्या. त्यांत राहणारे बहुतेक सारे लोक हे बेदुई किंवा बद्दू लोकच होते. या नांवाचा अर्थच मुळीं निर्जन-प्रदेशवासी लोक असा आहे. त्यांचे नित्याचे सहचर म्हणजे जलद चालीचे उंट आणि सुंदर घोडे. गाढव हा प्राणीही त्यांचा मोठा सच्चा दोस्त होता. त्याच्या त्या निःसीम कष्टाळूपणामुळें त्याची त्यांना फारच किंमत वाटे. गाढवाची किंवा खेचराची उपमा म्हणजे या देशांत एक स्तुतीचा प्रकार असे. इतर देशांतल्याप्रमाणें त्यांत निंदाव्यंजक असें कांहींच नव्हतें. कारण वालुकामय मैदानांच्या प्रदेशात जीवन फार बिकट असतें; त्यामुळें शक्ति आणि कष्ट सहन करण्याची ताकद, हे गुण इतर ठिकाणापेक्षां येथें तर फारच किमतीचे वाटत असतात.

वालुकामय प्रदेशांतील हे रहिवासी मोठे अभिमानी, भावनाप्रधान, नाजुक मनाचे आणि तंटेखोर होते. आपल्या कुटुंबाला व कुळाला ते धरून राहत व इतर कुटुंबांशीं व कुळांशीं झगडत. वर्षांतून एकदां ते आपसातील सर्व भांडणें बाजूस ठेवून एक होत आणि त्यांचे अगणित देव ज्या ठिकाणीं ठेवलेले होते, त्या मक्केच्या यात्रेला ते सर्व जण मिळून जात. या देवदेवतांत सर्वांत अधिक भक्तिभावानें ते तेथील काबा नावाच्या प्रचंड शिळेची पूजाअर्चा करीत असत.

यांचेंही जीवन पशुधन घेऊन भटकणारांचेंच होतें. आणि कुटुंबप्रमुखाची आपापल्या कुटुंबापुरती सत्ता चालावयाची एवढ्याच प्रकारची त्यांची समाजव्यवस्था असे. शहरामध्यें जाऊन वसाहत करण्यापूर्वी आणि तेथील सुधारणेशीं समरस होण्या-पूर्वी मध्य आशियांतील किंवा इतर ठिकाणचें जीवन ज्या प्रकारचें होतें त्याच प्रकारचें हें जीवन होतें. अरबस्तानच्या समोंवार जीं मोठमोठीं साम्राज्यें उदयास आलेलीं होतीं, तीं आपापल्या साम्राज्यांमध्यें अरबस्तानची गणना करीत. परंतु ही गोष्ट नांवापुरतीच खरी होती. प्रत्यक्ष त्यांचें राज्य अरबस्तानवर कधींच प्रस्थापित झालें

नाहीं. या वालुकामय प्रदेशांतील भटकत्या टोळ्यांना जिंकणें किंवा त्यांवर अम्मल गाजविणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हती.

तुला आठवत असेल मीं सांगितलेलें, कीं एकदां सीरियामध्यें पामीरा येथें आरबांचें एक लहानसें राज्य उदयाला आलें होतें. इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत अगदीं थोडा काळपर्यंत त्याची चलती चालली होती. परंतु हें राज्यही खुद्द अरबस्तानच्या बाहेरच होतें. अशा स्थितींत शतकांमागून शतकें जात होतीं, तरी अरबस्तानच्या त्या वालुकामय प्रदेशांत या बेदुई लोकांची ही अशाच प्रकारची वस्ती चालू होती. त्यांचीं जहाजें व्यापारासाठीं दूर दूर जात असत; तथापि अरबस्तानमध्यें मात्र कांहींही बदल घडून आला नाहीं. कांहीं लोकांनीं तेथें ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला, तर कांहीं थोड्या लोकांनीं ज्यू धर्माचा अवलंब केला; परंतु बाकीचे बहुसंख्य लोक सगळे त्यांचे ते ३६० देव आणि तो काबाचा दगड यांची पूजाअर्चा करणारेच राहिले.

अशा रीतीनें युगानुयुगें हे आरबी लोक एक प्रकारचें निद्रिस्त जीवन कंठीत आले होते; बाहेरच्या जगांत ज्या घडामोडी चाललेल्या होत्या त्यांचें जणुं वारेंसुद्धां त्यांच्यावरून जात नव्हतें. असे हे लोक एकाएकीं जागे झाले आणि साऱ्या जगाला चकित करून टाकण्यासारखी, जगाच्या इतिहासाचा ओघ पालटून टाकण्यासारखी, प्रचंड शक्ति त्यांच्या अंगीं दिसून आली, ही केवढी चमत्काराची गोष्ट आहे. आरबांचा यानंतरचा इतिहास, ते झपाट्यानें आशिया, यूरप आणि आफ्रिका या तिन्ही खंडांत कसे पसरले आणि उच्च प्रकारची संस्कृति आणि सुधारणा त्यांनीं कशी निर्माण केली ही सारीच घटना, म्हणजे एक जगांतलें मोठेंच आश्चर्य आहे.

आरबी लोकांना जागृत करून त्यांच्या ठिकाणीं आत्मविश्वास आणि सामर्थ्य प्रफुल्लित करणारी शक्ति म्हणजे इस्लामधर्म. हा धर्म महमद नांवाच्या नवीनच उदयास आलेल्या प्रेषितानें, पैगंबरानें सुरू केला. महमदाचा जन्म मक्का येथें इ. स. ५७० मध्यें झाला. परंतु त्यानें हा धर्म तारुण्याच्या उतावीळपणांत किंवा अविचारानें स्थापला नाहीं. तो आपला उद्योगधंदा संभाळून साधेपणानें शांत जीवन कंठीत होता. आजूबाजूच्या लोकांचें त्याच्यावर प्रेम होतें, आणि त्याच्यावर त्यांचा विश्वासही होता; नव्हे, त्याचें नांवच लोकांनीं 'अल्अमीन' म्हणजे विश्वासू असें ठेवलें होतें. परंतु त्यानें जेव्हां आपल्या नवीन धर्माचा उपदेश करावयाला सुरुवात केली, विशेषतः मक्का येथील मूर्तींच्या विरुद्ध जेव्हां त्यानें प्रचार चालू केला, त्या वेळीं लोकांचा त्याच्याविरुद्ध फार मोठा आरडाओरडा सुरू झाला आणि शेवटीं लोकांनीं त्याला मक्केंतून हांकलून लावलें. जेमतेम जीव घेऊन त्याला तेथून पळून जावें लागलें. त्याच्या उपदेशांत सर्वांत मोठा भर यावर होता, कीं परमेश्वर फक्त एकच आहे आणि मी महमद त्या परमेश्वराचा प्रेषित—पैगंबर आहें.

आपल्याच लोकाकडून अशा रीतीनें मक्केंतून हांकलला गेल्यानंतर महमद येथ्रीब येथील आपल्या कांहीं मित्रांच्या आणि साहाय्यकांच्या आश्रयाला जाऊन राहिला.

मक्केमधून केलेल्या या पलायनाला आरबी भाषेत हिजरात असें म्हणतात. आणि मुसलमानी कालगणना या तारखेपासून म्हणजे इ. स. ६२२ पासून सुरू होते. ही हिजरी कालगणना चांद्रवर्षीय आहे. म्हणजे चंद्राच्या गतीप्रमाणें त्यांचे महिने व वर्षें हीं ठरत असतात. आपण सामान्यतः सौर वर्षमान अवलंबीत असतों. त्याच्या मानानें हें चांद्र वर्ष पांचसहा दिवसांनीं लहान असतें. त्यामुळें वर्षाचे निरनिराळे ऋतू हिजरी शकाच्या नेमक्या त्याच त्या महिन्यांत येत नाहींत. त्यांचा एक महिना या वर्षी ऐन थंडींत असेल, तर पुढें कांहीं वर्षांनीं त्याच महिन्यात भर उन्हाळा असेल.

खरोखर इस्लामधर्माचा उदय एका अर्थी थोडासा आधींच झालेला असला, तरी त्याची सुरुवात या पलायनापासून, इ. स. ६२२ मधील हिजरातीपासून झाली, असें धरून चालण्यास हरकत नाहीं. येथ्रीब शहरामध्यें महमदाला आश्रय मिळाला; त्याच्या तेथें येण्याची पुण्यस्मृतीची खूण म्हणून येथ्रीबचें नाव बदलून त्याला "मदीनत्–उन–नबी" म्हणजे प्रेषिताची किंवा पैगंबराची नगरी असें नवीन नांव ठेवण्यांत आलें. आतां हल्लीं त्यालाच थोडक्यांत मदीना असें म्हणतात. मदीनांतील ज्या लोकांनीं महमदाला मदत केली, त्यांना अन्सार म्हणजे साहाय्यक असें म्हणतात. या साहाय्यकांच्या वंशजांना ही पदवी मोठी मानाची वाटते आणि आजच्या घटकेलाही ते तिचा उपयोग करतात.

इस्लामधर्म आणि आरबी लोक यांच्या यापुढील दिग्विजयाच्या वृत्तांताला हात घालण्यापूर्वी आपण जरा किंचित् आजूबाजूला नजर टाकूं या. आपण पाहिलेंच आहे नुकतें, कीं या सुमारास रोमची धूळधाण होऊन गेलेली होती; प्राचीन ग्रीक आणि रोमन लोकांची संमिश्र सुधारणा विलयाला गेली होती आणि तिच्या आधारावर उभी असलेली सगळी समाजरचना उलथीपालथी झाली होती. उत्तर यूरपमधील टोळ्या आणि वंश आतां हळूहळू महत्त्वाला चढूं लागले होते. रोमपासून कांहीं कांहीं गोष्टी घेण्याचा जरी त्यांनीं क्रम ठेवला होता, तरी खरोखर ते अगदींच नवीन प्रकारची सुधारणा व संस्कृति निर्माण करीत होते. अर्थात् आतांशा नुकती कोठें या प्रकाराची सुरुवात झाली होती. अद्याप त्याला कांहीं तसें रंगरूप आलेले दिसूं लागलें नव्हतें. अशा रीतीनें जुनें सर्व नष्ट झालें होतें; पण त्याची जागा नव्यानें अजून भरून काढली नव्हती. त्यामुळें सर्व यूरपभर अंधकार पसरलेला होता. यूरपच्या पूर्व टोंकाला पूर्वेकडील रोमन साम्राज्य अद्यापि भरभराटींत होतें हें खरें. कॉन्स्टान्टिनोपल शहर हें यूरपमधील अजूनही सर्वांत मोठें शहर होतें. अजूनही त्याला तेथें फार महत्त्व होतें. अजूनही त्याचें ऐश्वर्य व वैभव कमी झालें नव्हतें. तेथील अर्धवर्तुळाकृति क्रीडांगणामध्यें, रंगभूमीमध्यें खेळ आणि शर्यती अजूनही चालू होत्या; आणि थाटमाट, डामडौल यांच्यामध्यें अजून एवढीही उणीव नव्हती. तरी पण याही साम्राज्याचें सामर्थ्य मात्र कमी होत होतें. त्याचीं इराणांतील सस्सन लोकांशीं सारखीं युद्धें चालूच होतीं. इराणचा बादशहा दुसरा खुशरू यानें कॉन्स्टान्टिनोपलच्या साम्राज्यातील प्रत्यक्ष कांहीं भाग जिंकून-

सुद्धां घेतला होता आणि अरबस्तानावर नावालाच का होईना पण आपलेंच स्वामित्व आहे, असें तो प्रतिपादूं लागला होता. पुढें खुशरूनें ईजिप्त देशही जिंकून घेतला व तो थेट कॉन्स्टान्टिनोपलवरही चालून गेला. परंतु तेथील ग्रीक बादशहा हेराक्लिअस यानें त्याचा त्या वेळीं पराभव केला. पुढें खुशरूचा खून प्रत्यक्ष त्याचा मुलगा कवाध यानेंच केला.

तेव्हा त्या सुमारास यूरपची आणि पूर्वेस इराणची हालहवाल कांहीं चांगली नव्हती. त्याच्याच जोडीला आणखी ते ख्रिस्ती धर्मपंथामधील झगडे घ्या. त्यांना तर जणुं अंतच नव्हता मुळीं. पश्चिमेंत आणि आफ्रिकेमध्येंही जो ख्रिस्ती धर्मपंथ भरभराटींत होता, तो अतिशय तंटेखोर आणि लांचलुचपतखोर होता. इराणमध्यें झोरोॲस्ट्रियन धर्माला राजदरबारीं स्थान मिळून लोकांवर तो सक्तीनें लादला गेला होता. त्यामुळें यूरपमध्यें, आफ्रिकेंत किंवा इराणमध्यें काय, सर्व ठिकाणीं लोकांचा प्रचलित धर्मावरील विश्वास नाहींसा झालेला होता. याच सुमारास, सातव्या शतकाच्या सुरुवातीला सर्व यूरपभर मोठमोठ्या सांथींच्या रोगांच्या लाटांवर लाटा आल्या व लाखों माणसें मृत्युमुखीं पडलीं.

या सुमाराला हिंदुस्थानांत हर्षवर्धनाचें राज्य असून त्याच वेळीं ह्यूएन चँग इकडे येऊन गेला. हर्षाच्या अमदानींत हिंदुस्थान हें एक प्रबळ सत्ताधीश राज्य होतें. परंतु त्यानंतर लौकरच उत्तर हिंदुस्थानचे तुकडे पडले आणि तितके त्याचें सामर्थ्य कमी झालें. पलीकडे पूर्वेला महान् तंग वंशाचा अम्मल नुकताच सुरू झाला होता. इ. स. ६२७ मध्यें तै चुंग नांवाचा त्या घराण्यांतील एक अत्यंत सामर्थ्यवान् व श्रेष्ठ राजा गादीवर आला होता. आणि त्याच्या वेळींच चिनी साम्राज्य थेट पश्चिमेकडे कास्पिअन समुद्रापर्यंत जाऊन भिडलें होतें. मध्य आशियांतील बहुतेक राज्यांनीं त्याचें सार्वभौमत्व मान्य करून त्याला खंडणी देण्यास सुरुवात केली होती. मात्र या सर्व प्रचंड विस्ताराच्या साम्राज्याची मिळून एकच अशी एखादी प्रबळ मध्यवर्ती सत्ता त्या वेळींही निर्माण झालेली नसावी.

इस्लामधर्म उदयाला आला त्या वेळीं आशियामधील आणि यूरपातील जगाची अवस्था ही अशी होती. चीन देश सामर्थ्यवान् आणि सत्ताधीश होता. पण अरबस्तानापासून तो फारच दूर होता. हिंदुस्थान पुष्कळ सामर्थ्यवान् होता; परंतु आपल्याला दिसेलच पुढें, कीं पुष्कळ काळपर्यंत इस्लामधर्मीयांचा हिंदुस्थानशीं झगडा होण्याचा प्रसंगच आला नाहीं. राहिलीं यूरप व आफ्रिका खंडें; तीं मात्र दुर्बळ होतीं, थकून जाऊन त्यात त्राण उरलें नव्हतें.

पळून गेल्यानंतर सात वर्षांच्या आंतच महमदानें मक्केंत मक्केचा स्वामी म्हणून प्रवेश केला. त्यापूर्वींच मदीना येथूनच त्यानें जगामधील राजे लोकांना आणि राज्यकर्त्यांना एकच परमेश्वर आणि त्याचा प्रेषित यांना मान्यता देण्याबद्दल आज्ञापत्र पाठविलें होतें. सीरिआमध्यें इराणी लोकांविरुद्ध केलेल्या स्वारींत गुंतलेला असतांनाच

कॉन्स्टान्टिनोपलचा बादशहा हेराक्लिअस याला हें आज्ञापत्र मिळालें; इराणच्या राजालाही तें पोंचलें. चीनचा बादशहा तै चुंग यालाही तें मिळालें होतें म्हणतात. हे सर्व राजे आणि महाराजे, त्यांना किती आश्चर्य वाटलें असेल नाहीं. कीं अशा रीतीनें आपल्याला आज्ञा करण्याचें साहस करणारा, ज्याचें नांवसुद्धा कधीं कोणीं ऐकिलें नाहीं असा कुठला, कोण हा मनुष्य! महमदानें असे हे संदेश पाठविले यावरून त्याला स्वतःविषयीं आणि आपल्या कार्याविषयीं केवढा निरतिशय विश्वास असला पाहिजे, याची आपल्याला थोडीशी कल्पना येते. हाच विश्वास, हीच श्रद्धा त्यानें आपल्या लोकांमध्येंही निर्माण केली, आणि या श्रद्धेमुळें उत्पन्न होणाऱ्या उत्साहाच्या आणि समाधानाच्या बळावर, वालुकामय प्रदेशांतील आतांपर्यंत अगदींच क्षुद्र असलेल्या अशा त्या लोकांनीं तोंपर्यंत ज्ञात झालेल्या जगापैकीं अर्धा भाग जिंकून घेण्यांत यश मिळविलें.

आत्मप्रत्यय आणि आत्मविश्वास या गोष्टी मुळांत कांहीं कमी प्रभावी नव्हत्या. परंतु त्यांच्या जोडीला आणखी इस्लामधर्मानें त्या लोकांना बंधुभावनेची, जे जे कोणी मुसलमान असतील ते सर्व सारखे असल्याची शिकवण दिली. अशा रीतीनें लोकांच्या-पुढें लोकशाहीचा थोडासा अंशच ठेवण्यांत आला. लांचलुचपतीनें भरलेल्या त्या काळच्या ख्रिस्ती धर्मापेक्षां या बंधुभावनेच्या शिकवणीचा लोकांच्या मनावर फारच मोठा परिणाम झाला असला पाहिजे. केवळ आरबी लोकांच्या मनावरच नव्हे, तर ज्या अनेक देशांमध्यें ते गेले तेथील रहिवाशांच्या मनावरही हा परिणाम झाला असला पाहिजे.

हिजरातीनंतर दहा वर्षांनीं इ. स. ६३२ मध्यें महमद मरण पावला. एवढ्या अवधींतच आपापसांत लढणाऱ्या अरबस्तानांतील अनेक टोळ्यांचें एकजीव राष्ट्र बनविण्याचें कार्य त्यानें तडीस नेलें आणि त्या लोकांच्या अंतःकरणांत कार्याविषयीं, ध्येयाविषयीं उत्साह प्रज्वलित केला. त्याच्या पाठोमागून त्याच्याच कुटुंबांतील अबू बकर हा खलीप किंवा कलीफ, म्हणजेच नायक झाला. खलिफाच्या पदावर कोणीं यावयाचें हें एक प्रकारें सार्वजनिक सभेंत साधारणपणें लोकमत अजमावून ठरविण्याची पद्धत होती. दोन वर्षांतच अबू बकर मरण पावला. त्याच्यानंतर उमर हा खलिफा होऊन दहा वर्षे जगला.

अबू बकर आणि उमर हे फार श्रेष्ठ पुरुष होऊन गेले. अरबस्तानच्या आणि इस्लामधर्माच्या श्रेष्ठतेचा त्यांनीं पाया घातला. खलिफा या नात्यानें त्यांच्याकडे देशाचें धार्मिक पुढारीपण होतें आणि राजकीय पुढारीपणही होतें; म्हणजे खलिफा हा राजाही होता आणि धर्मगुरूही (पोप किंवा शंकराचार्य) होता. खलिफाचें मोठें स्थान त्यांना लाभलेलें होतें; त्यांच्या राज्याचें सामर्थ्यही वाढत होतें; तरी पण त्यांनीं आपली साधीसुधी राहणी सोडली नाहीं आणि डामडौल व विलास यांना बिलकुल थारा दिला नाहीं. इस्लामधर्मांतील समानतेचें तत्त्व त्यांनीं आपल्या जीवनात सतत जागतें ठेवलें होतें. परंतु त्यांचे अधिकारी आणि अमीरउमराव यांनीं मात्र लौकरच रेशमी वस्त्रें

परिधान करण्याला आणि उपभोगण्यास सुरुवात केली; आणि अबू बकर व उमर यांनीं त्यांची या त्यांच्या उधळपट्टीबद्दल व ऐषआरामाबद्दल निर्भर्त्सना कशी केली, अधिकाऱ्यांना शिक्षा कशा केल्या आणि केव्हां केव्हां त्यांना त्याबद्दल रडूंसुद्धां कसें आलें, यांबद्दलच्या कितीएक गोष्टी त्या लोकांत प्रचलित आहेत. त्या दोघांचीही भावना अशी होती, कीं आपलें खरें सामर्थ्य साध्या आणि कष्टाच्या राहणींतच आहे आणि आरबी लोकांनीं जर इराणच्या किंवा कॉन्स्टान्टिनोपलच्या राजदरबारांतील विलासी राहणी उचलली तर त्याच्या जीवनाला कीड लागून तें अवनतीस जाईल.

अबू बकर आणि उमर यांचा अम्मल काय तो सारा बाराच वर्षें चालला. परंतु तेवढ्यांत आरबी लोकांनीं यूरपमधील पूर्वेकडील रोमन साम्राज्य आणि इराणमधील ससन लोकाचा राजा या दोघांचाही पाडाव केला. ज्यू आणि ख्रिस्ती लोकांची पवित्र भूमि जें जेरूसलेम शहर, तेंही त्यांनीं व्यापलें आणि सीरिया, इराक व इराण हे प्रदेशही नवीन आरबी साम्राज्यामध्यें समाविष्ट झाले.

## ४९

## आरबी लोक स्पेनपासून मंगोलियापर्यंतचा प्रदेश जिंकतात

२३ मे, १९३२

इतर कांहीं धर्मांच्या संस्थापकांप्रमाणें महमद हाही पुष्कळशा प्रचलित सामाजिक चालीरीतींविरुद्ध बंड पुकारणारा गृहस्थ होता. त्याच्या आजूबाजूच्या देशांमधील सामान्य जनता किती तरी काळपर्यंत अनियंत्रित सत्ताधीश राजे आणि त्याच्याइतकेच अनियंत्रित आणि अधिकाराच्या उन्मादानें भरलेले धर्मगुरू, यांच्या जुलमाखालीं पिचून निघालेली होती. त्यामुळें महमद उपदेशीत असलेल्या धर्मांतील साधेसुधेपणा आणि त्याच्यांतील व्यक्तिस्वातंत्र्य व समता यांचा आस्वाद, यांमुळें त्या धर्माचा त्या लोकांच्या मनावर अनुकूल परिणाम झाला. जुन्या जमान्याला हे लोक कंटाळलेले असून नव्याचा स्वीकार करावयाला त्यांची मनोभूमि अगदीं तयार झालेली होती. इस्लामधर्मानें त्यांना नवा जमाना प्राप्त करून दिला आणि त्यांना तो हितकरही वाटला; कारण त्यामुळें त्यांच्यामधील कितीएक जुन्या अनिष्ट रूढी नष्ट झाल्या आणि कितीएक दृष्टींनीं त्यांच्या स्थितींत सुधारणा झाली. जिच्यामुळें सर्वसामान्य जनतेची पिळणूक बऱ्याचशा मोठ्या प्रमाणांत नाहींशी व्हावी, अशी मोठी सामाजिक क्रांति कांहीं इस्लाम-धर्माच्या मागोमाग घडून आली नाहीं. परंतु मुसलमानांच्यापुरती तरी ही पिळणूक इस्लामधर्मानें अवश्य कमी केली आणि आपण सर्व एका मोठ्या प्रबळ कुटुंबाचे घटक आहोंत, अशा प्रकारची भावना या धर्माच्या लोकांच्या मनात उत्पन्न झाली.

आणि मग आरबी लोक विजयामागून विजय मिळवीत पुढें चालले. कितीएकदा तर लढल्याशिवायच पुष्कळ प्रदेश त्यानीं जिंकले. त्यांच्या पैगंबराच्या मृत्यूपासून पंचवीस वर्षांच्या आंतच त्यांनीं एका बाजूला इराण, सीरिया आणि आर्मीनिया हे सबंध देश आणि मध्य आशियाचा थोडासा भाग हे प्रदेश कबजांत घेतले आणि दुसरीकडे पश्चिमेस सबंध ईजिप्त देश आणि उत्तर आफ्रिकेचा कांहीं भाग त्यांच्या कबजांत आला. ईजिप्त देश त्यांच्या हातांत पडावयाला त्यांना जवळजवळ कांहींच परिश्रम पडले नाहींत. कारण रोमन साम्राज्याकडून होणारी पिळणूक आणि निरनिराळ्या ख्रिस्ती धर्मपंथीयांमधील झगडे, यांमुळें ईजिप्त देश सर्वांत अधिक त्रस्त झालेला होता. आरबी लोकांनीं ॲलेक्झांड्रिया येथील ग्रंथालय जाळून टाकलें अशी एक कथा प्रचलित आहे. परंतु ही गोष्ट खोटी आहे असेंच आतां सिद्ध होत आहे. आरबी लोकांची ग्रंथावर इतकी मोठी भक्ति होती, कीं त्यांच्या हातून हा असला रानटी अत्याचार होणेंच शक्य नाहीं. उलटपक्षीं, खरा प्रकार बहुधा असा असावा, कीं कॉन्स्टान्टिनोपलचा बादशहा थिओडोसिअस–याच्याबद्दल मागें थोडेंसें मीं तुला सांगितलें आहे– यानें हें ग्रंथालय, निदान त्यांतला कांहीं भाग जाळण्याचें दुष्कृत्य केलें. त्या ग्रंथालयापैकीं कांहीं भाग पुष्कळ पूर्वी ज्यूलिअस सीझरनें ॲलेक्झांड्रियाला वेढा घातला त्याच वेळीं नष्ट करून टाकण्यांत आला होता. जुन्या ग्रीक पौराणिक कथा आणि ग्रीक तत्त्वज्ञान याबद्दलचे ग्रीक भाषेतील मूर्तिपूजावादी ग्रंथ थिओडोसिअसला मुळींच पसंत नव्हते; इतकें त्याचें ख्रिस्ती धर्मप्रेम अत्यंत कडवें होतें. त्यामुळे त्यानें आपल्या स्नानगृहांतील पाणी तापविण्याकरितां ॲलेक्झांड्रियाच्या ग्रंथालयांतील ग्रंथांचा उपयोग केला असें सांगतात.

आरबी लोक पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे सारखे पसरतच चालले. पूर्वेकडे हिरात, काबूल आणि बलख याचा पाडाव करून ते सिंधु नदी आणि सिंधपर्यंत जाऊन पोंचले. परंतु त्याच्यापलीकडे मात्र त्यांनीं हिंदुस्थानमध्ये आंत प्रवेश केला नाहीं आणि पुढें कितीएक शतकें हिंदुस्थानांतील राज्यकर्त्यांशीं त्यांचे संबंध अत्यंत सख्यत्वाचे होते. पश्चिमेकडे मात्र त्यांचा मोर्चा सारखा पुढेंच जात राहिला. असें सांगतात, कीं त्यांचा एक सेनापति उक्बा ( Okba ) हा सर्व उत्तर आफ्रिका ओलांडून आज जो देश मोरोक्को म्हणून ओळखला जातो त्याच्या पश्चिम किनाऱ्यावर ॲटलांटिक महासागरापाशीं जाऊन ठेपला. आपल्या मार्गांत समुद्राची ही अडचण पुढें उभी राहिलेली पाहून त्याला फार वाईट वाटलें; तरी पण समुद्रांत जितकें आंत जातां येईल तितका तो घोड्यावरून गेला आणि नंतर मग अत्यंत खिन्नतापूर्वक परमेश्वराला (अल्लाला) म्हणाला, "हे अल्ला, तुझ्या नांवानें जिंकण्यासाठीं मला आतां यापुढे जमीनच शिल्लक राहिली नाहीं, त्याला आता मी काय करूं?"

मोरोक्को आणि आफ्रिका यांमधून मग आरबी लोक वरचा निरुंद समुद्र ओलांडून यूरपमध्यें स्पेनच्या भूमीवर उतरले; या ठिकाणच्या अरुंद सामुद्रधुनीला ग्रीक

लोक प्राचीन काळीं हर्क्युंलसचे स्तंभ असें म्हणत असत. ही सामुद्रधुनी ओलांडून जो आरबी सेनापति गेला तो प्रथम जिब्राल्टर येथें उतरला. त्याच्या नांवावरूनच जिब्राल्टर हें नांव निघालेलें आहे. त्याचें नांव तरीक असें असून त्यावरून जिब्राल्टरचें खरें मूळचें नांव जबल-उत्-तरीक – तरीकचा खडक – असें ठेवण्यांत आलें होतें.

स्पेनचा अतिशय जलदीनें पाडाव झाला आणि मग आरबी लोकांचा लोंढा दक्षिण फ्रान्समध्यें घुसला. अशा रीतीनें महमदाच्या मृत्यूपासून सुमारें शंभर वर्षांत आरबी साम्राज्य दक्षिण फ्रान्स व स्पेनपासून थेट उत्तर आफ्रिकेतून सुएजपर्यंत आणि अरबस्तानच्या पलीकडे इराण, मध्य आशिया आणि मंगोलियाची सरहद्द येथपर्यंत पसरलें. एक सिंध सोडून हिंदुस्थानचा मात्र कोणताच भाग त्यात सामील नव्हता. यूरपवर आरबी लोकांचा हल्ला दोन बाजूंनीं चालू होता; एक समोरून कॉन्स्टान्टिनोपल-वर आणि दुसरीकडून आफ्रिका-मार्गानें फ्रान्सवर. दक्षिण फ्रान्समध्यें घुसलेल्या आरबी लोकांची संख्या लहान होती आणि शिवाय ते आपल्या जन्मभूमीपासून फार दूर होते. त्यांतच अरबस्तान इकडे मध्य आशियांतील प्रदेश जिंकण्यांत गुंतलेलें होतें. त्यामुळें फ्रान्समधील आरबी सैन्याला घरची फारशी मदतही मिळत नव्हती. इतकें असूनही फ्रान्समध्यें शिरलेल्या आरबी लोकांचें पश्चिम यूरपमधील लोकांना फार भय वाटलें, आणि त्यांच्याशीं लढा देण्यासाठीं म्हणून पश्चिम यूरपमधील लोकांचा एक मोठा संघ स्थापन झाला. चार्ल्स मॉर्टेल हा या संघाचा पुढारी असून इ. स. ७३२ मध्यें त्यानें फ्रान्समध्यें टूर्स येथील लढाईंत आरबांचा पराभव केला. या पराजयामुळें सर्व यूरप खंड आरबांच्या ताब्यांत जाण्याचें वांचलें. एका इतिहासकारानें लिहिलें आहे, कीं "जवळजवळ त्यांच्या हातांत आलेलें सर्व जगाचें साम्राज्य आरबी लोकांनीं टूर्सच्या मैदानांत गमाविलें." आरबांचा जर टूर्सच्या लढाईंत जय झाला असता, तर यूरपच्या सर्व इतिहासाला भलतेंच निराळें वळण लागलें असतें यांत मुळींच संशय नाहीं. मग त्यांना रोखून धरायला यूरपमध्यें कोणी राहिलें नसतें आणि त्यांनीं थेट कॉन्स्टान्टिनोपलवर चालून जाऊन पूर्वेकडचें रोमन साम्राज्य आणि वाटेंतलीं सगळीं छोटीं राज्यें नष्ट करून टाकलीं असतीं. ख्रिस्ती धर्माऐवजीं मग इस्लाम हाच सर्व यूरप खंडाचा धर्म झाला असता. आणि दुसरेही कितीएक नानाविध बदल होऊन गेले असते. पण या सगळ्या निव्वळ कल्पनेच्या भराऱ्या आहेत. प्रत्यक्ष आरबांना फ्रान्समध्येंच रोखून धरण्यांत आलें. स्पेनमध्यें मात्र ते पुढें पुष्कळ शतकें राज्य करीत राहिले.

अशा रीतीनें स्पेनपासून मंगोलियापर्यंत आरबी लोकांच्या विजयाचा झेंडा फडकला. आणि वालुकामय प्रदेशांतील भटकणारे हे लोक एका प्रबल साम्राज्याचे प्रतिष्ठित राज्यकर्ते बनले. त्यांना सारासान लोक असें नांव पडलें, तें बहुधा सहारा आणि नशीन या शब्दांवरून, वालुकामय प्रदेशांतील रहिवासी, या अर्थानें पडलें असावें. पण वालुकामय निर्जन प्रदेशांतील या रहिवाशांनीं लौकरच शहरी राहणी



आरबी लोकांचे विजय

आणि विलास उचलले आणि मोठमोठ्या प्रासादांनीं युक्त अशीं शहरेंही त्यांच्या साम्राज्यांत उदयास आलीं. इकडे दूरदूरच्या देशांमध्यें ते एवढाले विजय मिळवीत होते तरी आपापसांत तंटे करण्याची त्यांची जुनी संवय मात्र अद्याप सुटली नव्हती. शिवाय आता तर ज्यासाठीं लढावें असा एक प्रकारचा मोठा लग्गाही उत्पन्न झालेला होता. कारण ज्याच्या हातीं अरबस्तानचीं सूत्रें त्याच्या हातांत साऱ्या साम्राज्याचा कारभार, अशी आतां अवस्था होती. अर्थात् यामुळें खलिफाच्या पदासाठीं वारंवार झगडे होऊं लागले. छोटीं छोटीं भांडणें, कुटुंबाकुटुंबांमधील तंटे, असें करतां करतां यादवीपर्यंत – आपापसांतील युद्धापर्यंत – वेळ येऊन ठेपली. या झगड्यांमधून इस्लामधर्मीयांचे दोन मोठे तट पडून दोन धर्मपंथ निर्माण झाले. शिया आणि सुनी हे ते दोन पंथ आजही अस्तित्वांत आहेत.

पहिले दोन श्रेष्ठ खलिफा, अबू बकर आणि उमर यांच्यानंतर लगेचच ही गडबड सुरू झाली. महमदाची मुलगी फातिमा हिचा नवरा अली हा त्यानंतर कांहीं काळपर्यंत खलिफा होता. परंतु त्याच्या अमदानींत एकसारखे झगडे चालू होते. शेवटीं अलीचा खून झाला. आणि कांहीं काळानंतर त्याचा मुलगा हुसेन आणि त्याचें सारें कुटुंब यांची करबलाच्या मैदानांत कत्तल करण्यांत आली. मुसलमान लोक, विशेषतः शियापंथीय मुसलमान, मोहरमच्या महिन्यांत करबला येथील याच दुःखकारक घटनेबद्दल सालोसाल शोकनिदर्शन करीत असतात.

कांहीं काळानें मग खलिफा हा अनियंत्रित सर्वसत्ताधीश राजाच बनला. व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही, निवडणूक यांचा आतां त्याच्या बाबतींत कांहीं मागमूस राहिला नाहीं. तत्कालीन इतर अनियंत्रित राजपुरुषांमध्यें आणि त्याच्यांत आतां कांहींच अंतर राहिलें नाहीं. तत्त्वतः अजूनही इस्लामधर्माचा प्रमुख ... 'सद्धर्मीयाचा सरदार' (अमीर उल् मोमनीन) म्हणून तो होताच. परंतु ज्या इस्लामधर्माचे मुख्य संरक्षक म्हणून हे राज्यकर्ते समजले जात होते, त्या इस्लामधर्माचाच कित्येकदां त्यांनीं अवमान केल्याचें आढळून येतें.

सुमारें शंभर वर्षें खलिफापद महमदाच्याच घराण्याची एक शाखा उम्मेया या नांवानें प्रसिद्ध असलेली होती, त्या शाखेच्या हातीं राहिलें. दमास्कस ही त्यांनीं आपली राजधानी केली; आणि मग हें प्राचीन शहर राजप्रासाद, मशिदी, कारंजीं आणि चबुतरे यांच्या योगानें मोठें शोभिवंत होऊन गेलें. दमास्कसच्या पाणीपुरवठ्याच्या व्यवस्थेची त्या काळीं मोठीच प्रख्याति होती. या काळांत आरबी लोकांनीं एक स्वतंत्र प्रकारची शिल्परचना निर्माण केली. ती जगांत सारासनी लोकांची शिल्परचना म्हणून प्रसिद्ध आहे. या पद्धतींत नक्षीकामाला विशेषसें स्थान नाहीं. तर साधेपणा, भव्यपणा, रमणीयता यांचा त्यामध्यें आविष्कार आहे. या सर्व शिल्परचनेच्या पाठीमागें आधारभूत अशी मध्यवर्ती कल्पना अरबस्तान आणि सीरियामधील डौलदार अशा खजुरीच्या वृक्षांची आहे. त्यामधील त्या कमानी व मेहेरपी, ते स्तंभ, ते मनोरे,

ते घुमट, ते बुरूज पाहिले म्हणजे खजुरीच्या वृक्षांच्या मेहेरपी, कमानी आणि घुमटाकृति शाखासमूह, याचेंच चित्र डोळ्यांपुढे उभें राहतें.

ही शिल्परचना पुढें हिंदुस्थानांतही आली. परंतु येथें तिच्यावर हिंदी कल्पनांचा पुष्कळ परिणाम होऊन येथें एक निराळीच मिश्र शिल्परचना निर्माण झाली. सारासनी शिल्पकलेचे अत्यंत उत्कृष्ट नमुने स्पेनमध्यें आजही पाहावयाला सांपडतात.

संपत्ति व साम्राज्य यांच्याबरोबर विलासभोग, खेळ आणि विलासोपयोगी कला याही आल्या. घोडयांच्या शर्यती हा आरबी लोकांचा एक मोठा आवडीचा, करमणुकीचा विषय होता. तसेच पोलो, शिकार आणि बुद्धिबळें यांचीही त्यांना आवड होती. आणि शहरी दिमाखदार लोकांमध्यें संगीताचे, विशेषतः गायनाचें वेडच पसरलें होते. राजधानीमध्यें गायक-गायिका, आणि त्यांच्या पाठीमागचे साथीदारांचे, साजिंद्यांचे तांडे आणि त्यांच्याभोंवतालीं घुटमळणारांचे घोळके यांचा नुसता सुळसुळाट होऊन गेला होता.

आणखी एक जो फार मोठा बदल घडून आला तो मात्र अतिशय खेदकारक. तो म्हणजे स्त्रियांच्या दर्जामध्यें व परिस्थितीमध्यें घडून आलेला फरक. आरबी लोकांमध्यें स्त्रिया पडदा वापरीत नसत. समाजांतून दूर एकीकडे कोंडलेल्या अशाही त्या राहत नसत. सार्वजनिक ठिकाणीं, समाजामध्यें त्या हिंडत-फिरत असत, मशिदींत जात असत, व्याख्यानाला हजर राहत असत; एवढेंच नव्हे, तर स्वतःही व्याख्यानें देत असत. परंतु एक पूर्वेकडील रोमचें साम्राज्य, आणि दुसरें इराणचें साम्राज्य अशीं जीं दोन प्राचीन साम्राज्यें आरबांच्या दोन्ही बाजूंना होतीं तीं जिंकल्यानंतर त्या साम्राज्यामधल्याच पुष्कळशा चालीरीतींचें अधिकाधिक अनुकरण करण्याकडे आरबांची प्रवृत्ति झाली. त्यांपैकीं एका साम्राज्याचा त्यांनीं पराभव केला होता. एक तर पार नष्टच करून टाकलें होतें. परंतु त्या दोन्ही साम्राज्यांतील कित्येक अनिष्ट चालींना आरब लोक स्वतःच बळी पडले. कॉन्स्टान्टिनोपल आणि इराण यांमधील उदाहरणामुळेंच आरबी लोकांमध्यें स्त्रियांना समाजापासून दूर एकांतांत ठेवण्याची पद्धति रूढ झाली असें म्हणतात. हळूहळू अंतःपुराची पद्धति सुरू झाली आणि स्त्री व पुरुष यांचें सामाजिक मीलन कमी कमी प्रमाणावर होऊं लागलें. दुर्दैवानें स्त्रियांना पुरुषांपासून अलग ठेवणें हें इस्लामधर्मीय समाजाचें एक वैशिष्टयच होऊन बसलें आणि मुसलमान हिंदुस्थानांत आल्यानंतर हिंदुस्थानांतही त्यांच्यापासून हा धडा घेण्यांत आला. अजूनसुद्धां कांहीं लोक हा रानटीपणा चालू देतात, हें पाहून मला आश्चर्याचा धक्का बसून चीड येते. बाहेरच्या जगापासून पार तोडून टाकलेल्या अशा पडद्यांतील स्त्रियांचा विचार मनांत आला कीं माझ्या डोळ्यांपुढें तुरुंग किंवा कोंडवाडा अगर प्राणिसंग्रहालय यांचें दृश्य उभें राहतें. ज्या देशांतील अर्धी लोकसंख्या एक प्रकारच्या तुरुंगात डांबून कोंडून ठेवलेली आहे, त्या देशाची प्रगति व्हावी तरी कशी?

मोठी आनंदाची गोष्ट आहे, कीं हिंदुस्थानांत आतां पडदा झपाट्यानें टाकून देण्यांत येत आहे. या भयंकर दडपणापासून खुद्द मुसलमान समाजसुद्धां पुष्कळ अंशीं आपली सोडवणूक करून घेत आहे. तुर्कस्तानमध्यें कमालपाशानें पडदा अजीबात नाहींसा करून टाकला असून ईजिप्तमध्येंही तो झपाट्यानें नाहींसा होत आहे.

आणखी एक गोष्ट सांगून हें पत्र पुरें करतों. आरबी लोक हे त्यांच्या जागृतीच्या काळाच्या सुरुवातीला, आपल्या धर्माविषयींच्या श्रद्धेनें विशेषच भारले गेले होते. परंतु जात्या ते परमतसहिष्णु लोक असून धर्माच्या बाबतींतील त्यांच्या नेमस्त वृत्तीचीं अगणित उदाहरणें आढळून येतात. जेरुसलेममध्ये खलिफा उमरनें तर धर्मविषयक सहिष्णुतेचा विशेषच अवलंब केला होता. स्पेनमध्यें ख्रिस्ती लोकाची संख्या फार मोठी असून त्यांना तेथें संपूर्ण धर्ममतस्वातंत्र्य होतें. हिंदुस्थानांत आरबी लोकांचें राज्य सिंधशिवाय इतरत्र कोठेंच केव्हां नव्हतें; परंतु हिंदुस्थानशीं त्यांचे संबंध वारंवार येत आणि दोन्ही देशांमध्यें पूर्ण सख्यत्वाचे संबंध होते. एवढेंच नव्हे, तर या काळच्या इतिहासांतील सर्वांत अधिक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली, तर एका बाजूला आरबी मुसलमानांची धार्मिक सहिष्णुता आणि दुसऱ्या बाजूला यूरपांतील ख्रिस्ती लोकांची धार्मिक असहिष्णुता हें परस्परविरोधी दृश्य होय.

## ५०

## बगदाद आणि हरून-अल्-रशीद

२७ मे, १९३२

दुसऱ्या देशांकडे पुन्हा वळण्यापूर्वी आरबी लोकाचीच गोष्ट जरा आणखी पुढें चालवूं या.

मागच्या पत्रांत मीं तुला सांगितलें, कीं खलिफाचें पद पहिलीं सुमारें शंभर वर्षेंपर्यंत महंमद पैगंबराच्याच घराण्याच्या उम्मैया नांवाच्या शाखेकडे राहिलें. दमास्कस येथें त्यांनीं आपली राजधानी केली होती आणि त्यांच्या अमदानींत आरबी मुसलमानांनीं इस्लाम धर्माचा झेंडा दूरवर चोहोंकडे फडकविला. दूरदूरचे देश तिकडे ते जिंकून घेत होते. परंतु इकडे घरीं मात्र आपसांत झगडत होते. आणि त्यांच्यामध्यें वारंवार यादवी माजून राहत होती. शेवटीं महंमदाच्याच घराण्याच्या दुसऱ्या एका शाखेनें उम्मैया घराण्याला उलथून टाकलें. हें घराणें महंमदाचा चुलता आब्बास याच्यापासूनचें असल्यामुळें त्यांना आब्बासी म्हणत असत. उम्मैया लोकांनीं जीं अनेक क्रूर कृत्यें केलीं होतीं त्यांचा नायनाट करून दुष्टांचें शासन करण्यासाठीं म्हणून हें आब्बासी घराणें पुढें आलें

होतें. परंतु एकदां त्यांना जय मिळाल्यानंतर क्रूरपणा आणि कत्तली या बाबतींत त्यांनीं उम्मैया घराण्यावरही ताण केली. उम्मैया घराण्यांतील माणसांना जेथून तेथून शोधून काढून त्यांचा रानटीपणें त्यानीं वध केला.

अशा रीतीनें इ. स. ७५० मध्यें आब्बासी खलिफाच्या अमलाला सुरुवात झाली. आणि तो किती तरी दीर्घ काळपर्यंत चालू राहिला. त्यांच्या अमलाच्या सुरुवातीचा हा सारा प्रकार मोठासा श्रेयस्कर किंवा सुखदायक नव्हता हें खरें. परंतु आब्बासी खलिफाची अमदानी आरबांच्या इतिहासांत एकंदरींत बरीच हितकर आणि वैभवाची गेली यांत शंका नाहीं. आतां त्यांच्या अमदानींत उम्मैयांच्या वेळेपेक्षां घडामोडी मात्र फार मोठमोठया झाल्या. अरबस्तानांतील यादवीमुळें सारें आरबी साम्राज्य हादरून डळमळूं लागलें. घरीं अरबस्तानांत आब्बासी लोकांचा जय झाला. परंतु तिकडे स्पेनमध्यें राजप्रतिनिधि ( गव्हर्नर ) अमीर होता उम्मैयाच्या घराण्यांतला. त्यानें आब्बासी घराण्यांतलि खलिफांचा अधिकार मानण्याचें नाकारलें. उत्तर आफ्रिका पण—याच प्रदेशाला पूर्वीं इफ्रिकियाची सुभेदारी असें म्हणत असत—त्यानंतर लौकरच जवळजवळ स्वतंत्र झाली. ईजिप्तनेंही तोच मार्ग स्वीकारला, एवढेंच नव्हे, तर त्या देशांत स्वतंत्रच खलिफाची स्थापना करण्यांत आली. ईजिप्त देश जवळच असल्यामुळें त्याला पुनः पुनः दटावणी दाखवून साम्राज्याचा अधिकार मान्य करायला लावण्याचा प्रयत्न करतां येत असे, आणि मधूनमधून असा प्रयत्न यशस्वी पण होई. परंतु इफ्रिकियाला कोणींच केव्हां हात लावला नाहीं आणि स्पेन देश तर इतका दूर होता, कीं त्याच्यापर्यंत हात पोंचणेंच शक्य नव्हतें. अशा रीतीनें आब्बासी खलिफांची अमदानी सुरू झाल्यानंतर आरबी साम्राज्याचे तुकडे पडून गेले. खलिफा कांहीं मग साऱ्या मुसलमानी साम्राज्याचा प्रमुख राहिला नाहीं; किंवा तो अमीरुल मोमनीन म्हणजे सगळया धर्मनिष्ठ मुसलमानांचा नायकही राहिला नाहीं. इस्लामधर्मीयांमध्यें आतां एकी राहिली नाहीं. स्पेनमधील आरब आणि आब्बासी लोक यांच्यामध्यें तर एकमेकांबद्दल इतका द्वेष वाढला, कीं परस्परांवरील संकटांमुळें परस्परांना उलट आनंदच वाटूं लागला.

हें सगळें खरें असलें, तरीही आब्बासी खलिफा हे फार मोठे राज्यकर्ते होऊन गेले आणि जगांतील एकंदर साम्राज्यांच्या मानानें पाहतां त्यांचें साम्राज्यही श्रेष्ठ होऊन गेलें. मात्र ज्या श्रद्धेच्या आणि तेजाच्या बळावर आरबी लोक मोठमोठाले पर्वत ओलांडून वणव्यासारखे चोहोंकडे पसरले, ती त्यांची मूळची श्रद्धा आणि तें मूळचें तेज मात्र आतां त्यांच्यामध्यें शिल्लक राहिलें नाहीं. त्यांचा साधेपणाही नाहींसा झाला; लोकशाही आणि व्यक्तिस्वातंत्र्य यांचाही मागमूस राहिला नाहीं; आणि ज्या इराणी शहेनशहांचा आरबांनीं यापूर्वीं पहिल्या पहिल्या दिवसांत पाडाव केला होता, त्या शहेनशहांत किंवा कॉन्स्टान्टिनोपलच्या बादशहांत आणि सद्धर्मानुयायाच्या या नायकांत, अमीरुल मोमनीनमध्यें, आतां कांहींच फरक राहिला नाहीं. महंमद पैगंबरच्या काळच्या सुरुवातीसुरुवातीच्या आरब पिढ्यांमध्यें जें चैतन्य होतें आणि जी शक्ति होती, ती राजे

लोकाच्या सैन्यांतल्यापेक्षां अगदीं वेगळ्या प्रकारची होती. आपल्या वेळच्या सगळ्या जगांत त्यांचा दर्जा कांहीं अपूर्व होता आणि त्यांच्या अमोघ मोर्चापुढें राजे लोक आणि त्यांचीं सैन्यें पार कोलमडून पडलीं. सामान्य जनता या राजे लोकांना विटलेली होती आणि आरबी लोकांच्यामुळें एक सामाजिक क्राति होऊन आपल्याला चांगले दिवस येतील अशी त्यांना आशा उत्पन्न झालेली होती.

पण आतां हें गाडें सर्व पालटून गेलें. वालुकामय प्रदेशांत राहणाऱ्या लोकांची वस्ती आतां प्रासादामध्यें होऊं लागली आणि खजुराऐवजीं नानाविध रुचकर, स्वादिष्ट आणि मनोहर पक्कान्नें त्याच्या खाण्यांत येऊं लागलीं. आतां ते चांगले सुखांत रंगले, तेव्हां आतां त्यांनीं सामाजिक क्रांतीची आणि सामान्य जनतेच्या राहणींत फरक घडविण्याची काळजी कशाला करावी? उलट, प्राचीन साम्राज्यांच्या ऐश्वर्योपभोगापेक्षांही अधिक ऐश्वर्योपभोग घेण्यास त्यांनीं सुरुवात केली. आणि त्यांच्या कितीएक अनिष्ट चाली त्यांनीं उचलल्या. स्त्रियाना पड्याआड समाजापासून दूर ठेवण्याची चाल ही यांपैकींच एक होती, हें मीं तुला सांगितलेंच आहे.

यानंतर राजधानी दमास्कस सोडून इराकमध्यें बगदाद येथें गेली. राजधानीच्या या बदलावरून सुद्धां आरबी लोकांच्या जीवनक्रमांत कशा प्रकारचा बदल होत चालला होता याची ओळख पटेल. कारण बगदाद शहर हें इराणच्या शहांचें उन्हाळ्यातील हवा खाण्याचें ठिकाण होतें. शिवाय, बगदाद शहर दमास्कसच्या मानानें यूरपला दूर होतें. त्यामुळें यापुढें आब्बासी खलिफांची नजर यूरपपेक्षां आशियाकडेच अधिक वळलेली राहिली. त्यानंतरही कॉन्स्टान्टिनोपल जिंकण्याचे आणखी पुष्कळ प्रयत्न झाले आणि यूरपियन राष्ट्रांशीं युद्धेंही पुष्कळ झालीं. परंतु हीं युद्धें सगळीं आत्मसंरक्षणाच्या स्वरूपाचीं होतीं. नवनवे देश पादाक्रांत करण्याचे दिवस आतां निघून गेले होते आणि आब्बासी खलिफा आपलें राहिलें होतें तेवढेंच साम्राज्य संघटित करून टिकवून धरण्याची धडपड करीत होते. अर्थात् स्पेन आणि आफ्रिका वगळून सुद्धां हें साम्राज्य कांहीं लहानसहान नव्हतें.

बगदाद शहर! नाहीं आठवत तुला त्यांतला तो हरून-अल्-रशीद, ती शहेराजादी आणि आरबी भाषेंतील त्या सुरस आणि नवलपूर्ण गोष्टी? आब्बासी खलिफांच्या अमलांत बगदाद शहराला यापुढें अरेबियन नाइट्समध्यें वर्णन केलेल्या बगदाद शहराचें स्वरूप प्राप्त झालें. आतां तें राजप्रासाद, सार्वजनिक कचेऱ्या, शाळा आणि विद्यालयें, मोठमोठीं दुकानें, राखीव हिरवळीचीं मैदानें आणि उद्यानें यांनीं गजबजलेलें एकं प्रचंड शहर झालें. तेथल्या व्यापाऱ्यांचा पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील देशांशीं फारच विशाल प्रमाणावर व्यापार सुरू झाला. साम्राज्याच्या दूरदूरच्या प्रांतांशींही सारखा निकट संबंध राहावा म्हणून अगणित अधिकारी वर्गाचें जाळें निर्माण झालें, आणि राज्यकारभाराचें काम रोजरोज अधिकाधिक बिकट होत गेल्यामुळें त्याची निरनिराळ्या खात्यांत विभागणी करावी लागली. टपाल नेण्या-आणण्याची अत्यंत

चोख व्यवस्था करण्यांत येऊन साम्राज्यांतील कोनाकोपऱ्यांतील ठिकाणांचा सुद्धां राजधानीशीं चांगला संबंध राहील, अशी व्यवस्था करण्यांत आली. इस्पितळांची संख्याही पुष्कळ झाली. जगांतून जिकडून तिकडून प्रवासी लोक, विशेषतः विद्वान् लोक, विद्यार्थी आणि कलावंत बगदादला भेट देऊं लागले; कारण खलिफाकडून विद्वानांचा आणि कलावंतांचा चांगल्या प्रकारें आदरसत्कार होतो, अशी जगभर ख्याति झाली होती.

खलिफा हाही स्वतः अतिशय विलासोपभोगांत आणि थाटामाटांत राहूं लागला; त्याच्या सभोंवार गुलामांचा तांडा असे आणि त्याच्या कुटुंबीय स्त्रिया अंतःपुरांत पडद्याआड असत. आब्बासी साम्राज्याचें हें बाहेरचें वैभव हरून-अल्-रशीदच्या अमदानींत इ. स. ७८६ पासून ८०९ पर्यंत अगदीं कळसाला पोंचलें. पूर्वेकडून चीनच्या बादशहाच्या दरबाराचे आणि पश्चिमेकडून शार्लमेन बादशहाच्या दरबारचे वकील हरूनच्या दरबारांत येऊं लागले. आरबांच्या कबजांतील स्पेन देश तेवढा सोडला, तर बाकीच्या सर्व युरोपच्या मानानें बगदाद शहर आणि आब्बासी साम्राज्य हें राज्यकारभाराचें शास्त्र, व्यापार आणि विद्यावृद्धि यांमध्यें कितीतरी पुढारलेलें होतें.

आब्बासी राज्याचा काळ आम्हा लोकांना विशेष कौतुकाचा वाटतो याचें कारण शास्त्रांच्याबद्दल त्या काळांतील लोकांच्या मनांत एक नवीनच प्रकारची जाणीव—जिज्ञासा व आपुलकी—उत्पन्न झाली होती हें होय. आधुनिक जगांत आज शास्त्राचें स्थान फारच मोठें आहे हें तुला माहीत आहे. शास्त्राचे आपल्यावर फारच उपकार आहेत. चित्त शांत करून एका ठिकाणीं बसावयाचें आणि हवें असेल तें घडो म्हणून प्रार्थना करीत राह्यचें असला मार्ग शास्त्राचा नाहीं. तर शास्त्र जें कांहीं घडतें तें कां व कसें, याच्या शोधाची खटपट करीत असतें. शास्त्र प्रयोग करतें. पुनः पुनः प्रयत्न करतें. केव्हां त्याला यश येतें, केव्हां त्याला अपेश येतें; आणि अशा रीतीनें कणाकणानें शास्त्र मानवी ज्ञानांत भर घालीत असतें. प्राचीन काळच्या किंवा मध्ययुगीन जगापेक्षां आपलें आजचें हें जग फारच निराळें आहे. हा जो एवढा मोठा फरक पडलेला आहे, त्याचें श्रेय मुख्यतः शास्त्राला आहे; कारण आजच्या जगाची सर्व निर्मिति शास्त्रानें केलेली आहे.

प्राचीन काळच्या लोकांमध्यें, ईजिप्तमध्यें काय, चीनमध्यें काय किंवा हिंदुस्थानमध्यें काय, कोठेंच अशी शास्त्रीय पद्धति अवलंबिलेली आढळून येत नाहीं. प्राचीन ग्रीसमध्यें थोडासा तिचा अंश आढळतो. परंतु रोममध्यें पुन्हां तिचा अभाव होतो. आरबी लोकांच्या ठिकाणीं मात्र ही शास्त्रीय संशोधनाची उपजत प्रवृत्ति होती. यासाठीं आधुनिक शास्त्रांचे ते जनकच समजले पाहिजेत. वैद्यक, गणित, अशांसारख्या कांहीं विषयांत हिंदुस्थानकडून त्यांनीं पुष्कळ शिकून घेतलें. पुष्कळ हिंदी विद्वान् आणि गणितज्ञ बगदादला येत असत. पुष्कळ आरबी विद्यार्थी तक्षशिलेला जात असत. तेथें त्या काळींही मोठें विद्यापीठ असून वैद्यकीचें अध्यापन तेथें विशेष चांगल्या प्रकारें

होत असे. वैद्यकाच्या आणि इतर विषयांच्या संस्कृत ग्रंथांचीं आरबी भाषेंत मुद्दाम भाषांतरें करण्यांत आलीं. दुसऱ्या पुष्कळ गोष्टी—उदाहरणार्थ, कागद तयार करण्याची कला—आरबी लोक चीनपासून शिकले. परंतु इतरांपासून मिळविलेल्या या ज्ञानाच्या पायावर त्यांनीं आपलें स्वतःचें संशोधन चालू केलें आणि पुष्कळ महत्त्वाचे शोध लावले. जगांतील पहिली दुर्बीण आणि होकायंत्र आरबी लोकांनीं तयार केलीं. वैद्यकामध्यें आरबी वैद्य आणि शस्त्रक्रियाविशारद साऱ्या यूरपभर ख्याति पावलेले होते.

आरबी लोकांच्या या बौद्धिक हालचालींचें मुख्य केंद्र अर्थातच बगदाद शहर हेंच होतें. पश्चिमेकडील स्पेनमधील कार्डोवा किंवा कोर्डोवा शहर हें दुसर एक असें केंद्र होतें. आरबी जगांत दुसरींही अनेक विद्यापीठांचीं स्थानें असून त्या ठिकाणीं बौद्धिक जीवनाचा उत्कर्ष झालेला आढळतो. उदाहरणार्थ, कैरो किंवा 'अल्काहिरा' (म्हणजे विजयी), बसरा आणि कूफा या ठिकाणीं अशीं विद्यापीठें होतीं. पण या सर्व सुप्रसिद्ध शहरांच्यावर बगदादचें वैभव होतें. इस्लामची राजधानी, इराकचा डोळा, साम्राज्याचें अधिष्ठान, सौंदर्यविद्या आणि कला यांचें माहेरघर असें त्याचें एका आरबी इतिहासकारानें वर्णन केलें आहे. बगदादची लोकसंख्या वीस लक्ष असे. म्हणजे तें शहर आजच्या आपल्या मुंबई किंवा कलकत्ता या शहरांपेक्षाही मोठें होतें.

छोटेमोठे पायमोजे वापरण्याची पद्धति बगदादमधील श्रीमान् लोकांत सुरू झाली, हें वाचून तुला विशेष गंमत वाटेल. त्यांना ते 'मोजे' म्हणत. आणि आपला हिंदुस्थानीमधील शब्द याच शब्दापासून निघाला असला पाहिजे. त्याचप्रमाणें फ्रेंच भाषेंतील शेमीस शब्दही आरबी लोकांच्या कमीस या सदरावाचक शब्दापासूनच निघालेला आहे. कमीस आणि मोझा या दोन्ही वस्तू आरबांकडून बायझांटियममध्यें गेल्या आणि तेथून त्यांचा यूरपमध्यें प्रसार झाला.

आरब लोक हे पहिल्यापासूनच मोठे प्रवासप्रिय होते. दूरवर समुद्रपार प्रवास करीत राहून आफ्रिकेमध्यें, हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर मॅलेशियामध्यें, एवढेंच नव्हे, तर प्रत्यक्ष चीनमध्येंही त्यांनीं वसाहती केल्या होत्या. त्यांच्यांतील एक सुप्रसिद्ध प्रवासी अल्बेरुणी हा हिंदुस्थानांत येऊन गेला होता. ह्यूएन चँगप्रमाणें त्यानेंही आपल्या प्रवासाचें वर्णन लिहून ठेवलेलें आहे.

आरबी लोक हे मोठ इतिहासलेखकही होते. त्यांच्याबद्दलची माहिती आपल्याला त्यांनीं स्वतःच लिहिलेल्या इतिहासाच्या व इतर ग्रंथांमधून मिळते. तसेंच ते लोक किती सुंदर गोष्टी आणि अद्‌भुतरमणीय कथा लिहीत असत, हें तर कोणाला सांगावयालाच नको. हजारों, लाखों लोक असे आढळतील, कीं ज्यांनीं आब्बासी घराण्यांतील खलिफांचें काय किंवा त्यांच्या साम्राज्याचें काय नांव सुद्धां कधीं ऐकलें नसेल; परंतु 'अलिफ्लैला व लैला' उर्फ 'एक हजार आणि एक रात्री' (अरेबियन नाइट्स) मधील ती रहस्यमय आणि अद्‌भुतरमणीय बगदाद नगरी—तिचें नांव ऐकलें नसेल असा क्वचितच कोणी असेल. कल्पनासाम्राज्यें हींच वास्तविक साम्राज्यां-

पेक्षां पुष्कळदां अधिक दीर्घायुषी आणि मनुष्यांच्या चांगल्या परिचयाचीं असतातसें म्हटलें पाहिजे.

हरून-अल्-रशीदच्या मरणानंतर लौकरच आरबी साम्राज्यावर दुर्दैव ओढवलें. राज्यांत दंगेधोपे होऊं लागले, अव्यवस्था माजली, निरनिराळ्या प्रांतांचे नबाब स्वतःच आपापलीं राजघराणीं स्थापूं लागून साम्राज्यांतले वेगवेगळे भाग स्वतंत्र व अलग होऊं लागले. खलिफांची सत्ता दुर्बळ होत गेली; आणि शेवटीं इतकी अवस्था झाली, कीं खलिफांचा अम्मल फक्त बगदाद शहर आणि त्याभोंवतालचीं कांहीं गांवें एवढ्यापुरताच शिल्लक राहिला. एका खलिफाला तर त्याच्याच शिपाई लोकांनीं राजवाड्यांतून ओढून बाहेर काढलें व त्याचा वध केला. त्यानंतर बगदादमध्यें राहून कांहीं जबरदस्त लोक राज्य करूं लागले आणि खलिफाला त्यांनीं आपल्या ताटाखालचें मांजर केलें.

दरम्यान इस्लामी धर्माचें ऐक्य ही एक निव्वळ पुराणांतली कथाच होऊन राहिली. मध्य आशियांत खोरासानपर्यंत जिकडे तिकडे स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं. आणि अतिपूर्वेपासून पश्चिमेकडे भटकणाऱ्या टोळ्या अजूनही येतच राहिल्या. मध्य आशियांत मूळचे जे तुर्क लोक होते त्यांनीं मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली आणि येऊन बगदाद शहराचा कब्जा घेतला. त्यांना **सेल्जुक तुर्क** असें नांव आहे. त्यांनीं कॉन्स्टान्टिनोपलच्या बादशाही बायझांटियन सैन्यांचा अगदीं धुळधाण पराभव केलेला पाहून सारें यूरप खंड चकित झालें. कारण यूरप खंडांतल्या लोकांना वाटत होतें, कीं आरब आणि मुसलमान लोकांची शक्ति आतां संपली असून दिवसेंदिवस ते अधिकाधिक दुर्बळ होऊं लागले आहेत. आरब लोकांची पुष्कळच अवनति झालेली होती, हें खरेंच आहे. परंतु त्यांच्यामागून या सेल्जुक तुर्कांनीं रणांगणावर येऊन इस्लामधर्माचा झेंडा हातांत घेतला आणि यूरप खंडाला त्या झेंड्याचा स्वीकार करण्याचें त्यांनीं आव्हान दिलें.

आपण लौकरच पाहूं आतां यापुढे, कीं या आव्हानाचा लगेच स्वीकार करून ख्रिस्ती राष्ट्रांनीं मुसलमानी राष्ट्रांशीं धर्मयुद्धें करण्यासाठीं व आपली पवित्र धर्मभूमि जेरुसलेम ही जिंकून परत घेण्यासाठीं आपसांमध्यें संघटना केली. शंभरांहून अधिक वर्षे सीरिया, पॅलेस्टाइन आणि आशिया मायनर यांच्या स्वामित्वाबद्दल ख्रिस्ती लोक आणि इस्लामधर्मीय लोक यांच्यामध्यें सतत युद्ध झालें; त्यांत दोघांचीही शक्ति क्षीण झाली. आणि या देशांतील इंचन् इंच भूमि मानवी रक्तानें ओलीचिंब होऊन गेली. त्या देशांतील भरभराटीला आलेल्या शहरांतील व्यापारधंदा बुडाला, त्यांचें महत्त्व नष्ट झालें आणि धनधान्यांनीं प्रफुल्लित अशा शेतांच्या जागीं रान माजलें.

असें हें या दोन धर्मांच्या लोकांचें युद्ध झालें. परंतु त्या युद्धाचा शेवट होण्याच्या आधींच तिकडे आशियाच्या पलीकडील बाजूच्या मंगोलिया प्रांतांत चेंगिझखान हा उदयास आला. त्याला जग हादरविणारा मोंगल असें म्हणतात. आणि खरोखरच त्याच्या हातून यूरप आणि आशिया खंडांना चांगलाच हादरा बसावयाचा होता. त्यानें

आणि त्याच्या वंशजांनीं बगदादची आणि त्याच्या साम्राज्याची अखेरची इतिश्री केली. मोंगल लोकांनीं या सुप्रसिद्ध महान् शहराचा नाश करण्याचें कार्य पुरें केलें त्या वेळीं बगदाद शहर म्हणजे धुळीची आणि राखेची नुसती एक रास होऊन राहिली आणि त्यामधील वीस लक्ष लोकांपैकीं बहुतेक सर्व जण मृत्युमुखीं पडले!

बगदाद शहर आतां पुन्हां भरभराटलें असून आज तें इराकची राजधानी आहे. परंतु त्याच्या पूर्वीच्या वैभवाची आतांचें हें शहर म्हणजे नुसती छायाच मात्र आहे. कारण मोंगल लोकांनीं त्याची धुळधाण आणि नाश केल्यावर त्याच्या पूर्ववैभवाला पुन्हा डोकें वर काढणें अशक्यच होऊन गेलें.

## ५१

## उत्तर हिंदुस्थानांत हर्षापासून महमुदापर्यंत

१ जून, १९३२

आरबी किंवा सारासान लोकांची कथा मध्येंच सोडून देऊन आपणांला आतां थोडेंसें इतर देशाच्याकडे पाहिलें पाहिजे. आरबी लोकांची सत्ता इकडे वाढत होती, आणि निरनिराळे देश पादाक्रांत करून साऱ्या जगभर पसरल्यानंतर त्याच्या सत्तेचा ऱ्हासही झाला; या सगळया दरम्यानच्या काळांत हिंदुस्थानांत, चीनमध्यें आणि यूरपमधील इतर देशात कोणत्या घडामोडी चालू होत्या? त्यांपैकीं कांहींचें अगदीं ओझरतें दर्शन आपल्याला आतापर्यंत झालेलें आहे. उदाहरणार्थ, चार्ल्स मार्टेल याच्या नेतृत्वाखालीं यूरपीय राष्ट्रांच्या संयुक्त सैन्यानीं आरबांचा फ्रान्समध्यें टूर्स येथें इ. स. ७३२ मध्यें केलेला पराभव, आरबी लोकांनीं मध्य आशियाचा केलेला पाडाव किंवा त्यांचें हिंदुस्थानांत सिंधपर्यंत येणें वगैरे. त्यांत प्रथम आतां आपण हिंदुस्थानकडे वळूं या.

कनोजचा राजा हर्षवर्धन हा इ. स. ६४८ मध्यें मरण पावला होता. त्याच्या मृत्यूपासून उत्तर हिंदुस्थानांतील राजकीय अवनति अधिकाधिक स्पष्ट होऊं लागली. वास्तविक हें अवनतीचें बीज त्याच्यापूर्वीच कांहीं काळ मूळ धरूं लागलेलें होतें. हिंदु आणि बुद्धधर्म यांच्यामधील झगड्यामुळें त्याला आणखीच जोर चढत होता. हर्षाच्या अमदानींत बाहेरून मोठ्या वैभवाचा आणि दृढतेचा देखावा दिसला; परंतु तोही कांहीं काळापुरताच होता. त्याच्या मृत्यूनंतर उत्तरेंत किती तरी छोटीं छोटीं राज्यें निर्माण झालीं; थोडा वेळ त्यांनीं अधून मधून वैभवही उपभोगलें; आणि मधून मधून त्याचे आपापसांत झगडे पण होत राहिले. असें असूनही हर्षानंतरच्या या तीनशें वर्षांच्या काळांतसुद्धां कला आणि वाङ्मय यांचा उत्कर्षच होत राहिला आणि पुष्कळ

सुंदर सार्वजनिक बांधकामें पुरीं झालीं, ही गोष्ट मात्र आश्चर्य करण्यासारखी आहे. भवभूति किंवा राजशेखर यांसारखे विख्यात ग्रंथकार या काळांत होऊन गेले; आणि कितीएक राजेही राजकीय दृष्टीनें नसले, तरी त्यांच्या अमदानींत विद्या आणि कला यांची जी अभिवृद्धि झाली, त्यासाठीं संस्मरणीय असे होऊन गेले. त्यांच्याचपैकीं एक राजा भोज हा तर आदर्श राजाचा देवाप्रमाणें एक वंद्य असा नमुनाच होऊन राहिला आणि लोक त्याला याच दृष्टीनें ओळखतात.

परंतु अधून मधून अशीं कांहीं उज्ज्वल उदाहरणें आढळलीं, तरी एकंदरींत उत्तर हिंदुस्थानचा ऱ्हासच होत चालला होता. दक्षिण हिंदुस्थान पुन्हां एकदां आघाडीवर चमकूं लागलें होतें आणि उत्तरेवर कडी करूं लागलें होतें. पूर्वीच्या एका पत्रांत (पत्र ४४ वें) दक्षिण हिंदुस्थानच्या या काळांतील इतिहासाबद्दल (तेथें उदयास आलेलीं जीं चोल, पल्लव आणि राष्ट्रकूटांचीं राज्यें त्यांच्याबद्दल) थोडेंसें मीं तुला सांगितलें आहे. शंकराचार्यांबद्दल, आपल्या अगदींच लहानशा आयुष्यांत देशभरातील विद्वान् आणि बिनशिकलेल्या सर्वच लोकांच्या मनाचा त्यांनीं ठाव कसा घेतला आणि बुद्धधर्माला हिंदुस्थानातून जवळजवळ नष्ट करण्याच्या कामीं त्याना यश कसें आलें, याबद्दलही मीं सांगितलें आहे. परंतु हें कार्य शंकराचार्य करीत होते, त्याच क्षणाला हिंदुस्थानच्या दाराशीं एक नवाच धर्म आंत प्रवेश करण्याच्या हेतूनें उभा टाकावा आणि पुढें पुराच्या लोंढ्याप्रमाणें त्याचें विजयी आक्रमण या देशावर होऊन येथील प्रचलित समाजव्यवस्था उखडून काढण्याचा त्यानें चंग बांधावा, हा मात्र किती विचित्र योगायोग आहे!

आरबी लोकांना हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत पोंचण्यास फारसा अवकाश लागला नाहीं; हर्ष असतांनाच ते तेथपर्यंत आले. थोडा वेळ तेथेंच थांबून मग त्यांनीं सिंधचा कबजा मिळविला. इ. स. ७१० मध्यें महंमद इब्न कासीम नांवाचा एक अवघ्या सतरा वर्षांचा मुलगा आरबी लष्कराचा सेनापति होता. त्यानें आपल्या सैन्या-निशीं येऊन पश्चिम पंजाबांतील मुलतानपर्यंतचा सिंधु नदीच्या खोऱ्यांतील मुलूख जिंकून घेतला. आरबांनीं हिंदुस्थानचा जो काय मुलूख जिंकला तो एवढाच. त्यांनीं आणखी थोडा नेटानें प्रयत्न केला असता, तर त्यांना आणखीही पुढें जातां आलें असतें. उत्तर हिंदुस्थान दुर्बळ झालेला असल्यामुळें यामध्यें त्यांना कांहींच कठिण गेलें नसतें. तसें पाहिलें तर आरबी लोकांमध्यें आणि त्यांच्या आसपासच्या राजांमध्यें पुष्कळ लढायाही एकसारख्या चालू होत्या; परंतु देश जिंकून घेण्याचा सुसंघटित असा प्रयत्नच आरबी लोकांनीं केला नाहीं. तेव्हां आरबी लोकांनीं सिंध प्रांत जिंकून घेतला ही गोष्ट राजकीय दृष्ट्या कांहीं विशेष महत्त्वाची ठरली नाहीं. कारण हिंदुस्थानवर मुसल्मानांचा संपूर्ण विजय व्हावयाला यानंतर किती तरी शतकें लागलीं. परंतु आरबी लोकांशीं हिंदुस्थानांतील लोकांचा जो हा संबंध आला, त्याचे संस्कृतिदृष्ट्या मात्र फार मोठे परिणाम झाले.

आरबी लोकांचे दक्षिण हिंदुस्थानांतील हिंदी राजे लोकांशीं, विशेषतः राष्ट्रकूट घराण्याशीं सख्यत्वाचे संबंध होते. पुष्कळसे आरब लोक हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर वसाहत करून राहिले होते; आपल्या वसाहतीमध्यें त्यांनीं मशिदीही बांधल्या होत्या. आरबी प्रवासी आणि व्यापारी हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांमध्यें हिंडत असत. पुष्कळच आरबी विद्यार्थी वैद्यकाच्या अध्यापनासाठीं विशेष प्रसिद्ध असलेल्या उत्तरेंतील तक्षशिला येथील विद्यापीठांत येत असत. असें सांगतात, कीं हरून-अल्-रशीदच्या कारकीर्दींत हिंदी विद्वानांना व विद्यांना बगदादमध्यें फार मोठें मानाचें स्थान असे आणि हिंदुस्थानांतील वैद्यकांतील निपुण लोक तेथें रुग्णालयें आणि वैद्यकशास्त्रांच्या शाळा स्थापन करून त्या चालविण्यासाठीं जात असत. संस्कृत-मधील गणित आणि ज्योतिषशास्त्राच्या पुष्कळशा ग्रंथांची आरबी भाषेंत भाषांतरेंही करण्यांत आलीं होतीं.

अशा रीतीनें आरबी लोकांनीं प्राचीन भारतीय आर्यांच्या संस्कृतीपासून पुष्कळच गोष्टी घेतल्या आणि कांहीं थोड्या गोष्टी ते हेलनिक म्हणजे ग्रीक संस्कृतीपासूनही शिकले. आरब लोक म्हणजे जणुं एक ताज्या दमाचा पहिल्यांदांच आखाड्यांत उतरलेला नवाच मानववंश होता. तसाच तो आपल्या ऐन भरांत आलेला मानववंश होता. म्हणून आपल्या सभोंवतालीं आढळणाऱ्या सर्व संस्कृतींचा घेतां येईल तेवढा फायदा त्यांनीं घेतला; त्यांच्यापासून शिकतां येईल तें सर्व त्यांनीं शिकून घेतलें. परंतु त्या पायावर त्यांनीं आपलें स्वतःचें असें निराळें कांहीं तरी जरूर निर्माण केलें; तें म्हणजेच सारासनी संस्कृति. जगांतील एकंदर संस्कृतींच्या मानानें पाहतां या संस्कृतीचें आयुष्य फार थोडें ठरलें; परंतु त्या थोड्या काळावर का होईना, या संस्कृतीचा आविष्कार मात्र मोठा प्रभावी आणि तेजस्वी असा झाला; विशेषतः तत्कालीन यूरपच्या मध्ययुगीन परिस्थितीच्या अंधकारमय पार्श्वभूमीवर तर या संस्कृतीचें तेज विशेषच खुलून दिसतें.

आरबी लोकांनीं त्यांचा जो भारतीय आर्य संस्कृति, ग्रीक संस्कृति व इराणी संस्कृति यांच्याशीं संबंध आला, त्यापासून स्वतःचा पुष्कळ फायदा करून घेतला; परंतु हिंदी, इराणी आणि ग्रीक लोकांनीं मात्र आरबांशीं त्यांचा जो हा संबंध आला त्यापासून स्वतःचा विशेष असा कांहींच फायदा करून घेतला नाहीं, हें पाहून मोठें विचित्र वाटतें. त्याचें कारण कदाचित् असें असावें, कीं आरबी लोक हे नवतारुण्ययुक्त, जोमदार आणि उत्साहानें भरलेले असे लोक होते, तर बाकीचे हे लोक म्हातारपण आलेल्या मानववंशाचे, प्राचीन काळापासून चालत आलेल्या चाकोरीलाच चिकटून राहणारे, आणि कांहीं बदल व्हावा असा फारसा विचारच कधीं मनांत न आणणारे अशा प्रकारचे लोक होते. म्हातारपणाचा एखाद्या व्यक्तीवर जो परिणाम होतो, तोच समाजावर किंवा मानववंशावरही होतो, ही मोठी विचार करण्यासारखी गोष्ट आहे; व्यक्ति काय आणि समाज काय, दोन्ही म्हातारपणामुळें हालचालीमध्यें मंद होतात,

त्यांचा शरीर आणि मन यांच्यामधील लवचिकपणा नाहींसा होतो, त्यांची बुद्धि पुराणप्रिय बनते, नवीनाचें भयच तिला वाटूं लागतें.

तात्पर्य, हिंदुस्थानचा आणि आरबांचा हा असा संबंध पुष्कळ शतकें जरी चालू राहिला, तरी हिंदुस्थानवर कांहीं त्याचा परिणाम झाला नाहीं, किंवा येथें त्यामुळें म्हणण्यासारखे बदलही घडून आले नाहींत. परंतु या एवढया काळामध्यें हा जो इस्लामचा नवा धर्म त्याबद्दल हिंदुस्थानांत कांहीं कांहीं माहिती तरी खास येऊन पोंचली असली पाहिजे. आरबी मुसलमान देशांत ठिकठिकाणीं येऊन जात होते आणि केव्हां केव्हां कांहीं लोकांना आपल्या धर्माची दीक्षाही देत होते. यांत त्यांना त्या काळीं कोणी कांहीं आडकाठी केल्याचें आढळत नाहीं, किंवा हिंदुधर्म आणि इस्लामधर्म यांच्यामध्यें कांहीं कटकट किंवा झगडाही झालेला आढळून येत नाहीं. पुढच्या काळांत मात्र या दोन धर्मांमध्यें अशी कटकट आणि असे झगडे निर्माण झाल्यावांचून राहिले नाहींत, या दृष्टीनें आधींची ही गोष्ट विशेषच लक्षांत घेण्यासारखी वाटते. इस्लामधर्म अकराव्या शतकांत जेव्हां तरवार हातांत घेऊन विजेत्याच्या थाटानें हिंदुस्थानात आला, तेव्हां मात्र त्याच्याविरुद्ध जोराची प्रतिक्रिया झाली आणि त्यापूर्वींची धर्मविषयक सहनशील, खेळीमेळीची वृत्ति नाहींशी होऊन तिच्या जागीं द्वेष आणि झगडे यांचें राज्य सुरू झालें.

अशी ही तरवार परजीत येऊन हिंदुस्थानमध्यें आग आणि मनुष्यवध याचा डोंब ज्यानें उडवून दिला, असा गृहस्थ म्हणजे गझनीचा महमूद हा होय. गझनी हें आतां अफगाणिस्तानमध्यें एक लहानसें शहर आहे. पण दहाव्या शतकांत गझनी आणि त्याच्या आसपासचा प्रदेश मिळून एक राज्य निर्माण झालेलें होतें. मध्य आशियांतील सगळींच राज्यें नांवाला पाहिलीं तर खलिफाच्या अधिराज्याखालीं होतीं. परंतु मीं सांगितलेंच आहे तुला, कीं हरून-अल्-रशीदच्या मृत्यूनंतर खलिफाची सत्ता दुर्बल होत गेली आणि अखेरीस एक काळ असा आला, कीं त्या सुमारास साम्राज्याचे अनेक तुकडे होऊन जिकडे तिकडे पुष्कळशीं स्वतंत्र राज्यें प्रस्थापित झालीं होतीं. याच काळाबद्दल आपण आतां या क्षणीं बोलतों आहों. या काळांत इ. स. ९७५ च्या सुमारास तुर्कांपैकीं गुलाम वंशांतला सबक्तगीन यानें गझनी व कंदाहार यांच्या सभोंवार आपलें स्वतःचें एक वेगळेंच राज्य स्थापन केलें. त्यानें हिंदुस्थानवरही हल्ले केले होते. त्या काळीं लाहोर येथें जयपाळ नांवाचा राजा राज्य करीत होता. जयपाळ मोठा धाडसी राजा होता. त्यानें काबूल नदीच्या खोऱ्यांत सबक्तगीनवर स्वारी केली; परंतु त्याचा तेथें पराभव झाला.

सबक्तगीनच्या पाठीमागून त्याचा मुलगा महमूद हा गादीवर आला. हा एक अत्यंत कुशल सेनानी आणि घोडदळाचा मोठा उमदा नायक होता. दरसाल तो हिंदुस्थानवर धाड घाली, येथें पुष्कळ लोकांना लुटून ठार करी आणि प्रचंड संपत्ति आणि अगणित कैदी बरोबर घेऊन परत जाई. अशा रीतीनें त्यानें एकंदर सतरा हल्ले

या देशावर केले आणि त्यांपैकीं काश्मीरवरील हल्ल्यांतच काय तो एकदां त्याचा पराभव झाला. बाकीच्या सर्व हल्ल्यांत त्याला यश आलें आणि सर्व उत्तर हिंदुस्थानभर त्याची मोठीच दहशत बसली. खालीं थेट पाटलिपुत्र, मथुरा आणि सोमनाथ येथपर्यंत तो चालून जात असे. ठाणेश्वर येथून त्यानें दोन लक्ष कैदी आणि अगणित संपत्ति नेली असें म्हणतात. परंतु सोमनाथ येथेंच त्याला सगळ्यांत अधिक संपत्ति मिळाली. कारण हें एक फारच श्रेष्ठ मंदिर असून भक्तांनीं शेंकडों वर्षें अर्पण केलेल्या वस्तूंचा तेथें मोठाच सांठा जमा होता. असें सांगतात, कीं महमुदाचा हल्ला आल्यावेळीं हजारों लोकांनीं या मंदिरात आसरा घेतला. त्यांना आशा वाटत होती, कीं ज्या देवाची आपण भक्ति करतों तो कांहीं तरी चमत्कार करून आपलें संरक्षण करील. परंतु श्रद्धावंतांच्या कल्पनाक्षेत्राच्या बाहेर इतर ठिकाणीं असे चमत्कार कधींच घडत नाहींत. त्यामुळें महमुदानें तें मंदिर फोडलें आणि लुटलें; आणि चमत्काराची वाट पाहत बसलेले ५०,००० लोक तसा कांहीं चमत्कार न घडल्यानें मृत्युमुखीं पडले.

महमूद इ. स. १०३० मध्यें मरण पावला. त्या वेळीं सर्व पंजाब व सिंध हा प्रदेश त्याच्या अमलाखालीं आलेला होता. इस्लामधर्माचा हिंदुस्थानांत प्रसार करण्यासाठीं आलेला तो एक महान् पुढारी होता असें मानलें जातें. बहुतेक सर्व मुसलमानांच्या मनांत त्याच्याविषयीं अत्यंत पूज्यभाव आहे. बहुतेक हिंदू त्याचा अत्यंत तिरस्कार करतात. तसें पाहिलें तर महमुदाला धार्मिक विचारांनीं भरलेला मनुष्य म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. तो मुसलमान होता ही गोष्ट अर्थातच खरी आहे; परंतु ती कांहीं एवढी महत्त्वाची गोष्ट नाहीं. सगळ्यांत महत्त्वाची खरी गोष्ट ही आहे, कीं महमूद हा शिपाई होता; मोठा धडाडीचा शूर शिपाई होता; लढवय्ये लोकांच्या नित्याच्या खेदकारक रिवाजास अनुसरून तोही हिंदुस्थानांत लढाई करून लूट मारण्यासाठीं म्हणून आला. आणि तो कोणत्याही धर्माचा असता तरी असाच आला असता. मोठी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे, कीं त्यानें सिंधच्या मुसलमान राजांवरही दाब आणण्यास कमी केलें नाहीं. त्यांनीं त्याचा अम्मल मान्य केला आणि खंडणी दिली तेव्हांच महमुदानें त्यांना सुखानें राहूं दिलें. फार कशाला, त्यानें बगदादच्या खलिफाला सुद्धां मारण्याची धमकी देऊन त्याच्याकडून समरकंद शहराची मागणी केली होती. तेव्हां महमूद हा कांहीं नुसताच एक यशस्वी लढाऊ गडी नसून आणखी कांहीं तरी होता अशी जी सामान्यतः चुकीची समजूत आहे, तिला आपण तरी बळी पडतां उपयोगी नाहीं.

महमुदानें आपल्याबरोबर पुष्कळ हिंदी शिल्पज्ञ आणि कारागीर नेले आणि त्यांच्या साह्यानें त्यानें गझनी येथें एक सुंदर मशीद बांधून तिला 'उरुस-इ-जन्नत' म्हणजे 'स्वर्गवधू' असें नांव दिलें. महमुदाला बागांचा फार मोठा शोक होता.

महमुदानें एका ठिकाणीं मथुरेचें ओझरतें वर्णन केलेलें आहे. त्यावरून मथुरा हें केवढें श्रेष्ठ शहर असलें पाहिजे, याची आपल्याला थोडीशी कल्पना येते. गझनी येथें त्याचा एक सुभेदार होता; त्याला लिहिलेल्या पत्रात महमूद म्हणतो, "या ठिकाणीं

(मथुरा येथें) सद्धर्मनिष्ठांच्या, मोमिनांच्या धर्मनिष्ठेप्रमाणें अचल अशा एक हजार इमारती आहेत. लक्षावधि दिनार खर्च केलेले असल्याशिवाय शहराला आजची ही अवस्था प्राप्त झालेली असणें शक्य नाहीं, आणि दोनशें वर्षांहून कमी काळामध्यें असें दुसरें शहर निर्माण करतां येणार नाहीं."

मथुरेचें महमुदानें केलेलें हें वर्णन फिरदोसीनें लिहिलेल्या त्या काळच्या वृत्तांतामध्यें आपल्याला वाचावयास मिळतें. महमुदाच्या काळीं उदयास आलेला फिरदोसी हा एक श्रेष्ठ कवि होता. गेल्या वर्षीच्या एका पत्रांत त्याचा आणि त्याचा महान् ग्रंथ जो शहानामा यांचा उल्लेख मीं केला होता, असें मला आठवतें. एक दंतकथा अशी सांगतात, कीं महमुदानें मुद्दाम सांगितल्यावरून फिरदोसीनें 'शहानामा' हा ग्रंथ लिहिला आणि त्यांतील प्रत्येक श्लोकाबद्दल–शेराबद्दल (दोन ओळींबद्दल)–एक सोन्याचा दिनार देण्याचें महमुदानें कबूल केलें होतें. परंतु आटोपशीरपणा किंवा सुटसुटीतपणा यांची बहुधा फिरदोसीला फारशी फिकीर नसावी. त्यानें इतका अवाढव्य लांबीचा ग्रंथ लिहिला, कीं अखेरीस आपले ते हजारों शेर जेव्हां त्यानें महमुदापुढें हजर केले तेव्हां महमुदानें त्याच्या ग्रंथाची स्तुति केली. परंतु "पारितोषिक देण्याचें माझें वचन अगदींच अविचाराचें होतें, तें मला पुरें करणें शक्य नाहीं" असें म्हणून कबूल केल्यापेक्षां बरीच कमी रक्कम त्यानें फिरदोसीला देऊं केली; परंतु याचा अत्यंत राग येऊन फिरदोसीनें त्याच्याकडून कांहींही घेण्याचें नाकारलें.

कांहीं थोड्याशा परिच्छेदांत आपण हर्षापासून महमुदापर्यंत भली लांब उडी मारून हिंदुस्थानच्या साडेतीनशें वर्षांहूनही अधिक काळच्या इतिहासावर नजर टाकली आहे. या काळाबद्दल मनोरंजक असें पुष्कळच सांगण्यासारखें असलें पाहिजे हें मी जाणतों. परंतु मला स्वतःला ही प्रत्यक्ष माहिती नाहीं. तेव्हां त्याबद्दल मौन धारण करणें हें अधिक शहाणपणाचें आहे. या ठिकाणचे अनेक राजेरजवाडे एकमेकांशीं नित्य कसकसे लढत आले, मधेंमधें पांचाळाच्या राज्यांप्रमाणें मोठमोठीं राज्येंही उत्तर हिंदुस्थानांत त्यांनीं स्थापन कशीं केलीं, कनोजसारख्या महान् नगरीवर केवढे दुर्दैवाचे प्रसंग ओढवले, तिच्यावर हल्ला करून कांहीं काळ काश्मीरच्या राजांनीं ती काबीज कशी केली, पुढें तिच्यावर बंगालच्या राजांचें आणि त्यानंतर दक्षिणेंतील राष्ट्रकूटांचें स्वामित्व कसें स्थापन झालें, या हकिकती कांहीं कांहीं प्रमाणांत मी तुला सांगूं शकेन. परंतु या वृत्तांताचा तसा कांहीं विशेष उपयोग नाहीं आणि उलट तुझा त्यामुळें व्यर्थ गोंधळ मात्र उडेल.

हिंदुस्थानच्या इतिहासातील एका विभागाच्या टोकापर्यंत आतां आपण येऊन पोंचलों असून येथून पुढें आतां नव्याच विभागाची सुरुवात व्हावयाची आहे. इतिहासाचे असे हे तुटक विभाग पाडणें हें मोठें बिकट काम आहे आणि तसें करणें पुष्कळदां बरेंचसें चुकीचेंही ठरतें. इतिहास हा वाहत्या नदीसारखा आहे. त्याचा ओघ सतत आणि अखंड वाहतच असतो. परंतु त्या ओघांत मधून मधून बदल

पडत असतो, आणि या ठिकाणीं पहिला ओघ संपला आणि या ठिकाणीं नवीनच प्रकारचा ओघ सुरू झाला, हें केव्हां केव्हांच सांगणें शक्य होतें. हे असे फरक एकदम आणि अगदींच विलगपणें घडून येत नसतात. त्यांचा आदि आणि अंत यांच्या छटा एकमेकांत सूक्ष्मपणें मिसळून गेलेल्या असतात. याच अर्थानें मीं म्हटलें, कीं या ठिकाणीं इतिहासाच्या कधींच अंत न पावणाऱ्या या नाटकांत हिंदुस्थानापुरतें तरी आपण एका अंकाच्या अखेरीस येऊन पोंचलों आहों. ज्याला हिंदु वर्चस्वाचा काळ म्हणता येईल, तो आतां हळूहळू संपुष्टात येऊं लागला असून गेलीं कित्येक हजार वर्षेंपर्यंत या ठिकाणीं भरभराटत राहिलेल्या भारतीय आर्य संस्कृतीवर आतां नवीनच या ठिकाणीं आलेल्या संस्कृतीशीं झगडा करण्याचा प्रसंग उभा राहिला आहे. पण ही सारी घटना कांहीं अकस्मात् घडून आलेली नाहीं हें तूं लक्षांत ठेव ; हळूहळू ही घटना घडत येत होती. महमुदाच्या-बरोबर इस्लामचा प्रवेश उत्तर हिंदुस्थानमध्ये झाला ; दक्षिण हिंदुस्थानांत त्यानंतर किती तरी दीर्घकाळपर्यंत त्याचा स्पर्शसुद्धां झाला नाहीं ; एवढेंच नव्हे, तर त्यानंतर २०० वर्षेंपर्यंत बंगालमध्यें सुद्धां इस्लामचा प्रवेश झाला नव्हता. पुढील इतिहासात आपल्या अचाट आणि बेगुमान शौर्यधैर्याबद्दल प्रसिद्धीस आलेल्या चितोड शहरीं सर्व रजपूत घराण्यांनीं एकत्र येऊन इस्लामला विरोध करण्याची संघटना केल्याचें आपण पाहतों. परंतु असें जरी होतें, तरी कसल्याही विरोधाला न जुमानतां अगदीं दृढपणें आणि वाटेंत जें येईल तें कापीत, तुडवीत मुसलमानांच्या विजयाची ही भरतीची लाट चोहोंकडे पसरली आणि कोणीं किती वैयक्तिक शौर्य गाजविलें असलें, तरी तिला कोणी अटकावून धरूं शकला नाहीं. प्राचीन भारतीय आर्यांच्या भारताचा आतां अवनतीचा काळ सुरू झाला होता, यांत बिलकुल शंका नाहीं.

परकीय विजेत्यांचें आक्रमण थांबवितां येईनासें झालें तेव्हां भारतीय आर्य-संस्कृतीच्या लोकांनीं बचावाचें धोरण स्वीकारलें. स्वसंरक्षणासाठीं आपल्याभोंवतीं एक प्रकारचें कुंपण उत्पन्न करून त्याच्या आंत दडून राहण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला. या काळपर्यंत जातिसंस्थेंत एक प्रकारचा लवचिकपणा होता ; तो काढून टाकून भारतीय आर्यसंस्कृतींत जातिसंस्था आतां अगदीं खडी चक्कडबंद करण्यांत आली. स्त्रियांचें स्वातंत्र्य तेथें कमी करण्यांत आलें. हळूहळू ग्रामपंचायतीचें स्वरूप सुद्धां बदलून त्यांत हीनपणा उत्पन्न झाला. तथापि, अशा रीतीनें आपल्याहून अधिक जोमदार अशा लोकांपुढें माघार घेत असतांही या संस्कृतीच्या वंशजांनीं त्या नव्या लोकांवरही आपला परिणाम करून त्यांनाच आपल्या प्रवृत्तीशीं मिळून घेण्याचा प्रयत्न करण्यास कमी केलें नाहीं. आणि त्यांच्या संस्कृतीच्या अंगची दुसऱ्याला आत्मसात् करून घेण्याची, आपल्यांत एकरूप करून टाकण्याची शक्ति इतकी मोठी होती, कीं कांहीं अंशीं आपल्या विजेत्यांवर सांस्कृतिक विजय मिळविण्याचें कार्य भारतीय संस्कृतीनें पार पाडलेंच.

मात्र हें लक्षात ठेव, कीं हा झगडा कांहीं आर्यसंस्कृति आणि अत्यंत सुधारलेले आरबी लोक यांच्यामध्यें नव्हता. हा झगडा चांगला सुधारलेला परंतु आतां क्षीण होत चाललेला हिंदुस्थान देश एका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला नुकतेच मुसलमानी धर्माची दीक्षा घेतलेले मध्य आशियामधील अर्धवट सुधारलेले आणि मधूनमधून भटक्या मारीत फिरणारे लोक यांच्यामध्यें होता. दुर्दैवाची गोष्ट ही, कीं हा सुधारणेचा अभाव आणि महमुदाच्या स्वाऱ्यांमधील अमानुष अत्याचार यांची हिंदी लोकांनीं एक अभेद्य सांगड घातली आणि त्यामुळें या धर्माच्या लोकांविषयीं चिडीची भावनाच येथें वाढीस लागली.

## ५२
## यूरपांतील देशांचीं स्वरूपें निश्चित होतात

*३ जून, १९३२*

आतां जरासा यूरपकडे फेरफटका करून येऊं या का बाळ? मागच्या खेपेला आपण तिकडे गेलों होतों, तेव्हां यूरपला वाईट दिवस आलेले होते. रोमचें राज्य कोलमडून पडल्यामुळें पश्चिमेकडील सगळी यूरपीय संस्कृतीच कोलमडून पडल्यासारखें झालें होतें. पूर्व यूरपांतही, कॉन्स्टान्टिनोपलच्या साम्राज्याच्या अमलाखालील मुलूख सोडला, तर बाकीच्या भागाची अवस्था याहूनही वाईट होती. हूणांचा नायक ॲटिला यानें यूरप खंडाच्या बहुतेक भागामध्यें जाळपोळ आणि मोडतोड यांचा धुमाकूळ उडवून दिला होता. पूर्वेकडचें रोमन साम्राज्य मात्र — जरी तेंही हळूहळू दुर्बल होत चाललें होतें तरीही — त्या सर्व सपाट्यात टिकून राहिलें होतें आणि तें उत्साहानें वर उसळीही मारण्याचा प्रयत्न करीत होतें.

रोमचें पतन झाल्यावर पश्चिम यूरप खंड एक प्रकारें तळापासून हादरून निघालें; आणि त्यानंतर तेथें स्थिरस्थावर होऊं लागून नवीनच प्रकारचें वळण निर्माण होतेंसें दिसूं लागलें. अर्थात् असें स्थिरस्थावर होण्याला काळ पुष्कळच लागला. परंतु हें जें कांहीं नवें वळण निर्माण होत होतें तें कशा प्रकारचें होतें, याची सुरुवातीपासूनच काहीं कांहीं कल्पना येण्यासारखी होती. पहिली गोष्ट म्हणजे ख्रिस्ती धर्माचा प्रसार वाढत होता. त्या धर्मांतील साधुसंत आणि शांततेचे पुरस्कर्ते यांच्यामुळें जसा हा प्रसार वाढत होता, तसाच त्या धर्माचा तरवारीच्या जोरावर प्रसार करणारे जे लढवय्ये राजे निघाले त्यांच्याहीमुळें तो वाढत होता. दुसरी गोष्ट म्हणजे नवीं नवीं राज्यें उदयाला येत होतीं. फ्रान्स, बेल्जम आणि जर्मनीचा कांहीं भाग या प्रदेशांवर फ्रँक लोकांनीं ( त्याना एवढ्यांतच फ्रेंच लोकाशीं एकरूप मानण्याचा गोंधळ मात्र करूं

नवव्या शतकांतील यूरपखंड



नको) क्लोव्हिस नांवाच्या राज्याच्या नेतृत्वाखालीं एक राज्य स्थापन केलें. क्लोव्हिसनें इ. स. ४८१ पासून ५२१ पर्यंत राज्य केलें. क्लोव्हिसच्या आजाच्या नांवावरून त्याच्या राजवंशाला मेरोव्हिजियन घराणें हें नांव मिळालें. परंतु या राजांची सद्दी फार दिवस चालली नाहीं; त्यांच्याच एका अधिकाऱ्यानें, राजवाड्यावरील व्यवस्थापकानेंच, त्यांना निस्तेज करून टाकलें. हे व्यवस्थापकच पुढें सर्वसत्ताधीश झाले आणि आनुवंशिकपणें तो अधिकार भोगूं लागले. खरें राज्य त्यांचेंच होतें; आणि नांवाला जे राजे होते, ते त्यांच्या हातचीं बाहुलीं मात्र होते.

इ. स. ७३२ मध्यें सारासन लोकांचा पराभव फ्रान्समध्यें टूर्स येथील घनघोर लढाईंत ज्यानें केला, तो चार्ल्स मार्टेल हा याच प्रासादाधिकाऱ्यांपैकीं एक होता. आपल्या त्या जयामुळें सारासन लोकांची देशामागून देश जिंकीत जाण्याची लाट त्यानें परतविली आणि ख्रिस्ती लोकांच्या दृष्टीनें त्यानें यूरपचें मोठ्या संकटापासून रक्षण केलें. त्यामुळें त्याची कीर्ति व प्रतिष्ठा फारच वाढली. ख्रिस्तधर्मी जगताचा शत्रूविरुद्ध दंड थोपटून उभा राहणारा नायक, पुढारी, असें लोक त्याला मानूं लागले. या सुमारास रोम येथील पोपांचें कॉन्स्टान्टिनोपल येथील बादशहाशीं जमत नाहींसें झालेलें होतें. म्हणून चार्ल्स मार्टेलकडून आपल्याला मदत मिळवावी, असा उद्योग त्यांनीं सुरू केला होता. मार्टेलचा मुलगा पेपिन यानें या नव्या राज्यांत राजाचें जें एक नुसतें बाहुलें चालत आलेलें होतें, तें काढून टाकून स्वतःच राजा होण्याचा विचार ठरविला आणि पोपनें मोठ्या आनंदानें त्याला संमति दिली.

पेपिनचा मुलगा म्हणजेच शार्लमेन. पोप पुन्हां कांहीं अडचणींत सांपडला व त्यानें शार्लमेनला आपणाला त्यांतून सोडविण्यासाठीं विनंति केली. चार्ल्सनें (शार्लमेननें) ही विनंति मान्य करून पोपच्या शत्रूंना पिटाळून लावलें आणि इ. स. ८०० च्या नाताळच्या दिवशीं रोम येथील कॅथेड्रलमध्यें मोठा समारंभ करून पोपनें त्याला रोमन बादशहाच्या पदावर यथाविधि प्रस्थापित केलें. मागें मीं तुला पवित्र रोमन साम्राज्य म्हणून सांगितलें ना, तें या दिवसापासून सुरू झालें.

हें मोठें विचित्र साम्राज्य होतें; आणि ज्या काळांत पुढें त्याचा हळूहळू लोप झाला, त्या पुढच्या काळचा त्याचा इतिहास अधिकच विचित्र आहे. ॲलिस इन दि वंडरलँड या गोष्टीमधील तें चेशायर जातीचें मांजर तुला आठवतें ना, तशी त्याची अवस्था झाली. त्या मांजराचें शरीर मुळींच दिसेनासें झालें. परंतु मागें त्याचें हास्य तेवढें दृष्टीसमोर राहिलें, त्याप्रमाणेंच. पण या सर्व पुढें होणाऱ्या गोष्टी आहेत. आतां भविष्यकाळांत इतक्यांतच खोल जाऊन पाहण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं.

हें पवित्र रोमन साम्राज्य म्हणजे, जुनें जें पश्चिम रोमन साम्राज्य, त्याचीच मागील पानावरून पुढें चालू अशी आवृत्ति मुळींच नव्हती. त्याच्यांत आणि याच्यांत बराच फरक होता. पहिली गोष्ट साऱ्या जगांत साम्राज्य असें काय तें एक फक्त हेंच

आणि एक पोप तेवढा कदाचित् सोडला, तर बाकीच्या जगामध्यें एकूण एक व्यक्तीवर या साम्राज्याच्या बादशहाचा अधिकार, अशी समजूत आतां अस्तित्वात आली. पोप श्रेष्ठ कीं बादशहा श्रेष्ठ, असाही झगडा त्या दोघांमध्यें कितीक शतकेंपर्यंत होता. पण अर्थात् हाही पुढे घडून येणारा प्रकार होता. विशेष मौजेची गोष्ट काय, तर हें साम्राज्य म्हणजे पूर्वी रोमला साऱ्या जगाची स्वामिनी समजत असत ना, त्या काळच्या सर्वश्रेष्ठ रोमन साम्राज्याचें पुनरुज्जीवन आहे, अशी कल्पना दृढ करण्यांत आली. अर्थात् त्यामध्यें एका गोष्टीची तेवढी नवीन भर होती. ती म्हणजे ख्रिस्ती धर्म आणि ख्रिस्ती जगत् यांबद्दलची. याचमुळें या साम्राज्याला 'पवित्र' म्हणूं लागले. बादशहा म्हणजे परमेश्वराचा पृथ्वीवरील एक प्रतिनिधीच, अशी समजूत; तीच गोष्ट पोपचीही. एकाकडे राज्यव्यवस्थेचा अधिकार; दुसऱ्याकडे आत्मिक जीवनाची व्यवस्था. अशी एक कल्पना तरी निदान होती आणि तिच्यापासूनच मला वाटतें, कीं यूरपमध्यें राजांच्या दैवी हक्कांची कल्पना निघाली. बादशहाला आतां धर्मसंरक्षक ही पदवी प्राप्त झाली. इंग्लंडच्या राजाला अजूनही धर्मसंरक्षक ही पदवी लावतात, हें ऐकून तुला मोठी गंमत वाटेल.

या बादशहाची मुसलमानांच्या खलिफाशीं तुलना करून पाहा. तोही आपल्याला सद्धर्मीयांचा नायक, अमीर-उल्-मोमनीन, म्हणवीत असे. खलिफा हा वस्तुतः स्वतःच बादशहाही होता आणि पोप म्हणजे धर्मगुरूही होता. पुढें त्याची सत्ता नुसती नांवाला मात्र राहिली व त्याचें स्थान म्हणजे एक निव्वळ शोभेची वस्तु होऊन राहिलें, हें आपल्याला ओघाओघानें दिसेलच.

अर्थातच कॉन्स्टान्टिनोपल येथील बादशहांना रोममध्यें नवीनच उदयास आलेलें हें 'पवित्र रोमन साम्राज्य' मुळींच मान्य नव्हतें. शार्लमेनला बादशहा म्हणून राज्याभिषेक झाला, त्या वेळीं आयरीन नांवाची एक स्त्रीच कॉन्स्टान्टिनोपलची सम्राज्ञी झाली होती. आपल्याला राजपद मिळावें म्हणून जिनें आपल्या मुलाचा वध केला, तीच ही दुष्ट बया; हिच्या काळीं त्या साम्राज्याला फार वाईट दिवस आले होते. याचमुळें कॉन्स्टान्टिनोपलच्या साम्राज्याशीं असलेले संबंध तोडून टाकून शार्लमेनला सम्राटाचा मुकुट देण्याचें धाडस पोपला करवलें.

शार्लमेन हा आतां पश्चिमेकडील ख्रिस्ती जगताचा नेता, परमेश्वराचा पृथ्वीवरील प्रतिनिधि, पवित्र साम्राज्याचा बादशहा झाला. किती पोकळ डामडौलाच्या या पदव्या आहेत खरोखर! पण लोकांचीं मनें भारून टाकून त्यांना भलत्याच गोष्टीवर विश्वास टाकावयाला लावण्यासाठीं अशा पदव्या फार मोठ्या उपयोगाच्या असतात. अधिकारपदावर असलेले लोक परमेश्वर आणि धर्म यांच्या नांवांचा उपयोग लोकांना बनवून आपली सत्ता वाढविण्यासाठीं जगांत नेहमींच करीत आलेले आढळतात. राजा, बादशहा आणि धर्माधिकारी या व्यक्ती म्हणजे सामान्य जनापासून फार फार निराळ्या, जवळजवळ देवासारख्या, अशा कोणी अवर्णनीय, अतिमानुष व्यक्ती आहेत, असें

सर्वसामान्य माणसाला वाटत असतें. त्यांच्याबद्दल त्याला जी ही एक गूढ भावना वाटत असते, त्यामुळें त्याला त्यांची भीतीही वाटते. राजदरबारांतील वागणुकीचे ते कितीक बारीकसारीक नियम, तेथली ती शिस्त, ते दरबारी लहानमोठे समारंभ आणि मंदिरें किंवा चर्चमधील पूजा-अर्चांचें अगदीं तसेंच व तितकेंच तें विविध प्रकारचें तंत्र, यांच्यामधील सारखेपणाचा थोडा विचार करून पाहा. दोन्ही ठिकाणीं ते नमस्कार, तें नाक घासणें, जमिनीवर वांकणें किंवा साष्टांग प्रणिपात करणें — चिनी लोक त्याला कोटो करणें म्हणतात — हे प्रकार अगदीं एकसारखे आढळतात. लहानपणापासून आम्हांला अधिकारी लोकांची अशी ही पूजा करावयाला नाना प्रकारानीं शिकवण्यांत येत असतें. पण हें जें भक्तीचें प्रदर्शन घडतें, तें सगळें भीतीच्या पोटीं जन्मलेलें असतें; प्रेमाच्या पोटीं नव्हे.

शार्लेमेन हा बगदादच्या हरून-अल्-रशीदचा समकालीन होता. या दोघांचा पत्रव्यवहारही चाले. आणि ही गोष्ट तूं मुद्दाम लक्षांत ठेव, कीं पूर्वेकडील रोमन साम्राज्य आणि स्पेनमधील सारासन लोक यांच्याशीं लढण्याकरितां आपण दोघांनीं दोस्तीचा तह करावा, असें खुद्द शार्लेमेननें हरून-अल्-रशीदला सुचविलें होतें. या सूचनेंतून निष्पन्न कांहीं झालें नाहीं; परंतु अशी सूचना करण्यापर्यंत तरी मजल गेली होती, यावरून राजे लोक आणि मुत्सद्दी यांचे मनोव्यापार कशा रीतीनें चालत असतात, यावर केवढा प्रचंड प्रकाश पडतो. तूंच पाहा ना आतां, "पवित्र साम्राज्या"चा हा बादशहा, ख्रिस्ती जगताचा नेता, करीत काय होता, तर एक ख्रिस्तीच राज्य आणि एक आरबी राज्य यांच्याविरुद्ध लढण्यासाठीं म्हणून बगदादच्या खलिफाच्या हातांत हात घालावयाला तयार झाला होता. स्पेनमधील सारासन लोकांनीं बगदाद येथील आब्बासी घराण्यांतील खलिफांची सत्ता मानण्याचें नाकारलें होतें, हें तुला आठवतच असेल. ते स्वतंत्र झाल्यामुळें बगदादच्या खलिफांचा त्यांच्यावर दांत होता. परंतु दोघांमध्यें अंतर फार असल्यामुळें त्यांची एकमेकांशीं लढाई होणें अशक्य झालें होतें. त्याचप्रमाणें कॉन्स्टान्टिनोपलचें साम्राज्य आणि शार्लेमेन यांच्यामध्येंही गोडी मुळींच नव्हती. परंतु याही ठिकाणीं मध्यें अंतर फार असल्यामुळें प्रत्यक्ष हातघाई होणें कठिण होतें. असें जरी होतें, तरीही योजना काय सुचविली गेली, कीं एक ख्रिस्ती आणि एक आरबी अशा राजांनीं एक होऊन ख्रिस्ती आणि आरबी अशाच इतर दोन राज्यांशीं युद्धें करावीं. राजे लोकांच्या मनांतला खरा हेतु सत्ता, अधिकार आणि संपत्ति मिळवावयाची हाच असतो. परंतु पुष्कळदां धर्माच्या बाह्य आवरणाच्या आंत तो दडवून ठेवण्यांत येत असतो. सगळीकडे हाच प्रकार झालेला आढळून येतो. हिंदुस्थानांत नाहीं का आपण पाहिलें, कीं महमूद हाही धर्माच्याच नांवाचा जप करीत आला आणि त्यानें आपला चांगलाच फायदा करून घेतला. धर्माच्या आरोळ्या ठोकून जगांत खरोखरच नेहमीं चांगली भक्कम प्राप्ति होत आलेली आढळते.

परंतु निरनिराळ्या युगांतले विचारप्रवाह सारखे निरनिराळे होत असतात;

त्यामुळें आपल्यापासून फार दूरच्या काळात जे लोक होऊन गेले, त्याना बरेंवाईट ठरविणें ही गोष्ट खरोखरच कठिण आहे, हें आपण कधीं विसरतां कामा नये. आज ज्या पुष्कळशा गोष्टी आपल्याला अगदीं साध्या आणि स्वाभाविक वाटतात, त्या त्या काळीं लोकांना अतिशय चमत्कारिक वाटल्या असण्याचा संभव आहे; आणि त्यांच्या काळच्या रोजच्या चालीरीती आणि विचारपरंपरा आज आपल्याला विचित्र वाटण्याचा संभव आहे. त्या वेळचे लोक जरी मोठमोठ्या ध्येयांच्याबद्दल आणि पवित्र साम्राज्य, परमेश्वराचा प्रतिनिधि बादशहा, आणि खिस्ताचा प्रतिनिधि पोप यांच्याबद्दल मोठमोठ्या गप्पा मारीत असले, तरी त्या काळची पश्चिम यूरपची परिस्थिति जास्तींत जास्त वाईट होती, हें निःसंशय. शार्लमेनच्या कारकीर्दीनंतर इटली व रोम यांना फारच हलाखीचे दिवस आले. रोमचा कारभार कांहीं नष्टचरित्र स्त्रीपुरुषांच्या लहरीप्रमाणें चालूं लागला आणि मनास येईल त्याला हे लोक पोप करूं लागले किंवा पोपच्या स्थानावरून भ्रष्ट करूं लागले.

रोमचा पाडाव झाल्यानंतर पश्चिम यूरपांत जी अव्यवस्था माजली होती, तिच्यामुळें तर लोकांना वाटूं लागलें होतें, कीं जुन्या साम्राज्याचें पुनरुज्जीवन केलें तर बरे दिवस येतील. तसेंच आपल्यामध्यें एक बादशहा असल्याशिवाय आपली जगांत खरी प्रतिष्ठा राहत नाहीं, असेंही कांहीं लोकांना वाटत होतें. त्या काळच्या एका प्राचीन ग्रंथकारानें चार्ल्सला बादशहा कां केलें याविषयीं लिहितांना म्हटलें आहे, "तसें केलें नसतें तर खिस्ती लोकांमध्यें बादशहाचें नांव शिल्लक राहिलें नाहीं म्हणून काफीर – बिगर खिस्ती लोकांनीं खिस्ती लोकांना हिणवलें असतें."

शार्लमेनच्या साम्राज्यामध्यें फ्रान्स, बेल्जम, हॉलंड, स्वित्झर्लंड, जर्मनीचा अर्धा भाग आणि इटली एवढ्या प्रदेशाचा समावेश होत होता. त्याच्या साम्राज्याच्या नैर्ऋत्येला आरबी अमलाखालील स्पेन देश होता. ईशान्येला स्लाव्ह आणि इतर टोळ्यांचे – वंशांचे – मुलूख होते; उत्तरेला डेन्स आणि नॉर्थमेन यांचे मुलूख, आग्नेयीला बल्गेरियन आणि सर्बियन लोकांचे मुलूख आणि त्यांच्या पलीकडे कॉन्स्टान्टिनोपलचें पूर्व रोमन साम्राज्य होतें.

शार्लमेन इ. स. ८१४ मध्यें मरण पावला आणि त्यानंतर लौकरच साम्राज्यलक्ष्मीच्या वांटण्या करण्याबाबत झगडे उत्पन्न झाले. त्याच्या वंशजांना कार्लोव्हिंजियन म्हणतात. (लॅटिन भाषेंत चार्ल्सचें रूप कॅरोलस असें होतें त्यावरून.) या त्याच्या वंशजांपैकीं कुणाला लठ्ठ, कुणाला टकल्या, कुणाला धर्मभीरू अशा पदव्या दिलेल्या आढळतात. त्यावरून पाहतां या कार्लोव्हिंजियन राजांत कांहीं दम होता, असें दिसत नाहीं. शार्लमेनच्या साम्राज्याचे जे विभाग पडले त्यांतून या सुमारास फ्रान्स आणि जर्मनी हे देश उदयास येतांना आपल्याला दिसतात. एक राष्ट्र म्हणून जर्मनीची संघटना इ. स. ८४३ या सालीं सुरू झाली असें मानतात; आणि पुढें बादशहा ऑटो दि ग्रेट यानें इ. स. ९६२ ते ९७३ पर्यंतच्या आपल्या कारकीर्दींत सर्व जर्मन

लोकांना बहुतांशीं एकजीव केलें असें म्हणतात. याच्या आधींच फ्रान्स देश स्वतंत्र झाला असून तो कांहीं आटोच्या साम्राज्यामध्यें नव्हता. इ. स. ९८७ मध्यें ह्यूजेस कॅपेट यानें दुर्बळ झालेल्या कार्लोव्हिंजियन राजघराण्याला हुसकून देऊन फ्रान्सवर आपलें प्रभुत्व स्थापन केलें. परंतु हें त्याचें प्रभुत्व म्हणण्यासारखें सार्वत्रिक व प्रभावी नव्हतें. कारण फ्रान्सचे निरनिराळे मोठे विभाग झालेले असून ते स्वतंत्र सरदारांच्या हातांत होते; व त्यांचीं आपसांत सारखीं युद्धें चालू असत. परंतु परस्परांपेक्षां त्या सर्वांना रोमचा बादशहा आणि पोप यांची भीति अधिक वाटे. म्हणून त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं ते सगळे एकत्र झाले. ह्यूजेस कॅपेटच्या काळापासून फ्रान्स हें एकजीव असें एक राष्ट्र झालें. आज एक हजार वर्षेपर्यंत, थेट आमच्या काळापर्यंत, चालत आलेल्या फ्रान्स व जर्मनी यांच्यामधील वैराचीं बीजें इतक्या त्या पहिल्या पहिल्या काळींसुद्धा आपणांस आढळून येतात. फ्रेंच आणि जर्मन यांसारख्या दोन सुधारलेल्या आणि अत्यंत उच्च बुद्धि व शक्ति असलेल्या दोन शेजारी राष्ट्रांनीं पिढ्यान्‌पिढ्या हें प्राचीन वैर असेंच धुमसत ठेवावें, हें पाहून किती चमत्कारिक वाटतें. परंतु हा दोष त्या राष्ट्रांतील लोकांचा नसून त्यांच्यामधील समाजव्यवस्थेचा असला पाहिजे.

याच सुमारास रशियाही इतिहासाच्या रंगभूमीवर प्रवेश करतो. उत्तरेकडील प्रदेशांमधील रूरिक नांवाच्या एका गृहस्थानें इ. स. ८५० सालीं रशियाच्या राज्याचा पाया घातला असें म्हणतात. इकडे यूरपच्या आग्नेय कोपऱ्यात बल्गेरियन लोक स्थिरस्थावर होऊं लागले होते, एवढेंच नव्हे, तर बाहेरच्या भागांत स्वाऱ्याही करूं लागले होते. तसेंच सर्बियन लोकही. त्याचप्रमाणें पवित्र रोमन साम्राज्य आणि नवें रशियन राज्य यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत मग्यार म्हणजेच हंगेरियन लोक, आणि पोल लोक यांनींही आपलीं स्वतंत्र राज्यें स्थापन करण्यास सुरुवात केलेली होती.

दरम्यान उत्तर यूरपांतून कांहीं लोक जहाजांतून यूरपच्या पश्चिमेकडील आणि दक्षिणेकडील देशांत आले आणि तेथें त्यांनीं लूटमार आणि जाळपोळ सुरू केली. डेन्स आणि इतर नॉर्थमेन लोकांनीं इंग्लंडमध्यें कसा धुमाकूळ घातला आणि लुटालूट केली, हें तुझ्या वाचण्यांत आलेलें आहे. याच नॉर्थमेन लोकांना पुढें नॉर्समेन आणि अखेरीस नॉर्मन म्हणूं लागले. हे पुढें भूमध्य समुद्रांत गेले आणि तेथून मोठमोठ्या नद्यांच्या मुखांतून आपलीं जहाजें घेऊन वर जाऊन जेथें जमेल तेथें त्यांनीं दरोडे घातले, कत्तली केल्या आणि लूटमार केली. या वेळीं रोममध्यें कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नव्हता, अराजक माजलेलें होतें आणि रोमची अवस्था अगदींच कींव करण्यासारखी झालेली होती. नॉर्मन लोकांनीं रोम लुटलें आणि खुद्द कॉन्स्टान्टिनोपललाही दटावण्यापर्यंत त्यांची मजल गेली. या लुटारू आणि दरोडेखोर लोकांनीं ज्या ठिकाणीं नार्मंडी परगणा आहे, त्या फ्रान्सच्या ईशान्य भागांतील प्रदेशाचा कबजा घेतला; तसेंच इटली व सिसिली हे देश काबीज करून ते या प्रदेशांत वसाहत करून स्थिरस्थावर झाले व तेथले सरदार आणि जमीनदार बनले. दरोडेखोर लोकांची चांगली चलती

सुरू झाली, म्हणजे पुढें ते नेहमींच हा मार्ग अनुसरीत असतात. फ्रान्समधील नॉर्मंडी विभागांतील याच नॉर्मन लोकांनीं कॉंकरर म्हणजे विजेता या नांवानें प्रसिद्ध असलेल्या विल्यमच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडवर स्वारी करून इ. स. १०६६ मध्यें तो देश जिंकला. अशा रीतीनें याच काळांत इंग्लंडलाही रंगरूप येऊं लागलेलें आपण पाहतों.

यूरपमध्यें आतां आपण ख्रिस्ती शकाच्या पहिल्या सहस्रकाच्या म्हणजे ख्रिस्ती शकाच्या हजार वर्षांच्या काळाच्या अखेरीस येऊन पोंचलों आहों. या सुमारास इकडे गझनीचा महमूद हिंदुस्थानमध्यें दरोडे घालीत होता; याच सुमारास आब्बासी खलिफाची सत्ता मोडकळीला आली होती. आणि सेल्जुक तुर्क लोक पश्चिम आशियामध्यें इस्लामधर्माचें पुनरुज्जीवन करीत होते. स्पेन देश अजून आरबांच्या हातांत होता; परंतु या आरबांचा आपला मायदेश जो अरबस्तान त्याच्याशीं अजिबात संबंध तुटून गेला असून बगदादच्या राज्यकर्त्यांशीं त्यांचे संबंध शत्रुत्वाचेच झाले होते. उत्तर आफ्रिका बगदादच्या साम्राज्यांतून फुटून जवळजवळ पूर्ण स्वतंत्र झाली होती. ईजिप्तमध्यें राज्य तर स्वतंत्र होतेंच, परंतु खलिफाची गादीही स्वतंत्र होती; आणि कांहीं काळपर्यंत ईजिप्तच्या खलिफाचा उत्तर आफ्रिकेवरही अम्मल चालू होता.

## ५२

# सरंजामी पद्धति

*४ जून, १९३२*

आजचे आपले फ्रान्स, जर्मनी, रशिया, इंग्लंड हे जे देश त्यांची सुरुवात कशा प्रकारें झाली याचें थोडें ओझरतें दर्शन आपण गेल्या पत्रांत घेतलें. परंतु या देशांच्या-बद्दल आज आपली ज्या प्रकारची समजूत आहे, त्याच प्रकारची समजूत या देशांबद्दल त्या सुरुवातीच्या काळच्या लोकांची होती, अशी मात्र कल्पना करूं नकोस. आज आपण हीं वेगवेगळीं राष्ट्रें आहेत अशी कल्पना करतों; हे कोण तर इंग्लिश लोक, हे म्हणे फ्रेंच किंवा जर्मन लोक, अशीं वेगवेगळीं नांवेंही त्या त्या देशांतल्या लोकांना आपण देतों; आणि हे लोकही आपापल्या देशाला मातृभूमि नाहीं तर पितृभूमि असें मानतात. आज जगांत सगळीकडे अतिशय स्पष्टपणें प्रत्ययाला येणारी ही भावना म्हणजेच राष्ट्रीयत्वाची भावना होय. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां चाललेला आपला झगडा हा याच अर्थानें राष्ट्रीय झगडा आहे. परंतु ही राष्ट्रीयत्वाची भावना पहिल्या काळीं अस्तित्वांत नव्हती. ख्रिस्त्यांचें असें एक स्वतंत्र जग, म्हणजेच मुसलमान किंवा इतर परधर्मीयांच्या दृष्टीनें वेगळया आणि विरोधी अशा व ख्रिस्ती धर्म मानणाऱ्या एका समाजाचा किंवा गटाचा प्रदेश, अशी एक प्रकारची कल्पना त्या काळीं होती. त्याच-

प्रमाणें मुसलमानांचीही बाकीचे जे सगळे त्यांच्या धर्मांत नसलेले काफीर लोक त्यांच्याहून वेगळ्या अशा इस्लामच्या जगताची कल्पना होती.

परंतु ख्रिस्ती जग किंवा इस्लामी जग या कल्पना नुसत्या विचार-सृष्टींतल्या आणि त्याही अस्पष्ट अशा गोष्टी असून लोकांच्या रोजच्या प्रत्यक्ष व्यवहारावर त्यांचा कांहींच परिणाम झालेला नव्हता. कांहीं कांहीं विशेष प्रसंगीं ख्रिस्तधर्मीयांना इस्लामधर्मीयांविरुद्ध किंवा इस्लामधर्मीयांना ख्रिस्तधर्मीयांविरुद्ध युद्धें करावयाचीं असत. अशा वेळीं लोकांचीं मनें धार्मिक उत्साहानें भडकवून त्यांना लढण्याला तयार करण्यासाठीं अशा कल्पनांचा उपयोग करण्यांत येत असे. बाकी समाजामध्यें एकराष्ट्रीयत्वाचें बंधन अद्यापि उत्पन्न झालेलें नसून त्याऐवजीं निराळ्याच प्रकारचें एक बंधन किंवा माणसामाणसांमधील परस्पर-संबंधाचें नातें त्या काळीं अस्तित्वांत होतें. हें नातें म्हणजे सरंजामी पद्धतींतून उत्पन्न झालेलें सरंजामशाहीचें बंधन किंवा नातें म्हणून म्हणतात तें होय. रोमचा पाडाव झाल्यानंतर त्या वेळपर्यंत चालत आलेली पश्चिम यूरपांतील जुनी समाजव्यवस्था पार नष्ट होऊन गेली होती. जिकडे तिकडे अव्यवस्था, अराजकता, अत्याचार आणि बळी तो कान पिळी असा प्रकार चालू झाला होता. ज्याच्या हातांत सामर्थ्य असेल तो हातांत सांपडेल तें बळकावून बसे आणि दुसरा कोणी त्याच्याहून अधिक बलवान् मनुष्य येऊन त्यानें तें हिसकावून घेतलें नाहीं तोंपर्यंत त्याचा उपभोग त्याला घ्यावयास मिळे. त्यासाठीं मग मोठमोठे गड–किल्ले–बांधण्यास सुरुवात झाली. या किल्ल्यांचे स्वामी आपल्याबरोबर दरोडे घालणाऱ्या टोळ्या घेऊन बाहेर पडत, आजूबाजूच्या छोट्या छोट्या गांवांत लूटमार करीत; कधीं कधीं त्यांना आपल्यासारख्याच दुसऱ्या कोणा किल्ल्याच्या मालकाशीं लढावेंही लागे. गरीब शेतकरी आणि शेतकाम करणारे मजूर यांना अर्थातच यांचा सर्वांत अधिक छळ सोसावा लागे. असा हा जो गोंधळ माजून राहिला होता, त्यांतूनच पुढें सरंजामी पद्धति निर्माण झाली.

या शेतकऱ्यांची आपसांत कसल्याच प्रकारची संघटना नव्हती. त्यामुळें या दरोडेखोर किल्ले-मालकांपासून–सरदारांपासून–आपलें संरक्षण करणें त्यांना शक्य होत नव्हतें. बरें, मध्यवर्ती राज्यसत्ता त्यांचें रक्षण करील म्हणावें तर अशी राज्यसत्ताही नव्हती. म्हणून आलेल्या प्रसंगांतून कशी तरी तोड काढावयाची म्हणून शेतकऱ्यांनीं लूटमार करणाऱ्या या किल्लेमालकांशीं तडजोडी केल्या. शेतकऱ्यांनीं शेतीचा जो माल उत्पन्न होईल त्यापैकीं कांहीं वाटा या दरोडेखोरांच्या नायकाला द्यावयाचा; तसेंच त्याच्याकडे कांहीं एक प्रकारची सेवाचाकरीही करावयाची; आणि याच्या मोबदल्यात अशा सरदारानें मग त्यांची लूटमार करून त्यांना त्रास द्यावयाचा नाहीं; आणि दुसरा कोणी सरदार तसें करावयास आला, तर त्याच्यापासूनही त्यांचें संरक्षण करावयाचें; अशा प्रकारची ही तडजोड होती. अशाच रीतीनें छोट्या छोट्या किल्लेमालकांच्या मोठमोठ्या किल्लेमालकांशीं पण तडजोडी झाल्या. पण छोटा किल्लेमालक मोठ्या किल्ले-

मालकाला शेतांतला माल देण्याचें कसें कबूल करणार? कारण तो कांहीं स्वतः जमीन कसून कसला माल काढीत नव्हता किंवा तो स्वतः शेतमालक पण नव्हता. म्हणून त्यानें त्या मोठ्या किल्लेवाल्याकडे लष्करी चाकरी करण्याचें म्हणजेच जरूर पडेल तेव्हां त्याच्या बाजूनें लढण्याचें कबूल केलें. याच्या मोबदल्यांत मोठ्या किल्लेदारानें त्याला आपला मांडलिक समजून त्याचें संरक्षण करावयाचें. अशा रीतीनें एकेक पायरी चढत चढत हें गाडें एकापेक्षां एक मोठ्या सरदार-हक्कदारापर्यंत जातां जातां या सरंजामदारी संघटनेच्या अगदीं शिखरावरील जो राजा त्याच्यापर्यंत जाऊन पोंचलें. पण तेथेंच तें थांबलें नाहीं. स्वर्गांतसुद्धां त्यांच्या दृष्टीनें अशा या सरंजामी पद्धतीचें एक प्रकारें अस्तित्व होतें. पोप, ख्रिस्त आणि परमेश्वर अशा चढत्या पायऱ्यांच्या त्रिमूर्तींचा तेथें अधिकार व त्या सर्वांत श्रेष्ठ परमेश्वर अशी कल्पना बसविण्यांत आलेली होती.

रोमच्या पाडावानंतर यूरपमध्यें जी बंडाळी माजली होती तिच्यांतून जी समाज-व्यवस्था निर्माण झाली ती ही अशा प्रकारची. मुद्दाम लक्षांत ठेव, कीं या पद्धतींत या वेळीं मध्यवर्ती अशी एखादी राज्यसत्ता जवळजवळ नव्हतीच; आणि अशा कोणाचें पोलीसदल, किंवा अधिकारी-मंडळ अशीही कांहीं व्यवस्था नव्हती. एखाद्या जमिनीचा जो मालक असेल तोच त्या जमिनीचा आणि त्या जमिनीवर राहणाऱ्या सर्व लोकांचा मालक, अधिकारी, सर्व कांहीं असे. त्या लोकांचा तो छोटासा राजाच म्हणा ना. लोकांनीं त्याला जमिनींत होणाऱ्या मालापैकीं काहीं माल द्यावयाचा व त्याची चाकरी करावयाची आणि त्यानें त्यांचें संरक्षण करावयाचें. या जमीन-मालकाला स्वामी म्हणत आणि लोकांना भूदास म्हणत. असा हा जमीनदार प्रत्यक्षांत जरी मालक म्हणून वावरत असला, तरी तत्त्वतः त्याची जमीन कांहीं त्याच्या मालकीची समजली जात नसे. तर त्याच्या वरचा जो लॉर्ड किंवा सरदार, जमीनदार असेल, त्याच्या वतीनें ही जमीन या छोट्या सरदाराकडे दिलेली असून तो त्या मोठ्या जमीनदाराचा पोट-जमीनदार किंवा दुय्यम सरदार होय असें समजण्यांत येई व त्यासाठीं त्याला त्या मोठ्या जमीनदाराची लष्करी चाकरी पण करावी लागे.

धर्मपीठाचे अधिकारी सुद्धां या सरंजामशाहीमध्यें सामील असत. ते एकीकडे धर्मगुरू असत, तर एकीकडे सरंजामदार, जमीनमालक असत. अशा रीतीनें जर्मनीमध्यें जवळजवळ अर्धी जमीन आणि मालमत्ता बिशप आणि ॲबट अशा धर्मपीठांच्या अधिकाऱ्यांच्या हातीं होती. प्रत्यक्ष पोपसुद्धां एक सरंजामदारच झाला होता.

या सर्व पद्धतींमध्यें एकापेक्षां एक श्रेष्ठ असे थर किंवा वर्ग असत, हें तुझ्या ध्यानांत आलें असेल. समतेची यामध्यें मुळीं कल्पना सुद्धां नव्हती. अगदीं तळाशीं होते भूदास, त्यांच्या वर ते छोटे जमीनदार, त्यांच्या वर मोठे जमीनदार, त्यापुढें त्यांच्याहून मोठे सरदार आणि शेवटीं राजा अशा प्रकारची ही मोठी समाजाची इमारत होती आणि तिचा सर्व आधार आणि भार पायामधल्या या भूदासांच्या माथ्यावर होता. त्याच्याच भरतीला बिशप, ॲबट, कार्डिनल वगैरे मोठे आणि इतर

सर्व छोटे धर्माधिकारी, धर्मगुरू, भिक्षुकवर्ग याच्यासुद्धां धर्मपीठाचा सर्व खर्चही भूदासांच्याच डोक्यावर लादला जावयाचा. हे जहागिरदार – सरंजामदार – जमीनदार, मग ते छोटे असोत किंवा मोठे असोत, कसलेंही धनधान्य किंवा मालमत्ता निर्माण होईल अशा प्रकारचें कांहीं एक काम करीत नसत. त्यांचा एकमेव धंदा म्हणजे लढण्याचा, आणि तो चालू नसेल तेव्हां शिकार करण्याचा किंवा लुटुपुटीच्या लढाया किंवा मैदानी खेळ खेळण्याचा. अगदींच रानगट आणि अक्षरशत्रू अशा लोकांचें तें एक टोळकें असून लढणें किंवा खाणेंपिणें यावांचून इतर कसलेंच करमणुकीचें साधन त्यांच्या माहितीचें नव्हतें. त्यामुळें धनधान्य, खाद्यपदार्थ व आयुष्यातील इतर आवश्यक वस्तू निर्माण करण्याचें काम सर्वस्वीं केवळ शेतकरी आणि कारागीर लोक यांच्यावर पडे. या सर्व समाजव्यवस्थेच्या डोक्यावर एक राजा म्हणून असायचा आणि त्यालाही परमेश्वराचा एक दुय्यम सरंजामदारच समजावयाचें.

अशा प्रकारच्या कल्पनेच्या पायावर ही सरंजामशाहीची पद्धति उभारली गेली. तत्त्वतः या सरंजामदार-जहागिरदारांनीं आपल्या पोट-जमीनदारांचें आणि भूदासांचें संरक्षण केलें पाहिजे, अशी त्यांच्यावर जबाबदारी होती. पण प्रत्यक्षांत त्यांना विचारता कोणीच नव्हता; काय वाटेल तें करायला ते मुखत्यार होते. कारण त्यांच्याहून जे खालचे वरिष्ठ जमीनदार होते ते किंवा प्रत्यक्ष राजा यांपैकीं कोणी त्यांच्यावर नियंत्रण असें क्वचितच चालवीत असे. आणि त्यांच्या मागण्यांना नाहीं म्हणण्याची भूदासांची कुवत नव्हती. त्याच्या मानानें हे जमीनदार स्वतः फारच प्रबळ असल्यामुळें त्यांच्याकडून ते जास्तींत जास्त वसूल करीत आणि त्यांना बिचाऱ्यांना कसेंबसें जिवंत राहतां येईल एवढेंच काय तें शिल्लक ठेवीत. साऱ्या जगांतील जमीन-मालकांचा हा नेहमींच चालत आलेला प्रघात आहे. जमिनीच्या मालकींतून पुढें सरदारवर्ग निर्माण झाला. मूळचा जो दरोडेखोर लढवय्या होता, तो लोकांच्या जमिनी लुबाडून तेथें किल्ला बांधून आता मोठा प्रतिष्ठित राव – सरदार – उमराव – लॉर्ड झाला. जमिनीच्या मालकीबरोबर सत्ताही आली; आणि या सत्तेच्या बळावर प्रत्यक्ष माल पिकाविणारा शेतकरी, शेतमजूर किंवा कारखानदार आणि कारागीर यांच्याकडून जितका उकळता येईल तितका फायदा हे सरंजामदार उकळीत आलेले आहेत. आजवर सगळीकडे कायदेसुद्धां या जमीनमालकांच्या, सरंजामदारांच्या, रावांच्या फायद्याचे! कारण ते तरी त्यांनींच स्वतः किंवा त्यांच्या स्नेह्यासोबत्यांनीं केलेले. आणि म्हणूनच तर पुष्कळ लोकांना असें वाटूं लागलें आहे, कीं जमीन ही एकट्या व्यक्तीच्या मालकीची नसावी; ती साऱ्या समाजाच्या मालकीची असावी. जमीन जर अशा रीतीनें राज्याच्या किंवा समाजाच्या मालकीची झाली, तर त्याचा अर्थ त्या जमिनीवर जे राहतील त्या सर्वांच्या मालकीची ती होऊन तिच्यावर कोणालाही एकमेकांची पिळणूक करतां येणार नाहीं किंवा कोणावर कसला अन्याय्य बोजा टाकतां येणार नाहीं.

पण या सगळ्या कल्पना अजून पुढें उदयाला यायच्या होत्या. आपण ज्या

काळाबद्दल बोलतों आहों त्या काळीं लोकांचे विचार अजून अशा प्रकारचे होऊं लागले नव्हते. सामान्य जनतेची परिस्थिति होती दैन्याचीच. परंतु आपल्यावरील अडचणींचें निवारण कसें करावें याचा त्यांना कांहींच मार्ग उमगत नव्हता. म्हणून ते होईल तो सारा छळ सोशीत होते; आणि ज्यापासून त्यांचें कांहीं भलें होत नव्हतें असे श्रमसायास ते करीतच होते. आज्ञापालनाचें महत्त्व रोज ओरडून त्यांच्या हाडींमासीं ती संवय खिळवून टाकण्यांत आलेली होती; एकदां ही हुकमी संवय अंगीं बाणली, म्हणजे मग लोक खरोखर काय वाटेल तें सहन करतील. अशा रीतीनें एका बाजूला हे सरंजामदार-उमराव व त्यांचे नोकर-चाकर आणि दुसऱ्या बाजूला अत्यंत गरीब असे शेतकरी व कारागीर यांचा वर्ग, अशा प्रकारची समाजव्यवस्था या काळात रंगारूपाला येतांना आपणांस आढळते. सरदाराच्या त्या भव्य दगडी कोटाभोंवतीं भूदासांच्या मातीच्या किंवा कुडामाडांच्या छोट्या छोट्या झोंपडयांचे पुंजके पुंजके असावयाचे. हीं दोन अगदीं निरनिराळीं जगेंच निर्माण होत होतीं; एक जमीनदार-उमरावाचें जग आणि एक भूदासांचें जग; आणि त्यातही भूदास म्हणजे आपल्या पाळीव जनावरांच्यापेक्षां थोडासा वरच्या दर्जाचा एक प्राणी अशीच बहुधा जमीनदारांची त्यांच्याबद्दल समजूत असावयाची.

केव्हां केव्हा छोट्या पाद्री लोकांनीं भूदासांचें आपल्या रावांच्या छळापासून रक्षण केल्याचें आढळून येतें. परंतु सामान्य नियम म्हणजे पाद्री आणि धर्मपीठांचे अधिकारी हे या रावांच्याच बाजूला असावयाचे; आणि बिशप व ॲबट लोक तर स्वतःच सरंजामी जमीनदार-राव-असावयाचे.

आपल्या इकडे हिंदुस्थानांत अगदीं थेट याच स्वरूपाची सरंजामशाही अस्तित्वांत नसली, तरी थोडाफार त्याच प्रकारचा नमुना आपल्याकडेही निर्माण होऊन गेलेला आहे. फार कशाला, अगदीं आजसुद्धां आमचीं हिंदी संस्थानें, त्यांमधील ते राजे, त्यांचे छोटेमोठे सरदार आणि लहानमोठे जहागिरदार यांनीं सरंजामदारशाहीच्या किती-एक चालीरीती जिवंत ठेवलेल्या आहेतच. हिंदुस्थानांतील जातिव्यवस्था ही या सरंजामशाहीहून अगदींच निराळ्या प्रकारची समाजव्यवस्था होती. परंतु तिच्या-मध्येंही समाजाचे निरनिराळे उच्चनीच वर्ग ठरविण्यांत आलेले आहेतच. मला वाटतें, मीं मागें एकदां तुला सांगितलेलें असावें, कीं चीनमध्यें मात्र अनियंत्रित सत्ताधारी किंवा कांहीं खास हक्क उपभोगणारा अशा तऱ्हेचा एखादा वर्ग निर्माण झाला नाहीं. त्यांच्यामध्यें फार प्राचीन काळीं जी परीक्षेची पद्धति सुरू झाली, तिच्यामुळें मोठ्यांत मोठी अधिकाराची जागा मिळण्याचा मार्ग कोणाही व्यक्तीला खुला झालेला होता. अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारात त्या मार्गात अनेक बंधनें आलेलीं असणार हें खरेंच.

तेव्हां अशा रीतीनें सरंजामशाहीमध्यें समता किंवा व्यक्तिस्वातंत्र्य या कल्पनांना स्थान नव्हतें. हक्क आणि कर्तव्यें याबद्दलची एक प्रकारची कल्पना या समाज-व्यवस्थेच्या बुडाशीं होती. म्हणजे काय, तर जमिनींतील उत्पन्नापैकीं कांहीं भाग व

सेवाचाकरी घेण्याचा आपला हक्क आहे, आणि लोकांना संरक्षण देणें आपलें कर्तव्य आहे, असें धरून जमीनदारानें–रावानें–वागावयाचें होतें. परंतु जगांत नेहमींच हक्काची तेवढी आठवण राहत असते आणि कर्तव्याची जाणीव राहत नसते. आजही यूरपीय देशांत आणि हिंदुस्थानात मोठमोठाले जमीनदार आपणाला आढळतात. आपल्या कुळाकडून हे प्रचंड रकमा वसूल करतात आणि स्वतः कसल्याही प्रकारचे श्रम करीत नाहींत; परंतु आपलें कांहीं कर्तव्य आहे याबद्दलची त्याची आठवण बुजून गेल्याला आतां कितीक युगें लोटून गेलीं आहेत!

यूरपमधील या प्राचीन रानटी टोळया मुळामध्यें व्यक्तिस्वातंत्र्याच्या इतक्या मोठ्या भोक्त्या असतांही ज्या सरंजामशाहीमध्यें त्यांचें तें स्वातंत्र्य अजिबात नाहींसें झालें, अशा सरंजामशाहीच्या आहारीं त्या हळूहळू कशा गेल्या याचें मात्र मोठें आश्चर्य वाटतें. पूर्वी ह्या टोळया आपला नायक आपणच निवडीत असत आणि नायकावरही त्यांचें नियंत्रण चालत असे. पण त्या ठिकाणीं आतां या नव्या पद्धतींत जिकडे तिकडे अनियंत्रित एकतंत्री झोंडशाही सुरू झालेली आढळते. निवडणुकीचें त्यात आता कोठें नांवसुद्धां राहिलें नाहीं. असा हा बदल कशामुळें घडून आला, हें मात्र मला निश्चयानें सांगतां येणार नाहीं. ख्रिस्ती धर्मपीठ ज्या प्रकारच्या तत्त्वांचा प्रसार करीत होतें, त्या तत्त्वामुळें कदाचित् व्यक्तिस्वातंत्र्यविरोधी कल्पनांचा प्रसार झाला असेल. त्यांच्या तत्त्वांप्रमाणें राजा हा या पृथ्वीवरील परमेश्वराची छायाच होऊन गेला; मग प्रत्यक्ष परमेश्वराच्या या छायेची अवज्ञा कोणीं कशी करावयाची किंवा त्याच्या कोणत्याही करण्याला बरेंवाईट तरी कसें म्हणावयाचें? त्याला हें कर किंवा तें करू नको, असें कसें बोलावयाचें? सरंजामशाहीच्या पोतडींत स्वर्ग आणि पृथ्वी दोहोंचाही समावेश झालेला दिसत होता!

इकडे हिंदुस्थानमध्येंही प्राचीन भारतीयांची स्वातंत्र्याची कल्पना हळूहळू बदलत गेलेली दिसते. येथेंही हळूहळू त्यासंबंधींच्या भावना दुर्बल होत जाऊन पुढे स्वतंत्रतेच्या विचारांचें पूर्ण विस्मरणच झालेलें आढळतें. मध्ययुगीन भारतांत मात्र या कल्पनेची कांहीं अंशीं आठवण शिल्लक होती, असें शुक्राचार्यांच्या नीतिसारावरून आणि दक्षिणेंतील शिलालेखांवरून दिसून येतें, हें मीं तुला दाखविलेंच आहे.

या ज्या नवीन सामाजिक परंपरा यूरपमध्यें निर्माण होत होत्या, त्यांतूनच पुढें थोडेंफार व्यक्तिस्वातंत्र्य यूरपमध्यें निर्माण झालें. जमीनदार आणि जमिनी कसणारे लोक, राव आणि त्यांचे भूदास, यांशिवायही समाजांत आणखी कांहीं वर्ग होते. उदाहरणार्थ, कारागीर आणि व्यापारी. हे लोक तसें पाहिलें तर, आपापल्या धंद्याच्या क्षेत्रापुरतें कांहीं या सरंजामशाहींत समाविष्ट नव्हते. सुरुवातीच्या बंडाळीच्या काळांत व्यापार म्हणण्यासारखा नव्हताच आणि कारागिरीचे दिवसही भरभराटीचे नव्हते. परंतु हळूहळू व्यापारधंदा वाढूं लागला व कारागिरांचा माल बनविणारे आणि व्यापारधंदा करणारे लोक यांचें महत्त्व वाढूं लागलें. हे लोक संपत्तिमान् झाले आणि सरंजामदार–

जहागीरदार–राव लोक त्यांचेकडे कर्जाऊ रकमा मागण्यासाठीं जाऊं लागले. या लोकांनीं त्यांना कर्जे देण्याचें कबूल केलें. परंतु त्याच्या मोबदल्यांत रावांकडून त्यांनीं आधीं कांहीं खास हक्क व सवलती मिळवून घेतल्या. या सवलतींमुळें त्यांचें बळ वाढलें. अशा रीतीनें मग रावांचा कोट आणि त्यांच्याभोंवतीं भूदासांच्या झोपड्यांचे पुंजके अशी जी वसाहतीची पद्धति होती, तिच्या ऐवजीं छोटीं छोटीं शहरें निर्माण होऊं लागलीं. मध्यें एक कॅथेड्रल किंवा प्रार्थनामंदिर किंवा व्यापारी व कारागीर-संघाची कचेरीची इमारत आणि तिच्याभोंवतीं सगळीकडे घरें अशी या शहरांची रचना असे. व्यापारी आणि कारागीर यांनीं आपापले संघ स्थापन केलेले होते. या संघांची कचेरी एका मध्यवर्ती दिवाणखान्यामध्यें असे; अशा दिवाणखान्यांनाच पुढें टॉऊन हॉल म्हणजे नगर-भवन असें म्हणूं लागले.

अशीं हीं जीं शहरें निर्माण होऊं लागलीं होतीं – उदाहरणार्थ, कोलोन, फ्रांकफोर्ट, हॅंबर्ग वगैरे – तीं सरंजामदार–रावांच्या सत्तेला प्रतिस्पर्धी स्थानेंच बनूं लागलीं. व्यापारी व कारागीर यांचा या शहरांमधून एक नवीनच वर्ग समाजांत निर्माण होत गेला. हा वर्ग संपत्तिमान् होत जाऊन सरंजामदार–रावांची सत्ता न जुमानण्या-इतकी शक्ति त्याच्या ठिकाणीं निर्माण झाली. या दोन वर्गांमधील हा झगडा फार काळपर्यंत चालू होता; कित्येकदां स्वतः राजे लोक आपल्या सरदारदरकाराच्या सत्तेला भिऊन या शहरांच्या बाजूला जाऊन मिळतांना आढळतात. पण पुन्हा मी फार पुढच्या काळांत धांव घेऊं लागलों.

या पत्रांच्या सुरुवातीला मी तुला सांगत होतों, कीं त्या पहिल्या काळीं एक-राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण झालेली नव्हती. आपलें व्यक्तीचें कर्तव्य आणि आपल्या वरिष्ठ रावाबद्दल बाळगण्याची निष्ठा, एवढ्याच कल्पना लोकांना ठाऊक होत्या. त्या रावाची चाकरी करण्याबद्दल लोकांची प्रतिज्ञा असे; देशाची चाकरी करण्याबद्दल नव्हे. राजाचीसुद्धा त्यांना तशी म्हणण्यासारखी स्पष्ट कल्पना नव्हती. इतकें सामान्य जनतेंत आणि राजामध्यें अंतर होतें. रावानें, सरंजामदारानें जर राजा-विरुद्ध बंड केलें, तर लोक मानीत, कीं तो त्याचा प्रश्न आहे; आणि रावाचे मांडलिक किंवा दुय्यम जमीनदार हे मुकाट्यानें त्याचीच साथ करीत. पुढच्या काळांत एकराष्ट्रीयत्वाची जी कल्पना उदयास आली, तिच्याहून हें तंत्र अगदीं निराळें होतें.

# ५४
# चीनमधून भटक्या टोळ्यांना पश्चिमेकडे पिटाळून देण्यांत येतें

५ जून, १९३२

फार दिवस होऊन गेले, मला वाटतें जवळजवळ एक महिना झाला असेल, मीं तुला चीन किंवा अतिपूर्वेकडील देश यांच्याबद्दल कांहीं लिहिलें नाहीं त्याला. यूरप, हिंदुस्थान आणि पश्चिम आशिया इकडील घडामोडींसंबंधींच आपण आतांपर्यंत विचार केला. त्यामध्यें आरबी लोक चोहोंकडे पसरून त्यांनीं अनेक देश जिंकले आणि यूरपखंड मागें पडून तेथें सगळीकडे अंधकार होऊन गेला व त्यामधून बाहेर पडण्याकरितां धडपड सुरू झाली, हें आपण पाहिलें. या सर्व काळांत चीनचें गाडें नुसतें चालू होतें, एवढेंच नव्हे, तर तें क्वचित् एखादा अपवाद सोडला तर फार चांगल्या रीतीनें चालू होतें. सातव्या आणि आठव्या शतकामध्यें तंग राजांच्या अमलाखालीं चीन देश हा साऱ्या जगांत जास्तींत जास्त सुधारलेला, जास्तींत जास्त संपन्न आणि जास्तींत जास्त चांगल्या प्रकारची राज्यव्यवस्था असलेला देश होता, असें म्हणता येईल. त्या काळच्या यूरपची तर चीनशीं तुलनासुद्धां करतां येणार नाहीं. कारण तिकडे रोमचा पाडाव झालेला असून सगळीकडे अतिशयच मागासलेपणा आलेला होता. इकडे उत्तर हिंदुस्थानमध्येंही हा सर्व काळ ओहोटीचाच होता. त्याही सुमारास, उदाहरणार्थ, हर्षाच्या अमलाच्या वेळीं हिंदुस्थानला केव्हां केव्हां ऐश्वर्याचे थोडेसे दिवस लाभलेले आढळतात; परंतु एकंदरींत पाहतां येथेंही घसरगुंडीच सुरू झालेली होती. उत्तर हिंदुस्थानच्या मानानें दक्षिण हिंदुस्थान पुष्कळच जोमांत होतें. आणि तेथील लोकांच्या समुद्रापलीकडच्या अङ्कोर, श्रीविजय वगैरे वसाहती आपल्या महान् उदय-कालाच्या उंबरठ्यावर होत्या. परंतु त्या काळच्या चीनशीं ज्यांची कांहीं कांहीं बाबतींत बरीचशी बरोबरी पाहतां येईल अशीं फक्त दोनच राज्यें होतीं. तीं म्हणजे आरबांचीं बगदाद आणि स्पेन येथील राज्यें. परंतु हीं राज्यें सुद्धां वैभवशिखरावर अशीं, चीनच्या मानानें पाहतां, फारच थोडा काळ राहिलीं. तरीपण हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे, कीं एकदां एका तंग बादशहाला जेव्हां गादीवरून हांकलून देण्यांत आलें होतें, त्या वेळीं त्यानें या आरबी लोकांचीच मदत मागितली आणि त्यांच्याच मदतीनें त्यानें आपली सत्ता परत मिळविली.

तात्पर्य, त्या काळीं चीन देशाचा रथ चांगला सुधारणेच्या मार्गावर असून तत्कालीन यूरपीयांना चिनी लोक जर अर्धवट रानटी समजत असले, तर त्यांत त्यांना कांहीं दोष देतां येण्यासारखा नाहीं. त्या काळीं माहीत असलेल्या सर्व जगांत चीन

देश हाच सर्वश्रेष्ठ देश होता. माहीत असलेलें जग हे शब्द मी मुद्दाम वापरतों आहे. कारण त्या काळीं अमेरिकेंत कोणत्या घडामोडी चाललेल्या होत्या हें मला नीटसें ठाऊक नाहीं. या काळाच्या आधींच कित्येक शतकांपासून मेक्सिको, पेरू आणि या देशांच्या आसपासचे प्रदेश यांमध्यें भिन्न भिन्न प्रकारची सुधारणा नांदत होती, एवढें आपल्याला आता ठाऊक झालेलें आहे. कांहीं कांहीं बाबतींत हे देश विशेष नांवाजण्यासारखे सुधारलेले होते ; तर कांहीं बाबतींत ते तितकेच मागासलेले होते. परंतु माझें या देशांबद्दलचें ज्ञान इतकें थोडें आहे, कीं त्यासंबंधीं विशेष तपशिलाचें असें मला कांहीं सांगतां येणार नाहीं. पण या देशांचा, मेक्सिको आणि मध्य अमेरिका यांमधील मय-सुधारणेचा आणि पेरूमधील इन्कांच्या राज्यांचा विसर तूं मात्र होऊं देऊं नकोस. माझ्याहून अधिक ज्ञान असणारे लोक तुला त्याबद्दल पुष्कळ अधिक उपयुक्त माहिती सांगूं शकतील. मला त्यांच्याबद्दल एक प्रकारची विशेष ओढ वाटते हें कबूल ; पण जितकी माझी ओढ मोठी आहे, तितकेंच मोठें माझें त्यांच्याविषयींचें अज्ञान आहे.

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवायला मला तुला सांगावयाचें आहे. यापूर्वीच्या पत्रांमध्यें आपण पाहिलें, कीं मध्य आशियामध्यें पुष्कळशा भटक्या टोळ्या उत्पन्न होऊन त्या यूरप किंवा हिंदुस्थान या प्रदेशाकडे हल्ले करून गेल्या. हूण लोक, सिथियन लोक, तुर्क लोक, या आणि अशाच इतर वंशांच्या एकामागून एक लाटाच जणुं आल्या. श्वेत हूण हिंदुस्थानमध्यें आले आणि ॲटिलाचे हूण यूरपमध्यें गेले, हें तुला आठवत असेल. बगदादचें साम्राज्य काबीज करणारे सेल्जुक तुर्क हेही मध्य-आशियामधून आलेले होते. त्यांच्यामागून ज्यांना आटोमन म्हणजे उस्मानी तुर्क म्हणत, त्या तुर्कांची दुसरी एक शाखा येऊन तिनें कॉन्स्टान्टिनोपलचें साम्राज्य पूर्ण जिंकून घेतलें आणि थेट व्हिएन्नाच्या तटापर्यंत मोर्चा नेला. मध्य आशिया किंवा मंगोलिया यांमधूनच मंगोलियन लोक निघाले; हे मोठे क्रूर लोक असून त्यांनीं थेट यूरपपर्यंतचा देश जिंकला आणि चीन देशही आपल्या अमलाखालीं आणला. त्यांच्याच वंशजांपैकीं एकानें पुढें हिंदुस्थानांत आपलें राजघराणें आणि साम्राज्य स्थापन केलें. आणि त्या घराण्यांत पुढें पुष्कळ प्रसिद्ध राजे उदयास आले. अर्थात् या घटना पुढच्या काळांत घडून आलेल्या आहेत.

मध्य आशिया व मंगोलिया यांमधील या भटक्या टोळ्यांशीं चीनचें सतत युद्ध चालू होतें. किंवा खरें म्हणजे, हे भटक्ये लोकच चीनला एकसारखे हल्ले करून त्रास देत आणि चीनला स्वसंरक्षणासाठीं म्हणून लढणें भाग पडे. या लोकांपासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून तर चीनची ती प्रचंड भिंत बांधण्यांत आली. तिचा कांहीं थोडासा उपयोगही झाला, नाहीं असें नाहीं ; परंतु बाहेरच्या हल्ल्यांपासून संरक्षण करावयाला अशा बिचाऱ्या भिंतीचा कितीसा उपयोग होणार ? दरेक बादशहाला या टोळ्यांना मागें हटविण्याकरिता लढाया कराव्या लागतच. या टोळ्यांना मागें हटवितां

हटवितांच चीनचें साम्राज्य, मीं तुला मागें सांगितल्याप्रमाणें, कॅस्पियन समुद्रापर्यंत वाढत गेलें. चिनी लोकांना स्वभावतः साम्राज्यवर्धनाची मोठीशी आवड नव्हती. त्यांच्यामधील कांहीं कांहीं बादशहांना देश जिंकण्याची महत्त्वाकांक्षा असून ते साम्राज्यवादी होते असें म्हणतां येईल. पण जगांतल्या इतर लोकांच्या मानाने पाहतां चिनी लोक हे शांतताप्रिय असून युद्धें आणि देश जिंकणें या गोष्टींची त्याना आवड नव्हती. चीनमध्यें योध्यापेक्षां विद्वान् माणसाला नेहमीं अधिक मान मिळत आलेला आहे. असें असूनही कांहीं कांहीं काळीं चीनच्या साम्राज्याचा विस्तार फारच प्रचंड वाढलेला आढळतो याचें कारण उत्तरेकडून आणि पश्चिमेकडून या भटक्या टोळ्यांचे जे हल्ले होत किंवा जे उगीच चिमटे घेण्याचे प्रयत्न होत, त्यामुळें आलेली चीड हें होय. चिनी बादशहा फारच प्रबळ होते. म्हणून ही कटकट कायमची मिटवून टाकावी यासाठीं त्यांनीं या टोळ्यांना पश्चिमेकडे फार दूरवर पिटाळून लावलें. याचा अर्थ ही कटकट अगदीं कायमची त्यांना मिटवितां आली असें नव्हे; परंतु कांहीं काळ तरी त्याना शांतता मिळाली.

पण चिनी लोकांना जी ही उसंत मिळाली तिचा वचपा मात्र दुसऱ्या देशांवर आणि लोकांवर निघाला. कारण चिनी लोकांनीं तिकडून हांकून दिल्यावर या भटक्या लोकांनीं दुसऱ्या बाजूला जाऊन इतर देशांवर हल्ले केले. ते हिंदुस्थानमध्यें आले. यूरपमध्यें तर त्यांनीं वारंवार हल्ले केले. चीनमधील हानवंशीय बादशहांनीं उधळून लावलेले हूण, तार्तर आणि इतर भटक्ये लोक दुसऱ्या देशांवर जाऊन आदळले; आणि तंग घराण्यांतील राजांनीं तुर्कांची भेट यूरपला पाठवली.

अशा रीतीनें पुष्कळ काळपर्यंत चिनी लोकांना या भटक्या लोकांपासून आपलें संरक्षण करण्यांत यश मिळालें खरें. पण आतां आपण अशा काळाशीं आलों आहोंत, कीं त्या वेळीं मात्र त्यांना या प्रयत्नांत इतकेंसें यश लाभलेलें आढळत नाहीं.

जगांतील सर्वच राजघराण्यांत जो एक नित्यक्रम आढळतो, त्या नित्यक्रमानेंच या तंग घराण्यांतही अखेरीअखेरीला पुष्कळशा नालायक अशा राजांची रांग सुरू झाली आणि त्यामुळें त्या घराण्याच्या यशोदीपाची ज्योत मंदमंद होत गेली. आपल्या पूर्वजांच्या गुणांपैकीं एकही गुण या पुढच्या पुढच्या राजांजवळ नव्हता. पण त्यांचें ऐश्वर्यप्रेम व विलासप्रेम मात्र त्यांच्या ठिकाणीं भरपूर होतें. देशांत लांचलुचपत खूप वाढली होती. त्यांतच भरीला करांचें ओझें फार अवजड झालें होतें; आणि अर्थातच या सगळ्यांचा भार बहुतांशीं गरिबांनाच सोसावा लागत होता. त्यामुळें लोकांमध्यें असंतोष वाढीस लागून दहाव्या शतकाच्या सुरुवातीला, इ. स. ९०७ मध्यें तंग घराण्याचा पाडाव झाला.

यानंतर अर्ध्या शतकापर्यंत एकामागून एक अगदींच क्षुद्र आणि कवडी किंमतीचे राजे गादीवर आले. इ. स. ९६० मध्यें मात्र पुन्हां चीनमधील आणखी एका मोठ्या राजवंशाच्या अमलाला सुरुवात झाली. कौत्सु किंवा कौचू नांवाच्या राजानें स्थापन

केलेलें हें तें सुंग घराणें होय. परंतु सरहद्दीवर आणि आंतही कटकटी व बंडाळी ही चालू होतीच. शेतावरील अवजड करांचें ओझें शेतकऱ्याला असह्य झाल्यामुळें त्याबद्दल शेतकऱ्यांमध्यें फारच असंतोष माजलेला होता. हिंदुस्थानांतल्या-प्रमाणें तेथेंही शेतीवरील करांची वगैरे सर्वच पद्धति लोकांना अगदीं दुःसह होऊन गेली असून ती अजिबात बदलल्याशिवाय कसलीही शांतता होणें किंवा प्रगति होणें शक्य नव्हतें. परंतु असे आमूलाग्र फरक इतक्या सहजासहजीं कधींच होत नसतात. प्रचलित पद्धतीपासून वरच्या थरामधील लोकांचा फायदा होत असतो आणि म्हणून तिच्यांत कोणी बदल करूं लागल्यास ते त्यांना कसून विरोध करतात. परंतु लोकांनीं आपण होऊन जर वेळेवर असा बदल केला नाहीं, तर तो नको म्हटल्यामुळें घडून यायचा थांबतो, असें मात्र नाहीं. न बोलावतांही हा नव्या बदलाचा पाहुणा घरांत शिरतोच आणि सगळी उलथापालथ करून टाकतोच.

तंग राजवंशानें असा काळाला अनुसरून असलेला बदल केला नाहीं यामुळेंच त्या राजवंशाचा पाडाव झाला. सुंग घराण्यालाही याच कारणामुळें सतत त्रास सहन करावा लागला. त्याच्या राज्यांत एक मनुष्य मात्र असा निर्माण झाला होता, कीं ज्याच्या अंगीं असा बदल घडवून आणण्याबद्दलचें ज्ञान व सामर्थ्य दोन्ही होतीं; आणि परिस्थिति अगदींच प्रतिकूल नसती, तर त्याला यश आलेंही असतें. सुंग राजांचा अकराव्या शतकामधील एक मुख्य प्रधान वांग आन् शी हा तो गृहस्थ. मीं तुला सांगितलेंच आहे, कीं चीनच्या भूमीवर कॉन्फ्यूशिअसच्या विचारांचा पगडा होता. सर्व चिनी अधिकाऱ्यांना कॉन्फ्यूशिअसच्या ग्रंथाचें अध्ययन करून परीक्षा द्यावी लागे आणि कॉन्फ्यूशिअसनें लिहून ठेवलें त्याच्या बाहेर जाण्याची कोणाची छाती नसे. वांग आन् शी हा सुद्धां या कॉन्फ्यूशिअसच्या शिकवणीच्या विरुद्ध प्रत्यक्ष गेला नाहीं. परंतु त्याच्या लिहिण्याचा त्यानें मोठा कौतुक करण्यासारखा अर्थ लावला. अडचणींतून मार्ग काढण्याची चतुर लोकांची ही नेहमींचीच एक रीत आहे. वांगच्या कांहीं कल्पना अगदीं आधुनिक काळाला साजेशा होत्या. त्याचा सगळा खरा हेतु गरिबांवरील करांचें ओझें कमी करून ज्यांना कर देण्याचें सामर्थ्य होतें अशा श्रीमंतांवर कर बसवावयाचे हाच होता. त्यानें जमिनीवरील करांचें प्रमाण कमी केलें आणि पैशांच्या स्वरूपांत कर भरणें जर कठिण वाटलें तर धान्य अथवा इतर शेतमाल यांच्या स्वरूपांतही कर भरावा, अशी त्यानें सवलत दिली. श्रीमंतांच्याकडून त्यानें प्राप्तीवरील कर घेण्यास सुरुवात केली. हा कर आजच्या आधुनिक काळीं शोधून काढलेला एक कर असें समजतात. परंतु ९०० वर्षांपूर्वी चीनमध्यें प्रत्यक्ष त्याची योजना झालेली आढळते. शेतकऱ्यांना मदत म्हणून सरकारनें पैसे कर्जाऊ द्यावे आणि त्यांनीं ते सराईच्या मोसमांत परत करावे, अशीही एक वांगची योजना होती. धान्याच्या व शेतमालाच्या किमतींत चढउतार फार होत असत; ही एक अडचण त्याच्या मनांतून दूर करावयाची होती. कारण बाजार पडला म्हणजे शेतकऱ्याला आपल्या मालाच्या

मोबदल्यांत कांहींच मिळत नसे. म्हणून त्यांना माल तर विकता येत नाहीं; पण त्यामुळें कर देण्यासाठीं किंवा इतर कांहीं जरुरीच्या वस्तू खरेदी करण्यासाठीं त्यांच्याजवळ पैसा येत नाहीं. वांग आन शीनें याही प्रश्नावर तोड काढण्याचा प्रयत्न केला; त्याची योजना अशी होती, कीं धान्याच्या किंमतींत चढउतार होऊं नये म्हणून सरकारनेंच स्वतः हा माल खरेदी करून विक्रीचें काम करावें.

वांगची आणखीही एक योजना अशी होती, कीं सार्वजनिक कामासाठीं कोणावरही मजुरीची सक्ती होता कामा नये आणि प्रत्येक मनुष्याला त्याच्या कामाबद्दल भरपूर वेतन मिळालेंच पाहिजे. त्यानें पौ विया या नावाचें एक स्थानिक लष्करही संघटित केलें होतें. परंतु वांगच्या या साऱ्या योजना त्याच्या काळाच्या मानानें फारच न झेपण्यासारख्या असल्यानें लौकरच त्या साऱ्या कोसळून पडल्या. एक त्याची लष्कराची योजना तेवढी ८०० वर्षांहून अधिक काळपर्यंत चालू राहिली.

आपल्यापुढें उभे असलेले सामाजिक प्रश्न योग्य रीतीनें सोडवितां न आल्यामुळें सुंग घराण्यांतील राजांची सत्ता यापुढें हळूहळू दुबळी पडत गेली. उत्तरेकडून खितान नांवाच्या रानटी लोकांचें दडपण आलें. त्याला त्यांना तोंड देतां आलें नाहीं. या लोकांना मागें पिटाळून लावणें अशक्य झाल्यामुळें वायव्येकडील किन किंवा सुवर्ण तार्तार नांवाच्या दुसऱ्या एक असुधारलेल्या टोळीला त्यांनीं आपल्या मदतीला येण्याची विनंति केली. त्याप्रमाणें हे किन लोक आले; त्यांनीं खितान लोकांना पिटाळूनही लावलें; परंतु त्यांनीं स्वतःच चीनमध्यें मुक्काम केला आणि परत जाण्याचें आजिबात नाकारलें. दुसऱ्या प्रबळ देशाची अथवा व्यक्तीची मदत मागणाऱ्या दुर्बळ देशाचें किंवा व्यक्तीचें हें कायमचेंच ठरलेलें नशीब आहे. या किन लोकांनीं चीनचा उत्तर भाग आपल्या कबजांत घेतला आणि पेकिंग येथें आपली राजधानी केली. सुंग राजे खालीं दक्षिणेकडे सरकले आणि किन लोक जसजसे पुढें येत गेले, तसतसे ते अधिक अधिक माघार घेत घेत आपल्या राज्याचा संकोच करीत गेले. अशा रीतीनें चीनमध्यें उत्तरेस किन लोकांचें साम्राज्य आणि दक्षिणेस सुंग घराण्याचें साम्राज्य, अशी व्यवस्था झाली. सुंग राजांना मग दक्षिणेकडील राजे असें नांव मिळालें. सुंग घराण्याचा अम्मल उत्तर चीनमध्यें असतांना इ. स. ९६० पासून ११२७ पर्यंत चालला. दक्षिण चीनमध्यें त्यांनीं आणखी दीडशें वर्षें राज्य केलें; पण अखेरीस मोंगल लोकांनीं येऊन इ. स. १२६० मध्यें त्यांचा पूर्ण नाश केला. परंतु प्राचीन हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच चीननेंही या मोंगल लोकांना निराळ्याच रीतीनें प्रतिकार केला. चिनी लोकांनीं त्यांना आपल्यामध्यें सामील करून पूर्ण एकजीव करून टाकलें आणि त्यांना अगदीं नमुनेदार चिनीच बनवून टाकलें.

अशा रीतीनें अखेरीस चीनला दोन भटक्या टोळ्यांच्या आहारीं जावें लागलें. परंतु त्यांच्या आहारीं जातांजातांनाच चीननें त्या टोळ्यांनाच सुसंस्कृत केलें. त्यामुळें

आशिया किंवा यूरप खंडांतील इतर देशांतल्याप्रमाणें चीनला त्याच्यापासून त्रास सहन करावा लागला नाहीं.

सुंग राजवंश हा उत्तरेंत असतांना काय किंवा दक्षिणेंत असताना काय, केव्हांच तंग राजवंशाइतका राजकीय दृष्ट्या समर्थ नव्हता. परंतु तंग घराण्याच्या वैभवशाली काळांतील कलांची परंपरा मात्र त्यांनीं चालू ठेवली; इतकेंच नव्हे, तर तिच्यामध्यें प्रगतीही केली. दक्षिणेंतील सुंग राजांच्या कारकीर्दींत दक्षिण चीनमध्यें कला आणि काव्य यांची फारच भरभराट झाली आणि पुष्कळ मोठमोठीं चित्रें रंगवलीं गेलीं; यांमध्यें निसर्गामधील देखाव्यांचीं चित्रें विशेष आहेत; कारण सुंगकालीन कलावंतांना निसर्गाची फार आवड होती. कलावंतांच्या बोटांच्या स्पर्शाच्या योगानें त्यांच्या मातीच्या भांड्यांनाही सौंदर्याची जोड त्या वेळेपासून मिळूं लागलेली आढळते. मातीवरील भांड्यांचें नक्षीकाम पुढें पुढें सुंदर होत जाऊन दोनशें वर्षांनंतर मिंग राजांच्या कारकीर्दींत अत्यंत अद्‌भुत सौंदर्यशाली अशीं मातीचीं भांडीं तयार होऊं लागलीं. चीनमधील मिंग काळांतील मातीचें भांडें म्हणजे या आधुनिक काळांतही मनाला विशेष अपूर्व आल्हाददायक वाटतें.

## ५५

## जपानमधील शोगूनांचें राज्य

६ जून, १९३२

चीनमधून पिवळा समुद्र ओलांडून जपानमध्यें जाणें सोपें आहे. म्हणून आतां आपण इतके जवळ आलोंच आहों तर जाऊन येऊं या तिकडे एकदां. मागच्या खेपेला आपण इकडचा फेरफटका करून आलों तो आठवतो का तुला? प्रथम तिथें कितीएक घराण्यांमध्यें वर्चस्वाकरतां झगडे होतां होतां एक मध्यवर्ती सत्ता उदयास येऊं लागलेली आपण पाहिली. मूळचा एका अत्यंत मोठ्या आणि बलिष्ठ टोळीचा नायक पुढें या मध्यवर्ती सत्तेचा प्रमुख बादशहा बनला. मध्यवर्ती सत्तेचें प्रतीक म्हणून नारा येथें राजधानी वसविण्यांत आली. त्यानंतर ती तेथून बदलून किओटो येथें नेण्यांत आली. राज्यव्यवस्थेच्या बाबतींत चिनी परंपरांची नक्कल करण्यांत आली; कला, धर्म, राजकारण, वगैरेंच्या बाबतींत बाहेरून जें कांहीं घेण्यांत आलें, तें सगळें चीनच्या मार्फतीनें घेण्यांत आलें. प्रत्यक्ष देशाचें नांव दै निपॉन हें सुद्धां चीनमधूनच आलें.

हें जसें आपण पाहिलें त्याचप्रमाणें फुजीवार नांवाच्या एका घराण्यानें सगळी सत्ता आपल्याच हातीं बळकावून बादशहांना आपल्या हातचें बाहुलें कसें केलें हेंही आपण पाहिलें. या घराण्याची सत्ता अशा रीतीनें दोनशें वर्षें चालली. त्यांची सत्तेची पकड

इतकी कठिण असे, कीं बादशहांना आपलें जिणें अगदीं असह्य होऊन ते राज्यत्याग करून मठवासी होत. परंतु भिक्षु झाल्यानंतर सुद्धा माजी बादशहा आपल्या मागून गादीवर आलेल्या आपल्या मुलाला सल्ला देण्याच्या मिषानें राज्यकारभारांत गडबड चालू ठेवीतच. अशा रीतीनें फुजीवार घराण्याच्या वर्चस्वाला खो देण्याची ही एक युक्ति होती. हा मोठाच द्राविडी प्राणायाम होता हें खरें ; परंतु त्यामुळें फुजीवार घराण्याची सत्ता कमी झाली हेंही खरें. एकामागून एक राज्यत्याग करून जे बादशहा भिक्षू होत गेले, त्यांच्या हातीं खरी सत्ता हळूहळू येत गेली. यासाठीं या बादशहांना मठवासी बादशहा म्हणून म्हणतात.

दरम्यान जपानी समाजांत आणखीही घडामोडी होतां होतां जमीनदार असून शिवाय लढवय्ये असणारे अशा लोकांचा एक नवीन वर्ग निर्माण झाला. फुजीवार घराण्यानें हे जमीनदार निर्माण करून त्यांच्याकडे सरकारी कर वसूल करण्याचें काम सोंपविलें होतें. त्यांना दाइम्यो म्हणत. याचा अर्थ महान् नांवाचे म्हणजेच नामवंत किंवा नामदार असा आहे. ब्रिटिश लोक आपल्याकडे येण्यापूर्वी कांहीं थोडे दिवस आपल्या प्रांतात असाच एक वर्ग निर्माण झाला होता हें पाहून मौज वाटते. त्याची जपानमधल्या या नव्या वर्गाशीं तुलना करण्यासारखी आहे. विशेषतः अयोध्या प्रांतामध्यें राजानें स्वतः दुर्बल असल्यामुळें अशा प्रकारचे कर वसूल करणारे लोक नेमले होते. सक्तीनें कर वसूल करतां यावा म्हणून हे लोक स्वतःजवळ थोडेंसें स्वतःचें असें सैन्य बाळगीत ; आणि वसूल झालेला कर बहुतेक सगळा आपल्याच खिशांत ठेवीत. या कर वसूल करणाराचेच पुढें मग कांहीं कांहीं ठिकाणीं मोठमोठे तालुकदार झाले.

दाइम्यो लोकांजवळही स्वतःचे नोकरचाकर, शिपाई आणि छोटेंसें सैन्य असे. त्यामुळें बलिष्ठ होऊन ते एकमेकांत लढूं लागले व कियोटो येथील मध्यवर्ती राज्याला जुमानीनातसे झाले. या दाइम्योंमध्यें तैरा आणि मिनामोटो हीं दोन घराणीं प्रमुख होतीं. त्यांनीं बादशहाला इ. स. ११५६ मध्यें फुजीवार घराण्याला दडपून टाकण्यांत साहाय्य केलें. परंतु त्यानंतर या दोन घराण्यांचेंच परस्परांशीं युद्ध जुंपलें. त्यामध्यें तैरा घराण्याचा जय झाला, आणि पुढें केव्हां आपल्या विरुद्ध कसलीही गडबड उपस्थित करण्याचा संभव सुद्धां राहूं नये याच हेतूनें बहुधा त्यांनीं शत्रु-घराण्याची कत्तल केली. चार लहान मुलें सोडून बाकी मिनामोटो घराण्यांतील सर्व लोक त्यांनीं ठार केले. या चार मुलांत योरीटोमो या नांवाचा एक बारा वर्षांचा मुलगा होता. तैरा घराण्यानें इतका सगळा प्रयत्न केला तरीही तो अपुराच ठरला. त्यांनीं योरीटोमो हा काय तो एक लहान मुलगा म्हणून त्याला सोडलें ; परंतु हाच योरीटोमो जसजसा मोठा होत गेला तसतसा त्याच्या मनांत तैरा घराण्याविषयीं तीव्र द्वेष वाढत जाऊन सूड घेण्याच्या इच्छेनें त्याचें सर्व अंतःकरण व्यापून गेलें. त्याला सूड घेण्यांत यशही आलें ; राजधानींतून त्यानें तैरा घराण्याला हांकलून लावलें आणि एका आरमारी लढाईंत त्यांचा चक्काचूर केला.

आतां योरीटोमो हा सर्वसत्ताधीश झाला. बादशहानें त्याला सी-ए-ताय् शोगून

अशी भली थोरली पदवी दिली. तिचा अर्थ रानटी लोकांना पराभूत करणारा महान् सेनापति असा आहे. ही गोष्ट इ. स. ११९२ सालची. ही पदवी आनुवंशिक असून तिच्याबरोबर राज्यकारभाराचा संपूर्ण अधिकारही प्राप्त होई. शोगून हाच खरा राज्य करणारा असे. अशा रीतीनें जपानमध्यें शोगूनशाही सुरू झाली. ही शोगूनशाही फार दीर्घ काळपर्यंत – जवळजवळ ७०० वर्षेंपर्यंत चालून अगदीं आधुनिक काळांत जपाननें आपलें सरंजामदारशाहीचें कवच फोडून टाकून नव्या जगांत प्रवेश केला, तेथपर्यंत टिकून राहिली होती.

परंतु याचा अर्थ योरिटोमोच्या घराण्यांतलेच लोक ७०० वर्षेंपर्यंत शोगूनचें पद उपभोगीत राहिले असा मात्र नव्हे. शोगूनचें पद पुष्कळ निरनिराळ्या घराण्यांतील लोकांच्या हातीं जात राहिलें. आपापसांत त्यासाठीं पुष्कळदां यादवीही होई. परंतु शोगून हाच एकमेव खरा सत्ताधीश असावयाचा, बादशहाच्या नांवानें त्यानें राज्यकारभार करावयाचा, खुद्द बादशहाला जवळजवळ कांहींच सत्ता नसावयाची, ही व्यवस्था मात्र या सर्व दीर्घ काळांत जशीच्या तशी टिकून राहिली. मधून मधून कितीएक वेळां असेंही घडे, कीं शोगूनची सत्ताही निव्वळ नांवालाच असे आणि खालच्या पुष्कळशा अधिकाऱ्यांनींच सत्ता बळकावलेली असे.

योरिटोमोला कियोटो येथील राजधानीमधील ऐश्वर्य आणि विलास यांनीं युक्त अशा त्या जीवनाचें भय वाटलें. तेथल्या त्या चैनी जीवनामुळें स्वतःच्या ठिकाणीं आणि आपल्या सहकाऱ्यांमध्येंही दुबळेपणा येईल असें त्याला वाटे. म्हणून त्यानें कामाकुरा येथें आपलें लष्करी ठाणें स्थापन केलें. त्यामुळें या पहिल्या शोगूनशाहीला कामाकुराची शोगूनशाही असें म्हणतात. इ. स. १३३३ पर्यंत म्हणजे सुमारें दीडशें वर्षें तिचा अम्मल चालला. या काळांत जपानमध्यें बहुतेक एकसारखी शांतता होती. आधींच्या कितीएक वर्षांच्या यादवीनंतर आलेले हे शाततेचे दिवस लोकाना हवेहवेसेच होते; त्यामुळें एक प्रकारची भरभराटही समाजामध्यें उत्पन्न झाली. तत्कालीन यूरप-मधील कोणत्याही देशांतल्यापेक्षां याकाळची जपानची स्थिति खात्रीनें अधिक चांगली आणि तेथील राज्यव्यवस्था खात्रीनें अधिक कार्यक्षम होती. जपान देश हा चीनचा चांगलाच पट्टशिष्य झाला होता. परंतु दोन्ही देशांच्या मनोभूमिकेंत मात्र फारच मोठा फरक होता. मीं पूर्वीं म्हटल्याप्रमाणें चीन देश हा स्वभावतः शांतताप्रिय आणि स्थिरप्रकृति देश होता. उलटपक्षीं, जपान हा आक्रमणशील प्रवृत्तीचा, लढाऊ देश होता. चीनमध्यें शिपायाला हीन दर्जाचा मानीत आणि लढण्याचा पेशा विशेषसा अब्रूदार समजत नसत. तर जपानमध्यें लढवय्ये लोक सर्वश्रेष्ठ स्थानीं असत आणि दाइम्यो होणें किंवा लढवय्या वीर होणें हें एक मोठेंच ध्येय मानलें जाई.

तेव्हां जपाननें चीनपासून जरी पुष्कळ गोष्टी शिकून घेतल्या असल्या, तरी त्या जशाच्या तशा कांहीं घेतल्या नाहींत. जें घेतलें तें आपल्याला हवें तसें आणि तेवढेंच घेतलें आणि आपल्या लोकांच्या प्रवृत्तीशीं त्याचा बिनतोड सांधा बसेल असें त्याचें

रूपांतर केलें. जपानचा चीनशीं नित्य अगदीं निकट संबंध चालू राहिला; व्यापार-धंदाही चालू राहिला; परंतु मालाची वाहतुक मात्र बहुतेक सर्व चिनी जहाजांमधून होत असे. तथापि तेराव्या शतकाच्या अखेरीला या दोन्ही गोष्टींत एकदम खंड पडला. कारण त्या सुमारास चीनमध्यें आणि कोरियामध्यें मोंगल लोकांचा प्रवेश झाला. या मोंगल लोकांनीं जपान जिंकण्याचाही प्रयत्न केला, परंतु त्यांत त्यांना माघार घ्यावी लागली. त्यामुळें या मोंगल लोकांनीं इकडे जरी आशियाचें रंगरूपच बदलून टाकलें असलें आणि यूरप खंडाला चागलाच हादरा दिला असला, तरी जपानवर त्यांचा म्हणण्यासारखा कांहीं परिणाम झाला नाहीं. जपानमध्यें पूर्वींचाच क्रम पुढें चालू राहिला. बाहेरच्या जगाशीं अधिकाधिकच त्याचे संबंध तुटत जाऊन बाहेरचे नवीन वारे तेथें फिरकेनासेच झाले.

जपानच्या प्राचीन दरबारी कागदपत्रांत जपानमध्यें कापसाचें झाड प्रथम कसें आलें याबद्दलची एक हकिकत दिली आहे. तिचा सारांश असा, कीं कांहीं हिंदी लोकांचें जहाज इ. स. ७९९ मध्यें जपानच्या किनाऱ्याजवळ बुडाल्यामुळें ते जपानला आले; त्यांच्याजवळ कापसाचें बीं होतें तें त्या वेळीं प्रथम जपानमध्यें लागवडीस आणलें गेलें.

चहाची लागवड यानंतर झाली. प्रथम त्याची सुरुवात नवव्या शतकाच्या प्रारंभीं झाली; पण तेव्हां ती यशस्वी झाली नाहीं. पुढें इ. स. ११९१ मध्यें एका बुद्धभिक्षूनें चीनमधून चहाचें बीं नेलें, आणि त्यानंतर लौकरच जपानांत चहाची चहा वाढली. चहा पिण्यामुळें चागल्या मातीच्या भांड्याना मागणी सुरू झाली. तेराव्या शतकाच्या अखेरीस एक जपानी कुंभार चीनमध्यें चिनी मातीचीं भांडीं करण्याची कला शिकण्यासाठीं गेला. सहा वर्षें त्यानें ही कला शिकण्यासाठीं चीनमध्यें घालविलीं. परत आल्यावर जपानमध्यें तशींच सुंदर भांडीं तयार करण्यास त्यानें सुरुवात केली. चहा पिणें म्हणजे जपानमध्यें आज एक मोठी कलेची गोष्ट होऊन राहिलेली आहे. आणि त्याचें तेथें एक मोठेंच गुंतागुंतीचें तंत्र वाढलेलें आहे. जपानला तूं जाशील तेव्हां तेथील चहा पिण्याची ती शिष्ट पद्धति तुला शिकावी लागेल. नाहीं तर लोक तुला कोणी तरी एक रानटी स्त्री समजतील!

## ५६

# मानवाची ज्ञानलालसा

१० जून, १९३२

चार दिवसांपूर्वी मीं तुला बरेली तुरुंगामधून पत्र लिहिले. त्याच दिवशीं संध्याकाळीं माझें सर्व सामानसुमान बांधून मला बाहेर पडावयास सांगण्यांत आलें. म्हणजे सुटण्यासाठीं नव्हे हो, तर येथून दुसऱ्या तुरुंगांत बदलून जाण्यासाठीं. म्हणून मग आज चार महिने ज्या बराकींत काढले तेथल्या आमच्या जोडीदाराचा निरोप घेतला, जिच्या आसऱ्याला बसून इतके दिवस काढले त्या आमच्या भल्या भक्कम चोवीस फूट उंच भिंतीचें शेवटचें दर्शन घेतलें आणि थोडा वेळ बाहेरच्या जगाचें दर्शन घेण्यासाठीं कूच केलें. आम्हां दोघांची तुरुंग-बदली व्हावयाची होती. पण आम्हांला कांहीं बरेली स्टेशनवर नेणार नव्हते; कारण लोक आम्हांला पाहतील; आम्ही आता पडदानशीन झालों आहों; लोकांच्या नजरेस आम्हांला कसें पडून चालेल? म्हणून मोटारीनेंच, पन्नास मैल दूर, एका आडरानांतल्या स्टेशनवर आम्हांला नेण्यांत आलें. मोटारच्या त्या प्रवासानें मात्र मला फार बरें वाटलें. रात्रीचा गार वारा मोठा मधुर होता आणि तुरुंगांतील कित्येक महिन्यांच्या एकांतवासानंतर रात्रीच्या त्या अंधुक प्रकाशामध्यें वृक्ष, पशू, आणि माणसें यांचीं तीं भुतासारखीं दृश्यें, जीं डोळ्यांपुढून झपाट्यानें सरकून जात होतीं, तीं सुद्धां मनाला फार आल्हादकारक वाटलीं.

आम्हांला डेहराडूनच्या तुरुंगांत नेण्यांत आलें. परंतु या टोकालाही आम्हाला शेवटच्या स्टेशनपर्यंत न नेतां पहांटेच्या वेळीं अलीकडच्या एका स्टेशनवर उतरवून पुढें नेलें; हो उगीच चोरट्या नजरा आमच्यावर पडायच्या नाहीं तर!

तेव्हां आज हा मी येथें डेहराडूनच्या छोट्या तुरुंगांत बसलों आहें. बरेलीपेक्षां येथें पुष्कळच सुखाचें आहे. येथें म्हणण्यासारखा उन्हाळा नाहीं. बरेलीप्रमाणें येथें उष्णतामान ११२ अंशावर जात नाहीं. सभोंवतालच्या भिंतीही उंचीला पुष्कळ कमी आहेत; त्यांच्या शेजारचीं झाडें त्यांहून उंच असून हिरवीगार आहेत. आमच्या भिंतीच्यावरून पलीकडे बाहेरच्या दूरच्या एका ताडाच्या झाडाचा शेंडा येथून मला दिसूं शकतो; तो बघून मला फार आनंद होतो आणि सिलोन व मलबार याची मला आठवण येते. या झाडांच्या पलीकडे, कांहीं थोड्या मैलांवर पर्वतांच्या रांगा असून त्यांच्या शेंड्यावर मसुरी वसलेली आहे. त्या पर्वतराजी कांहीं मला दिसत नाहींत; कारण मध्यें झाडें आड येतात. परंतु आपण त्या पर्वतांच्या जवळ आहोंत या जाणिवेनें आणि रात्रीच्या वेळीं त्या तिथें दूर ते मसुरीचे दिवेच चमकत असतील या कल्पनेनें सुद्धा मनाला एक प्रकारचें सुख होतें.

चार वर्षांपूर्वी—का तीन?—ही पत्रमालिका तुझ्यासाठीं लिहावयाला मीं सुरुवात केली. त्या वेळीं तूं मसुरीतच होतीस. या तीन-चार वर्षांच्या दरम्यानच्या काळांत

केवढाल्या मोठ्या घडामोडी घडून आल्या आहेत; आणि तूं तर केवढी मोठी बाई साहेब झाली आहेस! मधें मधें खूप वेगांत येऊन आणि मधें मधें भली मोठी सुटी घेऊन हीं पत्रें मी तुला बहुतेक सगळीं तुरुंगांत बसूनच लिहीत आलों आहें. परंतु जों जों मी पुढें पुढें लिहीत जातों आहें, तों तों जें लिहिलें तें तितकेंसें मला पसंत पडत नाहींसें झालें आहे; आणि अशी आशंका वाटूं लागली आहे, कीं तुला कांहीं या पत्रांमध्यें विशेष वाचण्यासारखें वाटणार नाहीं. कदाचित् तुला तीं कंटाळवाणींच होण्याचा संभव आहे. असें जर आहे, तर मग कशाला लिहीत बसतों हीं पत्रें तुला मी?

माझ्या मनांतील फार फार इच्छा अशी, कीं प्राचीन काळचे अत्यंत सुंदर हुबेहूब देखावे तुझ्या दृष्टीसमोर एकापुढें एक उभे करावे आणि आपल्या या जगामध्यें नानाविध बदल एकामागून एक पायरीपायरीनें कसे होत गेले, जगाची वाढ कशी होत गेली, प्रगति आणि सुधारणा कशी होत गेली, आणि क्वचित् एखाद्या काळीं जगाचें पाऊल मागें पडल्यासारखें कसें झालें याची जाणीव तुझ्या मनाला करून द्यावी; प्राचीन सुधारणांचें व संस्कृतींचें दर्शन तुला करवून समुद्राच्या भरतीप्रमाणें त्या वाढल्या कशा आणि ओहटी लागून कालात विलीनही झाल्या कशा हें तुला दाखवावें; तसेंच जागतिक इतिहासाचा हा ओघ प्राचीन काळापासून युगानुयुगें सतत अखंड कसा वाहत आला आहे, अजून तो वाहतोच आहे, कुठेंच थांबत नाहीं, मध्यें मध्यें त्यांत भोंवरे बनलेले दिसतील, लाटा उसळलेल्या आढळतील, केव्हां केव्हां पाणी परतून माघारें आल्याचा भास होईल; तथापि हा ओघ असाच जोरानें पुढें पुढेंच जात असून तो कोठल्या अज्ञात समुद्राला जाऊन मिळणार आहे याची कोणालाच कांहीं कल्पना नाहीं, ही गोष्ट तुझ्या मनांत ठसवावी. मानव-जातीच्या या प्रवासमार्गावर तुला फिरवून आणावें; अगदीं सुरुवातीच्या काळीं, प्रथम मनुष्याला मनुष्यपण सुद्धा म्हणण्यासारखें प्राप्त झालें नव्हतें तेथून सुरुवात करून तों थेट आजच्या क्षणाला, मानव जेव्हां एका अर्थी मूर्खासारखा आणि व्यर्थच आपल्या महान् संस्कृतीचा मोठा अभिमान बाळगूं लागला आहे तेथपर्यंतचा सर्व प्रवास तुझ्याकडून करवावा अशी मला किती हौस वाटते! तूं मसुरीला होतीस तेव्हां आपण या प्रकारच्या प्रवासाला सुरुवातसुद्धां केली होती हें तुला आठवत असेल. अग्नीचा शोध कसा लागला, शेतीला सुरुवात कशी झाली, शहरें कशीं वसलीं गेलीं, श्रमविभागाला कशी सुरुवात झाली वगैरे गोष्टींची आपण चर्चा करीत होतों त्या वेळीं. पण आपण जसजसें पुढें पुढें जाऊं लागलों, तसतसें ह्या साम्राज्यें वगैरेंच्या गोंधळांतच अधिकाधिक सांपडलों आणि मानवाच्या प्रगतीच्या मार्गावरची आपली नजर थोडीशी चळत चालली. इतिहासाचें अगदीं वरवरचेंच काय तें दर्शन आपल्याला आतांपर्यंत घडलें आहे. प्राचीन काळीं घडलेल्या घटनाचा नुसता निर्जीव सांगाडा मात्र मी तुझ्यापुढें उभा करूं शकलों आहें; परंतु त्यांत रक्त आणि मांस घालून तुझ्यापुढें प्राचीन इतिहासाची चालती-बोलती जिवंत मूर्तीच मला उभी करता आली असती, तर ती मला किती हवी होती!

पण मला वाटतें माझ्या अंगांत कांहीं ती शक्ति नाहीं; तेव्हां असा हा चमत्कार घडवून आणण्यासाठीं तुला स्वतःच्या कल्पनाशक्तीवरच अवलंबून राहिलें पाहिजे. पण मग पुष्कळशा सुंदर सुंदर ग्रंथांतून प्राचीन इतिहास तुला वाचावयास मिळण्यासारखा असतांना मीं हीं पत्रें तुला का लिहीत बसावें? असा हा संशय वारंवार वाटत असून सुद्धां मी हीं पत्रें लिहीत आलेंच आहें आणि बहुधा यापुढेंही असाच लिहीत राहणार. तसें मीं तुला वचन दिलें आहे याची मला आठवण आहे; तें वचन पुरें करण्याचा मी जरूर प्रयत्न करणार. परंतु वचनपूर्तीच्या आनंदापेक्षांही पत्र लिहावयाला बसलों म्हणजे तुझी आठवण मनांत येते, आणि तूं माझ्याजवळ बसली असून आपण दोघें एकमेकांशीं बोलत आहों अशी भावना होते, याचा आनंद कांहीं विशेष मोठा आहे.

आपल्या प्राथमिक जंगली अवस्थेंतून धडपडत, हातपाय टेंकात बाहेर पडून मनुष्यानें प्रगतीचा मार्ग आक्रमिण्यास सुरुवात केली त्याबद्दल मीं वर तुला लिहिलें. कितीएक हजारों वर्षेपर्यंत लांबपासून मानवाचा हा प्रवास चालू आहे. तथापि तसें पाहिलें तर पृथ्वीच्या एकंदर सुरुवातीपासूनचा अनंत काळचा इतिहास, आणि मनुष्य पृथ्वीवर निर्माण होण्यापूर्वीं होऊन गेलेला कितीएक युगांचा आणि कल्पांचा जो काळ, त्याच्या मानानें मनुष्याच्या प्रवासाचा हा काळ किती तरी थोडा आहे. अर्थात् पृथ्वीवरील मानवापूर्वींच निर्माण झालेल्या इतर मोठमोठ्या प्राण्यांपेक्षां मानवाचें स्वाभाविकच आपल्याला जास्त महत्त्व वाटतें. त्याचें कारण असें आहे: इतर पशूंजवळ नव्हती अशी एक नवीनच गोष्ट माणसाबरोबर पृथ्वीवर आली. ती म्हणजे माणसाचें मन, जिज्ञासावृत्ति, शोध करण्याची आणि कार्यकारणभाव समजून घेण्याची इच्छा ही होय. त्यामुळें मनुष्याच्या अगदीं सुरुवातीच्या दिवसापासूनच त्याचें ज्ञानसाधनेचें कार्य सुरू झालेलें आहे. लहान मुलाकडे पाहा; तें कसें आपल्या भोंवतींच्या अगदीं नवीन आणि आश्चर्यकारक जगाकडे टक लावून पाहत असतें तें; हळूहळू तें माणसांची आणि वस्तूंची ओळख कसें ठेवूं लागतें, नवनवीन गोष्टी कशा शिकत असतें, ज्ञानसंपादन कसें करीत असतें तें ध्यानांत आण. एखाद्या लहान मुलीचेंच पाहा; ती जर निरोगी असेल आणि चांगली खेळकर आणि हुषार असेल, तर ती तुम्हांला निरनिराळ्या गोष्टींबद्दल इतके कांहीं प्रश्न विचारील म्हणतां! इतिहासाच्या प्रभातकाळीं मनुष्य जेव्हां लहान होता, सारें जग त्याला नवें आणि आश्चर्य उत्पन्न करणारें होतें, किंवा थोडीबहुत आजूबाजूच्या जगाची माणसाला एक प्रकारची भीतीच वाटत होती, अशा वेळीं अगदीं अशा लहान मुलासारखेंच त्यानें आपल्या आजूबाजूला टक लावून किती पुनः पुनः निरखून पाहिलें असेल, किती प्रश्न विचारले असतील! पण प्रश्न तरी स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाला तो विचारूं शकणार होता? कारण उत्तर द्यायला त्याच्याहून अधिक समर्थ किंवा माहितगार दुसरें कोणीं नव्हतेंच. परंतु माणसाजवळ एक छोटीशी विलक्षण सामर्थ्याची वस्तु होती; त्याच्याजवळ त्याचें मन (बुद्धि) होतें; आणि त्याच्या साहाय्यानें हळूहळू, धडपडत

धडपडत, कष्ट सोशीत तो अनेक अनुभवांचा सांठा आपल्या मनामध्यें सतत करीत गेला आणि त्यांपासून नवनव्या गोष्टी शिकत गेला. अशा रीतीनें अगदीं जुन्यात जुन्या काळापासून तों थेट आजपर्यंत मनुष्याचें हें संशोधन आणि ज्ञानसंपादन सारखें चालू आहे; पुष्कळशा गोष्टी त्याला समजून आल्या आहेत; परंतु पुष्कळशा अजून त्याला समजावयाच्या आहेत; आणि जों जों तो या मार्गावर पुढें पुढें प्रवास करीत जातो आहे, तों तों त्याच्या दृष्टीसमोर एवढाले विशाल नवे नवे प्रदेश दूरवर पसरलेले उभे राहत आहेत कीं त्यावरून आपल्या मार्गावर शेवटचें थांबण्याचें स्थान कोठें तरी खरोखरीच आहे असें गृहीत धरलें, तरीसुद्धां त्यापासून आपण अद्यापि किती किती तरी दूर आहों हेंच त्याला दिसून येऊं लागले आहे.

मनुष्याचा हा सगळा शोध कशाचा चाललेला आहे आणि त्याचा प्रवास कोठल्या ठिकाणासाठीं आहे? हजारों वर्षें अनेक माणसांनीं या प्रश्नांचीं उत्तरें शोधून काढण्याचा प्रयत्न चालविलेला आहे. धर्म, तत्त्वज्ञान आणि शास्त्रें यांनीं या प्रश्नांचा विचार करून पुष्कळ उत्तरें दिलेलीं आहेत. हीं उत्तरें काय आहेत हें सांगून मी तुला त्रास देत नाहीं, त्याचें सगळ्यांत मोठें कारण म्हणजे मला त्यांतील बहुतेक उत्तरें नीटशीं माहीत नाहींत; परंतु त्या सगळ्यांमध्यें मुख्यतः धर्मानें या प्रश्नांचा संपूर्ण आणि ज्याच्याबद्दल कोणाला कसली शंका काढण्याचा हक्कच नाहीं असा उलगडा करण्याचा चंग बांधलेला आहे; आणि मानवी मनाच्या शक्तींचा फारसा विचार न करतां आपण घेतलेला निर्णय निरपवाद मान्य केला जावा यासाठीं निरनिराळे उपाय मात्र धर्मानें काढलेले आहेत. भौतिक शास्त्रांनीं केलेला या प्रश्नांचा उलगडा निःसंदिग्ध नाहीं, साशंक आणि कचरत उत्तर देण्याचा त्यांनीं यत्न केला आहे; कोणत्याही बाबतींत कसलाही परिवर्तनातीत हटवादी निर्णय करावयाचा नाहीं, परंतु मानवी मनाच्या जिज्ञासावृत्तीवर विसंबून राहून प्रयोगाला आणि अनुमानाला वाव ठेवावयाचा हा शास्त्रांचा स्वभावच आहे. मला स्वतःला शास्त्रें आणि शास्त्राचा मार्ग हींच इतर कशापेक्षांही जास्त पसंत आहेत हें कांहीं मी तुला सांगावयाला नको.

मनुष्याच्या या ज्ञानसंशोधनाच्या — अनुभवप्रातीच्या — प्रयत्नाबद्दलच्या वरील प्रश्नांचें हमखास समाधानकारक उत्तर देणें हें आपणाला शक्य नसलें, तरी या संशोधनाचे दोन वेगवेगळे मार्ग माणसानें चोखाळले आहेत हें आपल्याला दिसून येतें. मनुष्यानें आपल्या बाहेरच्या जगाचें निरीक्षण करण्याचा प्रयत्न केलेला आहे; बाह्य जगाचें स्वरूप समजून घेण्याचा जसा त्यानें प्रयत्न केला आहे, तसाच आपलें स्वतःचेंही स्वरूप समजून घेण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. खरें पाहिलें तर संशोधनाचे हे दोन्ही प्रकार मुळांत एकच आहेत. कारण मनुष्य झाला तरी या निसर्गाचा, या जगाचाच एक भाग आहे. "आत्मानं विद्धि" म्हणजे "तूं स्वतःला जाण" अशी शिकवण हिंदुस्थान आणि ग्रीस यांमधील प्राचीन तत्त्वज्ञांनीं दिलेली आहे. आणि प्राचीन भारतीय आर्यांनीं हें आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं किती आश्चर्यकारक अखंड

धडपड केली, याचा सर्व वृत्तांतच उपनिषदांमध्यें सांपडतो. जगाच्या बाह्य स्वरूपाचें–मानवमनाच्या बाहेरच्या जगाचें–जें दुसऱ्या प्रकारचें ज्ञान, तें खास शास्त्रांच्या कक्षेतील विषय असून आजचें आधुनिक जगताचें स्वरूप हाच या बाबतींत केवढी प्रगति झालेली आहे याचा उत्कृष्ट साक्षीदार–पुरावा–आहे. आतां शास्त्राची पकड, झडप फारच दूरवर होऊं लागली असून ज्ञानसंपादनाच्या दोन्ही प्रकारांचे, प्रवृत्तींचें कार्य शास्त्रांनीं आपल्या अंगावर आतां घेतलें आहे आणि या दोन्ही प्रकारांचा समन्वय करण्याचें, त्यांच्यामध्यें एकसूत्रता आणण्याचें काम सुरू केलें आहे. आपणापासून अत्यंत दूरच्या अशा प्रचंड ताऱ्यांचें आत्मविश्वासपूर्वक आणि शंकाविरहित अशा प्रकारचें निरीक्षण करण्यास आतां शास्त्र समर्थ झालें आहे; त्याचप्रमाणें ज्यांनींच सर्व पदार्थमात्र बनलेले, भरलेले आहेत आणि ज्यांची एकसारखी अखंड हालचाल सुरूच आहे अशा अत्यंत सूक्ष्म अणूपरमाणूंबद्दल–Electrons व Protons बद्दलही निश्चित ज्ञान आतां शास्त्राला होऊं लागलेलें आहे.

आपल्या संशोधनकार्यार्थ चालविलेल्या या मार्गक्रमणात मनाच्या साहाय्यानें मनुष्यानें पुष्कळ मोठा पल्ला गांठलेला आहे. सृष्टीचें जसजसें अधिकाधिक ज्ञान त्याला होत गेलें, तसतसें निसर्गशक्तींना त्यानें अधिकाधिक आपल्या कामाला लावलें आहे आणि आपलें सामर्थ्य वाढविलें आहे. परंतु हें मिळविलेलें सामर्थ्य कशा रीतीनें आणि कशासाठीं उपयोगांत आणावें याचें मात्र चांगलेंसें ज्ञान त्याला पुष्कळ प्रसंगीं झालेलें दिसत नाहीं. आणि म्हणून या सामर्थ्याचा मनुष्य दुरुपयोग करीत आला आहे. शास्त्राचाच उपयोग करून माणसानें आपल्या बांधवांचा खून करण्यासाठीं व स्वतःच इतक्या परिश्रमानें निर्माण केलेली सुधारणा व संस्कृति नष्ट करून टाकण्यासारखीं अत्यंत भयंकर शस्त्रें निर्माण केलीं आहेत.

## ५७

## ख्रिस्तानंतर पहिल्या एक हजार वर्षांच्या अखेरीस

११ जून, १९३२

आपल्या या प्रवासामध्यें अशा एका ठिकाणीं आतां आपण येऊन पोंचलों आहों, कीं या ठिकाणीं थोडा वेळ थांबून जरा आजूबाजूस चोहोंकडे दृष्टि टाकली तर बरें होईल. किती दूरपर्यंत येऊन पोंचलों आहों आपण ? आतां कोठेंसें आलों आहों आपण ? आणि या ठिकाणीं जगाचें एकंदर रंगरूप कशा प्रकारचें आहे ? हें जरा आपण पाहूं या. त्यासाठीं अल्लाउद्दीनाच्या जादूच्या सतरंजीवर बसून आपण त्या काळच्या जगांतील सर्व देशांना धांवती भेट देऊन येऊं या.

ख्रिस्ती शकाच्या पहिल्या हजार वर्षांच्या अखेरीला आपण येऊन पोंचलों आहों. कांहीं कांहीं देशांत आपण याच्याही पुढें आघाडी मारलेली आहे, तर कांहीं कांहीं देशांत आपण अद्यापि थोडेंसें मागें पडलेलो आहों.

आशियामध्यें आपल्याला यावेळीं चीनमध्यें सुंग वंशाचा अम्मल आढळतो. तो महान् तंग राजवंश आतां आटोपला असून सुंग घराण्यालाही एका बाजूला अंतर्गत असंतोष आणि दुसऱ्या बाजूला उत्तरेकडील रानटी परकी शत्रूंचे, खितानांचे हल्ले यांचा त्रास सोसावा लागत आहे. त्याला तोंड देत तें घराणें १५० वर्षें काढतें, परंतु शेवटीं त्याला इतका दुबळेपणा येतो, कीं दुसऱ्या एका रानटी टोळीची, सुवर्ण तातीर किंवा किन नांवाच्या लोकांची मदत मागण्याचा प्रसंग त्याच्यावर येतो. हे किन लोक येतात ते चीनमध्येंच आपलें बिऱ्हाड थाटतात आणि गरीब बिचाऱ्या सुंग राजवंशाला आपलें चंबूगवाळें आटोपून दक्षिण चीनमध्यें जावें लागतें. तेथें दक्षिणेतील सुंग राजे या नांवानें आणखी १५० वर्षें त्यांचा अम्मल चालतो. मात्र या सर्व दरम्यानच्या काळांत सुंदर कला, चित्रकला आणि चिनी मातीच्या भांड्यांचा उद्योग या गोष्टी चांगल्या भरभराटीला येतात.

कोरियामध्यें प्रथम प्रथम पुष्कळ फाटाफूट आणि झगडे होत राहून शेवटीं इ. स. ९३५ मध्यें तेथें एक स्वतंत्र संघटित राज्य स्थापन होतें आणि हें राज्य पुढें पुष्कळच काळपर्यंत—सुमारें ४५० वर्षें—चालू राहतें. कोरियानें आपली संस्कृति, कला, राज्यव्यवस्थेची पद्धति यांमधील बराचसा भाग चीनपासून घेतलेला होता. धर्म आणि कलांचाही थोडासा भाग तेथें आणि जपानमध्यें हिंदुस्थानमधून चीनच्या मार्फत गेलेला आढळतो. पूर्वेच्या अगदीं टोकाला आशियाचा जणुं द्वारपाल असा वसलेला जपान देश या काळामध्यें बहुतांशीं बाकीच्या जगापासून तुटून निराळा राहत असलेला दिसतो. तेथें सध्यां फुजीवार घराण्याचें सर्वश्रेष्ठ वर्चस्व आहे; आणि बादशहा जरी आता निव्वळ एखाद्या घराण्याचा नायक म्हणून राहिला नसून त्याहून थोडा जास्त प्रभावी झाला आहे, तरी फुजीवार घराण्यापुढें तो फिकाच पडलेला आहे. त्यानंतर तेथें शोगूनशाही सुरू होते आहे.

मॅलेशियामध्यें हिंदी वसाहती भरभराटीला आलेल्या आहेत. वैभवशाली अङ्कोर नगरी ही कांबोज देशाची राजधानी असून या देशाची प्रगति आणि शक्ति हीं कळसाला जाऊन पोंचलेलीं आहेत. सुमात्रामध्यें एक महान् बुद्धधर्मीय साम्राज्य असून श्रीविजय शहर हें त्याची राजधानी आहे. आजूबाजूचीं सर्व बेटे या साम्राज्याच्या ताब्यांत असून त्यांच्यामध्यें व्यापार फार मोठ्या प्रमाणावर सुरू आहे. जावाच्या पूर्व विभागांत मात्र एक स्वतंत्र हिंदु राज्य आहे. लौकरच हें राज्य मोठें होऊन व्यापार व व्यापारापासून येणारी संपन्नता या बाबतींत श्रीविजयाच्या राज्याशीं स्पर्धा करूं लागणार आहे; आधुनिक यूरपीय राष्ट्रें करतात त्याप्रमाणें व्यापारासाठींच तें श्रीविजयाच्या राज्याशीं युद्ध करणार आहे; आणि अखेरीस तें राज्य जिंकून नष्ट करून टाकणार आहे.

हिंदुस्थानमध्यें उत्तर हिंदुस्थान आणि दक्षिण हिंदुस्थान यांमधील संबंध पूर्वी कांहीं काळ होता त्यापेक्षांही अधिक तुटक झाला आहे. उत्तरेकडे गझनीचा महमूद पुनःपुनः चालून येतो आहे, मोडतोड करतो आहे, लुटालूट करून जातो आहे. प्रचंड संपात्ति तो लुटून घेऊन जातो आणि पंजाब प्रांत जिंकून आपल्या राज्याला जोडतो. दक्षिणेकडे चोल घराण्याचें साम्राज्य राजराज आणि त्याचा मुलगा राजेंद्र यांच्या कारकीर्दीत विस्तार पावून प्रबळ होत चाललेलें आपल्याला दिसतें. साऱ्या दक्षिण हिंदुस्थानवर त्यांचें प्रभुत्व चालूं लागतें आणि तेथील रहिवासी आरबी समुद्र आणि बंगालचा उपसागर यांवरही झडपा घालूं लागतात. सीलोन, दक्षिण ब्रह्मदेश आणि बंगाल या देशांवरही ते आक्रमक स्वाऱ्या करून जातात.

मध्य आणि पश्चिम आशियामध्यें आपल्याला बगदाद येथील आब्बासी खलिफांचें उरलें सुरलें साम्राज्य आढळतें. बगदादची मात्र अद्यापि चांगली भरभराट चालू असून तेथें आलेले नवीन राज्यकर्ते जे सेल्जुक तुर्क, त्यांच्या अमलाखालीं त्याचें सामर्थ्य वाढतेंच आहे. परंतु जुन्या साम्राज्याचे मात्र तुकडे होऊन निरानिराळीं राज्यें स्थापन झालेलीं आहेत. इस्लामचें एकच एक साम्राज्य राहिलेलें नसून इस्लाम हा आतां भिन्न भिन्न राज्यांचा आणि समाजांचा धर्म होऊन गेला आहे. मोडून पडलेल्या आब्बासी साम्राज्यांतूनच गझनीचें राज्य निर्माण झालें. येथेंच राज्य करून महमूद हा हिंदुस्थानवर चालून येत होता. अशा रीतीनें बगदादचें साम्राज्य मोडून तोडून गेलेलें असलें तरी बगदाद शहराचें श्रेष्ठपण अजून कायम आहे, आणि दूरदेशाहून पुष्कळ कलावंत आणि विद्वान् लोक अद्यापि तेथे येत आहेत. बुखारा, समरकंद, बल्ख हीं आणि अशीं पुष्कळ मोठालीं शहरें या काळामध्यें मध्य आशियांत भरभराटीला आलेलीं आहेत. या शहरांमध्यें फारच मोठ्या प्रमाणावर व्यापार चालू असून मोठमोठे उंटांचे तांडे त्यामध्यें मालाची नेआण करीत असतात.

मंगोलियांत आणि त्याच्या आसपास भटक्या लोकांच्या कांहीं नव्याच टोळ्यांची लोकसंख्या वाढून त्या प्रबळ होत होत्या. यापुढें दोनशें वर्षांनंतर साऱ्या आशिया खंडभर या टोळ्या धुमाकूळ घालणार आहेत. परंतु या काळींसुद्धां मध्य आशियांत आणि पश्चिम आशियांत ज्या मानववंशांचें वर्चस्व चालू आहे त्याचें मूळही मध्य आशियांतील भटक्या लोकांच्या या जन्मभूमींतच आहे. चिनी लोकांनीं त्यांना हांकलून दिल्यामुळें ते दुसरीकडे पसरले, कांहीं हिंदुस्थानांत आले, काहीं यूरपमध्यें गेले. या काळामध्यें आतां पुन्हां सेल्जुक तुर्क हेही पश्चिमेकडे लोटले गेल्यामुळें बगदादच्या साम्राज्याचें पुनरुज्जीवन करून, कॉन्स्टांटिनोपलच्या पूर्व रोमन साम्राज्यावर हल्ला करून त्याचा पराभव करतांना ते आढळतात.

ही झाली आशियाची हकिकत. तिकडे तांबड्या समुद्राच्या पलीकडे बगदादच्या साम्राज्यापासून फुटून स्वतंत्र झालेला ईजिप्त देश आहे. तेथल्या मुसलमान राजांनीं स्वतंत्रपणें स्वतःलाच खलिफा म्हणून नियुक्त केलें आहे. उत्तर आफ्रिकेंतही स्वतंत्र

मुसलमानी राज्य स्थापन झालेलें आहे. जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीच्या पलीकडच्या बाजूला स्पेन देशांतही कुर्तुबाचें म्हणजेच कार्डोव्हाचें साम्राज्य या नांवाचें स्वतंत्र मुसलमानी राज्य आहे. परंतु आब्बासी घराण्याच्या हातीं खलिफाची गादी व साम्राज्य आल्यानंतर स्पेनमधील आरबी राज्यानें त्यांची सत्ता मानण्याचें नाकारलें हें तुला माहीत आहे. तेव्हांपासूनच त्यांचें तेथें स्वतंत्र राज्य चालू झालें. त्याच्या आधीं बराच काळ त्यांनीं फ्रान्स देश जिंकण्याचा प्रयत्न केला होता. परंतु चार्ल्स मार्टेलनें त्यांना चांगलाच शह देऊन गप्प केलें होतें. आतां उलट स्पेनच्या उत्तर भागांतील खिस्ती राज्येंच मुसलमानांवर हल्ले करूं लागलीं होतीं आणि पुढें पुढें त्यांचे हल्ले अधिकाधिक जोमदार होणार होते. परंतु आपण ज्या काळाबद्दल आता बोलतों आहों त्यावेळेला कार्डोव्हाचें साम्राज्य हें एक मोठें आणि प्रगतिशील राज्य असून सुधारणा आणि शास्त्रें यांच्या बाबतींत यूरपांतील इतर देशांपेक्षां तें फार पुढें गेलेलें होतें.

स्पेन देश सोडला म्हणजे बाकीच्या यूरपखंडांत आतां पुष्कळ वेगवेगळीं स्वतंत्र खिस्ती राज्यें स्थापन झालेलीं आढळतील. साऱ्या यूरपखंडभर आतां खिस्ती धर्माचा प्रसार झालेला असून जुने वीरपुरुष किंवा देवदेवता यांच्या पूजाअर्चांचे धर्म आतां येथून पार नाहींसे झालेले आहेत. या सुमारासच आजच्या आधुनिक यूरपीय देशांचीं स्वरूपें निश्चित होत गेलेलीं आपणास आढळतात. ह्यू कॅपेटच्या नेतृत्वाखालीं इ. स. ९८७ मध्यें फ्रान्स देशाचा उदय होतो. समुद्राच्या भरतीला परत जाण्याचा हुकूम दिल्याबद्दलची ज्याची कथा प्रसिद्ध आहे, तो डेन वंशाचा कॅन्यूट राजा इ. स. १०१६ मध्यें इंग्लंडमध्यें राज्य करीत होता. त्यानंतर पन्नास वर्षांनीं तेथें नॉर्मंडीमधून विजेता विल्यम हा आला. जर्मनी देश अद्यापि रोमच्या पवित्र साम्राज्याचाच एक भाग होता; अजूनपर्यंत जरी तेथें पुष्कळ छोटीं छोटीं स्वतंत्र संस्थानेंच होतीं, तरी त्या सर्वांचें मिळून एक स्वतंत्र राज्य निर्माण होण्याचीं स्पष्ट चिन्हें तेथेंही त्या सुमारास दिसूं लागलीं होतीं. पूर्वेकडे रशियाचा विस्तार वाढत होता आणि जहाजांतून जाऊन कॉन्स्टान्टिनोपलवर स्वारी करण्याचाही तो प्रयत्न करीत होता. रशियाला कॉन्स्टान्टिनोपलचें जें एक चमत्कारिक वेड लागलेलें दिसतें त्याची सुरुवात एव्हांपासूनच झाली. एक हजार वर्षेंपर्यंत या शहराचा लोभ रशियानें अंतःकरणांत बाळगला आणि चौदा वर्षांपूर्वीं जें महायुद्ध संपलें त्याच्यांतून अखेरीस तें शहर आपल्याला मिळेल अशी रशियाला आशा होती. परंतु दरम्यान एकदम क्रांतीच झाली आणि जुन्या रशियाच्या याबद्दलच्या सगळ्याच योजना कोलमडून पडल्या.

९०० वर्षांपूर्वींच्या यूरपच्या या नकाशावर तुला पोलंड आणि हंगेरी हे देशही आढळतील; त्यांमध्यें मग्यार लोकांची तेव्हां वसती होती. त्याचप्रमाणें बल्गेरियन आणि सर्बियन लोकांचीं राज्येंही तुला तेथें आढळतील. त्याचप्रमाणें चोहोंबाजूंनीं शत्रूंनीं वेढलेलें परंतु तरीसुद्धां जीव धरून असलेलें पूर्वेकडील रोमन साम्राज्यही त्यांत तुला

आढळून येईल. रशियन लोक त्याच्यावर हल्ला करीत होते; बल्गेरियन लोक त्याला चिमटे घेत होते; नॉर्मन लोक समुद्राकडून त्याच्या राशीस लागल्यासारखे करीत होते. आणि आतां तर त्या सर्वांहूनही भयंकर असे सेल्जुक तुर्क लोक आले असून त्यांनीं त्याच्या प्राणांवरच संकट आणलें होतें. इतके हे शत्रू आणि इतकीं संकटें सतावून सोडीत असूनही आणखी ४०० वर्षेपर्यंत हें साम्राज्य नष्ट होणार नव्हतें. इतका हा जो आश्चर्यकारक चिवटपणा त्याच्या ठिकाणीं आढळून आला त्याचें अंशतः कारण कॉन्स्टान्टिनोपल शहराची अत्यंत प्रबळ परिस्थिति हें आहे. हें शहर इतक्या कांहीं चांगल्या ठिकाणीं वसलेलें आहे, कीं शत्रूला तें काबीज करणें फारच कठिण होतें. ग्रीक लोकांनीं संरक्षणाचें नवीनच एक साधन शोधून काढलें होतें, हेंही अंशतः या गोष्टीचें कारण होतें. या नवीन साधनाला 'ग्रीक अग्नि' असें नांव पडलें होतें. तो असा कांहीं पदार्थ होता, कीं पाण्याचा व त्याचा स्पर्श झाला कीं तो पेटत असे. बास्फरसची सामुद्रधुनी ओलांडून येणाऱ्या शत्रूच्या जहाजांना या ग्रीक अग्नीच्या साहाय्यानें आगी लावून कॉन्स्टान्टिनोपलचे लोक स्वारी करणाऱ्या शत्रूच्या सैन्यांत हाहाःकार उडवून देत असत.

ख्रिस्त शक सुरू झाल्यानंतर १००० वर्षें संपण्याच्या सुमारास यूरपचा नकाशा हा अशा स्वरूपाचा होता. याच सुमारास नॉर्थमेन किंवा नॉर्मन लोक आपल्या जहाजांतून खालीं येऊन भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावरील शहरें लुटतांना आणि त्यांना सळो कीं पळो करून सोडतांना, तसेंच भर समुद्रांत जहाजांची लूटमारही करतांना तुला आढळतील. त्यांना मिळालेल्या यशामुळें तर आतां ते प्रतिष्ठित होऊं लागलेले दिसतील तुला. फ्रान्समध्यें पश्चिम किनाऱ्यावर नॉर्मंडी भागांत ते आतां स्थिरस्थावर झाले होते. याच आपल्या तळावरून इंग्लंडवर हल्ला करून तो देश त्यांनीं जिंकला. मुसलमानांपासून सिसिली बेट जिंकून घेऊन तें त्यांनीं दक्षिण इटलीच्या राज्याला जोडून दिलें होतें आणि या प्रदेशांत सिसिलियाचें राज्य म्हणून एक स्वतंत्र राज्यच त्यांनीं स्थापन केलें होतें.

मध्य यूरपमध्यें उत्तरसमुद्रापासून तों रोमपर्यंत रोमचें पवित्र साम्राज्य कसें तरी पसरलेलें होतें; पुष्कळ छोटीं राज्यें त्यामध्यें असून सर्वांचा मिळून बादशहा प्रमुख होता. हा जर्मन वंशाचा बादशहा व रोमचा पोप यांच्यामध्यें एकसारखें सत्तेचें भांडण चालू असे. केव्हां बादशहाचें वर्चस्व अधिक होई, तर केव्हां पोपचें; परंतु हळूहळू पोपची सत्ता वाढत गेली. पोपच्या हातीं बहिष्काराचें—मनुष्याला धर्मांतून काढून टाकून हद्दपार करण्याचें, वाळींत टाकण्याचें—फार मोठें भयंकर शस्त्र होतें. या शस्त्राच्या जोरावर एका पोपनें एका बादशहाची इतकी दीन अवस्था केली, कीं त्याला पोपची क्षमा मागण्यासाठीं बर्फावरून पोपच्या इटलींतील कॅनोसा येथील वसतिस्थानापर्यंत अनवाणी चालत राहावें लागलें आणि आंत येण्यासाठीं त्याला परवानगी देण्याची पोपची मर्जी लागेपर्यंत त्याला बाहेर तिष्ठत उभें राहावें लागलें!

अशा रीतीनें यूरपांतील हे देश रंगरूप घेतांना आपल्याला आढळत असले, तरी त्यांचें आज जें स्वरूप आपण पाहतों त्यापेक्षां यावेळीं त्यांचें रूप फारच निराळें होतें; विशेषतः त्यांत राहणारे लोक हे तर अगदींच वेगळ्या अवस्थेंत आढळतात. अजून आपणांला फ्रेंच लोक, इंग्लिश लोक, किंवा जर्मन लोक असें म्हणविण्यास तशी फारशी सुरुवातसुद्धां त्यांनीं केलेली नाहीं. त्यांमधील गरीब बिचारे शेतकरी अद्यापि अत्यंत दैन्यावस्थेंत असून देश किंवा भूगोल यांची त्यांना कांहीं माहिती नव्हती. त्यांना एवढेंच ठाऊक होतें, कीं आपण आपल्या जमीनदाराचे भूदास असून त्याची आज्ञा पाळणें एवढें आपलें काम. आणि या सरदार लोकांना जरी तुम्हीं विचारलें असतें कीं तुम्ही कोण, तर ते असेंच म्हणाले असते, कीं आम्ही या भूमिप्रदेशाचे स्वामी असून आमच्यापेक्षां श्रेष्ठ अशा दुसऱ्या सरदाराचे किंवा राजाचे आम्ही अंकित आहोंत. अशा तऱ्हेची ही सरंजामशाही रचना साऱ्या यूरपभर त्या काळीं पसरलेली होती.

मात्र हळूहळू जर्मनीमध्यें आणि विशेषतः इटलीमध्यें मोठमोठीं शहरें उदयास येतांना आपल्याला आढळतात. पॅरिस हेंही या सुमाराला एक प्रमुख शहर झालें होतें. हीं शहरें म्हणजे त्या काळच्या सगळ्या व्यापारधंद्यांचीं केंद्रस्थानें असल्यामुळें तेथें संपत्तीचा साठा वाढत जातांना दिसतो. या शहरांना सरंजामदार सरदारांची सत्ता कांहीं पटत नाहीं, त्यामुळें त्यांच्यांत नित्य झगडा सुरू होतो; परंतु अखेरीस पैशाचा विजय होतो. शहरांतील व्यापारी हा पैसा सरंजामदारांना कर्जाऊ देऊन त्याच्या जोरावर स्वतःला अधिकार आणि सत्ता प्राप्त करून घेतात. आणि हळूहळू या शहरांमधून सरंजामशाहीशीं कांहींच सूतगोत नसलेला असा नवाच एक वर्ग निर्माण होतो.

तात्पर्य, यूरपखंडांतील समाज हा या काळीं सरंजामशाहीच्या नमुन्याबरहुकूम निरनिराळ्या उच्चनीच थरांमध्यें विभागलेला आढळतो. आणि खुद्द धर्मपीठसुद्धां ही वर्गव्यवस्था मान्य करून तिला आपला आशीर्वाद देतांना आढळतें. अद्याप राष्ट्रभावना उत्पन्न झालेली दिसत नाहीं. परंतु यूरपखंडांतील सर्व ख्रिस्ती राजांना एकवटणारी ख्रिस्ती जगासंबंधींची कांहीं एक प्रकारची अस्पष्ट भावना मात्र यूरपमध्यें, विशेषतः वरिष्ठ वर्गांमध्यें, त्या काळीं दिसून येते. ख्रिस्ती धर्मपीठानें या भावनेचा प्रसार करण्यास साहाय्य केलें. कारण त्यामुळें ख्रिस्ती धर्मपीठाचें बळ वाढून पश्चिम यूरपमधील ख्रिस्ती धर्मपीठाचा आतां एकमेव आणि सर्वमान्य असा पुढारी झालेला जो रोमचा पोप त्याची सत्ताही त्यामुळें वाढत गेली. कॉन्स्टान्टिनोपल आणि पूर्वेकडील रोमचें साम्राज्य यांचा व रोमचा संबंध कधींच तुटून गेलेला होता हें तुला आठवतच असेल. कॉन्स्टान्टिनोपलमध्यें अद्यापि **जुनें सनातन धर्मपीठ** (Orthodox Church) चालू असून रशियानें आपला धर्म त्याच्यापासूनच घेतलेला होता. कॉन्स्टान्टिनोपलच्या ग्रीक लोकांची रोमच्या पोपला मान्यता नव्हती.

परंतु संकटाचा जेव्हां प्रसंग ओढवला, कॉन्स्टान्टिनोपलभोंवतीं जेव्हां शत्रूंचा वेढा पडला, त्याहूनही विशेषतः सेल्जुक तुर्कांनीं जेव्हां त्याची गळचेपी करण्यास सुरुवात

केली, त्या वेळीं कॉन्स्टान्टिनोपलचा सर्व गर्व गळाला; रोमबद्दलचा द्वेष त्यानें गिळून टाकला, आणि या मुस्लिम काफिरांविरुद्ध आपल्याला मदत करण्याबद्दल त्यानें पोपला विनंति केली. रोम येथें त्या वेळीं एक श्रेष्ठ पोप होता. त्याचें मूळचें नांव हाइल्डब्रँड असून पुढें हाच पोप सातवा ग्रेगरी म्हणून प्रसिद्धीस आला. या हाइल्डब्रँडपुढेंच जर्मन बादशहासारख्या बड्या धेंडाला बर्फावरून कॅनोसापर्यंत अनवाणी चालत यावें लागलें होतें.

आणखी एका गोष्टीमुळें यूरपांतील ख्रिस्ती जगांत या सुमारास मोठीच कल्पनांची खळबळ माजून राहिलेली होती. पुष्कळशा धर्मनिष्ठ ख्रिस्ती लोकांची श्रद्धा अशी होती, कीं ख्रिस्तानंतर १००० वर्षांनीं सर्व जगाचा एकाएकीं अंत होणार आहे. मिलेनियम या शब्दाचा अर्थ हजार वर्षांचा काळ असा आहे. मिले म्हणजे हजार आणि ॲनस म्हणजे वर्ष अशा दोन लॅटिन शब्दांचा मिळून हा शब्द बनलेला आहे. परंतु या काळाच्या अखेरीस तर जगाचा अंत व्हावयाचा अशी कल्पना होती. त्यामुळें मिलेनियम या शब्दाच्या अर्थांत अकस्मात् बदल होऊन चालू जगाचें नवीन अधिक चांगल्या जगांत रूपांतर असा झाला होता. या वेळीं साऱ्या यूरपमध्यें अतिशय दैन्यावस्था पसरलेली होती हें मीं तुला सांगितलेंच आहे; त्यामुळें लोकरच हें मिलेनियम म्हणजे सुवर्णयुग येणार या कल्पनेनें थकल्याभागल्या लोकांना एक प्रकारें समाधानाला स्थान मिळत होतें. कित्येकांनीं तर आपापला जमीनजुमला विकून पॅलेस्टाइनमध्यें कूच केलें होतें; हेतु हा, कीं जगाच्या अंताच्या समयीं आपण आपल्या पवित्र धर्मभूमींत असावें.

परंतु जगाचा अंत कांहीं झाला नाहीं आणि पॅलेस्टाइनमध्यें जे हजारों यात्रेकरू गेलेले होते त्यांचा छळ करून तुर्की लोकांनीं त्यांना सळो कीं पळो केलें. अत्यंत अपमानित आणि संतप्त होऊन ते यूरपमध्यें परत आले आणि पवित्र धर्मभूमीमध्यें आपल्याला काढाव्या लागलेल्या अत्याचारांची कहाणी त्यांनीं सगळीकडे प्रसृत केली. भिक्षु पीटर या नांवाचा एक प्रसिद्ध यात्रेकरू तर हातांत दंड घेऊन, मुसलमानांच्या हातून आपली पवित्र जरुसलेमनगरी सोडवा, असा उपदेश करीत सगळीकडे हिंडूं लागला.

याच सुमाराला कॉन्स्टान्टिनोपलकडून काफिरांविरुद्ध मदतीची याचना करण्यांत आली. आतां रोमन आणि ग्रीक प्रदेशांतील सर्वच्या सर्व ख्रिस्ती जग एकवटून चाल करून येणाऱ्या तुर्कांविरुद्ध खडें झालेंसें दिसूं लागलें. १०९५ मध्यें धर्मपीठांची एक मोठी बैठक भरून मुसलमानांकडून जेरुसलेमची पवित्र नगरी परत मिळविण्यासाठीं युद्ध पुकारण्याचा ठराव करण्यांत आला. अशा रीतीनें क्रूसेडस्‌ना, म्हणजेच इस्लाम जगाविरुद्ध ख्रिस्ती जग, क्रूसविरुद्ध चंद्रकोर, यांच्या युद्धास सुरुवात झाली.

# ५८

# आशिया व यूरप यांकडे आणखी एक दृष्टिक्षेप

१२ जून, १९३२

जगाचें, म्हणजे आशिया, यूरप आणि आफ्रिकेचा कांहीं भाग यांचें खिस्तानंतर १००० वर्षें संपण्याच्या वेळीं कशा प्रकारचें स्वरूप होतें, याचें थोडेंसें निरीक्षण गेल्या पत्रांत आपण पुरें केलें. तरी पण आणखी एकदां तिकडेच नजर टाकून पाहा.

प्रथम आशिया खंड. तेथें हिंदुस्थान आणि चीन यांमधील प्राचीन संस्कृति आणि सुधारणा अद्याप सुस्थितींत चालू आहेत. हिंदी संस्कृति मॅलेशिया आणि कांबोज यांमध्यें पसरत असून तेथें तिला फार भरदार फळ येत आहे. चिनी संस्कृति कोरिया-मध्यें, जपानमध्यें आणि कांहीं अंशीं मॅलेशियामध्यें पसरली आहे. पश्चिम आशियामध्यें अरबस्तान, पॅलेस्टाइन, सीरिया आणि मेसापोटेमिया या देशांत आरबी संस्कृति नांदते आहे; पर्शिया उर्फ इराणमध्यें प्राचीन इराणी संस्कृति आणि नवीन आरबी सस्कृति यांचें एक प्रकारचें मिश्रण दिसून येत आहे. मध्य आशियांतील कांहीं देशांमध्येंही हें इराणी-आरबी संस्कृतींचें मिश्रण थोडें थोडें मुरलें असून चीन आणि हिंदुस्थान यांचाही त्यांच्यावर कांहींसा परिणाम झालेला आहे. या सर्व देशांमध्यें उच्च प्रकारची सुधारणा नांदते आहे; व्यापार आणि कला आणि विद्या यांची भरभराट आहे; तेथील विद्यापीठांमध्यें दूरदूरच्या देशांतील विद्यार्थी जमा होत आहेत. फक्त मंगोलिया, मध्य आशियाचा कांहीं भाग आणि उत्तरेकडे सायबेरिया या प्रदेशांत सुधारणेची पातळी जरा कमी उंच आहे.

त्यानंतर यूरप खंड. आशियांतील पुढारलेल्या देशांच्या मानानें हें खंड मागास-लेलें आणि अर्धवट रानटी आहे. जुनी ग्रीक-रोमन संस्कृति म्हणजे फार प्राचीन-काळची एक नुसती आठवणीची गोष्ट होऊन बसली आहे. विद्यांना विशेषसा मान शिल्लक राहिलेला नाहीं; कलांचें कोठें फारसें दर्शन होत नाहीं, आणि व्यापारही आशियाच्या मानानें फारच कमी आहे. दोन ठिकाणीं मात्र थोडी चमक आढळते आहे. एक स्पेनमध्यें. तो देश आरबांच्या अमलाखालीं असून तेथें आरबी लोकांच्या वैभवाच्या काळांतील परंपरा चालू आहे. आणि दुसरी आशिया व यूरप यांच्यामधील सीमेवर वसलेलें जें कॉन्स्टान्टिनोपल शहर त्यामध्यें. हळूहळू त्याचा आतां पडता काळ सुरू झाला असला तरीही अजून तें चांगलें श्रेष्ठ दर्जाचें आणि गजबजलेलें शहर आहे. बाकी यूरपच्या बहुतेक भागामध्यें वारंवार दंगेधोपे सुरू आहेत आणि तेथें प्रचलित असलेल्या सरंजामशाहीमध्यें प्रत्येक सरदार आणि सरंजामदार हा आपआपल्या भागापुरता स्वतंत्र राजाच झालेला आहे. पूर्वीची ती साम्राज्याची राजधानी असलेली रोम नगरी तर या काळांत एकदां लहानशा खेड्याच्या अवस्थेला येऊन पोंचली होती

आणि तेथील त्या प्रचंड कलोजियम नांवाच्या रंगभूमीच्या ठिकाणीं जंगली जनावरें राहूं लागलीं होतीं! परंतु आतां पुन्हां हें शहर वाढूं लागलें आहे.

अशा रीतीनें ख्रिस्तानंतर १००० वर्षांच्या सुमाराच्या या दोन खंडांची, आशिया व यूरप यांच्या स्वरूपाची तूं तुलना केलीस, तर आशियाचें पारडें फारच जड आहेसें आढळेल.

परंतु वरवर दिसणाऱ्या या गोष्टींच्या आंत जरा खोलवर जाऊन आपण पुन्हां एकवार निरीक्षण करूं या. मग आपणाला आढळतें, कीं वरवर पाहणाराची कल्पना होते त्याप्रमाणें आशिया खंडाची अवस्था कांहीं तशी खरी चांगली नाहीं. हिंदुस्थान आणि चीन – प्राचीन संस्कृतींना पहिलें बाळसें ज्या ठिकाणीं चढलें ते हे देश – अडचणींत, संकटांत आहेत, असेंच आढळतें. ही अडचण किंवा हें संकट म्हणजे बाहेरून स्वाऱ्या होत आहेत एवढेंच केवळ नव्हे; तर त्यांची अंतर्गत शक्ति आणि जोम यांच्यामधील सत्त्वच शोषून घेणारें जें संकट तें अधिक खरें महत्त्वाचें संकट आहे. पश्चिमेकडे आरबी लोकांचा वैभवाचा काळ संपलेला आहे व सेल्जुक तुर्कांची सत्ता प्रस्थापित होऊन वाढलेली दिसते आहे हें खरें; परंतु तिचें मूळ केवळ त्यांच्या लढाऊ वृत्तीमध्यें आहे. त्यांच्या ठिकाणीं हिंदी, चिनी, इराणी किंवा आरबी संस्कृतींचा आविष्कार झालेला दिसत नाहीं; तर आशिया खंडांतील क्षात्रवृत्ति, लष्करी बाणा तेवढा त्यांच्या ठिकाणीं वाढलेला दिसतो. आशिया खंडांतही या सर्व प्राचीन संस्कृतींचा संकोच होत आहेसें दिसतें. त्यांच्या ठिकाणीं आत्मविश्वास राहिला नसून चढाई सोडून निव्वळ बचावाचें धोरण त्यांनीं स्वीकारलेलें दिसतें. शक्ति आणि उत्साह यांनीं नटलेले नवीन मनुष्यसमाज उदयाला येऊन ते आशियांतील या जुन्या मानववंशाला जिंकूं लागले आहेत आणि यूरप खंडाला सुद्धां त्याचें ग्रहण लागण्याचीं चिन्हें दिसत आहेत. परंतु त्यांनीं आपल्याबरोबर कांहीं एखादी सुधारणेची लाट किंवा संस्कृतीची नवीन मोठी प्रेरणा मात्र आणलेली नाहीं. उलट, आशियांतील या प्राचीन समाजांनींच त्यांना सुसंस्कृत करून आपल्यामध्यें समाविष्ट करून घेतलेलें आढळतें.

अशा रीतीनें आशिया खंडामध्यें एक फार मोठा बदल घडून येत असलेला आढळतो. प्राचीन सुधारणा चांगल्या नांदत आहेत असें दिसत असलें, कलांचा उत्कर्ष होत असला आणि विलासोपभोगांना रोज नवा नवा रंग चढत जात असला, तरी सुद्धां त्या सर्व सुधारणा व संस्कृति यांची नाडी मात्र मंद होऊं लागली आहे; त्यांचा श्वास आत आंत खोल जाऊं लागला आहे. तरी पण अजून त्या खूप दीर्घ काळपर्यंत टिकून राहणार आहेत. मोंगल लोक आल्यावर मध्य आशिया व अरबस्तान यांच्यांतील संस्कृतींचा ओघ मात्र खंडित होतो. परंतु एवढा एक अपवाद सोडला, तर या संस्कृतींचा इतर ठिकाणीं प्रत्यक्ष अंतही होत नाहीं किंवा त्यांच्या ओघांत मध्येंच कोठें मोठा खंडही पडत नाहीं. हिंदुस्थान आणि चीन यांमध्यें त्यांच्यामधील तेज हळूहळू मंद होतां होतां शेवटीं तेथें या संस्कृतींना जवळजवळ रंगीत चित्रांचें स्वरूप

प्राप्त होतें; दुरून पाह्यला तेवढें सुंदर, पण प्रत्यक्ष आत जिवंतपणा मात्र मुळींच नाहीं; आणि फार जवळ जाऊन निरीक्षण केलेंत, तर वाळवीनें पोखरून सगळा पोकळ डोलारा केलेला!

संस्कृति काय किंवा साम्राज्यें काय, यांचा अंत बाहेरचा शत्रु प्रबळ असतो म्हणून होतो म्हणण्यापेक्षां त्यांच्या अंतरंगातच कीड लागते व दुबळेपणा उत्पन्न होतो आणि त्यामुळेंच त्यांचा अंत होतो हेंच म्हणणें अधिक युक्त आहे. रानटी लोकांच्यामुळें रोमचा पाडाव झाला असें कांहीं नव्हे. खरोखर रोम आधींच निर्जीव प्रेताप्रमाणें झालें होतें. रानटी लोकांनीं काय केलें, तर त्याला एक धक्का देऊन खालीं पाडलें इतकेंच. रोमचे हातपाय रानटी लोकांनीं कापले, तेव्हां रोमचें हृदय आधींच बंद पडलेलें होतें. असाच कांहींसा प्रकार चीन आणि हिंदुस्थान या देशांमध्यें आणि आरबी लोकांच्या बाबतींतही झालेला आढळून येतो. फरक इतकाच, कीं आरबी लोकांच्या संस्कृतीचा उदय जसा अतिशय जलद झाला तसाच तिचा पाडावही फार वेगानें झाला. तर चिनी आणि भारतीय संस्कृतींच्या ऱ्हासाची ही क्रिया इतकी हळूहळू आणि दीर्घ काळ-पर्यंत होत राहिली, कीं ऱ्हास झाला हें सुद्धां नीटसें लक्षांत येणें सहज शक्य झालें नाहीं.

गझनीचा महमूद येण्यापूर्वींच पुष्कळ दीर्घ काळापासून ऱ्हासाचें हें कार्य सुरू झालेलें होतें. लोकांच्या मनामध्येंच फरक झालेला आपल्याला आढळतो. नवीन विचार किंवा नवीन वस्तु निर्माण करण्याची प्रवृत्ति नाहींशी होऊन तिच्या जागीं भारतीय लोक पूर्वी जें कांहीं झालें त्याची नुसती नक्कल किंवा पुनरुच्चार करण्यामध्येंच गुंग होऊं लागलेले दिसतात. त्यांच्या बुद्धीची तीव्रता अजून काहीं कमी झाली होती असें नव्हे. पण तिचा सगळा उपयोग फार फार जुन्या काळीं जें कांहीं लिहिलें गेलें त्याचा अर्थ लावण्यांत आणि त्याच्यावर टीका लिहिण्यांत होऊं लागला होता. त्यांच्या-मध्यें शिल्पकला आणि मूर्तिकाम उत्कृष्ट दर्जाचें होत होतें; परंतु त्यामध्येंही बारीक बारीक नक्षीकामावर आणि सजावटीवर प्रमाणाबाहेर भर देण्यांत येऊं लागला होता; इतका, कीं नक्षीकामाच्या आणि सजावटीच्या त्या ओझ्याखालीं सौंदर्याच्याऐवजीं बेंगरूळपणाचें मात्र केव्हां केव्हां प्रदर्शन होऊं लागलें. स्वतंत्र कल्पना तर मुळींच कोठें प्रत्ययाला येईनाशी झाली; तशीच भव्य आणि उदात्त अशी रचनाही आढळत नाहींशी झाली. कला, विलास आणि विषयोपभोगांच्या नाजुक नाजुक तऱ्हा आणि साधनें यांचा श्रीमंत आणि सुखवस्तू लोकांमध्यें प्रसार सुरू असलेला आढळतो. परंतु सर्वसामान्य लोकांचें दैन्य किंवा श्रम कमी करण्यासाठीं किंवा समाजाची उत्पादन-शक्ति वाढविण्यासाठीं कोणीं कांहीं प्रयत्न केलेला मात्र आढळून येत नाहीं.

संस्कृतीच्या अस्तकाळाचीं हीं सगळीं चिन्हें आहेत. हें असें होऊं लागलें, कीं अशा संस्कृतीचा प्राण कंठाशीं आला म्हणून खात्रीनें समजावें. कारण नवनिर्मिति करणें हें खरें जिवंतपणाचें लक्षण आहे; नक्कल करणें किंवा त्याच त्याच गोष्टी पाठ म्हणून दाखविणें हें नव्हे.

अशा तऱ्हेची ऱ्हासाची ही क्रिया त्या काळीं चीन व हिंदुस्थान यांमध्यें सुरू झालेली आढळते. परंतु माझ्या म्हणण्याचा भलताच कांहीं अर्थ समजूं नकोस. माझ्या म्हणण्याचा हेतु असा नव्हे, कीं चीन आणि हिंदुस्थान हे देशच या कारणामुळें अजिबात नष्ट होऊन गेले अथवा त्यांच्यामध्यें रानटी अवस्था निर्माण झाली. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं चीन आणि हिंदुस्थान यांमध्यें प्राचीन काळीं नवनिर्मितीची जी चैतन्यशक्ति भराला आली होती, ती त्या देशांत पुष्कळ काळ नांदल्यानंतर आतां थकली होती; तिच्यांतील दम नाहींसा होऊं लागला होता; तिच्यांतील आत्मस्फूर्तीचें, स्वयंविकासाचें सामर्थ्य नष्ट झालें होतें. आजूबाजूच्या बदलत्या परिस्थितीशीं जुळतें होण्याची तिच्यांत ताकद उरली नव्हती. त्या बदललेल्या परिस्थितींतच जीव धरून कशीबशी अद्याप ती जिवंत राहिली होती इतकेंच. प्रत्येक देशाच्या आणि सुधारणेच्या व संस्कृतीच्या बाबतींत हें असें घडत असतें. कांहीं काळ अत्यंत श्रेष्ठ नवनिर्मितीचा आणि प्रगतीचा – वाढीचा – जातो; तर कांहीं काळ थकण्याचा जातो. हिंदुस्थान आणि चीन यांच्यामध्यें हा थकण्याचा काळ इतक्या उशिरा आला आणि तो थकवाही त्यांचें सगळेंच कर्तृत्व नाहींसें व्हावें इतक्या मोठ्या प्रमाणांत आला नाहीं, हीच उलट अजब गोष्ट आहे.

इस्लामधर्मानें हिंदुस्थानांत मानवी प्रगतीची एक नवीन प्रेरणा आणली. कांहीं अंशीं एक प्रकारच्या शक्तिवर्धक औषधासारखा इस्लामधर्माचा हिंदुस्थानला उपयोग झाला. त्यानें हिंदुस्थानला खडबडून जागें केलें, परंतु त्याच्या हातून हिंदुस्थानचें जितकें हित व्हावयाला पाहिजे होतें तितकें झालें नाहीं; याचीं दोन कारणें आहेत. इस्लामधर्मानें हिंदुस्थानांत प्रवेश केला तो चुकीच्या पद्धतीनें केला; आणि तोही थोडासा योग्य काळ टळून गेल्यानंतर केला. गझनीच्या महमुदाच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या होऊं लागण्यापूर्वींच किती तरी शतकें मुसलमानी धर्म-प्रचारक हिंदुस्थानांत येत होते आणि त्यांचें येथें स्वागतही होत होतें. येथें येण्यासाठीं त्यांना कसलाही दंगाधोपा किंवा झगडा करावा लागला नाहीं आणि त्यांच्या धर्मप्रसाराच्या कामांत थोडेंबहुत त्यांना यशही आलें. हिंदुस्थानांत या सुमारास मुसलमानी धर्माबद्दल प्रतिकूल किंवा शत्रुत्वाची भावना जवळजवळ मुळींच नव्हती म्हटली तरी चालेल. नंतर महमूद आला तो तरवार परजीत आणि आग पाखडीतच आला. जेता, लुटारू आणि कत्तली करणारा अशा स्वरूपांत तो या देशांत आल्यामुळें हिंदुस्थानांत इस्लामधर्माची जितकी अपकीर्ति झाली, तितकी दुसरी कशामुळेंही झाली नाहीं. महमुदाला अर्थातच धर्माची, त्याच्यासारख्याच इतर जगज्जेत्यांप्रमाणें फारशी फिकीर नव्हती; तर लूटमार करणें हाच त्याचा मुख्य उद्देश होता. परंतु त्याच्या या स्वाऱ्यांच्या दुष्कीर्तीची छाया मुसलमानी धर्मावर हिंदुस्थानमध्यें फार काळपर्यंत पसरलेली राहिली; आणि लोक त्यासंबंधीं निर्विकार मनानें विचार करूं शकत नाहींसे झाले; असें झालें नसतें, तर कदाचित् मुसलमानी धर्माचा या देशात निराळ्या रीतीनें विचार होऊं शकला असता.

हें झालें एक कारण. दुसरें कारण म्हणजे मुसलमानी धर्माचा प्रवेश हा या देशांत व्हायला पाहिजे होता त्याहून उशिरा झाला. त्या धर्माचा प्रथम उदय झाल्यानंतर ४०० वर्षांनीं त्याचा हिंदुस्थानात प्रवेश झाला. एवढ्या या दीर्घकाळांत त्याची स्वतःचीच थोडीफार दमछाकी झाली होती आणि त्याच्यामधील नवनिर्मितीची शक्ति पुष्कळ प्रमाणांत नाहींशी झाली होती. इस्लामधर्माच्या उदयाच्या पहिल्या काळांत आरब लोक जर हिंदुस्थानांत आले असते, तर उदयोन्मुख आरबी संस्कृतीचा येथील प्राचीन भारतीय संस्कृतीशीं मिलाफ होऊन गेला असता आणि त्यांचा एकमेकांवर जो परिणाम झाला असता, त्यामधून पुष्कळ मोठाल्या घटना घडून आल्या असत्या. दोन सुसंस्कृत अशा मानववंशांचें हें मीलन झालें असतें; आरब लोक तर धर्माच्या बाबतींत कडवे धर्मवेडे मुळींच नव्हते; बुद्धिवादी असल्याबद्दलच त्यांची ख्याति होती. बगदादमध्यें तर एका काळीं, खुद्द खलिफाच्या आश्रयाखालीं, सर्व भिन्न भिन्न धर्मांच्या आणि मुळींच धर्म नसणाऱ्या अशाही लोकांचें एक मंडळ स्थापण्यांत आलेलें होतें; या मंडळाच्या वेळोवेळीं बैठकी भरून त्यांत नानाविध विषयांची चर्चा केवळ बुद्धिवादाच्या भूमिकेवरून करण्यांत येत असे.

परंतु आरबी लोक प्रत्यक्ष हिंदुस्थानमध्यें आले नाहींत. ते सिंधमध्येंच थांबले आणि हिंदुस्थानभर त्यांचा कांहीं परिणाम झाला नाहीं. मुसलमानी धर्माचा प्रवेश हिंदुस्थानमध्यें तुर्क किंवा दुसऱ्या अशा लोकांमार्फत झाला, कीं ज्यांच्या ठिकाणीं आरब लोकांची संस्कृतिसंपन्नताही नव्हती आणि धर्माबद्दलची सहिष्णुताही नव्हती. ते सारे लोक मुख्यतः शिपाईगडी होते.

असें असलें तरीही त्यांच्या येण्यानें प्रगति आणि नवनिर्मितीचा प्रयत्न या बाबतींत एक प्रकारची नवीच चेतना निर्माण झाली हें खरें. यामुळें हिंदुस्थानांत नवचैतन्य निर्माण कसें झालें आणि त्याचें पुढें एकंदर कोणतें स्वरूप झालें याचा आपण पुढें विचार करणार आहों.

हिंदी संस्कृति दुर्बळ होत चालली होती या गोष्टीचा आणखी एक परिणाम या काळांत दिसून येतो. बाहेरून जेव्हां हे हल्ले होऊं लागले, तेव्हां आंत येणाऱ्या त्या लोंढयापासून स्वतःचें संरक्षण करण्यासाठीं त्या संस्कृतीनें स्वतःच्या भोंवतीं एक प्रकारचें कवच किंवा कडें उभारण्याचा, म्हणजेच जवळजवळ स्वतःला तुरुंगांत कोंडून टाकण्याचा उपक्रम सुरू केला. हेंही एक दुर्बळपणाचें आणि भीतीचेंच लक्षण आहे. शिवाय, या उपायानें खरा विकार जो होता तो वाढतच गेला. परकी हल्ले हा कांहीं खरा विकार नव्हता, तर आंतला जोम नाहींसा होऊं लागला होता हा खरा विकार होता. आणि संरक्षणार्थ स्वीकारलेल्या या एकलकोंडेपणामुळें हा शक्तिक्षय वाढतच गेला आणि शक्ति वाढण्याचे सर्व मार्ग बंद झाले. पुढें दिसेलच आपल्याला, कीं चीननेंही आपल्यापरी हाच मार्ग स्वीकारला आणि तसाच जपाननें पण. चोहों बाजूंनीं आवरण घालून कोंडून टाकलेल्या अशा समाजात राहणें ही मोठी धोक्याची गोष्ट

आहे. कारण मनुष्य तेथें दगडासारखा चलनवलनविरहित होऊं लागतो; ताजी हवा आणि नव्या ताज्या कल्पना सहन करण्याची त्याची संवय नाहींशी होते. जितकी व्यक्तीला तितकीच समाजालाही ताज्या हवेची आवश्यकता असते.

हें झालें आशियापुरतें. यूरप तर या काळीं मागासलेला असून तेथें तंटे माजले होते, हें आपण पाहिलेंच आहे. पण या सगळ्या बंडाळीच्या आणि अडाणीपणाच्या पाठीमागें तेथें निदान जिवंतपणा आणि उत्साह तरी आढळतो. पुष्कळ वर्षें मोठेपण भोगून आशिया खंड आता घरंगळीला लागलेलें होतें; तर यूरप खंड वर चढण्याची धडपड करीत होतें. परंतु आशियाच्या पातळीच्या बरोबर येण्यासाठीं त्याला अजून पुष्कळच वर चढून जायला हवें होतें.

आज यूरप खंडाचें सगळीकडे प्रभुत्व असून आशिया खंडाची स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं मोठे कष्ट सोसून धडपड चालली आहे. परंतु त्यांतही वरवर सोडून जरा खोलवर पाहा. आशिया खंडांत तुला आज एक प्रकारचा नवीनच उत्साह, नवीनच शक्ति, नवीनच नवनिर्माणसामर्थ्य, एक प्रकारचें नवीनच चैतन्य उत्पन्न झालेलें दिसेल. आशिया खंड पुन्हां उठून उभें राहिलें आहे यांत मुळींच संशय नाहीं. आणि यूरप खंडांत, विशेषतः पश्चिम यूरप खंडात आज कितीही मोठेपणाचा डौल असला, तरी तेथें ऱ्हासाचीं थोडीं थोडीं लक्षणें दिसूं लागलेलीं आहेत. यूरपीय संस्कृतीचा नाश करण्याइतकें बळ अंगीं असलेले रानटी लोक आज जगांत नाहींत हें खरें. परंतु सुधारलेले लोकच केव्हा केव्हां रानटीपणाचें वर्तन करतात आणि असें झालें म्हणजे त्यांची सुधारणा आपली आपणच नष्ट होते.

आशिया खंड आणि यूरप खंड अशा वेगवेगळ्या खंडांबद्दल मी बोलतों आहें. पण हें केवळ भूवर्णनशास्त्रांतले पारिभाषिक शब्द आहेत असें म्हटलें पाहिजे. आपल्यापुढें जे प्रश्न उभे आहेत, त्यांत हे प्रश्न आशियापुरते, हे यूरपपुरते असा कांहीं एक प्रकार नसून आपल्यापुढचे सगळे प्रश्न सर्व जगाचे किंवा अखिल मानवजातीचे प्रश्न आहेत. साऱ्या जगाच्या दृष्टीनेंच ते आम्हीं सोडविले पाहिजेत; नाहीं तर पुन्हां अव्यवस्था आणि गडबड माजल्याशिवाय राहणार नाहीं. अशा प्रकारें हे प्रश्न सोडवावयाचे म्हणजे सर्व ठिकाणचें दारिद्य आणि दैन्य यांचा नाश झाला पाहिजे. हें घडवून आणायला बराच काळ लागेलही. परंतु आपलें तें ध्येय असलें पाहिजे; त्याच्यांत कसली तडजोड किंवा कमीअधिक करायला आपण तयार होतां कामा नये. असें केलें तरच समतेच्या पायावर आधारलेली खरी संस्कृति आणि खरी सुधारणा प्राप्त होईल; आणि मग एका देशाकडून दुसऱ्या देशाची किंवा एका वर्गाकडून दुसऱ्या वर्गाची पिळणूक होण्याला जागाच राहणार नाहीं. अशी समाजरचना ही प्रगतिशील राहील; तिच्यांत नवनिर्मितीची शक्ति नेहमींच राहील; बदलत्या परिस्थितीबरोबर जुळते होण्याजोगे बदल स्वतःमध्यें करून घेण्याचें सामर्थ्य तिच्या ठिकाणीं असेल; तिचा आधार समाजाच्या सर्व घटकांमधील परस्पर-सहकार्य

हा असेल. अशी ही संस्कृति अखेरीला सर्व जगावर पसरलीच पाहिजे. पूर्वीच्या काळच्या संस्कृतींचा ऱ्हास होऊं लागून जसा नाश झाला, तसा ऱ्हास आणि नाश या नव्या संस्कृतीचा होणार नाहीं.

म्हणून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं झगडत असतांना आपण नेहमीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं मनुष्यसमाजाचें खरें महान् ध्येय अखिल मानवजातीचें स्वातंत्र्य हें आहे; आणि या ध्येयाच्या पोटांत आपल्या लोकांच्या स्वातंत्र्याचा आणि दुसऱ्याही लोकांच्या स्वातंत्र्याचा समावेश आहे.

## ५९

# अमेरिकेंतील मय-सुधारणा

*१३ जून, १९३२*

माझ्या या पत्रांमध्यें सर्व जगाच्या इतिहासाचा आढावा घेण्याचा माझा प्रयत्न आहे, असें मी तुला सागतों आहे खरा; परंतु प्रत्यक्ष पाहिलें तर आतांपर्यंत हा फक्त यूरप, आशिया आणि उत्तर आफ्रिका यांचाच इतिहास होऊन गेला आहे. अमेरिका किंवा ऑस्ट्रेलिया यांच्याबद्दल मीं तुला जवळजवळ कांहींसुद्धां सांगितलें नाहीं म्हटलें तरी चालेल. अर्थात् या प्राचीन काळींही अमेरिकेंत एक सुधारणा नांदत होती एवढें मात्र एकदां मीं तुला बजावून ठेवलेलें आहे. या सुधारणेसंबंधीं आधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं; आणि मला तर स्वतःला त्यांतील फारच थोडी माहिती आहे. परंतु सर्वसामान्य लोकांची एक चुकीची समजूत असते, कीं कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढून यूरपीयन लोक तेथें जाऊन पोंचेपर्यंत अमेरिका देश हा आपला एक निव्वळ रानटी देश होता. तशी चुकीची समजूत तुझी होऊं नये म्हणून माझी माहिती अपुरी असूनही या सुधारणेबद्दल तुला थोडेंफार सांगण्याचा मोह मला आवरत नाहीं.

मानव अश्मयुगांत ज्या काळीं होता, ज्या काळीं घरदार करून मनुष्य अद्यापि कोठेंही स्थिरस्थावर झालेला नव्हता, तर शिकार करून पोट भरीत जंगलांत भटकत होता; इतक्या त्या प्राचीन काळीं आशिया आणि उत्तर अमेरिका याच्यामध्यें जमिनीवरून दळणवळण सुरू असावें असें दिसतें. या खंडांतून त्या खंडात अलास्काच्या मार्गानें कांहीं कांहीं मनुष्यसंघ किंवा टोळ्या जात-येत असल्या पाहिजेत. पुढें हें दळणवळण बंद पडलें आणि अमेरिकेंतल्या लोकांनीं आपली स्वतंत्रपणेंच सुधारणा संपादिली. आज जेवढी माहिती मिळालेली आहे तेवढ्यावरून या संस्कृतीचा आशिया किंवा यूरपशीं संबंध जोडण्याला काहीं एक साधन नाहीं हें लक्षांत ठेव. सोळाव्या शतकाच्या अखेरीला अमेरिकेचा जो शोध करण्यांत आला म्हणून म्हणण्याची पद्धति

आहे, तेथपर्यंत अमेरिकेशीं बाकीच्या जगाचा तसा म्हणण्यासारखा संबंध येत नव्हता. अमेरिकेचें हें जग अगदींच लांब अंतरावर आणि सर्वस्वीं निराळ्या प्रकारचें जग असून त्याच्यावर यूरप किंवा आशिया यांमधील घडामोडींचा कांहींही परिणाम होत नव्हता.

या खंडांत संस्कृतींचीं तीन प्रमुख केंद्रें होतीं असें दिसतें; एक मेक्सिकोंत, एक मध्य अमेरिकेंत, आणि एक पेरू देशांत. या संस्कृतींचा उगम केव्हांपासून झाला हें कांहीं सांगतां येत नाहीं. परंतु मेक्सिकोंतील शकाची, कालगणनेची सुरुवात ख्रिस्तपूर्व ६१३ च्या आसपास झालेली आहे. ख्रिस्ती सनाच्या सुरुवातीला, दुसऱ्या शतकापासून पुढें तिकडे पुष्कळ शहरें उदयास आलेलीं आढळतात. दगडी बांधकाम, मातीच्या भांड्यांचें काम, कापड विणणें आणि अत्यंत सुंदर प्रतीचें रंगकाम हे उद्योग त्या ठिकाणीं उदयास आलेले होते. तांबें आणि सोनें तेथें विपुल सांपडत असे. परंतु लोखंड मात्र सांपडत नव्हतें. शिल्पकला चांगली भरभराटीस आलेली दिसते आणि शहरामागून शहरें जणुं एकमेकांशीं स्पर्धा करीत उभीं राहतांना आढळतात. लिहिण्याची कांहीं एक खास गुंतागुंतीची पद्धतीही त्यांच्यामध्यें आढळते. चित्रकला, विशेषतः मूर्तिकाम, फार मोठ्या प्रमाणावर आणि अत्यंत सौंदर्यपूर्ण असें आढळून येतें.

संस्कृतीच्या या प्रत्येक केंद्रांत अनेक स्वतंत्र राज्यें होतीं. त्यांत किती तरी निरनिराळ्या भाषा असून त्याच्यामध्यें विपुल वाङ्मय होतें. राज्यव्यवस्था चांगली सुसूत्र आणि सामर्थ्यवान् असे आणि शहरामधून बुद्धिजीवी आणि सुसंस्कृत समाजाची वसती असे. कायदेपद्धति आणि आर्थिक व्यवहार याची या राज्यांतून चांगलीच वाढ झालेली होती. इ. स. ९६० मध्यें उक्ष्मल या शहराची प्रस्थापना झाली आणि थोड्याच काळांत आशियांतील मोठमोठ्या शहरांच्या जोडीला जाऊन बसण्याइतकी या शहराची वाढ झाली. लाबुआ, मयपान, चौमुलतुन अशीं दुसरींही पुष्कळ शहरें या खंडांत होतीं.

मध्य अमेरिकेंत तीन प्रमुख राज्यें असून त्यांचा एक मित्रसंघ होता, त्याला आधुनिक काळीं मयपानचा संघ असें नांव दिलेलें आहे. आशिया आणि यूरप खंडांच्या इतिहासात ख्रिस्तानंतर सुमारें एक हजार वर्षांच्या अखेरच्या काळाशीं आपण येऊन पोंचलों आहों; त्या सुमाराचाच काळ या संघाचाही आहे. तात्पर्य काय, तर ख्रिस्तानंतर एक हजार वर्षांच्या सुमारास मध्य अमेरिकेंतील सुधारलेल्या राज्यांचा अशा रीतीनें बाकीच्या जगाला लाज वाटविण्यासारखा एक प्रबळ मित्रसंघ होता. परंतु या सर्व राज्यामध्यें — नव्हे, सगळ्यांत मय-संस्कृतींतच उपाध्यायवर्गाचें फार प्रस्थ माजलेलें होतें. त्यामध्यें ज्योतिषशास्त्राला सगळ्या मोठा मान दिला जाई आणि या शास्त्राच्या ज्ञानाच्या बळावर उपाध्यायवर्ग अज्ञानी लोकांचा फार गैरफायदा घेई. हिंदुस्थानात पाहतोंच, कीं आपण, किती लाखों लोकाची सूर्यचंद्रांच्या ग्रहणाच्या वेळीं स्नान करण्याची आणि उपास करण्याची प्रवृत्ति बनविण्यांत आलेली आहे ती. तसाच कांहींसा प्रकार येथें होता.

मयपानाचा संघ सुमारें शंभर वर्षें टिकला. त्यानंतर तेथें एक सामाजिक क्रांति

झाली. आणि सरहद्दीवरील एका परकी सत्तेचा हात तेथें शिरकला असें दिसतें. इ. स. ११९० च्या सुमारास मयपान शहर नष्ट करण्यांत आलें. इतर शहरें मात्र तशींच अस्तित्वांत राहिलीं. त्यानंतर आणखी एक शतकानंतर दुसरेच लोक त्या ठिकाणीं येऊन बलिष्ठ झाले. ते म्हणजे मेक्सिको प्रांतांतील ॲझटेक लोक. चौदाव्या शतकाच्या सुरुवातीला त्यांनीं मय देश काबीज केला आणि इ. स. १३२५ च्या सुमारास त्यांनीं टेनॉक्टिट्लान या शहराची प्रस्थापना केली. साऱ्या मेक्सिकन भूमीची लौकरच या ठिकाणीं राजधानी करण्यांत आली, ॲझटेक लोकांच्या साम्राज्याचें तें मुख्य केंद्र बनलें आणि त्याची लोकसंख्या प्रचंड वाढली.

ॲझटेक राष्ट्र हें लढवय्यांचें राष्ट्र होतें. जागोजाग त्यांच्या लष्करी वसाहती आणि तळ होते. लष्कराच्या सोयीसाठीं त्यांनीं रस्त्यांचें जाळें निर्माण केलेलें होतें. असेंही सागतात, कीं आपल्या साम्राज्यांतील मांडलिक राज्यांच्यामध्यें आपसात कलागती लावून देण्यांतही कांहीं हे लोक कमी निपुण नव्हते. कारण त्या मांडलिक राज्यांत एकजूट नसली म्हणजे त्यांच्यावर साम्राज्याचा अधिकार चालविणें सोपें पडे. सगळ्याच साम्राज्यांचें हें फार जुनें धोरण आहे. रोमनें तर याबद्दल म्हणच निर्माण केली, कीं Divide at impera फोडा आणि राज्य करा!

इतर पुष्कळ बाबतींत ॲझटेक लोक फार चतुर आणि पुढारलेले असले, तरी त्यांच्यामध्येंही उपाध्यायवर्गाचें प्रस्थ फार मोठें माजलेलें होतें आणि याहूनही वाईट म्हणजे त्यांच्या धर्मांत मनुष्यबळीची पद्धत होती. दर वर्षीं हजारों माणसांना या धर्मपद्धतीस अनुसरून अंगावर शहारे येण्यासारख्या क्रूर रीतीनें बळी दिलें जात असे.

सुमारें दोनशें वर्षेंपर्यंत ॲझटेक लोकांनीं आपल्या साम्राज्याचा अधिकार हातांत जणुं लोखंडाची छडी घेऊन गाजविला. त्यांच्या राज्यात बाह्यतः शांतता आणि सुबत्ता होती. परंतु सामान्य जनतेची अत्यंत निर्दयपणें पिळणूक होत होती व त्यामुळें लोक दरिद्री झालेले होते. अशा तऱ्हेच्या पायावर बांधलेलें आणि अशा रीतीनें चालविलेलें हें साम्राज्य फार काळपर्यंत टिकणें अशक्य होतें. आणि शेवटीं नाहींच तें फार काळ टिकलें. सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला (१५१९) ज्या वेळीं ॲझटेक लोकांची सत्ता व सामर्थ्य अगदीं शिखराला पोंचलीं असें दिसत होतें, अशा वेळीं हें भलें थोरलें साम्राज्य मूठभर परकी लुटारू पुंडांच्या – पेंढाऱ्यांच्या पुढें एकदम कोलमडून जमीनदोस्त झालें. हा या साम्राज्याचा चक्काचूर हर्नान कोर्टेझ नांवाच्या एका स्पॅनिश इसमानें एका छोट्याशा लष्करी तुकडीच्या साहाय्यानें केला. कोर्टेझ हा चांगला शूर मनुष्य होता, तसाच तो साहसी पण भरपूर होता. त्याच्याजवळ घोडे होते आणि बंदुका होत्या. या दोन गोष्टींचा त्याला तेथें फारच मोठा उपयोग झाला. असें दिसतें, कीं मेक्सिकोच्या साम्राज्यामध्यें घोडे नसावेत; आणि बंदुका तेथें नव्हत्या यांत तर मुळींच संशय नाहीं. परंतु कोर्टेझ हा कितीही धैर्याचा पुतळा असला आणि त्याच्याजवळ भले पुष्कळ घोडे आणि बंदुका असल्या, तरी पण ॲझटेकच्या साम्राज्याला

आंतूनच जर कीड लागलेली नसती तर त्याच्या सगळ्या साधनसामग्रीचा कोर्टेझला कांहीं उपयोग झाला नसता. परंतु तें साम्राज्य आंतून कुजलेलें होतें; बाहेरचें सोंग मात्र चांगलें कायम ठेवलेलें होतें; परंतु त्याला कोलमडून लावायला एक लहानशी लाथसुद्धां पुरेशी होती. तें साम्राज्य लोकाच्या पिळणुकीवर उभारलेलें असून लोकांना तें अगदीं नकोसें झालेलें होतें. त्यामुळें त्याच्यावर जेव्हां हल्ला झाला, त्या वेळीं साम्राज्य चालविणाऱ्यावरील या संकटाचें सर्वसामान्य लोकांनीं स्वागतच केलें. असें जेव्हां घडतें तेव्हां एक सामाजिक क्रांति घडून यावयाची हा ठरलेला क्रमच आहे.

एक वेळ मेक्सिकन लोकांनीं कोर्टेझला पिटाळून लावलें होतें; आणि तो अगदीं मरतां मरतां वांचला होता. पण तो पुन्हां स्वारी करून आला, त्या वेळीं त्याला स्थानिक रहिवाशांचें साहाय्य मिळालेलें असल्यामुळें त्याचा जय झाला. त्यामुळें ॲझटेक लोकांचें राज्य तर नष्ट झालेंच; परंतु त्याबरोबरच सगळी मेक्सिकन संस्कृतीही पार विलयाला गेली याचें मोठें नवल वाटतें. एवढेच नव्हे, तर थोड्याच दिवसात साम्राज्यशाहीचें केंद्रस्थान अशी ती प्रचंड राक्षसी टेनॉक्टिट्लान नगरीही होती का नव्हती अशी होऊन गेली. त्या शहरातला पूर्वीचा एक दगडसुद्धा शिल्लक राहिला नाहीं. स्पॅनिश लोकानीं त्या ठिकाणीं आपलें एक कॅथेड्रल मात्र बांधलें. मयराज्यांतील इतर शहरेंही नष्ट होऊन त्या ठिकाणीं युकाटानचें अरण्य पसरलें; पुढें त्या शहरांचीं नांवेंसुद्धां कोणाच्या आठवणींत राहिलीं नाहींत; आणि काहीं थोड्यांची आठवण जी राहिली आहे, ती त्यांच्या मूळच्या ठिकाणांच्या आसपास त्या नांवांचीं क्वचित् लहान लहान खेडीं आहेत त्यांच्यामुळेंच काय ती. त्यांचें सगळें वाङ्मयही नष्ट झालें. केवळ तीन ग्रंथ त्याच्यामधील आज शिल्लक राहिलेले आहेत. पण तेही अजून कोणाला वाचतां आलेले नाहींत.

१५०० वर्षेपर्यंत चांगल्या रीतीनें नांदत राहिलेली ही प्राचीन संस्कृति आणि हा प्राचीन समाज दोन्ही, यूरपमधील एका नवीन लोकांशीं त्यांचा संबंध येतांक्षणींच एकाएकीं पार नाहींशीं होऊन गेलीं; असें हें झालें तरी कसें याचा खुलासा करणें हें खरो-खरच फारच असामान्य कठिण कार्य आहे. हा जो नव्या संस्कृतीचा तेथें संबंध आला, तो जणुं काहीं एक प्रकारच्या रोगासारखाच झाला असें दिसतें; जणुं हा एक सांथीचा रोगच तेथें आला आणि त्यानें सगळ्यांचा पुरा नायनाट करून टाकला. कांहीं बाबतींत ॲझटेक लोकांची सुधारणा पुष्कळच उच्च दर्जाची होती; तरी कांहीं बाबतींत ते फारच मागासलेले होते. त्यांच्या ठिकाणीं इतिहासाच्या निरनिराळ्या काळांतील विशेषांचें विचित्र मिश्रण झालेलें होतें.

दक्षिण अमेरिकेंत पेरू देशात सुधारणेचें आणखी एक केंद्र असून तेथें इन्काचा अम्मल होता. इन्का हा एक प्रकारें दैवी अंश असलेला राज्यकर्ता समजला जात असे. निदान पुढच्या पुढच्या काळांत तरी पेरूमधील या संस्कृतीचा मेक्सिकन संस्कृतीशीं संबंध अजिबात तुटून गेला होता, ही एक मोठी विचित्र गोष्ट आहे. एकमेकांपासून

फारसे दूर असे हे प्रदेश नसतांनाही त्यांची एकमेकांना फारशी माहिती नव्हती; यावरूनच कांहीं बाबतींत हे देश किती खास मागासलेले होते हें दिसून येण्यासारखें आहे. कोर्टेझचा मेक्सिकोमध्यें जय झाल्यानंतर थोड्याच काळांत पेरूच्या राज्याचा नाशही दुसऱ्या एका स्पॅनिश माणसानेंच केला ; त्याचें नांव पिझारो. तो त्या भागांत इ. स. १५३० मध्यें आला आणि त्यानें विश्वासघात करून इन्काला कैद केलें. देवाचा अंश असलेला आपला राजाच अशा रीतीनें कैद झालेला पाहून लोक भयभीत होऊन गेले. पिझारोनें तेथें इन्काच्या वतीनें म्हणूनच कांहीं काळ राज्य केलें आणि पुष्कळ संपत्तीची लूट केली. पुढें इन्काच्या वतीच्या राज्याचें हें सोंगही बंद झालें आणि स्पॅनिश लोकांनीं पेरू देश आपल्या साम्राज्यामध्यें सामील केला.

कोर्टेझनें जेव्हा टेनॉक्टिट्लान शहर प्रथम पाहिलें, तेव्हां तो त्याच्या प्रचंडपणानें आश्चर्यानें स्तंभित होऊन गेला. यूरपमध्यें असें एकही शहर त्यानें पाहिलेलें नव्हतें.

मय प्रांतांतील आणि पेरू देश यांमधील कलेचे पुष्कळसे नमुने आतां मिळविण्यात आलेले असून अमेरिकेमधील, मला वाटतें, विशेषतः मेक्सिकोंतील, पदार्थसंग्रहालयामध्यें ते पाहावयास सांपडतात. त्यावरून त्या देशांत कलेची फार सुंदर परंपरा होती हें दिसून येतें. पेरूमधील सोन्यावरील कारागिरी तर फारच अत्युत्कृष्ट, बिनमोल आणि अजोड आहे असें म्हणतात. दगडांतील मूर्तिकामाचे सांपडलेले कांहीं नमुने, विशेषतः दगडाचें कोरलेलें काम, फार सुंदर आहे म्हणतात. दुसरे कांहीं नमुने मुद्दाम भय उत्पन्न करण्यासाठीं तयार केलेल्या वस्तूंचेच असून त्यामुळें खरोखरच अंगावर भीतीनें कांटा उभा राहतो.

६०

# मोहेंजोदारोकडे आणखी एक उडी

१४ जून, १९३२

नुकतीच मोहेंजोदारो आणि सिंधु नदीच्या खोऱ्यांतील भारतीय संस्कृति यांच्याविषयीं मला वाचायची संधि मिळाली. ज्यामध्यें याबद्दलची आतांपर्यंत उपलब्ध सर्व माहिती संकलित केली असून या संस्कृतीसंबंधींचें वर्णन केलेलें आहे असा एक मोठा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. ज्यांच्या हातीं सिंधु नदीच्या खोऱ्यांतील हें उत्खननाचें आणि संशोधनाचें कार्य सोंपविलेलें आहे, आणि खोल खोलपर्यंत खणीत जात असतांना ज्यांच्या प्रत्यक्ष डोळ्यांपुढें भूमिमातेच्या उदरांतून एक प्राचीन शहर हळूहळू बाहेर पडलें, त्याच लोकानीं तयार करून हा ग्रंथ लिहिलेला आहे. अजून कांहीं तो ग्रंथ मला पाहायला मिळालेला नाहीं. इथें तो मिळाला असता तर केवढी बहार झाली

असती ! परंतु त्याच्यावरचें एक परीक्षण माझ्या वाचनांत आलें असून त्या परीक्षणांत त्या ग्रंथांतले जे उतारे दिले आहेत, त्यांपैकीं कांहीं तुझ्याबरोबर वाचावे असें माझ्या मनांत आहे. सिंधु नदीच्या खोऱ्यातील ही सुधारणा म्हणजे जगांतील एक मोठेंच आश्चर्य आहे. आणि तिच्याबद्दल जों जों अधिकाधिक माहिती मिळत जात आहे, तों तों पाहणाराची बुद्धि अधिकाधिकच स्तिमित होऊन जात आहे. म्हणून मी असें धरून चालतों, कीं जरी प्राचीन इतिहासाची आपली चालू गोष्ट जरा मध्येंच सोडून या पत्रांत पाच हजार वर्षांच्या पाठीमागें जरी आपण उडी मारली, तरी तूं कांहीं विशेषशी हरकत घेणार नाहींस.

मोहेंजोदारो हें कमींत कमी इतकें प्राचीन असलें पाहिजे असें म्हणतात. असें असूनही आज जें मोहेंजोदारो शहर सांपडलें आहे, तें किती तरी सुंदर शहर आहे ; मोठेच सुसंस्कृत आणि सुधारणासंपन्न लोक त्यामध्यें राहत असले पाहिजेत. त्यामुळें त्याच्यापूर्वी एवढ्या प्रगतीपर्यंत पोंचण्यासाठीं वाढीचा केवढा तरी दीर्घ काळ लोटून गेलेला असला पाहिजे. या उत्खननाच्या कामाचा मुख्य अधिकार सर् जॉन मार्शल यांच्याकडे आहे. ते लिहितात :

" मोहेंजोदारो येथें आणि हरप्पा येथें, दोन्ही ठिकाणीं एक गोष्ट अगदीं स्पष्ट आणि निःसंदिग्धपणें आढळून येते ती ही, कीं या दोन्ही ठिकाणीं व्यक्त होणारी सुधारणा व संस्कृति ही कांहीं प्राथमिक अवस्थेंतील अथवा बाल्यावस्थेंतील संस्कृति नाहीं ; तर ही संस्कृति, कितीएक युगांची प्राचीन असून हिंदुस्थानांत तर तिचा जणुं एक प्रकारचा कायम ठसाच होऊन गेलेला आहे ; तिच्या पाठीमागें कित्येक हजार वर्षांचे मानवी दीर्घ प्रयत्नांचे डोंगर उभे आहेत. अशा रीतीनें यापुढें इराण, मेसापोटेमिया, आणि ईजिप्त यांच्या बरोबरीनें हिंदुस्थानचीही गणना, ज्या ठिकाणीं मानवी सुधारणेच्या कार्यक्रमांना प्रथम सुरुवात झाली व ज्या ठिकाणीं त्यांची प्रथम वाढही झाली, अशा भूमीमध्यें केली पाहिजे. "

हरप्पाबद्दल मी तुला अजूनपर्यंत बोललेलों नाहींसें वाटतें. मोहेंजोदारोसारखेंच हें आणखी एक ठिकाण असून तेथेंही असेंच उत्खननाचें काम चालू आहे. हें ठिकाण पश्चिम पंजाबमध्यें आहे.

तेव्हां असें झालें, कीं सिंधु नदीच्या या खोऱ्यामध्यें आपण ५००० वर्षेंच पाठीमागें जाऊन थांबत नाहीं, तर त्यापेक्षांही किती तरी हजार वर्षांपूर्वीपर्यंतच्या काळांत आपण येथें जाऊन पोंचतों. अगदीं प्रथम त्या ठिकाणीं मनुष्याची वसती जेव्हां झाली असेल, अशा त्या अतिप्राचीन काळापर्यंत आपल्याला जावें लागतें. आणि मानवी इतिहासाच्या ज्ञानाचा माग या ठिकाणीं अंधकारांत लुप्त होऊन जातो. मोहेंजोदारो शहर भरभराटीला आलें होतें, त्या वेळीं आर्य लोक हिंदुस्थानांत अद्यापि आलेले नव्हते ; आणि आतां यासंबंधांत यत्किंचितही संशय उरलेला नाहीं कीं,

" पंजाब आणि सिंधमध्यें, आणि कदाचित् हिंदुस्थानच्या इतर भागांमध्येंही

त्या काळीं मेसापोटेमिया किंवा ईजिप्त यांमध्यें नांदत असलेल्या सुधारणेसारखीच परंतु कित्येक बाबतींत तिच्याहून उच्च दर्जाची अशी अगदीं पुढारलेली, सर्व ठिकाणीं एकसारखी आणि स्वतःचीच स्वतंत्र अशी सुधारणा नांदत होती. ”

मोहेंजोदारो आणि हरप्पा येथील उत्खननामुळें ही प्राचीन आणि मन मोहून टाकणारी सुधारणा आपल्या दृष्टीसमोर उभी राहिली आहे. हिंदभूमीच्या पोटांत अशीं आणखी किती तरी सुधारणेचीं स्थानें गाडलेलीं असतील. ही सुधारणा कांहीं केवळ मोहेंजोदारो किंवा हरप्पा अशा एखाद-दुसऱ्या ठिकाणींच तेवढी उत्पन्न झालेली नसून ती साऱ्या हिंदुस्थानभर खोलवर पसरलेली असली पाहिजे असें दिसतें. कारण हीं दोन ठिकाणेंच पाहिलीं, तरी त्यांच्यामध्येंच केवढें तरी अंतर आहे.

हा काळ अशा संधिकाळचा दिसतो कीं त्या वेळीं “ तांबें किंवा ब्रांझ धातूच्या हत्यारांच्या आणि भांड्यांच्या जोडीलाच मातीचीं किंवा दगडाचीं भांडीं आणि हत्यारें लोक वापरीत होते. ” तत्कालीन ईजिप्त, मेसापोटेमिया यांमधील लोकांपेक्षां सिंधूच्या खोऱ्यांतलि लोक कोणत्या बाबतींत निराळे होते आणि कोणत्या बाबतींत वरच्या दर्जाचे होते, हें सर जॉन मार्शल यानीं दाखविलेलें आहे. ते म्हणतात :

“ अशा रीतीनें कांहीं अगदीं थोडे प्रमुख मुद्दे सांगावयाचे म्हटलें, तर या काळीं कापसाचा कापडाच्या कामीं उपयोग करण्याची कला केवळ हिंदुस्थानांतच काय ती अस्तित्वांत होती. आणि पश्चिमेकडील जगांत तिचा प्रसार होण्याला त्यानंतर २–३ हजार वर्षें जावीं लागलीं. त्याप्रमाणें इतिहासपूर्वकाळच्या ईजिप्तमध्यें, मेसापोटेमियामध्यें. किंवा पश्चिम आशियामध्यें अथवा इतर कोठेंही आपल्याला मोहेंजोदारोमधील नागरिकांच्या घरांसारखीं प्रशस्त व सोयीस्कर घरें किंवा तेथील सुंदर व मजबूत बांधणीच्या स्नानगृहांसारखीं स्नानगृहें कांहीं आढळून येत नाहींत. त्या देशांमध्यें, देवांचीं विशाल व सुंदर मंदिरें, किंवा राजांचे राजवाडे आणि थडगीं हीं बांधण्याकरितां पुष्कळ पैसा उधळण्यांत आलेला आढळतो; पण बाकीच्या लोकांना मात्र मातीच्या अगदींच भिकार निवासस्थानांवर संतुष्ट राहावें लागत असावें असें दिसतें. सिंधु नदीच्या खोऱ्यांत याच्या उलट प्रकार आढळतो. तेथें जीं सुंदरांत सुंदर श्रेष्ठ दर्जाचीं बांधकामें आढळतात तीं सर्वसामान्य नागरिकांच्या सोयीसाठींच तयार केलेलीं आढळतात. ”

पुढें आणखी एका ठिकाणीं म्हटलें आहे :

“ त्याचप्रमाणें सिंधूच्या खोऱ्यांतील कला आणि धर्म हेही अगदीं खास स्वतंत्र ठशाचे आणि सिंधूच्या खोऱ्यांतील इतर अनेक गोष्टींप्रमाणेंच इतर जगापासून सर्वथा वेगळे आहेत. तत्कालीन इतर देशांमधील जे कांहीं कलांचे नमुने आपल्याला माहीत आहेत त्यांमध्यें कोठेंही, येथें जीं मेंढे, कुत्रे किंवा इतर प्राणी यांचीं शाडू मातीचीं किंवा चिनी मातीचीं चित्रें आढळतात, त्यांच्यांतील हातोटीच्या तोडीचीं चित्रें आढळत नाहींत; किंवा निरनिराळ्या मुद्रांवर ज्या पद्धतीचें कोरकाम किंवा कोतरकाम आढळतें, तशा तोडीचें कामही त्या देशांत आढळत नाहीं. विशेषतः अशा कोरकामांचें किंवा चित्रांचे

कांहीं कांहीं जे अत्युत्कृष्ट नमुने आहेत—उदाहरणार्थ, मोठ्या वशिंडाच्या आणि तोकड्या शिंगांच्या बैलाचीं चित्रें पाहा—त्यांमध्यें ज्या उच्च प्रकारचे उठाव निर्माण करण्याचें कौशल्य आणि अंगरचना आणि बाध्याच्या वळणाच्या रेषान् रेषासंबंधींची सूक्ष्म दृष्टि आढळते, तीहून उच्च प्रकारची दृष्टि व कसब कोरकामाच्या क्षेत्रात आजपर्यंत कोठेंही आणि केव्हांही दिसून आलेलीं नाहींत. तसेंच दहाव्या आणि अकराव्या चित्रामध्यें हरप्पा येथें सांपडलेले जे दोन मनुष्याच्या छोट्या पुतळ्यांचे नमुने दाखविलेले आहेत तशा तऱ्हेचे नमुने ग्रीक संस्कृतीच्या श्रेष्ठ काळांत येऊन पोंचेपर्यंत मध्यें कोठेंच इतरत्र दिसून येत नाहींत. सिंधूच्या खोऱ्यांतील धर्मामध्यें अर्थातच इतर जगांतील धर्मांशीं समान अशा पुष्कळ गोष्टी दाखवितां येतील. इतिहासपूर्वकालीन आणि इतिहासकालीन सर्वच धर्मांबद्दल हें म्हणतां येण्यासारखें आहे. परंतु एकंदर साकल्यानें विचार केला तर या काळचा धर्म इतका खास हिंदुस्थानचा असा वाटतो, कीं आज प्रचलित असलेल्या हिंदुधर्माहून तो कोणत्या बाबतींत वेगळा आहे हें दाखविणें सुद्धां कठिण आहे. ”

हरप्पा येथें सांपडलेले हे छोटे पुतळे, किंवा निदान त्यांचीं चित्रें तरी मला पाहावयास मिळालीं असतीं तर किती छान झालें असतें ! कदाचित् केव्हां तरी तूं आणि मी दोघेंही हरप्पा आणि मोहेंजोदारो येथें प्रवासाला जाऊं आणि हीं सर्व दृश्यें पोटभर पाहून घेऊं. दरम्यान आपापलीं तूर्तचीं कामें आपण चालू ठेवूं या झालें; तूं तुझ्या पुण्याच्या शाळेंत आणि मी येथें डेहराडून येथील डिस्ट्रिक्ट जेल या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या माझ्या शाळेंत !

## ६१

# कोर्डोबा आणि ग्रॅनाडा

१६ जून, १९३२

आशिया आणि यूरप खंडांमध्यें कितीएक वर्षें प्रवास करीत करीत आपण खिस्तानंतर १००० वर्षांच्या काळापाशीं मुक्काम केला ; आणि चालून आलेल्या अंतरावर मागें पुन्हां एकदां नजर टाकली. तथापि कशी कोण जाणे पण स्पेनची–आरबांच्या अमलाखालील स्पेनची–हकीकत त्यामध्यें यायची राहून गेली आहे. म्हणून तिकडे एकदां परत जाऊन ती हकीकत या सगळ्या तसबिरींमध्यें कोठें तरी बसविली पाहिजे.

बाकी तुला आठवण असली तर पूर्वी स्पेनबद्दल थोडीशी माहिती तुला मिळालेली आहे. इ. स. ७११ मध्यें आरबांचा एक सेनापति समुद्रपार होऊन आफ्रिकेतून स्पेन-

मध्यें आला. त्याचें नांव तरीक असून तो जिब्राल्टर येथें उतरला. (म्हणूनच जबल-उत्-तरीक तरीकचा खडक किंवा पहाड हें नांव निघालें.) दोन वर्षांच्या आंत आरबी लोकांनीं सर्व स्पेन देश काबीज केला आणि लौकरच पोर्तुगाल देशही आपल्या राज्याला जोडला. एवढ्यावर न थांबतां त्यांनीं आपला मोर्चा पुढें चालूच ठेवला; आणि फ्रान्समध्यें प्रवेश करून तेथें दक्षिण भागात ते सर्वत्र पसरले. त्यामुळें अतिशय भयभीत होऊन फ्रँक लोक आणि इतर टोळ्यांमधील लोक चार्ल्स मार्टेलच्या नेतृत्वा-खालीं एकत्र होऊन आरबी लोकांना रोखून धरण्याचा त्यांनीं फार मोठा प्रयत्न केला. त्यांत त्यांना यश येऊन फ्रान्समध्यें पॉइटिअर्स शेजारच्या टूर्स येथील प्रचंड लढाईंत आरबांचा फ्रँक लोकाकडून पराभव झाला. हा पराभव फारच मोठा असून त्यामुळें आरबी लोकांचीं सर्व यूरप खंड जिंकण्याचीं सुखस्वप्नें लयाला गेलीं. त्यानंतर अनेक वेळां आरबी लोक व फ्रँक आणि इतर ख्रिस्ती लोक यांचीं फ्रान्समध्यें परस्परांशीं युद्धें झालीं. त्यांत केव्हां केव्हां आरबांचा जय होऊन ते फ्रान्समध्यें घुसत, तर कधीं कधीं त्यांना पुन्हां परत स्पेनमध्यें हांकलून दिलें जाई. शार्लमेन बादशहानें सुद्धा प्रत्यक्ष स्पेनमध्यें जाऊन आरबांवर हल्ला केला होता, परंतु त्याचा पराभव झाला. तथापि पुष्कळ काळपर्यंत या दोन्ही पक्षांचें बळ सामान्यतः एकमेकांच्या तोडीचेंच राहिल्यामुळें आरब लोकांचें राज्य स्पेनमध्यें जरी चालू राहिलें, तरी तेथून आणखी पलीकडे त्यांना हातपाय पसरता आले नाहींत, एवढी माहिती तुला मिळालेली आहे.

आफ्रिकेच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरून थेट मंगोलियापर्यंत पसरलेलें जें आरबी लोकांचें साम्राज्य त्याचाच स्पेन देश हा अशा रीतीनें एक भाग झाला. पण तो या साम्राज्याचा भाग म्हणून फार काळपर्यंत राहिला नाहीं. तुला आठवतच असेल, कीं अरबस्तानात यादवी होऊन आब्बासी वंशानें उम्मैया खलिफांना हांकलून दिलें. स्पेनमधील आरबांचा गव्हर्नर — नबाब — हा उम्मैया घराण्याचा असून त्यानें आब्बासी खलिफांची सत्ता मानण्याचें नाकारलें. अशा रीतीनें स्पेननें आरबी साम्राज्याशीं आपला संबंध तोडून टाकला; आणि बगदादचा खलिफा तेथून फार दूर असल्यामुळें आणि तिकडच्याच स्वतःच्या भानगडींत त्याचे हात सर्वस्वीं गुंतलेले असल्यामुळें त्याला त्या बाबतींत कांहींही करतां आलें नाहीं. परंतु स्पेन आणि बगदाद यांच्यामध्यें वैरभाव मात्र निर्माण होऊन राहिला आणि संकटाच्या प्रसंगीं एकमेकांना मदत करण्याऐवजीं एकमेकांच्या संकटांत आनंदच मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली.

आपल्या मायदेशापासून आपले संबंध अशा रीतीनें तोडून टाकण्यांत स्पेनमधील आरबी लोकांची एक प्रकारें जरा धिसाडघाईच झाली. एक तर ते फार दूरच्या अशा एका देशांत राहत होते; तेथली प्रजा परकी होती; आणि त्यांच्या आजूबाजूला शत्रूंचा गराडा होता. संकटाच्या किंवा अडचणीच्या प्रसंगीं त्यांच्या मदतीला येईल असें तेथे जवळपास कोणीही नव्हतें. परंतु त्या काळीं त्यांचा आत्मविश्वास जणुं उतू चालला होता आणि

अशा संकटांची ते बिलकुल क्षिति बाळगीत नव्हते. असें होणें थोडेंसें स्वाभाविकच होतें. कारण ख्रिस्ती लोकांचें दडपण सारखें चालू असूनही त्यांनीं आपली बैठक चांगलीच घट्ट धरून ठेवलेली होती आणि पांचशें वर्षेंपर्यंत स्पेनचा बहुतेक सारा भाग त्यांनीं आपल्या कबजांत ठेवला होता. त्यानंतर सुद्धां पुढें आणखी दोनशें वर्षेंपर्यंत स्पेनच्या दक्षिणेला त्यांचें एक लहानसें स्वतंत्र राज्य त्यांनीं टिकवून धरलेंच. अशा रीतीनें प्रत्यक्ष बगदादच्या साम्राज्याचा नाश झाल्यानंतरही त्यांचें राज्य चालू होतें. आणि आरबी लोकांनीं स्पेनला शेवटचा रामराम ठोकला त्याच्या आधीं बगदाद शहर धुळीस मिळून किती तरी मोठा काळ लोटून गेलेला होता.

अशा रीतीनें स्पेन देशांत कोणत्या ना कोणत्या तरी ठिकाणीं, पण सातशें वर्षेंपर्यंत स्पॅनिश लोकांचा अम्मल चालू राहिला, हीच गोष्ट खरोखर मोठी आश्चर्य करण्यासारखी आहे. परंतु त्याहीपेक्षां या स्पेनमधील आरबी लोकांची – यांनाच मूर लोक म्हणत म्हणून या मूर लोकांची म्हणूं या – सुधारणा आणि संस्कृति ही त्याहून जास्त कौतुक करण्यासारखी उच्च होती. एका इतिहासकारानें अर्थात् उत्साहाच्या भरांत वाहून जाऊन थोड्याशा अतिशयोक्तीनेंच लिहिलें आहे :

“ मूर लोकांनीं कार्डोवा अथवा कोर्डोबा येथील हें अत्यंत अजब राज्य प्रस्थापित केलें ; हें राज्य म्हणजे मध्ययुगांतील एक महदाश्चर्य आहे ; आणि सारें यूरप खंड ज्या वेळीं रानटी लोकांशीं झुंजण्यांत आणि अज्ञानांधकारांत बुडून गेलें होतें त्या वेळीं सुधारणेचा आणि विद्यांचा दीप पश्चिम यूरपमध्यें याच एका राज्यानें जळता ठेवला. ”

कुर्तुबा ही या राज्याची सुमारें पांचशें वर्षेंपर्यंत राजधानी होती. इंग्रजी भाषेंत या नांवाचा उच्चार सामान्यतः कोर्डोबा असा करतात ; तर केव्हां केव्हां कार्डोवा असाही करतात. मला वाटतें, एकच नांव निरनिराळ्या ठिकाणीं वेगवेगळ्या पद्धतीनें लिहिण्याची मला खोड आहे. परंतु या शहराचें नांव मात्र मी कोर्डोबा असेंच नेहमीं लिहिणार आहें. हें एक फार मोठें शहर होतें. तेथील लोकवस्ती दहा लक्ष होती. त्यामध्यें अनेक उद्यानें असून प्रत्यक्ष नगराचा विस्तार दहा मैल लांब होता ; आणि उपनगरें आणखी वीस मैल लांबपर्यंत पसरलेलीं होतीं. असें म्हणतात, कीं या शहरांत ६०,००० राजवाडे आणि बंगले, २,००,००० लहान घरें, ८०,००० दुकानें, ३,८०० मशिदी, ७०० सार्वजनिक हमामखाने – स्नानगृहें – होतीं. या आकड्यांत कदाचित् थोडी अतिशयोक्ति असेल ; परंतु त्यांवरून तुला या शहराची कल्पना करतां येईल. तेथें पुष्कळ ग्रंथालयें असून त्यांपैकीं प्रमुख जें अमीराचें बादशाही ग्रंथालय त्यांत चार लक्ष ग्रंथ होते. कोर्डोबा येथील विद्यापीठ साऱ्या यूरप खंडांत आणि पश्चिम आशियामध्येंही विख्यात होतें. गरिबांसाठीं फुकट प्राथमिक शिक्षणाच्या शाळा विपुल होत्या. एका इतिहासकारानें लिहिलें आहे :

“ स्पेनमध्यें बहुतेक प्रत्येक मनुष्याला लिहितां-वाचतां येत असे, तर ख्रिस्ती

यूरपमध्यें एक पाद्री वर्ग सोडला, तर अतिशय वरिष्ठ वर्गांतील लोकसुद्धां सर्वस्वीं निरक्षर असत."

असें हें कोर्डोबा शहर आरबांचें दुसरें जें श्रेष्ठ शहर बगदाद, त्याच्याशीं बरोबरी करूं पाहत होतें. साऱ्या यूरपभर त्याची ख्याति पसरलेली असून दहाव्या शतकांतील एका जर्मन ग्रंथकारानें त्याचा "पृथ्वीचा अलंकार" असा उल्लेख केला आहे. तेथील विद्यापीठांत दूरदूरच्या ठिकाणचे विद्यार्थी येत असत. आरबी लोकांच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम यूरपमधील पॅरिस, ऑक्सफर्ड आणि इतर इटलीमधील विश्वविद्यालयांवरही घडून येऊं लागला. कोर्डोबा येथें बाराव्या शतकांत अॅव्हरोज (म्हणजेच इब्न रशीद) नांवाचा एक प्रख्यात तत्त्वज्ञ होऊन गेला. त्याच्या उतार वयांत स्पेनच्या अमीराशीं त्याचें वांकडें आल्यामुळें त्याला तेथून हद्दपार करण्यांत आलें होतें. तेथून निघून जाऊन त्यानें पॅरिसमध्यें मुक्काम ठोकला होता.

यूरप खंडांतील इतर प्रदेशांतल्याप्रमाणें स्पेनमध्येंही एक प्रकारची सरंजामशाही-पद्धतीच होती. तेथेंही मोठे मोठे आणि बलिष्ठ सरदार उदयाला आले होते; त्यांच्या-मध्यें आणि तेथील राजा जो अमीर याच्यामध्यें वारंवार लढाया होत असत. बाहेरून होणाऱ्या हल्ल्यांपेक्षांही या आंतील यादवीमुळेंच आरबी राज्य अधिक दुर्बल होत गेलें. त्याच सुमारास स्पेनच्या उत्तर भागांत कांहीं लहान लहान ख्रिस्ती राज्येंही उदयास येऊन प्रबळ होऊं लागलीं होतीं; आणि हीं राज्येंही आरबी लोकांना दूरदूर हांकलून लावण्याची धडपड करीत होतींच.

इ. स. १००० वर्षांच्या सुमाराला म्हणजे सुवर्णयुगाच्या अगदीं शेवटालाच, अमीराचें राज्य जवळजवळ सर्व स्पेन देशावर पसरलेलें होतें. फ्रान्सच्या दक्षिणेकडील एक लहानसा तुकडा सुद्धां त्या वेळीं त्या राज्यांत होता. परंतु या सर्व राज्याचा विनाश-काळ त्यानंतर लौकरच आला. हा विनाश इतर सर्व ठिकाणच्याप्रमाणें अंतर्गत दुर्बलतेमुळेंच घडून आला. आरबी लोकांच्या सुधारणेचा हा पट मोठा मनोहर होता. त्यांत कलांचा उत्कर्ष होता, विलासोपभोगांची लयलूट होती, शौर्य-धैर्यादिकांना अवसर होता, सर्व कांहीं होतें; पण कांहीं झालें तरी ही सगळी श्रीमंतांची सुधारणा होती. त्यामुळें ज्यांची उपासमार होत होती अशा गरीब लोकांनीं बंड केलें, आणि मजुरांचेही दंगे झाले. हळूहळू जिकडे तिकडे यादवी माजली, एकेक प्रांत फुटून वेगळा झाला, आणि आरबांचें स्पेनमधील साम्राज्य फुटून तुटून गेलें. परंतु अशी फुटाफूट झाल्यानंतर सुद्धा स्पेनमध्यें आरबी लोक राज्य करीतच होते. कोर्डोबा शहर कॅस्टीलच्या ख्रिस्ती राज्याच्या हातीं कायमचें पडावयाला इ. स. १२३६ साल उजाडावें लागलें.

आरबी लोकांना दक्षिणेकडे जरी हांकून देण्यांत आलें, तरीपण ते झगडतच राहिले. दक्षिणेंत एक लहानसें राज्य स्थापन करून त्याला धरून ते स्पेनमध्येंच चिकाटीनें राहिले. हें राज्य म्हणजे ग्रॅनाडाचें राज्य होय. आकाराच्या दृष्टीनें पाहिलें तर हें राज्य फारच लहान, अगदींच क्षुद्र होतें; परंतु अगदीं लहान प्रमाणावर का

होईना, पण आरबी संस्कृतीचेंच तें एक प्रतीक होतें. ग्रॅनाडामधील सुप्रसिद्ध अल्हांब्रा प्रासाद आजही अस्तित्वांत आहे. त्याच्यामधील त्या सुंदर कमानी, भव्य खांब आणि आरबी नकासकाम हीं त्या काळची चांगली आठवण करून देतात. आरबी भाषेंत त्याचें मूळचें नांव "अल् हम्र" 'लाल महाल' असें होतें. आरबी लोकांच्या किंवा मुसलमानी वळणाच्या इतर इमारतीवर एक विशिष्ट प्रकारचें नकासकाम किंवा सजावट दिसून येते. तिला इंग्रजींत अरॅबेस्क असें म्हणतात. इस्लाम धर्मामध्यें मानवी शरीराचीं चित्रें काढण्याला उत्तेजन दिलें जात नसे. म्हणून त्यांच्यातील शिल्पज्ञ लोक विचित्र आणि गुंतागुंतीचे असे नकशीचे अनेक नमुने तयार करूं लागले. कित्येकदां ते कमानीवर किंवा इतरही जागीं कुराणांतील आरबी भाषेमधील कविता (आयतें) कोरून त्यांची एक प्रकारची सुंदर नक्षी तयार करीत. आरबी लिपींत एक प्रकारचा ओघ साधतो; त्यामुळें नक्षीकामाकडे तिचा फार सहज उपयोग करतां येतो.

ग्रॅनाडाचें हें राज्य दोनशें वर्षें चाललें. स्पेनमधील खिती राज्यें – विशेषतः कॅस्टीलचें राज्य – त्याच्यावर एकसारखें दडपण आणीत असत, आणि त्याला फार त्रास देत. केव्हां केव्हां कॅस्टीलच्या राज्याला खंडणी देण्याचाही प्रसंग ग्रॅनाडावर येई. या खिती राज्यांमध्येंच परस्परांत यादवी नसती, तर ग्रॅनाडाचें राज्य बहुधा इतका काळ टिकलें नसतेंही. परंतु इ. स. १४६९ मध्यें प्रमुख अशा खिस्ती राज्यांपैकींच दोन राज्यांतील राज्यकर्त्यांचा, फार्डिनांड आणि इसाबेला यांचा, विवाह घडून आला आणि त्यामुळें कॅस्टील, ॲरगॉन आणि लिऑन हीं राज्यें एकत्र झालीं. या फार्डिनांड आणि इसाबेला यांनीं ग्रॅनाडा येथील आरबांचें राज्य नष्ट करून टाकलें. आरबी लोकांनीं पुष्कळ वर्षेंपर्यंत फार शौर्यानें आणि निकरानें युद्ध केलें, परंतु अखेरीस चोहोंकडून रेटीत रेटीत त्यांची ग्रॅनाडामध्यें कोंडी करण्यांत आली. तेथें उपासमारीमुळें अखेरीस इ. स. १४९२ मध्यें ते शरण आले.

त्या वेळीं सारासन म्हणजेच आरबी लोकांपैकीं पुष्कळसे लोक स्पेन सोडून आफ्रिकेंत गेले. ग्रॅनाडाजवळच शहरापासून थोड्याशा अंतरावर एक उंच ठिकाण आहे, त्याला अजूनही 'मूर लोकांचा शेवटचा निःश्वास' हें नांव चालू आहे.

परंतु यानंतरही स्पेनमध्यें पुष्कळच आरब लोक राहिले. या आरबी लोकांना इतक्या वाईट रीतीनें वागविण्यांत आलें, कीं हें एक स्पेनच्या इतिहासातील अतिशय काळेंकुट्ट प्रकरण आहे. त्यांचा क्रूरपणें छळ करण्यांत आला, त्यांच्या कत्तली करण्यांत आल्या, तुम्हांला सवलतीनें वागविलें जाईल म्हणून त्यांना दिलेलीं सर्व वचनें मोडण्यांत आलीं. रोमन धर्मपीठानें आपल्या सत्तेपुढें जे कोणी मान वांकविणार नाहींत, त्यांना नेस्तनाबूत करण्यासाठीं इन्क्विझिशन म्हणजे धार्मिक न्यायदानाच्या संस्थेचें जें नवेंच भयंकर शस्त्र निर्माण केलें होतें, त्याची स्थापना याच सुमारास स्पेनमध्यें झाली होती. सारासन लोकांच्या अमलाखालीं ज्यू लोकांची चांगली भरभराट झाली होती. त्यांच्यावर

आतां धर्म बदलण्याची सक्ती करण्यांत आली आणि कित्येक ज्यूंना जाळून ठार करण्यात आलें. स्त्रिया किंवा मुलें यांची सुद्धां त्यांत गय करण्यांत आली नाहीं. एक इतिहासकार लिहितो, " या पाखंडी काफीर लोकांना ( म्हणजेच सारासन लोकांना ) आपले सुंदर सुंदर चित्रविचित्र पोशाख टाकून देण्याचा हुकूम करण्यांत आला ; त्यांना जिंकणाऱ्या लोकांप्रमाणें त्यानींही हॅट आणि विजारी वापरल्या पाहिजेत अशी सक्ती करण्यांत आली ; त्यांची भाषा त्यांना सोडून द्यावी लागली, त्यांच्या चालीरीती, त्यांचे सण व उत्सव – नव्हे, प्रत्यक्ष त्यांच्या भाषेंतील त्यांचीं नांवें त्यांना सोडून द्यावीं लागलीं, आणि स्पॅनिश भाषा बोलण्याची, स्पॅनिश चालीरीतीप्रमाणें वागण्याची, आणि स्वतःला स्पॅनिश म्हणवून घेण्याची त्यांच्यावर सक्ती करण्यांत आली. या सर्व रानटी जुलुमा-विरुद्ध दंगे आणि बंडें झालीं नाहींत असें नाहीं ; परंतु त्या सर्वांचा निर्दयपणें बीमोड करण्यांत आला. "

स्पेनमधील या खिस्ती लोकांचा आंघोळ करण्याला आणि कपडे धुण्याला फारच विरोध होता असें दिसतें. स्पेनमधील आरबी लोकांच्या या गोष्टी फारच आवडीच्या होत्या आणि त्यासाठीं जिकडे तिकडे त्यांनीं मोठमोठे हमामखानेही बांधलेले असत ; एवढ्याचमुळें कदाचित् खिस्ती लोकांनीं स्नान आणि कपडे धुणें यांना विरोध केला असावा. या खिस्ती लोकांनीं या बाबतींत खरोखर अगदीं कळसच केला. या मॉरिस्को ( म्हणजेच मूर किंवा आरब ) लोकांची सुधारणा व्हावी म्हणून त्यांनीं असे हुकूम बजावले कीं " त्यांच्यापैकीं स्वतः कोणाला, त्यांच्या स्त्रियांना किंवा इतरही कोणाला घरीं किंवा इतर कोठेंही कपडे धुण्याची किंवा स्नान करण्याची परवानगी देऊं नये ; आणि त्यांचीं सर्व स्नानगृहें – हमामखाने – मोडून तोडून नष्ट करण्यात यावींत. "

स्नान करण्याबद्दलच्या त्यांच्या या पापाच्या जोडीला या मॉरिस्को लोकांविरुद्ध आणखी असा एक मोठा आरोप करण्यांत आला, कीं हे लोक धर्माच्या बाबतींत असावे तसे कडवे नाहींत, मऊ आहेत. हें लिहिणें फार विचित्र आणि अविश्वास्य वाटतें खरें ; परंतु इ. स. १६०२ सालीं व्हलेन्शियाच्या आर्चबिशपनें या सारासन लोकांना स्पेन-मधून हद्पार करण्यांत यावें असा प्रस्ताव मांडताना त्यांच्याविरुद्ध " मॉरिस्को लोकांचीं राजद्रोहाचीं आणि धर्मद्रोहाचीं कृत्यें " म्हणून जो एक खलिता तयार केला होता त्यात हा वरचा धार्मिक सहिष्णुतेबद्दलचा आक्षेप एक प्रमुख आक्षेप म्हणून नमूद केला होता. त्या बाबतींत त्यानें लिहिलें होतें, " सर्व लोकांत धर्मविषयक एकूण एक बाबतींत पूर्ण विचार व आचारस्वातंत्र्य असावें याच्याइतकें दुसरें कोणतेंच तत्त्व या ( म्हणजे मॉरिस्को लोक ) लोकाना प्रिय नाहीं ; आणि असें स्वातंत्र्य तुर्की लोक आणि इतरही सर्व मुसलमान लोक आपल्या प्रजेला उपभोगूं देतात. " स्पेनमधील सारासन लोकांची न जाणतां ही केवढी मोठी स्तुतीच करण्यात आलेली आहे म्हणावयाची ; आणि त्या दृष्टीनें स्पॅनिश खिस्ती लोकांची भूमिका किती भिन्न आणि किती असहिष्णु – हटवादी – दिसून येते.

लाखों सारासन लोकाना स्पेनमधून हांकलून काढण्यांत आलें. त्यांपैकीं बहुतेक जण आफ्रिकेंत गेले. कांहीं थोडे जण फ्रान्समध्यें गेले. पण ध्यानांत ठेव, कीं हे आरब लोक स्पेनमध्यें कांहीं थोडेथोडके नव्हे, तर चांगले सातशें वर्षें होते. एवढ्या दीर्घ काळांत स्पेनमधील लोकांतच फार मोठ्या प्रमाणांत ते एकजीव होऊन गेलेले होते. मुळांत जरी ते आरब असले तरी हळूहळू ते आतां फार मोठ्या प्रमाणात स्पॅनिश बनून गेलेले होते. बगदादमधील आरबांपेक्षां हे स्पॅनिश आरब चेहऱ्या-मोहऱ्यांतसुद्धां फार वेगळे झालेले होते म्हटलें, तरी चालेल. आजच्या घटकेलासुद्धां स्पेनमधील मानव-वंशांत पुष्कळसें आरबी रक्त खेळत असलें पाहिजे.

हे सारासन लोक दक्षिण फ्रान्समध्यें आणि स्वित्झर्लंडमध्येंही जाऊन पोंचलेले होते. राज्यकर्ते म्हणून नव्हे, तर साधे रहिवासी म्हणून. मिडीच्या (म्हणजे दक्षिण फ्रान्समधील) फ्रेंच लोकांमध्यें आजही एखाद्या वेळीं अगदीं थेट आरबी वळणाचा चेहरा आढळून येतो.

अशा रीतीनें स्पेनमधील सारासन राज्याचाही नाश झाला आणि आरबी संस्कृतीचाही नाश झाला. कारण याच्या पूर्वींच आशियामध्यें ही संस्कृति कोलमडून पडलेली होती हें लौकरच आपल्याला दिसून येईल. या संस्कृतीचा इतर पुष्कळ देशांवर आणि संस्कृतींवर परिणाम झालेला आहे, कितीएक मोठीं भव्य व सुंदर स्मारकेंही त्या संस्कृतीचीं मागें शिल्लक आहेत. परंतु पुढच्या इतिहासात तिचें पुनरुज्जीवन मात्र झालें नाहीं.

सारासन लोक गेल्यानंतर, फार्डिनांड आणि इसाबेला यांच्या कारकीर्दींत स्पेनचें सामर्थ्य वाढूं लागलें. लौकरच अमेरिकेचा शोध लागून तिकडून पुष्कळ संपत्ति स्पेन-मध्यें येऊं लागली; आणि कांहीं काळपर्यंत स्पेन हा यूरप खंडांत सर्वांत सामर्थ्यवान् देश होऊन इतर सर्व देशांवर त्याचें वर्चस्व चालूं लागलें. परंतु त्याचा ऱ्हासही अतिशय जलद झाला; आणि इतर यूरपीय देश पुढें पुढें जात असताच त्याचें महत्त्व अगदीं शून्य झालें. मध्ययुगाचेच विचार उराशीं बाळगून स्पेन देश तसाच निर्जीव अवस्थे-मध्यें राहूं लागला; मध्ययुगानंतर जगामध्यें किती तरी बदल होत आला आहे हें त्याच्या विचारक्षेत्रांतच येऊं शकलें नाहीं.

लेन पूल नांवाच्या एका इंग्रज इतिहासकारानें स्पेनमधील सारासन लोकां-विषयीं पुढीलप्रमाणें लिहिले आहे :

"कितीएक शतकांपर्यंत स्पेन देश हा सुधारणेचें माहेरघर होता; कला आणि शास्त्रें, सर्व प्रकारची विद्या आणि उच्च प्रकारचें ज्ञान यांचें तें एक पीठ होतें; मूर लोकांच्या या सुसंकृत प्रदेशाच्या जोडीला बसण्याइतकी प्रगति दुसऱ्या कोणत्याही देशाची यूरपमध्यें झालेली नव्हती. फर्डिनांड आणि इसाबेला यांची कारकीर्द किंवा चार्लस बादशहाचें साम्राज्य यांमधील कांहीं काळ टिकलेलें वैभव हें इतक्या टिकाऊ आणि स्थिर सर्वश्रेष्ठत्वाच्या कोटीला केव्हांच पोंचूं शकलें नाहीं. त्या वेळीं मूर लोकांना

हद्दपार करण्यांत आलें; चंद्राप्रमाणें दुसऱ्याकडून उसन्या घेतलेल्या प्रकाशाच्या बळावर कांहीं काळपर्यंत ख्रिस्ती स्पेनचा प्रकाश पडला; आणि मग जें ग्रहण लागलें त्यामुळें उत्पन्न झालेल्या अंधकारांत आजतागायत स्पेन देश चांचपडतो आहे. स्पेन देशांतील सर्वस्वीं पिकाविरहित असे निर्जन प्रदेशांचे अनेक पट्टेच्या पट्टे हेच खरेंखुरें मूर लोकाचें स्मारक आहे असें म्हटलें पाहिजे. मूर लोकांनीं हींच ठिकाणें एका काळीं अत्यंत सुसंपन्न आणि भरघोस अशा द्राक्षवेली, ऑलिव्ह वृक्ष आणि पिवळीं पिवळीं धान्यें यांनीं भरून, फुलवून टाकलेलीं असत. ज्या लोकसमाजांत त्यांच्या काळीं चतुरस्रता आणि विद्या यांची भरभराट होती, तोच लोकसमाज आज मठ्ठ, आणि निरक्षर झालेला आहे हेंही एक मूर लोकांचें स्मारकच आहे; आणि येथील सर्वसामान्य जनता निर्जीव, निःसत्त्व आणि हीन होऊन राष्ट्राराष्ट्राच्या शर्यतींत सर्वतोपरि मागें पडली आहे, तिला आतां पुढें येण्याची आशाही राहिलेली नाहीं आणि तिची जी छी थू होते तीच योग्य आहे अशी तिची अवस्था झालेली आहे, हेंही एक प्रकारें त्या मूर लोकांचें स्मारकच आहे."

हा फारच कठोर अभिप्राय आहे. एक वर्षापूर्वीं स्पेनमध्येंही क्रांति झाली आणि राजाला काढून टाकण्यांत आलें. आज तेथें लोकसत्ताक राज्य आहे. बहुधा या नवीन प्रजासत्ताक राज्याला चांगले दिवस येतील आणि स्पेन देश इतर देशांच्या बरोबरीला येईलही.

## ६२

# क्रूसेड किंवा ख्रिस्ती धर्मयुद्धें

१९ जून, १९३२

नुकत्याच एका पत्रांत (५७ व्या) मीं तुला पोप आणि त्याचें धर्ममंडळ यांनीं मुसलमानांविरुद्ध जेरुसलेम शहर परत मिळविण्यासाठीं म्हणून जी धार्मिक—पवित्र लढाई पुकारली तिजबद्दल सांगितलें. सेल्जुक तुर्कांचें सामर्थ्य वाढूं लागल्यामुळें साऱ्या यूरप खंडाला भीति वाटूं लागली होती; परतु त्यांतही ही भीति कॉन्स्टान्टिनोपलच्या राज्याला सर्वांत अधिक वाटत होती; कारण त्याच्यावरच तुर्कांची खास धाड प्रथम आली होती. जेरुसलेम व पॅलेस्टाइन येथें जाणाऱ्या ख्रिस्ती यात्रेकरूंचा तुर्क लोकांकडून छळ होई, अशाबद्दलच्या कथा ऐकून यूरपमधील लोकांत फारच खळबळ उडून गेली आणि ते लोक संतप्त झाले. म्हणून ही पवित्र लढाई पुकारण्यांत आली आणि पोप व ख्रिस्ती धर्मपीठ यांनीं यूरपांतील सर्व ख्रिस्ती लोकांना आपल्या पवित्र शहराच्या सुटकेसाठीं चालून जाण्याचा आदेश दिला.

अशा रीतीनें इ. स. १०९५ मध्यें, क्रूसेडस् या नांवानें प्रसिद्ध असलेलीं हीं ख्रिस्तीधर्म आणि इस्लामधर्म, क्रूस आणि चंद्रकोर यांच्यामधील युद्धें सुरू होऊन तीं पुढें सुमारें दीडशें वर्षें चालू राहिलीं. मध्यें मध्यें पुष्कळ काळपर्यंत लढाई न करतां दोन्ही पक्ष विश्रांति घेत असत. तथापि एकंदरींत दोन्ही पक्षांमध्यें एकसारखें लढाईचेंच वातावरण कायम होतें. ख्रिस्ती क्रूसेडरांच्या—धर्मासाठीं लढणारांच्या—लाटांवर लाटा एकसारख्या त्यांच्या पवित्र भूमीमध्यें लढण्यासाठीं येत आणि त्यांतले बहुतेक शिपाई तेथेंच मरत. पुष्कळ काळपर्यंत हें युद्ध चालूनही क्रूसेडर लोकांना त्यापासून तसा कांहीं लाभ झाला नाहीं. कांहीं थोडा काळ जेरुसलेम त्यांच्या हातात आलें होतें. परंतु ते पुन्हां तुर्कांच्या हातीं गेलें, आणि अखेरपर्यंत तें त्यांच्याच हातीं राहिलें. या धर्म-युद्धांचे प्रमुख परिणाम म्हणजे लाखों ख्रिस्ती व मुसलमान लोकांना दैन्य सोसावें लागलें किंवा मरण आलें आणि आशिया मायनर व पॅलेस्टाइनमध्यें जमीन मानवी रक्तानें न्हाऊन निघाली, हेंच काय ते होत.

या काळांत बगदादच्या साम्राज्याची अवस्था काय होती? अब्बासी खलिफाच अजून तेथें प्रमुख स्थानीं होते. तेच अजून खलिफा, सद्धर्मीयांचे सेनापति अमीरुल मोमनीन होते. परंतु त्यांचें हें प्रमुख पद नुसतें नांवाला मात्र होतें. सत्ता त्यांच्या हातीं मुळींच नव्हती. त्यांच्या साम्राज्याचे तुकडे कसे होऊन गेले होते आणि त्यांच्या प्रांतोप्रांतींच्या हकिमांनीं, गव्हर्नरांनीं, आपापल्या प्रांतांत स्वतंत्र राज्यें कशीं स्थापन केलीं होतीं, हें आपण पाहिलेंच आहे. हिंदुस्थानांत वेळोवेळीं चालून येणारा गझनीचा महमूद हा एक स्वतंत्रच राजा होता. आणि खलिफा जर आपल्या इच्छेप्रमाणें वागणार नाहींत तर आपण त्यांचा समाचार घेऊं, अशी त्यानें धमकी दिलेली होती. खुद्द बगदादमध्यें सुद्धां खरी सत्ता तुर्कांच्याच हातांत होती. त्यानंतर सेल्जुक तुर्कांची ही आणखी एक शाखा आली; त्यांनीं आपली सत्ता प्रस्थापित केली आणि विजय मिळवीत मिळवीत ही सत्ता थेट कॉन्स्टान्टिनोपलपर्यंत जाऊन धडकली. त्यामुळें खलिफा हा जरी खलिफा म्हणून शिल्लक राहिला असला, तरी राजकीय सत्ता त्याच्या हातीं मुळींच राहिलेली नव्हती. खलिफांनीं सेल्जुक तुर्कांच्या मुख्याला सुलतान ही पदवी दिली आणि राजसत्ता या सुलतानाच्याच हातांत गेली. तेव्हां क्रूसेड—धर्मयुद्धें—करणाऱ्या ख्रिस्ती लोकांना जें लढावें लागलें, तें या सेल्जुक सुलतानांशीं आणि त्यांच्या अनुयायांशीं.

या धर्मयुद्धांमुळें यूरपमध्यें एका बाजूला ख्रिस्तधर्मीय नसणारे सर्व लोक व त्यांच्याविरुद्ध एक आपलें निराळें ख्रिस्ती जगत्, अशी कल्पना वाढत गेली. ख्रिस्ती लोक ज्यांना पाखंडी किंवा काफिर म्हणत अशा विधर्मी लोकांकडून आपली "पवित्र भूमि" परत मिळाविणें हा आता सगळ्या यूरप खंडापुढें एकच एक सर्वसामान्य विचार आणि उद्देश निर्माण झाला. या सर्वसामान्य—सामाईक—उद्देशामुळें लोकांमध्यें उत्साहाचें वारें भरलें आणि या महत्कार्यासाठीं कितीएक लोकांनीं घरादाराचा त्याग केला. अशा रीतीनें

पुष्कळ लोक या युद्धामध्यें उदात्त हेतूनें सामील झाले. तर पुष्कळ लोक, या युद्धामध्यें जे कोणी सामील होतील त्यांच्या पापाबद्दल माफी मिळेल असें जें पोपनें आश्वासन दिलें होतें त्याला भुलून या युद्धांत सामील झाले. या धर्मयुद्धांच्या पाठीमागें आणखीही कांहीं वेगळीं कारणें होतीं. रोमला कांहीं तरी करून कॉन्स्टान्टिनोपलवर कायमचें वर्चस्व मिळविण्याची इच्छा होती. कॉन्स्टान्टिनोपलचें धर्मपीठ रोमच्या धर्मपीठापासून वेगळें होतें हें तुला आठवतच असेल. हें धर्मपीठ आपल्याला आद्य, सनातन धर्मपीठ म्हणवीत असे; रोमच्या धर्मपीठाबद्दल त्यांतील लोकांना अतिशय तीव्र तिटकारा होता आणि पोपला तर ते उपटसुंभ समजत असत. पोपच्या मनांतून कॉन्स्टान्टिनोपलची ही घमेंड जिरवावयाची होती आणि तें धर्मपीठ आपल्या कबजांत आणावयाचें होतें. धर्मलंड तुर्कांच्या विरुद्ध अशा या पवित्र युद्धाच्या नांवाखालीं पोपला आपली ही फार दिवसांची मनीषा पुरी करून घ्यावयाची होती. राजकारणी पुरुषाची आणि स्वतःला मुत्सद्दी समजणाऱ्या लोकांची अशीच ही रीत असते! रोम आणि कॉन्स्टान्टिनोपल यांच्यामधील हा झगडा नीट ध्यानांत ठेवणें जरूर आहे; कारण या ख्रिस्ती-धर्मयुद्धांमध्यें तो पुनः पुनः डोकें वर काढतांना आढळतो.

ख्रिस्ती-धर्मयुद्धापाठीमागचें आणखी एक कारण व्यापारासंबंधींचें होतें. व्यापारी लोकांना, विशेषतः उदयास येऊं लागलेल्या व्हेनिस व जिनोआ या बंदरातील लोकांना, हीं युद्धें हवीं होतीं. कारण, नाहीं तर त्याच्या व्यापाराला धोका व खोट येत होती. सेल्जुक तुर्कांनीं त्यांचे पूर्वेकडील व्यापाराचे पुष्कळसे मार्ग बंद करून टाकले होते.

सर्वसामान्य लोकाना अर्थातच या आंतल्या हेतूंची कांहींच कल्पना नव्हती. त्यांना त्याबद्दल कोणीं कांहीं सांगितलेंच नव्हतें. राजकारणी लोक नेहमींच खरे हेतू दडवून ठेवीत असतात, आणि धर्म, न्याय, सत्य या किंवा अशाच गोष्टींचे मोठे पवाडे रचीत असतात. आजकालसुद्धां हाच प्रकार चालू आहे. त्या काळीं अशा या त्यांच्या गाजावाजाला लोक बळी पडले; आजही जगांतील बहुतेक लोक राजकारणी लोकांच्या गोड गोड भुलथापांना बळी पडत असतात.

अशा रीतीनें पुष्कळच लोक या धर्मयुद्धांच्या झेंड्याखालीं जमा झाले. त्यामध्यें सच्चे आणि कळकळीचे लोक होते; परंतु पुष्कळसे असे होते, कीं त्यांचा आणि सच्चेपणाचा दुरूनसुद्धां संबंध नव्हता आणि ते लूट मिळण्याच्या आशेनें मात्र यामध्यें सामील झालेले होते. एका बाजूला खरे सात्त्विक धर्मनिष्ठ लोक आणि दुसऱ्या बाजूला एकूण एक प्रकारचे गुन्हे करायला जे मुळींच मागेंपुढें पाहणार नाहींत अशा प्रकारचे समाजांतील सगळ्या घाणीचें आगर असे लोक, असें हें या सैन्यांत अपूर्व मिश्रण होतें. खरोखर, ख्रिस्ती धर्मीयांच्या दृष्टीनें अत्यंत उदात्त कार्य म्हणून या धर्मयुद्धांत सामील झालेल्या या धर्माच्या शिपायांनीं, निदान त्यांच्यापैकीं पुष्कळच जणांनीं अत्यंत घाणेरडीं, अत्यंत किळसवाणीं दुष्कर्में केलीं. इतकीं नीचपणाचीं, कीं त्यांना

दुसरीकडे कोठें तुलनाच नाहीं. वाटेंत जातां जातां लूटमार करणें आणि अनाचार किंवा स्त्रियांवर जुलूम करणें, यांतच त्यांपैकीं पुष्कळ जण इतके रंगून गेले, कीं ते पॅलेस्टाइनपर्यंत पोंचलेच नाहींत. कितीएक लोकांनीं वाटेंत ज्यू लोकांची कत्तल करण्याचा सपाटा चालविला; कितीकांनीं तर आपल्या ख्रिस्ती धर्मबांधवांचीही कत्तल करण्यास कमी केलें नाहीं. त्यांच्या या अनाचाराला कंटाळून, ते ज्या देशातून जात असत त्या देशांतील शेतकऱ्यांनींच पुष्कळदां त्यांच्यावर हल्ले करून त्यांना ठार तरी करावें किंवा त्यांना पिटाळून लावावें असेही प्रकार घडून आले.

शेवटीं बुइलोचा गॉडफ्रे या नांवाच्या एका नॉर्मन सेनापतीच्या आधिपत्याखालीं हें धर्मयुद्धाचें सैन्य एकदांचें कसेंबसें पॅलेस्टाइनमध्यें जाऊन पोंचलें खरें. जेरुसलेमचा त्यानें पाडावही केला आणि मग तेथें "एक आठवडापर्यंत कत्तल चालू राहिली." ही कत्तल अत्यंतच भयंकर झाली. हा प्रकार प्रत्यक्ष पाहिलेल्या एका फ्रेंच गृहस्थानें लिहिलें आहे, कीं "प्रवेशद्वाराच्या कमानीखालीं गुडघ्यापर्यंत रक्त सांचलें असून घोड्याच्या लगामाला तें जाऊन पोंचलें होतें." हा ग्रॉडफ्रे नंतर जेरुसलेमचा राजा झाला.

यानंतर सत्तर वर्षांनीं ईजिप्तचा सुलतान सलादिन यानें ख्रिस्ती लोकांच्या हातून जेरुसलेम परत घेतलें. त्यामुळें यूरपमधील लोकांत पुन्हां खळबळ माजली आणि पुन्हां धर्मयुद्धाचा मोर्चा सुरू झाला. या वेळीं यूरपमधील राजे आणि महाराजे त्यामध्यें सामील झाले; परंतु त्याना विशेषसें यश मिळालें नाहीं. लहान कोण आणि मोठा कोण यांबद्दल त्यांच्यामध्यें आपसांत तंटे होते आणि एकमेकांना एकमेकाबद्दल हेवाही वाटत होता. अत्यंत राक्षसी आणि क्रूर अशा लढाया, क्षुद्र कारस्थानें आणि दुराचार व पाजीपणा यानीं भरलेली या काळची या प्रसंगाची हकीकत मन खट्टू करणारी आहे. अर्थात् या सर्व भयाण कालखंडामध्येंही मनुष्यस्वभावांतील सद्गुणांचा कधीं कधीं प्रादुर्भाव झालेला आढळतो; कांहीं कांहीं प्रसंग असेही घडलेले आढळतात, कीं जेव्हां परस्पर-शत्रु असणारे लोकही एकमेकांशीं आदरानें आणि उदारबुद्धीनें वागल्याचें दिसतें. पॅलेस्टाइन देशांत गेलेल्या या परकी राजांमध्यें शरीरसामर्थ्य आणि शौर्य यांबद्दल विख्यात असलेला, सिंहहृदय ही पदवी मिळालेला, इंग्लंडचा राजा रिचर्ड हाही एक होता. सलादिन हाही मोठा योद्धा असून औदार्याबद्दल, धीरोदात्तपणाबद्दल त्याची ख्याति होती. त्याच्या या धीरोदात्तपणाची प्रशंसा खुद्द त्याच्याविरुद्ध लढणाऱ्या या ख्रिस्ती धर्मवीरांना सुद्धां करावी लागलेली आहे. एक गोष्ट अशी सांगतात, कीं एकदां रिचर्ड राजा फार आजारी होता आणि उष्णता त्याला असह्य झाली होती. ही गोष्ट सलादिनच्या कानावर गेल्यानंतर त्यानें त्याच्याकडे पर्वतावरून ताजें बर्फ आणि हिम पाठवून दिलें. हल्लीं आपण करतों त्याप्रमाणें पाणी कृत्रिम रीतीनें गोठवून त्या काळीं बर्फ तयार करतां येत नसे. त्यासाठीं पर्वतामध्यें स्वाभाविक रीतीनें गोठलेलें पाणी आणि पडलेलें बर्फ घेऊन अत्यंत जलद गतीनें जाणारे जासूद या कामासाठीं पाठविणें जरूर पडत असे.

अशा या धर्मयुद्धाच्या वेळच्या अनेक गोष्टी आहेत. वाल्टर स्कॉटची यासंबंधींची टालिस्मन ही कादंबरी बहुतेक तूं वाचलेली असशीलच.

या धर्मवीरांची एक तुकडी कॉन्स्टान्टिनोपल येथें गेली आणि त्या लोकांनीं तें शहर कबजांत घेतलें. तेथील पूर्व रोमन साम्राज्याचा जो ग्रीक बादशहा होता त्याला त्यांनीं हांकून दिलें आणि तेथें लॅटिन राज्य व रोमन धर्मपीठ यांची त्यांनीं स्थापना केली. कॉन्स्टान्टिनोपलमध्येंही भयंकर कत्तली करण्यांत आल्या आणि या धर्मवीरांनीं तें शहर अर्धवट जाळूनही टाकलें. परंतु हें लॅटिन राज्य फार काळपर्यंत टिकून राहिलें नाहीं. पूर्व साम्राज्यांतील ग्रीक राज्यकर्ते दुर्बल झाले होते खरे; तरी पण त्यांनीं परतून पन्नास वर्षांनंतर लॅटिन लोकांना तेथून हांकून लावलें. त्यानंतर हें पूर्व साम्राज्य कॉन्स्टान्टिनोपल येथें आणखी दोनशें वर्षेंपर्यंत चाललें. अखेरीस इ. स. १४५३ मध्यें तुर्क लोकांनीं तें कायमचें नष्ट केलें.

या ख्रिस्ती धर्मवीरांनीं कॉन्स्टान्टिनोपल शहर काबीज केलें यावरूनही रोमन धर्मपीठ व पोप याची तेथपर्यंत आपलें प्रभुत्व वाढविण्याची इच्छा होती हें दिसून येतें. या शहरांतील ग्रीक राज्यकर्त्यांनीं आणीबाणीच्या प्रसंगीं घाबरून जाऊन तुर्कांविरुद्ध रोमच्या साह्याची याचना केली होती खरी; परंतु धर्मयुद्धांना मात्र त्यांनीं कांहींच मदत केली नाहीं; त्यांचा त्यांना फार तिटकाराच होता.

परंतु या सर्व धर्मयुद्धामध्यें मुलांचीं धर्मयुद्धें म्हणून जीं झालीं तीं सर्वांत अतिशय भयप्रद झालीं. असंख्य लहान लहान मुलगे, यांत बहुतेक फ्रेंच होते आणि कांहीं थोडे जर्मन होते, उत्साहाच्या भरांत घरें सोडून पॅलेस्टाइनमध्यें जाण्याच्या निश्चयानें बाहेर पडले. त्यांपैकीं पुष्कळ जण वाटेंत मेले, कित्येक वाट चुकून कोठें भटकले त्यांचा कांहीं पत्ता लागला नाहीं. पुष्कळ जण त्यांत मार्सेल्स बंदरांत गेले. तेथें त्या गरीब बिचाऱ्या मुलांना फसवून त्यांच्या उत्साहाचा गैरफायदा पाजी लोकांकडून घेण्यांत आला. त्यांना पवित्र भूमीकडे घेऊन जाण्याचें मिष करून गुलामांचा व्यापार करणाऱ्या लोकांनीं आपल्या जहाजांवर त्यांना घेतलें; तेथून त्यांना ईजिप्तमध्यें नेलें आणि तेथें त्यांना गुलाम म्हणून विकून टाकलें.

इंग्लंडचा रिचर्ड राजा हा पॅलेस्टाइनमधून परत येत असतांना त्याला त्याच्या पश्चिम यूरपातील शत्रूंनीं पकडून कैद केलें आणि त्याला सोडवून आणण्यासाठीं भली मोठी खंडणी भरावी लागली. फ्रान्सचा एक राजा प्रत्यक्ष पॅलेस्टाइनमध्येंच कैद झाला होता. त्यालाही सोडवून आणण्यासाठीं खंडणी भरावी लागली. पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा, फ्रेडरिक बार्बारोसा हा पॅलेस्टाइनमध्यें एका नदींत बुडून मरण पावला. त्यानंतर जसजसा काळ जात चालला तसतसें धर्मयुद्धांमधील आकर्षण — त्याबद्दलचा सारा उत्साह — मावळत चालला. लोकांना त्यांचा कंटाळा येऊन गेला. जेरुसलेम तर अजून मुसलमानांच्याच हातीं होतें. परंतु यूरपांतील राजे लोकाना किंवा जनतेला तें परत मिळविण्यासाठीं आणखी लोकांचे प्राण व संपत्ति खर्चीं घालावी

अशाबद्दल फारशी आस्था वाटेनाशी झाली. तेव्हांपासून सुमारें सातशें वर्षेपर्यंत जेरुसलेम मुसलमानांच्याच ताब्यांत राहिलें. अगदीं अलीकडे, गेल्या महायुद्धांत १९१८ सालीं काय ते तें शहर एका इंग्रज सेनापतीनें तुर्कांच्या हातून जिंकून घेतलें.

या सर्व धर्मयुद्धांत पुढें झालेलें एक धर्मयुद्ध मात्र मोठें गमतीचें आणि विलक्षण झालें. खरें म्हटलें तर धर्मयुद्ध या शब्दाचा जो मूळचा जुना अर्थ त्या अर्थानें कांहीं त्याला धर्मयुद्ध म्हणतांच येणार नाहीं. पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा दुसरा फ्रेडरिक हा युद्धासाठीं ईजिप्तमध्यें गेला. पण तेथें लढण्याऐवजीं त्यानें तेथील सुलतानाची गांठ घेतली आणि त्यांच्यात्यांच्यामध्यें एक मित्रत्वाचा करार झाला. फ्रेडरिक हा एक लोकविलक्षण मनुष्य होता. त्याच्या काळच्या राजेलोकांना अक्षरओळखसुद्धां नसावयाची, परंतु त्याला अनेक भाषा येत असून त्यांत त्याला आरबी भाषासुद्धां येत होती. त्याला त्या काळीं ‘ जगांतील आश्चर्य ’ म्हणून म्हणत असत. पोपला तो मुळींच जुमानीत नसे ; त्यामुळें पोपनें त्याच्यावर बहिष्काराची शिक्षा फर्माविली होती. परंतु तीमुळेही त्याचें कांहीं वांकडें झालें नाहीं.

अशा तऱ्हेनें या धर्मयुद्धांपासून कांहीं निष्पन्न तर झालें नाहीं. पण या सतत चाललेल्या लढाईनें सेल्जुक तुर्क मात्र दुर्बळ होऊन गेले. तथापि त्यापेक्षांही खरें म्हटलें म्हणजे सरंजामदारशाहीनें सेल्जुक साम्राज्याला अधिक निःसत्त्व केलें. त्याचे मोठमोठे सरंजामदार जवळजवळ आपण स्वतंत्र आहोंत असें समजूनच राहूं लागले. त्यांच्यांत एकमेकांमध्यें लढाया होऊं लागल्या. त्यांच्यांतील या अंतर्गत दुर्बळपणामुळेंच कधीं कधीं तुर्क लोकांना या ख्रिस्ती धर्मयुद्धवाल्यापुढें हार खावी लागली. परंतु सलादिन-सारखा एखादा प्रबळ राज्यकर्ता उदयाला आला, म्हणजे मात्र थोडी थोडी तुर्कांची सद्दी भराला येत असे.

या धर्मयुद्धांसंबंधीं अगदीं अलीकडे एक निराळाच दृष्टिकोण इंग्रज इतिहासकार जी. एम. ट्रेव्हलीन यानें मांडला आहे. ( त्यानें लिहिलेले गॅरिबॉल्डीबद्दलचे ग्रंथ तुला माहीतच आहेत ) त्याचा हा दृष्टिकोणही मोठा पाहण्यासारखा आहे. ट्रेव्हलीन लिहितो, “ या वेळीं यूरपमध्यें पुन्हां एकदां शक्तीचा, सामर्थ्याचा, संचार होऊं लागला होता. या सामर्थ्याच्या जोरावर पूर्वेकडे आक्रमण करण्याची सर्वसामान्य आकांक्षा यूरपमध्यें निर्माण झालेली होती. या सामान्य आक्रमणांपैकीं लष्करी आणि धार्मिक आक्रमणाचा भाग म्हणजे हीं ख्रिस्ती धर्मयुद्धें होत. यूरपनें या धर्मयुद्धांतून कोणतें विशेष फळ पदरांत पाडून आणलें ? आपलें ख्रिस्ताचें पवित्र स्मशानस्थान कायमचें शत्रूच्या हातून सोडविणें किंवा सर्व ख्रिस्ती जगाच्या ऐक्याचा पाया घालणें यांपैकीं एकही कार्य त्याला साधलें नाहीं ; किंबहुना, धर्मयुद्धांचा सारा इतिहास म्हणजे या दोन्ही गोष्टी न साधल्या गेल्याचाच एक दीर्घ इतिहास आहे. या गोष्टींच्याऐवजीं यूरपनें अत्यंत कसबी कारागिरी व उद्योगधंदे, विलासोपभोग, शास्त्रज्ञान, आणि नवें ज्ञान संपादण्याची आकांक्षा याच गोष्टी पैदा केल्या ; म्हणजे अशा साऱ्या गोष्टी, कीं ज्यांचा भिक्षु

पीटर यानें अत्यंत तिटकारा केला असता; ज्यांना त्यानें दुरूनसुद्धां स्पर्श केला नसता."

सलादिन इ. स. ११९३ मध्यें मरण पावला आणि हळूहळू राहिल्यासाहिल्या आरबी साम्राज्याचेही तुकडे तुकडे होऊन गेले. पश्चिम आशियांमधील पुष्कळ प्रदेशांत छोट्या छोट्या सरंजामदारांच्या नेतृत्वाखालीं बंडाळी माजली. त्यानंतर अखेरचें धर्मयुद्ध इ. स. १२४९ मध्यें झालें. त्याचें नेतृत्व फ्रान्सचा राजा नववा लुई यानें स्वीकारलें होतें. त्यांत त्याचा पराभव होऊन त्याला कैद करण्यांत आलें.

या दरम्यान पूर्व आशिया आणि मध्य आशिया इकडे फार मोठमोठ्या घडामोडी चालू होत्या. मोंगल लोक, त्यांचा अत्यंत बलिष्ठ नायक चेंगीझखान अथवा जेंगीझखान याच्या नेतृत्वाखालीं एखाद्या प्रचंड काळ्याकभिन्न मेघाप्रमाणें पुढें पुढें जाऊन पूर्व क्षितिजाखालचा सारा प्रदेश व्यापून टाकूं लागले होते. धर्मयुद्धवाले आणि पॅलेस्टाइनचें संरक्षण करणारे, ख्रिस्ती आणि मुसलमान दोघांनाही या येऊं घातलेल्या स्वारीचें सारखेंच भय उत्पन्न झालें. हा चेंगीझखान आणि मोंगल लोक यांच्याबद्दल पुढच्या एका पत्रांत मी अधिक लिहीन.

हें पत्र पुरें करण्यापूर्वी मला आणखी एक गोष्ट सांगावयाची आहे. मध्य आशिया-मध्यें बुखारा येथें एक अत्यंत श्रेष्ठ आरबी रोग-चिकित्सक हकीम या काळांत होऊन गेला. त्याची कीर्ति आशियामध्यें आणि यूरपमध्येंही पसरलेली होती. त्याचें नांव इब्न सिना असें होतें. परंतु तो यूरपमध्यें आव्हिसेना या नांवानें अधिक प्रसिद्ध आहे. त्याला हकीमांचा राजा म्हणत असत. धर्मयुद्धें सुरू होण्यापूर्वीच इ. स. १३०७ मध्यें तो मरण पावला होता.

एकट्या इब्न सिनाचें नांव केवळ त्याची प्रसिद्धि झालेली आहे एवढ्यासाठींच मी सांगतों आहें. परंतु तूं मुद्दाम लक्षात ठेव, कीं या सर्व काळामध्यें शेवटपर्यंत आरबी लोकांच्या साम्राज्याचा जरी ऱ्हास होत चाललेला होता तरी आरबी सुधारणा, पश्चिम आशिया आणि मध्य आशियातील कांहीं भाग या ठिकाणीं चांगल्या रीतीनें तग धरून होती. सलादीन एकीकडे जरी या ख्रिस्ती धर्मवीरांशीं लढण्यांत गुंतलेला होता, तरी त्यानें त्याही धामधुमींत पुष्कळ विद्यालयें आणि रुग्णालयें बांधलीं. परंतु या सुधारणेचा आतां एकाएकीं संपूर्ण विनाशकाल जवळ आला होता; मोंगल लोक पूर्वेकडून तिच्या-वर चालून येऊं घातले होते.

## ६३

# ख्रिस्ती धर्मयुद्धांच्या काळांतील यूरप खंड

२० जून, १९३२

अकराव्या, बाराव्या आणि तेराव्या शतकांमध्यें इस्लामधर्म आणि ख्रिस्ती धर्म यांच्यामध्यें जो झगडा झाला, त्याचें थोडेंसें दर्शन आपण गेल्या पत्रांत घेतलें. या काळांत ख्रिस्ती जगताची कल्पना यूरप खंडांत वाढीस लागली. आतां साऱ्या यूरपभर ख्रिस्ती धर्म पसरलेला आढळतो. सगळ्यांत शेवटीं या धर्माच्या पंखाखालीं आलेले लोक म्हणजे रशियन आणि इतर कांहीं स्लाव्ह वंशाचे लोक. त्यासंबंधीं एक गोष्ट प्रचलित आहे; ती खरी कीं खोटी हें कांहीं मला ठाऊक नाहीं; पण असें सांगतात मात्र, कीं ख्रिस्ती होण्यापूर्वीं तत्कालीन जुन्या रशियन लोकांनीं जुना धर्म टाकून देऊन नवीन धर्म स्वीकारण्याबाबत आपसांत चर्चा केली. इस्लाम आणि ख्रिस्ती असे दोन नवे धर्म निर्माण झालेले त्यांच्या ऐकिवांत होते. म्हणून हे धर्म ज्या देशांत प्रचलित होते त्या देशांत अगदीं आधुनिक काळाच्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं आपलें शिष्टमंडळ पाठविलें. अशासाठीं, कीं त्या त्या धर्माच्या तेथील व्यवहाराचें निरीक्षण करून त्यासंबंधींचा अभिप्राय त्यांनीं आपल्या मायदेशाकडे सादर करावा. असें म्हणतात, कीं हें शिष्टमंडळ प्रथम इस्लामधर्माचा प्रसार असलेल्या पश्चिम आशियांत कांहीं ठिकाणीं जाऊन मग कॉन्स्टान्टिनोपल येथें गेलें. कॉन्स्टान्टिनोपल येथें त्यांनीं जें कांहीं पाहिलें त्यानें ते दिपून गेले. आद्य ख्रिस्ती पीठांमधील पूजातंत्र अतिशय छानछोकीचें आणि भपकेबाज होतें; त्याच्यांत वाद्यें आणि सुंदर गायन यांची मोहक जोड होती. उपाध्याय किंवा पाद्री लोक मोठमोठे भरजरी पोशाख घालून येत आणि धूपदीपाची रेलचेल असे. उत्तरेकडून गेलेल्या या अर्धवट सुधारलेल्या लोकांच्या मनावर त्या सर्व समारंभाचा प्रचंड परिणाम झाला. इस्लामधर्मामध्यें असें भपकेबाजपणाचें कांहींच लक्षण नव्हतें. म्हणून ख्रिस्ती धर्मच स्वीकारावा असें त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चित केलें आणि त्याप्रमाणें आपल्या राजाकडे अभिप्राय सादर केला. त्यानंतर रशियाचा राजा व लोक यांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला; त्यांनीं कॉन्स्टान्टिनोपलच्या आद्य ख्रिस्ती धर्मपीठाकडून या धर्माची दीक्षा घेतल्यानें ते आद्य धर्मपीठाचे अनुयायी बनले; रोमच्या धर्मपीठाचे नव्हे. पुढें केव्हांच रशियानें रोमच्या पोपला मान्यता दिली नाहीं.

रशियाचें हें धर्मांतर ख्रिस्ती धर्मयुद्धांपूर्वीं पुष्कळ काळ झालें होतें. बल्गेरियन लोक सुद्धां प्रथम थोडा वेळ मुसलमानी धर्म स्वीकारण्याकडे कललें होते म्हणतात. परंतु पुढें त्यांनाही कॉन्स्टान्टिनोपलच्या धर्मपीठाचेंच आकर्षण अधिक वाटलें. तेथील एका राजानें बायझांटियम येथील (कॉन्स्टान्टिनोपलचें जुनें नांव बायझांटियम होतें हें तुझ्या लक्षांत असेलच) एका राज्यकन्येशीं लग्न केलें आणि ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. अशाच रीतीनें बाजूच्या इतर प्रदेशांतील लोकही हळूहळू ख्रिस्ती झाले.


तेराव्या शतकांतील यूरपखंड
स्वीडनचें राज्य
नोव्हगोरोड संस्थान
डेन्मार्कचें राज्य
इंग्लंडचें राज्य
प्रशिया
पोलंडचें राज्य
डॉन
व्होल्गा
कीव्हचें संस्थान
नीपर
हंगेरीचें राज्य
आल्प्स
डान्यूब
स्पेनचीं राज्यें
लिऑन
पोर्तुगाल
नवार
कॅस्टील
ॲरागान
सर्बिया
बल्गेरिया
रोम
पूर्वेकडील साम्राज्य
सेल्जुक तुर्कांचा मुलुख
मूर लोकांचीं राज्यें

इकडे हीं धर्मयुद्धें चालू असतांना यूरपची काय हालहवाल होती ? तूं पाहिलेंच आहेस, कीं इकडचे कितीएक राजेमहाराजे पॅलेस्टाइनमध्यें गेले होते आणि तेथें त्यांच्यावर अडचणीचे प्रसंगही गुदरले होते. दरम्यान पोप मात्र रोममध्यें बसून काफीर तुर्कांविरुद्ध चाललेल्या या पवित्र धर्मयुद्धासाठीं मदत करण्याबद्दल आज्ञापत्रें आणि संदेशपत्रकें काढीत होता. या काळीं एकंदर यूरपच्या सर्व इतिहासामध्यें पोपची सत्ता अगदीं कळसाला जाऊन पोंचली होती असें म्हटलें तरी चालेल. मीं सांगितलेलें आठवतच असेल तुला, कीं एकदां प्रत्यक्ष एका मोठ्या अभिमानी बादशहाला क्षमा मागण्यासाठीं पोपच्या पायाशीं जाण्याला परवानगी मिळावी म्हणून कॅनोसा येथें पायांत कांहीं न घालता बर्फामध्यें तिष्ठत उभें राहावें लागलें होतें. त्याच त्या पोपनें, सातवा ग्रेगरी यानें ( याचें मूळचें नांव हाइल्डब्रँड असें होतें ) पोपच्या निवडणुकीची एक नवीनच पद्धति प्रस्थापित केली. रोमन कॅथॉलिक पंथाच्या उपाध्यायवर्गामध्यें कार्डिनल लोक हे सर्वांत श्रेष्ठ दर्जाचे धर्मगुरू समजले जात. या सर्व कार्डिनल्सचा मिळून एक संघ स्थापन करण्यांत येऊन त्याला पवित्र संघ किंवा Holy College असें नांव देण्यांत आलें. आणि या संघाकडून पोपची निवडणूक करण्यांत येऊं लागली. ही पद्धति इ. स. १०५९ मध्यें जी सुरू झाली, ती कांहीं किरकोळ फेरफार सोडले तर आजच्या घटकेलाही जशीच्या तशी चालू आहे. हल्लींसुद्धा पोप मरण पावला म्हणजे या कार्डिनल्सची बैठक एका दिवाणखान्यात भरते आणि बाहेरून कुलूप लावून दार बंद करून टाकलें जातें. पोपची निवडणूक होऊन जाईपर्यंत मग कोणीं आंतून बाहेर यावयाचें नाहीं किंवा बाहेरून कोणीं आंत जावयाचें नाहीं. या कार्डिनल मंडळीमध्यें केव्हां केव्हां कोणाची निवड करावयाची याबद्दल एकमत होत नाहींसें झालें म्हणजे तासन्‌तास ते असें कोंडून घेऊन बसतात. कुणालाही बाहेर कांहीं येतां येत नाहीं. त्यामुळें शेवटीं त्यांना कांहीं तरी एकमत करावेंच लागतें. आणि त्यांचा निर्णय झाला कीं लगेच, उत्सुकतेनें प्रतीक्षा करीत बाहेर जमून राहिलेल्या लोकांना, निर्णय झाला हें समजण्यासाठीं बाहेर पांढरा धूर सोडण्यांत येतो.

पोपची जशी ही निवडणूक होऊं लागली, त्याचप्रमाणें पुढें पवित्र रोमन साम्राज्याच्या बादशहाचीही निवडणूक होण्याची पद्धति अमलांत आली. मात्र त्याची निवडणूक मोठ्या सरंजामदाराकडून होत असे. असे हे जमीनदार सात असून त्याना ' मतदार राजे ' असें म्हणत असत. अशा रीतीनें बादशहा नेहमीं एकाच घराण्यांतला असूं नये यासाठीं ही व्यवस्था केलेली होती. प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र या निवडणुकींतही किती तरी काळपर्यंत एकाच घराण्याचें प्रस्थ माजून राहिलेलें दिसून येतें.

बाराव्या आणि तेराव्या शतकांत असें हें प्रस्थ साऱ्या साम्राज्यामध्यें होहेनस्टाफेन घराण्याचें माजलेलें होतें. हें घराणें मूळचें या गांवचें असल्यामुळें त्यांना हें नाव पडलें होतें. त्यांच्यापैकीं पहिला फ्रेडरिक होहेनस्टाफेन हा इ. स. ११५२ मध्यें बादशहा झाला. तो सामान्यतः फ्रेडरिक बार्बारोझा या नांवानें प्रसिद्ध आहे. धर्मयुद्धाहून

परत येतांना बुडून जो मेला तो हाच. पवित्र रोमन साम्राज्याच्या इतिहासात याची कारकीर्द सर्वांत अधिक वैभवशाली झाली असें म्हणतात. जर्मन लोक तर आज कितीएक शतकें त्याला एक विभूति–एक प्रकारचा देवाचा अवतार–समजत आले असून त्याच्यासंबंधीं त्या देशांत असंख्य दंतकथा प्रचलित झालेल्या आहेत. त्या लोकांची अशी समजूत आहे, कीं सध्यां तो पर्वतामध्यें निद्रिस्त आहे आणि योग्य वेळ येतांच जागा होऊन तो आपल्या लोकांचें संरक्षण करण्यासाठीं येणार आहे.

या फ्रेडरिक बार्बारोझानें पुष्कळ मोठा झगडा पोपच्या विरुद्ध केला. परंतु अखेरीस पोपचा जय झाला आणि फ्रेडरिकला त्याच्यापुढें नमावें लागलें. हा स्वतः 'हम करें सो कायदा' अशा वृत्तीचा राजा होता; परंतु त्याच्या माडालिकाकडून त्याला अतिशय त्रास सोसावा लागे. इटलीमध्यें या काळीं मोठमोठीं शहरें उदयास येत होतीं. या शहरांचें स्वातंत्र्य नष्ट करण्याची खटपट फ्रेडरिकनें करून पाहिली. परंतु तिच्यांत त्याला यश आलें नाहीं. जर्मनीमध्येंही विशेषतः नद्यांच्या कांठावर कोलन, हॅम्बर्ग, फ्रँकफोर्ट हीं आणि अशीं अनेक शहरें निर्माण होऊं लागलीं होतीं. त्यांच्या बाबतींत मात्र फ्रेडरिकनें निराळें धोरण स्वीकारलें. सरंजामदार आणि सरदार यांची सत्ता कमी व्हावी म्हणून त्यानें या उगवत्या शहरांना साहाय्यच केलें.

प्राचीन भारतीय लोकांची राजाविषयींची कल्पना काय होती, हें मीं तुला अनेक वेळां सांगितलेलें आहे. प्राचीन आर्यांच्या काळापासून तों अशोकाच्या काळापर्यंत, अर्थशास्त्रापासून तों शुक्राचार्यांच्या नीतिसारापर्यंत, पुनः पुनः असें आग्रहानें प्रतिपादन केलेलें आहे, कीं राजानें लोकमतापुढें मान वांकवलीच पाहिजे. प्रजा हीच खरी अखेरची सत्ताधीश होय. अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारांत जरी हिंदुस्थानांतील राजे हे इतर देशांतल्या राजांसारखेच एकतंत्री हुकूमशहा असत, तरी भारतीयांचा सिद्धांत हा असा होता. आतां हा सिद्धांत किंवा दृष्टिकोन प्राचीन यूरपीय दृष्टिकोनाशीं पडताळून पाहा. त्यांच्या त्या काळच्या कायदेपंडितांच्या मताप्रमाणें बादशहा हाच सर्वसत्ताधीश होता. त्याची जशी इच्छा असेल तसा कायदा व्हावयाचा. ते म्हणत, "बादशहा हा या पृथ्वीवरील मूर्तिमंत कायदाच होय; कायद्याचा प्रत्यक्ष अवतारच होय." फ्रेडरिक बार्बारोझाही स्वतः म्हणे, "राजे लोकांना कायद्याच्या गोष्टी सांगणें, नियम घालून देणें हें प्रजेचें काम नव्हे. आज्ञापालन हेंच तेवढें प्रजेचें कर्तव्य."

याची चिनी लोकांच्या दृष्टिकोनाशींही तुलना करून पाहा. त्या देशात राजाला किंवा सम्राटाला मोठमोठ्या पदव्या–'स्वर्गपुत्र' वगैरेसारख्या देण्याची पद्धति होती. परंतु त्यावरून आपण भलतीच समजूत करून घेतां कामा नये. तेथील कल्पनेप्रमाणेंही राजाची अधिकारमर्यादा ही यूरपांतील सर्वसत्ताधीश बादशहांच्यापेक्षां फारच निराळी होती. मेंगचे नांवाच्या एका प्राचीन चिनी ग्रंथकारानें म्हटलें आहे, "देशांतील सर्वांत महत्त्वाचा भाग म्हणजे प्रजा, त्यानंतरचें स्थान जमीन व तिच्यांतील पिकें यांच्याशीं

संबद्ध असलेल्या सोयीच्या व हितकारक अशा देवतांचें, आणि त्यानंतर सर्वांत खालचें स्थान म्हणजे राजाचें."

परंतु यूरपमध्यें मात्र वर सांगितल्याप्रमाणें बादशहाला जगामध्यें सर्वश्रेष्ठ सत्ताधीश असें समजण्यात येई. यांतूनच राजे लोकांच्या दैवी अधिकारांची कल्पना निर्माण झाली. प्रत्यक्षांत मात्र राजा असा सर्वसत्ताधीश कधींच नसे. त्याचे मांडलिक सरदार हे सुद्धां शिरजोरच असत पुष्कळसे. आणि हळूहळू हीं नवीन शहरें निर्माण होऊं लागल्यावर त्यांच्यामध्यें एक नवाच वर्ग निर्माण होऊन तोही स्वतः कांहीं सत्ता कशी बळकावूं लागला हें दिसेलच आतां आपल्याला. शिवाय, एका बाजूनें पोपही आपण या पृथ्वीवरचे सर्वसत्ताधीश आहों असा दावा सांगतच होता. अशा रीतीनें दोन सत्ताधीश एका ठिकाणीं आले, कीं झगडा आणि गोंधळ उत्पन्न होणारच.

या फ्रेडरिक बार्बारोझाच्या नातवाचें नांवही फ्रेडरिक असेंच होतें. फार अल्पवयांत तो बादशहा झाला. त्याला दुसरा फ्रेडरिक असें म्हणत. ज्याला जगांतील आश्चर्य म्हणून म्हणत असत आणि जो ईजिप्तच्या सुलतानाशीं मैत्रीचीं बोलणीं करून आला तोच हा गृहस्थ. आपल्या आजाप्रमाणें यानेंही पोपला धुडकावून देऊन त्याच्या आज्ञा पाळण्याचें नाकारलें. त्यावर त्याला धर्मबाह्य म्हणून जाहीर करून पोपनें उलट कोलदांडा घतला. पोप लोकांचें हें एक जुनें अत्यंत प्रचंड शस्त्र होतें; पण अलीकडे तें गंजून गेल्यासारखें झालें होतें. दुसऱ्या फ्रेडरिकनें पोपच्या रागाच्या या आविष्काराची कांहींच फिकीर केली नाहीं; आणि जग पाहावें तर तेंही बदलूं लागलें होतें. फ्रेडरिकनें यूरपांतील राजेरजवाड्यांना लांबलचक पत्रें लिहून असें प्रतिपादन केलें, कीं राजेलोकांच्या कारभारांत हात घालण्याचा पोपला कांहीं एक अधिकार नाहीं; धार्मिक आणि आध्यात्मिक व्यवहारांची चिंता करणें हेंच फक्त पोपचें कार्य; राजकारणांत लुडबुड करण्याचें नव्हे. त्याचबरोबरच उपाध्याय-वर्गांत लांचलुचपत आणि अनाचार किती माजला आहे याचेंही त्यानें वर्णन केलें. पोपशीं फ्रेडरिकचा हा जो वाद झाला, त्यांत फ्रेडरिकचेंच पारडें फार जड ठरलें. बादशहा आणि पोप यांच्यामधील पूर्वापार चालत आलेल्या झगड्यामध्यें आतां आधुनिक बुद्धिवादी प्रवृत्तीचा शिरकाव होऊं लागल्याचें प्रथमचिन्ह या दृष्टीनें फ्रेडरिकचीं हीं पत्रें मोठीं लक्षांत घेण्यासारखीं आणि मनोवेधक आहेत.

धर्माच्या बाबतींत फ्रेडरिक हा फार उदार वृत्तीचा होता. त्याच्या दरबारीं आरबी आणि ज्यू विद्वान् आणि तत्त्वज्ञही असत. आरबाची गणना-पद्धति ( संख्या ) आणि बीजगणित ( हिंदुस्थानांतून या गोष्टी मूळ अरबस्तानांत गेल्या हें तुझ्या लक्षांत असेलच ) हे विषय या फ्रेडरिकच्या मार्फतच यूरपमध्यें आले. नेपल्स येथील विश्वविद्यालयाची आणि सालेर्नो येथील प्राचीन विद्यापीठामध्यें एका महान् वैद्यकीय विद्यालयाची स्थापना या फ्रेडरिकनेंच केली.

दुसऱ्या फ्रेडरिकनें इ. स. १२१२ पासून १२५० पर्यंत राज्य केलें. त्याच्या

मृत्यूनंतर साम्राज्यावरील होहेनस्टाफेन घराण्याची सत्ता नष्ट झाली. इटली देश साम्राज्यांतून फुटून निघाला. जर्मनींत कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं. आणि कित्येक वर्षें जिकडे तिकडे भयंकर अव्यवस्था व बंडाळी माजली. दरोडेखोर सरदार आणि लुटारू पेंढारी यांनीं जिकडे तिकडे लूटमार सुरू केली आणि त्यांना आळा घालायला कोणीही समर्थ राहिला नव्हता. पवित्र रोमन साम्राज्याचें अवजड ओझें जर्मनीच्या राज्याला असह्य झालें. फ्रान्स आणि इंग्लंडमध्यें तेथील राजे आपापलें आसन स्वतंत्रपणें स्थिर करण्याच्या उद्योगाला लागले होते आणि आपल्याला त्रास देणारे जे दुय्यम सरदार त्यांचा कांटा काढून टाकीत होते. परंतु जर्मनीचा राजा हा वर आणखी पडला बादशहा आणि त्याची सगळी शक्तीही पोपशीं किंवा इटालियन शहरांशीं झगडे करण्यांत किंवा आपल्या सरदारांना ताब्यांत ठेवण्यांत खर्च होऊन जात होती. जर्मनीला बादशाहीचें पोकळ वैभव सांगायला सांपडत होतें, परंतु या खोट्या वैभवाच्या मोबदल्यांत स्वतःच्या देशामध्यें अंतर्गत झगडे आणि दुर्बलता यांचा मात्र उपद्रव त्याला सोसावा लागत होता. त्यामुळें जर्मन देशाचें एक संयुक्त राज्य बनण्याच्या पूर्वीं किती तरी काळ फ्रान्स आणि इंग्लंड देश यांचीं दोन्ही प्रबल राष्ट्रें निर्माण झालीं. कित्येक शतकें त्यानंतरही जर्मनींत असंख्य छोट्या छोट्या राजांचें राज्य चालू होतें. अलीकडे साठ वर्षांपूर्वींच काय तें सर्व जर्मनीचें मिळून एक राज्य स्थापन झालें; आणि तरीसुद्धा त्यांत राजेरजवाड्यांचें स्थान कायम राहिलेंच. १९१४ ते १८ च्या महायुद्धानंतर त्यांची ही गर्दी नष्ट झाली.

दुसऱ्या फ्रेडरिकनंतर जर्मनींत इतकी बंडाळी माजली, कीं तेवीस वर्षेंपर्यंत नवीन बादशहाची निवडच होऊं शकली नाहीं. नंतर १२७३ मध्यें हॅप्सबर्गचा काउंट रुडोल्फ याला बादशहा म्हणून निवडण्यांत आलें. अशा रीतीनें हें नवीनच एक हॅप्सबर्गचें घराणें रंगभूमीवर आलें. हें घराणें पवित्र रोमच्या साम्राज्याच्या अंतापर्यंत बादशाहीला चिकटून राहावयाचें होतें. तेंही घराणें राजघराणें या नात्यानें, गेल्या महायुद्धांतच नष्ट झालें. या महायुद्धाच्या वेळचा ऑस्ट्रिया-हंगेरीचा बादशहा फ्रान्सिस जोसेफ हा या हॅप्सबर्ग घराण्यामधलाच होता. त्या सुमारास हा फार म्हातारा होता. सुमारें ६० वर्षें त्यानें राज्योपभोग घेतला होता. त्याचा पुतण्या फ्रॅन्स फार्डिनांड हा त्याच्यानंतरचा वारस होता. त्याचा बायकोसह १९१४ मध्यें बाल्कन राष्ट्रांमधील बोस्निया देशातील सेराजेव्हो येथें खून झाला. या खुनांतून महायुद्ध उपस्थित झालें. आणि या महायुद्धानें ज्या अनेक गोष्टींचा अंत झाला, त्यांमध्यें हें प्राचीन हॅप्सबर्ग घराणेंही होतें.

हें झालें पवित्र रोमन साम्राज्याबद्दल. त्याच्या पश्चिमेला फ्रान्स आणि इंग्लंड यांचीं एकसारखीं एकमेकांशीं युद्धें चालू होतीं आणि त्या त्या देशांतील राजांचे आपापल्या देशांत स्वतःच्या सरदारांशीं झगडे चालू होते. जर्मनींतील राजांपेक्षां किंवा बादशहांपेक्षां या देशांतील राजांना आपल्या सरदारांविरुद्ध फार मोठें यश मिळालें;

त्यामुळें इंग्लंड व फ्रान्स हे दोन्ही देश एकजीव राष्ट्र अशा अवस्थेला अधिक आले, आणि त्यांच्यामधील या एकजीवपणाचें त्यांच्या ठिकाणीं सामर्थ्यही निर्माण झालें.

याच काळांत असा एक प्रसंग घडला, कीं ज्यासंबंधीं तुझ्या वाचनांत पुष्कळ आलें असेल. हा प्रसंग म्हणजे इ. स. १२१५ मध्यें जॉन राजानें मॅग्ना चार्टावर सही केली हा. जॉन हा आपला भाऊ सिंहहृदय रिचर्ड याच्या मागून गादीवर आला होता. याला अधिकाराची अतिशय हांव होती. परंतु त्या मानानें त्याची कुवत किंवा हिंमत नव्हती. त्यामुळें प्रत्येकाला डिंवचून असंतुष्ट करण्याचें काम तेवढें त्याच्या हातून चांगलें घडलें. त्याच्या सरदारांनीं टेम्स नदींतील रनीमीड या बेटावर त्याला कोंडींत धरलें आणि जवळजवळ नागव्या तरवारीच्या धारेवर धरून त्याच्याकडून मॅग्ना चार्टा (म्हणजे महान् करार) वर त्याची सही घेतली. त्यामध्यें त्यानें आपण इंग्लंडची सामान्य प्रजा व सरदार यांचें कांहीं कांहीं बाबतींतील स्वातंत्र्य संभाळूं असें वचन दिलें होतें. इंग्लंडच्या राजकीय स्वातंत्र्य-लढ्यामधील हें एक फारच मोठें पाऊल होतें. या चार्टरअन्वयें असें खास ठरविण्यांत आलेलें होतें, कीं कोणाही नागरिकाच्या बरोबरीच्या माणसांच्या संमतीशिवाय राजानें त्याच्या मालमत्तेंत किंवा व्यक्तिस्वातंत्र्यांत ढवळाढवळ करतां कामा नये. त्यांतूनच ज्यूरीची पद्धति सुरू झाली. कल्पना अशी, कीं कोणाही माणसाबद्दल न्यायदान हें त्याच्या बरोबरीच्या माणसानें करावें. म्हणजे ज्यूरींतील पंच म्हणजे एक प्रकारें न्यायाधीशच झाले. अशा रीतीनें इंग्लंडमध्यें राजाच्या सत्तेला फार पूर्वीच्या काळीं पायबंद घातला गेला असें आढळतें. पवित्र रोमन साम्राज्यामध्यें राजा हा अगदीं सर्वसत्ताधीश असा जो सिद्धांत मान्य करण्यांत आलेला होता, तो इंग्लंडमध्यें त्या काळीं सुद्धां मान्य झाला नव्हता.

पण एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्यासारखी आहे, कीं हा जो नियम इंग्लंडमध्यें सातशें वर्षांपूर्वी घालून देण्यांत आला तो आज हिंदुस्थानांत मात्र १९३२ सालीं आणि ब्रिटिशांच्याच राज्यामध्यें लागू नाहीं. आज येथें एका व्यक्तीला – व्हाइसरॉयला – ऑर्डिनन्स, वटहुकूम काढून कायदे करण्याची आणि लोकांची मालमत्ता आणि त्यांचें स्वातंत्र्य नष्ट करण्याची सत्ता आहे.

मॅग्ना चार्टाच्या मागोमाग इंग्लंडमध्यें आणखी एक महत्त्वाची घटना घडून आली. तेथें एक राष्ट्रीय पंच-मंडळ हळूहळू निर्माण झालें. त्या मंडळावर देशांतील निरनिराळ्या भागांतील व शहरांतील नागरिक आणि नाइट (योद्धे) हे निवडून येत असत. अशा रीतीनें इंग्रजांच्या पार्लमेंट संस्थेचा उगम झाला. नागरिक आणि नाइट निवडून येत. त्यांचें मिळून कॉमन्स हाउस होई; आणि सरदार व बिशपांची मिळून लॉर्डांची सभा. पहिल्यापहिल्यांदा या पार्लमेंटला सत्ता कांहींच नव्हती; परंतु ती हळूहळू वाढली. राजा आणि पार्लमेंट यांत श्रेष्ठ सत्ता कोणाची याबद्दलही शेवटीं एकदां कसोटीचा सामना झाला. त्यांत राजाला आपलें डोकें गमवावें लागून पार्लमेंट

हेंच अनिरुद्ध सत्ताधारी ठरलें. परंतु ही गोष्ट घडून यावयाला मॅग्ना चार्टानंतर ४०० वर्षें जाऊन सतरावें शतक यावें लागलें.

फ्रान्समध्येंसुद्धां अशा प्रकारचें एक मंडळ निर्माण झालें. तीन वर्गांचें पंच-मंडळ ( Council of three Estates ) असें त्याला म्हणत. हे तीन वर्ग म्हणजे सरदार लोक, धर्मपीठाचे लोक आणि सामान्य जनता असे होते. पण या मंडळाच्या सभा केव्हां तरी होत आणि इंग्लंडच्या पार्लमेंटनें ज्या प्रकारची सत्ता मिळविली, तशा प्रकारची सत्ता कांहीं त्या मंडळाला मिळवितां आली नाहीं. फ्रान्समध्येंही राजांची सत्ता मोडून जाण्यापूर्वी एका राजाला आपलें डोकें गमवावें लागलें.

पूर्वेकडे मात्र या काळात ग्रीक राजांच्या अमलाखालील पूर्वेकडील रोमन साम्राज्य चालू राहिलें. त्याच्या अगदीं पहिल्या पहिल्या काळापासून हें साम्राज्य सदान्‌कदा कोणाशीं ना कोणाशीं तरी युद्धांत गुंतलेलें होतें आणि पुष्कळदां तें अगदीं नाहींसें होण्याच्याही बेताला आलें होतें. तरी पण तें प्रथम उत्तरेकडील रानटी टोळयांच्या हल्लयांमधून आणि नंतर मुसलमानांच्या हल्लयांतून दोन्हींतून बचावून जिवंत राहिलें. या साम्राज्यावर रशियन, बल्गेरियन, आरबी किंवा सेल्जुक तुर्क वगैरेंकडून जे सगळे हल्ले झाले, त्यापेक्षांही अधिक विनाशकारक आणि घातक असा हल्ला ख्रिस्ती धर्मयुद्धवाल्यांचा झाला. या ख्रिस्ती धर्मवीरांनीं ख्रिस्तधर्मीय कॉन्स्टान्टिनोपलच्या राज्याचें विधर्मी तुर्कांपेक्षांही अधिक नुकसान केलें. या महान् आघातांतून मात्र कॉन्स्टान्टिनोपल शहरानें पुन्हां केव्हांच डोकें वर काढलें नाहीं.

पश्चिम यूरपांतील जगाला या पूर्व साम्राज्याबद्दल खरी अशी कांहींच माहिती नव्हती. त्याची त्या पाश्चात्य जगाला मुळींच पर्वा नव्हती. त्यांच्या दृष्टीप्रमाणें हें साम्राज्य म्हणजे ख्रिस्ती जगताचा जणुं भागच नव्हतें. या साम्राज्याची भाषा पडली ग्रीक भाषा; तर पश्चिम यूरपांतील विद्वानांची आणि सुसंकृत लोकांची भाषा म्हणजे लॅटिन भाषा. खरी गोष्ट अशी आहे, कीं कॉन्स्टान्टिनोपलच्या पडत्या काळांत-सुद्धां त्या राज्यांत विद्वत्ता, ज्ञानसाधन आणि वाङ्मय-निर्मिति या गोष्टी पश्चिम यूरप-पेक्षां पुष्कळच अधिक प्रमाणांत होत्या. परंतु ही सगळी विद्वत्ता म्हाताऱ्या माणसाची होती. तिच्यामध्यें कांहीं जोम किंवा नवनिर्माणशक्ति शिल्लक राहिलेली नव्हती. पश्चिम यूरपांत विद्वत्तेचें प्रमाण अगदींच कमी होतें. परंतु जी होती ती विद्वत्ता नव-तारुण्याच्या जोमांतील आणि नवनिर्मितीचें सामर्थ्य असलेली होती; आणि लौकरच त्या शक्तीच्या विकासाला बहर येऊन मोठमोठे सुंदर कार्यप्रबंध तिच्या हातून निर्माण होऊं घातले होते.

रोममधल्याप्रमाणें पूर्वेकडील रोमन साम्राज्यांत राजसत्ता आणि धर्मपीठ यांच्या-मध्यें सत्तेचा झगडा नव्हता. त्या ठिकाणीं बादशहा हाच सर्वसत्ताधीश होता; आणि त्याची सत्ता अगदींच अनियंत्रित होती. त्या राज्यांत व्यक्तिस्वातंत्र्याचें नांव-सुद्धां नव्हतें. ज्याच्याजवळ सर्वांत अधिक सामर्थ्य, किंवा जो सर्वांत अधिक न्याय-

अन्यायाची चाड न बाळगणारा, त्याच्या हातीं गादी पडावयाची. खून करून, कट करून, रक्तपातानें किंवा अनान्वित गुन्हे करून राजे राजमुकुट प्राप्त करून घेत आणि लोक मुकाट्यानें बिनतक्रार त्यांची आज्ञा पाळीत. आपल्यावर राज्य कोणाचें आहे याची लोकांना जवळजवळ मुळींच फिकीर नव्हती.

पूर्वेकडील रोमन साम्राज्य हें एक प्रकारें आशियाकडून येणाऱ्या हल्ल्याकडून यूरपचें संरक्षण करण्यासाठीं दाराशीं खड्या राहिलेल्या रखवालदाराप्रमाणेंच होतें म्हणावयाचें. कितीएक शतकेंपर्यंत या कार्यांत त्या साम्राज्याला यश येत गेलें. आरबांना कॉन्स्टान्टिनोपल काबीज करतां आलें नाहीं; सेल्जुक तुर्कांच्या हातीं तें अगदीं पडायला आलें होतें, परंतु अखेरीस त्यांनाहि तें घेतां आलें नाहीं. मोंगल लोक तें शहर बाजूला टाकूनच वर उत्तरेस रशियाकडे गेले. शेवटीं मग उस्मानी (आटोमन) तुर्क जेव्हां आले तेव्हां इ. स. १४५३ मध्यें कॉन्स्टान्टिनोपलच्या साम्राज्यशाही राजधानीचें तें अपूर्व फळ त्यांच्या हातीं पडलें. राजधानीच्या त्या पाडावाबरोबरच सगळ्या पूर्व साम्राज्यशाहीचाही पाडाव झाला.

## ६४

# यूरपमधील शहरांचा उदय

२१ जून, १९३२

खिस्ती धर्मयुद्धांचा काळ हा यूरप खंडामध्यें श्रद्धेचा एक महान् काळ होता. सामुदायिक श्रद्धा आणि सामुदायिक आशा-आकांक्षा यांचा तो काळ होता. साऱ्याच लोकांचीं अंतःकरणें एकाच आशेनें आणि श्रद्धेनें भरलेलीं होतीं; त्या श्रद्धेच्या आणि आशेच्या बळावर लोक आपल्या रोजच्या आयुष्यांतील दैन्यदुःखांतही मनाचें समाधान प्राप्त करून घेत होते. यूरप खंडांत त्या वेळीं शास्त्रसंशोधन नव्हतें; विद्यांचा उत्कर्ष जवळजवळ नव्हता म्हटलें तरी चालेल; कारण श्रद्धा आणि शास्त्र व विद्या कधीं एका ठिकाणीं सहसा नांदूं शकत नाहींत. विद्यार्जन आणि ज्ञानसंपादन यांमुळें मनुष्याला विचार करण्याची शक्ति उत्पन्न होते; परंतु शंका आणि प्रश्न यांची संगत श्रद्धेला तितकीशी सुखकारक वाटत नाहीं; थोडीशी अवघडच वाटते. शास्त्रसंशोधनाचा मार्ग म्हटला म्हणजे त्यांत नवीन शोध आणि प्रयोग हे आलेच; पण श्रद्धेचा मार्ग हा नव्हे. हळूहळू ही श्रद्धा कशी दुर्बल झाली व शास्त्राचा उदय कसा झाला, हें पुढें आपणांस दिसणारच आहे.

तूर्त या धर्मयुद्धाच्या क्षणाला मात्र श्रद्धेची चांगली सद्दी आहे आणि रोमन धर्मपीठच बहुधा या श्रद्धावंतांचें नेतृत्व स्वीकारून पुष्कळदां श्रद्धावंतांनाच पिळून

काढीत आहे, त्याच्या श्रमावर आपलें वजन आणि भांडवल वाढवीत आहे. असे हजारों, लाखों, श्रद्धाळू जन पॅलेस्टाइनमध्यें धर्मयुद्धासाठीं पाठविण्यात आले, पण पुन्हां कांहीं त्यांचे पाय मायदेशाला लागले नाहींत. इकडे यूरप खंडांतही ख्रिस्ती लोकांपैकीं किंवा इतरही गटांपैकीं जे कोणी कोणत्याही बाबतींत आपली आज्ञा मानणार नाहींत, त्यांच्याही विरुद्ध पोपनें धर्मयुद्ध सुरू केलें. लोकांमधील या श्रद्धेचा फायदा घेऊन पोपनें आणि पोपच्या धर्मपीठानें वारंवार सूटपत्रें व "क्षमापत्रें" (Indulgences) विकण्यास सुरुवात केली. सूटपत्र म्हणजे धर्मपीठाचा एखादा नियम किंवा प्रघात मोडण्यासाठीं दिलेली परवानगी असे. अशा रीतीनें धर्मपीठानें स्वतःच घालून दिलेले नियम मोडण्याची परवानगी खास व्यक्तींना धर्मपीठच देऊं लागलें! क्षमापत्रांचा प्रकार तर याहूनही अधिक घाणेरडा होता. रोमनधर्मपीठाच्या सिद्धांताप्रमाणें मेल्यानंतर मनुष्याचा आत्मा पर्गेटरी (शुद्धिस्थान) नांवाच्या स्थानीं जातो. हें स्थान स्वर्ग आणि नरक या दोहोंच्यामध्यें असून पृथ्वीवर केलेल्या पापांबद्दलची शिक्षा दुःखरूपानें त्या आत्म्याला या शुद्धिस्थानांत भोगावी लागते. ही शिक्षा भोगून झाल्यावर मग तो आत्मा स्वर्गांत जातो असें मानतात. परंतु पोपनें पैसे घेऊन लोकांना असें वचन देण्यास सुरुवात केली, कीं तुमच्या आत्म्यावरचें या शुद्धिस्थानांत जाण्याचें संकट टळून तो थेट एकदम स्वर्गांतच जाईल. अशा रीतीनें भोळयाभाबड्या लोकांच्या श्रद्धेचा धर्मपीठानें हा असा बाजार मांडून आपली तुंबडी भरली; एवढेंच नव्हे, तर गुन्हे आणि धर्मपीठाच्या दृष्टीनें जीं पापें असत अशीं पापें यांच्यामधून सुद्धां धर्मपीठानें पैसे उकळण्यास कमी केलें नाहीं. ख्रिस्ती धर्मयुद्धांनंतर काहीं काळानें हीं 'क्षमापत्रें' विकण्याची पद्धति सुरू झाली. पुढें पुढें ही पद्धति अगदींच किळसवाण्या अवस्थेला पोंचली आणि पुष्कळसे लोक रोमन धर्मपीठावर पुढें जे उलटले, त्याला हें एक कारण होतें.

भोळे-भाबडे श्रद्धाळू लोक काय काय सहन करतात, हें पाहिलें म्हणजे मन चकित होतें. याचमुळें तर पुष्कळशा देशांत धर्म हा मोठ्यांत मोठा आणि अधिकांत अधिक प्राप्तीचा धंदा झालेला आहे. देवळांतले—मंदिरांतले—पुजारी पाहा ना, कसे गरीब बिचाऱ्या भक्तांना लुबाडीत असतात ते. गंगेच्या कांठावर जा, म्हणजे इतकी दक्षिणा दिलीस तर ठीक, नाहीं तर तुझें धर्मकृत्य करीत नाहीं असें म्हणून गरीब खेडवळ लोकांना नाडणारे ते पंड्ये तुझ्या दृष्टीस पडतील. तुमच्या घरांत कांहीं घडो, कुणी जन्माला येवो, कुणाचें लग्न असो, नाहीं तर कुणी मेलेलें असो, भटजी तेथें यायचाच आणि दक्षिणेसाठीं त्याचा हात पुढें असावयाचाच!

सर्व धर्मांमध्यें हाच प्रकार आहे; मग तो हिंदुधर्म असो, नाहीं तर ख्रिस्ती धर्म असो; इस्लाम धर्म असो, नाहीं तर झरतुष्ट्राचा धर्म असो. श्रद्धाळू लोकांच्या श्रद्धेतून पैसा उकळण्याचे प्रत्येक धर्माचे मार्ग मात्र निरनिराळे आहेत. हिंदुधर्मातील हा मार्ग अगदीं उघड उघड कोणालाही दिसून येईल असा आहे. इस्लामधर्मात असा हा

उपाध्यायांचा किंवा भटजींचा वर्गच नाहीं, अशी समजूत आहे; आणि त्यामुळेंच धार्मिक पिळणुकीपासून या धर्माचे लोक पूर्वीच्या काळीं कांहीं अंशीं वांचले. परंतु याही धर्मांत असे कांहीं विशिष्ट वर्ग निघालेच, कीं जे आपल्याला धर्माचें खास ज्ञान आहे, आपल्या ठिकाणीं खरी विद्वत्ता आहे असें म्हणूं लागले; उदाहरणार्थ, मौलवी-मुल्ला वगैरे लोक; आणि या लोकांनीं भोळ्या-भाबड्या मुसलमान लोकांच्या श्रद्धाळू मनाला भूल पाडून त्यांच्यापासून पैसा उकळलाच आहे. ज्या ठिकाणीं लांब दाढी, किंवा डोक्यावरील शेंडी (केसांचा फक्त झुपका), कपाळावर लांबलचक गंध, किंवा फाकिराचा पोषाख, किंवा संन्याशाचीं भगवीं अगर केशरी वस्त्रें, याच वस्तूंवरून धार्मिकपणाचें सारें माप केलें जाणार, तेथें सामान्य जनतेला भुलविणें यांत काय कठिण आहे!

अमेरिका तर अगदीं सर्वांत पुढारलेला देश आहे ना! तेथें जरी तूं जाशील तरी तेथेंही धर्म हा एक बडा थोरला धंदा असून लोकांपासून पैसे उकळून तो व्यवस्थित चाललेला आहे असें तुला आढळून येईल.

परंतु मध्ययुग आणि तें श्रद्धेचें युग यांपासून हा मी फार दूर वाहवत आलों. आपल्याला पुन्हां तिकडे परत जायला हवें. त्या काळीं या श्रद्धेला प्रत्यक्ष मूर्त स्वरूप येत गेलेलें, तिच्यांतून नवनव्या गोष्टी प्रत्यक्षांत निर्माण होत गेलेल्या आढळतात. अकरावें आणि बारावें शतक हा तिकडे फार मोठा बांधकामाचा काळ झाला आणि साऱ्या पाश्चिम यूरपभर कॅथेड्रल्स जागोजाग उभीं राहिलीं. यूरपमध्यें पूर्वी कधींच कोणी पाहिली नव्हती अशी एक नवीच शिल्पपद्धति अस्तित्वांत आली. तिच्यांत अशी एक मोठी कसबी युक्ति योजण्यात आली, कीं तिच्यामुळें अवजड अशा छपरांचें सर्व वजन आणि दडपण हें इमारतीच्या बाहेर उभारलेल्या मोठमोठ्या धिरास्यांवर, टेंकणावर टाकतां येऊं लागलें. त्यामुळें आंतमध्यें दिसायला खांब अगदींच नाजूक असावयाचे. वरवर पाहिलें तर त्याच्यावरच जणुं वरची सर्व प्रचंड वजनदार इमारत तोलली गेलेली दिसून सकृद्दर्शनीं मोठा अचंबा वाटावयाचा. या खांबांवर आरबी लोकांच्या शिल्पपद्धतीप्रमाणें त्या तिकोनी कमानी असावयाच्या. इमारतीच्या वर अगदीं वरच्या बाजूला बाहेर अंतराळांत उंच जाणारा एक नागमोडी सुळका असावयाचा. यूरपमध्यें निर्माण झालेल्या या नव्या शिल्पपद्धतीलाच गॉथिक पद्धति म्हणतात. ही पद्धति अतिशय सौंदर्यानें नटलेली असून उंच उंच चढत जाणारी श्रद्धा आणि मानवी आकांक्षा यांचा तिच्यांत आविष्कार साधलेला आहे. खरोखर, त्या श्रद्धायुगाचें मूर्तिमंत प्रतीक अशी ही शिल्पपद्धति आहे. अशा प्रकारच्या इमारती ज्यांची आपल्या कामावर भक्ति आहे असे शिल्पकार व कारागीर एखाद्या महान् कार्यासाठीं म्हणून सहकार्य बुद्धीनें एकत्र येऊन काम करतील, तरच फक्त बाधतां येणें शक्य आहे.

पाश्चिम यूरपमध्यें अशा रीतीनें ही गॉथिक शिल्पपद्धति उदयास आली, ही एक आश्चर्यकारक घटना आहे. तेथें त्या काळीं बंडाळी, अराजकता, अज्ञान, धर्मविषयक

अनुदारता यांची सगळीकडे नुसती राड माजून राहिली होती; तिच्यामधें ही मधुर सौंदर्यमय कला म्हणजे या सगळ्या पापांपासून आम्हांला वांचीव अशा अर्थाच्या परमेश्वरी प्रार्थनेची साक्षात् मूर्तीच वर उभी झाली होती, असें म्हटलें पाहिजे. फ्रान्स, उत्तर इटली, जर्मनी, आणि इंग्लंड या सर्व देशांमध्यें जवळजवळ एकाच वेळीं ही कॅथेड्रल्स बांधण्याची लाट उसळली. ही बांधण्याची सुरुवात केव्हां आणि कशी झाली हें कोणालाही सांगतां येण्यासारखें नाहीं; तीं बांधणारे शिल्पकार कोण होते त्यांचीं नावेंही कोणाला माहीत नाहींत. त्यांच्यामध्यें कोणा एखाद्या विशिष्ट शिल्पकार व्यक्तीचा नव्हे, तर सर्वसामान्य लोकांच्याच एकत्रित प्रयत्नांचा आणि इच्छाशक्तीचा आविष्कार झालेला आहे असें दिसतें. या शिल्पपद्धतींतील आणखी एक नवीन गोष्ट म्हणजे कॅथेड्रल्सच्या खिडक्यांच्या रंगीत कांचा. खिडक्यांच्या या कांचांवर सुंदर सुंदर रंगांचीं बहारदार चित्रें रंगविलेलीं असत आणि या रंगीत कांचामधून जो प्रकाश आंत येई त्यामुळें त्या इमारतींच्या गंभीर आणि जरब वाटाविणाऱ्या वातावरणांत भरच पडे.

कांहीं दिवसांपूर्वीं, अलीकडेच तुला लिहिलेल्या एका पत्रांत, मीं यूरप आणि आशिया यांची तुलना केली होती. या काळीं यूरप खंडापेक्षां आशिया खंड हें किती तरी अधिक सुधारलेलें आणि संस्कृतिसंपन्न होतें असें त्यांत आपण पाहिलें. तरीसुद्धां हिंदुस्थानांत तेव्हां कसलेंच नवनिर्मितीचें कार्य होत नव्हतें. आणि अशी नवनिर्मिति होणें हेंच तर जिवंतपणाचें लक्षण आहे असें मीं सांगितलेंच आहे. अर्धवट सुधारलेल्या यूरपमध्येंसुद्धां या गॉथिक शिल्पपद्धतीचा उदय होऊं शकला, याचा अर्थ यूरपमध्यें चांगलाच जोमदारपणा, जिवंतपणा असला पाहिजे. बंडाळी आणि मागासलेली सुधारणा यामुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणींना न जुमानतां त्यांच्यांतील हा जोम, आंतील जिवंतपणा, वर उफाळून आल्याशिवाय राहिला नाहीं; त्यानें आपल्य आविष्कारासाठीं मार्ग शोधून काढलाच काढला. गॉथिक पद्धतीच्या इमारती ह त्याच्या आविष्काराचाच एक प्रकारचा मार्ग आहे. पुढच्या काळांत त्याचा हा आविष्कार चित्रकला, मूर्तिकला, आणि साहसाच्या कार्यावरील प्रेम अशा मार्गांनीं झालेला आढळून येईल आपल्याला.

यांतील कांहीं गॉथिक कॅथेड्रल्स तूं पाहिलेलीं आहेस. आतां तुला त्यांची आठवण असेल का नाहीं कोण जाणे! जर्मनींतील कोलोन शहरांतील कॅथेड्रल पाहण्याला तूं गेलेली आहेस. इटलीमध्यें मिलन येथें एक फार सुंदर गॉथिक कॅथेड्रल आहे. तसेंच फ्रान्समध्यें चार्ट्रे येथेंही आहे. पण या सगळ्याच ठिकाणांची यादी मला येथें देतां येणार नाहीं. जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड आणि उत्तर इटली यांमध्येंही अशीं कॅथेड्रल्स ठिकठिकाणीं पसरलेलीं आहेत. रोममध्यें मात्र एकही नांव घेण्याजोगी गॉथिक पद्धतीवरची इमारत नाहीं ही मोठी विचित्र गोष्ट आहे.

या अकराव्या आणि बाराव्या शतकांतील बांधकामाच्या बहराच्या काळांत

गॉथिक पद्धतीच्यापेक्षां निराळ्या पद्धतीचींही धर्ममंदिरें पुष्कळ बांधण्यात आलीं; उदाहरणार्थ, पॅरिसचें महान् नॉट्रेडेम हें मंदिर आणि बहुधा व्हेनिस येथील सेंट मार्क्सचें मंदिर. हें सेंट मार्क्सचें मंदिर तूं पाहिलेलें आहेस. त्याचें बांधकाम बायझांटाइन पद्धतीचें असून त्यांत चित्रविचित्र रंगांचें नकास-काम भरपूर आहे.

परंतु हें श्रद्धेचें युग जसजसें ऱ्हास पावत गेलें, तसतसें मंदिरें आणि कॅथेड्रल्स बांधण्याचें कामही मंदावत गेलें. माणसांचे विचार मग अन्य दिशांना वळूं लागले. आपला व्यापारधंदा आणि आपलें नागरिक-जीवन यांकडे माणसाचें मन वेधलें. कॅथेड्रल्सच्या ऐवजीं आतां नगरभवनें बांधण्यास सुरुवात झाली. अशा रीतीनें पंधराव्या शतकाच्या सुरुवातीपासून आपल्याला पश्चिम आणि उत्तर यूरपभर सुंदर गॉथिक पद्धतीचे टाउन हॉल ( नगर-भवनें ) आणि गिल्ड हॉल ( संघस्थानें ) विखरूं लागलेले आढळतात. लंडनमधील पार्लमेंटचीं सभागृहें हीं गॉथिक पध्दतीचींच आहेत. पण तीं कधीं बांधलीं हें मात्र मला माहीत नाहीं. माझी आपली अजून समजूत आहे, कीं मूळांतील गॉथिक पद्धतीची पार्लमेंटची इमारत जळून गेली असून नंतर पुन्हां तेथेंच ही हल्लींची गॉथिक पध्दतीचीच इमारत बांधलेली असावी.

अकराव्या आणि बाराव्या शतकांत हीं जीं मोठमोठीं गॉथिक पध्दतीचीं कॅथेड्रल्स निर्माण झालीं, तीं सगळीं शहरांत किंवा मोठमोठ्या व्यापारी गांवांत बांधलेलीं होतीं. जुनीं शहरें झोंपेंतून जागीं होउन आतां हालचाल करूं लागलीं होतीं आणि नवीं नवीं मोठीं व्यापारी गांवें उदयास येऊं लागलीं होतीं. यूरप खंडभर सगळीच घडी पालटत होती आणि शहरी जीवन वाढत होतें. प्राचीन काळीं रोमन साम्राज्यात सुध्दां भूमध्य समुद्राच्या तीरावर सगळीकडे मोठमोठीं शहरें होतीं हें खरें. परंतु ग्रीक आणि ग्रीक-रोमन या सुधारणांचा नाश झाल्यानंतर या शहरांचाही ऱ्हास झाला. आरबी लोकांच्या अमलाखालील स्पेन देश सोडला, तर यानंतर साऱ्या यूरप खंडांत एका कॉन्स्टान्टिनोपलखेरीज नांव घेण्याजोगें एकही मोठें शहर राहिलेलें नव्हतें. या काळीं आशिया खंडांत, चीनमध्यें, हिंदुस्थानांत आणि आरबी लोकांच्या जगांत मोठमोठीं शहरें भरभराटीला आलेलीं होतीं. यूरपमध्यें मात्र असें एकही शहर नव्हतें. शहरें, संस्कृति आणि सुधारणा हीं नेहमीं एकमेकांच्या संगतींत असतात असें दिसतें; आणि रोमन समाजव्यवस्था उलथून पडल्यानंतर पुष्कळ काळपर्यंत यूरप खंडांत या तिहींपैकीं कशाचेंच अस्तित्व नव्हतें.

पण पुन्हां एकदां यूरपमध्यें शहरी जीवनाला आतां भर आला. विशेषतः इटलीमध्यें अशीं हीं शहरें वाढूं लागलीं. पवित्र रोमन साम्राज्याच्या बादशहाच्या कुशींत जणुं कात्यासारखीं हीं शहरें सलूं लागलीं; कारण आपले कांहीं कांहीं स्वातंत्र्याचे अधिकार हीं शहरें त्याला दडपूं देत नव्हतीं. इटलींतील आणि इतर ठिकाणचीं हीं शहरें म्हणजे व्यापारीवर्ग आणि धनिकवर्ग आणि मध्यमवर्ग यांच्या वाढीचीं आणि भरभराटीचीं लक्षणेंच होतीं.

एड्रियाटिक समुद्रावर आपलें प्रभुत्व गाजवीत असणारें व्हेनिस शहर हें या सुमारास एक स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य झालें होतें. आज त्या शहरांतील कालव्यामध्यें समुद्राचें पाणी आंतबाहेर खेळतांना आढळतें व त्यामुळें हें शहर मोठें सौंदर्यानें फुललेलें दिसतें; परंतु शहर बाधलें जाण्यापूर्वी त्या ठिकाणीं नुसती दलदलीची जमीन होती असें म्हणतात. हूणांचा नायक ॲटिला हा तरवार परजीत आणि आग पाखडीत जेव्हां उत्तरेकडून ॲक्विलियामध्यें उतरला तेव्हां तेथून कसेबसे पळून गेलेले कांहीं लोक व्हेनिसच्या त्या पूर्वीच्या दलदलीच्या स्थानीं गेले. तेथें त्यानीं हें व्हेनिस शहर उभारलें आणि पूर्वेकडील रोमन साम्राज्य आणि पश्चिमेकडील रोमन साम्राज्य या दोहोंच्या मध्यावर तें वसलेलें असल्यामुळें कांहीं ना कांहीं करून एक स्वतंत्र राज्य म्हणून त्याला राहतां आलें. हिंदुस्थानातून आणि पूर्वेकडील देशांतून व्हेनिसशीं व्यापार चाले त्यामुळें शहरात संपत्ति जमा झाली; व्हेनिसनें स्वतःचें आरमार उभारलें; आणि एक दर्यावर्दी सत्ता म्हणून तें जगांत नांदू लागलें. येथलि राज्य हें श्रीमंत लोकांचें प्रजासत्ताक राज्य असून येथील अध्यक्षाला डोज किंवा डोजे हें नांव होतें. नेपोलियननें १७९७ सालीं या शहरात विजेता म्हणून प्रवेश केला, तोंपर्यंत हें प्रजासत्ताक राज्य अस्तित्वांत होतें. त्या वेळचा डोजे हा एक वृद्ध गृहस्थ होता. तो त्या नेपोलियनच्या प्रवेशाच्या दिवशीं समुद्रांत बुडून मेला असें म्हणतात. व्हेनिसमधला तो शेवटलाच डोजे.

इटालीच्या दुसऱ्या बाजूला व्हेनिसशीं स्पर्धा करणारें, त्याच्यासारखेंच दर्यावर्दी लोकांचें मोठें व्यापाराचें स्थान असें जिनोआ हें शहर होतें. या दोहोंच्यामध्यें बोलोना हें त्या नांवाच्या प्रसिद्ध विद्यापीठाचें शहर आणि फ्लॉरेन्स हीं शहरें होतीं. मेडिसी या सुविख्यात घराण्याच्या अमलांत लौकरच फ्लॉरेन्स शहर पुढें फारच वैभवाला चढावयाचें होतें आणि तेथें किती तरी महान् कलावंत निर्माण व्हावयाचे होते. उत्तर इटलींतच मिलन हेंही शहर त्या वेळीं नुकतेंच एक उद्योगधंद्याचें स्थान म्हणून वाढूं लागलें होतें आणि दक्षिणेस नेपल्स हें शहर उदयास येत होतें.

फ्रान्समध्यें ह्यू कॅपेटनें पॅरिस येथें राजधानी स्थापन केल्यानंतर तें शहरही फ्रान्सचें सामर्थ्य जसजसें वाढत गेलें तसतसें वाढत गेलें. पॅरिस शहर हें तेव्हांपासून फ्रान्सचें काळीज आणि पाठीचा कणा होऊन राहिलेलें आहे. इतर देशांमध्यें पुष्कळ राजधान्या झाल्या असतील; परंतु गेलीं १००० वर्षें फ्रान्समध्यें पॅरिसनें जसें सर्वतोपरि वर्चस्व गाजविलें आहे, तसें इतर कोठल्याच राजधानीनें गाजविलेलें आढळत नाहीं. फ्रान्समध्यें याशिवाय लिॲान्स, मार्सेल्स (हें तर प्राचीन काळापासूनचें बंदर आहे) ऑर्लीन्स, बोर्डो आणि बुलोन हींही शहरें महत्त्वाला चढलीं.

जर्मनीमध्येंही इटलीप्रमाणेंच, परंतु तेराव्या आणि चौदाव्या शतकांमध्यें विशेष प्रमाणांत, स्वतंत्र शहरांची खास वाढ झालेली आढळून येते. या शहरांचीही लोकसंख्या जशी वाढली आणि त्यांची सत्ता आणि संपत्ति जसजशी वाढली, तसतसें

त्यांचें धैर्य वाढून त्यांनीं मोठमोठ्या सरदारांशीं झगडण्यास सुरुवात केली. बादशहाच्या मनातून आपल्या सरदाराना वांकवावयाचें होतें. त्यामुळें तोही या शहरांना मधून मधून पाठिंबा देई. आपलें संरक्षण करण्यासाठीं म्हणून तेथील लोकांनीं मोठमोठे व्यापारी संघ आणि संघटना प्रस्थापित केल्या. कधीं कधीं या व्यापारी संस्था सरदारांशीं किंवा आपल्यासारख्याच प्रतिस्पर्धी व्यापारी संघांशीं लढायाही करीत. जर्मनींत वाढीला लागलेल्या या शहरांमधीलच हॅम्बर्ग, ब्रेमेन, कोलोन, फ्रँकफोर्ट, म्युनिक, डॅन्झीग, नुरेंबर्ग, आणि ब्रेस्लॉ हीं शहरें होत.

नेदरलंड्समध्यें (याच प्रदेशाला हल्लीं हॉलंड आणि बेल्जम असें म्हणतात) अँटवर्प, ब्रूजेस, घेंट हीं शहरें वाढलीं. हींही व्यापारींच शहरें. त्यांचा व्यापारधंदा एकसारखा वाढतच होता. इंग्लंडमध्यें अर्थात् या वेळींही लंडन हें शहर झालें होतें; परंतु यूरपांतील कोणत्याही मोठ्या शहराशीं आकार, व्यापार किंवा संपत्ति या बाबतींत त्या काळीं तें बरोबरी करूं शकत नव्हतें. ऑक्स्फर्ड आणि केंब्रिज हीं दोन शहरें त्या वेळीं विद्याभ्यासाचीं केंद्रें म्हणून महत्त्वाला चढत होतीं. यूरप खंडांत पूर्वेकडे व्हिएन्ना हें फार प्राचीन काळापासूनचें मोठें शहर होतें. आणि रशियामध्यें मॉस्को, कीव्ह आणि नोव्होगोरोड हीं शहरें होतीं.

या नव्या शहरात किंवा त्यांच्यापैकीं बहुतेकांत आणि जुन्या साम्राज्यशाहीच्या वैभवाचीं शहरें यांच्यामध्यें मोठा फरक आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. यूरपांतील हीं शहरें वाढलीं आणि महत्त्वाला चढलीं. याला कारण कोणी राजा किंवा बादशहा नव्हता; तर त्या शहराच्या ताब्यांत जो व्यापारधंदा होता त्यामुळें त्यांना महत्त्व आलेलें होतें. अर्थातच त्यांची शक्ति त्यांच्यांतील व्यापारी वर्गामध्यें होती, सरदार-दरकदरामध्यें नव्हे. हीं शहरें व्यापारी लोकांचीं शहरें होतीं. तेव्हां या शहरांचा उदय होणें याचाच अर्थ धनिकवर्गाचा उदय होणें हा आहे. पुढें आपणांस आढळून येणार आहे, कीं या धनिकवर्गाची सत्ता पुढें पुढें इतकी वाढत गेली, कीं अखेरीस त्यांनीं राजांशीं व सरदारांशीं सामना देऊन विजय मिळविला व त्यांच्या हातची सत्ता हिसकावून आपल्या हातीं घेतली. अर्थात् आतां ज्या काळाचा आपण विचार करतों आहों, त्या काळानंतर पुष्कळच वर्षांनीं घडून आलेली ही हकीकत आहे.

नुकतेंच मीं म्हटलें, कीं शहरें आणि सुधारणा हीं बहुतेक एकमेकांच्या संगतीनेंच अस्तित्वांत राहतात. शहरांच्या वाढीबरोबरच ज्ञानाची वाढ होते आणि स्वातंत्र्याची प्रवृत्तीही वाढते. खेडेगांवी वातावरणांत राहणारे लोक असंघटित आणि दूर दूर राहत असतात आणि पुष्कळसे अंधश्रद्धेनें भारलेले असतात. त्यांचें सारें जीवन पंचमहाभूतांवर, सृष्टींतील शक्तींच्या अनुकूलतेवर अवलंबून असतें. त्याना अतिशय श्रम करावे लागतात; विश्रांतीची फारच थोडी जोड त्यांना मिळते आणि आपापल्या मालक लोकांचा हुकूम न पाळण्याची त्यांची छाती असत नाहीं. शहरामध्यें पुष्कळ मोठी संख्या एकत्रित राहूं लागते; अधिक सुधारलेलें जीवन घालविण्याची त्यांना संधि मिळते;

विद्याभ्यास करण्याची, चर्चा करण्याची, टीका करण्याची आणि स्वतंत्र विचार करण्याचीही त्यांना संधि मिळते.

त्यामुळें सरंजामदार, सरदार याच्या हातीं असलेली राजकीय सत्ता आणि धर्मपीठांच्या हातीं असलेली धार्मिक किंवा आध्यात्मिक सत्ता या दोहोंच्याही कचाट्यांतून स्वतंत्र राहण्याची प्रवृत्ति शहरांत बळावत जाते. श्रद्धेचें युग ऱ्हास पावूं लागतें आणि हें कां, तें कसें, असे प्रश्नांचें युग सुरू होतें. पोपचा किंवा धर्मपीठाचा अधिकार नेहमींच आंधळेपणानें आतां मानला जात नाहीं. दुसरा फ्रेडरिक हा पोपशीं कसा वागला हें आपण पाहिलेंच आहे. हीच बेपर्वाईची प्रवृत्ति पुढें पुढें वाढत गेलेली आपल्याला आढळेल.

बाराव्या शतकापासून पुढें ज्ञानार्जनाचेंही पुनरुज्जीवन झालें. यूरपांतील सर्व विद्वानांची लॅटिन हीच एक सामान्य भाषा होती. आणि ज्ञान मिळवूं इच्छिणारे लोक इकडून तिकडे असे पुष्कळ विश्वविद्यालयांतून प्रवास करीत असत. इटलीचा महान् श्रेष्ठ कवि डांटे अलिघेरी याचा जन्म याच काळांत १२६५ मध्यें झाला. इटलीचा दुसरा एक श्रेष्ठ कवि पेट्रार्क हा १३०४ मध्यें जन्मला. त्यानंतर कांहीं काळानें श्रेष्ठ इंग्लिश कवींपैकीं अगदीं पहिला कवि चॉसर हा उदयाला आला.

परंतु विद्येच्या पुनरुज्जीवनापेक्षांही किती तरी जास्त लक्षांत ठेवण्यासारखी या काळची गोष्ट म्हणजे, पुढें यूरप खंडामध्यें अतिशयच प्रचंड वाढलेली जी शास्त्रीय संशोधनाची प्रवृत्ति तिचींही अगदीं सूक्ष्म बीजें याच काळांत उद्भूत झालीं ही होय. मीं सांगितलेलें आठवतच असेल तुला, कीं आरबी लोकांच्या ठिकाणीं ही वृत्ति असून तिच्या अनुसारानेंच त्यांचा व्यवहार कांहीं प्रमाणांत होत असे. मन कोणत्याही पूर्वग्रहाच्या अधीन जाऊं न देतां प्रयोग करण्याची आणि नवीन सत्यें शोधून काढण्याची प्रवृत्ति यूरप खंडात मध्ययुगीन काळांत उदयास येऊन अस्तित्वांत राहणें हें फार बिकट काम होतें. धर्मपीठाला तर अशा प्रवृत्तीला क्षणभर थारा मिळूं देण्याची इच्छा नव्हती. परंतु धर्मपीठाच्या विरोधाला न जुमानतांच ही प्रवृत्ति यूरपांत हळूहळू रुजून डोकें वर काढूं लागली. यूरपमध्यें अशी प्रवृत्ति ज्यांच्या ठिकाणीं अगदीं प्रथम उद्भूत झालेली आढळते, त्यामध्यें रोजर बेकन हा एक इंग्रज मनुष्य होता. तेराव्या शतकांत तो ऑक्स्फर्ड येथें राहत असे.

## ६५

# अफगाण लोक हिंदुस्थानवर स्वारी करतात

२३ जून, १९३२

काल तुला पत्र लिहिण्यामध्यें अडथळा उत्पन्न झाला. पत्र लिहावयाला मी बसलों होतों; येथील हा तुरुंग आणि सभोंवतींचें वातावरण पार विसरून मी तात्काळ विचाराच्या वेगाबरोबर मध्ययुगीन युगांत जाऊन दाखल झालों होतों. परंतु गेलों त्यापेक्षांही अधिक वेगानें मी आजच्या जगांत खेंचला गेलों, आणि आपण तुरुंगांत आहों या गोष्टीचें मला थोडेंसें बोंचक रीतीनें स्मरण झालें. तुझी आई आणि दिद्दाजी (आजी) यांना माझी भेट एक महिनाभर घेतां येणार नाहीं, असा वरून हुकूम आला आहे असें मला सांगण्यांत आलें. कां? कोणीं कांहीं सांगितलें नाहीं. कैद्याला कांहीं सांगण्याची जरुरी काय? येत्या भेटीच्या दिवसाची वाट पाहत आज दहा दिवस त्या दोघी डेहराडूनला येऊन राहिल्या आहेत. आतां इतके दिवस थांबून सगळें व्यर्थ होऊन त्यांना परत जावें लागणार. इतक्या सौजन्यानें आम्हांला वागविलें जात असतें! ठीक, ठीक; कांहीं फिकीर नाहीं. आमच्या अंगीकारिलेल्या कामामधलाच हाही एक सोसावा लागणारा प्रकार आहे; शिवाय, तुरुंग म्हटला म्हणजे कोठेंही गेलें आणि कोणीही मनुष्य असला तरी तो तुरुंगच, हें विसरतां उपयोगाचें नाहीं.

भूतकाळांतून वर्तमानकाळांत इतक्या आडदांडपणानें परत आणलें गेल्यानंतर पुन्हां लगेच वर्तमानकाळ सोडून भूतकाळामध्यें जाणें मला शक्य झालें नाहीं. पण कालची एक रात्रीची झोंप झाल्यावर आज आतां मला जरा बरें वाटतें आहे. म्हणून आज पुन्हा पत्र लिहावयाला बसलों आहें.

आतां आपण हिंदुस्थानकडे परत येऊं या. फार वेळ आपण दुसरीकडे फिरत राहिलों. तिकडे यूरपची मध्ययुगीन अज्ञानांधकारांतून व सुधारणेच्या अभावांतून बाहेर कसें पडावें यासाठीं ज्या काळीं धडपड चालली होती, ज्या काळीं तेथें सर्व-सामान्य जनता सरंजामशाहीच्या अवजड ओझ्याखालीं चुरडून गेल्यामुळें जिकडे तिकडे बंडाळी आणि अव्यवस्थित राज्यकारभार माजून राहिला होता, पोप आणि बादशहा यांच्यामध्यें झगडा चालू होता आणि यूरपमधील निरनिराळ्या देशांच्या मर्यादा व स्वरूपें निश्चित होत होतीं, आणि ख्रिस्ती धर्मयुद्धांच्या द्वारा ख्रिस्ती धर्म आणि इस्लामधर्म यांच्यामध्यें वर्चस्वाबद्दल झगडा चालू होता, अशा त्या काळीं आपल्या इकडे काय काय घडामोडी चालू होत्या?

मध्ययुगाच्या पहिल्या काळांतील हिंदुस्थानच्या परिस्थितीचें ओझरतें दर्शन एकदां आपण घेतलें आहे. गझनीचा सुलतान महमूद हा वायव्य दिशेकडून उत्तर हिंदुस्थानच्या सुसंपन्न भूमीवर स्वाऱ्या करून येत होता आणि लूटमार व नासधूस

करीत होता हें आपण पाहिलें आहे. महमुदाच्या या स्वाऱ्या पुष्कळच नुकसानकारक जरी असल्या, तरी त्यापासून हिंदुस्थानांत विशेष महत्त्वाचा किंवा कायम टिकणारा असा कांहीं बदल घडून आला नाहीं. या स्वाऱ्यांमुळें देशाला, विशेषतः उत्तरेकडील भागाला चागलाच मोठा धक्का बसला आणि कितीएक सुंदर धार्मिक स्थानें व साधु-संतांचीं समाधिस्थानें महमुदानें नष्ट करून टाकलीं. परंतु गझनीच्या साम्राज्यांत फक्त सिंध आणि पंजाबचा कांहीं थोडासा भाग एवढाच प्रदेश काय तो गेला. या धक्क्यां-तून उत्तर हिंदुस्थान लौकरच चांगला सांवरून स्थिरस्थावर झाला; दक्षिण हिंदुस्थानला तर या धक्क्याचा स्पर्शसुद्धा झाला नव्हता; तसाच बंगाललाही. महमुदाच्या नंतर सुमारें १५० वर्षे हिंदुस्थानांत मुसलमानाचा राज्यविस्तारही झाला नाहीं किंवा धर्मविस्तारही झाला नाहीं.

त्यानंतर मग बाराव्या शतकाच्या अखेरीला (इ. स. ११८६ च्या सुमारास) पुन्हां वायव्येकडून स्वारीची लाट आली. अफगणिस्तानात एक अफगाण सरदार बलिष्ठ होऊन त्यानें गझनी जिंकली व गझनीच्या साम्राज्याचा नाश केला. या सरदाराचें नांव शहाबुद्दीन घुरी. (घुरी हें अफगाणिस्तानातील एक लहानसें शहर आहे.) हा शहाबुद्दिन लाहोर येथे येऊन त्यानें तें शहर काबीज केलें आणि तेथून पुढें तो दिल्लीवर चालून आला. त्या वेळीं दिल्लीचा राजा पृथ्वीराज चव्हाण* होता. त्याच्या नेतृत्वाखालीं उत्तर हिंदुस्थानांतील इतरही पुष्कळ राजेरजवाडे जमा झाले. हे सर्व जण मिळून शहाबुद्दिनशीं लढले आणि त्याचा त्यांनीं संपूर्ण पराभव केला. परंतु हा जय फार काळ टिकला नाहीं. शहाबुद्दीन पुन्हां पुढच्या वर्षी आणखी मोठें सैन्य घेऊन आला आणि या वेळीं पृथ्वीराजाचा पराभव करून त्यानें त्याचा वध केला.

हिंदुस्थानांत पृथ्वीराज आजही एक लोकप्रिय विभूति गणली जात असून त्याच्याबद्दल समाजांत अनेक प्रकारचीं गाणीं आणि गोष्टी प्रचलित आहेत. कनोजचा राजा जयचंद याची कन्या त्यानें पळवून नेली याबद्दलची त्याची गोष्ट त्यामध्यें सर्वांत अधिक प्रसिद्ध आहे. पण ही राजकन्या पळविल्याचें प्रायश्चित्त पृथ्वीराजाला फारच जबर-दस्त मिळालें. त्याच्या पायीं त्याला आपल्या कित्येक अत्यंत शूर अनुयायांचे प्राण गमवावे लागले आणि एका प्रबळ राजाचें शत्रुत्व त्यानें संपादन केलें. आपसांतील विरोध आणि आपसांतील यादवी यांचीं बीजें त्यामुळें रुजलीं आणि त्यामुळेंच परकी स्वारी करणाराचें येथें चांगलेंच फावलें.

अशा रीतीनें इ. स. ११९२ मध्यें शहाबुद्दीनचा हिंदुस्थानांतील पहिला मोठा विजय घडून आला; त्याच विजयांतून पुढें हिंदुस्थानात मुसलमानांच्या सत्तेची स्थापना झाली. स्वारी करणारे लोक हळूहळू पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे पसरूं लागले.

(* चव्हाण हा मराठींतील उच्चार आहे. उत्तरेकडे याचा उच्चार चौहान असा असून या घराण्याचा मूळ संस्थापक राजा चाहमान याच्या नांवावरून ग्रंथांतरीं घराण्याचें नांव चाहमान असेंही सांपडतें.)

आणखी सुमारें दीडशें वर्षें गेल्यावर (इ. स. १३४० च्या सुमारास) मुसलमानांची सत्ता दक्षिणेंत बहुतेक सर्व प्रदेशावर पसरली होती. त्यानंतर मात्र त्यांची दक्षिणेकडील सत्ता संपुष्टांत येत गेली. कांहीं मुसलमानी आणि कांहीं हिंदू अशीं नवीं स्वतंत्र राज्यें तिकडे निर्माण झालीं; त्यांमध्यें विजयनगरचें राज्य हें विशेष उल्लेख करण्यासारखें आहे. यापुढें सुमारें दोनशें वर्षेंपर्यंत मुसलमानाची सत्ता थोडीशी संकोच पावली आणि मग पुढें अकबराची कारकीर्द आली तेव्हां मात्र पुन्हां सोळाव्या शतकाच्या मध्याला मुसलमानांची सत्ता हिंदुस्थानात या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्वत्र पसरली.

मुसलमानांच्या हिंदुस्थानांत येण्यापासून पुष्कळ निरनिराळे परिणाम झाले. एक लक्षांत ठेव, कीं हे स्वारी करणारे लोक अफगाण होते; ते काहीं आरबी लोक, इराणी लोक, किंवा पश्चिम आशियांतील सुसंस्कृत आणि उच्च सुधारणायुक्त असे मुसलमान नव्हते. सुधारणेच्या दृष्टीनें पाहतां हे अफगाण लोक हिंदी लोकांपेक्षां मागासलेले होते. पण त्याच्यांत उत्साहाचें वारें भरलेलें होतें; आणि तत्कालीन हिंदुस्थानांतल्यापेक्षां त्यांच्यामध्यें जिवंतपणा आधिक होता. हिंदुस्थानचें गाडें जुन्या चाकोरींत फारच रुतून गेल्यासारखें झालें होतें. हिंदुस्थानांत प्रगति होणें अशक्य झालें होतें, कांहींही बदल होणें अशक्य झालें होतें. जुन्या परंपरेला व व्यवहाराला पक्कें चिकटून राहावयाचें, त्यामध्यें कसलीही सुधारणा करण्याचा प्रयत्न करावयाचा नाहीं, अशी प्रवृत्ति येथें दृढ झालेली होती. लढाईच्या तंत्रामध्यें सुद्धां हिंदुस्थान देश मागासलेला होता. अफगाण लोक येथल्या लोकांपेक्षां किती तरी पटीनें अधिक सुसंघटित होते. त्यामुळें हिंदी लोकांमध्यें शौर्य आणि त्याग असूनही प्राचीन हिंदुस्थानला या नव्या मुसलमान स्वारी करणारांपुढें हार खावी लागली.

पहिली गोष्ट म्हणजे हे नवे आलेले मुसलमान लोक अतिशयच क्रूर, कजाग आणि उग्र होते. ते अशा रुक्ष देशांतून आले होते, कीं त्या ठिकाणीं मृदुतेला फारशी किंमतच नव्हती. त्यांतच भरीला आणखी हें, कीं हे लोक त्यांनीं नवीनच जिंकलेल्या देशांत राहत होते; त्यांच्या सभोंवतीं सगळीकडे शत्रूंचें कडें असून हे शत्रू केव्हां बंड करून उठतील याचा नेम नव्हता. ही बंडाची भीति त्यांच्यापुढें एकसारखी खडी असली पाहिजे; आणि भीतीमुळें मनुष्याच्या ठिकाणीं पुष्कळदां क्रौर्य आणि भयानकपणा उत्पन्न होत असतो. त्यामुळें लोकांना भयभीत करण्यासाठीं हिंदुस्थानांत या वेळीं अनेक कत्तली करण्यांत आल्या. यामध्यें मुसलमानांनीं हिंदूंना ते हिंदू आहेत एवढ्यासाठीं मारण्याचा प्रश्न नव्हता; तर परकी विजेत्यांनीं जिंकलेल्या लोकांचें तेज, प्रतिकारशक्ति मोडून काढण्याचा हा प्रश्न होता. या क्रूरपणाच्या कृत्यांचें खापर नेहमीं धर्मावर फोडण्यांत येत असतें; पण तसें करणें बरोबर नाहीं. कधीं कधीं धर्माचा उपयोग एक सबब म्हणून केलाही गेला असेल. परंतु खरें मुळातील कारण राजकीय किंवा सामाजिक स्वरूपाचेंच नेहमीं असलें पाहिजे. मध्य आशियांतील जे हे लोक हिंदुस्थानात स्वारी करून येऊन स्थिर झाले ते आपल्या मायदेशामध्येंही, आणि

त्यांनीं मुसलमानधर्माचा स्वीकार करण्याच्या आधीपासूनच किती तरी काळापासून असेच राक्षसी आणि क्रूरपणानें वागणारे लोक होते. नवीन देश जिंकून घेतल्यानंतर तो आपल्या कबजांत ठेवण्याचा एकच मार्ग त्यांना ठाऊक होता; तो म्हणजे लोकांना भयभीत करून टाकण्याचा.

परंतु हळूहळू हिंदुस्थाननें या भयानक लढवय्यांनाही मऊ करून सुधारणेच्या मार्गावर आणलें. आपण कोणी परकी स्वारी करून आलेले लोक नसून हिंदी लोकच आहों असें त्यांना वाटूं लागलें. या देशांतील स्त्रियांशीं त्यांचीं लग्नें होऊं लागलीं, आणि स्वारी करून आलेले आणि ज्यांच्यावर स्वारी झाली ते, यांच्यामधील अंतर हळूहळू कमी होत गेलें.

गझनीच्या महमुदाइतका प्रचंड नासधूस आणि लूटमार करणारा दुसरा कोणी उत्तर हिंदुस्थानच्या तरी माहितींत नाहीं ना? मूर्तिपूजकांच्या विरुद्ध इस्लाम-धर्मीयाचा तो तर एक मोठाच पुरस्कर्ता वीर समजला जात असतो. पण अशा या महमूद गझनीच्या पदरीं तिलक नांवाच्या हिंदु सेनापतीच्या हाताखालीं एक हिंदू सैनिकांचें पथक होतें हें ऐकून तुला केवढें मोठें नवल वाटेल. तिलक आणि त्याचें सैन्य यांना त्यानें आपल्या बरोबर गझनीस नेलें आणि त्यांचा त्यानें तेथील बंडखोर मुसलमानांचें बंड दडपून टाकण्यासाठीं उपयोग केला. यावरून तुझें तुलाच दिसेल, कीं महमुदाचा एकमेव उद्देश राज्य जिंकणें हा होता. तो हिंदुस्थानांत आला तेव्हां येथील मूर्तिपूजकांना आपल्या मुसलमान सैनिकांच्या हातून मारण्याची त्याची तयारी होती. आणि आपल्या हिंदू सैनिकांच्या हातून आपल्या मुसलमान प्रजेलाही मारण्याची त्याची तितकीच तयारी होती.

इस्लामनें हिंदुस्थानला चांगलाच हादरा दिला. सर्वस्वीं प्रगतिशून्य होऊं लागलेल्या येथील समाजांत त्यामुळें एक प्रकारचा नवीन जोम आणि प्रगतीची प्रवृत्ति निर्माण झाली. हिंदी कलेंत एक प्रकारचा रोगटपणा येऊन तिला उतरती कळा लागली होती; त्याच त्याच गोष्टींच्या पुनरावृत्तीमुळें आणि उगीच बारीक तपशिलावरच सगळा भर दिला जाऊं लागल्यामुळें हिंदी कलेमध्यें एक प्रकारचा निस्तेजपणा येऊं लागला होता. इस्लामच्या आगमनामुळें उत्तर हिंदुस्थानांत हें सर्व बदलून गेलें आणि नवीन प्रकारची, जोमदार, सामर्थ्य व उत्साह यांनीं नटलेली अशी कला येथें उदय पावली; हिला हिंदु-मुसलमानी कला असें नांव देतां येईल. प्राचीन हिंदुस्थानांतील पद्धतींत वाढलेले मोठमोठे शिल्पकार व बांधकाम करणारे जे कारागीर लोक होते त्यांना मुसलमानांनीं आपल्याबरोबर आणलेल्या नव्या कल्पनांपासून नवीन स्फूर्ति मिळूं लागली. मुसलमानांच्या धर्मातील आणि जीवनविषयक भूमिकेंतील जो अत्यंत साधेपणा, त्याचा तत्कालीन हिंदी शिल्पपद्धतीवर जरूर परिणाम झाला आणि तिच्यामध्यें रचनेचा साधेपणा व भव्यता यांची जोड निर्माण झाली.

मुसलमानांच्या स्वारीचा अगदीं पहिला परिणाम म्हणजे उत्तरेंतून पुष्कळसे लोक दक्षिणेंत निघून जाऊं लागले हा. महमुदाच्या स्वाऱ्या आणि कत्तली यांच्यानंतर उत्तर हिंदुस्थानातील लोकांच्या मनात इस्लामधर्माशीं रानटी क्रौर्य आणि नासधूस याची कायमची सांगड बसून गेली होती. त्यामुळें पुन्हां जेव्हां नवीन स्वारी आली आणि तिला थांबविणें अशक्य होऊं लागलें त्या वेळीं कसबी कारागीर आणि विद्वान् यांचे मोठमोठे समूह दक्षिण हिंदुस्थानांत निघून गेले. यामुळें दक्षिणेकडे आर्य-संस्कृतीला फार मोठा बहर आला. तिच्यामध्यें मोठेंच चैतन्य निर्माण झालें.

दक्षिण हिंदुस्थानाबद्दल यापूर्वीं मीं तुला बरेंच सांगितलें आहे. दक्षिण हिंदुस्थानांत पश्चिमेला आणि मध्यभागात म्हणजे महाराष्ट्राच्या प्रदेशांत सहाव्या शतकाच्या मध्यापासून पुढें दोनशें वर्षेंपर्यंत चालुक्यांची सत्ता प्रभावी होती. त्या वेळचा या घराण्यांतील राजा दुसरा पुलकेशी याची ह्युएन चँगनें भेट घेतली होती. चालुक्यांनंतर राष्ट्रकूट आले. त्यांनीं चालुक्यांचा पराभव केला आणि दक्षिणेंत त्यानंतर पुढची दोनशें वर्षें, आठव्या शतकापासून जवळजवळ दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत, त्यांनीं प्रभुत्व गाजविलें. या राष्ट्रकूट राजाचे सिंधमधील आरबी राज्यकर्त्यांशीं अत्यंत स्नेहाचे संबंध होते; आणि पुष्कळ आरबी व्यापारी व प्रवासी त्यांचे तिकडे येत असत. अशा एका व्यापाऱ्यानें आपल्या इकडील प्रवासाचा वृत्तांत लिहून ठेवलेला आहे. तो म्हणतो, त्या काळचा ( नववें शतक ) राष्ट्रकूट घराण्यांतील राजा हा तत्कालीन जगांतील चार सर्वश्रेष्ठ राजांपैकीं एक होता. त्याच्या मताप्रमाणें हे बाकीचे तीन राजे म्हणजे बगदादचा खलिफा, चीनचा बादशहा आणि रूमचा ( म्हणजे कॉन्स्टान्टिनोपलचा ) बादशहा हे होते. हें मत मोठें लक्षांत घेण्यासारखें आहे. कारण त्यावरून त्या काळीं आशिया खंडांत लोकांची कोणती समजूत प्रचलित होती याची आपल्याला कल्पना मिळते. या वेळीं बगदादच्या खलिफाची सत्ता आणि वैभव हीं अगदीं शिखराला पोंचलेलीं होतीं. अशा त्या खलिफाच्या साम्राज्याशीं राष्ट्रकूटांच्या राज्याची हा आरबी प्रवासी बरोबरी मानतो याचा अर्थ महाराष्ट्राचें हें राज्य फारच सामर्थ्यवान् आणि जोमदार असलें पाहिजे.

या राष्ट्रकूटांची जागा दहाव्या शतकांत (इ. स. ९७३ मध्यें) पुन्हां एकदां चालुक्यांनीं घेतली आणि त्यानंतर पुन्हां आणखी दोनशें वर्षांहून अधिक काळपर्यंत (इ. स. ११९० पर्यंत ) त्यांच्या हातीं सत्ता राहिली. या चालुक्यांपैकीं एका राजाबद्दल एक मोठें दीर्घ काव्य लिहिलेलें आहे. त्यांत त्याचा स्वीकार त्याच्या पत्नीनें जाहीर स्वयंवराच्या प्रसंगीं केला असें लिहिलेलें आहे. आर्यांची ही जुनी परंपरा इतक्या दीर्घकाळपर्यंत अशा रीतीनें चालू होती हें पाहून कौतुक वाटतें.

या प्रदेशाच्या पलीकडे दक्षिणेला आणि पश्चिमेला आपल्या देशांतील तामीळ देश होता. या ठिकाणीं तिसऱ्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत सुमारें सहाशें वर्षें पल्लव राजांचें राज्य होतें; आणि सुमारें दोनशें वर्षेंपर्यंत (सहाव्या शतकाच्या मध्यापासून पुढें ) साऱ्या दक्षिणेंत यांचेंच अधिराज्य होतें. मॅलेशियामध्यें व बाकीच्या

पूर्वेकडील इतर बेटांमध्यें वसाहती वसविण्यासाठीं या पल्लवांनींच स्वाऱ्या केल्या हें तुझ्या लक्षांत असेल. पल्लव राज्याची राजधानी कांची म्हणजेच हल्लींचें कांजीवरम् शहर येथें होती. त्या वेळीं तर हें शहर फार सुंदर होतेंच, पण आतांसुद्धां उत्कृष्ट विचारपूर्वक आंखलेल्या नगररचनेच्या दृष्टीनें तें शहर मोठें पाहण्यासारखें आहे.

आक्रमणशील चोलांनीं दहाव्या शतकाच्या सुरवातीला या पल्लवाची जागा घेतली. राजराज आणि राजेंद्र यांच्या चोल साम्राज्याबद्दलही मीं तुला सांगितलेलें आहे. यांनीं मोठमोठीं आरमारें बांधून सिलोन, ब्रह्मदेश, बंगाल हे प्रदेश जिंकण्याचा उपक्रम केला. यांच्याही राज्यांत लोकनियुक्त ग्रामपंचायतींची पद्धति अस्तित्वात होती, ही माहिती मात्र विशेषच लक्षांत घेण्यासारखी आहे. या व्यवस्थेंत खालपासून वरपर्यंत चढत चढत जाणाऱ्या संस्थांचें सुसूत्र जाळें होतें. अगदीं तळाशीं ग्रामसंघ असत; ते आपापल्या विभागांतील हरतऱ्हेचीं कामें करण्यासाठीं पोटमंडळें निवडीत असत. तसेंच हे ग्रामसंघ जिल्हासंघही निवडीत असत. अशा अनेक जिल्ह्याचा मिळून एक प्रांत होई. ही ग्रामपंचायतींची व्यवस्था म्हणजे प्राचीन आर्य समाजव्यवस्थेचा जणुं कणाच होती. त्यामुळें माझ्या या पत्रांमधून तिच्या वर्णनावर मी पुनः पुनः फार भर देत आलों आहें.

अफगाण लोकांची उत्तर हिंदुस्थानांत स्वारी झाली त्या काळीं दक्षिण हिंदुस्थानांत चोलांचें प्रभुत्व होतें. परंतु त्यानंतर लौकरच त्यांना उतरती कळा लागली आणि त्यांचेंच एक मांडलिक असें लहान राज्य त्यांच्यापासून स्वतंत्र होऊन त्याची सत्ता वाढूं लागली. हें म्हणजे पांड्यांचें राज्य. मदुरा ही त्यांची राजधानी असून कायळ हें त्यांच्या राज्याचें समुद्रकांठचें बंदर होतें. व्हेनिस येथील प्रसिद्ध प्रवासी मार्को पोलो याच्याबद्दल पुढें मी तुला थोडेंबहुत सांगणार आहें. हा मार्को पोलो इ. स. १२८८ व १२९३ सालीं असा दोनदा कायळ बंदरांत येऊन गेला होता. त्यानें त्या शहराचें वर्णन एक भव्य व महान् शहर असें केलें असून "तेथें अरबस्तान व चीन येथपासून भरलेलीं जहाजें येत असत व हें बंदर व्यापारधंद्यानें नुसतें गजबजून गेलेलें असे" असें म्हटलें आहे. मार्को स्वतःही तेथें चीनमधून जहाजामधूनच आला होता.

मार्कोनें आणखी असेंही लिहिलें आहे : "कोळ्याच्या जाळ्यासारखें दिसणारें" अत्यंत तलम कापड (मसलीन) हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावर तयार होत असे. तसेंच रुद्रमणी देवी नांवाची एक स्त्रीही मद्रासच्या उत्तरेकडील पूर्व किनाऱ्यालगतचा जो तेलगू प्रांत त्याची राणी होती. या राणीची कारकीर्द चाळीस वर्षें चालू असून मार्कोनें तिची फार स्तुति केलेली आहे.

मार्कोकडूनच आपणांला आणखी एक लक्षांत घेण्यासारखी माहिती अशी मिळते, कीं दक्षिण हिंदुस्थानमध्यें अरबस्तानांतून आणि इराणमधून समुद्रमार्गें असंख्य घोड्यांची आयात होत असे. घोड्यांची निपज होण्याला दक्षिण हिंदुस्थानची

हवा अनुकूल नाहीं. हिंदुस्थानवर स्वारी करून आलेले मुसलमान अधिक चांगले लढवय्ये ठरत याचें एक कारण त्यांच्यापाशीं जास्त चांगल्या दर्जाचे घोडे असत असें सांगण्यांत येतें. आशियांतील घोड्यांची उत्कृष्ट निपज होणारा प्रदेश त्यांच्या ताब्यांत होता.

अशा रीतीनें चोल घराण्याचा ऱ्हास झाल्यावर तेराव्या शतकांत पांड्यांचें राज्य हेंच तामीळ सत्तेचें प्रमुख केंद्र होतें. चौदाव्या शतकाच्या सुरुवातीलाच ( इ. स. १३१० ) मुसलमानी स्वारीच्या पाचरीचें टोंक दक्षिणेंत जाऊन भिडलें. ही पाचर पांड्यांच्या राज्यांत शिरली आणि पांड्यांच्या राज्याचा फारच जलद नाश झाला.

हें जें या पत्रांत दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासाचें निरीक्षण मीं आतांपर्यंत केलें, त्यांत मागें सांगितलेल्याच गोष्टी मीं पुन्हां सांगितल्या असण्याचा संभव आहे. परंतु हा विषय जरा गुंतागुंतीचा असून पुष्कळ लोक हे पल्लव, चालुक्य, चोल आणि इतर वंश यांच्यामध्यें पुष्कळदां मोठी गल्लत करीत असतात. परंतु साकल्यानें जर तूं या सर्व इतिहासाचा विचार करशील तर स्थूल असा एक एक सलग पट त्यासंबंधीं तुला डोळ्यांपुढें उभा करतां येईल. तुला आठवतच असेल, कीं दक्षिणच्या टोंकाचा एक लहानसा तुकडा सोडला तर अशोकाचें अखिल हिंदुस्थानवर व अफगाणिस्तान आणि मध्य आशियाचा कांहीं भाग एवढ्या प्रदेशावर राज्य होतें. त्याच्यानंतर दक्षिणेंत आंध्रांचें राज्य उदयास आलें. हें राज्य साऱ्या दक्षिण हिंदुस्थानभर पसरलेलें असून सुमारें चारशें वर्षें टिकून राहिलें; याच सुमारास उत्तरेमध्यें सरहद्द विभागांत कुशानांचें स्वतंत्र साम्राज्य होतें. तेलगू प्रांतांतील या आंध्राचा जसजसा ऱ्हास झाला, तसतशी तामीळ प्रांतांतील पल्लवांची सत्ता पूर्व किनारा आणि दक्षिणेंतील भाग इकडे उदयास आली आणि फार काळपर्यंत त्यांचा अम्मल या भागावर राहिला. या पल्लवांनींच मॅलेशियांत वसाहती केल्या. सहाशें वर्षें त्यांचें राज्य चालल्यानंतर त्यांची जागा चोलांनीं घेतली. त्यांनीं आपल्या आरमाराच्या बळावर दूरदूरचे देश जिंकले आणि समुद्रावर लांब लांब स्वाऱ्या केल्या. तीनशें वर्षांनंतर रंगभूमीवरून ते मागें पडले आणि पांड्य राज्याची सद्दी चालू झाली; त्यांचें मदुरा शहर हें विद्या व कला यांचें केंद्र बनलें आणि त्यांचें कायळ हें बंदर लांबलांबच्या देशांशीं संबंध राखणारें असें मोठें श्रेष्ठ व व्यापारानें गजबजलेलें बंदर झालें.

ही झाली दक्षिण आणि पूर्व भागांची हकीकत. पश्चिमेला महाराष्ट्र प्रदेशांत प्रथम चालुक्यांचें राज्य होतें; त्यांच्या पाठीमागून राष्ट्रकूटांचें; आणि त्यानंतर पुन्हां एकदा चालुक्यांचें.

हीं सगळीं नुसतीं नांवें मात्र मी तुला सांगतों आहें. परंतु इतर जरी कांहीं माहिती नसली तरी सुद्धां हीं राज्यें केवढा दीर्घकाळ राज्य चालवीत राहिलीं आणि सुधारणेच्या केवढ्या उच्च पायरीला पोंचलीं या गोष्टी जरूर लक्षांत घे. त्यांच्यामध्यें आंगचीच अशी कांहीं विशेष शक्ति होती. त्यामुळें यूरपांतील कोणत्याही राज्यापेक्षां

अधिक शांतता आणि दृढता त्यांच्या ठिकाणीं आढळून आली. परंतु पुढें पुढें तेथील समाजपद्धति बदलत्या काळाच्या दृष्टीनें निरुपयोगी झाली आणि तिच्यांतील दृढता संपून गेली. मुसलमानांचीं सैन्यें १४ व्या शतकांत दक्षिणेकडे वळल्यावर ती लौकरच कोलमडून पडलेली आपणांस दिसेल.

## ६६

# दिल्ली येथील गुलाम राजे

२४ जून, १९३२

गझनीचा सुलतान महमूद याच्याबद्दल ज्याप्रमाणें मी तुझ्याजवळ थोडेंफार बोललों, त्याचप्रमाणें महमुदाच्या सांगण्यावरून फारशी भाषेंत शहानामा नांवाचा ग्रंथ लिहिणारा फिर्दोसी कवि त्याच्याबद्दलही मी तुझ्याशीं बोललों आहें. परंतु महमुदाबरोबर त्याच्या काळचा आणखी एक प्रख्यात पुरुष पंजाबमध्यें आला होता. त्याच्याबद्दल अजून मीं तुला कांहीं सांगितलेलें नाहीं. त्याचें नांव अल्बेरुणी असें असून तो मोठा विद्वान् आणि बहुश्रुत माणूस होता. तत्कालीन धर्मवेड्या आणि क्रूर लढवय्यापेक्षा हा फार वेगळ्या प्रकारचा गृहस्थ होता. त्याला अगदीं नवीन असलेल्या या देशाची आणि त्यामधील लोकांची चागली माहिती करून घेण्यासाठीं त्यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला. हिंदी लोकांची तात्त्विक भूमिका समजून घेण्याची त्याला इतकी तीव्र तळमळ होती, कीं त्यासाठीं तो संस्कृत शिकला आणि हिंदूंचे बहुतेक प्रमुख ग्रंथ त्यानें मूळांत स्वतः वाचले. त्यानें भारतीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला, येथें त्या शास्त्रांचें आणि कलांचें जें शिक्षण मिळे त्याचेंही त्यानें निरीक्षण केलें. भगवद्गीता या ग्रंथावर त्याची फारच भक्ति जडली. दक्षिणेंत तो चोलांच्या राज्यांत गेला, तेव्हां तेथील पाणीपुरवठ्यासाठीं बांधण्यांत आलेले पाटबंधारे पाहून त्याला मोठाच अचंबा वाटला. आज आपल्यास उपलब्ध असलेल्या प्राचीन काळच्या प्रवासवर्णनामध्यें त्यानें आपल्या हिंदुस्थानांतील प्रवासाचें लिहिलेलें वर्णन हा एक फार श्रेष्ठ प्रकारचा ग्रंथ आहे. आजूबाजूला नासधूस, कत्तली आणि धार्मिक कडवेपणा यांची नुसती राड माजून राहिली असतांना, तिच्यामध्यें हा दीर्घ प्रयत्न करणारा, आपल्या सभोंवतीं काय चाललेलें आहे याचें सूक्ष्म निरीक्षण करणारा, अध्ययनांत रममाण होणारा, आणि सत्य कशामध्यें आहे हें शोधून काढण्याचा प्रयत्न करणारा स्थिरप्रकृति विद्वान् गृहस्थ फारच निराळा आणि उठून दिसतो.

पृथ्वीराजाचा पराभव करणाऱ्या अफगाण वंशाच्या शहाबुद्दिनाच्यानंतर गुलाम राजे या नांवानें प्रसिद्ध असलेल्या सुलतानांची एक परंपरा दिल्ली येथें नांदली. यांच्या-

पैकीं पहिला राजा कुतुबुद्दीन हा होता. हा शहाबुद्दिनाच्या पदरीं एक गुलाम होता; परंतु गुलामांना सुद्धा त्या काळीं मोठ्या पदावर चढतां येणें शक्य असल्यामुळें त्यानें दिल्लीचा सुलतान होण्यापर्यंत मजल गाठली. त्याच्यामागून आलेले कांहीं राजे हे सुद्धां स्वतः मुळांत गुलाम होते. त्यामुळें या घराण्याला गुलाम घराणें असें म्हणतात. हेही सगळे चांगलेच क्रूर होते; आणि त्याच्या कारकीर्दींत एकाच वेळीं जिकडे तिकडे नवे नवे प्रांत जिंकणें, इमारती आणि ग्रंथालयें यांचा नाश करणें आणि लोकाना भयभीत करून टाकणें या प्रकारांचा त्यांनीं धुमाकूळ चालविला होता. पण त्यांना स्वतःला इमारती बांधण्याची हौस होती; इमारतींमध्यें आकाराच्या भव्यपणाकडे त्यांचें अधिक लक्ष होतें. दिल्लीजवळचा कुतुबमिनार नांवाचा प्रचंड मनोरा तुझ्या चांगला माहितीचा आहे. तो बांधण्याची सुरुवात या कुतुबुद्दिनानेंच केली. त्याच्यामागून गादीवर आलेला इल्तुत्मिश (अल्तमष) यानें हें बांधकाम पुरें केलें आणि त्याच्याच शेजारीं कांहीं सुंदर कमानी बांधल्या. आजही त्या तेथें अस्तित्वांत आहेत. या इमारतींना लागणारा बहुतेक सर्व माल प्राचीन हिंदी इमारतींमधील, विशेषतः मंदिरांमधील घेतलेला होता. त्या बांधणारे शिल्पज्ञ आणि कारागीर हे सर्वच हिंदी होते; परंतु मागें मीं म्हटल्याप्रमाणें मुसलमानांनीं आपल्याबरोबर आणलेल्या नवीन कल्पनांचा त्याच्यावर फार परिणाम झालेला होता.

महमुदाच्या वेळेपासून हिंदुस्थानवर स्वारी करून परत जाणारा प्रत्येक गृहस्थ आपल्याबरोबर पुष्कळच हिंदी कारागीर आणि शिल्पज्ञ यांचे समूह नेत असे. त्यामुळें हिंदी शिल्पकला आणि वास्तुशास्त्र यांचाही परिणाम मध्य आशियापर्यंत होत राहिला.

अफगाण लोकांनीं बिहार आणि बंगाल हे प्रांत अतिशयच लीलेनें जिंकले. अफगाण लोक हे जात्याच अतिशय साहसी होते; आणि बिहार-बंगालचें संरक्षण करणारावर त्यांनीं अगदींच अचानक हल्ला केला; अशा अचाट साहसाला पुष्कळदां यश येत असतें. अमेरिकेंतील कोर्टेस आणि पिझारो यांचे विजय जितके आश्चर्यकारक, तितकाच अफगाणांचा हा विजयही एक मोठा आश्चर्यकारक चमत्कार आहे.

या इल्तुत्मिशच्या कारकीर्दींतच (इ. स. १२११ ते १२३६) हिंदुस्थानच्या सरहद्दीवर एक महान् उत्पातकारक काळाकुट्ट ढग डोकें वर काढूं लागला होता. चेंगीजखानाच्या निशाणाखालीं जमा झालेल्या मोंगल लोकांचें तें आगामी संकट होतें. आपल्यापुढें पळणाऱ्या शत्रूचा पाठलाग करीत चेंगीजखान थेट सिंधुनदापर्यंत आला होता. पण तेथें तो थांबला. त्याच्या तडाख्यांतून हिंदुस्थान देश वांचला. त्यानंतर सुमारें दोनशें वर्षांनंतर मग त्याच्याच जातीचा आणखी एक लुटारू तैमूरलंग हा मात्र हिंदुस्थानात आला आणि येथें त्यानें पुष्कळ लूटमार आणि नासधूस केली. परंतु चेंगीजखान स्वतः जरी हिंदुस्थानमध्यें आला नाहीं, तरी मोंगल लोकांनीं तेव्हांपासून वारंवार हिंदुस्थानांत दरोडे घालण्याचा क्रम चालू केला आणि थेट लाहोरपर्यंत ते येत-जात राहिले. लोकांना तर त्यांनीं भयभीत केलेंच; परंतु खुद्द दिल्लीच्या सुलतानांनासुद्धां

त्यांच्यामुळें चिंता उत्पन्न झाली; म्हणून कित्येकदां लांच देऊन सुलतान त्यांना मार्गे परतवीत असत. या मोंगलांपैकीं हजारों लोक पंजाबमध्येंच घरदारही करून राहूं लागले.

गुलाम घराण्यांतील सुलतान रेझिया ( रझिया ) नांवाची एक स्त्री राज्य करणारी निघाली. सुलतान इल्तुत्मिश याची ती मुलगी. ती मोठी कर्तबगार स्त्री असावी आणि शूर लढवय्यी असावी असें दिसतें. परंतु तिच्या राज्यांतील क्रूर अफगाण सरदार आणि त्यांच्यापेक्षांही जास्त क्रूर असे पंजाबमध्यें धाडी घालणारे मोंगल लोक यांच्या कचाट्यांत तिची कारकीर्द मोठी कष्टाची गेली.

इ. स. १२९० मध्यें गुलाम घराण्याचा शेवट झाला. त्यांच्यामागून अल्लाउद्दीन खिलजी हा दिल्लीचा राजा झाला. यानें गादी मिळविली ती केवळ्या साध्या आणि मृदु उपायानें; आपल्या चुलत्याचा – तोच त्याचा सासराही होता – त्यानें फक्त वध केला इतकेंच! या आपल्या सत्कार्याची सांगता – त्यानें जे जे कोणी आपल्याशीं एकनिष्ठ नाहींत असा त्याला संशय आला त्या सर्व मुसलमान सरदारांचा वध करून – केली. मोंगल लोकांनीं कट केल्याचा संशय आल्यावरून आपल्या राज्यांतील ऐकूण एक मोंगल माणसाला ठार करण्याचा त्यानें हुकूम दिला; अशासाठीं, कीं " या पृथ्वीच्या पाठीवर या लोकांचें एवढेंसुद्धां बीज शिल्लक राहतां कामा नये." अशा रीतीनें त्यांच्यापैकीं सुमारें वीस ते तीस हजार लोक ( ते सारे अर्थातच स्वतः बिचारे निरपराध असूनही ) ठार केले गेले.

मला वाटतें, एकसारखे हे जे कत्तलीचे उल्लेख येतात ते कांहीं तुझ्या मनाला सुखकारक वाटत नसतील. तसें पाहिलें तर सार्वत्रिक इतिहासाच्या विशाल दृष्टीनें पाहतां त्यांचें फारसें महत्त्वही नाहीं. तथापि, उत्तर हिंदुस्थानांतील या काळांतील अवस्था शांततेची किंवा सुधारणेची अजीबात कशी नव्हती हें दाखविण्याच्या दृष्टीनें या कत्तलींच्या उल्लेखांचा उपयोग आहे. सुधारणा नाहींशी होऊन एक प्रकारें रानटीपणाकडेच कांहींशी उलटी उडी या प्रदेशांत त्या वेळीं घेतलेली दिसते. इस्लामधर्माबरोबर एक पक्षीं हिंदुस्थानमध्यें थोडीशी प्रगतीची लाट आली, तर या मुसलमानी अफगाणांच्याबरोबर येथें रानटीपणाचा प्रवेश झाला. पुष्कळ लोक या दोन्ही गोष्टी एकच असें समजतात. पण तसें न करतां या दोन गोष्टी परस्परांपासून भिन्न आहेत हें आपण ओळखलें पाहिजे.

आपल्या पूर्वीच्या इतरांप्रमाणेंच अल्लाउद्दीन हाही जात्या धर्माच्या बाबतींत अगदीं अनुदार होता – कडवा होता. परंतु या सुमारास मध्य आशियांतून येऊन हिंदुस्थानांत राज्य करूं लागलेल्या या लोकांच्या दृष्टिकोनांत कांहींसा फरक पडत चालला होता असें दिसतें. आतां हिंदुस्थान देश हीच आपली मायभूमि आहे, आपलें घर आहे असें त्यांना वाटण्यास सुरवात झाली होती. या ठिकाणीं ते आता कोणी परके अशी अवस्था राहिली नव्हती. अल्लाउद्दिनानें स्वतः एका हिंदु स्त्रीशीं लग्न केलें होतें; तसेंच त्याच्या मुलानेंही.

अल्लाउद्दिनाच्या कारकीर्दीत राज्यकारभाराला थोडेंफार व्यवस्थितपणाचें आणि शिस्तीचें वळण लावण्याचा प्रयत्न करण्यात आला. सैन्याच्या हालचालीकरितां दळणवळणाचे मार्ग नीट बंदोबस्तांत ठेवण्याची तर विशेष काळजी घेण्यात येऊं लागली; अल्लाउद्दिनाचें आपल्या सैन्याची तंदुरुस्ती राखण्याकडे विशेषच लक्ष असे. त्यानें आपल्या सैन्याचें बळ फारच वाढविलें आणि त्याच्या जोरावर गुजरात व दक्षिण हिंदुस्थानचा बराचसा भाग जिंकून घेतला. त्याच्या सेनापतीनें दक्षिणेंतून परत येतांना प्रचंड संपत्ति आपल्याबरोबर आणली. असें सांगतात, कीं त्यानें बरोबर आणलेल्या संपत्तींत ५०,०००मण सोनें, मोतीं आणि जवाहीर यांचा प्रचंड सांठा, २०,००० घोडे आणि ३१२ हत्ती होते.

अद्‌भुतरम्यता आणि धीरोदात्तता यांचें माहेरघर जें चितोड शहर, त्याच्यामध्यें शौर्याला या काळींही कांहीं वाण नव्हती; परंतु तेथील सर्व व्यवहारांत आतां जुनाटपणा आला असून त्याची युद्धाची पद्धतीही आतां नव्या काळच्या दृष्टीनें जुनी आणि म्हणून निकामी झाली होती. अल्लाउद्दिनाच्या कुशल सैन्यानें या चितोडला चांगलाच दणका दिला. इ. स. १३०३ मध्यें चितोड शहराची लूट करण्यांत आली. पण अशी ही लूट होऊन चितोडचा पाडाव होण्यापूर्वी किल्ल्यांतील सर्व स्त्रीपुरुषांनीं आपल्या पूर्वीच्या रूढीला अनुसरून जोहाराचा भयंकर प्रकार केला. ही रूढि अशी आहे, कीं जेव्हां पराभव होण्याची वेळ येईल आणि आतां सुटकेचा दुसरा कांहीं मार्ग नाहीं असा अगदीं अखेरचा, आणीबाणीचा संकटाचा क्षण प्राप्त होईल, त्या वेळीं सर्व पुरुषांनीं बाहेर पडून रणभूमीवर लढता लढतां मरून जाणें आणि स्त्रियांनीं चिता रचून त्यांमध्यें स्वतःला जाळून घेणें, हें शत्रूला शरण जाऊन त्याच्या तावडींत सांपडण्यापेक्षां अधिक श्रेयस्कर. अर्थात् हा प्रकार स्त्रियांच्या दृष्टीनें पाहतां तर फारच भयंकर होता. त्यापेक्षां या स्त्रियाही स्वतः तरवार हातांत घेऊन रणांगणांत गेल्या असत्या आणि लढून मेल्या असत्या तर अधिक बरें झालें असतें. परंतु तें कसेंही झालें तरी, त्या काळीं लढाईंतील विजय म्हणजे पराजितांच्या कपाळीं गुलामी आणि अवहेलना याच गोष्टी यावयाच्या, असा निश्चित प्रकार असल्यामुळें त्यापेक्षां मरण हें अधिक श्रेयस्कर वाटे हें निःसंशय.

दरम्यान एकीकडे या देशांतील लोकांना – हिंदूंना – हळूहळू मुसलमान करून घेण्यांत येत होतें. परंतु अशा धर्मांतराची प्रगति म्हणावी अशी वेगाची नव्हती. कितीकांनीं धर्मांतर इस्लामधर्म त्यांना पटला म्हणून केलें; कितीकांनीं धर्मांतर भीतीमुळें केलें; तर कितीकांनीं विजयी पक्षाच्या बाजूला राहणें बरें असें स्वाभाविकपणेंच त्यांना वाटलें म्हणून धर्मांतर केलें. परंतु धर्मांतराचें अगदीं प्रमुख कारण हें आर्थिक होतें. जे इस्लामधर्माचे नसत अशा लोकांना एक विशिष्ट कर, डोईपट्टी द्यावी लागे. याला जिझिया म्हणत. गरीब लोकांना हें कराचें ओझें फारच अवजड होई. या करापासून सुटका व्हावी एवढ्याच बुद्धीनें पुष्कळसे लोक धर्मांतर करीत. वरिष्ठ वर्गामध्यें

दरबारची मर्जी संपादन करावी आणि मोठया अमलदारीच्या जागा मिळवाव्या हा प्रबळ हेतु धर्मांतराच्या बुडाशीं असे. अल्लाउद्दिनाचा एक श्रेष्ठ सेनापति मलिक काफर, ज्यानें दक्षिण हिंदुस्थान जिंकला, तो मूळचा हिंदु असून धर्मांतर करून मुसलमान झालेला होता.

दिल्लीच्या आणखी एका सुलतानाबद्दल तुला सांगितलेंच पाहिजे. हा एक अत्यंत लोकविलक्षण मनुष्य होता. त्याचें नांव महमद बिन तुघलघ. हा अत्यंत विद्वान् असून फारशी आणि आरबी या दोन्ही भाषांत मोठा प्रवीण होता. त्यानें तत्त्वज्ञान आणि तर्कशास्त्र यांचें अध्ययन केलें होतें; ग्रीक तत्त्वज्ञानाचाही त्यानें अभ्यास केलेला होता. गणितशास्त्र, भौतिकशास्त्रें आणि वैद्यकशास्त्रें यांमध्येंही त्याची थोडीथोडी गति होती. तो मोठा शूर असून आपल्या काळीं एक विद्वत्तेचा अपूर्व आश्चर्यकारक मुकुटमणि म्हणून तो चमकत होता. आणि हें सगळें अगदीं खरें असून-सुद्धां हे मुकुटमणिबहाद्दर एखाद्या सैतानासारखे क्रूर असून खरोखर फार डोकें फिरलेले गृहस्थ असावे असें वाटतें. त्यानें गादी मिळविली ती खुद्द आपल्या बापाचा वध करून. इराण आणि चीन देश जिंकून घ्यावे अशी कांहींशी त्याची अफाट कल्पना व योजना होती. अर्थात् तिचा स्वाभाविकपणें सर्व फज्जाच उडाला. परंतु त्याचा सगळ्यांत सुप्रसिद्ध पराक्रम म्हणजे स्वतःचीच राजधानी दिल्ली शहर हें नष्ट करून टाकण्याचा त्यानें केलेला निश्चय हा होय. कारण काय, तर त्याच्या धोरणाविरुद्ध म्हणे या शहरांतील कांहीं लोकांनीं, निनांवी पत्रकें काढून टीका करण्याचें साहस केलें. म्हणून त्यानें राजधानी दिल्लीहून उठवून ती दक्षिणेंत देवगिरी येथें (हल्लीं हें गांव दक्षिण हैद्राबाद संस्थानांत आहे) नेण्याचा हुकूम सोडला. या गांवाला त्यानें दौलताबाद असें नवें नांव दिलें. घरमालकांना कांहीं थोडीशी नुकसान-भरपाई देण्याचें ठरविण्यांत आलें होतें तेवढी घेऊन तीन दिवसांत प्रत्येकानें दिल्ली शहर सोडून गेलें पाहिजे असा त्याचा हुकूम होता.

त्याप्रमाणें बहुतेक लोकांनीं दिल्ली शहर सोडलें. कांहीं लोक लपून शहरांतच राहिले. ते जेव्हां सांपडले तेव्हां त्यांना अत्यंत क्रूर शिक्षा देण्यांत आल्या. या लोकांत एक आंधळा होता आणि एक जण अर्धांगानें पीडिलेला होता. पण तेसुद्धां शिक्षेंतून सुटले नाहींत. दिल्लीहून दौलताबाद येथें जायला त्या लोकांना चाळीस दिवसांचा प्रवास करावा लागला. एवढ्या या दीर्घ प्रवासांत या लोकांचे किती भयंकर हाल झाले असतील आणि वाटेंतच कितीकांनीं राम म्हटला असेल याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल.

बरें पण, मग त्या दिल्ली शहराचें इकडे काय झालें? यानंतर दोन वर्षांनीं महमद बिन तुघलघानें दिल्लीमध्यें पुन्हां लोकवस्ती करण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं या शहराची अवस्था प्रत्यक्ष पाहिलेल्या एकानें लिहिली आहे, कीं त्यापूर्वी त्यानें या शहराचें "अगदीं संपूर्ण निर्जन रान" करून टाकलें होतें. एखाद्या बागेचें रान काय

अगदीं तावडतोब करणें शक्य आहे! परंतु पुन्हा या रानाची बाग बनविणें हें कांहीं सोपें काम नाहीं. आफ्रिकेंतील मूर जातीचा इब्न बटूटा या नावाचा एक प्रवासी सुलतान महमदाबरोबर होता. त्याच्याबरोबर परत येऊन त्यानें दिल्ली शहर पाहिलें त्या वेळच्या वर्णनांत तो लिहितो, "सर्व विश्वामध्यें अत्यंत मोठ्या शहरांपैकीं हें एक शहर आहे. आम्हीं या शहरांत प्रवेश केला तेव्हां त्याची जी अवस्था होती तिचें हें वर्णन वर केलें. शहर सगळें उजाड मोकळें होतें; मूठभर लोक सोडले तर त्यामध्यें कोणी राहत नव्हते." दुसरा एक गृहस्थ आठ किंवा दहा मैलपर्यंत पसरलेलें असें हें शहर होतें असें वर्णन करून लिहितो, "सर्व कांहीं नष्ट करून टाकण्यांत आलें होतें. नाश इतका संपूर्ण करण्यात आला होता, कीं शहरातील इमारतींत, राजवाड्यात, किंवा शहराच्या उपनगरांतही एखादें कुत्रें किंवा मांजरसुद्धां शिल्लक राहिलेलें नव्हतें."

हा वेडा गृहस्थ सुलतान म्हणून २५ वर्षें, थेट इ. स. १३५१ पर्यंत, अम्मल गाजवीत होता. आपल्या राज्यकर्त्यांच्या ठिकाणचा किती दुष्टपणा, किती क्रूरपणा, किती नालायकी लोक सहन करूं शकतात हें पाहिलें म्हणजे भयंकर अचंबा वाटतो. पण महमद बिन तुघलघाची प्रजा इतकी गुलामी वृत्तीची असूनसुद्धां अखेर साम्राज्याचा विनाश घडवून आणण्यांत त्याला यश मिळालेंच! त्याच्या वेड्या योजनेमुळें आणि अवजड करामुळें साऱ्या देशाचा नाश झाला. जिकडेतिकडे अन्नाची टंचाई झाली आणि बंडें उद्भवलीं. प्रत्यक्ष त्याच्या हयातींतच १३४० पासून पुढच्या काळांत पुष्कळ प्रदेशांत अगदीं स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं. बंगाल देश स्वतंत्र झाला. दक्षिणेंत तर पुष्कळच राज्यें उदयाला आलीं. त्यामध्यें प्रमुख म्हणजे विजयानगरचें हिंदु-राज्य होय. हें इ. स. १३१६ मध्यें उदयास आलें; आणि दहा वर्षांत दक्षिणेमध्यें ही एक महान् सत्ता होऊन गेली.

दिल्लीच्या शेजारींच तुला अजून तुघलघाबादचे काहीं अवशेष पाहायला सांपडतील. या महमदाच्या बापानें बांधलेलें तें शहर होतें.

## ६७

# चेंगीजखान आशिया आणि यूरप खंडांना हादरा देतो

२५ जून, १९३२

अलीकडच्या माझ्या कित्येक पत्रांमध्यें मीं मोंगल लोकांचा आणि त्यानीं जगांत जो कहर उसळविला आणि विनाश केला त्याचा उल्लेख केला आहे. चीनमध्यें सुंग घराण्याचा वृत्तांत आपण पाहत होतों तो या मोंगल लोकांच्या आगमनाच्या काळाशींच आपण थांबविला. पश्चिम आशियात आपली-त्याची गाठ पडली आणि त्याच सुमारास

जुनें जग संपलें हें आपण पाहिलें. हिंदुस्थानात गुलाम राजे हे त्यांच्या कचाट्यांतून वांचले; तरी पण या देशांत कांहीं त्यांनीं कमी गोंधळ उडवून दिला असें नव्हे. मंगोलियामधील या भटक्या लोकांनीं साऱ्या आशिया खंडाला खालीं लोळविलें असें म्हणावें लागतें. आणि एकट्या आशिया खंडालाच कां, अर्ध्या यूरप खंडाला पण. एकाएकीं उसळून वर येऊन सगळ्या जगाला भीतीनें आणि आश्चर्यानें चीत करून टाकणारे हे विलक्षण लोक होते तरी कोण, कुठले? त्यांच्या आधीं सिथियन, हूण, तुर्क आणि तार्तार, या सगळ्या मध्य आशियांतीलच लोकांनीं इतिहासात नांव घेण्यासारखा पराक्रम करून दाखविलेला होता. या काळींसुद्धां अजून त्यांच्यापैकीं कांहीं लोक श्रेष्ठ स्थितींत होते. सेल्जुक तुर्क पश्चिम आशियांत बलिष्ठ होते; तार्तार लोक उत्तर चीनमध्यें आणि इतर ठिकाणीं होते. परंतु या काळापर्यंत या मोंगल लोकांनीं फार करून कोठेंच कांहीं नांव घेण्याजोगा पराक्रम केलेला नव्हता. पश्चिम आशियांतील कोणाला त्यांच्याबद्दल विशेष म्हणण्यासारखी माहितीसुद्धां नसावी. मंगोलियामधील अगदींच बिनमहत्त्वाच्या अशा कांहीं टोळ्यामधील हे लोक असून उत्तर चीन जिंकून घेणाऱ्या किन तार्तार लोकाच्या अमलाखालीं ते राहणारे होते.

कोणाच्या ध्यानींमनींही नव्हतें तोंच त्यांनीं सत्ता काबीज केली असें दिसून आलें. त्यांच्या सगळ्या विस्कळित टोळ्या एकत्र होऊन त्यांनीं आपला सगळ्यांचा मिळून एक पुढारी निवडला. तो म्हणजे बडा खान हा होय. त्याच्याशीं एकनिष्ठ राहून त्याचे हुकूम पाळण्याची त्यांनीं शपथ घेतली. या खानाच्या निशाणाखालीं त्यांनीं पेकिंगवर चाल केली आणि तेथील किन साम्राज्य नष्ट केलें. नंतर त्यानीं पश्चिमेकडे मोर्चा वळविला आणि वाटेंत भेटलीं तीं सगळीं मोठमोठीं राज्यें पार वाऱ्यावर विरवून टाकल्यासारखीं उधळून लावलीं. रशियांत जाऊन तो देशही त्यानीं आपल्या कबजांत आणला. त्यानंतर त्यांनीं बगदाद आणि बगदादचें सर्व साम्राज्य धुळीस मिळविलें आणि थेट पोलंड व मध्य यूरप येथपर्यंत मजल गांठली. वाटेंत त्यांना प्रतिबंध करायला कोणी उभाच राहूं शकला नाहीं. केवळ योगायोग म्हणूनच हिंदुस्थान देश त्यांच्या तडाख्यांतून बचावला. एकाएकीं वर उसळून आलेल्या या ज्वालामुखीच्या योगानें यूरपांतील व आशियांतील लोक किती गोंधळून गेले असतील याची आपल्याला चांगली कल्पना करता येईल. त्यांच्या-पुढें तो एक भूकंपासारखा प्रचंड नैसर्गिक उत्पातच उभा राहिल्यासारखा झाला असेल; आणि अशा नैसर्गिक महान् आपत्तीपुढें मनुष्य बिचारा काय करणार, अशी त्यांची केविलवाणी अवस्था होऊन गेली असेल!

मंगोलियांतील हे लोक, त्यांच्यामधील स्त्री आणि पुरुष दोन्ही, शरीरानें चांगलेच दणकट होते; कष्ट करण्याची, हाल सोसण्याची त्यांना संवय होती. उत्तर आशियांतील विशाल माळावर तंबू ठोकून दिवस कंठावयाचे ही त्याची रोजची राहणी होती. परंतु त्याच्यामध्यें त्यांचा तो असामान्य आणि लोकविलक्षण नेता जर

उत्पन्न झाला नसता, तर या त्यांच्या शरीरशक्तीचा आणि काटकपणाच्या संवयीचा त्यांना फारसा कांहीं उपयोग झाला नसता. हा नेता म्हणजे इतिहासात चेंगीजखान या नांवानें प्रसिद्ध असलेला गृहस्थ. ( गेंघीझ, जेंघीझ, जेंगीझखान असे त्याच्या नावाचे आणखी कितीक तऱ्हेचे लेख व उच्चार केले जातात. ) याचें मूळचें नांव टिमुच्चिन असें असून त्याचा जन्म इ. स. ११५५ मध्यें झाला. तो अगदीं लहान असतांना त्याचा बाप येसुगी – बगातूर हा मरण पावला. जातां जाता हें एक लक्षांत ठेव, कीं मोंगल सरदारांमध्यें " बगातूर " हें एक मोठेंच आवडतें नांव आहे. याचा अर्थ वीर असा असून उर्दूमधील बहादूर हा शब्द त्यापासूनच निघाला असावा.

दहा वर्षांचा कोंवळा असा हा पोरका मुलगा ; त्याची वास्तपुस्तसुद्धां घ्यायला कोणी नाहीं ; अशाही स्थितींत त्यानें हळूहळू धडपडत डोकें वर काढायची खटपट केली आणि अखेरीस त्याला यशाही आलें. एक एक पायरी तो चढत जात असतां शेवटीं मोंगल लोकांची ती श्रेष्ठ सभा, त्यांची ती कुरुलताई, भरून तिच्यामध्यें त्याची बडा खान, कागान, म्हणजेच बादशहा म्हणून निवड करण्यांत आली. याच्या पूर्वींच कांहीं काळ त्याला चेंगीज हें नांव देण्यांत आलें होतें.

**मोंगल लोकांचा गुप्त इतिहास** या नांवाचा एक ग्रंथ तेराव्या शतकांत लिहिलेला असून चीनमध्यें तो चौदाव्या शतकांत प्रसिद्ध झाला. त्यांत या वरील निवडणुकीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे:—

"आणि अशा रीतीनें कांबळ्यांच्या तंबूमध्यें राहणाऱ्या या लोकांच्या सर्व लहानमोठ्या पिढ्या एका सत्तेखालीं एकत्र येऊन राहूं लागल्यानंतर 'चित्तासंवत्' नांवाच्या वर्षी ते सगळे जण ओनोन नदीच्या मुखाशीं जमले आणि नऊ पायांवरील आपलें पांढरें निशाण उभारून त्यांनीं चेंगीजला कागान ही पदवी बहाल केली."

प्रमुख खान अथवा कागान झाला त्या वेळीं चेंगीज हा एकावन्न वर्षांचा होता. आतां काहीं तो तसा तरुण वयाचा नव्हता. त्याच्या वयाच्या बहुतेक माणसांचें लक्ष शांतता आणि विश्रांति यांवर लागलेलें असतें. पण चेंगीजच्या मुलूखगिरीच्या आयुष्याची तर ही कोठें नुकती सुरुवात होती, ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे ; कारण जगांतील बहुतेक श्रेष्ठ विजेत्यांनीं देश जिंकण्याचें काम बऱ्याच लहान वयांत केलेलें आढळतें. त्यावरून आपल्याला हीही आणखी एक गोष्ट दिसून येईल, कीं चेंगीजखान या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सारें आशिया खंड पालथें घालून पलीकडे जो गेला, तो कांहीं केवळ तरुणपणच्या उत्साहाच्या भरांत नव्हे. त्या वेळीं तो चांगला सावध वृत्तीचा, विचारी, मध्यमवयाचा मनुष्य असून त्यानें केलेल्या प्रत्येक मोठ्या कृत्याच्या मागें विचार आणि तयारी या गोष्टी अवश्य आढळून येतात.

मोंगल लोक हे स्वभावतःच भटक्ये असून त्यांना शहरांचा आणि शहरी जीवनाचा तिटकारा होता. हे लोक भटक्ये होते याचा अर्थ ते रानटी असले पाहिजेत अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे. पण ही चुकीची समजूत आहे. या लोकांना

अर्थातच शहरी लोकांच्या बऱ्याचशा कला माहीत नव्हत्या हें खरें; परंतु त्यांच्यामध्येंही जीवनाची कांहीं एक विशिष्ट पद्धति त्यांनीं रचलेली असून तिच्यांतही विविध अंगोपांगांनीं युक्त असें संघटनतंत्र होतें. रणांगणांत त्यांना जे विजय मिळाले ते केवळ त्यांच्या बाजूला सैन्य जास्त होतें म्हणून नव्हे, तर त्यांच्यामध्यें शिस्त आणि संघटना होती म्हणून; आणि त्याहून सगळ्यांत प्रमुख कारण म्हणजे चेंगीजखानाचें अत्यंत कुशल नेतृत्व त्यांना लाधलेलें होतें, हें होय. कारण चेंगीजखान हा निःसंशय सगळ्या इतिहासामध्यें युद्धशास्त्रांतील सर्वश्रेष्ठ प्रतिभावान् गृहस्थ आणि उत्कृष्टांतील उत्कृष्ट नेता होता. ॲलेक्झांडर किंवा सीझर हे त्याच्यापुढें क्षुद्र कीटकासारखे भासतात. चेंगीजखान हा स्वतः प्रत्यक्ष उत्कृष्ट सेनानायक तर होताच; परंतु शिवाय त्यानें आपले पुष्कळसे सेनापती स्वतः शिकवून तयार केले आणि त्यांना अत्यंत कुशल सेनानायक बनविले हा त्याचा आणखी विशेष होता. आपल्या मायदेशापासून हजारों मैल दूर असतांना, चोहों बाजूंनीं शत्रूंनीं वेढलेले असतांना, एवढेंच नव्हे, तर तो जेथें होता तेथील प्रजासुद्धां त्याच्याशीं विरोधी असतांना, अशा प्रतिकूल परिस्थितींत सुद्धां, आपल्याहून संख्येनें अधिक अशा शत्रूंशीं त्यानें शिकवून तयार केलेल्या या सेनापतींनीं यशस्वी लढाया केल्या.

चेंगीजखानानें आशिया आणि यूरप खंडें तुडवायला सुरुवात केली त्या वेळीं त्यांचा नकाशा कसा काय होता? मंगोलियाच्या पूर्वेला आणि दक्षिणेला असलेल्या चीन देशाचे या वेळीं दोन तुकडे झालेले होते. दक्षिणेला सुंग साम्राज्य असून तेथें दक्षिणेंतील सुंग राजांचा अम्मल होता. उत्तरेला किन अथवा सुवर्ण तार्तारांचें साम्राज्य असून पेकिंग येथें त्यांची राजधानी होती. त्यांनींच सुंग घराण्याला तेथून हांकलून लावलें होतें; पश्चिमेला गोबीच्या निर्जन मैदानाच्यावर व त्याच्यापलीकडे शिया किंवा तंगूत साम्राज्य होतें; हें मोंगलांसारख्याच भटक्या लोकांचें राज्य होतें. हिंदुस्थानांत इकडे गुलाम राजांचें राज्य दिल्ली येथें होतें हें आपण पाहिलेंच आहे. इराणमध्यें आणि मेसापोटेमियामध्यें थेट हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत ख्वाराजम किंवा खिवा याचें मोठें मुसलमानी राज्य असून समरकंद येथें त्याची राजधानी होती. त्याच्या पश्चिमेकडील प्रदेशांत सेल्जुक तुर्कांचें राज्य असून ईजिप्त व पॅलेस्टाइन या देशांत सलादिन सुलतानाचें राज्य होतें. बगदादच्या आसपास तेवढा खलिफाचा अम्मल होता, पण तोही सेल्जुक तुर्कांच्या अधिराज्याखालीं.

दुसऱ्या ख्रिस्ती धर्मयुद्धाचा हा काळ आहे. या वेळीं पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा जगांतील आश्चर्य म्हणून प्रसिद्धीस आलेला, होहेनस्टाफेन घराण्यांतील दुसरा फ्रेडरिक हा होता. इंग्लंडमध्यें मॅग्ना चार्टाचा आणि त्यानंतरचा हा काळ होता. फ्रान्समध्यें नवव्या लुईचा अम्मल चालू होता. हाच लुई ख्रिस्ती धर्मयुद्धांत गेला असतांना तुर्कांकडून कैद केला गेला आणि खंडणी देऊन त्याला सोडवून आणावें लागलें. पूर्व यूरपांत रशियाचें राज्य या सुमारास दुभंगल्यावजा झालेलें होतें; उत्तरेस




चेंगीझखान – "परमेश्वराचा कोरडा"

नोव्होगोरोड येथील राज्य आणि दक्षिणेस कीव्ह येथील राज्य. रशिया आणि पवित्र रोमन साम्राज्य यांच्या दरम्यान हंगेरी आणि पोलंड हे देश होते. कॉन्स्टान्टिनोपलच्या आसपास बायझांटाइन साम्राज्यही अस्तित्वात होतेंच.

चेंगीजखानानें आपल्या मुलूखगिरीसाठीं काळजीपूर्वक पूर्वतयारी केली. त्यानें आपल्या सैन्याला शिक्षण देऊन तयार केलें; सगळयात विशेष म्हणजे त्यानें आपले घोडेसुद्धा शिकवून तयार केले आणि राखीव घोड्यांची सुद्धा तजवीज करून ठेवली. कारण भटकणाऱ्या लोकांना घोड्यांइतकें महत्त्वाचें दुसरें काय आहे? ही तयारी झाल्यावर त्यानें पूर्वेकडे मोर्चा केला व उत्तरचीन आणि मंचुरिया यांमधील किन साम्राज्य जवळजवळ नष्ट केलें आणि पेकिंग शहर काबीज केलें. नंतर त्यानें कोरिया देश जिंकला. या वेळीं दक्षिणेंतील सुंग राजांशीं त्याचे स्नेहाचे संबंध असावे असें दिसतें. किन राजांच्या विरुद्ध सुंग राजांनीं चेंगीजला मदत सुद्धां केली; त्यापुढें आपल्यावर पण पाळी येणार आहे हें त्या वेळीं त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. त्यानंतर त्यानें तंगूत राजांचेंही राज्य जिंकलें.

या विजयानंतर कांहीं काळ चेंगीजखानानें विश्रांति घेतली असावी व पश्चिमेकडे स्वारी करण्याची त्याला इच्छा नसावी असें दिसतें. ख्वाराजमच्या राजाशीं किंवा शहाशीं मैत्रीचेच संबंध ठेवण्याचा त्याचा उद्देश होता. परंतु तसें घडावयाचें नव्हतें. लॅटिन भाषेंत अशी एक म्हण आहे, कीं देवांच्या मनांतून ज्यांचा नाश करावयाचा असतो त्यांना आधीं ते वेडे करतात. (विनाशकाले विपरीत बुद्धिः) ख्वाराजमच्या शहानें आपला नाश करून घ्यायचा असा जणुं निश्चयच केला होता असें दिसतें; आणि ही गोष्ट घडवून आणण्यासाठीं जरूर तें त्यानें सर्व केलें. त्याच्या एका प्रांताधिपानें मोंगल व्यापाऱ्यांची कत्तल केली. इतकें होऊनही चेंगीजखानाला शांतताच हवी होती. म्हणून त्यानें वकील पाठवून त्या प्रांताधिपाला शिक्षा व्हावी अशी मागणी केली. परंतु शहा होता मूर्ख; आपल्या मोठेपणाच्या गर्वाच्या भरांत त्यानें त्या वकिलाचा अपमान केला आणि त्याचा वध करविला. अर्थात् ही गोष्ट सहन करणें चेंगीजखानाच्या शक्तीच्या बाहेरचें होतें; तरीपण त्यानें उतावळी केली नाहीं. काळजीपूर्वक सगळी तयारी त्यानें केली आणि मग आपलें प्रचंड सैन्य घेऊन त्यानें पश्चिमेकडे मोर्चा फिरविला.

इ. स. १२१९ मध्यें जेव्हां हा मोर्चा सुरू झाला तेव्हा आशियाचे आणि कांहीं अंशीं यूरपचे डोळे उघडले; आणि हें नवीन भयंकर संकट काय आहे, कित्येक शहरांना आणि लाखों लोकांना निर्दयपणें चुरडून टाकीत पुढें जाणारा हा प्रचंड रूळ कशा प्रकारचा आहे याची त्यांना जाणीव झाली. ख्वाराजमचें साम्राज्य अस्तित्वांतून नाहींसें झालें. प्रासादांनीं भरलेलें आणि दहा लाख लोकवस्तीनें गजबजलेलें तें महान् बुखारा शहर धुळीस मिळालें. समरकंद हें राजधानीचें शहर नष्ट करण्यात आलें; तेथें राहणाऱ्या दहा लाख लोकांपैकीं फक्त ५० हजार लोक मागें जिवंत राहिले. हिरात,

बल्ख आणखी दुसरीं पुष्कळ गजबजलेलीं शहरें नष्ट करण्यांत आलीं. लाखों लोक मारले गेले. शतकांनुशतकें मध्य आशियांत भरभराटीस आलेल्या सर्व कला आणि कारागिरी नाहींशी होऊन गेली; इराणमध्यें आणि मध्य आशियांत सुधारलेलें जीवन शिल्लक राहिलें नाहीं. जेथें जेथें चेंगीजखान जाई, तेथें तेथें सगळें निर्जन रान होऊन जाई.

ख्वाराजमच्या शहाचा मुलगा जलालुद्दिन हा या महापुराच्या विरुद्ध मोठ्या शौर्यानें लढला. माघार घेत घेत तो थेट सिंधु नदीच्या कांठीं आला. तेथेंही समोरच्या सैन्याचा जोर अनिवार्य झाल्यामुळें घोड्यावरून त्यानें या प्रचंड नदींत एकदम ३० फूट लांब उडी मारली म्हणतात; आणि घोड्यासह पोहून तो पलीकडच्या तीराला पोंचला. इकडे दिल्लीच्या दरबारांत त्याला आसरा मिळाला. तेथपर्यंत त्याचा पाठलाग करण्यांत चेंगीजखानाला कांहीं विशेष अर्थ वाटला नाहीं.

सेल्जुक तुर्क आणि बगदाद यांचें नशीबच जोरावर होतें म्हणावयाचें; म्हणून त्यांना हात न लावतां चेंगीजखान उत्तरेंत रशियांत चालून गेला. कीव्ह येथील ग्रँड ड्यूकचा पराभव करून त्यानें त्याला कैद केलें. तेथून शिया किंवा तंगूत लोकांचें बंड झालें होतें तें मोडून काढण्यासाठीं तो पूर्वेकडे परतला.

चेंगीजखान इ. स. १२२७ मध्यें वयाच्या ७२ व्या वर्षाच्या अखेरीस मरण पावला. पश्चिमेस काळ्या समुद्रापासून तों इकडे पॅसिफिक महासागरापर्यंत त्याचें साम्राज्य पसरलेलें असून त्याच्या मृत्यूच्या वेळींही तें चांगलें जोमदार आणि वाढतें होतें. त्याची राजधानी मात्र अद्यापि मंगोलियामधील काराकोरम या छोट्याशा शहरींच होती. तो जरी भटक्या जातिमधील होता, तरी त्याच्या ठिकाणीं संघटना-कौशल्य फार उत्तम होतें; आपल्या साहाय्यार्थ कर्तबगार मंत्री नेमण्याइतकें शहाणपण आणि चातुर्य त्याच्यापाशीं होतें. इतक्या जलद गतीनें संपादलेलें असूनही त्याचें साम्राज्य तो मरतांक्षणीं कांहीं विलयाला गेलें नाहीं.

इराणी आणि आरबी इतिहासकाराच्या दृष्टीनें चेंगीजखान हा निव्वळ एक सैतान होता. त्याला ते "परमेश्वराचा चाबूक" असें म्हणत. त्याचें त्यांनीं फार निर्दय मनुष्य अशा प्रकारचें चित्र रंगविलें आहे. तो क्रूर आणि निर्दय होता यांत मुळींच शंका नाहीं; परंतु त्याच्या काळच्या इतर पुष्कळशा राज्यकर्त्यांहून कांहीं या बाबतींत तो फारसा वेगळा नव्हता. हिंदुस्थानांत लहानशा प्रमाणावर अफगाण राजे अशाच प्रकारचे होते. इ. स. ११५० मध्यें अफगाण लोकांनीं गझनी शहर काबीज केलें त्या वेळीं आपल्या पूर्वीच्या कांहीं वांशिक तंट्याचा सूड घेण्यासाठीं त्या शहराची लूट करून तें त्यांनीं जाळून टाकलें. सात दिवसपर्यंत "एकसारखी शहरांत लूट, नासधूस आणि कत्तल चालू होती. जो म्हणून पुरुष सांपडेल त्याला ठार करण्यात येई आणि बायकांना व मुलांना कैद करण्यात येई. ज्यांना जगांत कोठें तुलना नव्हती असे महमुदी राजांचे (म्हणजे महमुदाच्या वंशजांचे)

सर्व राजवाडे आणि मोठमोठीं बांधकामें नष्ट करून टाकण्यांत आलीं." असें हें मुसलमानांचें आपल्या मुसलमान बांधवाशींच वर्तन होतें. यामध्यें किंवा अफगाण राजांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानांत जे प्रकार घडले त्यांमध्यें, किंवा चेंगीजखानाच्या कारकीर्दीत इराणांत किंवा मध्य आशियांत झालेल्या विनाशामध्यें काळें-गोरें असें निवडण्यासारखें कांहीं नाहीं. आपला वकील शहाकडून मारला गेल्यामुळें चेंगीजखान ख्वाराजमच्या राज्यावर फारच संतापला होता. त्याच्या दृष्टीनें हा रक्ताचा सूड रक्तानें घेण्याचा मामला होता. चेंगीजखानानें दुसरीकडेही पुष्कळ नासधूस केली; परंतु मध्य आशियांतील या प्रदेशांत केली इतकी कांहीं ती मोठी म्हणतां येणार नाहीं.

शहरांचा नाश करण्याच्या पाठीमागें चेंगीजखानाचा आणखी एक उद्देश होता. त्याची प्रवृत्तीच भटक्याची होती. शहरें आणि नगरें यांचा त्याला तिटकारा होता. बिगरशेतीच्या माळावर किंवा प्रचंड मैदानावर राहणें त्याला प्रिय होतें. एकदां तर चीनमधील सर्वच्या सर्व शहरें नष्ट करून टाकलीं तर बरें होईल, असें त्याच्या मनानें घेतलें होतें. परंतु सुदैवानें तो विचार त्यानें सोडून दिला. सुधारलेली राहणी आणि भटकें जीवन यांचा संगम करावा अशी त्याची कल्पना होती. परंतु हें तेव्हां शक्य झालें नाहीं आणि केव्हांच शक्य होणारेंही नाहीं.

चेंगीजखानाच्या नांवावरून तुझी कदाचित् समजूत झाली असेल, कीं तो मुसलमान होता. परंतु तशी गोष्ट नाहीं. मोंगल लोकांमधील हें एक नाव आहे एवढेंच. चेंगीजखान हा धर्माच्या बाबतींत फार उदार वृत्तीचा मनुष्य होता. त्याचा जो कांहीं धर्म म्हणून होता त्याला शमावाद उर्फ शामाई धर्म ( शाम-श्याम म्हणजे निळें आकाश ) असें नांव असे. त्याच्यामध्यें अनंत नील आकाशाची पूजा ही मूलभूत गोष्ट होती. चीनमधील ताओपंथीय साधूंशीं त्याचे पुष्कळ वादविवाद झाले, परंतु तो शमा धर्मालाच चिकटून राहिला; आणि कोणत्याही संकटांत असतांना तो आकाश-देवाचा सल्ला घेत असे.

या पत्रांत सुरुवातीला मीं लिहिलेलें तुझ्या लक्षांत आलें असेल, कीं चेंगीज-खानाची बडा खान म्हणून मोंगल लोकांच्या सभेंत निवडणूक झाली. अर्थात् ही सभा म्हणजे खरोखर लोकसभा नव्हती; तर केवळ सरंजामदारांची सभा होती; आणि स्वतः चेंगीजखानही एका टोळीचा सरंजामदार — जमीनदार नायक होता.

तो स्वतः निरक्षर होता, तसेच त्याचे सर्व अनुयायीही निरक्षर होते. पुष्कळ काळपर्यंत लिहिण्याची म्हणून कांहीं कला आहे ही सुद्धां गोष्ट बहुतेक त्याला माहीत नव्हती. इकडून तिकडे निरोप पाठवावयाचे ते सर्व तोंडी असत; ते बहुधा पद्यांत आणि दृष्टान्तांच्या किंवा म्हणींच्या स्वरूपांत रचलेले असत. एवढ्या मोठ्या प्रचंड साम्राज्याचा सारा कारभार तोंडी निरोपांच्या द्वारा कसा चालत असेल, याचा विचार मनांत आला म्हणजे मोठाच अचंबा वाटतो. पुढें मग लिहिणें म्हणून कांहीं एक

प्रकार आहे असें जेव्हां चेंगीजखानाला समजलें, तेव्हां ही कला फार उपयुक्त आणि मौल्यवान् आहे असें ताबडतोब त्याच्या मनानें घेतलें आणि आपल्या मुलांनीं व प्रमुख अम्मलदारांनीं ती शिकावी असा त्यानें हुकूम केला. तसेंच प्राचीन मंगोलियन व्यवहाराचे नियम सगळे लिहून ठेवले पाहिजेत; त्याचप्रमाणें आपले सर्व हुकूम किंवा सूचना याही लिहून ठेवल्या पाहिजेत असाही त्यानें हुकूम केला. कल्पना अशी होती, कीं हे जे त्याचे व्यवहाराचे नियम, रूढींचा कायदा होता हा अगदीं कधींही न बदलणारा असा शाश्वत कायदा (धर्म) होता, आणि कोणींही तो मोडतां कामा नये. खुद्द बादशहावरसुद्धां या कायद्याचें बंधन होतें. आज हा "शाश्वत–कधींही न बदलणारा कायदा" अस्तित्वांत नाहीं; आजकालच्या मोंगल लोकांना-सुद्धां त्याची कांहींच आठवण नाहीं किंवा त्यांच्या आजच्या व्यवहारांतही त्यापैकीं कोणतीच परंपरा चालू नाहीं.

प्रत्येक देशाचा आणि प्रत्येक धर्माचा असा एक प्राचीन रूढींचा अलिखित आणि लिखितही कायदा असतो. आणि त्या त्या देशांत बहुतेक अशीच समजूत असते, कीं हा अगदीं "न बदलणारा कायदा" असून तो नित्य, यावच्चंद्र-दिवाकरौ चालू राहणार आहे. कित्येकदां हा कायदा म्हणजे एक प्रकारें परमेश्वराचा साक्षात्कार आहे असें मानलें जातें. आणि जें प्रत्यक्ष परमेश्वरानें मानवाला सांगितलें किंवा दिलें त्यांत बदल होईल किंवा तें क्षणभंगुर नाशवंत असेल, असें समजणें शक्य नाहीं. परंतु कायदे खरोखर प्रचलित परिस्थितीशीं जुळते असावे लागतात, आणि त्यांच्या साहाय्यानें आपल्याला आपली सुधारणा करतां यावी असा त्यांचा उद्देश असतो. मग जेव्हां परिस्थिति बदलेल, तेव्हां जुने कायदे परिस्थितीशीं जुळते कसे राहूं शकतील? बदललेल्या परिस्थितीबरोबर हे कायदेही बदलले पाहिजेत; नाहीं तर मग हे कायदे म्हणजे आपल्या गळ्याभोंवतींचा एक लोखंडी सांखळदंडच होऊन बसेल आणि जग पुढें कूच करीत असता हा सांखळदंड बांधून आम्हांला मागें खेंचून ठेवील. कोणताही कायदा मनुष्याच्या ज्ञानावर आधारलेला असला पाहिजे; आणि जसें ज्ञान वाढत जाईल तशी त्या कायद्याचीही वाढ झाली पाहिजे.

चेंगीजखानाबद्दल मीं तुला कदाचित् वाजवी होती त्यापेक्षां थोडी अधिक माहिती किंवा अधिक तपशील सांगितले आहेत असें म्हणतां येईल. परंतु कांहीं म्हणा मला त्या माणसाचें मोठेंच कौतुक वाटतें. किती विचित्र गोष्ट आहे नव्हे ही, कीं या भयंकर, क्रूर आणि अत्याचारी अशा एका भटक्या टोळीच्या सरंजामशाही नायकानें माझ्यासारख्या शांतताप्रिय, अहिंसावादी, शहरांत राहणाऱ्या आणि सरंजामशाहींतील एकूण एक गोष्टींचा तिटकारा करणाऱ्या एका मृदुवृत्तीच्या माणसाचें मन मोहून टाकावें!

## ६८

# मोंगल लोक सर्व जगावर प्रभुत्व मिळवितात

२६ जून, १९३२

चेंगीजखानाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा ओघताई ( ओघ्तै ) हा कागान म्हणजे बडा खान झाला. चेंगीजखान आणि त्या काळचे मोंगल लोक यांच्या मानानें पाहतां हा दयाळू आणि शांतताप्रिय वृत्तीचा मनुष्य होता. तो नेहमीं म्हणत असे, " आमचा कागान चेंगीज यानें आमची बादशाही गादी मोठ्या प्रयासानें स्थापन केली. आतां लोकांना कांहीं काळ शांततेचा आणि सुखाचा जावा आणि त्यांच्यावरील अवघड ओझीं कमी व्हावीं असें करण्याची वेळ आलेली आहे. " पाहा, त्याचा सगळा विचार कसा आपलें सरंजामशाहीप्रभुत्व आणि आपली टोळी यांच्यापुरताच मर्यादित आहे.

परंतु मोंगलांच्या मुलूखगिरीचा काळ अद्यापि संपलेला नव्हता ; अजून त्यांच्यांतील उत्साह उसळून बाहेर येतच होता. त्यांचा एक अत्यंत मोठा सेनापति साबुताई ( साबुतै ) याच्या नेतृत्वाखालीं त्या लोकांनीं यूरपवर पुन्हां एक स्वारी केली. शत्रूच्या प्रदेशांतील सर्व भेद काढून आणण्यासाठीं हेर आणि आपले आघाडीचे कार्यकर्ते गुप्तपणें पाठवून त्यानें आपली सगळी पूर्वतयारी मोठ्या सावधपणानें केली होती ; त्या त्या देशावर चालून जाण्यापूर्वी तेथील राजकीय आणि लष्करी परिस्थितीचें यथातथ्य ज्ञान त्यानें करून घेतलेलें होतें. रणांगणावर तर तो युद्धशास्त्रामध्यें अत्यंत श्रेष्ठ मुरब्बी असा सेनानी होता ; त्याच्या मानानें यूरपीय राष्ट्रांतील सेनापती म्हणजे युद्धकलेतील ओनामा शिकूं लागलेलीं नुसतीं पोरें होतीं. आग्नेयीकडे बगदाद आणि सेल्जुक तुर्क यांना धक्का न लावतां साबुताई थेट रशियावर चालून गेला. सहा वर्षें त्याची ही स्वारी पुढें पुढें कूच करीतच होती. या दरम्यान त्यानें मॉस्को, कीव्ह, पोलंड, हंगेरी, क्रॅकौ या प्रांतांत लूटमार करून तेथें संपूर्ण नाश केला. इ. स. १२४१ मध्यें एका पोलिश आणि जर्मन सैन्याचा मध्य यूरपांतील खालच्या सायलेशिया प्रांतामध्यें लिबनीझ येथें संपूर्ण उच्छेद करण्यांत आला, त्या क्षणीं साऱ्या यूरप खंडाची अखेरची घटका भरली असें वाटूं लागलें. मोंगल लोकांना अटकाव करूं शकेल, असा कोणीच शिल्लक राहिलेला दिसेना. दुसऱ्या फ्रेडरिकला त्या वेळीं जगांतील आश्चर्य म्हणत असत. परंतु मंगोलियामधून आलेल्या या खऱ्या आश्चर्याच्या पुढें तो बिचारा अगदींच फिका पडला असेल. यूरपांतील सर्व राजेमहाराजे यांची अगदींच फें फें उडाली होती. अशा वेळीं एकाएकीं त्यांच्यावरील हें संकट टळलें.

इकडे ओघताई मरण पावल्यामुळें त्याच्या पाठीमागून गादी कोणाला मिळावयाची याच्याबद्दल थोडीशी भानगड उपस्थित झाली होती. त्यामुळें यूरपांतील मोंगल सैन्यें त्यांचा तेथें पराभव झाला नव्हता तरी परत फिरलीं आणि इ. स. १२४२

मध्यें आपल्या मायभूमीकडे निघून आली. यूरप खंडाचा गेलेला श्वास जणुं पुन्हां परत आला.

दरम्यान इकडे चीनमध्यें मोंगल लोक लांबपर्यंत पसरले. उत्तरेकडील किन राजांचा तर त्यांनीं संपूर्ण नाश केला होताच; तसाच दक्षिणेंतील सुंग राजाचाही केला. १२५२ मध्यें मंगू खान हा कागान–प्रमुख खान–झाला, त्यानें कुबलाई खान याला चीनचा गव्हर्नर–प्रांताधिप–नेमलें. मंगूच्या काराकोरम येथील दरबारामध्यें आशिया आणि यूरप खंडांतील लोकांचा मोठाच मेळावा जमा होत असे. तरी पण भटक्ये लोकांच्या रूढीप्रमाणें अजूनही कागान हा तंबूंतच राहत असे. परंतु आतां हे तंबू मोठे भरदार झालेले होते; दोन खंडांतून लुटून आणलेल्या संपत्तीनें ते गडगंज भरलेले आणि शोभायमान् झाले होते. आतां तेथें व्यापारी लोक आपला माल खपविण्यासाठीं येऊं लागले; यांत मुसलमान व्यापाऱ्यांचाच भरणा अधिक असे. त्यांना असें आढळून आलें, कीं मोंगल लोकांत आतां चांगलेंच भक्कम गिऱ्हाईक निर्माण झालेलें आहे. जणुं साऱ्या जगावर स्वामित्व गाजविणाऱ्या त्या तंबूंच्या शहारांत आतां कारागीर येऊं लागले, फलज्योतिषी येऊं लागले, गणितशास्त्रज्ञ येऊं लागले, तसेंच तत्कालीन शास्त्रांच्या प्रयोगांशीं लुडबूड करणारे लोकही येऊं लागले; या प्रचंड मोंगल साम्राज्या-मध्यें एक प्रकारची शांतता आणि सुव्यवस्था नांदूं लागली; आणि या खंडांतून त्या खंडांत जाण्यायेण्याचे उंटांच्या तांड्यांचे मार्ग आतां जाणाऱ्या-येणाऱ्या लोकांनीं गजबजून गेले. यूरप आणि आशिया खंड यांचे परस्पर-संबंध अधिक दृढ होत गेले.

आणि मग काराकोरम येथें निरनिराळ्या धर्मांच्या लोकांमध्यें मोठी शर्यत चालू झाली. जग जिंकणाऱ्या या लोकांना खास आपल्या छापाच्या धर्माकडे वळवून घ्यावें असा ज्याचा त्याचा उद्देश होता. ज्या कोणत्या धर्माला या सर्व सामर्थ्यवान् लोकांना आपल्या बाजूकडे वळवितां येईल, तो धर्म बाकीच्या सर्व धर्मांवर पूर्ण मात करून सर्व जगांत अत्यंत बलिष्ठ धर्म होऊन बसेल हें स्पष्ट होतें. त्यामुळें पोपनें आपले प्रतिनिधी रोमहून येथें पाठविले; नेस्टोरियन ख्रिश्चन लोकही तेथें आले; मुसलमानही आले; त्याचप्रमाणें बुद्धधर्मीय लोकही आले. परंतु मोंगल लोकांना एखाद्या नव्या धर्माचा स्वीकार करण्याची मुळींच घाई सुटलेली नव्हती. इतके ते मुळीं फारसे धर्मांच्या आहारीं गेलेले लोकच नव्हते. असें दिसतें, कीं एकदां ख्रिश्चन धर्माचा स्वीकार करावा या कल्पनेच्या नादीं कागान थोडासा लागला होता; परंतु त्या धर्मांतील पोपचा जो सत्तेबद्दलचा दावा होता तो त्याला सहन झाला नाहीं. अखेरीस मोंगल ज्या ज्या देशांत जाऊन वसाहत करून स्थिर झाले, त्या त्या देशांतील धर्मांत ते असेच सामील झाले. चीन आणि मंगोलिया यांमध्यें त्यांच्यापैकीं बहुतेक लोक बुद्धधर्मी झाले; मध्य आशियांत ते मुसलमान झाले; आणि रशिया आणि हंगेरीमध्यें कांहीं जण ख्रिस्ती झाले.

रोम येथील पोपच्या व्हॅटिकन राजवाड्यांतील ग्रंथालयामध्यें बडे खां कागान मंगू यानें पोपला लिहिलेलें एक अस्सल पत्र अद्यापिही अस्तित्वांत आहे. तें आरबी भाषेंत

आहे. ओघताईच्या मृत्यूनंतर नव्या बड्या खानाकडे पोपनें आपला प्रतिनिधि पाठवून तूं यूरपवर पुन्हां स्वारी करतां कामा नये असें त्याला बजाविलें असावें असें दिसतें. कारण खानानें असें उत्तर दिलें आहे, कीं आम्हीं यूरपवर स्वारी केली याचें कारण यूरपांतील लोक आमच्याशीं चांगल्या रीतीनें वागत नाहींत हें आहे.

मंगूच्या कारकीर्दीत आणखी एक मुलूखगिरीची आणि नासधुशीची लाट उसळली. मंगूचा भाऊ हुलगू हा इराणचा प्रांताधिप होता. बगदादच्या खलिफाच्या कोणत्या तरी कृत्यानें चिडून जाऊन त्यानें त्याला संदेश पाठवून खलिफा आपलीं वचनें पाळीत नाहीं याबद्दल खलिफाची त्यानें निर्भर्त्सना केली आणि यापुढें जर खलिफा नीट वागणार नाहीं, तर त्याच्यावर साम्राज्य गमाविण्याची पाळी येईल असें त्याला बजाविलें. खलिफा हा फारसा शहाणा मनुष्य नव्हता; अनुभवानेंही त्याचे डोळे उघडत नव्हते. त्यानें उलट उपमर्दकारक उत्तर पाठविलें आणि मोंगलांच्या वकिलांचा बगदाद शहरांत लोकांच्या जमावानें अपमान केला. त्यामुळें हुलगूचें मोंगल रक्त सळसळून गेलें. रागाच्या भरात तो बगदादवर चालून गेला आणि चाळीस दिवसांच्या वेढ्यानंतर त्यानें तें शहर जिंकून घेतलें. आपल्या अरेबियन नाइटस्‌मधील त्या शहराच्या वैभवाचा अशा रीतीनें अंत झाला आणि ५०० वर्षे चाललेल्या साम्राज्याच्या अमदानींत तेथें जमा झालेली सर्व अगणित संपत्ति तेथून नाहींशी झाली. खलिफा, त्याचे मुलगे, त्याचे जवळचे नातेवाईक या सर्वांना ठार करण्यांत आलें. कित्येक आठवडेपर्यंत सर्व-सामान्य लोकांची कत्तल चालूच होती; त्यांच्या रक्तानें तैग्रीस नदीचें पाणी कित्येक मैलपर्यंत लाल होऊन गेलें. या कत्तलींत पंधरा लक्ष लोक प्राणांस मुकले असें म्हणतात. तेथील सर्व कारागिरीचे आणि वाङ्मयाचे संग्रह आणि ग्रंथालयें पार नष्ट करून टाकण्यांत आलीं. बगदाद शहर संपूर्णपणें धुळीस मिळविण्यांत आलें. पश्चिम आशियातील एक हजार वर्षांचें तें प्राचीन पाटबंधाऱ्याचें कामसुद्धां हुलगूनें नष्ट करून टाकलें.

अलेप्पो, इडेस्सा या आणि इतर पुष्कळ शहरांवर हाच प्रसंग ओढवला आणि साऱ्या पश्चिम आशियावर संकटाच्या अंधकाराची कृष्ण छाया पसरली. त्या काळचा एक इतिहासकार म्हणतो कीं, "हा शास्त्रें आणि सद्‌गुण यांच्या दुष्काळाचा —नापिकीचा—काळ होता. मोंगलाचें एक सैन्य पॅलेस्टाइनमध्यें गेलें होतें. तेथें मात्र त्याचा ईजिप्तचा सुलतान बायबर्स यानें पराभव केला. या सुलतानाच्या पदरीं बंदूकवाल्या म्हणजे अग्नियुक्त हत्याराच्या सैनिकांचें एक पथक होतें; त्यावरून त्याला बंदूकदार असें गमतीचें आडनांव मिळालें होतें. या सुमारास आतां आपण या असल्या आगवाल्या हत्यारांच्या काळांत प्रवेश करतों. चिनी लोकांना फार पूर्वीपासून बंदुकीच्या दारूची माहिती होती. त्यांच्याचकडून बहुधा मोंगल लोक ही कला शिकले असावे; या आगवाल्या हत्यारांच्या बळावर त्यांना एवढाले विजय मिळवितां आले असावेत. या मोंगल लोकांच्याकरवींच यूरपमध्यें आगवाल्या हत्यारांचा प्रवेश झाला.

इ. स. १२५८ मध्यें बगदादचा नाश झाल्यावर आब्बासी साम्राज्य जें काय उरलें सुरलें होतें तें अखेरचें नष्ट झालें. त्याचबरोबरच पश्चिम आशियामध्यें आरबी लोकांची जी एक विशिष्ट संस्कृति व सुधारणा होती तिचाही अंत झाला. लांब तिकडे स्पेनमध्यें ग्रॅनाडाच्या राज्यांत आरबी सुधारणेच्या परंपरेचा एक धागा अद्यापि चालू होता. त्याचाही अखेरचा नाश होईपर्यंत यापुढें अजून दोनशें वर्षे जायचीं होतीं. खुद्द अरबस्तानचें महत्त्व मात्र झपाट्यानें कमी होत गेलें आणि तेव्हांपासून त्या देशांतील लोकांनीं इतिहासांत कोणतीही महत्त्वाची कामगिरी केलेली नाहीं. पुढें हा देश व तेथील लोक उस्मानी तुर्कांच्या साम्राज्यांत सामील झाले. १९१४–१८ च्या महायुद्धांत इंग्रजांच्या उठावणीवरून आणि त्यांच्या साहाय्यानें आरबी लोकांनीं तुर्कांविरुद्ध बंड केलें आणि तेव्हांपासून अरबस्तान हा एक थोडाफार स्वतंत्रसा देश झाला आहे.

बगदादचा नाश झाल्यावर दोन वर्षे कोणी खलिफाच नव्हता. नंतर ईजिप्तचा सुलतान बायबर्स यानें शेवटच्या आब्बासी खलिफाच्या एका नातेवाइकाला खलिफा म्हणून नेमलें. परंतु हा खलिफा फक्त धर्मप्रमुख होता; त्याच्या हातीं राजकीय सत्ता कसलीही नव्हती. त्यानंतर तीनशें वर्षांनीं त्या परंपरेंतील शेवटच्या खलिफाच्या हातून तुर्की सुलतानांनाच खलिफा ही पदवी प्राप्त झाली. अलीकडे कांहीं वर्षांपूर्वींच मुस्तफा कमालपाशानें तुर्कस्तानांतून सुलतान आणि खलिफा या दोहोंचीही इतिश्री केली. तेथपर्यंत तुर्कस्तानचे सुलतान हेच मुसलमानांचे खलिफाही असत.

परंतु हो, कथेचें अनुसंधान सोडून मी हा दुसरीकडेच भटकत चाललों. मंगू खान हा इ. स. १२३९ मध्यें मरण पावला. मृत्यूपूर्वी त्यानें तिबेट देश जिंकला होता. त्याच्या मागून चीनचा प्रांताधिप कुब्लाईखान हा बडा खान – कागान – झाला. कुब्लाईखान आतांपर्यंत फार वर्षे चीनमध्यें राहत आला होता; त्यामुळें त्याचें मन त्या देशांत रमलें होतें. म्हणून आपली राजधानी काराकोरम येथून उचलून त्यानें पेकिंग येथें नेली आणि त्या शहराचें नांव बदलून **खानबालीक** – खानाचें शहर – असें त्याला नवें नांव दिलें. चीनच्या स्थानिक कारभारांतच कुब्लाईखानाचें मन इतकें रमून गेलें, कीं त्यामुळें त्याचें आपल्या साम्राज्याकडे दुर्लक्ष झालें व हळूहळू जागोजागचे मोंगल प्रांताधिप स्वतंत्र झाले.

सर्व चीन देश जिंकून घेण्याचें काम कुब्लाईखानानें पुरें केलें. परंतु जुन्या मोंगल लोकांच्या स्वाऱ्यांपेक्षा त्याच्या स्वाऱ्या फार निराळ्या स्वरूपाच्या होत्या. त्यामध्यें क्रूरपणा फारच कमी प्रमाणावर होता आणि नासधूसही फारच कमी होती. चीन देशानें कुब्लाईखानाला पुष्कळ नरम करून सुधारलें होतें. चिनी लोकही त्याच्याशीं गोड वागूं लागले होते; आणि त्याला आपल्यापैकीं एक असें मानूं लागले होते. इतका कीं त्यानें प्रत्यक्ष एक चिनी सनातन्यांना–धार्मिक लोकांना–मान्य असा आपला राजवंश चीनमध्यें चालू केला; तो म्हणजे युआन राजवंश. कुब्लाईखानानें

टांगकिंग ( टांकिन ), अनाम ( वैतनाम ) आणि ब्रह्मदेश हे प्रदेश आपल्या चीनच्या साम्राज्यांत सामील करून घेतले. जपान आणि मॅलेशिया हेही जिंकण्याचा त्यानें प्रयत्न केला; परंतु मोंगल लोकांना दर्यावर्दीपणाची संवय नव्हती यामुळें या प्रयत्नांत त्याला यश आलें नाहीं.

मंगूखानाच्या कारकीर्दीमध्यें त्याच्या दरबारांत फ्रान्सचा राजा नववा लुई याच्याकडून एका मजेदार राजकारणासाठीं एकदां वकील लोक आले होते. लुईची सूचना अशी होती, कीं मोंगल लोक आणि यूरपांतील ख्रिस्ती राज्यसत्ता यांच्यामध्यें मुसलमानांच्या विरुद्ध मैत्रीचा करार असावा. धर्मयुद्धामध्यें लुई जेव्हां कैद झाला होता, त्या वेळीं मुसलमानांच्या हातून त्या बिचाऱ्यावर फारच दुर्धर प्रसंग ओढवला होता. म्हणून तो हा तह करूं पाहत होता. परंतु मोंगल लोकांची असले तह करण्याकडे प्रवृत्ति नव्हती; त्याचप्रमाणें कोणाही लोकावर केवळ ते अमुक एका धर्माचे आहेत एवढ्याचसाठीं हल्ला करण्याचीही त्यांची प्रवृत्ति नव्हती.

यूरपमधील असल्या क्षुल्लक राजेरजवाड्यांशीं त्यांनीं काय म्हणून अशा तऱ्हेचा तह करावा? आणि कोणाविरुद्ध? पश्चिम यूरपमधील राज्यांच्या काय किंवा मुसलमानी राज्यांच्या काय, लढाऊ प्रवृत्तीचें त्यांना मुळींच भय वाटत नव्हतें. त्यांच्या कचाट्यांतून पश्चिम यूरप खंड बचावलें तें केवळ योगायोगानें. सेल्जुक तुर्कांनीं तर त्यांच्यापुढें मान वांकवून त्यांना खंडणीही देण्यास सुरवात केली होती. मोंगल सैन्याचा पराभव असा आजपर्यंत काय तो ईजिप्तच्या सुलतानानें केला होता; परंतु त्यांनीं तसाच खास मनापासून प्रयत्न केला असता, तर त्यांनीं ईजिप्तच्या सुलतानालाही वांकविलें असतें यांत बिलकुल संशय नाहीं. आशिया आणि यूरप खंडाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत मोंगल लोकांचें साम्राज्य पसरलेलें होतें. मोंगल लोकांनीं जे हे नानाविध देश जिंकले, त्याच्याशीं तुलना करण्याजोगे विजय आजपर्यंत कोणीं इतिहासांत मिळविलेले नव्हते. कोणाचेंही एवढें प्रचंड साम्राज्य झालेलें नव्हतें. मोंगल लोक म्हणजे त्या काळीं साऱ्या जगाचे स्वामी असेच कोणालाही भासले असतील. हिंदुस्थान देश त्यांच्या साम्राज्यांतून स्वतंत्र होता तो केवळ मोंगल लोक त्या बाजूला फिरकले नव्हते एवढ्याचमुळें. यूरपचा हिंदुस्थानाच्याच आकाराचा पश्चिमेकडील तुकडाही या साम्राज्याच्या बाहेर होता. पण हे सगळे प्रदेश मोंगल लोकांच्या कृपेमुळेंच फक्त असे स्वतंत्र होते; आणि त्यांना गिळंकृत करून टाकण्याचें त्यांनीं मनांत आणलें नाहीं, तोंवरच त्याच्या स्वतंत्र-पणाची कथा चालावयाची होती. तेराव्या शतकांत असेंच कोणालाही वाटण्याजोगी मोंगलाची सद्दी व शक्ति होती.

परंतु मोंगल लोकांची ही प्रचंड उत्साहशक्ति हळूहळू कमी होत गेलीसें दिसतें. देश जिंकीत जाण्याची त्यांची स्फूर्ति मावळत गेली. एक गोष्ट तूं लक्षांत ठेवली पाहिजे, कीं त्या काळीं लोकांची हालचाल पायीं किंवा फार तर घोड्यावरून होत असल्यामुळें फारच हळूहळू होत असे. दळणावळणाचीं याहून वेगाचीं साधनें त्या काळीं

नव्हतीं. मंगोलियांतील आपल्या मायभूमींतून निघून यूरपांतील आपल्या साम्राज्याच्या पश्चिम सरहद्दीपर्यंत पोंचावयाला त्यांच्या सैन्याला एक वर्षाचा प्रवास करावा लागे. आपल्याच साम्राज्यांतून हा एवढा प्रचंड अवघड प्रवास करावयाचा, त्यामुळें वाटेंत लूटमार करण्याचीही मुळींच संधि नसावयाची; इतकी कांहीं त्यांची देश जिंकण्याची प्रवृत्ति तीव्र नव्हती, कीं यांनीं असा बिगरलुटीचा हा प्रवास करण्यास तयार व्हावें. शिवाय, लढाईमध्यें आणि लूटमारीमध्यें एकसारखें आतांपर्यंत जयच येत गेल्यामुळें मोंगल लोकांजवळ भलीभक्कम लूट सांठली होती. त्यांच्यापैकीं पुष्कळांजवळ गुलाम-सुद्धां जमा झालेले असावेत. त्यामुळें जरा थंडावून ते आतां शांतपणाच्या आणि बिनदगदगीच्या राहणीकडे झुकूं लागले होते. मनुष्याला एकदां हवें असेल तें सगळें पोटभर मिळालें, म्हणजे मग तो शांतता आणि सुव्यवस्था यांचा फार मोठा भक्त बनतो.

एवढ्या ह्या प्रचंड मोंगल साम्राज्याचा कारभार करणें हें मोठेंच बिकट काम असलें पाहिजे. तेव्हां या साम्राज्याचे फुटून भाग पडायला सुरुवात झाली यांत कांहींच आश्चर्य नाहीं. कुब्लाईखान हा १२९२ मध्यें मरण पावला. त्याच्यानंतर कोणीही बडा खां कागान झाला नाहीं. आणि मोंगलांच्या साम्राज्याचे पांच मोठे विभाग झाले ते असे :—

(१) चीनचें साम्राज्य; यांतच मंगोलिया, मांचूरिया आणि तिबेट यांचा समावेश होता. साम्राज्याचा हा प्रमुख विभाग असून कुब्लाईखानानें प्रस्थापित केलेल्या युआन राजवंशाचें तेथें राज्य होतें;

(२) तिकडे दूर पश्चिमेला रशिया, पोलंड व हंगेरीमध्यें मोंगलांच्या सोनेरी सेनेचें राज्य होतें. मोंगलांना तिकडे **सोनेरी सेना** (Golden Horde) म्हणत असत;

(३) इराण, मेसापोटेमिया, आणि मध्य आशियाचा कांहीं भाग या ठिकाणीं इल्खानाचें साम्राज्य होतें. हुलगूखानानें हें साम्राज्य स्थापन केलें होतें आणि त्यालाच सेल्जुक तुर्क खंडणी देत असत;

(४) मध्य आशियांत तिबेटच्या उत्तरेला बृहत् तुर्कस्तान या नांवानें प्रसिद्ध असलेला प्रदेश होता; तेथें झगताई शाखेचें राज्य होतें; आणि

(५) मंगोलिया आणि सोनेरी टोळीचें राज्य याच्या दरम्यान मोंगल लोकांचें सायबेरियांतील एक साम्राज्य होतें तें पांचवें.

अशा रीतीनें त्या महान् मोंगल साम्राज्याचे जरी विभाग पडले असले, तरी त्यांपैकीं प्रत्येक विभाग म्हणजे एकेक बलिष्ठ साम्राज्यच होतें.

६९

# महान् प्रवासी मार्को पोलो

२७ जून, १९३२

मोंगलांच्या बडे खानाच्या – कागानच्या काराकोरम येथील दरबाराबद्दल, म्हणजे त्या दरबारांत मोंगल लोकांची कीर्ति आणि त्यांच्या विजयाचें तेज याविषयीं आकर्षण वाटून व्यापारी, कारागीर, विद्वान् लोक, धर्मप्रचारक यांचे तांडेच्या तांडे कसे जमा होत असत याविषयीं, मीं तुला सांगितलें आहे. अशा लोकांनीं आपल्या दरबारीं यावें या गोष्टीला मोंगल लोक उत्तेजन देत असत, हेंही अशी मंडळी तेथें जमण्याचें एक कारण होतें. हे मोंगल लोक म्हणजे विलक्षण लोक होते. कांहीं बाबतींत ते अतिशय चतुर आणि हुषार होते, तर कांहीं बाबतींत अगदींच पोरकट होते. त्याचा तो क्रूरपणा आणि अत्याचारीपणा इतका जरी अंगावर शहारे आणण्याजोगा होता, तरी त्यांच्यातही एक प्रकारचा थोडा पोरकटपणाचा अंश होता. मला वाटतें, कीं त्यांच्यामधील या पोरकट-पणामुळेंच हे भयंकर योद्धेही एवढे आकर्षक भासतात. कितीएक शतकांनंतर या मंगोलियनांपैकीं – आपण हिंदुस्थानांत त्यांना मोंगल म्हणतों – एकानें हिंदुस्थान देश जिंकला. त्याचें नांव बाबर. याची आई चेंगीजखानाच्या घराण्यातील होती. हिंदुस्थान जिंकून झाल्यावरही त्याला काबूल येथील आणि त्याच्या उत्तरेकडील प्रदेशांमधील थंडगार हवा, फुलें, बागा, कलिंगडें यांच्याबद्दल मनांत नेहमीं हळहळ वाटत राहिली. हा मोठा गोड स्वभावाचा मनुष्य होता; आणि त्यानें ज्या आपल्या आठवणी लिहून ठेवल्या आहेत, त्यावरून आजच्या घटकेलासुद्धां तो एक मोठा मोहक आणि भला माणूस होता अशीच वाचणाराची भावना होते.

तेव्हां मी सांगत काय होतों, कीं परदेशांतून आपल्या दरबारांत भेटीला लोक यावेत या गोष्टीला हे मंगोलियन – मोंगल – लोक उत्तेजन देत असत. नवीन ज्ञान पैदा करावें अशी इच्छा त्यांना होती आणि या परदेशस्थ पाहुण्यांकडून पुष्कळ गोष्टी शिकून घ्याव्या असा त्यांचा उद्देश असे. मागें मीं सांगितलेलें आठवतच असेल तुला, कीं चेंगीजखानला लिहिणें म्हणून कांहीं प्रकार आहे ही गोष्ट समजतां-क्षणींच या कलेचें खरें मर्म त्याच्या लक्षांत आलें आणि ती कला शिकण्याबद्दल आपल्या अम्मलदारांना त्यानें हुकूम केला. त्याची बुद्धि नवीन संस्कार करून घेण्याला समर्थ होती, त्यांच्या मेंदूचीं दारें खुलीं होतीं. दुसऱ्यापासून शिकण्याला त्यांची तयारी होती. कुब्लाईखान पेकिंगमध्यें स्थिरस्थावर जेव्हां झाला आणि एक महान् प्रतिष्ठित चिनी बादशहा असें त्याला स्थान प्राप्त झालें, त्यानंतर परकी देशांतील प्रवाशांना आपल्या दरबारीं येण्याबद्दल त्यानें फार प्रोत्साहन दिलें. त्यामध्यें त्याच्याकडे व्हेनिस येथील दोन व्यापारी लांबचा प्रवास करून आले. निकोलो पोलो, आणि मॅफिओ पोलो

असे हे दोघे भाऊ होते. व्यापारधंद्याच्या शोधार्थ ते थेट बुखारापर्यंत येऊन पोंचले होते. तेथें इराणमध्यें हुलगू राजाकडे कुब्लाईखानानें पाठवलेले कांहीं वकील त्यांना भेटले. त्यांनीं त्यांचें मन आपल्या तांड्याला मिळण्यासाठीं वळविलें आणि अशा रीतीनें त्या वकिलांबरोबर पेकिंग येथील बडे खानाच्या दरबारीं ते येऊन पोंचले.

कुब्लाईखानानें निकोलो आणि मॅफिओ यांचें फार चांगलें स्वागत केलें; आणि त्यांनीं त्याला यूरप खंड, ख्रिस्तीधर्म व पोप यांबद्दल माहिती सांगितली. ही माहिती ऐकून कुब्लाईखानाच्या मनावर फार परिणाम झाला आणि त्याच्या मनाचा कल ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्याकडे झुकला. या पोलोबंधूंना कुब्लाईखानानें इ. स. १२६९ मध्यें यूरपमध्यें परत पाठविलें व त्यांच्याबरोबर पोपला एक संदेश पाठविला. त्यानें पोपला अशी विनंति केली, कीं बुद्धिमान्, साती कलांचें (विद्यांचें) ज्ञान असणारे आणि ज्यांना ख्रिस्ती धर्माचें समर्थन करण्याची शक्ति आहे असे शंभर शहाणे लोक आपल्याकडे पाठवावे. परंतु पोलोबंधू जेव्हां यूरपमध्यें परत आले, तेव्हां यूरप खंडाची आणि पोपची अवस्था कठिण झाल्याचें त्यांना आढळून आलें. त्यामुळें अशीं शंभर विद्वान् माणसेंच मिळणें अशक्य झालें. दोन वर्षें वाट पाहून मग दोन ख्रिस्ती फ्रायर्स—भिक्षू—बरोबर घेऊन ते परत पेकिंगला आले. येतेवेळेस त्यांनीं आपल्याबरोबर निकोलोचा मुलगा तरुण मार्को यालाही आणलें होतें, ही गोष्ट आपल्याला सगळयांत जास्त महत्त्वाची आहे.

हे तिघे पोलो या प्रचंड प्रवासाला निघाल्यानंतर त्यांनीं जमिनीच्या रस्त्यानें सारें आशिया खंड या टोंकापासून त्या टोंकापर्यंत ओलांडलें. केवढा प्रचंड आणि अवघड प्रवास होता तो सारा! आजसुद्धां हे पोलो ज्या मार्गानें आले त्या मार्गानें प्रवास करावयाचा म्हटलें, तर जवळजवळ एक वर्षाचा काळ लागेल. प्रथम ते पॅलेस्टाइनमधून आर्मीनियांत गेले; तेथून मेसापोटेमियांतून इराणच्या आखातांत गेले. त्या ठिकाणीं त्यांना कांहीं हिंदी व्यापारी भेटले. त्यानंतर इराण ओलांडून ते बाल्ख प्रातांत गेले, तेथून पर्वत ओलांडून पलीकडे काशगडला पोंचले; मग खोतान येथें आणि नंतर लोपनोर उर्फ चंचल तलावाशीं पोंचले. त्यानंतर पुन्हां तें निर्जन नापीक मैदान; तें ओलांडून मग ते चीनच्या पिकाऊ रानांत आणि तेथून पेकिंगला पोंचले. त्यांच्याजवळ या सर्व प्रवासामध्यें बिनहरकत चालणारा एक सदर परवाना होता; खुद्द बडे खानानें—कागाननें दिलेली हुकमाची सोन्याची चीप त्यांच्याजवळ होती.

प्राचीन रोमच्या साम्राज्याच्या काळीं सीरिया आणि चीन यांच्यामध्यें उंटांच्या तांड्यांचा हाच मार्ग होता. स्वीडनमधील संशोधक आणि प्रवासी स्वेन हेडिन यानें गोबीच्या मैदानांतून अलीकडे जो प्रवास केला त्याबद्दलचें वर्णन मीं नुकतेंच वाचलें. पेकिंग येथून निघून तो पश्चिम दिशेनें चालूं लागला; मैदान ओलांडून तो लोपनोर तलावाशीं आला, तेथून खोतानला गेला आणि तेथून मग पुढें चालूं लागला. प्रवासांत त्याच्याजवळ सर्व प्रकारची आधुनिक साधनसामग्री होती; आणि तरीसुद्धां त्याच्या

या स्वारींत त्याला पुष्कळ अडचणी आणि यातना सोसाव्या लागल्या. पोलो त्रिवर्गांनीं ७०० वर्षांपूर्वी आणि ह्युएन चँगनें १३०० वर्षांपूर्वी या मार्गानें प्रवास केला, त्या वेळीं केवढें भयंकर स्वरूप असेल त्या प्रवासाचें. स्वेन हेडिननें एक मौजेचा शोध लावला आहे. त्याला असें आढळून आलें आहे, कीं लोपनोरच्या तलावाची जागाच बदलली आहे. पुष्कळ काळापूर्वी, चवथ्या शतकांत, या तलावांत येऊन वाहणाऱ्या तारीन नदीचा प्रवाह बदलला आणि ताबडतोब वालुकामय मैदानांतील वाळूनें, नदीनें सोडलेला पहिला मार्ग भरून गेला. त्यामुळें तेथील त्या प्राचीन लौलान शहराचा बाहेरच्या जगाशीं अजीबात संबंध तुटून गेला, आणि तेथील रहिवाशांना एकाकी होऊन नाशाप्रत जावें लागलें. नदीचा प्रवाह बदलल्यामुळें अर्थातच तलावाचेंही स्थान बदललें ; त्याबरोबर जुन्या उंटांच्या तांड्यांचा आणि व्यापाराचा मार्गही बदलला. स्वेन हेडिनला असें आढळून आलें कीं, अगदीं अलीकडे, कांहीं थोड्याच वर्षांपूर्वी, तारीन नदीचा ओघ पुन्हां एकवार बदलला आहे आणि पूर्वीच्या ओघाच्या जागीं गेला आहे. त्याच्या पाठोपाठ तलावाचेंही स्थान पहिल्या ठिकाणीं गेलें आहे. पुन्हा आतां तारीन नदी पहिल्याप्रमाणें, पण आतां मोडून पडलेल्या लौलान शहराच्या बाजूनें वाहूं लागली असून आतां पुन्हां तो पूर्वीचा, १६०० वर्षें नांवा-पुरता पडून राहिलेला जुना तांड्यांचा मार्ग प्रचारांत येण्याचा संभव आहे. तारीन नदी आणि लोपनोरचा तलाव याच्या या हिंडंतीची ही एवढी हकीकत जी मीं तुला सांगितली आहे, ती पाण्याचे मार्ग बदलून किती मोठ्या अंतरावर जातात व त्यामुळें इतिहासाच्या ओघावरही कसा परिणाम होतो याची तुला थोडीशी कल्पना यावी, या हेतूनें. आपण पाहिलें आहे, कीं त्या प्राचीन काळीं मध्य आशियाचा प्रदेश लोकवस्तीनें नुसता गजबजलेला होता ; त्यांतील लोकांच्या लाटांवर लाटा पश्चिमेकडे आणि दक्षिणे-कडे जाऊन प्रदेश काबीज करीत होत्या. आज पाहावें तर तेथें सगळें वैराण रान आहे ; उगीच कोठें तुरळक लोकवस्ती आणि थोडींशीं गांवें आढळतात. संभव असा आहे, कीं त्या प्राचीन काळीं या प्रांतांत हल्लींपेक्षां पाणी फार विपुल होतें आणि त्या-मुळें तेथें पुष्कळ लोकवस्तीचें पोषण होण्यासारखें होतें. पुढें हवा अधिकाधिक रूक्ष होत गेली आणि पाणीही कमी झालें ; त्यामुळें लोकवस्तीही कमी होत जाऊन अखेरीस जवळजवळ नाहींशी झाली.

त्या काळच्या या लांबलांबच्या प्रवासांत एक फायद्याची गोष्ट होती. माणसाला त्यामध्यें एक किंवा अनेक नवीन भाषा शिकण्याला वेळ मिळे. त्रिवर्ग पोलोंना व्हेनिसहून पेकिंगपर्यंत पोंचण्यास साडेतीन वर्षें लागलीं; या दीर्घ अवधींत मार्कोनें मंगोलियन भाषेवर प्रभुत्व मिळविलें आणि चिनी भाषेवरही पण त्याच वेळीं त्यानें प्रभुत्व मिळविलें असावें असें दिसतें. कुब्लाईखानाची मार्कोवर फारच मर्जी बसली आणि मार्कोनें त्याच्या दरबारीं १० वर्षें नोकरी केली. खाननें त्याला प्रांताधिप करून चीनच्या निरनिराळ्या प्रदेशांत दरबारी कामगिरीवर पाठविलें. तरी पण मार्को आणि

त्याचा पिता यांना मायभूमीची फार ओढ लागली होती आणि व्हेनिसला जावें असें त्यांच्या फार मनांत होतें. तथापि, त्यासाठीं खानाची परवानगी मिळविणें इतकें सोपें काम नव्हतें. पण शेवटीं एकदां त्यांना परत जाण्याची संधि मिळाली. इराणमधील इलखान साम्राज्याचा मोंगलवंशीय राजा हा कुब्लाईखानाचा चुलतभाऊ होता. त्याची बायको वारली. त्याच्या मनांतून लग्न करावयाचें होतें. परंतु आपल्या जातीच्या बाहेरच्या कोणा स्त्रीशीं लग्न करणार नाहीं असें त्याच्या बायकोनें त्याच्याकडून वचन घेतलेलें होतें. म्हणून आरगाननें (हें त्याचें नांव होतें) पेकिंग येथें कुब्लाईखानाकडे वकील पाठवून आपल्या जमातीपैकीं योग्य अशी स्त्री आपल्याकडे पाठवून देण्याबद्दल विनंति केली.

कुब्लाईखानानें एका तरुण मंगोलियन राजकुमारीची निवड केली; आणि तिच्याबरोबरच्या स्वारीमध्यें त्यानें त्रिवर्ग पोलोंचा समावेश केला. कारण ते प्रवासांत फार अनुभवी होते. चीनच्या दक्षिणेंतून जलमार्गानें ते प्रथम सुमात्रांत गेले आणि तेथें त्यांनीं कांहीं काळ मुक्काम केला. त्या वेळीं सुमात्रा बेटांत श्रीविजयाचें बुद्धधर्मीय साम्राज्य चालू होतें, पण आतां त्याचा संकोच होऊं लागला होता. सुमात्राहून ही मंडळी दक्षिण हिंदुस्थानांत गेली. दक्षिण हिंदुस्थानांतील पांड्यांच्या राज्यामधील कायळ या बंदराला मार्को पोलोनें भेट दिली होती हें मीं तुला मागेंच सांगितलें आहे. ती राजकुमारी, मार्को आणि त्यांच्याबरोबरचा परिवार यांनीं हिंदुस्थानांत बराच लांब मुक्काम केला. त्यांना पुढें जाण्याची विशेषशी घाई नव्हतीसें दिसतें; त्यामुळें त्यांना इराणला पोंचण्यास दोन वर्षांचा अवधि लागला. दरम्यान वधूची वाट पाहत बसलेले नवरदेवच मरण पावले. बाकी त्यानें वाटही पुष्कळच पाहिली म्हणा! शिवाय तो मेला यांत विशेष वाईट असें कांहींच झालें नाहीं म्हटलें तरी चालेल. कारण त्या तरुण राजकुमारीचें मग अरगानच्या मुलाशीं लग्न झालें; आणि तोसुद्धां तिच्याहून बऱ्याच अधिक वयाचा होता.

त्रिवर्ग पोलो राजकन्येला तेथेंच सोडून कॉन्स्टान्टिनोपलच्या मार्गानें आपल्या मायदेशास परत गेले. ते व्हेनिस सोडून आले त्यानंतर चोवीस वर्षांनीं इ. स. १२९५ मध्यें ते पुन्हां व्हेनिसला पोंचले. त्यांना तेथें कोणीं ओळखलेंसुद्धां नाहीं. असें म्हणतात, कीं आपल्या जुन्या इष्टमित्रांवर आणि इतरही मंडळीवर आपल्या मोठे-पणाचा परिणाम करण्यासाठीं म्हणून त्यांनीं एक मेजवानी दिली; आणि मेजवानी ऐन रंगांत आली असतांना आपले मळकट, गचाळे आणि रूभरू कपडे त्यांनीं कापून उकलले. त्याबरोबर त्यांमधून हिरे, पांचू, लाल वगैरे प्रकारच्या मौल्यवान् रत्नांची नुसती धार लागून त्यांची भली मोठी रास झाली. तेव्हां पाहुणे मंडळी चकित होऊन गेली. इतकें होऊनसुद्धां चीन आणि हिंदुस्थानमधील आपल्या पराक्रमाबद्दल व धाडसी अनुभवांबद्दल पोलो मंडळी ज्या हकिगती सांगत त्यांवर फारसा कांहीं कोणाचा विश्वास बसत नसे. मार्को, त्याचा बाप, आणि चुलता हे वृथा अतिशयोक्ति करतात

असेंच त्या लोकांना वाटे. त्याना आपल्या छोट्याशा व्हेनिसच्या लोकसत्ताक राज्याची तेवढी माहिती होती; त्यामुळें चीन आणि आशिया खंडांतील इतर देश यांच्या आकारांची आणि संपत्तीची त्यांना कल्पनासुद्धां करतां येईना.

तीन वर्षांनंतर इ. स. १२९८ मध्यें व्हेनिसनें जिनोआ शहराशीं युद्ध सुरू केलें. हीं दोन्ही राज्यें दर्यावर्दी राज्यें असून त्या दोहोंत फार स्पर्धा होती. त्यामुळें त्यांच्यांत फार मोठें आरमारी युद्ध झालें. त्यांत व्हेनिसच्या लोकांचा पराभव झाला आणि त्यांच्यापैकीं हजारों जणांना जिनोआच्या लोकांनीं कैद केलें. या कैद्यांमध्यें आपला मित्र मार्को पोलो हा होता. जिनोआ येथें तुरुंगांत बसून त्यानें आपल्या सर्व प्रवासाचें वृत्त लिहिलें; अथवा खरें म्हणजे तोंडानें सांगून लिहविलें. अशा रीतीनें 'मार्को पोलोचे प्रवास' हा ग्रंथ अस्तित्वांत आला. तेव्हां, चांगलीं चांगलीं कामें करण्याला तुरुंग ही केवढी उपयोगी जागा आहे म्हणावयाची!

आपल्या प्रवास-वृत्तांतामध्यें मार्को पोलोनें विशेषतः चीन देश आणि त्यामध्यें त्यानें केलेले अनेक प्रवास यांचें वर्णन केलेलें आहे. त्याशिवाय कांहीं अंशीं सयाम, जावा, सुमात्रा, सिलोन, दक्षिण हिंदुस्थान यांचेंही त्यानें वर्णन केलें आहे. त्यानें चीन देशाच्या मोठमोठ्या बंदरांचें वर्णन केलें आहे. या बंदरांमध्यें पौर्वात्य प्रदेशातील सर्व देशांतून येणाऱ्या जहाजांची नेहमीं गर्दी असे; त्यांतलीं कित्येक इतकीं मोठीं असत, कीं त्यावर ३०० ते ४०० पर्यंत खलाशी असत. चीन देशाचें वर्णन तो एक ऐश्वर्य-संपन्न आणि वैभवशाली फुललेला देश असें करतो; त्यामध्यें अनेक शहरें आणि नगरें होतीं; रेशमी कापड, जरीचें कापड आणि नाना तऱ्हेचे रेशमी तलम कपडे (टाफेटा) तेथें तयार होत असत; तेथें सुंदर द्राक्षांचे मळे आणि मनोहर पिकांची शेती आणि बागा असत; एकूण एक रस्त्यावर "प्रवाशांसाठीं अत्युत्कृष्ट धर्मशाळा" (उतारगृहें) असत. साम्राज्याचे संदेश व टपाल पोंचविण्यासाठीं खास जासुदांची एक प्रकारची व्यवस्था होती असें त्यानें म्हटलें आहे. जागोजाग घोडे बदलून हे संदेश किंवा टपाल चोवीस तासांत ४०० मैल इतक्या वेगानें जाऊं शकत असे. हा वेग खरोखरच फारच समाधानकारक म्हटला पाहिजे. त्यानें असेंही आपल्याला सांगितलें आहे, कीं चीनमधील लोक जमिनींतून काळे दगड खणून काढीत आणि लांकडाच्याऐवजीं या दगडांचा जळणासाठीं उपयोग करीत. याचा स्वच्छ अर्थ असा आहे, कीं ते लोक दगडी कोळशाच्या खाणी चालवीत असत आणि दगडी कोळसा जळणासाठीं वापरीत असत. कुब्लाईखानानें कागदी नाणेंही प्रचलित केलें होतें. म्हणजे काय तर आज करतात त्याप्रमाणें त्यानें कागदाच्या नोटा काढून त्याबद्दल सोनें देण्याची जिम्मेदारी पत्करली होती. ही मोठीच लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे; कारण त्यावरून आधुनिक काळच्याप्रमाणें व्यवहारांत पतीचा उपयोग करण्याची पद्धति त्यानें अंगीकारलेली होती असें दिसून येतें. चीनमध्यें प्रेस्टर जॉन नांवाच्या एका राज्यकर्त्याच्या अमलाखालीं एक ख्रिस्ती वसाहत होती हें मार्को पोलोनें लिहिलेलें पाहून युरपांतील

लोकांना मोठा अचंबा वाटून तेथें खळबळही उडाली. मंगोलियामध्येंही कांहीं नेस्टेरियन ख्रिस्ती बहुधा असावेत असें वाटतें.

जपान, ब्रह्मदेश आणि हिंदुस्थान यांच्यासंबंधानेंही मार्कोनें लिहिलें आहे. त्यांत कांहीं गोष्टी त्यानें स्वतः पाहिलेल्या लिहिल्या आहेत, तर कांहीं ऐकलेल्या अशा लिहिल्या आहेत. मार्को पोलोचा हा प्रवासवृत्तांत त्या काळीं जसा मोठा मनोरंजक आणि अप्रतिम ग्रंथ वाटला तसाच तो आजही वाटतो. यूरपांतील लोक त्या वेळीं आपल्या एवंढ्याशा बंदिस्त प्रदेशांत राहत होते; आणि आपसांमध्यें त्यांचीं क्षुद्र भांडणें चालू होतीं; मार्को पोलोच्या ग्रंथानें अशा त्या लोकांचे डोळे चांगलेच उघडले. त्यावरून त्यांना अखिल जगाच्या विशालत्वाची, संपत्तीची आणि जगांतील अनेक चमत्कृतींची यथार्थ कल्पना आली. त्यामुळें त्यांची कल्पनाशक्ति उसळूं लागली, त्यांच्यां-तील साहसी वृत्तीला उत्थान मिळालें आणि त्यांच्यांतील द्रव्यलोभालाही चालना मिळाली. म्हणून मग त्यांचें लक्ष दर्यावर्दीपणाकडे अधिक लागलें. यूरप खंड आतां वाढीला लागलेलें होतें. त्यांतील नव संस्कृतीला स्वतःच्या पायानें चालतां येऊं लागलें होतें आणि मध्ययुगीन बंधनांतून सुटण्याची त्यांची धडपड सुरू झाली होती. प्रौढपणांत प्रवेश करूं पाहणाऱ्या युवकाप्रमाणें ते उत्साहानें भरून गेले होते. दर्यावर्दीपणाकडची ही जोराची प्रवृत्ति, संपत्ती व साहस यांच्यामागें लागण्याची धडपड यांमुळेंच पुढें यूरपीय लोक अमेरिकेंत जाऊन पोंचले; ते केप ऑफ गुडहोपला वळसा घालून पॅसिफिकमधून हिंदुस्थानांत गेले, चीनमध्यें गेले, आणि जपानमध्यें गेले. समुद्र हा जगाचा राजमार्ग होऊन गेला, आणि या खंडापासून त्या खंडापर्यंत वाहणारे उंटांच्या तांड्यांचे मार्ग कमी महत्त्वाचे होऊन गेले.

मार्को पोलो गेल्यानंतर बडा खान कुब्लाई हा लवकरच मरण पावला. चीनमध्यें त्यानें जो युआन राजवंश स्थापन केला होता तो त्याच्या पाठीमागें फार काळ टिकला नाहीं. मोंगल लोकांची सत्ता झपाट्यानें ऱ्हास पावली आणि चिनी राष्ट्रीय लोकांची या परकी सत्तेविरुद्ध एक लाट उसळली. साठ वर्षांच्या आंत दक्षिण चीनमधून मोंगल लोकांना हांकलून लावण्यांत आलें आणि एक चिनी गृहस्थ नानकिंगचा बादशहा म्हणून प्रस्थापित झाला. त्यानंतर आणखी बारा वर्षांत इ. स. १३६८मध्यें युआन राजवंशाचा अखेरचा पाडाव झाला. आणि मोंगल लोकांना चीनच्या प्रचंड भिंतीच्या पलीकडे पिटाळून लावण्यांत आलें. आतां दुसरा एक मोठा चिनी राजवंश, तैमिंग या नांवाचा, रंगभूमीवर प्रवेश करतो. या राजवंशाचा अम्मल चीनमध्यें फार दीर्घ काळपर्यंत, जवळजवळ तीनशें वर्षें चालू राहिला; हा काळ चांगला राज्यकारभार, भरभराट आणि सुसंस्कृतपणा यासाठीं प्रसिद्ध समजला जातो. या काळांत परकी देश जिंकण्याचे किंवा साम्राज्यशाही पराक्रम करण्याचे मुळींच प्रयत्न झाले नाहींत.

चीनमधील मोंगल साम्राज्य मोडून पडल्याचा परिणाम यूरप आणि चीन या-मधील संबंध तुटण्यामध्यें झाला. जमिनीवरील मार्ग या सुमारास सुरक्षित राहिलेले नव्हते आणि जलमार्ग अजून तितके चांगले प्रचारांत आले नव्हते.

## ७०
# रोमन धर्मपीठ लढाऊ बाणा स्वीकारतें

२८ जून, १९३२

चीनमध्यें शंभर विद्वान् लोक पाठविण्याबद्दल कुब्लाईखानानें पोपला निरोप पाठविलेला होता हें मीं तुला सांगितलेलें आहे. परंतु पोपला तसें कांहीं करतां आलें नाहीं. पोपची परिस्थिति त्या वेळीं फार कठिण होती. तुला आठवत असेल, कीं हा काळ म्हणजे दुसरा फ्रेडरिक बादशहा याच्या मृत्यूनंतरचा, ज्या वेळीं कोणी बादशहाच नव्हता असा इ. स. १२५० ते १२७३ पर्यंतचा काळ होय. मध्य यूरपची अवस्था त्या वेळीं फारच भयंकर होती; सगळीकडे बंडाळी माजलेली होती; दरोडेखोर लढवय्ये लोक जिकडे तिकडे लूटमार करीत होते. पुढें १२७३ मध्यें हॅप्सबर्ग घराण्यांतील रुडॉल्फ हा बादशहा झाला. परंतु त्यामुळें परिस्थिति फारशी कांहींच सुधारली नाहीं. इटली देश साम्राज्यांतून नाहींसा व्हायचा तो झालाच.

यूरपमध्यें राजकीय बंडाळीच माजून राहिली होती असें नव्हे; तर रोमन धर्मपीठाच्या दृष्टीनें पाहता धार्मिक बंडाळीचीही सुरुवात या वेळेला होऊं लागली होती असें म्हणतां येईल. लोक आतां पहिल्याइतके धर्मपीठाच्या आज्ञा सरळ सुतासारखे मानीत नाहींसे झाले होते. ते आतां हें कां, तें कसें, असे प्रश्न विचारूं लागले होते; त्यांना आतां शंका सुचूं लागल्या होत्या. आणि धार्मिक बाबतींत शंका ही फार धोक्याची गोष्ट आहे. आपण यापूर्वींच पाहिलें आहे, कीं प्रत्यक्ष दुसरा फ्रेडरिक बादशहा हा चार-चौघां शेजाऱ्यांशीं वागावें इतक्या बेफिकीर रीतीनें पोपशीं वागूं लागला होता आणि पोपनें बहिष्कार पुकारला तरी त्याची त्याला क्षिति वाटत नव्हती. त्यानें पोपशीं लेखी वाद सुद्धां सुरू करण्याला कमी केलें नाहीं; आणि या वादांत पोपला कांहीं म्हणावें असें यशही आलें नाहीं. यूरपांत त्या वेळीं दुसऱ्या फ्रेडरिकप्रमाणें दुसरे आणखी पुष्कळ शंकित लोक असले पाहिजेत. दुसरे आणखी असे पुष्कळ लोक होते, कीं ज्यांना अशा कांहीं शंका नव्हत्या किंवा धर्मपीठाच्या अथवा पोपच्या अधिकाराबद्दल अगर मागणीबद्दल त्यांचा विरोध नव्हता; परंतु धर्मपीठाच्या मोठमोठ्या अधिकारी मंडळींत जो अनाचार आणि जी चैन माजली होती, तिचा मात्र त्यांना फार तिटकारा वाटत होता.

इकडे खिस्ती धर्मयुद्धांमधील जोर मावळत जाऊन एक प्रकारचा अपेशाचाच कलंक त्यापासून पदरांत पडण्याचा प्रसंग आला होता. या युद्धाची सुरुवात केवढ्या मोठ्या उत्साहानें केली गेली होती; त्यांतून केवढ्या गोष्टी मिळविण्याची आशा राखलेली होती; परंतु त्यांपैकीं कोणतीच गोष्ट या युद्धांतून प्राप्त झाली नाहीं; अशा प्रकारच्या अपयशामुळें नेमका उलटा परिणाम घडत असतो. अशा रीतीनें धर्मपीठा-

विषयीं संपूर्णपणें समाधान व विश्वास मनांत न राहिल्यामुळें दुसरीकडून कुठून कांहीं आशेचा किंवा समाधानाचा किरण मिळतो का, हें पाहण्याची हळूहळू आणि अस्पष्टपणें लोकांची प्रवृत्ति होऊं लागली. परंतु या गोष्टीचा प्रतिकार धर्मपीठानें जबरदस्तीच्या मार्गानें केला; आणि लोकांना भयभीत करून, धाकदपटशा दाखवून, त्यांच्या मनावर धर्मपीठाची पकड कायम ठेवावयाची असे प्रकार त्यानें करण्यास सुरुवात केली. परंतु माणसाचें मन हें एक मोठें विचित्र प्रकरण आहे आणि याच्यापुढें पाशवी शक्तीचें हत्यार हें अगदींच दुबळें शस्त्र आहे, हें ते धर्मपीठाचे लोक विसरले. तेव्हां कोणाही व्यक्तीच्या किंवा गटाच्या अंतःकरणांतील सदसद्विवेकबुद्धीमध्यें उत्पन्न होणारी संशयाची हालचाल मुळांत दाबून टाकण्याची खटपट धर्मपीठानें सुरू केली; लोकांच्या मनातील शंकांचें समाधान करण्यासाठीं तर्कशास्त्र किंवा बुद्धिवाद यांचा त्यांनीं अवलंब केला नाहीं; तर त्यासाठीं त्यांनीं दंडा आणि सूळ हे उपाय अमलांत आणले.

आतां आपण ज्या काळाबद्दल बोलतों आहों त्याच्या आधीं किती तरी वर्षें, इ. स. ११५५ मध्येंच, धर्मपीठाच्या कोपाचा प्रसाद इटलीमधील ब्रेशिया गांवांतील आर्नोल्ड नांवाच्या एका लोकप्रिय आणि तळमळीच्या धर्मोपदेशकाला सोसावा लागला. त्याला पकडून फांशीं देण्यांत आलें; नंतर त्याचा देह जाळून त्याची राख टायबर नदींत फेकून देण्यांत आली; हेतु असा, कीं ती राखसुद्धां त्याचें स्मरण म्हणून कोणीं जवळ बाळगूं नये. शेवटपर्यंत आर्नोल्डची दृढता आणि शांति मात्र बिलकूल ढळली नाहीं.

पोप मंडळी एवढ्यावरच थांबली नाहींत. धार्मिक मतांच्या बाबतींत ज्यांचा पोपच्या पंथापेक्षां थोडासा कांहीं फरक होता, किंवा जे पाद्री लोकांच्या वर्तनाविषयीं फार टीका करीत असत, असे कांहीं ख्रिस्ती पोटपंथ किंवा कांहीं गट यांना सबंधच्या सबंध धर्मांतून बहिष्कृत करण्यापर्यंत त्यांनीं मजल गांठली. या अशा मंडळींविरुद्ध जणुं कांहीं प्रत्यक्ष धर्मयुद्धच पुकारण्यांत आलें आणि त्यांच्याविरुद्ध एकूण एक प्रकारचे क्रूरपणाचे आणि भयभीत करणारे जुलमी उपाय योजण्यांत आले. फ्रान्सच्या दक्षिणेंतील टुलूझ ॲल्बीज्वा उर्फ ॲल्बिजेन्सी पंथ आणि वाल्डो नांवाच्या मनुष्याच्या अनुयायांचा वाल्डेन्सी पंथ या लोकांना अशा रीतीनें छळण्यांत आलें.

या सुमाराला किंवा याच्या थोड्या पुढच्या काळांत ख्रिस्ती धर्माच्या एकूण इतिहासांत ज्याच्याकडे सगळ्यांत मन जास्त वेधतें असा एक मनुष्य होऊन गेला. असीसी येथील फ्रॅन्सिस नांवाचा हा गृहस्थ. मूळचा हा चांगला श्रीमंत होता. त्यानें आपल्या संपत्तीचा त्याग केला; गरिबीनें राहण्याचें व्रत घेतलें आणि आजारी व गरीब लोक यांच्या सेवेसाठीं तो जगांत भ्रमण करूं लागला. जगांत स्वाभाविकच महारोग्यांचे सगळ्यांत अधिक हाल होतात आणि त्यांची कोणी काळजीही घेत नाहींत; म्हणून त्यानें प्रमुखतः त्यांच्या सेवेला आपलें जीवन वाहिलें. त्यानें एक पंथ स्थापन केला; त्याला सेंट फ्रान्सिसचा पंथ असें नांव आहे; बुद्धधर्मांतील संघासारखा हा एक पंथ होता. फ्रॅन्सिस

जागोजाग हिंडे आणि धर्मोपदेश करी; आणि स्वतःची राहणी ख्रिस्तासारखी असावी असा सतत प्रयत्न करी. पुष्कळच लोक त्याच्याकडे येऊं लागले आणि त्यांतून बरेचसे त्याचे शिष्यही होऊं लागले. ख्रिस्ती धर्मयुद्धें चालू होतीं त्या वेळीं तो ईजिप्त आणि पॅलेस्टाइन या देशांमध्येंही जाऊन आला होता. परंतु त्या देशांतही फ्रॅन्सिस हा ख्रिस्ती असून सुद्धां, या मृदु आणि आदरणीय व्यक्तीला मुसलमानांनींही आदरानें वागविलें आणि त्याच्या कामांत कोणत्याही प्रकारचा त्रास किंवा अडथळा उत्पन्न केला नाहीं. इ. स. ११८१ पासून १२२६ पर्यंत हा त्याच्या आयुष्याचा एकंदर काळ. तो मेल्यानंतर त्याचा पंथ आणि ख्रिस्ती धर्मपीठाचे वरिष्ठ अधिकारी यांच्यामध्यें झगडा उत्पन्न झाला. त्याच्या पंथाच्या गरिबी राहणीवर जो एवढा विशेष कटाक्ष होता तो धर्मपीठाला फारसा रुचला नसावा. बहुतेक ख्रिस्ती धर्मांचेंच हें प्राथमिक अवस्थेंत असतां-वेळचें एक तत्त्व होतें; परंतु आतां वय वाढल्यावर ख्रिस्ती धर्मपीठाच्या अंगाला तें होईनासें झालें होतें. या प्रकरणांत इ. सन १३१८ मध्यें फ्रॅन्सिसच्या पंथाच्या चार अनुयायांना मार्सेल्स येथें जाळण्यांत आलें.

नुकताच कांहीं वर्षांपूर्वी असीसी या छोट्या शहरीं सेंट फ्रॅन्सिसच्या सन्मानार्थ एक मोठा उत्सव करण्यांत आला होता. याच वेळीं हा उत्सव कां करण्यांत आला होता हें मला आठवत नाहीं. बहुतेक त्याची ती सतशततसांवत्सरिक पुण्यतिथि असावी.

फ्रॅन्सिसच्या पंथाप्रमाणें, परंतु प्रवृत्तीनें या पंथाहून अगदीं निराळा असा दुसरा एक पंथ ख्रिस्ती धर्मपीठामध्यें निर्माण झाला. सेंट डॉमिनिक नांवाच्या स्पॅनिश साधूनें हा पंथ स्थापन केला म्हणून त्याला डॉमिनिकन पंथ असें म्हणतात. हा पंथ लढाऊ आक्रमक वृत्तीचा आणि धार्मिक श्रद्धेत सनातन (कर्मठ) परंपरेचा होता. त्यांच्या मताप्रमाणें धर्मश्रद्धेच्या रक्षणाच्या दृष्टीनें बाकी इतर गोष्टी अगदीं दुय्यम प्रतीच्या मानून चाललें पाहिजे असें होतें. आणि लोकांचें मन वळवून जर त्यांना या तत्त्वाचें आचरण करायला लावतां आलें नाहीं, तर जबरदस्तीनेंही तसें करण्यास हरकत नाहीं असा त्यांचा सिद्धांत होता.

इ. स. १२३३ मध्यें इतिहासांत इन्क्विझिशन या नांवानें ओळखली जाणारी धार्मिक न्यायदानाची संस्था निर्माण करून ख्रिस्ती धर्मपीठानें अगदीं अधिकृतपणें आणि पद्धतशीरपणें धार्मिक जुलुमाच्या राज्याला सुरुवात केली. इन्क्विझिशन हें एक प्रकारचें कोर्ट–न्याय देणारें मंडळ–होतें. त्यामध्यें लोकांचीं धार्मिक मतें सनातन ख्रिस्ती धर्मपीठाशीं कितपत जुळतीं आहेत याची चौकशी करण्यांत येई; आणि हीं मतें जर ठराविक कसोटीशीं जुळतीं नाहींत असें आढळून आलें, तर या कोर्टा-कडून शिक्षा फर्माविण्यांत येई. नेहमींची शिक्षा म्हणजे जाळून वध करणें ही असे. हेरेटिक म्हणजे धर्मविरोधी किंवा पाखंडी लोकांना शोधून काढण्यासाठीं शिकारी-सारखा कसून प्रयत्न करण्यांत येत असे. अशा रीतीनें शेंकडों लोकांना सुळाला बांधून

जाळण्यांत आलें. पण या जाळून मारण्यापेक्षांही अधिक भयंकर प्रकार म्हणजे आपल्या मताचा इन्कार करावा म्हणून लोकांचा जो छळ करण्यांत येई तो होता. कित्येक गरीब बिचाऱ्या दुर्दैवी स्त्रियांवर त्या चेटकी आहेत असा आरोप ठेवून त्यांना जाळून टाकण्यांत आलें. तथापि हा प्रकार सगळीकडेच, आणि त्यांतही इंग्लंड व स्कॉटलंड यामध्यें विशेषतः लोकांच्या जमावाकडून होत असे; इन्क्विझिशनच्या हुकुमावरून नव्हे.

पोपनें एक धर्माज्ञा काढून प्रत्येक व्यक्तीनें हेराचें काम केलें पाहिजे, अधर्मी, पाखंडी, माणसाबद्दल आपल्याला कळेल ती माहिती धर्मपीठाला पुरविण्याचें कार्य केलें पाहिजे असें फर्माविलें. रसायनशास्त्राच्या प्रयोगाला पोपनें मनाई केली; ही सैतानाची कला आहे असें त्यानें ठरविलें. एवढा हा सगळा जुलूम आणि अत्याचार जो चालला होता, तो खरोखर अगदीं प्रामाणिक बुद्धीनें चाललेला होता. अशा रीतीनें सुळाला बांधून मनुष्याला जाळण्यामुळें आपण त्या मनुष्याच्या आत्म्याला आणि इतर लोकांच्या आत्म्याला पतनापासून बचावीत आहोंत, अशी त्या लोकांची अगदीं खरी श्रद्धा होती. धर्माला वाहिलेल्या लोकांनीं असाच नेहमीं इतरांवर वरचढपणा केलेला, आणि आपलीं मतें दुसऱ्यावर जबरदस्तीनें लादलेलीं आढळून येतात; आणि असें करतांना प्रत्येक वेळीं आपण मोठीच लोकसेवा करीत आहों अशीच त्यांची श्रद्धा असते. देवाच्या नांवानें त्यांनीं लोकांचा वध केलेला आढळतो, अगदीं खून केलेला आढळतो; आणि 'अमर आत्म्या'ला वांचविण्याची भाषा करीत मर्त्य अशा देहाची मात्र राख करावयाला त्यांनीं केव्हां मागेंपुढें केलेलें आढळणार नाहीं. धर्माचा इतिहास एकंदरीनें वाईटच आहे. परंतु अगदीं राक्षसी, निर्दय क्रूरपणाच्या बाबतींत या इन्क्विझिशनवर ताण करूं शकेल, असें या असल्या वाईट इतिहासांत सुद्धां दुसरें कांहीं दाखवितां येणार नाहीं. आणि त्यांतही अत्यंत अचंबा करण्यासारखी गोष्ट ही, कीं या क्रूरपणाला जबाबदार असणाऱ्या मंडळींपैकीं बहुतेक सर्व लोकांनीं असा क्रूरपणा कोणत्याही प्रकारचा वैयक्तिक फायदा करून घेण्यासाठीं म्हणून नव्हे, तर आपण एक सत्कृत्य करीत आहों अशा अगदीं दृढ श्रद्धेनें केला!

साऱ्या यूरपभर पोप लोक हें असें जुलमाचें राज्य एकीकडे अनिर्बंधपणें सुरू करीत होते; पण त्याच वेळीं इकडे राजे-महाराजांचाही स्वामी अशी जी पोपच्या प्रभुत्वाची अवस्था होती, ती मात्र घसरत चालली होती; कोणा बादशहाला धर्मांतून बहिष्कृत करण्याचे, किंवा त्या भीतीनें आपल्यापुढें वांकविण्याचे त्यांचे दिवस आतां संपले होते. पवित्र रोमन साम्राज्यावर जेव्हा कठिण काळाची छाया पडली आणि त्या साम्राज्याला जेव्हां बादशहाच नाहींसा झाला अथवा तेथील बादशहा जेव्हां रोमशीं संबंध ठेवीतनासे झाले, त्या वेळीं फ्रान्सच्या राजानें पोपाशीं गडबड करण्याला सुरुवात केली. इ. स. १३०३ मध्यें पोपच्या कांहीं एका कृत्यामुळें या राजाला कोप आलेला होता. म्हणून त्यानें एक मनुष्य पोपकडे पाठविला आणि या माणसानें पोपच्या राजवाड्यांतील त्याच्या शयनागारांत जबरदस्तीनें शिरून

पोपचा त्याच्या तोंडावर अपमान केला. पण या अपमानास्पद वागणुकीबद्दल कोणत्याही देशांत नापसंती व्यक्त करण्यांत आली नाहीं. कोठें हा प्रकार आणि कोठें कॅनोसा येथें एका बादशहाला अनवाणी यावें लागलें होतें हा प्रकार ; तुलना करून पाहा !

यानंतर कांहीं वर्षांनीं इ. स. १३०९ मध्यें एक फ्रेंच मनुष्य पोप झाला व त्यानें फ्रान्समध्यें ॲव्हिग्नान येथें आपलें निवासस्थान केलें. या ठिकाणीं १३७७ सालापर्यंत पोपांची वसती होती ; आणि येथें त्यांच्यावर फ्रेंच राजांचें वर्चस्व असे. याच्या पुढच्या वर्षी १३७८ मध्यें कार्डिनल्सच्या संघांत (कॉलेजमध्यें) फूट झाली. या फुटीला ( Great Scism ) महान् फूट असें म्हणतात. कार्डिनल्सच्या दोन्ही बाजूंनीं दोन पोपांची निवड केली. एक पोप रोम येथें राहूं लागला व रोमचा बादशहा आणि उत्तर यूरपमधील बहुतेक देश यांनीं त्याला मान्यता दिली. दुसऱ्या पोपला ॲंटिपोप, पोप-विरोधक, असें म्हणूं लागले. हा ॲव्हिग्नॉन येथें राहूं लागला व फ्रान्सचा राजा आणि त्याचे कांहीं मांडलिक यांचा त्याला पाठिंबा मिळाला. असा हा प्रकार चाळीस वर्षें चालला. या दरम्यान पोप आणि पोपविरोधक एकमेकांना शिव्याशाप देत होते, आणि एकमेकांना धर्मबाह्य ठरवीत होते. १४१७ मध्यें या दोन पक्षांत तडजोड झाली आणि दोन्ही पक्षांनीं नवीन निवडलेला एकच पोप रोममध्यें राहूं लागला. परंतु दोन पोपामधील या ओंगळ तंट्याचा यूरपमधील लोकाच्या मनावर फार मोठा परिणाम झाला असला पाहिजे.

स्वतःला पृथ्वीवरील देवाचे प्रतिनिधी ( Vicar ), देवाचे अवतार म्हणविणारे हे लोकच जेव्हां अशा रीतीनें वर्तन करूं लागले, तेव्हां त्यांच्या पवित्रपणाबद्दल आणि सद्बुद्धीबद्दल लोकाच्या मनांत शंका उत्पन्न झालीच असली पाहिजे. अशा रीतीनें या भांडणामुळें धार्मिक सत्तेचे हुकूम आधळेपणानें पाळण्याच्या लोकांच्या प्रवृत्तीला आळा बसण्यास फार मोठी मदत झाली. परंतु लोकांना या बाबतींत अजून पुष्कळच मोठे धक्के बसायला हवे होते.

ख्रिस्ती धर्मपीठावर अगदीं निर्भयपणें आणि आनिर्बंधपणें टीका करण्याला सुरुवात विक्लिफ नांवाच्या एका इंग्रज मनुष्यानें केली. हा स्वतः एक धर्मोपदेशक असून ऑक्स्फर्ड विद्यापीठांत प्राध्यापक होता. बायबलचा पहिला इंग्रजी भाषांतर-कार म्हणून हा विख्यात आहे. जिवंतपणीं रोमच्या धर्मपीठाच्या कोपांतून तो कसाबसा बचावला ; परंतु त्याच्या मृत्यूनंतर एकतीस वर्षांनीं चर्च कौन्सिलनें त्याचीं हाडें उकरून काढून तीं जाळून टाकण्याचा हुकूम दिला. आणि हा हुकूम प्रत्यक्ष अमलांतही आला !

अशा रीतीनें विक्लिफचीं हाडें अपवित्र ठरवून जाळून टाकण्यांत आलीं खरीं, परंतु त्याच्या मतांची कांहीं इतकी सहज गळचेपी करतां आली नाहीं ; त्या मतांचा प्रसार वाढतच गेला. हीं मतें दूरवर बोहेमियापर्यंत म्हणजे आज ज्याला झेकोस्लोव्हाकिया म्हणतात त्या देशापर्यंत पोंचलीं आणि जॉन हस नांवाच्या गृहस्थाच्या मनांत त्यांचें

ठाणें बसलें. हाच गृहस्थ पुढें प्राग येथील विश्वविद्यालयाचा प्रमुख झाला. त्याच्या या मतासाठीं पोपनें त्याला धर्मातून बहिष्कृत म्हणून जाहीर केलें. परंतु त्याच्या राहत्या छोट्या गांवीं त्याचें कोणी कांहीं वांकडें करूं शकत नव्हतें; कारण तेथें तो फार लोकप्रिय होता. म्हणून पोपच्या लोकांनीं त्याला कपट करून फशीं पाडलें. स्वित्झर्लंडमध्यें कॉन्स्टन्स येथें चर्च कौन्सिलची एक बैठक भरावयाची होती. त्या बैठकीसाठीं त्याला आमंत्रण देण्यांत आलें. आणि त्याच्या तेथें जाऊन येण्यापर्यंतच्या दरम्यानच्या सुरक्षिततेची हमी प्रत्यक्ष बादशहानें घेतली. तो तेथें गेला. त्याला आपली चूक कबूल करण्याबद्दल तेथें सांगण्यांत आलें. स्वतःच्या मनाचें समाधान झालेलें नसतांना तसें करण्याचें त्यानें नाकारलें. आणि मग हमी दिलेली असूनही तिची फिकीर न करतां त्याला जिवंत जाळण्यांत आलें. इ. स. १४१५ मधील ही गोष्ट. हस हा फार धैर्यवान् गृहस्थ होता. स्वतःला जी गोष्ट असत्य वाटते तिला मान्यता देण्याऐवजीं त्यानें इतकें हें दुःखकारक मरण पत्करलें. मतस्वातंत्र्य आणि भाषणस्वातंत्र्य यासाठीं हुतात्मा म्हणून त्यानें आपले प्राण दिले. झेक लोकांचा तो एक विभूतिमान् वीर पुरुष असून आजही झेकोस्लोव्हाकियांत त्याचें स्मरण लोक मोठ्या आदरानें करतात.

हुतात्मा जॉन हसचा प्राणयज्ञ कांहीं व्यर्थ गेला नाहीं. त्याच्या बोहेमियांतील अनुयायांमध्यें बंडाची आग पेटविणारी ती ठिणगीच ठरली. पोपनें त्या लोकांविरुद्ध धर्मयुद्ध पुकारलें. धर्मयुद्ध पुकारणें हें अगदींच बिनखर्ची स्वस्त कार्य होतें आणि त्याचा फायदा घ्यावयास टपलेले वाटेल तेवढे बदमाष आणि पुंड लोकही होतेच. एच्. जी. वेल्स्नेंच आपल्याला सांगितलें आहे, कीं या धर्मयुद्धांतील वीरांनीं आपल्या लोकांवर "अत्यंत भयंकर असे अंगावर शहारे आणणारे अत्याचार केले." परंतु हसपंथीय लोकांचें सैन्य जेव्हां आपलें रणगीत गात या वीरांवर चालून आलें, तेव्हा ते सारे ख्रिस्ती धर्मवीर वाऱ्यावर उडून गेले. आलेल्या मार्गानें ते वेगानें निघून गेले. गरीब बिचाऱ्या निरपराध खेडेगांवच्या लोकांची लूटमार करण्याचा प्रसंग होता, तोंपर्यंत त्या वीरांच्या ठिकाणीं मोठें लष्करी तेज स्फुरत होतें; परंतु शिस्तीचें सैन्य समोर येतांक्षणींच त्यांनीं पळ काढला.

अशा रीतीनें एकतंत्री, जुलमी आणि कर्मठ, आग्रही धर्माविरुद्ध हल्ले आणि बंडें सुरू होऊन तीं साऱ्या यूरप खंडभर पसरलीं; त्यामुळें यूरप खंडांत वेगवेगळे लष्करी तट पडले आणि त्यांतून ख्रिस्ती धर्माचे कॅथॉलिक आणि प्रॉटेस्टंट असे दोन पंथ पडून ख्रिस्तधर्मीयांत फूट झाली.

## ७१

# जोहुकुमी अमलाविरुद्ध झगडा

३० जून, १९३२

मला वाटतें यूरपांतील या ज्या धार्मिक झगड्यांच्या हकीकती मीं लिहिल्या आहेत, त्या तुला थोड्याशा कंटाळवाण्या वाटतील. पण या हकिकती महत्त्वाच्या आहेत. कारण आधुनिक युगातील यूरप खंड कसें बनत गेलें हें त्यावरून समजून येतें. यूरप खंडाचें संपूर्ण ज्ञान होण्याला आपल्याला त्यांचा उपयोग होतो. चौदाव्या शतकांत आणि त्यानंतर जो धर्मस्वातंत्र्यासाठीं यूरपमध्यें झगडा वाढत गेलेला आपणांस आढळतो आणि राजकीय स्वातंत्र्यासाठीं झगडा जो याच्या पाठोपाठच झालेला आपणास दिसून येणार आहे, ते हे दोन्ही झगडे खरोखर एकाच प्रकारच्या झगड्याचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत. सत्ताधीश आणि त्यांचा जोहुकमी अम्मल – अधिकारी आणि सर्वाधिकारशाही यांच्याविरुद्ध हा झगडा होय. पवित्र रोमन साम्राज्य काय किंवा पोपचें धर्मपीठ काय, दोन्ही एकतंत्री सत्तेचींच निरनिराळीं रूपें असून मनुष्यांमधील तेज, स्वत्व, चुरडून टाकण्याचा त्या दोहोंचा प्रयत्न होता. बादशहा हे दैवी अधिकारामुळेंच बादशहा झालेले; पोपच्या बाबतींत तर बादशहांपेक्षांही ही गोष्ट अधिकच खरी; कोणालाही या गोष्टीबद्दल शंका घेण्याचा अधिकार नाहीं, किंवा वरून झालेला हुकूम अमान्य करण्याचाही कोणाला अधिकार नाहीं, अशी त्यांची भूमिका होती. आज्ञापालन हा या तत्त्वज्ञानाप्रमाणें फार मोठा सद्‌गुण. कोणींही स्वतंत्र विचाराचा आश्रय करणें, धर्मतत्त्वाबद्दल स्वतःचा म्हणून कांहीं निश्चय करणें हें सुद्धां पाप समजलें जाई. त्यामुळें एका बाजूला आंधळें आज्ञापालन आणि दुसऱ्या बाजूला स्वातंत्र्य यांच्यामधील हा अगदीं उघड खडा विरोध किंवा तंटा होता. यूरपमध्यें विचार-स्वातंत्र्यासाठीं कित्येक शतकें एक झगडा चालू राहिला; तसाच पुढें राजकीय स्वातंत्र्यासाठींही. यशापयाचें पारडें पुष्कळ वेळा खालींवर हेलकावे खातां खातां आणि पुष्कळच हाल व यातना सोसल्यानंतर थोड्याफार प्रमाणांत या झगड्यांत यश प्राप्त झालें. परंतु, झालें; आपल्याला यश मिळालें अशी कोठें लोक थोडीशी आपापली पाठ थोपटताहेत तोंच सगळ्यांना आढळून आलें, कीं नाहीं, तसें समजण्यांत आपली चूक होत आहे. लोकांना दिसून आलें, कीं खरें स्वातंत्र्य हें आर्थिक स्वातंत्र्याशिवाय, जोंपर्यंत दारिद्र्य शिल्लक आहे तोंपर्यंत, अस्तित्वांत येऊंच शकत नाहीं. भुकेनें मरणाऱ्या माणसाला तूं स्वतंत्र मनुष्य आहेस म्हणून सांगणें म्हणजे त्याची थट्टा करण्यासारखें आहे. तेव्हां पहिल्या झगड्यानंतरची पुढची पायरी म्हणजे आर्थिक स्वातंत्र्यार्थ झगडण्याची पाळी आली आहे आणि हा झगडा साऱ्या जगभर चालू आहे. एकाच देशांत मात्र सामान्यतः लोकांनीं आर्थिक स्वातंत्र्य मिळविलेलें आहे. असें म्हटलें

पाहिजे ; हा देश म्हणजे रशिया अथवा जास्त बिनचूक बोलावयाचें तर सोव्हिएट यूनियन हा होय.

हिंदुस्थानमध्यें असा विचारस्वातंत्र्यासाठीं केव्हांच झगडा झालेला आढळत नाहीं. कारण अगदीं पूर्वीच्या काळापासून विचारस्वातंत्र्याचा हक्क हिंदुस्थानात कधीं नाकारण्यांत आल्याचेंच दिसत नाहीं. कोणालाही कोणत्याही गोष्टीवर किंवा विचारावर श्रद्धा ठेवण्याला सवड असे ; कोणावर कसलीही सक्ती नव्हती. या देशामध्यें तर्कशास्त्र, बुद्धिवाद आणि चर्चा यांच्या साह्यानें लोकांचें मतपरिवर्तन करण्याची पद्धति होती; दंडाच्या किंवा सुळाच्या साह्यानें नव्हे. अधूनमधून केव्हां केव्हां सक्तीचा किंवा जुलुमाचा अवलंब करण्यांत आला असेल, हें अर्थातच मान्य केलें पाहिजे ; परंतु प्राचीन आर्यांच्या तत्त्वज्ञानांतच विचारस्वातंत्र्याचा अधिकार मान्य करण्यांत आला आहे. मात्र या स्वातंत्र्याचा परिणाम सर्वस्वीं चांगला झाला नाहीं हें विचित्र वाटलें, तरी खरें आहे. तत्त्वतः स्वातंत्र्याबद्दल खात्री असल्यामुळेंच लोक या स्वातंत्र्याबद्दल तितके जागरूक राहिले नाहींत, आणि हळूहळू अवनत स्थितीस पोंचलेल्या धर्मामध्यें जें कर्मकांड, संस्कार, उत्सव आणि लोकभ्रम निर्माण होत असतात, त्या सर्वांच्या सांपळ्यांत ते कमीजास्त प्रमाणांत अडकले गेले. त्यांच्यामध्यें अशा प्रकारची एक धार्मिक विचारप्रणाली निर्माण झाली कीं त्यामुळें प्रगतिप्रथावर ते फारच मागें खेंचले गेले आणि धार्मिक सत्तेचें गुलामीपण त्यांच्या अंगीं उत्पन्न झालें. या देशांत ही धार्मिक सत्ता एखाद्या पोपच्या किंवा अशा दुसऱ्या कोणा एका व्यक्तीच्या ठिकाणींच नव्हती, तर "वेदादि पवित्र धर्मग्रंथ" परंपरा आणि रूढि यांची ती सत्ता होती. त्यामुळें तोंडानें जरी आम्ही विचारस्वातंत्र्याच्या बाता मारीत असलों आणि आमच्या देशांत तें आहे म्हणून स्वतःची मोठी फुशारकी मारीत असलों, तरी खरोखर त्या स्वातंत्र्यापासून आम्ही फार दूर होतों आणि आमचे प्राचीन धर्मग्रंथ आणि रूढि यांनीं आमच्या मनावर ठसविलेल्या कल्पनांच्या आम्ही पुरे आहारीं गेलेले होतों. अधिकारी आणि अधिकारशाही यांचाच आमच्यावर अम्मल बसला असून त्यांच्याच कबजांत आमची बुद्धीही गेली होती. आपल्या शरीराला क्वचित् एखादे वेळीं बांधणाऱ्या शृंखला या तर वाईट खऱ्याच, परंतु अशा या बुद्धीला कायम जखडून टाकणाऱ्या कल्पनांच्या आणि दुर्ग्रहांच्या शृंखला या त्याहून फारच वाईट. आमच्या आम्हीच या शृंखला निर्माण करीत असतों, आणि पुष्कळदां आपल्याला याबद्दल चांगली जाणीव असूनही त्या शृंखलांची आपल्यावरील भयंकर पकड ढिली होत नाहीं.

मुसलमान लोक जेव्हां हिंदुस्थानमध्यें स्वारी करणारे विजेते म्हणून आले, तेव्हां या देशांत धर्माच्या बाबतींत सक्तीचा भाग थोडासा निर्माण झाला. तेव्हांचा जो झगडा होता तो खरोखर जित आणि जेते यांच्यामधील राजकीय झगडा होता; परंतु त्याच्यावर एक प्रकारचा धार्मिकतेचा रंग चढलेला होता ; आणि केव्हां केव्हां धार्मिक जुलूम घडूनही.आलेला आहे. परंतु इस्लामधर्मांचा पाठिंबा अशा प्रकारच्या जुलुमाला होता

असें समजणें मात्र चुकीचें आहे. इ. स. १६१० मध्यें उरल्या सुरल्या आरबी लोकांना स्पेनमधून हांकलून लावण्यांत आलें; त्या वेळीं त्या लोकांबरोबर गेलेल्या एका स्पॅनिश मुसलमानानें दिलेल्या व्याख्यानाचा एक मोठा लक्ष देण्याजोगा अहवाल आपल्याला उपलब्ध आहे. इन्क्विझिशनच्या कोर्टाचा निषेध करून तो म्हणतो, “ आमच्या विजयी पूर्वजांनीं स्पेनमधून ख्रिश्चन धर्माचा उच्छेद करण्याचा प्रयत्न तशी त्यांच्या अंगीं शक्ति असूनही केव्हां तरी केला आहे काय? तुमच्या पूर्वजांना जरी शृंखला घालाव्या लागत होत्या, तरी त्याही स्थितींत त्यांना आपलीं सर्व धर्मकृत्यें करण्याला त्यांनीं सवलत ठेवली नव्हती काय? जबरदस्तीनें धर्मांतर करविल्याचीं कांहीं उदाहरणें असलीं, तरी तीं इतकीं क्वचित् घडलेलीं आहेत कीं त्यांचा उल्लेख सुद्धां करण्याचें कारण नाहीं. ज्या कोणी माणसांनीं असें करण्याचा प्रयत्न केला त्यांच्या दृष्टी-समोर परमेश्वर आणि पैगंबर याची भीति नव्हती, आणि तसें करताना हे लोक इस्लाम-धर्माच्या सर्व पवित्र आज्ञांच्या आणि नियमांच्या अगदीं पूर्ण विरुद्ध आचरण करीत होते; धर्मलंडपणा केल्याखेरीज ज्याला मुसलमान हें सामान्य विशेषण आपल्याला लावून घ्यावयाचें असेल, अशा कोणालाही असें वर्तन करता येणें शक्य नाहीं. कोणत्याही प्रकारें तुमच्या अत्यंत निंद्य अशा इन्क्विझिशनसारखें केवळ धर्मश्रद्धेच्या बाबतींतील मतभेदासाठीं असें एखादें रक्तपिपासू न्यायमंडळ तुम्हांला आमच्या लोकांत कधींच निर्माण करतां येणार नाहीं. ज्यांना आमच्या धर्माचा स्वीकार करण्याची इच्छा होईल, त्याला आमच्या धर्मांत घेण्यासाठीं आमचे हात सदैव अर्थातच सिद्ध आहेत; पण आमच्या पवित्र कुराणाप्रमाणें कोणाच्याही सदसद्विवेक बुद्धीवर जुलूम करण्याची आम्हांला मुभा नाहीं.”

तात्पर्य काय, कीं धार्मिक उदारपण आणि विचारस्वातंत्र्य या ज्या आमच्या प्राचीन भारतीय जीवनांतील विशेष लक्षांत घेण्यासारख्या गोष्टी त्या कांहीं प्रमाणांत आमच्या हातून निसटून नाहींशा झाल्या, तर तिकडे यूरपांतील लोकांनीं जगाच्या प्रगतीच्या शर्यतींत आम्हांला गांठून पुष्कळ पुढें प्रगति केली; आणि पुष्कळशा झगड्यानंतर हींच तत्त्वें त्यांनीं आपल्या स्वतःच्या जीवनांत प्रस्थापित केलीं. आज कधीं कधीं हिंदुस्थानांतच धार्मिक झगडे निर्माण होत असतात; येथेंच हिंदू आणि मुसलमान एकमेकांशीं लढतात आणि एकमेकांचे जीव घेतात. हें खरें, कीं असें हें कांहीं ठिकाणींच आणि अगदींच क्वचित् प्रसंगीं घडून येतें; आणि बहुतेक काळ आम्ही लोक शांततेंत आणि मैत्रींतच घालवीत असतों; कारण आमचे खरे हितसंबंध अगदीं एकच आहेत. धर्माच्या नांवानें कोणाही हिंदूनें मुसलमान बांधवाशीं किंवा मुसलमानानें हिंदु बांधवाशीं लढणें ही लज्जास्पद गोष्ट आहे. आपण हा प्रकार बंद करणें आवश्यक आहे आणि जरूर आम्ही तो बंद करूंच. परंतु धर्माच्या सोंगाखालीं रूढि, परंपरा आणि अंधश्रद्धा यांच्या कोडबोळ्यानें व्यापलेल्या ज्या विचारप्रणालीच्या शृंखलेनें आम्ही बांधले गेलों आहों, त्यांतून आम्हीं सुटणें ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे.

धार्मिक उदारतेच्या बाबतींत त्याप्रमाणेंच राजकीय स्वातंत्र्याच्या बाबतींतही सुरुवातीला हिंदुस्थाननें चांगली आघाडी मारली होती. आमच्याकडील स्वतंत्र ग्राम-राज्यांची तुला आठवण असेलच; तसेंच पहिल्या पहिल्या काळीं राजाची सत्ता मर्यादित असल्याबद्दलची इकडे कशी कल्पना होती हेंही तुझ्या ध्यानांत असेल. यूरपांतील राजांच्याप्रमाणें राजांचे कसलेही दैवी अधिकार या देशांत अस्तित्वांत नव्हते. आमची सर्व समाजरचना ही ग्रामीण स्वातंत्र्यावर आधारलेली असल्यामुळें राजा कोण आहे याबद्दल लोकाना फिकीर नसे. त्यांची स्थानिक स्वतंत्रता जोंपर्यंत सुरक्षित होती, तोंपर्यंत वर कोणाचा अधिकार चालू आहे याची काळजी करण्याचें त्या लोकांना काय कारण होतें? परंतु ही अगदीं धोक्याची आणि मूर्खपणाची कल्पना होती. हळूहळू वरच्या या अधिकाऱ्यांनीं आपलें सामर्थ्य वाढविलें आणि खेडेगांवाच्या स्वातंत्र्यावर आक्रमण केलें. लौकरच आमच्या येथें सर्वेसर्वा एकतंत्री राजांचा काळ निर्माण झाला आणि खेडेगांवचें स्वराज्यही राहिलें नाहीं; आणि वरपासून खालपर्यंत स्वातंत्र्याची छटासुद्धां कोठें राहिली नाहीं.

७२

## मध्ययुगाचा अंत

१ जुलै, १९३२

तेराव्या शतकापासून पंधराव्या शतकाच्या दरम्यानच्या काळांतील यूरप खंडाकडे आपण पुन्हां एकदां नजर टाकूं या. या काळात त्या खंडामध्यें प्रचंड बंडाळी आणि अत्याचार यांचें साम्राज्य माजलें होतें. हिंदुस्थानांतील परिस्थिति पण बरीचशी वाईटच होती; तथापि यूरप खंडाशीं तुलना करतां हिंदुस्थानांत शांतताच होती असेंच बहुतेक कोणालाही म्हणतां येईल.

मंगोलियन लोकांनीं आपल्याबरोबर बंदुकीची दारू यूरप खंडांत नेली आणि तेव्हांपासून या काळांत तेथें आगफेकी हत्यारें वापरण्यास सुरवात झाली. आपल्या बंडखोर दुय्यम सरदारांना चिरडून टाकण्यासाठीं राजेलोकांनीं या हत्यारांचा उपयोग करण्यास सुरुवात केली. त्या कामीं शहरामध्यें निर्माण झालेल्या नवीन व्यापारी-वर्गांनीं राजे लोकांना मदत केली. या सरदार लोकांना आपापसांमध्यें आपल्या कांहीं खासगी कारणासाठीं लढाया करण्याची संवय असे. त्यामुळें त्यांची शक्ति तर कमी होत गेलीच, परंतु त्यांच्या आसपासच्या खेडेगांवांनाही त्यामुळें फार यातना सोसाव्या लागूं लागल्या. राजाची जशी शक्ति वाढत गेली, तसतशा सरदारांमधील या

लढाया त्यानें बंद करून टाकल्या. कांहीं ठिकाणीं तर राजपदासाठीं स्पर्धा करणाऱ्या दोन गटांमध्येंच आपसात यादवीही झाली. उदाहरणार्थ, इंग्लंडमध्यें यॉर्कचें घराणें आणि लँकेशायरचें घराणें अशा दोन घराण्यांमध्यें हा झगडा झाला. त्यांपैकीं प्रत्येक पक्षानें गुलाबाचें फूल आपल्या पक्षाचें चिन्ह म्हणून धारण केलें होतें. एका पक्षानें पांढऱ्या गुलाबाचें, तर दुसऱ्या पक्षानें तांबड्या गुलाबाचें. म्हणून त्यांच्यामधील युद्धांना 'गुलाबांचीं युद्धें' असें नांव मिळालेलें आहे. या आपसांतील यादवीमध्यें पुष्कळच मांडलिक सरदार मारले गेले. ख्रिस्ती धर्मयुद्धांमध्येंही आणखी असेच पुष्कळ सरदार मेले. अशामुळें हळूहळू या सरंजामदार सरदारांची सत्ता नियंत्रित झाली. त्यांचा अनियंत्रित कारभार बंद झाला. परंतु त्याचा अर्थ सत्ता या सरदारांच्या हातून लोकांच्या हातीं आली असा मात्र नव्हे. त्यामुळें सत्ता अधिक वाढली ती राजाची. सरदारांतील खासगी लढाया बंद झाल्यामुळें जी काय थोडी परिस्थिति सुधारली तेवढी सोडली, तर लोकांची स्थिति आहे तीच राहिली. राजा मात्र जास्त जास्त सर्वसत्ताधीश आणि एकतंत्री राज्यकर्ता होत गेला. राजा आणि नवीन व्यापारीवर्ग यांच्यामधील झगडा अजूनपर्यंत सुरू झाला नव्हता. तो या पुढच्या काळांत व्हावयाचा होता.

युद्धें आणि कत्तली याच्यापेक्षांही इ. स. १३४८ मध्यें यूरप खंडांत उद्भवलेला महान् साथीचा रोग – प्लेग – हा फारच जास्त भयंकर होता. रशिया आणि आशिया मायनरपासून तों थेट इंग्लंडपर्यंत साऱ्या यूरप खंडावर या रोगाची सांथ पसरली होती. एवढेंच नव्हे, तर ईजिप्त, उत्तर आफ्रिका, मध्य आशिया या प्रदेशांपर्यंत जाऊन मग ती पश्चिमेकडे पसरली. इंग्लंडमधील सुमारें एक-तृतीयांश लोकसंख्या या रोगांत मरण पावली. चीन आणि इतर देशांतही मृत्युसंख्या अशीच डोळे फिरविण्याइतकी प्रचंड होती. आश्चर्याची गोष्ट मात्र ही, कीं हिंदुस्थानांत ही सांथ पसरली नाहीं.

या भयंकर संकटामुळें लोकसंख्या फारच रोडावली आणि जमिनीची लागवड करण्याला पुरेशीं माणसें पुष्कळ ठिकाणीं शिल्लक राहिलीं नाहींत. मनुष्यसंख्याच कमी झाल्यामुळें मजुराच्या वेतनामध्यें पूर्वींच्या अगदींच दैन्यवाण्या दरांच्या मानानें पुष्कळच वाढ होऊं लागणें स्वाभाविक होतें. परंतु कायदेमंडळें पडलीं जमीनमालक आणि संपत्तिमान् लोकांच्या हातांत. त्यामुळें त्यांनीं लोकांनीं पूर्वींच्याच त्या क्षुद्र दैन्यवाण्या मजुरीच्या दरांत काम केलें पाहिजे, अधिक मजुरी मागतां उपयोगी नाहीं, अशा प्रकारचे कायदे केले. पिळणूक आणि दारिद्र्याचें ओझें असह्य झाल्यामुळें शेतकऱ्यांनीं आणि गरीब लोकांनीं बंडें केलीं. सर्व पाश्चिम यूरप खंडभर एकामागून एक हीं अशीं शेतकऱ्यांचीं बंडें उद्भवलीं. फ्रान्स देशामध्यें इ. स. १३५८ मध्यें अशी ही उठावणी झाली तिला जॅकेरी हें नांव आहे. इंग्लंडमध्यें वॅट टायलरचें बंड होऊन त्यांत इ. स. १३८१ मध्यें प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाच्या डोळ्यांसमोर वॅट टायलर मारला गेला. हीं बंडें दडपून टाकतांना कित्येक वेळां फार क्रूर रीतीनें जुलूम करण्यांत आला. परंतु आतां समतेच्या नव्या कल्पना हळूहळू पसरूं लागल्या होत्या. दुसरे लोक

श्रीमंत असतांना आणि प्रत्येक गोष्टीची त्याच्याजवळ विपुलता असतांना आम्हींच तेवढें दरिद्री कां असावें आणि उपाशीपोटीं कां राहावें, असे प्रश्न लोक आपल्याशींच विचारूं लागले. कांहीं लोकांनीं सरंजामदार-जमीनमालक असावें आणि कांहींनीं भूदास असावें असा फरक कां असावा? कांहीं लोकांजवळ चांगले भरदार सुंदर सुंदर कपडे कां असावे आणि इतरांना लाज झांकण्यापुरेशीं फाटकीं लक्तरें सुद्धां कां नसावींत? सरंजामदारशाहीचा सगळा डोलारा सत्तेपुढें मान वांकवावयाची या कल्पनेवर आधारलेला होता. ती जुन्या काळची कल्पनाच आतां मोडकळीला आली. त्यामुळें शेतकऱ्यांनीं पुन्हां पुन्हां बंडाची उठावणी केली. परंतु ते दुर्बल आणि असंघटित असल्यामुळें त्यांचा पराभव होई. तथापि, पुन्हां संधि सांपडतांच आणखी नवी उठावणी ते करीत.

इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें या काळांत जवळजवळ एकसारखें युद्धच सुरू होतें. चौदाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळापासून तों पंधराव्या शतकापर्यंत त्यांच्यामध्यें ज्याला 'शंभर वर्षांचें युद्ध' म्हणून म्हणतात तें चालू होतें. फ्रान्सच्या पूर्वेला बर्गंडीचें राज्य होतें. येथील राजा नांवापुरता फ्रान्सच्या राजाचा मांडलिक असला, तरी हें राज्य मोठें शक्तिमान् राज्य होतें. बर्गंडीचा राजा हा मोठा त्रासदायक आणि बंडखोर माडलिक होता; त्यामुळें त्याच्याशीं इंग्लंडनें फ्रान्सविरुद्ध कट केला; तसाच इतरही देशाबरोबर इंग्लंडनें कट केला होता. अशा रीतीनें कांहीं काळपर्यंत फ्रान्सला विरोधी राज्यांकडून चोहोंकडून कोंडल्यासारखेंच झालें होतें. फ्रान्सचा पश्चिमेकडील बराचसा भाग पुष्कळ काळापासून इंग्रजांच्याच कबजांत होता. आतां तर इंग्लंडच्या राजानें आपल्याला फ्रान्सचा राजा असेंही म्हणविण्यास सुरुवात केली. फ्रान्सच्या दुर्दशेची आतां अगदीं कमाल अवस्था होऊन गेलेली होती; आशेला कांहींही जागा राहिलेली नव्हती; अशा वेळीं एका शेतकऱ्याच्या मुलीच्या रूपानें फ्रान्समध्यें आशा आणि विजय याचा अवतार झाला. ऑर्लिन्सची कुमारी जीन द आर्क (हिलाच इंग्रजींत जोन ऑफ आर्क म्हणतात; फ्रेंचमध्यें या नांवाचे वेगळे उच्चार आहेत. त्यांत एक झांडार्क असा आहे.) हिच्यासंबंधीं तुला थोडीशी माहिती आधींच आहे. तुझी तर ती एक पूज्य विभूति आहे. तेजोहीन झालेल्या, निराश झालेल्या आपल्या लोकांच्या मनात तिनें विश्वास उत्पन्न केला आणि त्यांना एक महान् प्रयत्न करण्यास उद्युक्त केलें; आणि तिच्या नेतृत्वाखालीं फ्रेंच लोकांनीं इंग्रजांना आपल्या देशांतून हांकलून लावलें. पण या सगळ्याचें बक्षीस तिला काय मिळालें? तर इन्क्विझिशनच्या न्यायमंदिरांत तिची चौकशी होऊन सुळावर जाण्याची शिक्षा तिला मिळाली! इंग्रज लोकांनीं तिला कैद केलें, धर्मपीठाकडून तिला मृत्यूची शिक्षा देवविली आणि इ. स. १३४० मध्यें रूएन येथील बाजारपेठेंत त्यांनीं तिला जिवंत जाळलें. यानंतर पुष्कळ वर्षांनीं रोमन धर्मपीठानें तिला मृत्यूची शिक्षा देणारा ठराव रद्द करून झालेल्या अन्यायाचें परिमार्जन करण्याचा प्रयत्न केला; आणि पुढें पुष्कळच दीर्घ काळानंतर त्या धर्मपीठानें तिला संतपदावर चढविलें.

जीन ही 'फ्रान्स देश' असा शब्दप्रयोग करूं लागली; परक्यापासून आपल्या पितृभूमीचें संरक्षण करण्याची भाषा ती बोलूं लागली. ही सगळीच नवीन प्रकारची भाषा होती. लोकांच्या मनात त्या काळीं सरंजामशाहीच्या कल्पना इतक्या भरून राहिलेल्या होत्या, कीं राष्ट्रीयत्वाच्या विचाराला त्या मनांत थाराच नव्हता. जीनच्या भाषेचें त्यांना मोठेंच आश्चर्य वाटलें; ती काय बोलते हेंच त्यांना नीटसें कळेना. जीन द आर्कच्या काळापासून राष्ट्रीयत्वाची अंधुक सुरुवात झालेली आपणांस आढळते.

इंग्लिश लोकांना आपल्या देशांतून काढून लावल्यानंतर फ्रान्सच्या राजानें बर्गंडीच्या राजाकडे लक्ष वळविलें. या राजापासून त्याला फारच त्रास झालेला होता. या सामर्थ्यवान् मांडलिकाला अखेरीस फ्रान्सच्या राजानें आपल्यापुढें नमायला लावलें आणि बर्गंडी देश इ. स. १४८३ मध्यें फ्रान्सच्याच राज्यांत समाविष्ट करून टाकण्यात आला. या वेळेपासून फ्रेंच राजा चागलाच समर्थ होतो. या सुमारास त्यानें आपल्या सरंजामदारांपैकीं कांहींना पार नष्ट करून टाकलें होतें. कांहींना आपल्या कबजांत आणलें होतें. बर्गंडीच्या राज्याचा समावेश फ्रान्समध्यें झाल्यावेळेपासून फ्रान्स आणि जर्मनी हे देश समोरासमोर येऊन त्यांच्या सरहद्दी एकमेकांना भिडल्या. परंतु फ्रान्स-मध्यें एका मध्यवर्गी राजसत्तेच्या ठिकाणीं सर्व सामर्थ्य एकवटलेलें होतें आणि तो देश चांगलाच प्रबळ झालेला होता, तर जर्मनी अगदींच दुर्बळ होता आणि अनेक देशा-मध्यें विभागून गेलेला होता.

याच सुमारास इंग्लंड हें स्कॉटलंड देश जिंकण्याचाही प्रयत्न करीत होतें. हाही झगडा पुष्कळ काळपर्यंत चालू होता. त्या दरम्यान स्कॉटलंड कधीं फ्रान्सच्या बाजूला जाई, तर कधीं इंग्लंडच्या बाजूला राही. इ. स. १३१४ मध्यें स्कॉट लोकांनीं रॉबर्ट ब्रूसच्या नेतृत्वाखालीं इंग्रजांचा बॅनाकबर्न येथें पराभव केला.

याच्या पूर्वीच बाराव्या शतकापासून इंग्रजानीं आयर्लंड देश जिंकून घेण्याचा प्रयत्न सुरू केला होता. म्हणजे आज या गोष्टीला सातशें वर्षें होऊन गेलीं. तेव्हांपासून आयर्लंड देशांत वारंवार युद्धें, बंडें, अत्याचार, जुलूम आणि भयाण कृत्यें यांचें साम्राज्य चालू होतें. हा देश लहानसा खरा; परंतु परकी वर्चस्वापुढें वांकण्याला त्या देशानें कधींही मान्यता दिली नाहीं आणि आम्ही असे कधींही वांकणार नाहीं हें पुकारून सांगण्यासाठीं दर पिढीला तेथील लोकांनीं बंडामागून बंडाची उठावणी केली.

तेराव्या शतकामध्यें यूरप खंडांतील आणखी एका छोट्या राष्ट्रानें, स्वित्झर्लंडनें, आपला स्वातंत्र्याचा अधिकार जोरानें सांगण्यास सुरुवात केली. हा देश पवित्र रोमन साम्राज्याचा एक भाग असून ऑस्ट्रियाचा त्याच्यावर अम्मल होता. विल्यम टेल आणि त्याचा मुलगा यांची गोष्ट तूं वाचलेली असशीलच; पण ती गोष्ट बहुधा खरी नसावी. तथापि स्विस शेतकऱ्यांनीं या महान् साम्राज्याविरुद्ध बंड केलें आणि त्यांच्या सत्ते-पुढें वांकण्याचें नाकारलें ही गोष्ट विल्यम टेलच्या गोष्टीपेक्षांही अधिक रोमांचकारी आणि अद्भुत आहे. या प्रांतांतील तीन जिल्ह्यांनीं प्रथम बंडाचें निशाण उभारून

सन १२९१ मध्यें "चिरंतन संघ" अशा नांवाची एक संघटना त्यांनीं सुरू केली. हळूहळू इतरही जिल्हे त्यांना मिळाले आणि इ. स. १४९९ मध्यें स्वित्झर्लंडचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें. भिन्न भिन्न स्वतंत्र जिल्ह्यांचें अथवा प्रांतांचें हें एक संघ-राज्य होतें. त्याला स्विस कान्फेडरेशन असें म्हणतात. ऑगस्टच्या पहिल्या तारखेला स्वित्झर्लंडमध्यें पर्वताच्या माथ्यावर जागोजाग होळ्या पेटविलेल्या आपण पाहिल्या त्या आठवतात का तुला? स्विस लोकांचा हा राष्ट्रीय सणाचा दिवस आहे; त्यांच्या क्रांतीच्या सुरुवातीचा हा वर्षदिन आहे; क्रांतीच्या काळांत होळी पेटविणें हें ऑस्ट्रियन राजाविरुद्ध बंड करून उठल्याचें एक लक्षण समजलें जात होतें.

या वेळीं इकडे पूर्व यूरपमध्यें कॉन्स्टान्टिनोपलची काय हालहवाल होती? लॅटिन वंशाच्या खिस्ती धर्मवीरांनीं हें शहर १२०४ मध्यें ग्रीकांपासून काबीज केलें होतें हें तुला आठवत असेल. इ. स. १२६१ मध्यें ग्रीकांनीं या लोकांना हांकलून देऊन पुन्हां पूर्वेकडील रोमन साम्राज्य स्थापन केलें. परंतु त्यांच्यावर दुसरेंच आणि पहिल्याहूनही मोठें संकट येऊं घातलेलें होतें.

मंगोलियन लोक जेव्हां आशिया खंडांतून पुढें पुढें चालून येऊं लागले तेव्हां त्यांच्या-पुढें पन्नास हजार उस्मानी तुर्क लोक नुसते पळत सुटले होते. हे तुर्क लोक सेल्जुक तुर्कांहून निराळे लोक होत. उस्मान या नांवाचा कोणी एक मनुष्य आपला मूळपुरुष किंवा वंशप्रस्थापक होता असें हे लोक मानीत असत. म्हणून यांना उस्मान अलीचे तुर्क असें म्हणत असत. या उस्मानी तुर्कांनीं पश्चिम आशियामध्यें सेल्जुक तुर्कांच्या राज्यांत आश्रय घेतला. सेल्जुक तुर्कांची शक्ति जसजशी क्षीण होत गेली तसतशी उस्मानी तुर्कांची सत्ता वाढत गेली असें दिसतें. ते पुढें पुढें वाढत आणि पसरत चालले. यांच्यापूर्वींच्या पुष्कळशा टोळ्यांनीं केलें होतें त्याप्रमाणें त्यांनीं कॉन्स्टांटिनोपलवर हल्ला केला नाहीं; तर त्या राज्याला वळसा घालून हे लोक इ. स. १३५३ मध्यें यूरप खंडावर चालून आले. तेथें ते झपाट्यानें प्रसार पावले; बल्गेरिया आणि सार्व्हिया या देशांचा त्यांनीं पाडाव केला आणि ॲड्रिआनोपल येथें त्यांनीं आपली राजधानी स्थापन केली. अशा रीतीनें कॉन्स्टान्टिनोपलच्या दोन्ही बाजूंना यूरप खंडांत आणि आशिया खंडांत उस्मानी तुर्कांचें साम्राज्य वाढत चाललें. त्या राज्याला त्यांनीं जणुं चोहोंकडून वेढा घातला; तरी पण तें या तुर्कांच्या साम्राज्याच्या बाहेरच राहिलें. परंतु एक हजार वर्षांपासून चालत आलेल्या त्या महान् रोमन साम्राज्याचा संकोच होत होत तें आतां फक्त जवळ-जवळ कॉन्स्टान्टिनोपल शहरांतच काय तें समाविष्ट होऊन राहिलें. त्याबाहेर या राज्याचा प्रांत बहुतेक राहिला नाहीं. अशा रीतीनें हे तुर्की लोक पूर्वेकडील रोमन साम्राज्याचे एकामागून एक भाग गिळंकृत करीत चालले होते तरीही तुर्कांचा सुलतान आणि रोमन बादशहा यांचे परस्परांशीं फार स्नेहाचे संबंध होते आणि त्यांच्या घराण्यांत परस्परांत लग्नसंबंधही होत होते. शेवटीं १४५३ मध्यें कॉन्स्टान्टिनोपल शहरही तुर्कांच्या हातीं पडलें. यापुढें आपण तुर्क म्हणजे फक्त उस्मानी तुर्क असें समजूनच

बोलत जाऊं. सेल्जुक तुर्कांचा आतां यापुढच्या घडामोडींत कोठेंच काहीं भाग उरलेला नाहीं.

कॉन्स्टान्टिनोपल शहर पडणार हें जरी पुष्कळ दिवसांपासून ठरलेलें दिसत होतें, तरी प्रत्यक्ष त्याचा पाडाव झाला तेव्हां सर्व यूरप खंडाला हादरा बसला. हें शहर पडलें याचा अर्थ हजार वर्षें चाललेलें पूर्व यूरपांतील प्राचीन ग्रीक साम्राज्य अखेरचें नष्ट झालें; त्याचा अर्थ यूरप खंडावर मुसलमानांची एक नवी स्वारी सुरू झाली. तुर्क लोक पुढें पुढें पसरतच गेले, आणि केव्हां केव्हां तर आतां हे सर्व यूरप खंड ग्रासून टाकणार अशी वेळ आल्याचें भासूं लागलें. परंतु अखेरीस व्हिएन्नाच्या प्रवेशद्वाराशीं त्याच्या पुढें सरकण्याला पायबंद घालण्यांत आला.

सहाव्या शतकामध्यें बादशहा जस्टिनियन यानें जें सेंट सोफायाचें महान् मंदिर (कॅथीड्रल) बांधलेलें होतें त्याची आतां मशीद बनविण्यांत आली; तिला आया सुफिया असें नांव देण्यांत आलें. तुर्कांनीं या मंदिरांतील संपत्तीची थोडीफार लूटही केली. त्यामुळें यूरपमध्यें फारच असंतोष निर्माण झाला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तसें पाहिलें तर तुर्की सुलतान हे आद्य (सनातन) ग्रीक धर्मपीठाशीं खरोखरच फार उदारपणानें वागले. सुलतान दुसरा महमद यानें तर आपण स्वतः ग्रीक धर्मपीठाचे पाठिराखे आहों असें जाहीर केलें. त्यानंतरचा ‘शानदार सुलेमान’ या नांवानें प्रसिद्ध असलेला सुलतान तर आपण पूर्वेकडील साम्राज्याच्या बादशहाचाच प्रतिनिधि आहों असें मानीत असे. आणि स्वतःला सीझर ही पदवीही त्यानें घेतली होती. प्राचीन परंपरेचा प्रभाव हा असा असतो.

या उस्मानी तुर्कांचें आगमन कॉन्स्टान्टिनोपल येथील ग्रीक लोकांना विशेषसें नकोसें वाटलेलें दिसत नाहीं. जुनें साम्राज्य मोडून पडणार ही त्यांची खात्री झालेली होती. अशा स्थितींत पोप आणि पश्चिमेकडील खिस्ती लोक यांच्यापेक्षां त्यांना हे तुर्क बरे वाटले. इ. स. १४५३ मध्यें कॉन्स्टान्टिनोपलचा अखेरचा वेढा चालू असतांना बायझांटियन राज्याचा एक सरदार म्हणाला सुद्धां, कीं “पोपच्या मुगुटापेक्षां पैगंबराचा शिरताज बरा.”

या तुर्कांनीं जानिसेरी (जान्निसार) नावाचें एक विलक्षण लष्करी पथक प्रस्थापित केलें होतें. खिस्ती लोकांकडून त्यांनीं खास खंडणी म्हणून लहान लहान खिस्ती मुलें घेतलीं, आणि त्यांना एका खास पद्धतीचें शिक्षण दिलें. आईबापांपासून मुलांची अशा रीतीनें ताटातूट करणें हें निर्दयपणाचें तर खरेंच; परंतु त्यांत या मुलांचा कांहीं अंशीं फायदाही झाला. कारण त्यांना चांगलें शिक्षण मिळालें आणि त्यांच्यांमधून एक प्रकारची लष्करी एकतंत्री सत्ता निर्माण झाली. हें जानिसारींचें पथक म्हणजे उस्मानी सुलतानांचा एक मजबूत आधारस्तंभच होऊन गेलें. जानिसारी हा शब्द जान (आयुष्य) व निसार (त्याग) या दोन शब्दांपासून निघालेला असून त्याचा अर्थ आपल्या जीवाचाही त्याग करणारा असा आहे.

अशाच रीतीनें तुर्कांच्या या जानिसारींच्यासारखेंच मॅमेल्यूक नांवाचें पथक ईजिप्तमध्यें स्थापन झालें होतें. हें पुढें फारच सामर्थ्यवान् झालें आणि शेवटीं त्यांच्यांतूनच ईजिप्तचे सुलतान निघूं लागले.

उस्मानी सुलतान लोकांनीं कॉन्स्टान्टिनोपलच्या राज्याबरोबरच तेथील त्यांच्या पूर्वीच्या बायझांटाइन बादशहांच्यामधील विलास आणि दुराचारयुक्त राहणी यांचाही वारसा आपल्याकडे घेतला असें दिसून येतें. बायझांटाइन साम्राज्यशाहीच्या सर्व हीन परंपरेंत ते गुरफटून गेले आणि हळूहळू त्यांची सर्व सत्ता निःसत्त्व बनत गेली. परंतु कांहीं काळ मात्र ते फारच प्रबळ होते आणि सर्व ख्रिस्ती यूरपीय देश त्यांच्यापुढें भीतीनें लटपटत होते. त्यांनीं ईजिप्त देशही जिंकला आणि तेथें अब्बासी घराण्याच्या एका शाखेकडे जें तेथील खलिफाचें पद होतें तें त्या वेळच्या दुर्बळ आणि सत्ता-विहीन खलिफाकडून त्यांनीं आपल्याकडे घेतलें. त्या वेळेपासून पुढें उस्मानी सुलतानच अगदीं अलीकडे कांहीं वर्षांपूर्वींपर्यंत स्वतःला खलिफा म्हणवीत होते. मुस्तफा कमालपाशानें आतां शेवटीं सुलतानशाही आणि खलिफाशाही दोहोंनाही मूठमाती दिली.

कॉन्स्टान्टिनोपलच्या पाडावाचा दिवस हा इतिहासामध्यें फार महत्त्वाचा दिवस आहे. एक युग त्या दिवशीं संपलें आणि दुसरें युग सुरू झालें असें समजतात. या दिवशीं मध्ययुगाचा अंत झाला. एक हजार वर्षांच्या अज्ञानांधकाराच्या युगाचा अंत झाला आणि यूरप खंडांत एक प्रकारची चपल गति निर्माण झाली, नवीन चैतन्य आणि शक्ति दिसून येऊं लागलीं. याच वेळीं ज्ञानाच्या आणि कलेच्या पुनरुज्जीवनाच्या काळास — यूरपीय इतिहासांतील रेनेसान्सच्या काळाला — सुरुवात झाली. मोठ्या थोरल्या झोंपेनंतर लोक आतां जागे झालेतसें दिसतें; जागे झाल्यावर लोकांची नजर कितीएक शतकांच्या मागें प्राचीन ग्रीसकडे, ज्या वेळीं ग्रीसचा अत्यंत वैभवाचा काळ होता त्या काळाकडे वळली आणि त्यांतून त्यांना स्फूर्ति मिळाली. धर्मपीठानें पुष्ट केलेल्या जीवनविषयक निराशमय आणि भीतिप्रद भूमिकेबद्दल आणि मानवी स्वत्वाला, तेजाला जखडून टाकणाऱ्या शृंखलांबद्दल लोकांच्या मनांत एक प्रकारचें जणुं बंडच उसळल्यासारखें झालें. प्राचीन ग्रीकांचें सौंदर्य-प्रेम आतां पुन्हां उद्भूत होतें आणि चित्रकला, मूर्ति तयार करण्याची कला (शिल्पकला) आणि इमारतींचें बांधकाम यांना यूरप खंडांत त्या सौंदर्यप्रेमामुळें केवढा तरी बहर येतो.

हें सर्व कांहीं कॉन्स्टान्टिनोपल पडल्यामुळेंच एकदम घडून आलें असें अर्थातच नव्हे. असें समजणें म्हणजे निव्वळ वेडगळपणाचें होईल. तुर्क लोकांनीं तें शहर काबीज केल्यामुळें या सर्व सामाजिक बदलाची गति थोडीशी वाढण्याला मदत मात्र झाली; कारण हें शहर तुर्कांनीं घेतल्याचा परिणाम म्हणजे तेथील पुष्कळसे विद्वान् आणि शिकले सवरलेले लोक तें शहर सोडून पश्चिम यूरप खंडांत जाऊन राहिले हा झाला.

त्यांनीं आपल्याबरोबर इटलीमध्यें ग्रीक वाङ्मयाची संपत्ति आणली; आणि तीही अशा वेळीं, कीं जेव्हां पश्चिम यूरपांतील लोकांना या नवीन ज्ञानाची योग्य समजूत करून घेण्याबद्दल विशेष उत्सुकता उत्पन्न झालेली होती. या अर्थानें पाहतां कॉन्स्टान्टिनोपलच्या पाडावानें ज्ञानाच्या पुनरुज्जीवनाची लाट जरा जोरानें सुरू करण्याला थोडीशी मदत झाली, असें म्हणतां येतें.

पण यूरप खंडांत जो महान् बदल घडून आला त्याचें हें एक अगदींच बारकेंसें कारण आहे. प्राचीन ग्रीक वाङ्मय आणि तत्त्वज्ञान हीं कांहीं मध्ययुगीन इटलीला किंवा पश्चिम यूरपला अगदींच नवीं म्हणजे अपरिचित होतीं असें नव्हे. विश्वविद्यालयांमधून त्या काळांत सुद्धां यांचा अभ्यास होत होता आणि विद्वान् लोकांना त्यांचें चांगलें ज्ञान होतें. परंतु हें ज्ञान अगदींच थोड्या लोकांपुरतें मर्यादित होतें; आणि जीवनाबद्दलच्या प्रचलित दृष्टीशीं तें जुळतें नसल्यामुळें त्याचा विशेषसा प्रसार होत नव्हता. परंतु लोकांच्या मनांत ज्या शंका यायला सुरवात झाली होती त्यामुळें जीवनाबद्दलच्या नवीनच दृष्टिकोनासाठीं जमीन हळूहळू तयार होत आली होती. आहे त्या परिस्थितीबद्दल लोक असंतुष्ट होते आणि त्याहून अधिक समाधानकारक असें नवीन कांहीं तरी शोधून काढण्याची लोकांची खटपट चालू होती. अशा तऱ्हेनें कांहीं अंशीं शंका, कांहीं अंशीं नवीन कांहीं तरी सापडणार अशा प्रकारची उत्कंठा, अशा अवस्थेंत असताना त्याच्या बुद्धीला ग्रीक लोकाचा हा खिस्ती धर्माचा संपर्क नसलेल्या प्राचीन खिस्तपूर्व तत्त्वज्ञानाचा ठेवा सांपडला आणि त्यांनीं त्या वाङ्मयाचें अगदीं आकंठ पान केलें. त्याचा त्यांनीं खोल अभ्यास केला व त्यांत ते रंगून गेले. आपण शोधीत होतों तीच नेमकी वस्तु ही सांपडली असें त्यांना झालें आणि या शोधामुळें त्याच्यामध्यें उत्साहाचें वारें संचारलें.

ज्ञान व कला यांच्या पुनरुज्जीवनाचें युग प्रथम इटलीमध्यें सुरू झालें. त्यानंतर तें फ्रान्समध्यें उद्‌भूत झालें. नंतर इंग्लंडमध्यें आणि मग इतर ठिकाणीं. त्या लोकांना नुसता ग्रीक वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा पुनः लाभ झाला एवढाच याचा अर्थ नव्हता; त्याहून याचा फार मोठा आणि फार श्रेष्ठ अर्थ होता. यूरपच्या वरून दिसणाऱ्या जीवनभूमीच्या खालीं आंतमध्यें जी कांहीं क्रिया आज पुष्कळ काळपर्यंत चालू होती त्या क्रियेचें तें प्रत्यक्ष उत्थान आणि आविष्करण होतें. यूरपीय समाजाच्या अंतर्भागीं जी पुष्कळ काळपर्यंत मोठी खळबळ माजून राहिलेली होती त्या खळबळीला हें असें दृश्य स्वरूप आलेलें होतें. ही खळबळ यूरपच्या जीवितांत अनेक स्वरूपांत बाहेर पडणार होती. ज्ञान आणि कला यांचें पुनरुज्जीवन हें त्यांतील फक्त एक स्वरूप आहे.

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ५९ वें

जा ग ति क

# इतिहासाचें ओझरतें दर्शन

( खंड २ रा )

लेखक

पं. जवाहरलाल नेहरू

अनुवादक

शिवराम गोविंद भावे




जून, १९५२ ]

[ मूल्य ७॥ रुपये

# अनुक्रमणिका

पृष्ठ

७३. जलमार्गांचा शोध - - - - ३६९
७४. मंगोलियन लोकांच्या साम्राज्याचा विध्वंस - - ३७७
७५. हिंदुस्थानांत एक बिकट प्रश्न सोडविण्याची धडपड सुरू होते - ३८४
७६. दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यें - - - ३९२
७७. विजयानगर - - - - - ३९७
७८. मज्झपहित आणि मलाक्का यांचीं मॅलेशियांतील साम्राज्यें - ४०१
७९. यूरप खंड पूर्व आशियांत आपली तुंबडी भरूं लागतें - ४०८
८०. चीनमधील शांततेचा आणि भरभराटीचा काळ - - ४१२
८१. जपान देश स्वतःला कोंडून घेतो - - - - ४१९
८२. धुमाकुळांत सांपडलेलें यूरप खंड - - - ४२५
८३. रेनेसान्स अथवा ज्ञानयुग - - - - ४३०
८४. प्रॉटेस्टंट लोकांचें बंड आणि शेतकऱ्यांचीं युद्धें - - ४३६
८५. सोळाव्या व सतराव्या शतकांतील यूरपमधील अनियंत्रित राजसत्ता ४४३
८६. नेदरलंडचें स्वातंत्र्यासाठीं युद्ध - - - ४५०
८७. इंग्लंड देश आपल्या राजाचें डोकें उडवितो - - ४५८
८८. बाबर - - - - - ४६७
८९. अकबर - - - - ४७४
९०. हिंदुस्थानांतील मोंगल साम्राज्याचा ऱ्हास व नाश - - ४८५
९१. शीख आणि मराठे - - - - - ४९३
९२. इंग्रजांची हिंदुस्थानांतील आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर मात - ४९९
९३. चीनच्या मांचू घराण्यांतील एक श्रेष्ठ राजा - - ५०८
९४. चीनचा बादशहा इंग्लंडच्या राजास पत्र लिहितो - - ५१५
९५. यूरपमधील अठराव्या शतकांतील भिन्न भिन्न कल्पनांमधील झगडा ५२०
९६. अत्यंत मोठ्या उलाढालींच्या दाराशीं उभें असलेलें यूरप खंड - ५२८
९७. मोठ्या यंत्रांचा उदय - - - - ५३७
९८. इंग्लंडमध्यें औद्योगिक क्रांतीला सुरुवात होते - - ५४५
९९. अमेरिका इंग्लंडपासून फुटून निघते - - - ५५४
१००. बॅस्टीलचा पाडाव - - - - ५६३
१०१. फ्रेंच राज्यक्रांति - - - - ५७३
१०२. क्रांति आणि प्रतिक्रांति - - - - ५८२
१०३. राज्यकर्त्यांच्या वागण्याच्या पद्धती - - - ५९२
१०४. नेपोलियन - - - - ५९८
१०५. पुन्हां एकवार नेपोलियन - - - - ६०९

१०६. एकवार सर्व जगाची संकलित पाहणी - - - ६२०
१०७. महायुद्धापूर्वीचीं जगाचीं शंभर वर्षें - - - ६२६
१०८. एकोणिसावें शतक पुढें चालू - - - ६३४
१०९. हिंदुस्थानांतील युद्धें आणि बंडें - - - ६४५
११०. हिंदी कारागिरांची गळचेपी - - - - ६५६
१११. हिंदुस्थानांतील खेडीं, शेतकरी आणि जमीनदार - - ६६४
११२. ब्रिटननें हिंदुस्थानचा कारभार कसा केला ? - - ६७६
११३. हिंदुस्थानची पुनर्जागृति - - - - ६८७
११४. ब्रिटन चीनच्या गळयांत अफू बांधतें - - - ७००
११५. अडचणींत सापडलेला चीन देश - - - ७१०
११६. जपानची घोडदौड - - - - ७१६
११७. जपान रशियाचा पराभव करतो - - - ७२६
११८. चीनमध्यें प्रजासत्ताक राज्य स्थापन होतें - - ७३४
११९. बृहद् भारत आणि ईस्ट इंडीज - - - ७४१
१२०. आणखी एक वर्षारंभदिन - - - - ७५१
१२१. फिलिपाइन्स आणि अमेरिका - - - ७५६
१२२. तीन खंडांच्या संगमाच्या ठिकाणीं - - - ७६२
१२३. सिंहावलोकन - - - - ७६९
१२४. इराणची प्राचीन चिवट संस्कृति - - - ७७६
१२५. इराणमधील साम्राज्यशाही आणि राष्ट्रवाद - - ७८५

## नकाशे

१६. नवीन भूमीचा शोध - - - - ३७२
१७. रोमन साम्राज्याविरुद्ध बंड - - - - ४३८
१८. अकबराचे साम्राज्य - - - - ४७७
१९. इंग्रज आणि फ्रेंच हिंदुस्थानसाठीं लढतात - - ५०२
२०. बादशहा चीन लुंगचें साम्राज्य - - - ५१८
२१. अमेरिका फुटून वेगळी होते - - - ५५६
२२. नेपोलियनचें यूरपमधील वर्चस्व - - - ६०२
२३. १८५७ च्या महान् बंडाच्या वेळचा हिंदुस्थान - - ६५३
२४. ब्रिटन आणि चीन - - - - ७०३
२५. जपानची वाढ - - - - ७२२
२६. बृहद् भारत आणि पूर्वेकडील हिंदी बेटें - - - ७४४
२७. सोळाव्या व सतराव्या शतकांतील उस्मानी साम्राज्य - - ७६६
२८. रशिया व इराण - - - - ७८८

# ७३
# जलमार्गांचा शोध

३ जुलै, १९३२

यूरप खंडांत मध्ययुगाचा अंत होण्याला सुरुवात झालेली आहे आणि नवीन जागतिक अवस्था त्या जागीं येऊं पाहत आहे, अशा काळाशीं आपण येऊन पोंचलों आहों. प्रचलित परिस्थितीबद्दल समाजांत असंतोष आणि विरोध निर्माण झालेला आहे; ही अशी असंतोषाची भावना म्हणजे फेरफार आणि प्रगति यांची जननीच होय. सरंजामदारशाहीमुळें आणि धर्मव्यवस्थेमुळें ज्या ज्या वर्गांची पिळणूक होत होती ते सारे असंतोषानें धुमसत होते. आतां शेतकऱ्यांचीं बंडें (यांनाच फ्रेंच भाषेत शेतकऱ्यांमधील जॅक्विस या एका नांवावरून जॅक्वेरीज असें म्हणतात) होऊं लागलीं होतीं हें आपण पाहिलें आहे. परंतु हे शेतकरी अजून फार मागासलेले आणि दुर्बल होते; आणि हीं एवढीं बंडें करूनही त्यांना फारसा फायदा झाला नाहीं. त्यांच्या यशाचा दिवस अजून दूर होता. या क्षणाला खरा झगडा जो होता तो एका बाजूला जुना सरंजामदारवर्ग आणि दुसऱ्या बाजूला शक्तिमान् होऊं लागलेला आणि जगा-विषयीं नवीन संपूर्ण ज्ञान झाल्यामुळें पूर्ण जागृत झालेला मध्यमवर्ग यांच्यामध्यें होता. सरंजामशाहीचा अर्थ हा होता, कीं संपत्ति ही जमिनीवर आधारलेली आहे; किंबहुना, जमीन म्हणजेच संपत्ति आहे. पण आतां नवीनच एक प्रकारची संपत्ति जमा होऊं लागली होती. तिचा उगम जमिनीपासून नव्हता. तिचा उगम उद्योगधंदे आणि व्यापार यांपासून होत होता आणि नवीन उत्पन्न झालेला जो मध्यमवर्ग अथवा धनिकवर्ग हा त्यापासून पुष्ट होत जाऊन त्यामुळें त्याची सत्ताही वाढत होती. आतां ज्या काळाशीं आपण आलों आहों, त्या काळीं हा झगडा सुरू होऊन पुष्कळ काळ लोटलेला होता. आतां विशेष हें झालें, कीं या दोन बाजूंच्या परस्पर भूमिकांमध्यें बदल पडला. सरंजामशाही जरी अद्याप चालू असली, तरी तिचें धोरण बचावाचें झालें. धनिकवर्गाला आपल्या नव्या वाढत्या सामर्थ्याचा विश्वास येऊन त्यानें चढाईचें धोरण स्वीकारलें. असा हा झगडा पुष्कळ शतकें चालू राहिला; परंतु त्यांत धनिक-वर्गालाच अधिकाधिक यश येत राहिलें. यूरपमधील निरनिराळ्या देशांत या झगड्याचें मान वेगवेगळ्या प्रमाणांत राहिलें. यूरपच्या पूर्व भागांत हा झगडा जवळजवळ नव्हताच म्हणतां येईल. धनिकवर्गाला प्रथम यूरपच्या पश्चिम भागांतच महत्त्व प्राप्त झालें.

प्राचीन बंधनांची आडकाठी नाहींशी झाली याचा अर्थ शास्त्रें, कला, वाङ्मय, वास्तुशास्त्र, शिल्पशास्त्र आणि नवीन संशोधन, अशा अनेक दिशांनीं प्रगति होण्यास वाव मिळाला. मनुष्यांची अंतर्गत शक्ति–स्वत्व–शृंखला तोडून बाहेर पडते, तेव्हां नेहमीं हें असेंच घडत असतें. आमच्या देशाला स्वातंत्र्य प्राप्त होईल तेव्हांही अगदीं असेंच घडेल; आपल्या सामान्य जनतेची आणि प्रतिभावंतांची शक्ति फांकून तिचा सर्व दिशांना संचार होऊं लागेल.

धर्मपीठाच्या वर्चस्वांतील दम नाहींसा होऊन तें जसजसें कमी होऊं लागलें, तसतसे लोक मंदिरांवर (कॅथीड्रल) किंवा चर्च बांधण्यावर कमी खर्च करूं लागले. ठिकठिकाणीं नवीन सुंदर सुंदर इमारती बांधल्या जातच होत्या; पण त्या आतां नगरमंदिरें किंवा अशाच नव्या धर्तीच्या इमारती होत्या. गॉथिक वास्तुपद्धति (शिल्पपद्धति) ही पण मागें पडून तिच्या जागीं नवीनच प्रथा निर्माण होऊं लागली होती.

अगदीं याच वेळेला, पश्चिम यूरप खंडांत नवीन उत्साहाचें भरतें आलें होतें अशा क्षणाला, पूर्वेकडील सोन्याच्या लोभाचें आकर्षण निर्माण झालें. हिंदुस्थानांत आणि चीनमध्यें जाऊन आलेल्या मार्को पोलोनें आणि इतर प्रवाशांनीं सांगितलेल्या हकीकती ऐकून लोकांच्या मनांत कर्तृत्वाच्या, धाडसाच्या कल्पनांची खळबळ माजली होती; त्यांतच तिकडील अगणित सोन्याच्या मोहाची भर पडून पुष्कळशा लोकांची वृत्ति दर्यावर्दीपणाकडे वळली. याच सुमाराला कॉन्स्टान्टिनोपलचा पाडाव झाला. त्यामुळें पूर्वेकडे जाण्याचे सर्वच जमिनीवरील मार्ग आणि त्या काळचे जलमार्गही तुर्क लोकांच्या ताब्यांत गेले; आणि तुर्कांनीं कांहीं व्यापाराला फारसें प्रोत्साहन दिलें नाहीं. मोठेमोठे धंदेवाले आणि व्यापारी जे होते, ते या अडचणीमुळें आंतल्या आंत चिडून गेलेले होते. दुसरा जो नवाच साहसाचीं अचाट कृत्यें करूं इच्छिणारा आणि अशा रीतीनें पूर्वेकडील सोनें मिळवूं चाहणारा वर्ग निर्माण झाला होता, त्यालाही तुर्कांच्या या मार्ग-नियंत्रणामुळें अडकल्यासारखें होऊन अस्वस्थता वाटत होती. म्हणून सुवर्णमय पूर्वेकडे जाऊन पोंचण्यासाठीं नवीन मार्ग शोधून काढण्याकरितां या सर्वांचीच धडपड सुरू झाली.

आज शाळेंत जाणाऱ्या छोट्या मुलीलासुद्धां माहीत असतें, कीं पृथ्वी वाटोळी आहे आणि ती सूर्याभोंवतीं फिरते. आज आपल्याला सगळ्यांनाच ही अगदीं साधी स्पष्ट गोष्ट वाटते. पण प्राचीन काळच्या लोकांना ही गोष्ट इतकी साधी व स्पष्ट वाटत नव्हती; आणि असा विचार पटून जर कोणीं तो बोलून दाखविला तर धर्मपीठाचा त्यावर राग होत असे. अशा रीतीनें या बाबतींत धर्मपीठाची भीति असून सुद्धां जास्त जास्त लोकांना पृथ्वी वाटोळी आहे ही गोष्ट पटत चालली. बरें, पृथ्वी जर वाटोळी आहे, तर पश्चिमेकडे प्रवास करीत राहिलें म्हणजे चीन आणि हिंदुस्थान येथ-पर्यंत पोंचतां आलेंच पाहिजे, असा कांहींनीं विचार केला. कांहींना असें वाटलें, कीं

आफ्रिकेला वळसा घालून गेल्यास हिंदुस्थानांत जातां येईल. या वेळीं सुएझचा कालवा नव्हता आणि भूमध्य समुद्रांतून तांबड्या समुद्रांत जातां येत नव्हतें, हें या ठिकाणीं तुला लक्षांत घेतलें पाहिजे. त्यामुळें चीजवस्त आणि व्यापारी माल भूमध्य समुद्राच्या कांठापासून तांबड्या समुद्राच्या कांठापर्यंत जमिनीवरूनच, बहुशः उंटांच्या पाठीवर लादून नेण्यांत येत असे आणि तेथून मग जहाजांतून तो पलीकडच्या बाजूला नेण्यांत येई. खरें पाहिलें असतां कोणत्याच काळीं ही व्यवस्था तितकीशी सोयीची नव्हती. ईजिप्त आणि सीरिआ हे देश तुर्कांच्या ताब्यांत गेल्यापासून तर हा मार्ग अधिकच अडचणीचा झाला.

तथापि, हिंदुस्थानांतील सोन्याचा लोभ लोकांच्या अंतःकरणांत उसळतच होता आणि तिकडे जाण्याला लोकांना प्रवृत्त करीतच होता. तेव्हां या देशाच्या मार्गासाठीं जें संशोधन सुरू झालें, त्यांत स्पेन आणि पोर्तुगाल या देशांनीं पुढाकार घेतला. या सुमारास मूर किंवा सारासन लोकांपैकीं राहिल्यासाहिल्या अखेरच्या लोकांना स्पेनमधून काढून टाकण्याचें काम त्या देशांत सुरू होतें. ॲरॅगॉनचा फार्डिनांड आणि कॅस्टीलची इसाबेला यांच्या लग्नामुळें स्पेनमधील सर्व ख्रिस्ती लोकांचें ऐक्य निर्माण झालेलें होतें; आणि कॉन्स्टान्टिनोपल पडल्यानंतर पन्नास वर्षांनीं इ. स. १४९२ मध्यें यूरपच्या टोंकाला आरबांचें ग्रॅनडा येथील राज्य संपुष्टांत आलें. त्यासरशीं स्पेनला यूरपांतील श्रेष्ठ दर्जाच्या ख्रिस्ती सत्तेचें स्थान प्राप्त झालें.

पोर्तुगीज लोकांनीं पूर्वेच्या बाजूनें पुढें जाण्याचा प्रयत्न केला, तर स्पॅनिश लोकांनीं पश्चिमेच्या बाजूनें. पोर्तुगीज लोकांनीं १४४५ मध्यें व्हर्डचें भूशिर शोधून काढलें हा या प्रयत्नांतील प्रगतीचा पहिला मोठा टप्पा होय. आफ्रिकेच्या नकाशांत पाहा. हें भूशिर म्हणजे आफ्रिकेचा पश्चिमेकडील अगदीं टोंकाचा भाग. या व्हर्डच्या भूशिराकडे यूरपमधून जायचें म्हणजे नैर्ऋत्य दिशेकडे जावें लागतें हें तुला दिसून येईल. पुढें या भूशिराला वळसा घातला म्हणजे मात्र आपल्याला आग्नेयीकडे वळावें लागतें. या भूशिराचा शोध हें एक मोठें आशेचें लक्षण होतें; कारण त्यामुळें लोकांच्या मनांत अशी श्रद्धा निर्माण झाली, कीं आतां आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानला जातां येईल.

परंतु आफ्रिकेला वळसा घालून जाण्याला यापुढें आणखी चाळीस वर्षें जावीं लागलीं. इ. स. १४८६ मध्यें बार्थोलो डायझ नांवाच्या एका पोर्तुगीज माणसानेंच आफ्रिकेच्या अगदीं दक्षिणेच्या टोंकाला वळसा घातला. यालाच आतां केप ऑफ गुड होप असें नांव दिलेलें आहे. यानंतर थोड्याच वर्षांनीं वास्को डी गामा नांवाच्या आणखी एका पोर्तुगीझ माणसानेंच या शोधाचा फायदा घेऊन केप ऑफ गुड होपच्या मार्गानें हिंदुस्थान देश गांठला. वास्को डी गामा हा मलबारच्या किनाऱ्यावरील कालिकत बंदरांत इ. स. १४९८ त आला.

अशा रीतीनें हिंदुस्थानला पोंचण्याची शर्यत पोर्तुगीजांनीं जिंकली. परंतु दरम्यान जगाच्या दुसऱ्या बाजूला फार मोठ्या घडामोडी होत होत्या. आणि त्यांचा

सारा फायदा स्पेनला मिळत होता व पुढेंही मिळावयाचा होता. इकडे क्रिस्तोफर कोलंबस हा १४९२ मध्यें अमेरिकन जगांत जाऊन पोंचला होता. कोलंबस हा जिनोआ येथील एक गरीब मनुष्य होता. पृथ्वी वाटोळी आहे हें लक्षांत घेऊन पश्चिमेच्या दिशेला आपण प्रवास करीत राहिलों, तर आपण जपानला आणि हिंदुस्थानला पोंचूं अशी त्याची कल्पना होती. पुढें त्याच्या प्रवासाला प्रत्यक्ष जितका दीर्घ काळ लागला, तितका या प्रवासाला लागेल असें प्रथम त्याला वाटलें नव्हतें. या आपल्या देश-संशोधनाच्या जलप्रवासाला मदत मिळावी या हेतूनें निरनिराळ्या राजांच्या दरबारीं जाऊन त्यानें त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. शेवटीं स्पेनचे फर्डिनांड आणि इसाबेला यांनीं त्याला मदत देण्याचें कबूल केलें आणि कोलंबस तीन लहान लहान जहाजांवर अठ्यायशीं लोक बरोबर घेऊन निघाला. अज्ञात अशा प्रदेशांत करूं घातलेला हा प्रवास मोठा साहसी आणि शौर्याचा होता. कारण, आपण कोठें जाणार आणि पुढें काय दिसणार किंवा होणार याची त्या वेळीं कोणाला काहींच कल्पना नव्हती. परंतु कोलंबसाची श्रद्धा दृढ होती आणि शेवटीं त्याच्या श्रद्धेला फळही मिळालें. एकूणसत्तर दिवस पाण्यावर काढल्यानंतर त्या लोकांचे पाय जमिनीला लागले. कोलंबसाला वाटलें, आपण हिंदुस्थानांतच आलों. खरोखर पाहिलें, तर वेस्ट इंडीज बेटांमधील हें एक बेट होतें. प्रत्यक्ष अमेरिका खंडामध्यें कोलंबस कधींच पोंचला नाहीं; आणि शेवटपर्यंत त्याची स्वतःची समजूत आपण आशिया खंडांत पोंचलों अशीच होती. ही चमत्कारिक चुकीची समजूत अजूनही एका स्वरूपांत शिल्लक राहिली आहे. या बेटांना अजूनही वेस्ट इंडीज (म्हणजे हिंदुस्थानच्या पश्चिम बाजूचीं बेटें) असें म्हणतात, आणि अमेरिकेच्या मूळच्या रहिवाशांनाही अद्यापि इंडियन किंवा रेड इंडियन असें म्हणतात.

कोलंबस यूरप खंडांत परत आला आणि पुढच्या वर्षी आणखी पुष्कळ जहाजें घेऊन तो पुन्हां प्रवासाला निघाला. हिंदुस्थानला जाण्यासाठीं नवा मार्ग शोधून काढण्याकरितां ही खटपट आहे अशी सर्वांची कल्पना होती; आणि त्यामुळें लोकांचीं मनें नुसतीं भारून गेल्यासारखीं झालीं होतीं. यानंतर लौकरच वास्को डी गामानें आपला पूर्वेकडील प्रवास झपाट्यानें पुरा केला आणि कालिकत बंदर गांठलें. पश्चिमेकडे आणि पूर्वेकडे नवीन देशांचा शोध लागल्याच्या बातम्या जसजशा येऊं लागल्या, तसतशी साऱ्या यूरप खंडांत उत्साहाची खळबळ वाढतच गेली. या नवीन सांपडलेल्या प्रदेशावरील वर्चस्वाबद्दल स्पर्धा पोर्तुगाल आणि स्पेन याच दोन देशांमध्यें होती. यानंतर पोपमहाराज रंगभूमीवर आले आणि स्पॅनिश व पोर्तुगीज लोक यांच्यामध्यें कसल्याही प्रकारचा झगडा होऊं नये म्हणून त्यांनीं हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवून औदार्य गाजविण्याचें ठरविलें. इ. स. १४९३ मध्यें पोपनें एक बुल काढला. (पोपच्या जाहीरनाम्यांना आणि आज्ञापत्रांना, कां कोण जाणे, बुल म्हणण्याची रीत आहे) त्याला सरहद्दी निश्चित करणारा बुल असें म्हणतात. अझोर्सच्या

समुद्राच्या पश्चिमेला शंभर लीगवर (१ लीग = ३ मैल) उत्तरेकडून दक्षिणेकडे त्यानें काल्पनिक रेषा आंखली आणि असें जाहीर केलें, कीं या रेषेच्या पूर्वेकडील सर्व बिन-ख्रिस्ती प्रदेश पोर्तुगालच्या मालकीचा आणि रेषेच्या पश्चिमेकडील असा मुलूख स्पेनच्या मालकीचा. एक यूरप खंड तेवढें वगळून बाकीच्या जवळजवळ सगळ्या जगाचें हें प्रचंड बक्षीसच पोपनें त्यांना दिलें आणि त्यासाठीं पोपच्या पदरचें कांहींच खर्च झालें नाहीं! अझोर्स बेटें हीं ॲटलांटिक समुद्रांत असून त्यांच्यापासून पश्चिमेकडे शंभर लीग, म्हणजे तीनशें मैलांवर दाक्षिणोत्तर रेषा काढली म्हणजे उत्तर अमेरिका संबंधच्या संबंध आणि दक्षिण अमेरिकेचा बहुतेक सर्व भाग हा प्रदेश त्या रेषेच्या पश्चिमेला पडतो. अशा रीतीनें पोपनें जवळजवळ दोन्ही अमेरिका खंडें स्पेनला बक्षीस दिलीं आणि हिंदुस्थान, चीन, जपान, इतर सर्व पूर्वेकडील देश, त्याचप्रमाणें आफ्रिका खंड सबंधच्या सबंध, एवढें मोठें बक्षीस पोर्तुगालला देऊन टाकलें!

या एवढ्या प्रचंड प्रदेशाचा ताबा घेण्याच्या खटपटीला पोर्तुगीझ लोकांनीं सुरुवात केली. ही कांहीं इतकी सोपी गोष्ट नव्हती. परंतु त्यांनीं थोडीफार प्रगति केली आणि पूर्वेकडे पुढें आक्रमण चालू ठेवलें. इ. स. १५१० मध्यें ते गोव्यापर्यंत पोंचलें; १५११ मध्यें मलाक्का आणि मॅलेचें द्विपकल्प त्यांनीं गांठलें; त्याच्या पाठोपाठच जावाही त्यांनीं गांठलें; आणि १५७६ मध्यें ते चीनमध्यें जाऊन पोंचले. याचा अर्थ या सर्व प्रदेशांचा त्यांनीं प्रत्यक्ष ताबा मिळविला असा नव्हे. त्या प्रदेशांत कांहीं कांहीं ठिकाणीं त्यांना आपला पाय रोवायला जागा मिळाली इतकेंच. पूर्वेमध्यें यानंतर त्यांचें जें कांहीं कार्य घडलें त्याचा विचार आपल्याला पुढें एखाद्या पत्रांत केला पाहिजे.

पूर्वेकडे गेलेल्या पोर्तुगीझ लोकांत फर्डिनांड मॅगेलन नांवाचा एक मनुष्य होता. पण तिकडील जे प्रमुख लोक होते त्यांच्याशीं त्याचा तंटा झाला, त्यामुळें तिकडून परत येऊन तो स्पेनचाच प्रजाजन झाला. हिंदुस्थान आणि पूर्वेकडचीं बेटें इकडे तो पूर्वेच्या मार्गानें म्हणजे केप ऑफ गुड होपला वळसा घालून जाऊन आलेला होता. आतां पुन्हां तिकडेच पश्चिमेच्या बाजूनें म्हणजे अमेरिकेकडून जावें असें त्याच्या मनानें घेतलें. कोलंबसानें शोधून काढलेला प्रदेश आशिया खंडांतील मुळींच नव्हता हें त्याला बहुधा माहीत असावें. खरें म्हटलें म्हणजे बॅल्बोआ नांवाच्या एका स्पॅनिश इसमानें मध्य अमेरिकेंतील पनामाचे डोंगर ओलांडून पॅसिफिक समुद्र इ. स. १५१३ मध्यें गांठला होता. कशामुळेंही असो, पण या समुद्राला त्यानें दक्षिण समुद्र असें नांव दिलें आणि त्याच्या किनाऱ्यावरून तो सर्व समुद्र आणि त्याच्या किनाऱ्याची सर्व भूमीही आपला धनी स्पेनचा राजा याच्या मालकीची आहे असें त्यानें घोषितही केलें.

इ. स. १५१९ मध्यें मॅगेलन आपल्या पश्चिम दिशेकडील जलप्रवासाला निघाला. आजपर्यंत झालेल्या अशा सर्व प्रवासांत हा सर्वश्रेष्ठ प्रतीचा प्रवास ठरणार होता. त्याच्याजवळ पांच जहाजें होतीं आणि २५० माणसें होतीं. ॲटलांटिक समुद्र ओलांडून तो दक्षिण अमेरिकेकडे गेला आणि तसाच दक्षिणेला जात जात तो त्या खंडाच्या

अगदीं दाक्षिण टोंकाला पोंचला. एवढ्या अवधींत त्याचें एक जहाज बुडून नाहींसें झालें होतें; आणि एक जहाज त्याला सोडून निघून गेलें होतें. म्हणून तीनच जहाजें शिल्लक राहिलीं होतीं. या तीन जहाजांनिशीं दाक्षिण अमेरिका खंड आणि त्याच्या दक्षिणेकडील एक छोटेंसें बेट यांमधील अरुंद सामुद्रधुनी त्यानें ओलांडिली आणि तेथून तो त्या खंडाच्या पलीकडच्या बाजूच्या मोकळ्या समुद्रांत आला. या समुद्राला मॅगेलन यानें पॅसिफिक समुद्र म्हणजे प्रशांत समुद्र असें नांव दिलें; कारण ॲटलांटिक समुद्राच्या मानानें त्याला हा समुद्र फार शांत वाटला. पॅसिफिक समुद्रात पोंचण्यास त्याला चौदा महिने लागले. तो जी सामुद्रधुनी ओलांडून गेला तिला त्याचेंच नांव, म्हणजे मॅगेलनची सामुद्रधुनी असें नांव देण्यांत आलें.

मॅगेलननें त्यानंतरही मोठ्या धैर्यानें उत्तरेकडे प्रवास चालू ठेवला; नंतर तो वायव्येकडे वळला. कोणालाही त्या समुद्राची कांहीं सुद्धां माहिती नव्हती. त्याच्या सर्व प्रवासांतील अत्यंत भयंकर असा हा प्रवास होता. तो प्रवासही इतका प्रचंड लांबीचा होईल, अशीही कोणाला कल्पना नव्हती. जवळजवळ चार महिने, किंवा अगदीं बरोबर म्हटलें म्हणजे १०८ दिवस हे लोक त्या अफाट समुद्राच्या मध्यभागीं होते; जवळ नाहीं कांहीं खायला कीं पाणी सुद्धां प्यायला, अशी त्यांची अवस्था होती. असे अनंत हाल व यातना सोसून शेवटीं एकदांचे ते लोक फिलिपाइन्स बेटांत पोंचले. त्या ठिकाणीं त्यांना जे लोक आढळले ते त्यांच्याशीं चांगल्या गोडीगुलाबीनें वागले; त्यांना त्यांनीं खायला दिलें. भेटीदाखल निरनिराळ्या वस्तूही दिल्या. पण स्पॅनिश लोकांचें वर्तन मात्र आगळिकीचें आणि उर्मटपणाचें झालें. तेथल्या दोन प्रांत-नायकांमध्यें कसलीशी एक लहानशी लढाई होती तिच्यांत मॅगेलननें भाग घेतला आणि तिच्यांत तो मारला गेला. आणखीही पुष्कळ स्पॅनिश लोकांना त्यांच्या उर्मट वर्तनामुळें तेथील स्थानिक लोकांनीं ठार केलें.

स्पॅनिश लोकांचा उद्देश मसाल्याच्या बेटांचा, जेथून त्यांच्याकडे येणारे मौल्यवान् मसाले येत असत त्या बेटांचा, शोध लावण्याचा होता. म्हणून त्यांच्या शोधार्थ राहिलेल्या लोकांनीं पुढें प्रवास सुरू केला. आणखी एक जहाज त्यांना जाळून टाकून द्यावें लागलें. आतां फक्त दोनच जहाजें शिल्लक राहिलीं. त्यांनीं असें ठरविलें, कीं एका जहाजानें पॅसिफिक समुद्राच्या मार्गानें स्पेनला परत जावें आणि दुसऱ्या जहाजानें केप ऑफ गुड होपवरून स्पेनला जावें. पहिल्या जहाजाला कांहीं फार दूरपर्यंत प्रवास करण्यास मिळाला नाहीं. कारण वाटेंत पोर्तुगीझांनीं तें जहाज पकडलें. परंतु दुसरें, व्हिक्टोरिया नांवाचें जहाज मात्र आफ्रिकेला वळसा घालून इ. स. १५२२ मध्यें म्हणजे मूळ निघाल्यापासून तीन वर्षांनीं अठरा माणसांनिशीं स्पेनमध्यें सेव्हिल बंदरांत जाऊन पोंचलें; त्याचा साऱ्या पृथ्वीभोंवतीं प्रवास पुरा झाला होता. असा प्रवास पुरा करणारें हें सगळ्यांत पहिलें जहाज.

व्हिक्टोरिया जहाजाचा हा प्रवास खरोखर अत्यंत अद्‌भुत असल्यामुळें त्याच्या-

बद्दल मीं हें इतकें लांबलचक लिहिलें आहे. आतां आपण सर्व प्रकारच्या सुखसोयींनिशीं समुद्र ओलांडतों आणि आगबोटींतून वाटेल तेवढे लांब लांब प्रवास करतों. पण त्या जुन्या काळच्या जलपर्यटनाचा थोडा विचार करून पाहा. त्यांना किती नाना प्रकारच्या संकटांना आणि धोक्यांना तोंड द्यावें लागलें; अज्ञात अशा प्रदेशांत उड्या घ्याव्या लागल्या; आणि अशा रीतीनें आपल्या पाठीमागून येणारांसाठीं नवे नवे जलमार्ग त्यांनीं प्रथम शोधून काढले. त्या काळचे स्पॅनिश आणि पोर्तुगीझ लोक हे अहंमन्य, उर्मट आणि क्रूर लोक होते हें खरें; परंतु त्यांच्या ठिकाणीं असामान्य धैर्य होतें आणि प्रचंड साहसाची प्रवृत्ति होती.

इकडे मॅगेलन पृथ्वीपर्यटन करीत होता, त्याच सुमारास कोर्टेझ मेक्सिको शहरांत प्रवेश करून स्पॅनिश राजाच्या वतीनें ॲझटेकांचें साम्राज्य जिंकून घेत होता. त्याबद्दल आणि अमेरिकेंतील मय संस्कृतीबद्दल थोडेंसें यापूर्वी मीं तुला सांगितलें आहे. कोर्टेझ मेक्सिकोमध्यें इ. स. १५१९ मध्यें पोंचला. पिझारो दक्षिण अमेरिकेंतील इन्कांच्या साम्राज्यांत (आजचा पेरू देश) १५३० मध्यें पोंचला. धैर्य आणि अचाट साहसीपणा, विश्वासघात आणि क्रूरपणा यांच्या बळावर आणि स्थानिक लोकांमधील आपसांतील विरोधांचा उपयोग करून कोर्टेझ आणि पिझारो यांनीं हीं दोन्ही प्राचीन साम्राज्यें यशस्वीपणें नष्ट केलीं. अर्थात् हीं दोन्ही साम्राज्यें आतां फार जुनाट झालीं होतीं; आणि पुष्कळ दृष्टींनीं सुधारणेच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंत तीं होतीं. तेव्हां पहिला धक्का मिळतांक्षणींच तीं दोन्ही पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें कोलमडून पडलीं.

हे पहिले श्रेष्ठ संशोधक आणि धाडसी पुरुष अशा रीतीनें जेथें जाऊन पोंचले, तेथें त्यांच्यामागून लुटालुटीसाठीं लोकांचे थवेच्या थवे जाऊं लागले. अशी गर्दी करून गेलेल्या लोकांमुळें अमेरिकेंतील स्पॅनिश राज्याला विशेष धोका पोंचला; आणि प्रत्यक्ष कोलंबसाला सुद्धां या लोकांनीं फार वाईट रीतीनें वागविलें. तरी पण पेरू आणि मेक्सिको या देशांतून स्पेनमध्यें सोन्याचा व चांदीचा एकसारखा वाहता झरा मात्र चालू झाला. साऱ्या यूरप खंडाचे डोळे फाटून गेले इतका प्रचंड सांठा या दोन्ही मौल्यवान् धातूंचा स्पेनमध्यें झाला आणि त्यामुळें सर्व यूरप खंडभर स्पेनचें वर्चस्व सुरू झालें. हें सोनें अर्थातच यूरपच्या इतरही देशांतून पसरलें आणि त्यामुळें पूर्वेकडील तयार माल घेण्यासाठीं यूरपमधील लोकांपाशीं भरपूर पैसा झाला.

पोर्तुगाल व स्पेन यांच्या यशामुळें इतर देशांतल्या लोकाच्या मनांत वारें संचरलें; फ्रान्स, इंग्लंड, हॉलंड, आणि जर्मनीच्या उत्तरेकडील शहरें यांमधील लोकांच्या मनांत ही खळबळ फार माजली. त्यांनीं आशिया व अमेरिका यांच्याकडे उत्तरेच्या मार्गानें म्हणजे नॉर्वेच्या उत्तरेकडून पूर्वेकडे जाण्याचा आणि ग्रीनलंडवरून पश्चिमेकडे जाण्याचा मार्ग शोधून काढण्याची खटपट प्रथम केली. पण त्यांत जेव्हां त्यांना यश आलें नाहीं, तेव्हां त्यांनीं आतां सर्वांच्या परिचयाच्या झालेल्या मार्गांचा अवलंब केला.

जगाचे नवीन नवीन भाग मनुष्याच्या दृष्टिपथांत येत होते, आणि तेथील

किंवा इतरही ठिकाणची पृथ्वीवरील संपत्ति आणि अद्भुत गोष्टी मनुष्याला समजून येऊं लागल्या होत्या; तेव्हांचा तो काळ किती अलौकिक असला पाहिजे! नवे नवे महासागर आणि देश यांचे शोध एकामागून एक लागत होते; 'तिळा उघड' म्हणून म्हटल्याबरोबर ती जादूची गुहा जशी उघडावी, अशा प्रकारें मोजतां येणार नाहीं इतकी प्रमाणाबाहेर संपत्ति पैदा होत होती. या साहसी कृत्यांमधील जादूगिरीच्या प्रभावानें या वेळच्या जगातील वातावरण नुसतें भारून गेलेलें असलें पाहिजे.

आजकाल जग अगदींच एवढेंसें होऊन गेलें आहे आणि त्यावर नवीन शोधण्याजोगेंही फारसें राहिलें नाहीं, असें एक प्रकारें आपल्याला वाटतें खरें; पण खरी गोष्ट मात्र तशी नाहीं. शास्त्रांनींच आपल्या दृष्टीसमोर एवढाले मोठे प्रदेश निर्माण करून ठेवले आहेत, कीं ज्यांचें अजून संशोधन व्हायचेंच आहे; त्या ठिकाणीं साहसाच्या अचाट कामांना मुळींच वाण नाहीं! निदान आजच्या आपल्या हिंदुस्थानांत तरी नाहीं

## ७४

# मंगोलियन लोकांच्या साम्राज्याचा विध्वंस

९ जुलै, १९३२

यूरपमधील मध्ययुगाचा अंत कसा झाला, यूरपमध्यें एक अगदीं नवीन प्रवृत्ति कशी निर्माण झाली, तेथें नवीनच उत्साह निर्माण होऊन त्याचा आविष्कार कसा झाला, हें मीं तुला सांगितलें. कर्तृत्व आणि नवनिर्मितीचा प्रयत्न यांनीं सारें यूरप खंड नुसतें ओसंडून चाललें आहे असें त्या काळीं दिसतें. कित्येक शतकें या खंडांतील लोक आपापल्या छोट्या छोट्या देशांत नुसते कोंडून राहिले होते; ते आतां आपल्या भोंवतालच्या भिंती फोडून बाहेर पडले आणि प्रचंड महासागर ओलांडून जगाच्या अगदीं वाटेल त्या टोंकाच्या देशाला जाऊन भिडण्यास उद्युक्त झाले. ते बाहेर पडले ते जगज्जेत्यांच्या आवेशानें; इतका त्यांना स्वतःच्या सामर्थ्याबद्दल विश्वास वाटूं लागला होता; या विश्वासामुळेंच त्यांच्या ठिकाणीं धैर्य उत्पन्न झालें आणि त्यांच्या हातून अचाट कार्यें पार पडलीं.

पण या लोकांमध्यें एकाएकीं एवढा मोठा फरक घडून आला तरी कसा, असा तुला प्रश्न पडला असेल. तेराव्या शतकाच्या मध्याला मंगोलियन लोकांचें वर्चस्व यूरप आणि आशिया खंडांमध्यें होतें. पूर्व यूरप खंड त्यांच्या ताब्यातच होतें; आणि पश्चिम यूरप खंड त्या श्रेष्ठ आणि अजिंक्यशा वाटणाऱ्या योद्धयांपुढें भयभीत होऊन थरथर कांपत होतें. यूरप खंडांतील मोठे राजे आणि महाराजे झाले, तरी कागानच्या, बडेखांच्या सामान्य सेनापतींच्या मानानें पाहतां त्या बिचाऱ्यांची काय किंमत होती!

यानंतर दोनशें वर्षांनीं उस्मानी तुर्कांच्या ताब्यांत बादशाही कॉन्स्टान्टिनोपल शहरही आलें आणि यूरपच्या आग्नेयीकडील बराचसा भागही ताब्यांत आला. अशा रीतीनें मुसलमान आणि ख्रिस्ती यांच्यामधील आठशें वर्षांच्या लढ्यानंतर ज्याच्या मोहानें आरबी लोक आणि सेल्जुक तुर्क या खंडाकडे ओढले गेले तें मोठें थोरलें घबाड, तो त्यांच्या आशेचा किल्ला, उस्मानी तुर्कांच्या हातीं पडला. पण एवढ्यानें उस्मानी तुर्कांचें समाधान झालें नाहीं. लोभानें त्यांची नजर आणखी पश्चिमेकडे, प्रत्यक्ष रोमकडे सुद्धां वळली. जर्मन ( पवित्र रोमन ) साम्राज्य आणि इटली देश दोहोंवर त्यांनीं रोख धरला. हंगेरी देश काबीज करून ते व्हिएन्ना शहराच्या तटाशीं आणि इटलीच्या सरहद्दीवर जाऊन पोंचले. पूर्वेस त्यांनीं बगदाद शहर आणि बगदादचें राज्य आपल्या साम्राज्याला जोडलें! आणि दक्षिणेला ईजिप्त देश. सोळाव्या शतकाच्या मध्याला वैभवशाली (शानदार) या पदवीनें प्रसिद्ध असलेला सुलतान सुलेमान हा या प्रचंड तुर्की साम्राज्यावर राज्य करीत होता. समुद्रावर सुद्धां त्याच्याच आरमाराचें सर्वत्र अप्रतिहत प्रभुत्व होतें.

असें असून यूरप खंडामध्यें एवढा हा फरक कसा घडून आला? या मंगोलियन संकटाचें निवारण यूरप खंडानें कसें केलें? एवढ्या या तुर्की संकटांतून यूरप खंड कसें वांचलें? आणि नुसतें वांचलें एवढेंच नव्हे, तर स्वतःच चढाईचें धोरण स्वीकारून इतरांनाच ग्रासण्यास कसें समर्थ झालें?

मंगोलियन लोकांचें दडपण यूरपला फार दीर्घ काळपर्यंत सोसावें लागलें नाहीं. नवीन खानाची निवडणूक करण्यासाठीं ते आपण होऊन परत गेले आणि पुन्हां यूरपकडे ते परतले नाहींत. मंगोलियांतील त्यांच्या घरादारांपासून पश्चिम यूरप खंड हें फारच दूर पडलें. शिवाय, त्या लोकांना संवय पडली मोकळ्या मैदानाची आणि माळरानाची, आणि पश्चिम यूरप खंडाचा प्रदेश तर सगळा अरण्यमय, त्यामुळेंही त्यांचें मन तिकडे वेधलें नसेल. तें कांहीं असलें तरी मंगोलियन लोकांच्या कचाट्यांतून पश्चिम यूरप खंड वांचलें तें कांहीं स्वतःच्या मर्दुमकीनें नव्हे, तर मोंगल लोकांनीं तिकडे दुर्लक्ष केल्यामुळें आणि ते दुसरीकडे गुंतल्यामुळें. पूर्व यूरपांत मात्र मंगोलियन लोक आणखी कांहीं काळपर्यंत राहिले. पण अखेरीस त्याची सत्ता संपुष्टांत आली.

इ. स. १४५२ मध्यें तुर्कांनीं कॉन्स्टान्टिनोपल शहर जिंकून घेतलें. त्या वेळेपासून सर्व यूरपियन इतिहासाला अगदीं निराळें वळण लागलें हें मीं तुला सांगितलेंच आहे. मध्ययुगाचा अंत आणि पुढें ज्याचा अनेक अंगांनीं बहरलेला आविष्कार घडून आला त्या नवीन चेतना-युगाची, ज्ञान व कला यांच्या पुनरुज्जीवनाच्या युगाची, सुरुवात यांच्यामधील एक खुणेचा दगड म्हणून हा कॉन्स्टान्टिनोपलच्या पाडावाचा प्रसंग सोयीसाठीं मानला जातो. म्हणजे चमत्कार असा, कीं ज्या क्षणाला, सारा यूरप तुर्क लोक गिळंकृत करणार, त्या कामीं त्यांना यशही येण्याचा पुष्कळसा संभव अशी खरोखर स्थिति प्राप्त झाली होती, त्याच क्षणाला यूरप खंड स्वतःच्या पायावर उठून उभें राहिलें आणि त्याच्या ठिकाणीं सामर्थ्यही वाढत गेलें. यानंतरही कांहीं काळपर्यंत तुर्क लोक पश्चिम

यूरपमध्यें पुढें पुढें सरकतच होते ; परंतु असे ते पुढें सरकत होते त्याच वेळेला इकडे यूरपीय संशोधक नवे नवे देश, नवे नवे समुद्र शोधून काढीत होते आणि पृथ्वीला वळसा घालीत होते. इ. स. १५२० पासून १५६६ पर्यंतच्या सुलतान वैभवशाली सुलेमानच्या कारकीर्दीमध्यें तुर्कीचें साम्राज्य इकडे व्हिएन्नापासून तों बगदाद आणि कैरोपर्यंत पसरलें होतें. पण त्यापुढें मात्र त्याची प्रगति झाली नाहीं. ग्रीक लोकांच्या ( कॉन्स्टान्टिनोपल येथील ) जुन्या जीवनांत कमजोरी आणि सडकेपणा उत्पन्न करणाऱ्या चालीरीतींना तुर्क लोक बळी पडत गेले. इकडे यूरपचें सामर्थ्य वाढत चाललें, तर त्याच वेळीं तुर्कांची मूळची शक्ति नाहींशी होऊन ते दुर्बळ होत गेले.

प्राचीन युगामधून भटकता भटकतां आपण पाहिलें, कीं आशिया खंडांतील लोकांनीं यूरप खंडावर पुष्कळच स्वाऱ्या केल्या. यूरप खंडांतील लोकांनींही आशिया खंडावर केव्हां केव्हां स्वाऱ्या केल्या ; परंतु त्या तशा म्हणण्यासारख्या महत्त्वाच्या नाहींत. सर्व आशिया खंड ओलांडून ॲलेक्झांडर थेट हिंदुस्थानपर्यंत गेला ; परंतु त्याच्याही स्वारीचा तसा कांहीं मोठा परिणाम झाला नाहीं. रोमन लोक तर मेसापोटे-मियाच्या पलीकडे केव्हांच गेले नाहींत. उलटपक्षीं, आशियांतील टोळ्यांनीं मात्र यूरपवर अगदीं प्राचीन काळापासून वारंवार हल्ले केलेले आढळतात. अशा या आशियांतील लोकांच्या स्वाऱ्यांमध्यें उस्मानी तुर्कांची यूरपवरील स्वारी ही अखेरची. त्यानंतर हळूहळू या भूमिका बदललेल्या दिसतात ; आतां यूरप खंड चढाई करूं लागतें. सोळाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास हा बदल घडून आला असें म्हणतां येईल. नवीनच सांपडलेलें अमेरिका खंड यूरपच्या फारच जलदी आहारीं गेलें. आशियाचा प्रश्न अधिक बिकट होता. आशिया खंडांत कोठें तरी चांगला पाय रोंवायला सांपडावा म्हणून यूरपीय लोकांना दोनशें वर्षें खटपट करावी लागली आणि अठराव्या शतकाच्या मध्याला आशिया खंडांत त्यांचें वर्चस्व बसण्यास सुरुवात झाली, ही गोष्ट आपण मुद्दाम लक्षांत ठेवली पाहिजे. कारण अज्ञानामुळें पुष्कळ लोकांची अशी समजूत झालेली असते, कीं यूरप खंड सदा सर्वकाळ आशिया खंडावर वरचष्मा गाजवीत आलें आहे. आपल्याला आतां दिसून येईलच, कीं यूरपची वरचष्म्याची ही भूमिका अगदीं अलीकडची आहे आणि एवढ्यांतच पुन्हां एकदां प्रवेश बदलण्याची वेळ आलेली असून ही वरचष्म्याची भूमिकाही आतां निकामी होऊन पडद्याआड जाण्याच्या बेतांत आली आहे. पूर्वेकडील सर्व देशांत नवीन कल्पना उसळत आहेत आणि स्वातंत्र्याच्या प्रबळ चळवळी त्या देशांत उत्पन्न होऊन यूरपच्या वर्चस्वाला मान्यता नाकारून त्याला खो देण्याचा उद्योग सुरू झाला आहे. या राष्ट्रीय विचारापेक्षांही सर्वत्र प्रकारच्या साम्राज्यशाहीचा पिळणुकीचा शेवट करावा या बुद्धीनें निर्माण झालेले सामाजिक समतेचे नवीन विचार हे अधिक खोलवर गेले असून अधिक दूरवर पसरलेले आहेत. यापुढें यूरपनें आशियावर वर्चस्व गाजवावें किंवा आशियानें यूरपवर वर्चस्व गाजवावें किंवा कोणाही एका देशानें दुसऱ्या देशा-

वर वर्चस्व गाजवावें किंवा त्याची पिळणूक करावी, असा प्रश्नच उद्भवता कामा नये अशी या विचारांची दिशा आहे.

ही प्रस्तावना फार लांबली. आतां आपण मंगोलियन लोकांकडे परत येऊं या. त्यांच्या यशापयशाची हकीकत थोडीशी पाहूं या; कसा काय झाला त्यांचा या पुढचा वृत्तांत? कुब्लाईखान हा शेवटचा बडे खा–कागान–झाला हें तुला आठवतच असेल. इ. स. १२९२ मध्यें तो मरण पावल्यानंतर आशिया खंडांत कोरियापासून तों थेट यूरप खंडांत पोलंड आणि हंगेरीपर्यंत पसरलेल्या त्याच्या साम्राज्याची फुटाफूट होऊन पांच वेगवेगळीं साम्राज्यें झालीं. तसें पाहिलें तर यांतील एकेक साम्राज्यही चांगलें भलें मोठें होतें. मागें एका पत्रांत (६८ वें) या पांची साम्राज्यांचीं नावें मीं तुला सांगितलीं आहेत.

त्यातलें मुख्य साम्राज्य चीनचें; यांतच मँचुरिया, मंगोलिया, तिबेट, कोरिया, अनाम (म्हणजे वैतनाम), टांगानिका आणि ब्रह्मदेशाचा कांहीं भाग यांचाही समावेश होत असे. कुब्लाईखानाचे युआन राजघराण्यांतील वंशज या साम्राज्याचे मालक झाले; परंतु फारच थोड्या काळपर्यंत. लौकरच या साम्राज्यातून दक्षिणेकडील कांहीं कांहीं तुकडे फुटून बाहेर पडूं लागले आणि कुब्लाईखानाच्या मृत्यूनंतर ७६ च वर्षांनीं इ. स. १३६८ मध्यें याच्या वंशाचा पाडाव झाला आणि मंगोलियन लोकांना हांकून देण्यांत आलें हें मीं तुला सांगितलेंच आहे.

अगदीं पाश्चिमेच्या टोंकाला सोनेरी टोळीचें सुवर्ण-संघीयांचें (सुनहरे कबीले) साम्राज्य होतें. किती मजेदार नांव आहे नव्हे या लोकांचें! कुब्लाईखानाच्या मृत्यूनंतर दोनशें वर्षे रशियांतील उमराव–सरदार–लोक या लोकांना खंडणी देत होते. त्यानंतर मात्र इ. स. १४८० च्या सुमारास इकडच्या मंगोलियन साम्राज्याचें सामर्थ्य थोडें कमी झालें; मॉस्कोचा ग्रँड ड्यूक हा या सुमारास प्रमुख रशियन उमराव झाला होता; त्यानें मंगोलियन साम्राज्याला खंडणी देण्याचें नाकारलें. या ग्रँड ड्यूकला इव्हान दि ग्रेट (श्रेष्ठ इव्हान) असें म्हणतात. रशियाच्या उत्तर भागात नोव्होगोरोडचें प्राचीन लोकसत्ताक राज्य असून तें व्यापारी व हुन्नरी लोकांच्या ताब्यांत होतें. इव्हाननें या लोकसत्ताक राज्याचा पराभव केला व तें आपल्या संस्थानाला जोडून टाकलें. दरम्यान इकडे तुर्कांनीं कॉन्स्टान्टिनोपलचा पाडाव केल्यामुळें तेथील प्राचीन बादशहाचें घराणें देशोधडीला लागलें होतें. इव्हाननें या प्राचीन बादशाही घराण्यांतील एका मुलीशीं लग्न केलें. आणि अशा रीतीनें आपण बादशहाच्या परंपरेंतीलच एक झालों असून प्राचीन बायझांटियमच्या साम्राज्याचे वारस आहोंत असा हक्क तो सांगूं लागला. त्याच्या नातवानें स्वतःला झार ही पदवी घेतली; झार म्हणजेच सीझर किंवा बादशहा. हा नातू फारच क्रूर असल्यामुळें त्याला इव्हान दि टेरिबल–भयंकर इव्हान–असें म्हणत असत.

अशा रीतीनें मंगोलियन लोकांचा यूरप खंडाशीं अखेरचा संबंध सुटला.

यानंतर आतां या सोनेरी टोळीच्या किंवा मध्य आशियांतील बाकीच्या मंगोलियन साम्राज्यांचा आपण फारसा विचार केला नाहीं तरी चालेल. शिवाय, मला स्वतःला त्याच्याबद्दल फारशी माहिती नाहीं. पण त्यांपैकीं एका मनुष्याकडे मात्र आपण लक्ष पुरविणें जरूर आहे.

हा मनुष्य म्हणजे टिमूर–तैमूरलंग–हा होय. त्याला दुसरा चेंगीजखान व्हावें अशी इच्छा होती. स्वतः तो आपण चेंगीजखानच्या वंशांतील आहों असें म्हणे; पण खरोखर तो होता तुर्क. तो लंगडा होता. त्यामुळें त्याला तैमूर-इ-लंग म्हणजे लंगडा तिमूर किंवा तामरलेन असें म्हणतात. आपल्या बापाच्या पाठीमागें तो १३६९ मध्यें समरकंदचा राजा झाला. त्यानंतर लौकरच त्यानें आपल्या मुलूखगिरीच्या आणि क्रूरपणाच्या कारकीर्दीला सुरुवात केली. तो सेनापति फार मोठा होता, पण अगदींच रानटी मनुष्य होता तो. दरम्यानच्या काळांत मध्य आशियांतील मंगोलियन लोकांनीं मुसलमानधर्माचा स्वीकार केलेला असल्यामुळें तैमूरलंग हाही मुसलमान होता. परंतु त्याचा प्रत्यक्ष लढण्याचा संबंध जरी मुसलमानांशींच आला, तरी तेवढ्यामुळें कांहीं त्याचें अंतःकरण एवढें सुद्धां द्रवलें नाहीं. जेथें जेथें तो जाई, तेथें तेथें तो सारा प्रदेश उध्वस्त करी; तेथें नानाविध घाणेरडे सांथीचे रोग उद्भवत आणि जिकडे तिकडे अन्नान्नदशा आणि घोर दैन्यावस्था निर्माण होई. मनुष्यांच्या मस्तकांचे मोठमोठे पिरामिड रचावयाचे यांत त्याला सगळ्यांत आनंद वाटत असे. पूर्वेला दिल्लीपासून पश्चिमेला आशिया मायनरपर्यंत त्यानें लोक ठार करविले आणि त्यांचीं मस्तकें पिरामिडच्या आकारामध्यें रचविलीं.

चेंगीझखान आणि त्याचे मंगोलियन लोक हेही क्रूरच होते आणि तेही खूप नासधूस करीत असत; पण ते आपल्या काळच्या इतर ठिकाणच्या लोकांहून विशेष निराळे नव्हते. तैमूरलंग हा याहून फारच वाईट प्रकारचा मनुष्य होता. सैतानी आणि निष्कारण क्रूरपणाच्या बाबतींत त्याच्यासारखा साऱ्या इतिहासांत तोच एकटा एक आढळतो; त्याच्याशीं तुलनेला कोणी नाहीं. एका ठिकाणीं असें लिहिलें आहे, कीं त्यानें दोन हजार जिवंत माणसांचा एक मनोरा उभा केला आणि त्याच्यावर विटांचें आणि चुन्याचें बांधकाम बांधून काढलें !

या रानटी माणसाचें चित्त हिंदुस्थानच्या संपत्तीनें वेधलें आहे. हिंदुस्थानवर स्वारी करावी या त्याच्या बेताला आपल्या सेनापतींची व सरदारांची मान्यता मिळविण्याला त्याला थोडें कठिण पडलें असें दिसतें. या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं समरकंद येथें मोठा दरबार भरला होता. आणि हिंदुस्थानांत फारच उन्हाळा असतो या कारणास्तव तिकडे जाण्याला सरदार लोकांनीं विरोध केला. अखेरीस आपण हिंदुस्थानांत कायमचें वास्तव्य करणार नाहीं, फक्त लूटमार करून आणि नासधूस करून परतूं, असें तैमूरलंगानें वचन दिलें; त्यानें हा आपला शब्द पाळला.

या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचें राज्य होतें हें तुझ्या लक्षांत असेल.

दिल्लीस या वेळीं एक सुलतानच राज्य करीत होता. परंतु मुसलमानाचें हें राज्य बलिष्ठ राहिलेलें नव्हतें; सरहद्दीवर मंगोलियन लोकांशीं एकसारखें लढावें लागल्यामुळें त्याचा कणाच मोडल्यासारखा झाला होता. त्यामुळें तैमूरलंगाची जेव्हां स्वारी आली, तेव्हां त्याला हिंदी सरहद्दीवर व पुढेंही फारसा विरोध होऊं शकला नाहीं आणि तो मोठ्या मौजेंत कत्तली करीत आणि मानवी मस्तकांचें पिरामिड बांधीत पुढें चालला. कत्तल हिंदू आणि मुसलमान दोघांची झाली. त्यामध्यें कसलाही भेदाभेद केला गेल्याचें आढळत नाहीं. कैद झालेल्या लोकांचें त्याला मोठेंच ओझें वाटूं लागून त्या सर्वांना मारून टाकण्याचा त्यानें हुकूम केला आणि अशा रीतीनें एक लक्ष लोकांची कत्तल करण्यात आली. एका ठिकाणीं तर असें सांगतात, कीं हिंदू आणि मुसलमान दोन्ही धर्मांच्या लोकांनीं एकत्र रजपूत लोकांचा जोहाराचा मार्ग अंगीकारला. पण उगीच तीच ती क्रूरपणाची कहाणी पुढें मी उगीच कशाला सांगत बसूं ? जेथें जेथें तो गेला तेथें तेथें त्यानें तोच प्रकार केला. तैमूरलंगाच्या सैन्याच्या धाडीपाठोपाठ दुष्काळ आणि रोग-राई यांचें संकट उभें राहिलें. पंधरा दिवस तो दिल्लींत राहिला आणि त्या श्रेष्ठ शहराचा त्यानें खाटिकखाना किंवा कसाईखाना बनवून टाकला. नंतर परत जातांना वाटेंत काश्मिरचा प्रदेश लुटून तो समरकंदला परत गेला.

तैमूरलंग इतका जरी रानटी होता, तरी समरकंद येथें व मध्य आशियांत इतर ठिकाणीं सुंदर इमारती बांधविण्याचा मात्र त्याला नाद होता. त्यासाठीं त्याच्यापूर्वी पुष्कळ काळ गझनीच्या महमुदानें केलें होतें त्याप्रमाणें त्यानेंही हिंदुस्थानांतील पुष्कळ कारागीर, कसबी, यंत्रशास्त्रज्ञ आणि शिल्पकार व वास्तुशास्त्रप्रवीण जमा केले आणि त्यांना आपल्याबरोबर नेलें. त्यांतले जे उत्कृष्ट शिल्प व वास्तुशास्त्रज्ञ आणि कारागीर होते, ते त्यानें आपल्या स्वतःच्या खास दिमतीस ठेवले. आणि बाकीच्यांना पश्चिम आशियांतील प्रमुख शहरांमध्यें विभागून टाकलें. अशा रीतीनें एका नवीन वास्तु-शास्त्राचा व शिल्पशास्त्राचा उदय झाला.

तैमूर गेल्यानंतर दिल्ली शहर म्हणजे यमाचा दरबार झाला होता. दुष्काळ आणि रोगराई यांचें तेथें अनिर्बंध थैमान चालू होतें. दोन महिनेपर्यंत तेथें कोणी राजा नव्हता की कसली व्यवस्था किंवा कारभार नव्हता. लोकवस्तीही फारच थोडी होती. तैमूरनें दिल्ली येथें आपला जो प्रतिनिधि नेमला होता तो सुद्धां खुद्द दिल्ली सोडून मुलतान येथें जाऊन राहिला होता.

यानंतर तैमूर इराण आणि मेसापेटोमिया या प्रदेशांत सगळीकडे उध्वस्तता करीत गेला. इ. स. १४०२ मध्यें अंगोरा येथें उस्मानी तुर्कांच्या एका मोठ्या सैन्याशीं त्याची गांठ पडली. अत्यंत कुशल अशा रीतीनें आपल्या सैन्याचें नेतृत्व करून त्यानें तुर्कांचा पराभव केला. परंतु समुद्रापुढें त्याचा कांहीं उपाय चालेना; आणि बास्फरसची सामुद्रधुनी कांहीं त्याला ओलांडतां येईना. यामुळें यूरप खंड त्याच्या तडाक्यांतून बचावलें.

त्यानंतर तीन वर्षांनीं चीनवर चालून जात असतांना इ. स. १४०५ मध्यें तैमूरलंग मरण पावला. त्याच्याबरोबरच, साऱ्या पश्चिम आशिया खंडभर पसरलेलें त्याचें साम्राज्यही कोलमडून पडलें. उस्मानी तुर्क त्याला खंडणी देत असत; तसाच ईजित देश; त्याचप्रमाणे सोनेरी टोळीचे मंगोलियन लोक पण त्याला खंडणी देत असत. परंतु त्याचा सगळा खरा गुण काय तो सेनानायकाचा; तो मात्र विशेष प्रकारचा होता. सायबेरियाच्या बर्फमय प्रदेशांत त्यानें केलेल्या कांहीं स्वाऱ्या खरोखरच अलौकिक होत्या. परंतु अंतःकरणानें तो खरा भटक्या जातीचा अगदींच बिनसुधारलेला मनुष्य होता. त्यामुळें कसलीही राज्यकारभाराची व्यवस्था त्यानें आखली नाहीं किंवा चेंगीजखानाप्रमाणें आपल्यामागें आपलें साम्राज्य चालविण्यासाठीं कर्तबगार लोकही निर्माण करून ठेवले नाहींत. त्यामुळें तैमूरचें साम्राज्य त्याच्याबरोबरच नष्ट झालें आणि पाठीमागें कत्तली आणि नासधूस यांची आठवण तेवढी शिल्लक राहिली. मध्य आशियांतून जेवढ्या सगळ्या लूटमार करणारांच्या किंवा मुलूखगिरी करणारांच्या धाडी येऊन पुढें गेल्या, त्या सर्वांपैकीं चार माणसांची स्मृति मध्य आशियांत अद्यापिही टिकून आहे. हे लोक म्हणजे शिकंदर किंवा ॲलेक्झांडर, सुलतान महमूद, चेंगीजखान आणि तैमूरलंग हे होत.

तैमूरलंगानें उस्मानी तुर्कांचा पराभव करून त्यांना मोठाच धक्का दिला. पण त्यांतूनही ते लौकरच सांवरले आणि अवघ्या पन्नास वर्षांनंतरच (१४५३) त्यांनीं कॉन्स्टान्टिनोपल जिंकून घेतलें.

आतां मध्य आशियाची आपण रजाच घेतली पाहिजे. या काळापासून हा प्रदेश सुधारणेच्या वरवर चढणाऱ्या मार्गांत मागें पडतो आणि कोठें तरी एकीकडे अडगळींत पडल्यासारखा होऊन जातो. आपलें लक्ष जावें असें तेथें मग कांहीं घडत नाहीं. मनुष्याच्याच हातून नष्ट झालेल्या तेथल्या संस्कृतीच्या आठवणींशिवाय पाहण्यासारखें त्यांत कांहीं शिल्लक राहत नाहीं. निसर्गाची सुद्धां या प्रदेशावर फारच गैरमर्जी झाली. तेथील हवा अधिकाअधिक रुक्ष झाली आणि मनुष्यवस्तीला गैरसोयीची झाली.

मंगोलियन लोकांची एक शाखा पुढच्या काळांत हिंदुस्थानांत आली आणि तेथें तिनें मोठें साम्राज्य स्थापन केलें. तेवढी शाखा वगळून बाकी सर्व मंगोलियन लोकांना पण आतां आपण रामराम ठोकला पाहिजे. कारण त्या शाखेखेरीज यानंतर चेंगीजखान आणि त्याचे वंशज यांच्या साम्राज्याची इतिश्री झाली. मंगोलियन लोकांत पुन्हां छोट्या छोट्या प्रदेशनायकांची पद्धति सुरू झाली आणि पुन्हां टोळ्याटोळ्यांची राहणीही सुरू झाली.

## ७५

# हिंदुस्थानांत एक बिकट प्रश्न सोडविण्याची घडपड सुरू होते

१२ जुलै, १९३२

तैमूरलंग, त्याच्या त्या कत्तली, व मस्तकांचे पिरामिड यांबद्दल मीं तुला लिहिलें आहे. किती भयंकर आणि रानटी क्रूरपणाच्या वाटतात नाहीं या गोष्टी! तुला वाटेल आमच्या सुधारलेल्या जगांत कांहीं असल्या गोष्टी घडणार नाहींत. तरीपण इतकी कांहीं अगदीं खात्री बाळगूं नको. आपल्या या चालू काळांत सुद्धां काय घडणें शक्य आहे तें नुकतेंच आपण ऐकलें आणि वाचलें आहे. चेंगीजखानानें माणसांचा आणि मालमत्तेचा केलेला नाश पुष्कळच मोठा होता खरा. परंतु १९१४ ते १९१८ च्या महायुद्धांत जो असा नाश झाला, त्याच्यापुढें तो अगदींच फिका पडतो. अशा रीतीनें मंगोलियन लोकांच्या क्रूरपणाच्या प्रत्येक कृत्याला तोडीस तोड अशी आधुनिक भयंकर कृत्यें वाटेल तेवढीं दाखवितां येतील.

तरीपण चेंगीजखान किंवा तैमूरलंग यांच्या काळापेक्षां शेंकडों प्रकारांनीं आपली प्रगति झालेली आहे यांत मुळींच संशय नाहीं. आपली राहणी अनेक रीतींनीं अधिक विविधतायुक्त झाली आहे; एवढेंच नव्हे, तर ती अधिक सुसंपन्नही झाली आहे. निसर्गांतील पुष्कळच शक्ती शोधून काढून, त्यांचे सर्व नियम समजावून घेऊन, त्यांना मनुष्याच्या कामाला लावण्यांत आलें आहे. तेव्हां आजचें जग खरोखरच अधिक सुधारलेलें आहे, अधिक सुसंस्कृत आहे. असें जर आहे, तर लढाईच्या काळांत तेच आपण लोक परत रानटीपणा कां स्वीकारतों? कारण युद्ध म्हणजे सगळी सुधारणा आणि संस्कृति यांची गळचेपीच होय; त्यांचा संपूर्ण धिक्कार व त्यागच होय; मनुष्याच्या मेंदूंत जी अधिक ज्ञानवान् शक्ति निर्माण झाली आहे तिचा उपयोग अधिकाधिक सामर्थ्यवान् आणि विनाशकारक यंत्रें तयार करण्यासाठीं करावयाचा एवढ्या एका गोष्टीशिवाय, युद्ध म्हटलें कीं मनुष्य बाकी साऱ्या सुधारणेला रामराम ठोकीत असतो. एकदां युद्ध सुरू झालें, म्हणजे त्यामध्यें गुंतलेल्या सर्व लोकांचीं डोकीं भयंकर भडकून जातात; आजपर्यंतच्या जीवनांतील सुधारणेंत ते जें जें कांहीं शिकले तें तें सर्व हे लोक विसरून जातात, संसारांतील सत्य आणि सौंदर्य पार विसरतात; आणि चार-दोन हजार वर्षांपूर्वींचे आपले जे क्रूर, रानटी पूर्वज त्यांच्यांत आणि यांच्यांत कांहीं फरक राहत नाहीं. तेव्हां युद्ध, मग तें कोणत्याही काळांतलें असो, तें अत्यंत भयंकरच असावयाचें यांत काय आश्चर्य!

या जगाशीं अपरिचित असा कोणी मनुष्य युद्धाच्या काळांत जर आपल्यामध्यें

आला, तर तो काय म्हणेल? शांततेच्या काळांत त्यानें आपल्याला कधींच पाहिलेलें नसून युद्धाच्या काळांतही त्याची-आपली पहिलीच गांठभेट आहे असें समज. मग युद्धावरूनच काय ती आपल्या मनाची कल्पना तो बांधील; आणि असें ठरवील, कीं हे लोक म्हणजे अत्यंत क्रूर आणि निर्दय आहेत; रानटी पशू आहेत नुसते; अधूनमधून त्यांच्या ठिकाणीं शौर्य आणि त्याग या गुणांचें दर्शन होतें; परंतु एकंदरींत, क्वचित् कांहीं अपवादात्मक चांगल्या गोष्टी सोडल्या, तर या लोकांना एकाच गोष्टीनें सर्वस्वीं वेड लावलेलें आहे; ती म्हणजे एकमेकांना ठार करावयाचें व एकमेकांचा नाश करावयाचा. अशा तऱ्हेनें तो आपल्याबद्दल चुकीचा निर्णय बांधील आणि आपल्या जगाबद्दल अगदींच विकृत कल्पना करून घेईल; कारण काय, तर त्याला आपली माहिती फक्त एका विशिष्ट काळापुरतीच, आणि तीही प्रतिकूल अशा काळापुरतीच झालेली असणार.

अशाच रीतीनें भूतकाळाचा विचार आपण त्या काळचीं युद्धें आणि कत्तली यांच्या चष्म्यातूनच फक्त जर करूं गेलों, तर आपला निर्णय चुकीचा होईल. मोठी खेदाची गोष्ट ही आहे, कीं युद्धें आणि कत्तली यांच्या ठिकाणीं माणसाचें चित्त वेधून घेण्याचा फार विलक्षण गुण आहे. लोकांची दैनंदिन राहणी ही इतकी आकर्षक असत नाहीं. तिच्यांत सांगण्यासारखें असें इतिहासकाराला काय सांपडणार? त्यामुळें इतिहासकार युद्ध किंवा लढाई दिसतांच त्यांच्यावर झडप घालतो आणि त्यांचीच टिमकी वाजवीत सुटतो. हीं सगळीं युद्धें विसरून किंवा त्यांकडे दुर्लक्ष करून आपलें चालणार नाहीं हें अर्थातच खरें; परंतु त्यांच्याकडे आपण वाजवीहून जास्त लक्ष देतां कामा नये. वर्तमानकाळाकडे जशा दृष्टीनें पाहतों, तशाच दृष्टीनें आपण भूतकाळाकडे पाहिलें पाहिजे; आणि त्या काळच्या लोकांचा विचारही आपण आपल्या स्वतःच्या-बद्दल करतों तशा आपुलकीच्या दृष्टीनें केला पाहिजे. असें केलें म्हणजे मगच आपल्याला त्यांच्यामधील मानवी गुणांचें अधिक चागलें आकलन होईल; आणि मग त्या लोकांची दैनंदिन राहणी आणि तत्संबंधीं त्यांचे विचार या गोष्टींचें आपल्याला खरें महत्त्व असून अधूनमधून होणाऱ्या युद्धांचें नव्हे, ही गोष्ट आपल्याला चांगली कळून येईल. हा मुद्दा नीट लक्षांत ठेवणें जरूर आहे. कारण तुझ्या हातीं येणाऱ्या पुष्कळशा इतिहास-ग्रंथांमध्यें या युद्धांच्या वर्णनांचाच महापूर असतो. फार कशाला? माझ्या या पत्रांतसुद्धां पुष्कळदां त्याच दिशेकडे ओघ वळतो. त्याचें खरें कारण असें आहे, कीं भूतकाळांतील दैनंदिन राहणीबद्दल लिहिणें ही गोष्ट अवघड आहे. मला स्वतःला त्याबद्दल पुरेशी माहितीच नाहीं.

हिंदुस्थानच्या कपाळीं आलेल्या सर्व भयंकर अनर्थांपैकीं तैमूरची स्वारी हा एक फारच तीव्रतम अनर्थ होता हें आपण पाहिलें आहे. जेथें जेथें तो येऊन जाई, तेथें तेथें त्याच्या पाठीमागें केवढें दैन्य आणि यातना पसरून जात याचा नुसता विचार मनांत

आला तरी अंगावर शहारे उभे राहतात. तरीपण त्यांतल्या त्यांत बरी गोष्ट म्हणजे दक्षिण हिंदुस्थान सबंधच्या सबंध त्याच्या कचाट्यांतून निसटला; त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या पूर्व, पश्चिम आणि मध्य भागांनाही त्याची झळ लागली नाहीं. एवढेंच नव्हे, तर सध्यांचा जो संयुक्त प्रांत तो सुद्धां, उत्तरेकडील दिल्ली किंवा मीरत यांच्या आसपासचा थोडासा तुकडा सोडला तर त्याच्या हातून बचावला. तैमूरलंगाच्या स्वारीनें सर्वांत अधिक आघात केला पंजाबवर आणि तसाच दिल्ली शहरावर. पंजाब-मध्यें सुद्धां तैमूरलंग हा ज्या मार्गानें आला आणि गेला, त्या मार्गाच्या आजूबाजूच्या लोकांना सर्वांत अधिक हाल सोसावे लागले. बाकी पंजाबमधील बहुतेक सर्व लोक आपापले रोजचे व्यवहार कसलीही आडकाठी न येतां करीत होते. असें असल्यामुळें या असल्या युद्धांच्या आणि स्वाऱ्यांच्या महत्त्वाबद्दल कांहीं तरी अतिशयोक्तीच्या कल्पना न करण्याबद्दल आपण सावधगिरी बाळगली पाहिजे.

चौदाव्या व पंधराव्या शतकांतील हिंदुस्थानाकडे आतां आपण जरा नजर टाकूं या. या काळांत दिल्लीच्या सुलतानांचा अम्मल कमी कमी होत होत तैमूरच्या येण्याच्या सुमारास जवळजवळ तो संपुष्टांत आलेला असतो. तैमूर आल्यावर तो पारच संपून जातो. हिंदुस्थानभर सगळीकडे स्वतंत्र राज्यें स्थापन होतात. त्यांतलीं बहुतेक सारीं मुसलमानीच होतीं; एकच नांव घेण्याजोगें मोठें हिंदुराज्य असतें; तें म्हणजे दक्षिणेकडील विजयनगरचें राज्य. इस्लामधर्म आतां कांहीं हिंदुस्थानांत पाहुणा किंवा अपरिचित राहिलेला नाहीं. तो या काळांत तेथें चांगला दृढ रीतीनें प्रस्थापित झालेला आढळून येतो. पहिले पहिले स्वारी करून आलेले अफगाण लोक आणि त्यानंतरचे गुलाम सुलतान यांच्या क्रूरपणाचें आणि भयंकरपणाचें मान कमी होत जाऊन मुसलमान लोक हे क्रमाक्रमानें हिंदूंच्याइतकेच या देशाचे रहिवासी होऊन जातात. आतां त्यांचे बाहेरच्या जगाशीं कांहीं संबंध राहत नाहींत. निरनिराळ्या राज्यांमध्यें लढाया होतात. पण त्या सर्व राजकीय लढाया; धार्मिक नव्हेत. कधीं कधीं तर मुसलमान राजे हिंदू शिपायांना नोकरीस ठेवतांना आढळतात आणि हिंदू राजे मुसलमान शिपायांना. मुसलमान राजे पुष्कळदां हिंदू स्त्रियांशीं विवाह करतात आणि मुसलमान राजांकडून मंत्रिपदावर किंवा इतर मोठ्या अमलदारीच्या स्थानावर हिंदूंच्या नेमणुकाही होतात. जित आणि जेते, राज्यकर्ते आणि परतंत्र प्रजा अशा प्रकारची भावना जवळजवळ कोठेंच राहत नाहीं. खरी गोष्ट म्हणजे हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व मुसलमान लोक आणि कित्येक मुसलमान राजेसुद्धां, धर्मांतरित हिंदूच होते. यांपैकीं पुष्कळांनीं धर्मांतर केलें होतें तें दरबारची मर्जी संपादन करावी किंवा इतर कांहीं आर्थिक लाभ करून घ्यावा यासाठीं; आणि धर्मांतर करून-सवरूनसुद्धां हे लोक आपल्या पुष्कळशा प्राचीन परंपरांना चिकटून राहिलेले होते. कांहीं कांहीं मुसलमान राज्यकर्ते हे धर्मांतर करण्यासाठीं जुलमी मार्गाचा अवलंब करतांना आढळतात; परंतु त्यांतही त्यांचा हेतु पुष्कळशा अंशीं राजकीय स्वरूपाचाच होता;

कारण धर्मांतर केलेले लोक हे अधिक राजनिष्ठ प्रजाजन होतील अशी कल्पना असे. परंतु अशा जुलुमानें धर्मांतराचें कार्य कांहीं तितकेंसे झालेलें दिसत नाहीं. आर्थिक कारण हेंच अधिक प्रभावी होतें. मुसलमान नसणारांवर जिझिया नांवाची डोईपट्टी बसविण्यांत येत असे आणि या पट्टींतून बचावण्यासाठीं पुष्कळसे लोक मुसलमान-धर्म स्वीकारीत.

परंतु ही सर्व घडामोड शहरांतूनच काय ती चालू होती. खेडेगांवच्या लोकांवर या सर्व प्रकरणाचा क्वचितच कोठें परिणाम झालेला आढळतो. खेडेगांवच्या कोट्यवधि लोकांची राहणी जशी पूर्वी होती, तशीच पुढेंही चालू होती. हें खरें, कीं सरकारी अम्मलदार खेडेगांवच्या जीवनांत पुष्कळ ढवळाढवळ करूं लागलेले होते; ग्रामपंचायतीचे अधिकार पूर्वीपेक्षां आतां कमी झालेले होते; तथापि ग्रामपंचायती अद्यापि शिल्लक होत्या. एवढेंच नव्हे, तर त्याच सर्व ग्रामीण जीवनाचा आधार आणि केंद्र होत्या. सामाजिक दृष्टीनें, तसेंच धार्मिक आणि रूढीच्या बाबतींत खेडेगांवांत जवळ-जवळ कांहींही बदल झालेला आढळत नाहीं. आजसुद्धां तुला माहीत आहे, कीं हिंदुस्थान देश हा लाखों खेडेगांवांचा देश आहे. मोठमोठीं व्यापारी नगरें आणि लहान लहान शहरें हीं निव्वळ वरचें पाणीच आहेत; खरोखरचा हिंदुस्थान म्हणजे ह्या खेडेगांवांचा बनलेला हिंदुस्थान असें म्हटलें पाहिजे. या खेडेगांवांच्या हिंदुस्थाना-मध्यें इस्लामधर्मानें कांहीं म्हणण्यासारखा बदल केला नाहीं.

मुसलमानधर्माच्या आगमनामुळें हिंदुधर्मामध्यें दोन प्रकारची खळबळ होऊन गेली. आणि मोठी विचित्र गोष्ट अशी, कीं हे दोन्ही प्रकार परस्परांशीं अगदीं विरुद्ध होते. एका बाजूनें हिंदुधर्म हा अगदींच प्रगतिविरोधी बनला. आपल्यावर होणाऱ्या हल्ल्यां-पासून आपलें संरक्षण करण्याच्या प्रयत्नांत त्याच्यांतील लवचिकपणा आणि चैतन्यच नाहींसें झालें आणि चार भिंतींच्या आंत जाऊन दडून बसल्यासारखा तो झाला. जातिबंधनें फारच कडक झालीं आणि एका जातींतून दुसऱ्या जातींत जाणें अतिशय कठिण होऊन गेलें. पडदा आणि स्त्रियांना बाह्य जीवनापासून दूर कोंडून ठेवणें या गोष्टी नित्याच्या होऊन बसल्या. उलटपक्षीं, दुसऱ्या बाजूनें जातिधर्म, पूजाअर्चेचें बंड आणि कर्मठपणा यांविरुद्ध आंतूनच बंड सुरू झालें. या सर्व कर्मकांडांत आणि धर्म-बंधनांत सुधारणा करण्याचे पुष्कळ प्रयत्न होऊं लागले.

अर्थातच हें खरें आहे, कीं अगदीं प्राचीन काळापासूनच्या हिंदुधर्माच्या इतिहासा-मध्यें त्या धर्मांतील अयोग्य गोष्टी किंवा दुराचार सुधारावे यासाठीं झटणारे सुधारक धर्म वेळोवेळीं निर्माण होत आलेले आहेत. बुद्ध हा अशा धर्मसुधारकांपैकीं सर्वश्रेष्ठ होय. आठव्या शतकामध्यें होऊन गेलेल्या शंकराचार्यांबद्दलही मीं तुला सांगितलेंच आहे. त्यांच्यानंतर तीनशें वर्षांनीं, अकराव्या शतकामध्यें दक्षिण हिंदुस्थानांत चोलांच्या साम्राज्यांत आणखी एक श्रेष्ठ धर्मसुधारक होऊन गेला. शंकराचार्यांच्या धर्मविचार-पद्धतीशीं विरोधी असा त्याचा संप्रदाय होता. याचें नांव रामानुज. शंकराचार्य शैव होते

आणि बुद्धिशाली गृहस्थ होते. रामानुज हे वैष्णव होते आणि श्रद्धेवर आधार ठेवणारे गृहस्थ होते. हिंदुस्थानमध्यें राजकीय दृष्ट्या पुष्कळ विभाग व स्वतंत्र राज्यें पडलेलीं असलीं व त्यांच्यामध्यें परस्पर युद्धेंही होत असलीं, तरी सांस्कृतिक दृष्टीनें, तत्त्वविचाराच्या दृष्टीनें सर्व हिंदुस्थान अगदीं प्राचीन काळापासून नेहमीं एक आणि अखंड कसा राहत आलेला आहे हें मीं तुला सांगितलें आहे. या देशांत केव्हांही एखादा श्रेष्ठ मनुष्य उदयास येवो किंवा एखादी श्रेष्ठ चळवळ निर्माण होवो, त्या माणसाच्या कर्तृत्वाचा किंवा विचाराचा आणि अशा चळवळीचा प्रसार, सगळ्या राजकीय सरहद्दी ओलांडून अखिल भारतांत व्हावयाचाच असा नियम चालत आलेला आहे.

इस्लामधर्माचा पाय हिंदुस्थानांत पक्का रोवला गेल्यानंतर हिंदुधर्मीयांमध्यें आणि मुसलमानधर्मीयांमध्येंही धर्मसुधारकांचा एक नवीनच प्रकार निर्माण झाला. या सुधारकांचा प्रयत्न असा होता, कीं या दोन्ही धर्मांतील समान गोष्टींवर अधिक भर द्यावयाचा, त्यांच्यामधील कर्मकांडावर आणि तंत्रावर हल्ला करावयाचा आणि अशा रीतीनें या दोन्ही धर्मांमधील अंतर कमी करावयाचें. अशा रीतीनें या दोन्ही धर्मांचा एक प्रकारचा समन्वय करण्याचा म्हणजे दोहोंचें मिळून मिश्रण बनविण्याचा एक प्रयत्न सुरू झाला. दोन्ही बाजूंच्या लोकांमध्यें एकमेकांबद्दल पुष्कळच दूषित पूर्वग्रह आणि द्वेषभाव असल्यामुळें हें काम फार अवघड होतें. परंतु आपल्याला आढळून येईल, कीं शतकांनुशतकें हा प्रयत्न होतच राहिला. कितीएक मुसलमान राज्यकर्त्यांनींसुद्धां, विशेषतः अकबरानें असा समन्वय घडवून आणण्याचा प्रयत्न केला.

चौदाव्या शतकांत दक्षिणेमध्यें होऊन गेलेला रामानंद हा या समन्वयाच्या कल्पनेचा प्रचार करणारा पहिला प्रख्यात धर्मोपदेशक होय. तो जातिधर्माविरुद्ध प्रचार करी आणि स्वतः जात मानीत नसे. त्याच्या शिष्यांमध्येंच कबीर हा मुसलमान विणकर होता. पुढें तो रामानंदापेक्षांही अधिक प्रसिद्धीस आला. कबीर हा सामान्य जनतेमध्यें फार प्रिय आहे. उत्तर हिंदुस्थानांत आज अगदीं कोनाकोपऱ्यांतल्या खेड्यांतसुद्धां त्याचीं हिंदी पदें सगळयांना चांगल्या परिचयाचीं आहेत, हें तुलाही ठाऊक आहे. तो स्वतः निव्वळ हिंदुधर्माभिमानी नव्हता किंवा निव्वळ मुसलमान-धर्माभिमानी नव्हता; त्याच्या ठिकाणीं या दोन्ही धर्मांवरील निष्ठा होती किंवा या दोन धर्मांच्या मध्यावर कोठें तरी तो उभा होता. त्याचे अनुयायी या दोन्ही धर्मां-मधील आणि सर्व जातींमधील होते. गोष्ट अशी सांगतात, कीं तो जेव्हां मरण पावला तेव्हां त्याच्या शरीरावर एका वस्त्राचें आच्छादन घालण्यांत आलेलें होतें. त्याचे हिंदू शिष्य होते त्यांच्या मनांतून त्याच्या प्रेताला अग्नि द्यावयाचा होता; मुसलमान होते त्यांच्या मनांतून तें पुरावयाचें होतें. त्यामुळें त्यांच्यामध्यें मोठा वाद माजला आणि अखेर प्रकरण भांडणावर गेलें. परंतु शेवटीं त्यानीं जेव्हां तें आच्छादनाचें वस्त्र उचलून पाहिलें, तेव्हां ज्याच्या ताब्यासाठीं आपण एवढे भांडलों तो देह तेथून

नाहींसा झाला असून त्याच्या जागीं ताजीं फुलें आहेत असें त्यांना आढळून आलें. ही कथा अर्थात् काल्पनिकच असणार; तरीपण ती फारच मधुर आहे.

कबिराच्या नंतर हिंदुस्थानांत आणखी एक महान् सुधारक आणि धर्मगुरु उदयास आला. हा म्हणजे शीखपंथाची स्थापना करणारा गुरु नानक हा होय. त्याच्या पाठीमागें एकामागून एक अशी शिखांच्या दहा गुरूंची परंपरा होऊन गेली. गुरु गोविंदसिंग हा त्या परंपरेंतील शेवटचा म्हणजे दहावा गुरु.

हिंदुस्थानांतील धार्मिक व सांस्कृतिक इतिहासामधील आणखी एका प्रख्यात मनुष्याचें नांव मला येथें तुला सांगावेंसें वाटतें. याचें नांव चैतन्य. हा बंगालमध्यें सोळाव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेला. मूळचा हा मोठा विद्वान् पंडित होता. परंतु एकाएकीं त्याच्या मनाचा असा निश्चय झाला, कीं आपली सारी विद्वत्ता आणि पांडित्य हीं निरर्थक होत. म्हणून त्यानें त्यांचा त्याग केला आणि भक्तीच्या मार्गाचा त्यानें अवलंब केला. पुढें तो फार मोठा भक्त म्हणून प्रसिद्धीस आला आणि आपल्या शिष्यगणासह भजनें गात तो साऱ्या बंगाल देशभर संचार करीत असे. त्यानें एक वैष्णवपंथही स्थापन केला आणि अद्यापिसुद्धां बंगालमध्यें त्याचा प्रभाव फार मोठा आहे.

ही झाली धार्मिक सुधारणा आणि समन्वय यांची हकीकत. जीवनाच्या इतर शाखांमध्येंसुद्धां अशाच तऱ्हेचा समन्वय, कधीं कधीं समजूनउमजून, तर पुष्कळ अंशीं अजाणतांच सुरू होता. एक नवीनच संस्कृति, नवीनच स्थापत्य, नवीनच भाषा उदयाला येऊं लागली. पण हें लक्षांत ठेव, कीं हें सारें खेड्यात नव्हे, तर मुख्यतः शहरांमध्यें घडून येत होतें; शहरामध्येंसुद्धा मोंगल साम्राज्याची राजधानी जें दिल्ली शहर त्यामध्यें आणि इतर मोठमोठ्या राज्यांच्या किंवा प्रांतांच्या राजधान्यांमध्यें हा समन्वय घडून येत होता. वरच्या टोंकाला आतां राजा हा पूर्वींपेक्षांही अधिक एकतंत्री होऊन गेला. प्राचीन हिंदी राज्यकर्त्यांच्या एकतंत्री कारभारावर नियंत्रण म्हणून रूढि आणि परंपरा यांचें बंधन तरी होतें. नवीन मुसलमान राजांवर हेंही बंधन राहिलें नाहीं. तत्त्वतः पाहिलें, तर इस्लामधर्मांत समतेचें धोरण अधिक आहे; त्यांच्यामध्यें गुलामालासुद्धां सुलतान होणें शक्य होतें हेंही आपण पाहिलें आहे; तरीपण त्यांच्या राजांचा अधिकार आणि अनियंत्रित सत्ता यांमध्यें वाढच झाली, हें मात्र खरें आहे. वेड्या तुघलकानें दिल्लींतून राजधानी उठवून ती दौलताबादला नेली, याहून अधिक मति गुंग करून टाकणारें दुसरें कोणतें उदाहरण या अनियंत्रित सत्तेचें असूं शकणार आहे?

याचबरोबर गुलाम बाळगण्याची पद्धति, विशेषतः सुलतानांच्या पदरीं ते बाळगण्याची पद्धति पण वाढीस लागली. लढाईमध्यें असे गुलाम पकडण्याचा खास प्रयत्न होऊं लागला. या गुलामांमध्यें कारागीर लोकांना विशेष किंमत असे. बाकीच्यांना सुलतानाच्या खास फौजेंत दाखल करण्यांत येत असे.

नालंदा आणि तक्षशिला येथील त्या महान् विद्यापीठांची या काळांत काय

अवस्था होती ! हीं विद्यापीठें नष्ट होऊन एव्हांना पुष्कळ काळ लोटला होता. परंतु नवीनच पद्धतीचीं पुष्कळ नवीं विद्यापीठें अस्तित्वांत आलेलीं होतीं. त्यांना तोल असें म्हणत असत व त्या ठिकाणीं प्राचीन संस्कृत विद्यांचें अध्ययन होत असे. त्यांच्यामध्यें अद्ययावत्पणा नव्हता. त्यांचें सगळें लक्ष प्राचीन काळांत गुंतलेलें होतें आणि त्यामुळें हीं विद्यापीठें बहुतेककरून प्रगतिविरोधी असावीं. अशा विद्यापीठांच्या केंद्रांपैकीं बनारस हें फार काळापासून नेहमींच सर्वश्रेष्ठ केंद्र म्हणून नांदत आलें आहे.

वरती मीं तुला कबिराच्या हिंदी पदांबद्दल सांगितलें. त्यावरून पंधराव्या शतकाच्या सुमारालाच हिंदी ही नुसती लोकभाषा राहिली नसून ती ग्रंथभाषेच्या साहित्याच्या पदवीला चढली होती असें दिसतें. संस्कृत ही जिवंत, रोजच्या व्यवहारांतील भाषा म्हणून नाहींशी होऊन आतां फार काळ लोटला होता. कालिदासाच्या आणि गुप्त राजांच्या काळींसुद्धां संस्कृत ही फक्त विद्वानांची भाषा झालेली होती. सामान्य लोक संस्कृतमध्येंच थोडेफार फरक होऊन बनलेली प्राकृत भाषा त्या वेळींही बोलूं लागले होते. हळूहळू हिंदी, बंगाली, मराठी आणि गुजराथी या संस्कृत भाषेच्याच मुली वाढत गेल्या. मुसलमानी ग्रंथकार व कवी हिंदी भाषेंत लिहूं लागले. पंधराव्या शतकांत जौनपूर येथील एका राजानें महाभारत आणि भागवत या ग्रंथांचें मूळ संस्कृतमधून बंगाली भाषेंत भाषांतर करविलें. दक्षिणेंतील विजापूर येथील मुसलमान राज्यकर्त्यांचे हिशेब मराठी भाषेंत ठेवले जात असत. अशा रीतीनें संस्कृत भाषेंतून निघालेल्या तीन भाषा, संस्कृताच्या तीन कन्या, पंधराव्या शतकाच्या सुमारासच चांगल्या झाल्या होत्या असें आपणांस आढळतें. अर्थात् दक्षिणेमध्यें द्रविड लोकांच्या भाषा तामीळ, तेलगू, मल्याळी आणि कानडी या पुष्कळच प्राचीन होत्या.

मुसलमानांची दरबारी भाषा फारशी होती. ज्या कोणाला दरबारशीं किंवा सरकारी कचेऱ्यांशीं संबंध ठेवावयाचा असे, त्यांपैकीं बहुतेक सुशिक्षित लोक फारशीचा अभ्यास करीत असत. अशा रीतीनें पुष्कळच हिंदू लोकांना फारशीचें ज्ञान असे. हळूहळू लष्करी तळामध्यें, बाजारामध्यें नवीनच एक उर्दू नांवाची भाषा उत्पन्न झाली. उर्दू या शब्दाचा अर्थच तळ असा आहे. खरें म्हणजे ती कांहीं एखादी निराळी नवी भाषा नव्हती; तर थोडासा निराळा पेहेराव चढविलेली हिंदीच ती होती. तिच्यामध्यें थोडेसे फारशी शब्द जास्त होते; बाकी ती सर्व हिंदीच होती. या हिंदी-उर्दूमिश्रित भाषेलाच कधीं कधीं हिंदुस्थानी भाषा म्हणतात. हिचा प्रसार उत्तर हिंदुस्थानांत आणि मध्य हिंदुस्थानांत सर्वत्र झाला. आज थोड्या थोड्या स्थानिक फरकांनिशीं ही भाषा सुमारें १५ कोटी लोक बोलतात. आणि याहून पुष्कळच अधिक लोकांना ती समजूं शकते. अशा रीतीनें बोलणारांच्या संख्येच्या दृष्टीनें पाहतां हिंदी ही जगांतल्या प्रमुख भाषांपैकीं एक भाषा आहे.

स्थापत्यामध्येंही नवीन परंपरा, नव्या धर्ती, सुरू झाल्या आणि पुष्कळ भव्य

आणि सुंदर इमारती बांधल्या गेल्या; दक्षिणेंत विजापूर आणि विजयनगर येथें; तसेंच गोवळकोंड्यास; अहमदाबाद या त्या काळच्या मोठ्या आणि सुंदर शहरामध्यें; तसेंच अलाहबादजवळ जौनपूर या शहरात. हैद्राबादजवळ गोवळकोंड्यास प्राचीन अवशेष पाहायला आपण गेलों होतों आणि तेथील या प्रचंड किल्ल्यावर जाऊन तेथून खालीं पसरलेल्या त्या प्राचीन शहराचे, तेथील राजवाड्यांचे, बाजार-पेठांचे मोडके-तोडके अवशेष आपण बघितले, ते आठवतात का तुला?

तात्पर्य, हिंदुस्थानमध्यें एकीकडे राजे लोक एकमेकांशीं लढत होते आणि एक-मेकांचा नाश करीत होते, तरीपण अशा या अदृश्य शक्ती एक प्रकारचा समन्वय, एकी-करण करून आणण्यासाठीं अखंड धडपड–खटपट करीत होत्या. उद्देश हा, कीं हिंदुस्थानांतील लोकांनीं एकमेकांसह गुण्यागोविंदानें, एकभावनेनें नांदावें, आपल्या एकत्रित शक्तीचा उपयोग प्रगतीसाठीं आणि सुधारणेसाठीं करावा. पुढील कांहीं शतकांत या अदृश्य शक्तींना प्रचंड यश प्राप्त झालें. परंतु त्यांचें कार्य पुरें होण्या-पूर्वींच आणखी एक धक्का बसून सर्व इमारतच कोसळली आणि जेथून आम्ही लोक निघालों तेथें आम्ही परत जाऊन पडलों. आज पुन्हां आपल्याला तोच सगळा मार्ग पुन्हां आक्रमण करून जें जें म्हणून चागलें आहे त्या सगळयांचा समन्वय – एकीकरण – करावयाचा आहे. पण या वेळीं हें एकीकरण चांगल्या दृढ पायावर उभारलें पाहिजे. स्वातंत्र्य आणि समता याच्या पायावर तें आधारलें पाहिजे आणि आहे त्याहून चांगल्या प्रकारच्या जागतिक रचनेशीं तें जुळतें असलें पाहिजे, तरच तें चिरकाल टिकण्यास समर्थ होईल.

धर्म आणि संस्कृति यांचा समन्वय करण्याच्या या प्रश्नावर कित्येक शतकेंपर्यंत हिंदुस्थानांतील सर्वच श्रेष्ठ लोकांचें चित्त खिळून राहिलेलें होतें. त्यांचें लक्ष या विषयांत इतकें कांहीं पार गुंगून गेलें होतें, कीं राजकीय आणि सामाजिक स्वातंत्र्याची त्यांना आठवणच राहिली नाहीं. आणि तिकडे यूरप खंड दहावीस दिशांनीं पुढें पुढें सरकत असतांना आमचा हिंदुस्थान देश कांहींच प्रगति न करतां कसाबसा जगून मागेंच राहिला.

मीं सांगितलें आहे तुला, कीं हिंदुस्थान देश, आपल्या रसायनशास्त्रांतील प्रगतीच्या जोरावर रंग तयार करणें, पोलादाला पाणी देणें, या आणि इतर अनेक कलांमधील कौशल्याच्या बळावर सर्व जगांतील बाजारपेठा आपल्या कबजांत ठेवीत होता, असा एक काळ होता. या देशाचीं जहाजें येथील माल दूरदूरच्या परकी देशांमध्यें घेऊन जात असत. आतां आपण ज्या काळाचा विचार करतों आहों, त्या वेळीं हिंदुस्थानचें जगाच्या बाजारावरील हें वर्चस्व नष्ट होऊन पुष्कळच काळ लोटला होता. सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला तर हा व्यापाराचा ओघ उलट पूर्वेच्या दिशेनें वाहूं लागला. सुरुवातीला उगीच कोठें एकदां थेंब थेंब पोंचल्यासारखें वाटत होतें; परंतु लौकरच हा ओघ वाढून चांगला प्रचंड भरदार प्रवाह होणार होता.

## ७६
# दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यें

१४ जुलै, १९३२

आतां पुन्हां एकदां आपण हिंदुस्थानाकडे नजर वळवूं या आणि येथील राज्यें आणि साम्राज्यें यांच्यामध्यें ज्या अलाटापालटी झाल्या त्यांचा विशाल चित्रपट पाहूं या. हा एक जणुं कांहीं प्रचंड मोठा आणि कधीं न संपणारा चलचित्रपट असून त्याच्या-वरचीं हीं मूक चित्रेंच जणुं एकापाठोपाठ एक आपल्यापुढें येऊन जातांना आढळतात.

आपला तो वेडा सुलतान महमद तुघलक आणि त्यानें दिल्लीचें साम्राज्य मोडून टाकण्याची बहाद्दरी कशी केली हें तुझ्या लक्षांत असेलच बहुधा. त्या वेळीं दक्षिणेंतील मोठमोठे प्रांत साम्राज्यांतून फुटून निघाले आणि त्या ठिकाणीं स्वतंत्र राज्यें प्रस्थापित झालीं. त्यामध्यें हिंदूंचें विजयानगर व मुसलमानांचें गुलबर्गा हीं प्रमुख राज्यें होतीं. पूर्वेकडे बंगाल आणि बिहार यांचा मिळून झालेला गौड देश हाही स्वतंत्र झाला. येथील राजा मुसलमान होता.

महमदाच्या मागून त्याचा पुतण्या फिरोजशहा हा गादीवर आला. हा आपल्या चुलत्यासारखा माथेफिरू नव्हता आणि त्याच्या मानानें अधिक दयाळू होता. परंतु त्याच्याही ठिकाणीं धार्मिक कडवेपणा होताच. फिरोजशहा हा कर्तबगार राज्यकर्ता असून त्यानें राज्यकारभारांत पुष्कळ सुधारणा केल्या. दक्षिणेंतील किंवा पूर्वेकडील गेलेले प्रांत कांहीं त्याला परत मिळवितां आले नाहींत; परंतु यापुढें आणखी साम्राज्याची फुटाफूट होऊं नये एवढी व्यवस्था मात्र त्याला करतां आली. नवीन शहरें, प्रासाद, मशिदी वगैरे बांधण्याची आणि बागबगीचे तयार करण्याची त्याला विशेष आवड होती. दिल्ली-जवळचें फिरोजाबाद शहर आणि अलाहाबादपासून थोडेंसें पलीकडे असलेलें जौनपूर हीं शहरें त्यानें प्रस्थापित केलीं. त्याचप्रमाणें त्यानें यमुना नदीचा एक मोठा कालवा बांधला आणि मोडकळीला आलेल्या कित्येक इमारती दुरुस्त केल्या. या सर्व बांधकामां-बद्दल त्याला मोठा अभिमान वाटत असे. आपण बांधलेल्या नव्या इमारती आणि दुरुस्त केलेल्या जुन्या इमारती यांची त्यानें एक भली मोठी लांब यादी तयार केलेली आहे.

फिरोजशहाची आई बिबी नैला ही रजपूत असून एका मोठ्या मांडलिक राजाची मुलगी होती. तिच्यासंबंधीं गोष्ट अशी सांगतात, प्रथम ही मुलगी फिरोजच्या बापाला देण्याचें नाकारण्यांत आलें होतें. त्यामुळें युद्ध उद्भवलें आणि नैलाच्या देशावर हल्ला होऊन तो उध्वस्त केला गेला. आपल्यासाठीं आपल्या लोकांचे होत असलेले हाल पाहून बिबी नैलाचें मन फार अवस्थ झालें आणि स्वतःच फिरोजशहाच्या बापाच्या हवालीं होऊन आपल्या लोकांचें रक्षण करण्याचा तिनें

निश्चय केला. अशा रीतीनें फिरोजशहाच्या अंगांत रजपूत रक्त होतें. पुढें अशीं हीं मुसलमान राज्यकर्ते आणि रजपूत स्त्रिया यांच्यामधील पुष्कळ लग्नें वारंवार होत गेलेलीं तुला आढळतील आणि त्यामुळें एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होण्याला मदत झाली असली पाहिजे.

आपली सदतीस वर्षांची भली लांब कारकीर्द संपवून फिरोजशहा इ. स. १३८८ मध्यें मरण पावला. त्यानंतर ताबडतोब आतांपर्यंत कसाबसा त्यानें सांवरून धरलेला दिल्लीच्या साम्राज्याचा डोलारा पार मोडून कोलमडून पडला. मध्यवर्ती अशी सत्ताच शिल्लक राहिली नाहीं. जिकडे तिकडे छोट्या-छोट्या राज्यकर्त्यांचें वर्चस्व माजलें. याच अंदाधुंदीच्या काळांत फिरोजशहाच्या मृत्यूनंतर दहा वर्षांनीं तैमूरलंग उत्तरेकडून हिंदुस्थानवर धाड घेऊन आला होता. दिल्ली शहराचा जवळजवळ त्यानें प्राणच घेतला म्हणावयाचा; परंतु त्यांतूनही हळूहळू दिल्ली शहर सांवरलें आणि पुन्हां पन्नास वर्षांनंतर तें शहर आणखी एका मध्यवर्ती सत्तेची राजधानी होऊन तेथें एका सुलतानाचा अम्मल चालू झाला. तथापि, त्या वेळीं त्याची ही सत्ता फक्त एका छोट्याशा राज्यावर होती. दक्षिणेंतील किंवा पूर्वेकडील मोठमोठ्या राज्यांशीं त्याची तुलना करतां येण्यासारखी नव्हती. हे नवे सुलतान अफगाण वंशाचे होते. पण हे अगदींच नादान लोक होते. इतके, कीं अखेरीस त्यांचे अफगाण सरदारच त्यांना कंटाळले आणि कशी तरी ही ब्याद एकदां जावो अशा तिरस्कारवृत्तीनें त्यांनीं एका परकी राज्यकर्त्याला आपल्या येथें येऊन आपल्यावर राज्य करण्याची विनंति केली. हा परकी राजा म्हणजे बाबर. हा मंगोलियन होता. हे लोक हिंदुस्थानांत स्थिरस्थावर झाल्यापासून त्यांना लोक मोंगल म्हणूं लागले. तसेंच आपणपण यापुढें म्हणूं या. बाबर थेट तैमूरलंगाच्या वंशांतच जन्मलेला असून त्याची आई चेंगीजखानाच्या वंशामधील होती. या वेळीं बाबर हा काबूल येथील राजा होता. हिंदुस्थानांत येण्याबद्दलचें हें आमंत्रण त्यानें मोठ्या आनंदानें पत्करलें; बाकी बोलावलें गेलें नसतें, म्हणजे कांहीं तो येण्याचा थोडाच थांबणार होता! दिल्लीजवळ पानिपतच्या मैदानांत इ. स. १५२६ मध्यें झालेल्या लढाईत बाबरनें हिंदुस्थानचें साम्राज्य जिंकलें. पुन्हां एक नवीन साम्राज्य—मोंगलांचें हिंदी साम्राज्य—उदयाला आलें आणि दिल्ली शहराला साम्राज्याच्या राजधानीपदाचा मान पुन्हां एकदां प्राप्त झाला. परंतु या प्रकरणाचा विचार करण्यापूर्वी बाकीच्या हिंदुस्थानकडे एकदां आपल्याला नजर टाकली पाहिजे आणि दिल्लीच्या या नव्या साम्राज्याच्या पूर्वीच्या दीडशें वर्षांच्या अवनतीच्या काळांत तिकडे काय काय घडामोडी होत होत्या, हें पाहिलें पाहिजे.

या काळांत हिंदुस्थानांत लहानमोठ्या स्वतंत्र राज्यांची खूपच संख्या माजलेली होती. नवीनच जौनपूर येथें एक लहानसें राज्य स्थापन झालें होतें. शरकी घराण्यांतील मुसलमान राजांचें तेथें राज्य होतें. हें राज्य मोठें नव्हतें किंवा

सामर्थ्यवानही नव्हतें; आणि राजकीय दृष्टीनें त्याला कांहीं महत्त्वही नव्हतें. तरीपण शंभर वर्षेंपर्यंत हें राज्य संस्कृतीचें, विद्यांचें एक मोठें केंद्र होतें आणि धार्मिक उदारतेचें तें माहेरघर होतें. जौनपूरमध्यें जीं मुसलमानी विद्यालयें होतीं, त्यांमधून या धार्मिक उदारतेच्या भावनेचा फैलाव करण्यांत आला आणि हिंदु व मुसलमान धर्मांच्या समन्वयाबद्दल, एकीकरणाबद्दल गेल्या पत्रांत मीं लिहिला तसा समन्वय करण्याचा प्रयत्नही तेथील एका राजानें केला. कलांना आणि सुंदर इमारतींच्या बांधकामांना त्या राज्यांत चांगलें प्रोत्साहन मिळालें; त्याचप्रमाणें या काळीं वाढीस लागलेल्या हिंदी आणि बंगाली या भाषांनाही त्या राज्यांत चांगली मदत मिळाली. सगळीकडे धार्मिक अनुदारतेनें धुमाकूळ घातलेला होता. अशा परिस्थितींत विद्या, कला, संस्कृति आणि धार्मिक उदारपणा यांचें माहेरघर असें हें राज्य निराळेंच उठून दिसतें.

पूर्वेला बंगाल आणि बिहार या प्रदेशांचें मिळून झालेलें गौड राज्य थेट जवळ-जवळ अलाहाबादपर्यंत येऊन भिडलेलें होतें. गौड हें शहर समुद्रकांठचें एक बंदर असून जलमार्गानें त्याचा समुद्रकांठच्या शहरांशीं संबंध होता. इकडे मध्य हिंदुस्थानांत अलाहाबादच्या पश्चिमेपासून तों जवळजवळ थेट गुजराथपर्यंत माळव्याचें राज्य होतें. याची राजधानी मांडव येथें (धार विभागांत) असून हें एक मोठें शहर होतें व तेथें चांगला गडही होता. या मांडव शहरांत फार वैभवशाली आणि सुंदर इमारती बांधण्यांत आलेल्या होत्या. त्यांच्या अवशेषांकडे आजही प्रवाशांचें चित्त वेधून राहतें.

माळव्याच्या वायव्येला राजपुताना. येथें पुष्कळ रजपूत राज्यें होतीं. चितोड हें त्यांत विशेष महत्त्वाचें. चितोडचें राज्य व माळवा आणि गुजराथचीं राज्यें यांच्यामध्यें वारंवार लढाया होत असत. त्या दोन बलिष्ठ राज्यांच्या मानानें चितोडचें राज्य लहान होतें. परंतु रजपूत लोक हे पहिल्यापासून नेहमींच मोठे शूर, लढवय्ये म्हणून नामांकित आहेत. त्यामुळें संख्येनें कमी असून सुद्धां केव्हां केव्हां त्यांचा जय होई. अशा एका विजयाचें स्मारक म्हणूनच चितोडच्या राजानें एक सुंदर जयस्तंभ चितोड येथें बांधविला. मांडवच्या सुलतानानें त्याच्यावर ताण करण्यासाठीं म्हणून मांडव येथें एक उंच मनोरा बांधला. चितोडचा स्तंभ अजून अस्तित्वांत आहे; मांडवचा नष्ट होऊन गेला आहे.

माळव्याच्या पश्चिमेला गुजराथ. या प्रांतांत एक बलिष्ठ राज्य स्थापन झालेलें होतें. त्याची राजधानी अहमदाबाद या शहरीं होती. सुलतान अहमदशहानें स्थापन केलेलें हें शहर चांगलें वाढून त्याची लोकसंख्या जवळजवळ दहा लाख झाली होती. त्या ठिकाणीं अनेक सुंदर इमारती बांधल्या गेल्या आणि पंधराव्या शतकापासून तों अठराव्या शतकापर्यंत तीनशें वर्षें, अहमदाबाद हें शहर जगांतील सर्वोत्कृष्ट शहरां-पैकीं एक असें गणलें जात होतें असें म्हणतात. या शहरांतील ती महान् जामी मशीद ही राणपूर येथें चितोडच्या राजानें त्याच सुमारास बांधलेल्या जैन मंदिरा-सारखीच आहे हें पाहून मोठा चमत्कार वाटतो. यावरून प्राचीन हिंदी स्थापत्यांत

आणि शिल्पकलेंत नवीन कल्पनांचा संचार कसा होत होता आणि त्यांतून एक नवीन स्थापत्यपरंपरा कशी निर्माण होत होती हें चांगलें दिसून येतें. त्याचप्रमाणें मीं ज्या कलेच्या प्रांतांतील समन्वयाबद्दल तुला लिहिलें, तो समन्वयही या ठिकाणीं दिसून येतो. आजही अहमदाबाद शहरांत या प्राचीन इमारतींपैकीं पुष्कळच सुंदर दगडी कोरकामानें युक्त अशा इमारती अस्तित्वांत आहेत; परंतु त्यांच्याभोंवतीं आतां जें नवें औद्योगिक शहर निर्माण झालेलें आहे, त्यांत मात्र कांहींच सौंदर्य नाहीं.

याच सुमारास हिंदुस्थान देशांत पोर्तुगीझ लोक पोंचले. केप ऑफ गुडहोपला वळसा घालून त्यांच्यापैकीं वास्को डि गामा हा प्रथम इकडे आला, हें तुझ्या ध्यानांत असेल. दक्षिण हिंदुस्थानांत कालिकत येथें तो इ. स. १४९८ मध्यें पोंचला. अर्थात् त्यापूर्वी पुष्कळ यूरपीय लोक हिंदुस्थानांत येऊन गेलेले होते; परंतु ते व्यापारी म्हणून किंवा नुसते देश पाहण्यासाठीं म्हणून आलेले होते. आतां जे पोर्तुगीझ आले त्यांच्या मनांत मात्र कांहीं निराळ्या कल्पना होत्या. हे मोठे गर्विष्ठ लोक होते; त्यांच्या ठिकाणीं आत्मविश्वास होता; पोपनें त्यांना पूर्वेकडील जग बहाल केलेलें होतें; हें जग जिंकण्याच्या उद्देशानेंच ते आलेले होते. सुरुवातीला त्यांची संख्या थोडी होती; परंतु जहाजांमागून जहाजें येत गेलीं आणि त्या लोकांनीं किनाऱ्यालगतचीं कांहीं गांवें काबीज केलीं; त्यांत गोवा हें शहर विशेष उल्लेख करण्यासारखें. पोर्तुगीझांचा हिंदुस्थानांत तसा म्हणण्याजोगा व्याप मात्र केव्हांच वाढला नाहीं. किनारा सोडून आतवर ते कधींच गेले नाहींत; परंतु समुद्रमार्गें येऊन हिंदुस्थानावर स्वारी करणारे हे पहिले यूरपीय लोक होत. त्यांच्या-मागून पुष्कळ वर्षांनीं फ्रेंच आणि इंग्रज हे आले. मात्र याप्रमाणें जलमार्ग खुला झाल्यानंतर समुद्राच्या बाजूनें हिंदुस्थान दुर्बल आहे ही गोष्ट समजून आली. दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन मोठीं राज्यें या सुमारास मोडकळीस आलेलीं असून त्यांचें लक्ष समुद्रकिनाऱ्यापेक्षां अंतर्गत संकटांकडेच अधिक गुंतलेलें होतें.

गुजराथच्या सुलतानांनीं मात्र पोर्तुगीझांना समुद्रावरसुद्धां तोंड दिलें. उस्मानी तुर्कांशीं मैत्री करून त्यांनीं एका पोर्तुगीझ काफिल्याचा पराभव केला; परंतु पुढें पोर्तुगीझांचा जय होऊन समुद्रावर त्यांचें वर्चस्व चालू झालें. त्याच वेळीं उत्तरेकडून दिल्लीच्या मोंगल सुलतानांचें भय उत्पन्न झाल्यामुळें गुजराथच्या सुलतानांनीं पोर्तुगीझांशीं तह केला; परंतु पोर्तुगीझांनीं मात्र त्यांना पुढें फसविलें.

चौदाव्या शतकाच्या सुरुवातीला दक्षिण हिंदुस्थानमध्यें दोन मोठीं राज्यें उदयास आलीं. एक गुलबर्गा येथें; त्यालाच बहामनी राज्य म्हणत आणि दुसरें त्याच्या दक्षिणेला विजयानगर येथें. बहामनी राज्य सबंध महाराष्ट्र देश आणि कर्नाटकाचा कांहीं भाग या प्रदेशांवर पसरलेलें होतें. हें राज्य दीडशें वर्षें चाललें; परंतु त्याचा इतिहास अगदींच क्षुद्र आहे. त्यामध्यें धार्मिक अनुदारता, छळ, जुलूम, खून, सुलतान आणि त्याचे सरदार यांची चैनबाजी, आणि यांच्या जोडीला सामान्य जनतेला सोसावें लागणारें अतिशय तीव्र दैन्य हाच सगळा प्रकार

आढळून येतो. सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला हें बहामनी राज्य निव्वळ आपल्या ठिकाणच्या नालायकीमुळें कोलमडून पडलें आणि त्यांतून विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडा, बिदर आणि वऱ्हाड अशा पांच छोट्या सुलतानशाह्या निर्माण झाल्या. दरम्यान विजयानगरच्या राज्याला स्थापन होऊन आतां दोनशें वर्षें झालीं होतीं आणि अजूनही तें चांगलें भरभराटींत होतें. या सहा राज्यांमध्यें नेहमींच युद्ध चालू असून साऱ्या दाक्षिण प्रांतावर वर्चस्व मिळविण्याचा प्रत्येकाचा प्रयत्न चालू होता. त्यांच्यामध्यें नित्य निरनिराळे गट बनत आणि ते मोडून पुन्हां नवे गट होत. केव्हां एका बाजूला एक मुसलमान राज्य, तर विरुद्ध हिंदु राज्य अशी लढाई होई; तर केव्हां मुसलमान व हिंदुराज्य मिळून दुसऱ्या एखाद्या मुसलमान राज्याशीं युद्ध होई. हे सर्व झगडे निव्वळ राजकीय स्वरूपाचेच असत. कोणतेंही एक राष्ट्र विशेष प्रबळ झालेंसें वाटलें, कीं बाकीचीं राज्यें त्याच्याविरुद्ध एकत्र होत. अखेरीस विजयानगरचें वाढतें सामर्थ्य आणि संपन्नता पाहून सर्व मुसलमानराज्यें त्याच्या विरुद्ध एकत्र झालीं आणि त्यांनीं इ. स. १५६५ मध्यें तालिकोटच्या लढाईत विजयानगरच्या राज्याचा पक्का चक्काचूर करून टाकला. अशा रीतीनें अडीचशें वर्षांच्या कारकीर्दीनंतर हें राज्य नष्ट झालें आणि विजयानगर हें अत्यंत मोठें, सुंदर व वैभवशाली शहरही पार नष्ट करून टाकण्यांत आलें.

परंतु लौकरच या विजयी मित्रसंघांत तंटे उत्पन्न होऊन आपापसात युद्धें सुरू झालीं आणि पाठोपाठ दिल्ली येथील मोंगल साम्राज्याची कृष्णछाया त्या सगळ्यांवर पसरली. दुसरें त्यांच्यावरील संकट म्हणजे पोर्तुगीझांचें. त्यानीं इ. स. १५१० मध्येंच गोंवा बंदर काबीज केलें होतें. हें विजापूरच्या राज्यांतलें बंदर. त्यांना तेथून हांकून लावावें म्हणून अनेक वेळां मोठा प्रयत्न करण्यांत आला; परंतु पोर्तुगीझांनीं गोवें सोडलें नाहीं आणि पूर्वेंचा राज्यप्रतिनिधि या पदवीनें विभूषित झालेला त्याचा नायक अल्बुकर्क यानें त्या प्रांतीं किळसवाणीं क्रूरपणाचीं कामें केलीं. पोर्तुगीझ लोकांनीं तेथील जनतेची नुसती कत्तल चालविली आणि तिच्यांतून बायका-मुलांनासुद्धां वगळलें नाहीं. त्या वेळेपासून अगदीं आजपर्यंत पोर्तुगीझांचें ठाणें गोव्यामध्यें आहे.

या दक्षिणेंतील राज्यांमध्यें विशेषतः गोवळकोंडा, विजयानगर व विजापूर येथें सुंदर इमारतींचीं बांधकामें करण्यांत आलीं. गोवळकोंडा शहर आज मोडून-तोडून पडलेलें आहे; विजापूरमध्यें जुन्या इमारतींपैकीं बऱ्याच अजून शिल्लक आहेत. विजयानगर तर पार धुळीसच मिळालें; त्याचें आज कांहींच मागें शिल्लक नाहीं. हैदराबाद शहरही याच सुमारास गोवळकोंड्याजवळ प्रस्थापित झालें. दाक्षिणेकडील बांधकाम करणारे आणि कारागीर हेच पुढें उत्तरेकडे गेले आणि ताजमहाल बांधण्यास त्यांची मदत झाली असें म्हणतात.

या भागांत निरनिराळ्या देशांत पुष्कळच धर्मविषयक सहिष्णुता होती; तरी पण

तेथेंही अधूनमधून धार्मिक कडवेपणा आणि अनुदारता यांचा स्फोट झाल्याचें आढळतें. या ठिकाणच्या युद्धांत पुष्कळदां भयंकर कत्तली आणि नासधूस करण्यांत आलेली आढळते. असें असूनही हें मोठें लक्षात ठेवण्यासारखें आहे, कीं विजापूरच्या मुसलमान राजाच्या पदरीं हिंदु रिसाला होता आणि विजयानगरच्या हिंदु राजाच्या पदरीं कांहीं मुसलमानी सैन्य होतें. या प्रांतीं सुधारणा बरीच उच्च प्रतीची होती असें दिसतें. पण हा सगळा श्रीमंत लोकांचा खेळ असून सामान्य शेतकरी लोकांचा त्या क्षेत्रांत मुळींच शिरकाव नव्हता. जगांतल्या नित्याच्या क्रमाप्रमाणें तो बिचारा गरीबच होता आणि श्रीमंतांच्या विलासांचें ओझें आपल्या माथ्यावर वाहात होता !

७७

# विजयानगर

१५ जुलै, १९३२

गेल्या पत्रांत दक्षिण हिंदुस्थानांतील ज्या राज्यांचा आपण विचार केला, त्या सर्वांमध्यें विजयानगरच्या इतिहासाचा काळ सर्वांत अधिक लांबीचा आहे. योगायोग असा आहे, कीं या राज्यामध्यें पुष्कळ परदेशचे प्रवासी येऊन गेले आणि हें राज्य व शहर यांबद्दल त्यांनीं पुष्कळ वृत्तांत लिहून ठेवलेले आहेत. इ. स. १४२० मध्यें नायकोलो काँटी या नावाचा एक इटालियन प्रवासी येऊन गेला. मध्य आशियांतील बडेखानाच्या दरबारांतून आलेला हिरातचा अबदुर रझाक हा इ. स. १४४३ मध्यें आला होता ; आणि पेज नांवाचा एक पोर्तुगीज गृहस्थ विजयानगर शहरांत इ. स. १५५२ मध्यें आला होता. त्याचप्रमाणें या दक्षिणेंतील राज्यासंबंधीं आणि विशेषतः विजापूर दरबारासंबंधीं ज्यांत पुष्कळ हकीकत आहे, असा एक हिंदुस्थानच्या इतिहासाचा ग्रंथही अस्तित्वांत आहे. आपण ज्या काळचा विचार करतों आहों, त्यानंतर लौकरच अकबराच्या कारकीर्दींत फेरिस्ता यानें हा इतिहास फारशी भाषेंत लिहिलेला आहे. समकालीनांनीं लिहिलेल्या इतिहासांत पुष्कळदां पक्षपात आणि अतिशयोक्ति हे दोष असतात ; तथापि त्यांचा मोठा उपयोग होत असतो. काश्मीरच्या राज्याविषयींचा **राजतरंगिणी** हा एक ग्रंथ सोडला, तर मुसलमानांच्या काळाचा असा समकालीनांनीं लिहिलेला इतिहासग्रंथ जवळजवळ एकही उपलब्ध नाहीं. तेव्हां फेरिस्ताचा इतिहासग्रंथ ही एक मोठीच नवीन प्रथा होय. इतरांनीं मग त्याचें अनुकरण केलें.

परकी प्रवाशांनीं विजयानगरचें जें वर्णन केलें आहे, त्यांत आपल्याला पक्षपातरहित बुद्धीनें रेखाटलेलें या नगराचें चित्र आढळतें. वारंवार चालू असलेल्या

घातकी लढायांच्या वर्णनापेक्षां या प्रवाशांच्या वर्णनांतून आपल्याला फार अधिक माहिती मिळते. म्हणून या लोकांनीं काय लिहिलें आहे, हें थोडेंसें मी तुला सांगणार आहें.

विजयानगरची प्रस्थापना इसवी सन १३३६ च्या सुमारास झाली. दक्षिण हिंदुस्थानांतील कर्नाटक म्हणून ज्या प्रदेशाला म्हणतात, त्या प्रदेशात हें राज्य होतें. हें हिंदुराज्य असल्यामुळे दक्षिणेंतील मुसलमानराज्यांतून निर्वासित झालेल्या–पळून गेलेल्या लोकांचे पाय सहजच या राज्याकडे वळत. पुष्कळच अशा प्रकारचे लोक त्यामध्यें आले व राज्य झपाट्यानें वाढत जाऊन थोडक्याच वर्षांत सर्व दक्षिणेंत या राज्याचा दरारा बसला आणि त्याच्या राजधानीच्या शहरांतील संपन्नता व सौंदर्य यांमुळे लोकांचे डोळे तिकडे वेधूं लागले. विजयानगरची सत्ता दक्षिणेंत सर्वांहून अधिक प्रभावी झाली.

फेरिस्तानें या शहराच्या संपन्नतेची मोठी थोरवी गायिली आहे आणि बहामनी राज्याचा एक मुसलमान राजा विजयानगरच्या एका राजकन्येशीं विवाह करण्याकरितां म्हणून इ. स. १४०६ मध्यें गेला असतां त्या वेळीं त्या शहराची काय अवस्था होती याचें वर्णन केलें आहे. तो म्हणतो, कीं सहा मैलपर्यंत रस्त्यावर भरजरी कापड, किंवा मखमल, आणि अशाच प्रकारचें किंमतवान् कापड पसरलेलें होतें. किती भयंकर आणि लाजिरवाणा असा हा पैशाचा अपव्यय!

नायकोलो कॉंटी हा इटालियन १४२० मध्यें आला. त्या वेळीं शहराचा परिघ साठ मैल लांब होता असें तो सांगतो. एवढा हा शहराचा विस्तार असण्याचें कारण त्यामध्यें असंख्य बागा होत्या. कॉंटीचें मत असें होतें, कीं विजयानगरचा राजा–त्यालाच राय असें म्हणण्याचा रिवाज होता–हा त्या काळच्या हिंदुस्थानमध्यें सर्वांत अधिक सामर्थ्यवान् राजा होता.

त्याच्यानंतर मध्य आशियांतून अबदुर रझक हा आला. विजयानगराकडे येत असतां वाटेंत त्याला मंगलोरजवळ शुद्ध गाळीव तांब्याचें केलेलें एक अत्यंत मनोहर व आश्चर्यकारक मंदिर आढळलें. तें पंधरा फूट उंच होतें आणि त्याची तळची जागा ३० फूट रुंद आणि ३० फूट लांब अशी औरस चौरस होती. पुढें बेलूर येथें आणखी एक मंदिर पाहून तर त्याला आणखीच अचंबा वाटला. त्या मंदिराचें वर्णन सुद्धां त्यानें केलेलें नाहीं. कारण तो म्हणतो, मीं जर हें वर्णन केलें तर "मजवर लोक अतिशयोक्तीचा आरोप करतील!" त्यानंतर तो विजयानगर शहरांत पोंचतो आणि तेथें त्याच्या आनंदाची परमावधि होते. तो म्हणतो, "या सर्व पृथ्वीवर डोळ्यांनीं कुणीं पाहिलें नाहीं किंवा कानानें कधीं ऐकलें नाहीं अशा प्रकारचें हें शहर आहे." तेथल्या विपुल बाजारपेठांचें त्यानें वर्णन केलें आहे. "प्रत्येक बाजारपेठेच्या सुरुवातीला एक अत्यंत उंच अशी कमान असते! आणि तिच्यावर एक भव्य आणि सुंदर सज्जा असतो. परंतु राजाचा प्रासाद या सर्वांच्यापेक्षांही अधिक उंच आहे." या बाजारपेठा भव्या लांब-रुंद आहेत. अत्यंत मधुर सुवासांनीं युक्त अशी

अगदीं ताजीं ताजीं फुलें या शहरांत विकत मिळतात; हीं फुलें म्हणजे अत्यंत आवश्यक अशी जीवनोपयोगी वस्तूच मानली जाते; इतकी कीं त्याशिवाय हे लोक जिवंतच राहूं शकणार नाहींत. एकेका स्वतंत्र धंद्याचीं किंवा कारागिरांचीं दुकानें एकमेकांशेजारीं असतात. जवाहिरे लोक आपल्याजवळचे माणिक-मोतीं, हिरे-पांचू, अगदीं उघड्यावर बाजारामध्यें विकतात." पुढें आणखी अब्दुर रज्ञक वर्णन करतो, "जेथें राजवाडा आहे त्या या शहराच्या अत्यंत मधुर विभागांत पुष्कळ लहानमोठे पाण्याचे प्रवाह घडीव, गांठीव आणि मोहरेदार दगडांनीं बांधलेल्या पाटातून झुळुझुळु वाहताना आढळतात. हा देश लोकसंख्येनें इतका गजबजलेला आहे, कीं त्यासंबंधींची कल्पना थोडक्यांत करून देणें अवघड आहे." अशा रीतीनें पंधराव्या शतकाच्या मध्याला मध्य आशियांतून आलेला हा पाहुणा विजयानगरच्या वैभवाचें वर्णन आपल्या वक्तृत्वपूर्ण भाषेंत करण्यांत गुंग होऊन किती तरी लिहितो आहे, आणि त्याला जणुं कंटाळा येतच नाहीं.

कुणाची अशी कल्पना होईल, कीं अबदुर रज्ञकनें मोठमोठीं शहरें फारशीं पाहिलेलीं नसावींत, म्हणून विजयानगर पाहिल्यावर त्याचे डोळे फाटून गेले असावेत. पण त्यानंतरचा जो आपला पाहुणा आला त्यानें चांगला भरपूर प्रवास केलेला होता. हा तो पेज नांवाचा पोर्तुगीज गृहस्थ; इटलीमध्यें ज्ञान व कला यांच्या पुनरुज्जीवनाचा काळ नुकताच सुरू झाला होता आणि इटलींतील शहरांमध्यें सुंदर सुंदर इमारती बांधल्या जात होत्या, अशा सुमारास इ. स. १५२२ मध्यें तो इकडे आला होता. पेजनें इटलींतील शहरें पाहिलेलीं होतीं असें दिसतें. त्यामुळें त्याची साक्ष फारच महत्त्वाची आहे. तो म्हणतो, "विजयानगर हें शहर रोमएवढें मोठें असून दिसायला फार सुंदर आहे." नंतर त्या शहरांतल्या अनेक आश्चर्यकारक गोष्टींचें, विशेषतः त्यामधील असंख्य तलावांचें, पाण्याच्या प्रवाहांचें ( कालव्यांचें व पाटांचें ) आणि उद्यानांचें मोहकत्व, याचें तो वर्णन करतो. तो म्हणतो, "हें शहर जगामध्यें सर्वांत अधिक सुसंपन्न, हरएक प्रकारच्या वस्तूंनीं भरलेलें असें आहे. कारण या शहराची अवस्था जगांतील इतर शहरांसारखी नाहीं. त्या शहरांत पुष्कळदां पुरेशीं खाद्यपेयें किंवा इतर आवश्यक वस्तू मिळत नाहींत; पण या शहरांत त्यांची रेलचल आहे." त्याला "राजवाड्यांतील एक दालन सर्वच हस्तिदंती आढळलें. जिकडे पहावें तिकडे हस्तिदंत! खालची जमीन, तळापासून वरपर्यंत सर्व भिंती हस्तीदंती; त्याचप्रमाणें खांबांवर आणि वरच्या तुळयांवर गुलाब आणि कमलपुष्पें यांचीं सर्वत्र हस्तीदंती चित्रें कोरलेलीं होतीं; तीही इतकीं कौशल्यपूर्ण कीं याहून अधिक चांगलें काम करतांच येणार नाहीं; असें हें दालन इतकें भव्य, मौल्यवान् आणि सुंदर आहे कीं दुसरीकडे कोठेंच त्याला तोड आढळणार नाहीं."

पेज इकडे आला त्या वेळीं विजयानगरचा जो राजा होता त्याचेंही त्यानें वर्णन केलें आहे. दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासांतील हा एक श्रेष्ठ राज्यकर्ता होऊन गेला; योद्धा म्हणून शत्रूंशींही अतिशय औदार्यानें वागणारा म्हणून, वाङ्मयाचा आश्रयदाता

म्हणून, लोकप्रिय आणि दानशूर, उदारबुद्धि राजा म्हणून त्याची कीर्ति आजही दक्षिणेंत टिकून आहे. त्याचें नांव कृष्णदेवराय. इ. स. १५०९ पासून १५२९ पर्यंत वीस वर्षें त्याची कारकीर्द झाली. पेजनें त्याची उंची, शरीरयष्टि यांचें आणि वर्णाचें सुद्धां वर्णन केलें आहे. त्याचा वर्ण गोरा होता असें पेजनें लिहिलें आहे.

जास्तींत जास्त सर्वगुणसंपन्न राजा जसा असूं शकेल, तसा तो आहे. अशा राजाला प्रजा जशी आणि जितपत वचकून असेल तसाच त्याचा वचक आहे. त्याचा स्वभाव मोठा आनंदी आणि अत्यंत विनोदी आहे. परकी लोकांबद्दल त्याला आदर वाटतो; त्यांचें तो चांगल्या रीतीनें स्वागत करतो आणि कोणी कशाही परिस्थितींतील तो परकी मनुष्य असला तरी त्याच्याविषयींची सर्व प्रकारची विचारपूस तो करतो. त्या राजाला असलेल्या अनेक पदव्या देऊन मग पेज म्हणतो, "परंतु त्याच्यासारख्या धीरोदात्त आणि सर्वगुणसंपन्न अशा माणसाला ज्या प्रकारच्या पदव्या असाव्यात, त्या मानानें या साऱ्या पदव्या म्हणजे कांहींच नव्हेत!"

केवढी मोठी स्तुति आहे ही खरोखर! या वेळीं विजयानगरचें साम्राज्य हिंदुस्थानच्या सर्व पूर्व किनाऱ्यावर आणि दक्षिण दिशेला विस्तारलेलें होतें. म्हैसूर, त्रावणकोर आणि आजचा सर्व मद्रास इलाखा एवढा प्रदेश यांत समाविष्ट होता.

आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे तुला. इ. स. १४०० च्या सुमारास विजयानगरमध्यें पाणी आणण्यासाठीं मोठें बंधाऱ्याचें बांधकाम तयार करण्यांत आलें होतें. एक सबंध नदीच्या नदी अडवून मोठाथोरला पाण्याचा साठा करण्यांत आला. येथून पाटामधून पंधरा मैलापर्यंत लांबीवर शहरांत पाणी आणण्यांत आलें; मध्यें मध्यें तर हे पाट कठिण खडकांतून फोडून तयार करण्यांत आले होते.

असें हें विजयानगर शहर व राज्य होतें. तेथील लोकांना आपल्या संपन्नतेबद्दल व सौंदर्याबद्दल अभिमान होता आणि आपल्या सामर्थ्याबद्दल फाजील विश्वास होता. अशा त्या साम्राज्याचा आणि शहराचा अंत इतका जवळ आलेला आहे अशी कोणालाही कल्पनासुद्धां शिवली नव्हती; परंतु पेजच्या भेटीनंतर अवघ्या त्रेचाळीस वर्षांमध्येंच संकटाचे काळे ढग उभे राहिले. विजयानगरचा मत्सर वाटून बाकीच्या सर्व दक्षिणेंतील राज्यांनीं त्याच्याविरुद्ध संघ निर्माण केला आणि त्याचा नाश करण्याचा निश्चय केला; तरी पण विजयानगरचें राज्य वेड्यासारखें निश्चिंत राहिलें. लौकरच अखेरचा क्षण आला आणि विजयानगरचा अगदीं पुरेपूर नाश झाला.

या राज्यांच्या गटानें इ. स. १५६५ मध्यें विजयानगरचा पराभव केला, हें मागें मीं तुला सांगितलेंच. या वेळीं अत्यंत भयंकर कत्तल झाली आणि मागोमाग शहराची लूटही झाली. सगळ्या सुंदर इमारती, मंदिरें, राजवाडे, सर्व कांहीं पार मोडून तोडून नष्ट करून टाकण्यांत आलें. सर्व अत्यंत सुंदर कोरकाम आणि शिल्पकलेचीं ठिकाणें पार चुराडा करून टाकण्यांत आलीं आणि मोठमोठ्या होळ्या पेटवून जाळण्यासारखें होतें तें सर्व त्यांत जाळून टाकण्यांत आलें. असा हा नाश इतके दिवस चालू होता,

कीं अखेरीस शहराच्या जागीं नुसत्या मोडतोडीच्या राशी मात्र उभ्या राहिल्या. एक इंग्रज इतिहासकार लिहितो, " आदल्या दिवशीं हें शहर सुसंपन्न आणि उद्योग-धंद्यांत गुंतलेल्या व भरभराटीच्या काळांतील सुबत्तेनें युक्त अशा प्रजेनें गजबजलेलें होतें आणि त्याचा दुसऱ्याच दिवशीं शत्रूंनीं कबजा केला, लूटमार केली आणि शब्दांनीं वर्णन करण्यास अशक्य अशा अत्यंत क्रूर कत्तली आणि अनन्वित कृत्यें करून त्याची मोडतोड व धूळधाण केली. सर्व जगाच्या इतिहासांत बहुधा कोठेंही आणि कधींही अशा वैभवशाली शहराची इतकी मोठी धूळधाण आणि तीही इतक्या अल्प अवकाशांत केली गेलेली आढळणार नाहीं. "

## ७८

## मज्झपहित आणि मलाक्का यांचीं मॅलेशियांतील साम्राज्यें

१७ जुलै, १९३२

मॅलेशिया आणि पूर्वेकडील बेटें यांच्याकडे थोडेंसें आपलें दुर्लक्षच झालें आहे. अलीकडे किती तरी दिवसांत त्यांच्याबद्दल मीं तुला लिहिलें नाहीं. मागें लिहिलेलें चाळून पाहिलें तों या प्रदेशासंबंधीं अगदीं शेवटचें मीं तुला लिहिलें तें ४६ व्या पत्रांत, असें आढळून आलें. त्यानंतर एकतीस पत्रें होऊन आज आपण ७८ व्या पत्राशीं आलों आहों. सगळ्याच देशांचें सारखें सूत्र सांभाळणें खरोखरच कठिण आहे.

दोन महिन्यांपूर्वीं आजच्या तारखेला मीं तुला जें काय लिहिलें होतें, तें ध्यानांत आहे का तुझ्या ? कँबोडिया ( काम्बोज ), अङ्कोर, सुमात्रा आणि श्रीविजय यांच्या-बद्दल ? इंडोचायनामधील त्या अनेक वसाहती वाढत जाऊन पुष्कळ शतकांनंतर त्यांचें एक साम्राज्य – कँबोडियाचें साम्राज्य – कसें झालें आणि मग निसर्गाची अवकृपा होऊन एकाएकीं व अगदींच कटु तऱ्हेनें ती नगरी व तें साम्राज्य यांचा अंत झाला. इ. स. १३०० च्या सुमारास ही गोष्ट घडली. आठवतें तुला हें सगळें ?

काम्बोजच्या साम्राज्याच्या अगदीं समकालीन म्हणजे त्याच वेळीं अस्तित्वांत असलेलें असें आणखी एक साम्राज्य समुद्रापलीकडे सुमात्राच्या बेटांत होतें ; परंतु श्रीविजयाच्या या साम्राज्यशाही अमलाला सुरुवात कांबोजपेक्षां जरा उशीरानें झाली ; पण काम्बोजच्या साम्राज्याच्यानंतरही तें अस्तित्वांत राहिलें. त्याचाही अंत असाच अगदीं एकाएकीं झाला; पण तो घडून आला माणसाच्या हातून ; निसर्गाच्या नव्हे. या बुद्धधर्मीय श्रीविजयाच्या साम्राज्याचा अम्मल तीनशें वर्षें चालू होता; पूर्वेकडील सर्व बेटांवर त्याचें अधिराज्य होतें ; एवढेंच नव्हे, तर कांहीं काळ त्यानें हिंदुस्थान,

सीलोन आणि चीन यांमध्येंही पाय रोवला होता. पण हें मुख्यतः व्यापारी लोकांचें साम्राज्य होतें. व्यापार करणें हेंच त्या साम्राज्याचें मुख्य काम होतें; परंतु याच सुमारास जावा बेटाच्या पूर्व भागांत आणखी एक व्यापाऱ्यांचेंच राज्य उदयास आलें. हें हिंदु राज्य असून त्यानें श्रीविजयाच्या साम्राज्यापुढें मान वांकविण्याचें नाकारलें.

नवव्या शतकाच्या सुरुवातीपासून चारशें वर्षेंपर्यंत पूर्व जावामधील या राज्यावर श्रीविजयाच्या वाढत्या सत्तेच्या दडपणाची एकसारखी छाया पडून राहिलेली होती; परंतु तशांतही आपलें स्वातंत्र्य राखण्यांत त्या राज्याला यश आलें; एवढेंच नव्हे, तर याच काळजीच्या काळांतसुद्धां अचंबा वाटावा इतकी प्रचंड संख्या सुंदर दगडी मंदिरांची तेथें निर्माण झाली. त्यांपैकीं सर्वांत मोठीं बोरोबोदूरचीं मंदिरें म्हणून प्रख्यात असलेलीं मंदिरें आजही तेथें पाहायला सांपडतात आणि पुष्कळच प्रवासी दर्शनार्थ तेथें जात असतात. श्रीविजयाच्या अधिराज्याच्या संकटांतून तर जावाचें राज्य बचावलेंच; पण पुढें तें स्वतःच आजूबाजूला चढाई करूं लागलें आणि लौकरच त्याचें प्रतिस्पर्धी जें श्रीविजयाचें साम्राज्य त्यालाच या जावाच्या राज्याचें संकट वाटूं लागलें. दोन्ही राज्यें व्यापारी. दोघांचाही समुद्रावरून लांबलांबच्या देशांशीं व्यापार चाले. त्यामुळें दोघांमध्यें झगडे होण्याचे प्रसंग वारंवार निर्माण होत.

जावा आणि सुमात्रा यांच्यामधील या स्पर्धेची आधुनिक जगांतील मोठ्या सत्ताधीश राष्ट्रांमधील स्पर्धेशीं, उदाहरणार्थ, इंग्लंड व जर्मनी यांच्यामधील स्पर्धेशीं तुलना करण्याचा या ठिकाणीं मला मोह होतो.

श्रीविजयाच्या वाढीला किंवा सत्तेला पायबंद घालावयाचा असेल व आपल्या स्वतःचा व्यापार-उदीम वाढवावयाचा असेल, तर आपलें आरमारी सामर्थ्य वाढविणें एवढाच एक त्याला उपाय आहे, अशा समजुतीनें जावानें आपलें दर्यावर्दी सामर्थ्य अफाट वाढविलें. मोठमोठाल्या आरमारी स्वाऱ्याही करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले जावानें; परंतु कित्येक वर्षेंपर्यंत शत्रूंशीं त्याला नीटसें भिडण्यासही सांपडलें नाहीं' अशा रीतीनें जावाचें सामर्थ्य वाढत गेलें आणि तें जास्त जास्त चढाईखोर होत गेलें. तेराव्या शतकाच्या अखेरीस त्या राज्यांत एक मोठें शहर स्थापन करण्यांत आलें. त्याचें नांव मज्झपाहित. वाढत्या जावाच्या राज्याची ही राजधानी झाली.

जावाचें हें राज्य इतकें घमेंडखोर आणि उद्दाम बनलें, कीं कुब्लाईखानानें त्याच्याकडे खंडणीकरितां म्हणून पाठविलेल्या वकिलांचा त्यानें प्रत्यक्ष अपमान केला. खंडणी देण्याचें तर दूरच राहिलें; परंतु एका वकिलाच्या कपाळावर अपमानास्पद अशा प्रकारचा निरोप गोंदवून घेऊन त्याला त्यांनीं परत पाठविलें! मोंगलांच्या बडे खांशीं हा जो त्यांनीं खेळ केला तो अगदींच मूर्खपणाचा आणि धोक्याचा होता. मध्य आशियांतील लोकांनीं अशाच प्रकारें वकिलांचा अपमान केला व त्यामुळें चेंगीजखानानें त्यांचा नाश केला. याच कारणासाठीं पुढच्या काळांत हुलगूखानानें बगदादचा नाश केला. असें असूनही एवढ्याशा या जावाच्या राज्यानें वकिलाचा

असा अपमान करण्याचें साहस केलें. त्याचें मोठें सुदैव कीं या सुमारास मंगोलियन राजांची रानटी वृत्ति पुष्कळशी सुधारलेली होती आणि नवीन प्रदेश जिंकण्याची इच्छा त्यांना राहिलेली नव्हती. शिवाय, समुद्रावरील लढाईही त्यांना विशेषशी प्रिय नव्हती. जमिनीवरच त्यांचें सामर्थ्य अधिक प्रत्ययाला येत असे. तरीपण कुब्लाईखानानें जावाच्या या अपराधी राजाला शिक्षा करण्यासाठीं म्हणून स्वारी पाठविलीच. त्याच्या चिनी सैन्यानें जावाच्या सैन्याचा पराभव केला आणि राजाचा वध केला. परंतु जावामध्यें इतर कांहीं म्हणण्यासारखी नासधूस त्यांनीं केली नाहीं. चीनच्या वातावरणाच्या परिणामानें मंगोलियन लोकांमध्यें केवढा हा बदल झाला होता म्हणावयाचा!

परंतु मौज पहा, कीं या चिनी स्वारीमुळें अखेरीस जावाचें राज्य किंवा आतां त्याला आपण मज्झपहित-साम्राज्य म्हणूं या – उलटें अधिकच बलिष्ठ झाल्याचें दिसून येतें. याचें कारण असें कीं या चिनी लोकांच्यापासून मज्झपहितमध्यें – जावामध्यें – दारू-गोळ्याच्या हत्यारांचा प्रवेश झाला आणि त्यानंतरच्या काळांत या हत्यारांच्या जोरावरच मज्झपहिताचा विजय झाला.

नंतर मज्झपहित-साम्राज्याची पुष्कळ वाढ झाली. ही वाढ उगीच आपली हवी तशी नाहीं झाली. तर जावाच्या राज्यानें अगदीं योजनापूर्वक ही साम्राज्याची वाढ कशी करावयाची हें ठरविलें व त्याबरहुकूम त्याच्या कर्तबगार सैन्यानें व आरमारानें हें काम पुरें केलें. ही वाढ चालू होती त्या सुमारास कांहीं काळ राणी सुहिता नावाची स्त्री या साम्राज्याची स्वामिनी होती. तेथील राज्यकारभार संपूर्णपणें एका मध्यवर्ती सत्तेच्या हातीं अत्यंत सुसूत्र आणि व्यवस्थित असा होता असें आढळून येतें. पाश्चात्य इतिहासकारांनीं लिहिलेलें आहे, कीं जकाती, आयात–निर्यातीवरील कर आणि अंतर्गत उत्पन्नावरील व जमिनीवरील वगैरे कर यासंबंधींची येथील करपद्धति अत्युत्कृष्ट होती. राज्यकारभाराचीं स्वतंत्र खातीं असत. त्यांत वसाहतींचें खातें, व्यापाराचें खातें, सार्वजनिक स्वास्थ्य आणि आरोग्य यांचें खातें, अंतर्गत सुव्यवस्थेचें खातें, लष्करी खातें अशीं खातीं असत. तेथें एक वरिष्ठ न्यायासन असे. त्यांत दोन अध्यक्ष आणि सात बाकीचे न्यायाधीश असे नऊ न्याय देणारे असत. ब्राह्मण उपाध्यायवर्गाच्या हातीं बरीच सत्ता असावी असें दिसतें; परंतु त्यांच्यावरही राजाचा अधिकार चालावयाचा अशी योजना होती.

ही खातेविभागणी आणि त्या खात्यांपैकीं कांहींचीं तर नांवेंसुद्धा पाहिलीं म्हणजे त्यावरून आपल्याला थोडीशी 'अर्थशास्त्र' या ग्रंथाची आठवण होते. परंतु वसाहतींचें खातें हें मात्र त्यांतलें नव्हे; तें जावामध्यें अगदीं नवीन होतें. अंतर्गत व्यवस्थेच्या खात्याकडे घरच्या म्हणजे मायदेशाच्या कारभाराची व्यवस्था असे. हें खातें ज्या प्रधानाच्या हातीं असे त्याला मंत्री हें नांव होतें. त्यावरून स्पष्ट दिसतें कीं दक्षिण हिंदुस्थानांतून तेथें जाऊन पल्लवांनीं येथें प्रथम वसाहत केली, तेव्हांपासून

बाराशें वर्षेंपर्यंत भारतीय परंपरा आणि संस्कृति ह्या या बेटात चालू राहिल्या होत्या. अर्थात् मूळ भारताशीं संबंध राहिले असले पाहिजेत म्हणूनच अशी ही परंपरा चालू राहणें शक्य झालें. आणि व्यापाराच्या निमित्तानें असे हे संबंध राहत आले होते यांत कांहींच संशय नाहीं.

मज्झपाहिताचें साम्राज्य हें व्यापारी साम्राज्य असल्यामुळें तेथें निर्यात आणि आयात व्यापारांची म्हणजे त्या देशांतून बाहेर जाणाऱ्या मालाच्या व्यापाराची आणि बाहेरच्या देशांतून त्या देशांत येणाऱ्या मालाच्या व्यापाराची स्वाभाविकच चांगली सुसंघटित व्यवस्था केली होती. हा सर्व व्यापार मुख्यतः हिंदुस्थान, चीन आणि वसाहती यांच्याशीं चालत असे. जोंपर्यंत श्रीविजयाच्या साम्राज्याशीं युद्धाचा काळ चालू होता, तोंपर्यंत खुद्द त्या राज्याशीं किंवा त्याच्या वसाहतींशीं व्यापारधंदा होणें शक्यच नव्हतें.

जावाचें हें राज्य एकंदर पुष्कळ शतकें चाललें; परंतु मज्झपाहिताचा अगदीं खरा वैभवाचा श्रेष्ठ काळ म्हणजे इ. स. १३३५ पासून १३८० पर्यंतचा – फक्त अवघा पंचेचाळीस वर्षांचा – काळच म्हटला पाहिजे. याच काळांत इ. स. १३७७ मध्यें श्रीविजयाचा संपूर्ण पाडाव करण्यांत येऊन नाश करण्यांत आला. अनाम ( वैतनाम ), सयाम आणि काम्बोज येथील राज्यांशीं या काळांत जावाचे मैत्रीचे तह होते.

मज्झपहित हें राजधानीचें शहर मोठें सुंदर आणि भरभराटलेलें शहर होतें; त्याच्या मध्यभागीं एक मोठें शिवमंदिर होतें. शहरांत पुष्कळ भव्य व मोहक इमारती होत्या. त्याशिवाय पुष्कळ आणखी मोठीं शहरें आणि बंदरें जावाच्या राज्यामध्यें होतीं.

आपलें प्राचीन शत्रुराज्य जें श्रीविजयाचें साम्राज्य, त्याच्या नाशानंतर हेंही साम्राज्यशाही राज्य फार काळ जिवंत राहिलें नाहीं. त्याच्यामध्यें अंतर्गत यादवी सुरू झाली आणि चीनशींही कांहीं कटकट सुरू झाली; त्यामुळें चीनचें एक प्रचंड आरमार जावाकडे चालून आलें. वसाहतीही हळूहळू फुटून निघाल्या. इ. स. १४२६ मध्यें राज्यांत फारच मोठा दुष्काळ पडला आणि त्यानंतर दोन वर्षांनीं मज्झपहिताचें बाहेरचें साम्राज्य नष्ट झालें. आणखी पन्नास वर्षें एक स्वतंत्र राज्य म्हणून त्यानें कशीबशीं काढलीं; परंतु अखेरीस मलाक्का येथील मुसलमानी राज्यानें त्याचा पाडाव केला.

मॅलेशियामधील हिंदी लोकांच्या वसाहतीमधून निर्माण झालेलें हें तिसरें साम्राज्य अशा रीतीनें नष्ट झालें. आपलीं हीं पत्रें किती छोटीं आणि त्यांत केवढाल्या मोठ्या कालखंडांबद्दल आपण चर्चा करतों! हिंदुस्थानांतून या ठिकाणीं अगदीं प्रथम वसाहत करण्यासाठीं जे लोक आले, ते जवळजवळ खिस्ती सनाच्या सुरुवातीला. आणि या पत्रांत आपण पंधराव्या शतकांत आलों आहों. म्हणजे या वसाहतींच्या १४०० वर्षांच्या इतिहासाचें निरीक्षण आपण करीत आलों. काम्बोज, श्रीविजय आणि मज्झपहित या तीन स्वतंत्र साम्राज्यांचा आपण विचार केला. त्यांपैकीं प्रत्येक

साम्राज्य कित्येक शतकें अम्मल चालवीत होतें. त्यांच्या त्या अमलांचा काळ किती लांब लांब होता हें नीट लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण त्यावरून हीं राज्यें किती सुदृढ आणि सुव्यवस्थित असलीं पाहिजेत याची कल्पना येते. सुंदर बांधकामें हा या राज्यांच करमणुकीचा मोठा विषय होता आणि व्यापार हा त्यांचा प्रमुख उद्योग होता. भारतीय संस्कृतीची परंपरा त्यांनीं पुढें चालू ठेवली होती आणि चिनी संस्कृतींपैकीं कांहीं गोष्टींचा त्या परंपरेशीं मोठा गोड मिलाफ केला होता.

मीं ज्या तीन विशेष मोठ्या राज्यांचा उल्लेख केला त्याशिवाय आणखीही पुष्कळ भारतीय वसाहती या भागांत होत्या हें तुला लक्षांत ठेवलें पाहिजे; पण त्या प्रत्येक वसाहतीचा स्वतंत्रपणें विचार आपणांस करतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्मदेश आणि सयाम या शेजारच्या दोन देशांबद्दलही फारसा विचार मला करतां येण्यासारखा नाहीं. याही दोन देशांत मोठीं बलिष्ठ राज्यें उदयास आलीं होतीं आणि तेथेंही कलांचा चांगला उत्कर्ष झाला होता. त्या दोन्ही राज्यांत बुद्धधर्माचा प्रसार झाला होता. ब्रह्मदेशावर मंगोलियन लोकांची एकदां स्वारी झाली होती; परंतु सयामवर मात्र चिनी लोकांची केव्हांच स्वारी झाली नाहीं. मात्र ब्रह्मदेश आणि सयाम, दोघांकडूनही चीनला पुष्कळदां खंडणी देण्यांत येत असे. अर्थात् ही खंडणी म्हणजे धाकट्या भावानें मोठ्या भावाला आदरभावानें कांहीं तरी द्यावें अशा प्रकारची दिलेली भेट असे. या भेटीला परतभेट म्हणून चीनकडूनही धाकट्या भावाला चांगल्या भरदार देणग्या येत.

ब्रह्मदेशावर मंगोलियन लोकांची स्वारी होण्यापूर्वी त्या देशाची राजधानी उत्तर ब्रह्मदेशांत पगन या शहरात होती. येथें सुमारें दोनशें वर्षें राजधानी असून हें शहर मोठें सुंदर शहर होतें व त्याच्या तोडीला तोड देणारें असें अङ्कोरशिवाय दुसरें शहर नव्हतें असें म्हणतात. तेथील सर्वांत सुंदर बांधकाम म्हणजे आनंदमंदिर. बुद्धांच्या शिल्प व स्थापत्य-कलेचा साऱ्या जगांतील हा एक अत्यंत मोहक नमुना आहे. याशिवाय तेथें आणखी पुष्कळ भव्य इमारती होत्या. पगन शहराचे आजचे मोडके अवशेष हेसुद्धां खरोखर किती सुंदर आहेत. पगन शहराचा भरभराटीचा काळ अकराव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत होता. त्यानंतर कांहीं काळ ब्रह्मदेशामध्यें थोडीशी अंदाधुंदी आणि गडबड माजली, आणि उत्तर ब्रह्मदेश आणि दक्षिण ब्रह्मदेश एकमेकांपासून वेगळे झाले. सोळाव्या शतकांत दक्षिण ब्रह्मदेशांत एक मोठा राजा उदयास येऊन त्यानें सर्व ब्रह्मदेश पुन्हां एक केला. त्याची राजधानी त्यानें दक्षिणेंत पेगु येथें केली.

एकदम मध्येंच मी ब्रह्मदेश आणि सयाम यांचा त्रोटक उल्लेख घुसडून देतों आहें त्यामुळें तूं गोंधळून गेली नाहींस म्हणजे मिळविली! मॅलेशिया आणि इंडोनेशिया (म्हणजे आशियांतील भारतीय वसाहती) यांच्या इतिहासांतील एका विभागाच्या अखेरीपर्यंत आपण येऊन पोंचलों होतों आणि त्या विभागाचें निरीक्षण मला अपुरें ठेवावयाचें नव्हतें. आतांपर्यंत या प्रदेशावर जे सर्व राजकीय किंवा सांस्कृतिक ठसे उमटत आले, त्यांचें मूळ हिंदुस्थान किंवा चीन यांच्यामध्यें होतें. मीं तुला

सांगितलेंच आहे, कीं आशिया खंडाला सलग चिकटून असलेले जे प्रदेश म्हणजे ब्रह्मदेश, सयाम, इंडोचायना यांच्यावर चीनचा अधिक प्रभाव पडलेला होता; तर खालचीं बेटें आणि मलायाचें द्वीपकल्प यांच्यावर हिंदुस्थानचा अधिक प्रभाव पडलेला होता.

यानंतर आतां या देशांवर नवीनच एक छाप पडण्याचा काळ उदयाला आला. ही छाप पाडण्याचें कार्य आरबी लोकांनीं केलें. ब्रह्मदेश व सयाम यांच्यावर ही छाप मुळींच पडूं शकली नाहीं. परंतु मलायाचें द्वीपकल्प आणि त्या खालचीं बेटें मात्र तिला बळी पडलीं आणि लौकरच तेथें मुसलमानांचें राज्य निर्माण होऊन वाढीस लागलें.

आरबी व्यापारी या बेटापर्यंत आज एक हजार वर्षांपासून प्रवास करीत होते आणि तेथें येऊन राहिलेही होते; परंतु त्यांचें सर्व लक्ष व्यापाराकडे असून या राज्यांच्या कारभाराच्या भानगडींत ते कधीं पडत नसत. चौदाव्या शतकांत अरबस्तानांतून तिकडे कांहीं आरबी धर्मप्रचारक आले आणि तेथें धर्मांतर करविण्यांत त्यांना थोडें-फार यशही आलें; विशेषतः तेथील कांहीं राज्यकर्त्यांकडून त्यांनीं धर्मांतर करविलें.

दरम्यान या प्रदेशांत कांहीं राजकीय फेरफार घडून येत होते. मज्झपहिताचा विस्तार वाढत होता आणि तें श्रीविजयाच्या राज्याचा कोंडमारा करीत होतें. श्रीविजयाचा जेव्हां पाडाव झाला तेव्हां पुष्कळच लोक तें राज्य सोडून मलाया द्वीपकल्पाच्या दक्षिणेस पळून गेले आणि तेथें मलाक्का नांवाचें शहर त्यांनीं वसविलें. हें शहर आणि मलाक्कानें राज्य दोन्ही झपाट्यानें वाढलीं आणि इ. स. १४०० च्या सुमारास मलाक्का हें फार मोठें शहर बनलें. मज्झपहिताच्या साम्राज्यामधील जावाचे लोक त्या साम्राज्याच्या परतंत्र प्रदेशांतील लोकांना अप्रिय झाले होते. कारण सर्व साम्राज्यशाही राज्यकर्त्या वर्गाप्रमाणें हेही लोक जुलमी झाले होते आणि त्यामुळें पुष्कळ लोक मज्झपहिताच्या राज्यांत राहण्यापेक्षां मलाक्काच्या राज्यांत जाऊन राहणें हेंच अधिक पसंत करूं लागले. सयाम हा देशही या सुमारास थोडेंसें आजूबाजूला आक्रमण करूं लागला होता. त्यामुळें देशत्याग करून जाणाऱ्या पुष्कळशा लोकांना मलाक्काचें राज्य हें मोठेंच आश्रयस्थान होऊन राहिलें. त्यामध्यें बुद्धधर्मीय लोक असत आणि मुसलमानधर्माचे लोकही असत. मलाक्काचे राजे प्रथम बुद्धधर्मीय होते; परंतु पुढें त्यांनीं इस्लामधर्माचा स्वीकार केला.

मलाक्काच्या या नव्या राज्याच्या एका बाजूला जावाच्या राज्याचें संकट आणि दुसऱ्या बाजूला सयामच्या राज्याचें संकट, अशीं दोन संकटें खडीं होतीं. त्यामुळें खालच्या बेटांमध्यें जीं पुष्कळ लहान लहान मुसलमान राज्यें होतीं, त्यांपैकीं कांहींशीं सख्य जोडण्याचा मलाक्कानें प्रयत्न केला. चीनकडेही त्यानें मदतीकरितां विनंति केली. या सुमारास चीनमध्यें मंगोलियन लोकांची हकालपट्टी होऊन मिंग घराण्याचा अम्मल चालू होता. मॅलेशियांतील एकूण एक मुसलमानी राज्यें मदतीसाठीं चीनकडे याचना एकाच वेळीं करूं लागलीं होतीं, ही गोष्ट या ठिकाणीं मोठी लक्षांत भरण्या-सारखी आहे. याचा अर्थ, त्या वेळीं त्यांना आपल्या बलिष्ठ अशा शत्रूंचें संकट अगदींच जवळ येऊन खेटलें असलें पाहिजे असा आहे.

मॅलेशियांतील सर्वच राज्यांशीं चीनचें धोरण नेहमीं सख्यत्वाचें असे; परंतु उगीच त्यांच्या खासगी भानगडींत स्वतः पडून धडपड करावयाची नाहीं असेंही धोरण चीन पाळीत असे. चीनला नवीन देश जिंकण्याची हाव नव्हती. त्या देशांपासून शिकण्यासारखें आपल्याला कांहीं नाहीं हें चीनला माहीत होतें; तथापि, स्वतःच्या संस्कृतीचीं शिकवण त्या देशांना देण्याची चीनची तयारी होती. परंतु आजपर्यंतच्या या धोरणांत आतां बदल करण्याचें मिंग बादशहानें ठरविलें आणि या देशांच्या कारभाराकडे तो अधिक लक्ष पुरवूं लागला असें दिसतें. जावा आणि सयामच्या राज्यांकडून जें इतरांवर आक्रमण चाललें होतें, तें त्याला पसंत नव्हतें असें दिसतें. तेव्हा तें आक्रमण थांबविण्यासाठीं आणि चीनच्या प्रभावाची बाकीच्या देशांना ओळख पटवून देण्यासाठीं म्हणून त्यानें दर्यासारंग चेंग हो याच्या हाताखालीं एक प्रचंड आरमार तिकडे पाठविलें. या आरमारापैकीं कांहीं जहाजें ४०० फूट लांबीचीं होतीं.

चेंग होनें या बाजूला पुष्कळ फेऱ्या केल्या आणि फिलिपाइन्स, जावा, सुमात्रा, मलाया द्वीपकल्प वगैरे बहुतेक सर्व बेटांवर तो जाऊन आला. सीलोनपर्यंतसुद्धां तो आला होता व तें बेट जिंकून तेथील राजाला त्यानें आपल्याबरोबर चीनला नेलें होतें. आपल्या शेवटच्या स्वारींत तो थेट इराणच्या आखातापर्यंत जाऊन पोंचला होता. पंधराव्या शतकाच्या अगदीं सुरुवातीच्या काळांत चेंग हो हा जलपर्यटन करून ज्या ज्या देशांत गेला, तेथें तेथें त्याची फार मोठी छाप पडली. त्याला मज्झपहिताचें हिंदु राज्य आणि सयामचें बुद्धधर्मीय राज्य या दोहोंनाही पायबंद घालावयाचा होता. त्यासाठीं त्यानें जाणूनबुजून इस्लामधर्माला प्रोत्साहन दिलें आणि त्याच्या प्रचंड आरमाराच्या आश्रयानें मलाक्काच्या राज्याचें आसन चांगलें बळकट झालें. चेंग होचा सगळा उद्देश अर्थातच पूर्ण राजकीय स्वरूपाचा होता; धर्माचा त्यांत कांहीं संबंध नव्हता. तो स्वतः पाहिलें तर बुद्धधर्मीच होता.

अशा रीतीनें मज्झपहिताच्या विरोधकांत मलाक्काला अग्रस्थान प्राप्त झालें. त्याचें सामर्थ्य वाढलें आणि हळूहळू जावाच्या वसाहती त्यानें जिंकून घेतल्या. इ. स. १४७८ मध्यें मज्झपहित शहराचाही पाडाव करण्यांत आला. या सुमारास इस्लाम हा मलाक्कांतील दरबारचा आणि शहरांचा धर्म झाला होता. परंतु खेडेगांवच्या जीवनांत मात्र, हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच येथेंही प्राचीन धर्म, प्राचीन लोकभ्रम आणि प्राचीन परंपराच चालू राहिलेली होती.

मज्झपहित किंवा श्रीविजय यांच्या साम्राज्याप्रमाणें मलाक्काचें राज्यही अत्यंत श्रेष्ठ होऊन दीर्घकाळ टिकावयासारखें होतें; परंतु त्याला तसा अनुकूल काळ लाभला नाहीं. पोर्तुगीझ लोक त्याच्या मार्गांत आडवे आले आणि अगदीं थोड्याच वर्षांत इ. स. १५११ मध्यें मलाक्का त्यांच्या हातीं गेलें. अशा रीतीनें त्या प्रदेशांतील हें चवथें साम्राज्य नाहींसें होऊन त्याच्या ठिकाणीं हें नवें पांचवें साम्राज्य आलें. पण तेंही फार

काळपर्यंत टिकावयाचें नव्हतें. तथापि, या पांचव्या साम्राज्याच्या रूपानें आजपर्यंतच्या साऱ्या इतिहासांत पूर्व समुद्रांत यूरपचें अगदीं पहिल्या प्रथम आक्रमण होऊन त्याचें तेथें प्रभुत्व निर्माण झालें.

७९

## यूरप खंड पूर्व आशियांत आपली तुंबडी भरूं लागतें

१९ जुलै, १९३२

गेल्या पत्रांत आपण पोर्तुगीज लोक मॅलेशियात आले येथपर्यंत येऊन थांबलों. त्यापूर्वीं नुकतेंच जलमार्गांचें संशोधन कसें झालें आणि पोर्तुगीज व स्पॅनिश लोकांच्यामध्य पूर्वेकडे प्रथम कोण पोंचतो अशाबद्दल स्पर्धा कशी सुरू झाली हें मीं तुला सांगितलेलें आठवत असेलच. पोर्तुगालचे लोक पूर्व दिशेला गेले; स्पेनचे लोक पश्चिम दिशेला गेले; पोर्तुगीज लोक आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानांत येऊन पोंचले; स्पॅनिश लोक चुकून अमेरिकेला जाऊन धडकले आणि दक्षिण अमेरिकेला वळसा घालून मॅलेशियामध्यें आले. हे सर्व धागे तसेच टाकून दिले होते आपण. त्यांपैकीं कांहीं धागे पुन्हां पकडून यापुढचा मॅलेशियाचा इतिहास आपणांला पाहतां येईल.

मसाल्याचे पदार्थ ( मिरीं वगैरे ) उष्ण हवेच्या ठिकाणीं म्हणजे विषुववृत्ताच्या आसपासच्या देशांत निर्माण होतात हें बहुतेक तुला ठाऊक असेल. यूरपमध्यें हे पदार्थ मुळींच निर्माण होत नाहींत. दाक्षिण हिंदुस्थानांत व सीलोनमध्यें हे पदार्थ थोडेसे होतात. पण बहुतेक सर्व मसाल्याचे पदार्थ मॅलेशियातील बेटांमधून, मलाक्कामधून येतात. या बेटांना त्यामुळें नांवसुद्धां मसाल्याचीं बेटें असें पडलेलें आहे. अगदीं प्राचीन कालापासून या पदार्थांना यूरप खंडांतून फार मोठी मागणी असे व ते इकडून पाठविले जात असत. यूरपमध्यें गेल्यावर त्यांना फार मोठी किंमत येत असे. रोमन राज्याच्या काळीं मिऱ्यांचा भाव सोन्याच्या भारंभार असे. मसाल्याच्या पदार्थांना इतकें मोल येत असे आणि त्यांना मागणी जरी इतकी होती, तरी यूरप खंडांतील लोकांनीं आपण स्वतः येऊन ते घेऊन जाण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं. किती तरी काळपर्यंत मसाल्याच्या पदार्थांचा हा व्यापार व वाहतूक हिंदी लोकांच्या हातीं होती; पुढें ती आरबी लोकांच्या हातीं गेली. पोर्तुगीज आणि स्पॅनिश लोक शेवटीं एकदांचा मॅलेशियाचा शोध लागेपर्यंत जे एकसारखे साऱ्या जगभर समुद्रावर पुनः पुनः प्रवास करीत राहिले आणि तो नाद म्हणून त्यांनीं सोडला नाहीं, त्या सगळ्याचें कारण त्यांना या मसाल्याच्या पदार्थांच्या लोभानें घेरलेलें होतें. पूर्वेच्या शोधार्थ हिंडतां हिंडतां स्पॅनिश लोकांचा हात अमेरिकेंत गुंतला आणि तेथें त्याना अगणित फायदा

पण होऊं लागला; त्याच वेळीं इकडे हा मसाल्यांच्या बेटांचा शोध लावण्याच्या कामीं पोर्तुगीजांना सर्वांआधीं यश मिळालें.

केप ऑफ गुड होपला वळसा घालून वास्को-डि-गामा हिंदुस्थानांत पोंचल्यानंतर त्याच मार्गानें आणखी पुष्कळ पोर्तुगीज जहाजें येऊं लागलीं आणि तेथून आणखी पूर्वेकडे जाऊं लागलीं. अगदीं याच वेळीं मलाक्काच्या नवीनच उदयास आलेल्या साम्राज्याच्या हातीं त्या मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापाराचीं आणि इतरही व्यापाराचीं सूत्रें आलेलीं होतीं. त्यामुळें या बाजूला जातांच पोर्तुगीजांचा या साम्राज्यांशीं आणि सामान्यतः सर्वच आरबी व्यापाऱ्यांशीं झगडा सुरू झाला. पोर्तुगीजांचा व्हाइसरॉय अल्बुकर्क यानें इ. स. १५११ मध्यें मलाक्काचा पाडाव केला आणि मुसलमानांचा व्यापार नष्ट करून टाकला. यूरपशीं येथून होणाऱ्या सगळ्या व्यापाराचीं सूत्रें आतां पोर्तुगीजांच्या हातीं आलीं आणि त्यांची यूरपांतील राजधानी लिस्बन शहर हें मसाल्याचे पदार्थ आणि पूर्वेकडून जाणारे इतर पदार्थ यांची सर्व यूरप खंडभर पोहोंच करणारें मोठें व्यापारी केंद्र झालें.

अल्बुकर्क हा आरब लोकांशीं अत्यंत शत्रुत्वानें, क्रूरपणानें आणि निर्दयपणानें वागला हें जरी खरें असलें, तरी पूर्वेकडील इतर व्यापारी समाजांशीं मात्र सख्यत्वानें वागण्याचा त्यानें प्रयत्न केला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. विशेषतः जेथें जेथें त्याचा चिनी लोकांशीं संबंध आला, तेथें तेथें त्यांच्याशीं तो अतिशय खास आदरानें व सभ्यतेनें वागला. त्याचा परिणाम असा झाला, कीं पोर्तुगीजांबद्दल चीनमध्यें जी वार्ता गेली ती त्यांना अत्यंत अनुकूल अशीच गेली. आरब लोकांचेंच पूर्वेकडील व्यापारांत सर्वांत अधिक प्रस्थ होतें, हेंच बहुधा त्यांच्याशीं पोर्तुगीजांचें एवढें वैर उत्पन्न होण्याचें कारण असावें.

दरम्यान मसाल्याच्या बेटांचा शोध अजून चालूच होता आणि पुढें पॅसिफिक ओलांडून ज्यानें पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली तो मॅगेलन ज्या काफिल्यावर होता त्या काफिल्यानें मोलक्का बेटांचा शोध लावला. यूरपशीं होणाऱ्या मसाल्याचा पदार्थांच्या व्यापारांत साठांहून अधिक वर्षेपर्यंत पोर्तुगीज लोकांना कोणीही प्रतिस्पर्धी नव्हता. त्यानंतर इ. स. १५६५ मध्यें स्पॅनिश लोकांनीं फिलिपाइन बेटांचा कबजा घेतला आणि अशा रीतीनें पूर्वेकडील समुद्रांत दुसरी एक यूरपीय सत्ता येऊन दाखल झाली. परंतु स्पेन-मुळें पोर्तुगीजांच्या व्यापाराला म्हणण्यासारखा कांहींच बाध आला नाहीं. कारण स्पॅनिश लोक हे कांहीं खरोखर स्वभावानें मुख्यतः व्यापारी नव्हते. स्पेनमधून पूर्वेकडे लढाऊ सैनिक आणि धर्मप्रचारकच विशेषेंकरून पाठविण्यांत आले. दरम्यान मसाल्याचा व्यापार सर्वतोपरी पोर्तुगीजांच्या हातीं गेला. इतका, कीं इराण आणि ईजिप्त यांनासुद्धां स्वतःला लागणारे मसाल्याचे पदार्थ पोर्तुगीजांच्या मार्फतच घ्यावे लागले. मसाल्याच्या बेटांशीं थेट व्यापार करायलासुद्धां पोर्तुगीजांनीं इतर सर्व लोकाना प्रतिबंध सुरू केला. त्यामुळें पोर्तुगाल देश फारच संपन्न झाला. परंतु त्यानें आपल्या वसाहती वाढविण्याचा

मुळींच प्रयत्न केला नाहीं. तुला ठाऊकच आहे, कीं पोर्तुगाल हा फारच लहान देश आहे. बाहेर पाठविण्याला पुरेशीं माणसेंच त्याच्याजवळ नव्हतीं. जवळजवळ शंभर वर्षें, सर्व सोळाव्या शतकभर, पूर्वेकडे या छोट्याशा राष्ट्रानें जो पराक्रम गाजविला, तोच खरोखर मोठा आश्चर्य करण्यासारखा म्हणायला हवा.

इकडे स्पॅनिश लोक फिलिपाइन्समध्येंच पाय रोवून राहिले आणि तेथून जेवढी मिळेल तेवढी संपत्ति पैदा करण्याचा त्यांनीं यत्न चालविला. स्थानिक लोकांकडून जबरदस्तीनें खंडणी आणि लूट वसूल करावयाची यापेक्षां दुसरें त्यांनीं क्वचितच कांहीं केलें. पूर्व समुद्रांत आपला आणि पोर्तुगीजांचा तंटा नको म्हणून या लोकांनीं त्यांच्याशीं तह केला होता. इकडे स्पॅनिश सरकार फिलिपाइन बेटांतील लोकांना अमेरिकेंतील स्पॅनिश वसाहतींशीं व्यापार करूं देत नव्हतें. कारण त्यामुळें मेक्सिको आणि पेरू या देशांतील सोनें आणि चांदी सगळीच पूर्वेकडे जाईल अशी त्यांना भीति वाटे. त्यामुळें फिलिपाइन्सकडून अमेरिकेकडे दरवर्षी एकच जहाज फक्त येत असे आणि परत जात असे. या जहाजाला **मॅनिला गॅलिअन्** असें नांव असे; दरवर्षी येणाऱ्या या जहाजाची फिलिपाइन्समधील हे स्पॅनिश लोक किती उत्सुकतेनें वाट बघत असतील याची तूंच कल्पना कर. अशा रीतीनें २४० वर्षें हें 'मॅनिला गॅलिअन्' फिलिपाइन्स बेटें आणि अमेरिका यांच्या दरम्यान पॅसिफिक समुद्रांत येरझारा करीत असे.

स्पेन आणि पोर्तुगाल यांच्या या यशामुळें यूरपांतील इतर राष्ट्रांचीं मत्सरानें पोटें दुखूं लागलीं. पुढें आढळेलच आपल्याला, कीं या वेळीं साऱ्या यूरप खंडावर स्पेनचा दरारा चालत होता. इंग्लंडला पहिल्या दर्जाच्या राष्ट्रांत अजून मुळींच स्थान नव्हतें. नेदरलंड्समध्यें, म्हणजे हॉलंड व बेल्जमचा कांहीं भाग यांमध्यें या वेळीं बंड उभें राहिलें होतें. इंग्रजांची सहानुभूति डच लोकांकडे होती आणि स्पेनचा त्यांना हेवा वाटत होता. त्यामुळें त्यांनीं आंतून डच लोकांना मदत चालू ठेवली. इंग्रजांचे कित्येक खलाशी समुद्रावर फेऱ्या करून स्पॅनिश लोकांनीं अमेरिकेंतून सोनें, चांदी वगैरे संपत्तीनीं लादून आणलेलीं जहाजें काबीज करून लुटूं लागले व अशा रीतीनें ज्याला चांचेगिरी म्हणून म्हणतात ती करण्याचा क्रम सुरू झाला. या थोड्याशा धोक्याच्या परंतु अत्यंत फायदेशीर उद्योगाचें नेतृत्व सर फ्रॅन्सिस ड्रेक याच्याकडे असून त्याला तो स्पेनच्या राजाची दाढी होरपळविण्याचा उद्योग असें म्हणे.

इ. स. १५७७ मध्यें ड्रेकनें पांच जहाजें घेऊन स्पॅनिश वसाहतींच्या लुटीसाठीं प्रयाण केलें. या हल्ल्यांत त्याला यश आलें खरें; परंतु त्याचीं चार जहाजें कामास आलीं. फक्त एक जहाज, गोल्डन हिंद ( सुवर्णमय हिंदुस्थान ) हें तेवढें बचावून पॅसिफिक महासागरांत पोंचलें आणि केप ऑफ गुड होपला वळसा घालून इंग्लंडला परत आलें. अशा रीतीनें ड्रेकची ही पृथ्वीप्रदक्षिणाच झाली. मॅगेलनच्या व्हिक्टोरिया जहाजानंतर अशी पृथ्वीप्रदक्षिणा करणारें हें दुसरें जहाज. ही प्रदक्षिणा पुरी करावयाला त्याला तीन वर्षें लागलीं.

स्पेनच्या राजाची दाढी जाळण्याचा हा उद्योग असाच निर्वेधपणें फार काळ चालू शकणें असंभवनीयच होतें. लौकरच त्यांतून अनेक कटकटी निर्माण होऊन इंग्लंड आणि स्पेन यांच्यामध्यें युद्ध उद्भवलें. डच लोक त्याच्या पूर्वीपासूनच स्पेनशीं लढत होते. पोर्तुगाल देशसुद्धां या युद्धांत सामील होता. कारण अलीकडे कांहीं वर्षें स्पेन आणि पोर्तुगाल या दोन्ही देशांवर एकच राजा राज्य करीत होता. निश्चय आणि पुष्कळशा प्रमाणांत बलवत्तर सुदैव यांच्या बळावर इंग्लंड या युद्धामधून यशस्वीपणानें पार पडलें आणि या गोष्टीचें यूरपमध्यें सर्वांनाच आश्चर्य वाटलें. स्पेननें ब्रिटनला जिंकण्यासाठीं म्हणून "अजिंक्य आरमार" पाठविलें होतें, त्याचा नाश झाला हें तुझ्या लक्षांत असेलच. परंतु त्याच्याशीं आपल्याला आताच कांहीं कर्तव्य नसून आपल्याला पूर्वेकडील इतिहासाकडे लक्ष द्यावयाचें आहे सध्यां.

या युद्धांत इंग्लंड आणि हॉलंड या दोन्ही देशांनीं अतिपूर्वेकडील स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांवर हल्ला चढविला. स्पॅनिश लोक सगळे जण फिलिपाइन्समध्यें एका ठिकाणीं होते म्हणून त्यांना आपलें संरक्षण चांगल्या रीतीनें करतां आलें. परंतु पोर्तुगीजांची मात्र फारच तारांबळ उडाली. त्यांचें पूर्वेकडील साम्राज्य तांबड्या समुद्रापासून मलाक्कापर्यंत म्हणजे मसाल्याच्या बेटांपर्यंत सहा हजार मैल पसरलेलें होतें. एडनच्या आसपास, इराणच्या आखातांत, सीलोनमध्यें, हिंदी किनाऱ्यांवर पुष्कळशा ठिकाणीं आणि पूर्वेकडील बेटांत आणि मलायांत तर स्वाभाविकच सर्वच ठिकाणीं त्यांच्या वसाहती झालेल्या होत्या. परंतु हळूहळू हें त्यांचें सगळें पूर्वेकडील साम्राज्य त्यांच्या हातून गेलें. गांवामागून गांव, वसाहतीमागून वसाहत इंग्रज आणि डच लोकांच्या ताब्यांत गेली. इ. स. १६४१ मध्यें मलाक्काही गेलें. हिंदुस्थानमध्यें आणि इतर कांहीं ठिकाणीं क्वचित् कोठें कांहीं टोंकांचीं ठाणीं तेवढीं पोर्तुगालच्या हातीं शिल्लक राहिलीं. यांपैकीं हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील गोवा प्रांत त्यामध्यें प्रमुख असून तो अजूनही त्यांच्या ताब्यांत आहे. नुकत्याच स्थापन झालेल्या पोर्तुगीज लोकसत्ताक राज्याचा तो एक भाग आहे. सामर्थ्यवान् अकबर बादशहानें गोवा पोर्तुगीजांकडून घेण्याचा यत्न केला होता, पण त्याला सुद्धां त्यांत यश आलें नाहीं.

अशा रीतीनें पूर्वेकडील जगाच्या इतिहासांतील पोर्तुगीजांचा प्रवेश संपला. या छोट्याशा देशानें हा फारच मोठा घांस घेतला होता. त्याला कांहीं तो गिळतां येईना; आणि त्या प्रयत्नांत त्याची अगदीं दमछाट होऊन गेली. स्पेन मात्र फिलिपाइन्स बेटांना धरून राहिलें; परंतु यापुढच्या पूर्वेकडील घडामोडींत त्यानें कांहीं भाग घेतला नाहीं. पूर्वेकडील मौल्यवान् व्यापारावरील प्रभुत्व आतां हॉलंड आणि इंग्लंड या देशांकडे गेलें. या दोन्ही देशांनीं यासाठीं कंपन्या स्थापन करून आधींपासूनच कंबरा कसलेल्या होत्या. इंग्लंडमध्यें १६०० सालींच इलिझाबेथ राणीनें ईस्ट इंडिया कंपनीला सनद दिली होती. त्यानंतर दोन वर्षांनीं डच ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली होती. या दोन्ही कंपन्यांची स्थापना केवळ व्यापार करण्याच्याच उद्देशानें

झालेली होती. या कंपन्या होत्या खासगी; पण त्यांना त्यांच्या राज्यांची वेळोवेळीं मदत होत असे. त्यांचें सगळें लक्ष खरें मॅलेशियांतील मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापाराकडे होतें. त्या वेळीं हिंदुस्थान देश हा मोंगलांच्या अमलाखालीं चांगला प्रबळ देश होता. तेव्हां त्याची खोड काढण्याची एवढ्यांतच सोय नव्हती.

या डच आणि इंग्रज लोकांमध्यें वारंवार आपसांतच तंटे होत; म्हणून मग इंग्रजांनीं अखेरीस पूर्वेकडील बेटांतून काढता पाय घेतला आणि हिंदुस्थानकडे अधिक लक्ष वळविलें. कारण मोंगल साम्राज्य या सुमारास दुर्बल होऊं लागलें होतें आणि परकी साहसी गुंडांना ही मोठी नामी संधि होती. पुढें दिसेलच आपणांला, कीं इंग्लंड आणि फ्रान्स यांमधून हे असे साहसी गुंड कसे आले आणि त्यांनीं लबाडीनें कट करून किंवा केव्हां केव्हां लढाई करून त्या विरघळूं लागलेल्या साम्राज्याचे कांहीं भाग कसे गिळंकृत केले तें.

## ८०

# चीनमधील शांततेचा आणि भरभराटीचा काळ

२२ जुलै, १९३२

म्हणजे एकंदरींत तूं आजारी आहेस म्हणायची बाळ; आणि कुणीं सांगावें, अजून सुद्धां तूं निजूनच असशील. तुरुंगाच्या आंत कोणतीही बातमी पोंचायला फार उशीर लागत असतो. आजारी असलीस तर तुझें तूंच सगळें कांहीं बघितलें पाहिजेस. मी येथून तुझ्यासाठीं काय करूं शकणार? फक्त तुझी आठवण मात्र पुष्कळशी करीत बसणार. पुष्कळसा तुझाच विचार करीत बसणार. काय विचित्र आहे पाहा; कशीं सर्वच जणें आपण निरनिराळ्या ठिकाणीं फेंकलीं गेलों आहों; तूं तिकडे दूर पुण्यास; तुझी आई अलाहाबादला आजारी; आणि बाकीचीं आम्ही निरनिराळ्या तुरुंगांत!

अलीकडे कांहीं दिवस मला हीं पत्रें लिहिणें थोडेंसें जिकिरीचें होऊन गेलें आहे. तुझ्याशीं मी गप्पा मारतों आहें, हें सोंग टिकविणें या दिवसांत फार कठिण पडतें. एकसारखी तुझी पुण्यास आजारी पडलेली मूर्ति मनापुढें येते आणि पुन्हां तुझी-माझी कधीं बरें भेट होईल अशी हुरहूर वाटूं लागते; अशी भेट होण्यापूर्वीं किती महिने किंवा किती वर्षें आणखी जायचीं आहेत, आणि तेवढ्या अवधींत तूं किती मोठी झालेली असशील कोणाला ठाऊक!

परंतु फाजिल विचार करीत बसणें हे कांहीं ठीक नव्हे; तुरुंगामध्यें तर विशेषच. म्हणून मन जरा घट्ट केलें पाहिजे आणि वर्तमानकाल विसरून जाऊन मागच्या काळांत मन नेलें पाहिजे.

आपण गेल्या पत्रात कोठें, मॅलेशियांत होतों नव्हे का? आणि त्या ठिकाणीं एक विलक्षण घडामोड झालेली आपण पाहिली. यूरपचें आशियावर आक्रमण सुरू झालेलें होतें. आधीं पोर्तुगीज लोक आले; मग स्पॅनिश लोक आले; त्यांच्यानंतर मग इंग्रज आणि डच लोक आले. परंतु सुरुवातीला पुष्कळ काळपर्यंत या यूरपियन राष्ट्रांची हालचाल फक्त मॅलेशिया आणि आसपासचीं बेटें यांतच चालू होती. त्यांच्या पश्चिमेला हिंदुस्थानांत मोंगलांचें प्रबळ राज्य होतें. उत्तरेला चीन देश असून तोही आपली काळजी घ्यायला समर्थ होता. त्यामुळें हिंदुस्थान किंवा चीन यांच्या भानगडींत त्या वेळीं हे यूरपियन लोक फारसे पडले नाहींत.

चीन मॅलेशियाला तर फारच जवळ. सरहद्दीवरून एक पाऊल पलीकडे टाकलें कीं चीन. तेव्हां आतां आपण तिकडे जाऊं या. त्या ठिकाणीं आतां मंगोलियन वंशाच्या कुब्लाईखानानें प्रस्थापित केलेलें युआन राजघराणें नाहींसें झालेलें आहे. जनतेचें बंड होऊन मंगोलियन लोकांचें राहिलें साहिलें सगळें सैन्य चीनच्या महान् भिंतीच्या पलीकडे इ. स. १३६८ मध्यें घालवून देण्यांत आलें. या बंडाचा पुढारी हुंग वू हा होता; आयुष्याच्या सुरुवातीला हा एक गरीब मजुराचा मुलगा होता; त्याला फारसें शिक्षणही मिळालेलें नव्हतें. परंतु संसाराच्या या विशाल शाळेमधला तो मोठा हुषार विद्यार्थी होता; म्हणून तो यशस्वी पुढारी झाला आणि पुढें शहाणा राज्यकर्ता झाला. बादशहा झाला म्हणून कांहीं तो गर्वाला किंवा घमेंडीला चढला नाहीं. तर आपण सामान्य जनतेमधीलच एक आहोंत, ही आठवण त्यानें अगदीं अखेरपर्यंत ठेवली. त्याची कारकीर्द तीस वर्षें झाली. ज्या सामान्य जनतेमधून तो वर आला, त्या सामान्य जनतेची स्थिति सुधारण्यासाठीं त्यानें केलेल्या प्रयत्नांकरितां अद्यापिही त्याच्या कारकीर्दीची लोकांमध्यें आठवण आहे. आपली साधेपणाची अभिरुचि त्यानें अखेरपर्यंत सांभाळली होती.

आतां नवीनच स्थापन झालेल्या मिंग राजघराण्यांतील पहिला बादशहा म्हणजे हा हुंग वू. त्याचा मुलगा युंग लो, हाही मोठा राज्यकर्ता होऊन गेला. तो इ. स. १४०२ पासून १४२४ पर्यंत बादशहा होता. पण तुझ्या डोक्यावर हीं चिनी नांवें लादून कांहीं उपयोग नाहीं. या राजघराण्यांत नंतर पुष्कळ चांगले राज्यकर्ते झाले आणि मग नेहमींप्रमाणें या घराण्याच्याही अवनतीला सुरुवात झाली. परंतु ह्या बादशहा मंडळींना आपण बाजूला ठेवूं या आणि त्या काळच्या चीन देशाच्याच इतिहासाचा विचार करूं या. या घराण्याच्या काळांतील चीनचा इतिहास फार तेजस्वी, भरभराटीचा असून त्याच्यामध्यें कांहीं एक खास माधुरी आहे. मिंग या शब्दाचाच अर्थ तेजस्वी असा आहे. मिंग घराण्याचा अम्मल इ. स. १३६८ पासून १६४४ पर्यंत एकूण २७६ वर्षें चालला. चीनमधील एकंदर सर्व राजघराण्यांमध्यें हें घराणें अगदीं खास चिनी संस्कृतीचें होतें. आणि त्याच्या काळांत चिनी लोकांना आपल्या अंगच्या गुणांचा विकास करावयाला पूर्ण संधि मिळाली. या काळांत अंतर्गत आणि बाह्य दोन्ही प्रकारें शांतता होती. त्या

वेळीं चीननें बाह्य देशावर आक्रमण करण्याचें, साम्राज्यशाही पराक्रमाचें धोरण ठेवलेलें नव्हतें. शेजारच्या सर्व राष्ट्रांशीं चीनचें सख्य होतें. उत्तरेकडून फक्त भटक्या तातारवंशीय टोळ्यांचें तेवढें थोडेंसें भय शिल्लक होतें. बाकीच्या पूर्वेकडील जगाच्या परिसरांत चीनची अवस्था पुष्कळशी वडील भावाप्रमाणें होती. हुषार, दैववान् आणि सुसंस्कृत असा वडील भाऊ; स्वतःच्या मोठेपणाची व वरचढपणाची जाणीव असलेला; तरी पण आपल्या धाकट्या भावाचें कल्याण व्हावें अशी ज्याची इच्छा आहे आणि आपल्यापाशीं जें सुधारणा आणि संस्कृति यांचें भांडार आहे त्यांतून त्यांनाही कांहीं भाग द्यावा, त्यांनाही शिकवून शहाणे करावें अशी ज्याची तयारी आहे असा भाऊ; अशी चीनची भूमिका होती. बरें, हीं बाकीचीं राष्ट्रेंही आपल्यापरी अशाच दृष्टीनें चीनकडे पाहत असत. कांहीं काळपर्यंत जपाननें तर चीनचें अधिराज्यसुद्धां मान्य केलें होतें आणि जपानवर अम्मल चालविणारे शोगुन आपल्याला चीनच्या मिंग घराण्यांतील बादशहांचे मांडलिक समजत असत. कोरिआ, इंडोनेशियन् बेटें — म्हणजे जावा, सुमात्रा वगैरे — आणि इंडोचायना यांकडूनही चीनला खंडणी मिळत असे.

युंग लोच्या कारकीर्दीतच दर्यासारंग चेंग हो याच्या आधिपत्याखालीं मॅलेशियावर ती मोठी आरमारी स्वारी करण्यांत आली. सुमारें तीस वर्षें चेंग हो हा पश्चिमेकडील समुद्रांत अप्रतिहत संचार करीत होता आणि थेट इराणच्या आखातापर्यंत जाऊन पोंचला होता. या बाजूच्या सर्व बेटांवरील राज्यांमध्यें आपल्या साम्राज्याचा दरारा बसविण्याचा हा प्रयत्न असावा. परंतु प्रत्यक्ष एखादा प्रदेश कबजांत घेण्याचा किंवा इतर कांहीं फायदा मिळविण्याचा त्यांत उद्देश नसावा असें वाटतें. सयाम आणि मज्झपहित यांच्या राज्यांची सत्ता फार वाढूं लागली होती. यामुळें कदाचित् युंग लोनें ही स्वारी पाठविली असेल. मूळ कारण कांहीं असो, या स्वारीला यश मात्र फार मोठें आलें. मज्झपहित व सयाम यांना तिच्यामुळें पायबंद बसला आणि नवीनच उदयास आलेल्या मलाक्काच्या मुसलमानी राज्याला प्रोत्साहन मिळालें. त्याचप्रमाणें चिनी संस्कृतीचा प्रसार सर्व इंडोनेशियामध्यें व आशियाच्या पूर्व प्रदेशामध्यें झाला.

चीन आणि त्याच्या आजूबाजूचीं राष्ट्रें याच्यामध्यें सख्य आणि शांतता नांदत असल्यामुळें चीनला अंतर्गत व्यवहाराकडे लक्ष देण्यास सांपडलें. राज्यव्यवस्था चांगल्या प्रकारची राहिली, आणि कर कमी होऊन शेतकऱ्यांच्या डोक्यांवरील बोजा कमी झाला. रस्ते, जलमार्ग, कालवे, तलाव पाण्याचे सांठे यांच्यामध्यें पुष्कळ सुधारणा झाली. दुष्काळ किंवा अशाच कांहीं अडचणीच्या काळामध्यें उपयोगी पडावी म्हणून धान्याचीं सार्वजनिक कोठारें निर्माण करण्यांत आलीं. सरकारतर्फें कागदी नाणें सुरू करण्यांत आलें; त्यामुळें पतीवर चालणारे व्यवहार वाढून व्यापाराला व मालाच्या देवघेवीला फार मदत झाली. कागदी नाण्यांचा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर होत असे आणि ७० टक्के करही कागदी नाण्यांत देतां येत असत.

या काळचा संस्कृतिविषयक इतिहास याहूनही विशेष डोळ्यांत भरण्यासारखा आहे. चिनी लोक हे कितीएक युगांपासून सुसंस्कृत आणि कलावंत लोक म्हणून विख्यात आहेत. मिंग घराण्याची सुखकारक राज्यव्यवस्था आणि त्या काळांत त्यांच्या-कडून कलेला मिळालेली मदत व प्रोत्साहन यांमुळें लोकांमधील गुण व प्रतिभा यांचा विकास आणि आविष्कार होण्याला फार चांगला अवसर मिळाला. या काळांत मोठमोठ्या वैभवशाली इमारती बांधण्यांत आल्या; चित्रकलेचीं फारच श्रेष्ठ दर्जाचीं कामें झालीं; आणि मिंग घराण्याच्या काळांतील चिनी मातीच्या भांड्यांचें काम तर मोहक आकार आणि सुंदर कारागिरी यांसाठीं सुप्रसिद्धच आहे. इटलींत त्या वेळीं ज्ञानयुगाच्या चेतनेनें जीं मोठमोठीं चित्रांचीं कामें होत होतीं, त्यांच्याच तोडीचीं चीनमधील हीं चित्रें होतीं.

पंधराव्या शतकाच्या अखेरीला चीन देश त्या काळच्या यूरपपेक्षां संपत्ति, उद्योगधंदे आणि विद्या यांमध्यें किती तरी पुढें होता. मिंग घराण्याच्या कारकीर्दीच्या सर्व काळांत जनतेचें सुख आणि जनतेंतील कारागिरीचा व कलेचा बहर या बाबतींत चीनच्या तोडीचा एकही देश यूरप खंडांत किंवा इतरही कोठें नव्हता आणि तरीही यूरप खंडांतील तो अत्यंत महत्त्वाचा ज्ञानपुनरुज्जीवनाचा–रेनेसान्सचा–काळ होता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

कलेच्या दृष्टीनें मिंग घराण्याची कारकीर्द इतकी प्रसिद्ध असण्याचें एक कारण असें आहे, कीं त्या काळच्या कारागिरीचे असंख्य नमुने आज आपल्याला पाहावयाला उपलब्ध आहेत. त्यांत कित्येक मोठीं समाधिस्थानें व स्मारकस्थानें आहेत; लांकूड, हस्तिदंत किंवा जेद जातीचा दगड यांवरील अत्यंत सुंदर कोरीव चित्रकाम आहे आणि तांब्याचीं आणि मातीचीं भांडीं आहेत. मिंग घराण्याच्या कारकीर्दीच्या अखेरी-अखेरीस मात्र चित्रांच्या नमुन्यांत ताशीवपणा, रेखीवपणा किंवा लहानसहान तपशील यांवर भर अधिक वाढलेला दिसतो आणि त्यामुळें त्या कोरकामाच्या किंवा चित्रांच्या सौंदर्याला थोडासा बाध आलेला आढळतो.

याच काळामध्यें पूर्वी सांगितलेलीं पोर्तुगीजांचीं जहाजें प्रथम चीनमध्यें आलीं. कँटन बंदराला हीं जहाजें इ. स. १५१६ मध्यें पोंचलीं. चिनी लोक जेथें जेथें भेटले तेथें तेथें त्यांच्याशीं अत्यंत चांगली वर्तणूक ठेवण्याचें धोरण अल्बुकर्कनें सांभाळलेलें होतें आणि त्याच्याबद्दलचे अनुकूल वृत्तांतच चीनपर्यंत आलेले होते. त्यामुळें या पोर्तुगीजांच्या जहाजांना लोकांनीं चांगलें वागविलें; परंतु लौकरच या पोर्तुगीज लोकांनीं अनेक रीतींनीं आपले गुण उधळण्याला सुरुवात केली आणि कित्येक ठिकाणीं त्यांनीं गडही उभारले. या त्यांच्या रानगटपणाचें चिनी सरकारला मोठेंच आश्चर्य वाटलें. परंतु त्यानें एकदम कांहीं त्यांच्यावर हत्यार उचललें नाहीं. मात्र अखेरीस हळूहळू त्यांनीं या सर्व लोकांना आपल्या देशांतून हांकून लावलें. तेव्हां पोर्तुगीज लोकांना कळून चुकलें, कीं आपली नित्याची पद्धति चीनमध्यें कांहीं कामाची नाहीं. मग

त्यांनीं शांतपणा आणि नम्रता धारण केली ; नंतर इ. स. १५५७ मध्यें त्यांना कँटन शहराजवळ वसाहत करायला परवानगी मिळाली. पुढें मग त्यांनीं मकाओ शहर वसविलें.

या पोर्तुगीजांच्याबरोबर ख्रिस्ती धर्मप्रचारक आले. याच्यापैकीं सेंट फ्रान्सिस् झेविअर हा सर्वांत अत्यंत विख्यात होता. तो हिंदुस्थानमध्यें पुष्कळ काळ राहिला होता आणि त्याच्या नांवाचीं मिशनरी कॉलेजें आपल्या देशांत तुला पुष्कळ आढळतील. सेंट झेव्हिअर जपानमध्येंही गेला होता. नंतर एका चिनी बंदरामध्यें जमिनीवर उतरण्याची परवानगी मिळण्यापूर्वीच तो वारला. चिनी लोक ख्रिस्ती धर्मप्रचारकांना मुळींच थारा देत नसत. परंतु जेसुइट पंथाचे दोन पाद्री मात्र बुद्धधर्मीय विद्यार्थ्यांचा वेष घेऊन तिकडे राहिले आणि कित्येक वर्षेंपर्यंत त्यांनीं चिनी भाषेचा अभ्यास केला. कान्फ्यू-शियन तत्त्वज्ञानांत ते उत्तम प्रवीण झाले आणि शास्त्रज्ञ म्हणून त्यांनीं चागली कीर्ति मिळविली. त्यांपैकीं एकाचें नांव मॅटिओ रिक्की असें होतें. हा अत्यंत बुद्धिमान् आणि तेजस्वी विद्वान् गृहस्थ होता. आणि बादशहावरही वजन मारण्याइतकें व्यवहार-चातुर्य त्याच्या अंगीं होतें. पुढें तर त्यानें आपलें बुद्धधर्माचें सोंगही टाकून दिलें आणि त्याच्या वजनामुळें ख्रिस्ती धर्माला चीनमध्यें पुष्कळ चांगलें स्थान प्राप्त झालें.

डच लोक मकाओ शहरांत सतराव्या शतकाच्या सुरुवातीला आले. तेथें व्यापार करण्याची परवानगी मिळविण्याची त्यांनीं खटपट केली. परंतु त्यांचें आणि पोर्तुगीजांचें मुळींच बरें नव्हतें. त्यामुळें पोर्तुगीजांनीं चिनी लोकांचीं मनें डचांविरुद्ध फार कलुषित केलीं. डच लोकांचें राष्ट्र हें क्रूर चांचे लोकांचें राष्ट्र आहे, असें त्यांनीं चिनी लोकांना सांगितलें. त्यामुळें चिनी लोकांनीं डच लोकांना व्यापार करण्याला परवानगी दिली नाहीं. यानंतर कांहीं वर्षांनीं जावामधील आपल्या बटेव्हिया या शहरांतून डचांनीं एक मोठा आरमारी काफिला मकाओ येथें पाठविला. मकाओ शहर जबरदस्तीनें घेण्याचा त्यांनीं अगदींच मूर्खासारखा प्रयत्न केला ; परंतु चिनी आणि पोर्तुगीज लोक हे त्यांच्याहून फार भारी ठरले.

डचांच्यानंतर इंग्रज आले. पण त्यांनाही जवळजवळ कांहींच यश मिळालें नाहीं. मिंग घराण्याची कारकीर्द संपून गेल्यावर मगच इंग्रजांचा हात चिनी व्यापारामध्यें शिरकला.

जगांतल्या सर्वच चांगल्या किंवा वाईट वस्तूंना अंत हा ठरलेलाच आहे त्याचप्रमाणें मिंग घराण्याची कारकीर्दही सतराव्या शतकाच्या मध्याला समाप्त झाली. उत्तरेकडे तार्तार लोकांच्या संकटाचा जो छोटासा ढग उत्पन्न झालेला होता, तो वाढत जाऊन प्रत्यक्ष चीनवर त्याची कृष्ण छाया पसरली. प्राचीन किन किंवा सुवर्ण तार्तार लोकांना तूं विसरली नसशीलच. त्यांनींच सुंग घराण्याला दक्षिण चीनमध्यें लोटलें होतें, आणि पुढें मंगोलियन लोकांनीं त्यांनाही चीनमधून हांकून लावलें होतें. या किन लोकांच्या जवळच्या नात्यांतलीच एक शाखा आतां आज ज्या ठिकाणीं

मांचूरिया देश आहे त्या चीनच्या उत्तर प्रदेशांत या सुमारास बलिष्ठ झालेली होती. ते आपल्याला मांचू लोक म्हणवीत. अखेरीस या मांचू लोकांनींच मिंग घराण्याचें स्थान पटकावलें.

परंतु चीनमध्यें या वेळीं जर फाटाफूट होऊन आपसांत प्रतिस्पर्धी गट निर्माण झालेले नसते, तर मांचू लोकांना चीन जिंकणें फारच कठिण गेलें असतें. चीन, हिंदुस्थान, वगैरे एकूण एक देशांत परकी लोक जे यशस्वी झाले, ते त्या त्या देशाचें सामर्थ्य कमी झालेलें होतें आणि लोकांमध्यें आपसांत यादवी होती म्हणूनच केवळ झाले. चीनमध्येंही या वेळीं अशीच जिकडेतिकडे बंडाळी माजलेली होती. पुढचे पुढचे मिंग बादशहा हे दुराचारी आणि बेवकूब निपजले असावे बहुधा; किंवा सामाजिक क्रांति उत्पन्न व्हावी अशी आर्थिक परिस्थितीच उत्पन्न झाली असेल. मांचू लोकांशीं जें युद्ध झालें तेंही चीनला फार महाग पडलें आणि त्याचा फारच मोठा ताण चीनला जाणवूं लागला. जिकडेतिकडे पुंड टोळयांच्या नायकांचें पीक उद्भवलें आणि त्यांच्यांत सगळयांत मोठा जो होता, त्यानें बादशहा म्हणूनही कांहीं काळ सत्ता उपभोगली. मांचूच्या विरुद्ध लढणारा मिंग राजांचा सेनापति वू सां कै नांवाचा होता. एका बाजूला हा पुंडांचा नायक बादशहा झालेला, तर दुसऱ्या बाजूला मांचू लोक शत्रु; अशा मोठ्या पेंचामध्यें तो सांपडला. अत्यंत मूर्खासारखी, किंवा कदाचित् विश्वासघातानेंही असेल, त्यानें त्या पुंडांविरुद्ध मांचू लोकांचीच मदत मागितली. मांचू लोकांनीं ही मदत खरोखरच मोठ्या हौसेनें केली, आणि त्यासाठीं ते जे पेकिंगला आले ते अर्थातच तेथेंच राहिले. त्यानंतर मिंग घराण्याच्या पक्षांत कांहींच अर्थ उरलेला नाहीं अशी खात्री होऊन वू सां कैनें त्यांचा त्याग केला आणि परकी स्वारी करणारे जे मांचू लोक त्यांना जाऊन तो मिळाला.

चीनमध्यें या वू सां कैचा अत्यंत तीव्र तिरस्कार आजही करतात आणि त्याला आपल्या इतिहासांतील एक अत्यंत मोठा विश्वासघातकी मनुष्य समजतात, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. साऱ्या देशाच्या संरक्षणाचें काम त्याच्या हातीं विश्वासानें सोंपविलेलें असतांना तो शत्रूला जाऊन मिळाला; एवढेंच नव्हे, तर दक्षिण चीनमधील प्रांतांना शत्रूच्या कबजांत आणण्यासाठींही त्यानें मदत केली. मांचू लोकांनीं त्याच्या या मदतीचें बक्षीस म्हणून त्यांच्यासाठीं त्यानें मिळविलेल्या दक्षिण चीनमधील प्रांतावरच आपला व्हाइसरॉय, राजप्रतिनिधि म्हणून त्याला नेमलें.

इ. स. १६५० मध्यें मांचू लोकांनीं कँटन बंदर जिंकून घेतलें आणि त्यांचा चीनवरील विजय संपूर्ण झाला. चिनी लोकांपेक्षां हे लोक अधिक चांगले लढवय्ये असल्यामुळें त्यांचा जय झाला असें असेल. कदाचित् फार दिवस शांततेंत आणि भरभराटींत गेल्यामुळें चिनी लोक लष्करी दृष्ट्या दुर्बळही झाले असतील. परंतु मांचू लोकांना इतका जलद जय मिळाला याचीं आणखीही कांहीं कारणें होतीं. चिनी प्रजेला

संतुष्ट ठेवण्याचा, त्याची मर्जी राखण्याचा त्यांनीं नेहमीं फार प्रयत्न केला हें त्यात एक विशेष उल्लेख करण्यासारखें कारण आहे. पूर्वींच्या काळीं तातॉर लोकांच्या स्वाऱ्या झाल्या, त्या वेळीं फार जुलूम आणि कत्तली झाल्या होत्या. या वेळीं चिनी अंमलदारांना आपल्याकडे वळविण्याचा मांचू लोकांनीं फार प्रयत्न केला आणि त्याच अंमलदारांना पुन्हां त्यांनीं आपापल्या जागांवर नेमलें. त्यामुळें त्यांच्या राज्यात मोठमोठ्या जागा चिनी अधिकाऱ्यांच्याच हातीं होत्या. जुनी मिंग घराण्याच्या वेळची राज्यपद्धति पण त्यांनीं बदलली नाहीं. पद्धति दिसायला तीच राहिली, फक्त तिचें वरचें सगळें सूत्र तेवढें पार बदलून गेलें.

परंतु चिनी लोक परकी अमलाखालीं गेले होते हें दाखविणाऱ्या दोन महत्त्वाच्या गोष्टी मात्र घडून आल्या. महत्त्वामहत्त्वाच्या सर्व ठिकाणीं मांचू सैन्याचे तळ ठेवण्यांत आले ही एक गोष्ट; आणि मांचूंची लांब शेंडी ठेवण्याची पद्धति चिनी लोकांवर नव्या राज्याला संमतिदर्शक म्हणून लादण्यांत आली, हें दुसरें. चिनी मनुष्य म्हटला, कीं त्याची ती लांब शेंडी त्याचें वैशिष्ट्य म्हणून आपल्यापैकीं बहुतेकांच्या डोळ्यांपुढें नेहमीं उभी राहते. पण मूळची ही कांहीं चिनी परंपरा मुळींच नव्हती. ही चाल त्यांच्या पारतंत्र्याची दर्शक होती; अगदीं अशाच प्रकारें आम्ही हिंदी लोक-सुद्धां आजही कांहीं लाज किंवा अपमान न वाटतां कितीक गुलामगिरीचीं लक्षणें स्वीकारीत आहोंतच कीं नाहीं! हल्लीं मात्र चिनी लोकांनीं ही लांब शेंडीची पद्धति सोडून दिली आहे.

अशा रीतीनें चीनमध्यें मिंग घराण्याची तेजस्वी कारकीर्द नष्ट झाली. जवळ-जवळ तीनशें वर्षें राज्य चांगल्या प्रकारें करीत असतां एकाएकीं इतक्या लौकर या घराण्याचा पाडाव कां झाला, असा माणसाला मोठा प्रश्न पडतो. आम्ही वर्णनें वाचतों इतकें जर हें राज्य चांगलें होतें, तर मग अंतर्गत बंडाळी आणि अंतर्गत दंगेधोपे का उद्भवले? मांचूरियांतील परक्या स्वारी करणारांना जागच्या जागीं रोखून त्यांना कां धरतां आलें नाहीं? बहुधा अखेरीअखेरीला हें राज्यही जुलमी झालें असावें. त्याच-प्रमाणें सर्व कांहीं सरकारनें वडिलांप्रमाणें करावयाचें, प्रजेवर कांहींच जबाबदारी नसावयाची, यामुळेंही कदाचित् लोक दुर्बळ झालेले असतील. मुलांना काय किंवा राष्ट्रांना काय, सारखेंच दुसऱ्यांनीं भरवीत राहणें हें हिताचें नसतें.

दुसरा एक प्रश्न असा पडतो, कीं चीन देश या काळीं इतका असा सुसंस्कृत असतांना इतर कांहीं बाबतींत, उदाहरणार्थ, शास्त्रें, संशोधन इत्यादि बाबतींत त्याचें कांहींच पाऊल पुढें कसें पडलें नाहीं? यूरपचे लोक तर त्या काळीं चीनपेक्षां किती तरी मागासलेले होते; असें असूनही ज्ञान व कला यांच्या पुनरुज्जीवनाच्या काळांत त्यांच्या ठिकाणीं उत्साह, साहस आणि शोधप्रवृत्ति यांचा संचार झालेला आपणांस आढळतो. त्या दोहोंची तुलना करावयाची, तर एका बाजूला एक मध्यम वयाचा चांगला विद्या व संस्कृति यांनीं विभूषित गृहस्थ, जरा शांत अशा जीवनाची आवड

असलेला, उगीच नवीन कांहीं भानगड करायला नको आणि आपल्या रोजच्या कार्यक्रमांत कांहीं बदल व्हायला नको अशा बुद्धीचा आणि आपल्या प्राचीन पवित्र ग्रंथांत आणि कलाप्रवृत्तींत गर्क झालेला मनुष्य; तर दुसऱ्या बाजूला एक तरुण पोरगा, अजून जरा असंस्कृत आणि गांवढळच, परंतु उत्साहानें आणि संशोधनबुद्धीनें भरलेला आणि कोठें तरी साहस आणि पराक्रम करायला मिळावा म्हणून धडपडणारा असा एक मनुष्य, अशी त्यांची तुलना करतां येईल. या काळच्या चीन देशांत मोहकता फार मोठ्या प्रमाणावर आहे हें खरें; पण ती मोहकता म्हणजे तिसऱ्या प्रहरच्या किंवा सायंकालीन प्रशांत सौंदर्याची रमणीयता आहे.

८१

# जपान देश स्वतःला कोंडून घेतो

२३ जुलै, १९३२

चीनमधून असेंच आपण एकदां जपानमध्यें जाऊं या चला; वाटेंत जातां जातां थोडा वेळ धांवताच मुक्काम कोरियामध्यें करूं या. कोरियाचा ताबा अर्थातच संपूर्णपणें मंगोलियन लोकांनीं घेतलेला होता. त्यांनीं जपानवरही स्वारी करण्याचा प्रयत्न केला होता. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. मंगोलियन लोकांना समुद्रावरील लढाईचें तंत्र कांहीं फारसें कधींच जुळलेलें दिसत नाहीं. स्वभावतः ते बेटापेक्षा सलग एका मोठ्या खंडांत जमिनीवर राहणारे लोक दिसतात. जपान पडलें बेटावर. त्यामुळें तें त्यांच्या तडाक्यांतून वांचलें.

चीनमधून मंगोलियन लोकांना हांकलून दिल्यानंतर लौकरच कोरियामध्यें एक क्रांति झाली आणि मंगोलियन लोकांचें अधिराज्य मान्य करून राहिलेले तेथले जे राज्यकर्ते होते, त्यांना काढून टाकण्यांत आलें. या बंडाचा पुढारी यी तै-जो नांवाचा एक कोरियन देशभक्त होता. बंडानंतर तो नवीन राजा झाला; आणि त्याचें जें राजघराणें स्थापन झालें त्याचाच अम्मल कोरियामध्यें सुमारें ५०० वर्षें म्हणजे इ. स. १३९२ पासून अगदीं परवां परवां जपाननें कोरिया देश आपल्या साम्राज्याला जोडून घेतला तेथपर्यंत चालू होता. बंडानंतर सेऊल ही कोरियाची राजधानी करण्यांत आली, ती आजही तशीच कायम आहे. कोरियाला यानंतर पुन्हां चोसेन असें म्हणण्यांत येऊं लागलें; आणि चीनच्या साधारणपणें सांवलीखालींच, आणि चीनला अधून मधून खंडणी देत, पण एकंदरींत जवळजवळ स्वतंत्र देश म्हणून चोसेनचें राज्य चालू राहिलें. जपानशीं कोरियाचीं पुष्कळ युद्धें झालीं व त्यांत त्याला कधीं कधीं जयही मिळाला. पण आज या दोन देशांत तुलना करायचीसुद्धां सोय नाहीं. जपान

आतां एक मोठें आणि बलिष्ठ साम्राज्य झालें असून साम्राज्यशाही सत्तांचे सर्व दुर्गुणही त्याच्या ठिकाणीं आलेले आहेत. गरीब बिचारा कोरिया देश या जपानच्या साम्राज्याचा एक लहानसा तुकडा आहे; जपान त्याच्यावर राज्य चालवीत असून त्याचें सगळें अर्थशोषण करीत आहे; तरी पण कोरिया असहायपणें का होईना, पण धैर्यानें आपल्या स्वातंत्र्यासाठीं धडपडत आहे. तथापि हा सगळा अगदीं आजकालचा इतिहास आहे; आणि आपण तर अजून पुष्कळ प्राचीन काळामध्यें आहों.

बाराव्या शतकाच्या अखेरीस जपानमध्यें राज्यकाभाराचीं सगळीं खरीं सूत्रें शोगूनांच्या हातीं आलीं होतीं हें तुला आठवतच असेल. बादशहा हा आपला नुसता शोभेला होता. कामाकुरा शोगूनशाही म्हणून प्रसिद्ध असलेली पहिली शोगूनशाही सुमारें दीडशें वर्षें चालली. या काळांत त्यांनीं जपानला शांतता आणि सुव्यवस्थित राज्यकारभार यांची जोड करून दिली. अर्थात् नेहमींप्रमाणें या राज्यकर्त्या घराण्याचीही यापुढें अवनति झाली; त्यांच्यामध्यें आणि राज्यामध्यें बेवकूफी आणि चैनबाजी वाढली आणि शेवटीं आपसांत यादवी निर्माण झाली. एका बाजूला आपली स्वतःची खरी सत्ता चालली पाहिजे यासाठीं धडपडणारा बादशहा आणि दुसऱ्या बाजूला शोगून यांच्यामध्यें झगडे सुरू झाले. त्यांत बादशहाचा जसा पाडाव झाला, तसाच जुन्या शोगूनशाहीचाही पण झाला आणि इ. स. १३३८ मध्यें नवीनच एक शोगूनशाही उदयाला आली. ही अशिकागा शोगूनशाही. ही पुढें २३५ वर्षें चालू राहिली. पण हा २३५ वर्षांचा काळ म्हणजे बंडाळी आणि युद्धें यांचा काळ होता. हा काळ आणि चीनमधील मिंग राजवंशाचा काळ जवळजवळ एकच होता. या दुसऱ्या शोगूनशाहीपैकीं एका शोगूनाच्या मनांत मिंग घराण्यांतील बादशहांची अनुकूलता मिळविण्याचें फार होतें; इतकें कीं त्यासाठीं आपण मिंग बादशहांचे मांडलिक आहोंत असें मान्य करण्यापर्यंत त्याची पाळी गेली. जपानचा हा जो अपमान झाला, त्याबद्दल जपानी इतिहासकारांच्या अंगाची नुसती लाही होते आणि या शोगूनाला ते अगदीं कडवट शिव्या देतात.

जपानचे चीनशीं संबंध स्वाभाविकच चांगले सख्यत्वाचे होते; आणि मिंग बादशहांच्या अमलामध्यें चीनमध्यें संस्कृतीला जो नवीन बहर आला होता, तें एक नवेंच कारण जपानला चीनविषयीं आणखीच आकर्षण वाटण्याला झालें होतें. त्यामुळें जपानमध्यें चीनमधील प्रत्येक गोष्टीचा अभ्यास सुरू झाला; चित्रकला, काव्य, स्थापत्य आणि शिल्पकला, तत्त्वज्ञान यांचा; एवढेंच नव्हे, तर युद्धशास्त्राचाही. जपानमधील किंकाकुजी (सुवर्णप्रासाद) आणि जिंकाकुजी (रजतप्रासाद) या सुप्रसिद्ध इमारती याच काळांत बांधण्यांत आल्या.

कला आणि विलास यांच्या या वाढीच्या जोडीलाच देशांत शेतकऱ्यांची मात्र फार दैन्यावस्था झालेली होती. शेतकऱ्यांवरील कर अतिशयच अवजड झाले होते; आणि देशांतील आपसांतील यादवीचा भारही अखेरीस त्यांनाच सोसावा लागत

होता. अशी ही परिस्थिति एकसारखी इतकी चिघळत गेली, कीं राजधानीच्या बाहेर मध्यवर्ती सत्तेचा कारभार मानला जाईना अशी अवस्था प्राप्त झाली.

या यादवीच्या काळांतच इ. स. १५४२ मध्यें पोर्तुगीज लोक जपानमध्यें आले मोठी लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं दारूगोळ्यांचीं हत्यारें जपानमध्यें या पोर्तुगीजांनीं प्रथम आणलीं. हें पाहिलें म्हणजे मोठें नवल वाटतें. कारण चीनला या हत्यारांची किती तरी पूर्वींपासून माहिती होती, आणि खरें म्हणजे यूरप खंडाला त्यांचें ज्ञान चीनपासूनच मंगोलियन लोकांच्याशीं यूरप खंडाचा संबंध आला तेव्हां मिळालेलें होतें.

जपानमध्यें जवळजवळ शंभर वर्षें चाललेल्या या यादवींतून तीन गृहस्थांनीं जपानची सुटका केली. नोरबुनागा या नांवाचा एक दाइम्यो म्हणजे उमराव, हिदेयोशी नांवाचा एक शेतकरी, आणि टोकुगावा इयेयासू नांवाचा वरिष्ठ सरदारांपैकीं एक, हे ते तीन गृहस्थ. सोळाव्या शतकाच्या अखेरीस सर्व जपान देश पुन्हां एकजीव असा झाला. हिदेयोशी हा शेतकरी जपानच्या अत्यंत कर्तबगार मुत्सद्यांपैकीं एक होऊन गेला. परंतु शरीरानें मात्र तो अगदींच कुरूप, ठेंगू, आडमाड आणि माकडासारख्या चेहऱ्याचा होता म्हणतात.

जपानचें एकीकरण पूर्ण झाल्यानंतर आपल्या मोठ्या थोरल्या सैन्याचें काय करावें असा या गृहस्थापुढें प्रश्न पडला. तेव्हां दुसरा कांहीं उद्योग नाहीं म्हणून त्यांनीं कोरियावर हल्ला केला. पण लौकरच त्याबद्दल त्यांना पश्चात्ताप करण्याची पाळी आली. कोरियांतील लोकांनीं जपानच्या आरमाराचा पराभव केला आणि कोरिया व चीन यांमधील समुद्रावर त्यांनीं आपलें वर्चस्व बसविलें. एका नवीनच प्रकारच्या जहाजांचा हा पराभव करण्याच्या कामीं त्यांना फार उपयोग झाला. लोखंडी पत्र्यांचें कांसवाच्या पाठीसारखें छप्पर या जहाजांवर असे. या जहाजांना कच्छपनौका "कांसवी जहाजें" असेंच म्हणत. हीं जहाजें मागें किंवा पुढें केव्हांही कशींही हांकारतां येत असत. या जहाजांवरून जपानच्या लढाऊ जहाजांचा कोरियांतील लोकांनीं नाश केला.

वर सांगितलेल्या तीन गृहस्थांपैकीं टोकुगावा इयेयासू यानें या यादवींतून आपली तुंबडी चांगलीच भरून घेतली. इतकी कीं भलताच संपत्तिमान् होऊन जवळजवळ एक-सप्तमांश जपानचा तो मालक झाला. आपल्या मालकीच्या प्रदेशांत त्यानेंच तें येदो हें शहर वसविलें. यालाच पुढें टोकिओ हें नांव प्राप्त झालें. इयेयासू हा इ. स. १६०३ मध्यें शोगून झाला, आणि तेव्हांपासून सुरू झालेली ही तिसरी आणि शेवटचीच टोकुगावा शोगूनशाही पुढें २५० वर्षेंपर्यंत चालू राहिली.

दरम्यान पोर्तुगीजांनीं तेथें आपलें थोडेंसें व्यापाराचें बस्तान जमविलें होतें. जवळजवळ पन्नास वर्षें यूरपमधून त्यांच्याशीं स्पर्धा करायला तेथें कोणी आलें नाहीं; कारण स्पॅनिश लोक इकडे प्रथम इ. स. १५९२ मध्यें आले आणि डच आणि इंग्रज तर याहूनही पुढें आले. जपानमध्यें ख्रिस्ती धर्माचा प्रवेश सेंट फ्रान्सिस झेव्हिअर यानेंच इ. स. १५४९ मध्यें केला असावा असें दिसतें. जेसुईट पंथाच्या लोकांना

जपानांत धर्मोपदेश करावयाला नुसती परवानगी मिळाली; एवढेंच नव्हे, तर त्यांत त्यांना उत्तेजनही मिळालें. असें करण्यांत मुळाशीं हेतु मात्र राजकीय होता. कारण बुद्धधर्मीय विहार किंवा मठ हे गुप्त कारस्थानांचे मोठेच अड्डे आहेत अशी समजूत होऊन गेलेली होती. त्यासाठीं या बुद्ध भिक्षूंना दडपून टाकून ख्रिस्ती मिशनऱ्यांना थोडी अनुकूलता दाखविण्यांत आली. परंतु लौकरच जपान्यांना कळून चुकलें कीं हे मिशनरी लोक म्हणजे मोठे घातक लोक आहेत. म्हणून तावडतोब जपानी लोकांनीं त्यांच्यासंबंधींचें आपलें धोरण बदललें आणि त्यांना बाहेर हांकलून देण्याचा प्रयत्न सुरू केला. इ. स. १५८७ इतक्या जुन्या काळींच ख्रिस्ती धर्माविरुद्ध एक हुकूम काढण्यांत येऊन सर्व ख्रिस्ती मिशनरी लोकांनीं वीस दिवसांत जपानांतून निघून जावें, नाहीं तर त्याचा वध करण्यांत येईल, असें त्यांना फर्माविण्यांत आलें. अर्थात् या हुकुमाचा रोख कांहीं व्यापाऱ्यांविरुद्ध नव्हता. हुकुमांतच स्पष्ट असें म्हटलेलें होतें, कीं व्यापाऱ्यांनीं जपानमध्यें राहून व्यापार करण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु ते जर आपल्या जहाजांवर मिशनरी आणतील, तर मात्र त्यांचें जहाज आणि त्यावरील माल दोन्ही जप्त केलीं जातील. हा हुकूमही केवळ राजकीय कारणासाठीं जारी करण्यांत आला होता. हिदेयोशीच्या सूक्ष्म बुद्धीनें संकट बरोबर हेरलें होतें. हे ख्रिस्ती मिशनरी आणि त्यांनीं बाटविलेले लोक यांच्यापासून राजकीय दृष्ट्या धोका उत्पन्न होण्याचा संभव आहे अशी त्याची कल्पना झाली, आणि यांत त्याची फारशी चूकही नव्हती.

यानंतर लौकरच एक प्रसंग असा घडून आला, कीं त्यामुळें आपली ही भीति अगदीं खरी होती असें हिदेयोशीला पक्कें समजून चुकलें आणि त्यामुळें त्याला फार संताप आला. फिलिपाइन्स बेटें आणि अमेरिका यांच्यामध्यें तें मॅनिला गॅलिअन् नांवाचें जहाज दर वर्षाला एक फेरी करून जात असे म्हणून तुला मीं सांगितलेलें आठवत असेल; हें जहाज वादळांत सांपडून एकदां जपानच्या किनाऱ्याला लागलें. त्या जहाजावरील कप्तानानें जगाचा नकाशा दाखवून, विशेषतः त्यावरील स्पेनच्या राजाच्या खास मालकीचा म्हणून दाखविलेला विशाल भूप्रदेश तेथील स्थानिक जपानी लोकांना दाखवून त्यांच्या मनांत भीति उत्पन्न करण्याचा मुद्दाम प्रयत्न केला. लोकांनीं कप्तानाला विचारलें, कीं एवढें हें प्रचंड साम्राज्य स्पेनच्या राजाला संपादन तरी कसें करतां आलें? त्यावर कप्तानानें उत्तर दिलें, कीं त्याच्याइतकी तर सोपी गोष्टच कोणती नाहीं. प्रथम मिशनरी लोकांनीं जावयाचें; मग त्यांनीं पुष्कळसे लोक बाटविले म्हणजे त्यांच्या मदतीला शिपाई पाठवावयाचे आणि त्या दोघांनीं मिळून स्थानिक राज्य उलथून टाकावयाचें. हिदेयोशीच्या कानांवर जेव्हां हा वृत्तांत गेला तेव्हां त्याला कांहीं फारसा संतोष होणें शक्य नव्हतें; उलट, त्यामुळें तो मिशनऱ्यांचा अधिकच तीव्र विरोधक बनला. मॅनिला गॅलिअन् जहाजाला त्यानें जाऊं दिलें; परंतु जपानमध्यें मात्र त्यानें कांहीं मिशनरी आणि त्यांनीं बाटविलेले लोक यांचा वध केला.

शोगून झाल्यानंतर मात्र इयेयाशू हा परकी लोकांशीं अधिक मऊपणानें व सरळपणानें वागूं लागला. परकी देशांबरोबरचा व्यापार वाढवावा, विशेषतः आपलें स्वतःचें बंदर जें येडो याचा परदेशांशीं व्यापार वाढावा याकडे त्याचें विशेष लक्ष लागलेलें होतें; परंतु इयेयाशूच्या मृत्यूनंतर ख्रिस्ती लोकांचा छळ पुन्हां सुरू झाला. मिशनरी लोकांना जबरदस्तीनें जपानमधून हाकलून लावण्यांत आलें आणि बाटलेल्या लोकांवर ख्रिस्तीधर्म सोडण्याची सक्ती करण्यांत आली. व्यापारसंबंधींचें धोरणसुद्धां आतां बदललें; इतकी या परकी लोकांच्या राजकीय डावांची भीति उत्पन्न झालेली होती. काय वाटेल तें करून या परकी लोकांना बाहेर ठेवावयाचें, अशी त्यांची धडपड होती.

जपानी लोकांच्या मनावर हा जो उलटा परिणाम झाला त्याचा अर्थ आपणास समजण्यासारखा आहे. यापुढील काळामध्यें इतर अनेक देशांत या यूरपीय सत्तांनीं धर्माच्या ढोंगाखालीं आपल्या स्वतःच्या पोतड्या भरण्याचा कावा कसा काय साधून घेतला, हें आतां आपल्याला चांगलें परिचित झालें आहे. परंतु आश्चर्य वाटतें तें या गोष्टीचें, कीं जपानी लोकांचा तोंपर्यंत यूरपीय लोकांशीं विशेषसा संबंध आलेला नसतांही धर्मरूपी शेळीचें कातडें पांघरून आलेल्या या साम्राज्यशाहीच्या लांडग्याचें खरें आंतलें स्वरूप नेमकें ओळखण्याइतकी खोल दृष्टि जपान्यांनीं त्या वेळीं प्रकट केली.

एव्हांपासून जगांतील एका अलौकिक प्रकाराला सुरुवात झाली. हा प्रकार म्हणजे जपानची नाकेबंदी. सगळ्या जगापासून फुटून दूर अगदीं वेगळें राहण्याचें धोरण तेथें जाणूनबुजून ठरविण्यांत आलें आणि त्याची अम्मलबजावणी पण अचंबा वाटण्याइतकी कसोशीनें करण्यांत आली. इंग्रज लोकांनीं जपानांत जाण्याचा प्रयत्न केला होता; पण तेथें आपली फारशी डाळ शिजत नाहीं असें पाहून त्यांनीं इ. स. १६२३ मध्यें हा प्रयत्न सोडून दिला. दुसऱ्या वर्षी स्पॅनिश लोकांना जपानांतून हद्दपार करण्यांत आलें. त्यांचीच तेथें सगळ्यांत अधिक भीति वाटत असे. बाहेर देशांत व्यापारासाठीं जावयाचें तें फक्त जे ख्रिस्ती नसतील त्यांनींच आणि त्यांनीं सुद्धां फिलिपाइन्स बेटांत जातां उपयोगी नाहीं असा कायदा करण्यांत आला. शेवटीं यानंतर बारा वर्षांनीं इ. स. १६३६ मध्यें जपानची पुरी नाकेबंदी करण्यांत आली. पोर्तुगीज लोकांना हद्दपार करण्यांत आलें; ख्रिस्ती किंवा बिगर ख्रिस्ती कोणीही जपानी माणसानें कोणत्याही कारणासाठीं परदेशीं जावयाचें नाहीं आणि परदेशीं राहणाऱ्या कोणाही जपान्यानें परत जपानला यावयाचें नाहीं, असा कायदा करण्यांत येऊन हा कायदा मोडणारास देहांताची शिक्षा ठरविण्यांत आली. परक्यांपैकीं आतां फक्त मूठभर डच लोक जपानमध्यें राहिलेले होते; परंतु त्यांना बंदर सोडून देशांतल्या आंतल्या भागांत जाण्याला पूर्ण मनाई होती. इ. स. १६४१ मध्यें या डच लोकांनाही नागासाकी बंदराजवळच्या एका बेटावर नेण्यांत येऊन तेथें कैद्यांप्रमाणें ठेवण्यांत आलें. अशा रीतीनें पोर्तुगीजांनीं प्रथम जपानमध्यें पाय ठेवला तेव्हांपासून नव्याण्णव

वर्षांत जपाननें परदेशांशीं आपला संबंध पार तोडून टाकला आणि स्वतःलाच कोंडून घेतलें.

इ. स. १६४० मध्यें पोर्तुगीजांच्या एका जहाजावरून कांहीं वकील व्यापार पुन्हां सुरू करावा अशी मागणी करण्याकरितां आले होते ; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. जपान्यांनीं त्या वकिलांना आणि बहुतेक सर्व खलाशांना ठार केलें. फक्त कांहीं खलाशांना परत जाऊन या प्रकाराची वर्दी पोंचविण्यासाठीं तेवढें जिवंत ठेवलें !

अशा रीतीनें सुमारें दोनशें वर्षें जपानचा सर्व जगाशीं, प्रत्यक्ष त्याचे शेजारी चीन आणि कोरिया यांच्याशींसुद्धां, अगदीं काडीचाही संबंध नव्हता. त्या बेटावरचे ते डच लोक आणि अतिशय कडक देखरेखीखालीं येणारा एखादा चिनी मनुष्य एवढाच काय तो बाहेरच्या जगाशीं संबंधाचा दुवा ! हा संबंध तोडण्याचा प्रकार फारच लोकविलक्षण आहे. आपल्याला माहीत आहे त्या इतिहासकाळांतील कोणत्याही काळांत किंवा कोठल्याही राष्ट्रांत अशा प्रकारचें दुसरें उदाहरण सांपडत नाहीं. रहस्यमय, अतिगूढ तिबेट देश आणि अरण्यमय मध्य आफ्रिका देश यांचासुद्धां आजूबाजूच्या देशांशीं वारंवार संबंध येत असे. जगापासून स्वतःला अगदीं सर्वस्वीं बाजूला ठेवणें ही गोष्ट घातुक आहे. परंतु या घातुक प्रकारांतही जपान जिवंत राहिलें, त्याच्यामध्यें अंतर्गत शांतता प्रस्थापित राहिली व दीर्घकालीन लढायांतून आलेल्या दुःस्थितींतून त्यानें डोकें वर काढलें. आणि अखेर इ. स. १८५३ मध्यें जपाननें आपलीं दारें आणि खिडक्या जेव्हां उघडल्या, तेव्हां जपाननें आणखी एक अलौकिक चमत्कार करून दाखविला. त्यानें एकदम पुढें धांव घेतली, फुकट गेलेला सर्व वेळ भरून काढला, यूरपियन राष्ट्रांना गांठलें आणि त्यांच्याच तंत्रांत त्यांच्यावर कडी केली.

इतिहासाची अशी ही नुसती बुच्ची बाह्य रेखाकृति किती कंटाळवाणी वाटते ! आणि त्यांत डोळ्यांपुढून जाणाऱ्या व्यक्तींचीं चित्रेंही किती निर्जीव आणि पुसट वाटतात ! परंतु एखादे वेळीं जुन्या काळींच लिहिलेला एखादा इतिहासग्रंथ जेव्हां वाचण्यांत येतो, तेव्हां मात्र मृत भूतकाळाच्या शरीरांत कोणी तरी प्राण ओतल्यासारखें वाटतें. त्या काळच्या घडामोडींची रंगभूमि अगदीं आपल्यासमोर उभी राहते आणि अगदीं आपल्यासारखींच जिवंत, एकमेकांवर प्रेम करणारीं किंवा एकमेकांचा हेवादावा करणारीं माणसेंच त्या रंगभूमीवर वावरत आहेत असा भास होतो. नुकतीच प्राचीन जपानांतील एका मोठ्या गोड स्त्रीची हकीकत माझ्या वाचण्यांत आली. तिचें नांव मुराकासी. शेंकडों वर्षांपूर्वी, त्या यादवीच्या युद्धांबद्दल मीं लिहिलें ना, त्यापूर्वीं किती तरी प्राचीन काळीं ही स्त्री होऊन गेली. जपानच्या बादशहाच्या दरबारांत आपलें जें आयुष्य गेलें त्याचा बराच लांबलचक वृत्तांत या स्त्रीनें लिहिलेला आहे. त्यामधील कित्येक उतारे वाचीत असतांना, त्यांतील त्या जागोजागच्या मधुर वर्णनांच्या सूक्ष्म छटा, ते घरगुती

वातावरणांतील प्रेमसंबंध व त्या अगदीं अंतरंगांतल्या हकीकती आणि दरबारांतील ते कित्येक निरर्थक फाजिल चाळे व खटपटी-लटपटी वाचीत असतांना ही मुरासाकी-बाई खरोखरच माझ्यापुढेंच उभी आहे असा मला भास झाला आणि प्राचीन जपानच्या दरबारांतील त्या मर्यादितच परंतु मोठ्या कलाकुसरीनें युक्त अशा जगाचें हुबेहूब चित्र माझ्या डोळ्यांपुढें उभें राहिलें !

## ८२

## धुमाकुळांत सांपडलेलें यूरप खंड

*४ ऑगस्ट, १९३२*

अलीकडे पुष्कळ दिवसपर्यंत हीं पत्रें लिहिण्याचें काम माझ्या हातून झालें नाहीं. मागचें पत्र लिहिलें त्याला आतां दोन आठवडे झाले असतील. तुरुंगांत माणसाचें मन पुष्कळदां उदास आणि मंद, उद्विग्न आणि विषण्ण होत असतें. तुरुंगांतच कां, तसें पाहिलें तर बाहेरच्या जगांत सुद्धां माणसाची अधूनमधून अशी अवस्था होते. त्यामुळें अलीकडे माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला पाह्यला न मिळणारीं हीं पत्रें लिहिण्याकडे माझें मनच जाईनासें झालें आहे. एक जागीं टांचून केव्हां तुझी दृष्टि त्यांच्यावर पडेल याची वाट पाहत दिलीं आहेत ठेवून बिचारीं बाजूला; मग तो क्षण यायला काय कांहीं महिने लागणार आहेत का कांहीं वर्षें लागणार आहेत, कोणीं सांगावें ? शिवाय कांहीं महिन्यांनीं किंवा कांहीं वर्षांनीं तरी काय ? जेव्हां केव्हां आपली भेट होईल आणि आपण एकमेकांना डोळे भरून नीटपणें पाहूं, भेटूं त्या वेळीं कोणाला ठाऊक तूं केवढी आजीबाई झालेली असशील आणि किती बदललेली असशील ! तसेंच त्या भेटीच्या वेळीं व नंतरही आपल्याला इतकें बोलायचें असेल आणि इतक्या कांहीं गोष्टी करायच्या असतील, कीं या पत्रांकडे लक्ष देण्याला तुला फुरसद सुद्धां नाहीं व्हायची. बरें, तोंपर्यंत पत्रें तरी काय थोडकीं का राहणार आहेत ? लहानसा डोंगरच होईल त्यांचा एक तोंपर्यंत आणि माझ्या तुरुंगांतील जीवनाच्या किती तरी तासांचा उद्योग त्यांमध्यें सांठून ठेवलेला असेल.

तरी पण हीं पत्रें पुढेंही लिहीत राह्यचें आणि लिहून झालीं आहेत त्यांत भर टाकीत राह्यचें मीं ठरविलें आहे. कोणीं सांगावें ? आवडतील सुद्धां एखादे वेळीं तुला तीं ! निदान माझ्या मनाला तरी त्यांची चांगलीच करमणूक होत असते.

अलीकडे कांहीं काळ आपण आशिया खंडांत वावरत आलों. इकडे हिंदुस्थान, मॅलेशिया, चीन आणि जपान यांमध्यें जाऊन या खंडांचा इतिहास आपण पाहत आलों. तिकडे दुसऱ्या बाजूस यूरप खंड नुकतें कोठें आतां जागें होऊं लागलें होतें

आणि त्याचा इतिहास थोडासा लक्ष देण्याजोगा होऊं लागला होता, तोंच एकाएकीं यूरप खंड सोडून आपण इकडे आलों. यूरपमध्यें या वेळीं रेनेसान्स म्हणजे पुनरुज्जीवन झालें. खरें म्हटलें म्हणजे त्या वेळीं यूरपचा नवाच जन्म झाला असें म्हणणें अधिक बरोबर होईल. कारण सोळाव्या शतकामध्यें यूरप खंडाचें जें स्वरूप निर्माण झालें, तें पूर्वीच्या काळच्या कोणत्याही अवस्थेशीं सारखें किंवा जुळण्याजोगें नव्हतें. हें स्वरूप सर्वतोपरी अगदीं नवीन होतें; आणि जुन्याचा त्यांत कांहीं भाग होता असें म्हटलेंच, तर त्यावर संपूर्ण नवीन आवरण पडून मूळचा भाग पार झांकून टाकण्यांत आला होता एवढें तरी खासच.

यूरप खंडांत या काळात जिकडे तिकडे धुमाकूळ, अस्वस्थता माजलेली आढळते. जणुं कांहीं एखाद्या कोंडलेल्या जागेच्या सभोंवतालचें आवरण फुटून जाऊन आंतलें सगळें काहीं उसळून बाहेर पडत आहे, अशी स्थिति तेथें झाली होती. कितीक शतकें सरंजामशाहीच्या पद्धतीवर आधारलेल्या सामाजिक आणि आर्थिक व्यवस्थे-खालीं यूरप खंड दडपून गेलेलें होतें. इतकी कडक पकड या व्यवस्थेची त्यावर पडलेली होती, कीं वरच्या या कवचाच्या दडपणामुळें काहीं काळ यूरपची वाढच बंद झाली! परंतु या कवचाला आतां पुष्कळ ठिकाणीं चिरा पडूं लागल्या होत्या. कोलंबस, वास्को-डि-गामा आणि जलमार्ग शोधून काढणारे प्रारंभींचे इतर लोक हे हें कवच फोडून बाहेर पडले. पूर्वेकडून व अमेरिकेंतून स्पेन आणि पोर्तुगाल यांमध्यें जी पाहतां पाहतां अकल्पित प्रचंड संपत्ति जमा झाली, तीमुळें यूरपचे डोळे फिरून गेले आणि पूर्वीच्या समाजव्यवस्थेंत होऊं घातलेला बदल फार लौकर घडून आला. आपल्या आजूबाजूच्या समुद्राच्या पलीकडे आतां यूरपची नजर फाकली आणि त्या ठिकाणीं जागतिक दृष्टिकोण उत्पन्न झाला. जागतिक व्यापार आणि जागतिक सत्ता यांच्या मोठ्या मोठ्या कल्पना यूरपच्या नजरेसमोर नाचूं लागल्या. धनिकवर्ग अधिक बलिष्ठ होत गेला आणि पश्चिम यूरपला सरंजामदारशाहीची अधिकाधिक अडचण वाटूं लागली.

सरंजामशाही ही खरोखर आतां प्रचलित काळाच्या दृष्टीनें निरुपयोगी प्रथा झालेली होती. या पद्धतीचा खरा गाभा म्हणजे शेतकऱ्यांची निर्लज्जपणें पिळणूक करायची हा होता. सक्तीची बिगारवेठ, विनावेतन मजुरी, जमीनमालकाला द्यावे लागणारे नाना तऱ्हेचे खास कर आणि वसूल हे सर्व या पद्धतीचे विशेष असून न्याय करण्याचा सगळा अधिकार हापण खुद्द जमीनमालकाकडेच असे. यामुळें शेतकरीवर्गाचे हाल इतके वाढले, कीं शेतकऱ्यांचीं बंडें आणि युद्धें वारंवार होऊं लागलीं हें आपण पाहिलेंच आहे. शेतकऱ्यांचीं हीं बंडें दिवसेंदिवस वाढत्या प्रदेशांवर आणि पुनः पुनः होऊं लागलीं. यूरपच्या पुष्कळशा भागांत आर्थिक क्रांति होऊन जुन्या सरंजामदारवर्गाच्या ठिकाणीं नवीन मध्यमवर्ग अथवा धनिकवर्ग प्रस्थापित झाला व ही क्रांति या शेतकऱ्यांच्या बंडांनीं आणि जॅक्केरींनींच घडवून आणली.

पण हे सर्व फेरफार चुटकीसारखे घडून आले अशी मात्र चुकीची समजूत करून

घेऊं नको. हें घडून येण्याला पुष्कळ मोठा कालावधि लागला आणि त्यापूर्वी यूरपमध्यें कित्येक दशकें आपसांत यादवी माजून राहिली. या आपसांतील लढायांमुळें यूरपच्या पुष्कळ मोठ्या भागाचा तर पार नाश झाला. या काळांतील यादवींत शेतकऱ्यांचीं युद्धें हीं तर होतींच; परंतु त्यांच्या जोडीलाच प्रॉटेस्टंट आणि कॅथॉलिक या पंथांमधील धार्मिक युद्धेंही होतीं. नेदरलंड्स्मध्यें झालें त्याप्रमाणें राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं झालेलीं युद्धेंही होतीं आणि धनिकशाहीचें राजाच्या अनियंत्रित सत्तेविरुद्ध चाललेलें बंडही त्यांत होतें असें आपल्याला आतां दिसेलच. हा सगळा नुसता गोंधळ आहे असें वाटतें, नव्हे? खरेंच आहे; या सर्व धुमाकुळाचा इतिहास गुंतागुंतीचा आणि भानगडीचाच आहे. परंतु त्यांतही मोठे मोठे प्रसंग आणि चळवळी यांचें जर आपण निरीक्षण केलें, तर या धुमाकुळीचीही कांहीं थोडीशी स्पष्ट कल्पना आपल्याला येऊं शकेल.

यांत पहिली गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही, कीं शेतकरीवर्गाची फारच खालावलेली आणि दैन्यमय हालाची अवस्था झालेली असून त्याचा परिणाम म्हणून शेतकऱ्यांचीं युद्धें चालू झालेलीं होतीं. दुसरी गोष्ट आपण लक्षांत ठेवावयाची म्हणजे धनिकवर्गाचा उदय होऊन उत्पादनाच्या शक्ती वाढल्या होत्या. निरनिराळ्या वस्तू निर्माण करण्यासाठीं अधिकाधिक मजूर लावले जात होते आणि व्यापारउदीम वाढूं लागला होता. तिसरी गोष्ट लक्षांत ठेवावयाची म्हणजे ख्रिस्ती धर्मपीठ हेंच सगळ्यांत मोठ्यांत मोठें जमीनमालक-सरंजामदार झालेलें होतें. अशा रीतीनें जमिनीमध्यें धर्मपीठाचे प्रचंड हितसंबंध गुंतलेले असल्यामुळें सरंजामशाही अशीच चालू राहावी असें करण्याच्या पक्षालाच धर्मपीठ स्वाभाविकपणें फार मोठ्या प्रमाणावर वळलेलें होतें. ज्यामुळें धर्मपीठाची पुष्कळशी संपत्ति आणि मालमत्ता नाहींशी झाली असती, असा कोणताही आर्थिक फेरबदल घडून आलेला धर्मपीठाला नको होता. त्यामुळें रोममध्यें जेव्हां धार्मिक बंड उभें राहिलें तेव्हां त्याचा यूरपांतलि आर्थिक क्रांतीशीं चांगलाच जोड जमला.

या आर्थिक क्रांतीच्या सोबतच किंवा तिच्या पाठीमागें लगोलग सामाजिक, धार्मिक, राजकीय बाबतींत हरएक दिशेनें फेरबदल घडून आले. जरा दूर अंतरावरूनच सोळाव्या आणि सतराव्या शतकांतील यूरप खंडाच्या जास्तींत जास्त भागावर एकदम जर तूं नजर टाकलीस, तर या काळांतील त्या सर्व घडामोडी आणि चळवळी आणि हालचाली या कशा सर्व एकसूत्री आणि परस्परांशीं निगडित होत्या हें तुला दिसून येईल. इतिहासामध्यें सामान्यतः त्या काळच्या तीन मोठ्या चळवळींवर भर देण्यांत येत असतो. ज्ञान व कला यांचें पुनरुज्जीवन (रेनेसान्स); धार्मिक सुधारणा (रेफर्मेशन) आणि क्रांति (रेव्होल्यूशन). परंतु या सर्वांच्या पाठीमागें आर्थिक दैन्यावस्था आणि बंडाळी होती हें तूं नीट लक्षांत ठेव. त्यांतूनच आर्थिक क्रांति घडून आली आणि तीच या सर्व फेरबदलांत सर्वांत अधिक महत्त्वाची होय.

रेनेसान्स म्हणजे ज्ञानाचें पुनरुज्जीवन; यूरपीयन देशांमध्यें कला, शास्त्रें, वाङ्मय

आणि भाषा यांच्यामध्यें झालेली वाढ. रेफर्मेशन म्हणजे रोमन धर्मपीठाविरुद्ध झालेलें बंड; एका दृष्टीनें हें धर्मपीठाच्या अनाचाराविरुद्ध लोकांचें बंड होतें; दुसऱ्या दृष्टीनें हें पोपचा जो सर्व राजामहाराजांवर अधिकार चालविण्याचा प्रयत्न सुरू होता, त्याविरुद्ध राजामहाराजांनीं केलेलें बंड होतें; तर आणखी एका दृष्टीनें धर्मपीठाची सुधारणा करण्यासाठीं हा एक आंतल्या बाजूनेंच झालेला प्रयत्न होता. रेव्होल्यूशन म्हणजे धनिकवर्गाचा राजाची सत्ता नियंत्रित करून त्याच्यावर आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठीं झालेला राजकीय झगडा.

या सर्व चळवळींच्या पाठीमागें आणखी एक कारण होतें; तें म्हणजे छापण्याची कला. कागद तयार करण्याची कला प्रथम आरब लोक चिनी लोकांपासून शिकले व नंतर या आरबांपासून यूरप खंडांत ती कला आली हें तुझ्या लक्षांत असेलच. परंतु कागद भरपूर आणि स्वस्त मिळूं लागण्यास मात्र फार काळ लागला. पंधराव्या शतकाच्या अखेरीला यूरपमध्यें निरनिराळया ठिकाणीं, हॉलंड, इटली, इंग्लंड, हंगेरी वगैरे देशांत पुस्तकें छापण्याची सुरुवात झाली. कागद आणि छपाई ही घरोघरची गोष्ट होण्यापूर्वी जगाची काय अवस्था असेल, याचा विचार करून पाहा. पुस्तकें-कागद, छपाई यांची इतकी कांहीं आपल्याला संवय होऊन गेलेली आहे, कीं त्या-शिवायचें जग असेल तरी कसें, याची आपल्याला कल्पना सुद्धां करणें फार कठिण पडतें. छापलेलीं पुस्तकें नसलीं म्हणजे बहुसंख्य लोकांना नुसतें लिहायला आणि वाचायला एवढें शिकविणें हें सुद्धां जवळजवळ अशक्य होतें. अशा काळीं मग ग्रंथांच्या नकला सगळ्या हातानें करण्याचा खटाटोप करावा लागावयाचा; अर्थातच असे ग्रंथ फारच थोड्या लोकांच्या संग्रहाला असावयाचे. शिक्षण स्वाभाविकच तोंडीं व्हावयाचें आणि जें शिकावयाचें तें सर्व पाठ करावें लागावयाचें. हा प्रकार अजूनही तुला कांहीं कांहीं जुन्या पद्धतीच्या मक्तबांमध्यें किंवा पाठशाळांमध्यें चालू असलेला आढळेल.

कागद आणि छपाई हीं येतांक्षणींच फार प्रचंड फेरबदल घडून येतो. छापील पुस्तकें—शालेय आणि इतरही—आतां मिळूं लागतात. लौकरच लिहितां-वाचतां येणारांची संख्या पुष्कळ वाढते. लोक जों जों अधिकाधिक वाचूं लागतात, तों तों ते अधिकाधिक विचारसंपन्न होतात. (अर्थातच हें विधान विचारसंपन्न पुस्तकांच्या वाचनाला लागू आहे. आजकाल प्रसिद्ध होणाऱ्या पुष्कळशा भिकार पुस्तकांच्या वाचनाला नव्हे.) मनुष्य जों जों अधिकाधिक विचार करूं लागतो, तों तों प्रचलित परिस्थितीचें तो निरीक्षण करूं लागतो, तिच्या गुणदोषांची चर्चा करूं लागतो आणि पुष्कळदां याचा परिणाम म्हणजे मनुष्य प्रचलित अवस्था अमान्यही करूं लागतो. अज्ञानी मनाला नेहमीं फेरफाराचें भय वाटत असतें. अज्ञाताचें त्याला भय वाटतें आणि चालत आलेली चाकोरी कितीही दैन्यवाणी असली, तरी तिलाच तें चिकटून राहतें; परंतु चांगल्या वाचनाबरोबर थोड्याफार प्रमाणांत माणसाचें मन ज्ञानयुक्त होतें आणि माणसाचे डोळे अंशतः तरी उघडतात.

कागद आणि छपाई यांच्या योगानें यूरप खंडाचे डोळे अशा रीतीनें उघडले. या गोष्टीचा फार प्रचंड उपयोग आपण वर विचार करीत असलेल्या त्या मोठमोठ्या चळवळींना झाला. अगदीं प्रारंभीं छापलेल्या पुस्तकांत बायबलच्या निरनिराळ्या भाषांतील आवृत्त्या होत्या. त्यामुळें अद्यापपर्यंत जे पुष्कळ लोक बायबलची लॅटिन आवृत्ति कानानें नुसती ऐकत, परंतु जिचा त्यांना कांहींच अर्थ समजत नसे, अशा पुष्कळ लोकांना आपआपल्या भाषेंत बायबल वाचावयाला मिळूं लागलें. या वाचनामुळें त्यांच्यामध्यें कित्येकदां चांगली विवेचक बुद्धि निर्माण झाली आणि पाद्री लोकांची त्यांना गरज लागत नाहींशी झाली. पाद्री लोकांचें त्यांच्या मनावरील वर्चस्व नाहींसें झालें. शालेय पुस्तकांची पण आतां खूप संख्या वाढली. या वेळेपासून यूरपमधील निरनिराळ्या भाषांची फार झपाट्यानें वाढ झाली असें आढळून येतें. आतांपर्यंत लॅटिन भाषेच्या छायेखालीं या सर्व भाषा खुरटलेल्या होत्या.

या काळचा यूरपचा इतिहास श्रेष्ठ पुरुषांच्या नांवानें नुसता भरून गेलेला आहे. त्यांपैकीं कांहीं कांहींशीं आपली यापुढें गांठ पडणार आहे. कोणतेही देश किंवा खंड जेव्हां प्रगतीला प्रतिबंध करणारें कवच फोडून बाहेर पडतात, तेव्हां ते अनेक दिशांनीं पुढें धांव घेत असतात. यूरपांतही आपल्याला हाच प्रकार आढळून येतो. त्या काळच्या आर्थिक आणि इतर फेरबदलांमुळें या काळच्या यूरपचा इतिहास अत्यंत मनोरंजक आणि बोधप्रद झालेला आहे. याच काळांतील हिंदुस्थानच्या इतिहासाशीं किंवा वाटल्यास चीनच्यासुद्धां इतिहासाशीं या इतिहासाची तुलना करून पाहा. सांगितलेंच आहे मीं तुला, कीं हे दोन्ही देश या काळीं पुष्कळ बाबतींत यूरपच्या पुढें होते. परंतु त्या काळच्या यूरपच्या चैतन्ययुक्त अशा इतिहासाशीं ताडून पाहतां या देशांचा इतिहास किती निष्क्रिय किंवा कर्तृत्वशून्य वाटतो! हिंदुस्थानांत व चीनमध्यें या काळींही मोठे राजे आणि श्रेष्ठ पुरुष आढळतात आणि उच्च दर्जाची संस्कृति आढळते; परंतु त्यांच्यामधील, विशेषतः हिंदुस्थानांतील सामान्य जनता अगदींच तेजहीन आणि निष्क्रिय आढळते. त्यांच्यावर एक जाऊन दुसरे कोणीही राज्यकर्ते आले तरी त्यांचें त्यांना कांहींच वाटत नाहीं; कोणापुढेंही ते मान वांकवितांना आढळतात. त्यांचा सर्व दमच उखडल्यासारखा दिसतो आणि हुकूम मानण्याची त्यांना इतकी संवय लागलेली होती, कीं कोणत्याही सत्तेशीं विरोध मांडण्याचें त्यांचें सामर्थ्यच खलास झालें होतें असें दिसतें. त्यामुळें या देशांचा इतिहास, मधूनमधून जरी त्यांत कांहीं मनोरंजक प्रसंग आले, तरी राजेलोक आणि त्यांच्या दरबारी हकीकती यांनींच बहुतेक सारा भरलेला असून त्यांमध्यें जनतेच्या चळवळींचा कांहीं मागमूस नाहीं. चीनच्या बाबतींत हें विधान सर्वांशानें खरें आहे कीं नाहीं हें मी सांगूं शकत नाहीं; परंतु हिंदुस्थानच्या बाबतींत मात्र गेल्या कितीएक शतकांच्या इतिहासाला हें वर्णन लागू आहे आणि हिंदुस्थानची जी जी कांहीं दुरवस्था या काळांत होत आली किंवा जीं संकटें हिंदुस्थानमध्यें उभीं राहिलीं, त्या सर्वांच्या मुळाशीं आमच्या सामान्य जनतेची ही असमाधानकारक अवस्था आहे.

हिंदुस्थानातील आणखी एक प्रवृत्ति लक्षांत घेतली पाहिजे; ती म्हणजे आमच्या लोकांची नजर सारखी भूतकाळाकडे वळलेली आहे; भविष्यकाळाकडे नव्हे. आम्ही मागें केवढ्या उंचीवर चढलों होतों यांत आमचें लक्ष गुंतलें आहे; यापुढें आपल्याला केवढ्या उंचीवर चढण्याची आशा करावयाची इकडे नव्हे. यामुळें आमचे लोक गतकालच्या आठवणी काढून नुसते हळहळत बसले आणि पुढच्या मार्गावर चालण्याची कांहीं हालचाल करण्याऐवजीं जो कोणी येऊन दमदाटी करील, त्याचे हुकूम पाळीत राहिले! एंकदरींत खोल विचार केला, तर साम्राज्यें जीं टिकतात तीं स्वतःच्या सामर्थ्याच्या बळावर टिकत नसून ज्यांच्यावर तीं सत्ता गाजवीत असतात त्या लोकांच्या गुलामी मनोवृत्तीवरच तीं टिकत असतात.

## ८२

# रेनेसान्स अथवा ज्ञानयुग

५ ऑगस्ट, १९३२

साऱ्या यूरप खंडभर जी ही सगळी धामधूम पसरली आणि लोकांना जे हाल सोसावे लागले त्यांतूनच रेनेसान्सचें, ज्ञानयुगाचें, सुंदर फूल जन्मास आलें. हें फूल उमललें प्रथम इटलीच्या भूमींमध्यें; पण त्याला चैतन्य आणि खतपाणी कितीएक शतकांपूर्वीं होऊन गेलेल्या प्राचीन ग्रीक संस्कृतीपासूनच मिळालें होतें. ग्रीसपासूनच या ज्ञानयुगानें सौंदर्याची भक्ति उचलली; परंतु ग्रीकांची सौंदर्यदृष्टि शारीरिक आकृती-विषयीं विशेष होती. तिच्यामध्यें या ज्ञानयुगानें मानवी मन आणि बुद्धि व चैतन्य यांच्या ठिकाणच्या जास्त मनोवेधक आणि परिणामकारक अशा भावरूप सौंदर्याची भर घातली. ज्ञानयुगाची ही वाढ शहरी वातावरणात झाली; ज्ञानयुगाची जोपासना इटलीच्या उत्तरेकडील शहरांच्या आश्रयानें झाली. विशेषतः फ्लॉरेन्स शहर हें तर ज्ञानयुगाचें प्रारंभींचें माहेरघरच होतें.

फ्लॉरेन्समध्यें यापूर्वींच तेराव्या आणि चौदाव्या शतकांत डांटे आणि पेट्रार्क हे इटालियन भाषेंतील महान् कवी निर्माण होऊन गेले होते. मध्य युगांत फ्लॉरेन्स शहर हें सर्व यूरप खंडाचें आर्थिक व्यवहाराचें मुख्य केंद्रस्थान होतें. मोठमोठे सावकार सगळे त्या ठिकाणीं एकत्र आलेले होते. श्रीमंत लोकांचें तें एक प्रजासत्ताक राज्य होतें; मात्र हे लोक आचरणानें कांहीं फारसे भले लोक नव्हते. आपल्यांतीलच श्रेष्ठ लोकांना पुष्कळदां हे लोक वाईट रीतीनें वागवीत असत. 'चंचल फ्लॉरेन्स', 'मायावी फ्लॉरेन्स' असें नांवच फ्लॉरेन्सला मिळालेलें आहे. अशा रीतीनें या शहरामध्यें सावकार व झोंड आणि जुलमी लोक यांची गर्दी असूनही पंधराव्या

शतकाच्या उत्तरार्धांत त्या ठिकाणीं लिओनार्डो डि व्हिन्सी, मायकेल अँजेलो आणि राफेल हे तीन नामांकित गृहस्थ उदयास आले; हे तिघेही श्रेष्ठ दर्जाचे कलावंत आणि चित्रकार होते. लिओनार्डो आणि मायकेल अँजेलो हे अन्य दृष्टीनेंही श्रेष्ठ होते. मायकेल अँजेलो हा फारच बहाद्दर मूर्तिकार होता; संगमरवरी फत्तरामधून कापून कोरून त्यानें केवढाले प्रचंड पुतळे तयार केले; तसाच तो फार मोठ्या दर्जाचा शिल्पी आणि स्थापत्यशास्त्रज्ञही होता; रोममधील तें भव्य सेंट पीटरचें कॅथेड्रल पुष्कळ अंशीं त्याच्याच योजनेप्रमाणें बांधलेलें आहे. फार म्हातारा होईपर्यंत, जवळजवळ नव्वद वर्षांचा होईपर्यंत, तो जगला आणि अगदीं शेवटीं त्यानें देह टाकला त्या दिवसापर्यंत जवळजवळ तो सेंट पीटरच्या कॅथेड्रलच्या बांधकामावर हजर होता. परंतु मनानें मात्र तो कष्टी, असुखी, होता; सृष्टींत डोळ्यांपुढें दिसणाऱ्या वस्तूंच्या वरवरच्या स्वरूपामागें कांहींतरी असावें असें वाटून त्याच्या शोधासाठीं जन्मभर त्याची धडपड चाललेली होती; सदैव त्याच्या मनांत विचारांची तळमळ चाललेली असे आणि नित्य कांहीं ना काहीं अचाट कार्य करून दाखवावें अशा प्रयत्नांत तो असे. "मनुष्य चित्र काढतो तें डोक्यानें काढीत असतो, हातांनीं नव्हे," असें तो एकदां म्हणाला होता.

लिओनार्डो हा या तिघांत सर्वांत वडील आणि पुष्कळ प्रकारांनीं या सर्वांमध्यें अधिक आश्चर्यकारक मनुष्य होता. आपल्या काळचा तो सर्वांत श्रेष्ठ असा नामांकित गृहस्थ होऊन गेला हें निःसंशय; आणि हें लक्षांत ठेव कीं हा काळ एकंदरच श्रेष्ठ माणसांचा काळ होता; वासरांत लंगडी गाय शहाणी अशांतला कांहीं हा प्रकार नव्हता. लिओनार्डो हा जसा श्रेष्ठ चित्रकार आणि मूर्तिकार होता त्याचप्रमाणें तो एक महान् तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञही होता. प्रत्येक वस्तूचें मूळ स्वरूप, मूळ कारण शोधून काढण्यासाठीं त्याचे नित्य प्रयोग चाललेले असत, नित्य अत्यंत खोल चिंतन चाललेलें असे; अशा रीतीनें आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा पाया घालणाऱ्या महान् शास्त्रज्ञांपैकीं तो अगदीं पहिला शास्त्रज्ञ होऊन गेला. तो म्हणे, "दयाळू निसर्गानें अशी व्यवस्था करून ठेवली आहे कीं जगतांत तुम्ही पाहाल तेथें नवीन कांहीं तरी शिकण्याची तुम्हांला संधि मिळावी." त्याची सगळी विद्या त्यानें केवळ आपल्या स्वतःच्या प्रयत्नानें मिळविलेली होती. तिसाव्या वर्षी त्यानें लॅटिन भाषा आणि गणित यांचा अभ्यास कोणाच्याही मदतीशिवाय स्वतःचा स्वतःच करण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणें यंत्रशास्त्रांतही चांगल्या प्रकारें नैपुण्य मिळवून तो श्रेष्ठ दर्जाचा एंजिनिअरही झाला, आणि शरीरांतील रुधिराभिसरणाचा शोध त्यानें प्रथम लावला. शरीराच्या रचनेवर तो अतिशय मोहून जात असे. तो म्हणे, "अयोग्य आचार करणाऱ्या आणि बुद्धिविहीन अशा रानगट माणसांच्या ताब्यांत मानवी शरीरासारखें इतकें सुंदर यंत्र, इतक्या गुंतागुंतीची शारीरिक साधनसामग्री मुळींच देतां उपयोगी नाहीं. त्यांची तेवढी खरोखर पात्रताच नाहीं. त्यांच्या शरीरांत फक्त अन्न आंत

घेण्याला आणि बाहेर टाकायला एक पिशवी असावी म्हणजे झालें. कारण हीं माणसें म्हणजे केवळ अन्ननलिकाच होत; दुसरी कसलीही त्यांची योग्यताच नाहीं!" लिओनार्डो हा स्वतः शाकाहारी असून प्राण्यांवर त्याचें फार प्रेम होतें. बाजारांत जाऊन पिंजऱ्यांत कोंडलेले पक्षी खरेदी करावयाचे आणि ते ताबडतोब सोडून द्यावयाचे असा त्याचा नित्याचा क्रम होता.

लिओनार्डोचा सगळ्यांत अचंबा वाटण्याजोगा प्रयत्न म्हणजे तो हवेंत उडण्याचा प्रयत्न. या प्रयत्नांत त्याला यश आलें नाहीं; परंतु यशाच्या मार्गावर त्यानें याही बाबतींत पुष्कळच प्रगति केली होती. परंतु त्याची उपपत्ति आणि प्रयोग यांचा फायदा घेऊन हें काम पुढें चालू ठेवायला कोणीच मिळालें नाहीं. लिओनार्डोच्या पाठीमागें त्याच्याचसारखे आणखी दोन जरी लिओनार्डो निघते, तरी आधुनिक जगांतील हवाई जहाज—विमान—२००-३०० वर्षांपूर्वींच शोधून काढण्यांत आलें असतें. हा लोकविलक्षण आणि महान् श्रेष्ठ पुरुष इ. स. १४५२ पासून १५१९ पर्यंत होऊन गेला. त्याचें सगळें आयुष्य म्हणजे "निसर्गाशीं संभाषणच होतें" असें म्हटलें जातें. नित्य तो नवे नवे प्रश्न उपस्थित करीत असे आणि प्रयोग करून त्या प्रश्नांचीं उत्तरें शोधून काढण्याचा प्रयत्न करीत असे. एकसारखी त्याची पुढें उडी असे; भविष्यकाळ हातांत पकडण्यासाठीं त्याची धडपड असे.

फ्लॉरेन्सच्या या तीन गृहस्थांविषयीं लिहितांना लिओनार्डोबद्दल मीं विशेष अधिक लिहिलें आहे; कारण तो माझा एक आवडता पुरुष आहे. फ्लॉरेन्सच्या या प्रजासत्ताक राज्याचा इतिहास विशेषसा आनंददायक किंवा अभिमान वाटण्यासारखा नाहीं; कारण त्यांत कपटकारस्थानें, जुलमी अधिकारी आणि लुच्चे राजे यांचेंच सारें भरताड आहे. पण असें असूनही फ्लॉरेन्सनेंच या अनेक श्रेष्ठ पुरुषांना जन्म दिला यासाठीं फ्लॉरेन्सचें पुष्कळसें पाप आपण माफ केलें पाहिजे; त्या शहरांत सावकारांना स्थान मिळालेलें होतें इकडे सुद्धां आपण दुर्लक्ष केलें पाहिजे. फ्लॉरेन्सच्या या श्रेष्ठ सुपुत्रांची सांवली आजही या शहरावर आहे; या सुंदर शहराच्या रस्त्यावरून चालत असतां अथवा शहराच्या बाजूनें आपल्या अनेक मध्ययुगीन पुलांखालून वाहत जाणाऱ्या आर्नो नदीवर नजर टाकली असतां आपण एक प्रकारें जादूनें भारल्यासारखे होऊन जातों आणि भूतकाळच चालताबोलता आणि स्पष्ट असा आपल्यापुढें उभा आहेसें वाटतें. डांटे आपल्या समोरून जातो आहे, तशीच त्याची प्रिया बिआट्रिस हीही आपल्या पाठीमागें आपल्या मधुर सुवासाचा मंदप्रवाह दरवळीत आपल्यापुढून जात आहे असा भास होतो; आणि असें वाटतें, कीं तो पहा तो लिओनार्डोच विचारांत गढून गेलेला आहे, आणि निसर्ग आणि जीवन यांच्या गूढांबद्दल विवंचना करीत शहराच्या अरुंद रस्त्यावरून झपाझप चाललेला आहे.

अशा रीतीनें पंधराव्या शतकापासून इटलींत ज्ञानयुगाला बहर आला आणि तेथून पश्चिमेकडील इतर देशांकडे हा बहर पुढें पुढें पसरत गेला. मोठे मोठे कलावंत

दगड आणि पडदे यांच्यामध्यें जीव ओतूं लागले, चैतन्य निर्माण करूं लागले, त्यांच्या चित्रांनीं आणि मूर्तींनीं यूरप खंडांतील वस्तुसंग्रहालयें आणि चित्रसंग्रह गच्च भरून गेलेले आहेत. इटलीमध्यें मात्र सोळाव्या शतकाच्या अखेरीस कलाच्या पुनरुज्जीवनाला ओहोटी लागली. सतराव्या शतकांत हॉलंड देशात महान् चित्रकार उदयास आले; त्यांमध्यें रेम्ब्रांट हा सर्वांत अधिक प्रख्यात आहे. स्पेनमध्येंही याच सुमारास व्हेलास्क्वेझ हा विख्यात चित्रकार होऊन गेला; पण जास्त नांवें मी तुला सांगत बसत नाहीं. कारण अशी ही यादी फारच मोठी होईल. हे श्रेष्ठ चित्रकार व मूर्तिकार कोणकोण होते हें पाहावेंसें तुला वाटलें, तर जरूर निरनिराळ्या संग्रहालयांतून जाऊन तूं त्यांच्या कलाकृती पाहा. त्यांच्या नुसत्या नांवांमध्यें कांहीं अर्थ नाहीं. आपल्या ठिकाणीं जर कांहीं नवीन चैतन्य किंवा नवा विचार किंवा सुखसंवेदना निर्माण व्हावयाची असेल, तर ती त्यांच्या कलेतून आणि त्यांनीं निर्माण केलेल्या सौंदर्यांतूनच होणारी आहे; नुसत्या नांवांतून नव्हे.

याच काळांत, पंधरा ते सतराव्या शतकांमध्यें, शास्त्रीय ज्ञानानेंही हळूहळू प्रगति केली आणि त्याला एक मानाचें स्थान प्राप्त झालें. शास्त्रीय ज्ञानाचा धर्मपीठाशीं चांगलाच तीव्र झगडा झाला. लोकांनीं विचार करावा, प्रयोग करावे, या गोष्टीवर धर्मपीठाची श्रद्धा नव्हती. धर्मपीठाच्या कल्पनेप्रमाणें ही पृथ्वी हाच सगळ्या विश्वाचा मध्यबिंदु असून सूर्य हा त्याभोंवतीं फिरतो आणि तारे व चांदण्या आकाशामध्यें कायमच्याच एका एका जागीं बसविलेल्या आहेत, असें होतें. याहून निराळें जो कोणी बोलेल तो धर्मभ्रष्ट; इन्क्विझिशनच्या कोर्टाकडूनही त्याची चौकशी होण्याला तो पात्र. असें असूनही पोलंडमधील एक रहिवासी कोपरनिकस यानें धर्मपीठाची ही कल्पना अमान्य केली आणि पृथ्वीच सूर्याभोंवतीं फिरत असते ही गोष्ट सिद्ध केली. अशा रीतीनें विश्वासंबंधींची आधुनिक जगाची जी उपपत्ति आहे, तिचा पाया कोपरनिकसनें घातला. हा इ. स. १४७३ पासून १५४३ पर्यंत होऊन गेला. त्याच्या या क्रांतिकारक आणि अधर्मी विचारामुळें धर्मपीठाचा त्याच्यावर खरें म्हणजे राग व्हावयाचा; परंतु कसा तरी तो त्यापासून बचावला. त्याच्यामागून आलेल्यांचें नशीब मात्र इतकें शिकंदर नव्हतें. ज्योर्डानो ब्रूनो या इटालियन गृहस्थाला, पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते आणि तारे हेही स्वतंत्र सूर्यच आहेत असा आग्रह धरल्याबद्दल इ. स. १६०० मध्यें जिवंत जाळण्यांत आलें. त्याचाच समकालीन, दुर्बिणीचा शोध लावणारा गॅलिलियो याच्यावरही धर्मपीठानें तीच पाळी आणली होती; पण तो ब्रूनोपेक्षां दुर्बळ ठरला. मरण्यापेक्षां आपलें मतच परत घेणें बरें, असें त्यानें ठरविलें. म्हणून त्यानें धर्मपीठापुढें असें कबूल केलें, कीं "आपली चूक झाली; पृथ्वी हीच खरोखर सर्व विश्वाचा मध्यबिंदु असून सूर्य हाच तिच्या भोंवतीं फिरत असतो." इतकें सगळें करूनसवरूनसुद्धां त्याला तुरुंगांत राहून आपल्या पापाचें प्रायश्चित्त भोगावेंच लागलें.

सोळाव्या शतकातील प्रमुख शास्त्रज्ञांत हार्वे नावाचा एक शास्त्रज्ञ होऊन गेला. त्यानें अखेरीस रुधिराभिसरणाचा सिद्धांत प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविला. सतराव्या शतकामध्यें आपल्यापुढें शास्त्रीय जगतांतील एका अत्यंत श्रेष्ठ गृहस्थाचें नांव येतें; हा गृहस्थ म्हणजे ऐझाक न्यूटन हा होय. हा जसा शास्त्रज्ञ होता, तसाच मोठा गणितीही होता. ज्याला आपण गुरुत्वाकर्षणाचा नियम म्हणतों त्याचा — वस्तू अधांतरींच न राहतां खालीं कां पडतात याचा — त्यानें शोध लावला आणि त्यायोगें सृष्टीच्या उदरांतील एक रहस्य बाहेर काढलें.

ही शास्त्राबद्दलची हकिकत झाली. मग ती थोडी म्हण नाहीं तर पुष्कळ म्हण. या काळात वाङ्मयाची पण जोरानें प्रगति झाली. वातावरणांत जें नवीन चैतन्य निर्माण झालें होतें त्याचा नवीनचपणांत येऊं लागलेल्या यूरपीय भाषांवर फारच मोठ्या प्रमाणांत परिणाम झाला. या भाषा कांहीं अगदींच काल-परवां जन्माला आलेल्या होत्या असें नव्हे. जगांत कांहीं काळ त्या नांदत आलेल्या होत्या एवढेंच नव्हे, तर इटलींत यापूर्वीच महान् कवी त्या देशांतील भाषेंत निर्माण झालेले होते. इकडे इंग्लंडमध्यें चॉसर होऊन गेला होता. परंतु लॅटिन हीच सगळ्या शिक्षित लोकांची आणि धर्मपीठांची भाषा सर्व यूरपभर अजून होती आणि तिच्यापुढें या बाकीच्या सर्व भाषांचें तेज अगदींच फिकें पडत होतें. अजून त्यांचें स्वरूप ग्रामीण भाषांचें होतें; म्हणजे इंग्रजी भाषेंत ज्यांना व्हर्नाक्युलर्स म्हणतात, आणि जें नांव हिंदुस्थानांतील भाषांना आजही देण्याचें चमत्कारिक शहाणपण कांहीं लोक करीत असतात, तशा त्या भाषा होत्या. या भाषांत लिहिणें म्हणजे एक प्रकारें मोठेपणाला न शोभेसें समजलें जाई. परंतु वातावरणांतील तें नवें चैतन्य, तसेंच कागद व छपाई यांनीं या भाषांना जोरानें पुढें लोटलें. इटालियन भाषा प्रथम पुढे आली; तिच्या मागून फ्रेंच, इंग्रजी आणि स्पॅनिश भाषा या पुढें सरसावल्या आणि सगळ्यांच्या शेवटीं जर्मन भाषा. फ्रान्समध्यें तरुण ग्रंथकारांच्या एका गटानें आपल्या स्वतःच्या भाषेंतच लिहावयाचें, लॅटिनमध्यें लिहावयाचें नाहीं आणि आपली ग्रामीण भाषा इतकी सुधारावयाची कीं तिच्यामध्यें उत्तमोत्तम साहित्य लिहिलें जाण्याचें सामर्थ्य आलें पाहिजे, असा निश्चयच केला होता.

अशा रीतीनें यूरपांतील भाषांची प्रगति होत गेली; त्याच्यांतील संपन्नता आणि सामर्थ्य वाढत गेलें आणि आजकाल त्या केवढ्या सुंदर भाषा होऊन राहिल्या आहेत. उगीच खंडीभर प्रख्यात ग्रंथकारांची यादी मीं तुला देत बसत नाहीं. अगदीं नमुन्यापुरतीं थोडीं नांवें तुला सांगतों. इंग्लंडमध्यें सुविख्यात शेक्स्पिअर या काळांत झाला; त्याचा काळ इ. स. १५६४ ते १६१६. त्याच्या पाठोपाठच तेथें सतराव्या शतकांत **पॅरेडाइझ लॉस्ट**चा आंधळा कवि मिल्टन हा होऊन गेला. फ्रान्समध्यें डेस्कार्टीस हा तत्त्वज्ञानी आणि मोलिअर हा नाटककार, दोघेही सतराव्या शतकांत होऊन गेले. पॅरिसमधील भव्य सरकारी नाटकगृह **कॉमेडी फ्रँकेज** हें मोलिअरनेंच स्थापन केलें

स्पेनमध्यें शेक्स्पिअरचा समकालीन सरव्हांटीस हा होता; त्यानें डॉन क्विक्झोट ही प्रसिद्ध कथा लिहिलेली आहे.

आणखी एका गृहस्थाचें नांव मी सांगणार आहें तें तो गृहस्थ खरोखर श्रेष्ठ होता म्हणून नव्हे, तर त्याचें नांव फार प्रसिद्धीला आलेलें आहे म्हणून. हा मनुष्य म्हणजे मॅकिव्हॅली. हाही फ्लॉरेन्सचाच राहणारा होता. पंधराव्या-सोळाव्या शतकांतला हा एक केवळ राजकारणी गृहस्थ होता. परंतु त्यानें लिहिलेलें 'दि प्रिन्स' हें पुस्तक फार प्रसिद्धीला आलेलें आहे. त्या काळच्या राजे लोकांच्या आणि राजकारणी पुरुषांच्या मनोभूमिकेचें या पुस्तकावरून आपल्याला थोडेंसें ओझरतें दर्शन होऊं शकतें. मॅकिव्हॅली म्हणतो कीं राज्याला धर्माची गरज आहे; पण लक्षांत ठेव आं नीट, ही गरज लोकांनीं सद्वर्तनी व्हावें यासाठीं त्याला वाटत नाहीं; तर लोकांवर राज्यकारभार चालविण्याला धर्माचा उपयोग होतो आणि लोक त्यामुळें दबून राहतात म्हणून! स्वतःला जरी धर्म असत्य वाटत असला तरी सुद्धां त्याला पाठिंबा देणें हें राजाचें त्याच्या मतें कर्तव्यच ठरतें. मॅकिव्हॅली लिहितो, "राजाला एकाच वेळीं मनुष्य आणि पशु, सिंह आणि कोल्हा अशा दोन्ही भूमिका वठवितां आल्या पाहिजेत. दिलेला शब्द पाळल्यामुळें जर आपल्या हिता-विरुद्ध परिणाम होत असेल तर त्यानें तो शब्द पाळण्याचें कारण नाहीं; किंबहुना, तसा तो पाळणें त्याला शक्यच होणार नाहीं. मी तर असेंही म्हणण्याचें धाडस करतों कीं नेहमींच अगदीं प्रामाणिकपणानें राहणें हें मोठें गैरफायद्याचें होणारें आहे. उलट पक्षीं धार्मिक, श्रद्धाळू, दयाळू आणि भक्तिमान्, कर्मठ आपण आहों असा नुसता बाहेरून भास उत्पन्न करणें हें मात्र फार उपयोगाचें आहे. सद्गुणाच्या बाह्य देखाव्या-इतकी दुसरी कोणतीही गोष्ट उपयुक्त नाहीं."

किती दुष्ट विचार आहेत नव्हे हे? त्याच्या मतें जितका मनुष्य अधिक पाजी, तितका तो राजा व्हायला अधिक लायक! त्या काळच्या यूरप खंडामध्यें सर्वसामान्य-पणें राजे लोकांच्या मनोभूमिकेची जेथें ही अवस्था होती, तेथें त्या खंडांत एकसारखा बेबंदशाही धुमाकूळ माजून राहिला होता यांत कांहींच आश्चर्य नाहीं. पण इतक्या दूरच्या काळांत तरी कशाला जायला हवें? आजचीं साम्राज्यशाही राज्यें सुद्धां पुष्कळशीं या मॅकिव्हॅलीच्या राजाप्रमाणेंच वागतात कीं. त्यांचाही बाहेरचा देखावा सदाचरणा-चाच असतो; पण त्याच्या आंत लोभ, क्रूरपणा आणि न्याय-अन्याय याबद्दलची पूर्ण बेफिकिरी याच गोष्टी असतात; वरच्या संस्कृतीच्या हातमोजाच्या आंत हिंस्र पशूच्या रक्तानें माखलेला पंजाच त्यांच्याहि ठिकाणीं आढळतो.

## ८४
# प्रॉटेस्टंट लोकांचें बंड आणि शेतकऱ्यांचीं युद्धें

८ ऑगस्ट, १९३२

पंधरा ते सतराव्या शतकापर्यंतच्या यूरप खंडाबद्दल मीं आतांपर्यंत तुला कित्येक पत्रें लिहिलीं आहेत. मध्ययुगाचा अंत, शेतकरीवर्गाची अत्यंत दैन्यावस्था, धनिक-वर्गाचा उदय, अमेरिका खंड आणि पूर्वेकडे जाण्याचे जलमार्ग यांचा शोध, यूरप खंडांतील कला, शास्त्रें आणि भाषा यांची प्रगति यांबद्दल आतांपर्यंत कांहीं कांहीं मीं तुला सांगितलेलें आहे; परंतु या काळच्या चित्राची संपूर्ण रूपरेखा द्यावयाची म्हटली, तर अजून पुष्कळच सांगावयाला हवें आहे. माझीं या मागचीं दोन पत्रें, तसेंच जल-मार्गांच्या शोधाबद्दलचें माझें पत्र, आज आतां लिहितों आहे तें हें पत्र आणि बहुधा यापुढचीं आणखीं एकदोन पत्रें हीं सगळीं यूरप खंडांतील या काळाबद्दलचींच आहेत हें लक्षांत घे. निरनिराळ्या चळवळी आणि घडामोडींबद्दल मी वेगळेंवेगळें लिहीत आहे; परंतु या सर्व चळवळी आणि घडामोडी सामान्यतः एकाच काळांत झालेल्या असून त्यांचा एकमेकांवर परिणामही घडून आलेला आहे.

ज्ञानयुगाचा आरंभ होण्यापूर्वीपासूनच रोमन धर्मपीठामध्यें आतल्या आंतच कुरबूर सुरू झालेली होती. यूरपांतील राजेलोक आणि सामान्य प्रजा दोघांनाही धर्मपीठाच्या जाचक सत्तेचें ओझें जाणवूं लागून ते तक्रार करूं लागले होते. कां हें ओझें मानावें, असा संशयही त्यांच्या मनांत उत्पन्न होऊं लागला होता. आठवतच असेल तुला, कीं बादशहा दुसरा फ्रेडरिक यानें तर पोपबरोबर चांगलाच वाद घातला होता आणि धार्मिक बहिष्कारालाही त्यानें दाद दिली नाहीं. संशय आणि अवज्ञा यांच्या या लक्षणामुळें राग येऊन या नवीन धर्मभ्रष्टतेचा चक्काचूर करून टाकावयाचा असा रोमन धर्मपीठानें निश्चय केला. याच उद्देशानें तीं इन्क्विझिशनचीं न्यायासनें निर्माण करण्यांत आलीं आणि सगळ्या यूरपभर कितीएक बिचाऱ्या निरपराध पुरुषांना धर्मभ्रष्ट — पाखंडी — ठरवून आणि स्त्रियांवर चेटकी असल्याचा आरोप ठेवून त्यांना जिवंत जाळण्यांत आलें. प्राग येथील हस याला लबाडीनें घेरण्यांत आलें व जाळण्यांत आलें आणि त्यानंतर हसाईट लोकांनीं, म्हणजे हसच्या बोहेमियांतील अनुयायांनीं, बंडाचें निशाण उभारलें. इन्क्विझिशननें वाटेल ते भयभीत करण्यासारखे प्रकार केले, तरीसुद्धां रोमन धर्मपीठाविरुद्ध निर्माण झालेल्या या बंडाच्या प्रवृत्तीचा बीमोड होऊं शकला नाहीं. ही प्रवृत्ति वाढतच गेली आणि धर्मपीठ हें एक मोठाथोरला जमीनदारच असल्यामुळें त्याच्याविरुद्ध शेतकऱ्यांमध्यें जी चीड उत्पन्न झालेली होती, तिचीही त्या प्रवृत्तींत भरच पडली. तसेंच पुष्कळ ठिकाणच्या राजेलोकांनींही स्वार्थी बुद्धीनें या बंडखोरीला प्रोत्साहनच दिलें. त्यांची मत्सरी, लोभी आणि पापी नजर धर्म-

पीठाच्या प्रचंड मालमत्तेकडे लागून राहिलेली होती. याच वेळीं छपाई सुरू होऊन पुष्कळ ग्रंथ आणि बायबलचीं भाषांतरें बाहेर पडलीं. या गोष्टीमुळें या धुमसत्या आगींत तेलच ओतल्यासारखें झालें.

अशा वेळीं सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला जर्मनींत मार्टिन लूथर हा जन्मास आला. हाच पुढें रोमन धर्मपीठाविरुद्ध झालेल्या महान् बंडाचा पुढारी व्हावयाचा होता. मार्टिन लूथर हा स्वतः एक पाद्री होता. त्यानें जेव्हा रोम येथील धर्मपीठांत समक्ष जाऊन तेथील ते अनाचार, लांचलुचपत आणि चैन पाहिली, तेव्हां त्याला अत्यंत तिटकारा आला. याबद्दलचाच तंटा माजून तो इतका वाढला, कीं त्यांतून रोमन धर्मपीठांत फूट होऊन दोन निरानिराळे विभाग झाले आणि पश्चिम यूरप खंडाचे धार्मिक आणि राजकीयही दृष्ट्या दोन परस्पर-विरोधी गट पडले. रशियांतील जुनें सनातन ग्रीक धर्मपीठ आणि यूरपचा पूर्वेकडील भाग हे या वादापासून अलिप्त राहिले होते आणि रोमच्या धर्मपीठाचाच जर विचार केला, तर तें स्वतः खऱ्या ख्रिस्ती धर्मविचारापासून खरोखर किती तरी वेगळें पडलेलें होतें.

अशा रीतीनें प्रॉटेस्टंट लोकांचें बंड उभें राहिलें. या लोकांना प्रॉटेस्टंट म्हणत याचें कारण या लोकांनीं रोमन धर्मपीठाच्या कित्येक अचल धर्मसिद्धांतांना विरोध केला. या काळापासून पश्चिम यूरप खंडांत ख्रिश्चन धर्माचे दोन मुख्य पंथ होऊन राहिले आहेत. एक रोमन कॅथॉलिक आणि दुसरा प्रॉटेस्टंट; परंतु या प्रॉटेस्टंट लोकांमध्यें अनेक उपपंथ आहेत.

धर्मपीठाविरुद्ध ही जी चळवळ झाली तिलाच रेफर्मेशन किंवा धर्मसुधारणेची चळवळ असें म्हणतात. धर्मपीठाची सर्वाधिकारशाही आणि त्यामधील अनाचार याविरुद्ध हें मुख्यतः सर्वसामान्य प्रजेचें बंड होतें. या बरोबरच कित्येक राजेलोकांच्या मनांतून पोपचे जे आपल्यावरही अधिकार गाजविण्याचे प्रयत्न चालले होते, त्यांना खो द्यावा असेंही होतें. पोपनें आपल्या राजकीय कारभारांत ढवळाढवळ करावी या गोष्टीची त्यांना मनस्वी चीड आलेली होती. या धर्मसुधारणेच्या—रेफर्मेशनच्या—चळवळीचें आणखीही एक अंग होतें. तें म्हणजे कांहीं निष्ठावंत धर्मपीठाच्या सेवकांनीं—पाद्र्यांनीच—धर्मपीठांतील दोषांची आंतूनच सुधारणा करण्याचा चालविलेला प्रयत्न हें होय.

ख्रिस्ती धर्मपीठांतर्गत दोन मोठे संघ होते; एक फ्रान्सिस्कन संघ व दुसरा डॉमिनिकन संघ हे तुला आठवतच असतील. सोळाव्या शतकामध्यें मार्टिन लूथरचें सामर्थ्य वाढूं लागलें होतें, त्या सुमारास लोयोला येथील इग्नेशियस नांवाच्या स्पॅनिश गृहस्थानें आणखी एक संघ काढला. त्यानें या संघाचें नांव **सोसायटी ऑफ जीझस** जीझसचा संघ असें ठेवलें. या संघाच्या सभासदांना जेसुईट असें म्हणण्यांत येऊं लागलें. हे जेसुईट लोक चीनमध्यें आणि पूर्वेकडील प्रदेशाकडे आलेले होते हें मीं मागें सांगितलेंच आहे. हा जीझसचा संघ ही एक मोठी विलक्षण संस्था आहे. रोमन धर्मपीठ आणि पोप यांची सेवा करण्यासाठीं सर्वच्या सर्व आयुष्य वेंचणारे लोक

तयार करणें हा या संघाचा उद्देश होता. त्यांची शिकवणूक फार कडक असे आणि तींतून अत्यंत कर्तबगार आणि निष्ठावंत असे धर्मपीठाचे सेवक तयार होत असत. त्यांची धर्मपीठावर इतकी कांहीं श्रद्धा – निष्ठा – असे, कीं त्याच्या आज्ञा अगदीं डोळे झांकून निमूटपणें असें कां, तसें कां असा कांहीं विचार न करतां ते पाळीत असत आणि आपलें सर्वस्व धर्मपीठाला देऊन टाकीत असत. धर्मपीठाचा फायदा होईल अशी कोणतीही गोष्ट असली, तर तिच्यासाठीं ते हौसेनें वाटेल तो स्वार्थत्याग करावयाला तयार असत ; एवढेंच नव्हे, तर धर्मपीठाचें कार्य साधण्यासाठीं ते न्याय-अन्यायाचीही फिकीर करीत नसत. वाटेल तें पापकर्म करायलाही मागेंपुढें पाहत नसत अशीही त्यांची कीर्ति आहे. धर्मपीठाचें हित झालें म्हणजे झालें ; मग त्यासाठीं कांहीं केलें तरी तें न्याय्य आणि क्षम्य होय, अशी त्यांची विचारसरणी होती.

या विलक्षण धर्मसंघाचा रोमन धर्मपीठाला सर्वांत अधिक उपयोग झाला. या धर्मपीठाचें नांव आणि धर्मविचार त्यांनीं लांबलांबच्या देशांत तर पसरविलेच ; पण त्याशिवाय त्यांनीं खुद्द यूरप खंडामध्येंही या धर्मपीठाचा दर्जा वाढविला. कांहीं अंशीं आंतल्या बाजूनेंच सुधारणेचा प्रयत्न सुरू होता म्हणून आणि पुष्कळ अंशीं प्रॉटेस्टंट लोकांच्या बंडाचें संकट डोळ्यांपुढें होतें म्हणून रोमन धर्मपीठांतील अनाचार पुष्कळच कमी होत गेला. अशा रीतीनें रेफर्मेशननें – धर्मसुधारणेच्या चळवळीमुळें – ख्रिस्ती धर्मामध्यें बाह्यतः जसे दोन पंथ पडले, त्याचप्रमाणें कांहीं अंशीं त्यामध्यें अंतर्गत सुधारणाही त्यामुळें झाली.

प्रॉटेस्टंट लोकांचें बंड जसें वाढत गेलें, तसे यूरप खंडांतील राजेरजवाडे, कांहीं या पक्षाला तर कांहीं त्या पक्षाला जाऊन मिळाले. त्यामध्यें त्यांचा कांहीं धार्मिक असा उद्देश मुळींच नव्हता. बहुतांशीं राजकारण आणि अर्थलाभ यांचाच प्रश्न त्यांच्या मनांत या कामीं प्रमुख होता. पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा त्या वेळीं हॅप्सबर्ग घराण्यांतील पांचवा चार्ल्स हा होता. त्याचा बाप आणि आजा यांच्या लग्नामुळें तो आतां ऑस्ट्रिया, जर्मनी ( नांवापुरतातरी ), स्पेन, नेपल्स व सिसिली, नेदरलंड्स आणि स्पॅनिश-अमेरिका एवढ्या प्रचंड साम्राज्याचा वारस झालेला होता. विवाह करून त्यायोगें आपल्या राज्याच्या प्रदेशांत भर घालावयाची ही एक त्या काळच्या राजाची मोठी आवडती पद्धति होती. अशाच रीतीनें चार्ल्स राजाच्या अंगच्या कांहीं कर्तबगारीमुळें नव्हे, तर या विवाहसंबंधामुळें त्याचा अर्ध्या यूरपवर अम्मल चालू होता आणि कांहीं काळ तो एक मोठा श्रेष्ठ पुरुष म्हणून गणला जात होता. त्यानें प्रॉटेस्टंट लोकांविरुद्ध पोपचा पक्ष घेण्याचें ठरविलें. धर्मसुधारणेची कल्पना ही साम्राज्याच्या कल्पनेशीं जुळणारी नव्हती ; परंतु जर्मनीमधील पुष्कळशा छोटया छोटया राजांनीं मात्र प्रॉटेस्टंट लोकांचा पक्ष घेतला आणि त्यामुळें जर्मनींत जिकडे तिकडे रोमन धर्मपीठाचा आणि लूथरचा असे दोन तट पडले. याचा परिणाम स्वाभाविकच जर्मनींत यादवी निर्माण होण्यांत झाला.

इंग्लंडमध्यें एकामागून एक अनेक लग्नें करण्यासाठीं प्रसिद्ध असलेला आठवा हेन्री राजा यानें पोपच्या विरुद्ध जाऊन प्रॉटेस्टंट लोकांचा पक्ष अथवा खरें म्हटलें म्हणजे स्वतःच्या खास हितसंबंधाचा पक्ष त्यानें घेतला. धर्मपीठाच्या मालमत्तेचा त्याला लोभ सुटलेला होता; म्हणून रोमशीं संबंध तोडून टाकल्यानंतर त्यानें इंग्लंड-मधील ॲबे, मोनास्टरी आणि चर्चें यांचा, म्हणजे एकूणएक धर्मसंस्थांचा, अत्यंत संपन्न असा जमीनजुमला जप्त करून टाकला. पोपशीं संबंध तोडून टाकण्यांत आणखी एक अगदीं वैयक्तिक कारण त्याला असें होतें, कीं हेन्रीच्या मनांतून आपल्या बायकोशीं काडीमोड करून दुसऱ्या एका स्त्रीशीं लग्न करावयाचें होतें.

फ्रान्समध्यें मात्र मोठीच चमत्कारिक अवस्था झाली. या वेळीं येथील राजांचा मुख्य मंत्री सुप्रसिद्ध कार्डिनल रिचिलियो हा असून खरोखर तोच सगळा राज्यकारभार चालवीत होता. रिचिलियोनें फ्रान्सला रोमन धर्मपीठ आणि पोप यांच्या बाजूस ठेवलें आणि प्रॉटेस्टंट लोकाना या देशांत चुरडून टाकलें; परंतु राजकारणाच्या लटपटी किती विचित्र असतात पाहा! याच रिचिलियोनें जर्मनींत मात्र प्रॉटेस्टंट पक्षाला प्रोत्साहन दिलें; हेतु असा, कीं जर्मनींत त्यामुळें यादवी होऊन तो देश दुर्बळ व्हावा व तेथील एकी नष्ट व्हावी! जर्मनी आणि फ्रान्स यांच्यामधील या वैराचा धागा यूरपखंडाच्या साऱ्या इतिहासपटांत अखंड आणि सतत चालत आलेला आहे.

लूथर हा स्वतः मोठा प्रॉटेस्टंट असून रोमन धर्मपीठाच्या अधिकाराला त्यानें विरोध केला. तरी पण धर्माच्या बाबतींत तो स्वतः उदारमतवादी होता असें मात्र समजूं नकोस. ज्या पोपशीं तो झगडत होता, त्या पोपइतकाच तो धर्माच्या बाबतींत कडवा, अनुदार होता. या कारणानें यूरपमध्यें धार्मिक मताबद्दलचें स्वातंत्र्य कांहीं रेफर्मेशनमुळें निर्माण झालें नाहीं. उलट त्यामुळें प्यूरिटन आणि कॅल्व्हिनिस्ट पंथांच्या लोकासारखे नवेच धर्मवेडे लोक निर्माण झाले. प्रॉटेस्टंट लोकांच्या चळवळीचा कॅल्व्हिन हा एक पुढारी होता. हा चांगला संघटनाकुशल होता आणि कांहीं काळ जिनीव्हा शहरावर याचें प्रभुत्व होतें. जिनीव्हाच्या नगरोद्यानामधील तें रेफर्मेशनचें प्रचंड स्मारक तुला आठवतें का? ती भली मोठी लांब-रुंद भिंत आणि तिच्यावरील ते कॅल्व्हिन आणि इतर मंडळींचे पुतळे? कॅल्व्हिन हा तर स्वतः इतका कडवा होता, कीं कित्येक लोकांना ते स्वतंत्र विचाराचे होते आणि स्वतःच्या विचारांशीं जुळते नव्हते एवढ्याच कारणासाठीं त्यानें जिवंत जाळलें!

लूथरला आणि प्रॉटेस्टंट लोकांना बहुसंख्य सामान्य प्रजेनें मदत केली; कारण प्रजेमध्यें रोमन धर्मपीठाविरुद्ध तीव्र भावना निर्माण झालेली होती. मागें मीं सांगितलेंच आहे तुला, कीं शेतकऱ्यांची अवस्था अतिशयच दैन्यवाणी झालेली होती आणि वारं-वार त्यांचीं बंडें होत होतीं. या बंडांतून एक भलें मोठें प्रत्यक्ष शेतकऱ्यांचें युद्धच जर्मनीमध्यें उद्भवलें. ज्या जमीनदारीच्या पद्धतीखालीं ते चिरडून जात होते, त्या पद्धतीविरुद्ध शेतकरी उठले होते. त्यांच्या मागण्या भूदासपद्धति नष्ट व्हावी आणि

मासे धरण्याचा व शिकारीचा शेतकऱ्याला हक्क असावा, अशा प्रकारच्या अतिशयच साध्या आणि न्यायाच्या होत्या; परंतु या त्यांच्या साध्या मागण्यासुद्धां मान्य झाल्या नाहींत आणि जर्मनींतील राजे लोकांनीं हरएक प्रकारच्या रानटी उपायांनीं शेतकऱ्यांना दडपून टाकण्याचा प्रयत्न केला. महान् सुधारक लूथर याची या बाबतींतील भूमिका काय होती? त्यानें या गरीब शेतकऱ्यांचा पक्ष घेऊन त्यांच्या न्याय्य मागण्यांना पाठिंबा दिला का? छे! छे! भलतेंच कांहीं तरी! उलट भूदासपद्धति नाहींशी करावी या शेतकऱ्यांच्या मागणीबद्दल लूथर म्हणाला, "या नियमामुळें सर्व माणसें समान होतील आणि त्यामुळें ख्रिस्ताच्या आध्यात्मिक, पारमार्थिक, दैवी राज्याचें रूपांतर जड, ऐहिक राज्यामध्यें होईल. अशक्य! पृथ्वीवरील कोणतेंही राज्य माणसामाणसांमधील विषमतेशिवाय टिकणें शक्य नाहीं. कांहीं लोक स्वतंत्र असले पाहिजेत, कांहीं लोक भूदास (दास) असले पाहिजेत, कांहीं राज्यकर्ते असले पाहिजेत, तर कांहींनीं प्रजा राहिलें पाहिजे." त्यामुळें लूथरनें शेतकऱ्यांना शिव्या-शाप दिले असून त्यांचा नाश व्हावा अशी आशा व्यक्त केली आहे. तो म्हणतो, "म्हणून जे कोणी समर्थ असतील, त्यांनीं या लोकांना उघडपणें किंवा गुप्तपणें कापून काढावें, त्यांची कत्तल करावी व त्यांना भोसकून ठार करावें. त्यांनीं हें नित्य ध्यानात ठेवावें, कीं बंडखोरांइतकें विषारी, घाणेरडें आणि सर्वतोपरी सैतानी व अमानुष असें जगांत दुसरें कांहीं नाहीं." किती सुंदर भाषा आहे नव्हे ही! विशेषतः एका मोठ्या धार्मिक नेत्याच्या आणि सुधारकाच्या तोंडीं!

तेव्हा यांतून आपल्या हेंच प्रत्ययाला येतें, कीं मतस्वातंत्र्य आणि आचार-स्वातंत्र्य यांची जी सगळी ओरड त्या काळीं चाललेली होती, ती फक्त वरिष्ठ-वर्गापुरती होती; खालच्या वर्गासाठीं, सामान्य जनसमूहासाठीं, नव्हे. आजपर्यंतच्या एकूण एक युगांमध्यें सामान्य जनतेचें जीवन पशुकोटीच्या जीवनाहून केव्हांच फारसें निराळें नव्हतें. लूथरच्या मताप्रमाणें त्यांनीं हें असेंच जीवन उपभोगीत अथवा सोशीत राहिलें पाहिजे; कारण परमेश्वराचीच तशी योजना आहे! प्रॉटेस्टंट लोकाच्या रोमच्या धर्मपीठाविरुद्ध झालेल्या बंडाला मूळ कारण पुष्कळ अंशीं जनतेंतील आर्थिक दैन्य हें होतें. प्रॉटेस्टंट बंडखोरांनीं त्यांच्या हालांच्या तक्रारीशीं आपला सूर मिळविला आणि त्यांचा आपल्या कामांत उपयोग करून घेतला; परंतु हे भूदास–शेतकरी–वाजवीपेक्षां जास्त पुढें जाऊन भूदासपणांतूनच आपली मुक्तता करून घेणार अशी जेव्हां भीति उत्पन्न झाली, तेव्हां वस्तुतः ही एक अगदींच लहानशी बाब असूनसुद्धां प्रॉटेस्टंट पुढारी लोकांनीं राजे लोकांशीं शेतकऱ्याना चुरडून टाकण्याच्या कामात सहकार्य केलें. सामान्य जनतेच्या यशाचा काळ या वेळीं अजून फारच दूर होता. आताचें जें हें नवें युग उदयाला येत होतें, तें मध्यमवर्गीय धनिकांचें युग होतें. यूरपांतील सोळाव्या आणि सतराव्या शतकांमधील एकूण एक झगड्यातून आणि

युद्धांमधून नेमका हा धनिकवर्गच हळूहळू एकेक पायरी वरवर चढताना पाहणाराला आढळून येईल.

ज्या ज्या ठिकाणीं उदयास येणारा हा धनिकवर्ग बलिष्ठ होता, तेथें तेथें प्रॉटेस्टंट पंथाची वाढ झाली. प्रॉटेस्टंट पंथाचेही पुष्कळ प्रकार आणि उपपंथ होते. इंग्लंडमध्यें राजाच स्वतः धर्मपीठाचा प्रमुख झाला—Defender of the Faith धर्मसंरक्षक झाला; अशा रीतीनें धर्मपीठाचें धर्मपीठ हें स्वरूपच नाहींसें होऊन तें निव्वळ राज्यकारभारांतलें एक खातें झालें. तेव्हांपासून इंग्लंडच्या धर्मपीठाची ही अवस्था कायमची होऊन राहिली आहे.

इतर देशांत, विशेषतः जर्मनी, स्वित्झर्लंड आणि नेदरलंड्स यांमध्यें, निराळेच पंथ प्रमुख पदाला चढले. कॅल्व्हिनचा पंथ हा धनिकवर्गाच्या वाढीला पोषकच होता त्यामुळें तो वाढत गेला. धार्मिक बाबतींत कॅल्व्हिन हा तर फारच भयंकर कडवा होता. पाखंडी लोकांसाठीं त्याच्या पंथांत जिवंत जाळणें किंवा शरिराचे नाना तऱ्हेचे हाल करणें अशा शिक्षा होत्या आणि जे धर्मनिष्ठ होते त्यांनाही फारच भयंकर शिस्तीचें बंधन होतें; परंतु व्यवहाराच्या प्रांतांत त्याची शिकवण, वाढता व्यापार आणि उद्योगधंदे यांच्याशीं रोमन धर्मपीठापेक्षां अधिक जुळती होती. व्यापारांतील नफेबाजीला त्याच्या धर्मपंथाचा अनुकूल आशीर्वाद होता आणि पतीच्या व्यवहारालाही त्याचा पाठिंबा होता. त्यामुळें या नवीन धनिक वर्गानें जुन्या धर्मांची ही नवी आवृत्ति मान्य केली आणि स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला मुळींच टोंचणी न लागतां संपत्ति मिळविण्याचा क्रम त्यांनीं चालू ठेवला. सरंजामदार सरदारांशीं त्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत त्यांनीं सामान्य जनतेचा उपयोग करून घेतला होता. आता त्या सरदारलोकांवर विजय मिळविल्यानंतर मात्र हे लोक सामान्य जनसमूहाकडे दुर्लक्ष करूं लागले होते किंवा त्याच्या डोक्यांवर बसूं लागले होते.

परंतु धनिकवर्गापुढें अजून पुष्कळ अडचणी उभ्या होत्या. राजाची मोठी धोंड अजून त्यांच्या मार्गांत उभी होती. सरदारांशीं लढतांना राजे लोकांनीं या शहरी धनिकवर्गाशीं सहकार्य केलेलें होतें. आतां सरदारलोकांची सत्ता जाऊन ते दुर्बळ झाले तेव्हां राजांची सत्ता तर पाहिल्याहून फार मोठ्या प्रमाणांत वाढली. राजा हा सगळीकडेच जणुं एकटा एकच मालक बनून गेला. त्याच्या आणि धनिकवर्गाच्या झगड्याचा काळ अजून पुढें यायचा होता.

## ८५

# सोळाव्या व सतराव्या शतकांतील यूरपमधील अनियंत्रित राजसत्ता

२६ ऑगस्ट, १९३२

अलीकडे पुन्हां माझी टंगळमंगळ सुरू झाली आहे. कितीएक दिवसांत तरी मीं तुला या पत्रांपैकीं एकहि पत्र लिहिलें नाहीं. इथें बोलायला कोणी नाहीं पाठीवर, कीं धारेवर धरून काम करून घ्यायलाही कोणी नाहीं; त्यामुळें मधूनमधून मी आळशी-पणा करूं लागतों आणि दुसरींच कांहीं तरी कामें करीत बसतों. आपण दोघें जर एका ठिकाणीं असतों तर असें झालें नसतें, नाहीं का? पण मग आपल्या दोघांना एकमेकांशीं बोलयला मिळत असतांना मी असें लिहीत कशाला बसलों असतों?

माझ्या या मागच्या पत्रांत मी तुला यूरप खंडांतील एका मोठ्या खळबळीच्या आणि फेरफाराच्या काळाबद्दल लिहीत होतों. सोळाव्या व सतराव्या शतकांत तिकडे जे मोठे फेरफार घडून आले त्यांचा विचार त्या पत्रांत केला होता. ज्या आर्थिक क्रांतीमुळें मध्ययुगाचा अंत होऊन धनिकवर्गाचा उदय झाला, त्या आर्थिक क्रांतीच्या बरोबरच किंवा तिच्यामधूनच हे फेरफार घडून आले. गेल्या पत्रांत आपण पश्चिम यूरपमधील ख्रिस्ती धर्माचीं रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट अशीं दोन शकलें झालीं हें पाहिलें. या दोन परस्परविरोधी गटांमध्यें सगळ्यांत तीव्र धार्मिक झगड्याचें खास रणांगण जर्मनीमध्यें उघडलें गेलें; कारण तेथें हे दोन्ही गट साधारणपणें सारखेच बलवान् होते. पश्चिम यूरप खंडांतील इतर देशांनाही थोडाफार या झगड्यांत भाग घ्यावा लागला. यूरप खंडांतील या धार्मिक झगड्यांतून इंग्लंड मात्र अलिप्त राहिलें. इंग्लंडचा राजा आठवा हेन्री याच्या अमलाखालीं, इंग्लंडचा रोमच्या धर्मपीठाशीं संबंध, देशांत विशेष अंतर्गत गडबड न माजतांच पार तुटला आणि इंग्लंडमध्यें अर्धवट कॅथॉलिक, अर्धवट प्रॉटेस्टंट असें एक स्वतंत्रच धर्मपीठ स्थापन झालें. हेन्रीला धर्माबद्दल विशेषशी आस्था मुळींच नव्हती. त्याला पाहिजे होत्या धर्मपीठाच्या मालकीच्या जमिनी आणि त्या त्याला मिळाल्या. तसेंच त्याला पुन्हां लग्न करावयाचें होतें, तेंही त्यानें केलें. तात्पर्य, रेफर्मेशनचा – धर्मसुधारणेच्या चळवळीचा – मुख्य परिणाम असा झाला, कीं राजेरजवाडे लोकांची पोपच्या दावणींतून मुक्तता झाली.

अशा रीतीनें रेनेसान्स (ज्ञानयुग) आणि रेफर्मेशन (धर्मसुधारणेची चळवळ) आणि आर्थिक खळबळ या कारणांमुळें यूरप खंडाचें स्वरूप अगदीं पालटून चाललेलें असतांना तेथील राज्यव्यवस्थेचें स्वरूप कशा प्रकारचें होतें? सोळाव्या आणि सतराव्या शतकांत यूरपच्या नकाशाची मांडणी कशी काय होती? या दोनशें वर्षांत ही मांडणी

एकसारखी बदलत होती, हें अर्थातच खरें आहे. तेव्हां सोळाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळांत हा नकाशा कसा दिसतो हें एकदां आपण पाहूं या.

इकडे आग्नेयीला कॉन्स्टान्टिनोपल तुर्कांच्या ताब्यांत असून त्यांच्या साम्राज्याची सरहद्द हंगेरीच्या आंतपर्यंत जाऊन भिडली आहे. नैर्ऋत्येला विजेत्या आरबांचे वंशज, सारासन वंशाचे मुसलमान लोक ग्रॅनाडांतील त्यांच्या राज्यांतून नुकतेच हांकलून देण्यांत आले असून स्पेनमध्यें फर्डिनांड आणि इसाबेला याच्या संयुक्त अमलाखालीं संपूर्ण ख्रिस्तधर्मीयांचें राज्य प्रस्थापित झालेलें आहे. स्पेनमध्यें ख्रिस्ती आणि मुसलमान यांच्यामध्यें जो कितीक शतकांचा दीर्घकालीन धार्मिक झगडा चालू होता, त्यामुळें स्पॅनिश लोकांना कॅथॉलिक पंथाविषयीं अत्यंत तीव्र आणि कडवी अशी भक्ति उत्पन्न झालेली आहे. त्यामुळें स्पेनमध्येंच तें इन्क्विझिशनचें न्यायासन स्थापन करण्यात आलेलें आहे. अमेरिकेचा शोध लावल्याच्या यशाचा मान आणि त्यापासून देशांत वाहूं लागलेला संपत्तीचा ओघ या कारणांनीं यूरपच्या राजकारणामध्यें स्पेनचा हात आतां प्रामुख्यानें चमकूं लागलेला आहे.

पुन्हां एकदां नकाशाकडे नजर टाक. हे इंग्लंड आणि फ्रान्स देश तर त्यामध्यें जवळजवळ आजच्यासारखेच दिसतात. नकाशाच्या मध्यभागीं तें पवित्र रोमन साम्राज्य आहे ; परंतु तें अनेक जर्मन राज्यांमध्यें विभागलेलें असून हीं सर्व राज्यें बहुतांशीं अगदीं स्वतंत्र राज्येंच आहेत. कोठें प्रिन्स, कोठें ड्यूक, कोठें बिशप, कोठें राजनियोजक* अशा प्रकारच्या लोकांच्या हातांत ज्यांचा राज्यकारभार आहे, अशा लहान लहान स्वतंत्र राज्यांची ही एक चमत्कारिक खिचडी आहे, तीमध्यें कित्येक मोठीं शहरें अशीं आहेत, कीं त्यांना कांहीं कांहीं खास स्वतंत्र अधिकार आहेत ; त्यांपैकीं उत्तरेच्या बाजूच्या व्यापारी शहरांनीं एकत्र होऊन आपला एक संघ स्थापन केला आहे. त्यानंतर पलीकडे स्वित्झर्लंडचें प्रजासत्ताक राज्य आहे, हेंही वस्तुतः स्वतंत्रच आहे ; पण तशी अजून त्याला रीतसर मान्यता मिळालेली नाहीं. या बाजूला व्हेनिसचें प्रजासत्ताक राज्य आणि इटलींतील इतरही प्रजासत्ताक नगर-राज्यें आहेत. नंतर हा रोमच्या आसपासचा पोपच्या ताब्यांतील प्रदेश. त्याला पेपल राज्यें म्हणजे पोपचीं राज्यें असें म्हणतात आणि त्यांच्या दक्षिणेला नेपल्स आणि सिसिली यांचें मिळून राज्य. पूर्वेला पवित्र रोमन साम्राज्य आणि रशिया यांच्या दरम्यान पोलंड देश आहे आणि तसेंच हंगेरीचें राज्य असून त्यावर उस्मानी तुर्कांच्या आक्रमणाची काळी छाया पसरलेली

*पवित्र रोमन साम्राज्याचा बादशहा निवडण्याचें काम ज्या राज्यकर्त्यांकडे असे, त्यांना इलेक्टर्स किंवा राजनियोजक असें म्हणत. तीन राजे व तीन मोठे बिशप असे सहा व आणखी एक सातवा असे पहिले मतदार होते. हा सातवा कोण याबद्दल वाद होता. इ. स. १२९० मध्यें ही जागा बोहेमियाच्या राजाला मिळाली. प्रतिस्पर्धी बव्हेरियालाही त्यांत पुढें स्थान मिळालें. पुढें हॅनोव्हरला नववें स्थान मिळालें. पुढें १८०६ मध्यें पवित्र रोमन साम्राज्य आटोपल्यावर ही सत्ता गेली आणि नांव मात्र राहिलें.

आहे. त्याच्याही पलीकडे पूर्वेला रशिया आहे. तेथून मंगोलियन लोकांना आणि सोनेरी टोळीच्या लोकांना हांकलून लावल्यानंतर नुकतेंच एक बलिष्ठ राज्य तेथें स्थापन होऊन वाढीस लागलेलें आहे आणि उत्तरेला आणि पश्चिमेला आणखी कांहीं देश आहेत.

सोळाव्या शतकाच्या प्रारंभाला यूरपचा नकाशा हा असा होता. इ. स. १५२० मध्यें पांचवा चार्ल्स हा बादशहा झाला. हा हॅप्सबर्ग घराण्यांतील असून स्पेन, नेपल्स व सिसिली आणि नेदरलंड्स यांच्याही राज्यांचा वारसा त्याच्याकडे आलेला होता हें आपण पाहिलें आहे. राजघराण्यांतील केवळ कांहीं लग्नांच्यामुळें सबंध देशचे देश आणि समाजचे समाज एक मालक बदलून दुसऱ्या मालकाच्या हातीं जात असत, हें पाहून किती विचित्र वाटतें! लाखों लोक आणि मोठेमोठे प्रदेश हे नुसत्या वारसाहक्कामुळें इकडून तिकडे जात; कधीं कधीं हुंडा म्हणून सुद्धां असे प्रदेश दिले जात. मुंबई बेट हें अशाच रीतीनें इंग्लंडचा राजा दुसरा चार्ल्स याला त्याची बायको पोर्तुगालमधील ब्रॅगाझा येथील कॅथरीन हिच्याबरोबर हुंडा म्हणून मिळालें. तात्पर्य, विवाहसंबंध मोठ्या कुशलपणानें जुळवून आणून हॅप्सबर्ग घराण्यानें भलें मोठें साम्राज्य संपादन केलेलें होतें आणि पांचवा चार्ल्स हा या साम्राज्याचा प्रमुख बनला होता. चार्ल्स हा अगदीं एक साधारण मनुष्य होता. त्याची विशेष प्रसिद्धि म्हटली म्हणजे त्याच्या अचाट खादाडपणाबद्दलची! परंतु त्याच्या साम्राज्याच्या प्रचंड विस्तारामुळें तूर्त तरी चार्ल्स हा यूरप खंडांत एक बडें धेंड होऊन राहिला होता.

चार्ल्स ज्या सालीं बादशहा झाला, त्याच सालीं सुलेमान हा उस्मानी साम्राज्याचा प्रमुख झाला. त्याच्या कारकीर्दीत हें ऑटोमन साम्राज्य चोहों दिशांनीं वाढलें. पूर्व यूरपमध्यें ही वाढ विशेषच झाली. तुर्की लोक हे थेट व्हिएन्नाच्या प्रवेश-द्वाराशीं येऊन ठेपले होते; परंतु प्रत्यक्ष व्हिएन्ना शहर तेवढें त्यांच्या कबजांत यायचें राहिलें. तथापि हॅप्सबर्ग घराण्यांतील बादशहाला त्यांनीं एवढी दहशत बसविली, कीं सुलेमानला खंडणी देऊन त्याला गप्प करणें हेंच या बादशहाला अधिक सोयीचें वाटलें. पवित्र रोमन साम्राज्याच्या महान् बादशहावर तुर्कांच्या सुलतानाला खंडणी देण्याचा प्रसंग यावा या गोष्टीचा अर्थ लक्षांत आण. सुलेमानला सुलेमान दि मॅग्निफिसंट – वैभव-शाली, प्रतापी सुलेमान – सुलतान अले सलाम – असें नांव मिळालेलें आहे. त्यानें आपल्याला स्वतःला बादशहाही म्हणविण्यास सुरुवात केली; कारण आपण बायझांटाइन साम्राज्याच्या सीझरचेच वारसदार आहों असें तो मानीत असे.

सुलेमानच्या काळीं कॉन्स्टान्टिनोपलमध्यें नवीन बांधकामाला मोठा भर आला होता. कित्येक सुंदर मशिदी त्या वेळीं बांधण्यांत आल्या. इटलीमधील कलेच्या पुनरुज्जीवनासारखेंच पूर्वेकडील भागांतही कलेचें पुनरुज्जीवन झालें होतें असें दिसतें. कलाकौशल्याचा भर फक्त कॉन्स्टान्टिनोपलमध्येंच आला होता असें नव्हे, तर मध्य आशियांत इराण आणि खोरासान या देशांतही या काळांत सुंदर चित्रांचीं कामें झालेलीं आढळतात.

इकडे हिंदुस्थानात मोंगलांपैकीं बाबर हा वायव्येकडून आला आणि त्यानें एक नवीन राजवंश स्थापन केला हें आपण पाहिलेंच आहे. ही गोष्ट इ. स. १५२६ सालची. त्या वेळीं यूरपमध्यें पांचवा चार्ल्स हा बादशहा होता आणि सुलेमान कॉन्स्टान्टिनोपलमध्यें राज्य करीत होता. बाबर आणि त्याच्या मागचे त्याच्या घराण्यांतील राजे यांच्याबद्दल आपल्याला पुष्कळच बोलावें लागणार आहे. या ठिकाणीं एवढीच गोष्ट मुद्दाम नमूद करण्यासारखी आहे, कीं बाबर हाही स्वतः ज्ञानयुगीन धर्तीचाच राजा होता; परंतु तत्कालीन यूरपमधील त्या धर्तीच्या राजांपेक्षां तो अधिक चांगला होता. तो साहसी, उलाढाल्या असला, तरी उदार लढवय्या होता आणि कला व वाङ्मय यांविषयीं त्याला फार मोठी भक्ति होती. इटलीमध्येंही या काळीं असेच कांहीं साहसी राजे असून त्यांच्याही ठिकाणीं कला व वाङ्मय यांबद्दल प्रेम होतें आणि त्यांच्या छोट्या दरबारांमध्यें वरवर विद्या व कला यांचें तेज मोठें चमकल्यासारखें दिसत होतें. फ्लॉरेन्समधील मेडिसी घराणें आणि बोर्जिया घराणें हीं त्या काळीं याविषयीं प्रख्यातीस चढलेलीं होतीं; परंतु हे सर्व इटालियन राजे, त्याचप्रमाणें यूरप खंडांतील या काळचे बहुतेक सर्व राजे हे खरोखर मॅकिव्हॅलीचे अनुयायी असून न्यायान्यायाची बिलकुल क्षिति न बाळगणारे, कारस्थानी, अनियंत्रित असे सत्ताधारी होते. आपल्या विरोधकांचा ते विषाचा प्याला आणि खंजीर यांच्या साहाय्यानें खुशाल खून करीत असत. या राजांच्या क्षुद्र दरबारांची तुलना अकबर, शहाजहान यांच्यासारख्या मोंगल बादशहांच्या आग्रा, दिल्ली येथील दरबारांशीं करणें हें जसें रास्त होणार नाहीं, तितकीच उदार लढवय्या अशा बाबराची या साऱ्या टोळक्याबरोबर तुलना करणें हें न्यायाचें नाहीं. मोंगलांचे हे दरबार फारच ऐश्वर्ययुक्त असून इतके सुखसंपन्न आणि इतके ऐश्वर्यशाली दरबार जगांत केव्हांच कोठें दुसरीकडे झालेले नाहींत असें म्हणतात.

यूरप सोडून नकळत आपण हिंदुस्थानकडे वाहवत आलों; परंतु यूरपमधील या ज्ञानयुगाच्या काळामध्यें हिंदुस्थानांत आणि इतरत्र काय काय घडामोडी चालू होत्या, हें तुझ्या लक्षांत यावें असा माझा हेतु होता. या काळीं तुर्कस्तान, इराण, मध्य आशिया आणि हिंदुस्थान यांमध्येंही कलाकौशल्याची प्रवृत्ति बहरली होती. चीनमध्यें हा मिंग बादशहांचा शांततेचा आणि भरभराटीचा काळ असून तेथें उच्च प्रकारची कलाकुसरीच्या पदार्थांची निर्मिती होत होती; परंतु ज्ञानयुगाच्या काळांतील ही सर्व कला—एक चीनचा अपवाद कांहींसा सोडला तर—सगळी दरबारी कला होती. त्या कलाकौशल्याचा सामान्य जनतेशीं कांहीं संबंध नव्हता. इटलीमधील कांहीं श्रेष्ठ कलावंतांचीं नांवें मीं मागें सांगितलीं. ते गेल्यानंतर ज्ञानयुगाच्या पुढच्या कालांतील इटलीमधील कला अगदींच क्षुद्र आणि दुर्लक्षणीय झाली.

असो. यूरप खंडाची विभागणी या काळीं रोमन कॅथॉलिक राजे आणि प्रॉटेस्टंट राजे अशा तऱ्हेनें झालेली होती. अधिकार होता सगळा राजांचा. लोकांना कोणी विचारी-तच नव्हते. इटली, ऑस्ट्रिया, फ्रान्स आणि स्पेन हे देश कॅथॉलिक होते; जर्मनी अर्धा

कॅथॉलिक, अर्धा प्रॉटेस्टंट होता; इंग्लंड देश प्रॉटेस्टंट झाला होता. कारण त्या देशाच्या राजाची तशी लहर लागली आणि इंग्लंड देश प्रॉटेस्टंट झाला. एवढेंच कारण आयर्लंड देश रोमन कॅथॉलिक राहण्याला पुरेसें झालें; कारण या देशाला जिंकण्याचा, त्याच्यावर जुलूम करण्याचा इंग्लंडचा सारखा प्रयत्न चालू होता. परंतु लोक कोणत्या धर्मपंथाच्या बाजूला होते या गोष्टीला कोठेंच कांहीं किंमत नव्हती, हें म्हणणेंही अगदीं सर्वस्वीं बरोबर नाहीं. अखेरीस याच गोष्टीला महत्त्व प्राप्त झालें आणि तिच्यामुळेंच कितीक युद्धें आणि क्रांत्या घडून आल्या. राजकीय आणि आर्थिक प्रवृत्तीपासून ही धार्मिक प्रवृत्ति अगदीं वेगळी तोडून काढणें ही मोठी कठिण गोष्ट आहे. मला वाटतें, मीं मागेंच तुला सांगितलेलें आहे, कीं रोमन धर्मपीठाच्या विरुद्ध प्रॉटेस्टंट पंथाचें हें बंड सुद्धां, विशेषतः ज्या ठिकाणीं हा नवीन उदयास आलेला व्यापारीवर्ग बलिष्ठ होऊं लागला होता, त्या ठिकाणीं झालें. अशा तऱ्हेनें धर्म आणि व्यापार यांची सुद्धां सांगड पडलेली आपल्याला आढळून येते. त्याचप्रमाणें पुष्कळशा राजांना या धर्मसुधारणेची जी भीति वाटत होती ती ही, कीं या नांवाखालीं आपल्या प्रदेशांतून राजकीय क्रांति होईल आणि आपली सत्ता उलथून पडेल. त्यांना वाटे, कीं मनुष्य एकदां पोपची धार्मिक सत्ता अमान्य करण्याला तयार आणि समर्थ झाला, कीं तोच मनुष्य उद्यां राजेरजवाड्यांची राजकीय सत्ता सुद्धां झुगारून देण्याला कमी करणार नाहीं. म्हणून राजाच्या दृष्टीनें हा नवा धर्मविचार फार घातक होता. राज्य करण्याच्या आपल्या वर्गाच्या दैवी हक्काला हे राजे लोक अद्यापि पक्के चिकटून होते. फार काय, पण प्रॉटेस्टंट पंथाचे राजे सुद्धां हा आपला दैवी अधिकार सोडायला तयार नव्हते.

राजे लोकाना जरी अशी भीति वाटत होती, तरी पण रेफर्मेशन होऊनही यूरप खंडांत राजे लोकांचा अधिकार सर्वस्वीं अनियंत्रितच राहिला. त्यापूर्वीं ते केव्हांही नव्हते इतके आतां ते एकतंत्री झाले. पूर्वीं त्यांचे मोठे मोठे सरंजामदार-सरदार त्याच्यावर पायबंद घालूं शकत असत आणि पुष्कळदां त्यांची सत्ता झुगारूनही देत असत. परंतु व्यापाऱ्यांना आणि धनिकवर्गाला हे सरदार लोक नकोसे झालेले होते; राजांनाही ते नकोसेच होते. म्हणून व्यापारीवर्ग आणि त्याचप्रमाणें शेतकरीवर्ग यांच्या मदतीनें राजेलोकांनीं सरदारवर्गाला चुरडून टाकलें आणि ते आपण स्वतः सर्वसत्ताधीश बनले. धनिकवर्गाची सत्ता आणि वजन हीं जरी पुष्कळ वाढलेलीं होतीं, तरी राजाना पायबंद घालण्याचें सामर्थ्य अजून त्यांच्या ठिकाणीं आलेलें नव्हतें. तथापि लौकरच या मध्यमवर्गानें राजांच्या पुष्कळशा व्यवहारांना हरकती मात्र घेण्यास सुरुवात केली. विशेषतः राजेलोक त्यांच्याकडून वारंवार फार अवजड कर वसूल करूं पाहत त्याला त्यांचा विरोध होता आणि राजेलोकांनीं त्यांच्या धर्मविषयक गोष्टींत हात घालतां उपयोगी नाहीं अशी एक त्यांची तक्रार होती. अर्थात् राजेलोकांना हा त्यांचा विरोध मुळींच मानवला नाहीं. आपण केलेल्या कोणत्याही गोष्टीला विरोध करण्याचा उद्धटपणा या लोकांनीं करावा हें पाहून राजेलोक संतप्त झाले. त्यानीं व्यापारीवर्गाच्या

लोकांना कैदेंत टाकण्याचा आणि इतरही रीतींनीं त्यांना शिक्षा करण्याचा क्रम सुरू केला. आज हिंदुस्थानांत आम्ही लोक ब्रिटिश सत्तेपुढें वांकण्याचें नाकारतों, म्हणून ज्याप्रमाणें आम्हां लोकांना विनाचौकशी, सत्ताधिकाऱ्यांच्या लहरीप्रमाणें, तुरुंगात टाकलें जातें, त्याचप्रमाणें तेथेंही लोकांना वाटेल तसें तुरुंगांत डांबण्यांत येऊं लागलें. राजेलोक व्यापारामध्येंही ढवळाढवळ करूं लागले. त्यामुळें प्रकरण अधिकच चिघळलें आणि राजेलोकांना धनिकवर्गाचा वाढता विरोध होऊं लागला. धनिकवर्गाचा राजेलोकांच्या अनियंत्रित सत्तेविरुद्ध स्वतःच्या हातीं सत्ता मिळविण्याचा हा झगडा अगदीं अलीकडच्या काळापर्यंत कित्येक शतकें चालत राहिला आणि त्यामध्यें, राजेलोकांच्या दैवी हक्कांची कल्पना कायमची गाडून टाकली जाऊन राजे लोकांना त्यांच्या त्यांच्या लायकीच्या स्थानीं बसविलें जाण्यापूर्वीं कितीएक राजांचीं डोकीं कापलीं जावीं लागलीं. कांहीं देशांत धनिकवर्गाला पुष्कळ लौकर जय मिळाला; कांहीं देशात पुष्कळ काळानंतर मिळाला; पण या झगड्यांतील जयपराजयाचें निरीक्षण आपण पुढच्या कांहीं पत्रांत करूं.

परंतु सोळाव्या शतकांत मात्र यूरप खंडांत जवळजवळ सर्वत्र राजेलोकांच्याच हातीं सर्व सत्ता होती. जवळजवळ म्हणण्याचें कारण स्वित्झर्लंडमधील गरीब शेतकऱ्यांनीं एवढ्या मोठ्या प्रचंड हॅप्सबर्ग घराण्यांतील बादशहाविरुद्ध बंड करण्याचें साहस करून स्वतःचें स्वातंत्र्य मिळविलें होतें हें तुझ्या लक्षांत असेलच. अशा रीतीनें यूरप खंडांत सर्वत्र पसरलेल्या त्या अनियंत्रित जुलमी सत्तेच्या समुद्रांत ज्या ठिकाणीं राजाला मुळीं स्थानच नव्हतें असा हा स्वित्झर्लंड देश, प्रचंड महासागरांतील एखाद्याच बेटाप्रमाणें उठून दिसत होता.

लौकरच आणखी एका ठिकाणीं, नेदरलंडस्‌मध्यें, प्रकरण हातघाईवर आलें व जनतेच्या आणि धार्मिक स्वतंत्रतेसाठीं झगडा होऊन तो यशस्वीही झाला. हा देश अगदींच लहान आहे आणि त्याचा झगडा होता फार तीव्र आणि यूरपमधील त्या काळच्या सगळ्यांत मोठ्या सत्तेशीं म्हणजे स्पेनशीं. अशा रीतीनें नेदरलंड्‌सनीं यूरपला एक धडा घालून दिला. त्यानंतर इंग्लंमध्यें जनतेच्या स्वातंत्र्याचें युद्ध होऊन तेथील एका राजाला आपलें डोकें गमवावें लागलें आणि तेथील तत्कालीन पार्लमेंटचा विजय झाला. अशा रीतीनें धनिकवर्गानें अनियंत्रित राजसत्तेविरुद्ध केलेल्या झगड्यांत इंग्लंड आणि नेदरलंड्‌स यांनीं आघाडी मारली. या देशांत धनिकवर्गाचा जय झाल्यामुळें जगांतील नवीन परिस्थितीचा त्यांना फायदा घेतां आला व त्यामुळें बाकीच्या देशांहून फार मोठी प्रगति त्यांना करतां आली. पुढच्या काळांत या दोन्ही राष्ट्रांनीं मोठीं सामर्थ्यवान् आरमारें उभारलीं. दूरदूरच्या देशांशीं दोघांनीं व्यापारधंदा वाढविला आणि अशा रीतीनें दोघांनींही आशिया खंडांतील साम्राज्याचा पाया घातला.

या पत्रांमध्यें आतांपर्यंत इंग्लंडबद्दल आपण फारसें बोललेलों नाहीं. तसें बोलण्यासारखें कांहीं नव्हतेंच. कारण इंग्लंड देश हा यूरप खंडांत विशेष महत्त्वाचा देश

नव्हताच. आतां मात्र यांत बदल होतो आणि मग इंग्लंड फारच झपाट्यानें पुढें जातें हें लौकरच आपल्याला दिसेल. आतापर्यंत आपण मॅग्नाचार्टा व पार्लमेंटचा प्रारंभ यांविषयीं आणि शेतकऱ्यांचीं युद्धें आणि निरनिराळ्या घराण्यांतील आपसांतील युद्धें यांबद्दलचा उल्लेख केला आहे. या लढायांमध्यें या राजेलोकांनीं पुष्कळच उघड आणि लपून अशा प्रकारें खून केले. सरदारांपैकीं पुष्कळसे लोक रणांगणांत ठार झाले; अशा रीतीनें सरदार-वर्गाचें सामर्थ्य नष्ट झालें. त्यानंतर नवीनच एक घराणें, ट्यूडर राजांचें, गादीवर आलें आणि त्यांनीं अनियंत्रित राज्याधिकार चांगलाच गाजविला. आठवा हेन्री हा या ट्यूडर घराण्यांतलाच; तशीच त्याची मुलगी इलिझाबेथ राणीही.

पांचव्या चार्ल्स बादशहानंतर त्याच्या साम्राज्याचे तुकडे झाले. स्पेन आणि नेदरलंड्स हे देश त्याचा मुलगा दुसरा फिलिप याच्याकडे गेले. स्पेन देश हा त्या काळीं साऱ्या यूरप खंडांतील अत्यंत बलिष्ठ राजसत्ता म्हणून मोठा गाजत होता. पेरू आणि मेक्सिको हे देश स्पेनच्या मालकीचे असून तेथून स्पेनमध्यें सोन्याचा एकसारखा प्रवाह वाहत होता, हें तुझ्या ध्यानांत असेलच. परंतु स्पेनमध्यें कोलंबस, कोर्टेझ, पिझारो यांच्यासारखे नवयुगाच्या वाऱ्यानें भारलेले लोक निर्माण होऊन सुद्धा स्पेनला जगांतील पालटलेल्या युगाचा फायदा घेता आला नाहीं. व्यापाराकडे या देशानें मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्याला फिकीर होती ती फक्त एक धर्माची, आणि तीही क्रूर आणि माथेफिरू अशा धर्माची! साऱ्या स्पेन देशभर इन्क्विझिशनच्या न्यायासनांचा धुमाकूळ माजला होता आणि पाखंडी म्हणून समजले जाणारांवर वाटेल त्या प्रकारचे अत्याचार करण्यांत येत होते. वेळोवेळीं मोठे सार्वजनिक उत्सव करण्यांत येत आणि त्या ठिकाणीं या 'पाखंडी' पुरुष आणि स्त्रियांच्या टोळयांच्या टोळया राजा आणि राजघराण्यांतील मंडळी, व अमीरउमराव, आणि हजारों लोक यांच्यासमोर मोठमोठ्या चितेवर एका वेळीं जिवंत जाळण्यांत येत असत! या सार्वजनिक रीतीनें जिवंत जाळण्याच्या प्रकाराला अग्निसमर्पण, अग्नीला आहुति असें म्हणत असत. यूरप खंडांतला या काळांतील सारा इतिहास अत्याचार, अत्यंत भयंकर रानटी क्रौर्य आणि धार्मिक माथेफिरूपणा यांनीं इतका भरलेला आहे, कीं कधीं कधीं खरोखरच इतका अनाचार घडणें शक्य आहे का, असा सुद्धां मनाला प्रश्न पडतो!

स्पेनचें साम्राज्य फार काळ टिकलें नाहीं. हॉलंडनें स्पेनशीं जी तेजस्वी लढाई केली त्यानें त्या साम्राज्याचे सांधे चांगलेच खिळखिळे झाले. त्यानंतर लौकरच इ. स. १५८८ मध्यें इंग्लंड देश जिंकण्याचा स्पेननें केलेला प्रयत्न अगदींच अंगाशीं आला आणि स्पेनचें सैन्य घेऊन जाणारें "अजिंक्य आरमार" इंग्लंडच्या किनाऱ्यालाही लागूं शकलें नाहीं. भर समुद्रांत त्याचा नाश करून तें बुडविण्यांत आलें. यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. कारण या आरमाराचा मुख्याधिकारी जो होता त्याला जहाजें किंवा समुद्र यांची कांहीं सुद्धां माहिती नव्हती. एवढेंच नव्हे, तर दुसऱ्या फिलिप

राजाकडे जाऊन त्यानें स्वतः विनंति केली होती कीं, “ मला समुद्रावरील लढाईच्या तंत्राची व डावपेचांची मुळींच माहिती नाहीं, आणि शिवाय समुद्रप्रवासही मला मानवत नाहीं, यासाठीं मजवर ही कामगिरी सोंपवूं नका. ” त्यावर राजानें त्याला उत्तर दिलें कीं, “ आरमाराचें आधिपत्य खुद्द परमेश्वर करील. ” अशा रीतीनें स्पेनचें साम्राज्य हळूहळू संपुष्टांत आलें. पांचव्या चार्ल्सच्या वेळीं त्याच्या साम्राज्यावर सूर्य मावळत नाहीं असें म्हणत असत. इतकें एक वेळ तें साम्राज्य विस्तृत होतें. आजही त्याचप्रमाणें दुसऱ्या एका गर्विष्ठ आणि उद्दाम अशा साम्राज्याबद्दल नेहमीं असेंच म्हणण्यांत येतें, कीं या साम्राज्यावर सूर्य मावळत नाहीं.

८६

## नेदरलंडचें स्वातंत्र्यासाठीं युद्ध

*२७ ऑगस्ट, १९३२*

सोळाव्या शतकामध्यें जवळजवळ सर्व यूरप खंडभर राजेलोक सर्वसत्ताधीश कसे झाले हें मी गेल्या पत्रांत तुला सांगितलें. इंग्लंडमध्यें ट्यूडर राजे झाले आणि स्पेन व ऑस्ट्रिया यांमध्यें हॅप्सबर्ग राजे झाले. रशियामध्यें, जर्मनींतील बहुतेक भागांत आणि इटलीमध्यें असेच अनियंत्रित सत्ताधारी राजे होते. फ्रान्सचा राजा हा या अशा राजांचा एक उत्कृष्ट नमुना होता. तेथला तो एकटा एक मालक आणि चालक होता. सगळें राज्य म्हणजे केवळ त्याची अगदीं खासगी मालमत्ता समजली जात होती. तेथील एक अत्यंत कर्तबगार मंत्री रिचिलिओ यानें फ्रान्स आणि फ्रान्सचे राजे यांचें बळ वाढविण्यास फार मदत केली. फ्रान्सची नेहमीं अशी समजूत राहत आलेली आहे, कीं ज्या प्रमाणांत जर्मनीचें सामर्थ्य कमी राहील त्या प्रमाणांत आपली शक्ति आणि सुरक्षितता अधिक. त्यासाठीं रिचिलिओ स्वतः जरी श्रेष्ठ कॅथॉलिक धर्मगुरु होता आणि फ्रान्समध्यें जरी त्यानें निर्दयपणें प्रॉटेस्टंट लोकांना चुरडून टाकलें, तरी जर्मनीमध्यें प्रत्यक्ष त्यानें प्रॉटेस्टंट लोकांना पाठिंबा दिला. या त्याच्या धोरणाला फार मोठें यश आलें. पुढें आतां दिसेलच आपल्याला, कीं जर्मनींत अत्यंत वाईट प्रकारची यादवी माजली आणि त्या आपसांतील युद्धामुळें जर्मनीचा नाश झाला.

फ्रान्समध्येंसुद्धां सतराव्या शतकाच्या मध्याला आपसांतील युद्ध झालें; त्याला फ्रॉन्देचें युद्ध ( गोफणीची लढाई ) असें म्हणतात; पण तेथें राजानें सरदारलोक आणि व्यापारीवर्ग या दोघांचाही निःपात केला. त्यानंतर सरदारलोकांच्या हातीं सत्ता अशी कांहींच राहिली नाहीं; परंतु त्यांना आपल्या बाजूस ठेवण्यासाठीं म्हणून राजानें त्यांना अगणित प्रकारच्या सवलती दिल्या. त्याना कर म्हणून जवळजवळ

द्यावाच लागत नसे. सरदारलोक आणि उपाध्यायवर्ग या दोघांनाही करांची माफी होती. करांचें सर्व ओझें गरीब लोकांवर आणि विशेषतः शेतकरीवर्गावर पडे. या गरीब बिचाऱ्या दैन्यांत खितपतणाऱ्या लोकांकडून उकळलेल्या पैशाच्या बळावर फ्रान्समध्यें मोठमोठे वैभवशाली प्रासाद बांधण्यांत आले आणि राजाचा दरबार विलास आणि ऐश्वर्य यांनीं गजबजून गेला. पॅरिसच्या जवळच व्हर्सायला तूं गेली होतीस, तें आठवतें का तुला ? तेथले ते भव्य प्रासाद आज आपण पाह्यला जातों ते सर्व सतराव्या शतकामध्यें अशा रीतीनें फ्रेंच शेतकऱ्यांच्या रक्तामधून उभारलेले आहेत. व्हर्साय शहर हें सर्वस्वीं आनियंत्रित आणि बेजबाबदार राजशाहीचें मूर्तिमंत प्रतीकच होतें जणुं. त्यामुळेंच सगळ्या राजशाहीला मूठमाती देणाऱ्या फ्रेंच राज्यक्रांतीचें पहिलें शिंग या व्हर्सायनेंच फुंकलें यांत कांहींच आश्चर्य नाहीं; परंतु आतां ज्या काळासंबंधीं आपण बोलतों आहों त्या काळापासून फ्रेंच राज्यक्रांति अजून फार दूर होती. या काळीं चौदावा लुई हा राजा होता. त्याला महान् बादशहा, राजसूर्य असें म्हणत असत. राजा म्हणजे सूर्य आणि दरबारांतील लोक म्हणजे त्याच्या भोंवतीं फिरणारे ग्रह आणि तारागण अशी त्याची ख्याति होती. इ. स. १६४३ पासून १७१५ पर्यंत त्याची कारकीर्द भली मोठी थोरली ७२ वर्षांची झाली. त्याचा प्रधान दुसरा एक कार्डिनलच होता. त्याचें नांव मॅझरिन. वरच्या वर्गांत विलासोपभोगांना, चैनबाजीला या काळांत खूप ऊत आलेला होता; त्याचप्रमाणें वाङ्मय, शास्त्रें आणि कला यांना राजदरबारीं चांगला आश्रय मिळत होता; परंतु वरच्या या अगदीं झिरझिरीत अशा ऐश्वर्याच्या मुलाम्याखालीं दैन्य आणि यातना यांचा डोंगर उभा होता. वरच्या बाजूला मोठे सुंदर केसांचे टोप, कोटाच्या बाहीच्या टोंकाला भरदार जरीचें भरतकाम आणि एकंदर सगळाच पोशाख मोठा ऐटदार; परंतु त्यांनीं झांकलेलें शरीर मात्र आंत कधींही न धुतलेलें आणि हरएक प्रकारच्या घाणीघुणीनें भरलेलें, अशा स्वरूपाचा हा काळ होता.

आपल्या सगळ्यांच्याच मनावर डामडौल आणि थाटमाट यांचा फार मोठा परिणाम होत असतो. त्यामुळें आपल्या दीर्घ कारकीर्दींत चौदाव्या लुईनें यूरप खंडावर मोठीच छाप पाडलेली होती यांत कांहीं आश्चर्य नाहीं. उत्कृष्ट राजांचा नमुना लुई, त्याचें बाकीच्यांनीं अनुकरण करावयाचें अशी अवस्था झालेली होती; परंतु हा महान् राजा खरोखर काय लायकीचा मनुष्य होता ? सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार कार्लाइल यानें म्हटलें आहे, "तुमच्या या लुई क्वाटोंझच्या ( चौदाव्या लुईच्या ) अंगावरचीं राजवस्त्रें तेवढीं उतरून टाका म्हणजे तुम्हांला आंतल्या बाजूला खालीं दोन टोंकें फुटलेला एक मुळा आणि वरच्या बाजूला चित्रविचित्र रीतीनें कोरलेलें एक डोकें याशिवाय दुसरें कांहींसुद्धां आढळणार नाहीं!" हें फारच निर्दयपणाचें वर्णन आहे खरें आणि राजांनाचसें काय, सामान्य लोकांनाही, बहुतेक सर्वत्र तें सारखेंच लागू पडेल.

लुई क्वाटोंझ (चौदाव्या) च्याबरोबर आपण इ. स. १७१५ शीं, म्हणजे

अठराव्या शतकाच्या आरंभींच्या काळात येऊन पोंचतों. या दरम्यानच्या काळात यूरप खंडांतील इतर राष्ट्रांत पुष्कळच घडामोडी झालेल्या होत्या. त्यांतल्या कांहीं प्रसंगांकडे आपण थोडेंसें लक्ष पुरविण्यासारखें आहे.

नेदरलंडनें स्पेनविरुद्ध केलेल्या बंडाबद्दल मीं मागें तुला सांगितलेंच आहे. त्यांच्या या बाणेदार युद्धाची हकिकत जरा जास्त तपशीलवार रीतीनें पाहण्यासारखी आहे. जे. एल्. मॉटले नांवाच्या एका अमेरिकन गृहस्थानें या स्वातंत्र्ययुद्धाच्या हकिकतीचा एक प्रसिद्ध असा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यानें ही कथा अत्यंत चित्तवेधक आणि अंतःकरण विरघळून टाकण्यासारख्या रीतीनें रंगविली आहे. यूरपच्या या लहानशा कोपऱ्यामध्यें साडेतीनशें वर्षांपूर्वी ज्या घडामोडी झाल्या त्यांचा हा जो अंतःकरण हालवून सोडणारा वृत्तान्त आहे, त्याच्याइतकी लक्ष खिळवून टाकणारी कादंबरीसुद्धां माझ्या वाचनांत नाहीं. या पुस्तकाचें नांव " डच प्रजासत्ताक राज्याचा उदय " असें असून तें मीं तुरुंगांत वाचलें.*

नेदरलंडमध्यें हॉलंड आणि बेल्जम या दोन्ही देशांचा समावेश होतो. त्यांच्या या नांवांवरूनच आपल्याला दिसून येतें, कीं हे खोलगट, समुद्रसपाटीहूनही खालच्या बाजूचे देश आहेत. हॉलंड हें नांवच **हॉलो लँड** म्हणजे खोलगट जमीन या शब्दांपासून निघालेलें आहे. या देशांतला फार मोठा भाग खरोखरच समुद्रसपाटीपासून खोल असून मोठमोठे बांध व भिंती उभारून त्याचें उत्तर समुद्रापासून संरक्षण करावें लागलेलें आहे. अशा या देशांत लोकांना रोजच समुद्राशीं झगडण्याचा प्रसंग असल्यामुळें हे लोक स्वाभाविकच चांगले चिवट दर्यावर्दी बनतात; तसेंच ज्या लोकाना वारंवार समुद्रप्रवास करावा लागतो ते लोक व्यापार करण्याकडे स्वाभाविकपणेंच झुकतात. म्हणून हे नेदरलंडचे लोक व्यापारी झाले. हे लोक स्वतः लोकरीचे आणि इतरही पदार्थ निर्माण करीत आणि पूर्वेकडील प्रदेशातून मसाल्याचे पदार्थही त्यांच्याच हातीं येत. त्यामुळें या देशांत मोठीं संपन्न आणि उद्योगधंद्यानें गजबजलेलीं शहरें वाढलीं; उदाहरणार्थ, ब्रूजेस, घेंट आणि विशेषतः अँटवर्प. पूर्वेशीं व्यापार जसा वाढत गेला तसतशी या शहरांची संपन्नता वाढत गेली आणि अँटवर्प शहर हें सोळाव्या शतकांत यूरप खंडामध्यें सर्व व्यापारी शहरांत प्रमुख शहर झालें. असें सांगतात, कीं तेथील देवघेवीच्या ठिकाणीं सराफकट्ट्यावर, **नाणे-बाजारांत** रोज एकमेकांशीं व्यवहार करण्याकरितां म्हणून पांच हजार व्यापारी जमा होत असत. रोज तेथें पांचशें जहाजें येत-जात असत आणि या व्यापारीवर्गाच्या हातांत या शहरांमधील राज्यकारभार असे.

रेफर्मेशनमधील ज्या नवीन धार्मिक कल्पना होत्या त्यांचें ज्यांना आकर्षण वाटावें अशाच तऱ्हेचा हा नवीन व्यापारीवर्ग होता. त्यामुळें त्या ठिकाणीं विशेषतः उत्तर

---

[ * हिंदीमध्यें सस्ता-साहित्य-मंडळानें याचें भाषांतर 'नरमेध' या नांवानें प्रसिद्ध केलेलें आहे. ]

यूरप खंडांत, प्रॉटेस्टंट पंथाचा प्रसार वाढला. निरनिराळ्या वारशाची संधि मिळाल्यामुळें हॅप्सबर्ग घराण्यांतील पांचवा चार्ल्स आणि त्याचा मुलगा दुसरा फिलिप यांचें राज्य या नेदरलंडवर झालेलें होतें. या दोघानाही राजकीय काय किंवा धार्मिक काय कोणत्याच प्रकारच्या स्वातंत्र्याची कल्पनासुद्धां सहन न होण्यासारखी होती. फिलिपनें शहराना मिळालेले हे निरनिराळे हक्क, त्याचप्रमाणें हा नवीन धर्मपंथ या दोहोंचाही नाश करण्याचा प्रयत्न केला. त्यानें नेदरलंडमध्यें गव्हर्नर जनरल म्हणून ड्यूक ऑफ आल्व्हा याला पाठविलें होतें. हा गृहस्थ जुलूम आणि जबरदस्ती यांच्याकरितां इतिहासांत चांगलाच प्रसिद्धीला आलेला आहे. त्यानें तेथें इन्क्विझिशनचें न्यायासन स्थापन केलें आणि एक ब्लड कौन्सिल "रक्तमंडळ" निर्माण केलें आणि या दोन्ही संस्थानीं हजारों लोकांना सुळावर चढविलें किंवा डोकीं मारून ठार केलें.

हा सगळा इतिहास फारच लांबलचक आहे, म्हणून तो सगळा मला येथें सागतां येणार नाहीं. स्पेनचा जुलमीपणा जसजसा वाढत गेला तसतशी लोकांची त्याच्याशीं झगडा करण्याची शक्ति पण वाढत गेली. त्या लोकांमध्यें एक श्रेष्ठ आणि शाहणा, दूरदृष्टीचा पुढारी निर्माण झाला. त्याचें नांव ऑरेंजचा प्रिन्स विल्यम् हें होय. त्याला विल्यम् दि सायलेंट, 'न बोलणारा विल्यम्' असें म्हणत असत. हा ड्यूक ऑफ आल्व्हाला त्याच्याहून जास्त बलिष्ठ असा प्रतिस्पर्धी भेटला. इ. स. १५८८ मध्यें इन्क्विझिशनच्या कोर्टानें एकाच निवाड्यानें नेदरलंडमधील कांहीं मोजक्या निर्दिष्ट व्यक्ती सोडून, एकूण एक रहिवाशांना पाखंडी म्हणून देहान्ताची शिक्षा एकदम फर्माविली. केवळ तीनचार ओळींच्या एका वाक्यानें तीस लाख लोकांना दिलेली देहान्ताची ही साऱ्या इतिहासांत अत्यंत अचंबा वाटण्यासारखी शिक्षा सर्वस्वीं अलौकिक आणि जगात सर्वथा अजोड आहे!

पहिल्या पाहिल्यानें हा झगडा म्हणजे नेदरलंडमधील सरदारवर्ग आणि स्पेनचा राजा यांच्यामधलाच फक्त झगडा आहे असें दिसत होतें. इतर देशांत जसे राजे आणि सरदार यांचे झगडे झाले त्यांतलाच हाही एक झगडा आहे असें वाटत होतें. या सरदारलोकांना नष्ट करून टाकण्याच्या प्रयत्नांत आल्व्हानें ब्रुसेल्स येथें कितीएक सरदारलोकांचीं डोकीं कापलीं. अशा रीतीनें वध झालेल्या सरदारांमध्यें एगमांटचा काउंट हा एक लोकप्रिय आणि श्रेष्ठ सरदार होता. त्यानंतर पुढें आल्व्हाला पैशाची तंगी पडल्यामुळें त्यानें नवीन करांचें ओझें लादण्याचा उपक्रम करून पाहिला; पण त्यामुळें व्यापारीवर्गाच्या खिशाला चट्टा बसूं लागला आणि त्यांनीं बंड केलें. याच्या भरीला तेथें कॅथॉलिक आणि प्रॉटेस्टंट या पंथामधील झगडा चालू होताच.

स्पेनची सत्ता त्या वेळीं फार बलिष्ठ होती. ती सत्ता या वेळीं श्रेष्ठपणाच्या अगदीं ऐन भरांत होती. उलट नेदरलंड्स म्हणजे काय, व्यापारीवर्गाचे आणि बेताल खर्च आणि चैन करणाऱ्या निःसत्त्व सरदारांचे कांहीं लहान सुभे इतकेंच त्याचें स्वरूप होतें. या दोन पक्षांत तुलना सुद्धां करण्याला जागा नव्हती. तरीपण या प्रांतांना

दडपून टाकणें स्पेनला कठिण गेलें. स्पेननें तेथें वारंवार कत्तली केल्या आणि जागो-जागचे सर्वच्या सर्व रहिवासी पार नाहींसे केले. माणसें मारण्याच्या बाबतींत आल्व्हा आणि त्याचे सेनापती यांनीं चेंगीजखान व तैमूरलंग यांच्यावर कडी करण्याचा प्रसंग आणला. कित्येक ठिकाणीं त्यांनीं या मंगोलियन लोकांवरही खरोखरच हद्द केली. शहरांमागून शहरांना आल्व्हानें वेढे घातले. शहरांतील युद्धशास्त्राचें ज्ञान नसलेले पुरुष आणि पुष्कळ ठिकाणीं स्त्रियासुद्धां आल्व्हाच्या शिकलेल्या सैन्याशीं जमिनीवर आणि समुद्रांतही तोंड देऊं लागल्या; परंतु उपासमारीनें त्यांना अखेरीस हा लढा चालविणें अशक्य होत गेलें. अशा वेळीं स्पेनच्या गुलामगिरीचें जूं पत्करण्यापेक्षां आपल्याला मौल्यवान् असणाऱ्या आपल्या सर्वस्वाचा नाश झाला तरी बेहेत्तर, असें म्हणून हॉलंडच्या लोकांनीं स्पॅनिश शिपायांना पळवून लावण्याच्या अथवा बुडवून मारण्याच्या उद्देशानें उत्तर समुद्राला घातलेले सर्व बंधारे फोडून टाकले. लढाई जशी जशी पुष्कळ काळपर्यंत लांबत गेली तसतशी ती जास्त जास्त तीव्र आणि नाशकारक होत गेली आणि दोन्ही पक्ष अत्यंत क्रूरपणानें वागूं लागले. त्यांमध्यें सुंदर हार्लेम शहराच्या वेढ्याचा प्रसंग तर सगळ्यांत उठून दिसतो. तेथील लोकांनीं अगदीं शेवटच्या क्षणापर्यंत मोठ्या शौर्यानें शहराचें संरक्षण करण्याची शिकस्त केली; परंतु अखेरीस नित्याप्रमाणें स्पॅनिश सैन्यानें आंत शिरून भयंकर कत्तल आणि लूटमार केलीच. तसाच अल्कमारचा वेढा. बंधारे फोडल्यामुळें हें शहर कत्तलींतून, लूटमारींतून वांचलें एवढेंच. त्याचप्रमाणें लीडनचा वेढा; या ठिकाणीं शत्रूंनीं घेरल्यामुळें हजारों लोक उपासमारीनें आणि रोगराईनें मरण पावले. हेही वेढे असेच विशेष उठून दिसतात. लीडन शहरांत तर झाडावर एक हिरवें पानसुद्धां शिल्लक राहिलें नाहीं. तींसुद्धां सगळीं लोकांनीं खाऊन टाकलीं होतीं! उकिरड्यावर एखादें शीत मिळेल म्हणून स्त्रीपुरुषांचे भुकेनें तळमळणाऱ्या कुत्र्यांशीं तेथें झगडे झाले. तरीपण ते शरण गेले नाहींत. शहराच्या तटां-वर चढून उपासमारीनें नुसते हाडांचे सांपळे झालेल्या लोकांनीं शत्रूंचा धिक्कार केला आणि आम्ही उंदीर आणि कुत्रीं खाऊन राहूं पण शरण येणार नाहीं, असा निर्धार जाहीर केला. "हेंही सगळें संपलें आणि आम्हीच फक्त शिल्लक राहिलों, तर आम्ही आमचे डावे हात खाऊं आणि राहिलेल्या उजव्या हातांनीं आमच्या स्त्रिया, आमचें स्वातंत्र्य आणि आमचा धर्म यांचें जुलमी परकीयांपासून रक्षण करूं. परमेश्वराची आमच्या-वर अवकृपाच झाली आणि आमचा नाशच करावयाचें त्याच्या मनांत आल्यामुळें त्यानें आम्हांला कसलेंच साहाय्य मिळूं दिलें नाहीं, तरीसुद्धां आम्ही तुमच्या या शहराच्या प्रवेशाला सारखा अडथळा करीत उभे राहूं. अगदीं शेवटचा क्षण जेव्हां आलासें दिसेल तेव्हां आम्ही आमच्या हातांनीं शहराला आग लावून देऊं आणि त्या आगींत बायका, मुलें, माणसें, आम्ही सगळीं, भस्म होऊन जाऊं; परंतु परकीयांकडून आमचीं घरें आम्ही भ्रष्ट होऊं देणार नाहीं आणि आमचें स्वातंत्र्यही पायांखालीं तुडवूं देणार नाहीं!"

अशी तेजस्वी वृत्ति लीडनच्या लोकांची होती; परंतु बाहेरून जेव्हां मदत येत

नाहीं अशा स्थितींत दिवसांमागून दिवस जाऊं लागले तेव्हां तेथेंही निराशेचें साम्राज्य पसरलें. म्हणून बाहेर त्यानीं हॉलंडमधील शेत-जमिनी असणाऱ्या जमीनदारी भागांतील आपल्या इष्टमित्रांना संदेश पोंचविला. त्यावर या जमीनदारींतील लोकांनीं पाणी फोडून आपली प्रिय जमीन बुडवून टाकावयाची, पण लीडन शहर शत्रूच्या हातीं लागूं द्याव-याचें नाहीं असा महान् निश्चय केला. "जमीन दुसऱ्याच्या हातीं जाण्यापेक्षां बुडून गेलेली पुरवली" ही त्यांची भूमिका. म्हणून आपल्या लीडनमधील संकटांत सांपड-लेल्या बांधवांच्या संदेशाला त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर पाठविलें : "आम्ही आमची सर्व जमीन आणि आमचें सर्वस्व — धन व संपत्ति — पाण्यांत बुडवून टाकूं ; परंतु आमच्या प्रिय लीडन शहराला आम्ही अंतर देणार नाहीं!"

शेवटीं बंधाऱ्यांमागून बंधारे फोडून टाकण्यांत आले आणि वाऱ्याची अनु-कूलता मिळाल्यामुळें समुद्राचें पाणी आंतवर घुसलें आणि डच जहाजेंही आंतवर येऊन त्यांतून अन्नपाणी आणि इतर मदतही येऊन पोंचली. स्पॅनिश लोकांना या नव्या शत्रूचें, समुद्राचें, भय वाटून ते झपाट्यानें तेथून निघून गेले. अशा रीतीनें लीडन शहर बचावलें आणि तेथील रहिवाशांच्या शौर्याच्या स्मरणार्थ तेथें इ. स. १५७५ मध्यें लीडनची युनिव्हर्सिटी स्थापन करण्यांत आली. हें विश्वविद्यालय आजही यूरपमध्यें विख्यात आहे.

अशा या शौर्याच्या त्याचप्रमाणें खाटिकगिरीच्या अनेक कथा आहेत. सुंदर अशा अँटवर्प शहरांत तर भयंकर कत्तल आणि लूटमार झाली. ८००० लोकांना तेथें असें ठार करण्यांत आलें. या प्रकाराला इतिहासांत "स्पेनचा वणवा" असें नांव मिळालेलें आहे.

परंतु या महान् झगड्याचा खरा मोठा भाग नेदरलंडमधील दक्षिणेकडील भागा-ऐवजीं हॉलंडनेंच आपल्या अंगावर घेतला होता. स्पॅनिश लोकांनीं लांचलुचपतीनें आणि धाकदपटशानें पुष्कळसे सरदारलोक आपल्या बाजूला वळवून घेतले होते. त्यांच्या हातून त्यांनीं आपल्याच देशबांधवांचा नाश करविला. दक्षिण विभागांत प्रॉटेस्टंट लोकांपेक्षां कॅथॉलिक लोकांची संख्या फार मोठी होती. ह्या गोष्टीचें त्या कामीं स्पॅनिश लोकांना फार मोठें साहाय्य झालें. या कॅथॉलिक लोकांना आपल्याकडे वळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व त्यांत त्यांना थोडेंफार यशही आलें आणि सरदारांचें तर कांहीं विचारूंच नका! स्पॅनिश राजाची आपल्यावर कृपा व्हावी व त्याच्याकडून आपल्याला संपत्ति मिळावी, मग त्यासाठीं आपल्या देशाचा सर्वनाश झाला तरी बेहेत्तर, अशा बुद्धीनें या लोकांनीं केवढीं बेशरमपणाचीं, विश्वासघाताचीं आणि लुच्चेगिरीचीं कामें केलीं!

नेदरलंडमधील लोकसभेपुढें भाषण करतांना ऑरेंजचा विल्यम् एकदां म्हणाला, "नेदरलंडचा पाडाव होत असला, तर तो केवळ नेदरलंडकडूनच होत आहे. ड्यूक ऑफ आल्व्हा ज्या शक्तीची घमेंड करतो ती त्याच्या ठिकाणीं कोठून आली? तुमच्या-

आमच्यापासून—नेदरलंडमधील शहरांच्यापासून नव्हे काय ? त्याला मिळालेलीं जहाजें, सामानसुमान, पैसा, हत्यारें, शिपाई हें सारें कोठून मिळालें? नेदरलंडच्या लोकांकडून!"

तात्पर्य, अखेरीस सामान्यतः आज ज्या देशाला बेल्जम म्हणतात तो सारा नेदरलंडचा भाग स्पॅनिश लोकांनीं आपल्या कबजात आणला; परंतु कितीही खटपट केली तरी हॉलंडला त्याला नमवितां आलें नाहीं. ह्या सर्व लढायांमध्यें पहिल्यापासून जवळजवळ थेट अखेरपर्यंत स्पेनच्या दुसऱ्या फिलिपचा राज्याधिकार मात्र हॉलंडनें केव्हांच अमान्य केला नाहीं, हें पाहून मात्र विलक्षण वाटतें. त्यांचे स्थानिक स्वतंत्रतेचे हक्क जर फिलिपनें मान्य केले असते, तर त्याला राजा म्हणून ठेवायला त्यांची हरकत नव्हती. शेवटीं फिलिपशीं आपले संबंध तोडून टाकणें त्यांना भाग पडलें. त्यांनीं आपला पुढारी ऑरेंजचा विल्यम् यास तें राजपद देऊं केलें; परंतु त्याला तें मुळींच नको होतें. अशा रीतीनें त्यांच्या जवळजवळ मनाविरुद्धच केवळ परिस्थितीच्या दडपणामुळें हॉलंडच्या लोकांना प्रजासत्ताक राज्य पत्करावें लागलें; इतका त्या वेळीं राजेशाहीच्या परंपरेचा जोर होता.

हॉलंडमधला हा झगडा पुष्कळ वर्षें चालू राहिला. इ. स. १६०९ च्या आधीं कांहीं हॉलंड देश स्वतंत्र होऊं शकला नाहीं. परंतु नेदरलंडमधील लढाईचा खरा भर इ. स. १५६७ पासून १५८४ पर्यंत चालू होता. स्पेनच्या दुसऱ्या फिलिपला ऑरेंजच्या विल्यमचा उघड लढाईत पराभव करतां येईना, तेव्हां त्यानें विल्यमचा एका खुनी इसमाकडून खून करविला. असा कोणी खून करील त्याला त्यानें बक्षीस जाहीर केलें होतें! यूरपमधील नैतिक परंपरा त्या काळीं या असल्या अवस्थेंत होती. विल्यमला मारण्याचे असे पुष्कळ प्रयत्न फसले. इ. स. १५५४ मध्यें सहावा प्रयत्न यशस्वी होऊन हा श्रेष्ठ पुरुष—साऱ्या हॉलंडमध्यें त्याला "विल्यम् बाबा" असें मोठ्या प्रेमादरपूर्वक म्हणत असत—मरण पावला. त्याला जें साधावयाचें तें तोंपर्यंत त्यानें साधलेलें होतें. लोकांच्या स्वार्थत्यागाच्या आणि दैन्यदुःखाच्या—हालअपेष्टांच्या आगींतून डच प्रजासत्ताक राज्य आतां स्थापन झालेलें होतें. जुलमी आणि अनियंत्रित राज्यकर्त्यांविरुद्ध झगडा केल्यामुळें कोणत्याही देशाचें किंवा समाजाचें हितच होत असतें. त्यामुळें एक प्रकारचें शिक्षण मिळतें आणि सामर्थ्य वाढतें. हॉलंडही अशा रीतीनें बलवान् आणि स्वावलंबी होऊन थोड्याच काळांत तें एक मोठें आरमारी सत्ताधीश राज्य बनलें आणि अतिपूर्वेकडे त्याचें साम्राज्य वाढूं लागलें. बेल्जम देश मात्र हॉलंडपासून वेगळा पडून स्पेनच्या अमलाखालींच राहिला.

यूरप खंडाचें हें आपलें चित्र संपूर्ण करण्यासाठीं आपण जरा जर्मनीकडे नजर टाकूं या. येथेंही इ. स. १६१८ पासून १६४८ पर्यंत आपसांतील यादवी भयंकर माजली होती. तिला "तीस वर्षांचें युद्ध" असें म्हणतात. हें युद्ध कॅथॉलिक आणि प्रॉटेस्टंट या दोन धर्मपंथांमधील होतें; त्यांत एका बाजूला जर्मनींतील राजनियोजक आणि दुसऱ्या बाजूला जर्मनींतील छोटे छोटे राजे यांच्यामध्यें लढाई चालू होती;

तसेंच या सर्वांचें मिळून बादशहाशींही युद्ध सुरू होतें. या गोंधळांत आणखी भर घालण्यासाठींच कीं काय फ्रान्सच्या कॅथॉलिक राजांची कृपादृष्टि येथील प्रॉटेस्टंटांच्या पक्षाकडे वळलेली होती. अखेरीस स्वीडनचा राजा "उत्तरेचा सिंह" या नांवानें प्रसिद्ध असलेला गस्टेव्हस ॲडाल्फस् यानें येऊन बादशहाचा पराभव केला आणि अशा रीतीनें प्रॉटेस्टंट लोकांचें रक्षण केलें; परंतु या सर्व भानगडींत जर्मन देशाचा मात्र सत्यानाश झाला. तेथील शिपाई लोक केवळ पैशासाठींच लढणारे आणि पेंढाऱ्यांसारखे होते. ते जिकडेतिकडे लूटमार करीत, दंगा माजवीत हिंडूं लागले. मोठमोठ्या सेनापतींनीं सुद्धां शिपायांचा पगार भागविण्यासाठीं किंवा त्याना अन्नपाणी देण्यासाठीं-सुद्धां जवळ पैसा नसल्यामुळें स्वतःच लूटमारींत भाग घेण्यास सुरुवात केली. आणि विचार कर, हा सगळा बेबंद कारभार सतत तीस वर्षें चाललेला होता! वर्षानुवर्षें जिकडे तिकडे नुसती कत्तल, नासधूस आणि लूटमार यांचा मारे धुमाकूळ माजून राहिलेला होता. व्यापार जवळजवळ कोठें मुळीं नव्हताच म्हटलें तरी चालेल. त्याच-प्रमाणें शेतीची लागवडही होणें दुरापास्तच होतें. त्यामुळें अन्नाचा पुरवठा कमी कमी होत गेला आणि उपासमार वाढूं लागली आणि त्याचा परिणामही अर्थातच पेंढारी आणि लूटमार यांची वाढ होण्यांतच झाला. जर्मनी देश म्हणजे धंदेवाईक पगारदार शिपायाचा एक प्रकारचा मळाच बनला.

अखेरीस बहुधा आतां लुटालूट करायला काहीं शिल्लकच उरलें नाहीं, या कारणामुळें या युद्धाचा शेवट झाला. परंतु या धक्क्यांतून वांचून पुन्हां वर येण्याला आणि स्थिरस्थावर व्हायला जर्मनीला फार फार दीर्घकाळ लागला. इ. स. १६४८ मध्यें वेस्टफालिया येथें तह होऊन जर्मनींतील आपसांतील युद्धाचा शेवट करण्यांत आला. या सुमारास पवित्र रोमन साम्राज्याच्या बादशहाची सत्ताही नाहींशी होऊन बादशहा नुसता सोंगापुरता आणि बुजगावण्यापुरता बादशहा म्हणून शिल्लक राहिला होता. त्या साम्राज्याचा एक भला मोठा लचका, आल्सेस प्रांत, फ्रान्सनें बळकावला; २०० वर्षें हा प्रदेश फ्रान्सच्या ताब्यांत राहिल्यानंतर मग जर्मनीच्या नवीन राजसत्तेला तो परत देणें फ्रान्सला भाग पडलें. परंतु १९१४ ते १९१८ च्या लढाईमध्यें तो फ्रान्सनें पुन्हां आपल्या कबजात घेतला. वेस्टफालियाच्या तहामुळें फ्रन्सचा अशा रीतीनें फायदा झाला. परंतु त्यानंतर जर्मनीमध्यें आणखी एक राजसत्ता निर्माण झाली आणि फ्रान्सच्या पाठीशीं तें एक कायमचें संकट उभें होऊन बसलें. ही सत्ता म्हणजे होएनझोलर्न घराण्यांतील राजांची प्रशियांतील राजसत्ता होय.

वेस्टफालियाच्या तहानें अखेरीस हॉलंड व स्वित्झर्लंड यांच्या प्रजासत्ताक राज्यांना मान्यता देण्यांत आली.

कसली ही लढाया, कत्तली, लुटालूट आणि धर्मवेडेपणा यांची कथा मी तुला सांगतों आहें! परंतु ज्ञानयुगाच्या प्रारंभानंतर ज्या वेळीं यूरप खंडामध्यें कलाकौशल्य आणि वाङ्मयनिर्मिति यांच्या उत्कर्षाचा नुसता बहर उसळला होता, त्या वेळीं यूरप

खंडाची राजकीय आणि सामाजिक व धार्मिक अवस्था ही अशी होती. यूरप खंडाची आशियांतील देशांशीं तुलना करून मीं तुला दाखविलेंच आहे, कीं यूरप खंडांत एक प्रकारचें नवजीवन संचरत होतें. या नवजीवनाची सर्व अडचणींतून वर येण्याची जी ही धडपड चालू होती त्यावरूनही हेंच आपल्याला दिसून येतें. बालकाचा जन्म आणि नवीन समाजपद्धतीचा जन्म हीं दोन्ही व्हावयाचीं म्हणजे त्याबरोबर कष्ट आणि सायास हे सोसावे लागावयाचेच. खालीं तळाशीं आर्थिक स्थिरता नसली कीं वरती पृष्ठभागावर समाज आणि राजकारण यांना हादरा बसावयाचाच. यूरपमध्यें नवजीवनाचा संचार होत होता हें अगदीं उघडच आहे ; परंतु त्याच्या सभोंवार केवढा हा सगळा रानटी व्यवहार आढळतो ! त्या काळची एक म्हणच होती कीं, "राज्यकारभाराचें शास्त्र म्हणजे खोटें बोलण्याचें शास्त्र." त्या काळचें सगळें वातावरण खोटें बोलणें, कारस्थानें, लांड्यालबाड्या, अत्याचार, क्रूरपणा यांच्या घाणीनें नुसतें सडून गेलेलें दिसतें आणि लोक एवढी ही घाण सहन तरी कशी करीत असत, याचाच मोठा चमत्कार वाटतो !

८७

# इंग्लंड देश आपल्या राजाचें डोकें उडवितो

२९ ऑगस्ट, १९३२

आतां आपण इंग्लंडच्या इतिहासावर थोडा वेळ खर्च करूं या. आतांपर्यंत आपण तिकडे बहुतेक दुर्लक्षच करीत आलों आहों. कारण मध्ययुगाच्या काळांत या देशाच्या इतिहासांत लक्ष देण्यासारखें विशेष कांहीं नव्हतेंच. फ्रान्स किंवा इटली यांच्यापेक्षां हा देश मागासलेला होता. तेथील ऑक्सफर्डचें विद्यापीठ मात्र फार पूर्वीपासून प्रख्यातीस चढलेलें होतें आणि लौकरच पुढें केंब्रिजचें विद्यापीठही तसेंच प्रख्यात झालें. ऑक्सफर्ड विद्यापीठांतूनच विक्लिफ हा निघाला. त्याच्याबद्दल मी तुला मागें थोडेंसें बोललोंच आहें.

इंग्लंडच्या पहिल्या पहिल्या काळांतील इतिहासामध्यें जर विशेष कशावर लक्ष वेधत असेल, तर तेथील पार्लमेंटच्या विकासावर. या देशांत अगदीं पहिल्यापासून सरदारवर्गानें राजाच्या सत्तेवर नियंत्रण घालण्याचा प्रयत्न केला. त्यांतूनच इ. स. १२१५ सालीं मॅग्ना चार्टा निर्माण झाला. त्यानंतर थोड्या काळानें पार्लमेंटची सुरुवात झालेली दिसते. अर्थात् पार्लमेंटचें सुरुवातीचें हें स्वरूप अगदींच ठिसूळ आणि अर्धकच्चें होतें. तेथील मोठे सरदार व बिशप यांची मिळून प्रथम एक लॉर्डांची सभा स्थापन झाली. पण अखेरीस जी सभा अधिक महत्त्वाची ठरली ती

म्हणजे नाइट लोक,* छोटे छोटे जमीन-मालक आणि शहरातील व्यापारीवर्गाकडून निवडून आलेले प्रतिनिधी यांची मिळून झालेली सल्लागार सभा ही होय. याच लोक-नियुक्त सभेंतून पुढें कॉमन्स सभा निर्माण झाली. या दोन्ही सभांमध्यें किंवा गृहांमध्यें जमीन-मालक आणि धनिक लोक यांचाच भरणा असे. प्रत्यक्ष कॉमन्स सभेंत सुद्धां कांहीं थोडे श्रीमंत जमीनदार आणि व्यापारी लोक यांचेच फक्त प्रतिनिधी असत.

या कॉमन्स सभेच्या हातीं सत्ता फारच थोडी होती. पहिल्या प्रथम या सभेचें कार्य म्हणजे राजाकडे अर्ज करावयाचे आणि त्याच्यापुढें तक्रारी मांडावयाच्या एवढेंच होतें; पुढें पुढें हळूहळू त्यांनीं कर बसविण्याच्या बाबतींत हात घालावयाला सुरुवात केली. त्यांची संमति असल्याशिवाय नवीन कर बसविणें किंवा वसूलही करणें कठिण पडूं लागल्यामुळें राजानें कर बसविण्याच्या बाबतींत कॉमन्स सभेची संमति मागण्याची पद्धति सुरू केली. पैशाच्या पिशवीचें सामर्थ्य फार मोठें आहे; त्यामुळें पार्लमेंटला कराची ही सत्ता जसजशी मिळत गेली तसतसें पार्लमेंटचें, विशेषतः कॉमन्स सभेचें सामर्थ्य वाढत गेलें. राजा आणि कॉमन्स सभा यांमध्यें वारंवार खटके उडत असत; परंतु पुष्कळ काळपर्यंत पार्लमेंट ही एक दुबळीच संस्था होती आणि ट्यूडर घराण्यांतील राजे बहुतेक अंशीं अनियंत्रित सत्ताधारीच होते हें मीं तुला सांगितलेंच आहे; परंतु ट्यूडर राजे जात्याच चतुर असल्यामुळें पार्लमेंटशीं झगडा होण्याचा प्रसंग मात्र त्यांनीं येऊं दिला नाहीं.

यूरप खंडांतील तीव्र धार्मिक झगड्यांतून मात्र इंग्लंड बचावलें. तेथेंसुद्धां धर्माच्या नांवाखालीं कटकटी, बंडाळी, धर्मवेडेपणा व माथेफिरूपणा या गोष्टी कांहीं कमी झाल्या असें नव्हे. तसेंच अंगावर शहारे येतील अशा प्रकारें पुष्कळ स्त्रिया चेटक्या म्हणून येथेंही जिवंत जाळण्यांत आल्या! परंतु यूरप खंडाशीं तुलना केली तर इंग्लंड देशांत शांतताच होती असें म्हटलें पाहिजे. आठवा हेन्री राजा स्वतः प्रॉटेस्टंट झाला तसा इंग्लंड देशही प्रॉटेस्टंटच झाला असें गृहीत धरण्यांत आलें. अर्थात् देशांत कॅथॉलिक पंथाचे लोक कांहीं थोडे नव्हते. त्याचप्रमाणें अगदीं कडवे प्रॉटेस्टंटही पुष्कळच होते. इंग्लंडचें अधिकृत असें जें नवें धर्मपीठ होतें, तें मात्र या दोहोंच्या मध्यें कुठें तरी होतें. त्याचें नांव होतें प्रॉटेस्टंट धर्मपीठ; परंतु त्याचा व्यवहार प्रॉटेस्टंट पंथापेक्षां कॅथॉलिक पंथाशीं अधिक जुळता होता; आणि अगदीं खरें पाहिलें तर तें राजाच्या अधिकारांतलें एक सरकारी खातें मात्र बनून गेलेलें होतें. रोम आणि पोप यांच्याशीं मात्र त्याचा संबंध पार तोडून टाकण्यांत आला होता. आणि देशांत

*सरंजामशाही समाजव्यवस्थेंतील लष्करी कामगिरीच्या शर्तीवर राजाकडून जमीन मिळालेले लढवय्ये जमीनदार. इंग्लंडमध्यें विजेता विल्यम् याच्या काळापासून असे जमीनदार उत्पन्न झाले. पुढें धर्मपीठानेंही असे लढाऊ जमीनदार निर्माण केले. नाइट या शब्दानें पुढें पुढें शौर्यधैर्ययुक्त, गरिबांचे संरक्षक, स्त्रीदाक्षिण्ययुक्त, रंगेल, खिलाडू अशा वीरांचाही बोध होऊं लागला. परंतु मुख्यतः ते वर सांगितल्याप्रमाणें राजाचे लष्करी साहाय्यक होते.

"पोपविरुद्ध" अशी पुष्कळशी बंडाळी पण माजली होती. इलिझाबेथ राणीच्या ( ही आठव्या हेन्रीची मुलगी ) कारकीर्दींत पूर्वेकडील देशांकडे आणि अमेरिकेकडे जाणारे जलमार्ग उघडले गेले होते आणि व्यापाराला नवीन क्षेत्र व संधि निर्माण झाली होती. त्यामुळें इंग्लंडच्या लोकांच्याही मनांत या बाजूचा मोह उत्पन्न झाला. स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांना प्राप्त झालेल्या यशानें भारले जाऊन आणि त्यांच्याचप्रमाणें आपणही संपात्ति मिळवावी अशा लोभानें इंग्लिश लोकांनीं दर्यावर्दीपणा करण्यास सुरुवात केली. सर फ्रान्सिस ड्रेक व त्याच्यासारखेच आणखीही इतर लोक यांनीं प्रथम समुद्रांत चांचेगिरी करण्यास सुरुवात केली आणि ते अमेरिकेहून येणाऱ्या स्पॅनिश जहाजांची लुटालूट करूं लागले. त्यानंतर ड्रेकनें पृथ्वीपर्यटनाचा प्रचंड प्रयत्न सुरू केला. सर वाल्टर रॅले ॲटलांटिक समुद्र ओलांडून गेला व आज जो युनायटेड स्टेट्स किंवा अमेरिका देश म्हणून आपण म्हणतों, त्याच्या पूर्व किनाऱ्यावर वसाहत स्थापण्याचा त्यानें प्रयत्न केला. या वसाहतीला त्यानें इंग्लंडची कुमारिका राणी इलिझाबेथ इच्या गौरवार्थं व्हर्जिनिया ( व्हर्जिन = कुमारी ) हें नांव दिलें. या रॅलेनेंच अमेरिकेंतून यूरपमध्यें तंबाखूचें व्यसन प्रथम आणलें. यानंतर ती स्पॅनिश आरमाराची इंग्लंडवर स्वारी आली; परंतु त्या प्रचंड प्रयत्नाचा सगळाच फजिता झाल्यामुळें इंग्लंडचा उत्साह फारच मोठ्या प्रमाणावर वाढला. अर्थात् या सगळ्या घडामोडींचा राजा आणि पार्लमेंट यांमधील झगड्यांशीं कांहीं तसा साक्षात् संबंध नव्हता; मात्र त्यामुळें लोकांचीं मनें अन्य विषयात गुंतलीं आणि घरच्या व्यवहारापेक्षां परदेशीय व्यवहाराकडे त्यांचें लक्ष लागलें; व त्यामुळें राजा व पार्लमेंट यांच्यामधील झगडा तात्पुरता दृष्टीआड झाला. तथापि ट्यूडर राजाच्या आमदानींतही आंतल्या बाजूला आग धुमसत होतीच.

इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीचा काळ हा इंग्लंडच्या इतिहासांतील सर्वांत अधिक भरभराटीचा तेजस्वी काळ आहे. इलिझाबेथ स्वतः फार श्रेष्ठ राणी होऊन गेली आणि तिच्या काळीं दुसरीं पुष्कळच कर्तबगार माणसें इंग्लंडमध्यें उदयास आलीं; परंतु राणी आणि तिचे साहसी कर्तबगार लढवय्ये वीर यांच्यापेक्षांही त्या काळचे कवी आणि नाटककार हे अधिकच श्रेष्ठ होते. त्यांच्यापैकीं विल्यम् शेक्स्पिअर हा तर अत्यंत सर्वश्रेष्ठ असून तो आज जागतिक इतिहासांत अमर होऊन राहिला आहे. त्याचीं नाटकें आज साऱ्या जगाच्या ओळखीचीं झालेलीं आहेत; परंतु खुद्द व्यक्तिशः त्याच्याबद्दल मात्र आपल्याला फारच थोडी माहिती आहे. तो आणि त्याचेच समकालीन दुसरे कित्येक श्रेष्ठ ग्रंथकार इंग्लंडमध्यें एकाच वेळीं चमकले आणि त्याच्या प्रयत्नानें इंग्रजी भाषेंत आजही आपलें अंतःकरण हर्षनिर्भर करणाऱ्या अशा अनेक अत्यंत मौल्यवान् रत्नांची भर पडली. इलिझाबेथच्या काळांतील छोट्या छोट्या भावगीतांमध्येंसुद्धां जें एक विलक्षण माधुर्य आहे, तसें दुसऱ्या कोणत्याही भावगीतांत सांपडणार नाहीं. अत्यंत साध्या परंतु अत्यंत मधुर अशा भाषेंत, आनंदानें जणुं नाचत नाचत, हीं काव्यें अनुपम अशा कांहीं रीतीनें रोजच्याच साध्यासुध्या गोष्टींचें वर्णन करीत असतात. एक इंग्रजी

टीकाकार लिटन स्ट्राची यानें या काळाबद्दल लिहितांना म्हटलें आहे, "इलिझाबेथ राणीच्या काळांतील या अत्यंत उदात्त अशा वाङ्मयवीराच्या पथकानें आपल्या सामर्थ्यवान् आणि तेजस्वी प्रतिभेच्या बळावर, ज्याला चमत्कारयुग म्हटलें पाहिजे अशा केवळ एका पिढीच्या काळांत, आजपर्यंत जगांत दुसरीकडे कोणीं कोठेंही पाहिला नाहीं असा नाट्यवाङ्मयाचा अत्यंत गौरवशाली असा ठेवा इंग्लंड देशाला प्राप्त करून दिला आहे."

इलिझाबेथ राणी ही इ. स. १६०३ मध्यें म्हणजे इकडे हिंदुस्थानात अकबर बादशहा मरण पावला त्याच्या आधीं दोनच वर्षें मरण पावली. त्या वेळीं स्कॉटलंड-मध्यें जो राजा होता, तो पहिला जेम्स् या नावानें तिच्यामागून इंग्लंडच्या गादीवर आला; कारण तो कायद्यानें सगळ्यांत जवळचा वारस होता. अशा रीतीनें इंग्लंड आणि स्कॉटलंड हे देश एका राजाच्या अमलाखालीं आले. आतांपर्यंत जुलूम-जबरदस्तीनें जी गोष्ट इंग्लंडला करता आली नव्हती, ती ही अशा रीतीनें अगदीं शांततेनें घडून आली. या जेम्स् राजाचा राजेलोकांच्या दैवी अधिकारावर विश्वास होता आणि पार्लमेंट संस्था त्याला पसंत नव्हती. तसेंच तो इलिझाबेथ राणीप्रमाणें चतुरही नव्हता. त्यामुळें लौकरच त्याच्यामध्यें आणि पार्लमेंटमध्यें कटकट उत्पन्न झाली. जेम्सच्याच राजवटींतून कितीएक त्याच्यापुढें मान वांकविण्यास तयार नसलेले ताठर प्रॉटेस्टंट लोक आपला मायदेश कायमचा सोडून मेफ्लॉवर जहाजांतून अमेरिकेंत वसाहत करण्यासाठीं निघून गेले. पहिल्या जेम्सच्या अनियंत्रित कारभाराला त्यांचा विरोध होता; तसेंच इंग्लंडचें नवें धर्मपीठही त्यांना आवडत नव्हतें; कारण तें प्रॉटेस्टंट पंथाला पुरेसें जुळतें नाहीं, कट्टर प्रॉटेस्टंट पंथाचें नाहीं, असें त्यांना वाटे. तेवढ्यासाठीं आपलीं घरेंदारें आणि देशही सोडून या लोकांनीं अ‍ॅटलांटिक समुद्राच्या पलीकडील नवीन अरण्यमय प्रदेशाकडे आपलीं जहाजें हांकारलीं. उत्तरेकडील किनाऱ्यावरील एका जागीं ते लागले. त्या ठिकाणाला त्यांनीं न्यू (नवीन) प्लिमथ असें नांव दिलें. त्यांच्यामागून आणखी पुष्कळ वसाहतवाले आले. त्याच्या वसाहती हळूहळू वाढत गेल्या आणि अखेरीस पूर्व किनाऱ्यावर त्यांच्या तेरा वसाहती प्रस्थापित झाल्या. याच वसाहतींतून पुढें संयुक्त अमेरिकन राज्यसंघ (अमेरिकेंतील संयुक्त राज्यें, यू. एस्. ए.) निर्माण झाला; पण ती हकिकत अजून फार दूरची आहे.

पहिल्या जेम्सचा मुलगा पहिला चार्ल्स हा इ. स. १६२५ मध्यें गादीवर आल्यानंतर मात्र इंग्लंडमध्यें लौकरच भांडण चांगलें रंगाला आलें. त्यामुळें पार्लमेंटनें इ. स. १६२८ मध्यें त्याच्याकडे "**पिटिशन ऑफ राइट**" म्हणजे "हक्कांचा खलिता" सादर केला. हा खलिता इंग्रजी इतिहासांत फार प्रख्यात आहे. पार्लमेंटनें या खलित्यामध्यें इंग्लंडचा राजा हा कांहीं अनियंत्रित सत्ताधीश—राज्यकर्ता—नाहीं आणि पुष्कळशा गोष्टी करण्याचा त्याला मुळींच अधिकार नाहीं असें राजाला बजावलें. उदाहरणार्थ, कायदेशीर चौकशीशिवाय राजाला कोणालाही कैदेंत टाकतां येणार नाहीं,

ही एक गोष्ट या अर्जांत सांगितली होती. ऑर्डिनन्स काढावयाचे आणि त्याखालीं लोकांना तुरुंगांत टाकावयाचें हें जें आज विसाव्या शतकांत हिंदुस्थानांत इंग्रजांच्याच राजप्रतिनिधीला करतां येतें, तें इंग्लंडमध्यें सतराव्या शतकांतसुद्धां आणि खुद्द राजालाही करतां येत नव्हतें.

तुम्हांला अमुकच करतां येईल आणि अमुक करतां येणार नाहीं, असें लोक सांगूं लागलेले पाहून पहिला चार्ल्स संतप्त झाला आणि त्यानें पार्लमेंट बरखास्त करून त्याच्याशिवाय कारभार करण्यास सुरुवात केली; परंतु थोड्याच वर्षांत त्याला पैशाचा इतका तुटवडा पडला, कीं त्याला नवीन पार्लमेंट भरविणें भाग पडलें. पार्लमेंटाशिवायच चार्ल्स जें जें कांहीं करीत होता त्याबद्दल फारच असंतोष माजलेला होता आणि राजाशीं दोन हात करण्यासाठीं नवीन पार्लमेंटचे हात नुसते वळवळत होते. म्हणून दोन वर्षांच्या आंतच इ. स. १६४२ मध्यें इंग्लंडमध्यें यादवी सुरू झाली. एका बाजूला राजा आणि त्याच्या मदतीला पुष्कळसे सरदार आणि बहुतेक सारें सैन्य; तर दुसऱ्या बाजूला पार्लमेंट आणि त्याला पाठिंबा देणारे मोठमोठे संपन्न व्यापारी आणि लंडन शहर यांचा असा सामना सुरू झाला. हें युद्ध अखेरीस पार्लमेंटच्या बाजूला ऑलिव्हर क्रॉम्वेल हा श्रेष्ठ पुढारी येईपर्यंत पुष्कळ दिवसपर्यंत असेंच रेंगाळत चालू होतें. क्रॉम्वेल हा फार मोठा संघटनाकुशल होता, कडक शिस्तीचा भोक्ता होता आणि पार्लमेंटच्या कार्याबद्दल एक प्रकारच्या धार्मिक निष्ठेनें त्याचें अंतःकरण भारलेलें होतें. कार्लाइलनें क्रॉम्वेलबद्दल लिहिलें आहे, "लढाईच्या संकटाच्या अत्यंत अंधकारमय प्रसंगीं, रणांगणावरील मोठ्या हातघाईच्या ठिकाणीं, इतर सर्व लोकांच्या अंतःकरणांतून आशा अजीबात मावळली असतांना क्रॉम्वेलच्या अंतःकरणांत आशेचा जणुं अग्निस्तंभच धगधगीतपणें उभा होता." क्रॉम्वेलनें नवीन सैन्य तयार केलें; त्यांना **आयर्नसाइड्स** (पोलादी फळी) असें नांव मिळालेलें आहे; त्या सैन्यांत त्यानें आपल्या ठिकाणचा उत्साह आणि शिस्तशीरपणा निर्माण केला. पार्लमेंटच्या सैन्याला प्यूरिटन म्हणत; चार्ल्सच्या सैन्याला कॅव्हॅलिअर्स म्हणत. या प्यूरिटन व कॅव्हॅलिअर लोकांमध्यें युद्ध चालू होतें. अखेरीस क्रॉम्वेलचा जय झाला आणि चार्ल्स, इंग्लंडचा खुद्द राजा, हा पार्लमेंटचा कैदी झाला.

पार्लमेंटच्या पुष्कळशा सभासदांचा विचार अद्यापिही राजाशीं तडजोड करावी असाच होता; परंतु क्रॉम्वेलच्या नवीन दमाच्या सैन्याला ही गोष्ट मुळींच पसंत नव्हती; म्हणून या सैन्याचा एक अधिकारी कर्नल प्राइड यानें सरळ धट्टपणें पार्लमेंटच्या सभागृहांत प्रवेश केला आणि अशा वृत्तीच्या सभासदांस तेथून बाहेर हांकलून दिलें. यालाच प्राइड्स पर्ज–प्राइडची खडसणी–असें म्हणतात. हा उपाय अगदींच आडदांडपणाचा आणि जहाल होता आणि त्यांत पार्लमेंटचाही अनादरच होता. पार्लमेंट मारे एका प्रकारच्या अनियंत्रित सत्तेला विरोध करीत होतें; तर इकडे दुसरी एक सत्ता, त्याचें स्वतःचेंच सैन्य, कायद्याचा मुळींच मान ठेवीत नव्हतें. क्रांतीचा मार्ग हा असा असतो.

बाकीचे जे कॉमन्स सभेचे सभासद राहिले—त्यांना रम्प पार्लमेंट म्हणत—त्यांनीं, लॉर्डांच्या सभेची हरकत न जुमानतांच चार्ल्सवर खटला चालविण्याचें ठरविलें आणि त्यांनीं त्याला "जुलमी, विश्वासघातकी, देशद्रोही, खुनी आणि देशाचा शत्रु" ठरवून देहान्ताची शिक्षा फर्माविली. आणि इ. स. १६४९ मध्यें राज्य करण्याचा आपल्याला दैवी अधिकार आहे असा दावा सांगणारा त्यांचा हा जो राजा म्हणून नांदला होता, त्या माणसाचें डोकें लंडन येथें व्हाइट हॉलमध्यें उडविण्यांत आलें.

राजेलोकांचा मृत्यु आणि सामान्य माणसाचा मृत्यु यांत वस्तुतः कांहींच फरक नाहीं. इतिहासांत किती तरी राजांना अशा रीतीनें घातपातानें मरण आल्याचें आढळतें. अनियंत्रित सत्ता आणि राजशाही यांच्या पोटीं खून आणि वध यांचा जन्म होत असतो; इंग्लिश राजघराण्यामध्यें यापूर्वी कांहीं थोडेथोडके वध झालेले नव्हते. परंतु लोकनियुक्त अशा सभेनें स्वतःच न्यायासनावर चढण्याचें धाडस करावें, आपल्या राजाची चौकशी करावी, त्याला देहाताची शिक्षा फर्मावावी आणि तदनुसार पुढें त्याचें डोकें उडवावें, हा प्रकार अगदींच नवीन आणि अचंबा वाटण्यासारखा होता! इंग्रजलोक हे नेहमींच जात्या सुधारणाविन्मुख, पुराणप्रिय व कोणताही जलदी फेरफार करण्याला अत्यंत नाखुष असे असतांना त्यानींच जुलमी आणि देशद्रोही राजाशीं लोकांनीं कसें वागावें याचा हा असा धडा घालून द्यावा, ही मात्र मोठीच विलक्षण गोष्ट आहे! परंतु हें खरें, कीं ही गोष्ट तसेंच म्हटलें तर सर्वसाधारण इंग्रज जनतेनें केलेली नव्हती; तर क्रॉम्वेलच्या हाताखालच्या नव्या दमाच्या आयर्नसाइड्सनीं ती केलेली होती.

यूरपमधील सर्व राजे, महाराजे, संस्थानिक आणि अमीरउमराव यांना त्यामुळें फार जोराचा धक्का बसला. आपल्या राज्यांतील सामान्य जनता जर अशी उर्मटपणानें वागूं लागली, तिनें जर असा ताळतंत्र सोडला व इंग्लंडमधील लोकांचा धडा गिरविला तर आपलें कसें होणार हा त्यांना प्रश्न पडला. त्यांच्यापैकीं पुष्कळांना असे वाटत होतें, कीं थेट इंग्लंडवरच स्वारी करावी आणि इंग्लंडलाच नामोहरम करावें; परंतु इंग्लंड कांहीं आतां एखाद्या लेच्यापेच्या नालायक राजाच्या हातांत नव्हतें. इंग्लंड हें आतां अगदीं पहिल्या प्रथमच एक प्रजासत्ताक राज्य झालेलें होतें आणि त्याचें रक्षण करायला क्रॉम्वेल व त्याचें सैन्य खडें होतें. क्रॉम्वेल हा इंग्लंडचा जवळजवळ डिक्टेटर—सर्वसत्ताधीशच—होता. त्याला "लॉर्ड प्रोटेक्टर" अशी पदवी होती. त्याच्या कडक आणि कर्तबगार अमलाखालीं इंग्लंडचें सामर्थ्य वाढलें व इंग्लंडच्या आरमारानें डच, फ्रेंच आणि स्पॅनिश आरमारांना हुसकून लावलें. आपल्या आतांपर्यंतच्या इतिहासांत इंग्लंड आतां प्रथमच यूरप खंडांतील प्रमुख आरमारी सत्ताधारी राष्ट्र बनलें.

पण हें इंग्लंडचें प्रजासत्ताक राज्य फारच थोडा काळ टिकलें; चार्ल्सच्या फांशीनंतर धड अकरा वर्षें सुद्धां तें टिकलें नाहीं. क्रॉम्वेल इ. स. १६५८ मध्यें मरण

पावला आणि त्यानंतर दोनच वर्षांनीं या प्रजासत्ताक राज्याचा अंत झाला. चार्ल्सच्या (पहिल्या) मुलानें पळून जाऊन फ्रान्समध्यें आश्रय घेतला होता. तो इंग्लंडला परत आला. लोकांनीं त्याचें स्वागत केलें आणि दुसरा चार्ल्स म्हणून त्याला राज्याभिषेक केला. हा दुसरा चार्ल्स अगदींच हीन दर्जाचा व दुराचारी मनुष्य होता. त्याची राजाबद्दलची कल्पना म्हणजे मिळेल तेवढी चैन करावयाची एवढीच होती; पण पार्लमेंटच्या विरुद्ध फारसें अधिक जावयाचें नाहीं एवढा शहाणपणा त्याच्या अंगीं होता. तथापि इकडे त्याला फ्रान्सच्या राजाकडून प्रत्यक्ष तनखा मिळतच होता. त्यामुळें क्रॉम्वेलच्या वेळीं इंग्लंडला जें स्थान प्राप्त झालें होतें, तें नाहींसें झालें आणि डच लोकांनीं प्रत्यक्ष थेट टेम्स नदीपर्यंत येऊन इंग्रजांचें आरमार जाळून टाकलें.

चार्ल्सचा भाऊ दुसरा जेम्स् हा त्याच्यामागून गादीवर आला आणि ताबडतोब त्याची पार्लमेंटशीं कटकट सुरू झाली. जेम्स् हा मोठा श्रद्धाळू कॅथॉलिक होता आणि त्याच्या मनातून इंग्लंडमध्यें पोपचें वर्चस्व प्रस्थापित करावें अशी कल्पना होती; परंतु इंग्लंडच्या लोकांचीं धर्मविषयक मतें जरी कशाही प्रकारचीं असलीं — आणि तशीं निश्चित अशीं मतें त्या देशांत नव्हतींच — तरी बहुतेक सारे इंग्रजलोक पोप आणि पोपचा पंथ — पोपशाही — यांच्या मात्र फार तीव्रपणें विरुद्ध होते. सर्व देशभर पसरलेल्या या भावनेपुढें दुसऱ्या जेम्सचें काहीं चाललें नाहीं. पार्लमेंटचा राग मात्र त्यानें आपल्यावर ओढवून घेतला आणि जीव वांचविण्यासाठीं त्याला फ्रान्सचा आश्रय घ्यावा लागला.

अशा रीतीनें पार्लमेंटला राजावर हा आणखी एक जय मिळाला व तोही अगदीं शांततेनें, आपसातील यादवीचा प्रसंग न येतांच. जेम्स् गेला तेव्हां देशांत राजा कोणीच नव्हता; पण इंग्लंड देशाची कांहीं पुन्हां प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्याची तयारी नव्हती. असें म्हणतात, कीं इंग्लंड देशाला कोणी तरी एक धनी असावा लागतो आणि त्याहीपेक्षां डामडौल आणि राजवैभव यांची त्या लोकांना अधिकच आवड आहे. म्हणून पार्लमेंटनें राजासाठीं शोध चालविला आणि अखेरीस ऑरेंजच्या राजवंशांत त्यांना एक राजा सांपडला. याच घराण्यांत शंभर वर्षांपूर्वी विल्यम् दि सायलेंट हा झाला होता व त्याच्या नेतृत्वाखालीं नेदरलंडचें स्पेनविरुद्ध स्वातंत्र्यासाठीं महान् युद्ध झालें होतें. आतांही तेथें विल्यम् नांवाचाच संस्थानिक त्या घराण्यापैकीं होता आणि त्यानें इंग्लिश राजघराण्यातील मेरी नांवाच्या राजकुमारीशीं लग्न केलें होतें. तेव्हां विल्यम् आणि मेरी या दोघांना मिळून इ. स. १६८८ मध्यें इंग्लंडच्या गादीवर बसविण्यांत आलें. पार्लमेंट हेंच आतां सर्वसत्ताधीश झालें होतें आणि अशा रीतीनें लोकांचें प्रतिनिधिभूत असें जें पार्लमेंट त्याच्या हातीं राजसत्ता येण्याची ही राज्यक्रांति आतां पूर्ण झाली. या वेळेपासून कोणाही राजाचें किंवा राणीचें इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या अधिकाराला विरोध करण्याचें धाडस झालें नाहीं. परंतु

असें जरी असलें तरी प्रत्यक्ष अधिकार अमान्य न करतां किंवा उघड विरोध न करतांही आंतून पुष्कळ कारस्थानें करून पार्लमेंटवर वजन आणण्याचे मार्ग कांहीं कमी नसतात आणि पुष्कळ ब्रिटिश राजांनीं या मार्गाचा अवलंब केलेला आहे.

पार्लमेंटच्या हातांत सर्व सत्ता आली खरी; परंतु या पार्लमेंटचें स्वरूप कशा प्रकारचें होतें? इंग्लंडच्या सामान्य जनतेच्या तर्फेचे प्रतिनिधी त्यांत होते अशी समजूत करून घेऊं नको. इंग्लंडमधल्या अगदींच अल्पसंख्याक लोकांचे प्रतिनिधी या पार्लमेंटमध्यें असत. हाउस ऑफ लॉर्ड्सच्या नांवावरूनच ही गोष्ट उघड होते, कीं ही सभा सरदार, मोठे सरंजामदार, जमीनदार आणि धर्माधिकारी बिशप यांच्या प्रतिनिधींची होती; परंतु कॉमन्स सभेमध्येंसुद्धां श्रीमंत लोक, मोठमोठे जमीनमालक किंवा मोठे व्यापारी यांचाच भरणा बहुतेक असे. मतदानाचा हक्क फारच थोड्या लोकांना होता. नुकतें शंभर वर्षांपूर्वीपर्यंत इंग्लंडमध्यें ज्यांना 'खिशांतले मतदार-संघ' (Pocket Burroughs) असें नांव होतें, असे किती तरी मतदारसंघ होते. त्याचा अर्थ असा, कीं हे मतदारसंघ खरें पाहिलें असतां कोणा तरी एखाद्या व्यक्तीच्या मुठीमध्यें असत. कित्येकदां तर अशा मतदारसंघांतलि मतदारांची संख्या एक किंवा दोन मतदार इतकी भली मोठी असे! असें म्हणतात, कीं इ. स. १७९३ मध्यें कॉमन्स सभेच्या ३०६ सभासदांची निवडणूक एकूण १६० मतदारांकडून झालेली होती! ओल्ड सारम नांवाच्या एका मतदारसंघांत होतें फक्त एकच झोंपडें; पण त्या मतदारसंघातर्फे दोन सभासद पार्लमेंटमध्यें निवडले होते! अशा रीतीनें फार मोठ्या बहुसंख्य लोकांना मतदानाचा हक्क नव्हता आणि त्यांचे प्रतिनिधी पार्लमेंटांत मुळींच नव्हते ही गोष्ट आतां तुझ्या लक्षांत येईल. त्यामुळें कॉमन्स सभा ही लोकांची प्रातिनिधिक सभा मुळींच नव्हती. शहरांमधून जे मध्यमवर्गाचे लोक नवीनच उदयास येत होते, त्यांचेंसुद्धां प्रतिनिधित्व कॉमन्स सभेकडे नव्हतें. ती फक्त जमीनमालक आणि बडे व्यापारी यांची प्रतिनिधि-सभा होती. पार्लमेंटच्या सभासदांच्या जागेची खरेदी-विक्री होऊं शकत असे. यामुळें लांचलुचपतीला नुसता ऊत आला होता. हा प्रकार अगदीं अलीकडे थेट इ. स. १८३२ पर्यंत म्हणजे अवघ्या शंभर वर्षांपूर्वीपर्यंत चालू होता. पुष्कळ चळवळ झाल्यानंतर या वर्षी पार्लमेंटच्या सुधारणेचा पहिला कायदा पास झाला आणि त्यानें पुष्कळशा लोकांना मतदानाचा हक्क मिळाला.

अशा रीतीनें काय दिसून येतें, तर पार्लमेंटला राजावर जय मिळाला याचा खरा अर्थ म्हणजे मूठभर श्रीमंत लोकांचा जय झाला. इंग्लंडचा राज्यकारभार खरोखर या मूठभर जमीनमालकांच्या हातामध्यें आला; त्यांच्यांत उगीच मधून मधून नांवापुरते श्रीमंत व्यापारी होते. बाकीच्या सगळ्या वर्गांना, म्हणजे बहुतेक सबंध राष्ट्राला त्यांत कांहींसुद्धां बोलण्याचा अधिकार नव्हता.

स्पेनशीं पुष्कळ काळ युद्ध केल्यानंतर जें डच प्रजासत्ताक राज्य अस्तित्वांत आलें तेंही याचप्रमाणें केवळ श्रीमंत लोकांचें राज्य होतें हें तुझ्या लक्षांत असेलच.

विल्यम् आणि मेरी यांच्यानंतर मेरीची बहीण ॲन ही इंग्लंडची राणी झाली. इ. स. १७१४ मध्यें तिचा मृत्यु झाल्यानंतर पुन्हां एकदां पुढें राजा कोण ही अडचण उपस्थित झाली. शेवटीं पार्लमेंटनें राजाच्या शोधार्थ जर्मनी देश गांठला. तेथें हॅनोव्हरच्या राजघराण्यांतील एक राजनियोजक असलेला जर्मन गृहस्थ पार्लमेंटला पसंत पडला आणि त्याला त्यांनीं इंग्लंडचा पहिला जॉर्ज राजा म्हणून प्रस्थापित केलें. हा हुषार तर नव्हताच, परंतु अगदींच मंदबुद्धि होता आणि म्हणूनच पार्लमेंटनें त्याला पसंत केलें असावें. कारण पार्लमेंटच्या कामांत ढवळाढवळ करूं पाहणाऱ्या हुषार राजापेक्षां मूर्ख राजा फार चांगला. पहिल्या जॉर्ज राजाला इंग्रजी भाषा बोलतांसुद्धां येत नसे. राजा म्हणायचा इंग्लंडचा आणि तरीसुद्धां बिचाऱ्याला त्या देशाची भाषासुद्धां अवगत नसायची! त्याचा मुलगा दुसरा जॉर्ज यालासुद्धा इंग्रजी भाषा फारशी येत नव्हती. अशा रीतीनें इंग्लंडमध्यें हॅनोव्हर किंवा हॅनोव्हेरियन घराणें प्रस्थापित झालें आणि आजही हेंच घराणें तेथें अस्तित्वांत आहे. हें घराणें राज्यकारभार करीत आहे अशी शब्दयोजना करणें कांहीं बरोबर होणार नाहीं; कारण राज्याचा सगळा कारभार पार्लमेंटच्या हातीं आहे.

सोळाव्या आणि सतराव्या शतकामध्यें इंग्लंड आणि आयर्लंड या देशांत पुष्कळच झगडे आणि कटकटी चालू होत्या. इलिझाबेथ राणी आणि पहिला जेम्स् राजा या दोघांच्याही कारकीर्दींत पहिल्यापासून अखेरपर्यंत आयर्लंड जिंकण्याचे अनेक प्रयत्न इंग्लंडकडून चालू होते; तेथें पुष्कळ बंडें होत होतीं आणि इंग्लंडकडून तेथें अनेक कत्तलीही झाल्या. जेम्स् राजानें आयर्लंडच्या उत्तर किनाऱ्याला अल्स्टर प्रांतांतील पुष्कळसा भाग खालसा करून आपल्या ताब्यांत घेतला आणि स्कॉटलंड-मधील प्रॉटेस्टंट लोकांना तेथें वसाहत करण्यासाठीं पाठविलें. तेव्हांपासून हे प्रॉटेस्टंट वसाहतवाले तेथें राहत आलेले आहेत आणि अशा रीतीनें आयर्लंडचे दोन तुकडे पडलेले आहेत. एक स्थानिक आयरिश लोकांचा आणि दुसरा वसाहतवाल्या स्कॉच लोकांचा; एक रोमन कॅथॉलिक लोकांचा आणि दुसरा प्रॉटेस्टंट लोकांचा. या दोन तटांमध्यें अत्यंत तीव्र द्वेष नांदत आलेला असून इंग्रजांनीं या फुटीचा चांगला फायदा घेतलेला आहे. राज्यकर्त्या लोकांचा नेहमींच "फोडा आणि झोडा" या नीतीवर विश्वास असतो. आजसुद्धां आयर्लंडमधला सगळ्यांत मोठा झगड्याचा प्रश्न म्हणजे हा अल्स्टरचाच प्रश्न आहे.

इंग्लंडमधील आपसांतील युद्धाच्या वेळीं आयर्लंडमध्यें इंग्लिश लोकांची कत्तल करण्यांत आली होती. क्रॉम्वेलनें निर्दयपणें आयरिश लोकांची कत्तल करून या गोष्टीचा सूड घेतला; त्यामुळें अगदीं या घटकेपर्यंत क्रॉम्वेलबद्दल आयरिश लोकांच्या मनांत तीव्र संतापाची भावना आहे. त्यानंतर तेथें पुष्कळच लढाया झाल्या,

पुष्कळदां तडजोडी आणि तह झाले आणि इंग्लिश लोकांनीं ते मोडले—असा हा आयर्लंडच्या यातनांचा इतिहास फारच लांब आणि अतिशय दुःखकारक अशा प्रकारचा आहे.

तुझ्या आवडत्या **गलिव्हर्स ट्रॅव्हल्स**चा कर्ता जोनाथन स्विफ्ट हा याच काळांत इ. स. १६६७ पासून १७४५ पर्यंत होऊन गेला, हें एक तुला सांगण्यासारखें आहे. हें पुस्तक लहान मुलांचें प्रिय पुस्तक म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु खरोखर, त्या पुस्तकांत तत्कालीन इंग्लंडवर अत्यंत उपरोधिक टीका आहे. **रॉबिन्सन क्रूसो**चा कर्ता डॅनियल डीफो हाही स्विफ्टचा समकालीनच होता.

## ८८

## बाबर

३ सप्टेंबर, १९३२

आतां आपण हिंदुस्थानकडे परत येऊं या. अलीकडे आपण यूरप खंडावर पुष्कळच वेळ घालविला; पुष्कळशा पत्रांमध्यें आपण युद्धें आणि बंडाळ्या यांच्या अशा धुमाकुळाच्या वरच्या आवरणाच्या आंत जाऊन सोळाव्या आणि सतराव्या शतकांत यूरपमध्यें आंतल्या बाजूला खरोखर काय काय घडामोडी चालल्या होत्या, हें पाहण्याचा प्रयत्न केला. त्या काळच्या यूरपबद्दल तुझ्या मनावर कोणत्या प्रकारचे परिणाम घडलेले असतील, कशा प्रकारचीं चित्रें उमटलीं असतील कोणीं सांगावें? जे कोणते ठसे तुझ्या मनावर उमटलेले असतील ते अगदीं संमिश्र असणार हें निश्चित. आणि तसें झालें तर कांहीं आश्चर्य नाहीं. कारण त्या काळच्या यूरप खंडाचें स्वरूपच संमिश्र आणि विलक्षण आहे. अखंड आणि रानटी पद्धतीचीं युद्धें, धार्मिक माथेफिरूपणा आणि निर्दय-पणा—ज्याला इतिहासांत दुसरीकडे कोठें दाखला नाहीं अशा प्रकारचा—आणि सामान्य जनतेची निर्लज्जपणें चाललेली पिळणूक, हे त्या काळच्या यूरपचे विशेष होत. या सग-ळ्याच्या मानानें चीन देश किती तरी युगें पुढारलेला वाटत होता; तो देश सुसंस्कृत होता, कलाकौशल्ययुक्त होता, दुसऱ्यांच्या मतांविषयीं उदार होता आणि बहुतांशीं शांतताप्रिय होता. हिंदुस्थानमध्यें पुष्कळ फाटाफूट आणि अवनत अवस्था झालेली होती. तरीसुद्धां यूरपशीं तुलना करतां हिंदुस्थानसुद्धां पुष्कळ श्रेष्ठच ठरे.

परंतु या स्वरूपाहून वेगळें आणि आल्हादकारक असेंही एक स्वरूप यूरप खंडाचें त्या काळीं होतें. तेथें आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचे अंकुर नुकतेच वर येऊं लागलेले होते आणि सामान्य जनतेच्या स्वातंत्र्याची कल्पना वाढूं लागून राजेलोकांचीं सिंहासनें हादरून टाकीत होतीं. या सगळ्याच्या बुडाशीं, त्यांचें आणि दुसऱ्याही

पुष्कळच घडामोडींचें मूळ कारण म्हणून त्या काळच्या पश्चिम आणि वायव्य यूरपमध्यें घडून आलेली व्यापारी आणि औद्योगिक वाढ ही नजरेस येते. दूरदूरच्या देशांशीं व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांनीं भरलेलीं आणि कारागीर लोकांच्या औद्योगिक कार्यानें गजबजून गेलेलीं मोठमोठीं शहरें त्या काळीं तेथें उदयास आलेलीं आढळतात. सबंध पश्चिम यूरप खंडभर कारागिरांचे आणि उद्योगधंदेवाल्यांचे संघ स्थापन होतात. या व्यापाऱ्यांचा आणि कारखानदारांचा मिळून एक नवाच धनिकवर्ग—नवीन मध्यमवर्ग—यूरपमध्यें निर्माण होतो. हा वर्ग वाढत असतां त्याच्या मार्गांत राजकीय, सामाजिक, धार्मिक अशा पुष्कळच अडचणी उभ्या राहतात. राजकीय आणि सामाजिक कारभारांत अद्यापि सरंजामदारशाहीचे अवशेष पुष्कळच होते. सरंजामदारशाही ही जुन्या काळाला अनुरूप अशी समाजव्यवस्था होती; बदलल्या काळाशीं ती जुळती नव्हती. व्यापार आणि उद्योगधंदे यांना तिचा अडथळा होत होता. हे सरंजामदार सरदार नाना तऱ्हांचे कर आणि देणीं वसूल करीत; त्यामुळें व्यापारीवर्गाला फार त्रास होई. त्यामुळें या धनिकवर्गानें या सरंजामदारशाहीच्या हातून सत्ताच काढून घेण्याचा उपक्रम सुरू केला. राजालाही हे सरदार लोक नकोच होते; कारण ते त्याच्या सत्तेवर आक्रमण करण्याची धडपड करीत असत. म्हणून राजा आणि धनिकवर्ग हे या सरंजामदारवर्गाच्या विरुद्ध एकत्र झाले आणि त्यांचें खरें वर्चस्व त्यांनीं पार हिरावून घेतलें. याचा परिणाम म्हणजे राजेलोकच अधिक सामर्थ्यवान् आणि अनियंत्रित झाले.

त्याचप्रमाणें पश्चिम यूरप खंडांतील त्या काळच्या धार्मिक संघटना, प्रचलित धार्मिक समजुती आणि व्यवहारधंदा करण्याच्या त्या काळच्या रीतिभाती यांचीही व्यापार आणि उद्योगधंदे यांच्या वाढीच्या मार्गांत अडचण होत होती, असा अनुभव येऊं लागला. धर्माचा तर सरंजामदारशाहीशीं अनेक प्रकारांनीं संबंध होता आणि धर्मपीठ हें तर स्वतःच एक मोठें जमीनदार होतें, हें मीं तुला सांगितलेंच आहे. या काळच्या पूर्वीच कांहीं वर्षांपासून कांहीं कांहीं व्यक्ती आणि गट रोमन धर्मपीठावर टीका करण्यासाठीं आणि त्याचा अधिकार उडवून लावण्यासाठीं उभे राहूं लागले होते; तथापि त्यांना रोमन धर्मपीठाचें फारसें कांहींच वांकडें करतां आलें नाहीं. पण आतां नवीन उदयास येणाऱ्या या धनिकवर्गालाच या बाबतींत पुष्कळ फेरबदल व्हावयास हवा होता; म्हणून ही धर्मसुधारणेची चळवळ मग फारच जोरानें फोफावली.

आतांपर्यंत हे किंवा अशा प्रकारचे इतरही कितीएक फेरबदल एकाच वेळीं यूरप खंडांत घडून आलेले आपण जे पाहत आलों, ते सर्व म्हणजे ज्या एका क्रांतीमुळें धनिकवर्ग समाजाच्या अग्रस्थानीं आला त्या क्रांतीचींच निरनिराळीं स्वरूपें होतीं. पश्चिम यूरप खंडांतील सर्व देशांत या क्रांतीची घडामोड सामान्यपणें सारख्याच पद्धतीची आढळून येते; मात्र निरनिराळ्या देशांत हे फेरबदल निरनिराळ्या वेळीं घडून आले एवढेंच. पूर्व यूरप खंड मात्र या काळांत आणि पुढेंही पुष्कळ काळपर्यंत उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें फारच मागासलेलें होतें आणि त्यामुळें तेथें फारसे फेरबदल घडून आले नाहींत.

चीनमध्यें आणि हिंदुस्थानमध्येंही कारागिरांचे संघ होते आणि कारागीर व धंदेवाईक लोक यांची या देशात फारच प्रचंड संख्या होती. उद्योगधंद्यांचीही प्रगति या दोन्ही देशांत चांगली झालेली होती. इतकी, कीं पुष्कळ बाबतींत पश्चिम यूरपांतल्यापेक्षांसुद्धां त्यांचें पाऊल पुढें होतें. परंतु त्या अवस्थेंतही यूरपांतल्याप्रमाणें या देशांत शास्त्रीय ज्ञानाची वाढ झालेली दिसत नाहीं; त्याचप्रमाणें सामान्य जनतेच्या स्वातंत्र्याबद्दलची ओढही उत्पन्न झालेली आढळत नाहीं. या दोन्ही देशांत फार पूर्वीच्या काळापासून धार्मिक स्वातंत्र्याची आणि शहरें, खेडीं आणि कारागीरसंघ यांच्यामधील स्थानिक स्वातंत्र्याची फार मोठी परंपरा अस्तित्वांत होती. या दोन्ही देशांत उभारण्यांत आलेली समाजपद्धति फार काळपर्यंत टिकून राहिलेली होती आणि यूरप खंडांतील कोणत्याही समाजपद्धतीपेक्षां ती अधिक सुदृढ व भक्कम पायावर आधारलेली होती. परंतु या समाजपद्धतीचा हा भक्कमपणा आणि लवचिकपणाचा अभाव यांमुळेंच तिची पुढें प्रगति, वाढ होण्याला प्रतिबंध होत होता. याचा परिणाम म्हणून हिंदुस्थानांत फाटाफूट आणि अवनति होऊं लागली व अखेरीस मोंगल वंशाचा बाबर यानें उत्तरेकडून हा देश जिंकला हें आपण पाहिलेंच आहे. या काळीं या देशांतील लोक आपल्या प्राचीन आर्यांच्या स्वातंत्र्याच्या सर्व कल्पना पार विसरून गेले होते आणि गुलामी मनोवृत्तीचे बनून वाटेल त्या राज्यकर्त्यांचा अम्मल चालवून घेण्याला तयार झालेले होते असें दिसतें. वास्तविक मुसलमान लोक हे या देशांत एक प्रकारच्या नवीन जीवनाची खळबळ घेऊन आले होते; तरी ते सुद्धां स्वतःच या देशांतील बाकीच्या लोकांप्रमाणें अवनत, सत्त्वहीन आणि गुलामी मनोवृत्तीचे होऊन गेले.

त्यामुळें पूर्वेकडील प्राचीन सुधारणांच्या अंगीं न दिसून येणारें असें नवचैतन्य आणि उत्साह यांनीं संपन्न झालेलें यूरप खंड हळूहळू या पूर्वेकडील देशाच्या पुढें सटकलेलें दिसतें. यूरपचे सुपुत्र जगांतल्या चारी कोपऱ्यांपर्यंत प्रवास करूं लागतात; व्यापार आणि संपत्ति यांच्या लोभानें तेथील दर्यावर्दी लोक अमेरिका व आशिया खंडांकडे वळले व इकडे आशिया खंडाच्या आग्नेय दिशेला आतां पोर्तुगीज लोक मलाक्कांतील आरब लोकांचें साम्राज्य नाहींसें करतांना आपणांस दिसतात. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरही ते कांहीं ठाणीं प्रस्थापित करतात; परंतु लौकरच मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापारांत त्यांनीं जी मिराशी मिळविली होती, तिच्यावर हॉलंड व इंग्लंड या दोन नवीन दर्यावर्दी राज्यांकडून गदा येते. त्यांच्याकडून पोर्तुगालची पूर्वेकडून हकालपट्टी होते आणि पोर्तुगालचें पूर्वेकडील साम्राज्य आणि व्यापार दोन्ही नष्ट होतात. आतां कांहीं ठिकाणची पोर्तुगालची जागा डच लोक घेतात आणि पूर्वेकडील बेटें त्यांच्या कबजांत जातात. इ. स. १६०० सालीं इलिझाबेथ राणी ईस्ट इंडिया कंपनीला सनद देते. हिंदुस्थानशीं व्यापार करण्याच्या उद्देशानें स्थापन झालेली लंडनच्या व्यापारी लोकांची ही कंपनी होती. यानंतर दोन वर्षांनीं डच ईस्ट इंडीज

कंपनी स्थापन होते. अशा रीतीनें यूरप खंडानें आशियाची लूट करून आपली तुंबडी भरण्याचा काळ सुरू होतो. पुष्कळ काळपर्यंत ही लूटमार मलाया आणि पूर्वेकडील बेटें यांच्या पलीकडे पोंचलेली नव्हती. चीनमध्यें या वेळीं प्रथम मिंग राजांचा अम्मल होता; पुढें सतराव्या शतकाच्या मध्याला मांचू घराण्याचा प्रारंभ झाला. या दोन्ही घराण्यांच्या कारकीर्दींत चीन इतका बलिष्ठ होता, कीं त्यावर स्वारी करणें यूरपला शक्य नव्हतें. जपाननें तर कोणाही परदेशी मनुष्याला आपल्या देशांत पाऊल ठेवूं द्यावयाचें नाहीं येथपर्यंत पल्ला गांठलेला होता आणि इ. स. १६४१ मध्यें त्यानें स्वतःला पूर्णपणें कोंडून घेतलें होतें. आणि हिंदुस्थान? हिंदुस्थानची हकीगत अजून आपण या काळापर्यंत आणलेली नाहीं; ती गोष्ट जरा मागेंच रेंगाळली आहे. म्हणून आतां मधला काळ संपवून बाकीच्या देशाच्या बरोबरीला ती गोष्ट आपण आणली पाहिजे. लौकरच आपल्याला आढळून येईल, कीं हिंदुस्थान देशांतही नवीन मोंगल राजवंशाच्या अमदानींत एक चांगलें सामर्थ्यवान् राज्य प्रस्थापित होऊन यूरपीयन देशांच्या स्वारीचें संकट तेथें उद्भवणें जवळजवळ अशक्य झालें. परंतु समुद्रावर मात्र यूरप खंडाला तोडीस तोड देणारें दुसरें कोणीच या सुमारास उरलेलें नव्हतें.

म्हणून आता आपण हिंदुस्थानकडे परत येऊं. यूरप खंड, चीन, जपान आणि मॅलेशिया इकडे आपण सतरावें शतक संपवून अठराव्या शतकाच्या तोंडाशीं आलेलों आहों. परंतु हिंदुस्थानांत मात्र अद्यापि आपण बाबर इकडे आला त्या काळापाशीं म्हणजे सोळाव्या शतकाच्या सुरुवातीलाच आहों.

दिल्ली येथील दुर्बळ आणि नादान अशा अफगाण सुलतानावर इ. स. १५२६ मध्यें बाबराला जय मिळाला आणि तेव्हापासून हिंदुस्थानांत एका नव्या युगाला, मोंगलांच्या साम्राज्याला सुरुवात झाली. मधला एक थोडासा काळ सोडला, तर हें साम्राज्य १५२६ पासून १७०७ पर्यंत म्हणजे १८१ वर्षें चालू राहिलें. हा काळ या साम्राज्याच्या सत्तेचा आणि वैभवाचा काळ होय. त्या अवधींत हिंदुस्थानच्या महान् मोंगल वंशाची कीर्ति साऱ्या आशिया खंडांत व यूरप खंडांत पसरली. या घराण्याचे एकामागून एक सहा मोठे राजे झाले. नंतर मात्र हें साम्राज्य मोडकळीस आलें, फुटलें आणि मराठे, शीख व इतरही लोक यांनीं त्याचे निरनिराळे भाग काबीज करून तेथें आपापलीं राज्यें स्थापन केलीं. त्यांच्या पाठीमागून मग ब्रिटिश लोक आले. मध्यवर्ती सत्ता मोडून पडलेली आणि देशांत बरीच अंदाधुंदी माजलेली; या गोष्टींचा त्यांनीं फायदा घेतला आणि हळूहळू या देशांत आपलें राज्य स्थापित केलें.

बाबरची कांहीं हकीगत मीं तुला मागेंच सांगितली आहे. चेंगीजखान आणि तैमूरलंग यांच्या घराण्यांतला तो असून त्याच्या ठिकाणीं त्या दोघांच्याही ठिकाणचा मोठेपणा आणि युद्धकौशल्य थोड्याफार प्रमाणांत होतें; परंतु चेंगीजखानाच्या वेळेपेक्षां आता मोंगल लोकांमध्यें पुष्कळच सुधारणा झालेली होती असें दिसतें. बाबर तर

स्वतः, आपल्याला त्या काळात क्वचितच पाहायला सापडेल इतका, अत्यंत सुसंस्कृत आणि मधुर स्वभावाचा मनुष्य होता. त्याच्यामध्यें कोणत्याही विशिष्ट पंथाचें वेड नव्हतें, पक्षाभिमान नव्हता, धार्मिक माथेफिरूपणा नव्हता आणि आपल्या पूर्वजांप्रमाणें नासधूस करण्याची खोडही त्याला नव्हती. कला आणि वाङ्मय यांवर त्याची भक्ति होती आणि पार्शियन भाषेंत तो स्वतः काव्यरचना करीत असे. फुलें आणि उद्यानें यांची त्याला फार आवड होती आणि हिंदुस्थानांतील उष्ण हवेंत मध्य आशियांतील आपल्या मायभूमीची वारंवार आठवण त्याला होत असे. आपल्या आठवणींच्या ग्रंथांत तो म्हणतो, " फरघणांतील व्हायलेट फुलें फारच मधुर असतात ; फरघणा म्हणजे ट्यूलिप आणि गुलाबाच्या फुलांचा ताटवाच आहे जणुं ! "

बाप मेला तेव्हां बाबर केवळ अकरा वर्षांचा लहान मुलगा होता. या वयांत तो समरकंदच्या गादीवर आला. समरकंदचें राज्य करावयाचें म्हणजे कांहीं सोपें काम नव्हतें. त्याच्या सभोंवार सगळीकडे शत्रूंची दाटी उभी होती. त्यामुळें ज्या वयांत लहान मुलगे आणि मुली शाळेंत शिकत असतात, अशा वयांत हातांत तलवार घेऊन त्याला लढाईवर जावें लागलें. त्यांत एकदां त्याची गादी हातून गेली; ती त्यानें पुन्हां परत मिळविली. त्याच्या तुफानी कारकीर्दीत असे अनेक संकटांचे व पराक्रमांचे प्रसंग घडून आले. या सगळ्या धकाधकींत असूनही वाङ्मय, काव्य आणि कला यांची जोपासना करण्याचें आपलें व्रत त्यानें सोडलें नाहीं. महत्त्वाकांक्षेमुळें तो एकसारखा पुढेंपुढेंच आक्रमण करीत चालला होता. प्रथम काबूल जिंकून घेतल्यावर सिंधु नदी ओलांडून तो हिंदुस्थानांत उतरला. त्याच्याबरोबर सैन्य फार थोडें होतें. परंतु यूरप खंडांत आणि पश्चिम आशियांत आतां लोक वापरूं लागले होते तसला नवीन प्रकारचा तोफखाना त्याच्याबरोबर होता. त्याचें छोटेंसेंच परंतु चांगलें शिकून शिस्तशीर बनलेलें सैन्य आणि त्याचा तोफखाना यांच्यापुढें लढाईला आलेल्या अफाट अफगाण सैन्याच्या चिंधड्या उडाल्या आणि बाबरचा जय झाला ; परंतु एवढ्यानें त्याच्या अडचणी संपल्या असें मात्र नव्हे. त्यानंतरही पुष्कळदां त्याच्यावर आणीबाणीचे प्रसंग येऊन जगणार कीं मरणार इतकी अवस्था उत्पन्न झाली. एकदां असाच एक अत्यंत भयंकर संकटाचा प्रसंग आला असतांना त्याच्या हाताखालच्या सेनापतींनीं त्याला उत्तरेकडे माघार घेण्याचा सल्ला दिला; परंतु बाबर असा उगीच लेचापेचा लढवय्या नव्हता ; तो मोठा दमदार माणूस होता ; म्हणून मेलों तरी पुरवलें, परंतु मागें फिरावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें. त्याला दारू पिण्याची चांगलीच खोड होती; परंतु आपल्या आयुष्यांतील या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यानें दारू न पिण्याचा निश्चय करून आपले दारूचे सर्व प्याले फोडून टाकले. त्या प्रसंगांत त्याचा शेवटीं जय झाला आणि आपली दारू न पिण्याची प्रतिज्ञा त्यानें अखेरपर्यंत पाळली.

बाबर हिंदुस्थानात येऊन नुकतीं चार वर्षें झालीं होतीं नव्हतीं, तोंच तो

मरण पावला. या चारी वर्षांत तो एकसारखा लढतच होता. विश्रांति कशी ती त्याला ठाऊकच नव्हती. त्यामुळें हिंदुस्थानची किंवा त्याच्या इतिहासाचीही खरी ओळख त्याला केव्हांच झाली नाहीं. आग्रा येथें त्यानें आपलें राजधानीचें शहर वसविण्यासाठीं एक भव्य योजना आंखली आणि कॉन्स्टान्टिनोपलहून एक विख्यात बांधकामांतील तज्ज्ञ त्यानें मागवून घेतला. सुप्रसिद्ध वैभवशाली सुलेमान कॉन्स्टान्टिनोपल शहरांत नवीन बांधकाम करीत होता तोच हा काळ. तेथें उस्मानी तुर्कांचा सिनान हा अत्यंत प्रख्यात असा बांधकामांतील तज्ज्ञ होता; त्यानें आपला आवडता शिष्य युसुफ याला हिंदुस्थानांत बाबरकडे पाठवून दिलें.

बाबर आपल्या आठवणी लिहून ठेवीत असे. या त्याच्या ग्रंथावरून या गृहस्थाच्या अंतरंगाचें अत्यंत मधुर दर्शन आपल्याला होऊं शकतें. त्यांत त्यानें पाहिलेल्या हिंदुस्थानचें पुष्कळ वर्णन केलें आहे. तेथील फुलें, फळें, झाडें यांचें वर्णन तर त्यानें केलेंच आहे, पण बेडकांना सुद्धां तो विसरलेला नाहीं. आपल्या मायभूमींतील कलिंगडें, द्राक्षें आणि फुलें यांची आठवण होऊन त्याला दुःख झालेलें दिसतें. या देशांतील लोकांबद्दल मात्र त्याची अत्यंत तीव्र निराशा झाल्याचें तो स्पष्ट लिहितो. त्याच्या मताप्रमाणें येथील लोकांविषयीं चांगली म्हणून सांगावी, अशी एकही गोष्ट नाहीं. कदाचित् चारच वर्षें तो येथें राहिला आणि तोही सतत लढाईंत गुंतलेला, यामुळें त्याचा येथें फारसा कोणाशीं परिचयच झाला नसेल; त्याचप्रमाणें आपला देश जिंकायला आलेल्या या नव्या शत्रूपासून वरच्या वरच्या वर्गांचे लोक दूरदूरच राहिले असतील. कदाचित् नवीनच आलेल्या माणसाला परकी अशा लोकांच्या जीवनांत आणि संस्कृतीमध्यें तितका सहज प्रवेश करून घेतां येत नसेल, हेंही एक कारण असेल. तें कसेंही असलें तरी तेथें कांहीं काळापासून राज्य करीत असलेल्या अफगाण लोकांमध्यें किंवा इतर बहुसंख्य लोकांमध्यें प्रशंसनीय असें त्याला कांहींही आढळलें नाहीं ही गोष्ट खरी. तसें पाहिलें तर त्याचें निरीक्षण चांगलें सूक्ष्म आहे आणि दुसरीकडून आलेल्या मनुष्याची दृष्टि बरीचशी पूर्वग्रहदूषित असते ही गोष्ट मान्य करून सुद्धां त्याच्या या वृत्तांतावरून असें दिसून येतें, कीं त्या वेळची उत्तर हिंदुस्थानची स्थिति कांहीं फारशी अभिमान बाळगण्याजोगी नव्हती. दक्षिण हिंदुस्थानांत मात्र त्यानें पाय सुद्धां ठेवलेला नव्हता.

"हिंदुस्थानचें साम्राज्य" बाबर लिहितो, "चांगलें विशाल आहे, लोकसंख्येनें गजबजलेलें आहे आणि संपन्न आहे. पूर्वेला, दक्षिणेला आणि पुष्कळसा पश्चिमेला सुद्धां—तिन्ही बाजूंना महान् सागर आहे. उत्तरेला काबूल-कंदाहार आणि गझनी हीं शहरें असून हिंदुस्थानची राजधानी दिल्ली हें शहर आहे." एक विशेष गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे; बाबर या देशांत आला त्या वेळीं त्याचे अनेक तुकडे पडलेले असून तेथें स्वतंत्र राज्यें जरी अस्तित्वांत होतीं, तरीही आजच्या सगळ्या हिंदुस्थान प्रदेशाचें एक सलग स्वतंत्र राज्य अशीच बाबरची पाहण्याची दृष्टि होती.

हिंदुस्थानच्या या एकराष्ट्रीयत्वाची भूमिका साऱ्या इतिहासांत अशा रीतीनें कायमची टिकून राहिलेली आहे.

पुढें हिंदुस्थानचें वर्णन करतांना बाबरनें लिहिलें आहे : "हा खरोखरच नमुनेदार सुंदर देश आहे. आमच्या देशांच्या मानानें पाहतां हें एक अगदीं निराळेंच जग आहे. येथील पर्वत आणि नद्या, अरण्यें आणि मैदानें हीं सर्व अगदीं निराळ्या प्रकारचीं आहेत. सिंधु नदी ओलांडून जायची खोटी कीं सगळा प्रदेश, झाडें, दगडधोंडे, भटकणाऱ्या टोळ्या, लोकांच्या चालीरीती आणि व्यवहार, सर्व सर्व कांहीं इतर जगाहून वेगळें आणि एकटें एक खास या हिंदुस्थानातच तेवढें आढळणारें आहे, असें आढळून येऊं लागतें. येथील साप सुद्धां इतर ठिकाणाहून निराळ्या प्रकारचे आहेत. हिंदुस्थानांतील बेडूक सुद्धां मोठे पहाण्याजोगे आहेत. हे बेडूक आहेत आपल्या इकडच्या बेडकांच्याच जातीचे ; तरीपण हे बेडूक पाण्यावर सहा सहा सात सात गज पोहून जातांना आढळतात."

यापुढें मग त्यानें हिंदुस्थानांतील प्राणी, फुलें, झाडें, फळें यांची मोठी यादीच दिली आहे. नंतर मग आपण त्याच्या येथील माणसांच्या वर्णनाशीं येतों. तो म्हणतो :

"हिंदुस्थान देशाची शिफारस करावी अशा प्रकारच्या सुखोपभोगाच्या आणि आरामाच्या गोष्टी येथें जवळजवळ नाहींतच. येथील लोक सुरेख नाहींत, मित्रामित्रांच्या सहवासाच्या आनंदाची किंवा एकमेकांमध्यें मोकळेपणानें मिसळण्याची अथवा एकमेकांशीं घरोब्यानें वागण्याची त्यांच्यांत कल्पनाच नाहीं. त्यांच्यामध्यें प्रतिभा नाहीं, त्यांच्या बुद्धीच्या ठिकाणीं ग्रहणशक्ति नाहीं; वागणुकींत सौज्यन्य नाहीं; दयाळूपणा किंवा बंधुभावना नाहीं; आपलीं कारागिरीचीं कामें करण्यांत अथवा त्यांच्यासंबंधीच्या नवनव्या योजना आंखण्यांत कसलीही चतुराई, सफाईदारपणा किंवा यांत्रिक संशोधनवृत्ति नाहीं; शिल्पशास्त्र, इमारतींचें बांधकाम किंवा नवीन इमारतींची रचना यांबद्दलचें कसलेंही कौशल्य किंवा ज्ञान त्यांच्यांत नाहीं; त्यांच्यापाशीं चांगले घोडे नाहींत, चांगलें मांस नाहीं, द्राक्षें नाहींत, खरबुजें किंवा कलिंगडें नाहींत, चांगलीं फळें नाहींत, बर्फ नाहीं, गार पाणी नाहीं, चांगलें अन्न नाहीं अथवा चांगली भाकरीही नाहीं; त्यांच्याकडे हमामखाने नाहींत, विद्यालयें नाहींत, मेणबत्त्या नाहींत, मशाली नाहींत, एवढेंच नव्हे, तर शामदानेंही नाहींत."

"मग आहे तरी काय या लोकांजवळ?" असा प्रश्न हें वाचून तात्काळ लेखकाला विचारावासा वाटतो. हें सगळें लिहीत असतांना बाबरलासुद्धां खरोखर नकोसें होऊन गेलें असेल! तो पुढें लिहितो :

"हिंदुस्थानांतील सगळ्यांत मोठा गुण म्हणजे हा देश फारच मोठा आहे आणि त्यामध्यें विपुल सोनें आणि चांदी आहे. हिंदुस्थानांत दुसरी एक सोयीची गोष्ट अशी आहे, कीं येथें प्रत्येक धंद्यांतील आणि व्यापारांतील कारागीर व कामगार अगदीं असंख्य, मागाल तितके आहेत. तुम्ही कसलेंही काम काढा, कोठलाही उद्योग

उभारा, त्यासाठीं कामगारांचा संच अगदीं हाताशीं तयार आहे; अशा लोकांचा, कीं ज्यांना त्या कामाचें किंवा उद्योगाचें शिक्षण बापापासून मुलाला अशा परंपरेनें युगानुयुगापासून मिळत आलेलें आहे."

बाबरच्या स्मृतिग्रंथामधून मीं जरा लांबलचक उतारे दिले आहेत. दुसऱ्या कोणीं लिहिलेल्या कसल्याही वर्णनापेक्षां अशा प्रकारच्या ग्रंथावरून माणसाची पुष्कळदां अधिक चांगली कल्पना येऊं शकते.

बाबर आपल्या वयाच्या एकुणपन्नासाव्या वर्षी म्हणजे इ. स. १५३० मध्यें मरण पावला. त्याच्या मृत्यूसंबंधींची कथा चांगली प्रख्यात आहे. त्याचा मुलगा हुमायून हा आजारी होता. त्याच्यावरील प्रेमामुळें बाबरनें आपला स्वतःचा प्राण देऊं केला आणि त्यामुळें त्याचा मुलगा बरा झाला असें सांगतात. असें म्हणतात, कीं हुमायून बरा झाला आणि या प्रसंगानंतर थोडक्याच दिवसांत बाबर मरण पावला.

बाबरच्या लोकांनीं त्याचें प्रेत काबूल येथें नेलें आणि तेथें त्याच्या आवडत्या बागेंत त्याचें त्यांनीं दफन केलें. ज्या फुलांकरितां त्याच्या मनाला एकसारखी तळमळ लागलेली होती, त्या फुलांमध्येंच अखेरीस तो जाऊन पडला.

८९

# अकबर

४ सप्टेंबर, १९३२

कुशल सेनानायकत्व आणि शिस्तवान् सैन्य व युद्धसामग्री यांच्या बळावर बाबरनें उत्तर हिंदुस्थानचा पुष्कळसा भाग जिंकून घेतला होता. प्रथम त्यानें दिल्लीच्या अफगाण सुलतानाचा पराभव केला, आणि नंतर रजपूत लोकांचा पराभव केला. ही दुसरी लढाई त्याला बिकट गेली; कारण रजपुतांच्या इतिहासांतील प्रसिद्ध वीरपुरुष चितोडचा राणा संग याच्या नेतृत्वाखालीं सगळ्या रजपुतांनीं त्याला सामना दिला होता. हे जय जरी बाबरला मिळाले होते, तरी आपल्या पाठीमागें आपला मुलगा हुमायून याला त्यानें कठिणच काम उत्पन्न करून ठेवलेलें होतें. हुमायून चांगला सुसंस्कृत आणि विद्वान् मनुष्य असला, तरी बापाप्रमाणें तो मोठा योद्धा नव्हता. त्याच्या नव्या साम्राज्यांत त्याच्या कारकीर्दीमध्यें ठिकठिकाणीं भानगडी उपस्थित झाल्या. अखेरीस इ. स. १५४० मध्यें, बाबरच्या मृत्यूनंतर दहाच वर्षांनीं, बिहारमधील एक अफगाण सरदार शेरखान यानें हुमायूनचा पराभव करून त्याला हिंदुस्थानांतून हांकलून लावलें. त्यामुळें महान् मोंगल घराण्यांतील या दुसऱ्या राजपुरुषावर रानोमाळ भटकण्याची पाळी आली, लपून

राहावें लागूं लागलें आणि हरएक प्रकारचे हाल सोसावे लागले. अशा रीतीनें भटकत असतानांच राजपुतान्यांतील निर्जन मैदानांत त्याची बायको इ. स. १५४२ च्या नोव्हेंबर महिन्यांत प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. निर्जन मैदानांत अशा रीतीनें जन्मलेला हा त्याचा मुलगा अकबर बादशहा व्हावयाचा होता.

येथून निसटून हुमायून इराणमध्यें गेला. तेथें तेथील राजा शहा तमास्प यानें त्याला आश्रय दिला. दरम्यान शेरखानाचा अम्मल साऱ्या उत्तर हिंदुस्थानावर चालू लागला. शेरशहा असें नांव घेऊन त्यानें पांच वर्षें राज्य केलें. एवढ्या छोट्याशा अवधींत सुद्धां आपण मोठे कर्तबगार पुरुष आहों याची साक्ष त्यानें पटविली. तो फारच बुद्धिमान् व संघटनाचतुर होता, आणि त्याचा राज्यकारभार सुव्यवस्थित आणि जिवंत होता. एकीकडे युद्धामध्यें गुंतलेला असूनसुद्धां शेतकऱ्यांवर जमिनीचा कर बसविण्याची व तो वसूल करण्याची एक नवी आणि चांगली महसूलपद्धति प्रस्थापित करण्याला त्याला सवड मिळूं शकली. तो मोठा कठोर आणि कडक मनुष्य होता. परंतु हिंदुस्थानांतील सर्व अफगाण राज्यकर्त्यांच्या मानानें आणि इतरही पुष्कळशा राज्यकर्त्यांच्या मानानें तो निःसंशय सर्वांत अधिक कर्तबगार व सज्जन राज्यकर्ता होता. परंतु कर्तबगार एकतंत्री अशा राज्यकर्त्यांच्या बाबतींत बहुतेक प्रसंगीं जें घडतें, तेंच नेमकें शेरशहाच्या बाबतींत घडून आलें. तो मरण पावतांच त्याच्याबरोबर त्यानें उभारलेली सर्व घडीही पार कोलमडून जमीनदोस्त झाली.

या अंदाधुंदीचा फायदा घेऊन हुमायून इ. स. १५५६ मध्यें बरोबर सैन्य घेऊन इराणमधून हिंदुस्थानात परत आला. या वेळीं त्याला जय मिळाला आणि सोळा वर्षांनंतर पुन्हां तो दिल्लीच्या गादीवर बसला; पण तें वैभव त्याला फार वेळ लाभलें नाहीं; सहाच महिन्यांनंतर तो जिन्यावरून पडून मरण पावला.

शेरशहा आणि हुमायून यांच्या थडग्यांची अथवा कबरींची तुलना करून पाहणें मनोरंजक आहे. त्या अफगाण वीराची कबर बिहारमध्यें सहाश्रम (सहस्राम) येथें असून त्याच्याप्रमाणें कठोर, मजबूत आणि मोठा दरारा वाढविणारी अशीच ती इमारत आहे. हुमायूनची कबर दिल्ली येथें आहे. ही इमारत मोठी नाजुक, सुंदर, चमकदार व मोहक आहे. या दगडी बांधकामावरून सोळाव्या शतकामधील या साम्राज्यप्राप्तीसाठीं झगडणाऱ्या दोघां प्रतिस्पर्ध्यांविषयीं फार चांगली कल्पना करतां येण्यासारखी आहे; त्यांत जणुं त्यांचेच स्वभावविशेष प्रतिबिंबित झालेले आहेत.

या वेळीं अकबर अवघा तेरा वर्षांचा होता. आपल्या आज्याप्रमाणें तोही फारच लहान वयांत गादीवर आला. बहिरामखान नांवाचा एक मनुष्य त्याचा पालक आणि पाठिराखा होता. त्याला खानबाबा असें म्हणत असत; परंतु चार वर्षांतच अकबर या पालकाच्या नियंत्रणाला आणि इतर लोकांनीं सांगून त्याप्रमाणें वागण्याला कंटाळला आणि त्यानें राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें आपल्या हातांत घेतलीं.

इ. स. १५५६ च्या सुरुवातीपासून तों १६०५ च्या अखेरीपर्यंत जवळजवळ

पन्नास वर्षें अकबरानें हिंदुस्थानवर राज्य केलें. यूरप खंडांत नेदरलंडच्या स्वातंत्र्य-युद्धाचा आणि इंग्लंडांत शेक्स्पिअरचा हा काळ. हिंदुस्थानच्या इतिहासांत अकबराची कीर्ति व कामगिरी फारच मोठ्या दर्जाची व सहज उठून दिसणारी आहे. कधीं कधीं त्याच्या कांहीं कांहीं गोष्टींवरून आपल्याला राजा अशोकाचें स्मरण होतें. ख्रिस्तापूर्वी तिसऱ्या शतकांतील हिंदुस्थानचा बुद्धधर्मीय बादशहा आणि ख्रिस्तानंतर सोळाव्या शतकांतील मुसलमानधर्मीय बादशहा या दोघांची भाषा व विचारपद्धति एकच असावी, नव्हे, त्यांचे शब्द आणि आवाजसुद्धां जणुं एकाच प्रकारचे असावेत ही खरोखर मोठी विलक्षण गोष्ट आहे. त्यामुळें कित्येकदां असें वाटतें, कीं प्रत्यक्ष भरतभूमीच आपल्या या दोन महान् सुपुत्रांच्या रूपानें आपल्याशीं बोलत नसेल ना? असेलही कदाचित्. अशोका-बद्दल आपल्याला त्यानें दगडावर कोरून ठेवलेलीं जीं स्वतःचीं आज्ञापत्रें आहेत त्यांहून अधिक कांहींच माहिती नाहीं. अकबराबद्दल मात्र आपल्याला पुष्कळच माहिती उपलब्ध आहे. त्याच्या दरबारांतील दोन समकालीन इतिहासकारांनीं दोन भले मोठे वृत्तांत लिहिलेले आहेत आणि त्याला भेटावयास आलेल्या परकी लोकांनीं, विशेषतः त्याला ख्रिस्ती धर्माकडे वळविण्याची जिवापाड मेहनत ज्यांनीं केली त्या जेसुइट लोकांनीं, त्याच्याबद्दल पुष्कळ लांबलचक वर्णनें लिहिलेलीं आहेत.

बाबरपासून या घराण्यांतील हा तिसरा राजा. परंतु त्याच्या काळींसुद्धां मोंगल लोक हे हिंदुस्थानांत अजून नवीनच होते. लोक त्यांना परकीच समजत होते आणि त्यांचें येथील वर्चस्व लष्करी सामर्थ्यामुळें मात्र होतें. तेव्हां खरें म्हणजे मोंगल घराण्याचें राज्य हिंदुस्थानांत चांगल्या रीतीनें प्रस्थापित झालें तें अकबराच्याच कारकीर्दींत प्रथम झालें; त्याच वेळीं त्याचीं पाळेंमुळें येथील भूमींत रुजून एकजीव झालीं आणि त्याच्याच कारकीर्दींत त्या घराण्याच्या ठिकाणीं आपण सर्वथा हिंदीच आहोंत अशी भावना निर्माण झाली. त्याच्याच कारकीर्दींत मोंगल राजांचें यूरप खंडांत महान् मोंगल हें नांव प्रचारांत आलें. अकबर हा अगदीं हम करें सो कायदा अशा प्रवृत्तीचा राज्यकर्ता होता आणि त्याच्या हातीं सत्ताही अगदींच अनियंत्रित अशा प्रकारची होती. राज्यकर्त्यांच्या अधिकारावर नियंत्रण ठेवण्याची गोष्ट त्या काळच्या हिंदुस्थानांत कोठेंही कानाच्या कोपऱ्याला सुद्धां माहीत नव्हती. योगायोग मात्र असा होता, कीं अनियंत्रित सत्ताधारी असला तरी अकबर हा फार शहाणा राजा होता आणि हिंदी लोकांचें कल्याण व्हावें म्हणून त्यानें जिवापाड मेहनत घेतली. एका दृष्टीनें हिंदी एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा तो जनक होऊन गेला असें म्हणतां येईल. त्या काळीं एकदेशीय किंवा एकराष्ट्रीय अशी भूमिका जवळजवळ नव्हतीच; धर्मा-वरूनच निरनिराळे पक्ष किंवा गट अद्यापि पडत होते; अशा त्या काळीं भिन्न धर्मांमुळें पडणारे तट बाजूला सारून त्यांच्याऐवजीं, किंबहुना त्यांच्याविरुद्ध अकबरानें जाणून-बुजून धर्मजातिनिरपेक्ष अशा रीतीनें सर्व देशाबद्दलचें एकराष्ट्रीयत्वाचें ध्येय उचलून धरलें. या प्रयत्नांत त्याला संपूर्ण यश आलें नाहीं हें खरें; परंतु त्यानें ही एवढी लांब




मजल मारली आणि त्याच्या प्रयत्नांत त्याला पुष्कळ मोठ्या प्रमाणांत यशही मिळालें, हीच गोष्ट त्या काळच्या मानानें अत्यंत अचंबा करण्यासारखी वाटते.

परंतु अकबराला या प्रयत्नांत जें कांहीं थोडेंफार यश मिळालें तें कांहीं अगदीं कोणाच्याही मदतीशिवाय केवळ स्वतःच्या एकट्याच्याच प्रयत्नानें मिळालें असें मात्र नव्हे. योग्य काळ आणि संधि प्राप्त झाल्याशिवाय आणि आजुबाजूची परिस्थिति व वातावरणाची अनुकूलता उत्पन्न झाल्याशिवाय कोणालाही महत्कार्यांत यश मिळूं शकत नाहीं. श्रेष्ठ पुरुष काळाची गति जरा अधिक वेगाची करूं शकतो आणि आपल्याला जरूर तें वातावरणही तो निर्माण करूं शकतो हें खरें; तथापि श्रेष्ठ पुरुष झाला, तरी बदलता काळ आणि प्रचलित वातावरण किंवा परिस्थिति यांच्यांतूनच तो जन्माला येत असतो. म्हणून अकबर हा सुद्धां हिंदुस्थानांतील त्या काळानेंच निर्माण केलेला महापुरुष होता असें म्हटलें पाहिजे.

या देशांत सहजीं एकत्र आलेल्या या दोन धर्मांमध्यें आणि संस्कृतींमध्यें एक

प्रकारचा समन्वय साधावा म्हणून कित्येक प्रयत्न व प्रवाह गाजावाजा न करतां — कोणाला न कळतच — कशा प्रकारें चालू होते, हें मागच्या एका पत्रांत मीं तुला सांगितलें आहे. इमारतींच्या बांधकामामध्यें नवीन शिल्पपद्धति कशी अस्तित्वांत येत होती आणि हिंदुस्थानच्या भाषांमध्यें, विशेषतः हिंदुस्थानी आणि उर्दू यांची, वाढ कशा रीतीनें होत होती हें मीं तुला सांगितलें. तसेंच रामानंद, कबीर, गुरु नानक यांच्यासारखे धर्मसुधारक किंवा धार्मिक नेते इस्लामधर्म आणि हिंदुधर्म यांमधील समान अशा गोष्टींवर भर देऊन व त्यांमधील कर्मकांडावर व मंत्रतंत्रावर हल्ला करून या दोन्ही धर्मांमधील अंतर कमी करण्याचा प्रयत्न कसा करीत होते, हेंही मीं तुला सांगितलें. अशा रीतीनें समन्वयाची ही प्रवृत्तीच जणुं त्या काळीं सुरू झालेली होती. आणि अकबराची ग्रहणशक्ति अत्यंत कुशाग्र व तरल असल्यामुळें त्यानें ही प्रवृत्ति ओळखून आत्मसात् केली असली पाहिजे आणि त्या प्रवृत्तीचा बदल त्याच्या मनोभूमिकेचें स्वरूप निश्चित होण्यात झाला असला पाहिजे. एवढेंच नव्हे, तर तो स्वतः या प्रवृत्तीचा प्रमुख प्रचारकर्ताच झाला.

आपल्या स्वतःच्या राज्याला आणि हिंदुस्थान देशालाही या समन्वयामुळें सामर्थ्य प्राप्त होईल हें एक राजकारणी पुरुष या नात्यानें सुद्धां त्याला समजून चुकलें असलें पाहिजे. अकबर हा चांगला शूर लढवय्या होता आणि कर्तबगार सेनापति पण होता. या बाबतींत त्याचें अशोकाशीं साम्य नव्हतें. लढाईचा त्याला कधींच कंटाळा नव्हता. परंतु तलवारीच्या जोरावर मिळालेल्या लाभापेक्षां प्रेमाच्या बळावर झालेले लाभ हेच त्यालाही अधिक आवडत असत आणि तेच अधिक चिरस्थायी होऊं शकतात हेंही तो जाणणारा होता. त्यामुळें हिंदू सरदार-दरकदार व सामान्य हिंदु जनता यांच्या मनांत आपल्याविषयीं सद्भाव जागृत करण्याचा उपक्रम त्यानें जाणूनबुजून चालू केला. बिगर मुसलमानांवरचा जिझियाकर आणि हिंदू यात्रेकरूंवरील कर हे कर त्यानें माफ केले. त्यानें स्वतः रजपूत राजघराण्यांतील एका स्त्रीशीं लग्न केलें; पुढें आपल्या मुलाचेंही त्यानें एका रजपूत मुलीशीं लग्न केलें. अशा तऱ्हेच्या मिश्र विवाहाला तो प्रोत्साहन देऊं लागला. रजपूत सरदारांना त्यानें साम्राज्याच्या कारभारातील मोठ्या मोठ्या जागांवर अधिकारी नेमलें. त्याचे कित्येक अत्यंत शूर सेनापती, अत्यंत कर्तबगार मंत्री आणि प्रांताधिप हे हिंदू होते. राजा मानसिंगाला तर त्यानें कांहीं काळपर्यंत प्रत्यक्ष काबूल येथें गव्हर्नर — प्रांताधिप — म्हणून पाठविलेलें होतें. एवढेंच नव्हे, तर रजपूत सरदार आणि हिंदु जनसमाज यांना संतुष्ट ठेवण्याच्या या प्रयत्नांत केव्हां केव्हां तो येथपर्यंत मजल गांठी, कीं त्यामुळें त्याच्या मुसलमान प्रजेवर त्याच्या हातून अन्याय होई. एवढें मात्र खरें, कीं हिंदू लोकांची अनुकूलता मिळविण्याच्या या प्रयत्नांत त्याला चांगलेंच यश आलें आणि रजपूत लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याची नोकरी करण्यासाठीं आणि त्याचा सन्मान करण्यासाठीं त्याच्याकडे येऊं लागल्या. मेवाडचा राणा प्रतापसिंग हा एकटा एकच रजपूत तेवढा त्याच्यापुढें मान न वांकवितां

ताठरपणें त्याच्यापासून दूर राहिला. बाकी सर्व रजपूत अकबराकडे ओढले गेले. राणा प्रतापानें नुसता नांवापुरतासुद्धां अकबराचा वरिष्ठत्वाचा अधिकार मान्य केला नाहीं. युद्धांत त्याचा पराभव झाला; परंतु अकबराचा मांडलिक म्हणून खातपीत सुखानें दिवस काढण्यापेक्षां रानावनांत वध्य सावजाप्रमाणें भटकणें त्यानें अधिक पसंत केलें! सार्‍या जन्मभर या स्वाभिमानी रजपूत वीरानें दिल्लीच्या महान् बादशहाशीं लढाई दिली आणि त्याच्यापुढें तो केव्हांही वांकला नाहीं. आयुष्याच्या अखेरीअखेरीला तर त्याला थोडेंफार यशही मिळालें. राजपुतान्यामध्यें या रजपूत वीराची स्मृति सर्वांच्या हृदयांत अत्यंत मौल्यवान् ठेवा म्हणून सांठविलेली असून त्याच्यासंबंधीं तेथें कितीएक मधुर लोककथा आणि दंतकथा निर्माण झालेल्या आहेत.

तात्पर्य, अकबरानें रजपुतांना आपल्या बाजूला वळविलें आणि सामान्य जनतेंतही तो लोकप्रिय झाला. पारशी लोकांना त्यानें पुष्कळ सवलती दिल्या; त्याचप्रमाणें त्याच्या दरबारीं आलेल्या जेसुइट मिशनरी लोकांनासुद्धां त्यानें सवलतीनेंच वागविलें. परंतु हें त्याचें सवलतीचें धोरण आणि कांहीं मुसलमानी रीतीरिवाजांकडे त्यानें केलेलें दुर्लक्ष यामुळें मुसलमान सरदार मात्र त्याच्यावर नाखूष झाले आणि त्यांनीं त्याच्याविरुद्ध कितीएक बंडें उभारण्याचे प्रयत्न केले.

अकबराचें अशोकाशीं साम्य वाटतें असें मीं म्हटलें; परंतु या तुलनेवरून भलतीच समजूत मात्र करून घेऊं नकोस. पुष्कळ बाबतींत तो अशोकाहून अगदीं निराळ्या प्रकारचा होता. एक तर तो फारच महत्त्वाकांक्षी होता आणि अगदीं अखेरच्या क्षणापर्यंत आपलें साम्राज्य वाढविण्याच्या अत्यंत तीव्र इच्छेनें नवे नवे प्रांत जिंकून घेण्याचें त्याचें काम सारखें चालूच होतें. जेसुइट लोकांनीं त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"त्याची बुद्धि चपल आणि विवेचक होती. त्याच्या अंगीं अचूक निर्णय करण्याची मोठी शक्ति होती. व्यवहारामध्यें तो मोठा दूरदृष्टीनें वागणारा होता. विशेष म्हणजे तो दयाळू, बोलण्याचालण्यांत मोठा गोड, आणि उदार होता. या गुणांच्या जोडीला त्याच्या अंगीं मोठमोठीं पराक्रमाचीं कामें अंगावर घेऊन तीं पार पाडणार्‍यांच्या ठिकाणीं ज्या प्रकारचें धैर्य व हिंमत असतें, तसें धैर्य व हिंमतही होती. नानाविध गोष्टी पाहाव्या अशी त्याला हौस होती. पुष्कळशा गोष्टी शिकाव्या अशी त्याला जिज्ञासा होती. युद्ध आणि राज्यकारभार यांच्याविषयींच फक्त त्याला खोल ज्ञान होतें असें नव्हे, तर यांत्रिक व हस्तकौशल्याच्या कारागिरीचेंही त्याला चांगलें खोल ज्ञान होतें. ...... व्यक्तिशः खुद्द त्याचा अपमान करणारावरसुद्धां या राजाच्या नेत्रांमधून दया आणि मृदुता यांच्याच प्रकाशाचे मधुर किरण पडत असत. त्याला फारच क्वचित् राग येत असे. जेव्हां राग येई तेव्हां त्याचें डोकें पार भडकून गेल्यासारखें होई; पण हा त्याचा राग केव्हांही फार काळ टिकत नसे." हें वर्णन कोणीं एखाद्या दरबारी सेवकानें केलेलें नाहीं; तर अकबराचें सर्व बाजूंनीं

निरीक्षण करण्याला ज्याला पुष्कळ अवसर मिळाला होता अशा दुसऱ्याच एका देशांतील परकी माणसानें तें केलेलें आहे, हें विशेष लक्षांत घे यामध्यें तूं.

शरीराच्या दृष्टीनें पाहतां अकबर अलौकिक शक्तिमान् आणि चपळ होता. रानटी धोकेबाज प्राण्यांची शिकार करण्याची त्याला इतर कशाहीपेक्षां फार मोठी आवड होती. लढवय्या या नात्यानें तो फारच शूर होता. प्राणांचीसुद्धां पर्वा न करतां वाटेल तें अविवेकी साहस करण्यापर्यंतसुद्धां त्याची मजल जात असे. आग्र्याहून अहमदाबादपर्यंत त्यानें नऊ दिवसांत कूच केल्याची प्रसिद्ध हकीगत आहे. तिच्यावरून त्याच्या ठिकाणीं केवढी अचंबा वाटण्याइतकी शक्ति व उत्साह होता हें दिसून येण्यासारखें आहे. गुजरातमध्यें एक बंड उभें राहिलें होतें. त्यासाठीं एक छोटेंसें सैन्य बरोबर घेऊन एवढ्या थोड्या अवधींत ४५० मैलांचें अंतर राजपुतान्याच्या निर्जन रखरखीत मैदानांतून कूच करून अकबरानें तोडलें व बंडाच्या ठिकाणीं तीरासारखा तो आला. खरोखरच ही एक अलौकिक पराक्रमाची गोष्ट होती. त्या वेळीं प्रवासासाठीं कांहीं आगगाड्या किंवा मोटारगाड्या नव्हत्या, हें कांहीं मी तुला सांगायला नको.

परंतु श्रेष्ठ मनुष्यांच्या ठिकाणीं या सर्व गुणांपेक्षां निराळें असें आणखी कांहीं तरी असतें. असें म्हणतात, कीं त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारची विशेष आकर्षक शक्ति असते आणि तिच्यामुळें लोक त्यांच्याकडे ओढले जातात. अकबराच्या ठिकाणीं ही वैयक्तिक आकर्षकता आणि मोहकता फारच मोठ्या प्रमाणांत होती. लोकांचें चित्त आपल्याकडे खेंचून घेणारे त्याचे डोळे "सूर्यप्रकाशामध्यें समुद्रपृष्ठावर चमकत व नाचत असणाऱ्या तरंगांप्रमाणें दिसत" असें जेसुइट लोकांनीं अकबराचें जें मधुर वर्णन केलेलें आहे, त्यांत म्हटलें आहे. अशा या माणसाकडे आजही आपलें लक्ष वेधावें आणि त्याची श्रेष्ठतम राजवैभवानें परिपूर्ण आणि पौरुषयुक्त मूर्ति, नुसते नांवाला जे असंख्य राजे होऊन गेले त्यांच्या गर्दींत एखाद्या ताऱ्याप्रमाणें चमकून दिसावी, यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे?

राज्य जिंकण्याच्या बाबतींत सर्व उत्तर हिंदुस्थानांत आणि दक्षिण हिंदुस्थानांतसुद्धां अकबराला यश मिळालें. गुजरात, बंगाल, ओरिसा, काश्मीर आणि सिंध हे प्रांत त्यानें आपल्या साम्राज्यांत सामील केले. मध्य हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान यांमध्येंही तो विजयी झाला व तेथून तो खंडणी वसूल करूं लागला. मध्य हिंदुस्थानांतील राणी दुर्गावतीचा त्यानें पराभव केला. यांत मात्र त्यानें कसलें शौर्यही गाजविलें नाहीं किंवा कांहीं विशेष चांगुलपणाचें कृत्य केलें असेंही नाहीं. ही राणी मोठी शूर आणि चांगल्या रीतीनें राज्य करणारी होती. तिच्यापासून अकबराला कसलाही त्रास पोंचत नव्हता; पण महत्त्वाकांक्षा आणि साम्राज्यवर्धनाचा लोभ यांच्यापुढें असल्या छोट्या बाबींचा कोण विचार करतो? दक्षिण हिंदुस्थानांतही त्याच्या सैन्याला आणखी एका राज्यकर्त्या स्त्रीशीं लढण्याचा प्रसंग आला. ती स्त्री म्हणजे अहमदनगरच्या राज्याची

कारभारीण प्रख्यात चांदबिबीची ही होय. ही बाई मोठ्या धैर्याची आणि कर्तबगार होती. तिनें मोंगल सैन्याशीं अशी मोठ्या दमानें लढाई दिली, कीं तिच्याशीं आधिक लढण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें उमजून मोंगलांनीं तिच्याशीं सोयिस्कर अशा अटींवर तह केला. दुर्दैवानें तिच्याच कोणा असंतुष्ट शिपायाच्या हातून तिचा वध झाला!

अकबराच्या सैन्यानें चितोडलाही वेढा दिलेला होता. पण ही राणा प्रतापच्या आधींची गोष्ट. त्या वेळीं तेथील जयमल राजानें चितोडचा फार शौर्यानें बचाव करण्याचा प्रयत्न केला. तो मरण पावल्यावर चितोड येथें पुन्हां एकवार जोहारचा भयंकर प्रकार करण्यांत आला आणि मग चितोडचा पाडाव झाला.

अकबरानें आपल्यापाशीं पुष्कळच स्वतःवर निष्ठा असलेले असे कर्तबगार मदतनीस गोळा केलेले होते. त्यांच्यामध्यें फैझी आणि अबुल फजल हे दोन भाऊ आणि बिरबलच्या गोष्टी म्हणून आजकालही ज्याच्या गोष्टी सांगितल्या जातात तो बिरबल, हे तिघे विशेष प्रमुख होते. तोडरमल हा त्याचा अर्थमंत्रि होता. त्यानेंच सगळी महसूल-पद्धति सुधारून नव्या पद्धतीची केली. त्या काळीं आपल्याकडे जमीनदारी नव्हती आणि जमीनदार आणि तालुकदारही कोणी नव्हते हें ऐकून तुला मोठेंच आश्चर्य वाटेल. प्रत्यक्ष राज्यामार्फतच व्यक्तिशः शेतकऱ्यांकडून किंवा रयतांकडून कर वसूल केला जात असे. याच पद्धतीला हल्लीं रयतवारी पद्धति म्हणतात. हल्लींचे जे जमीनदार लोक आहेत ते ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं निर्माण केलेले आहेत.

जयपूरचा राजा मानसिंग हा अकबराचा एक फार श्रेष्ठ सेनापति होता. अकबराच्या दरबारांतील आणखी एक प्रख्यात व्यक्ति म्हणजे तानसेन नांवाचा श्रेष्ठ गवय्या. आज तो हिंदुस्थानांतील सर्व गवय्यांचा जणुं प्रतिपरमेश्वरच झालेला आहे!

सुरुवातीला अकबराची राजधानी आग्रा येथें होती. तेथील किल्ला त्यानेंच बांधला. त्यानंतर त्यानें आग्र्यापासून पंधरा मैलांवर फत्तेपूर शिक्री येथें एक नवीन शहर वसविलें. या ठिकाणीं शेख सलीम खिस्ती नांवाचा एक साधुपुरुष राहत असे. म्हणून ही जागा त्यानें पसंत केली. येथें त्यानें वसविलेलें तें भव्य व वैभवसंपन्न शहर "लंडनपेक्षां किती तरी मोठें" होतें असें एका तत्कालीन इंग्रज प्रवाशानें लिहिलेलें आहे. पंधरा वर्षेपर्यंत मोंगल साम्राज्याची राजधानी या ठिकाणीं होती. त्यानंतर अकबरानें लाहोर येथें आपली राजधानी केली. अकबराचा मित्र आणि मंत्री अबुल फझल यानें लिहिलें आहे: "बादशहा सलामत अलीशान हे भव्य व मोहक इमारतींच्या योजना व नकाशे आंखति असतात आणि अशा रीतीनें आपलें अंतःकरण व बुद्धि यांच्या ठिकाणचें कर्तृत्व आणि सामर्थ्य दगड आणि माती यांच्या बांधकामांच्या रूपानें व्यक्त करीत असतात." फत्तेपूर शिक्री हें शहर, त्यामधील ती सुंदर मशीद, तो मोठा बुलंद दरवाजा आणि इतर अनेक सुंदर इमारती यांसह आजही उभें आहे. आज त्यामध्यें लोकवस्ती म्हणण्यासारखी नाहीं आणि त्याच्यांत

जिवंतपणाही उरलेला नाहीं; परंतु त्याच्या रस्त्यावरून आणि विशाल चौकांमधून आणि प्रांगणांमधून त्या मृत साम्राज्याचें पिशाच अजूनही वावरतें आहे, असा मनाला भास होतो !

आपलें आताचें अलाहाबाद शहर हेंही अकबरानेंच वसविलें; अर्थात् त्या शहराचें स्थान हें फारच प्राचीन काळचें आहे आणि प्रयाग शहर हें त्या ठिकाणीं थेट रामायणाच्या काळापासून वसलेलें आहे. अलाहाबादचा किल्ला हा अकबरानेंच बांधलेला आहे.

नवीन राज्यें जिंकून घ्यावयाचीं, जिंकलेल्या राज्यांचें स्थिरस्थावर करून राज्य-कारभाराची नवीन व्यवस्था लावावयाची, अशा प्रकारें हा सर्व काळ अकबराला मोठाच धामधुमीचा गेला असेल. पण त्यांतही मुळाशीं पाहणाराला अकबराच्या ठिकाणची आणखी एक विशेष प्रवृत्ति आढळून येते; ती म्हणजे त्याच्या ठिकाणची अमर्याद जिज्ञासाबुद्धि आणि तज्जन्य सत्यसंशोधनासाठीं त्याचे प्रयत्न. ज्या कोणाला कोणत्या एखाद्या विषयांत कांहीं सांगण्याची शक्ति आहे म्हणून कळेल, त्याला अकबर बोलावून घेई आणि त्याला तऱ्हतऱ्हेचे प्रश्न विचारून त्याच्याकडून माहिती मिळवी. निरनिराळ्या धर्मांचे लोक त्याच्याभोंवतीं त्याच्या इबादतखान्यामध्यें जमा झालेले होते. या महान् शक्तिमान् बादशहाला आपण आपल्या धर्माकडे वळवून घेऊं अशी त्यांपैकीं प्रत्येकाला मोठी आशा वाटत होती. त्यांच्यामध्यें आपसांत पुष्कळदां वाद आणि तंटेही होत असत आणि अकबर बसून त्यांचीं उत्तरें-प्रत्युत्तरें ऐकत असे आणि अधूनमधून आपण स्वतःही त्यांना पुष्कळ प्रश्न करीत असे. सत्य हें कांहीं कोणत्याही एका विशिष्ट धर्माची किंवा पंथाची मिरास नव्हे, अशी त्याची खात्री पटलेली असावी असें दिसतें; आणि धर्माच्या बाबतींत विश्वांतील एकूण एक मनुष्याला पूर्ण उदारपणें वागविण्याचें आपलें निश्चित धोरण आहे, असें त्यानें जाहीरही केलें होतें.

त्याच्या काळचा एक इतिहासकार (मुल्ला अबदुल कादीर) बदौनी यानें अकबराच्या या प्रवृत्तीबद्दल एक मोठा मनोरंजक वृत्तांत लिहिलेला आहे. तो मी यापुढें खालीं देणार आहें. वरच्यासारख्या वादविवादाच्या सभांतून या बदौनीनेंही स्वतः पुष्कळदां भाग घेतलेला असला पाहिजे. तो स्वतः जुन्या वळणाचा कट्टर मुसलमान होता आणि अकबराचा हा सगळा व्यवहार त्याला पूर्णपणें नापसंत होता. तो लिहितो,

"जहांपनाह एकूण एक माणसांचीं मतें गोळा करीत असत; जे मुसलमान नसतील त्यांचीं तर विशेषच; त्यांपैकीं जीं त्यांना आवडत त्यांचा ते आपल्यापाशीं संग्रह करीत आणि जीं त्यांच्या स्वभावाला रुचत नसत किंवा जीं त्यांच्या इच्छे-विरुद्ध असत तीं ते टाकून देत. अगदीं बाळपणापासून तों तारुण्यापर्यंत आणि तारुण्यापासून वृद्धापकाळापर्यंत जहांपनाहांनीं असंख्य निरनिराळ्या प्रवृत्तींचा अनुभव घेतलेला आहे. निरनिराळे धार्मिक आचार आणि निरनिराळ्या पंथांचीं मतें या सर्वांची त्यांनीं चांगली ओळख करून घेतलेली आहे आणि लोकांना अनेक

ग्रंथांचा अभ्यास करून जें जें ज्ञान मिळेल त्या सर्व ज्ञानाचा त्यांनीं संग्रह केलेला आहे; परंतु त्या बाबतींत निवडानिवड करून आपल्या दृष्टीनें जरूर तेवढेंच संग्रहीं ठेवण्याची कांहीं विशेष प्रकारची बुद्धि त्यांच्या ठिकाणीं आहे आणि आपला हा सर्व ज्ञानसंग्रह त्यानीं ज्या विशिष्ट प्रकारच्या संशोधनबुद्धीनें केला आहे, ती संशोधनाची प्रवृत्ति आणि पद्धति इस्लामधर्माच्या तत्त्वाशीं, शरियतशीं अगदींच विरुद्ध आहे. त्यामुळें कांहीं मूलभूत तत्त्वांवर आधारलेली अशा प्रकारची धर्मभावना त्यांच्या हृदयाच्या आरशावर स्वतंत्रच कोरली गेली आहे आणि जहांपनाहाच्या मनावर जे हरएक तऱ्हेच्या विचारांचे परिणाम घडून आले, त्या सर्वांचा परिणाम म्हणून टाकीचे घण पडतां पडतां दगडांतून जशी एक स्पष्ट आकृति निर्माण व्हावी त्याप्रमाणें त्यांच्या हृदयांत अशी दृढ श्रद्धा निर्माण झालेली आहे, कीं शहाणे लोक सर्व धर्मांमध्यें असतात, तसेंच प्रमाणबद्ध विचारसरणी असणारे आणि ज्यांच्या ठिकाणीं चमत्कार वाटण्याजोगें अद्‌भुत सामर्थ्य आहे अशीं माणसें सर्व राष्ट्रांमध्यें असतात. तेव्हां कांहीं ना कांहीं खरें ज्ञान प्रत्येक ठिकाणीं सांपडतें अशी वस्तुस्थिति असतांना सत्य फक्त एकाच धर्मांत समाविष्ट झालेलें आहे, असा वृथा आग्रह कां धरावा?"

तुला आठवतच असेल, कीं याच काळांत यूरप खंडामध्यें धर्मांच्या बाबतींत अनुदारपणाला, माथेफिरूपणाला असामान्य ऊत आलेला होता. स्पेनमध्यें आणि नेदरलंडमध्यें व इतरत्रही इन्क्विझिशनचा धुमाकूळ चालू होता आणि कॅथॉलिक पंथाच्या माणसानें कॅल्व्हिनिस्ट पंथीयाला किंवा त्यानें पहिल्याला थारा द्यावयाचा किंवा थोडें बरेपणानें वागवावयाचें म्हणजे मोठें घातक महत्पाप समजलें जात होतें.

निरानिराळ्या धर्मांच्या पंडितांशीं अकबराचीं हीं संभाषणें आणि ही चर्चा वर्षानुवर्षें नित्य चालूच होती. शेवटीं हे पंडित लोक या सर्व प्रकाराला कंटाळले आणि त्याला आपापल्या धर्माकडे वळविण्याची त्याची आशा नाहींशी झाली. प्रत्येक धर्मांत जर कांहीं ना कांहीं सत्य हें होतेंच, तर मग त्यांतल्या एकालाच विशेष चिकटून आपण कां राहावें असा त्याचा प्रश्न होता. या बाबतींत एकदां त्यानें पुढीलप्रमाणें विधान केल्याचें जेसुइट लोकांनीं लिहून ठेवलेलें आहे: "जंटाईल* लोक समजतात, कीं आपला कायदा (धर्मशास्त्र) खरा; सारासन लोक असेंच मानतात आणि त्याचप्रमाणें ख्रिस्तीही. अशा स्थितींत कोणत्या धर्माचा आपण स्वीकार करावा?" अकबराचा हा प्रश्न खरोखर अगदीं न्याय्य व समर्पक होता; परंतु त्यामुळें त्या जेसुइट मंडळींचें पित्त खवळलेलें दिसतें; कारण त्यांनीं आपल्या ग्रंथांत पुढें लिहिलें आहे, "अशा रीतीनें या राजामध्येंही आपल्याला नास्तिकांच्या ठिकाणचा नेहमींचा दोष दिसून येतो. नास्तिक मनुष्य बुद्धीवर श्रद्धेचें नियंत्रण मान्य करीत नाहीं. त्याच्या दुर्बल मनाला, बुद्धीला ज्या गोष्टी खोलवर

* जंटाईल म्हणजे जेसुइट लोकांच्या मताप्रमाणें हिंदु; सारासन लोक म्हणजे अर्थातच मुसलमान. जेसुइट पाद्री हे पोर्तुगालमधील असल्यामुळें त्यांना स्पेनमधील सारासन लोक ठाऊक होते; त्यामुळें हिंदुस्थानांतील मुसलमान लोकांना सुद्धां ते त्याच नांवानें संबोधतात.

जाऊन पाहतां येणें शक्यच नसतें ती गोष्ट सत्य म्हणून मानण्यास तो तयार नसतो आणि मनुष्याच्या ग्रहणशक्तीची धांव जेथपर्यंत जास्तींत जास्त जाऊन पोंचणें शक्य आहे अशाही टप्प्याच्या पलीकडच्या, त्या ग्रहणशक्तीला आकलन न होणाऱ्या, गोष्टींच्या निर्णयाच्या बाबतींतही ते आपल्या अपूर्ण अशा बुद्धीवरच विसंबतात." हीच जर नास्तिकाची खरी व्याख्या असेल, तर असे नास्तिक जितके अधिक निर्माण होतील तितकें जगाचें अधिक कल्याण होईल.

अकबराचा हेतु तरी काय होता याचा स्पष्ट थांग लागत नाहीं. या गोष्टीकडे केवळ तो राजकारणी दृष्टिनेंच बघत होता काय ? या देशांत एकराष्ट्रीयत्व प्रस्थापित करण्याची त्याची इच्छा असल्यामुळें येथील सर्व धर्मांना एकाच ओळींत कसें तरी करून आणावें, असा त्याचा हेतु होता काय ? का त्याच्या मनातील ही प्रेरणा आणि सत्यसंशोधनाची धडपड या गोष्टींच्या मागें खरोखरच धार्मिक प्रवृत्ति होती ? मला कांहीं हें नीटसें सांगतां येणार नाहीं. परंतु त्याच्या अंगीं धर्मसुधारकापेक्षा राजकारणी पुरुषाच्या प्रवृत्तींचें प्रमाण अधिक होतें असेंच मला तरी म्हणावेंसें वाटतें. त्याचा उद्देश कांहीं असो, त्यानें एक नवाच धर्म प्रस्थापित केल्याचें जाहीर केलें ही गोष्ट खरी. या धर्माचें नांव दीने इलाही असून त्या धर्माचा प्रमुख स्वतः अकबर हाच होता. इतर बाबतींप्रमाणें धर्माच्या बाबतींत आपल्या एकतंत्री सत्तेला तो कसलाही पायबंद घालून घेण्याला तयार नव्हता आणि त्याच्याही धर्मामध्यें पायांवर लोटांगण घालणें आणि पायाचें चुंबन घेणें वगैरे प्रकारचीं किळसवाणीं तंत्रें होतींच ! या नव्या धर्मानें मूळ मात्र धरलें नाहीं. त्याचा कांहीं परिणाम झाला असला तर एवढाच, कीं मुसलमान लोक मात्र चिडून गेले.

अकबर म्हणजे सर्वाधिकारशाहीचा अगदीं अर्कच होता. तरीपण त्याच्यापुढें जर राजकीय उदारमतवादित्वाच्या कल्पना आल्या असत्या तर तो कसा वागला असता, याचा तर्क करून पाहणें मोठें गमतीचें आहे. व्यक्तीला धर्माच्या बाबतींत मतस्वातंत्र्य असणें जरूर आहे असें एकदां मान्य केलें, म्हणजे मग लोकांना अधिकाधिक राजकीय स्वातंत्र्यही असावें असें कां म्हणूं नये ? शास्त्रीय ज्ञानाची त्याला जर कोणी ओळख करून देता, तर त्याचें मन त्याकडे फारच वेधलें गेलें असतें हें खास. दुर्दैवाची गोष्ट या ज्या कांहीं नव्या कल्पनांची खळबळ यूरप खंडांत काहीं लोकांच्या मनामध्यें नुकतीच माजूं लागलेली होती, त्या कल्पनांचा प्रवेश या काळीं अजून हिंदुस्थानांत झालेला नव्हता. त्याचप्रमाणें येथें छापखान्याचाही उपयोग होऊं लागल्याचें दिसून येत नाहीं ; त्यामुळें शिक्षणाचा प्रसारही फारच मर्यादित प्रमाणावर झालेला होता. फार कशाला ? अकबराला स्वतःला लिहितां वाचतां येत नव्हतें हें ऐकून तर आश्चर्यानें तूं थक्क होऊन जाशील. असें असूनही तो फार मोठा विद्वान् मनुष्य होता आणि वाचून दाखविलेले ग्रंथ ऐकण्याची त्याला फार मोठी आवड होती. त्याच्या आज्ञेवरून किती तरी संस्कृत ग्रंथांचीं फारशी भाषेंत भाषांतरें करण्यांत आलीं होतीं.

अकबरानें हिंदूंमधील सती बंद करण्याबद्दल आणि लढाईंत पडलेल्या कैद्यांना गुलाम करण्याची पद्धति बंद करण्याबद्दल हुकूम काढलेले होते, ही गोष्ट मुद्दाम नमूद करण्यासारखी आहे.

जवळजवळ पन्नास वर्षांच्या कारकीर्दीनंतर वयाच्या ६४ व्या वर्षी अकबर इ. स. १६०५ च्या ऑक्टोबर महिन्यांत मरण पावला. आग्र्याजवळ शिकंदरा येथें एका सुंदर कबरीमध्यें त्याच्या शवाचें दफन करण्यांत आलेलें आहे.

अकबराच्या काळांत उत्तर हिंदुस्थानमध्यें, बहुतेक करून काशी येथेंच, असा एक मनुष्य होऊन गेला, कीं ज्याचें नांव आज आपल्या संयुक्त प्रांतांत एकूण एक खेड्यांमध्यें सुप्रसिद्ध आहे. अकबर किंवा दुसऱ्या कोणत्याही राजापेक्षां हा गृहस्थ या खेड्यापाड्यांत अधिक माहितीचा आहे. हिंदीमध्यें रामचरितमानस म्हणजेच रामायण लिहिणारा कवि तुलसीदास याला उद्देशून हें मी म्हणतों आहें.

## ९०

# हिंदुस्थानांतील मोंगल साम्राज्याचा ऱ्हास व नाश

९ सप्टेंबर, १९३२

अकबराबद्दल आणखी सुद्धां कांहीं कांहीं तुला सांगावें असा माझ्या मनाला मोह पडतो आहे; पण मनाला आवर घातला पाहिजे मला. तरी पण पोर्तुगीज मिशनऱ्यांनीं लिहिलेल्या वृत्तांतांतून थोडेसे उतारे दिल्यावांचून मात्र माझ्याच्यानें राहवतच नाहीं. दरबारी सेवकांच्या अभिप्रायापेक्षां या स्वतंत्र लोकांच्या अभिप्रायाला फार जास्त किंमत आहे; आणखी अकबर ख्रिस्ती झाला नाहीं म्हणून त्याच्यावर ते फार असंतुष्ट झालेले होते हें एक त्यांत विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. असें असूनही त्यांनीं लिहिलें आहे, "तो खरोखरच एक श्रेष्ठ राजा होता. कारण ज्याला प्रजेच्या ठिकाणीं आपल्याविषयीं एकाच वेळीं आज्ञाधारकता, आदर, प्रेम आणि भीति या सर्व भावना निर्माण करतां येतात त्यालाच चांगला राज्यकर्ता म्हणतां येईल, ही गोष्ट तो चांगली जाणत होता. हा सर्वांचा आवडता राजा होता; मोठ्या लोकांशीं तो ताठपणानें वागत असे, गरीबगुरिबांशीं तो दयाळूपणानें वागत असे आणि उंच-नीच, शेजारी किंवा परकी, ख्रिस्ती, सारासन किंवा जंटाईल ( हिंदु ) कोणीही कसाही असो, सर्वांशीं सारख्या न्याय्य बुद्धीनें तो वागत असे. त्यामुळें प्रत्येक मनुष्याला असें वाटे, कीं "राजा आपल्या बाजूचा आहे." पुढें एका ठिकाणीं या जेसुइट लोकांनीं लिहिलें आहे, "आतां या क्षणीं तो राज्यकारभाराच्या कामांत किंवा प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकण्यांत अगदीं दंग झालेला असेल, तर दुसऱ्याच क्षणीं तो उंटांची भादरणी करीत असतांना

आढळेल; नाहीं तर दगड घडवितांना, लांकूड फोडतांना, किंवा लोखंडावर घण मारतांना दिसेल; आणि त्यांतली प्रत्येक गोष्ट जणुं कांहीं आपला अगदीं रोजचा धंदाच आहे इतक्या तन्मयतेनें आणि कसोशीनें करतांना तो आढळेल." एवढा मोठा बलिष्ठ आणि एकतंत्री राज्यकर्ता जरी तो होता, तरी आज कितीएक लोक समजतात त्याप्रमाणें हातकाम करणें हें कमीपणाचें आहे असें तो मुळींच समजत नसे.

पुढें एके ठिकाणीं आणखी असें सांगतात हे लोक: "त्याचा आहार बेतशीर होता; मांस तो वर्षांतून तीनचार महिनेच फक्त खात असे... रात्रीचे जेमतेम तीन तास त्याला झोंप घ्यावयाला मिळे... त्याची स्मरणशक्ति अलौकिक होती. त्याच्याजवळ हजारों हत्ती असत तरी त्या सर्वांचीं नांवें त्याच्या लक्षांत असत; त्याचप्रमाणें आपले घोडे, हरिणें यांचीं आणि कबूतरांचीं नांवें सुद्धां त्याच्या ध्यानांत राहत असत." माणसाच्या ठिकाणीं इतकी थक्क करून टाकण्यासारखी स्मरणशक्ति असेल, या गोष्टीवर आपला सहसा विश्वास बसत नाहीं; आणि या हकिकतींत थोडीफार अतिशयोक्तीही असेल. परंतु त्याची बुद्धि असामान्य होती याबद्दल मुळींच संशय नाहीं. "त्याला जरी लिहितां-वाचतां येत नव्हतें, तरी आपल्या राज्यांत कोठें काय चाललें आहे याची त्याला खडान्‌खडा माहिती असे." आणि त्याची "ज्ञानाविषयींची तळमळ" इतकी मोठी होती कीं "भुकेलेला मनुष्य ज्याप्रमाणें आपल्या पुढचें अन्न एकाच घासांत खाऊन टाकावें असें म्हणतो, त्याप्रमाणें तो सगळें कांहीं एकदम शिकण्याची धडपड करीत असे."

अकबर हा अशा प्रकारचा होता. परंतु तो संपूर्णपणें एकतंत्री राज्य करण्याची आवड असणारा राजा होता. लोकांच्या जीवनांत त्यानें पुष्कळशी निश्चितता निर्माण केली आणि शेतकऱ्यांवरील करांचें ओझें कमी केलें हें जरी खरें, तरी पण शिक्षण आणि संस्कार यांच्या योगानें लोकांच्या सुधारणेची उंचीच सामान्यपणें वाढवावी याकडे कांहीं त्याच्या मनाचा कल नव्हता. चीनमध्यें कुब्लाईखानाच्या वंशाची गोष्ट घडली, त्याप्रमाणें अकबरापासून पुढें मोंगल राजघराणें हेंही एक हिंदी राजघराणें होऊन गेलें. आणि आपलें साम्राज्य एकसूत्री आणि सुदृढ करण्याचा अकबरानें जो महान् प्रयत्न यशस्वीपणें केला होता, त्यामुळें त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वंशाची कारकीर्द शंभर वर्षांहून अधिक काळपर्यंत चालू राहिली.

अकबराच्यानंतरचे तीन राजे चांगले कर्तबगार निघाले. परंतु अलौकिक असें मात्र त्यांच्या ठिकाणीं कांहीं नव्हतें. बादशहा मेला रे मेला कीं आतां त्याच्या मुलांत राज-सिंहासनासाठीं ओंगळवाणी झटापट सुरू होऊं लागली. अंतर्गत कारस्थानें, वारसासाठीं लढाया, मुलांचीं बापाविरुद्ध बंडें, भावांविरुद्ध बंडें, खून, डोळे काढणें—अनियंत्रित आणि बेजबाबदार अशा राजशाहीच्याबरोबर येणारे हे सर्व प्रकार या राजवटींतही घडून येऊं लागले. ज्याला कोठेंही तोड सांपडणार नाहीं इतकें मोठें ऐश्वर्य, वैभव आणि दिमाख या राज्यामध्यें आढळून येत होता. तुला आठवतच असेल, कीं फ्रान्समध्यें

राजसूर्य म्हटला जाणारा चौदावा लुई मोठ्या वैभवानें तळपत होता, व्हर्सायचें शहर वसवीत होता आणि मोठा थाटाचा दरबार नांदवीत होता तोच हा काळ. परंतु या महान् राजाचें वैभव मोंगल बादशहाच्या वैभवापुढें अगदींच फिकें होतें. मोंगल बादशहा हे आपल्या काळीं सर्व पृथ्वीमध्यें अधिकांत अधिक संपन्न राजे होते असें दिसतें. तरी पण अधूनमधून त्यांच्या राज्यांत दुष्काळ पडतच असत; निरनिराळे सांथीचे रोगही उत्पन्न होत आणि त्यामुळें हजारों-लाखों लोक मृत्युमुखीं पडत; इकडे दरबारामध्यें मात्र विलास व ऐश्वर्य यांची चंगळ चाललेली असे.

सर्व धर्मांना उदारपणें वागविण्याचें अकबराच्या काळचें धोरण पुढें त्याचा मुलगा जहागीर याच्या कारकीर्दींत चालू राहिलें. पण त्यापुढें तें मागें पडूं लागून खिस्ती व हिंदू लोकांवर थोडा थोडा जुलूम होऊं लागला. नंतर औरंगजेबाच्या कारकीर्दींत तर देवळें फोडून टाकून आणि जिझियाची डोईपट्टी पुन्हा लादून हिंदूंचा छळ करण्याचा जाणूनबुजून कसून प्रयत्न करण्यांत आला. अशा रीतीनें अकबरानें ज्या गोष्टींचा अत्यंत सुदृढ पाया मोठ्या दीर्घ परिश्रमानें आपल्या साम्राज्याच्या तळाशीं रचला होता, त्या गोष्टी एकामागून एक नाहींशा करण्यात आल्या आणि त्यामुळें मोंगलांचें साम्राज्य एकदम हादरा बसून कोलमडून पडलें.

अकबराच्या पाठीमागून रजपूत पत्नीपासून झालेला त्याचा मुलगा जहांगीर हा गादीवर आला. आपल्या बापाची परंपरा त्यानें थोड्याफार प्रमाणात चालू ठेवली. परंतु एकंदरीनें राज्यकारभारापेक्षां बहुतेक कलाकौशल्य, चित्रकला, उद्यानें आणि फुलें यांकडेच त्याचें लक्ष अधिक होतें. त्याच्यापाशीं फार सुंदर चित्रसंग्रह त्यानें जमा केला होता. दरवर्षी तो काश्मीरमध्यें जात असे; आणि मला वाटतें, श्रीनगरजवळच्या त्या सुप्रसिद्ध शालिमार आणि निशात या बागा त्यानेंच उभारल्या. जहांगीरची पत्नी, अथवा खरें म्हटलें म्हणजे त्याच्या पुष्कळशा बायकांपैकीं एक, सौंदर्यशाली नूरजहान ही होती. राज्यकारभाराची खरी सत्ता या स्त्रीच्या हातामध्यें होती. एत्मादुद्दौला याचें थडगें ज्यात आहे ती इमारत जहांगीरच्याच कारकीर्दींत बांधली गेली. मी केव्हांही जरी आग्रा येथें गेलों तरी शिल्पकलेंतील या रत्नाचें अवश्य दर्शन घेतों आणि त्याच्या अपूर्व सौंदर्यानें माझ्या सौंदर्यासक्त डोळ्यांचें पारणें फेडून घेतों.

जहांगीरनंतर त्याचा मुलगा शहाजहान गादीवर आला. त्यानें तीस वर्षें राज्य केलें (१६२८ ते १६५८). हा फ्रान्सच्या चौदाव्या लुईशीं समकालीन होता. त्याच्या कारकीर्दींत मोंगलांचें ऐश्वर्य कळसास पोंचलें आणि त्याच्याच कारकीर्दींत पुढच्या ऱ्हासाचीं बीजेंही वर डोकावूं लागलीं. याच्या कारकीर्दींत तें अत्यंत मौल्यवान् रत्नांनीं खचलेलें असें विख्यात मयूरसिंहासन बादशहासाठीं म्हणून तयार करण्यांत आलें. आग्रा येथील यमुना नदीच्या तीरावरील स्वर्गीय सौंदर्यानें विनटलेला, सौंदर्याचा साक्षात्कार, रमणीयतेचें स्वप्नरंजनच जणुं, असा तो ताजमहाल हाही याच काळांत तयार झाला. ताजमहाल म्हणजे शहाजहानची प्रेमळ पत्नी मुमताजमहाल हिचें कबरस्तान आहे हें बहुतेक तुला

ठाऊक असेल. परंतु शहाजहाननें स्वतःच्या मान्यतेला किंवा चांगुलपणाला बट्टा लावणाऱ्याही कित्येक गोष्टी केल्या. धर्माच्या बाबतींत तो अनुदारपणें वागला; त्याचप्रमाणें दक्षिण हिंदुस्थान आणि गुजरात यांच्यामध्यें एकदां भयंकर दुष्काळानें कहर गुदरविलेला असतांना त्या प्रांतांना मदत देण्यासाठीं त्यानें जवळजवळ कांहीं सुद्धां केलें नाहीं. त्याच्या प्रजेचें दारिद्र्य आणि दैन्य याच्याशीं जोडून पाहिलें असतां त्याची संपत्ति आणि वैभव यांची खरोखर अत्यंत किळस वाटूं लागते. इतकें असूनही साध्या आणि संगमरवरी दगडाचीं जीं अजब सौंदर्यशाली बांधकामें त्यानें आपल्यामागें आमच्यासाठीं ठेवलीं आहेत, त्यामुळें त्याचीं पुष्कळशीं पापें माफ करावींशीं वाटतात. मोंगलांची शिल्पकला आणि वास्तुशास्त्रही पण त्याच्याच काळीं अगदीं कळसास पोंचलीं. ताजमहालखेरीज आग्रा येथील मोती मशीद शहाजहाननेंच बांधविली. त्याचप्रमाणें दिल्ली येथील ती प्रचंड जामी मशीद, आणि दिल्लीच्या राजवाड्यामधील दिवाण-ई-आम व दिवाण-ई-खास हे दिवाणखाने पण. या इमारतींमध्यें एक प्रकारचें उदात्त व रमणीय साधेपण आहे; त्यांतील कांहीं विस्तारानें फारच प्रचंड आहेत; तथापि त्याच्यामध्यें नाजुकपणा आहे, सफाईदारपणा आहे, डौलदारपणा आहे आणि अप्सरांचें स्वर्गीय सौंदर्य व लालित्य आहे.

पण पुढच्या या सगळ्या नंदनवनासारख्या सौंदर्याच्या पाठीमागें काय उभें होतें? तर दारिद्र्यानें गांजलेले लोक; ज्यांनीं करभार देऊन या इमारती उठविण्यासाठीं राजाजवळ संपत्ति उभी केली, परंतु ज्यांना स्वतःला मातीच्या झोंपड्यासुद्धां पुरेशा राहण्यासाठीं नव्हत्या असे लोक. सर्व राज्यकारभार सर्वस्वीं केवळ बादशहाच्या मर्जीनुसार चालत असे आणि राजाची अथवा त्याच्या मोठ्या प्रांताधिपांची अगर गव्हर्नराची ज्यांवर गैरमर्जी होईल, त्यांना भयंकर शिक्षा देण्यांत येत असत. दरबारांतील कारस्थानांमध्यें मॅकिव्हॅलीच्या तत्त्वांचाच सर्व जण अवलंब करीत. अकबराचा दयाळूपणा, धार्मिक उदारपणा, सहनशीलता आणि हितकर राज्यकारभार या गोष्टी आतां फार जुन्या होऊन गेल्या होत्या, व त्यामुळें गडबड आणि दंगल माजण्याचा काळ जवळजवळ येत चालला होता.

यानंतर महान् मोंगल बादशहांपैकीं शेवटचा औरंगजेब हा गादीवर आला. बापाला कैदेंत टाकून यानें आपल्या राज्याचा व कारकीर्दीचा श्रीगणेशा केला. त्याची कारकीर्द इ. स. १६५९ पासून १७०७ पर्यंत अठ्ठेचाळीस वर्षें झाली. त्याचा आजा जहांगीर याच्या ठिकाणचें कला व साहित्य यांविषयींचें प्रेम त्याच्या अंगीं नव्हतें किंवा त्याचा बाप शहाजहान याच्या ठिकाणचें शिल्पकाम, वास्तुशास्त्र यांविषयींचें प्रेमही त्याच्या अंगीं नव्हतें. तो मोठा कडक नियम पाळणारा, अत्यंत साध्या राहणीचा, धर्मवेडा मनुष्य असून एक आपल्या स्वतःच्या धर्माहून इतर कोणत्याही धर्माला थारा देण्यास तो तयार नव्हता. त्याच्या दरबारांत छानछोकी, डामडौल हीं चालूच राहिलीं; परंतु त्याचें खासगी जीवन जवळजवळ एखाद्या वैराग्यासारखें आणि अतिशयच साधें

होतें. हिंदुधर्माच्या लोकाचा छळ करण्याचें धोरण त्यानें अगदीं मुद्दाम जाणूनबुजून अंगीकारलें. अकबराचें गोडीगुलाबीचें आणि समन्वयाचें धोरण त्यानें जाणूनबुजून पार उलटेंपालटें केलें आणि अशा रीतीनें ज्या पायावर मोंगलांचें साम्राज्य स्थिर झालें होतें, तो पायाच त्यानें नाहींसा केला. हिंदूंवर त्यानें जिझियाची डोईपट्टी पुन्हां बसविली; शक्य तों हिंदूंना तो अम्मलदारीवर नेमण्याचें टाळूं लागला; ज्या रजपूत सरदारानीं अकबराच्या वेळेपासून मोंगल घराण्याला पाठिंबा देण्यास सुरुवात केलेली होती, त्याच रजपुतांमध्यें त्यानें असंतोष निर्माण केला आणि रजपुतांशीं युद्ध ओढवून घेतलें. हिंदूंचीं हजारों देवळें त्यानें उध्वस्त केलीं आणि अशा रीतीनें कित्येक प्राचीन सुंदर सुंदर बांधकामें धुळीस मिळालीं. इकडे एकीकडे त्याच्या साम्राज्याचा विस्तार दक्षिणेंत वाढत होता; विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें त्यानें काबीज केलीं होतीं; त्याच्याही खालचीं दक्षिणेंतील राज्यें त्याला खंडणी देऊं लागलीं होतीं; तर दुसरीकडे त्याच्या साम्राज्याचा पायाच निःसत्त्व होऊन तें साम्राज्य दिवसेंदिवस दुर्बळ होत चाललें होतें आणि त्याच्या चोहों बाजूंनीं शत्रू उभे राहूं लागले होते. हिंदू लोकांतर्फे जिझिया डोईपट्टीविरुद्ध त्याच्याकडे एक अर्ज करण्यांत आला होता. त्यामध्यें लिहिलें होतें कीं, "हा कर न्यायाला काळिमा आणणारा आहे. राज्याला कल्याणकारक अशा धोरणाला तो सोडून आहे आणि त्यामुळें देशांत दारिद्र्य खात्रीनें वाढेल; शिवाय, हा अगदींच नवीन प्रकारचा कर असून हिंदुस्थानांतील धर्मशास्त्राच्या नियमांचा त्यामुळें भंग होत आहे." पुढें साम्राज्यांतील प्रचलित परिस्थितीसंबंधीं या अर्जांत लिहिलें आहे, "जहांपनाहांच्या चालू कारकीर्दींत पुष्कळच लोक साम्राज्याशीं विरोधी झाले आहेत; आणि सर्वत्र धनधान्यादिकांचा नाश आणि लुटालूट हीं माजून राहिलेलीं असल्यामुळें साम्राज्याला आणखीही प्रदेशाला मुकावें लागणें हें अपरिहार्य आहे. आपली प्रजा पायाखालीं तुडविली जात आहे, आपल्या साम्राज्यांतील एकूण एक प्रांत दरिद्री झाला आहे, लोकसंख्या रोडावत आहे आणि संकटें रोज वाढतच आहेत."

यापुढील पन्नास एक वर्षांमध्यें हिंदुस्थानात ज्या मोठमोठ्या घडामोडी आणि फेरबदल घडून यावयाचे होते त्यांची, देशांत सार्वत्रिक पसरलेलें हें दैन्य म्हणजे एक प्रकारची नांदीच होती म्हणावयाची. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगलांचें महान् साम्राज्य सर्वतोपरि कोलमडून रसातळाला गेलें ही पुढच्या पन्नास वर्षांमधली अशीच एक महत्त्वाची घडामोड होय. अशा ज्या मोठमोठ्या घडामोडी होतात आणि फेरबदल घडून येतात त्यांच्या बुडाशीं नेहमीं आर्थिक कारणेंच असतात. चीनमध्यें आणि यूरपमध्यें मोठमोठीं साम्राज्यें नष्ट झालीं. त्यांच्या नाशाच्या मुळाशीं आर्थिक दुरवस्था हीच होती; पुढच्या होऊं घातलेल्या क्रांतीची ती जणुं हाकच होती. त्या साम्राज्यांच्या पडत्या काळातही आर्थिक दैन्यावस्था त्यांच्या कायमचीच पाठीस लागून क्रांतीला कारण झाली. त्या देशांत हा जो प्रकार झालेला आपण पाहिला, तोच प्रकार आतां इकडे हिंदुस्थानात झाला.

इतर बहुतेक सर्व साम्राज्यांप्रमाणें मोंगलाचें साम्राज्यही अंतर्गत दुर्बळतेमुळेंच नष्ट झालें. त्याचे अक्षरशः तुकडे तुकडे झाले. परंतु औरंगजेबाच्या धोरणामुळें हिंदूंच्या ठिकाणीं जी बंडखोरीची प्रवृत्ति निर्माण झालेली होती, तिचाही मोंगल साम्राज्याचे तुकडे तुकडे होण्याच्या कामीं फार मोठ्या प्रमाणांत उपयोग झाला. हिंदूंमधील या एक प्रकारच्या धार्मिक राष्ट्रवादाचें मूळ औरंगजेबाच्या कारकीर्दीच्याही आधींच्या काळामध्यें रुजलेलें होतें; आणि अंशतः यामुळेंच औरंगजेबाच्या ठिकाणीं धार्मिक बाबतींत इतका कडवटपणा आणि माथेफिरूपणा निर्माण झाला असावा. मराठे, शीख आणि असेच दुसरेही लोक हे म्हणजे हिंदूंमधील या जागृतीच्या व पुनरुज्जीवनाच्य भाल्याचीं जणुं टोंकेंच होतीं; याच लोकांनीं अखेरीस मोंगल साम्राज्य उलथून पाडलें हें आपल्याला पुढच्याच पत्रामध्यें दिसून येईल. परंतु संपन्न अशा या मोंगल साम्राज्याच्य वारशाचा लाभ मात्र त्यांच्या पदरांत पडला नाहीं. बाकीचे सर्व लोक एकमेकांशीं या वारशाच्या वांटणीसाठीं लढत असतां ब्रिटिश लोकांनीं मोठ्या चतुराईनें आणि हळूच कोणाला नकळत आंत प्रवेश केला आणि सगळीच लूट स्वतःच्या खिशांत टाकली; पण ती अजून पुष्कळ पुढची हकीगत आहे.

मोंगल बादशहा सैन्य घेऊन लढाईला निघाले म्हणजे त्याचा लष्करी तळ कसा प्रकारचा असे याचें वर्णन तुला थोडेंसें मनोरंजक वाटेल. हा तळ म्हणजे भला मोठा पसाराच असे एक; जवळजवळ तीस मैलांचा त्याचा घेर असे आणि त्यांत पांच लाख माणसांची वसाहत असे! या पांच लाखांत बादशहाच्या बरोबरचें लढाऊ सैन्य तर असेच; पण त्या खेरीजही इतर असंख्य लोक असत. लढाईसाठीं कूच करीत चाललेलें तें एक भलें मोठें शहर असे जणुं; आणि त्यांत शेंकडों बाजार उघडलेले असत. या अशा तळामध्येंच उर्दू – लष्करी तळाची भाषा – निर्माण होऊन वाढत गेली.

मोंगलांच्या काळचीं स्त्रीपुरुषांचीं पुष्कळ चित्रें उपलब्ध आहेत. त्यांतील चित्र-काम आणि रंगकाम मोठें रेखीव, सफाईदार आणि नाजुक आहे. सगळ्या बादशहांच्या चित्रांचा मिळून तर एक चांगला मोठा संग्रहच आहे. त्यामध्यें बाबरापासून औरंगजेबा-पर्यंतच्या या बादशहांचें स्वरूप आणि वैशिष्टय फारच चांगल्या रीतीनें प्रत्ययाला येतें.

मोंगल बादशहांची नेहमींची एक पद्धति अशी होती, कीं खिडकीच्या सज्जांतून रोज दोन वेळ प्रजेला दर्शन द्यावयाचें व त्यांचे अर्ज स्वीकारावयाचे. इंग्लंडचा राजा पांचवा जॉर्ज दिल्ली येथें इ. स. १९११ मध्यें राज्यारोहणाच्या दरबारासाठीं आला असतां त्यालाही अशाच पद्धतीनें लोकांना दर्शन देण्यासाठीं उभें करण्यात आलें होतें. हिंदुस्थानांतील मोंगलांच्या राज्याचे आपण वारसदार आहों असें ब्रिटिश लोक समजतात आणि डामडौल आणि रिकामा थाटमाट या बाबतींत ते मोंगल दरबाराची नक्कल करूं पाहतात. इंग्रज राजाला या लोकांनीं मोंगल बादशहांची पदवी, कैसर-इ-हिंद, हीसुद्धां दिली आहे हें मीं सांगितलेंच आहे तुला. आजच्या घटकेला

सुद्धा हिंदुस्थानांतील इंग्रज राजप्रतिनिधीच्या सभोंवार जितका थाटमाट आणि राजवैभवाचें प्रदर्शन आढळून येतें, तितकें जगात बहुधा दुसरीकडे कोठेंही आढळून येणार नाहीं.

यापुढच्या मोंगल बादशहांचे परदेशीय लोकांशीं कशा प्रकारचे संबंध होते हें मीं अद्यापि तुला सांगितलेलें नाहीं. अकबराच्या दरबारांत पोर्तुगीज मिशनरी लोकांना फारच सवलतीनें वागविण्यात येत असे आणि अकबराचा यूरपीय जगताशीं संबंध या पोर्तुगीज लोकांच्या मार्फतच मुख्यतः येत असे. पोर्तुगाल हें त्याला सर्वांत अधिक बलिष्ठ राष्ट्र असें वाटे आणि त्या वेळीं पोर्तुगीज लोकांचा समुद्रावर दराराही चांगलाच होता. इंग्रज लोकांचें दर्शनसुद्धां त्या वेळीं या बाजूला फारसें होत नव्हतें. गोव्याचें राज्य जिंकून घ्यावें अशी अकबराला फार मोठी हाव होती. त्यानें त्याच्यावर हल्लाही केला; परंतु त्याला त्यांत यश आलें नाहीं. मोंगल लोकांना दर्यावर्दीपणा नीटसा कधींच अंगवळणी पडला नाहीं, त्यामुळें दर्यावर्दी सत्तेपुढें ते अगदीं दुबळे पडत. या काळीं पूर्व बंगालमध्यें जहाजें बांधण्याचे कारखाने तर मोठ्या जोरांत चालत असत; त्यामुळें मोंगलांचें हें समुद्रावरील दौर्बल्य मोठें विलक्षण वाटतें; परंतु हीं सर्व जहाजें मुख्यतः मालवाहतुकीच्या कामासाठीं तयार होत असत. मोंगल साम्राज्याच्या नाशाचें एक कारण समुद्रावरील त्याचें हें दुर्बलत्व असेंही म्हटलें जातें. आतां या काळीं दर्यावर्दी बलिष्ठ राष्ट्रांचे दिवस येऊं घातले होते.

इंग्रज लोक जेव्हां मोंगलांच्या दरबारांत प्रवेश करून घेण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हा पोर्तुगीज लोकाना त्यांचा मत्सर वाटून त्याच्याविरुद्ध जहांगीर बादशहाचें मन कलुषित करण्यासाठीं त्यांनीं जंगजंग पछाडले. तरी पण इंग्लंडचा राजा पहिला जेम्स् याचा वकील सर टॉमस मनरो हा इ. स. १६१५ मध्यें जहांगीरच्या दरबारांत येऊन शिरकलाच. त्यानें व्यापाराबाबत बादशहाकडून कांहीं सवलती मिळविल्या आणि अशा रीतीनें ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापाराचा पाया घातला. दरम्यान इकडे हिंदुस्थानच्या बाजूच्या समुद्रामध्यें इंग्रजांच्या आरमारी काफिल्यानें पोर्तुगीजांच्या जहाजांचा पाडावही केला होता. इंग्लंडचा तारा हळूहळू पूर्व क्षितिजावर वरवर चढूं लागला होता; तर पोर्तुगालचा तारा पश्चिमेकडे मावळूं लागला होता. डच आणि इंग्रज लोकांनीं क्रमाक्रमानें पोर्तुगीज लोकांना पूर्व समुद्रांतून हांकलून लावलें. इ. स. १६४१ मध्यें तर मलाक्का हें मोठें बंदरही डच लोकांच्या हातीं लागलें हें तुला आठवत असेल. इ. स. १६२९ मध्यें शहाजहान आणि पोर्तुगीज लोक यांच्यामध्यें हुगळी येथें एक युद्ध झालें. या ठिकाणीं पोर्तुगीज लोकांनीं उघड उघड गुलामांचा व्यापार सुरू केला होता आणि लोकांना जबरदस्तीनें बाटवून ख्रिस्ती करण्याचा सपाटा चालविला होता. पोर्तुगीज लोकांनीं हुगळीचा बचाव करण्याचा मोठ्या शौर्यानें प्रयत्न केला; परंतु अखेरीस मोंगलांनीं त्यांचा पाडाव केला. एकसारख्या पाठीस लागलेल्या या युद्धामध्यें चिमुकलें पोर्तुगाल राष्ट्र अगदीं थकून गेलें. म्हणून साम्राज्यसंपादनाच्या या शर्यतींतून

त्यानें आपलें आंगच काढून घेतलें; परंतु गोवा आणि इतर चारदोन ठिकाणें यांचा मात्र ताबा अगदीं आजच्या घटकेपर्यंत त्यांनीं केव्हांही सोडला नाहीं.

दरम्यान इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर मद्रास व सुरत येथें आपल्या वखारी उघडल्या. मद्रास शहर तर त्यांनींच इ. स. १६३९ मध्यें वसविलें. इ. स. १६६२ मध्यें दुसऱ्या चार्ल्स राजानें पोर्तुगालमधील ब्रॅगान्झा परगण्यांतील कॅथरीन नांवाच्या राजकन्येशीं लग्न केलें. त्या वेळीं आंदण—हुंडा—म्हणून त्याला मुंबई बेट मिळालें. लौकरच त्यानें नावाला थोडीशी किंमत घेऊन तें बेट ईस्ट इंडिया कंपनीला विकून टाकलें. हा प्रकार औरंगजेबाची कारकीर्द चालू असतांना घडला. पोर्तुगीज लोकांना हांकून लावल्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीला स्वतःच्या सामर्थ्याचा अभिमान वाटूं लागला होता; त्यांतच मोंगल साम्राज्याचें सामर्थ्य कमी होत आहे अशी कंपनीची समजूत होऊन कंपनीनें १६८५ मध्यें हिंदुस्थानांत जबरदस्तीनें आपले हातपाय पसरण्याचा प्रयत्न करून पाहिला; परंतु त्यांत कंपनीच्या अंगलटीसच सर्व प्रकार आला. खास इंग्लंडहून मारे लढाऊ जहाजें इकडे लांबवर आलीं आणि कंपनीनें औरंगजेबाच्या राज्यावर पूर्वेस बंगालमध्यें आणि पश्चिमेस सुरत येथें असा दोहोंकडून हल्ला केला; परंतु मोंगल लोक अजून चांगले खंबीर असल्यामुळें त्यांनीं दोन्ही ठिकाणीं कंपनीचा चांगली आठवण राहीलसा पराभव केला. त्यापासून इंग्रज लोकांनीं धडा घेतला आणि यापुढें ते फार सावधपणानें वागत गेले. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर तर मोंगलांच्या साम्राज्याचे तुकडे तुकडे होत चालले होते हें कोणालाही दिसण्यासारखें होतें; तरीसुद्धां पुन्हां राज्य मिळविण्याच्या खटपटीला लागण्याचें धाडस त्यानंतर पुष्कळ वर्षेपर्यंत इंग्रजांच्या हातून झालें नाहीं. इ. स. १६९० मध्यें जॉब चारनाक नांवाच्या इंग्रज गृहस्थानेंच कलकत्ता शहराची प्रस्थापना केली. अशा रीतीनें मद्रास, मुंबई आणि कलकत्ता हीं तिन्ही शहरें इंग्लिश लोकांनीं वसविलेलीं असून ब्रिटिश लोकांच्या कर्तबगारीमुळें व पराक्रमामुळेंच प्रारंभींच्या काळांत त्यांना महत्त्व प्राप्त होऊन त्यांची वाढ झाली.

आतां या सुमारास हिंदुस्थानमध्यें फ्रान्सचा प्रवेश होतो. एक फ्रेंच व्यापारी कंपनी स्थापन होऊन इ. स. १६६८ मध्यें ही कंपनी सुरतेस आणि इतरही कांहीं ठिकाणीं आपल्या वखारी उघडते. त्यानंतर कांहीं वर्षांनीं हे लोक पाँदिचेरी शहर विकत घेतात आणि हें शहर पूर्व किनाऱ्यावरील सर्वांत महत्त्वाचें व्यापारी बंदर होऊन जातें.

इ. स. १७०७ मध्यें औरंगजेब बादशहा वयाच्या जवळजवळ नव्वदाव्या वर्षी मरण पावतो आणि मग त्यानें आपल्या मागें ठेवलेलें हें भलें मोठें मौल्यवान् घबाड—हिंदुस्थान देशाचें राज्य—कोणाच्या हातीं जावयाचें यासाठीं व्हावयाच्या झगड्याच्या रंगभूमीची सिद्धता होते. झगडणारांत प्रथम त्याचे स्वतःचे नादान वंशज आणि त्याचेच कांहीं प्रांताधिप हे तर होतेच; याखेरीज मराठे आणि शीख हेही होते; त्याच-

प्रमाणें सरहद्दीपलीकडूनही लोभानें कांहीं लोकांची नजर इकडे वळलेलीच होती. याशिवाय सातां समुद्रापलीकडील हे दोन परकी देशांचे लोक, इंग्रज आणि फ्रेंच, हेही येथें दंड थोपटून हें घबाड गिळंकृत करायला टपलेलेच होते. या सर्व कचाट्यांत गरीब बिचाऱ्या हिंदी जनतेची व्यवस्था काय?

## ९१
# शीख आणि मराठे

*१२ सप्टेंबर, १९३२*

औरंगजेबाच्या मृत्यूनंतरच्या शंभर वर्षांमधील हिंदुस्थान देश म्हणजे नाना तऱ्हेच्या तुकड्याताकड्यांची एक प्रकारची वाकळच होती म्हणेनास. नाहीं तर एकसारख्या बदलत राहणाऱ्या चित्रांची रांगच जणुं म्हण; परंतु कांहींही म्हटलें तरी दिसायला मात्र बेंगरूळच. असा हा काळ उलाढाल्या, साहसी आणि पराक्रमी लोकांना आणि न्याय-अन्यायाचा विचार न करतां, मार्ग चांगला कीं वाईट याची पण फिकीर न करतां, मिळेल ती संधि स्वीकारून आपला फायदा करून घ्यावयाचा असला बेडर घट्टपणा ज्यांच्या अंगीं आहे अशा लोकांना फार सोयिस्कर. त्यामुळें या काळांत असे पुष्कळ धामधूम उडविणारे साहसी किंवा पराक्रमी लोक निघाले; कांहीं खुद्द या देशांतले, कांहीं वायव्य सरहद्दीपलीकडून आले, तर इंग्रज व फ्रेंच यांच्यासारखे कांहीं साता समुद्रांपलीकडून आले. प्रत्येक व्यक्तीची अथवा गटाची धडपड चालेल तितका आपला हात चालवावयाचा आणि बाकीच्या सगळ्यांना खड्ड्यांत लोटून द्यावयाचें अशा प्रकारची चाललेली होती. कधीं कधीं दोन अथवा अधिक गट एकत्र होऊन तिसऱ्याला किंवा उरलेल्याला चुरडून टाकण्यासाठीं खटपट करीत; आणि पुढें स्वतःच आपसांमध्यें झगडा करूं लागत. लहानमोठीं राज्यें संपादण्यासाठीं, झटपट श्रीमंत होण्यासाठीं आणि लुटालूट करण्यासाठीं अनेकांची मोठी जिवापाड धडपड या काळांत चालू होती. कांहींनीं हें काम कसलाही आडपडदा न ठेवतां आणि कुणाची लाजलज्जा न बाळगतां चालविलेलें होतें; तर कांहीं लोकांनीं तेंच काम पण व्यापार वाढविण्याच्या झिरझिरीत बुरख्याआडून चालविलेलें होतें. या सगळ्या धामधुमीच्या दडपणाखालीं बिचारें मोंगल साम्राज्य मात्र हळूहळू नाहींसें होत गेलें. तुझ्या गोष्टींतल्या त्या चेशायर मांजराप्रमाणें; अखेरीस त्या मांजराचें निदान हास्य तरी मागें राहिलें होतें, तसें सुद्धां त्या साम्राज्याचें कांहीं राहिलें नाहीं आणि नांवाला बादशहा म्हणून जो कोणी असे, तो बिचारा कोणाचा तरी दुर्दैवी कैदी तरी असे अथवा कुणाकडून तरी तनखा खात दिवस कंठीत असे.

पण वरती ही सगळी धांदल आणि धुमाकूळ, एकमेकांनीं एकमेकांवर उलटणें किंवा एकमेकांचे पाय ओढणें हे जे सगळे प्रकार चालले होते, ते सर्व म्हणजे पृष्ठभागाच्या खालीं आंतल्या आंगाला जी एक क्रांति चालू होती तिचें बाह्य लक्षण होतें. त्याचा अर्थ जुनी आर्थिक रचना आतां मोडून पडत होती; सरंजामदारशाहीची सद्दी संपली असून तिला शेवटची घरघर लागलेली होती. देशांतील बदलत्या परिस्थितीशीं या सरंजामदारशाहीचा जमाव जमत नव्हता. यूरप खंडांतही आपण हा प्रकार घडून आलेला पाहिला आहे. तेथें नवीनच व्यापाऱ्यांचा वर्ग उत्पन्न होऊन त्यांच्या डोक्यावर फक्त अनियंत्रित अशा राजसत्तेचें बंधन तेवढें शिल्लक राहिलें होतें. इंग्लंड देशांत आणि कांहीं अंशीं हॉलंड देशांत मात्र राजांना पायबंद घालण्यांत आला होता. औरंगजेब जेव्हां गादीवर आला, तेव्हा इंग्लंडमध्यें पहिल्या चार्ल्स राजाचा वध केल्यानंतर स्थापन झालेलें तें अल्पजीवी प्रजासत्ताक राज्य चालू होतें. पुढें औरंगजेबाची कारकीर्द चालू असतांनाच दुसरा जेम्स् राजा पळून गेला व अशा रीतीनें ब्रिटिशांच्या पार्लमेंटचा इ. स. १६८८ मध्यें जय होऊन तेथील राज्यक्रांति पूर्ण झाली. इंग्लंडमध्यें पार्लमेंटसारखें एक प्रकारचें अर्धवट लोकप्रतिनिधींचें सल्लागारमंडळ राजदरबारीं अस्तित्वांत होतें या गोष्टीचा राज्यक्रांतीच्या झगड्यांत फार उपयोग झाला. प्रथम सरंजामदार-सरदारांच्या विरुद्ध आणि नंतर राजांच्याही विरुद्ध लोकांतर्फे सत्तेचें कांहीं-तरी एक ठिकाण त्यामुळें उभें करतां आलें.

यूरप खंडांत बाकीच्या सर्व देशांमध्यें परिस्थिति अगदीं वेगळ्या प्रकारची होती. फ्रान्समध्यें अद्याप महान् बादशहा राजसूर्य चौदावा लुई याचीच सत्ता चालू होती; त्याची कारकीर्द औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या थेट अखेरपर्यंत आणि त्यानंतरही आठ वर्षे चालू होती. फ्रान्समध्यें अनियंत्रित राजसत्ता जवळजवळ अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू राहिली; शेवटीं मग तेथें तो फ्रेंच राज्यक्रांतीचा प्रचंड धूमधडाका उडाला. जर्मनींत तर आपण पाहिलेंच, कीं सतराव्या शतकाचा काळ म्हणजे फारच भयंकर काळ गेला. याच शतकांत त्या देशांत तें तीस वर्षांचें युद्ध झालें आणि त्यामुळें त्या देशाचे तुकडे होऊन त्याचा नाश झाला.

हिंदुस्थानची अठराव्या शतकामधील अवस्था कांहींशी जर्मनीमधील या तीस वर्षांच्या काळांतील परिस्थितीसारखी होती. पण ही तुलना किंवा सारखेपणा उगीच फार लांबवूं मात्र नको. दोन्ही देशांत प्रचलित आर्थिक व्यवस्था कोलमडून पडलेली होती आणि जुना सरंजामदारांचा वर्ग निरुपयोगी होऊन गेलेला होता. हिंदुस्थानांत या सरंजामशाहीला जरी शेवटची घरघर लागलीच होती; तरी पण पुढें पुष्कळ काळ-पर्यंत ती नाहींशी झाली नाहीं. आणि शेवटीं जरी बहुतेक तिचा नाश झाला, तरी तिची बाह्य चौकट मात्र चालूच राहिली. फार कशाला, आजच्या घटकेलासुद्धां हिंदुस्थानांत आणि यूरपच्या कांहीं भागांत या सरंजामदारशाहीचे पुष्कळसे अवशेष पाहायला सांपडतात.

अशा रीतीनें आर्थिक व्यवहारांत जे फेरफार घडून येत होते, त्यामुळें मोंगलांचें साम्राज्य मोडून पडलें; परंतु त्याच्या मोडकळीच्या व फाटाफुटीचा फायदा घेऊन सत्ता आपल्या हातीं काबीज करायला तेथें भांडवलदार-कारखानदारांचा धनिक मध्यमवर्ग तयार नव्हता. या धनिकवर्गाचें प्रतिनिधिभूत असें एखादें राजाचें सल्लागार-मंडळ किंवा दुसरी एखादी संघटित संस्था, इंग्लंडांत होती त्याप्रमाणें या देशांत नव्हती आणि अगदीं अमर्याद अशा एकतंत्री कारभाराखालीं फार काळ दडपून राहिल्यामुळें लोक सामान्यतः गुलामी मनोवृत्तीचे झाले होते, आणि त्यांच्या समाजांमधील प्राचीन काळच्या ज्या कांहीं स्वातंत्र्याच्या कल्पना होत्या, त्या ते पार विसरून गेले होते. असें असूनही या पत्रांतच पुढें आपल्याला दिसून येईल, कीं सत्ता काबीज करण्याचे प्रयत्न कधीं सरंजामदारांच्या वतीनें, कधीं धनिक वर्गाच्या बाजूनें, तर कधीं शेतकऱ्याच्या मधून, असे येथेंही झालेच; आणि त्यांपैकीं कांहींना तर यश मिळणार इतकी अवस्था आली होती. परंतु एक गोष्ट लक्षांत घ्यायची ती ही, कीं या देशांत ज्या वेळीं सरंजामदारशाहीचा पाडाव झाला, त्याच क्षणीं सत्ता काबीज करण्याला पुरेसा समर्थ असा धनिक मध्यमवर्ग या ठिकाणीं उदयास येऊन उभा नव्हता; या दोन्ही गोष्टी एकाच समयाला घडून आल्या नाहींत; त्यांच्यामध्यें थोडा मोकळा काळ गेला. असा मोकळा काळ असला, कीं जर्मनींत घडून आलें त्याप्रमाणें दंगल आणि धामधूम माजावयाची हें ठरलेलें आहे. हिंदुस्थानांतही तेंच घडलें. या देशामध्येंही छोटेछोटे राजे आणि सरदार देशावर प्रभुत्व मिळविण्यासाठीं आपसांमध्यें लढत होते. परंतु मरू घातलेल्या आर्थिक समाजरचनेचे हे प्रतिनिधी होते. लौकरच त्यांना नवीनच प्रकारच्या मनुष्यवर्गाशीं, आपल्या स्वतःच्या देशांत पूर्ण विजयी झालेल्या ब्रिटिश धनिकवर्गाच्या प्रतिनिधींशीं, सामना द्यावा लागला. सरंजामदारशाहीपेक्षां या ब्रिटिश मध्यमवर्गाची समाजपद्धति आधिक उच्च प्रतीची होती; जगांत प्रचलित होऊं लागलेल्या परिस्थितीशीं ती अधिक जुळती होती; त्यांची समाजव्यवस्था जास्त सुसंघटित आणि जास्त कर्तबगार होती; त्यांच्याजवळ हत्यारेंपात्यारें आणि शस्त्रें चांगल्या प्रकारचीं होतीं; त्यामुळें त्यांना लढाई जास्त परिणामकारकपणें देतां येत होती आणि शिवाय समुद्रावर या लोकांचें वर्चस्व होतें. हिंदुस्थानांतल्या सरंजामदार-राजेरजवाड्यांना या नवीन सत्तेशीं स्पर्धा करणें सर्वतोपरि अशक्य होतें. त्यामुळें ते एकामागोमाग एक पराभव पावून नष्ट झाले.

या पत्राची ही प्रस्तावना फारच लांबली. म्हणून आता थोडेंसें आपल्याला मागच्या काळांत परत गेलें पाहिजे. माझ्या मागच्या पत्रांत औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या शेवटच्या भागांत सामान्य जनतेचीं जीं बंडें झालीं आणि हिंदूंच्यामध्यें एक प्रकारचा धार्मिक राष्ट्रवाद उत्पन्न होऊन त्यायोगें त्यांच्यामध्यें जो नवीन जोम निर्माण झाला, त्या गोष्टीचा नुसता उल्लेख केला आहे. आतां त्याबद्दल आपण थोडें अधिक विस्तारानें बोललें पाहिजे. मोंगल साम्राज्याच्या पुष्कळच भागांमध्यें कितीतरी अर्धवट धार्मिक

अशा प्रकारच्या सामान्य जनतेच्या चळवळी उत्पन्न झालेल्या आपल्याला आढळून येतात. देशांतील प्राकृत अथवा लोकभाषांमध्यें, हिंदी, मराठी, पंजाबी इत्यादि भाषांमध्यें पदें आणि धार्मिक भजनें लिहिण्यांत येऊन तीं फार लोकप्रिय होऊं लागलीं. त्या पदांनीं आणि भजनांनीं लोकांच्या ठिकाणीं स्वसामर्थ्याबद्दल जागृति झाली. लोकप्रिय अशा धर्मोपदेशकांचे निरनिराळे धर्मपंथ स्थापन झाले. बदलत्या आर्थिक परिस्थितीच्या दडपणामुळें या धर्मपंथांचें लक्ष हळूहळू राजकीय प्रश्नांकडे वळूं लागलें; त्यामुळें राजसत्तेशीं–मोंगल साम्राज्याशीं–त्यांची घासाघीस होण्याचे प्रसंग येऊं लागले आणि अशा धर्मपंथांवर राजसत्तेकडून दडपशाही होऊं लागली. या दडपशाहीमुळें मुळांत शांत आणि धर्मनिष्ठ असा जो धर्मपंथ असावयाचा तो स्वाभाविक मग लष्करी बाण्याचा संघ व्हावयाचा असें घडूं लागलें. शीख आणि इतर धर्मपंथ यांची वाढ ही अशा प्रकारें झाली. मराठ्यांचा इतिहास इतका साधा नाहीं; त्यांत दुसरीही पुष्कळ गुंतागुंत आहे; परंतु त्याच्यामध्येंही धर्म आणि मोंगलांच्या विरुद्ध हत्यार उपसून लढ्यास तयार झालेला राष्ट्रवाद यांचें मिश्रण होतेंच. मोंगल साम्राज्याचा पाडाव हा कांहीं खरोखर ब्रिटिश लोकांनीं मुळींच केलेला नाहीं. त्याचा पाडाव या धर्मनिष्ठ राष्ट्रवादी चळवळी करणारांनीं आणि त्याहूनही विशेष म्हणजे मराठ्यांनीं केलेला आहे. औरंगजेबाच्या धार्मिक कडवेपणाच्या धोरणामुळें तर या चळवळींना साहजिक अधिक जोर चढला. त्याचप्रमाणें आपल्या राज्याच्या विरुद्ध ही जी धर्मभावना, धर्मजागृति वाढत चाललेली होती तिच्यामुळें औरंगजेब अधिकाधिक चिडला असला पाहिजे व अधिकाधिक कडवा होत गेला असला पाहिजे, हीही गोष्ट संभवनीय आहे.

उत्तर हिंदुस्थानांत इ. स. १६६९ मध्येंच मथुरा येथें जाट शेतकऱ्यांनीं औरंगजेबाविरुद्ध बंड केलें होतें. औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत त्यांचा पुनःपुनः पराभव केला जाई तरी पुनःपुनः ते बंड करून उठतच; असा तीस वर्षें सारखा क्रम चालला होता. मथुरा हें गांव आग्र्यापासून जवळच आहे हें यामध्यें विशेष लक्षांत घे. याचा अर्थ प्रत्यक्ष राजधानीच्या आसपासच हीं बंडें चालू झालेलीं होतीं. दुसरें बंड सतनामी नांवाच्या हिंदुधर्मामधील पंथाचें झालें. हा पंथ मुख्यतः खालच्या वर्गांच्या लोकांचा होता. अशा रीतीनें हेंही बंड सामान्य जनतेचेंच होतें. राजेरजवाडे, नबाब या किंवा अशा लोकांनीं केलेल्या उठावाहून हें बंड अगदीं निराळें होतें. त्या काळच्या एका मोंगल उमरावानें तर अगदीं तिरस्कारानें त्याचें वर्णन "सोनार, सुतार, भंगी, ढोर या आणि इतर क्षुद्र लोकांमधील पाजी आणि हलकट बंडखोरांची टोळी" अशा रीतीनें केलेलें आहे. त्याच्या मतानें पाहतां अशा "क्षुद्र प्राण्यांनीं" आपल्या वरिष्ठांविरुद्ध अशा रीतीनें बंड करून उठणें, हा केवढा भयंकर अमानुष अपराध होता!

त्यानंतर आपण शिखांच्या काळाशीं येऊन पोंचतों. शिखांचा इतिहास आपल्याला याही पूर्वींच्या काळापासून तपासला पाहिजे. गुरु नानकाबद्दल मी एकदां

थोडेंसें बोललों आहे तें तुझ्या ध्यानांत असेल. बाबर हिंदुस्थानांत आल्यानंतर थोडक्याच काळांत गुरु नानक मरण पावला. हिंदुधर्म आणि इस्लामधर्म यांच्यामध्यें एक समान भूमिका निर्माण करावी अशासाठीं धडपड करणारांपैकीं नानक हा एक होता. त्याच्यानंतर त्याच्या पंथाचे जे तीन गुरू झाले, ते त्याच्याचप्रमाणें सर्वस्वीं शांतताप्रिय असून त्यांचें सर्व लक्ष धार्मिक गोष्टींकडेच लागलेलें असे. शिखांच्या चवथ्या गुरूला अमृतसर येथील सुवर्णमंदिरासाठीं व तलावासाठीं अकबरानें जागा दिली, तेंव्हांपासून अमृतसर हें शिखांच्या पंथांच्या आदिपीठाचें स्थान झालेलें आहे.

त्यानंतर पांचवा गुरु अर्जुनसिंग या नांवाचा झाला. त्यानें शिखांचा **ग्रंथसाहेब** नांवाचा धर्मग्रंथ संपादित केला. या शिखांच्या पवित्र ग्रंथामध्यें निरनिराळ्या वचनांचा, म्हणींचा आणि अभंगांचा संग्रह आहे. कांहीं राजकीय अपराधावरून जहांगिरानें अर्जुनसिंगाला हालहाल करून ठार मारविलें. शिखांच्या इतिहासाला येथपासून अगदीं निराळें वळण लागलें. या आपल्या गुरूचा असा अन्याय्य आणि क्रूरपणानें छळ झालेला पाहून त्यांच्या ठिकाणीं असंतोष भडकला आणि त्यांचें लक्ष सशस्त्र होऊन लढण्याकडे वळलें. त्यांचा सहावा गुरु हरगोविंदसिंग याच्या नेतृत्वाखालीं शिखांची एक प्रकारें बंधुभावनेनें भारलेली अशी लष्करी एकजूट झाली आणि तेंव्हांपासून पुढें त्यांचे राजसत्तेशीं वारंवार झगडे होऊं लागले. गुरु हरगोविंदसिंगाला तर जहांगीर बादशहानें दहा वर्षेंपर्यंत कैदेंत ठेवलें होतें. शिखांचा नववा गुरु तेजबहादूर हा औरंगजेबाच्या काळांत होऊन गेला. औरंगजेबानें त्याला इस्लामधर्म स्वीकारण्याचा हुकूम केला आणि तो त्यानें न मानल्यामुळें त्याचा वध करण्यांत आला. शिखांचा दहावा आणि शेवटचा गुरु गोविंदसिंग हा होय. मुख्यतः दिल्लीच्या बादशहाशीं टक्कर देण्यासाठीं म्हणून गुरु गोविंदसिंगानें सबंध शीख जमातीला लष्करी बाण्याची बनवून ती बलिष्ठ केली. औरंगजेबानंतर एक वर्षानें तो मरण पावला. तेंव्हांपासून पुढें शिखांचा कोणी गुरु झाला नाहीं. गुरूचा अधिकार आतां सर्व शीखसमाजाच्या ठिकाणीं सामावलेला आहे असें मानलें जातें. शीखसमाजाला खालसा म्हणजे "मान्य झालेले" (परमेश्वरमान्य) असें नांव आहे.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर लगेच शीख लोकांनीं बंड केलें; तें जरी मोडून टाकण्यांत आलें तरीही शिखांची शक्ति वाढतच गेली आणि पंजाबमध्यें त्यांचें बूड जड होऊन तेथें त्यांचा चांगलाच जम बसला. पुढें पंजाबमध्यें रणजितसिंगाच्या नेतृत्वाखालीं शिखांचें एक स्वतंत्र राज्य स्थापन व्हावयाचें होतें; पण तें अठराव्या शतकाच्या अखेरीला.

हीं सगळीं बंडें जरी कांहीं खरोखर कमी त्रासदायक नव्हतीं तरी मोंगल साम्राज्यावर खरें संकट आलें, तें हिंदुस्थानच्या आग्नेय कोपऱ्यामध्यें उदयास येणाऱ्या मराठ्यांच्या सत्तेकडून आलें. प्रत्यक्ष शहाजहानच्या कारकीर्दींत एक मराठा सरदार शहाजी

राजा यानें पुष्कळच त्रास मोंगल साम्राज्याला दिला होता. हा प्रथम अहमदनगरच्या राज्यांतील एक अम्मलदार होता व नंतर विजापूरच्या राज्यामधील; परंतु इ. स. १६२७ मध्यें जन्माला आलेला शहाजीचा मुलगा शिवाजी हा खरा मराठ्यांचें वैभव वाढविणारा आणि मोंगल साम्राज्याचा कर्दनकाळ होऊन गेला. एकोणीस वर्षांचा असतांनाच त्यानें आपल्या मुलूखगिरीच्या कार्यक्रमाला सुरुवात केली आणि पुण्याजवळ प्रथम एक किल्ला जिंकून घेतला. तो मोठा शूर सेनानायक होता; गनिमी काव्याच्या लढाईचा नमुनेदार पुढारी होता आणि चांगला साहसी व पराक्रमी पुरुष होता. त्यानें आपल्याभोंवतीं शूर आणि काटक अशा डोंगरी लोकांचा अत्यंत एकनिष्ठ असा जमाव जमा केला होता. त्याच्या साहाय्यानें त्यानें पुष्कळसे किल्ले काबीज केले आणि औरंगजेबाच्या सेनापतींना सळो कीं पळो करून सोडलें. इ. स. १६६५ मध्यें एकाएकीं तो सुरतेवर चालून गेला व तें शहर त्यानें लुटलें. याच ठिकाणीं इंग्रजांनीं आपली वखार घातलेली होती. पुढें औरंगजेबानें त्याचें मन वळवून त्याला आपल्या दरबारात आग्रा येथें आणाविलें होतें; परंतु तेथें त्याला औरंगजेबानें एक स्वतंत्र राजा या नात्यानें वागविलें नाहीं, म्हणून आपला अपमान झाला व अनादर झाला असें शिवाजीला वाटलें. पुढें त्याला तेथें कैद करून ठेवण्यांत आलें; पण कैदेंतून तो निसटला. त्यानंतरसुद्धां पुढें त्याला राजा ही पदवी देऊन गौरवून आपल्याकडे वळवून घेण्याचा औरंगजेबानें पुष्कळ प्रयत्न केला.

परंतु लौकरच शिवाजीनें लढाईचा मार्ग सुरू केला आणि मोंगलांचे दक्षिणेंतील अम्मलदार त्याच्यापुढें इतके भयभीत झाले, कीं त्यांनीं शिवाजीनें आपलें कांहीं वांकडें करूं नये म्हणून त्याला नजराणे देण्यास सुरुवात केली. या नजराण्यांसाठींच मराठे जेथें जात तेथें त्यांची ती सुप्रसिद्ध चौथाई किंवा सरकार-देण्याचा चौथा भाग वसूल करीत असत. इ. स. १६७४ मध्यें शिवाजीनें रायगड येथें मोठ्या समारंभानें स्वतःस राज्याभिषेक करून घेतला. पुढें तो इ. स. १६८० मध्यें मरण पावला. तोंपर्यंत त्याचा सतत विजयच होत राहिला.

अलीकडे तूं तर कित्येक दिवस मराठ्यांच्या देशाच्या अगदीं ऐन अंतरंगांत, पुणें शहरांत, राहते आहेस. त्यामुळें शिवाजीविषयीं त्याच्या देशाच्या लोकात केवढा आदर, केवढी भक्ति आहे हें तुला समजून चुकलें असलेंच पाहिजे. वर मीं तुला धर्मनिष्ठ राष्ट्रवादाच्या प्रवृत्तीबद्दल सांगितलें ना, तशा प्रवृत्तीचा शिवाजी हा होता. आर्थिक घडीची विस्काळितता आणि सामान्य लोकांच्या हालअपेष्टा यांच्यामुळें मूळ भूमि तयार झालेली होतीच; रामदास व तुकाराम या दोन श्रेष्ठ मराठी कवींनीं आपल्या काव्यांनीं आणि अभंगांनीं या भूमीची चांगलीच मशागत केली; त्यामुळें मराठे लोकांत स्वसामर्थ्याबद्दल जागृति उत्पन्न झाली, ऐक्यभावना निर्माण झाली आणि अगदीं अशा ऐन मोक्याला त्यांना विजयमार्गावर नेणारा हा तेजस्वी नायक मिळाला.

शिवाजीचा मुलगा संभाजी याला मोंगलांनीं हालहाल करून ठार मारलें; तरी-पण आणि मध्यंतरीं तात्पुरती माघार घ्यावी लागली तरीही हिंमत खचूं न देतां मराठे लोकांनीं आपली सत्ता वाढविलीच. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर तर त्याचें सगळें साम्राज्य वाऱ्याबरोबर उडून गेल्यासारखें नाहींसें होऊं लागलें. त्याच्या पुष्कळशा प्रांताधिपांनीं मध्यवर्ती सत्तेशीं काडीमोड केली. बंगाल प्रांत साम्राज्यांतून फुटून बाहेर पडला. त्याचप्रमाणें अयोध्या आणि रोहिलखंड हे प्रांतही. दक्षिणेंत वजीर असफजहा यानें स्वतंत्र राज्य स्थापलें. हेंच आजकालचें हैद्राबाद संस्थान. हल्लींचा निजाम हा या असफ-जहाचाच वंशज होय. औरंगजेब मेल्यापासून सतरा वर्षांच्या आंत मोंगलांचें साम्राज्य होतें का नव्हतें असें होऊन गेलें. परंतु दिल्ली येथें किंवा आग्रा येथें साम्राज्य नव्हतें, तरी साम्राज्याचा अधिपति म्हणून कोणी तरी मोंगल बादशहाचा वंशज मात्र बादशहा म्हणून तेथें नांदत होता.

जसजसें मोंगलांच्या साम्राज्याचें सामर्थ्य कमी झालें, तसतशी मराठ्यांची सत्ता वाढली. पुढें त्याचे मुख्य प्रधान पेशवे यांच्या हातीं सगळी खरी सत्ता आली; मराठ्यांचा राजा खुद्द त्यांच्यापुढें फिका पडला. पेशव्यांचें पद पुढें वंशपरंपरेनें एकाच घराण्याकडे राहत गेलें; जपानमध्यें शोगुनशाही झाली ना त्याप्रमाणें आणि राजा बिचारा कोठें कोपऱ्यामध्यें पडून गेला. दिल्लीचा बादशहा तर अगदींच दुबळा झालेला. त्यानें बिचाऱ्यानें मराठ्यांचा दक्षिणेंत सर्वत्र चौथाई वसूल करण्याचा हक्क मान्य केला. एवढ्यानें समाधान न होऊन पेशव्यांनीं हे प्रांत काबीज केले. इ. स. १७३७ मध्यें तर पेशव्यांचें सैन्य थेट दिल्लीच्या दरवाजाशीं येऊन ठेपलें होतें. हिंदुस्थानची सर्व राज्यसत्ता या मराठ्यांच्याच हातीं जाणार असा रंग वाटूं लागलेला होता. इतक्यात एकाएकीं इ. स. १७३९त वायव्य सरहद्दीकडून एक नवीनच ओघ आंत घुसला आणि त्यामुळें हिंदुस्थानांतील सत्तेचें पारडें फिरलें आणि उत्तर हिंदुस्थानचें सगळें स्वरूपच पालटून गेलें.

## ९२

# इंग्रजांची हिंदुस्थानांतील आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर मात

१३ सप्टेंबर, १९३२

दिल्लीच्या साम्राज्याची अवस्था कांहीं ठीक नव्हती; त्याला फार वाईट दिवस आलेले होते हें गेल्या पत्रांत आपण पाहिलें. खरें म्हणजे साम्राज्य या दृष्टीनें त्याला आतां तसें कांहीं अस्तित्वच राहिलें नव्हतें. तथापि दिल्ली आणि उत्तर हिंदुस्थान यांचें पारडें अजूनही पुष्कळ खालीं जावयाचें होतें; कारण या सुमारास साऱ्या जगांत मुलूख-

गिरीसाठीं साहसें करणाऱ्या लोकांचा जणुं मेरुमणि असा एक गृहस्थ हिंदुस्थानवर वायव्येकडून विजेसारखा चालून आला आणि पुष्कळ कत्तली आणि लुटी करून प्रचंड संपत्ति गोळा करून ती आपल्याबरोबर घेऊन गेला. हा गृहस्थ म्हणजे नादिरशहा. अलीकडे इराणची गादी त्यानें बळकावलेली होती. शहाजहाननें तयार करविलेलें मयूर-सिंहासनही नादिरशहानें आपल्याबरोबर नेलें. नादिरशहाचें हें भयंकर संकट इ. स. १७३९ मध्यें आलें आणि सारा उत्तर हिंदुस्थान त्या वेळीं जणुं धुळीस मिळाला. नादिरशहानें आपल्या राज्याची सरहद्द उत्तरेकडून सिंधु नदीच्या तीरापर्यंत आणून भिडविली. अशा रीतीनें अफगाणिस्तान देश हिंदुस्थानापासून तोडला गेला. हिंदुस्थानच्या इतिहासाच्या अगदीं पहिल्या काळापासून, महाभारताच्या आणि गांधार राज्याच्या वेळेपासून, अफगाणिस्तान देश हा हिंदुस्थानशीं अगदीं निकट जोडलेला असा होता. तो या वेळीं तुटून निराळा पडला.

यानंतर सतरा वर्षांतच दिल्लीवर आणखी एका लुटारू गृहस्थाची स्वारी झाली. नादिरशहाच्या पाठीमागून अफगाणिस्तानच्या गादीवर आलेला अहमदशहा दुराणी यानें ही स्वारी केली. अशा या स्वाऱ्या होत होत्या तरीही मराठ्यांची सत्ता वाढतच गेली आणि इ. स. १७५८ मध्यें पंजाब प्रांतावर मराठ्यांचें प्रभुत्व प्रस्थापित झालें. अर्थात् या सगळ्या प्रदेशावर आपलें पद्धतशीर राज्य स्थापण्याचा कांहीं त्यांनीं प्रयत्न केला नाहीं. आपल्या पूर्वापार पद्धतीला अनुसरून त्यांनीं आपली सुप्रसिद्ध चौथाई तेथें वसूल करून प्रांताचा कारभार तेथील स्थानिक लोकांच्याच हातीं राहूं दिला. अशा रीतीनें दिल्लीच्या साम्राज्याचा जवळजवळ सगळा अधिकार व वारसा मराठ्यांनीं हस्तगत केल्यासारखेंच झालें. इतक्यात त्यांना एक फार मोठा पायबंद बसला. अहमदशहा दुराणी वायव्येकडून पुन्हां इकडे चालून आला आणि तेथील कांहीं लोकांशीं संगनमत करून त्यांच्या साहाय्यानें त्यानें पानिपतच्या प्राचीन रणभूमीवर इ. स. १७६१ मध्यें मराठ्यांच्या प्रचंड सैन्याचा पूर्ण पराभव करून धुव्वा उडविला. दुराणी आता सगळ्या उत्तर हिंदुस्थानचा मालकच झाला; त्याला नाहीं म्हणण्याचें सामर्थ्य तेथें आतां कोणाच्याही आंगीं नव्हतें; परंतु विजयाच्या अगदीं ऐन क्षणाला त्याच्या स्वतःच्याच लोकांमधील बंडाळीला आणि भानगडीला तोंड देण्याचा प्रसंग त्याच्यावर येऊन तो आपल्या मायदेशाला परत गेला.

कांहीं काळपर्यंत मराठ्यांच्या सद्दीचे दिवस संपले असें वाटूं लागलें; त्यांचा कोठेंच कांहीं फारसा प्रभाव शिल्लक राहिला नाहीं. हिंदुस्थानच्या साम्राज्याचें जें मोठें घबाड मिळविण्याच्या नादामध्यें ते होते, तें त्यांच्या हातून निसटलें होतें; परंतु अशाही अवस्थेंत हळूहळू त्यांनीं आपली स्थिति चांगलीच सांवरली आणि पुन्हां एकदां त्यांची सत्ता ही हिंदुस्थानांतील सर्वांत प्रचंड अशी सत्ता होऊन राहिली. दरम्यानच्या या काळांत दुसऱ्या आणखी अधिक खोल परिणाम करणाऱ्या, हिंदुस्थानच्या कांहीं पिढ्यांच्या भवितव्याला अगदीं निराळेंच वळण लावणाऱ्या कांहीं नवीन घटना व

शक्ती निर्माण झाल्या होत्या हें आतां लौकरच आपल्याला दिसून येईल. या नवीन शक्ती निर्माण होण्याच्या काळच्या सुमारासच मराठ्यांच्यामध्यें पुष्कळ सरदार अशा प्रकारचे निर्माण झाले, कीं ज्याना पेशव्यांची सत्ता नको होती आणि जे स्वतः स्वतंत्र राजे अशा थाटानें वागूं लागले होते. अशा सरदारांमध्यें सर्वांत प्रमुख म्हणजे ग्वाल्हेरचे शिंदे होत. बडोद्याचे गायकवाड आणि इंदूरचे होळकर हेही त्याच पंथाचे.

आतां वर ज्या नवीन घटना घडून येत होत्या म्हणून मीं म्हटलें त्यांचा थोडा विचार करूं या. दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासावर या काळच्या ज्या एका घटनेचा फारच प्रचंड परिणाम झाला व इतिहासाचा सारा ओघच बदलण्याला जी कारणीभूत झाली अशी गोष्ट म्हणजे या भागातील इंग्रज आणि फ्रेंच लोकांचें युद्ध ही होय. अठराव्या शतकांत तिकडे यूरपमध्यें इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें वारंवार युद्धाचे प्रसंग उद्भवत होते. तिकडे या दोन देशांमध्यें युद्ध जुंपलें, कीं हिंदुस्थानातही त्यांच्या प्रतिनिधींमध्यें युद्ध सुरू होई; परंतु कित्येकदा तर तिकडे या दोन राष्ट्रांमध्यें अधिकृत रीतीनें शांततेचा तहनामा असूनसुद्धां हिंदुस्थानांत मात्र त्या दोघांचें युद्ध चालू राही. दोन्ही बाजूंकडे कांहीं काहीं बेडर आणि न्यायान्यायाची फिकीर न बाळगणारे असे लुटारू प्रवृत्तीचे साहसी लोक होते; संपत्ति आणि सत्ता यांच्या अतिलोभानें ते भारून गेलेले होते; त्यामुळें स्वाभाविकच त्या दोन्ही बाजूंच्या लोकांमध्यें अत्यंत तीव्र स्पर्धा उत्पन्न झालेली होती. फ्रेंचांच्या बाजूचा या काळचा सर्वांत प्रमुख मनुष्य म्हणजे डुप्ले आणि इंग्रजांच्या बाजूचा क्लाइव्ह. डुप्लेनें या देशांत एक मोठा फायदेशीर खेळ खेळण्यास सुरुवात केली. येथें दोन राज्यांमध्यें स्थानिक कांहीं तंटा सुरू झाला म्हणजे त्यांपैकीं कोणत्या तरी एका पक्षाला आपण मिळावयाचें; आपलें सैन्य भाड्यानें त्या पक्षाच्या मदतीला धावयाचें आणि अखेरीस त्या दोघांच्या भांडणात आपला खिसा चांगला गरम करून घ्यावयाचा. यामुळें फ्रेंचांचें वर्चस्व वाढत चाललें होतें; परंतु इंग्रजांनीं त्यांचा हा धडा लौकरच गिरविला; एवढेंच नव्हे, तर त्यांत त्यांनीं थोडीशी सुधारणा करून फ्रेंचांच्याही वर ताण केली. फ्रेंच आणि इंग्रज दोघेही कोठें काहीं भानगड उत्पन्न होते का, याकडे गिधाडासारखे डोळे लावून बसलेले असत आणि या देशांत अशा भानगडींना कांहीं कमी नव्हतें. दक्षिण हिंदुस्थानमध्यें गादीच्या वारसाबद्दल तंटा उत्पन्न झाला रे झाला, कीं एका बाजूला इंग्रज आणि एका बाजूला फ्रेंच हे पाठीराखे म्हणून उभे राहिलेले आपल्याला आढळावयाचेच बहुधा. अशा रीतीनें झगडे चालतां चालतां इ. स. १७४६ ते १७६१ या पंधरा वर्षांच्या काळांत फ्रान्सचा पराभव होऊन इंग्रज लोक येथें यशस्वी झाले. हिंदुस्थानांतील या उचापती करणाऱ्या इंग्रज पुंडांना त्यांच्या मायदेशांतून भरपूर मदत मिळत होती. डुप्ले आणि त्याचे सहकारी यांना मात्र फ्रान्सकडून अशी मदत मिळाली नाहीं. यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या पाठीशीं ईस्ट इंडिया कंपनीचे भागीदार असलेले ब्रिटिश व्यापारी आणि इतर लोक उभे होते; या मंडळींचें पार्लमेंटवर आणि




म्हणून राज्यकारभारावर चांगलें वजन होतें. फ्रेंच लोकांच्या पाठीशीं कोण, तर लुई राजा. ( हा महान् बादशहा चौदावा लुई याचा नातू असून त्याच्या मागून फ्रान्सच्या गादीवर आलेला होता. ) तो स्वतःच ऐषआरामांत दंग होऊन अखेरच्या संकटाच्या खाईकडे धांव घेत होता. ब्रिटिशांचें समुद्रावर सर्वत्र वर्चस्व चालू झालेलें होतें या गोष्टीचाही ब्रिटिशांना फार मोठा उपयोग झाला. फ्रेंचांनीं आणि ब्रिटिशांनीं, दोघांनींही हिंदी सैनिक शिकवून तयार केले—त्यांना ते शिपाई ( मूळ शब्द सिपाही ) म्हणत. या सैन्याजवळ स्थानिक राज्याच्या सैनिकांपेक्षां हत्यारें जास्त चांगल्या प्रकारचीं असत आणि त्यांना कवाईत चांगली शिकविलेली असे. त्यामुळें ज्याला-त्याला या सैन्याची मदत हवीशी वाटे.

तात्पर्य, मुद्द्याची गोष्ट काय, तर हिंदुस्थानांत ब्रिटिशांनीं फ्रेंचांचा पराभव केला आणि फ्रेंचांचीं चंद्रनगर आणि पाँडिचेरी हीं शहरें पार उध्वस्त करून टाकलीं. या शहरांचा त्यांनीं इतका नाश केला म्हणतात, कीं दोन्ही शहरांत एकही छप्पर जाग्यावर शिल्लक राहिलें नाहीं. या वेळेपासून हिंदी रंगभूमीवरून फ्रेंच लोक मागें पडत गेले आणि पुढें जरी त्यांना चंद्रनगर आणि पाँडिचेरी हीं शहरें परत मिळालीं आणि आजपर्यंत हीं

शहरें त्यांच्याच ताब्यात असलीं, तरी या देशांत त्यांना यापुढें कांहीं महत्त्वाचें स्थान राहिलें नाहीं.

इंग्रज आणि फ्रेंच लोकांत या काळीं इकडे फक्त हिंदुस्थानांतच युद्ध चालू होतें असें नव्हे; यूरपखेरीज कॅनडामध्यें आणि इतरही ठिकाणीं त्याचें युद्ध चालू होतें. कॅनडा-मध्येंही इंग्रजांचाच जय झाला; परंतु त्यानंतर लौकरच अमेरिकेंतील इंग्रजांच्या वसाहती मात्र त्यांच्या हातांतून गेल्या. या प्रसंगीं फ्रेंचांनीं या वसाहतींना मदत करून इंग्रजांवर सूड उगविला.

अशा रीतीनें फ्रेंचांचा कांटा आपल्या मार्गांतून काढून टाकल्यानंतर हिंदुस्थानांत इंग्रजांच्या मार्गांत आतां आणखी कोणाकोणाची अडचण उभी होती? अर्थातच मराठ्यांची अडचण ही पहिली आणि मोठी; त्यांची सत्ता पश्चिम हिंदुस्थान आणि मध्य हिंदुस्थान यांमध्यें व कांहीं अंशीं उत्तर हिंदुस्थानमध्येंसुद्धां होती. त्यानंतर हैद्राबादचा निजाम हा एक होता; पण त्याचें कांहीं एवढें मोठेंसें महत्त्व नव्हतें. आणि त्याशिवाय दक्षिण हिंदुस्थानांत नवीनच निर्माण झालेला एक फार बलिष्ठ शत्रु त्यांना होता, तो म्हणजे हैदरअल्ली. जुन्या विजयनगरच्या राहिल्यासाहिल्या भागाचा कबजा घेऊन हैदरअल्लीनें आपलें राज्यासन मांडलें होतें. आजच्या म्हैसूर संस्थानचा प्रांत म्हणजे सामान्यतः या हैदरअल्लीच्या राज्याचा प्रदेश होता. उत्तरेकडे बंगाल प्रांतांत सिराजउद्दौला याचा अम्मल चालू होता; पण हा अगदींच नालायक गृहस्थ होता. दिल्लीचें साम्राज्य असें प्रत्यक्षांत मुळींच अस्तित्वात नव्हतें; त्यांचें अस्तित्व आतां नुसतें कल्पनेंतच राहिलें होतें हें आपण पाहिलेंच आहे. तरी पण चमत्कार असा, कीं इंग्रज लोक हे इ. स. १७५६ पर्यंत, म्हणजे नादिरशहाची स्वारी होऊन जाऊन मध्यवर्ती सत्तेची राहिलीसाहिली सावलीसुद्धां गाडली गेल्यानंतर कितीएक वर्षेंपर्यंत, आपण दिल्लीच्या साम्राज्याचा अधिकार मानतों हें दाखविण्यासाठीं म्हणून मोठ्या नम्रपणानें दिल्लीपतीकडे नजराणे पाठवीत असतच. आठवत असेल तुला, कीं औरंगजेबाच्या काळांत इंग्रजांनीं एकदां बंगालवर चढाई करण्याचें धाडस केलें होतें. त्या वेळीं त्यांचा चांगलाच पराभव झाल्यामुळें त्यांनीं इतकी हाय खाल्ली होती, कीं पुढें परिस्थिति बदलून उत्तर हिंदुस्थानांत हिंमतवान् अशा कोणा माणसाला कोठेंही हात शिरकविण्याला सगळें मोकळें रान अशी अवस्था निर्माण झाली, तरीसुद्धां पुष्कळ काळपर्यंत पुन्हां हल्ला करण्याचें धाडस करण्याची छाती इंग्रजांना झाली नाहीं.

क्लाइव्ह हा मग अशा प्रकारचा हिंमतवान् इंग्रज गृहस्थ निघाला. स्वाभाविकच साम्राज्य संपादन करणारा म्हणून इंग्रज लोक या क्लाइव्हबद्दल फार मोठा पूज्यभाव बाळगतात. त्यानें आपल्या वैयक्तिक गुणावगुणांनीं आणि आपल्या कामगिरीनें साम्राज्यें कशीं उभारलीं जातात याचें एक प्रत्यक्ष उदाहरणच जगापुढें ठेवलेलें आहे. क्लाइव्ह हा बेडर साहसी गृहस्थ होता, असामान्य लोभी होता आणि एकदां एखादी गोष्ट करावयाची म्हणून ठरलें, कीं तीसाठीं मग खोटे कागद तयार करणें, खोटीं वचनें

देणें या गोष्टींना तो डरणारा नव्हता. इंग्रज लोकांनीं त्याच्या राज्यात ज्या पुष्कळ भानगडी चालविल्या होत्या त्यांमुळें बंगालचा नबाब सिराजउद्दौला हा चिडून जाऊन मुर्शिदाबादेहून कलकत्त्यावर चालून गेला आणि तें शहर त्यानें कबजांत घेतलें. याच हल्ल्याच्या वेळीं "ब्लॅकहोल" या नांवानें ओळखला जाणारा तो शोकजनक प्रसंग घडला असें म्हणतात. गोष्ट अशी सांगितली जाते, कीं नबाबाच्या अधिकाऱ्यांनीं पुष्कळसे इंग्रज लोक एका अगदीं लहानशा आणि कोंदट खोलीमध्यें रात्रभर कोंडून ठेविले आणि त्यांपैकीं बहुतेक सर्वजण गुदमरून तेथें मरण पावले. ही गोष्ट घडली असली, तर ती खरोखरच अत्यंत रानटी आणि आंगावर शहारे आणण्यासारखी किळसवाणी आहे यांत कांहींच शंका नाहीं; परंतु ही सगळी गोष्ट ज्या एका गृहस्थानें लिहून ठेवलेल्या हकिकतीवर आधारलेली आहे, तो मनुष्यच तसा फारसा विश्वासाई म्हणून समजला जात नाहीं. त्यामुळें पुष्कळशा लोकांचा समज असा आहे, कीं ही गोष्ट पुष्कळ अंशीं खोटीच आहे आणि जरी कदाचित् तिच्यांत सत्याचा अंश असावा असें मानलें, तरी तिच्यामध्यें अतिशयोक्तीचें प्रमाण फारच मोठें आहे.

नबाबाला कलकत्ता घेण्यांत जें यश आलें, त्याचा क्लाइव्हनें चांगलाच सूड घेतला; पण या बाबतींत या साम्राज्यसंस्थापकानें स्वीकारलेला मार्ग हा खास त्याच्या डोक्यांतून निघालेला असा होता. त्यासाठीं एक खोटा कागद तयार करून नबाबाचा प्रधान मीरजाफर याला त्यानें आंतून विश्वासघात करायला प्रवृत्त कसें केलें, याबद्दलची सगळी हकिगत फार मोठी आहे. मुद्दा असा, कीं अशा रीतीनें खोटा कागद व स्वजन-द्रोह यांच्या साहाय्यानें भूमिका तयार करून क्लाइव्हनें प्लासी येथें इ. स. १७५७ मध्यें नबाबाचा पराभव केला. लढाई म्हणून पाहिली तर ही फारच लहान स्वरूपाची लढाई होती आणि खरें म्हणजे ती लढाई सुरू होण्यापूर्वीच क्लाइव्हनें आपल्या कारस्थानांच्या बळावर जिंकलेली होती. पण या प्लासीच्या छोट्या लढाईचे परिणाम फार मोठे झाले. त्या लढाईंत बंगालचें भवितव्य ठरून गेलें; एवढेंच नव्हे, तर इंग्रजांच्या सर्व हिंदुस्थानावरील प्रभुत्वाचीच सुरुवात प्लासीच्या लढाईनें झाली असेंही म्हणण्यांत येतें. अशा तऱ्हेनें खोटे दस्तऐवज व विश्वासघात यांच्या या किळसवाण्या पायावर ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील साम्राज्य स्थापलें गेलें; परंतु जगांतलि सगळ्याच साम्राज्यांचा आणि साम्राज्य-संस्थापकांचा थोड्याफार फरकानें हा नेहमींचाच मार्ग आहे.

भाग्यचक्राच्या गतीमध्यें एकाएकीं घडून आलेल्या या बदलामुळें बंगालमधील लुटारू, साहसी आणि लोभी इंग्रजांचीं डोकीं फिरून गेल्यासारखीं झालीं. सगळा बंगाल देश आतां त्यांचा झाला होता आणि त्यांनीं कोठेंही हातपाय पसरले, तरी त्यांना नाहीं म्हणण्याची ताकद कोणामध्येंच नव्हती. म्हणून क्लाइव्हच्या नेतृत्वाखालीं या लोकांनीं बंगाल प्रांताच्या सार्वजनिक खजिन्यावर घाड घातली आणि तो अगदीं पुरा पुरा रिता करून टाकला. त्यांतून क्लाइव्हनें स्वतःलाच आपल्या कामगिरीबद्दल नगद साडेबावीस लक्ष रुपये बक्षीस म्हणून घेतले आणि एवढ्यावर संतुष्ट न होतां त्यानें

स्वतःला कित्येक लाख रुपयांचें सालीना उत्पन्न असलेली मोठी मौल्यवान् जहागीरही घेतली. बाकीच्याही सर्व इंग्रज लोकांनीं अशाच रीतीनें आपापल्या "श्रमाचा मोबदला" घेतला. जो तो निर्लज्जपणें जें हातास लागेल तें आपल्या खिशांत घालीत होता. ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांनीं या वेळीं जो लोभीपणा व न्याय-अन्यायाबद्दल बेफिकिरी दाखविली, तिला जगांत कोठें तोड सांपडावयाची नाहीं. यानंतर बंगालमध्यें नबाब कोणाला करावयाचें हें इंग्रजांच्या मर्जीवर अवलंबून राहिलें; आपल्या लहरी-प्रमाणें कोणालाही ते नबाब करीत, नाहीं तर काढून टाकीत. एक नबाब जाऊन दुसरा नबाब प्रस्थापित व्हायचा, म्हणजे भलेभक्कम नजराणे आणि लांचलुचपत यांना नुसता ऊत यावयाचा. राज्यकारभाराची कांहीं या लोकांना कसलीच फिकीर नव्हती; तें काम रोज नव्या येणाऱ्या बिचाऱ्या नबाबाच्या माथ्यावर; यांचें काम फक्त जलदी गबर होण्याचें!

यानंतर थोड्याच वर्षांनीं इ. स. १७६४ मध्यें ब्रिटिशांनीं बक्सार येथें आणखी एक लढाई जिंकली. तिचा परिणाम म्हणजे दिल्लीच्या बादशहानें इंग्रजांचें प्रभुत्व मान्य केलें. त्यांच्याकडून वार्षिक तनखा घेऊन त्यानें राज्याचे अधिकार त्यांच्या स्वाधीन केले. अशा रीतीनें इंग्रजांचें बंगाल आणि बिहार या प्रांतामध्यें अप्रतिबंध राज्य सुरू झालें; परंतु या प्रदेशांतून आतांपर्यंत त्यांनीं जी लूट चालविली होती तेवढ्यावर त्यांचें समाधान न होऊन संपत्ति मिळविण्याचे आणखी मार्ग शोधून काढावयाला त्यांनीं सुरुवात केली. आतापर्यंत देशांतील अंतर्गत व्यापारांत त्यांचा हात नव्हता. आतां त्यांत त्यांनीं शिरकाव करून घेतला आणि बाकीच्या सर्व व्यापाऱ्यांना घरगुती तयार झालेले जिन्नस इकडून तिकडे नेऊन विकतांना जी जकात द्यावी लागत असे ती न देतांच हा व्यापार करण्याचा त्यांनीं चंग बांधला. हिंदी कारखानदारांवर आणि व्यापारावर ब्रिटिशांनीं घातलेला हा अगदीं पहिला घाव होय.

उत्तर हिंदुस्थानमध्यें आतां ब्रिटिशांची परिस्थिति हातांत सत्ता आणि संपत्ति भरपूर, पण जबाबदारी मात्र कसल्याच प्रकारची नाहीं, अशी होती. ईस्ट इंडिया कंपनीच्या या लुटारू व्यापाऱ्यांना खराखुरा प्रामाणिक व्यापारधंदा, खोटेपणाचा अप्रामाणिक व्यापार-व्यवहार आणि उघड उघड निव्वळ लूटमार यांच्यामधला फरक समजून वागण्याची बिलकुल फिकीर नव्हती. तो काळ म्हणजे इंग्रज लोकांनीं पैशांचीं ओझींच्या ओझीं घेऊन परत इंग्लंडला जावयाचें आणि तेथें 'नबाब' होऊन राहावयाचें अशा प्रकारचा होता. तूं जर थॅकरेची 'व्हॅनिटी फेअर' ही कादंबरी वाचली असशील, तर तिच्यामध्यें तुला असा एक तुंद माजलेला माणूस आढळला असेल.

राजकीय असुरक्षितता आणि बंडाळी, पावसाचा अभाव, ब्रिटिशांचें आपले खिसे भरून घेण्याचें धोरण या सर्व कारणांच्या समुच्चयामुळें बंगाल व बिहार या प्रांतांमध्यें इ. स. १७७० मध्यें अत्यंत प्रचंड व भयंकर अशा दुष्काळाचा कहर उसळला. असें म्हणतात, कीं त्यामध्यें या प्रदेशांतील तिसऱ्या हिश्श्याहून अधिक रहिवासी

नष्ट झाले. केवढी प्रचंड, किती भयंकर संख्या असली पाहिजे ही! लाखों लोक दिवसानुदिवस अपुरें अन्न खात राहिल्यामुळें मृत्युमुखीं पडले. मोठमोठे प्रदेशच्या प्रदेश लोकच नाहींसे झाल्यामुळें उजाड झाले. शेतजमीन आणि खेडीं वर उगवलेल्या अरण्याच्या पोटांत गडप होऊन गेलीं. उपासमारीच्या यातना सोसणाऱ्या लोकांना कोणींही कसलीही मदत केली नाहीं. नबाबाला शक्ति नव्हती, सत्ता किंवा अधिकार नव्हता आणि इच्छाही नव्हती. ईस्ट इंडिया कंपनींतील लोकांच्या हातात सामर्थ्य होतें आणि अधिकारही होता; परंतु त्यांना तशी जबाबदारी किंवा इच्छा वाटत नव्हती. त्यांचें काम फक्त मिळेल तेथून पैसा गोळा करावयाचा, जमीनमहसूल वसूल करावयाचा एवढेंच होतें आणि हें काम त्यांनीं अतिशयच चोख रीतीनें आणि आपले खिसे भरून घेण्याच्या दृष्टीनें अतिशयच समाधानकारकपणें पार पाडलें. इतकें कीं, सभोंवार जरी असा हा दुष्काळाचा कहर उसळला होता आणि लोकसंख्येपैकीं तिसऱ्या हिश्शाहून अधिक हिस्सा नष्ट होत होता, तरीसुद्धां जे जिवंत राहिले होते त्यांच्याकडून त्यांनीं जमीनमहसुलापैकीं पैन् पै वसूल करायला सोडलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर सरकारी ठरलेल्या महसुलापेक्षांही अधिक वसूल या लोकानीं केला आणि हा वसूल त्यांनीं जबरदस्तीनें व मारपीट करून केला, असें खुद्द सरकारी रिपोर्टांतच म्हटलेलें आहे. दुष्काळासारख्या भयंकर संकटांतून कसाबसा जीव बचावून राहिलेल्या अर्धपोटी, उपासमारीनें दैन्यावस्थेस पोंचलेल्या या लोकांकडून अशा रीतीनें जबरदस्तीनें आणि जुलूम करून पैसा वसूल करण्याचा हा अमानुषपणा कशा प्रकारचा असूं शकेल, याची पुरेशी कल्पनासुद्धां करणें आपल्यासारख्यांच्या बुद्धीच्या आटोक्याबाहेरचें काम आहे.

बंगालमध्यें आणि फ्रेंचांविरुद्ध इंग्लिश लोकांना अशा तऱ्हेनें जरी जय मिळाले, तरी दक्षिणेंत त्याना फार अडचणींना तोंड द्यावें लागलें. शेवटचा विजय पदरांत पडेपर्यंत तिकडे त्यांना पुष्कळदां पराभूत व्हावें लागलें व पुष्कळदां अपमानही सहन करावे लागले. म्हैसूरचा हैदरअल्ली हा त्यांचा फार मोठा कडवा शत्रु होता. तो मोठा कर्तबगार आणि बेडर सेनानायक असून त्यानें इंग्लिश सैन्याचा पुनःपुनः पराभव केला. इ. स. १७६९ मध्यें तर थेट मद्रासच्या किल्ल्याच्या भिंतीखालीं त्यानें इंग्रजांना स्वतःशीं आपल्याला फायदेशीर असा तह करण्यास भाग पाडलें. दहा वर्षांनंतर पुन्हां एकदां त्याला असाच मोठा जय मिळाला. त्याच्या मागें त्याचा मुलगा टिपू सुलतान हाही असाच ब्रिटिशांच्या मार्गांत चागलाच कांटा होऊन सलत राहिला. टिपूचा अखेरचा पराभव करण्यापूर्वी ब्रिटिशाना आणखी दोन युद्धें म्हैसूरच्या राज्याशीं करावीं लागलीं. टिपूचा पराभव केल्यानंतर इंग्रजांनीं हल्लींच्या महाराजाच्या एका पूर्वजाला ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं म्हैसूरच्या गादीवर प्रस्थापित केलें.

मराठ्यानीं पण दक्षिणेंत इ. स. १७८२ मध्यें ब्रिटिशांचा चांगला पराभव केला. तिकडे उत्तरेंत या वेळीं ग्वाल्हेरच्या शिंद्यांचें वर्चस्व प्रस्थापित झालेलें होतें आणि गरीब बिचारा दिल्लीचा बादशहा शिंद्यांच्या हातचें खेळणें होऊन राहिलेला होता.

अशा वेळीं इंग्लंडहून वॉरन हेस्टिंग्ज यास हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें व तो हिंदुस्थानचा पहिला गव्हर्नर जनरल झाला. आतां ब्रिटिश पार्लमेंटनें हिंदुस्थानच्या प्रश्नांत लक्ष घालण्यास सुरुवात केली. हेस्टिंग्ज हा इंग्रजांचा हिंदुस्थानांतील सर्वांत श्रेष्ठ प्रतीचा कारभारी म्हणून समजला जातो; परंतु त्याच्या काळचा राज्यकारभार सुद्धां लांचलुचपतीनें बरबटलेला आणि दुसऱ्या अनेक अन्यायांनीं भरलेला होता, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. स्वतः हेस्टिंग्जनें छळ करून मोठमोठ्या रकमा उकळल्याचीं कांहीं उदाहरणें आतां जगजाहीर झालेलीं आहेत. इंग्लंडला परत गेल्यावर हेस्टिंग्जची पार्लमेंटच्या न्यायासनासमोर त्याच्या हिंदी कारभाराबाबत चौकशी झाली होती; दीर्घ काळपर्यंत खटला चालून त्यांत तो निर्दोषी म्हणून सुटला होता. त्याच्या आधीं पार्लमेंटनें क्लाइव्हलाही ठपका दिला होता आणि त्यानें तर त्यामुळें आत्महत्याच केली. अशा रीतीनें कोणावर ठपका ठेवून किंवा कोणाची जाहीर चौकशी करून आपल्या सदसद्विवेक बुद्धीची टोंचणी कमी करण्याचा इंग्लंडनें प्रयत्न केला; परंतु मनांतून खरोखर या लोकांनीं जें केलें तें फार उत्तम केलें, अशी आदराची भावना इंग्लंडला त्या लोकांबद्दल होती आणि त्यांच्या धोरणापासून झालेला फायदाही गिळं-कृत करण्याला इंग्लंडची तयारीच होती. क्लाइव्ह आणि हेस्टिंग्ज यांच्यासारख्यांचा कितीही जरी निषेध केला, तरी ते दोघे मोठे नमुनेदार साम्राज्यसंस्थापक होऊन गेले हें खरें आहे आणि जोंपर्यंत जिंकलेल्या लोकांवर साम्राज्यें स्थापून त्या लोकांची पिळणूक करावयाची हा प्रकार जगांत चालू राहणार आहे, तोंपर्यंत असल्या प्रकारचे लोक हे पुढें येणारच आणि लोक त्यांची वाहवाही करणारच. निरनिराळ्या युगात पिळणूक करण्याच्या पद्धती बदलतील एवढेंच; बाकी मूळ भूमिका तीच कायम राहणार. ब्रिटिश पार्लमेंटनें क्लाइव्हचा म्हणे निषेध केला; परंतु लंडन येथील व्हाइट हॉलमधील इंडिया ऑफिसच्या समोरच खुद्द क्लाइव्हचा पुतळा इंग्रज लोकांनीं बसविलेला असून आंतील आंगाला कचेरीमध्यें त्याच्या ठिकाणची प्रवृत्तीच मूर्तिमंत प्रकट होऊन जणुं हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजवटीचें धोरण ठरवीत आहे.

हेस्टिंग्जनेंच प्रथम ब्रिटिशांच्या संरक्षणाखालील हिंदी राजांची बाहुलीं प्रस्थापित करण्याच्या धोरणाला सुरुवात केली. म्हणून पुष्कळसे सोन्याचा मुलामा चढवलेले व पोकळ डोक्याचे जे कित्येक महाराज आणि नबाब हिंदी इतिहासाच्या रंगभूमीवर उगीच छाती वर काढून नाचत असतात आणि आपल्या अस्तित्वामुळें नसती घाणघूण करून ठेवीत असतात, अशा या राजेलोकांच्या टोळक्यांच्या निर्मितीचें श्रेय अंशतः हेस्टिंग्जला द्यावयास हवें.

हिंदुस्थानांत इंग्रजांचें साम्राज्य वाढत चाललें, तसतशीं त्यांचीं मराठ्यांशीं आणखीं पुष्कळ युद्धें झालीं. पण या सर्व युद्धांविषयीं एक अलौकिक चमत्काराची गोष्ट अशी आहे, कीं तीं सर्वच युद्धें जरी इंग्लंडच्या फायद्यासाठीं म्हणून चाललेलीं होतीं, तरी त्यांचा खर्च मात्र हिंदुस्थानच्या माथ्यावर पडलेला आहे. इंग्लिश लोकांना

त्यातला एवढाही भार सोसावा लागलेला नाहीं. त्यांनीं फक्त फायदा तेवढा खिशात घातला.

लक्षांत घेण्यासारखी एक गोष्ट आहे, कीं आतां ईस्ट इंडिया कंपनीचें–एका व्यापारी संस्थेचें–अशा रीतीनें हिंदुस्थानात राज्य झालें. कंपनीवर ब्रिटिश पार्लमेंटची देखरेख आणि नियंत्रण वाढत्या प्रमाणांत होतें हें खरें; परंतु हिंदुस्थान देशाचें भवितव्य आतां मुख्यतः मूठभर व्यापारी लुटारूंच्या टोळक्यांच्या हातीं गेलेलें होतें. त्यांच्या दृष्टीनें राज्यकारभार म्हणजे व्यापार आणि लूट असें समीकरण ठरलेलें होतें. यामधील भेद त्यांच्या दृष्टीपुढें असलाच तर तो फारच क्षुल्लक होता. ईस्ट इंडिया कंपनी आतां आपल्या भागीदारांना शंभर टक्के, दीडशें टक्के, केव्हा केव्हां दोनशें टक्केसुद्धां सालोसाल नफ्याच्या रूपानें वाटूं लागली होती. याशिवाय कंपनीचे हिंदुस्थानांतील कारभारी चांगल्या भल्या मोठ्या रकमा अचूक खिशांत टाकीतच असत, हें क्लाइव्हच्या उदाहरणावरून आपण पाहिलेंच आहे. याखेरीज कंपनीचे अधिकारी निरनिराळ्या व्यापारांच्या बाबतींत ठेकेदारी निर्माण करून झपाट्यानें या मार्गानें प्रचंड संपत्ति मिळवीत तें वेगळेंच. हिंदुस्थानांतील कंपनीचें राज्य हें अशा प्रकारचें होतें.

## ९३

## चीनच्या मांचू घराण्यांतील एक श्रेष्ठ राजा

१५ सप्टेंबर, १९३२

माझ्या अंतःकरणाचें नुसतें पाणी पाणी होऊन गेलेलें आहे! काय करावें हेंच मला सुचत नाहीं. बातमी–भयंकर बातमी–आली आहे, कीं बापूंनीं प्राणांतिक उपोषण सुरू केलें आहे. माझ्या जीवनाच्या छोट्या जगांत बापूंनी केवढी मोठी जागा व्यापलेली आहे! हें जग आज कांपूं लागलें आहे; धडपडूं लागलें आहे; जिकडे तिकडे डोळ्यापुढें अंधकार उभा राहिला आहे; कशामध्यें कांहीं अर्थच शिल्लक राहिला नाहीं असें झालें आहे. त्यांचें स्वरूप पुनःपुनः माझ्या डोळ्यांपुढें उभें राहतें आहे. त्यांचें अगदीं अलीकडचें दर्शन मला झालें त्याला नुकतेंच एक वर्ष झालें. हिंदुस्थानांतून त्यांना पश्चिमेकडे घेऊन जाणाऱ्या त्या जहाजाच्या वरच्या भागावर त्या दिवशीं उभे असतांना त्यांना मीं पाहिलें. आतां त्यांची माझी पुन्हां भेटच होणार नाहीं काय? आणि मला जेव्हां संशयानें पछाडलेलें असेल, कोणाचा दूरदृष्टीचा सल्ला हवा असेल, किंवा शरीराच्या अथवा मनाच्या कांहीं वेदनाच्या वेळीं मला कोणाचा प्रियकर हात पाठीवरून फिरून तें दुःख हलकें व्हावेंसें वाटेल, अशा वेळीं मग मला कोणाकडे जातां येईल? ज्याच्यापासून आम्हांला स्फूर्ति मिळाली तो आमचा प्रिय

पुढारी गेल्यावर आमची गति कशी होईल? छे! ज्या या देशात अशा श्रेष्ठ पुरुषांना अशा रीतींनें लोक मरूं देतात, तो हा हिंदुस्थान देश किती राक्षसी म्हटला पाहिजे! प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा विचार सोडून देऊन क्षुद्र गोष्टींसंबंधीं उगीच तंटेबखेडे करीत बसणारे हिंदुस्थानांतले लोक गुलामच असले पाहिजेत; त्यांची मनोभूमिकाच गुलामांची बनलेली असली पाहिजे.

माझ्या मनात लिहिण्याचा उत्साहच राहिलेला नाहीं! एकदां तर ही पत्रमालिका लिहिण्याचें काम संपवूनच टाकावें असें माझ्या मनांत आलें; परंतु मीं विचार केला, कीं असें करणें मूर्खपणाचें आहे. येथें या तुरुंगाच्या खोलींत बसून वाचन, लेखन आणि मनन हें जर मीं केलें नाहीं, तर दुसरें मला काय करतां येणार आहे? तसेंच थकून गेलों असताना किंवा अंतःकरण त्रस्त झालेलें असतांना तुझी स्मृति आणि तुला पत्र लिहिणें याहून माझ्या मनाचें समाधान करायला दुसरें अधिक चांगलें साधन कोठलें असणार आहे? नुसतें दुःख करीत, अश्रू ढाळीत बसण्यानें का मनुष्याचे दिवस हलके होणार आहेत? सर्व महासागरांत पाणी नसेल इतके अश्रू आजवर मनुष्यजातीनें ढाळलेले आहेत, असें बुद्धानें म्हटलें आहे आणि आमच्या या दुर्दैवी पृथ्वीची सर्व व्यवस्था ठाकठीक लागेपर्यंत अजून असे किती तरी अश्रू ढाळावे लागणार आहेत. आमच्यापुढें अजून पुष्कळ काम पडलें आहे. केवढी मोठी कार्यें करण्याची जबाबदारी आम्हांला बसूं नका, कामाला लागा, म्हणून बजावते आहे. हें सारें कार्य पुरें होईपर्यंत आम्हांला काय किंवा आमच्या मागून येणाराना काय, विश्रांति घेण्याला सवड मिळणें शक्य नाहीं. म्हणून आपला रोजचा कार्यक्रम चालू ठेवावयाचा असें मीं ठरविलें आहे. तेव्हां आतां हीं पत्रें मी लिहीत जाईन तुला पूर्वीप्रमाणें.

गेल्या कांहीं पत्रांत मी हिंदुस्थानची हकीगत सांगत होतों. मोठासा अभिमान वाटावा असा कांहीं हा वृत्तांत नव्हता. कारण त्या काळांत हिंदुस्थान चीत होऊन पडलेला असून येईल त्या पेंढाऱ्यानें नाहीं तर लुटारूनें त्याच्यावर हल्ला करून त्याला लुबाडावें किंवा नागवावें अशी त्याची अवस्था झालेली होती. हिंदभूमीची पूर्वेकडील श्रेष्ठ भगिनी जी चीनची भूमि, तिची अवस्था मात्र या काळांत पुष्कळच चांगल्या प्रकारची होती; म्हणून आतां थोडा वेळ आपण चीनकडे लक्ष पुरविणें अवश्य आहे.

पूर्वीच्या एका पत्रांत (पत्र ८०) सांगितलेली हकीगत आठवत असेल तुला मिंग घराण्याच्या काळांत चीनची कांहीं काळ फार मोठी भरभराट झाली; पुढें तेथें अनाचार माजला. तंटेबखेडे होऊन फाटाफूट झाली आणि अशा वेळीं चीनचे उत्तरेकडील शेजारी जे मांचू लोक त्यांनीं चीनवर चालून येऊन तेथील राज्य काबीज केलें. इ. स. १६५० पासून पुढें मांचू घराण्याचें राज्य चीनमध्यें चागलेंच भक्कमपणें प्रस्थापित झालें. या अर्धवट परकी घराण्याच्या कारकीर्दीत चीनचें बळ वाढलें; एवढेंच नव्हे, तर चीननें बाहेर प्रदेशांत स्वाऱ्याही करण्यास सुरुवात केली. मांचू घराण्याच्या

ठिकाणीं एक नवीनच प्रकारचा जोम संचारला होता; परंतु चीनच्या अंतर्गत व्यवहारामध्यें फारशी ढवळाढवळ न करतां त्यांनीं आपली सर्व जादा शक्ति आपलें साम्राज्य उत्तर, पश्चिम आणि दक्षिण या दिशांना वाढविण्यांत खर्च केली.

कोणतेंही नवें राजघराणें म्हटलें म्हणजे सुरुवातीला त्यामध्यें कांहीं कांहीं कर्तबगार राज्यकर्ते निर्माण व्हावयाचे आणि मग नालायकांची मालिका लागून त्याची तेजाची ज्योति मंद आणि बारीक होत होत नाहींशी व्हावयाची, असा एक नियमच दिसतो. त्याप्रमाणें मांचू घराण्यामध्येंही कांहीं असामान्य सामर्थ्यवान् आणि कर्तबगार राज्यकर्ते आणि मुत्सद्दी उदयास आले. मांचू घराण्यांतील दुसरा बादशहा कांग ही या नावाचा होता. गादीवर आला त्या वेळीं तो अवघा आठ वर्षांचा होता. जगांतील कोणत्याही साम्राज्यापेक्षां अधिक विस्तृत आणि अधिक लोकसंख्येच्या साम्राज्याचा तो एकसष्ठ वर्षें स्वामी म्हणून नांदला; परंतु इतिहासामध्यें त्याला जें विशेष स्थान प्राप्त झालेलें आहे तें या त्याच्या साम्राज्याच्या विस्तारामुळें नव्हे किंवा त्याच्या लष्करी सामर्थ्यामुळेंही नव्हे. तर त्याची स्मृति एवढी टिकून आहे याचीं ध्यानात ठेवण्यासारखीं कारणें म्हणजे त्याच्या ठिकाणचा मुत्सद्दीपणा आणि त्याचीं साहित्यविषयक कामगिरी हीं होत. त्याची कारकीर्द इ. स. १६६१ पासून १७२२ पर्यंत चालली; म्हणजे फ्रान्सचा महान् बादशहा चौदावा लुई याचा तो चौपन्न वर्षें समकालीन होता. दोघांच्याही कारकीर्दी भल्या लांबलचक झाल्या; परंतु बहात्तर वर्षें राज्य करून लुईनें दीर्घ काळ राज्य करण्याच्या उच्चांकाची शर्यत जिंकली. या दोघांची तुलना करणें मोठें मनोरंजक आहे; परंतु या तुलनेमध्यें लुईची बाजू सर्वतोपरी लंगडी पडणारी आहे. लुईनें आपल्या देशाचा नाश केला; पिळून त्याला निःसत्त्व केलें आणि वर आणखी कर्जाच्या डोंगराचा बोजा करून ठेवला. धर्माच्या बाबतींतही तो अनुदार आणि कडवा होता. कांग ही हाही स्वतः कट्टा कॉन्फ्यूशियसच्या पंथाचा अनुयायी होता; परंतु इतर धर्ममतांना तो आदरानें वागवीत असे. त्याच्या कारकीर्दीत, नव्हे — मांचू घराण्यांतील पहिल्या चारही बादशहांच्या कारकीर्दीत, चीनमधील मिंग घराण्यापासून चालत आलेल्या संस्कृतीला काडीचा धक्का लावण्यांत आला नाहीं. त्या संस्कृतीची उच्च भूमिका याही कालांत कायम राहिली; एवढेंच नव्हे, तर तिच्यांत थोडीशी कांहीं बाबतींत अधिकच उच्चता निर्माण झाली. उद्योगधंदे, कला, साहित्य आणि शिक्षण यांची मिंग घराण्याच्या काळाप्रमाणेंच याही काळामध्यें भरभराट चालू राहिली. चिनी मातीचीं अलौकिक कलाकौशल्याचीं भांडींही निर्माण होत राहिलीं. रंगीत छपाई करण्याची कला याच काळांत चीनमध्यें शोधून काढण्यांत आली आणि जेसुइट लोकांकडून तांब्यावरील कोरकामाची विद्या पैदा करण्यांत आली.

मांचू घराण्यांतील राज्यकर्त्यांच्या मुत्सद्देगिरीचें आणि यशस्वितेचें रहस्य तें स्वतःच चिनी संस्कृतीशीं संपूर्णपणें एकजीव होऊन गेले यामध्यें आहे. चिनी तत्त्वज्ञान आणि चिनी संस्कृति याचा जरी त्यांनीं आपल्या जीवनाशीं पूर्ण मिलाफ केला, तरी

पण चिन्यांपेक्षां सुधारणेनें कमी अशा मांचू समाजाच्या ठिकाणीं जो एक विशिष्ट जोमदारपणा आणि उद्योगीपणा होता तो मात्र त्यांनीं सोडला नाहीं. त्यामुळें कांग हीच्या ठिकाणीं आपल्याला दोन भिन्न प्रवृत्तींचें एक प्रकारचें विलक्षण आणि सामान्यतः अनुभवास न येणारें असें मिश्रण आढळून येतें. एका बाजूनें तत्त्वज्ञानाचा मोठा अभ्यासविरत जिज्ञासू आणि सांस्कृतिक कार्यामध्यें पूर्ण गुंगलेला असा तो आढळतो, तर दुसरीकडे तोच कर्तबगार लष्करी नायक आणि देश जिंकण्याचें थोडेंसें वेडच असलेला असाही आढळतो. कला आणि साहित्य यावरची त्याची भक्ति निव्वळ वरवरची, पोशाखी किंवा दिखाऊ नव्हती. त्याच्या साहित्यविषयक कामगिरींत त्याच्या सूचनेवरून, किंबहुना पुष्कळदां प्रत्यक्ष त्याच्या देखरेखीखालीं जीं तीन महत्त्वाचीं कार्यें चीनमध्यें संपूर्ण करण्यांत आलीं त्यांचा समावेश होतो; त्यांवरून त्याचा स्वतःचा अभ्यास किती खोल होता आणि वाङ्मयावरील त्याची भक्ति किती दृढ होती याची तुला थोडीशी कल्पना येईल.

चिनी भाषेंत वेगळे वेगळे शब्द नाहींत, तर चिन्हें आहेत हें तुला ठाऊक आहे. या सगळ्या चिन्हांचा एक कोश कांग हीनें तयार करविला. चाळीस हजार चिन्हें आणि त्यांचा अर्थ व्यक्त करणारीं उदाहरणादाखल असंख्य वाक्यें यांचा संग्रह करण्याचें हें काम खरोखरच फार प्रचंड होतें. आज सुद्धां या कोशाच्या तोडीचा प्रचंड कोश दुसरा नाहीं असें म्हणतात.

कांग हीच्या उत्साहामुळेंच आपल्याला आणखी एक मोठाच ग्रंथ प्राप्त झालेला आहे. तो म्हणजे एक प्रचंड सचित्र ज्ञानकोश होय. या आश्चर्यकारक प्रचंड ग्रंथाचे कित्येक शेंकडों भाग आहेत. हा ज्ञानकोश म्हणजे एक मोठा स्वतंत्र ग्रंथसंग्रहच म्हणावा लागतो. त्यांत सर्व गोष्टींचा, हरएक विषयाचा समावेश करण्यांत आलेला आहे. कांग हीच्या मृत्यूनंतर तांब्याच्या सरकत्या पट्ट्यांच्या ठशांवरून हा ग्रंथ छापण्यांत आला.

तिसरें जें कार्य मला या ठिकाणीं नमूद करावयाचें आहे, तें म्हणजे सर्व चिनी वाङ्मयाचा एक प्रकारचा पदवाक्यसंग्रहकोश ( Coneordance ) होय. हा एक प्रकारचा अनेक शब्द आणि उतारे यांचा संग्रहकोश असून त्यामध्यें अशा शब्दांची आणि उताऱ्यांची साम्यभेदात्मक चर्चा करून दाखविलेली आहे. हेंही एक असामान्यच कार्य होतें; कारण त्यामध्यें सर्व वाङ्मयाच्या सूक्ष्म अभ्यासाची आवश्यकता होती. कवी, इतिहासकार आणि निबंधलेखक यांच्या ग्रंथांतून त्यांत संपूर्ण उतारे द्यावयाचें काम होतें.

कांग हीनें साहित्यविषयक आणखीही पुष्कळ काम केलें; परंतु हीं तीन कामें-सुद्धां त्याच्या कामगिरीचा भरीवपणा कोणाच्याही ध्यानांत येण्यास पुरेशीं आहेत. या तिन्हींशीं तुलना करावयाला अशा प्रकारचें एकच आधुनिक साहित्यविषयक कार्य माझ्या डोळ्यांपुढें उभें राहतें; दुसरें नाहीं. तें म्हणजे ती महान् ऑक्स्फर्ड इंग्लिश

डिक्शनरी. हा कोश तयार करण्याला पन्नास वर्षें लागलीं; अगणित विद्वानांचे परिश्रम त्या कामीं खर्ची पडले आणि इतक्या काळानंतर आणि परिश्रमांनीं नुकता कोठें तो कोश सबंध छापून तयार झाला आहे.

ख्रिस्ती धर्म आणि ख्रिस्ती मिशनरी यांना कांग ही याची चांगलीच अनुकूलता होती. त्यानें परदेशीय व्यापारालाही चांगलें उत्तेजन दिलें व चीनचीं सर्व बंदरें त्यासाठीं खुलीं केलीं; परंतु यूरपियन लोक या सवलतीचा दुरुपयोग करतात व त्यांच्यावर नियंत्रण ठेवणें जरूर आहे असें त्याला आढळून आलें. हे मिशनरी लोकच आपापल्या मायभूमींतील साम्राज्यवाद्यांशीं सहकार्य करून त्यांना नवीन देश जिंकून घेण्याच्या कामीं मदत व्हावी म्हणून कारस्थानें करीत असतात असा त्याला संशय आला, आणि हा संशय कांहीं अगदींच निराधार नव्हता. त्यामुळें प्रथम ख्रिस्ती धर्माशीं तो जसा सवलतीनें वागत असे, तसें वागण्याचें त्यानें त्यापुढें बंद केलें. पुढें कँटन बंदरांतील एका चिनी लष्करी अधिकाऱ्याकडून एक अहवाल कांग हीकडे सादर करण्यांत आला. त्यावरून त्याचा संशय अधिकच दृढ झाला. या अहवालांत फिलिपाइन्समध्यें व जपानमध्यें यूरपीय देशांचीं सरकारें आणि त्या त्या देशचे व्यापारी व मिशनरी यांचा परस्परांच्या किती संपूर्ण संगनमतानें सगळा व्यवहार चालतो हें दाखविण्यांत आलें होतें. म्हणून या अधिकाऱ्याची शिफारस अशी होती, कीं साम्राज्याचें परकी स्वाऱ्या आणि परकी कारस्थानें यांच्यापासून संरक्षण करण्यासाठीं परदेशीय व्यापारावर नियंत्रण घालावें आणि ख्रिस्ती धर्माचा प्रचार व प्रसार अजिबात बंद करावा.

हा अहवाल इ. स. १७१७ मध्यें सादर करण्यांत आला. पूर्वेकडील देशांत परदेशीय लोकांचीं कारस्थानें कशा प्रकारचीं चाललेलीं होतीं आणि त्यापैकीं कितीएक देशांनीं परदेशीय व्यापार आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसार यांच्यावर जें नियंत्रण घातलें त्यांत त्याचा उद्देश काय होता, या गोष्टींवर या अहवालानें किती स्वच्छ आणि भरपूर प्रकाश पडतो. तुला आठवत असेल, कीं जपानमध्येंही अशाच प्रकारची कांहीं भानगड घडून आल्यामुळेंच जपाननें आपल्या देशाला कोंडून घेतलें. पुष्कळदां असें म्हणण्यांत येतें, कीं हे चिनी आणि इतर लोक हे मागासलेले आहेत, अडाणी आहेत; परदेशीय लोकांचा हे लोक द्वेष करतात आणि त्यांच्या व्यापाराच्या मार्गांत अडचणी निर्माण करतात. परंतु आपण आतांपर्यंत जें इतिहासाचें निरीक्षण केलें त्यावरून तर खरें पाहतां आपल्याला स्वच्छपणें असें प्रत्ययाला आलेलें आहे, कीं हिंदुस्थान आणि चीन यांचा व जगांतील इतर देशांचा परस्परांशीं अगदीं प्राचीनतम काळापासून आणि फारच मोठ्या प्रमाणावर व्यवहार व संबंध चालू होता. परदेशीय लोकांचा किंवा परदेशीय व्यापाराचा द्वेष करण्याचा प्रश्नसुद्धा या देशामध्यें कधीं उद्भवलेला नव्हता. किती तरी दीर्घ काळपर्यंत सर्व परदेशी बाजारपेठांवर वास्तविक हिंदुस्थानचेंच वर्चस्व चालू होतें. परदेशीय व्यापारसंवर्धक मंडळांचा व्यवहार म्हणजे पश्चिम यूरपांतील देशांचा

साम्राज्यवर्धनाचा अगदीं राजरोस मार्गच होय असें जेव्हां दिसून आलें, तेव्हांपासूनच प्रथम त्याच्याविषयीं पूर्वेकडील लोकांमध्यें संशय उत्पन्न झाला.

या लष्करी अधिकाऱ्याच्या अहवालाचा चीनच्या मंत्रिमंडळानें विचार केला व त्याला त्यानें मान्यता दिली. त्यानंतर बादशहा कांग ही यानें त्या रिपोर्टांतील शिफारशींना अनुसरून परदेशीय लोकांचा व्यापार व मिशनरी लोकांचें कार्य यांवर कडक नियंत्रण घालणारे हुकूम जारी केले.

आतां प्रत्यक्ष चीन देशाची सरहद्द थोडा वेळ मी सोडणार आहें आणि तुला आशियाच्या उत्तर टोंकाकडे सायबेरियांत घेऊन जाऊन तेथें काय घडामोडी होत होत्या हें तुला सांगणार आहें. हा प्रचंड सायबेरिया प्रांत म्हणजे अतिपूर्वेकडील चीन देश आणि पश्चिमेकडील रशिया यांना जोडणारा दुवा आहे. चीनमधील मांचू घराण्याच्या साम्राज्याचें धोरण परकी देशांवर आक्रमण करणारें होतें, हें मीं तुला सांगितलेंच आहे. या साम्राज्यात त्यांचा स्वतःचा देश जो मांचूरिया त्याचा अर्थातच समावेश होत होता; पण त्यापलीकडे मंगोलिया प्रांत पचवून घेऊन त्याच्याही पलीकडे तें साम्राज्य विस्तार पावलेलें होतें. याच सुमारास रशियांतून सोनेरी टोळीच्या मंगोलियन लोकांना हांकलून लावण्यांत आलेलें होतें आणि तेथें एक बलिष्ठ मध्यवर्ती सत्ता आतां प्रस्थापित झालेली होती. ही सत्ताही पूर्वेकडे सायबेरियाच्या मैदानाच्या पलीकडे आपलें राज्य वाढविण्याच्या नादांत होती. अशा रीतीनें या दोन साम्राज्यांची सरहद्द सायबेरियामध्यें एकमेकांशीं भिडली.

आशिया खंडात या मोंगल लोकांचें सामर्थ्य कमी होऊन त्यांचा अतिशयच झपाट्यानें ऱ्हास झाला ही इतिहासांतील एक अत्यंत आश्चर्यकारक, विश्वास न बसण्याजोगी अशी घटना आहे. या लोकांनीं आशिया आणि यूरप खंडांत एक काळ नुसता अप्रतिहत धुमाकूळ घातला; चेंगीजखान व त्याचे वंशज यांच्या कारकीर्दीत त्या काळीं ज्ञात असलेल्या जगाचा फार मोठा भाग त्यांनीं जिंकून घेतला आणि असा पराक्रम करणारे हे लोक एकाएकीं अंधकारांत गडप झाल्यासारखे झाले. पुढें तैमूरलंगाच्या कारकीर्दींत त्यांनीं पुन्हां थोडें डोकें वर काढलें; परंतु तैमूरलंगाचें साम्राज्य त्याच्याबरोबरच नाहींसें झालें. त्याच्यामागें त्याच्याच वंशजांपैकीं तैमूरी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या लोकांचें एक राज्य मध्य आशियामध्यें होतें आणि त्याच्या दरबारीं चित्रकारांची एक विख्यात परंपरा नांदत होती. पुढें हिंदुस्थानांत आलेला बाबर हा या तैमूरी लोकांपैकींच एक होता. अशा रीतीनें तैमूरी लोकांचें असें हें एक राज्य जर सोडलें, तर एका वेळीं रशियापासून थेट आशिया खंडाच्या पलीकडच्या आपल्या मायभूमीपर्यंत पसरलेल्या मोंगल वंशाचा या काळांत ऱ्हासच झाला आणि त्याचें सर्व महत्त्व नष्ट झालें. हें असें कां व्हावें, याचें कारण कोणालाही सांगतां येत नाहीं असें दिसतें. कोणी म्हणतात, हवेमध्यें जे फेरबदल घडून आले त्यांचा कांहीं

अंशीं हा परिणाम असावा; दुसऱ्यांचीं दुसरींच मतें आहेत. तें कसेंही असलें, तरी आतां आपण ज्या काळचा इतिहास पाहतों आहों, त्या काळांत जुन्या काळीं सारें जग जिंकण्याचा चंग बांधलेल्या या स्वारीबहादूर लोकांवरच डावीकडून आणि उजवीकडून स्वाऱ्या होण्याचा प्रसंग आला.

आशियांतील मोंगलांच्या साम्राज्याचे तुकडे पडल्यापासून आशियामधील इकडून तिकडे जाणारा जमिनीवरचा वाहतुकीचा मार्ग जवळजवळ २०० वर्षें बंद पडून गेला होता. सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत रशियानें आपले वकील जमीनमार्गानें चीनमध्यें पाठविल्याचें आढळतें. मिंग घराण्यांतील बादशहांबरोबर राजकीय संबंध प्रस्थापित करण्याचा त्यांचा प्रयत्न होता असें दिसतें. परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. यानंतर लौकरच यरमाक नांवाच्या एका रशियन पेंढाऱ्यानें कोसाक सैनिकांच्या एका टोळीनिशीं उरल पर्वत ओलांडला आणि सिबिर येथील छोटेखानी राज्य जिंकून घेतलें. याच राज्याच्या नांवावरून सायबेरिया हें या प्रांताचें नांव निघालेलें आहे.

यरमाकचा हा पराक्रम इ. स. १५८१ सालचा. या दिवसापासून रशियन लोक एकसारखे पूर्वेकडे पसरतच गेले आणि सुमारें पन्नास वर्षांत ते पॅसिफिक महासागरापर्यंत जाऊन पोंचले. लौकरच अमूर नदीच्या खोऱ्यांत त्यांचा चीनबरोबर तंटा उद्भवला आणि दोन्ही पक्षांत लढाई जुंपून तीमध्यें रशियन लोकांचा पराभव झाला. इ. स. १६८९ मध्यें या दोन देशांत एक तह झाला. यालाच नरकिंस्कचा तह असें म्हणतात. या तहाप्रमाणें एकमेकांच्या देशांच्या सरहद्दी कायम करण्यांत आल्या आणि व्यापारासंबंधींचे करारमदार झाले. चीन देशाचा यूरपांतील एखाद्या देशाशीं झालेला असा हा पहिला तह. या तहामुळें रशियाचें यापुढील प्रदेशावरील आक्रमण थांबलें; परंतु दोन्ही देशांत उंटांच्या तांड्यांवरून चालणारा व्यापार मात्र पुष्कळ वाढला. त्या वेळीं पीटर दि ग्रेट हा रशियाचा झार होता आणि चीनबरोबर निकट संबंध जोडण्यासाठीं तो फार आतुर होता. कांग ही बादशहाकडे दोन वेळां त्यानें वकील पाठविले आणि पुढें तर चीनच्या दरबारांत त्यानें आपला कायमचाच प्रतिनिधि ठेवला.

फार प्राचीन काळापासून चीन देशांत निरनिराळ्या देशांकडून वकील येण्याची वहिवाट होती. मला वाटतें, मागें एका पत्रांत मीं रोमन बादशहा मार्कस ऑरेलियस अँटोनियस यानें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत असे वकील चीनमध्यें पाठविल्याबद्दलचा उल्लेख केला आहे. इ. स. १६५६ मध्यें डच लोकांचे आणि रशियन लोकांचे वकील चीनमध्यें गेले होते आणि त्यांना त्या ठिकाणीं हिंदुस्थानातल्या महान् मोंगलांच्या दरबारचे वकील आलेले आढळले. हा वृत्तांत मोठा लक्षांत घेण्यासारखा आहे. हिंदुस्थानांतले हे वकील शहाजहाननें पाठविलेले असले पाहिजेत.

९४

# चीनचा बादशहा इंग्लंडच्या राजास पत्र लिहितो

१६ सप्टेंबर, १९३२

मांचू घराण्यांतील राजे मोठे विलक्षण दीर्घायुषी दिसतात. कांग ही बादशहाचा नातू चीन लुंग हा या घराण्यांतील चौथा बादशहा. यानेंही चांगला भलाभक्कम लांब काळ, म्हणजे इ. स. १७३६ ते १७९६ पर्यंत साठ वर्षें राज्य केलें. इतरही बऱ्याच बाबतींत तो आपल्या आजासारखा होता. वाङ्मयविषयक कार्य आणि साम्राज्यवर्धन हीं दोन कामें त्याचीं विशेष आवडतीं होतीं. संग्रह करण्यालायक अशा सर्व वाङ्मय-कृतींसाठीं त्यानें आपल्या कारकीर्दींत फार मोठा शोध करविला. अशा सर्व ग्रंथांचा संग्रह करून त्यांची त्यानें यादी करविली. यादी हें नांव तितकेंसें शोभण्याजोगें नाहीं; कारण तीमध्यें प्रत्येक ग्रंथाविषयीं मिळण्याजोगी सर्व माहिती ग्रथित केलेली असून शिवाय प्रत्येक ग्रंथाविषयीं परिचयपर आणि गुणदोषविवेचनपर टिपणेंही दिलेलीं होतीं. बादशाही ग्रंथालयांतील ग्रंथसंग्रहाच्या अशा या प्रचंड वर्णनात्मक यादीचे चार भाग आहेत; पहिला पवित्र ग्रंथ म्हणजे कॉन्फ्यूशियन पंथासंबंधींचे ग्रंथ, दुसरा इतिहास, तिसरा तत्त्वज्ञान आणि चवथा सामान्य वाङ्मय. असें म्हणतात, कीं या यादीच्या ग्रंथाला साऱ्या जगांत कोठें तोड नाहीं.

याच काळाच्या सुमारास चिनी वाङ्मयांत कादंबरी, लघुकथा आणि नाटक या प्रकारांचा उदय होऊन त्यांची वाढही फार उच्च प्रतीची झाली. इंग्लंडमध्येंही कादंबरीची वाढ याच काळांत होत होती, हीही एक गमतीची गोष्ट आहे. चिनी मातीचीं भांडीं आणि इतरही कलाकौशल्याच्या वस्तू यांनाही या काळीं यूरपमध्यें फार मागणी होती आणि त्यांचा मोठा व्यापार सतत चालू होता. याहूनही सर्वांत लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे या काळांत चहाच्या व्यापाराला सुरुवात झाली ही होय. मांचू घराण्यांतील पहिल्या बादशहाच्या कारकीर्दींतच या व्यापाराला सुरुवात झाली. इंग्लंडमध्यें चहा बहुधा दुसऱ्या चार्ल्सच्या कारकीर्दीच्या वेळीं पोंचला असावा. इंग्रजी भाषेंतील विख्यात रोजनिशीलेखक सेम्युएल पेपिस यानें इ. स. १६६० सालच्या रोज-निशींत पहिल्या प्रथमच "टी" (Tea) नांवाचें "चिनी पेय" प्रथमच प्यायल्याचा उल्लेख केलेला आहे. पुढें हा चहाचा व्यापार प्रचंड वाढत गेला. दोनशें वर्षांनंतर इ. स. १८६० मध्यें फू चौ या चीनच्या फक्त एका बंदरामधून केवळ एका हंगामांत दहा कोटी पौंड चहाची निर्यात झाली आणि आजकाल हिंदुस्थान आणि सिलोन या देशांत चहा फार मोठ्या प्रमाणावर तयार होतो हें तुला ठाऊकच आहे.

मध्य आशियामध्यें तुर्कस्तान जिंकून आणि इकडे तिबेटचा कबजा घेऊन चीन लुंग यानें आपल्या साम्राज्याचा विस्तार वाढविला. त्यानंतर कांहीं वर्षांनीं इ. स. १७९०

मध्यें नेपाळमधील गुरख्यांनीं तिबेटवर हल्ला केला. त्यावर चीन लुंगनें तिबेटमधून तर गुरखे लोकाना पिटाळून लावलेंच ; पण पुढें हिमालयातून त्यांचा पाठलाग करून थेट नेपाळमध्यें जाऊन त्यानें नेपाळच्या राजाला चिनी साम्राज्यामधील एक मांडलिक बनविलें. नेपाळवरील चीनचा हा विजय म्हणजे खरोखरच एक मोठा बहादुरीचा पराक्रम आहे. चीनच्या सैन्यानें तिबेट व हिमालय पर्वत ओलांडून नेपाळमध्यें जावयाचें आणि तेथें गुरख्यांसारख्या लष्करी वृत्तीच्या लोकांचा त्यांच्या खुद्द जन्मभूमीमध्यें पराभव करावयाचा, ही खरोखरच मोठी अचंबा वाटण्यासारखी गोष्ट आहे! कारण योगायोग असा, कीं यापुढें फक्त बावीसच वर्षांनंतर इ. स. १८१४ मध्यें इंग्रजांची या नेपाळच्या राज्याशीं कांहीं कटकट उत्पन्न झाली. इंग्रजांनीं नेपाळवर सैन्य पाठविलें ; या सैन्याला तर हिमालय पर्वत ओलाडण्याचीही जरुरी नव्हती ; तरी पण या सैन्याला तेथें फार हाल काढावे लागले.

इ. स. १७९६ मध्यें चीन लुंग हा मरण पावला. त्या वेळीं प्रत्यक्ष त्याचें स्वतःचें राज्य ज्या प्रदेशांवर चालू होतें त्यांमध्यें मांचूरिया, मंगोलिया, तिबेट आणि तुर्कस्तान या चीनच्या बाहेरच्या देशांचा समावेश होत होता. याखेरीज कोरिया, अनाम (वैतनाम), सयाम आणि ब्रह्मदेश या देशांनीं त्याचें अधिराज्य कबूल केलें होतें व ते त्याचे मांडलिक बनले होते ; परंतु देश जिंकणें आणि लष्करी पराक्रमाच्या कीर्तीच्या पाठीस लागणें हे मोठे खर्चाचे खेळ आहेत. यांच्या पायीं प्रचंड संपत्ति खर्ची पडते आणि लोकांवरील करांचें ओझें वाढतें. हें करांचें ओझें बहुशः नेहमीं गरिबांच्याच डोक्यावर पडतें. चीनमध्यें हाच प्रकार झाला. शिवाय या काळामध्यें एकंदरच आर्थिक व्यवस्थेंत बदल घडून येत होते आणि त्यामुळेंही लोकांमधील असंतोषांत भरच पडत गेली. साऱ्या देशभर गुप्त संस्थांचें जाळें निर्माण झालें. इटली-प्रमाणें चीन देशही गुप्त मंडळांकरितां मोठा सुप्रसिद्ध आहे. या गुप्त मंडळांपैकीं कांहींचीं नांवेंही मोठीं गमतीचीं आहेत. उदारणार्थ, श्वेतकमल मंडळ, दैवी न्याय-मंडळ, श्वेतपक्ष मंडळ, इहपरलोक मंडळ वगैरे.

दरम्यान परदेशी व्यापारावर पुष्कळशीं नियंत्रणें—निर्बंध—घातलेले असूनही परदेशी व्यापार वाढत्या प्रमाणावरच होता. परदेशी व्यापाऱ्यांमध्यें या निर्बंधांबद्दल फारच मोठा असंतोष निर्माण झालेला होता. ईस्ट इंडिया कंपनीचा व्याप आता चीनच्या कँटन बंदरापर्यंत पोंचलेला होता आणि चीनच्या व्यापारांतील भला मोठा हिस्सा या कंपनीच्याच हातीं होता. त्यामुळें कंपनीला या निर्बंधांची अडचण सगळ्यांत अधिक जाणवत होती. शिवाय पुढच्या पत्रांत आपल्याला ज्याचा विचार करावयाचा आहे असा तो यूरपमधील औद्योगिक क्रांतीचा काळ होता. या क्रांतीमध्यें इंग्लंड देश प्रामुख्यानें सर्वांच्या आघाडीस होता. वाफेच्या इंजिनाचा आतां शोध लागलेला होता ; यंत्रांचा शोध आणि काम करण्याच्या नव्या नव्या पद्धती यांमुळें मालनिर्मितीचें काम सोपें होऊन निर्मितीचें प्रमाण वाढत होतें. विशेषतः कापडमाल फारच उत्पन्न होत

होता. खुद्द इंग्लंडच्या गरजेपेक्षां पुष्कळच अधिक असणारा हा माल विकणें तर जरूर होतें. म्हणून त्यासाठीं बाजारपेठा शोधून काढण्याची व मिळविण्याची आवश्यकता होती. इंग्लंडच्या सुदैवानें अगदीं याच वेळीं हिंदुस्थान देशावर इंग्लंडचा ताबा चालू लागला; त्यामुळें आपल्या मालाचा खप या देशांत जबरदस्तीनें करतां येईल अशी व्यवस्था करणें इंग्लंडला शक्य झालें व त्याप्रमाणें इंग्लंडनें केलेंही. तरीपण याखेरीज चीनची बाजारपेठही इंग्लंडला हवीच होती.

त्यासाठीं ब्रिटिश सरकारनें इ. स. १७९२ मध्यें लॉर्ड मॅकार्टने याच्या नेतृत्वा-खालीं आपलें एक वकीलमंडळ पेकिंग येथें पाठविलें. त्या वेळीं तिसरा जॉर्ज हा इंग्लंडचा राजा होता. बादशहा चीन लुंग यानें या शिष्टमंडळाला भेट दिली आणि एकमेकांनीं एकमेकांना नजराणे वगैरे दिले; परंतु परदेशी व्यापारावरील जुन्या निर्बंधांत कांहींही बदल करण्याचें बादशहानें नाकारलें. त्या संबंधांत चीन लुंग यानें तिसऱ्या जॉर्जला जें उत्तर पाठविलें तें मोठें मौजेचें आहे. म्हणून त्यांतून मी तुला एक चांगला मोठा उतारा मुद्दाम देतों. त्या पत्रामध्यें लिहिलें होतें :

" हे राजा, तूं अनेक समुद्रांच्या मर्यादांच्या पलीकडे राहत असतोस; तथापि आमच्या सुधारणेमधील हितकर गोष्टींचा आपल्यालाही कांहीं अंश प्राप्त व्हावा, अशा नम्र उद्देशानें प्रेरित होऊन तूं आपलें शिष्टमंडळ तुझा खलिता आदरपूर्ण रीतीनें इकडे पोंचता करण्यासाठीं म्हणून पाठविलें आहेस. आपली निष्ठा दर्शविण्यासाठीं तूं आपल्या देशाचा मालही नजराणा म्हणून पाठविला आहेस. तुझा खलिता मीं वाचला आहे; त्याच्यामध्यें जी तळमळीची शब्दयोजना केलेली आहे, तीवरून तुझ्या ठिकाणची दिसून येणारी मजविषयींची आदरयुक्त विनम्रता ही मोठी प्रशंसनीय आहे. ......

" विशाल जगतावर प्रभुत्व गाजवीत असतां माझ्या दृष्टीपुढें फक्त एकच उद्देश आहे; तो म्हणजे सर्व दृष्टींनीं परिपूर्ण अशी राज्यव्यवस्था चालवावयाची आणि राजाचीं एकूणएक कर्तव्यें पार पाडावयाचीं. अजब दिसणाऱ्या महागऱ्या अशा वस्तूंमध्यें माझें चित्त रमत नाहीं. मला......तुझ्या देशांत निर्माण होणाऱ्या मालाचा कांहींच उपयोग होत नाहीं. तेव्हां हे राजा, माझ्या भावनांचा तूं आदर करावास आणि भविष्यकाळीं माझ्याबद्दल तूं अधिकाधिक भक्ति आणि राजनिष्ठा व्यक्त करीत जावेंस हेंच तुझ्या कल्याणाचें आहे; म्हणजे अशा रीतीनें सदैव आमच्या गादीला नमून राहिल्यानें यापुढें तुला आपल्या देशाची शांतता आणि भरभराट हीं साधतां येतील.

" म्हणून भयकंपित चित्तानें या आदेशाचें पालन कर आणि निष्काळजीपणा करूं नकोस."

तिसरा जॉर्ज राजा आणि त्याचें मंत्रिमंडळ यांना हें उत्तर वाचून थोडासा एक प्रकारचा आश्चर्याचा धक्काच बसला असेल! परंतु या पत्रामध्यें स्वतःच्या ज्या उच्च प्रकारच्या सुधारणेविषयींचा गाढा विश्वास दिसून येतो आणि ज्या सामर्थ्याचा दिव्य आवेश दिसून येतो, ती सुधारणा आणि तें सामर्थ्य यांच्यामध्यें खरोखर आतां दीर्घ

काळपर्यंत टिकून राहण्याची शक्ति राहिलेली नव्हती. मांचू राज्य वरून बलिष्ठ दिसत होतें आणि चीन लुंगच्या कारकीर्दीमध्यें तें प्रत्यक्षांत बलिष्ठ होतेंही; परंतु आर्थिक व्यवस्थेंत होऊं लागलेल्या बदलामुळें त्या राज्याचा पायाच निर्जीव होत चालला होता. वर ज्या गुप्तमंडळांबद्दल मीं सांगितलें, तीं मंडळें असंतोषाचींच निदर्शक होतीं; परंतु खरी अडचण ही होती, कीं बदलत्या आर्थिक परिस्थितीशीं जुळती अशी देशाची सामाजिक व राजकीय व्यवस्था व्हावी असा कांहींच प्रयत्न चीनमध्यें होत नव्हता. दरम्यान इकडे या नवीन आर्थिक फेरबदलांत पश्चिमेकडील देशांनीं चांगलीच आघाडी मारली होती आणि भरघांव पुढें जाऊन प्रतिक्षणीं ते आपलें सामर्थ्य अधिकाधिक वाढवीत होते. चीन लुंगनें तिसऱ्या जॉर्ज राजाला एवढें हें गर्वभराचें उत्तर पाठविलें ना, तेव्हांपासून सत्तर वर्षांच्या आंतच इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं चीनला आपल्यापुढें वांकावयास लावलें आणि चीनचा सगळा अभिमान आणि सामर्थ्याचा ताठा धुळीस मिळाला.

परंतु ही सगळी हकीगत माझ्या चीनबद्दच्या पुढच्या पत्रासाठीं मला राखून ठेवली पाहिजे. इ. स. १७९६ मध्यें चीन लुंग मरण पावला त्या वेळीं आपण अठराव्या शतकाची जवळजवळ अखेरच गांठली; परंतु हें शतक संपण्यापूर्वी तिकडे अमेरिकेंत आणि यूरपमध्यें पुष्कळच विलक्षण घटना घडून आलेल्या होत्या. यूरपमध्यें पुष्कळच भानगडी उत्पन्न झाल्या होत्या आणि युद्धेंही उद्भवलीं होतीं. या काळांत त्यामुळें तर चीनवरील पश्चिमेकडील दडपण पाव शतकपर्यंत थोडें कमी झालें होतें. म्हणून पुढच्या पत्रांत आपण आतां यूरपमध्यें जाऊं आणि तेथल्या इतिहासाचें सूत्र अठराव्या शतकाच्या सुरुवातीपासून हातीं घेऊन हिंदुस्थान आणि चीन या देशांतील या शतकांतल्या घडामोडींशीं त्याचा धागा जुळवून देऊं.

परंतु हें पत्र पुरें करण्यापूर्वी मला इकडे पूर्वेकडे रशियाची जी प्रगति झाली, तिच्याबद्दल तुला सांगावयाचें आहे. इ. स. १६८९ मध्यें चीन व रशिया यांचा नरकिन्स्क येथें तह झाला, तेव्हांपासून पूर्वेकडील रशियाचें वर्चस्व दीडशें वर्षेपर्यंत सतत वाढतच गेलें. इ. स. १७२८ मध्यें रशियाच्या नोकरींत असणाऱ्या व्हायटस बेरिंग नावाच्या एका डॅनिश कप्तानानें अमेरिका खंड व आशिया खंड यांच्यामधील सामुद्रधुनीचा शोध लावला. त्याच्या नांवावरून या सामुद्रधुनीला आजही बेरिंगची सामुद्रधुनी म्हणतात हें कदाचित् तुला ठाऊक असेल. ही सामुद्रधुनी ओलांडून बेरिंग अलास्कामध्यें गेला आणि तो प्रदेश रशियाचा आहे असें त्यानें जाहीर केलें. अलास्का हें फर* जातीच्या लोकरीच्या चामड्याच्या उत्पत्तीचें फारच मोठें ठिकाण होतें आणि अशा चामड्याला चीनमध्यें फार मोठी मागणी होती. त्यामुळें रशिया आणि चीन

---

* अलास्का भागांत ( उत्तर अमेरिकेंत ) एका विशिष्ट जातीची मेंढी असून तिचे केंस अत्यंत मृदु असतात. या केंसांसह तिचें कातडें पांघरण्यासाठीं तयार करतात. त्याची किंमत फार असते. हिंदीमध्यें या केंसांना समूर म्हणतात, तर इंग्रजींत फर म्हणतात.

यांच्या दरम्यान हा चामड्याचा खास व्यापार निर्माण झाला. चीनमध्यें हें चामडें व तज्जन्य पदार्थ यांना खरोखर अठराव्या शतकाच्या अखेरीला एवढी मोठी मागणी होती, कीं रशिया कॅनडामधील हडसन आखातांतून या मालाची आयात इंग्लंडमार्गे आपल्या देशांत करी आणि तो माल मग सायबेरियामधील बैकल सरोवराजवळील कियाख्ताच्या मोठ्या कातड्याच्या बाजारांत पाठवीत असे. केवढा प्रचंड प्रवास या चामड्याला करावा लागत असे पाहा!

रोजच्या क्रमांत थोडा बदल म्हणून हें पत्र या पत्रमालिकेंतील आतांपर्यंतच्या माझ्या बहुतेक पत्रांहून लहान आहे. हा फेरफार तुला पसंत पडेल अशी आशा आहे.

९५

## यूरपमधील अठराव्या शतकांतील भिन्न भिन्न कल्पनांमधील झगडा

१९ सप्टेंबर, १९३२

आतां आपण यूरपमध्यें परत जाऊं आणि त्या खंडाच्या भवितव्याच्या बदलणाऱ्या रंगांचें निरीक्षण करूं. फार मोठाले फेरबदल होऊं घातलेले आहेत, अशा काळाच्या अगदीं दाराशीं या वेळीं यूरप खंड पोंचलेलें आहे. या फेरबदलांनीं एकंदर सर्वच इतिहासावर फार मोठा परिणाम केलेला आहे. या फेरबदलांचा अर्थ नीट समजावून घ्यावयाचा, तर वरवर दिसणाऱ्या गोष्टींच्या जरा आंत डोकावून तत्कालीन माणसांच्या मनांत काय काय घडामोडी चाललेल्या होत्या, हें आपल्याला पाहिलें पाहिजे. कारण कोणतेंही बाह्य कार्य झालेलें जें आपण पाहतों, तें विचार आणि विकार, पूर्वग्रह, दुराग्रह आणि अंधश्रद्धा, आशा आणि भीति यांच्या संकलित परिणामांचें बाह्य रूप असतें आणि या त्याच्या मूळ कारणाचें स्वरूप जर आपल्याला नीट समजलेलें नसलें, तर त्या कार्याचाही खरा अर्थ आपल्या ध्यानांत येणार नाहीं. परंतु अशीं हीं मूळ कारणें समजून घेणें किंवा सांगणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं आणि इतिहासांतील विशेष महत्त्वाच्या ठळक ठळक अशा प्रसंगांची घडण ज्यांमुळें घडली अशीं हीं कारणें आणि हेतू यांचें यथायोग्य स्वरूप लिहून अगदीं वेंचकपणें आणि हुबेहूब चित्रित करण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं आहे असें जरी गृहीत धरलें, तरीसुद्धां आधींच अवजड आणि कंटाळवाणीं होत आलेलीं हीं पत्रें त्यामुळें आणखीच कंटाळवाणीं करावीं असें मला वाटत नाहीं. एखाद्या विषयाच्या किंवा विशिष्ट दृष्टिकोणाच्या भरांत केव्हां केव्हां मला वाटतें, मी वाजवीहून अधिक खोल पाण्यांत शिरत असतों : पण काय

करणार ? हा प्रकार तुला चालवून घेतला पाहिजे. तेव्हां आजचा मुद्दा काय, तर हीं जीं आंतलीं कारणें आहेत त्यांच्याविषयीं फार खोलांत कांहीं आपणाला जातां येणार नाहीं; परंतु त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें हेंही अगदींच वेडेपणाचें होईल. कारण, असा वेडेपणा करायचाच असें आपण म्हटलें, तर इतिहासाचें खरें रहस्य आणि सौंदर्य याना आपण पारखे होऊं.

सोळाव्या शतकांत आणि सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत यूरप खंडांत जी बंडाळी आणि अंदाधुंदी माजली होती, ती आपण पाहिली आहे. सतराव्या शतकाच्या मध्याला ( १६४८ ) वेस्ट फालियाचा तह होऊन तें भयंकर तीस वर्षांचें युद्ध एकदांचें संपलें. त्यानंतर एक वर्षानें इंग्लंडमधील आपसांतील यादवी संपली आणि पहिल्या चार्ल्स राजाचें डोकें उडविण्यांत आलें. यानंतर थोडासा त्या मानानें शांततेचा काळ आला. यूरप खंडांतील देश त्या वेळीं पार थकून गेल्यासारखे झालेले होते. अमेरिकेशीं आणि इतर देशांशीं व्यापार सुरू झालेला होता त्यामुळें यूरप खंडांत पैसा येऊं लागला होता. त्यामुळें परिस्थितीचा जाच थोडा हलका झाला होता आणि वर्गावर्गांतील चीड आणि ताण हीं थोडीं कमी झालीं होतीं.

इंग्लंडमध्यें या काळांत एक निःशस्त्र क्रांति झाली आणि तीमुळें दुसरा जेम्स् राजा हांकलला जाऊन पार्लमेंटचा विजय संपूर्ण झाला ( १६८८ ). पार्लमेंटनें लढाई खरी जिंकली होती पहिल्या चार्ल्सच्याविरुद्ध झालेल्या यादवीमध्येंच. आता जी ही शांततामय क्रांति झाली, तिनें चाळीस वर्षांपूर्वीं शस्त्रबळावर झालेल्या निर्णयावर शिक्कामोर्तब केलें एवढेंच.

अशा रीतीनें इंग्लंडमध्यें राजाला मागच्या जागेवर जाऊन बसावें लागलें; परंतु यूरप खंडांत स्वित्झर्लंड किंवा हॉलंड यांच्यासारखे कांहीं छोटे प्रदेश सोडले, तर बाकीच्या ठिकाणीं मात्र निराळी परिस्थिति अद्यापि चालू होती. त्या ठिकाणीं अनियंत्रित राजसत्तेचीच परंपरा अद्यापि चालू होती आणि महान् बादशहा फ्रान्सचा चौदावा लुई हा अजून या देशांत राजेपणाचा अगदीं उत्कृष्ट नमुना आणि कित्ता समजला जात होता. सतरावें शतक हें यूरप खंडांत जवळजवळ चौदाव्या लुईच्या कारकीर्दीचें आणि वर्चस्वाचें शतक असें म्हणतां येईल. आपल्यापुढें कशाचें ताट वाढून ठेवलेलें आहे याची बिलकुल पर्वा न करतां, पहिल्या चार्ल्सची जी गति त्यांच्या डोळ्यांसमोर झाली तिच्यावरूनही कांहीं धडा न घेतां, या राजेलोकांनीं आपलें अनियंत्रित राजेशाहीचें सोंग पहिल्याइतक्याच डामडौलानें, इतमामानें आणि पोकळ बडेजावीनें चालू ठेवलेलें होतें. देशांतील सगळी सत्ता आणि संपत्ति केवळ आपली; देश म्हणजे जणुं कांहीं आपली एखादी खासगी मालमत्ताच, अशी त्यांची भूमिका होती. ४०० वर्षांपूर्वींच इरास्मस् नावाच्या एका प्रसिद्ध विद्वान् डच गृहस्थानें लिहिलें आहे :

“ वास्तविक गरुड पक्षी सुंदर नाहीं, गाणारा नाहीं, खाण्यालाही उपयोगी नाहीं;

परंतु उलट तो मांसभक्षक आहे, अघाशी आहे, सगळ्या पक्ष्यांना तो अगदीं नकोसा वाटतो, सगळ्यांना त्याचें संकट वाटतें, त्याच्या ठिकाणीं इतरांना दुःख देण्याचें फार मोठें सामर्थ्य आहे आणि इतर कोणाही पक्ष्याहून अधिक प्रमाणांत इतरांना दुःख देण्याची इच्छाही याच्या ठिकाणीं आहे. तरीपण बाकीचे एकूण एक पक्षी सोडून अशा या एकट्या फक्त गरुडाच्या ठिकाणींच काय तीं राजपदाचीं सर्व लक्षणें आहेत, अशी जगांतील शहाण्या लोकांची समजूत चालत आलेली आहे......"

आजकाल हे राजे लोक बहुतेक नाहींसे झालेले आहेत. जे कांहीं थोडे आहेत ते भूतकालीन प्रेक्षणीय वस्तू म्हणून मात्र उरलेले आहेत. त्यांच्या ठिकाणीं सत्ता जवळजवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. त्यांच्याकडे जरी आतां आपण लक्ष दिलें नाहीं तरी चालू शकेल; परंतु त्यांची जागा आतां दुसऱ्या आणि त्यांच्याहून अधिक घातक अशा लोकांनीं बळकावलेली आहे, असे जे आधुनिक काळचे साम्राज्यवादी आणि लोखंड, तेल, चांदी आणि सोनें यांचे राजे आहेत, त्यांच्या निशाणांवरसुद्धां वरच्यासारख्या गरुडाचेंच चिन्ह असणाच्या पूर्ण लायकीचे ते लोक आहेत.

यूरपमधील या राजशाह्यांमुळें प्रबळ मध्यवर्ती सत्ता असलेले असे देश निर्माण झाले. जुन्या सरंजामशाहीच्या काळांतील भूस्वामी आणि भूदास या कल्पना आतां नाहींशा झाल्या होत्या किंवा नाहींशा होण्याच्या बेताला आल्या होत्या. राजा किंवा स्वामी जाऊन त्या जागीं देश हाच एक स्वतंत्र अधिकारमूर्ति समजण्याची कल्पना रूढ झाली. व्यक्तीला जें सत्ताकेंद्र म्हणून स्थान होतें, तें आतां देशाच्या ठिकाणीं कल्पिण्यांत येऊं लागलें. रिचिलियो व मॅझेरीन या दोन कर्तबगार मंत्र्यांच्या कारकीर्दीत फ्रान्स देशानें या कल्पनेच्या बाबतींत पहिलें पाऊल टाकून इतरांना मार्ग दाखविला. अशा रीतीनें राष्ट्रभावना व राष्ट्रनिष्ठा लोकांत निर्माण झाली. कांहीं अंशीं देशभक्तीच्या भावनेचाही उदय झाला. आतांपर्यंत लोकांच्या जीवनांत धर्माला सगळ्यांत महत्त्वाचें स्थान होतें; परंतु धर्म यापुढें मागें पडला आणि नव्याच कल्पना त्याच्या जागीं उभ्या राहिल्या. या कल्पनांबद्दलच पुढें या पत्रांत तुला सांगायचा माझा विचार आहे.

सतराव्या शतकाचें याहूनही आणखी एक महत्त्व आहे; कारण या शतकांतच आधुनिक शास्त्रसंशोधनाचा पाया घालण्यांत आला आणि जागतिक बाजारपेठ उघडली गेली. एवढी ही प्रचंड नवी बाजारपेठ उघडली गेल्यामुळें यूरपमधील जुनी आर्थिक घडी पार कोलमडून पडली; म्हणून यानंतर यूरप खंडांत आणि आशिया खंडांत ज्या पुष्कळशा घडामोडी घडून आल्या त्यांचें खरें स्वरूप लक्षांत घ्यावयाचें, तर ही नवीन जागतिक व्यापारपेठेची गोष्ट नेहमीं डोळ्यांपुढें बाळगली पाहिजे. प्रथम बाजारपेठ निर्माण झाली; शास्त्रीय संशोधनाची सुरुवात त्यामागून झाली; परंतु जागतिक बाजारपेठेच्या गरजा भागविण्याचीं साधनें या शास्त्रीय संशोधनांतूनच निर्माण झालीं.

अठराव्या शतकांत वसाहती व साम्राज्य यांच्यासाठीं चढाओढ, विशेषतः

फ्रान्स व इंग्लंड यांच्यामध्यें उत्पन्न झाली. तिचा परिणाम म्हणून या दोन देशांमध्यें यूरप खंडांत आणि कॅनडांत, एवढेंच नव्हे, तर हिंदुस्थानमध्येंही युद्ध उद्भवलें हें आपण मागें पाहिलेंच आहे. या लढाया संपल्यानंतर अठराव्या शतकाच्या मध्याला पुन्हां एकदां सामान्यतः पाहतां शांततेचा काळ आला. वरवर पाहतां यूरप खंडांत जिकडे तिकडे शांतता आहे, कसलीही खळबळ नाहीं, असें दिसून येऊं लागलें. यूरप खंडातील अनेक राजदरबारीं शिष्टाचारसंपन्न व सुसंस्कृत अशा थोर आणि सुंदर सभ्य स्त्रीपुरुषांची नुसती गर्दी उसळून गेली; परंतु ही सगळी वरवरची शांतता होती. खालच्या बाजूला पुष्कळच खळबळ चाललेली होती ; लोकांच्या मनांत नवीन विचार आणि नवीन सिद्धांत यांची दंगल माजलेली होती. त्याचप्रमाणें दरबारांतील वातावरणाच्या जादूनें भारलेले लोक आणि वरिष्ठ वर्गांपैकीं कांहीं थर सोडले, तर बाकीच्या बहुतेक समाजांना वाढत्या दारिद्र्यामुळें अधिकाधिक हाल व यातना सोसाव्या लागत होत्या. म्हणून यूरप खंडांत अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत दिसून येणारी शांतता ही अगदीं फसवी शांतता होती ; ती वादळापूर्वीची शांतता होती. इ. स. १७८९ च्या १४ जुलै रोजीं हें वादळ यूरपमधील सर्वश्रेष्ठ राजशाहीच्या राजधानींत—पॅरिस येथें—उठलें. त्यामध्यें ही राजधानी पार उधळून गेली आणि तिच्याबरोबर शेंकडों जुनाट, निरुपयोगी, शेवाळ माजलेल्या चालीरीती आणि हक्कसंबंधही नष्ट झाले.

हें वादळ आणि त्यापासून घडून आलेले फेरबदल यांची ही पूर्वतयारी नवीन कल्पनांच्या रूपानें फ्रान्समध्यें आणि यूरप खंडांतील इतरही देशांत बऱ्याच आधींपासून चालू होती. मध्ययुगाच्या सुरुवातीपासून अखेरपर्यंत यूरप खंडामध्यें धर्माचें फार मोठें वर्चस्व होतें. त्यानंतर रेफर्मेशनच्या काळींसुद्धां त्याचें हें वर्चस्व कांहीं कमी झालें नाहीं. कोणत्याही गोष्टीचा विचार, ती गोष्ट राजकीय किंवा आर्थिक स्वरूपाची असली तरीही धर्माच्या चष्म्यामधून होत असे. धर्म हा यूरप खंडांत एका सुसंघटित संस्थेच्या हातीं असून धर्ममत म्हणजे पोपचें किंवा धर्मपीठाच्या श्रेष्ठ अधिकाऱ्याचें मत, असाच तेथें अर्थ होता. समाजाची रचना कांहींशी हिंदुस्थानांतील जातिसंस्थेच्या रचनेच्या धर्तीवर होती. जातिसंस्थेच्या मुळांतील पहिली कल्पना पाहिली, तर उद्योगधंदे किंवा कामधंदे यांच्या धोरणानें समाजांतील निरनिराळे गट पडावयाचे अशीच होती. यूरप खंडांतही मध्ययुगांत समाजरचनाविषयक ज्या कल्पना होत्या, त्याच्याही मुळाशीं ही कामधंद्यांनुसार सामाजिक वर्ग पाडावे हीच कल्पना होती. अशा एका वर्गांतील सर्व व्यक्ती, हिंदुस्थानांतील एका जातींतील सर्व व्यक्तींप्रमाणें एकमेकींशीं पूर्ण समान असत; परंतु दोन किंवा अधिक वर्गांमध्यें मात्र अशी परस्पर-समता नसे. निरनिराळ्या वर्गांमध्यें असणारी ही विषमता ही जणुं तत्कालीन सर्व समाजरचनेचा एकमेव पायाच होती ; कोणीही या विषमतेला विरोध करीत नव्हता. या समाजव्यवस्थेखालीं ज्यांना कमीपणा किंवा हाल सोसण्याचा प्रसंग असे त्यांना "तुमच्या कष्टाचें फळ तुम्हांला स्वर्गांत मिळेल" असें सांगण्याचा परिपाठ होता. अशा रीतीनें परलोकाचीं पुराणें

सागून धर्मसंस्था विषमतेच्या अन्याय्य पायावर आधारलेली समाजरचना उचलून धरण्याचा आणि त्या अन्यायापासून लोकांचे विचार दुसरीकडे वळावेत अशा प्रकारचा प्रयत्न करीत असे. त्याचप्रमाणें धर्मसंस्था ज्याला विश्वस्तभावाचें–ट्रस्टीचें–तत्त्व म्हणतात त्याचाही उपदेश – पुरस्कार–करीत असे. या तत्त्वाचा अर्थ असा : संपत्तिमान् मनुष्य हा संपत्तीचा मालक नसून त्याच्याजवळची संपत्ति ही गरिबांची त्याच्याजवळ असलेली "ठेवच" आहे ; त्याचप्रमाणें जमीनदाराच्या कबजांत असलेली सगळी जमीन ही पण कुळाची एक प्रकारची त्याच्याकडे सांभाळण्यासाठीं दिलेली वस्तूच होय. विषमतेमुळें उत्पन्न होणाऱ्या अडचणीच्या परिस्थितीचा परिहार करण्याची धर्मपीठाची ही एक शक्कल होती. या तत्त्वामुळें संपन्न लोकांच्या प्रत्यक्ष परिस्थितींत कांहींच फरक होत नव्हता किंवा गरिबांनाही त्यामुळें कांहीं वाढतें सुखसमाधान लाधत नव्हतें. कितीही चतुराईच्या खुलाशाचें पुराण तुम्हीं भुकेनें कळवळलेल्या मनुष्यापुढें वाचलें, तरी त्यामुळें त्याची भुकेची तळमळ का शमणार आहे ?

प्रॉटेस्टंट आणि कॅथॉलिक यांच्यामधील घोर युद्धें, कॅथॉलिक आणि कॅल्व्हिनिस्ट-पंथांची परस्परांबद्दलची अत्यंत तीव्र असहिष्णुता आणि इन्क्विझिशनचें न्यायासन, या सर्वांचा उगम या धार्मिक आणि वर्गविशिष्ट–जातीय–मनोवृत्तींमधूनच झाला. या सर्व प्रकरणाचा तूं स्वतःच्या मनाशीं नीट विचार करून पाहा! असें म्हणतात, कीं प्युरिटन लोकांनीं लाखों स्त्रियाना त्या चेटक्या आहेत या आरोपावरून जिवंत जाळून टाकलें. या काळांत शास्त्रीय संशोधनांतील नव्या कल्पनाही सगळ्या दडपून टाकण्याचे प्रयत्न झाले. कारण धर्मपीठाचा जगताबद्दलचा, जीवनाबद्दलचा जो दृष्टिकोन होता, त्याला या शास्त्रीय कल्पना म्हणे विरोधी होत्या. अशा रीतीनें ही जीवनविषयक जुनी भूमिका सर्वस्वीं स्थिर, न बदलणारी होती. तिच्याप्रमाणें प्रगतीचा प्रश्नच उद्भवण्याचें कारण नव्हतें.

परंतु जीवनविषयक या सर्व जुन्या कल्पना सोळाव्या शतकापासूनच पुढें हळूहळू बदलत गेल्या असें दिसतें. या सुमारास शास्त्रीय संशोधनाचा उदय झाला आणि धर्माची ही सर्वगामी पकड ढिली होऊं लागली. राजकारण आणि अर्थशास्त्र यांचा धर्माहून अलगपणें विचार होऊं लागला. सतराव्या आणि अठराव्या शतकांत बुद्धिवादाची वाढ झाली असें म्हटलें जातें. हा बुद्धिवाद म्हणजे काय, तर अंधश्रद्धेऐवजीं बुद्धीला प्रामाण्य देण्याची पद्धति. त्याचप्रमाणें अठराव्या शतकांतच धार्मिक सहिष्णुतेचा, मतस्वातंत्र्याचा पूर्ण विजय झाला असेंही समजलें जातें. कांहीं अंशीं हें म्हणणें खरेंही आहे; परंतु हा जय झाला याचा खरा अर्थ असा होता, कीं पूर्वींपेक्षां लोक धर्माचें आतां कमी महत्त्व मानूं लागले होते. सहिष्णुता, धर्ममतस्वातंत्र्य याचा अर्थ जवळजवळ धर्माविषयीं अनास्था, उदासीनता असा केला तरी चालेल. कोणत्याही एखाद्या गोष्टीबद्दल लोकांची भावना विशेष तीव्र असते त्या वेळीं त्यांच्या ठिकाणीं तद्विरोधी गोष्टींना सवलतीनें वागविण्याची, सहिष्णुतेची भावना असूंच शकत नाहीं; त्यांच्या

भावनेची ही तीव्रता जेव्हां थोडीशी कमी होते तेव्हां मग आम्ही मोठे सहिष्णु आहोंत, उदार आहोंत, असें मोठ्या प्रौढीनें लोक पुकारूं लागतात. औद्योगीकरणाची जशी वाढ झाली, मोठमोठ्या यंत्रांचा जसा शोध लागला, तसतशी लोकांची धर्मविषयींची अनास्था वाढतच गेली. शास्त्राच्या उदयानें यूरप खंडांतील जुनी श्रद्धावृत्ति पार उखडून काढली. नवे उद्योगधंदे आणि नवीन आर्थिक व्यवहार यांमुळें लोकांपुढें नवेच प्रश्न उपस्थित होऊन त्यांतच त्यांचीं मनें गढून जाऊं लागलीं. त्यामुळें यूरपांतील लोकांनीं धर्मश्रद्धा किंवा धर्ममतें या प्रश्नावर एकमेकांचीं डोकीं फोडण्याची आपली संवय सर्वस्वीं जरी नाहीं, तरी बहुतेक टाकून दिली; त्याऐवजीं ते आर्थिक आणि सामाजिक वादासाठीं आतां एकमेकांचीं डोकीं फोडूं लागले.

यूरपांतील या धार्मिक वर्चस्वाच्या काळाची आजच्या हिंदुस्थानशीं तुलना करणें मोठें बोधपर आहे. हिंदुस्थान देश हा मोठा धर्मप्रवण आणि अध्यात्मप्रवण देश आहे असें पुष्कळदां स्तुति करण्याच्या हेतूनें आणि हेटाळणीही करण्याच्या हेतूनें—दोन्ही हेतूंनीं—म्हटलें जात असतें. याच्या उलट, यूरप खंड हें धर्मविरहित आहे व त्याला या जगतातील सगळया सुखसोयींच्या साधनांची प्रमाणाबाहेर आवड आहे असें म्हणतां येईल असें दाखवून हिंदुस्थान व यूरप खंड यांमध्यें भेद दाखविला जात असतो; परंतु हिंदुस्थानातील लोकांच्या जीवनविषयक भूमिकेमधील धार्मिक प्रवृत्तीच्या प्रमाणापुरतेंच बोलावयाचें, तर खरोखर या धार्मिक हिंदुस्थान देशांत आणि सोळाव्या व सतराव्या शतकांमधील यूरप खंडांत फारच विलक्षण सारखेपणा आहे. अर्थात् हा सारखेपणा असाच इतरही क्षेत्रामध्यें दाखवितां येणार नाहीं; परंतु आमच्या जविनक्रमांत धर्मश्रद्धा आणि धार्मिक दुराग्रह यांचें आम्ही माजवीत असलेले फाजील स्तोम, आमच्या राजकीय व आर्थिक प्रश्नांमध्यें आमच्या धार्मिक गटांच्या हितसंबंधांची आम्ही करीत असलेली गल्लत, आमचीं जातीय भांडणें, या किंवा इतर अशाच प्रकारच्या प्रश्नांच्या बाबतींत जी अवस्था आमच्या देशांत आहे ती, आणि यूरप खंडांतील वर सांगितलेली धर्मविषयक प्रवृत्ति यांच्यामध्यें कांहीं सुद्धां फरक नाहीं; दोहोंचें स्वरूप अगदीं एक आहे. एका बाजूला व्यवहारनिष्ठ आणि जडवादी पश्चिम आणि दुसऱ्या बाजूला अध्यात्मवादी आणि परलोकनिष्ठ पूर्व असा यांत कांहींसुद्धां प्रश्न नाहीं. मग दोहोंत फरक कुठेसा आहे? तर पश्चिमेंत उद्योगधंद्यांची फार मोठी वाढ झालेली असून ज्या त्या कामासाठीं मोठ्या प्रमाणावर यंत्रांचा उपयोग वाढलेला आहे. याचे जे चांगले आणि वाईट परिणाम व्हावयाचे, ते आज पश्चिमेकडील लोकांच्या ठिकाणीं झालेले आहेत; उलट, पूर्व अजून बहुतांशीं औद्योगिक युगाच्या आधींच्या शेतकी युगांतच आहे; हाच काय तो फरक आहे.

धार्मिक मतस्वातंत्र्य आणि बुद्धिवाद यांची ही वाढ यूरप खंडांतही कांहीं हूं म्हणून चुटकीसरशीं झाली नाहीं. ती हळूहळू आणि क्रमाक्रमानेंच घडून आली. प्रथम प्रथम या प्रवृत्तीची वाढ होण्याला पुस्तकांची कांहींच मदत मिळाली नव्हती. कारण

ख्रिस्ती धर्मावर जाहीरपणें टीका करावयाची म्हणजे कैदेची किंवा दुसरी कसली तरी शिक्षा भोगावी लागावयाची असा अर्थ होता. जर्मनीमध्यें एका तत्त्वज्ञानें एकदां चीनचा कॉन्फ्यूशियस याची फारच स्तुति केली ; त्याबद्दल त्याला देशांतून हांकलून देण्यांत आलें. कारण काय, तर अशी ही फाजील स्तुति करणें म्हणजे ख्रिस्ती धर्माचा कमीपणा करण्यासारखें आहे असा अर्थ निघाला. परंतु अठराव्या शतकांत नवीन तत्त्व-कल्पना अधिकाधिक स्पष्ट होत गेल्या आणि त्यांचा प्रसारही पुष्कळ वाढला. तेव्हां मात्र या विषयासंबंधींचे ग्रंथ लिहिण्यांत येऊं लागले. बुद्धिवाद आणि अशाच प्रकारचे इतर विषय यांसंबंधीं लिहिणारा तत्कालीन सर्वांत अधिक प्रख्यात असा ग्रंथकार म्हणजे व्हाल्टेअर हा फ्रेंच गृहस्थ होय. त्याला त्याच्या लिखाणावरून कैद भोगावी लागली व हद्दपारीही भोगावी लागली. अखेरीस तो जिनीव्हाजवळ फर्ने येथें जाऊन राहिला. तुरुंगांत असतांना त्याला कागद किंवा शाई देत नसत, म्हणून तो शिशाच्या तुकड्यानें छापील पुस्तकांत दोन ओळींच्यामध्यें जी कोरी जागा असते त्या जागेंत कवितेच्या ओळी रचून लिहीत असे. अगदीं लहान वयाचा असतांनाच त्याची ख्याति सर्वत्र पसरली होती. तो केवळ दहा वर्षांचा असतांना आपल्या ठिकाणच्या बुद्धिमत्तेनें त्यानें लोकांचें लक्ष वेधून घेतलें होतें, अशी मोठी नवलाची गोष्ट सांगतात. अन्याय आणि धर्मवेडेपणा, दुराग्रही श्रद्धा यांचा व्हाल्टेअरला तिटकारा असून त्यांच्या विरुद्ध त्यानें झगडा चालविलेला होता. Ecrasez L'infame या सैतानाला, दुर्बुद्धीला, लज्जास्पद गोष्टीला, या अंधश्रद्धेला चिरडून टाका, ही त्याची प्रसिद्ध घोषणा होती. फार वृद्ध होईपर्यंत तो जगला ( १६९४ ते १७८८ ) आणि त्यानें लिहिलेल्या ग्रंथांची संख्या फारच प्रचंड आहे. ख्रिस्ती धर्मावर तो टीका करीत असे. यामुळें जुन्या सनातन ख्रिस्ती लोकांच्या मनांत त्याच्याबद्दल फार तिटकारा होता. एका ग्रंथांत त्यानें लिहिलें आहे, "जो मनुष्य कांहींही चांगल्यावाइटाची चौकशी न करतांच धर्माला मान्यता देतो तो मनुष्य आणि स्वतःच्या मानेवर जोखड ठेवूं देणारा बैल, हे दोन्ही सारखेच होत." व्हाल्टेअरच्या लिखाणाचा परिणाम फार मोठा होऊन पुष्कळ लोकांचा कल बुद्धिवादाला आणि नव्या कल्पनांना अनुकूल असा झाला. फर्ने येथील त्याचें तें जुनाट घर आजही कितीएक लोकांना एक पवित्र यात्रेचें ठिकाण वाटतें.

दुसरा एक असाच श्रेष्ठ ग्रंथकार म्हणजे जीन जॅक्स रूसो हा होय. हा व्हाल्टेअरचा समकालीनच, परंतु व्हाल्टेअरपेक्षां वयानें लहान होता. त्याचा जन्म जिनीव्हा येथें झाला. अजूनही जिनीव्हाच्या लोकांना या गोष्टीचा मोठाच अभिमान वाटत असतो. तेथील त्याचा तो पुतळा तुला आठवतो का ? रूसोच्या राजकीय आणि धर्मविषयक लिखाणानें फारच विरोधी हाकाटी निर्माण झाली. तरीपण त्याच्या कादंबऱ्या आणि जरासे धाडसी असे नवीन सामाजिक आणि राजकीय सिद्धांत यांच्यामुळें लोकांचीं मनें नवीन कल्पनांनीं आणि नवीन कार्याविषयींच्या निश्चयांनीं भारलीं गेलीं हें निःसंशय. याचे ते राजकीय सिद्धांत आज अगदींच जुनाट आणि

निरुपयोगी वाटतात; परंतु फ्रान्समधील लोकाना तेथील त्या महान् क्रांतिसाठीं तयार करण्याच्या कामीं त्या सिद्धांतांचा केवढा तरी मोठा उपयोग झाला. रूसोनें स्वतः क्रांतीची शिकवण केव्हांच दिली नाहीं, किंबहुना अशी क्रांति होईल अशी त्याची अपेक्षा सुद्धां नसावी; परंतु त्याच्या पुस्तकांनीं आणि सिद्धांतांनीं मात्र निश्चितपणें लोकांच्या मनांत अशीं बीजें रुजविलीं, कीं त्यांचेंच फळ म्हणजे फ्रेंच राज्यक्रांति. त्याचा सर्वांत जास्त प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे Social Contract (Du Contrat Social) 'सामाजिक करार' हा होय. त्याची सुरुवात, "मनुष्य जन्माला येतो स्वतंत्र म्हणून; पण जिकडे पाहावें तिकडे तो शृंखलांनीं जखडलेलाच आढळतो" या प्रसिद्ध वाक्यानें झालेली आहे. (अर्थात् निव्वळ स्मरणावर विसंबून हें वाक्य मी सांगतों आहें.)

याखेरीज रूसो मोठा शिक्षणशास्त्रज्ञही होता आणि त्यानें सुचविलेल्या कितीएक शिक्षणपद्धती आजकाल शाळांमधून अमलांत आलेल्या आहेत.

व्हाल्टेअर आणि रूसो यांच्याखेरीज आणखीही पुष्कळ नामांकित विचारवंत आणि ग्रंथकार फ्रान्समध्यें अठराव्या शतकांत होऊन गेले; पण आणखी एकाचेंच नांव मी तुला येथें सांगणार आहें. तें म्हणजे मॉंटेस्क्यू यांचें. यानें इतर बऱ्याचशा ग्रंथांबरोबरच ॲस्प्रॉय डी लॉइ (कायद्याचें तत्त्व या विषयावरील ३१ खंडांचा) हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिलेला आहे. याच काळांत फ्रान्समध्यें एक ज्ञानकोश निर्माण झाला. त्यांमध्यें डिडेरॉट याचे आणि दुसऱ्या पुष्कळ विद्वान् ग्रंथकारांचे राजकीय आणि सामाजिक विषयावरचे पुष्कळसे लेख होते. खरोखरच त्या काळीं फ्रान्स देश म्हणजे तत्त्वज्ञानी आणि विचारप्रवर्तक लोकांचें जणुं माहेरघरच होऊन गेला आणि विशेष म्हणजे त्यांच्या ग्रंथांचें वाचनही फार मोठ्या प्रमाणावर झालें. इतकें, कीं सर्वसामान्य लोकांच्या सर्व विचारसरणीवर त्यांच्याच विचाराची छाप पडली आणि जे ते लोक त्यांच्याच सिद्धांतांबद्दल आपसांत वाद करूं लागले. अशा रीतीनें फ्रान्समध्यें धार्मिक माथेफिरूपणाच्या किंवा दुराग्रहाच्या विरुद्ध आणि राजकीय किंवा सामाजिक हक्कदारीविरुद्ध अशा मतांचा एक चांगला भक्कम प्रवाह व एक मोठा वर्ग निर्माण झाला. तरीपण आश्चर्याची गोष्ट ही, कीं सामान्य लोक काय किंवा हे तत्त्वज्ञ काय, कोणालाही 'राजालाच उडवून टाकावें' अशी कांहीं कल्पना आली नाहीं. प्रजासत्ताक राज्याची कल्पना ही त्या काळीं लोकमान्य झाली नव्हती. प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजासारखा एखादा आदर्श राजा अजूनही निर्माण होऊं शकेल आणि तो आपल्यावरील अवजड ओझीं कमी करून आपल्याला न्याय देईल आणि कांहीं अंशीं स्वातंत्र्य देईल अशीच अजून लोकांना आशा वाटत होती! निदान त्या वेळच्या तत्त्वज्ञांच्या लिहिण्याचा सूर तरी हा असा आहे; परंतु ज्यांना हाल व यातना सोसाव्या लागत होत्या, त्या सामान्य लोकांना राजा कितपत आवडत होता याची मात्र शंकाच आहे.

फ्रान्समध्यें झाली तशा प्रकारची राजकीय विचारांची वाढ इंग्लंडमध्यें झाली नाहीं.

म्हणच पडली आहे, कीं इंग्रज मनुष्य हा राजकीय प्राणीच नाहीं; फ्रेंच मनुष्य मात्र तसा आहे. तें कसेंही असलें तरी एक गोष्ट अशी, कीं १६८८ मधील राज्यक्रांतीमुळें इंग्लंड-मधलि आणीबाणीची परिस्थिति तितकी तीव्र राहिली नव्हती. अर्थात् तेथेंही अद्यापि कांहीं वर्गांना पुष्कळच खास हक्क आणि अधिकार उपभोगावयास मिळतच होते; परंतु पुढें एका पत्रांत मी तुला सागणार आहें त्या नवीन आर्थिक घडामोडी आणि अमेरिका व हिंदुस्थान यांमधील व्यापार व इतर भानगडी यांकडेच इंग्रजांचें सर्व लक्ष गुंतून गेलेलें होतें. शिवाय, सामाजिक विषमतेचा ताण जेव्हां थोडासा जाणवण्याइतका वाढला, तेव्हां तेथें एक तेवढ्यापुरती तडजोड होऊन सगळीच समाजव्यवस्था मोडून-तोडून टाकण्याचें संकट टाळण्यांत आलें. फ्रान्समध्यें अशा प्रकारची तडजोड होण्याला सवड किंवा अनुकूलता नव्हती. यामुळें तेथें तसा तो भडका उडाला.

अशा स्थितींत आधुनिक कादंबरीलेखनाचें तंत्र इंग्लंडमध्यें या अठराव्या शतकाच्या मध्यालाच निर्माण होऊन वाढलें ही मात्र मोठी लक्षांत ठेवण्यासारखी व कौतुकाची गोष्ट आहे. 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स्' आणि 'रॉबिन्सन् क्रूसो' हे ग्रंथ अठराव्या शतकाच्या प्रारंभालाच बाहेर पडले हे मी तुला सांगितलेंच आहे मागें. त्यांच्यामागून इंग्लंडमध्यें खरोखर उत्तम प्रतीच्या कादंबऱ्या बाहेर पडल्या. या सुमारास इंग्लंडमध्यें एक नव्याच प्रकारचा वाचकवर्ग अस्तित्वांत आला असें आढळून येतें.

या अठराव्या शतकांतच प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार गिबन् यानें आपला सुप्रसिद्ध The Decline and fall of the Roman Empire (रोमन साम्राज्याचा ऱ्हास व नाश) हा ग्रंथ लिहिला. मागें रोमन साम्राज्याबद्दल लिहिताना एका पत्रामध्यें त्याच्या या ग्रंथाचा उल्लेख मीं केला आहे.

## ९६

## अत्यंत मोठ्या उलाढालींच्या दाराशीं उभें असलेलें यूरप खंड

२४ सप्टेंबर, १९३२

यूरप खंडामधील, विशेषतः फ्रान्समधील अठराव्या शतकांतील स्त्री-पुरुषांच्या मनांत थोडें आंत शिरून खोलवर बघण्याचा प्रयत्न आपण करून पाहिला. ही आपली पाहणी अगदींच ओझरती झाली; तिच्यामध्यें जुन्या कल्पनांशीं ज्यांचा झगडा सुरू झालेला होता, अशा कांहीं नव्या कल्पना आपल्या दृष्टीसमोर आल्या. अशा रीतीनें थोडा वेळ पडद्याआड जाऊन तेथें काय चाललेलें होतें तें आपण पाहिलें; आतां थोडा वेळ यूरप खंडाच्या सार्वजनिक रंगभूमीवरील नट कोणता कोणता अभिनय करीत होते, हें थोडेंसें पाहूं या.

फ्रान्समध्यें म्हातारा चौदावा लुई अखेर इ. स. १७१५ मध्यें एकदांचा मरण पावला. त्याच्या पाठीमागून गादीवर आलेल्या राजाची कारकीर्दही भली मोठी म्हणजे एकूणसाठ वर्षांची झाली. म्हणजे अशा रीतीनें फ्रान्समध्यें चौदावा लुई आणि पंधरावा लुई या दोघांनीं मिळूनच एका पाठोपाठ एकशें-एकतीस वर्षें राज्य केलें! माझी खात्री आहे कीं जगांत याला दुसरीकडे कोठें तोड नसेल. चीनमधील मांचू घराण्यांतील दोघां बादशहांची, कांग ही व चीन लुंग यांची, कारकीर्द प्रत्येकीं साठ वर्षांची झाली खरी; पण या कारकीर्दी एका पाठीमागून एक नाहीं झाल्या. त्यांच्या दरम्यान तिसऱ्या एका राजाची कारकीर्द झालेली होती.

पंधराव्या लुईची कारकीर्द बऱ्याच दीर्घ मुदतीची झाली ; त्यापेक्षांही तिच्यामध्यें दुराचार आणि कारस्थानें यांना जो किळसवाणा ऊत आला, त्यासाठीं इतिहासांत ती विशेष उल्लेखनीय होऊन राहिलेली आहे. त्याच्या कारकीर्दींत राज्याच्या एकूण एक उत्पन्नाच्या बाबींचा उपयोग केवळ राजाच्या विलासोपभोगांच्या खर्चासाठीं होऊं लागला. कलमाच्या खांदीनें ज्याप्रमाणें मूळ झाडाचा रस शोषून घ्यावा, त्याप्रमाणें प्रजेचा रस शोषून घेऊन दरबारची चैनीसाठीं उधळपट्टी चाललेली होती. दरबारांत राजाची मर्जी संपादन करणाऱ्या स्त्रीपुरुषांना राजाकडून जमिनीच्या किंवा सनदी नोकरीच्या देणग्या मिळत. या नोकरींत काम कांहीं नाहीं, पण पगार मात्र मिळावयाचा. अशा रीतीनें कांहीं न करता या लोकांना उत्पन्न मिळावयाची व्यवस्था झाली. स्वाभाविक या सगळ्याचा बोजा सामान्य जनतेवरच अधिकाधिक पडत गेला ; परंतु अनियंत्रित राज्यसत्ता, नालायक कारभार आणि लांचलुचपत व दुराचार यांचें गाडें मात्र बिनघोरपणें, मोठ्या मजेत, चालूच राहिलें. अशा स्थितींत अठरावें शतक पुरें होण्यापूर्वींच त्याचा पुढचा मार्ग खुंटला आणि त्याला पुढचें पाऊल खोल दरींत टाकून गडप व्हावें लागलें यांत आश्चर्य तें काय आहे ? खरें आश्चर्य याचें वाटतें, कीं या गाड्याला इतका लांबवर प्रवास करतां आला आणि त्याला खड्ड्यात पडण्याला एवढा दीर्घ कालावधि लागला ! पंधरावा लुई स्वतः तर जनतेच्या न्यायासनाच्या निकाला-पासून आणि सूडापासून वांचलाच ; या सगळ्याला तोंड त्याच्या मागून गादीवर आलेला सोळावा लुई याला द्यावें लागलें.

पंधरावा लुई हा इतका नादान आणि दुराचारी होता, तरी सुद्धां राज्यामध्यें आपल्याला संपूर्ण अनियंत्रित सत्ता असणें हा आपला अधिकार आहे, त्याबद्दल मात्र त्याला तिळमात्र शंका नव्हती. राज्यामध्यें त्याचाच अधिकार एकूण एक बाबतींत चालावयाचा; त्याला काय जें मनास येईल तें करण्याचा अधिकार ; त्या बाबतींत कोणी काहींही ब्र काढता कामा नये. इ. स. १७६६ मध्यें पॅरिस येथें लोकसभेपुढें त्यानें जें भाषण केलें त्यांत तो काय म्हणतो ऐका :

“ राज्यसत्ता ही अगदीं सर्वस्वीं केवळ माझ्या एकट्या व्यक्तीच्या ठिकाणीं निवास

करीत आहे. दुसऱ्या कोणाचाही आश्रय किंवा मदत घेतल्याशिवाय केवळ एकट्या मलाच कायदे करण्याचा पुरेपूर हक्क आहे. प्रजेला शांततेच्या प्रवाहाचा लाभ केवळ एक माझ्यापासूनच व्हावयाचा ; प्रजेचा सर्वांत मोठा संरक्षक एक फक्त मीच आहें. माझ्या प्रजेला माझ्यावांचून दुसरें कोणतेंही सत्तेचें केंद्र नाहीं. कांहीं लोकांच्या मतानें बादशहाच्यापेक्षां वेगळें असें राष्ट्र म्हणून कांहीं तरी आहे, आणि त्याचा कांहीं स्वतंत्र अधिकार व हित आहे ; परंतु वस्तुतः राष्ट्राचा अधिकार म्हणजे माझाच अधिकार आणि राष्ट्राचें हित म्हणजेच माझें हित अशीच सर्वस्वीं खरी गोष्ट असून हा अधिकार व हें हित सर्वथा माझ्याच मुठीमध्यें आहे."

अठराव्या शतकाच्या बहुतेक सर्व काळपर्यंत ज्यानें फ्रान्सवर राज्य केलें, तो राजा हा अशा प्रकारचा होता. कांहीं काळ तर साऱ्या यूरपवर त्याचें प्रभुत्व माजल्यासारखें झालें; परंतु नंतर दुसऱ्या महत्त्वाकांक्षी राजांशीं व लोकांशीं त्याचे झगडे झाले आणि त्यांत त्याला पराभव खाऊन माघार घ्यावी लागली; फ्रान्सचे पूर्वीचे जे कोणी प्रतिस्पर्धी होते त्यांचें कांहीं आतां यूरप खंडाच्या राजकारणाच्या रंगभूमीवर फारसें वजन उरलेलें नव्हतें; परंतु त्याच्या जागीं आतां नवीनच दुसरे प्रतिस्पर्धी निर्माण होऊन ते फ्रेंच राज्यसत्तेला खो देण्याची खटपट करूं लागलेले होते. ज्याचा एवढा मोठा गाजावाजा झाला होता, त्या स्पेन देशाचें बादशाही वैभव फारच थोडा काळ टिकलें. आतां यूरपमध्यें स्पेन देश मागें पडून गेला होता. तरीपण अद्यापिही स्पेनच्या ताब्यांत अमेरिकेमध्यें आणि फिलिपाइन बेटांत फार मोठमोठ्या वसाहती होत्या. त्याचप्रमाणें आजपर्यंत ऑस्ट्रियाच्या हॅप्सबर्ग घराण्यानें पवित्र रोमन साम्राज्याचें प्रमुखत्व आणि त्या मार्गानें सर्व यूरप खंडाचें प्रमुखत्व आपल्या हातीं एक प्रकारें बळकावून ठेवलेलें होतें; परतु या घराण्याचेंही मोठेंपण आतां पूर्वींसारखें शिल्लक राहिलेलें नव्हतें. पवित्र रोमन साम्राज्यामध्यें ऑस्ट्रियाचें राज्य कांहीं आतां एकटेंच श्रेष्ठ पदावर राहिलेलें नव्हतें. दुसऱ्या एका राज्याचा — प्रशियाचा — अलीकडे उदय होऊन तेंही ऑस्ट्रियाच्या राज्याइतकेंच महत्त्वाचें होऊन राहिलें होतें. त्याचप्रमाणें ऑस्ट्रियाच्या गादीवर कोणीं बसावें याबद्दल युद्धें सुरू होतीं आणि पुष्कळ दीर्घ काळपर्यंत मराया थेरसा नांवाची एक स्त्रीच तेथें गादीवर होती.

इ. स. १६४८ मधील वेस्टफालिया येथील तहानें प्रशियाच्या राज्याला यूरपमधील सत्ताधीश राज्यांत महत्त्वाचें स्थान मिळालें हें तुला आठवत असेल. त्या ठिकाणीं होहेनझोलर्न राजघराण्याचें राज्य असून या घराण्यानें, दुसरें जें ऑस्ट्रियावर राज्य करणारें हॅप्सबर्ग हें जर्मन राजघराणें होतें, त्याच्या वर्चस्वाला खो देण्याचा प्रयत्न चालविलेला होता. प्रशियामध्यें इ. स. १७४० पासून १७८६ पर्यंत शेहेचाळीस वर्षें फ्रेडरिक दि ग्रेट याचें राज्य चालू होतें. याला दि ग्रेट—महान्—म्हणण्याचें कारण म्हणजे त्याला मिळालेले अनेक लष्करी विजय. यूरपांतील इतर राजेलोकांप्रमाणें हाही एक सर्वस्वीं अनियंत्रित राजाच होता; परंतु त्यानें आपण मोठे तत्त्वज्ञानी आहोंत असा

आव आणलेला होता आणि व्हाल्टेअरशीं मैत्री संपादन करण्याचा प्रयत्न केला होता. त्यानें फार बलिष्ठ असें लष्कर उभारलेलें होतें आणि तो मोठा यशस्वी सेनापति होता. तो स्वतःला बुद्धिवादी म्हणवीत असे आणि "प्रत्येकाला आपापल्या मार्गानें स्वर्गामध्यें जाण्यास मोकळीक असावी" असेंही तो म्हणत असे, असें म्हणतात.

सतराव्या शतकापासून पुढें साऱ्या यूरप खंडांत फ्रेंच संस्कृतीची छाप पडलेली होती. अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमाराला तर ही छाप दृढ झाली आणि व्हाल्टे-अरची कीर्ति साऱ्या यूरपवर प्रचंड पसरली. इतकी, कीं कित्येक लोक तर या शतकाला "व्हाल्टेअरचें शतक" असें नांव देतात. फ्रेंच वाङ्मयाचें वाचन यूरप खंडांतील सर्व राजदरबारांमधून होऊं लागलें. अगदीं त्या मागासलेल्या सेंट पीटर्सबर्गच्या दरबारांत-सुद्धां आणि सुसंस्कृत व विद्वान् लोक सर्वच देशांत, फ्रेंच भाषेंत लिहिणें आणि बोलणें यांत मोठेपणा मानूं लागले. उदाहरणार्थ, स्वतः फ्रेडरिक दि ग्रेट राजा हा सुद्धां नेहमीं फ्रेंच भाषेंत बोले आणि लिही. त्यानें तर फ्रेंच काव्य लिहिण्याचासुद्धां प्रयत्न करून पाहिला; तें आपलें काव्य व्हॉल्टेअरनें तपासून साफसूफ करून त्याच्यावर उजळा द्यावा असें त्याच्या मनांत होतें.

प्रशियाच्या पूर्वेला रशिया देश हाही पुढच्या काळांत त्याला जें प्रचंड राक्षसी स्वरूप प्राप्त झालें त्या स्वरूपाला पोंचण्याचा मार्ग आक्रमण करीत वाढत होता. रशिया, सायबेरियाचा सगळा प्रदेश ओलांडून पॅसिफिकमध्यें पोंचला होता व पुढें सामुद्रधुनी ओलां-डून त्यानें अलास्कांतही प्रवेश केलेला होता, हें चीनच्या इतिहासाच्या वेळीं आपण पूर्वींच पाहिलें आहे. सतराव्या शतकाच्या रशियामध्यें पीटर दि ग्रेट या अत्यंत बलिष्ठ राजाचें राज्य होतें. रशियामध्यें पूर्वींपासून जे कितीएक मंगोलियन आचार-विचार आणि परंपरेचे संबंध निर्माण झालेले होते, ते सर्व नाहींसे करून टाकावे असें पीटरच्या मनांत फार होतें. कित्येक लोक म्हणतात त्याप्रमाणें त्याला रशियाचें पाश्चिमीकरण करावयाचें होतें. म्हणून त्यानें आपली राजधानी मॉस्को येथून उठविली; कारण मॉस्कोमध्यें या प्राचीन परंपरेचा फार मोठा भर होता. त्यानें स्वतःचें राजधानीचें शहर नवेंच वसविलें. फिन-लंडच्या आखाताच्या तोंडाशीं नेवा नदीच्या तीरावर वसलेलें तेंच तें सेंट-पीटर्स-बर्ग शहर. सोनेरी डेरे आणि सोनेरी कळस-घुमट यांनीं युक्त अशा त्या मॉस्को शहरांत आणि या नव्या शहरांत एवढेंसुद्धां साम्य नव्हतें. त्याचें स्वरूप पुष्कळसें यूरपमधील पश्चिमेकडील शहरांसारखें होतें. पीटर्सबर्ग शहर म्हणजे पश्चिमीकरणाचें एक मूर्तिमंत लक्षणच होऊन राहिलें आणि तेव्हांपासून रशिया यूरपीयन राजकारणांत अधिकाधिक भाग घेऊं लागला. आतां या शहराचें पीटर्सबर्ग हें नांव शिल्लक राहिलें नाहीं, हें बहुधा तुला माहीत असेलच. पहिल्यांदा बदलून हें नांव पेट्रोग्राड असें करण्यात आलें होतें; नंतर दुसऱ्यांदा बदलून तें लेनिनग्राड असें झालें. हेंच नांव हल्लीं चालू आहे.

पीटर दि ग्रेटनें रशियांत पुष्कळ फेरबदल घडवून आणले. त्यांतला एक मी तुला सांगतों; कारण तो तुला लक्षांत घेण्यासारखा वाटेल. त्याच्या काळीं रशियांत

बायकांना समाजापासून दूर एकाकी पडद्याआड ठेवण्याची पद्धति चालू होती. या पद्धतीला तेथें टेरेम हें नांव होतें. ही टेरेमची पद्धत पीटरनें बंद केली. पीटरचें लक्ष हिंदुस्थानवर होतें; आंतरराष्ट्रीय राजकारणांत हिंदुस्थानचें महत्त्व तो ओळखून होता. त्यानें आपल्या मृत्युपत्रांत लिहिलेलें आहे, "लक्षात ठेवा, कीं हिंदुस्थानचा व्यापार म्हणजे अखिल जगताचा व्यापार आहे आणि ज्या कोणाच्या सर्वस्वीं एकट्याच्या हातीं या व्यापाराचीं सूत्रें येऊं शकतील तो साऱ्या यूरप खंडाचा सर्वाधिकारी होऊं शकेल!" हिंदुस्थानात राज्य प्राप्त झाल्यानंतर इंग्लंड देशाची सत्ता जी अत्यंत झपाट्यानें वाढली, तिच्यावरून पीटरचे हे अखेरचे शब्द किती खरे होते हें सिद्ध झालें. हिंदुस्थानच्या संपत्तीची लूट करावयाला मिळाल्यानें इंग्लंडची पत वाढली, संपन्नताही वाढली आणि पुढें कित्येक पिढ्यांपर्यंत इंग्लंडचें राज्य हें साऱ्या जगांतील प्रमुख सत्ताधीश राज्य होऊन राहिलें.

एका बाजूला प्रशिया आणि ऑस्ट्रिया व दुसऱ्या बाजूला रशिया यांच्या दरम्यान पोलंडचें राज्य होतें. पोलंड हा एक मागासलेला देश असून तेथें दरिद्री शेतकऱ्यांची सगळी वसति होती. उद्योगधंदे किंवा व्यापार यांचा तेथें जवळजवळ मागमूसही नव्हता; मोठीं शहरें मुळींच नव्हतीं; परंतु या देशाची राज्यघटना मात्र मोठी विलक्षण होती. तेथील राजा हा लोकनियुक्त असून सत्ता ही सरंजामदार, जमीनदार वरिष्ठ वर्गीयांच्या हातांमध्यें होती. पोलंडच्या सभोंवारचे देश जसजसे बलिष्ठ होत चालले, तसतशी पोलंडची दशा अधिकच दुर्बलतेची होत गेली. प्रशिया, रशिया, ऑस्ट्रिया यांची बोक्यासारखी त्याच्यावर नजर लागलेली होती.

परंतु याच पोलंडच्या राजाचें सामर्थ्य थोड्याच काळापूर्वी इतकें मोठें होतें, कीं त्यानेंच इ. स. १६८३ मध्यें तुर्कांचा हल्ला परतवून लावून त्यांचा पराभव केला होता. उस्मानी तुर्कांनीं पुन्हां कांहीं मग कोठेंही स्वारी करण्याचें धाडस केलें नाहीं. त्याची शक्ति आतां क्षीण झाली होती आणि त्यांच्या विजयाची भरती हळूहळू ओसरूं लागली होती. यापुढें त्यांनीं संरक्षक धोरणाचा अवलंब केला; तरीपण तुर्कांचें यूरपांतील साम्राज्य यापुढें हळूहळू संपुष्टातच येत राहिलें; परंतु आपण ज्या अठराव्या शतकाच्या पूर्वार्धाच्या काळचा विचार करतों आहों, त्या काळीं मात्र तुर्कस्तान हा यूरप खंडाच्या आग्नेय भागांतील एक सामर्थ्यवान् देश असून त्याचें साम्राज्य बाल्कन राष्ट्रांच्या सगळ्या प्रदेशावर झालें होतें व हंगेरी देश ओलांडून थेट पोलंडच्या सरहद्दीला जाऊन तें भिडलेलें होतें.

दक्षिणेकडे इटली देशाचे मात्र पुष्कळसे लहान लहान तुकडे होऊन तेथें निरनिराळ्या स्वतंत्र राजांचीं राज्यें चालू होतीं; त्यामुळें यूरपच्या राजकारणांत इटलीला कांहींच विशेष किंमत नव्हती. पोपचा सर्वाधिकार कांहीं आतां यूरप खंडांत पूर्वींप्रमाणें चालत नव्हता. राजेरजवाडे अजूनही त्याचा आदर, सन्मान राखीत होते; परंतु राजकीय बाबतींत मात्र त्याच्या बोलण्याकडे कोणी फारसें पाहत नसत. यूरपमध्यें

हळूहळू एक नवीन प्रकारची राजकीय परंपरा निर्माण होत होती. ती म्हणजे महान् सत्ताधीश राष्ट्रांची. ज्यांच्या एकट्याच्या हातीं देशाची सगळी सत्ता केंद्रीभूत झाली अशा बलिष्ठ राजघराण्यांचे अम्मल चालू झाल्यामुळें स्वतंत्र राष्ट्रभावना कशी निर्माण झाली हें मीं तुला सांगितलेंच आहे. लोकांच्या मनांत आपल्या देशाविषयीं एक नवीनच विलक्षण दृष्टिकोन उत्पन्न झाला; आज हा दृष्टिकोन जिकडे तिकडे नित्य परिचयाचा झालेला आहे; परंतु त्यापूर्वीच्या काळीं तो इतका परिचित आणि सर्वसामान्य नव्हता. फ्रान्स, इंग्लंड किंवा ब्रिटानिया, इटालिया या किंवा अशाच आणखी निरनिराळया देशांच्या मूर्तीच जणुं आतां स्पष्ट आकारांत येऊं लागल्या. हीं नांवें म्हणजे त्या त्या राष्ट्राचीं प्रतीकें किंवा बोधचिन्हेंच झालीं. सारें राष्ट्र त्यामध्यें मूर्तिमंत सामावल्यासारखें झालें. पुढें एकोणिसाव्या शतकांत तर त्या त्या देशाच्या स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणावर आपापल्या देशाच्या या कल्पना-मूर्ती स्पष्ट स्वरूपांत कोरल्या गेल्यासारख्या होऊन त्यामुळें त्यांच्या हृदयांतील भावना विलक्षण रीतीनें उचंबळूं लागल्या. त्यांच्या चित्तांत त्यांना दैवतांचें रूप प्राप्त झालें. या देवताच्या पायापाशीं प्रत्येक राष्ट्रभक्तानें आपली पूजा अर्पण करावयाची अशी भूमिका निर्माण होऊन त्या देवतांच्या नांवानें आणि त्यांच्यासाठीं म्हणून मग एकमेकांशीं युद्धें करून एक-मेकांचे प्राण घेण्याची प्रथा सुरू झाली. आज आपल्याही अंतःकरणामध्यें भारत-मातेच्या कल्पनेनें केवढी चेतना निर्माण होत असते आणि या गूढशक्तिसंपन्न आणि काल्पनिक मूर्तीसाठीं लोक किती हाल सोसावयाला आणि प्राणही देण्याला तयार असतात हें तुला ठाऊकच आहे. त्याचप्रमाणें इतर देशांतील लोकांच्याही भावना आपल्या मातृभूमीच्या कल्पनामूर्तीनें उचंबळूं लागल्या; परंतु ही सर्व पुढच्या काळां-तील घडामोड आहे. सध्या तुला फक्त एवढेच सांगावयाचें आहे मला, कीं अठराव्या शतकामध्यें या राष्ट्रीयत्वाच्या भावनेचा उदय होऊन तिनें मूळ धरलें असें आपणांस आढळतें. हें घडून येण्याच्या कार्यांत फ्रेंच तत्त्वज्ञांनीं फार मदत केली आणि फ्रान्स-मधील महान् क्रांतीनें तर त्या भावनेवर मान्यतेचें शिक्कामोर्तबच केलें.

यापुढें हीं राष्ट्रें म्हणजे शासनकर्तीं (Powers) राज्यें, राज्यसत्ता समजण्यांत येऊं लागलीं. राजे येत आणि जात; पण त्यामुळें राष्ट्राच्या सत्तेत कांहींच बदल होत नसे. राष्ट्राचें शासन अविच्छिन्न चालूच राही. या राज्यांमध्यें हळूहळू काहीं राज्यें बाकीच्याहून अधिक महत्त्वाला चढलीं. उदाहरणार्थ, अठराव्या शतकाच्या सुरुवातीला फ्रान्स, इंग्लंड, ऑस्ट्रिया, प्रशिया आणि रशिया यांचीं राज्यें खास "महान् राज्यें" म्हणून समजलीं जाऊ लागलीं. बाकीचीं कांहीं स्पेनसारखीं राष्ट्रें नावाला मोठीं म्हटलीं जात होतीं; परंतु प्रत्यक्षांत त्यांचा ऱ्हास होऊं लागला होता.

इंग्लंडचें महत्त्व आणि संपत्ति दोन्ही झपाट्यानें वाढत होतीं. इंग्लंड देश इलिझाबेथ राणीच्या काळापर्यंत यूरप खंडांतील कल्पनेप्रमाणें काहीं महत्त्वाचा देश झालेला नव्हता. एक तर त्या देशाची लोकसंख्या थोडी होती; सगळी मिळून

इंग्लंडची लोकसंख्या त्या वेळीं साठ लक्षांहून अधिक नव्हती; म्हणजे ही लोकसंख्या आजच्या लंडन शहराच्या लोकसंख्येहूनही कमी होती; परंतु प्यूरिटन पंथाची धर्मक्रांति व समाजक्रांति आणि पार्लमेंटचा राजावरील विजय या दोन घटनांमुळें इंग्लंडची गाडी नवीन बदलत्या परिस्थितीच्या मार्गावर दाखल झाली आणि जोरानें पुढचा मार्ग आक्रमण करूं लागली. हॉलंडमध्येंही स्पेनचें जूं दूर झुगारून दिल्यानंतर हीच गोष्ट घडून आली.

अठराव्या शतकांत अमेरिका आणि आशिया खंडांत वसाहती करण्यासाठीं सगळ्यांची झटापट चाललेली होती. यूरपांतील पुष्कळशा राज्यांनीं या झटापटींत भाग घेतलेला होता; परंतु अखेरीस खरी झटापट चालू राहिली फक्त दोन देशांमध्यें — इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें. फ्रान्समध्यें एक तर पंधराव्या लुईची नादान कारकीर्द चालू होती; पण त्याशिवाय विशेष म्हणजे यूरपीयन राजकारणामध्यें फ्रान्सचे हात इतके अडकलेले होते, कीं त्याला दुसरीकडे लक्ष द्यायला सवड मिळणें कठिण होतें. इ. स. १७५६ पासून १७६३ पर्यंत या दोन देशांमध्यें आणि इतरही अनेक देशांमध्यें वसाहतींची मालकी कोणाकडे राहावयाची या गोष्टीच्या निर्णयास्तव, यूरप खंडांत कॅनडामध्यें आणि हिंदुस्थानांत युद्ध झालें. याच युद्धाला सात वर्षांचें युद्ध असें म्हणतात. हिंदुस्थानांत हें युद्ध झालें तेव्हां फ्रान्सचा पराभव झाला हें मागें आपण पाहिलें आहे. कॅनडामध्येंही इंग्लंडचाच जय झाला. यूरप खंडांत मात्र आपण नुसता पैसा पुरवावयाचा आणि त्याच्या मोबदल्यांत दुसऱ्या राष्ट्रांना आपल्या वतीनें लढावयास लावावयाचें ही इंग्लंडची आतां लोकांना सुपरिचित झालेली पद्धति इंग्लंडनें अमलांत आणली. या लढाईत फ्रेडरिक दि ग्रेटला त्यांनीं असा आपला मित्र केलें होतें.

या सात वर्षांच्या युद्धाचा परिणाम इंग्लंडला फारच फायद्याचा झाला. हिंदुस्थान आणि कॅनडा या दोन्ही प्रदेशांत इंग्लंडला आतां कोणीही यूरपीय प्रतिस्पर्धी उरला नाहीं. त्याचप्रमाणें समुद्रमार्गावरही इंग्लंडचें प्रभुत्व प्रस्थापित झालें. अशा रीतीनें साम्राज्य स्थापून तें वाढविण्याची—एक जागतिक राज्य स्थापन करण्याची—इंग्लंडला शक्यता उत्पन्न झाली. प्रशियाचेंही महत्त्व या काळामध्यें पुष्कळच वाढलें.

यूरप खंडाची या युद्धानें पुन्हां एकदां दमछाट झाल्यासारखी झाली आणि पुन्हां सर्व यूरप खंडभर एक प्रकारें शांतता प्रस्थापित झाली; परंतु अशी शांतता होती म्हणून कांहीं प्रशिया, रशिया आणि ऑस्ट्रिया यांना पोलंडचें राज्य गिळंकृत करण्याला मुळींच प्रत्यवाय वाटला नाहीं. या राज्याशीं लढण्याजोगी पोलंडची मुळींच स्थिति नव्हती; तेव्हा त्या तिन्ही लांडग्यांनीं पोलंडवर स्वारी केली आणि पुनः पुनः पोलंडच्या आपल्यामध्यें वांटण्या करून स्वतंत्र राज्य म्हणून पोलंडचा कांहींही भाग त्यांनीं शिलक ठेवला नाहीं. इ. स. १७७२ मध्यें, १७९३ मध्यें आणि १७९५ मध्यें, अशी तीन वेळां ही वांटणी करण्यांत आली. यांपैकीं पहिली वांटणी झाल्यानंतर पोलंडच्या लोकांनीं आपल्या देशाची सुधारणा करून त्याचें बळ वाढविण्याचा फार

भगीरथ प्रयत्न केला. त्यांनीं आपल्या देशांत पार्लमेंट सभा स्थापन केली; कला आणि वाङ्‌मय यांचें तेथें पुनरुज्जीवन करण्यांत आलें; परंतु पोलंडच्या सभोंवतालच्या एकतंत्री राजांना आतां पोलंडच्या रक्ताची जणुं चटकच लागली होती; त्यामुळें अशानें कांहीं त्या राष्ट्रांच्या आक्रमणांत खंड पडण्यासारखा नव्हता. शिवाय, या राजांना पार्लमेंट सभांबद्दल मुळींच आपलेपणा नव्हता. म्हणून पोलिश लोकांनीं आपल्या राष्ट्रप्रेमाची जरी पुष्कळच शर्थ करून दाखविली आणि आपला महान् वीर पुढारी कोश्यूझ्को याच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं अत्यंत शौर्यानें लढाई दिली, तरीपण अखेरीस यूरपच्या नकाशांतून इ. स. १७९५ सालीं पोलंड देश नाहींसा झाला. त्या वेळीं त्याचा देश अशा रीतीनें नाहींसा झाला, तरीही पोलिश लोकांचा राष्ट्राभिमान मात्र जिवंत राहिला आणि केव्हां तरी आपलें स्वातंत्र्य आपण मिळवूं अशी आशा करीत ते राहिले; अखेरीस १२३ वर्षांनंतर त्यांचें हें सुखस्वप्न खरें ठरलें; त्या वेळीं गेल्या महायुद्धानंतर पोलंड पुन्हां एकदां स्वतंत्र राज्य — राष्ट्र — म्हणून उभें राहिलें.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत यूरप खंडांत त्या मानानें शांतता नांदत होती असें मीं म्हटलें; परंतु ही शांतता फार काळ टिकली नाहीं. ती केवळ वरवरची शांतता ठरली. या शतकांतल्या इतर पुष्कळ घडामोडींबद्दलही मी आतांपर्यंत तुझ्याशीं बरेंच बोललों; परंतु अठरावें शतक हें मुख्यतः तीन मोठ्या घटनांसाठीं — तीन क्रांत्यांसाठीं — प्रसिद्ध आहे. या तीन घटनांशीं ताडून पाहतां यूरप खंडांत या शंभर वर्षांत घडलेली बाकीची एकूण एक गोष्ट अगदींच क्षुद्र ठरते. या तिन्ही क्रांत्या अगदीं वेगवेगळ्या प्रकारच्या होत्या; एक राजकीय होती, एक औद्योगिक होती आणि एक सामाजिक क्रांति होती. राजकीय क्रांति ही अमेरिकेंत घडून आली. ही क्रांति म्हणजे त्या ठिकाणच्या ब्रिटिश वसाहतींचें बंड व त्यामधून पुढें प्रस्थापित झालेलें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य ही होय. हेंच राज्य पुढें आपल्या काळापर्यंत फार मोठ्या दर्जाला चढावयाचें होतें. औद्योगिक क्रांतीची सुरुवात झाली इंग्लंडमध्यें. तेथून ती पसरत पसरत यूरपांतील पश्चिमेकडील सर्व राष्ट्रांमध्यें पसरली आणि तेथून इतर सर्व देशांमध्यें. ही क्रांति पूर्ण शांततेंत झाली; परंतु तिचे परिणाम फार दूरवर आणि खोलवर झाले आणि जगाच्या इतिहासांतील ज्ञात अशा कोणत्याही घटनेचा झाला नाहीं इतका मोठा परिणाम जागतिक जीवनावर या क्रांतीचा झाला. या क्रांतीचीं लक्षणें म्हणजे वाफेच्या शक्तीचा शोध, मोठ्या यंत्रांचा उदय आणि अखेरीस औद्योगीकरणाचे जे अगणित धुमारे फुटून वाढलेले आपल्या भोंवतीं आपण पाहतों ते, हीं होत. सामाजिक क्रांति म्हणजे महान् फ्रेंच राज्यक्रांति. या क्रांतीमुळें फ्रान्समधील केवळ राजशाहीच नष्ट होऊन काम संपलें नाहीं; तर तिच्यामध्यें असंख्य खास जन्मजात अधिकारही नष्ट झाले आणि समाजांतील नवीन वर्गांना पुढें येण्याला संधि मिळाली. या तिन्ही क्रांत्यांचा आपल्याला स्वतंत्रपणें आणि थोडासा तपशीलवारपणें विचार केला पाहिजे.

अशा तऱ्हेच्या या अत्यंत महत्त्वाच्या घडामोडी होण्याचा समय अगदीं जवळ येऊन ठेपला होता, अशा वेळीं यूरपमध्यें राजे लोकांच्या हातीं सर्व सत्ता केंद्रित झालेली होती. इंग्लंड आणि हॉलंड या देशांत लोकनियुक्त कायदेमंडळें होतीं खरीं; परंतु तीं सर्व वरिष्ठ वर्गीय आणि धनिक अशा लोकांच्याच ताब्यांत होतीं. कायदे हे सर्व श्रीमंतांच्या उपयोगासाठीं, त्यांच्या मालमत्तेचें, हक्कांचें आणि सवलतींचें सरक्षण व्हावें एवढ्यासाठींच फक्त होत असत. शिक्षण हेसुद्धां अशा श्रीमंत आणि हक्कदार लोकांनाच काय तें मिळत असे. खरें म्हणजे सगळया राजसत्तेचें, कारभाराचें अस्तित्वच या वर्गाच्या हितार्थ होतें ; परंतु या काळचा सगळयांत अतिशय मोठा प्रश्न होता तो म्हणजे गरिबांच्या पोटाचा प्रश्न. वरच्या वर्गाची परिस्थिति जरी थोडीफार सुधारलेली असली तरी गरिबाच्या हालअपेष्टा होत्या तशाच कायम होत्या; नव्हे, वरच्या वर्गाच्या सुखाच्या प्रकाशांत त्या हालअपेष्टा अधिकच उठून दिसूं लागल्या होत्या.

सबंध अठराव्या शतकभर सर्वच यूरपीय राष्ट्रांनीं गुलामाचा व्यापार अगदीं निर्दयपणानें आणि अंतःकरणशून्य पद्धतीनें चालविलेला होता. प्रत्यक्ष यूरपच्या प्रजेमध्यें आतां कायदेशीर अर्थानें गुलाम म्हणून कोणी शिल्लक राहिलेले नव्हते; परंतु सर्फ किंवा व्हिलन्स म्हणून ज्या शेतकाम करणारांना म्हणत असत, त्या भूदासांची अवस्था मात्र, कायदेशीर रीत्या ते गुलाम नसले तरी, गुलामापेक्षां कोणत्याच प्रकारें सुखाची नसे. तथापि अमेरिकेचा शोध लागल्यानंतर मात्र गुलामांचा पुन्हां अत्यंत क्रूर अशा रीतीचा व्यापार सुरू झाला. या व्यापाराची सुरुवात केली पोर्तुगिज आणि स्पॅनिश लोकांनीं. हे लोक आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील प्रदेशांत नीग्रो लोकांना पकडीत आणि त्यांना अमेरिकेंत आपल्या शेतीचें काम करण्यासाठीं घेऊन जात. या निंद्य-तिरस्करणीय-व्यापारांत इंग्रज लोकांचाही भरपूर भाग होता. जंगलांतील हिंस्र पशूंची शिकार करतात त्याप्रमाणें या आफ्रिकन लोकांना जंगलांतून शोधून पकडण्यांत येई; नंतर त्यांना एका सांखळीला बांधून टाकण्यांत येई, आणि अशा रीतीनें अमेरिकेकडे नेण्यांत येई. अशा त्या नीग्रो लोकांना किती भयंकर यातना भोगाव्या लागत असतील याची तुला काय किंवा आपल्यापैकीं कोणालाही काय कल्पनासुद्धा करणें अशक्य आहे. प्रवासाच्या शेवटच्या टोंकाला पोंचण्यापूर्वीच त्यांपैकीं असंख्य लोक मरून पडत. जगांत आजपर्यंत ज्या लोकांना हालअपेष्टा भोगाव्या लागलेल्या आहेत, त्यांमध्यें या नीग्रो लोकांना सोसाव्या लागलेल्या यातनांची तीव्रता सर्वांत अधिक मोठी आहे. ही गुलामगिरी कागदावर पाहतां एकोणिसाव्या शतकांत नष्ट करण्यांत आली. इंग्लंडनेंच या कामांत पुढाकार घेतलेला होता. परंतु या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं अमेरिकेंत यादवीचें युद्ध व्हावें लागलें. आज अमेरिकेंत जे लाखो नीग्रो लोक आहेत, ते याच गुलामांचे वंशज होत.

जर्मनी आणि ऑस्ट्रिया देशांत या शतकामध्यें संगीताची जी मोठी वाढ झाली तिच्यासंबंधीं छोटेंसे टिपण करून या पत्राचा शेवट मी जरा गोड करणार आहें. जर्मन लोक

हे यूरपमध्यें संगीतशास्त्राच्या बाबतींत इतर सर्व देशांपेक्षां आघाडीवर आहेत हें तुला ठाऊक आहे. या देशाच्या नामांकित संगीतकलाविशारदांपैकीं कांहींचीं नांवें सतराव्या शतकाच्या इतिहासांतही आढळून येतात. इतर देशांतल्याप्रमाणें यूरपमध्येंही संगीत हें धार्मिक कर्मकांडाचेंच एक अंग प्रथम होतें. पुढें त्यांमध्यें हळूहळू फारकत झाली आणि संगीत हें स्वतंत्र कला म्हणून नांदूं लागलें. अठराव्या शतकातील संगीत-विशारदांपैकीं दोघांचीं नांवें विशेषच जगविख्यात आहेत. ते म्हणजे मोझार्ट आणि बीदोव्हन. यांच्या ठिकाणीं अगदीं बालवयातच संगीतकलेचा मोठा प्रकर्ष झाला; दोघेही अत्यंत प्रतिभावान् पद्यकार आणि स्वरलेखक होऊन गेले. बीदोव्हन हा पश्चिमे-कडील सर्वश्रेष्ठ संगीत-पद्य-स्वर-लेखक आहे असें म्हणतां येईल; परंतु मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे, कीं तो स्वतः अगदींच बहिरा होता आणि इतरांना त्याचें जें संगीत अलौकिक मधुर वाटे, तें संगीत त्याला स्वतःला कांहीं ऐकतां येत नसे! परंतु ते ते स्वर पकडून त्यांचें लेखन करण्यापूर्वी कानानें नाहीं तरी अंतःकरणामध्यें, हृदया-मध्यें त्याचा नाद त्याला ऐकूं येत असलाच पाहिजे.

## ९७

# मोठ्या यंत्रांचा उदय

२६ सप्टेंबर, १९३२

आता जिला औद्योगिक क्रांति म्हणतात तिचा आपण विचार करूं या. या क्रांतीची सुरुवात इंग्लंडमध्यें झाली आणि म्हणून इंग्लंडमध्येंच तिचें स्वरूप कसकसें बनत गेलें याचा आपण अभ्यास करूं. अमुक एका तारखेला ही क्रांति झाली अशी नक्की तारीख कांहीं मला सांगतां येणार नाहीं. कारण हा जो मोठा फेरबदल झाला तो कांहीं जादूसारखा एखाद्या विशिष्ट दिवशीं एकाएकीं घडून आलेलाच नाहीं. तरी पण त्याची गति होती ती मात्र फारच जलद होती. अठराव्या शतकाच्या मध्यापासून शंभर वर्षांच्या आंत मानवी जीवनाचें सर्व स्वरूपच त्यानें पार बदलून टाकलें. आपल्या या पत्रांमध्यें आपण जगाच्या सर्व इतिहासाच्या ओघाचें अगदीं प्राचीनतम काळापासून तों पुढें हजारों वर्षें होऊन जाईपर्यंत निरीक्षण करीत आलों आहों आणि जगांत घडून आलेले कितीएक फेरबदल आपण पाहिले आहेत. यांपैकीं कितीएक फेरबदल तर फारच मोठाले होते. तरीपण या किंवा आतापर्यंतच्या कोणत्याच फेरबदलानें लोकांच्या जीवनामध्यें मूलतः फरक घडून आला असें केव्हांच घडलेलें आढळत नाहीं. सॉक्रेटीस किंवा अशोक किंवा ज्यूलिअस सीझर हे एकाएकीं अकबराच्या हिंदुस्थानामधील दरबारांत आले असते, किंवा अठराव्या शतकाच्या प्रारंभींच्या काळांत इंग्लंडमध्यें

किंवा फ्रान्समध्यें गेले असते, तर त्यांना आपल्या काळच्या मानानें पुष्कळच बदल झालेले आढळून आले असते. त्यांतले कांहीं बदल त्यांना पसंत पडले असते; कांहीं नापसंत पडले असते; परंतु सामान्य दृष्टीनें पाहतां, निदान बाह्यतः पाहतां तरी, हें जग त्यांना कांहीं अगदींच अनोळखी वाटलें नसतें. कारण त्यांच्या काळच्या कल्पना आणि या काळच्या कल्पना यांत कांहीं त्यांना अगदीं न कळण्याइतका मोठा फरक आढळून आला नसता. तसेंच निदान बाह्य दृष्टीनें वरवरच्या गोष्टी पाहतांना तरी आपण कांहीं तरी अगदींच भलत्या कोठल्या तरी जगांत येऊन पडलों आहों, असेंही त्यांना झालें नसतें. त्यांच्या मनांत प्रवास करावा असें आलें असतें, तर त्या काळींही त्यांच्या स्वतःच्या वेळीं त्यांनीं केला असता त्याचप्रमाणें जवळजवळ त्यांना घोड्या-वरून किंवा गाडीमधून प्रवास करावा लागता आणि प्रवासाला लागणाऱ्या वेळामध्येंही आपल्या काळच्या मानानें कांहीं विशेष फरक त्यांना आढळून आला नसता.

परंतु या तिघांपैकीं कोणीही सद्गृहस्थ जर आपल्या आजच्या जगांत आला, तर त्याला फारच मोठें आश्चर्य वाटेल आणि बहुतकरून हा आश्चर्याचा धक्का त्याच्या मनाला दुःखदायक असाच होण्याचा पुष्कळसा संभव आहे. त्याच्या कल्पनेंतल्या कोणत्याही अत्यंत द्रुतगति घोड्यापेक्षां हल्लीं माणसें किती तरी जास्त जलद गतीनें प्रवास करतात असें त्याला आढळून येईल. त्याच्या कल्पनेंतील बाणाच्या गतीपेक्षांही ही गति अधिक जलद आहे असें त्याला दिसेल. आगगाडीनें, आगबोटीनें, मोटारीनें आणि विमानानें लोक त्याला साऱ्या जगांत वाटेल तिकडे भयंकर प्रचंड वेगानें मारे धांवपळ माजवीत असलेले आढळतील. त्याचप्रमाणें तारायंत्र, टेलिफोन आणि बिनतारी संदेशवाहक, आधुनिक काळच्या छापखान्यांतून बाहेर पडणारीं अगणित पुस्तकें, त्याचप्रमाणें वर्तमानपत्रें हीं आणि अशाच प्रकारची अठराव्या शतकांत आणि त्यानंतर झालेल्या औद्योगिक क्रांतीपासून निर्माण झालेली उद्योगधंद्यांची अपरंपार संतति पाहून त्यांना मोठाच विचार पडेल. सॉक्रेटीस किंवा अशोक किंवा ज्यूलिअस सीझर यांना हे सगळे नवे प्रकार पसंत पडतील किंवा नापसंत होतील हें मी सांगूं शकत नाहीं. परंतु सध्यांच्या काळच्या जीवनांतील राहणीचे हे सर्व मार्ग आपापल्या काळीं प्रचलित असलेल्या मार्गांहून मूलतःच भिन्न आहेत, एवढें त्यांच्या प्रत्ययाला आल्यावांचून राहणार नाहीं हें मात्र निश्चित.

औद्योगिक क्रांतीमुळें जगांत मोठ्या यंत्रांची निर्मिति झाली. या क्रांतीमुळें ज्याला यंत्रयुग किंवा यांत्रिक युग म्हणतात त्याची सुरुवात झाली. याचा अर्थ याच्यापूर्वीं जगांत यंत्रें नव्हतीं असा नव्हे; परंतु हीं यंत्रें नवीन निर्माण झालेल्या यंत्राच्याएवढीं मोठीं नव्हतीं. यंत्र म्हणजे तरी खरोखर काय ? तर मनुष्याला त्याच्या कामांत उपयोगी पडणारें एक मोठें थोरलें हत्यार. मनुष्य हा हत्यार तयार करणारा प्राणी आहे असें म्हटलें जातें. अगदीं प्राचीनतम काळापासून माणूस नवीं नवीं हत्यारें बनवीत आहे किंवा जुन्यांची सुधारणा करीत आला आहे. बाकीच्या प्राण्यांवर, आपल्यापेक्षांही कितीएक

अधिक बलिष्ठ अशा प्राण्यांवर, त्यानें प्रभुत्व संपादन केलें तें या हत्यारांच्याच बळावर. यंत्र म्हणजे त्याचा हात आहे त्याहून मोठा, लांब, बलिष्ठ करण्याचें साधनच होतें. किंवा यंत्र म्हणजे माणसाचा एक तिसरा हात होता असें म्हण. हत्यार म्हणजे जसा अधिक सामर्थ्यवान् झालेला हात, त्याचप्रमाणें यंत्र म्हणजे अधिक सामर्थ्यवान् झालेलें हत्यारच. हीं हत्यारें आणि यंत्रें यांच्या साधनांनीच मनुष्य निव्वळ पशुकोटींतून वरच्या दर्जाला चढत गेला. त्यांच्यामुळेंच माणूस निसर्गाच्या गुलामगिरींतून मोकळा झाला. हत्यारें आणि यंत्रें यांच्या साहाय्यानें माणसांना आपणांला हवे असलेले पदार्थ अधिकाधिक सुलभतेनें बनवितां येऊं लागले. आतां पहिल्यापेक्षां किती तरी अधिक प्रमाणांत वस्तू माणसाला तयार करता येऊं लागल्या आणि तरी सुद्धां पहिल्यापेक्षां अधिक प्रमाणांत फुरसतीचा किंवा विश्रांतीचा वेळ माणसाला मिळूं लागला. या सगळ्याचा परिणाम कला आणि सुधारणा, ज्ञान आणि शास्त्रें यांची अभिवृद्धि होण्यांत झाला.

परंतु मोठीं यंत्रें आणि त्यांच्या इष्टमित्रांचा परिवार यांमुळें जगाचें अगदीं निखळ कल्याणच झालेलें आहे असें मात्र मुळींच नव्हे. एकीकडे त्यांच्यामुळें मानवी समाजांत पुष्कळ सुधारणा घडून आलेली आहे; तर त्याच वेळीं युद्धाचीं आणि विनाशाचीं भयंकर साधनें निर्माण करून जगांत रानटीपणाची वाढ करण्यालाही त्यांनीं मदत केलेली आहे. त्यांच्यामुळें जगामध्यें निरनिराळ्या वस्तूंची विपुलता आणि संपन्नता पुष्कळच वाढलेली आहे; परंतु ही सारी विपुलता किंवा संपन्नता सर्वसामान्य जनतेच्याच मुख्यतः उपयोगी पडावयाची असें मुळींच घडलेलें नसून त्यांचा उपयोग अगदीं मोजक्या अशा थोड्या लोकांनाच मात्र होतो आहे. अत्यंत धनिक अशा वर्गाचे विलासोपभोग आणि गरीब लोकांची दीनदशा यांमधील फरक – अंतर – पूर्वीच्या काळापेक्षांही फार मोठें यंत्रांमुळें वाढलेलें आहे. मनुष्याच्या हातचें हत्यार, त्याची सेवा करणारें असें होण्याऐवजीं मनुष्याचा मालक होऊन त्याच्याच डोक्यावर नाचण्याचें धारिष्ट त्यानें चालविलेलें आहे. एका बाजूनें पाहिल्यास त्यानें मानवसमाजाला सहकार्य, संघटना, नियमितपणा अशांसारखे कांहीं सद्‌गुण शिकविले आहेत, तर त्याच वेळीं दुसऱ्या बाजूला लाखों लोकांचें जीवन त्यानें कायम ठशाचें करून टाकलें आहे; त्या-पासून आनंद किंवा स्वातंत्र्यसुख प्राप्त होण्याऐवजीं एक कांहीं तरी जड ओझें गळ्या-मध्यें बांधलेलें असावें, अशी असंख्य लोकांची अवस्था यंत्रानें करून टाकली आहे.

परंतु यंत्रापासून हे जे दुष्परिणाम घडून आलेले दिसतात, त्याबद्दल आपण बिचाऱ्या यंत्राला दोष देण्यांत काय अर्थ आहे? दोष खरा आहे माणसाचा; कारण त्यानें त्याचा योग्य प्रकारें उपयोग केला नाहीं. त्याचप्रमाणें समाजाचाही दोष आहे; कारण समाजानें यंत्राचा जेवढा संपूर्ण उपयोग करून घ्यावा, तेवढा करून घेतलेला नाहीं. सारें जग किंवा एखादा देश आतां पुन्हां औद्योगिक क्रांतीच्या पूर्वीच्या काळच्या अवस्थेमध्यें जाऊं शकेल हा विचारसुद्धां कल्पनेच्या पलीकडचा वाटतो. त्याचप्रमाणें यंत्रांमुळें घडून आलेले कांहीं दुष्परिणाम नाहींसे करण्यासाठीं म्हणून आपण औद्योगी-

करणानें आपल्याला जी अगणित चांगल्या गोष्टींची जोड करून दिलेली आहे त्या साऱ्या गोष्टींही टाकून द्याव्या, हीही गोष्ट खरोखर मला इष्ट वाटत नाहीं आणि शहाणपणाचीही वाटत नाहीं. दुसरें असें, कीं आतां कोणी कांहीं म्हटलें तरी यंत्र माणसाच्या संसारांत येऊन बसलेलें आहे आणि तेथून तें कांहीं हालणारही नाहीं. तेव्हां आपल्या पुढचा खरा प्रश्न औद्योगीकरणानें आपले जेवढे सगळे फायदे झालेले आहेत ते सर्व राखून ठेवून त्यांच्याबरोबरच आलेल्या वाईट गोष्टी तेवढ्या कशा घालवून टाकावयाच्या हा आहे. यंत्रांमुळें जी संपत्ति निर्माण होते तिचा फायदा आपण घेतलाच पाहिजे; पण ही सर्व संपत्ति ज्यांनीं ती निर्माण केली त्यांच्या वांट्यास जाईल असें मात्र आपण केलें पाहिजे.

इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांति कशी घडून आली हें सांगण्यासाठीं हें पत्र लिहावयाला मीं घेतलें; परंतु माझ्या रोजच्या संवयीप्रमाणें सरळ रस्ता सोडून मध्येंच फुटलेल्या पोटवाटेवर मी भटकतों आहें आणि औद्योगीकरणाच्या परिणामांची चर्चा करावयाला मीं सुरवात केली आहे. त्या चर्चेच्या अखेरीस मीं, आज जो प्रश्न पुष्कळ लोकांना सतावून सोडीत आहे तो तुझ्यापुढें मांडला आहे; परंतु त्या आजच्या प्रश्नापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वी कालच्या काळात काय घडलें हें आपण आधीं पाहिलें पाहिजे. औद्योगीकरणाचे परिणाम काय झाले हें पाहण्यापूर्वी ते घडून कसे आले, हें आपण पाहिलें पाहिजे. मग एवढी भली मोठी प्रस्तावना मीं कशासाठीं केली? तर या क्रांतीचें महत्त्व केवढें मोठें आहे हें तुझ्या मनावर ठसावें म्हणून. एक राजा बदलावयाचा किंवा सगळेच राज्यकर्ते बदलावयाचे अशा प्रकारची निव्वळ वरच्या थरांत फेरबदल करणारी ही कांहीं एखादी राजकीय क्रांति नव्हती. या क्रांतीचे परिणाम समाजातील निरनिराळ्या वर्गांवर, नव्हे हरएक व्यक्तीवर घडून आले. यंत्राचा आणि औद्योगीकरणाचा विजय याचा अर्थ यंत्र ज्यांच्या ताब्यात होतें त्या वर्गांचा विजय असें हें समीकरण होतें. बरेच पूर्वी मीं तुला एकदां सांगितलेंच आहे, कीं संपत्तीच्या उत्पादनाचीं साधनें ज्या वर्गाच्या ताब्यांत असतात, त्या वर्गाचें राज्य समाजावर चालत असतें. पूर्वीच्या काळीं संपत्तीच्या उत्पादनाचें सगळ्यांत प्रमुख साधन म्हणजे एक जमीनच होती काय ती-त्यामुळें जे जमीनदार होते, ज्यांच्याकडे जमिनीची मालकी होती, त्या जमीनदारांच्याच हातीं सर्व सत्ता होती. सरंजामशाहींत हा असा प्रकार होता. पण नंतर मग जमिनींत उत्पन्न होणाऱ्या संपत्तीखेरीज निराळ्या प्रकारची संपत्ति पुढें आली आणि ही नवीन संपत्ति उत्पन्न करणाऱ्या लोकांना जमीनमालक लोकांच्याबरोबर सत्तेमध्यें भागीदारी प्राप्त झाली. त्यानंतर आतां मोठें यंत्र निर्माण झालें. स्वाभाविकच हें यंत्र ज्यांच्या हातांत होतें ते लोक आता अग्रभागीं आले आणि खरे सत्ताधीश झाले.

शहरांमधून हा धनिकवर्ग हळूहळू महत्त्वाला कसा चढला, सरंजामदार-सरदारांशीं त्याला झगडा कसा करावा लागला आणि कांहीं काहीं ठिकाणीं थोडेंफार यशही त्याला कसें मिळालें, हें या माझ्या पत्रांत मी तुला वारंवार सांगत आलों आहें.

सरंजामशाही कोसळून पडली हेंही मीं तुला सांगितलें ; परंतु या सरंजामशाहीची जागा या धनिकवर्गानें, नव्या मध्यम वर्गानें घेतली अशी कदाचित् माझ्या लिहिण्यावरून तुझी समजूत झालेली असण्याचा संभव आहे. तसें असेल तर मला माझ्या लिहिण्या-मध्यें दुरुस्ती केली पाहिजे. कारण मध्यम वर्गाच्या हातीं सत्ता येण्याचें हें कार्य फारच हळूहळू होत गेलेलें आहे ; आतां ज्या काळाचा आपण विचार करतों आहों, त्या काळींही हें कार्य पुरें झालेलें नव्हतें. धनिकशाहीच्या हातीं सत्ता येण्यापूर्वीं फ्रान्समध्यें एक मोठी राज्यक्रांति व्हावी लागली आणि आपल्याकडेही अशा प्रकारची क्रांति होणार नाहीं ना, अशी भीति इंग्लंडमध्यें त्यामुळें उत्पन्न व्हावी लागली. इंग्लंडमधील १६८८ च्या क्रांतीमुळें पार्लमेंटचा विजय झाला खरा. परंतु हें पार्लमेंटच मुळीं अगदीं थोड्या लोकांच्या – केवळ जमीनमालकांच्या – प्रतिनिधींचें बनलेलें होतें ही गोष्ट तुझ्या लक्षांत असेलच. शहरांतील कांहीं फार मोठ्या व्यापाऱ्यांना त्यामध्यें कदाचित् प्रवेश मिळाला असेल केव्हां केव्हा ; परंतु सामान्यतः पाहतां व्यापारी वर्गाला, म्हणजेच मध्यम वर्गाला त्यामध्यें स्थान नव्हतें.

तात्पर्य काय, तर राजकीय सत्ता ही ज्यांच्याकडे जमिनीची मालकी होती त्याच्याच हातात होती. इंग्लंडमध्यें प्रत्यक्ष ही अशी परिस्थिति होती ; तेव्हा इतर ठिकाणीं तर याहूनही अधिक प्रमाणांत ही गोष्ट खरी होती. यामुळें राजकीय सत्ता हा सुद्धां एक प्रकारचा जन्मसिद्ध हक्क होऊन गेलेला होता. कारण जमिनीची मालकी ही बापापासून मुलाकडेच जायची. इंग्लंडमध्यें यामुळें खिशांतले मतदार संघ, म्हणजे ज्यामध्यें मतदारांची संख्या अगदींच थोडी असे अशा प्रकारचे पार्लमेंटचे सभासद निवडणारे मतदारसंघ निर्माण झालेले होते हें मीं तुला सांगितलेंच आहे. हे थोडेसे मतदारही पुन्हा आणखी कोणाच्या तरी ताब्यामध्यें असत ; अशा रीतीनें हा मतदार-संघ अशा माणसाच्या खिशांतलाच असे. अशा या मतदारसंघातर्फेच्या निवडणुकी म्हणजे काय नुसते फार्सच! त्यांमध्यें लांचलुचपतीला मोठा ऊत येई आणि मतांची व पार्लमेंटच्या सभासदत्वाची प्रत्यक्ष खरेदी-विक्री होई. अशा रीतीनें नवीनच उदयास येणाऱ्या मध्यमवर्गापैकीं कांहीं धनिक लोकाना पैशाच्या बळावर पार्लमेंटमध्यें जागा खरेदी करून मिळवितां येत असे. परंतु सरळ मार्गानें काय किंवा या अशा आडवाटेनें काय, सामान्य लोकाना पार्लमेंटमध्यें नजर सुद्धां टाकायला वाव नव्हता. वारसा-हक्कानें त्यांना कसलेच हक्क किंवा सत्ता प्राप्त होण्यासारखी नव्हती ; त्याचप्रमाणें सत्ता विकत घेण्याचीही त्याची ताकद नव्हती हें उघडच आहे. अशा स्थितींत श्रीमंत आणि हक्कदार वतनदार लोक त्यांच्या डोक्यावर नाचूं लागले किंवा त्यांची पिळणूक करूं लागले तरी या लोकांना काय करतां येणार होतें ? पार्लमेंटमध्यें जाऊन बोलण्याची संधि त्यांना मिळणें शक्य नव्हतें किंवा पार्लमेंटमध्यें कोणी प्रतिनिधि निवडून पाठविण्याचाही त्यांना अधिकार नव्हता. बरें, बाहेरून आपल्या मताचें प्रदर्शन करण्यासाठीं म्हणून त्यांनीं कांहीं सार्वजनिक हालचाल करावी

तर त्यामुळेंही सत्ताधारी मंडळीची नाराजी होत असे आणि अशी सार्वजानिक चळवळ ते जबरदस्तीनें दडपून टाकीत असत. लोकांच्यामध्यें संघटनाही नव्हती. त्यामुळें ते बिचारे अगदींच दुर्बल आणि असहाय झालेले होते. परंतु त्यांच्या दैन्याचा आणि दुःखाचा पेला जेव्हां भरून ओसंडून वाहूं लागला, तेव्हां मात्र त्यांनीं कायदा आणि सुव्यवस्था यांचें गांठोडें खुंटीला लावून बंद केलें. त्यामुळें अठराव्या शतकामध्यें इंग्लंडमध्यें पुष्कळच बेकायदेशीरपणाच्या चळवळी माजलेल्या होत्या. सर्वसामान्य लोकांची आर्थिक परिस्थिति फारच वाईट प्रकारची झालेली होती. त्यामध्येंच मोठ्या जमीनदारांनीं छोट्या छोट्या जमिनदारांना हुसकून काढून, पिळून काढून त्यांच्या जमिनींची आपल्या मिळकतींत भर टाकण्याचे जे प्रयत्न चालविलेले होते, त्यानेंही आर्थिक परिस्थिति अधिकच वाईट होत गेली. खेडेगांवच्या ज्या सामुदायिक मालकीच्या जमिनी होत्या, त्यासुद्धां बळकावून आपल्या खिशांत टाकण्यास श्रीमंत जमीनदारांनीं कमी केलें नाहीं. या सगळ्या प्रकारानें सामान्य जनतेच्या हालअपेष्टांमध्यें भरच पडली. आपल्याला पार्लमेंटमध्यें कांहींच अधिकार नाहीं, या विचारामुळेंही लोकांमध्यें असंतोष निर्माण झालेला होता आणि राजकीय स्वायत्ततेची कांहींशी अस्पष्ट अशी मागणी लोक यामुळें करूं लागले होते.

फ्रान्समधील परिस्थिति तर याहूनही अधिक वाईट असल्यामुळें तेथें राज्यक्रांतीच घडून आली. इंग्लंडमध्यें राजाला कांहींच महत्त्वाचें स्थान नव्हतें. राज्यसत्ता अनेकांच्या हातांमध्यें विभागलेली होती. त्याशिवाय फ्रान्समध्यें ज्याप्रमाणें राजकीय विचारांची वाढ होत गेली, तशी इंग्लंडमध्यें ती झालेली नव्हती. त्यामुळें इंग्लंडमध्यें एकदम मोठा स्फोट होण्याची आपात्ति टळली आणि तेथें राजकीय फेरबदल आस्ते आस्ते घडून आले. दरम्यान औद्योगीकरणामुळें जे सामाजिक फेरबदल झाले आणि नवीन आर्थिक रचना निर्माण झाली, त्यामुळें मात्र हे राजकीय बदल होण्याचें काम जरा झपाट्यानें झालें.

अठराव्या शतकांत इंग्लंडमधील राजकीय पार्श्वभूमि ही अशा प्रकारची होती. या सुमारास परदेशाहून निर्वासित झालेल्या पुष्कळशा कारागिरांची इंग्लंडमध्यें आयात झाल्यामुळें घरगुती उद्योगधंद्यामध्यें इंग्लंडनें पुष्कळ आघाडी मारलेली होती. यूरप खंडांत जीं धार्मिक युद्धें सुरू होतीं, त्यांमुळें पुष्कळशा प्रॉटेस्टंट लोकांना आपलीं घरेंदारें आणि देश हीं सोडून इंग्लंडमध्यें येऊन आसरा पाहावा लागत होता. तसेंच नेदरलंडमधील बंड मोडून काढण्यासाठीं स्पेननें जेव्हां तिकडे युद्ध चालू केलें, तेव्हांही नेदरलंडमधील किती तरी कारागीर पळून इंग्लंडमध्यें येऊन राहिले. इंग्लंडच्या पूर्व भागांत अशा रीतीनें ३०,००० लोक येऊन राहिले होते असें म्हणतात. त्यांना त्या ठिकाणीं राहण्याची परवानगी देतांना इलिझाबेथ राणीनें त्यांच्यावर अशी अट घातली होती, कीं त्यांच्यापैकीं प्रत्येक घरीं एकेक इंग्रज मनुष्य शिकाऊ उमेदवार म्हणून त्यांनीं ठेवला पाहिजे. अशा रीतीनें इंग्लंडचा कापड विणण्याचा उद्योग संघटित होण्याला हें फार मोठें साधन झालें. स्वतःच्या देशांत जेव्हां कापड विणण्याचा उद्योग चांगला प्रस्थापित

झाला, तेव्हां इंग्लंडनें नेदरलंडमधून आपल्या देशांत कापडाची आयात करण्याला बंदी केली. दरम्यान इकडे नेदरलंडचें अजूनही स्वातंत्र्याचें तें तीव्र युद्ध चालूच होतें. त्यामुळेंही त्यांच्या उद्योगधंद्यांचें फार नुकसान झालें. त्यामुळें असें झालें, कीं ज्या ठिकाणीं नेदरलंडहून कापडानें भरलेलीं असंख्य जहाजें इंग्लंडला नित्य जात होतीं, तेथें हीं जहाजें जाण्याचीं तर थोडक्याच काळांत बंद झालींच; पण उलट, इंग्लंडहूनच नेदरलंडमध्यें कापडाचा प्रवाह सुरू होऊन तो अधिकाधिक मोठाच होत गेला.

अशा रीतीनें बेल्जममधील वालून लोकांनीं ( केल्टिक वंशाचे पण फ्रेंच बोली बोलणारे ) इंग्रजांना कापसाचें कापड विणण्याचा धंदा शिकविला. त्यांच्यामागून ह्यूजेनॉट लोक इंग्लंडमध्यें आले ; हे फ्रान्समधले प्रॉटेस्टंट लोक. तेथून पळून ते इंग्लंडमध्यें आश्रयाला आलेले होते. या लोकांनीं इंग्लंडला रेशमी कापड विणण्याचा धंदा शिकविला. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें यूरप खंडामधून इंग्लंडमध्यें अगणित कसबी कारागीर येऊन राहिले आणि त्यांच्यापासून इंग्रज लोक कागद, कांच, यांत्रिक खेळणीं, लहान व मोठीं घड्याळें वगैरे प्रकारचे उद्योगधंदे शिकले.

अशा रीतीनें आतांपर्यंत यूरप खंडांत मागासलेल्या अवस्थेंत असलेलें इंग्लंड यापुढें महत्त्वाला चढूं लागलें आणि त्याची संपत्ति पण वाढत चालली. लंडन शहरही आतां वाढूं लागलें ; लौकरच तें एक साधारणपणें बरेंच महत्त्वाचें बंदर गणलें जाऊं लागलें आणि तेथें व्यापारी आणि धंदेवाले यांची लोकसंख्या अधिकाधिक वाढून भरभराटीस येऊं लागलें. सतराव्या शतकाच्या सुरुवातीलाच लंडन हें एक महत्त्वाचें बंदर आणि व्यापाराचें केंद्र झालेलें होतें, हें दाखविणारी एक मौजेची गोष्ट सांगतात. ज्याचें डोकें मारलें गेलें त्या पहिल्या चार्ल्स राजाचा बाप पहिला जेम्स् राजा याचा राजे लोकांची अनियंत्रित राजसत्ता आणि राजे लोकांचा दैवी अधिकार यांवर फार मोठा भर होता. त्याला पार्लमेंट सभाही मंजूर नव्हती आणि लंडनमधील हे उपटसुंभ व्यापारी पण त्याला आवडत नव्हते. म्हणून एकदां रागाच्या भरांत त्यानें आपण आपला दरबार लंडनहून काढून ऑक्स्फर्ड येथें नेणार अशी तेथील नागरिकांना धमकी दिली ; परंतु लंडनच्या मेयरवर या धमकीचा तिळमात्रसुद्धां परिणाम झाला नाहीं ; आणि उत्तरादाखल उलट तो म्हणाला, "दरबाराबरोबर टेम्स नदीही, महाराज आपल्याबरोबर कृपा करून घेऊन जाणार नाहींत अशी मी आशा करतों !"

या धनिक व्यापारी वर्गानेंच पार्लमेंटला पाठिंबा दिला आणि पार्लमेंटच्या पहिल्या चार्ल्सबरोबरच्या युद्धांत पार्लमेंटला पैशाची फार मोठी मदत केली.

इंग्लंडमध्यें हे सगळे नवे उद्योगधंदे निर्माण झाले त्या सगळ्यांचें स्वरूप घरगुती किंवा खेडेगांवी धंदे, हस्तोद्योग किंवा ग्रामोद्योग म्हणतात तशा प्रकारचें होतें. याचा अर्थ असा, कीं हे कारागीर किंवा धंदेवाले लोक सामान्यतः आपापल्या घरीं बसून काम करीत असत किंवा क्वचित् कोठें थोडे थोडे एकत्र बसून काम करीत असत. प्रत्येक धंद्यामध्यें कारागिरांचे संघ किंवा संस्था असत. हिंदुस्थानांतील जातीं-

मध्यें आणि त्याच्यामध्यें पुष्कळच साम्य असे. परंतु हिंदुस्थानांतल्या जातींमध्यें जें एक धर्माचें अंग आहे तें या संघांमध्यें नव्हतें. त्या त्या धंद्यांतले जे प्रमुख वाकबगार कारागीर असत ते आपल्या हाताखालीं शिकाऊ उमेदवार घेऊन त्यांना शिकवून तयार करीत असत. विणकरांजवळ स्वतःच्या मालकीचे माग असत. सूत कांतणारांजवळ आपापल्या मालकीचे चरखे असत. सूत काढण्याचें काम साऱ्या देशभर होत असे. स्त्रिया आणि मुली यांचा फावल्या वेळचा हा धंदा होता. कोठें कोठें विणकामाचे लहान लहान कारखाने पण असत. अशा ठिकाणीं पुष्कळसे विणकर आपापले माग एकत्र ठेवीत असत आणि तेथें जाऊन विणण्याचें काम करीत असत; परंतु प्रत्येक विणकर आपापल्या मागावर स्वतंत्रपणें काम करीत असे. त्यामुळें स्वतःच्या घरीं बसून त्यानें आपलें विणण्याचें काम केलें काय किंवा अशा चारचौघां विणकरांच्या बरोबर आपआपल्या मागावर प्रत्येकानें काम केलें काय, दोहोंमध्यें खरोखर फरक असा कांहींच नव्हता. आजचे मोठमोठ्या यंत्रांनीं युक्त असे जे कारखाने असतात, त्यांत आणि या असल्या छोट्या कारखान्यात कसल्याही प्रकारचें साम्य नव्हतें.

उद्योगधंद्यांची ही घरगुती पद्धति त्या वेळीं कांहीं एकट्या इंग्लंडमध्यें होती असें नव्हे; तर साऱ्या जगभर जेथें जेथें म्हणून उद्योगधंदे या काळामध्यें होते तेथें तेथें हीच पद्धति होती. उदाहरणार्थ, हिंदुस्थानामध्यें हे घरगुती धंदे फारच पुढारलेल्या स्थितीमध्यें होते. इंग्लंडमध्यें हे घरगुती धंदे आज जवळजवळ बहुतेक पार नाहींसे झाले आहेत; परंतु हिंदुस्थानांत अजूनही असे धंदे पुष्कळच आहेत. हिंदुस्थानांत आज मोठीं यंत्रें आणि छोटे हातमाग दोन्हींची जोडीनें चलती चालू आहे आणि दोघांचेही फायदे-गैरफायदे एकमेकांशीं एकाच वेळीं ताडून पाहण्याला येथें साधन आहे. आपण जें कापड वापरतों तें खादीचें असतें हें तुला ठाऊकच आहे. हें हातानें कांतलेल्या सुतापासून हातानें विणलेलें असतें. अशा रीतीनें हें कापड म्हणजे सर्वस्वीं हिंदुस्थानांतील मातीच्या झोंपड्यांतून आणि खेडेगांवी घरांतून तयार झालेला असा माल आहे.

परंतु नवीन जे यांत्रिक शोध लागले, त्यांच्यामुळें इंग्लंडमधील घरगुती धंद्यांच्या बाबतींत फार मोठी उलाढाल घडून आली. यंत्रें अधिकाधिक प्रमाणांत माणसांचें काम करूं लागलीं आणि थोड्या श्रमांत पुष्कळ अधिक माल निर्माण करणें शक्य होऊं लागलें. या शोधाची सुरुवात अठराव्या शतकाच्या मध्याला झाली; त्यांच्याबद्दल आतां पुढच्या पत्रामध्यें विचार करूं.

वर मीं खादीच्या चळवळीचा ओझरता उल्लेख केला. त्या संबंधांत येथें मला फारसें सांगावयाचें नाहीं. परंतु एक मात्र मला तुला सांगावेंसें वाटतें, कीं ही चळवळ आणि चरखा या गोष्टी कांहीं मोठ्या यंत्रांशीं स्पर्धा करण्यासाठीं काढलेल्या नाहींत. पुष्कळ लोकांची अशी चुकीची समजूत होते. चरखा मान्य करणें म्हणजे मध्ययुगीन अवस्थेकडे परत जाणें होय आणि मोठमोठीं यंत्रें आणि त्यांच्यापासून आपल्याला प्राप्त झालेलें हें सगळें औद्योगीकरण यांचा त्याग करणें होय, असें

त्यांना वाटतें ; पण हें सगळें चूक आहे. आमची चळवळ औद्योगीकरणाला औद्योगीकरण म्हणून किंवा यंत्रें आणि कारखाने यांना यंत्रें आणि कारखाने म्हणूनच केवळ विरोध करणारी चळवळ नाहीं. प्रत्येक गोष्टींतील जें चांगल्यांत चागलें आहे तें सगळें आणि अगदीं जलदींत जलदी आम्हांला हिंदुस्थानासाठीं मिळवावयाचें आहे; परंतु आमच्या देशाची आजची स्थिति लक्षांत घेतली असतां आणि विशेषतः आमच्या शेतकरीवर्गाचें भयंकर दारिद्र्य ध्यानांत घेता त्यांनीं आपल्या फुरसतीच्या वेळाचा उपयोग करावा म्हणून आम्ही त्यांना सूत काढावयास सांगत असतों. असें केल्यानें थोडीशी कां होईना, पण त्यांची आर्थिक स्थिति सुधारते आणि त्याचबरोबर ज्या परदेशी कापडानें आमच्या देशाची केवढी तरी संपत्ति देशाबाहेर नेण्याचा सपाटा चालविलेला आहे, त्या परदेशी कापडावरही त्यांना कमी कमी अवलंबून राहावें लागतें.

## ९८

# इंग्लंडमध्यें औद्योगिक क्रांतीला सुरुवात होते

२७ सप्टेंबर, १९३२

कारागिरीच्या वस्तू निर्माण करण्याच्या पद्धतीमध्यें ज्यामुळें एवढा प्रचंड फेरबदल घडून आला, अशा कांहीं यांत्रिक शोधांबद्दल तुला आतां थोडेंसें सांगितलें पाहिजे मला. या यांत्रिक शोधांचें स्वरूप आज प्रत्यक्ष गिरण्यांमध्यें किंवा कारखान्यांमध्यें पाहिलें, म्हणजे आपल्याला वाटतें यांत काय आहे एवढें मोठें! किती साध्या, सोप्या गोष्टी आहेत या! परंतु त्यांची सुरुवातीला मनामध्यें कल्पना करणें आणि प्रत्यक्ष त्यांची रचना करून त्यांचें कार्य डोळ्यांपुढें निर्माण करून दाखविणें हें पहिल्या प्रथम केवढें तरी कठिण काम असलें पाहिजे. या यांत्रिक शोधांपैकीं पहिला शोध इ. स. १७३८ मध्यें लागला. या सालीं विणण्याच्या मागामध्यें धांवत्या धोट्याचा उपयोग के नांवाच्या मनुष्यानें करून दाखविला. हा शोध लागण्यापूर्वी विणकराच्या हातांतील कांडीचा धागा ताण्यामधून इकडून तिकडे न्यावयाचा म्हणजे किती हळू आणि कष्टानें न्यावा लागत असे! धांवत्या धोट्यामुळें हें काम पुष्कळ जलद होऊं लागलें. त्यामुळें विणकराची काम-निर्मिति दुप्पट वाढली. याचा अर्थ असा, कीं विणकराला आतां पहिल्यापेक्षां अधिक सूत लागूं लागलें. अर्थातच हातानें सूत काढणाऱ्या लोकांना विणकरांची ही मागणी पुरी करणें पुष्कळ जड पडूं लागलें; त्यामुळें पहिल्यापेक्षां अधिक सूत काढण्याचा कांहीं मार्ग सांपडला तर पाहावा, अशी खटपट ते सहजच करूं लागले. इ. स. १७६४ मध्यें हारग्रीव्हस् नांवाच्या मनुष्यानें स्पिनिंग

जेली नांवाचें छोटेंसें सूत काढण्याचें यंत्र तयार केलें. त्यानें ही अडचण बरीचशी भागल्यासारखी झाली. त्यानंतर याच बाबतींतील रिचर्ड आर्कराइट वगैरेंचे आणखी शोध झाले. प्रथम पाण्याचा उपयोग यंत्रें चालविण्यासाठीं शक्ति निर्माण करण्याकडे करण्यांत येऊं लागला. नंतर वाफेच्या शक्तीचा उपयोग सुरू झाला. या सर्व शोधांचा उपयोग प्रथम कापसाच्या सुताचें कापड विणण्याच्या धंद्यामध्यें होण्यास सुरुवात झाली. त्यामुळें कापड-कारखाने किंवा कापड-गिरण्या उभ्या राहूं लागल्या. त्यानंतर या शोधांचा उपयोग लोकरीच्या धंद्यामध्यें होऊं लागला.

याच सुमारास जेम्स् वॅट यानें इ. स. १७६५ मध्यें वाफेचें इंजिन तयार केलें. औद्योगिक इतिहासांतील ही एक मोठी महत्त्वाची घटना होती. तेव्हांपासून कारखान्यांतील वस्तू तयार करण्याच्या कामांत वाफेच्या शक्तीचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होऊं लागला. या प्रकारच्या नव्या कारखान्यांसाठीं आतां कोळशाची गरज उत्पन्न झाली. त्यामुळें कोळशाचा नवीन धंदा निर्माण झाला. कोळशाचा उपयोग व्हायला लागल्यापासून लोखंड गाळण्याच्या म्हणजे खाणींतील मातीपासून शुद्ध लोखंड तयार करावयाच्या नवीन पद्धतीचा उगम झाला. त्यामुळें लोखंडाचा धंदा फारच झपाट्यानें वाढला. लोखंडी कामाचे नवे कारखाने कोळशाच्या खाणीं-जवळच उभारले जाऊं लागले; कारण तेथें कोळसा त्या मानानें स्वस्त पडे.

अशा रीतीनें इंग्लंडमध्यें तीन धंदे मोठ्या जोरानें वाढीला लागले; कापड, लोखंड आणि कोळसा यांचे. हे कारखाने मुख्यतः कोळशाच्या खाणींच्या आसपास आणि इतरही कांहीं सोयीच्या ठिकाणीं उभारण्यांत येऊं लागले. यामुळें इंग्लंडचें सगळें स्वरूपच पालटून गेलें. हिरव्याचार रानांनीं गर्द असलेलीं मधुर खेडेगांवें आतां नाहींशीं होत चाललीं आणि त्यांच्या जागीं हे नवीन मोठेमोठे कारखाने–गिरण्या–उभारले जाऊन त्यांच्या चिमण्यातला काळाकभिन्न धूर जिकडे तिकडे आजूबाजूला अंधकाराची आणि घाणीची छाया पसरवूं लागला. आजूबाजूला कोळशाचे पर्वतासारखे ढीग आणि त्याचप्रमाणें राखेचे वगैरे उकिरड्याचे डोंगर असलेले हे कारखाने, या गिरण्या, दिसायला किती बेंगरूळ आणि भकास वाटत! बरें, या गिरण्यांच्या आणि कारखान्यांच्या भोंवतीं जी कारखानदारी शहरें निर्माण झालीं, तीं तरी कांहीं सुरेख असावीं; तर तींही तशीं नव्हतीं. कारखान्याच्या मालक लोकांचा उद्देश फक्त एकच होता. तो म्हणजे अधिकाधिक पैसा मिळविण्याचा मार्ग काढावयाचा. त्यासाठीं जशी वेळ पडली तशीं त्यांनीं शहरें रचीत नेलीं. त्यांत रेखीवपणा, सौंदर्य-विचार यांना कांहीं थारासुद्धां नव्हता. कशीं तरी, जशीं वाढतील तशीं हीं शहरें वाढत गेलीं. त्यामुळें हीं शहरें बेंगरूळ, भकास, भयंकर मोठीं आणि घाणेरडीं अशीं झालीं आणि अर्धपोटी काम करणाऱ्या मजुरांना कारखान्यांतील त्या भयंकर आरोग्यविघातक परिस्थितींत कामाच्या वेळीं राहावें लागून बाकीचा वेळ या असल्या गचाळ शहरात घालविणें भाग पडूं लागलें.

मोठमोठ्या जमीनदारांनीं छोट्या जमीनदारांना पिळून काढून चोरट्याप्रमाणें दूर फेंकून देण्याचा क्रम सुरू केल्यामुळें इंग्लंडमध्यें बेकारी वाढत गेली व बेकायदेशीर दंगेखोरीला आणि बंडांना इंग्लंडमध्यें भर आला हें मागें मीं तुला सांगितलें तें तुझ्या लक्षांत असेलच. हे नवीन जे उद्योगधंदे निर्माण झाले त्यामुळें तर सुरुवातीला परिस्थिति अधिकच बिघडली. कारखान्यांमुळें शेतीला नुकसान आलें आणि त्यामुळें बेकारी वाढतच चालली. बरोबरच आहे; एखादा नवीन शोध लागला, कीं स्वाभाविकच यंत्रानें जें काम होऊं लागावयाचें तें काम करणाऱ्या माणसांची गरज नाहींशी व्हावयाची. यामुळें पुष्कळदां कामगाराना नोकरीवरून कमी होण्याचे प्रसंग येत व मग सहजच त्यांच्यामध्यें मोठाच असंतोष माजे. त्याच्यापैकीं पुष्कळाना या नव्या यंत्रांचाच तिटकारा वाटूं लागे आणि कित्येकदा हीं यंत्रें मोडून टाकण्याचाही ते प्रयत्न करीत. या लोकांना ‘ यंत्रफोडे ’ असें नांव त्या काळीं मिळालेलें होतें.

या यंत्र फोडण्याच्या प्रकाराचा यूरप खंडांतील इतिहास मोठा लांबपासूनचा आहे. सोळाव्या शतकात जर्मनीमध्यें एक अगदीं साधा यांत्रिक माग शोधून काढण्यांत आला. त्या काळपर्यंत या प्रकाराच्या इतिहासासाठीं आपल्याला मागें जावें लागतें. इ. स. १५६९ मध्यें एका इटालियन पाद्र्यानें लिहिलेल्या एका जुन्या पुस्तकांत या मागासंबंधीं पुढील मजकूर लिहिलेला आढळतो : “ डॅन्झिगमधील नगरसभेला अशी भीति पडली, कीं या नवीन शोधामुळें कितीतरी कारागीर बेकार होऊन उघडे पडतील. यासाठीं त्यानीं या नवीन शोधून काढलेल्या यंत्राचा मोडून तोडून नाश केला आणि तें शोधून काढणाऱ्या मनुष्याला गुप्तपणें गळा दाबून तरी ठार करून टाकण्यांत आलें असावें किंवा पाण्यांत बुडवून नाहींसें करण्यांत आलें असावें! ” या संशोधकाचा अशा रीतीनें जरी तडकाफडकी निकाल करून टाकण्यात आला, तरी हें यंत्र सतराव्या शतकामध्यें पुन्हां उत्पन्न होऊन पुढें आलेंच. या वेळीं त्याच्यामुळें साऱ्या यूरप खंडभर दंगे उसळले. या यंत्राचा उपयोग करण्यांत येऊं नये अशा प्रकारचे कायदे कित्येक ठिकाणीं करण्यात आले आणि कित्येक ठिकाणीं हीं यंत्रें भर बाजारांमध्यें जाहीर रीतीनें जाळण्यांत आलीं. या यंत्राचा प्रथम शोध लागला तेव्हांपासूनच जर त्याचा उपयोग होऊं लागला असता, तर त्याच्या मागून दुसरे आणखी शोध लागले असते आणि यंत्रयुग पुढे सुरू झालें त्यापेक्षांही आधीं सुरू झालें असतें. परंतु या यंत्राचा उपयोगसुद्धां त्या काळीं होऊं शकला नाहीं ही एकच गोष्ट सुद्धां औद्योगीकरणाला अद्यापि अनुकूल काल आलेला नव्हता, हें दाखविण्याला पुरेशी आहे. हा काल जेव्हा अनुकूल आला त्या वेळीं इंग्लंडमध्यें यंत्रानें आपले पाय रोंवलेच. इंग्लंडमध्येंही याविरुद्ध पुष्कळ दंगे झाले; पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कामगारांच्या मनांत यंत्रामुळें असंतोष निर्माण व्हावा ही अगदीं स्वाभाविक गोष्ट होती; परंतु हळूहळू त्यांनाही कळून आलें, कीं दोष कांहीं यंत्राचा नाहीं; तर थोड्या लोकांच्याच केवळ फायद्यासाठीं यंत्राचा उपयोग करण्यांत येतो या पद्धती-

मध्यें दोष आहे; परंतु तूर्त आपण पुन्हा एकदां इंग्लंडमध्यें यंत्रें आणि कारखाने यांची वाढ कशी होत गेली, या गोष्टींकडे लक्ष देऊं या.

हे जे नवीन कारखाने निर्माण केले गेले त्यांनीं जुन्या पुष्कळशा घरगुती उद्योगांची आणि वैयक्तिक कारागिरी करून राहणारांची इतिश्री केली. घरांत बसून काम करणाऱ्या या लोकांना यंत्राशीं स्पर्धा करून टिकून राहणें अशक्य होतें. म्हणून त्यांना आपली कारागिरी किंवा उद्योगधंदे सोडून देणें भाग होतें. त्यानंतर मग ज्या कारखान्यांचा त्यांना स्वाभाविकच अगदीं तिटकारा वाटत असे त्याच कारखान्यांत जाऊन त्यांनीं रोजमजुरीचें काम तरी पत्करावें, नाहीं तर बेकाराच्या जमावांत सामील व्हावें हे दोनच मार्ग त्यांना मोकळे होते. घरगुती उद्योगधंद्यांचा हा नाश अगदीं एकदम तडकाफडकी घडून आला असें जरी नव्हे, तरी तो पुष्कळच वेगानें घडून आला. या शतकाच्या अखेरीस म्हणजे इ. स. १८०० च्या सुमारास हे मोठे कारखानेच ठिकठिकाणीं दिसून येऊं लागले. यानंतर सुमारें तीस वर्षांनीं स्टीफन्सन्‌नें संशोधित केलेलें सुप्रसिद्ध रॉकेट नांवाचें वाफेचें इंजिन तयार झालें आणि तें जोडून रूळावरून डब्यांच्या गाड्या धांवूं लागल्या. अशा रीतीनें यंत्रांचा प्रसार आणि व्याप सारखा वाढत गेला आणि लौकरच उद्योगधंदे आणि सामान्य जीवन यांच्या क्षेत्रांत जवळजवळ सगळीकडे यंत्रांचा शिरकाव झाला.

या संशोधकांपैकीं कितिकांचीं तरी नांवें मीं तुला सांगितलेलीं नाहींत; पण त्या सर्वांच्या बाबतींत एक गोष्ट मात्र विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. ते सगळे लोक एकूणएक जण सामान्य हातकाम करणाऱ्या लोकांच्या वर्गामधून उदयाला आलेले होते. याच वर्गामधून सुरुवाती-सुरुवातीचे बहुतेक सारे बडे कारखानदार उत्पन्न झाले; परंतु संशोधकांनीं केलेले शोध आणि त्यांपासून उत्पन्न झालेली कारखानदारी पद्धति यांचा परिणाम म्हणजे मालक आणि मजूर यांच्यामधील अंतर पूर्वींहून फारच अधिक झालें. कारखान्यांतील मजूर म्हणजे केवळ तेथील यंत्रांतला एक दांता होऊन गेला; एका विशाल व गुंतागुंतीच्या आर्थिक रचनेच्या चक्रांत सांपडून तो जणुं एक दुबळा गुलाम झाला; ही आर्थिक रचना कशा प्रकारची आहे ही गोष्टसुद्धां त्याच्या समजुतीच्या बाहेरची होती, तेथें त्या संघटनेंत त्याचा कांहीं अधिकार चालणें ही किती अशक्य गोष्ट होती! हे नवीन कारखाने कारागिरांशीं आणि धंदेवाल्यांशीं स्पर्धेला उभे राहिले व त्यांच्यापेक्षां कमी खर्चांत वस्तू तयार करून इतक्या स्वस्त किंमतीला त्या विकूं लागले, कीं स्वतःच्या घरच्या अगदींच साध्या आणि जुन्या काळच्या हत्यारांच्या साहाय्यानें वाटेल तेवढें कसब दाखवून शिकस्त केली तरीही कारागिरांना इतक्या स्वस्त त्या वस्तू देतां येईनाशा झाल्या, हें जेव्हा प्रथम दिसून आलें तेव्हा या सगळ्या पद्धतींत कोठें तरी अन्याय होतो आहे याची थोडीशी अंधुक कल्पना त्या वेळीं कारागिरांना व धंदेवाल्यांना प्रथम आली. त्यांचा स्वतःचा धंद्यामधील कोणताही दोष नसतांना त्यांना आपले छोटेखानी उद्योगधंदे बंद करणें

माग पडत होतें. बरें, एक सोडून दुसरा नवा धंदा करावा म्हटलें, तरी स्वतःच्या हातचा रोजचा कसबाचा धंदा जेथें चालविणें अशक्य झालें, तेथें नवीन धंदा तरी कसा यशस्वी होणार? त्यामुळें हळूहळू या सर्व कारागिरांची बेकारांच्या जमावांत भर पडली आणि त्यांची उपासमार होऊं लागली. कोणीं तरी लिहिलेलें आहे, कीं "भूक ही कवाईत शिकविणारा आणि ती कवाईत करून घेणारा कारखानदाराचा अंमलदार आहे" आणि या भुकेपायींच या कारागिरांना या नव्या कारखान्यांत काम मिळविण्याकरिता म्हणून नाइलाज होऊन यावें लागलें. कारखानदारांना त्यांच्याबद्दल थोडीच कांहीं दयामाया होती? त्यांनीं या लोकांना काम दिलें; परंतु वेतन मात्र अगदींच थोडें दिलें आणि तेवढ्यावर त्या बिचाऱ्यांना कारखान्यांमध्यें आपल्या रक्ताचें पाणी करीत राबावें लागलें. स्त्रियांना आणि मुलांनासुद्धां या आरोग्यविघातक अशा ठिकाणीं दिवस-दिवस, किती तरी तास राबावें लागल्यानें त्यांच्यापैकीं कितीक थकून, घेऱ्या येऊन पडत आणि मरतसुद्धां. पुरुषांना साऱ्या दिवसभर खोल कोळशाच्या खाणींच्या तळाशीं काम करीत राहावें लागे आणि महिनोमहिनेपर्यंत त्यांना कधीं सूर्याचें दर्शन म्हणून होत नसे.

परंतु हें सारें कारखानदारांच्या मालकांच्या क्रूरपणामुळें घडून येत होतें अशी मात्र समजूत करून घेऊं नकोस. आपण असा कांहीं क्रूरपणा करतों आहों अशी त्यांना बहुशः जाणीवसुद्धां नव्हती. दोष होता तो त्या कारखानदारी कामाच्या पद्धतीचा होता. या कारखानदारांचा सगळा उद्देश काय होता, तर आपला उद्योग-धंदा वाढवावयाचा आणि इतर दूरदूरच्या देशांतील बाजारपेठा काबीज करावयाच्या; यासाठीं काय वाटेल तें करावें लागलें तरी तें करण्याला त्यांची तयारी होती. हे सगळे नवे कारखाने बांधावयाचे आणि यंत्रसामग्री खरेदी करावयाची म्हणजे सुरुवातीलाच किती तरी प्रचंड पैसा खर्च करावा लागे. या पैशावरील नफा काय तावडतोब थोडाच हातांत येणार? कारखाना सुरू होऊन जिन्नस तयार होऊं लागले पाहिजेत, बाजारांत ते विकले गेले पाहिजेत, तेव्हां कोठें गुंतविलेला पैसा थोडा थोडा मोकळा होऊं लागणार. त्यामुळें कारखाने उभारतानाच या मालक लोकांना अत्यंत काटकसर करणें जरूर वाटे. बरें, पुढें माल बराचसा खपून पैसा जरी हातांत आला, तरी हा पैसा ते आणखी नवे कारखाने उभारण्याकडे खर्च करीत. त्यांच्या देशांत इतर देशांतल्यापेक्षां आधीं औद्योगीकरणाला सुरुवात झालेली होती; हा जो इतरांच्यापेक्षां पुढचा टप्पा त्यांना गांठायला मिळालेला होता त्याचा फायदा घेण्याचा त्यांचा उद्देश होता आणि असा हा फायदा त्यांना मिळतही गेला. तेव्हां आणखी उद्योगधंदे वाढवावेत आणि आणखी पैसा मिळवावा, या वेडाच्या भरीं भरून त्यांनीं जे मजूर खरोखर त्यांची सगळी संपत्ति निर्माण करीत होते, त्यांनाच भरडून काढण्याचा क्रम चालू केला.

त्यामुळें या नवीन कारखानदारीच्या पद्धतीची रचना बलिष्ठांनीं दुर्बलांची

पिळणूक करावी या गोष्टीला विशेषच अनुकूल अशा प्रकारची बनत गेली. इतिहासांत सुरुवातीपासूनच 'बळी तो कान पिळी' हा न्याय आपण पाहत आलों आहों. कारखानदारीच्या पद्धतीनें हा प्रकार अधिकच सुलभ झाला. कायद्यानें पाहिलें तर या पद्धतींत गुलामगिरी नव्हती; परंतु वस्तुतः पाहता अर्धपोटीं राहणारा हा रोजमजुरीचा गुलाम होऊन राहिलेला कामगार जुन्या काळच्या गुलामाहून कांहीं निराळा नव्हता. कायद्याचें सगळें धोरण मालकांच्या हिताचें होतें. धर्मसुद्धां त्यांच्याच बाजूचा होता; तोही मजुराला पुढच्या जन्मांत अथवा स्वर्गांत परमेश्वरी कृपेची प्राप्ति होईल या आशेवर सध्याची आपली दैन्यावस्था बिनतक्रार सहन करीत राहण्याचाच उपदेश करी. एवढेंच नव्हे, तर राज्यकर्त्या लोकांनीं एक स्वतःच्या सोयीचें तत्त्वज्ञान प्रसृत केलें; तें असें, कीं समाजाच्या धारणेसाठीं त्यामध्यें गरिबांचा वर्ग असणें आवश्यकच आहे आणि म्हणून कमी मजुरी देणें यात कसलाही दोष नसून समाजधारणेच्या दृष्टीनें तेंही पुण्यकर्मच आहे. कारण जर जास्त मजुरी देण्यास सुरुवात केली तर लोक ऐषआराम करूं लागतील आणि नीट कसून काम करणार नाहींत. ही सगळी विचारसरणी त्या लोकांना मोठी उपयुक्त आणि संतोषजनक अशी झाली; कारण ती कारखानदारांच्या आणि श्रीमंत लोकांच्या हितसंबंधाशीं नेमकी जुळती होती.

या काळचा इतिहास वाचायला मोठा मौजेचा आणि बोधपर आहे. त्यापासून आपल्याला पुष्कळच शिकावयाला सांपडतें. यांत्रिक निर्माणपद्धतीचा अर्थव्यवस्थेवर आणि समाजजीवनावर केवढा प्रचंड परिणाम होतो हें त्यावरून आपणास समजून येतें. या पद्धतीमुळें जुनी सर्व सामाजिक जुळणी पार विस्कटून जाते, नवीन वर्ग पुढें येतात आणि त्यांच्या हातीं सत्ता येते. मूळचा कारागिरांचा वर्ग हा कारखान्यांतील रोजंदारी मजूर होऊन जातो. याच्याच बरोबर या नवीन आर्थिक घडीमुळें लोकांच्या धार्मिक आणि नैतिक आचारविचारांवरही परिणाम होतो. सर्वसामान्य माणसांच्या धार्मिक श्रद्धा किंवा नैतिक विचार यांची घडण त्यांचे त्यांचे वैयक्तिक हितसंबंध किंवा वर्गभावना यांच्याशीं जुळती अशा रीतीनें बनत असते किंवा बदलत असते आणि जमेल तोंपर्यंत आपापल्या हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठींच उपयुक्त असे धर्म व नीति यांचे नियम घालून ठेवण्याची पुरेशी काळजी सर्व लोक घेत असतात. अर्थात् हें सर्व करतांना आव मात्र असा मोठा सद्बुद्धीचा आणलेला असतो, कीं अशा प्रत्येक नियमाच्या पाठीशीं सर्व मनुष्यजातीच्या कल्याणाचाच मात्र एकमेव हेतु आहे. आपल्या या हिंदुस्थानांत इंग्रज राजप्रतिनिधि (व्हाइसरॉय) किंवा इतर अधिकारी यांच्या तोंडून असल्या मोठ्या पुण्यकल्पना रोज ऐकायला सांपडत असतात. रात्रंदिवस हे लोक आम्हाला सांगत असतात, कीं 'पाहा, हिंदुस्थानच्या हितासाठींच आम्ही आमच्या जिवाचें रान करून किती खटपट करतों आहों!' आणि हें बोलत असतांच इकडे हे लोक वटहुकुमांच्या आणि संगिनींच्या जोरावर राज्य करून

आमच्या लोकांच्या अंगांतील सर्व जोम नष्ट करून टाकीतच असतात. आमचे जमीनदार लोक आपलें आपल्या कुळावर केवढें प्रेम आहे म्हणून सांगत असतात; परंतु आपल्या उपाशी पोटांत घालायला एक काडीसुद्धां बिचाऱ्याजवळ शिल्लक राहूं नये इतका कमाल खंड शेतकऱ्यांकडून वसूल करून त्यांचा पिळून पाचोळा करून टाकावयाला ते तिळभरसुद्धां मागेंपुढें पाहत नाहींत. आमचे भांडवलदार आणि मोठमोठे कारखानदारसुद्धां आपल्या मनांत आपल्या मजुरांबद्दल फार मोठी सद्भावना आहे असेंच सांगत असतात; पण या सद्भावनेचें रूपांतर जास्त समाधानकारक मजुरींचे दर किंवा मजुरांच्यासाठीं कारखान्यांत आणि बाहेर जास्त चांगल्या वातावरणाची व राहणीची सोय यांमध्यें झालेलें कधींच आढळून येत नाहीं. त्यांचा सगळा फायदा नवे नवे प्रासाद बांधण्याकडे खर्ची पडतो; मजुराची मातीची झोंपडी थोडीशीसुद्धां सुधारण्याला कांहीं उपयोगी पडत नाहीं.

आपल्या स्वार्थाच्या दृष्टीनें जरुरीचें असेल तेव्हां तेव्हां मनुष्य आत्मवंचना आणि परवंचना किती आणि कशी करतो हें पाहिलें, म्हणजे मोठाच अचंबा वाटतो. तेव्हां स्वाभाविकच अठराव्या शतकांतील व त्यानंतरचे इंग्रजी मजूरमालक हे मजुरांची परिस्थिति सुधारण्यासाठीं केलेल्या सर्व प्रयत्नांना कसून विरोध करीत आलेले आढळतात. कारखान्यांच्या कारभारासंबंधीं आणि मजुरांच्या घरांची व कारखान्यांच्या इमारतींची सुधारणा करण्यासंबंधीं कायदे करण्यालाच प्रथम मुळात त्यांनीं विरोध केला. मजुरांच्या हालअपेष्टांचीं कारणें नाहींशीं करण्याची खटपट करण्याची समाजावर जबाबदारी आहे, ही गोष्टच मुळीं त्यांना मान्य नव्हती. ते आपल्या मनाचें असें समाधान करीत, कीं खरोखर समाजांत जे आळशी असतात त्यांनाच फक्त हाल सोसण्याचा प्रसंग येतो. शिवाय, कांहीं झालें तरी मजूर हेही आपल्यासारखेच मनुष्यप्राणी आहेत, अशी खरोखर त्यांची फारशी भावनाच नव्हती. या लोकांनीं त्यामुळें आणखी एक नवीन तत्त्वज्ञान प्रसृत केलें. या तत्त्वज्ञानाचें नांव ( Laissez faire ) लेसे फेअर ( म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य अथवा व्यापारी व्यवहारात वैयक्तिक कार्यपद्धतीवरील नियंत्रणाचा अभाव ) असें आहे; त्याचा अर्थ असा, कीं आमच्या उद्योगधंद्यांत आम्ही आम्हांला जसें वाटेल तसें वागूं; त्यांत शासनसंस्थेकडून कसलीही ढवळाढवळ होणें न्याय्य नव्हे. इतर देशात कोणींही अजून काढलेले नव्हते अशा वेळीं त्यांनीं कारखाने काढलेले असल्यामुळें त्यांनीं जो इतरांपेक्षां पुढचा पल्ला गांठलेला होता त्यापासून मिळेल तो जास्त पैसा मिळविण्यासाठीं त्यांना सगळें रान मोकळें हवें होतें; कसलाही प्रतिबंध नको होता. म्हणून लेसे फेअरच्या, व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाला या लोकांनीं कांहीं अंशीं परमेश्वरी न्यायाचें स्वरूप प्राप्त करून दिलें. ते म्हणत, यात कोणावर कसलाही अन्याय तर नाहींच; उलट, त्यामुळें प्रत्येकाला मिळेल त्या संधीचा जितका करून घेतां येईल तितका उपयोग करून घेण्याचें समान स्वातंत्र्य मिळत असतें; ज्याची जशी निसर्गसिद्ध ताकद असेल तसा त्याला संधीचा लाभ करून घेतां येईल. या तत्त्वाप्रमाणें प्रत्येक व्यक्तीला बाकीच्या

सर्व जगाशीं झगडा करून पुढें जाण्याला संपूर्ण संधि होती. मग या झगड्यांत पुष्कळशा लोकांचा यशाऐवजीं नाशच होतो असें जरी झालें, तरी त्याला कोण काय करणार ?

सर्व जागतिक सुधारणेचा पाया म्हणजे मनुष्यामनुष्यांमध्यें दिवसेंदिवस वाढत गेलेली व जाणारी सहकार्यप्रवृत्ति हीच होय, हें मी या पत्रामध्यें तुला सांगत आलों आहें; परंतु लेसे फेअरच्या, अनियंत्रित व्यक्तिस्वातंत्र्याच्या या तत्त्वज्ञानामुळें आणि नवीन उदयास आलेल्या भांडवलशाहीमुळें मात्र समाजांत जंगलचा कायदा उदयास आला. कार्लाइलनें या तत्त्वज्ञानाला " डुकरांचें तत्त्वज्ञान " असें नांव दिलें आहे. हा जीवन आणि उद्योगधंदे यांमधील नवा कायदा–धर्म–नियम कोणीं बरें घालून दिला ? मजुरांनीं खास नव्हे ! त्या बिचाऱ्यांना या बाबतींत कोणी तिळमात्र विचारीत नव्हतें. यशस्वी झालेले जे कारखानदार वर त्यांच्या डोक्यावर नाचत होते त्यांनाच मूर्खासारखें भावनांच्या भरीं भरून कोणीं आपल्या व्यवहारांत लुडबूड करावी ही गोष्ट मंजूर नव्हती. म्हणून खासगी घरामध्येंही सक्तीनें स्वच्छता करण्याला भाग पाडलें जावें आणि खाद्यपेयादि वस्तूंच्या भेसळीच्या बाबतींत अडथळा केला जावा, या प्रयत्नांना सुद्धां व्यक्तिस्वातंत्र्य आणि मालमत्तेचा हक्क यांच्या नांवावर या लोकांनीं हरकत घेतली !

आतां नुकताच भांडवलशाही हा शब्द मीं वापरला. कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारची भांडवलशाही जगाच्या सुरुवातीपासून आज शेंकडों वर्षें जगांत नांदतच आलेली आहे. म्हणजे काय, तर उद्योगधंदे हे सांठवून ठेवलेल्या पैशाच्या आधारावरच चालत आलेले आहेत; परंतु यंत्राचा शोध लागून औद्योगीकरण झाल्यानंतर कारखानदारी पद्धतीच्या निर्मितीला एकदम फारच पैशाची जरुरी लागूं लागली. अशा पैशाला आतां " औद्योगिक भांडवल " हें नांव प्राप्त झालें आणि आतां भांडवलशाही हा शब्द औद्योगिक क्रांतीनंतर जी नवीन आर्थिक रचना अस्तित्वांत आली तिला उद्देशून वापरण्यांत येऊं लागला आहे. या आर्थिक रचनेमध्यें भांडवलदार लोकांच्या म्हणजे ज्यांच्या मालकीचा पैसा–भांडवल–असे त्यांच्या हातांत कारखान्यांचा सर्व कारभार असावयाचा आणि तेच फायद्याचे मालक असावयाचे. औद्योगीकरणाबरोबरच भांडवलशाहीची वाढ साऱ्या जगभर झाली. याला सोव्हियट यूनियन आणि इतर कांहीं एकदोन प्रदेश हेच तेवढे अपवाद आहेत. भांडवलशाहीच्या अगदीं सुरुवातीच्या दिवसापासूनच श्रीमंत आणि गरीब यांमधील भेद स्पष्ट करण्यावर अधिक भर देण्यांत आला. उद्योगधंद्यांचें कार्य यंत्रांच्या साहाय्यानें होऊं लागल्यामुळें उत्पादन पुष्कळ अधिक वाढलें आणि त्यामुळें संपत्तींत खूप वाढ झाली; पण ही सगळी नवी संपत्ति कांहीं थोड्या लोकांच्याच–या कारखान्यांच्या मालकांच्या–फक्त खिशामध्यें जमा झाली. कामगार लोक गरीब ते गरीबच राहिले. इंग्लंडमध्यें मात्र हिंदुस्थान आणि इतर प्रदेश यांच्या पिळणुकीच्या बळावर हळूहळू मजुरांच्या राहणीचें मान सुधारत

गेलें; परंतु एकंदर उद्योगधंद्यांमधील फायद्याचा वांटा मात्र फारच थोडा त्यांच्या वांट्यास येई. औद्योगिक क्रांति आणि भांडवलशाही यांनीं मिळून उत्पादनाचा प्रश्न सोडविला; परंतु नवीन उत्पन्न होणाऱ्या संपत्तीची वांटणी करण्याचा प्रश्न त्यांना सोडवितां आला नाहीं; त्यामुळें सधन आणि निर्धन यांमधील प्राचीन काळापासून चालत आलेला झगडा हा नुसता शिल्लक राहिला; एवढेंच नव्हे, तर उलट तो अधिकच तीव्र झाला.

ही औद्योगिक क्राति अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत घडून आली. याच वेळीं नेमकें ब्रिटिश लोकाचें फ्रेंचांशीं कॅनडा व हिंदुस्थान या देशांत युद्ध सुरू होतें. याच वेळीं तें सात वर्षांचें युद्ध झालें. या निरनिराळया घटनांचे एकमेकींवर फार मोठे परिणाम झाले. प्लासीच्या लढाईच्या वेळीं आणि त्यानंतरही हिंदुस्थानांतून ईस्ट इंडिया कंपनीनें स्वतः आणि कंपनीच्या नोकरांनीं (क्लाइव्हची आठवण असेलच तुला) ज्या प्रचंड रकमा उकळून नेल्या, त्यांचा उपयोग इंग्लंडमध्यें नवे नवे कारखाने उघडण्याच्या कामीं फारच झाला. याच पत्रांत थोड्या वेळांपूर्वीच मीं तुला सांगितलें आहे, कीं औद्योगीकरण करावयाचें म्हणजे सुरुवातीला त्यासाठीं पाण्यासारखा पैसा ओतावा लागत असतो. कांहीं पैसा नुसता गडप होत राहतो. त्यावर नफा कांहींच होत नाहीं. तेव्हां कर्जाच्या रूपानें किंवा इतर कोणत्या रीतीनें भरपूर पैसा मिळविण्याची सोय जर नसेल, तर कारखाना सुरू होऊन त्यांतून नफा मिळूं लागेपर्यंत प्रथम पुष्कळच दारिद्र्याची आणि हालअपेष्टांची अवस्था सहन करणें भाग होतें. आपले उद्योगधंदे आणि कारखाने स्थापन करून वाढीला लावण्यासाठीं ज्या वेळीं इंग्लंडला अशा रीतीनें भरपूर पैशांची गरज होती, त्याच अगदीं ऐन वेळीं इंग्लंडच्या अलौकिक सुदैवानें हिंदुस्थानांतून प्रचंड मोठ्या रकमा इंग्लंडला मिळाल्या.

हे कारखाने जसे स्थापन करून झाले तशा आणखी कांहीं गोष्टींची गरज उत्पन्न झाली. पक्का माल तयार करण्यासाठीं कारखान्यांना कच्च्या मालाची गरज निर्माण झाली. उदाहरणार्थ, कापड बनवावयाचें तर त्यासाठीं कापूस हवा. कच्च्या मालापेक्षांही कारखान्यांतून तयार झालेला हा नवीन माल ज्या ठिकाणीं विकतां येईल अशा बाजारपेठांचीही आवश्यकता उत्पन्न झाली. कारखाने सगळ्यांच्या आधीं काढल्यामुळें बाकीच्या सगळ्या देशांपेक्षां इंग्लंडनें पुष्कळच अधिक आघाडीचा पल्ला गांठलेला होता. असें असूनसुद्धां तयार मालाला बाजारपेठ मिळविण्याच्या कामीं कांहीं कमी अडचणी इंग्लंडला पडल्या असल्या असें नव्हे; परंतु त्या कामींही इंग्लंडला पुन्हां हिंदुस्थानचा फार मोठा उपयोग झाला. अर्थात् हिंदुस्थानच्या संमतीनें नव्हे, तर हिंदुस्थानच्या इच्छेविरुद्धच इंग्लंडनें हा उपयोग करून घेतला. हिंदुस्थानांतल्या इंग्रज लोकांनीं हिंदी उद्योगधंदे नष्ट करून इंग्लंडचें कापड हिंदी लोकांवर लादण्यासाठीं हर तऱ्हेच्या युक्त्या-प्रयुक्त्या केल्या. त्या संबंधांत मी पुढें सांगणारच आहें. दरम्यान तूर्त ब्रिटिशांच्या हातात हिंदुस्थान देश असल्यानें आणि त्या देशाला जबरदस्तीनें आपल्या

योजनांबरहुकूम त्यांना खेळवितां आल्यामुळें इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीला कसा उपयोग झाला हें पाहणें आपल्याला महत्त्वाचें आहे.

एकोणिसाव्या शतकांत जगाच्या सर्व भागांमध्यें औद्योगीकरणाचा प्रसार होऊन इतर देशांतही इंग्लंडनें घालून दिलेल्या नमुन्याबरहुकूमच सामान्यपणानें भांडवलशाही कारखानदारीची वाढ झाली. भांडवलशाहींतून अगदीं अपरिहार्यपणें एका नवीन प्रकारच्या साम्राज्यशाहीचा उगम झाला. कारण ज्या त्या देशांत उत्पादनाला उपयोगी असा कच्चा माल व तयार माल विकण्यासाठीं बाजारपेठ यांच्याकरितां मोठी हाकाटी सुरू झाली. बाजारपेठ मिळविण्याचा आणि कच्चा माल पैदा करण्याचा सर्वांत सोपा मार्ग म्हणजे ज्या देशांत अशी बाजारपेठ किंवा कच्चा माल असेल किंवा दोन्ही असतील, असे देशच आपल्या कबजांत घ्यावयाचे. अशा कारणानें त्यांतल्या त्यांत जे अधिक सामर्थ्यवान् देश होते त्यांच्यामध्यें स्वतःच्या कबजांत नवे नवे प्रदेश आणण्यासाठीं स्पर्धेची मोठी हातघाई सुरू झाली. याही बाबतींत हिंदुस्थान देश कबजांत असल्यामुळें आणि समुद्रावरील वर्चस्वामुळें इंग्लंडला परिस्थिति मोठीच अनुकूलतेची होती; परंतु साम्राज्यशाही आणि तिचीं फळें यांबद्दल मला तुला पुढें बरेंच सांगावें लागणार आहे.

औद्योगिक क्रांतीचा उदय झाल्यापासून इंग्लंडच्या कारभारामध्यें मात्र तेथील मोठे मोठे कापड-कारखानदार, लोखंड-कारखानदार आणि कोळशाच्या खाणींचे मालक यांचें प्रस्थ दिवसेंदिवस अधिकाअधिक वाढत गेलें.

## ९९

## अमेरिका इंग्लंडपासून फुटून निघते

*२ ऑक्टोबर, १९३२*

आतां आपण अठराव्या शतकांतील दुसऱ्या क्रांतीचा विचार करूं. ही क्रांति म्हणजे अमेरिकन वसाहतींनीं इंग्लंडविरुद्ध केलेलें बंड होय. ही क्रांति केवळ राजकीय स्वरूपाची. आतां नुकताच जिचा आपण विचार करीत होतों त्या औद्योगिक क्रांती-मुळें अथवा अमेरिकेच्या बंडानंतर लौकरच घडून आलेल्या ज्या फ्रेंच राज्यक्रांतीनें यूरपमधील सर्व सामाजिक संघटनेचा पाया हादरवून टाकला त्या क्रांतीमुळें जीवनांत जसे मूलभूत फरक झाले, तसे कांहीं या अमेरिकन राज्यक्रांतीमुळें झाले नाहींत. तरी पण हा जो राजकीय फेरबदल झाला, त्याचेसुद्धां पुढच्या काळांत फार मोठे परिणाम व्हावयाचे होते. त्या वेळीं स्वतंत्र झालेल्या अमेरिकन वसाहती आज सगळ्या जगांत

अत्यंत सामर्थ्यवान्, अत्यंत संपन्न आणि औद्योगिक दृष्टीनें अत्यंत पुढारलेल्या अशा झाल्या आहेत.

इ. स. १६२० सालीं इंग्लंडमधून प्रॉटेस्टंट लोकांची एक लहानशी टोळी घेऊन मेफ्लॉवर नांवाचें जहाज अमेरिकेला गेल्याचें मीं तुला सांगितलें होतें. त्या जहाजाची आठवण आहे का तुला? या लोकांना पहिल्या जेम्सचा अनियंत्रित राज्यकारभार मान्य नव्हता; त्याचप्रमाणें त्याचीं धार्मिक मतेंही त्यांना मान्य नव्हतीं. म्हणून या लोकांनीं इंग्लंडच्या जमिनीची आपल्या पायाला लागलेली धूळ झटकून टाकून इंग्लंडला रामराम ठोकला आणि अटलांटिक समुद्राच्या पलीकडच्या तीरावर नवीन देशांत जाऊन त्यांनीं आपल्याला जास्त स्वतंत्रतेनें राहतां यावें म्हणून त्या ठिकाणीं आपली वसाहत स्थापन केली. या लोकांना इंग्रजी इतिहासांत पुढें "पिलग्रिम फादर्स" म्हणजे यात्रेकरूंचे मूळपुरुष, असें नाव पडलें. या नव्या प्रदेशाच्या उत्तर बाजूला हे लोक जमिनीला लागले. त्या ठिकाणाला त्यांनीं न्यू प्लिमथ असें नांव दिलें. त्यांच्या आधींही कित्येक वसाहतवाले अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्यावर येऊन दाखल झालेले होते. त्यांच्या मागूनही पुष्कळ लोक आले आणि अखेरीस अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावर उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत छोट्या छोट्या वसाहतींचे ठिपकेच जणुं सगळीकडे पसरले. यांमध्यें कांहीं वसाहती कॅथॉलिकांच्या होत्या; कांहीं इंग्लंडमधील कॅव्हॅलिअर म्हणजे राजपक्षीय सरदारांनीं स्थापन केलेल्या होत्या, तर कांहीं क्वेकर लोकांनीं स्थापन केलेल्याही होत्या. पेन्‌सिल्व्हानिया वसाहतीचें नाव पेन नांवाच्या क्वेकर पुढाऱ्याच्या नांवावरूनच दिलें गेलेलें आहे. याशिवाय डच, जर्मन, डॅनिश आणि कांहीं कांहीं फ्रेंच लोकही या वसाहतींमधून होते. अशा रीतीनें ही एक यूरपमधील अनेक देशांतील लोकांची भेळच त्या ठिकाणीं झालेली होती; परंतु त्यांच्यामध्यें बहुतेक सारा भरणा इंग्रज वसाहतवाल्यांचाच होता. डच लोकांनीं या भागांत जें एक शहर स्थापन केलें होतें, त्याला त्यांनीं ॲम्स्टरडॅम हें नांव दिलें होतें. पुढें इंग्रज लोकांनीं हें शहर काबीज केलें तेव्हां त्याचें नांव बदलून तें त्यांनीं न्यूयॉर्क असें केलें; आज हें नांव केवढें तरी प्रसिद्धीस आलेलें आहे.

हे इंग्रज वसाहतवाले पुष्कळ दिवसपर्यंत ब्रिटिश राजा आणि ब्रिटिश पार्लमेंट यांचा अधिकार मान्य करून चालले होते. त्यांच्यापैकीं पुष्कळसे लोक आपलीं घरेंदारें सोडून इकडे आले होते याचें कारण त्यांना इंग्लंडमधील आपली परिस्थिति समाधानकारक वाटत नव्हती आणि शिवाय कोणाला तेथें चाललेला राजाचा कारभार पसंत नव्हता, तर कोणाला पार्लमेंटचें राजकारण मान्य नव्हतें. असें असलें तरी आपल्या मायदेशापासून अजिबात फुटून निघावें अशी त्यांच्यापैकीं कोणाचीही इच्छा नव्हती. दक्षिणेंतील वसाहतींमध्यें कॅव्हॅलिअर आणि राजाच्या पक्षाला पाठिंबा देणाऱ्या इतर लोकांची वस्ती अधिक होती. त्यांचा तर इंग्लंडकडे अधिकच ओढा होता. या ज्या वेगळ्या वेगळ्या वसाहती होत्या त्यांचे आपापले कारभार अगदीं स्वतंत्र चालत असत;




अमेरिका फुटून वेगळी होते

त्यांच्यामध्यें सर्वांमध्यें समानता अशी फारच थोडी होती. अठराव्या शतकामध्यें आतां पूर्व किनाऱ्यावर एकूण तेरा वसाहती झालेल्या होत्या, त्या सर्व ब्रिटिशांच्या अमलाखालीं होत्या. उत्तरेला कॅनडाची वसाहत होती आणि दक्षिणेकडे स्पॅनिश लोकांचा मुलूख होता. या सर्व वसाहतींमध्यें डच लोकांच्या, डॅनिश लोकांच्या किंवा अशाच इतर लोकांच्या वस्तीचे जे भाग होते ते सर्व ब्रिटिश लोकांनीं आतां कवटाळलेले होते आणि त्यांच्याच अमलाखालीं ते नांदूं लागलेले होते; पण यांत एक लक्षांत ठेव, कीं या सर्व वसाहती केवळ किनाऱ्याला लागून आणि थोड्याशा अंतरावर अशाच फक्त वसलेल्या होत्या. त्यांच्या पश्चिमेला थेट पॅसिफिक महासागरापर्यंत जो प्रचंड प्रदेश पसरलेला होता, तो या सर्व वसाहतींच्यापेक्षां आकारानें दसपट मोठा होता. हा प्रदेश अजून कोणाही यूरपीय वसाहतवाल्यांनीं व्यापलेला नव्हता. अनेक रेड इंडियन् जमातींची किंवा राष्ट्रांची तेथें वसति असून त्यांचींच तेथें राज्यें होतीं. या सर्व राज्यां-मध्यें इरोकोइस जमात ही प्रमुख जमात होती.

अठराव्या शतकाच्या मध्याला इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें जगांत जेथें जेथें त्यांची वसाहत होती, तेथें तेथें सगळीकडे युद्ध झालें हें तुला आठवतच असेल. या युद्धाला सात वर्षांचें युद्ध म्हणत (१७५६ ते १७६३) आणि तें केवळ यूरपमध्येंच होऊन न राहतां कॅनडा आणि हिंदुस्थान या देशांमध्येंही झालें. या लढाईंत इंग्लंडचा जय झाला आणि फ्रान्सला कॅनडा देश इंग्लंडच्या स्वाधीन करावा लागला. अशा रीतीनें फ्रान्सची अमेरिकेंतून पूर्ण हकालपट्टी झाली आणि उत्तर अमेरिकेंतील सर्व वसाहती इंग्लंडच्या ताब्यांत आल्या. कॅनडामधील केबेक प्रांतांत मात्र थोडीफार फ्रेंच लोकवस्ती होती. नाहीं तर बाकीच्या सर्व वसाहती प्रामुख्यानें इंग्रजांच्याच झालेल्या होत्या. मोठी चमत्काराची गोष्ट अशी आहे, कीं आजच्या घटकेलासुद्धां चारी बाजूंनीं अँग्लो सॅक्सन् लोकांच्या समुद्रानें वेढलेलें असें, फ्रेंच भाषा आणि फ्रेंच संस्कृति यांचें एक जणुं बेटच अशा स्वरूपांत, केबेक शहर उभें आहे. या प्रांतांतील सर्वांत मोठें शहर जें मॉंट्रील (हें नांव मॉंट रॉयलवरून दिलेलें आहे) त्याच्यामध्येंही मला वाटतें फ्रेंच बोलणाऱ्या लोकांची जितकी संख्या आहे, तितकी एक पॅरिस शहर सोडलें तर जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही शहरामध्यें सांपडणार नाहीं.

मागें एका पत्रामध्यें मीं तुला या यूरपीय देशांनीं आफ्रिकेंतील नीग्रो कामगार अमेरिकेंत आणून गुलामांचा जो व्यापार चालू केला होता त्याबद्दल सांगितलें आहे. हा भयंकर आणि अमानुष राक्षसी व्यापार बहुतांशीं स्पॅनिश, पोर्तुगीज आणि इंग्रज लोकांच्या हातांमध्यें होता. अमेरिकेमध्यें मजुरांची गरज होती ती विशेषतः दक्षिणे-कडील वसाहतींत अधिक होती; त्या बाजूला तंबाखूची लागवड फार मोठ्या प्रमाणांत झालेली होती. प्रत्यक्ष त्या देशाचे लोक, ज्यांना रेड इंडियन म्हणून म्हटलें जातें, ते होते भटक्ये; त्यांची एका ठिकाणीं राहण्याची तयारी नव्हती. त्याचप्रमाणें गुलाम होऊन राबण्याचीही त्यांची तयारी नव्हती. या वसाहतवाल्यांपुढें नमण्यापेक्षां मोडून

जाणें त्यांनीं अधिक पसंत केलें आणि पुढच्या काळांत वसाहतवाल्यांनीं त्यांना मोडून काढलें; पण त्यांनीं त्या लोकांचा जवळजवळ सर्वस्वीं उच्छेद केला आणि प्राप्त झालेल्या नवीन परिस्थितीमध्यें ते सारे बहुतेक मरून नाहींसे होऊन गेले. एका काळीं सबंध खंड व्यापून राहिलेल्या या लोकांपैकीं आज आतां फार करून कोणीसुद्धा अमेरिकेंत शिल्लक राहिलेले नाहींत.

तेव्हां हे रेड इंडियन लोक तर मळ्यांमध्यें काम करीनात आणि मजुरांची गरज फारच निकडीची आणि मोठी होती. तेव्हां आफ्रिकेंतील दुर्दैवी बिचाऱ्या लोकांची शिकारी जनावरांप्रमाणें अघोरी शिकार करण्यांत आली आणि त्यांना समुद्रपार इतक्या क्रूर व अमानुष पद्धतीनें पाठविण्यांत आलें, कीं त्यावर आज विश्वास ठेवणेंसुद्धां शक्य होत नाहीं. आफ्रिकेंतील या नीग्रो लोकांना दक्षिणेकडील व्हार्जिनिया, कॅरोलिना आणि जॉर्जिया या वसाहतींत – संस्थानांत – नेण्यांत आलें आणि तेथें त्यांना टोळ्याटोळ्यांनीं मुख्यतः तंबाखूच्या मोठ्या मोठ्या मळ्यांमधून कामाला जुंपण्यांत आलें.

उत्तरेकडील संस्थानांमधील परिस्थिति याहून वेगळ्या प्रकारची होती. मेफ्लॉवर बोटींतून आलेल्या पिलग्रिम फादर्सनीं आपल्याबरोबर आणलेली प्युरिटन (साध्या व तत्त्वप्रधान) जीवनाची परंपरा अद्यापिही तेथें कायम टिकून होती. शिवाय तेथील मळे अगदीं आटपशीर आकाराचे होते. दक्षिणेंतील संस्थानांप्रमाणें भले मोठे मळे या भागांत नव्हते. या आटपशीर मळ्यांमध्यें गुलामांची किंवा पुष्कळ मजुरांच्या संख्येचीही आवश्यकता नव्हती. बरें, जमिनीलाही कांहीं तुटवडा नव्हता. त्यामुळें आपल्यापुरती जमीन संपादन करून स्वतःच्या मालकीचा आटपशीर मळा करून राहावें अशींच प्रवृत्ति या भागांतील लोकांची झालेली होती. त्याचमुळें सर्व वसाहत-वाल्यांमध्यें एक प्रकारची समतेची भावना निर्माण झाली होती.

अशा तऱ्हेनें या वसाहतींमध्यें दोन प्रकारच्या आर्थिक व्यवस्था निर्माण झाल्या होत्या असें आपणांस आढळून येतें. उत्तरेकडील लहान लहान मळे आणि एक प्रकारची समतेची भावना यांच्या पायावर आधारलेली एक आणि दक्षिणेकडील प्रचंड मोठे मळे आणि लागवडी व गुलामगिरी यांवर आधारलेली दुसरी. रेड इंडियन लोकांना या दोन्हींमध्येंही कोठेंच स्थान नव्हतें. उलट, त्या खंडांतील मूळचे रहिवासी असे जे लोक त्यांना हे सगळेच वसाहतवाले हळूहळू पश्चिमेकडे रेटीत चालले होते. रेड इंडियन लोकांमध्यें आपसांत पुष्कळ भांडणें आणि भेद होते. त्यामुळें वसाहतवाल्यांचें हें कार्य आणखीच सोपें झालें.

या वसाहतींमध्यें, विशेषतः दक्षिणेकडील संस्थानांमध्यें, इंग्लंडचा राजा आणि इंग्लंडमधील मोठमोठे जमीनदार यांचे फार मोठे हितसंबंध होते. या वसाहतींतून जितका फायदा पिळून काढतां येईल तितका काढावा, असा त्यांचा प्रयत्न चालू असे. सात वर्षांच्या युद्धानंतर तर या अमेरिकेंतील वसाहतींतून पैसा मिळविण्यासाठीं खास मोठे प्रयत्न करण्यांत आले. इंग्लंडमधील पार्लमेंटांत हुकमत बहुतांशीं होती जमीन-

दारांचीच; त्यामुळें वसाहतींना पिळून काढण्याच्या धोरणाला पार्लमेंटचें मत अनुकूलच होतें. म्हणून वसाहतींतून पैसा उत्पन्न करण्याच्या राजाच्या धोरणाला पार्लमेंटचाही पाठिंबाच मिळाला. म्हणून मग तिकडच्या व्यापारावर कर लादण्यांत आले आणि बंधनें घालण्यांत आलीं. आठवतच असेल तुला, कीं इकडे हिंदुस्थानांतसुद्धां बंगाल प्रांतांत ब्रिटिशांनीं प्रचंड प्रमाणांत लूट आणि पिळणूक सुरू केलेली होती आणि हिंदी लोकांच्या व्यापारामध्यें हरएक प्रकारच्या अडचणी निर्माण करण्यांत येत होत्या.

वसाहतवाल्यांचा या नव्या करांना आणि बंधनांना विरोध होता. त्यांनीं त्याबद्दल हरकत उपस्थित केली; परंतु सात वर्षांचें युद्ध नुकतेंच जिंकलेलें असल्यामुळें इंग्लंडच्या राज्यकर्त्यांना आपल्या सामर्थ्याबद्दल जरा गर्व वाटूं लागला होता. त्याना कुणाची विशेष फिकीर वाटेनाशी झाली होती; त्यामुळें त्यांनीं वसाहतवाल्यांच्या या हरकतीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; पण याच सात वर्षांच्या लढाईपासून वसाहतवाल्यांनाही कांहीं कांहीं नवीन धडे मिळालेले होते. या युद्धांत निरनिराळ्या वसाहतींतील लोक एकत्र येऊन त्यांचा एकमेकांशीं चांगला परिचय झाला होता. इंग्लंडच्या पगारी सैन्याच्या बरोबरीनें हेही लोक फ्रेंच सैन्याविरुद्ध लढले होते. त्यामुळें युद्धाचा लढाऊ घातक खेळ हाही आता त्यांना अनोळखी उरला नव्हता. असें असल्यामुळें आपल्यावर जो अन्याय होतो, जुलूम होतो असें या वसाहतवाल्यांना वाटत होतें, तो अन्याय किंवा जुलूम सहन करण्याच्या मनाच्या अवस्थेंत आतां इकडे हे वसाहतवालेही राहिलेले नव्हते.

अशा स्थितींत ब्रिटिश सरकारनें ईस्ट इंडिया कंपनीचा चहा या संस्थानांवर लादण्याचा प्रयत्न जेव्हां केला, तेव्हां प्रकरण तंट्यावर आलें. इंग्लंडमधल्या पुष्कळशा श्रीमंत लोकांचें भांडवल ईस्ट इंडिया कंपनीमध्यें गुंतलेलें होतें. त्यामुळें त्या कंपनीचें बरें चालावें असें स्वाभाविकच त्यांना वाटत होतें. इंग्लंडमधील राज्यव्यवस्थेवरही याच लोकांचें वर्चस्व होतें; एवढेंच नव्हे, प्रत्यक्ष राज्यकारभारावर असणाऱ्या कितीएक मंडळींचेही हितसंबंध या ईस्ट इंडिया कंपनीच्या पूर्वेकडील व्यापाराशीं निगडित झालेले होते. तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीला आपला चहा अमेरिकेंत नेऊन तेथें सवलतीनें विकण्याची सवड मिळावी आणि अशा रीतीनें कंपनीचा व्यवहार वाढवावा अशी खटपट ब्रिटिश सरकारमार्फत सुरू झाली; परंतु यामुळें स्थानिक चहाच्या व्यापाराला धोका पोंचूं लागल्यामुळें तेथें याबद्दल फारच असंतोष निर्माण झाला. म्हणून या परदेशी चहावर बहिष्कार घालावयाचा असें वसाहतवाल्यांनीं ठरविलें. इ. स. १७७३ च्या डिसेंबर महिन्यांत ईस्ट इंडिया कंपनीचा चहा बोस्टन बंदरांत उतरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला; परंतु त्याला वसाहतवाल्यांनीं प्रत्यक्ष विरोध केला. कितीएक वसाहतवाल्यांनीं रेड इंडियन लोकांसारखा पोशाख करून चहाच्या मालबोटींवर प्रवेश करून घेतला आणि त्यांवरील चहा समुद्रांत फेंकून दिला! ही गोष्ट अगदीं दिवसाढवळ्या, जाहीर रीतीनें, या कामाबद्दल सहानुभूति असलेल्या अशा

वसाहतवाल्यांच्या मोठ्या जमावासमक्ष करण्यांत आली. अशा रीतीनें हें एक प्रकारें युद्धाला आव्हानच होतें आणि यांतून या बंडखोर वसाहती व इंग्लंड यांच्यामध्यें युद्ध निर्माण झालें.

इतिहासाची अगदीं जशीच्या तशी पुनरावृत्ति कधींच होत नसते ; परंतु केव्हा केव्हां इतिहासामधील निरनिराळे प्रसंग एकमेकांशीं इतके पुष्कळ प्रमाणांत सारखे आढळतात, कीं मोठा चमत्कार वाटतो. बोस्टन बंदरांत इ. स. १७७३ मध्यें हा जो चहा बोटींवरून समुद्रांत फेंकून देण्याचा प्रसंग घडला, त्याचा इतिहासांत फार मोठा गाजावाजा होऊन राहिलेला आहे. त्याला "बोस्टनची चहापार्टी" असें नांव देण्यांत आलेलें आहे. अडीच वर्षांपूर्वी जेव्हां बापूंनीं आपला मिठाचा सत्याग्रह सुरू केला आणि तें महान् 'दांडीचें कूच' करून मिठागरावर हल्ले केले, त्या वेळीं अमेरिकेंतील पुष्कळशा लोकांना आपल्या "बोस्टनच्या चहापार्टी"ची आठवण होऊन तिची त्यांनीं या मीठपार्टीशीं तुलना केली ; तरी पण या दोहोंमध्यें फार मोठें अंतर आहे हें तर खरेंच.

यानंतर दीड वर्षानें, इ. स. १७७५ मध्यें, इंग्लंड आणि इंग्लंडच्या अमेरिकेंतील वसाहती यांच्यामध्यें युद्ध जुंपलें. या वसाहतींचा लढण्याचा खरोखर उद्देश कोणता होता ? स्वातंत्र्य मिळवावें, इंग्लंडपासून फुटून निघावें असा त्यांचा मुळींच विचार नव्हता. दोघांचें युद्ध सुरू झालें, पुष्कळसा रक्तपातही झाला ; तरीसुद्धां अजूनही वसाहतवाल्यांचे पुढारी इंग्लंडच्या तिसऱ्या जॉर्जला उद्देशून "अत्यंत कृपावंत महाराज" असाच शब्दप्रयोग करीत होते आणि स्वतःला त्याची एकनिष्ठ प्रजा समजत होते, ही गोष्ट मोठी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कारण हा प्रकार वारंवार घडून येतांना दिसतो. उदाहरणार्थ, हॉलंडमध्यें स्पेनच्या दुसऱ्या फिलिपला महाराजा म्हणत होते आणि तरीही तेथें त्याच्या सैन्याशीं लोक अत्यंत कडवटपणानें लढतच होते. अशा रीतीनें पुष्कळ वर्षें लढत राहिल्यानंतरच मग हॉलंडला आपलें स्वातंत्र्य जाहीर करणें भाग पडलें. हिंदुस्थानांतही पुष्कळ वर्षेंपर्यंत हें करावें कां तें करावें, काय करावें, अशा संशयग्रस्त आणि काचकुचीच्या अवस्थेंत काढल्यानंतर, कांहीं काळपर्यंत वसाहतींचें स्वराज्य किंवा यासारख्याच आणखी कांहीं कल्पनांच्या नादात राहिल्यानंतर, मगच आपल्या राष्ट्रीय सभेनें १ जानेवारी १९३० रोजीं स्वातंत्र्याच्या बाजूचा आपला निर्णय जाहीर केला. तरीसुद्धां अजून हिंदुस्थानांत असे लोक आहेतच, कीं ज्यांना स्वातंत्र्याच्या कल्पनेचें भय वाटतें आणि अद्याप वसाहतीच्या स्वराज्याच्याच गोष्टी असे लोक करीत असतात ; परंतु अशा प्रकारच्या या झगड्याचा शेवट स्वातंत्र्यांतच व्हावयाचा हीच इतिहासाची आपल्याला शिकवण आहे. हॉलंड आणि अमेरिका यांच्या उदाहरणांवरूनही हीच गोष्ट स्पष्ट दिसून येणारी आहे.

इ. स. १७७४ सालीं म्हणजे इंग्लंड आणि वसाहती यांच्यामधील हें युद्ध सुरू होण्यापूर्वी थोडा काळ, वॉशिंग्टन स्वतः असें म्हणाला होता, कीं उत्तर अमेरिकेंतील

कोणाही विचारी माणसाची इच्छा अमेरिकेनें स्वतंत्र व्हावें अशी नव्हती आणि हाच वॉशिंग्टन लौकरच अमेरिकन प्रजासत्ताक राज्याचा पहिला अध्यक्ष व्हावयाचा होता. लढाई सुरू झाल्यानंतर १७७५ मध्यें वसाहतींतील काँग्रेसच्या सेहेचाळीस सभासदांनीं तिसऱ्या जॉर्ज राजाकडे त्याचे राजनिष्ठ प्रजाजन या नात्यानें एक अर्ज सादर केला होता आणि शांतता प्रस्थापित करण्याची व हा रक्तपात बंद करण्याची याचना केली होती. इंग्लंड आणि त्याचीं हीं अमेरिकन अपत्यें ( प्रजा ) यांच्यामध्यें गोडी आणि सद्भाव पुन्हां प्रस्थापित व्हावा, अशी त्यांच्या मनांत फार तळमळ होती. त्यांची मागणी अगदीं मोठ्यांत मोठी काय होती, तर आपल्याला कांहींएक प्रकारचे वसाहतीचा कारभार चालविण्याचे अधिकार मिळावे आणि वॉशिंग्टनच्या शब्दांत त्यांनीं जाहीर केलें होतें, कीं आमच्यापैकीं कोणाही विचारी मनुष्याला स्वातंत्र्य नको आहे. या अर्जाला "Olive Branch Petition"–"तडजोडीचा अर्ज", "समजुतीचा अर्ज" असें नांव दिलेलें आहे इतिहासामध्यें.

परंतु दोनच वर्षांत या अर्जावर सही करणाऱ्या सेहेचाळीस गृहस्थांपैकीं पंचवीस जणांनीं दुसऱ्याच एका कागदावर, अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यावर, सह्या केल्या.

तेव्हां मुद्दा हा, कीं वसाहतींनीं जें युद्ध सुरू केलें तें कांहीं स्वातंत्र्यासाठीं केलें नव्हतें. त्यांची तक्रार व्यापारावर लादलेल्या करांविरुद्ध आणि निर्बंधांविरुद्ध होती. आपली संमति असल्याशिवाय ब्रिटिश पार्लमेंटला आपल्यावर कर बसविण्याचा हक्क नसावा व नाहीं असें त्यांचें म्हणणें होतें. "मतदानाचा हक्क नाहीं, तर करही नाहीं" अशी त्यांची सुप्रसिद्ध घोषणा होती. कारण ब्रिटिश पार्लमेंटमध्यें प्रतिनिधी पाठविण्याला त्यांना अधिकार नव्हता.

वसाहतवाल्यांजवळ चांगलें सैन्य कांहीं नव्हतें; परंतु त्यांचा प्रदेश फार प्रचंड होता; तेव्हां त्याचा त्यांना आधार असून त्यामध्यें जरूर पडेल तशी माघार घेत राहण्यालाही त्यांना अवसर होता. हळूहळू त्यांनीं सैन्यही निर्माण केलें आणि अखेरीस वॉशिंग्टन हा त्या सैन्याचा सरसेनापति झाला. या वसाहतवाल्यांना थोडेंफार यशही आलें आणि आपला जुना शत्रु इंग्लंड देश याच्यावर प्रहार करायला ही बरी संधि आहे असें वाटून फ्रान्स देश या वसाहतींना मिळाला. स्पेननेंही इंग्लंडच्या विरुद्ध युद्ध जाहीर केलें. अशा रीतीनें इंग्लंडचा पक्ष कमजोर झाला. तरीपण हें युद्ध असेंच पुष्कळ वर्षेंपर्यंत रेंगाळत राहिलें. इ. स. १७७६ मध्यें (जुलै ४ रोजीं) वसाहतींचा सुप्रसिद्ध "स्वातंत्र्याचा जाहीरनामा" बाहेर पडला. इ. स. १७८२ मध्यें युद्ध संपलें आणि इ. स. १७८३ मध्यें युद्धांतील निरनिराळ्या पक्षीयांच्या पॅरिसच्या तहावर सह्या झाल्या.

अशा रीतीनें या तेरा अमेरिकन वसाहती स्वतंत्र होऊन त्यांचें एक प्रजासत्ताक

राज्य बनलें. यालाच पुढें युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका म्हणजे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें हें नांव प्राप्त झालें. सुरुवाती-सुरुवातीला प्रत्येक संस्थानाच्या मनांत बाकीच्या संस्थानांबद्दल हेवादावा असे आणि प्रत्येक संस्थान कमीअधिक प्रमाणांत स्वतःला स्वतंत्र समजत असे. पुढें त्या सर्वांच्या ठिकाणीं एकराष्ट्रीयता अगदीं हळूहळू वाढत गेली. आधींच हा फार मोठा देश होता आणि पश्चिमेकडे त्याची हद्द एकसारखी वाढतच चाललेली होती. आधुनिक जगांतलें हें खरें पहिलें मोठें प्रजासत्ताक राज्य होतें. या काळचें दुसरें प्रजासत्ताक राज्य म्हणजे काय तें छोट्या स्वित्झर्लंडचें. हॉलंडमध्यें दिसायला राज्य प्रजासत्ताक होतें खरें; परंतु तेथें सत्ता खरी वरिष्ठ वर्गाच्याच हातांत होती. इंग्लंडमध्यें तर प्रत्यक्ष राजसत्ता होतीच; परंतु तेथलें तें पार्लमेंटसुद्धां खरोखर मूठभर श्रीमंत जमीनमालकवर्गाच्या हातामध्यें होतें. म्हणून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा हा प्रजासत्ताक देश जगांत एक नवीनच प्रकारचा देश होता. यूरप आणि आशिया खंडांतील इतर देशांना जसा एक विशिष्ट भूतकाल होता, तसा या देशाला नव्हता. त्यामध्यें प्राचीन जमीनदारी-सरंजामदारी पद्धतीचे अवशेष नव्हते; अर्थातच याला दक्षिणेकडील संस्थानांमधील लागवडीची पद्धति व गुलामगिरी यांचा अपवाद धरला पाहिजे. त्याचप्रमाणें या देशांत आनुवंशिक सरदारकीचें अस्तित्व नव्हतें. अशा रीतीनें धनिकवर्गाच्या अथवा मध्यमवर्गाच्या वाढीला येथें फारसे अडथळे नव्हते. त्यामुळें या वर्गांची तेथें फारच झपाट्यानें वाढ झाली. स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं या राज्याची लोकसंख्या ४० लक्षांहून कमीच होती. दोन वर्षांपूर्वीं, १९३० मध्यें हीच लोकसंख्या १२ कोटी, ३० लक्ष इतकी मोठी भरली.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा पहिला अध्यक्ष जॉर्ज वॉशिंग्टन हा झाला. हा व्हर्जीनिया संस्थानांतील एक मोठा जमीनदार होता. या प्रजासत्ताक राज्याच्या संस्थापकांपैकीं आणखी दुसरे श्रेष्ठ पुरुष म्हटले म्हणजे टॉमस पेन्, बेंजामिन् फ्रँकलिन्, पॅट्रिक हेन्री, टॉमन् जेफर्सन्, अॅडम्स् आणि जेम्स् मॅडिसन् हे होत. यांपैकीं बेंजामिन् फ्रँकलिन् हा विशेष विद्वान् आणि गुणवान् मनुष्य असून तो मोठा शास्त्रसंशोधक होता. मुलांचे खेळण्याचे पतंग उडवून त्यांच्या साहाय्यानें त्यानें असें सिद्ध केलें, कीं ढगांत चमकणारा प्रकाश म्हणजे विद्युत्प्रकाशच होय.

स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यांत असें जाहीर केलेलें आहे, कीं "जन्मतः सर्व मनुष्यमात्र परस्पर-समान आहे." या विधानाचें तसें खोल पृथक्करण केलें, तर तें तितकेंसें बरोबर नाहीं असें आढळून येईल. कारण कांहीं माणसें अशक्त असतात, तर कांहीं सशक्त असतात; कांहीं माणसें इतरांपेक्षां अधिक बुद्धिमान् आणि अधिक कार्यक्षम असतात; परंतु हें विधान करण्यामधली जी कल्पना आहे ती अर्थात् स्पष्टच आहे आणि ती प्रशंसनीयही आहे. या वसाहतवाल्यांना यूरपमध्यें सरंजामदारशाहीनें जी विषमता निर्माण झालेली होती ती नाहींशी करावयाची होती. असाही संभव आहे, कीं हा स्वातंत्र्याचा जाहीरनामा तयार करणारांपैकीं पुष्कळांच्या मनावर फ्रान्स-

मधील अठराव्या शतकांतील व्हॉल्टेअर व रूसो यांच्या आणि त्यांच्यापुढच्या तत्त्वज्ञान्यांच्या व विचारवंतांच्या विचारसरणीचा परिणाम झालेला असला पाहिजे.

"जन्मतः मनुष्यमात्र परस्पर-समान आहे" ही घोषणा, आणि तरी या लोकांच्या समाजव्यवस्थेंत नीग्रो गुलामाला जागा होतीच; त्या बिचाऱ्याला जवळजवळ कांहींच अधिकार नव्हते! त्या बिचाऱ्याचा कांहीं विचार? नव्या होणाऱ्या घटनेंत हा गुलाम कसा काय बसूं शकला? खरें म्हणजे नाहींच तो बसूं शकला आणि अजूनही त्याला त्या घटनेंत नीटसें स्थान मिळालेलें नाहीं. स्वातंत्र्ययुद्धानंतर पुष्कळ वर्षांनीं उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील संस्थानांमध्यें या बाबतींत एक मोठी तीव्र यादवी झाली आणि तिच्या अखेरीस गुलामगिरी नष्ट करून टाकण्यांत आली. तरी पण नीग्रोंचा प्रश्न अजूनही अमेरिकेमध्यें सुटलेला नाहींच.

## १००

## बॅस्टीलचा पाडाव

*७ ऑक्टोबर, १९३२*

आतांपर्यंत अठराव्या शतकांतील दोन क्रांत्यांबद्दल आपण अगदीं थोडक्यामध्यें विचार केला. या पत्रांत मी तुला या शतकांतील तिसऱ्या क्रांतीविषयीं, फ्रेंच राज्यक्रांतीविषयीं, थोडेंसें सांगणार आहे. या तिन्ही क्रान्त्यांपैकीं फ्रेंच राज्यक्रांतीचा गाजावाजा जगामध्यें फारच झाला. इंग्लंडमध्यें सुरू झालेली औद्योगिक क्रांति ही या तिन्हींमध्यें खरोखरच किती तरी प्रचंड प्रमाणात जास्त महत्त्वाची; परंतु तिचा प्रवेश अगदीं हळूहळू झाला; इतका कीं अशी कांहीं क्रांति होते आहे, हें सुद्धां प्रथम कोणाच्या लक्षामध्यें आलें नाहीं.

फ्रेंच राज्यक्रांति मात्र एखादी कडकडून वीज पडावी त्याप्रमाणें स्फोट होऊन अवतीर्ण झाली आणि सारें यूरप खंड त्यामुळें भयचकित होऊन गेलें. या सुमारास यूरप खंडामध्यें अजूनही पुष्कळशा राजे-महाराजांचाच अंमल चालू होता. प्राचीन पवित्र रोमन साम्राज्याचें प्रभुत्व खरोखर आतां नष्ट झालेलें होतें; परंतु कागदोपत्रीं अजून तें अस्तित्वांत असून त्याची कृष्ण छाया यूरप खंडाला अजूनही केव्हां केव्हां भेडसावीत असेच.

अशा या राजे-महाराजांच्या आणि दरबार व राजप्रासाद यांच्या जगामध्यें क्रांतीचें हें चमत्कारिक आणि भयंकर प्रकरण—भूत—सामान्य जनतेच्या खालच्या थरांतून आणि त्यांच्या ठिकाणीं खोलवर रुजलेल्या आकांक्षा आणि तीव्र भावनांतून उभें राहिलें; ज्यांच्यावर कालांतरानें शेवाळ माजून घाण झालेली होती अशा

बुरसलेल्या चालीरीती किंवा हक्क आणि वतनें यांना या क्रांतीनें अगदींच बाजूला सारलें. एका राजाला सिंहासनावरून उचलून फेंकून दिलें आणि दुसऱ्या कितीक राजांपुढें हेंच संकट उभें केलें.

यूरप खंडांतील राजेरजवाड्यांनीं आणि वतनदार लोकांनीं आजपर्यंत ज्या सामान्य जनतेकडे अजीबात दुर्लक्ष केलें होतें, नव्हे, जिला त्यांनीं पायांखालीं तुडविलें होतें त्याच सामान्य जनतेचें हें बंड उभें राहिलेलें पाहून या लोकांचे पाय भीतीनें लटलट कांपूं लागले असले, तर त्यांत आश्चर्य तें काय?

एखादा ज्वालामुखी स्फोट होऊन बाहेर पडावा तशा तऱ्हेनें फ्रेंच राज्यक्रांतीचा स्फोट झाला; परंतु राज्यक्रांत्या काय किंवा ज्वालामुखी काय कारणाशिवाय किंवा आधीं पुष्कळ दिवसपर्यंत त्यांची तयारी होत आलेली असल्याशिवाय असे एकदम अवचितपणें उसळून बाहेर येत नसतात. आपल्या डोळयांपुढें झालेला स्फोट मात्र अगदींच अनपेक्षितपणें झालेला असतो आणि म्हणून आपल्याला अत्यंत आश्चर्य वाटतें; परंतु पृथ्वीच्या पृष्ठभागाच्या खालीं पुष्कळ परस्परविरोधी शक्तींचा झगडा किती तरी काळपर्यंत त्यापूर्वी चालू असतो आणि निरनिराळीं स्फोटक द्रव्यें आगीनें फुटायला येत असतात. अखेरीस पृथ्वीच्या वरच्या आवरणाला आंतला हा त्यांचा दाब आवरून धरणें अशक्य होतें. मग आंतल्या त्या आगीचा स्फोट होऊन ती बाहेर येते आणि तिच्यांतून वर आकाशाशीं जाऊन भिडण्यासारख्या ज्वाळा बाहेर पडतात व लालभडक तप्त रस पर्वताच्या पृष्ठभागावरून खालीं उसळत वाहत येतो. राज्य-क्रांतीच्या वेळीं ज्या अनेक शक्तींचा स्फोट झालेला दिसून येतो, त्याही अगदीं अशाच रीतीनें समाजाच्या वरच्या थराखालीं आंतल्या बाजूला पुष्कळ काळपर्यंत धुमसत असतात.

पाण्याला तुम्हीं उष्णता लावली कीं त्याला उकळी फुटते; परंतु त्यापूर्वी पुष्कळ वेळ अधिकाधिक गरम होत जाऊन त्याच्यामध्यें बुडबुडे उत्पन्न झाले म्हणजे मग आपण म्हणूं लागतों कीं आतां पाण्याला उकळी फुटली.

क्रांत्या होतात त्या आर्थिक परिस्थिति आणि जीवनविषयक कल्पना यांच्यामुळें होत असतात. मूर्ख सत्ताधारी जे लोक असतात, ज्यांना आपल्या स्वतःच्या डोक्यांतील कल्पनांवांचून जगांतलें दुसरें कांहीं पाहण्याची अक्कलच नसते, त्यांना वाटतें कीं क्रांत्या होतात त्या चळवळ्या लोकांमुळें होतात.

हे चळवळे लोक म्हणजे तरी कोण असतात?

तर प्रचलित परिस्थितीबद्दल ज्यांच्या मनांत असंतोष निर्माण झालेला असतो, ज्यांना ती परिस्थिति बदलून घेण्याची इच्छा असते आणि त्यासाठीं जे खटपट करीत असतात असे लोक.

प्रत्यक्ष क्रांतीच्या वेळीं समाजामध्यें अशा चळवळे लोकांची मुळींच उणीव नसते; समाजांत जें असमाधान, जी असंतोषाची खळबळ असते त्यामधूनच खरोखर

हे लोक स्वतः निर्माण होत असतात ; परंतु हजारों–लाखों लोक जेव्हां कांहीं एखादें कार्य करण्यासाठीं म्हणून पुढें येतात, ते कांहीं कोणी एखादा चळवळ्या त्यांना तसें करावयाला सांगतो म्हणून काहीं नव्हे. जगामध्यें बहुतेक लोकांना तर सुरक्षित आणि सुखासमाधानाच्या संसाराची आवड असते. आपल्याजवळ जें कांहीं आहे तें गमावण्याचा धोका पत्करावयाला सहसा कोणी तयार नसतो ; परंतु आर्थिक परिस्थितीच जेव्हां अशी चमत्कारिक होते कीं रोजच्या रोज लोकांचे हाल वाढतच जातात आणि संसाराचें ओझें खरोखर अगदीं असह्य होऊन जातें अशा वेळीं मग दुर्बल लोकसुद्धां संकटांत उडी घेण्याला, वाटेल तो धोका पत्करावयाला, तयार होतात. असें झालें म्हणजे मगच चळवळे लोकांचे शब्द त्यांच्या कानांत घुसणें शक्य होतें ; आपल्या दैन्य-दुःखांतून बाहेर पडण्याचा मार्ग हे लोक आपल्याला दाखवीत आहेत, असें मग त्यांना वाटूं लागतें.

माझ्या पुष्कळशा पत्रांत मी तुला सामान्य लोकांच्या हालअपेष्टा आणि शेतकऱ्यांचीं बंडें यांच्याबद्दल सांगत आलों आहें. आशिया आणि यूरप खंडांत अशीं हीं शेतकऱ्यांचीं बंडें वारंवार होत आलीं आहेत. त्यांचा परिणाम म्हणजे पुष्कळसा रक्तपात व्हायचा आणि मग जुलूम व्हायचा. अगदीं निर्दय जुलूम ! असल्या हालअपेष्टांनीं चिडून जाऊन शेतकरी लोक बंड करण्याला प्रवृत्त होत खरे ; परंतु आपल्याला घडवून काय आणावयाचें आहे याची नीटशी कल्पना त्यांना मुळीच नसे. अशा तऱ्हेनें त्यांचे विचार अनिश्चित आणि अस्फुट असल्यामुळें, त्यांच्यापाशीं एखादा सुसूत्र कार्यक्रम नसल्यामुळें, बहुतेक वेळीं त्यांच्या बंडाच्या प्रयत्नांना अपयश येई. फ्रेंच राज्यक्रांती-मध्यें मात्र एक नवीनच गोष्ट आढळून आली. निदान इतक्या मोठ्या प्रमाणांत यापूर्वी केव्हां ती आढळून आलेली नव्हती ; ती म्हणजे आर्थिक कारणामुळें स्वाभाविक उत्पन्न होणारी क्रांतीची ओढ आणि जीवनविषयक सुसंघटित कल्पना यांचा संगम ही होय. असा संगम ज्या ठिकाणीं घडून येतो त्याच ठिकाणीं खरी क्रांति घडून येते ; आणि अशी क्रांति जीवन आणि समाज यांचे एकूण धागे–राजकीय, सामाजिक आर्थिक आणि धार्मिक–सर्व प्रांत व्यापून टाकते, त्यांत फेरबदल घडवून आणते.

फ्रेंच राजांचे विलासोपभोग, नादानपणा आणि दुराचारीपणा यांबद्दल आणि याच वेळीं दुसरीकडे सामान्य जनतेला भरडून काढणारी जी आर्थिक दुरवस्था तिच्या-बद्दल मी या पूर्वींच तुला सांगत आलों आहें. फ्रेंच लोकांच्या मनांत विचारांची, व्हाल्टेअर आणि रूसो आणि मॉंटेस्क्यू यांच्या आणि इतरांच्याही पुष्कळांच्या नवकल्पनांची खळबळ कशी माजलेली होती, हेंही मीं तुला सांगितलेलें आहे. अशा रीतीनें एका बाजूला ही आर्थिक दैन्यावस्था आणि दुसऱ्या बाजूला हा नवीन तत्त्वविचार या दोहोंचें कार्य समाजांत एकाच वेळीं जोडीजोडीनेंच चालू होतें आणि त्यांचा एक-मेकांचा एकमेकांवर अर्थातच परिणाम होत होता. कोणत्याही समाजामध्यें नवीन तत्त्व-प्रणाली निर्माण होऊन पक्की होण्याला फार दीर्घ कालावधि लागत असतो. कारण हे

नवे विचार लोकांपर्यंत हळूहळू पाझरत खालीं जावे लागत असतात; शिवाय लोक आपले पूर्वग्रह आणि जुने विचार चटकन् टाकून देण्याला तितकेसे तयार नसतात. त्यांतच पुष्कळदां असें होतें, कीं एखादी नवीन तत्त्वप्रणाली थोडीशी नीटपणें प्रस्थापित व्हायला यावी, लोक आपल्या जुन्या कल्पना सोडून या नव्या कल्पनांचें गाडें मान्य करावयाला तयार व्हावे, तोंच काळ इतका बदललेला असतो, कीं ही तत्त्वप्रणालीच थोडीशी जुनी, मागासलेली आणि निरुपयोगी झाल्यासारखी होते. या दृष्टीनें अठराव्या शतकांतील या फ्रेंच तत्त्वज्ञांच्याच कल्पनांची गम्मत थोडीशी पाहण्यासारखी आहे. त्यांच्या सर्व कल्पना यूरपमधील औद्योगिक क्रांतीच्या पूर्वीच्या काळच्या परिस्थितीवर आधारलेल्या होत्या.

परंतु ज्या वेळीं या कल्पना इकडे फ्रान्समध्यें ते मांडीत होते, जवळजवळ त्याच वेळीं तिकडे इंग्लंडमध्यें औद्योगिक क्रांति घडून येत होती आणि तिच्यामुळें उद्योग-धंद्यांत आणि समाजजीवनांत इतके मोठे फरक घडून येत होते, कीं त्यामुळें फ्रेंच तत्त्वज्ञान्यांनीं बसविलेल्या पुष्कळशा नव्या सिद्धान्तांची सगळी बैठकच उखडून पडत होती.

हें खरें आहे, कीं औद्योगिक क्रांतीचें हें सगळें स्वरूप पुढच्या काळामध्यें वाढलें. त्यामुळें आपल्या पुढच्या काळांत हें असें काय काय घडून येणार आहे याची आगाऊ कल्पना करणें स्वाभाविकच फ्रेंच तत्त्वज्ञांना शक्य नव्हतें; परंतु ज्या त्यांच्या कल्पनां-वर फ्रेंच राज्यक्रांतीचा कार्यक्रम बहुतांशीं आधारलेला होता त्या कल्पना मोठ्या कारखानदारीच्या उदयानंतर कांहीं प्रमाणांत तरी जुनाट आणि निरुपयोगी ठरून गेल्या हें आपल्याला लक्षांत घ्यावयाचें आहे.

परंतु तें कसेंही असलें, तरी फ्रेंचांच्या राज्यक्रांतीवर फ्रेंच तत्त्वज्ञाच्या या कल्पनाचा आणि सिद्धान्तांचा फारच मोठा जोराचा परिणाम झालेला होता हें निःसंशय आहे. यापूर्वी सामान्य जनतेनें उठाव करून दंगे आणि बंडें केल्याचे पुष्कळ प्रकार झालेले होते; परंतु या वेळचें हें या प्रकारचें उदाहरण जरा विशेष तऱ्हेचें होतें; या वेळीं जागृत झालेल्या समाजानें उठाव केलेला होता—अथवा हा उठाव करणाऱ्या समाजाला जागृत अशा पुढाऱ्यांकडून मार्गदर्शन होत होतें असें म्हणा पाहिजे तर—या कारणासाठीं फ्रान्समधील राज्यक्रांतीला हें एवढें महत्त्व चढलेलें आहे.

आपला आजा चौदावा लुई याच्यामागून पंधरावा लुई हा इ. स. १७१५ मध्यें फ्रान्सच्या गादीवर आला आणि त्यानें एकुणसाठ वर्षें राज्य केलें हें मागें मीं तुला सांगितलें आहे. त्यानें एकदां म्हटलें होतें म्हणतात, कीं "माझ्यामागें सगळा प्रळय का होईना" (अप मुवे पीछे डुब गई दुनिया) आणि असें होणार हें गृहीत धरूनच त्याचें वागणें चाललेलें होतें. अगदीं हंसत-खेळत चैन करीत त्यानें आपला देश खुशाल संकटाच्या खाईंत ढकलला.

तिकडे ब्रिटिशांनीं राज्यक्रांति केली आणि आपल्या एका राजाचें डोकें

उडविलें. या गोष्टीपासून त्यानें कांहींही बोध घेतला नाहीं. इ. स. १७७४ मध्यें त्याच्यामागून त्याचा नातू सोळावा लुई हा फ्रान्सच्या गादीवर आला. हा तर अगदींच मूर्ख आणि बुद्धिहीन मनुष्य होता. त्याची बायको मेरी अँटोइनेट ही हॅप्सबर्ग घराण्यांतील ऑस्ट्रियाच्या बादशहाची बहीण होती. तीही मूर्खच होती; परंतु तिच्यामध्यें एक प्रकारचा हटवादीपणा आणि चिवटपणा होता आणि सोळाव्या लुईला तिनें सर्वस्वीं आपल्या मुठींत ठेवलेलें होतें. लुईपेक्षांसुद्धां तिच्या डोक्यामध्यें राजे लोकांच्या दैवी अधिकाराचें वेड अधिक भरलेलें होतें; सामान्य जनतेचा तिला अत्यंत तिटकारा असे. या दोघां नवरा-बायकोंनीं मिळून हरएक प्रकारें राजशाहीची कल्पना लोकांना अगदीं मुळींच डोळ्यांसमोर नकोशी होईल असें होण्याजोगी कोणतीही गोष्ट करण्याचें बाकी ठेवलें नाहीं. क्रांतीची सुरुवात झाल्यानंतरसुद्धां राजशाहीचें काय करावें याबद्दल फ्रेंच लोकांचा कांहीं पक्का निश्चय झालेला नव्हता; परंतु सोळावा लुई आणि मेरी अँटोइनेट यांच्या खटपटींमुळें आणि मूर्खपणामुळें फ्रान्समध्यें प्रजासत्ताक राज्य स्थापन होणें अगदीं अपरिहार्य झालें. बाकी त्यांच्याहून शहाणीं माणसें त्याच्या जागीं असतीं असें धरलें, तरी त्यांना सुद्धां त्या बाबतींत कांहीं करतां आलें असतें कीं नाहीं कोण जाणे! रशियामध्यें १९१७ सालीं क्रांति झाली त्याच्या आधीं रशियाचा झार आणि झारिना यांचेंही वर्तन या फ्रेंच राजा-राणीच्याइतकेंच अचंबा वाटण्याइतकें मूर्खपणाचें झालें. प्रसंगांतील आणीबाणीचा क्षण जसजसा अधिकाधिक जवळ येत गेला, तसतसे हे लोक अधिकाधिकच मूर्खपणा कसा करीत गेले आणि त्यामुळें आपल्याच हातानें आपला नाश करून घेण्याला त्यांनीं मदतच कशी केली हें पाहिलें म्हणजे मोठा चमत्कार वाटतो! लॅटिनमध्यें जी एक म्हण आहे, कीं "परमेश्वराच्या मनांतून ज्यांचा नाश करावयाचा, त्यांना तो अगोदर वेडें करतो." ('आधीं जाते बुद्धि, मग जातें मांडवल.' 'विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः।' 'बुद्धिनाशात् प्रणश्यति।') ती या लोकांना कशी बरोबर लागू पडते! संस्कृतमध्यें अगदीं याच अर्थाची "विनाशकाले विपरीतबुद्धिः" अशी म्हण आहे.

राजशाहीच्या किंवा सुलतानशाहीच्या आधारस्तंभांमध्यें लष्करी वैभव—लष्करी विजय—हा एक नेहमींचा आधारस्तंभ होऊन राहत आलेला आहे. स्वतःच्या देशांत कांहीं असंतोष किंवा गडबड माजलीसें दिसलें, कीं लोकांचें लक्ष दुसरीकडे वळविण्याच्या उद्देशानें बाहेरच्या देशांत कांहीं तरी लष्करी आक्रमण करण्याचा मोह सरकारी गटांना व्हायचा हें जणुं ठरलेलें. फ्रान्सनेंही अशीं लष्करी आक्रमणें करण्याचे प्रयत्न केलेले होते; पण ते सर्वच फ्रान्सच्या अंगाशीं आलेले होते. सात वर्षांच्या युद्धांत तर फ्रान्सचा प्रत्यक्षच पराभव झाला होता. तेथील राजाच्या अमलाला हा एक मोठाच धक्का होता. त्यामुळें दिवाळखोरीची अवस्था एकसारखी वाढूं लागलेली होती. पुढें फ्रान्सनें अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धामध्यें भाग घेतला. त्यामुळें अधिकच खर्च वाढला. हा एवढा सगळा पैसा आणावयाचा कोठून? सरदार लोक आणि पाद्री

हे पडले वतनदार; सगळ्या करांची जवळजवळ त्यांना माफी. बरें, आपल्या या खास सवलती सोडून देण्याची त्यांची तयारी होती म्हणावी तर तोही नाहीं. परंतु झालेलीं कर्जें फेडण्यासाठीं आणि दरबारची उधळपट्टी भागविण्यासाठींही कांहीं करून पैसा तर उभा करावयालाच हवा होता. अशा वेळीं सामान्य जनतेची, लोकसमाजाची, कशी काय अवस्था होती? कार्लाइल या इंग्रज ग्रंथकारानें फ्रेंच राज्यक्रांतीवर एक ग्रंथ लिहिलेला आहे. त्यामधून तुला एक वर्णन याबद्दलचें मी देतों. त्याची भाषासरणी थोडीशी चमत्कारिक आहे खरी; परंतु त्याचीं शब्दचित्रें नेहमींच फार परिणामकारक असतात. त्यानें लिहिलें आहे :

"बरें, इकडे श्रमजीवी लोकांकडे पाहावें तर त्यांचीही परिस्थिति चांगली नाहीं. दुर्दैवी बिचारे! कारण त्यांची संख्याही कांहीं थोडीथोडकी नाहीं, तर चांगली घसघशीत दोन ते अडीच कोटी आहे. एवढ्या मोठ्या संख्येचा आम्ही लोक एकत्र लोळागोळा करून त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारच्या अंधुक अशा एकभावनेची कल्पना लादतों आणि आमच्यापासून अगदींच निराळा, ज्याची आपली नीटशी ओळखसुद्धां नाहीं असा तो एक बाजारबुणग्यांचा अमानुष जमाव आहे, असें आपण त्याला नांव देतों. अथवा आमच्यापैकीं ज्यांच्या ठिकाणीं जरा थोडीशी मानवी दयाबुद्धि असते ते या जमावाला मासेस—लोकसमाज—असें नांव देतात. लोकसमाज म्हणे! पण चमत्कार असा आहे, कीं जरा थोडी कल्पनाशक्ति चालवून तुम्ही जर सगळ्या फ्रान्सभर त्यांच्यामध्यें जाऊन मिसळलांत, त्यांच्या मातीच्या छपऱ्यांत, डोक्याला टेकायला आलेल्या अशा छपराच्या ठेंगण्या कोठड्यांत किंवा घुशींच्या सांपळ्यासारख्या त्यांच्या राहत्या जागेंत जर तुम्ही जाल तर तुम्हांला आढळून येईल, कीं लोकसमाज म्हणून कांहीं कुणी कुठली एकच एक अशी अमानुष किंवा अतिमानुप राक्षसी व्यक्ति नसून तोही एकेका स्वतंत्र व्यक्तीचाच बनलेला आहे. त्यांपैकीं प्रत्येक व्यक्तीला स्वतःचें स्वतंत्र हृदय आहे आणि सुखदुःखें आहेत. त्या व्यक्तींच्या अंगावरही आपल्यासारखीच कांतडी आहे आणि त्यांना तुम्हीं कांहीं टोंचलेंत, तर त्यांच्याही अंगांतून तुमच्यासारखेंच रक्त येईल."

हें वर्णन केवळ १७८९ मधल्या फ्रान्सलाच नव्हे, तर १९३२ च्या हिंदुस्थानला सुद्धां किती तंतोतंत लागू पडतें! आमच्यापैकीं पुष्कळशी मंडळीसुद्धां हिंदुस्थानांतील कोट्यवधि शेतकरी कामकऱ्यांना स्वतःचें कांहीं स्वतंत्र जीवन आहे, अशी कल्पना न करतां त्या सर्वांचा मिळून "मासेस" म्हणजे जनता किंवा लोकसमुदाय म्हणून कोणी बेंगरूळ दीनदुबळा मनुष्यभावनाविरहित गोळा—पशु—आहे अशीच कल्पना करीत असतात!

आज किती तरी काळापासून या कोट्यवधि लोकांचें जिणें हें ओझीं वाहणाऱ्या पशूंच्या जिण्यासारखेंच झालेलें आहे आणि आजच्या घटकेलाही तें तसेंच आहे! आम्ही लोक मारे त्यांच्याबद्दल "सहानुभूति" दाखवीत

असतों आणि मोठ्या कनवाळूपणानें त्यांचें कल्याण करण्याचा आव आणीत असतों. परंतु हे लोकही तुमच्याआमच्याहून कांहीं कोणी निराळे नाहींत; तेही मनुष्यप्राणीच आहेत; आपल्याप्रमाणेंच त्यांच्याही ठिकाणीं कांहींएक स्वतंत्र जीव, व्यक्तिमत्त्व आहे, अशी आमची क्वचितच कल्पना असते. त्यांच्या त्या मातीच्या झोंपड्यांमध्यें राहत असतांना त्यांच्यापैकीं प्रत्येकाला स्वतःचा म्हणून कांहीं जीव असतो, सुखदुःख असतें, आपल्याप्रमाणेंच त्यालाही भूक लागत असते, थंडीचा त्रास होत असतो, दुखण्याबाहण्याचा त्रास होत असतो, ही गोष्ट आपण चांगली लक्षांत बाळगणें आवश्यक आहे. आमच्यापैकीं पुष्कळसे कायद्याच्या पांडित्यांत मुरलेले राजकारणी लोक राज्यघटनेची आणि यासारख्याच दुसऱ्या गोष्टींची चर्चा आणि मनन करीत असतात; परंतु ज्या बिचाऱ्या मानवी जीवांकरितां या सगळ्या घटना किंवा हे सगळे कायदे करावयाचे असतात, त्यांचें त्यांना स्मरणसुद्धां नसतें! आमच्या देशांत मातीच्या झोंपड्यांत किंवा शहरांतील घाण खुराड्यावजा गर्दीत राहणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें राजकारण या शब्दाचा एकच अर्थ आहे. तो म्हणजे या भुकेनें मरणाऱ्या लोकांना अन्नपाणी, कपडे आणि राहायला जागा मिळवून देणें हा होय.

सोळाव्या लुईच्या कारकीर्दीमध्यें फ्रान्सची ही अशी अवस्था होती. त्याच्या कारकीर्दीच्या सुरुवातीलाच उपासमारीमुळें लोकांचे दंगे झाले होते. हे दंगे कितीक वर्षे तरी चालूच होते. पुढें मध्यें कांहीं काळ त्यांत खंड पडला आणि त्यानंतर पुन्हां शेतकऱ्यांचे दंगे व बंडें सुरू झालीं. उपासमारीमुळें झालेल्या दंग्यांच्या वेळीं डि जॉन येथें गव्हर्नरानें भुके मरणाऱ्या लोकांना सांगितलें, "शेतांत गवत रुजलें आहे, तिकडे जा आणि चरा जा त्यावर!" यामुळें धंदेवाईक भिकाऱ्यांची संख्या प्रचंड झाली. अधिकृत रीतीनेंच असें जाहीर करण्यांत आलें होतें, कीं इ. स. १७७७ मध्यें फ्रान्समध्यें अकरा लक्ष भिकारी होते. या दारिद्र्याचा आणि दैन्याचा विचार करूं लागतांच हिंदुस्थानचें चित्र मनापुढें उभें राहिल्याशिवाय कसें तें राहतच नाहीं.

शेतकऱ्यांना खायला-प्यायला तर हवेच होतें; पण तशीच त्यांना कसून खाण्याला जमीनही हवी होती. सरंजामदारशाही-पद्धतीला अनुसरून फ्रान्समध्यें जमिनीची मालकी होती सरदारवर्गाकडे आणि जमिनींतील बहुतेक सारें उत्पन्न याच लोकांच्या खिशांत जात असे. शेतकऱ्यांच्या मनांत विशेष स्पष्ट अशा कांहींच कल्पना नव्हत्या. अमुक एक ध्येय असेंही त्यांच्या डोळ्यांपुढें निश्चितपणें नव्हतें; परंतु जमीन आपल्या मालकीची असावी एवढी मात्र त्यांना कल्पना असावी. आपल्याला भरडून काढणाऱ्या सरंजामशाही-पद्धतीचा त्यांना तिटकारा होता. सरदारवर्ग आणि भिक्षुकवर्ग, पाद्रीलोक यांचाही त्यांना तिटकारा आलेला होता आणि गरीब लोकांना गॅबेल किंवा मिठावरचा कर ( पुन्हां हिंदुस्थानची स्थिति लक्षांत आण ) हा तर फारच जाचक वाटत होता.

शेतकऱ्यांची स्थिति अशी होती आणि तरी पण राजा आणि राणी पैशांसाठीं हाकाटी करीतच होतीं.

सरकारजवळ खर्चाला पैसा नव्हता, त्यामुळें कर्जाचा डोंगर वाढतच होता. मेरी अँटोइनेटला लोकांनीं 'तुटीची राणी' असें टोपण नांव दिलें होतें. आतां पैसा उत्पन्न करण्याचा मार्ग शिल्लक उरलेला नव्हता. शेवटीं सोळाव्या लुईनें इतर कांहीं मार्ग सुचेनासा होऊन स्टेटस् जरनलची-फ्रेंच लोकसभेची-बैठक मे १७८९ मध्यें बोलाविली. या सभेमध्यें सरदार, पाद्री व सामान्य समाज अशा तीन वर्गांचे प्रतिनिधी असत. म्हणजे त्याची बाह्यरचना ब्रिटिश पार्लमेंटाहून कांहीं फारशी निराळी नव्हती; कारण पार्लमेंटमध्यें लॉर्डांच्या सभेंत सरदार, धर्मगुरू, पाद्री असत आणि कॉमन्स सभा ही बाकीच्या जनतेच्या प्रतिनिधींची सभा होती; परंतु नीट पाहिलें म्हणजे या दोहोंमध्यें पुष्कळसे फरक होते. ब्रिटिश पार्लमेंटच्या बैठका आज कितीक शतकांपासून अगदीं नियमितपणें भरत आल्या होत्या आणि त्यांच्या काम करण्याच्या परंपरा, नियम आणि पद्धती आतां पुष्कळशा चांगल्या मजबूतपणें प्रस्थापित झालेल्या होत्या. फ्रेंच लोकसभेच्या बैठकी क्वचितच होत असत आणि तिच्या बाबतींत कसलीही परंपरा अशी ठरून गेलेली नव्हती. मात्र दोन्ही सभा वरिष्ठ वर्गाच्या प्रातिनिधिभूतच होत्या; फ्रेंच लोकसभेपेक्षांसुद्धां ब्रिटिश कॉमन्स सभेची अशी अवस्था अधिक प्रमाणांत होती. दोन्ही सभांमध्यें शेतकऱ्यांचा कोणीही प्रतिनिधि नसे.

४ मे १७८९ या दिवशीं राजानें व्हर्साय येथें फ्रेंच लोकसभेचें उद्घाटन केलें; परंतु या तीन वर्गांच्या प्रतिनिधींना कोठून आपण एकत्र बोलाविलें असें म्हणून पश्चात्ताप करण्याची लौकरच राजावर पाळी आली. तिसरा वर्ग म्हणजे सामान्य जनतेचा, मध्यम वर्गीयांचा समाज. त्याचे जे प्रतिनिधी होते ते राजाचा लगाम नीटपणें मुकाट्यानें तोंडांत धरीनात; तो दांतांत घेऊन ते चावूं लागले आणि आमच्या संमतीविना कसल्याही प्रकारचे कर बसविले जातां कामा नयेत असा त्यांनीं आग्रह धरला. इंग्लंडमध्यें कॉमन्स सभेनें अशा तऱ्हेचा हक्क प्रस्थापित केलेला होता हें उदाहरण त्यांच्या डोळ्यांपुढें होतेंच. त्याचप्रमाणें अगदीं ताजें अमेरिकेचें उदाहरणही त्यांच्यापुढें होतें. त्यांची कल्पना अशी होती, कीं इंग्लंड हा स्वतंत्र लोकांचा देश आहे; पण ही त्यांची चूक होती. खरें पाहिलें तर हा त्यांचा भ्रमच होता. कारण इंग्लंडचा राज्यकारभार वरिष्ठ वर्ग आणि जमीनमालक यांच्याच हातांमध्यें होता. पार्लमेंटसभा सुद्धां प्रत्यक्ष त्यांचीच मिरास होती; कारण मतदानाचा हक्क फारच थोड्या लोकांच्या हातीं केंद्रित झालेला होता.

तथापि अशा या तिसऱ्या वर्गाच्या लोकांनीं किंवा कॉमन्स लोकांनीं हा जो विचार केला तो सुद्धां लुईच्या सहनशक्तीच्या पलीकडचा होता. त्यानें त्या सगळ्यांना सभास्थानांतून हांकलून दिलें; परंतु हे प्रतिनिधी अशा रीतीनें निमूटपणें निघून जाण्याच्या वृत्तीमध्यें नव्हते. बाहेर पडतांच ताबडतोब ते जवळच्याच एका टेनिस खेळण्याच्या जागीं जमले आणि राज्यघटना प्रस्थापित केल्याशिवाय तेथून हलावयाचें नाहीं, घरोघर जावयाचें नाहीं, असा त्यांनीं निश्चय केला. या प्रतिज्ञेला टेनिसकोर्ट-

वरची प्रतिज्ञा असें म्हणतात. त्यानंतर मग राजानें त्याच्यावर जबरदस्ती करण्यासाठीं लष्कराला हुकूम दिला; परंतु राजाच्या खास शिपायांनींच हा हुकूम पाळण्याचें नाकारलें त्या वेळीं आणीबाणीचा क्षण निर्माण झाला. कोणतीही क्रांति घ्या; ज्या क्षणीं सरकारचा मुख्य आधारस्तंभ जें सैन्य तेंच लोकांच्या गर्दीमधील आपल्याच बांधवांवर गोळ्या घालण्याचें नाकारतें, त्याच वेळीं खरा निर्णयाचा क्षण प्राप्त होतो. सैन्यानें हुकूम नाकारतांच लुई भयभीत झाला आणि त्यानें माघार घेतली आणि मग पुन्हां आपल्या नेहमींच्या मूर्खपणाला अनुसरून त्यानें आपल्या प्रजेला गोळ्या घालून ठार मारण्यासाठीं परदेशच्या पलटणी आणविण्याचें कारस्थान उभें केलें. ही गोष्ट लोकांच्या सहनशक्तीच्या बाहेरची ठरून १४ जुलै १७८९ या संस्मरणीय दिवशीं लोकांनीं पॅरिस शहरामध्यें बंड केलें, बॅस्टीलचा प्राचीन तुरुंग काबीज केला आणि त्यामधील कैद्यांना सोडून दिलें.

बॅस्टीलचा पाडाव हा इतिहासामधील एक फारच मोठा प्रसंग आहे. या प्रसंगापासून फ्रेंच राज्यक्रांतीची सुरुवात झाली. देशांत सगळीकडे जनतेनें बंडें पुकारावींत असा आदेश देणारें जणुं हें एक रणशिंगच वाजलें. बॅस्टीलचा तुरुंग फुटला याचा अर्थ फ्रान्समधील सरंजामशाही, राजशाही आणि वतनदारी यांची प्राचीन राजवट नष्ट झाली असा होता. यूरपमधील सगळ्या राजे-महाराजांच्यापुढें हें एक भयंकर दुश्चिन्हच उभें राहिलें होतें. वास्तविक राजे-महाराजांच्या ऐश्वर्योपभोगांची आणि अनियंत्रित कारभाराची दीक्षा जो फ्रान्स देश यूरप खंडाला देत आला होता तोच फ्रान्स देश आतां नवीनच दीक्षेचा प्रचार करायला सज्ज होत होता हें पाहून यूरप खंड गांगरून गेलें. कांहीं थोड्या लोकांना तर बॅस्टीलच्या पाडावाच्या या कार्यानें धडकीच भरली व त्यांचे हातपाय लटलट कांपूं लागले; परंतु बहुसंख्य समाजाला मात्र आतां आपल्याला चांगले दिवस उगवणार अशी त्यामुळें आशा वाटूं लागली. जुलैचा चौदावी तारीख हा दिवस अजूनसुद्धां फ्रान्समध्यें राष्ट्रीय सण म्हणून दरसाल देशभर चोहोंकडे पाळला जात असतो.

जुलैच्या चौदाव्या तारखेच्या दिवशीं बॅस्टीलचा तुरुंग पॅरिसच्या सामान्य जमावानें फोडला व ताब्यांत घेतला हें दृश्य जगाला दिसलें; परंतु अधिकारारूढ लोक हे किती आंधळे असतात पाहा; त्याच्या आदल्याच रात्रीं तेरा तारखेला व्हर्सांय येथें राजदरबारीं एक मोठाच उत्सव करण्यांत आला होता. त्या ठिकाणीं नाचरंग, गाणें-बजावणें चाललें होतें आणि खुद्द राजाराणी यांच्या समवेत हे लोक बंडखोर पॅरिसवर लौकरच जो विजय मिळविण्याच्या हुरुपांत होते. त्याच्या जणुं अभिनंदनार्थ मद्यपान करीत होते! त्या काळीं यूरप खंडांतील लोकांच्या मनावर राजाच्या सत्तेचा इतका अलौकिक पगडा होता, कीं तो पाहून मोठा चमत्कार वाटतो मनाला! आधुनिक जगांत राहणारे जे आपण लोक, त्याना आतां प्रजासत्ताक राज्यांचा इतका चांगला परिचय

झाला आहे, कीं राजाची राजवट ही चांगली असूं शकते असें कोणी डोकें ताळयावर असलेला मनुष्य आतां म्हणत नाहीं.

जे कांहीं मूठभर राजे जगांत अजून शिल्लक राहिलेले आहेत, तेही आतां अगदीं पूर्ण विचारपूर्वक आणि मर्यादेनेंच वागत असतात; नाहीं तर कोणता बडगा वाढून ठेवलेला आहे याची त्यांना चांगली कल्पना आहे. असें असून सुद्धां आजकालही पुष्कळ लोकांचा अशा राजशाहीलाही विरोधच आहे; कारण तिच्यामुळें वर्गभिन्नता कायम राहते आणि एक प्रकारची एकमेकांपासून तुटून राहण्याची आणि लब्धप्रतिष्ठितपणाची प्रवृत्ति, झब्बूशाही वाढते; परंतु अठराव्या शतकांत यूरप खंडांतील लोकांची प्रवृत्ति अशी राजशाहीविरुद्ध नव्हती. त्या काळच्या लोकांना राजाशिवाय एखादा देश असूं तरी कसा शकेल, याची कल्पनासुद्धां करणें थोडेंसें कठिण पडत होतें! त्यामुळें काय झालें पाहा. लुई जरी इतका मूर्खपणा करीत होता आणि लोकांच्या इच्छेविरुद्ध वारंवार वागत होता, तरीसुद्धां त्याला पदच्युत करावें असें कांहीं कोणी म्हणेना. यानंतर दोन वर्षेपर्यंत लोकांनीं लुई राजाचा मूर्खपणा सहन करून त्याला डोक्यावर वागवून घेतलें; परंतु अखेरीस जेव्हां त्याला देश सोडून पळून जातांना पकडण्यांत आलें, तेव्हां काय तो फ्रान्स देशानें आपल्याला मुळीं राजाच नको असा निश्चय केला.

पण हें सगळें पुढचें पुराण आहे. त्याच्या आधीं स्टेट्स जनरलचें रूपांतर नॅशनल असेंब्ली—राष्ट्रसभा—असें करण्यांत आलें; एव्हांपासून राजाची सत्ता नियंत्रित झाली; म्हणजे आतां राष्ट्रसभा सांगेल तें त्यानें ऐकलें पाहिजे अशी सामान्यतः सगळयांची कल्पना ठरली. परंतु राजाला ही गोष्ट नको होती; मेरी अँटोइनेटला तर ती त्याहून मुळींच नको होती. शिवाय पॅरिसच्या लोकांना या दोघांबद्दलही फारसा आपलेपणा नव्हता आणि हीं दोघेंजण काय हवीं तीं कारस्थानें करतील असा त्यांना संशय वाटत होता. त्या वेळीं राजाराणी आपला दरबार घेऊन व्हर्साय येथें राहिलेलीं होतीं. व्हर्साय पॅरिसपासून बरेंच दूर असल्यामुळें पॅरिसमधील लोकांना राजावर नीट नजर ठेवतां येत नव्हती. त्याचप्रमाणें व्हर्साय येथें चाललेल्या मेजवान्या, नाचरंग, विलासोपभोग यांच्या हकिकती कानांवर येऊन पॅरिसमध्यें उपाशीपोटीं मरत असलेल्या लोकांचा जळफळाट होई. म्हणून लोकांनीं जगांत आजपर्यंत कोणींही कोणत्याही ठिकाणीं काढली नसेल अशा अजब पद्धतीची मिरवणूक काढून पॅरिसच्या लोकांनीं राजाराणींना पॅरिस येथील टयुलेरीज राजवाड्यांत आणून ठेवलें.

फ्रेंच राज्यक्रांतीची ही कथा आतां पुढच्या पत्रांत पुढें चालू करीन मी.

## १०१

# फ्रेंच राज्यक्रांति

*१० ऑक्टोबर, १९३२*

फ्रेंच राज्यक्रांतिबद्दल तुला लिहितांना मला थोडेंसें कठिण वाटतें आहे. त्यासंबंधीचें साहित्य कमी आहे म्हणून नव्हे, तर असें साहित्य फारच आहे म्हणून. जागतिक इतिहासाच्या रंगभूमीवरील फ्रेंच राज्यक्रांतीचा हा प्रयोग नानाविध बदलत्या प्रसंगांनीं भरलेला आणि बुद्धि थक्क करून टाकणारा अशा प्रकारचा झाला; त्यामधील त्या अलौकिक घटनावर चित्त अद्यापिही खिळून राहतें, त्यांच्या स्मरणानें अद्यापिही मन भयभीत होतें, थरकांप पावतें.

राजे लोकांचीं किंवा मुत्सद्यांचीं राजकारणें हीं नेहमीं चार भिंतींच्या आड अगदीं खासगी बैठकींत बसून चाललेलीं असतात; त्यांच्याभोंवतीं एक प्रकारचें गूढपणाचें वातावरण पसरलेलें असतें. सगळें खोल राजकारण उगीच षट्कर्णी होऊं देता उपयोगी नाहीं, या धोरणाच्या पडद्याखालीं पुष्कळ पापें दडून राहूं शकतात आणि अलंकारिक भाषेच्या फुलोऱ्यांत प्रतिस्पर्धी पक्षांच्या महत्त्वाकांक्षा आणि लोभ हे लपून राहूं शकतात. या महत्त्वाकांक्षांमुळें आणि लोभांमुळें जरी मोठमोठीं युद्धें निर्माण होत असलीं आणि त्या कामीं खूप खूप तरुण माणसें मृत्युमुखीं पडत असलीं, तरीही या युद्धांच्या पाठीमागें असले क्षुद्र हेतू आहेत असें सांगून आपले कान कधींही विटाळले जात नाहींत. उलट पक्षीं, ज्यांसाठीं अगदीं सर्वस्वाचा होम करणें आवश्यक असतें अशा प्रकारच्या अत्यंत उदार आणि महान् मानवी ध्येयांचा घोषच त्या काळीं आमच्यापुढें केला जात असतो.

परंतु क्रांतीचा प्रकार सगळाच निराळा. क्रांतीचें निवासस्थान पडलें शेतांत, रस्त्यांत आणि बाजारपेठेंत; क्रांतीचे मार्ग सगळे राकट आणि धसमुसळेपणाचे. क्रांति घडवून आणणारे जे लोक असतात त्यांना कांहीं राजेरजवाडे आणि मुत्सद्यांसारख्या शिक्षणाचा लाभ झालेला नसतो. असंख्य कपटकारस्थानें आणि दुष्ट डाव कोणाच्याही ध्यानांत येणार नाहींत अशा तऱ्हेची त्यांची भाषा कांहीं दरबारी थाटाची आणि अलंकारिक असूं शकत नाहीं. त्यांच्याभोंवतीं गूढपणाचें कसलेंही वातावरण नाहीं; त्यांच्या मनांत जीं कांहीं विचारचक्रें चालू आहेत तीं लपवून ठेवण्यासारखा मोठेपणाचा, प्रतिष्ठितपणाचा वगैरे कसलाच पडदा त्यांच्यापाशीं नाहीं; मनाचें तर दूरच राहूं द्या म्हणा; प्रत्यक्ष त्यांचें शरीर झांकण्यापुरतें सुद्धां वस्त्र त्यांच्यापाशीं नसतें. क्रांतीच्या वेळचें राजकारण म्हणजे कांहीं राजे लोक किंवा धंदेवाईक मुत्सद्दी यांचा करमणुकीचा खेळ नसतो. त्या राजकारणाचा प्रत्यक्ष रोजच्या व्यवहाराशीं संबंध असतो आणि त्याच्या पाठीमागें साधासुधा मानवी स्वभाव आणि भुकेलेल्या लोकांचीं उपाशी पोटें असतात.

फ्रान्समध्येंही अर्थातच १७८९ ते १७९४ या पांच वर्षांच्या प्रलयकाळांत उपासमार झालेले शेतकरीच कार्याला पुढें सरसावलेले आपण पाहतों. या शेतकऱ्यांनींच भेदरट अशा राजकारणी लोकांचे हात धरून जबरदस्तीनें त्यांना राजशाही, सरंजामशाही आणि धर्मपीठाची वतनदारी या सर्व गोष्टींना खो देण्यास भाग पाडलें असें दिसतें. त्यांनींच त्या भयंकर गिलोटीन बाईसाहेबांना—सुरीला—नैवेद्य अर्पण केला आणि ज्या लोकांनीं आजपर्यंत त्याना पायाखालीं तुडविलें आणि भरडलें होतें किंवा आतां नवीनच मिळविलेल्या आपल्या स्वातंत्र्याविरुद्ध जे कारस्थान आणि कट करतात असा त्यांना संशय येत होता, अशा सर्वांचा त्यांनीं सूड घेतला. हेच लक्तरें पांघरणारे आणि अनवाणी चालणारे लोक, मिळालीं तीं किंवा घाईघाईंत जसलीं बनवितां आलीं तसलीं, कशातरी तऱ्हेचीं हत्यारें घेऊन आपल्या राज्यक्रांतीचें रक्षण करण्यासाठीं रणांगणावर धावले आणि आपल्या विरुद्ध उभ्या राहिलेल्या यूरप खंडांतील लष्करी शिक्षणांत मुरलेल्या सर्व सैन्यांचा पराभव करून त्यांना त्यांनीं मागें हटविलें. अशा रीतीनें या फ्रान्समधील सामान्य लोकांनीं मोठे चमत्कार करून दाखविले; परंतु कित्येक वर्षांचा ताण आणि झगडा सोसल्यानंतर क्रांतीची शक्ति संपल्यासारखी झाली; तेव्हां मग ही क्रांतीची लाट आपल्याच प्रवर्तकावर उलटली आणि स्वतःच्याच अपत्यांचा—कार्यांचा—नाश करूं लागली. त्यानंतर प्रतिक्रांति निर्माण झाली. तिनें क्रांतीचा सगळा पसारा गट्ट केला आणि ज्या सामान्य जनतेनें एवढें शौर्य व धाडस दाखविलें, जिनें एवढे कष्ट सोसले, तिलाच पुन्हां या प्रतिक्रांतीनें "वरिष्ठ वर्गा"च्या राजवटीखालीं खेंचून नेलें. या प्रतिक्रांतीमधूनच नेपोलियन हा प्रथम सर्वाधिकारी आणि नंतर बादशहा म्हणून उदयास आला. परंतु नेपोलियनला काय किंवा प्रतिक्रांतीला काय, कोणालाही सामान्य जनतेला आतां पूर्वीच्या ठिकाणीं नेऊन बसविणें शक्यच नव्हतें. राज्यक्रांतीनें जें खरें मुद्द्याचें यश मिळविलें होतें तें हिरावून घेणे, पुसून नाहींसें करणें कोणालाही शक्य नव्हतें; ज्या या काळामध्यें वरिष्ठ वर्गीयांनीं पायांखालीं तुडविलेल्या गरीब लोकांनीं थोडा काळ का होईना पण आपल्या मानेवरचें जूं फेंकून दिलें, त्या काळची अंतःकरणावर खोदून राहिलेली उज्ज्वल स्मृति फ्रेंच लोकांच्या, एवढेंच नव्हे, तर यूरप खंडांतील इतरही लोकांच्या अंतःकरणांतून काढून टाकणें हेंही कोणाला शक्य नव्हतें.

क्रांतीच्या पहिल्या दिवसांत सत्ता हातीं यावी म्हणून झगडणारे पुष्कळ पक्ष व गट उत्पन्न झालेले होते. त्यांत एक पक्ष राजाच्या बाजूच्या लोकांचा होता. या लोकांच्या मनांत सोळाव्या लुईलाच अनियंत्रित राजा म्हणून कायम ठेवावयाची वेडी आशा घोळत होती; दुसरे कांहीं नेमस्त होते, त्यांना राज्यघटनेचा कायदा हवा होता. नियंत्रित अधिकार हातीं असलेला राजा असला, तरी त्यांची तशी हरकत नव्हती. तिसरा पक्ष नेमस्तमतवादी प्रजासत्ताक राज्यवाल्यांचा होता. त्यांनाच गिरोंदे पक्षाचे लोक म्हणत आणि अखेरचा महत्त्वाचा पक्ष जहाल मताच्या प्रजासत्ताक राज्यवाल्यांचा होता. यांना जॅकोबिन लोक म्हणत असत. कारण त्यांच्या पक्षाच्या

सभांचें स्थान जॅकोबिन कॉन्व्हेंट—धर्ममंदिर—मध्यें होतें. असे हे चार पक्ष प्रमुखतः फ्रान्समध्यें होते. याशिवाय या पक्षांमध्यें आणि पक्षांच्या बाहेरही पुष्कळसे एकांडे शिलेदार लटपटी करणारे होते. या सर्व पुढें पुढें दिसणाऱ्या पक्षाच्या आणि व्यक्तींच्या मागें फ्रान्समधील, विशेषतः पॅरिसमधील आम जनता होती; या जनतेचें काम लोकांमध्यें प्रसिद्धि न पावलेल्या अशा आपल्यामधल्याच किती तरी पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं चालू होतें. आणखी एक पक्ष होता, तो क्रांतीला भिऊन देशत्याग करून परदेशांमध्यें, विशेषतः इंग्लंडमध्यें पळून जाऊन राहिलेल्या सरदार लोकांचा; परदेशांत राहून या लोकांची क्रांतीविरुद्ध सतत कारस्थानें चालू होतीं. यूरपचे एकूण एक देश क्रांतिकारक फ्रान्सच्या विरुद्ध एकत्र झालेले होते. राज्यव्यवस्था लोकप्रतिनिधिसभेच्या नियंत्रणाखालची असली, तरी कारभार जेथें केवळ वरिष्ठ वर्गीयांच्या हातामध्यें होता असा इंग्लंड देश, आणि यूरप खंडांतील राजे आणि महाराजे या सर्वांना सामान्य जनतेच्या या विलक्षण ज्वालामुखीचें एकसारखेंच भय वाटत होतें आणि म्हणून तो दडपून काढण्याचे त्या सर्वांचे प्रयत्न चालू होते.

राजा आणि राजपक्षीय लोक यानीं कारस्थानें केल्यामुळें त्यांनीं आपला नाश आपल्या हातानें जवळ आणला. पहिल्या-पहिल्यांदां फ्रेंच नॅशनल असेंब्लीमध्यें सर्वांत मोठा महत्त्वाचा पक्ष म्हणजे उदारमतवादी नेमस्तांचा होता; या लोकांना इंग्लंड आणि अमेरिका याच्यासारखी लोकप्रतिनिधिसभांनीं युक्त अशी राज्यघटना पाहिजे होती. या पक्षाचा पुढारी मिराबो हा होता. सुमारें दोन वर्षेपर्यंत असेंब्ली-मधील सत्ता या पक्षाच्या हातीं होती. क्रांतीच्या पहिल्या दिवसात लोकपक्षाचा जो बराचसा विजय झाला त्यानें हुरळून जाऊन या पक्षानें लोकांना मोठीं मोठीं भरदार आश्वासनें दिलीं आणि कांहीं कांहीं सुधारणाही केल्या.

बॅस्टीलच्या पाडावानंतर वीस दिवसांनीं ता. ४ ऑगस्ट १७८९ या दिवशीं असेंब्लीमध्यें एक मोठा नाटकांतल्यासारखा विलक्षण प्रकार घडून आला.

सरंजामदार लोकांचे हक्क आणि वतनें व जादा अधिकार हे सर्व काढून टाकावेत अशा प्रकारचा प्रश्न असेंब्लीपुढें चर्चेसाठीं होता. फ्रान्सचें वातावरणच त्या वेळीं असें कांहीं विलक्षण झालें होतें कीं लोकांच्या डोक्यामध्यें कांहीं तरी विलक्षण वारें भरून गेलें होतें; एवढेंच नव्हे, तर प्रत्यक्ष सरंजामदार-सरदार लोकांनासुद्धां स्वातंत्र्याची निशा थोडीशी चढल्यासारखी झालेली होती. त्यामुळें त्या दिवशीं असेंब्लीमध्यें मोठमोठे सरदार आणि धर्मपीठाचे प्रमुख एकामागून एक मोठ्या अहमहमिकेनें उठले आणि आपले जमिनीवरचे अधिकार आणि खास सवलती व हक्क सोडून देतों असें जाहीर करूं लागले.

त्यांनीं दाखविलेला हा उमाळा व आविर्भाव प्रामाणिकपणाचा आणि उदार बुद्धीचा होता हें निःसंशय; परंतु त्याचा परिणाम मात्र आणखी कांहीं वर्षेपर्यंत मुळींच झाला नाहीं. केव्हां केव्हां, पण अगदींच क्वचित् प्रसंगीं सत्ताधारी, वतनदार लोकांच्या

ठिकाणींसुद्धा असा औदार्याचा उमाळा येतो. अथवा असेंही असूं शकेल, कीं आपल्या खास अधिकारांचा व सवलतींचा विनाशकाल आतां जवळ आला अशी पक्की खात्री झाल्यामुळें औदार्याचा पुण्यमय आविर्भाव करणें हें त्यांना सगळ्यांत अधिक सोयीचें वाटत असावें. थोड्या दिवसांपूर्वी आपल्या देशांतही असाच एक प्रकार घडून आला. अस्पृश्यता-निवारणाच्या कामीं बापूंनीं तो उपास केला आणि जादूगारानें कांडी फिरवावी त्याप्रमाणें साऱ्या देशभर भावनेचा भर उसळून गेला, त्या वेळींही वरिष्ठ जातीच्या हिंदूंनींही अशाच तऱ्हेचा औदार्याचा मोठा आश्चर्यकारक उमाळा दाखविला. त्यामुळें हिंदूंनीं आपल्याच फार मोठ्या बंधुवर्गावर लादलेले कांहीं पाश थोड्याफार प्रमाणांत गळून पडले आणि कित्येक युगांपासून या अस्पृश्य लोकांना बंद असलेल्या दारांपैकीं हजारों दारें त्यांना उघडीं झालीं.

अशाच रीतीनें या क्रांतिकारक फ्रान्सच्या नॅशनल असेंब्लीनें उत्साहाच्या भरांत, निदान ठरावाच्या स्वरूपांत का होईना, पण भूदासागिरी, खास हक्कदारी आणि सरंजामदारांचे न्यायदानाचे अधिकार, सरदार व पाद्री लोक यांना असलेली करांची माफी या गोष्टी, एवढेंच नव्हे, तर या लोकांच्या पदव्यासुद्धां रद्द करून टाकल्या. आश्चर्याची गोष्ट अशी, कीं अजून राजाची 'राजा' ही पदवी शिल्लक राहिली होती; आणि इकडे या सरदारांच्या पदव्या तेवढ्या नाहींशा झाल्या होत्या.

यानंतर असेंब्लीनें मानवी हक्कांचा जाहीरनामा मंजूर करण्याचें काम केलें. या प्रसिद्ध जाहीरनाम्याची कल्पना बहुधा अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यावरून घेतलेली असावी. परंतु अमेरिकेचा जाहीरनामा हा अगदीं त्रोटक आणि साधा आहे, तर फ्रेंच जाहीरनामा लांबलचक आणि भानगडीचा आहे. जे हक्क दिल्यानें मनुष्याला समता, स्वातंत्र्य आणि सुख लाभेल ते हक्क म्हणजे मानवी हक्क होत, अशी कल्पना करण्यांत आलेली होती. त्या काळीं मानवी हक्कांचा हा जाहीरनामा लोकांना फारच वीरवृत्तीचा आणि धाडसाचा वाटला आणि पुढें शंभर वर्षेपर्यंत यूरपमधील उदारमत-वादी आणि लोकशाहीवाल्या लोकांचा एक ब्रीदलेखच तो होऊन राहिलेला होता; पण आज पाहिलें तर हाच जाहीरनामा अगदींच जुन्या काळचा आणि निरुपयोगी वाटतो. आपल्या काळचे कोणतेही प्रश्न सोडविण्याला त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. निव्वळ कायद्यामध्यें नमूद झालेली समता आणि मतदानाचा हक्क यांमुळें माणसाला खरी समता, खरें स्वातंत्र्य किंवा सुख प्राप्त होत नाहीं आणि ज्यांच्या हातीं सत्ता असते त्यांना लोकांची पिळणूक करायला अजूनही पुष्कळच मार्ग शिल्लक राहिलेले असतात, ही गोष्ट लोकांच्या ध्यानांत येण्याला काळ मात्र पुष्कळ जावा लागला. फ्रेंच राज्यक्रांती-पासून आतांपर्यंत राजकीय विचारामध्यें पुष्कळ प्रगति झालेली आहे अथवा फेरबदल झालेला आहे म्हणा; त्यामुळें आजच्या अगदीं पुराणमतवादी समजल्या जाणाऱ्या माणसालासुद्धां या मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यांतील जाडजूड शब्दांमध्यें लिहिलेलें तत्त्वांचें अवडंबर समाधानकारक वाटणार नाहीं, मान्य होणार नाहीं. पण याचा

अर्थ कांहीं असा नव्हे, कीं हे पुराणमतवादी लोक कोणालाही खरें स्वातंत्र्य आणि समता द्यायला तयार आहेत. जरा थोडा प्रयत्न केला, तर ही गोष्ट तेव्हांच उघड दिसून येण्यासारखी आहे. या मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यानें उलट खासगी मालमत्तेचें संरक्षणच केलेलें आहे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं सरदार लोकांची आणि धर्मपीठाची मालमत्ता जी खालसा करण्यांत आली, ती कांहीं खाजगी मालमत्ता नष्ट करण्याच्या हेतूनें नव्हे, तर सरंजामदारी आणि इतर प्रकारचे हक्क व सवलती यांच्या ठिकाणच्या दुसऱ्या कांहीं दोषांसाठीं. परंतु मालमत्ता धारण करण्याचा हक्क हा मात्र या जाहीरनाम्याप्रमाणें मोठा पवित्र आणि अनुल्लंघ्य असा हक्क ठरविण्यांत आलेला होता. अर्थात् तुला माहीत असेलच, कीं आजच्या पुरोगामी राजकीय विचारवंतांच्या मतें खासगी मालमत्ता हें एक प्रकारचें पाप आहे आणि शक्य तों ती नष्टच केली पाहिजे असें त्यांचें मत आहे.

मानवी हक्कांच्या जाहीरनाम्याचा हा मसुदा आजच्या काळच्या आपणा मंडळींना अगदींच सामान्य वाटण्याचा संभव आहे. काल मोठीं शौर्याचीं वाटणारीं ध्येयें हीं आज पुष्कळदां अगदींच सामान्य वाटत असतात. पण ज्या काळीं या जाहीरनाम्याची घोषणा करण्यांत आली त्या काळीं त्यामुळें साऱ्या यूरप खंडांतील जनतेचीं अंतःकरणें थरारून गेलीं आणि सर्व दलित आणि दीन लोकांना त्यामुळें आपल्याला पुढें चांगला काळ येणार अशी बरीचशी गोड आशा वाटूं लागली. अर्थात् राजाला हा जाहीरनामा बिलकुल पसंत पडला नाहीं; या विद्रोहकारक विचारांमुळें त्याचें मस्तक फिरून गेलें आणि त्या जाहीरनाम्याला मान्यता देण्याचें त्यानें नाकारलें. राजा या सुमारास अजून व्हर्साय येथेंच राहात होता. याच वेळीं पॅरिसमधील गर्दीचा लोंढा स्त्रियांच्या पुढारीपणाखालीं व्हर्साय येथें राजवाड्यात गेला; आणि लोकांनीं राजाला हा जाहीरनामा मंजूर करण्याला तर भाग पाडलेंच, परंतु शिवाय राजाला पॅरिस येथें जाण्याला भाग पाडलें. माझ्या गेल्या पत्राच्या अखेरीस एका विलक्षण मिरवणुकीचा उल्लेख मीं केला होता ना, तीच ही मिरवणूक.

असेंब्लीनें आणखी पुष्कळ उपयुक्त सुधारणा घडवून आणल्या. धर्मपीठाची सर्व प्रचंड मालमत्ता तिनें खालसा करून ती सरकारखातीं जमा केली. फ्रान्सची एक प्रकारची नवी वांटणी करून त्यांचीं ऐशीं खातीं म्हणजे जिल्हे पाडण्यांत आले. मला वाटतें, जिल्ह्यांची ही विभागणी आजही जशीच्या तशीच कायम आहे. जुन्या सरंजामदारांच्या घरच्या न्यायासनाऐवजीं दुसरीं चांगलीं न्यायासनें प्रस्थापित कररण्यांत आलीं. हें जें सगळें झालें त्यानें लोकांचें हित झालें हें खासच; परंतु त्यानें जेवढी व्हावी तेवढी कांहीं सुधारणा झाली नाहीं. शेतकरी लोक जमिनी-साठीं हपापले होते आणि शहरांतील सामान्य जनता जी भाकरीसाठीं धडपडत होती, तिला त्यांत विशेष कांहींच लाभ झाला नाहीं. या प्रश्नाच्या बाबतींत क्रांतीला पुढें पाऊल टाकतां येईनासें झालें असें दिसतें.

नॅशनल असेंब्लीमध्यें सामान्य जनतेचे, शेतकऱ्यांचे किंवा सर्वसामान्य लोकांचे कोणीच प्रतिनिधी नव्हते हें मी मागें तुला सांगितलेंच आहे.

असेंब्लीवर सगळा शह होता मिराबोच्या नेतृत्वाखालील मध्यम वर्गीयाचा. आणि आपल्याला जें हवें होतें तें मिळालें असें दिसतांक्षणींच त्यांनीं क्रांतीचा गाडा पुढें चालविण्याचें बंद केलें.

एवढेंच नव्हे, तर खुद्द लुई राजाशीं संगनमत करून त्यांनीं खेडेगांवातील शेतकरी लोकांवर गोळयासुद्धां घालण्यास सुरुवात केली. मध्यमवर्गीय पक्षाचा पुढारी मिराबो हा तर प्रत्यक्ष राजाचा गुप्त सल्लागार झाला आणि ज्या सामान्य लोकांनीं एवढा बॅस्टीलचा तुरुंग फोडून काबीज केला आणि आतां शृंखला तुटून पडून आपण स्वतंत्र झालों अशी गोड भावना ज्याची झाली होती त्यांना आतां वाटूं लागलें, कीं हा काय चमत्कार झाला ! ज्या स्वातंत्र्यासाठीं आपण झगडलों, तें स्वातंत्र्य तर आपणांपासून अजून फार दूर पडलें आहे आणि नॅशनल असेंब्ली तर आपल्याला जुन्या काळच्या सरदार-जमीनदारांप्रमाणेंच दडपून टाकीत आहे हें त्यांच्या आतां प्रत्ययाला आलें.

फ्रेंच राज्यक्रांतीची खरी गुरुकिल्ली पॅरिसच्या जनतेच्या हातीं होती; नॅशनल असेंब्लीमध्यें जेव्हां त्यांचे प्रयत्न अशा रीतीनें फसले तेव्हा आपल्या क्रांतीच्या सामर्थ्याला बाहेर पडण्यासाठीं दुसरेंच एक साधन त्यांनीं शोधून काढलें. तें म्हणजे पॅरिस कम्यूनचें, म्हणजे पॅरिसच्या नगरसभेचें. या कम्यूनमध्येंच केवळ नव्हे, तर कम्यूनमध्यें सभासद निवडून पाठविणाऱ्या शहराच्या निरनिराळ्या विभागामध्येंही सामान्य जनतेशीं प्रत्यक्ष संबंध असणारी अशा प्रकारची एक जिवंत संघटना पॅरिसमध्यें या वेळीं अस्तित्वांत होती. या कम्यूननें आणि विशेषतः शहराच्या सर्व पोटविभागांनीं आतां क्रांतीचें निशाण आपल्या हातीं घेतलें आणि मध्यमवर्गीय आणि नेमस्त लोकांनीं भरलेल्या नॅशनल असेंब्लीच्या सत्तेला खो देण्याला ते उभे राहिले.

दरम्यान बॅस्टीलच्या पाडावाचा वर्षादिन आला. या दिवशीं म्हणजे १४ जुलै रोजीं, पॅरिसच्या लोकानीं फार मोठा उत्सव केला. त्याला त्यांनीं संयुक्त राज्याचा उत्सव असें नांव दिलें. पॅरिसच्या लोकांनीं त्या दिवशीं शहर श्रृंगारण्यासाठीं विनावेतन काम केलें; कारण हा आपल्या घरचाच उत्सव आहे अशी त्याची भावना होती.

फ्रेंच राज्यक्रातीची अशी ही अवस्था इ. स. १७९० व १७९१ या सालांच्या सुमारास होती. असेंब्लीचा क्रांतीचा उमाळा सगळा पार जिरून गेलेला होता आणि आतां झाले तेवढे फेरबदल आणि सुधारणा पुरे झाल्या, नवीन कांहीं नको, अशी त्यांची प्रवृत्ति झाली होती. परंतु पॅरिसच्या जनतेच्या अंतःकरणांतील क्रांतीचा उत्साह अजूनही सळसळत होता; शेतकरी समाज अजून आपली जमीन आपल्या कबजांत घेण्यासाठीं आशेनें डोळे लावून बसलेला होता. अशी ही परिस्थिति फार काळ टिकून राहणें शक्य नव्हतें. क्रांतीचे कार्य पुढें वाढून पुरें तरी व्हायला हवें होतें किंवा क्रांति पूर्ण दडपली जायला हवी होती. नेमस्तांचा पुढारी मिराबो हा १७९१ मध्यें मरण

पावला. राजाशीं जरी तो अंतस्थ कारस्थानें करीत होता, तरी लोकांमध्यें तो प्रिय होता आणि म्हणून लोकांना तो आवरून धरूं शकत होता. इ. स. १७९१ मध्यें जून २१ या दिवशीं एक प्रसंग असा घडला, कीं त्यामुळें क्रांतीचें भवितव्य काय हें निश्चित ठरून गेलें. हा प्रसंग म्हणजे लुई राजा आणि मेरी अँटोइनेट यांचा गुप्त वेषानें पळून जाण्याचा प्रयत्न. या प्रयत्नांत तीं दोघें जवळजवळ फ्रान्सच्या सरहद्दीपर्यंत जाऊनसुद्धां पोंचलीं होतीं. परंतु व्हर्डूनजवळ वारेन या गांवामध्यें शेतकऱ्यापैकीं कांहीं लोकांनीं त्यांना ओळखलें; त्यांना पुढें जाण्यास त्यांनीं अटकाव केला आणि त्यांना पॅरिस येथें परत आणण्यांत आलें.

या त्यांच्या कृत्यामुळें राजा व राणी यांच्या भवितव्याबद्दलचा निर्णय पॅरिसच्या जनतेच्या दृष्टीपुरता तरी ठरून गेला. प्रजासत्ताक राज्याची कल्पना आतां जोरानें वाढीस लागली. तरीपण नॅशनल असेंब्ली आणि तत्कालीन राज्यकर्ते हे इतके मवाळ होते आणि लोकांच्या भावनेपासून इतके अलग पडलेले होते, कीं लुई राजाला पदभ्रष्ट केलें पाहिजे अशी मागणी करणाऱ्या लोकांना अजूनही हे लोक गोळ्या घालून ठार करीतच होते. उदाहरणार्थ, मारत ( फ्रेंचमध्यें मारा ) हा क्रांतीच्या कार्यांतील एक श्रेष्ठ पुरुष होता. त्यानें राजाचा पलायनानंतर देशद्रोही म्हणून निषेध केला होता. त्यासाठीं त्यालाच पकडण्याकरितां या सरकारनें चोहोंकडे शोध चालविला होता. त्यामुळें त्याला पॅरिसच्या घाण सांडपाणी वाहून नेणाऱ्या रस्त्याखालच्या मोऱ्यांमध्यें लपून राहावें लागे; आणि त्यामुळें त्याला एक भयंकर कातडीचा रोगही जडला.

तरी सुद्धां चमत्कार असा, कीं लुई राजाचें राज्य तत्त्वतः तरी यानंतरही अजून एक वर्षभर चालू होतें. सप्टेंबर १७९१ मध्यें नॅशनल असेंब्लीची कारकीर्द आटोपून तिच्या जागीं एक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली म्हणजे कायदेमंडळ आलें. हें मंडळही आपल्या पूर्वींच्या मंडळासारखें मवाळ होतें; त्यांतही वरिष्ठ वर्गांचेच तेवढे प्रतिनिधी होते. फ्रान्समध्यें संतप्त झालेला जो लोकसमाज होता, ज्याचा संताप अद्याप वाढतच होता, त्या समाजाचा प्रतिनिधि त्यामध्यें कोणीही नव्हता. परंतु क्रांतीचा हा संतापज्वर लोकांमध्यें वाढतच होता आणि सामान्य जनतेमधल्या लोकाचाच — अत्यंत तीव्र जहाल मंडळींचा — जो जॅकोबिन पक्ष होता त्याचें बळ वाढत चाललें होतें.

दरम्यान यूरप खंडांतील इतर राज्यसत्ता या सर्व विलक्षण घडामोडीकडे भयचकित वृत्तीनें पहात होत्या. तरीसुद्धां यापुढेंही थोडा काळपर्यंत प्रशिया, ऑस्ट्रिया आणि रशिया यांनीं आपलें दुसरीकडे लूटमार करण्याचें कार्य चालूच ठेवलें होतें. हे तीन देश मिळून तिकडे पोलंडच्या प्राचीन राज्याची अखेर करण्याच्या खटपटींत होते; परंतु इकडे फ्रान्समधील परिस्थिति फारच चिघळत गेल्यामुळें त्यांना या बाजूला लक्ष देणें जरूर झालें. इ. स. १७९२ मध्यें फ्रान्सचें ऑस्ट्रिया व प्रशिया यांच्याशीं युद्ध जुंपलें. या ठिकाणीं मला हें सांगितलें पाहिजे तुला, कीं या सुमारास नेदरलंडमधील बेल्जमचा भाग ऑस्ट्रियाच्या ताब्यांत होता आणि बेल्जमची आणि फ्रान्सची सरहद्द एक होती.

परदेशाचीं सैन्यें या बाजूनें फ्रेंच मुलखांत शिरलीं आणि त्यांनीं फ्रेंच सैन्याचा पराभव केला. तेव्हां लोकांना असें वाटलें, कीं राजाचें या परकी सैन्याशीं संधान असलें पाहिजे; आणि असें वाटण्यास लोकांना आधार नव्हता असें नव्हे. राजाच्या बाजूच्या सर्व लोकांनीं अशा रीतीनें विश्वासघात चालविला असला पाहिजे, असा आतां संशय माजला. अशीं हीं संकटें जेव्हां फ्रेंच जनतेच्या भोंवतीं वाढूं लागलीं, तसतशीं त्यांचीं डोकीं भडकत गेलीं आणि तोल सुटून जाऊन त्यांचा सगळाच गोंधळ झाला. जिकडे तिकडे त्यांना शत्रूचे हेर आणि विश्वासघातकी लोक डोळ्यांसमोर दिसूं लागले. अशा या आणीबाणीच्या प्रसंगीं पॅरिसच्या क्रांतिकारक प्रवृत्तीच्या कम्यूननें सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. राजदरबारानें लोकांविरुद्ध उभारलेल्या बंडाचा बीमोड करण्यासाठीं लष्करी राज्य पुकारल्याची ग्वाही म्हणून कम्यूननें तांबडें निशाण फडकावलें आणि ऑगस्ट १०, १७९२ रोजीं राजाच्या राजवाड्यावर चालून जाण्याचा आपल्या सैनिकांना हुकूम केला. राजानें आपल्या स्विस संरक्षक सैन्याकरवीं गोळ्या घालून या हल्ला करणारांना ठार केलें.

परंतु अखेरीस जय कम्यूनचाच झाला आणि राजाला पदच्युत करून कैद करण्यास तिनें कायदेमंडळाला भाग पाडलें.

हें तांबडें निशाण आजकाल जगांतील सर्व कामगारांचें, समाजवादी लोकांचें आणि कम्यूनिस्ट लोकांचें निशाण झालेलें आहे हें आता सर्वांना ठाऊक आहे. पूर्वीच्या काळीं लोकांच्या विरुद्ध लष्करी कायदा पुकारल्याची ग्वाही म्हणून या निशाणाचा उपयोग करीत असत. माझी पक्की खात्री नाहीं, परंतु माझी अशी समजूत आहे, कीं लोकांच्या वतीनें असा या निशाणाचा उपयोग पॅरिसच्या कम्यूननें केला तोच पहिला; यापुढें मात्र हळूहळू हें तांबडें निशाण कामगारांचें निशाण म्हणून कायम होत गेलें.

राजाला पदच्युत करून आणि कैद करूनच लोकांचें समाधान झालें नाहीं. संरक्षक स्विस सैन्यानें लोकांपैकीं पुष्कळांना गोळ्या घालून ठार करण्याचें काम केलें होतें; त्यामुळें भडकून जाऊन, आणि हेरगिरी करणारे व देशद्रोही, विश्वासघातकी असे लोक जे होते त्यांच्याविषयींच्या संतापामुळें आणि भयामुळेंही पॅरिसच्या जनतेनें ज्यांचा ज्यांचा त्यांना संशय आला, त्यांना पकडून तुरुंग भरण्याचा धूमधडाका सुरू केला. पकडलेल्या लोकांपैकीं पुष्कळ लोक खरोखरच दोषी होते यांत कांहीं संशय नाहीं; परंतु कित्येक निरपराधी लोकांनाही पकडून तुरुंगामध्यें टाकण्यांत आलेलें होतें. कांहीं दिवसांनंतर लोकांमध्यें आणखी एक संतापाची आणि त्वेषाची लाट उसळली; तिच्यासरशीं लोकांनीं या कैद केलेल्या लोकांना बाहेर आणून त्यांच्यावर खटले करण्याचा फार्स केला आणि त्यापैकीं बहुतेकांचा वध करून टाकला. "सप्टेंबर महिन्यांतील कत्तली" म्हणून म्हटल्या जाणाऱ्या या कत्तलींमध्यें एक हजारांहून अधिक माणसें प्राणांस मुकलीं. पॅरिसच्या जनतेला मोठ्या प्रमाणावर रक्तपाताचा हा पहिला

परिचय होता. परंतु त्यांची रक्ताची तहान पूर्ण भागण्यापूर्वी अजून पुष्कळ रक्ताचे पाट वाहावयाचे होते.

या सप्टेंबर महिन्यांतच ऑस्ट्रिया आणि प्रशिया यांच्या फ्रान्सवर स्वारी करून आलेल्या सैन्यावर फ्रेंच सैन्याला पहिला विजय मिळाला. हा विजय वाल्मी येथील छोट्या लढाईत मिळाला.

लढाई म्हणून पाहिली तर ही फारच लहान होती. परंतु तिचे परिणाम फार मोठे झाले. या लढाईतील विजयामुळे फ्रेंच राज्यक्रांतीवरील संकटाचें निवारण झालें.

सप्टेंबर ११, १७९२ रोजीं नॅशनल कन्व्हेन्शनची पहिली बैठक भरली.

कायदेमंडळाच्या जागीं ही आतां एक नवीनच संस्था उदयास आली होती. आपल्या पूर्वीच्या दोन संस्थांच्या मानानें पाहतां या संस्थेनें पुष्कळच पुढचा सुधारणेचा पल्ला गांठला होता. तरी पण कम्यूनच्या मानानें पाहतां ही संस्था अजून मागासलेलीच होती. या कन्व्हेन्शननें पहिली गोष्ट कोणती केली असेल, तर प्रजासत्ताक राज्य जाहीर केलें.

यानंतर लौकरच लुई राजावरचा खटला चालला; त्यामध्यें त्याला देहान्ताची शिक्षा सांगण्यांत आली आणि राजा होण्याच्या पापाबद्दल त्याला २१ जानेवारी, १७९३ या दिवशीं आपल्या डोक्याचें प्रायश्चित्त द्यावें लागलें. त्याला गिलोटिन केलें असें म्हटलें जातें. म्हणजे काय तर गिलोटीन नांवाच्या सुरीखालीं त्याची मान कापण्यांत आली. [आतां या सुरीचा उपयोग छापखान्यांत कागद व पुस्तकाच्या कडा कापण्यासाठीं करतात.] अशा रीतीनें फ्रेंच जनतेनें आपला आणि राजशाहीचा किंवा पूर्वीच्या राजवटीचा संबंध पार धुऊन भाजून काढला. क्रांतीच्या मार्गावरील अखेरचें पाऊल टाकण्याचें धाडस करून यूरपमधील राजे आणि महाराजे यांच्या सत्तेचा त्यांनीं अधिक्षेप केला. आतां परत फिरण्याचा मार्ग त्यांना खुला नव्हता. आणि ज्या सुरीवरचें राजाचें रक्त अद्याप पुसलेलें नव्हतें, त्याच सुरीच्या बैठकीच्या पायरीवर उभा राहून समोर जमलेल्या गर्दीसमोर भाषण करून क्रांतिकालांतील एक महान् पुढारी डांटन यानें यूरपमधील बाकीच्या राजांना स्पष्टच आव्हान दिलें. तो मोठ्या आवेशानें ओरडून म्हणाला, "यूरपच्या राजे लोकांनीं आम्हांला लढाईचें आव्हान देण्याचें धाडस केलेलें आहे; उत्तरादाखल आम्ही त्यांना राजाचें हें मस्तक सादर करतों आहों!"

## १०२
# क्रांति आणि प्रतिक्रांति

*१३ ऑक्टोबर, १९३२*

अशा रीतीनें लुई राजाचा अंत झाला ; परंतु त्याचा अंत होण्यापूर्वींच फ्रान्स देशामध्यें फार मोठा आश्चर्यकारक फरक घडून आला. क्रांतीच्या ज्वरानें त्या देशांतील लोकांचें रक्त नुसतें फणफणत होतें. त्यांच्या नसानसांत जोम उसळून राहिला होता आणि प्रज्वलित उत्साहानें त्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेतला होता. फ्रान्सचें प्रजासत्ताक राज्य चोहों बाजूंकडून उभ्या राहिलेल्या शत्रूंच्या विरुद्ध पाय रोवून संरक्षणासाठीं सज्ज होऊन उभें राहिलें होतें ; बाकीचें सगळें यूरप खंड आणि तेथील राजशाह्या त्याच्या विरुद्ध उभ्या होत्या. या सर्व निःसत्त्व राजेरजवाड्यांना फ्रान्सचें प्रजासत्ताक राज्य हें स्वातंत्र्याच्या सूर्याच्या उन्हाची ऊब मिळालेले देशभक्त लोक कसे लढतात याचा प्रत्यय आणून देणार होतें. आपल्या स्वतःच्या नवीनच प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याच्या रक्षणार्थच केवळ लढण्याचा त्यांचा उद्देश नव्हता ; तर राजे लोक आणि सरदार-वर्ग यांनीं गांजलेल्या सर्व लोकांना स्वातंत्र्य मिळावें यासाठींही त्यांना लढावयाचें होतें. यूरपांतील सर्व राष्ट्रांना फ्रेंच लोकांनीं संदेश पाठविला, कीं तुम्ही आपापल्या राज्यकर्त्यांविरुद्ध बंड करून उठा ; आम्ही सर्व ठिकाणच्या सामान्य जनतेचे मित्र आहोंत आणि सर्व प्रकारच्या राजशाही कारभाराचे शत्रु आहोंत. फ्रेंच लोकाच्या दृष्टीनें फ्रान्स देश–त्यांची पितृभूमि–हा आतां स्वातंत्र्याची जननीच झाला ; तिच्या पूजनार्थ वाटेल तो त्याग करण्यांत त्यांना आनंद वाटूं लागला. अशा या त्यांच्या भयंकर उत्साहाच्या क्षणीं त्याच्यामध्यें एक अत्यंत बहारदार गीत तयार झालें ; हें गीत त्यांच्या ठिकाणच्या धगधगीत भावनांशीं संपूर्ण जुळतें असून त्यांमधून हें गीत गात गात आणि नाचत नाचत रणांगणावर जाण्याची, सर्व अडचणी ओलांडून जाण्याची, कसल्याही संकटाची पर्वा न करण्याची स्फूर्ति त्यांना मिळूं लागली. हें गीत म्हणजे **मार्सेलेज** या नांवानें प्रसिद्ध असलेलें, रूगे डी लिलेच्या ऱ्हाइन नदीवरच्या फ्रेंच सैन्यासाठीं लिहिलेलें रणगीत होय. आजही हेंच गीत फ्रान्सचें राष्ट्रगीत आहे.

**फ्रेंच राष्ट्रगीत ( मार्सेलेज )**

पितृभूमीच्या बच्चांनो या
वैभवदिन आला जवळी !

विरुद्ध अपुल्या ठाकुनि राहत
रक्तपाति जुलमाचा झेंडा
क्रूर, हिंस्र, उद्दाम शिपाई
तुम्ही ऐकतां घोंगावति ना
विशाल तुमच्या शेतभूमिवर ?

सरसावुनि समशेरी त्यांच्या
शत्रांच्या जबड्यांमधिं अपुल्या
दुष्ट धावती बळी घ्यावया
जिवलग अपुल्या मालकिणींचे
आणि पोटच्या मुलामुलींचे !

नागरिकांनो शस्त्र करीं घ्या
करा सघटित सैन्यदलें
चाल करुनि जा चाल तयांवर,
सारी अपुली जमीन भिजवा
अशुद्ध रक्तें सर्वांच्या या !

पितृभूमीच्या पुण्य प्रेमा !
मार्ग दाखवी बळ दे शत्रां
सूड घ्यावया आसावलिं जीं !
स्वतंत्रते प्रिय स्वतंत्रते करि
साथ तुझ्या रक्षणिं लढत्यांना !

अशा रीतीनें हे लोक राजे लोकांना दीर्घ आयुष्य मिळो अशा प्रकारचीं निरर्थक गीतें गात बसले नाहींत. त्याच्याऐवजीं मायभूमीबद्दलच्या पवित्र भक्तीनें भरलेलीं आणि स्वातंत्र्याबद्दलचीं, त्यांना अत्यंत प्रिय असलेल्या स्वातंत्र्याविषयींचीं गाणीं त्यांच्या जिभेवर नाचत होतीं.

क्रांतीच्या काळांत लोकांना भयंकर हाल सोसावे लागले. पुरेसें अन्न नव्हतें, पुरेशीं वस्त्रप्रावर्णें नव्हतीं; बूट, जोडे यांचा तर तुटवडा होताच; पण सैन्याजवळ पुरेशीं हत्यारेंसुद्धां नव्हतीं. कित्येक ठिकाणीं सैन्यासाठीं बूट, जोडे सामान्य नागरिकांकडून मागून घेण्यांत आले. सैन्याला ज्या प्रकारच्या अन्नाची गरज होती, परंतु जें त्यांना मिळूं शकत नव्हतें अशा पुष्कळ प्रकारचें अन्न फ्रेंच देशभक्तांनीं स्वतः होऊन सैन्याला पुरविलें. त्यासाठीं कित्येक लोक स्वतः पुष्कळसे दिवस उपासही करीत. कातडीं, स्वयंपाकाचीं भांडीं, तवे, बादल्या वगैरे नाना तऱ्हेच्या घरगुती वस्तू साऱ्या जमा करण्याचा सपाटा सुरू झाला आणि मग पॅरिसमध्यें रस्तोरस्तीं अनेक भट्ट्या उघडून त्यांत सामान्य लोक घण मारण्याचें काम करूं लागले; नागरिकांपैकीं पुरुषच नव्हे, तर स्त्रियासुद्धां त्या ठिकाणीं हत्यारें तयार करण्याच्या कामीं श्रम घेऊं लागल्या. हो, हाल तर पुष्कळच होत होते खरे; पण प्रत्यक्ष फ्रान्स, पितृभूमि, रकटीं पाघरलेली परंतु डोक्यावर स्वातंत्र्याचा मुकुट विराजत असलेली सुंदर फ्रेंच मायभू संकटांत असतांना, तिच्या दाराशीं शत्रु खडा असतांना, हालांची काय पर्वा ? म्हणून फ्रान्समधील सारा तरुणवर्ग आपल्या मायभूच्या रक्षणार्थ धांवला आणि तहान व भूक यांची फिकीर न करतां शत्रूंवर चाल करून त्यांनीं विजय मिळविला. कार्लाइलनें लिहिलें आहे, "सर्वच्या सर्व जनतेच्या ठिकाणीं एकच एक अशी निष्ठा उत्पन्न झाल्याचें आपणांस क्वचितच आढळून येतें आणि जेथें कोठें ती आढळून येते तेथें ती

फक्त खाण्यापिण्याच्या आणि वापरण्यासवरण्याच्या जड वस्तूंवरच अशी निष्ठा सर्व लोकांची असलेली आढळते; परंतु ज्या काळीं जनतेमध्यें अशा प्रकारची फ्रान्समधल्या-सारखी निष्ठा उत्पन्न होते, त्या काळीं त्यांचा इतिहास अंतःकरण खळबळवून टाकणारा आणि प्रशंसनीय होतो." फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळच्या सर्व स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं अशी एका महान् कार्याबद्दलची निष्ठा जागृत झाली होती. त्या संस्मरणीय दिवसांत त्यांनीं जो इतिहास घडाविला आणि स्वार्थत्यागपूर्वक ज्या हालअपेष्टा भोगल्या त्यांच्या स्मरणानें आजही आपल्या अंतःकरणांत खळबळ माजते आणि आपली नाडी जलद चालूं लागते.

क्रांतिकारकांचें हें नव्या उमेदवारांचें सैन्य; त्याला पुरेशी कवाईतसुद्धां शिकायला सवड मिळालेली नव्हती; तरीपण याच सैन्यानें फ्रेंच भूमीवरून सर्व परदेशी सैन्याला हांकून काढलें आणि त्यानंतर नेदरलंडला (बेल्जम्, हॉलंड वगैरे) ऑस्ट्रियाच्या गुलामगिरींतून सोडविलें. या वेळीं मात्र हॅप्स्बर्ग घराण्याला नेदरलंडला कायमचा रामराम ठोकावा लागला. पुन्हां त्याचे पाय त्या भूमीला लागले नाहींत. यूरप खंडांतील शिकलेल्या धंदेवाईक सैन्याचासुद्धां या क्रांतिकारकांच्या नव्या उमेदवारां-पुढें टिकाव लागेना. तो शिकलेला धंदेवाईक शिपाई केवळ पैशासाठीं आणि म्हणून आपला जीव राखून लढे.

क्रांतिकारकांचा नवा उमेदवार हा ध्येयप्राप्तीसाठीं लढत होता आणि म्हणून जयप्राप्तीसाठीं तो वाटेल तें दिव्य करावयाला तयार होता. धंदेवाईक शिपायांजवळ बाडबिछाइतीचें ओझें फार; त्यामुळें त्यांची हालचाल सावकाश व्हावयाची; तर क्रांतिकारकांच्या शिपायांजवळ सामानच जवळजवळ कांहीं नव्हतें, त्यामुळें तो इकडून तिकडे झपाट्यानें हालचाल करूं शके. अशा रीतीनें क्रांतिकारकांच्या सैन्याची ही एक नवीनच जात निर्माण झालेली असून त्यांनीं लढाईचेंही एक नवीनच तंत्र निर्माण केलेलें होतें. जुन्या लढाईच्या पद्धतींत या सैन्यानें पुष्कळच बदल केला; यापुढें शंभर वर्षेपर्यंत यूरप खंडांत जीं सैन्यें निर्माण झालीं तीं सर्व कांहीं अंशीं फ्रेंच क्रांतिकारकांच्या या नव्या सैन्याच्या धर्तीवर निर्माण झालीं; परंतु या त्यांच्या सैन्याचें खरें बल त्यांच्या उत्साहांत आणि साहसी वृत्तींत, बेडरपणांत सांठविलेलें होतें. या सैन्याचें ब्रीदवाक्य म्हणून नव्हे, तर या वेळच्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या सगळ्याच प्रवृत्तीचें प्रतीक म्हणून डांटनचें पुढील सुप्रसिद्ध वाक्य आपणांस सांगतां येईल :

'मातृभूमीच्या शत्रूंचा पराभव करण्यासाठीं आमच्या ठिकाणीं धैर्य–हिंमत–पाहिजे; अधिकाधिक हिंमत पाहिजे; सदैव टिकणारी हिंमत पाहिजे; धैर्य, अधिक धैर्य, अखेरपर्यंत टिकणारें धैर्य पाहिजे!'

लढाई मात्र वाढतच चालली. इंग्लंडजवळ आरमार असल्यामुळें इंग्लंड देश हा फार प्रबळ शत्रु ठरला.

फ्रान्सच्या प्रजासत्ताक राज्यानें जमिनीवर लढणारें फार मोठें आणि बलवान्

सैन्य निर्माण केलेलें होतें; परंतु समुद्रावर अजून त्यांचा दम चालत नव्हता. इकडे इंग्लंडनें सगळ्या फ्रेंच बंदरांची कोंडी करण्याच्या प्रयत्नाला सुरुवात केली.

दुसरी गोष्ट म्हणजे पळून गेलेले जे फ्रेंच लोक इंग्लंडमध्यें गर्दी करून राहिलेले होते त्यांनीं इंग्लंडमधूनच लाखों खोट्या असाइना, म्हणजे फ्रान्सच्या प्रजासत्ताक राज्याच्या चलनी नोटा, फ्रान्समध्यें पाठविण्याचा सपाटा सुरू केला. अशा रीतीनें फ्रेंचांची चलनपद्धति आणि सगळीच आर्थिक व्यवस्था नष्ट करून टाकण्याचा उद्योग त्यांनीं आरंभिला.

फ्रेंच लोकांच्यापुढें आतां परदेशांशीं करावी लागणारी लढाई, याशिवाय दुसरा विषय नव्हता. देशाची सगळी शक्ति या एका कामांत खर्ची पडत होती. अशा या लढाया क्रांतीच्या दृष्टीनें हानिकारक – धोक्याच्या – असतात; कारण यामुळें समाज-सुधारणेच्या प्रश्नांवरचें लक्ष निघून जाऊन तें सगळेंच परदेशी सैन्यांशीं लढण्यावरच तेवढें केंद्रित होतें आणि अशा रीतीनें क्रांतीचा जो खरा हेतु तोच फसल्यासारखा होतो. क्रांतीच्या ज्वराची जागा मग युद्धज्वर हा घेतो. फ्रान्समध्यें हाच प्रकार घडला आणि लौकरच आपणांस दिसेल कीं या प्रकारची अखेरची पायरी म्हणजे फ्रान्समध्यें एका महान् लष्करी अमलदाराची सर्वाधिकारशाही स्थापन झाली.

बाहेरच्या युद्धाच्या जोडीला अंतर्गत भानगडीही होत्याच. फ्रान्सच्या पश्चिम भागांतील वेंडी प्रांतांत एक मोठें शेतकऱ्यांचें बंड उद्भवलें होतें; त्याचें कारण एक तर येथील शेतकऱ्यांची नवीन सैन्यामध्यें शिरण्याची इच्छा नव्हती आणि शिवाय राजपक्षाचे पुढारी आणि परदेशांत पळून गेलेले लोक यांचेही प्रयत्न या कामांत भरीला होतेच.

क्रांतीचीं सर्व सूत्रें आणि कार्यक्रम हा खरोखर सर्वच पॅरिसमधील फ्रेंच नागरिकांच्या हातांमध्यें होता.

शहरामध्यें हे जे फेरबदल झपाट्यानें घडून येत होते त्यांचा सगळा अर्थ अजून शेतकरी-वर्गाच्या लक्षांत नीटपणें येऊं लागलेला नव्हता; त्या मानानें ते मागेंच पडत असत. वेंडीमधील हें बंड मोठ्या क्रूरपणानें दडपून टाकण्यांत आलें. युद्धाच्या काळीं विशेषतः आपापसांतील यादवीच्या काळीं मनुष्याच्या ठिकाणच्या वाइटांतल्या वाईट भावना जागृत होऊन प्रभावी झालेल्या असतात; त्याच्या ठिकाणची दयाबुद्धि दूर कोठें तरी रानोमाळ भटक्या मारीत हिंडत असते. तिला कोणीच कोठें थारा देत नाहीं. लिऑन्स बंदरांतही प्रति-क्रांतिकारकांचें एक बंड झालें. हेंही बंड मोडून काढलें गेलें. त्या वेळीं शिक्षा म्हणून लिऑन्ससारखें विशाल शहर नष्ट करून टाकावें असा विचार पुढें मांडण्यांत आला होता. "लिऑन्सनें स्वातंत्र्याच्या विरुद्ध युद्ध केलें; लिऑन्स शहर मरणच पावलें!" अशा घोषणा करण्यात आल्या होत्या. सुदैवानें हा विचार अमलांत आला नाहीं; परंतु पुढें लिऑन्स शहराला फारच हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या.

दरम्यान इकडे पॅरिसमध्यें काय घडामोडी चाललेल्या होत्या ? तेथें सत्ता कोणाच्या हातामध्यें होती ? नवीनच निवडून आलेली कम्यून (नगरसभा) आणि तिचे पोटविभाग यांचेंच वर्चस्व अजून साऱ्या शहरच्या कारभारावर होतें. नॅशनल कन्व्हेन्शनमध्यें निरनिराळ्या पक्षांमध्यें सत्तेसाठीं झटापट चालू होती. गिरोंदे-पक्षाचे म्हणजे प्रजासत्ताक-राज्यवादी मवाळ लोक आणि जॅकोबिन् पक्षाचे प्रजासत्ताकराज्यवादीच पण जहाल लोक यांचे हे पक्ष त्यांमध्यें विशेष प्रमुख होते. यांमध्यें जॅकोबिन् पक्षाचा जय होऊन जून १७९३ च्या सुरुवातीला गिरोंदे-पक्षाच्या बहुतेक सभासदांची कन्व्हेन्शनमधून हकालपट्टी झाली. यानंतर आतां सरंजामदारांचे, जमीनमालकांचे सर्व हक्क व सवलती काढून घेण्याचा अखेरचा टप्पा गांठला गेला आणि जमीनदारांच्या मालकीची सर्व जमीन काढून घेऊन ती स्थानिक कम्यून्सच्या अथवा लोकसभांच्या स्वाधीन करण्यांत आली; म्हणजे काय तर जमीन आतां सामुदायिक मालकीची करण्यांत आली.

जॅकोबिन् पक्षाच्या वर्चस्वाखालीं आलेल्या कन्व्हेन्शननें यानंतर मग दोन समित्या स्थापन केल्या; एक सार्वजनिक हितकारक समिति व दुसरी सार्वजनिक संरक्षक-समिति. या समित्यांच्या हातीं कम्यून्सनें फार मोठी सत्ता दिलेली होती. या दोन्ही समित्या फार बलिष्ठ झाल्या; त्यांमध्येंही सार्वजानिक संरक्षक-समितीचें बळ तर फारच वाढलें आणि सगळ्यांना तिची भीति वाटूं लागली. या समितीनें कन्व्हेन्शनला एकेक पायरी रेटीत रेटीत नेऊन अखेरीस राज्यक्रांतीचें रूपांतर अत्यंत भयंकर अशा अत्याचारी वावटळींत केलें.

जनतेच्या मनावरची भीतीची पकड अद्यापिही कमी झालेली नव्हती; सभोंवतीं घेरा घालून बसलेल्या परदेशच्या सैन्याची भीति तर त्यांना होतीच; पण त्याचप्रमाणें हेरांची आणि विश्वासघातकी लोकांचीही भीति होती; याची संख्याही फारच मोठी होती.

भीतीमुळें मनुष्य आंधळा होतो, बेभान होतो; त्यामुळें कन्व्हेन्शननेंही या एकसारख्या ग्रासून राहिलेल्या भीतीच्या भुताला बळी पडून १७९३ च्या सप्टेंबर महिन्यामध्यें एक अत्यंत भयंकर कायदा केला. हा कायदा म्हणजे संशयित लोकां-संबंधींचा कायदा. या कायद्यामुळें आतां कोणाही संशयित माणसाचें जीवन सुरक्षित राहिलें नाहीं आणि ज्यांच्याविषयीं संशय येणार नाहीं अशा व्यक्ती तरी कोण सांपडणार होत्या ? यानंतर एक महिन्यानेंच गिरोंदे पक्षाच्या बावीस सभासदांचा खटला क्रांतिकारकांच्या न्यायासनापुढें चालला आणि ताबडतोब त्यांना देहांताची सजा देण्यांत आली.

अशा रीतीनें ही अत्याचारी वावटळ सुरू झाली. रोजच्या रोज ज्यांना देहान्ताची शिक्षा झालेली आहे अशा लोकांचा प्रवास गिलोटिनच्या सुरीकडे होऊं लागला. रोजच्या रोज या बळी जाणाऱ्या लोकांनीं भरलेल्या गाड्या—त्यांना टंब्रिल्स म्हणत असत—पॅरिसच्या खडबडीत दगडी रस्त्यावरून ओझ्याखालीं कचकच करीत आणि

धडधडत जाऊं लागल्या. रस्त्यांतील लोक बिचारे या लोकांना वाटेल त्या प्रकारें वांकुल्या दाखवीत असत.

कन्व्हेन्शनमध्यें सत्ताधारी गटाविरुद्ध ब्र काढणें हें सुद्धां आतां धोक्याचें होऊन बसलें; कारण असें केलें कीं बोलणारा मनुष्य झालाच संशयित इसम; संशयांतून पुढें खटला आणि खटल्यांतून पुढें गिलोटिनची सुरी हा क्रम ठरलेलाच.

सार्वजनिक-हित-समिति आणि सार्वजनिक-संरक्षण-समिति यांच्याच हातांत आतां कन्व्हेन्शनचा सगळा कारभार आलेला होता. या समितींच्या हातीं आतां कोणाला जिवंत ठेवावें आणि कोणाचा जीव घ्यावा अशा प्रकारची सगळी सत्ता आलेली असून त्यांत इतर कोणालाही एवढासा सुद्धां हिस्सा देण्याची त्यांची तयारी नव्हती. त्याचा पॅरिसच्या कम्यूनलासुद्धां विरोध सुरू झाला; जो कोणी त्यांच्याशीं सहमत नसेल त्याला विरोध करावयाचा, असाच खरोखर त्यांचा क्रम चालू झाला. सत्तेच्या ठिकाणीं मनुष्याचें मन दुष्ट बनविण्याची फार विलक्षण शक्ति असते. तेव्हां आतां या समित्यांनीं जी पॅरिसची कम्यून आपल्या पोटविभागासह आजपर्यंत क्रांतीचा कणाच जणुं होती त्या कम्यूनलाच नष्ट करून टाकण्याचा उद्योग आरंभिला. प्रथम त्यांनीं पोटविभाग चुरडून टाकून कम्यूनचे आधारस्तंभ नष्ट केले. आणि अखेरीस कम्यूनवरही तोच प्रसंग आणला. अशा रीतीनें पुष्कळदां क्रांति आपल्या स्वतःलाच खाऊन टाकतांना आढळते. पॅरिसच्या निरनिराळ्या भागांतील कम्यूनचे हे पोटविभाग म्हणजे जनता आणि वरचे सत्ताधारी लोक यांचा संबंध आणून तो टिकवणारे जणुं दुवेच होते. हे पोटविभाग म्हणजे जणुं ज्यांमधून क्रांतीच्या शरीरांत तांबडें रक्त वाहात होतें अशा रक्तवाहिन्याच होत्या; त्यांमधूनच क्रांतीला शक्ति आणि जीवन प्राप्त होत होतें. १७९४ च्या आरंभीं अशा या पोटविभागांचा आणि कम्यूनचाही जो नाश करण्यांत आला त्यामुळें हा जीवनप्रवाहच बंद केल्यासारखें झालें.

यापुढें नॅशनल कन्व्हेन्शन आणि या पोटसमित्या या संस्था वरच्या राज्यकर्त्यांच्या हातांतील यंत्रें होऊन राहिल्या; त्यांचा लोकसमाजाशीं जिवंत संबंध शिल्लक राहिला नाहीं; सत्ता हातांत आलेले सर्वच लोक करतात त्याप्रमाणें या समित्यांनीं लोकांवर आपली इच्छा जबरदस्तीच्या अत्याचारी मार्गानें लादण्याचा क्रम सुरू केला. अशा रीतीनें खऱ्या क्रांतिकाळाचा अंत होण्याच्या कार्याची सुरुवात झाली. आणखी एक सहा महिनेपर्यंत या समित्यांची ही अत्याचारी वावटळ चालू राहायची होती आणि क्रांतीचा गाडा कसा तरी रखडत पुढें चालावयाचा होता; परंतु तिचा अखेरचा क्षण आतां दिसायला लागला होता.

या सगळ्या धामधुमीच्या आणि वावटळीच्या काळांत फ्रान्समध्यें आणि पॅरिसमध्यें पुढारी लोक कोण कोण होते? पुष्कळच नांवें प्रामुख्यानें डोळ्यांपुढें उभीं राहतात. उदाहरणार्थ, कॅमिल डेस्मोलिन (कामील डेमोले) हा गृहस्थ घे. यानेंच पुढें होऊन १७८९ मध्यें बॅस्टीलच्या तुरुंगावर हल्ला चढविला आणि इतरही पुष्कळ

प्रसंगीं फार लक्षांत राहण्यासारखी कामगिरी केली. अत्याचारी वावटळीच्या काळामध्यें सरकारी धोरण दयाळूपणाचें असावें असा त्याचा आग्रह होता; परंतु त्यामुळेंच म्हणा, तो स्वतःच गिलोटीनला बळी पडला आणि थोड्याच दिवसांत त्याची तरुण पत्नी ल्यूसिल हिलाही तोच मार्ग पत्करावा लागला; त्याच्यामागें जिवंत राहण्याऐवजीं तिनें मरणच अधिक पसंत केलें. फेबर डेग्लांटिन नांवाचा कवि आणि ज्याच्यामुळें लोकांच्या अंतःकरणाचा थरकांप उडत असे असा सरकारी वकील फूक्ये टिनव्हील यांचींही नांवें लक्षात ठेवण्यासारखीं आहेत. मॅरट ( मारा झां पाउल ) हा या क्रांतीच्या काळच्या कर्तबगार लोकांमध्यें सर्वांत अधिक कर्तबगार आणि सर्वांत अधिक श्रेष्ठ दर्जाचा मनुष्य होता असें म्हटलें तरी चालेल; शार्लट कॉर्डे नांवाच्या एका तरुण मुलीनें सुरा भोंसकून त्याला ठार केलें. डान्टनचा तर यापूर्वी दोन वेळां मीं उल्लेख केला आहे; हा मोठा शूर, सिंहासारखा लढवय्या होता; श्रेष्ठ दर्जाचा आणि लोकप्रिय वक्ता होता; तरीपण शेवटीं गिलोटिनची सुरी त्याच्याही कपाळची चुकली नाहींच. राब्सपियरचें नांव या सर्वांत अधिक लोकप्रसिद्ध आहे. जॅकोबिन पक्षाचा हा पुढारी असून त्या अत्याचारी वावटळीच्या दिवसांत कन्व्हेन्शनचा जणुं तो सर्वाधिकारीच होता. इतिहासांत या अत्याचारी वावटळीचें जणुं तो मूर्तिमंत प्रतीकच होऊन राहिलेला असून त्याचें नांव घेतांच कित्येकांच्या अंगाचा थरकांप होतो, किळस येते; तरीपण या माणसाच्या प्रामाणिकपणाबद्दल आणि देशभक्तीबद्दल बिलकुल वाद नाहीं. त्याची "कसल्याही लांचलुचपतीला किंवा वजनाला, किंवा विलासांना बळी न पडणारा", "अभेद्य" अशी ख्याति होती. त्याची स्वतःची राहणीही अतिशयच साधी होती; परंतु त्याला स्वतःच्या पलीकडे जवळजवळ दुसरें जगच माहीत नव्हतें; इतका तो सर्वस्वीं आत्मनिष्ठ होता आणि स्वतःहून ज्याचें थोडेंसुद्धां मत निराळें असेल तो प्रत्येक मनुष्य फ्रान्सच्या प्रजासत्ताक राज्याचा आणि क्रांतीचा द्रोही होय, अशीच जणुं त्याची भावना होती. क्रांतीच्या कार्यांत त्याचे सहकारी असलेले कित्येक श्रेष्ठ पुरुष त्याच्याच आज्ञेवरून गिलोटिनखालीं गेले; शेवटीं या प्रकाराचा इतका कळस झाला, कीं जी कन्व्हेन्शन आतांपर्यंत इतकी मेंढरासारखी त्याच्या पावलावर पाऊल टाकून जायला तयार होती, तीच कन्व्हेन्शन त्याच्यावर उलटली. तिनें त्याला जुलमी आणि अनियंत्रित राज्यकर्ता असें ठरविलें आणि त्याचा व त्याच्याबरोबरच त्याच्या अनियंत्रित कारभाराचा अंत केला.

क्रांतीचे हे सर्व पुढारी अगदीं तरुण वयाचे होते. म्हाताऱ्या लोकांच्या हातून क्रांत्या क्वचितच घडून येत असतात. हे सर्व पुढारी फार महत्त्वाचे लोक होते हें जरी खरें असलें, तरी त्यांपैकीं कोणाही एका व्यक्तीच्या हातांत, प्रत्यक्ष राब्सपियरच्या हातांत सुद्धां, क्रांतीच्या या महान् प्रयोगाचीं सर्व सूत्रें नव्हतीं. फार कशाला, घडून आलेल्या क्रांतीचेंच खरोखर त्याना भय वाटून तिच्या कचाट्यांतून निसटण्यासाठीं जणुं ते आपलें अंग चोरीत होते; क्रांति ही त्यांनीं घडवून तर आणलीच नव्हती,

परंतु क्रांतीच्या पुढील कार्यक्रमाचीं सूत्रें सुद्धां त्यांच्या हातामध्यें नव्हतीं. इतिहासामध्यें पुष्कळदां जे निव्वळ सृष्टिक्रमानुसार मानवी भूकंप किंवा उत्पात घडून येत असतात तसला एक उत्पात म्हणजे ही फ्रेंच राज्यक्रांति होती; अर्थात् असा हा उत्पात घडून येण्यापूर्वी दीर्घकालपर्यंत टिकून राहणारी दैन्यावस्था आणि अनियंत्रित राज्यसत्ता यांच्यामुळें आणि सामाजिक परिस्थितीमुळेंही हळूहळू केव्हां तरी असा हा भडका उडाल्यावांचून सुटका नाहीं अशा प्रकारची पूर्वतयारी व्हावी लागत असते.

कन्व्हेन्शननें आपसांतील तंटे आणि गिलोटिन सुरी चालविणें याहून दुसरें कांहीं केलेंच नाहीं अशी मात्र कल्पना करून घेऊं नको. खऱ्या क्रांतीमधून प्रस्फुरित झालेली शक्ति ही नेहमींच फार मोठी असते. अर्थात् यापैकीं पुष्कळशी शक्ति परकीय देशांशीं लढण्यांत खर्च झाली हें खरें; परंतु तरीही जी शिल्लक राहिली ती कांहीं थोडीथोडकी नव्हती. या शक्तीच्या बळावर पुष्कळच विधायक कार्य करण्यांत आलें. यामध्यें विशेष म्हणजे राष्ट्रांतील शिक्षणाच्या सर्व पद्धतीमध्येंच आमूलाग्र सुधारणा करण्यात आली. आज शाळेंत सर्व मुलें शिकतात ती मोजमापाची मेट्रिक (दशमान) पद्धति याच वेळीं सुरू करण्यांत आली. या पद्धतीमुळें वजनामापाचें कितीही लहानमोठें काम अगदीं सुलभपणें करण्याची सोय झाली. सुधारलेल्या जगामध्यें आज जवळजवळ सर्वत्र या पद्धतीचा स्वीकार करण्यांत आलेला आहे. पुराणमतवादी इंग्लंड देश मात्र अजूनही आपल्या जुन्यापुराण्या अवजड अशा यार्ड, फर्लांग, पौंड आणि हंड्रेडवेट या व असल्या वजनामापानाच चिकटून राहिलेला आहे. आपल्या हिंदुस्थानमध्येंही या गुंतागुंतीच्या वजनामापाचेंच ओझें वाहावें लागत आहे; आणखी त्यांत भर घालावयाला आमचीं देशी शेर, मण वगैरे मापें आहेतच.

मोजमापांची ही नवी मेट्रिक पद्धति जशी सुरू झाली, त्याच विचारसरणीचा परिणाम म्हणून नवीन कालगणनेसही सुरुवात याच वेळीं झाली. २२ सप्टेंबर १७९२ रोजीं प्रजासत्ताक राज्याची घोषणा करण्यांत आली. आठवडा सात दिवसांचा होता तो आतां दहा दिवसांचा करण्यांत आला; दहावा दिवस हा सुटीचा दिवस ठरला. महिने मात्र अजून बाराच शिल्लक राहिले; परंतु त्यांचीं नांवें मात्र बदलण्यांत आलीं. फेबर डेग्लांटिन या कवीनें बदलत्या ऋतुमानाला आणि हंगामाना अनुसरून नवीं मोठीं मधुर नांवें या महिन्यांना दिलीं. वसंत ऋतूंतील तीन महिन्यांना त्यानें **जर्मिनल** (अंकुरक), **फ्लोरिअल** (पुष्पक) व **प्रायेरियल** (शस्यक) अशीं नांवें दिलीं. उन्हाळ्याच्या तीन महिन्यांना मेसिडॉर (कापणीचा महिना), थर्मिडॉर (ग्रीष्म) आणि फ्रुक्टिडॉर (फलमास) हीं नांवें मिळालीं; व्हेंडेमायेर (द्राक्षारसमास), ब्रूमायेर (धुक्याचा महिना) व फ्रीमायेर (हिममास) हे तीन महिने मिळून शारदीय काळ झाला आणि निव्होस (बर्फाचा), प्लुव्हिओज (वर्षामास) व व्हेंटोज (वादळी महिना) हे तीन महिने मिळून हिंवाळा. ही कालगणना प्रजासत्ताक राज्याच्यामागें कांहीं फार दिवस टिकली नाहीं.

क्रांतीच्या या दिवसांत एकदा ख्रिस्ती धर्माविरुद्ध आणि बुद्धिवादाचीच प्रतिष्ठापना करण्यासाठीं म्हणून जोराची चळवळ उद्भवली होती. सत्याचीं मंदिरें बांधण्यांत आलीं. पॅरिस शहरांतून अंतर्गत प्रांतांतही ही चळवळ मोठ्या झपाट्यानें पसरत गेली. १७९३ च्या नवंबर महिन्यांत पॅरिस येथें नॉट्रेडेम कॅथीड्रलमध्यें स्वतंत्रता आणि बुद्धि यांना देवता कल्पून त्यांचा मोठा उत्सव करण्यांत आला. या प्रसंगीं एका सुंदर स्त्रीला बुद्धीची भूमिका देण्यांत आलेली होती; पण या असल्या बाबतींत राब्सपियर हा अगदींच जुन्या मतांचा होता. त्याला ही चळवळ पसंत नव्हती. त्याच-प्रमाणें डांटनलाही ती पसंत नव्हती. जॅकोबिन पक्षाच्या हातामधील सार्वजनिक हित-समितीचाही या चळवळीला विरोधच होता. यामुळें या चळवळीचे पुढारी गिलोटिनला बळी देण्यांत आले. स्वतंत्रता व बुद्धि यांच्या या उत्सवाला तोडीस तोड म्हणून राब्सपियरनें दुसरा एक परमेश्वराचा उत्सव म्हणून घडवून आणला. कन्व्हेन्शनमध्यें मतें घेऊन असें ठरविण्यांत आलें, कीं फ्रान्स देशाची परमेश्वरावर श्रद्धा आहे! त्यामुळें रोमन कॅथॉलिक धर्मानें हळूच फिरून एकदां आपला शिरकाव करून घेतला व पुन्हां एकदा त्याची चलती सुरू झाली.

पॅरिसची पोटविभागमंडळें आणि पॅरिसची कम्यून यांचा नाश केल्यानंतर प्रकरण लौकरच हातघाईवर आलें. जॅकोबिन पक्षाला आतां कोणी प्रतिस्पर्धी शिल्लक राहिलेला नव्हता. साऱ्या राज्यव्यवस्थेचा ताबा त्यांच्या हातीं आलेला होता; परंतु लौकरच त्यांच्या पक्षांतच तंटे उद्भवले. स्वतंत्रता आणि बुद्धिवाद यांच्या उत्सवामध्यें भाग घेतल्याबद्दल हेबर्ट आणि त्यांचे पाठिराखे यांचा गिलोटीनखालीं वध करण्यांत आला त्या वेळेपासून जॅकोबिन पार्टीमध्यें पहिली फार मोठी फूट पडली. यानंतर पाठो-पाठच फेबर डेग्लांटीन गिलोटीनला बळी पडला आणि १७९४ च्या प्रारंभाला डांटन, कॅमिल डेस्मोलिन यांनीं आणि इतर कांहीं जणांनीं राब्सपियर हा गिलोटीनखालीं वाजवीपेक्षां फार जास्त माणसें पाठवितो अशी तक्रार केली. तेव्हां त्यांचींच डोकीं उडविण्यांत आलीं. लोक कदाचित् कांहीं मध्येंच अडथळा करतील या भीतीनें एप्रिल १७९४ मध्यें डांटनचा वध जेव्हां अगदींच घाईघाईमध्यें उरकून टाकण्यांत आला, तेव्हांच पॅरिसमधील आणि अंतर्गत भागांतील पण जनता समजली, कीं क्रांतीचे दिवस संपले. त्यांनीं ओळखलें, कीं क्रांतीचा सिंह पडला आणि एका क्षुद्रबुद्धि गटाच्या हातीं सगळी सत्ता आली. या गटाच्या भोंवतीं शत्रूंचें जाळें पसरलेलें होतें; सामान्य जनतेशीं त्याचा संबंध तुटून गेलेला होता; त्यामुळें या गटाला आपल्या डोळ्यांपुढें जिकडे तिकडे देशद्रोहाचें भूत नाचतांना दिसे आणि अत्याचाराची ती वावटळ अधिकच तीव्र करण्याविना स्वसंरक्षणाचा दुसरा कांहींच मार्ग या गटाला राहिला नाहीं.

म्हणून ती अत्याचाराची वावटळ अधिकच भयंकर वाढली आणि गिलोटीन-कडे बळी द्यावयाचीं माणसें घेऊन जाणाऱ्या टंब्रिल गाड्या पूर्वीपेक्षांही अधिक खच्चून

भरून येऊं लागल्या. जून महिन्यांत आणखी एक कायदा करण्यांत आला. त्याचं नाव प्राएरिअल महिन्याच्या बाविसाव्या तारखेचा कायदा. लोकांमध्यें फूट पाडण्याच्या हेतूनें किंवा खळबळ माजविण्याच्या हेतूनें, लोकांचा धीर व नीतिमत्ता बिघडविण्याच्या हेतूनें अगर लोकांची सदसद्विवेकबुद्धि खची करण्याच्या हेतूनें खोट्या बातम्या पसरविणें हा या कायद्यान्वयें गुन्हा ठरवून त्याला फांशीची शिक्षा मुकर करण्यांत आली. राब्सपिअर आणि त्याचे खुनी साथीदार यांच्याशीं ज्या कोणाचा मतभेद होईल त्याला सहज पकडण्याजोगें या कायद्याचें हें जाळें मोठें विशाल होतें. या कायद्याखालीं पुष्कळशा लोकांचा खटला एकाच वेळीं चालविण्यांत येई व त्या सगळ्याना शिक्षा देण्यांत येत. एकदां राजपक्षीय व इतर निरनिराळ्या प्रवृत्तींच्या १५० आरोपींना एकाच खटल्यांत गोंवून काम चालविण्यांत आल्याचा दाखला सांपडतो.

ही अत्याचाराची ताजी वावटळ सेहेचाळीस दिवसपर्यंत चालू राहिली. शेवटीं थर्मिडॉर महिन्याच्या नवव्या तारखे दिवशींच्या ( २७ जुलै १७९४ ) स्क्रूचा पेंच उलटा फिरूं लागला, चक्र पालटलें. कन्व्हेन्शन राब्सपिअर व त्याचे साथीदार यांच्यावरच एकाएकीं उलटली आणि " जुलमी राज्यकारभार करणाऱ्यांचा निःपात असो " अशी घोषणा करून त्यांनीं त्या सर्वांना पकडलें. राब्सपिअरला त्यांनीं भाषण करायलासुद्धां परवानगी दिली नाहीं. ज्या गिलोटीनकडे राब्सपिअरनें इतक्या असंख्य लोकांना आतांपर्यंत पाठविलें होतें, त्याच गिलोटीनपाशीं टंब्रिलमधूनच दुसऱ्याच दिवशीं राब्सपिअरला नेण्यांत आलें आणि अशा रीतीनें फ्रेंच राज्यक्रांतीची अखेर झाली!

राब्सपिअरच्या मृत्यूनंतर प्रतिक्रांतीचा झपाटा सुरू झाला. मवाळ लोक आतां पुन्हां पुढें आले; या लोकांनीं आतां आपल्या बाजूनें जॅकोबिन पक्षीयावर हल्ला चढविला आणि त्याचा कांटा काढण्याला सुरुवात केली. तांबड्या प्रलयानंतर ज्याला पांढरा प्रलय म्हणतात तो आतां सुरू झाला. यानंतर पंधरा महिन्यानीं १७९५ च्या ऑक्टोबर महिन्यांत कन्व्हेन्शनची इतिश्री होऊन पांच लोकांच्या डायरेक्टोरेटच्या—संचालक मंडळाच्या—हातीं राज्य आलें. हें राज्य म्हणजे अगदीं निखालस धानिक मध्यम वर्गाचें राज्य होतें; या राज्यानें सामान्य जननेला दडपून टाकण्याचा स्वाभाविकपणेंच प्रयत्न केला. या डायरेक्टोरेटचें राज्य फ्रान्सवर सुमारें चार-सव्वाचार वर्षें चाललें. इतक्या या अंतर्गत कटकटी आणि भानगडी चालू होत्या तरी फ्रान्सच्या प्रजासत्ताक राज्याची शक्ति आणि प्रतिष्ठा अजूनही इतकी बलवत्तर होती, कीं परदेशामध्यें या प्रजासत्ताक राज्याची लढाई विजयीच होत होती. या राज्याविरुद्ध प्रत्यक्ष कांहीं बंडेंही उद्भवलीं होतीं, पण तीं सर्व मोडून काढण्यांत आलीं. अशा या बंडांपैकीं एक बंड प्रजासत्ताक राज्याचा एक तरुण लष्करी अम्मलदार नेपोलियन बोनापार्ट यानें मोडून काढलें. त्यानें प्रत्यक्ष पॅरिसच्या जनतेवर गोळ्या घालून पुष्कळांना ठार करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. याच गोळीबाराला कुलुपी गोळ्यांची फैर अथवा झपाटा ( Whiff of grapeshot ) असें प्रसिद्ध नांव आहे. अशा रीतीनें प्रत्यक्ष कालच्या क्रांतीतून

निर्माण झालेल्या सैन्याचाच उपयोग जेव्हां आज फ्रान्सच्याच जनतेला ठार करण्याच्या कामीं करतां येऊं लागला, तेव्हां आतां फ्रान्समध्यें क्रांतीची छाया सुद्धां शिल्लक राहिली नाहीं हें अगदीं उघड झालें.

अशा रीतीनें क्रांतीचा सगळा ग्रंथ आटोपला आणि त्याचबरोबर ध्येयवादी लोकांचीं कितीएक सुखस्वप्नें आणि गरिबांच्या पुष्कळशा गोड आशाही विलयाला गेल्या. तरी पण जें करण्यासाठीं क्रांतीचें पाऊल पुढें टाकण्यांत आलेलें होतें, त्यांपैकीं पुष्कळशा गोष्टी क्रांतीनें पुऱ्या केल्या होत्या ; कारण प्रतिक्रांति कसल्याही प्रकारची झाली तरी तिला पुन्हां भूदासांची गुलामगिरी सुरू करतां आली नाहीं ; त्याचप्रमाणें पुढें फ्रेंच राजघराणें—जें बुर्बोन राजघराणें—त्यांतील राजे परत गादीवर आल्यानंतर सुद्धां त्यानाही जी जमीन शेतकरी लोकांत वांटून टाकण्यांत आली होती ती परत घेतां आली नाहीं. पूर्वीच्या कोणत्याही काळापेक्षां सामान्य माणसाची परिस्थिति खास पुष्कळ सुधारलेली होती. मग तो मनुष्य शहरामधील असो किंवा खेडेगांवामधील असो. फार कशाला, पण प्रत्यक्ष त्या अत्याचारी प्रलयाच्या काळीं सुद्धां राज्यक्रांतीच्या पूर्वीच्या काळापेक्षां जनता अधिक सुखी होती. कारण या प्रलयाचा खरा रोख कांहीं त्यांच्याविरुद्ध नव्हता. हा रोख सगळा वरिष्ठ वर्गीयांच्या विरुद्ध होता. तथापि शेवटीं शेवटीं थोडे गरीब लोकही या प्रलयाला बळी पडले हें खरेंच.

क्रांतीचा पाडाव झाला ; परंतु प्रजासत्ताक राज्याची कल्पना मात्र साऱ्या यूरप खंडभर पसरली आणि त्या कल्पनेबरोबरच मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यांतील जाहीर केलेल्या तत्त्वांचाही प्रसार आपोआपच होत गेला.

## १०३

## राज्यकर्त्यांच्या वागण्याच्या पद्धती

२७ ऑक्टोबर, १९३२

गेल्या दोन आठवड्यांत मीं कांहींच लिहिलें नाहीं. मला वाटतें आळशी होत चाललों आहें मी. जी गोष्ट सांगायला घेतली होती मीं, ती संपायला आली आहे म्हणून कशाला संपवून टाका सगळीच गोष्ट एकाएकीं, अशा कल्पनेनेंही कदाचित् मी रेंगाळत असेन. अठराव्या शतकाच्या अखेरीस तर आपण केव्हांच येऊन पोंचलों आहों. पुढच्या शंभर वर्षांचें निरीक्षण करायची आपली तयारी झालेली आहे. तीं शंभर वर्षें संपलीं म्हणजे मग थेट आपल्या आजच्या काळापर्यंत पोंचावयाला काय तीं बत्तीसच वर्षें आपल्याला राहतील. परंतु हीं एकशेंबत्तीस वर्षें जरी थोडींशीं वाटत असलीं, तरी त्यांच्याबद्दल सांगायला लागणार आहे किती तरी. हा काळ आपल्या

अगदीं जवळचा असल्यामुळें स्वाभाविकच तो आपल्याला मोठा आहेसें भासतें, आपली सारी बुद्धि त्यामध्यें रंगून जाते आणि पूर्वींच्या काळच्या इतिहासापेक्षां हा इतिहास आपल्याला फारच जास्त महत्त्वाचा वाटतो. आज आपण आपल्याभोंवतीं पाहतों त्यांपैकीं पुष्कळशा गोष्टींचें मूळ या काळामध्यें आहे. या गेल्या शतकांत आणि त्यापुढच्या थोड्या काळांत ज्या कांहीं घडामोडी घडून आल्या त्यांच्या त्या गर्द रानांतून मार्ग काढीत सगळया प्रदेशाचें तुला दर्शन करवीत जाणें ही गोष्ट खरोखर मला चांगलीच जड जाणार आहे असें दिसतें. त्यामुळेंही कदाचित् माझें मन पुढें जायला थोडेंसें भीत असेल. तसाच मला हाही मोठा विचार पडतो, कीं समजा, मीं ही मानवाची गोष्ट इ. स. १९३२ पर्यंत आणून भिडविली, भूतकाळची सगळी गोष्ट संपून ती वर्तमानकाळांत येऊन थांबली आणि पुढच्या अदृश्य भविष्यकाळच्या छायेकडे कथानकाचा ओघ आतुरतेनें बघूं लागला म्हणजे मग मी काय करणार ? पोरी, मग मी तुला काय लिहिणार ? हातांत पेन घेऊन बसावयाचें आणि तुझें स्मरण करावयाचें, किंवा तूं जवळ बसून मला पुष्कळसे प्रश्न विचारीत आहेस आणि मी तुला उत्तरें देण्याचा प्रयत्न करीत आहें अशी कल्पना करीत राहावयाचें, हें जें सोंग मी आजपर्यंत चालवीत आलों आहें, तें तसेंच पुढें चालू ठेवावयाला मग सबब कोणती काढावयाची ?

फ्रेंच राज्यक्रांतीबद्दल मीं तुला तीन पत्रें लिहिलीं आहेत. चांगलीं भलीं लांबलचक तीन पत्रें आणि कशाबद्दल तर फ्रान्सच्या इतिहासामधील फक्त पांच वर्षांच्या एवढ्याशा काळाबद्दल. अनेक युगांच्या इतिहासाचा हा प्रवास करीत असतांना कित्येक शतकें एका पावलासरशीं आपण ओलांडलीं आणि नुसत्या एका दृष्टिपातानें कितीक शतकांचें आपण दर्शन घेतलें ; पण येथें फ्रान्समध्यें मात्र या इ. स. १७८९ पासून १७९४ पर्यंतच्या थोड्याशाच कालक्षेत्रांत आपण चांगला भला लांबलचक मुक्काम केला आहे ; तरी पण या विषयानें माझें मन इतकें भारून गेलें होतें आणि त्याबद्दल एकसारखें पुष्कळ लिहिण्याला माझा हात इतका उत्सुक होता, कीं संक्षेपानें या काळाबद्दल लिहिण्यासाठीं मला केवढा दीर्घ प्रयत्न करावा लागला हें जर मीं तुला सांगितलें, तर तुला मग मोठाच चमत्कार वाटेल. परंतु इतिहासाच्या दृष्टीनें या फ्रेंच राज्यक्रांतीचें महत्त्वच तसें आहे. या राज्यक्रांतीच्या प्रसंगीं एका युगाचा अंत होऊन दुसरें युग जगांत सुरू झालें. परंतु त्यापेक्षांही तिच्यामध्यें जे अनेक रोमहर्षकारक प्रसंग घडून आले त्यामुळें माझें मन तिच्याकडे अधिक वेधतें आणि शिवाय तिच्यापासून आपल्यापैकीं प्रत्येकाला किती तरी गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. आज पुन्हां जगांत एक प्रकारें काळाला उकळी फुटलेली आहे. सगळीकडे भयंकर खळबळ माजून राहिली आहे, भडका उडालेला आहे. आणि पुन्हां काहीं तरी महान् फेरबदलांच्या उंबरठ्याशीं आपण येऊन पोंचलों आहों. आपल्या स्वतःच्या देशामध्यें तर

आपण अगदीं सर्वतोपरी शांततायुक्त अशा का होईना, पण एका क्रांतीच्या काळामध्यें वावरतों आहों. यामुळें या फ्रेंच राज्यक्रांतीपासून आणि त्याचप्रमाणें आपल्या जवळ-जवळ प्रत्यक्ष डोळ्यांसमोर आपल्याच या काळामध्यें रशियामध्यें नुकतीच घडून आलेली दुसरी जी महान् क्रांति तिच्यापासून तर आपल्याला पुष्कळच शिकण्यासारखें आहे. या दोन क्रांत्यांप्रमाणें ज्या खऱ्या जनतेच्या प्रयत्नानें होणाऱ्या क्रांत्या असतात त्यांच्या योगानें जीवनाच्या सगळ्या कानाकोपऱ्यांवर आणि सत्य स्वरूपावर फार मोठा भयंकर प्रकाश पडत असतो. विजेच्या झोताप्रमाणें एकाच वेळीं सगळ्या संसारक्षेत्रांचें दर्शन या क्रांत्यांमुळें आपल्याला होतें आणि या प्रदेशांतील अंधारांतील सर्व जागा अशा वेळीं विशेषच उजेडांत येतात. कांहीं काळपर्यंत तरी मानवी जीवनाचें ध्येय अगदीं स्पष्टपणानें कळून आलेंसें वाटतें आणि तें अगदीं आतां आपल्या हाताला लागलें इतकें तें विलक्षण जवळ आल्याचाही भास होतो. श्रद्धा आणि शक्ति यांनीं सर्व लोक भरून आणि भारून जातात. तडजोड करावयाची, हें नाहीं मिळालें तर मग त्याच्याऐवजीं हें थोडें दुसरें कमी जें कांहीं आहे तें चालेल, अशा प्रवृत्तीला बिलकुल थारा राहत नाहीं. क्रांति करायला निघालेलीं माणसें आपल्या ध्येयमार्गाचें बाणासारखें सरळ आक्रमण करीत राहतात, दृष्टि इकडे तिकडे रेसभरही ढळूं देत नाहींत आणि त्यांची नजर अशी ज्या प्रमाणांत सरळ थेट आपल्या ध्येयावर अगदीं कडवटपणानें खिळलेली राहते त्या प्रमाणांत क्रांतीच्या कार्याची अधिकाधिक प्रगति होते; परंतु हा सर्व चमत्कार क्रांतीच्या कालाला जेव्हां अगदीं भर आलेला असतो, तेवढ्यापुरताच तेवढा घडून येत असतो. अशा या काळामध्यें क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यानें पर्वताचें शिखर गांठलेलें असतें आणि जनता पर्वताच्या बाजूनें वर त्याच्यापर्यंत भिडण्यासाठीं कूच करीत असते. परंतु अरेरे! काळ पालटतो आणि पर्वताच्या उंचीवरून खालीं खोल अंधाऱ्या दरींत जाऊन पडण्याचा या लोकांवर प्रसंग येतो आणि त्यांच्यामधील सारी श्रद्धा मंद होऊन जाते, शक्ति क्षीण होऊन जाते.

सारा जन्म जवळजवळ आपल्या देशांतून हद्दपार होऊन ज्याला घालवावा लागला तो व्हॉल्टेअर इ. स. १७७८ मध्यें पॅरिसमध्यें परत आला आणि तेथें मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय चौऱ्यायशीं वर्षांचें होतें. त्या वेळीं फ्रेंच तरुणांना उद्देशून तो म्हणाला, "हे तरुण लोक मोठे भाग्यवान्! त्यांना जीवनांत फार मोठे फेरबदल झालेले पाहायला मिळणार आहेत." व्हॉल्टेअरनें म्हटल्याप्रमाणें खरोखरीच त्यांना असे फेरबदल झालेले पाहण्यास मिळाले. एवढेंच नव्हे, तर ते घडवून आणण्यांत त्यांनीं स्वतःच पुष्कळ भाग घेतला. कारण व्हॉल्टेअरनें हें विधान केल्यानंतर अकराच वर्षांमध्यें फ्रेंच राज्यक्रांतीचा स्फोट झाला. खरें म्हणजे किती तरी वर्षांपासून ही क्रांति होऊं घातलेली होती. "L'ètat c'est moi" "राज्य, राज्य म्हणजे काय? राज्य म्हणजे केवळ मी!" असें खुद्द तो महान् बादशहा चौदावा लुई हाच सतराव्या शतकांत म्हणाला होता. त्याच्या मागून गादीवर आलेला पंधरावा लुई हाही अठराव्या शतका-

मध्यें "Aprés moi le dèluge" (माझ्यानंतर भले महाप्रलय होवो) असें म्हणाला होता. त्यानें आवाहन केल्याप्रमाणें हा प्रलय घडून येऊन त्यांत सोळावा लुई आणि त्याचा सारा परिवार वाहून गेला. सुवासिक पावडरी लावलेले टोप आणि पट्ट्याच्या विजारी घातलेल्या सरदारांऐवजीं आतां सान्स्कुलोट म्हणजे पट्ट्याच्या विजारी न घालणारे लोक आघाडीवर आले. फ्रान्समध्यें आतां बाकीच्या पदव्या नाहींशा होऊन नागरिक (किंवा नागरिका) एवढ्याच पदव्या सर्वांना एकसारख्या लावण्यांत येऊं लागल्या. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता हें आमचें ब्रीद आहे, असें नवीन प्रस्थापित झालेल्या प्रजासत्ताक राज्यानें साऱ्या जगाला मोठ्यानें ओरडून जाहीर केलें.

या क्रांतीच्या काळांत अत्याचाराच्या प्रलयाचा पुष्कळच धुमाकूळ झाला. खास क्रांतिकारकांचें न्यायालय स्थापल्यावेळेपासून तों राब्सपियरचा पाडाव होईपर्यंतच्या सोळा महिन्यामध्यें जवळजवळ ४००० लोक गिलोटिनखालीं देण्यात आले. हा आंकडा खरोखरच फार मोठा आहे आणि कितीक निरपराधी लोकसुद्धां सुरीखालीं गेले असतील हा विचार मनांत आला म्हणजे माणसाला केवढा मोठा धक्का बसतो आणि दुःख होतें! परंतु या फ्रेंच अत्याचारी प्रलयाचें खरें स्वरूप आणि प्रमाण आपल्या ध्यानांत येण्यासाठीं आपल्याला आणखी पुष्कळ गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. पहिली गोष्ट म्हणजे फ्रान्सचें प्रजासत्ताक राज्य चोहोंकडून शत्रूंनीं, हेरांनीं आणि देशद्रोही लोकांनीं वेढलेलें होतें, आणि गिलोटीनखालीं गेलेल्या लोकांपैकीं पुष्कळसे लोक प्रजासत्ताक राज्याचे उघड उघड शत्रू असून त्यांच्या नाशासाठीं ते खटपटी करीत होते. या प्रलयाच्या अखेरी-अखेरीसच अपराधी माणसांबरोबरच निरपराधी माणसांवरही गिलोटीनला बळी जाण्याचा प्रसंग येऊं लागला. मनांत भीतीनें ठाणें दिलें म्हणजे आपली दृष्टि विकृत किंवा आंधळी होते आणि मग अपराधी आणि निरपराधी यांच्यामधील फरक ओळखणें हें कठिण होऊन जातें. फ्रेंच प्रजासत्ताक राज्याला तर आपल्या अगदीं आणीबाणीच्या काळांत लाफेयटसारख्या स्वतःच्याच मोठमोठ्या सेनापतींनीं केलेल्या विरोधाला आणि विश्वासघाताला तोंड देण्याचा प्रसंग आलेला होता. अशा वेळीं क्रांतीच्या पुढाऱ्यांचा धीर सुटल्यासारखा होऊन त्यांनीं शत्रु कोण, मित्र कोण, हा विचार न करतां चारी बाजूंना सांपडेल त्याच्यावर प्रहार करावयाला सुरवात केली असली, तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं.

त्याचप्रमाणें एच्. जी. वेल्स् यांनीं आपल्या इतिहासग्रंथामध्यें दाखविल्याप्रमाणें याच दिवसांत इंग्लंड आणि अमेरिका या देशांमध्यें किंवा आणखीही इतर देशांमध्यें काय प्रकार घडत होते हेंही आपण नीटपणें ध्यानांत घेतलें पाहिजे. मालमत्तेच्या संरक्षणार्थ म्हणून जो या देशामध्यें फौजदारी कायदा या काळीं अस्तित्वांत होता तो इतका निर्घृण आणि घोर होता, कीं अगदीं क्षुल्लक अपराधासाठींसुद्धां लोक या कायद्याप्रमाणें फांशीं दिले जात. कांहीं ठिकाणीं अगदीं अधिकृतपणें अशा अपराधांबद्दल अनेक प्रकारचा छळ करण्यांत येई. वेल्स् यांनीं लिहिलें आहे, कीं या पांच

वर्षांच्या काळामध्यें फ्रान्स देशांत या अत्याचाराच्या प्रलयाच्या वेळीं जितके लोक गिलोटीनखालीं गेले, त्याच्यापेक्षां किती तरी जास्त लोक इंग्लंडमध्यें आणि अमेरिकेमध्यें याच काळांत या साध्या फौजदारी कायद्याखालीं फांशीं देण्यांत आले !

त्यांतच आणखी त्या काळचे ते गुलाम पकडण्यासाठीं घातले जाणारे छापे, त्यातला तो अघोरी क्रूरपणा आणि अमानुषपणा यांचाही विचार कर. त्याचप्रमाणें युद्धांची, विशेषतः लाखों तरुण लोकांना आयुष्याच्या ऐन भरामध्यें पार नाहींसे करून टाकणाऱ्या आधुनिक युद्धांची गोष्ट लक्षांत आण. तेराच वर्षांपूर्वीं अमृतसर येथें एप्रिल महिन्यांत वसंतोत्सवाच्या दिवशीं संध्याकाळीं जालियनवाला बागेमध्यें शेंकडों लोकांना ठार करण्यांत आलें आणि हजारों लोकांना भयंकर स्वरूपाच्या जखमा झाल्या आणि आमच्या देशांतले हे सगळे कटाचे खटले, जादा अधिकाराचीं खास न्यायासनें आणि वटहुकूम या सगळ्या गोष्टी लोकांना भयभीत करून दडपून टाकण्यासाठींच केलेल्या नाहींत तर कशासाठीं ? जुलूम आणि अत्याचार यांच्या तीव्रपणावरून सरकारला भीतीनें किती ग्रासलेलें आहे याचें मोजमाप करतां येत असतें. सरकार कोणतेंही असो, पुरोगामी असो, क्रांतिवादी असो, कीं प्रतिगामी असो, परकी असो कीं स्वदेशी असो, एकदां त्याला आपल्या अस्तित्वाविषयींच भय उत्पन्न झालें, कीं त्यानें लोकांवर जुलुमाचें व अत्याचाराचें हत्यार उचललेंच म्हणून समजावें. प्रतिगामी सरकार हा प्रकार कांहीं थोड्या हक्कदार-वतनदार लोकांच्या हितार्थ आणि सामान्य जनतेच्या विरुद्ध करीत असतें; तर क्रांतिकारक सरकार हाच प्रकार अखिल जनतेच्या वतीनें तिच्या हितार्थ मूठभर हक्कदार, वतनदार लोकांच्या विरुद्ध करीत असतें. क्रांतिकारक सरकार या कामांत कसली लपवालपवी करीत नाहीं. त्याचा मार्ग अधिक सीधा आणि उघड असतो; पुष्कळदां त्या सरकारचें वर्तन बरेंच निर्दयपणाचें आणि कठोर होत असेल; पण त्यांत कपटाचा, कारस्थानाचा किंवा लांडीलबाडीचा कांहींएक भाग नसतो. प्रतिगामी सरकारच्या भोंवतालचें सर्व वातावरणच लांडीलबाडीनें पुरेपूर भरलेलें असतें; कारण त्या सरकारला माहीत असतें, कीं आपलें स्वरूप उघडें झालें तर आपल्याला कोणी जगूं देणार नाहीं. असें सरकारही स्वातंत्र्याच्या गप्पा मारीत असतें, परंतु त्याच्या स्वातंत्र्याचा अर्थ आपल्या मनास येईल तें करण्याचें स्वातंत्र्य एवढाच असतो. हें सरकार न्यायाच्या गोष्टी करीत असतें; परंतु त्याचाही अर्थ, ज्या प्रचलित समाजपद्धतींतच या सरकारचा उत्कर्ष होऊं शकत असतो, मग इतरांचा त्यात नाश झाला तरी हरकत नाहीं, तीच समाजपद्धति चिरकाल टिकवून धरणें एवढाच असतो. याहीपेक्षां विशेष असा या सरकारचा कटाक्ष असतो, तो कायदा आणि सुव्यवस्था या जोडगोळीवर. या शब्दांच्या आश्रयानें असें सरकार लोकांवर गोळ्या घालून त्यांना ठार करतें, कैदेंत घालतें, त्यांना भाषणबंदी करतें आणि कितीएक तरी बेकायदेशीर आणि गैरशिस्त गोष्टी करतें. या "कायदा आणि सुव्यवस्था" यांच्या नांवानें आमच्या शेंकडों बांधवांचे खटले खास न्यायालयापुढें चालविण्यांत

येऊन त्यांना फांशीं देण्यात आलेलें आहे. यांच्याच नांवाखालीं अडीच वर्षांपूर्वी एप्रिल महिन्यांत एके दिवशीं पेशावर येथें मशीनगन्समधून आपल्या पठाण देशबांधवांवर, ते निःशस्त्र असतांनाही, मारा करून त्यांना ठार करण्यांत आलें. याच "कायदा आणि सुव्यवस्था" यांच्यासाठीं ब्रिटिश विमानदल सरहद्द प्रांतांतील खेड्यांवर आणि इराकमध्यें बाँब टाकीत असतें आणि कितीएक स्त्रीपुरुषांना आणि मुलांनाही, दोषी कोण, निर्दोषी कोण याचा कांहींएक विचार न करतां, सरसकट जन्माचे जायबंदी करून टाकीत असतें. बाँब टाकण्यासाठीं जवळ विमान आलेलें पाहून लोक कदाचित् निसटून जातील, तेव्हां त्यांना तसें करतां येऊं नये म्हणून विशिष्ट कालावधीनंतर ज्यांचा स्फोट होतो असे कालावधीचे बाँब सैतानी बुद्धिकौशल्याच्या जोरावर करण्यांत आलेले आहेत. बाँब पडून फुटला नाहीं म्हणजे गरीब बिचारे खेडेगांवचे लोक आतां संकट टळलें म्हणून घरीं परत येतात आणि लौकरच मग बाँब फुटतो, त्यांना यमसदनाला पाठवितो आणि त्यांच्या घरादारांचें वाटोळें करतो.

याचप्रमाणें कोट्यवधि लोकांना रोजच्या रोज ग्रासून राहिलेली जी उपासमार तिचाही विचार कर. होतें काय कीं आपल्या भोंवतीं दुःख आणि दैन्य यांचा खच जमलेला असूनही संवयीनें त्याचें आपल्याला कांहीं वाटेनासें होतें. आम्ही आपल्या मनाची अशी समजूत करून घेतों, कीं हे कामगार आणि शेतकरी जात्याच जरा आमच्यापेक्षां रांकट असतात आणि हालअपेष्टांचा त्यांना इतका कांहीं मोठा बाऊ वाटत नाहीं. थोड्याशा हालअपेष्टांनीं त्यांना कांहीं एवढा त्रास होत नाहीं. परंतु आमच्या सदसद्विवेकबुद्धीची टोंचणी थांबविण्यासाठीं आम्ही हे किती भ्रामक मुद्दे उपस्थित करतों ! मध्यंतरीं मी बिहारमध्यें एकदां कोळशाच्या खाणींत गेल्याचा प्रसंग आतां मला आठवतो आहे. जमिनीच्या पृष्ठभागाच्या आंतल्या बाजूला लांबच लांब प्रकाशहीन काळयाकुट्ट अशा कोळशाच्या बोळकंड्यांमधून काम करताना त्या स्त्रीपुरुष कामगाराना पाहून माझ्या मनाला जो धक्का बसला, तो मी कधींही विसरणार नाहीं. कांहीं लोक खाणींतील मजुरांच्या कामाचा दिवस आठ तासांचाच असावा अशी मागणी करतांना आपण पाहातों आणि कांहीं लोक तर या मागणीलाही विरोध करून त्यांच्याकडून अधिक काम घेतलें पाहिजे असें प्रतिपादन करतात. या लोकांनीं केलेल्या चर्चा जेव्हां मी ऐकतों किंवा पाहातों, तेव्हां लगेच माझें मन त्या कोळशाच्या खाणींना मीं भेट दिली त्या प्रसंगाकडे धांव घेतें ; कारण तेथें त्या बोळकंडांत आठ मिनिटें रहाणें म्हणजे मला केवढें संकट होऊन गेलें होतें !

हें खरें, कीं फ्रान्समधील हें हत्याकांड ( Terror ) फारच भयंकर होतें. परंतु लोकांच्या नशिबीं नित्य लादल्या गेलेल्या दारिद्य आणि बेकारी यांच्या जीवघेण्या दुःखाच्या माऱ्यापुढें या हत्याकांडाचें दुःख म्हणजे नुसता एक चिलटाचा चावाच होता असें म्हटलें पाहिजे. सामाजिक क्रांतीसाठीं द्यावी लागणारी किंमत कितीही जरी भली मोठी असली, तरीसुद्धां सध्यांच्या आमच्या प्रचलित समाजपद्धतीमध्यें आणि

राजकीय व्यवस्थेमध्यें वेळोवेळीं उद्भवणाऱ्या युद्धांसाठीं जी किंमत आम्हांला देण्याचा प्रसंग येतो किंवा जे हाल सोसावे लागतात, त्या किंमतीहून समाजक्रांतीसाठीं द्यावी लागणारी किंमत केव्हांही कमीच ठरेल! फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळचें हत्याकांडसुद्धां जें एवढें मोठें थोरलें वाटतें, त्याचें कारण तरी त्यामध्यें वरिष्ठवर्गाचे आणि मोठे मोठे पदवी धारण करणारे लोक हे पुष्कळसे बळी पडले हें आहे. हक्कदार, वतनदार लोकांच्या विषयींची आदरभावना आमच्या हाडींमासीं इतकी खिळलेली आहे, कीं त्यांना जरा कोठें कांहीं झालें तरी आम्हांला त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटूं लागते! इतरांबद्दल जशी आपल्याला सहानुभूति वाटते तशी त्यांच्याबद्दलही वाटली तर कांहीं हरकत आहे असें नव्हे; परतु किती झालें तरी हे लोक मूठभर असतात ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. त्यांचेंही अकल्याण होऊं नये अशी आपण भावना ठेवल्यास कांहीं हरकत नाहीं; पण खरा विचार आपण जो केला पाहिजे तो सामान्य जनतेचा. या थोड्या लोकांच्या हितासाठींही सर्व जनतेला कांहीं आपल्याला बळी देतां येणार नाहीं. रूसोनें लिहिलें आहे कीं “ मानवसमाज, मानवसमाज म्हणून ज्याला म्हणतात तो सामान्य जनतेचा बनलेला आहे. या सामान्य जनतेंत जे कोणी नाहींत त्यांचें तें प्रकरण इतकें अल्पसंख्य आहे कीं ‘दर्यामें खसखस’ या न्यायानें त्यांची मोजदादसुद्धां करण्याची यातायात करण्याचें कारण नाहीं!”

या पत्रांत नेपोलियनविषयीं थोडीशी माहिती तुला सांगावी असा माझा विचार होता ; पण माझें मन दुसरीकडेच भरकटलें आणि लेखणी दुसऱ्याच विषयावर चालत राहिली त्यामुळें नेपोलियनची परीक्षा करण्याचें—दर्शन घेण्याचें—काम तसेंच राहिलें आहे. त्याला बापड्याला आतां दुसरें पत्र लिहिण्याची आमची लहर लागेपर्यंत वाट पाहत राहिलें पाहिजे!

## १०४

# नेपोलियन

४ नोव्हेंबर, १९३२

फ्रेंच राज्यक्रांतीमधून नेपोलियनचा उदय झाला. फ्रान्स देश, प्रजासत्ताक राज्याचा वाली फ्रान्स देश, ज्या फ्रान्सनें यूरप खंडांतील राजेलोकांच्या सत्तेला आव्हान देऊन त्या सत्तेचें धूड उखडून काढण्याची धडपड केली तो फ्रान्स देश, कॉर्सिका बेटांतील या छोट्याशा माणसाच्या पायाशीं सर्वस्वीं लीन झाला. त्या काळच्या फ्रान्सच्या ठिकाणीं कांहींएक विलक्षण हिंस्र श्वापदासारखें रानगट सौंदर्य, आकर्षकत्व निर्माण झालेलें होतें. बार्बी नांवाच्या एका फ्रेंच कवीनें त्या काळच्या

फ्रान्सची न माणसाळलेल्या रानटी पशूशींच तुलना केलेली आहे. तो म्हणतो, फ्रान्स देश म्हणजे त्या वेळीं उन्मत्त आणि स्वतंत्र अशा घोडीसारखा होता. कातडी कशी तेजस्वी आणि तुळतुळीत, मान ऐटीनें वर उचलून धरलेली, अत्यंत सुंदर परंतु लहरीला येईल त्याप्रमाणें हवी तिकडे धांवणारी, पाठीला खोगिराचा स्पर्शसुद्धां होऊं देण्याला अथवा पट्टा किंवा लगाम चढवूं देण्याला भयंकर नाखुष, पायानें जमीन ठोकरीत असलेली आणि आपल्या खिंकाळण्यानें साऱ्या जगाचा थरकांप उडवणारी अशी जशी एखादी घोडी असावी तशी फ्रान्सची अवस्था होती, असें त्यानें वर्णन केलें. अशा या गर्वानें फुरफुरणाऱ्या घोडीनें कॉर्सिका बेटामधील या तरुण मनुष्याला आपणांवर स्वार होऊं दिलें आणि त्यानें तिच्याकडून खूप विलक्षण काम करून घेतलें. पण त्याच वेळीं त्यानें या घोडीला माणसाळविलीही चांगली आणि तिच्या अंगाचा सगळा रानगटपणा आणि स्वातंत्र्यप्रेमही नाहींसें करून टाकलें. त्यानें तिला इतकें विलक्षण राबविलें आणि इतकें विलक्षण दमविलें, कीं शेवटीं तिनें त्याला खालीं फेंकून दिलें आणि ती स्वतःही धडपडून खालीं पडली!

असा हा नेपोलियन होता तरी कशा प्रकारचा मनुष्य? जगांत जे श्रेष्ठ पुरुष होऊन गेले त्यांतला हा एक होता का? ज्याना दैवी विभूती, भाग्यविधाते, भाग्यवान् पुरुष म्हणून म्हटलें जातें अशा विभूतींपैकीं हा एक होता का? तो एखादा अत्यंत शूरवीर पुरुष होता का? अथवा मानवजातीचीं पुष्कळशीं दुःखाचीं ओझीं ज्यानें हलकीं केलीं असा कोणी तो होता का? का एच्. जी. वेल्स् आणि अशीच इतर कांहीं मंडळी म्हणतात त्याप्रमाणें तो एक निव्वळ उलाढाल्या आणि नासधूस करणारा मनुष्य असून त्यानें यूरप आणि मानवी संस्कृति यांचें अतिशय मोठें नुकसान केलें, हें खरें आहे? हे दोन्ही दृष्टिकोन बहुधा अतिशयोक्तीनें दूषित झालेले आहेत. बहुधा दोहोंमध्येंही थोडेंफार सत्य आहे. आपल्या सगळयांच्यामध्येंच बरे आणि वाईट, उच्च आणि नीच, यांचें चमत्कारिक मिश्रण असतें. त्याच्यामध्येंही अशाच प्रकारचें मिश्रण होतें; पण आपल्यापैकीं बहुतेकांपेक्षां त्याच्या ठिकाणचें हें मिश्रण थोडेंसें वेगळया प्रकारचें होतें. त्याच्या ठिकाणचे जे बरेवाईट विशेष होते, ते सर्वच अत्यंत असामान्य होते. त्याच्या ठिकाणीं शौर्य होतें, आत्मविश्वास होता, कल्पनाशक्ति होती, कोणालाही थक्क करून टाकण्यासारखा उत्साह आणि शक्ति होती आणि प्रचंड महत्त्वाकांक्षा होती. तो एक फार मोठ्या प्रतीचा सेनापति होता. युद्धकलेंत अत्यंत श्रेष्ठ दर्दी होता. त्याची तुलना करायचीच म्हटली तर प्राचीन काळांतले आपले अत्युत्कृष्ट सेनानी जे अलेक्झांडर आणि चेंगीजखान, त्यांच्याशीं थोडीशी करतां येईल; पण या गुणांबरोबरच त्याच्या मनाच्या ठिकाणीं अत्यंत क्षुद्रपणा होता, आप्पलपोटेपणा होता, चमत्कारिक आत्मनिष्ठता होती आणि त्याच्या आयुष्यामधील सगळयांत बळकट कार्यप्रेरणेची शक्ति म्हणजे उच्च ध्येयाचा मार्ग आक्रमण करण्याची धडपड ही नव्हती, तर आपल्या स्वतःच्या हातीं सत्ता प्राप्त करून घेण्यासाठीं त्याचे सारे प्रयत्न चालू होते. "माझी प्रिया कोण म्हणून

विचारतां ? " एकदां तो म्हणाला, " सत्ता ही माझी प्रिया, ; ही माझी प्रिया प्राप्त करून घेण्यासाठीं मला इतकी मोठी किंमत द्यावी लागलेली आहे, कीं माझ्यापासून ती मी आतां कोणाला हिरावूं देणार नाहीं अथवा ती उपभोगण्याच्या बाबतींत कोणाला भागीदारीही मिळूं देणार नाहीं ! " हा मनुष्य उदयास आला क्रांतीच्या काळीं आणि क्रांतीच्या कार्यामध्यें ! तरीसुद्धां त्याचीं सारीं सुखस्वप्नें एखाद्या प्रचंड साम्राज्याचीं होतीं. अलेक्झांडरच्या विजयानें त्याचें सारें डोकें भरून गेलेलें होतें. पूर्वेकडच्या प्रदेशांचा विशेषतः चीन आणि हिंदुस्थान यांचा त्याला फार लोभ वाटत होता. अवघा सत्तावीस वर्षांचा असतांना, आपल्या आयुष्यक्रमाच्या अगदीं सुरुवातीला तो म्हणाला, " खरीं साम्राज्यें कोठें उत्पन्न होऊन गेलीं असतील आणि खऱ्या प्रचंड घडामोडी कोठें झाल्या असतील तर त्या पूर्वेकडील देशांमध्यें. या पूर्वेकडच्या देशांत थोडेथोडके नाहींत तर साठ कोटी लोक राहतात ; त्या मानानें यूरप खंड म्हणजे काय, केवळ एक लहानसें मुंग्यांचें वारूळ आहे."

नेपोलियन बोनापार्ट याचा जन्म इ. स. १७६९ मध्यें कॉर्सिका बेटामध्यें झाला. हें बेट त्या वेळीं फ्रेंच अमलाखालीं होतें. त्याच्या शरीरांत कॉर्सिकन, फ्रेंच आणि इटालियन अशा रक्ताचें मिश्रण होतें. फ्रान्समधील लष्करी शिक्षणाच्या शाळेंत त्यानें शिक्षण घेतलेलें असून जॅकोबिन मंडळाचा तो सभासद होता. आतां हें खरें कीं तो जो जॅकोबिन मंडळाचा सभासद झाला, तो स्वतःचा पुढच्या आयुष्यांत फायदा साधून घ्यावा या स्वार्थबुद्धीनेंच झाला ; त्याची क्रांतीच्या किंवा त्या पक्षाच्या ब्रीदावर निष्ठा होती म्हणून नव्हे, असाच बराचसा संभव आहे. १७९३ मध्यें टूलॉन शहरीं त्याला आपल्या आयुष्यांतील पहिला विजय मिळाला. त्या शहरांतील श्रीमंत लोकांनीं क्रांतिकारकांच्या अमलाखालीं आपली सगळी मालमत्ता नाहींशी होईल या भीतीनें इंग्रज लोकांना प्रत्यक्ष आपल्या बंदरांत बोलावून घेऊन तेथील राहिलेलें सर्व आरमार त्यांच्या स्वाधीन केलें होतें. नुकत्याच स्थापन झालेल्या फ्रान्सच्या लोकसत्ताक राज्याला इतर ठिकाणच्या अनेक संकटांच्याबरोबरच या संकटानें मोठाच धक्का बसला होता आणि त्यासाठीं ज्याला म्हणून शक्य असेल त्या प्रत्येक स्त्री-पुरुषानें लढाईच्या कामांत येऊन मिळावें अशी सरकारनें लोकांना विनंति केलेली होती. नेपोलियननें हे टूलॉनमधील बंडखोर व त्यांच्या मदतीला आलेलें इंग्रजांचें सैन्य यांच्यावर मोठ्या कौशल्यानें हल्ला चढवून त्यांचा पराभव केला आणि बंड-खोरांची हड्डी चांगलीच नरम केली. येथून त्याचा भाग्यसूर्य चांगलाच चमकूं लागला आणि वयाच्या चोविसाव्या वर्षीं तो सेनापति झाला. त्यानंतर थोड्याच महिन्यांनीं राब्सपियर गिलोटीनखालीं गेला. त्या वेळीं तो थोडासा अडचणींत आला होता. कारण तो राब्सपियरच्या पक्षाचा असावा असा संशय होता ; पण नेपोलियन ज्या कोणत्या पक्षाचा अगदीं खराखुरा होता त्या पक्षाच्या सभासदांची संख्या फक्त एक ही होती ! त्या एकाच सभासदाचें नांव म्हणजे नेपोलियन ! त्यानंतर डायरेक्टरींची

कारकीर्द सुरू झाली. त्या वेळीं एका प्रसंगीं नेपोलियननें हें सिद्ध केलें, कीं आपण जॅकोबिन् पक्षाचे असण्याचें दूरच; पण उलट आपण प्रतिक्रांतीचे पुढारी आहों आणि अंगावर एवढासासुद्धां शहारा न येतां आपण जनतेला गोळ्या घालून ठार करूं शकतों. मागें एका पत्रांत इ. स. १७९५ सालीं फ्रान्समध्यें whiff of grapeshot कुलपी गोळ्यांच्या फैरी झाडून माणसें मारण्यांत आलीं म्हणून एक प्रसंग सांगितला ना? तोच हा, नेपोलियन ज्यामध्यें होता असा इतिहासप्रसिद्ध प्रसंग! त्या दिवशीं नेपोलियननें फ्रेंच प्रजातंत्रराज्यावर वार केला. तेव्हांपासून दहा वर्षांच्या आंत प्रजासत्ताक राज्याचा अंत करून तो स्वतःच फ्रेंच लोकांचा बादशहा झाला.

इ. स. १७९६ मध्यें नेपोलियन इटलीमधील सर्व फेंच सैन्याचा अधिपति झाला आणि इटलीच्या उत्तर विभागामध्यें त्यानें जी तेजस्वी मोहीम केली तिच्यामुळें सारें यूरप खंड चकित होऊन गेलें. अजूनसुद्धां फ्रेंच सैन्यामध्यें क्रांतीचें तेज टिकून होतें; परंतु त्या बिचाऱ्यांचे सगळे कपडे फाटलेले होते; पुरेसे कपडे त्यांच्याजवळ नव्हते, बूटही नव्हते, खायला धड अन्न नव्हतें किंवा पैसाही नव्हता. असले हे फाटक्या कपड्यांचें आणि अनवाणी चालण्यामुळें पाय हुळहुळे झालेलें सैन्य नेपोलियननें आल्प्स् पर्वताच्या पलीकडे चालून नेलें. तुम्ही या पर्वताच्या पलीकडे इटलीच्या मैदानांत चला, मग तेथें तुम्हांला खायलाप्यायला भरपूर आणि दुसऱ्या हव्या असतील त्या मजेदार वस्तू देतों असें आश्वासन देऊन त्यानें आपल्या सैनिकांना तिकडे नेलें. उलट, इटालींतील लोकांनाही तुमचें स्वातंत्र्य मी तुम्हांला मिळवून देतों असें त्यानें आश्वासन दिलें. तुमच्यावर जुलूम करणाऱ्या तुमच्या राज्यक्रांतीच्या तावडींतून तुम्हांला सोडविण्यासाठीं मी आलों आहें, असा त्यानें भास उत्पन्न केला. एका बाजूला क्रांतिकारकाला शोभणारी ठोकळेबाज घोषणा आणि दुसऱ्या बाजूला लूटमारीच्या चंगळीचें आमिष यांचें हें किती विचित्र मिश्रण आहे! अशा रीतीनें त्यानें इटालियन आणि फ्रेंच या दोन्ही लोकांच्या भावनेचा हा खेळच केला. त्यांतच जन्मतः तो कांहीं प्रमाणांत इटालियन वंशाचा असल्यामुळें त्याला त्या लोकांच्या मनावर खूप मोठा परिणाम करण्याला तें एक साधन झालें. त्याला जसजसे जय मिळूं लागले तसतशी त्याची प्रतिष्ठा वाढत गेली आणि कीर्ति चोहोंकडे पसरली. स्वतःच्या सैन्यामध्यें सामान्य सैनिकाला जशा प्रकारच्या हालअपेष्टांत राहावें लागेल तसल्या प्रकारच्या हालअपेष्टांत स्वतः तो पुष्कळ अंशीं राहत असे आणि शिपायांवर येणाऱ्या संकटांतही तो भागीदार असे. कारण ज्या ठिकाणीं हल्ल्याचा जोर व धोका सर्वांत अधिक असे त्या ठिकाणीं तो नेमका सांपडावयाचा नेहमीं. खऱ्या गुणाकडे त्याचें नेहमीं फार बारकाईनें लक्ष असे. आणि गुण दिसून आला रे आला कीं त्याचें तो योग्य तें चीज करीत असे आणि तेंही अगदीं ताबडतोब, प्रत्यक्ष रणधुमाळी चालू असतांनासुद्धां. त्याच्या सैनिकांना तो अगदीं बापाप्रमाणें आवडता असे; बाकी केवढा लहान वयाचा हा बाप म्हणा! त्याला ते

पुष्कळदां 'पेटि कॉर्पोरल' म्हणजे 'छोटा नाईक' या नांवानें मोठ्या प्रेमानें हांक मारीत असत आणि पुष्कळदां त्याच्याशीं अरे-तुरेची भाषाही बोलत असत. अशा स्थितींत अजून तिशीच्या आंत असलेला हा तरुण सेनापति आपल्या फ्रेंच सैनिकांच्या गळ्यांतला अगदीं ताईत बनून गेला त्यांत आश्चर्य तें काय?

इटलीच्या सर्व उत्तर विभागामध्यें ऑस्ट्रियाचा पूर्ण पराभव करून तेथें सर्वत्र त्यानें विजय संपादन केला; व्हेनिस येथील प्राचीन प्रजासत्ताक राज्य नाहींसें करून टाकलें आणि एक अत्यंत अनिष्ट स्वरूपाचा साम्राज्यशाही धोरणाचा तह त्या लोकांवर लादून नेपोलियन एक महान् विजयी वीर या नात्यानें पॅरिसला परत आला. एव्हांच साऱ्या फ्रान्सभर त्याचा दरारा वाढण्यास सुरुवात झालेली होती; परंतु एवढ्यांतच सगळी सत्ता आपल्या हातीं हिसकावून घेण्याची वेळ आली नाहीं असें वाटल्यामुळेंच म्हणा, त्यानें बरोबर सैन्य घेऊन इजिप्तकडे मोर्चा नेण्याचें ठरविलें. अगदीं कोंवळ्या तरुण वयापासून त्याला हा पूर्वेकडे स्वारी करून जाण्याचा जणुं ध्यासच लागलेला होता. आतां आपला हा ध्यास प्रत्यक्ष पुरा करण्याची ही संधि त्याला मिळाली, त्यामुळें मनामध्यें त्यानें केवढाल्या प्रचंड साम्राज्यांचीं सुखस्वप्नें रचलीं असतील! कसें तरी करून भूमध्य समुद्रांतील इंग्रजांच्या आरमारी काफिल्याला त्यानें झुकांडी दिली व तो ॲलेक्झांड्रिया बंदरामध्यें जाऊन तर ठेपला.

इजिप्त देश हा त्या काळीं उस्मानी तुर्कांच्या साम्राज्याचा एक भाग होता; परंतु या साम्राज्याची पकड सध्यां ढिली झालेली असून मेमलुक लोकच इजिप्तवर राज्य करीत होते. नांवाला मात्र ते सुलतानाचें अधिराज्य मानीत असत. यूरपमध्यें एवढ्या जरी क्रांत्या झाल्या आणि नवे नवे शोध लागले, यूरपमध्यें त्यामुळें मारे मोठी धामधूम उडून राहिली, तरी पण मेमलुकांची राहणी आणि कारभार अद्यापि मध्ययुगीन काळांतलाच चालू होता. असें सांगतात, कीं नेपोलियन जेव्हां कैरोवर चाल करून गेला तेव्हां एक मेमलुक वीर पुरुष तेजस्वी रेशमी पोषाख करून आणि दमास्कसचें सुंदर पोलादी चिलखत घालून फ्रेंच सैन्याच्या अगदीं जवळ घोड्यावरून आला आणि 'कोणीही माझ्याशीं द्वंद्वयुद्ध खेळावयास या' असें त्यानें मारे आव्हान दिलें! त्याला काय माहीत कीं त्याचें स्वागत फ्रेंच सैनिक अगदींच भ्याडाप्रमाणें गोळ्यांचा भडिमार करून करणार होते म्हणून! लौकरच नेपोलियननें पिरामिडची लढाई जिंकली. नेपोलियनला नाटकी आविर्भाव आणि देखावे करण्याची मोठी आवड होती. पिरामिडांच्यासमोर गेल्यावर आपल्या सैन्यासमोर जाऊन तो थांबला आणि त्याला उद्देशून म्हणाला, "सैनिकहो, हीं पाहा मागील काळचीं चाळीस शतकें तुमच्याकडे आदबीनें पाहत आहेत!"

जमिनीवरील युद्धांत नेपोलियन अतिशय निष्णात असल्यामुळें त्याचा एकसारखा जयच होत चालला; परंतु समुद्रावर मात्र त्याची स्थिति अगदींच दुबळेपणाची होती. ही गोष्ट त्याच्या नीटपणें कधीं लक्षांतच आली नाहीं. शिवाय त्याच्या पदरीं

कार्यकुशल, कर्तबगार, दर्यासारंगही नव्हते असें दिसतें. अगदीं याच काळीं इंग्लंडच्या भूमध्य समुद्रावरील आरमाराचें नेतृत्व एका अत्यंत प्रतिभावान् गृहस्थाकडे होतें. हा गृहस्थ म्हणजे होरेशियो नेल्सन हा होय. एके दिवशीं नेल्सन जरा वाजवीपेक्षां अधिकच साहस करून थेट ॲलेक्झांड्रिया बंदरांत गेला आणि नाईल नदींतील लढाई म्हणून प्रसिद्ध असलेल्या लढाईंत त्यानें सर्व फ्रेंच आरमार नष्ट करून टाकलें. यामुळें नेपोलियनचा फ्रान्सशीं पूर्ण संबंध तुटून एका परक्या देशामध्यें तो अडकून राहिला. पुढें तेथून कसें तरी करून तो गुप्तपणें निसटला आणि फ्रान्सला परत आला. परंतु असें करण्यांत त्याला आपल्या पूर्वेकडील स्वारीसाठीं तयार केलेल्या सर्व सैन्याचा बळी द्यावा लागला.

नेपोलियनच्या पूर्वेकडील स्वारींत त्याला जरी बरेचसे जय मिळाले आणि लष्करी दृष्टीनें पुष्कळ कीर्ति मिळाली, तरी एकंदरीनें पाहतां ती अयशस्वीच झाली; पण या बाबतींत आणखी एक गोष्ट मात्र विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. नेपोलियननें आपल्याबरोबर इजिप्तमध्यें पुष्कळच मोठे अनुभवी, बहुश्रुत आणि विद्वान् लोक व प्राध्यापक नेले होते. त्याचप्रमाणें पुष्कळसे ग्रंथ आणि अनेकविध शास्त्रीय प्रयोगांचीं उपकरणें नेलेलीं होतीं. या सर्वांचें मिळून जें एक 'विद्यालय'च तयार होई, त्यामध्यें पुष्कळ तऱ्हतऱ्हेच्या चर्चा चालत असत. त्यांच्यामध्यें इतरांच्या बरोबरीनें, कसलाही मोठेपणाचा भेदभाव न बाळगतां नेपोलियन भाग घेत असे. या ठिकाणीं त्याच्या बरोबरच्या शास्त्रज्ञांनीं पुष्कळ शास्त्रीय गूढ संशोधनाचें कार्य केलें. तेथील विचित्र लिपीचें फार काळपर्यंत न उलगडलेलें कोडें या लोकांनीं तेथें जी एक ग्रॅनाइट दगडाची शिळा शोधून काढली तिच्यावरील लेखावरून उलगडून दाखविलें. हा लेख तीन लिपींमध्यें लिहिलेला होता. एक ग्रीक लिपि व दुसऱ्या दोन इजिप्शियन चित्रलिपीच्या दोन तऱ्हा होत्या. त्यांवरील या ग्रीक मसुद्यावरून बाकीच्या दोन्ही लिप्यांचा अर्थानुवाद लावण्यांत आला. दुसरी एक गोष्ट आणखी लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती अशी, कीं सुएज येथें एक कालवा खोदण्याची गोष्ट नेपोलियनच्या मनामध्यें फारच भरली होती.

इजिप्तमध्यें असतांना नेपोलियननें इराणचा शहा आणि दक्षिण हिंदुस्थानांतील टिपू सुलतान यांच्याशीं वाटाघाटी सुरू केल्या होत्या. परंतु आरमारी बाबतींतील त्याच्या सामर्थ्यहीनतेमुळें या वाटाघाटींतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. शेवटीं नेपोलियनचा पाडाव केला तोही एका आरमारी सामर्थ्य असलेल्याच राज्यानें आणि एकोणिसाव्या शतकांत इंग्लंडला जें एवढें महत्त्व प्राप्त झालें, तें या आरमारी सामर्थ्याच्या जोरावरच.

नेपोलियन इजिप्तमधून परत आला त्या वेळीं फ्रान्सची परिस्थिति बिघडलेली होती. डायरेक्टरीच्या कारभाराची नाचक्की होऊन त्यांच्याबद्दल लोकांत असंतोष पसरला होता. त्यामुळें तो परत येतांच सर्वांचे डोळे त्याच्याकडे लागले. नेपोलियनची

तर काय, सत्ता हातात घेण्याची मनापासून तयारी होतीच. म्हणून परत आल्यानंतर एक महिन्यानें, इ. स. १७९९ च्या नोव्हेंबर महिन्यांत त्यानें आपला भाऊ ल्युसियन याच्या मदतीनें नॅशनल असेंब्लीचें जबरदस्तीनें विसर्जन केलें आणि ज्या घटनेच्या अनुसारानें त्या वेळीं डायरेक्टरीचा कारभार चालू होता त्या घटनेची इतिश्री केली. अशा तऱ्हेच्या राज्यकर्त्यांच्या जबरदस्तीच्या मामल्याला फ्रेंच भाषेंत Coup d'état 'झपाटेबंद उलथापालथ', 'यक्षिणीच्या कांडीचा चमत्कार' असें म्हणतात. या उलथापालथीनें सर्व कांहीं परिस्थिति नेपोलियनच्या पूर्णपणें कह्यांत आली. हें सगळे त्याला घडवतां आलें त्याचें कारण तो लोकप्रिय होता. आणि लोकांची त्याच्या ठिकाणीं निष्ठा होती हें आहे. क्रांतीचें तर दिवाळें वाजून या सुमारास पुष्कळ दिवस झालेले होते आणि आतां तर लोकशाहीचासुद्धां लोप होण्याचा समय आला आणि सारीं सूत्रें एका लोकप्रिय सेनापतीच्या हातामध्यें आलीं. या वेळीं आणखी एक नवी घटना तयार करण्यांत आली. तिच्याप्रमाणें कारभार पाहण्यासाठीं तीन कॉन्सल नेमण्यांत आले (हा शब्द प्राचीन रोमच्या राज्यव्यवस्थेंतून घेतलेला आहे). परंतु त्यांमध्यें प्रमुख स्थान नेपोलियनला देऊन त्याच्याच हातीं पूर्ण सत्ता देण्यांत आली व त्याच्या कारकीर्दीची मुदत दहा वर्षांची ठरविण्यांत आली. ही घटना ठरविल्यानंतर चर्चेच्या प्रसंगीं एकानें असें सुचवलें, कीं राज्यघटनेंत एक अध्यक्ष असावा; पण त्याच्या हातीं सत्ता अशी कांहीं नसावी. मात्र राज्याच्या कागदपत्रांवर त्यानें सह्या कराव्यात आणि राज्याचा तो औपचारिक रीतीनें, कायदेशीर दृष्टीनें प्रतिनिधि समजला जावा. म्हणजे राज्याधिकार नियमित केलेल्या राजासारखा किंवा हल्लींच्या फ्रेंच अध्यक्षासारखा हा अध्यक्ष असावा. नेपोलियनला खरी सत्ता पाहिजे होती. नुसता राजाचा पोषाख नको होता. म्हणून सत्ताविहीन परंतु दरबारी थाटाचा अध्यक्ष असावा अशा या सूचनेला त्यानें मुळींच थारा दिला नाहीं. "फेकून द्या हें लठ्ठ फोफसें डुकर" असें ओरडून या सूचनेचा त्यानें धिक्कार केला.

मग जिच्यामध्यें दहा वर्षेंपर्यंत नेपोलियनला पहिल्या कॉन्सलचा अधिकार देण्यात आलेला होता ती ही नवी राज्यघटना लोकांच्या मतास घालण्यांत आली आणि तिला तीस लाखांहून जास्त मतें अनुकूल पडून जवळजवळ एकमतानें ती मान्य करण्यांत आली. अशा रीतीनें फ्रान्सच्या लोकांनीं आपल्या स्वतःच्या हातानेंच सगळी सत्ता नेपोलियनच्या हातीं अर्पण केली. हें करतांना त्यांना वेड्यासारखी खोटीच आशा वाटत होती, कीं त्याच्या प्रयत्नांनीं आपणांस स्वातंत्र्य आणि सुख मिळेल.

परंतु आपल्याला नेपोलियनचें सर्व जीवनचरित्र तपशीलवार रीतीनें पाहत जाणें शक्य नाहीं. एकसारखें कार्य करीत राहण्याची अत्यंत जिवंत प्रवृत्ति आणि एकसारखी अधिकाधिक सत्ता मिळविण्याची हांव यांनीं त्याची जीवनयात्रा भरगच्च व्यापलेली आहे. ज्या दिवशीं त्यानें राजसत्तेची उलथापालथ, घालमेल केली, त्याच दिवशींच्या दुसऱ्या रात्रीं, सांगितलेली राज्यघटना पसार होण्याच्या किंवा तयारही होण्याच्या पूर्वीं,

त्यानें कायद्याचें संकलन व संशोधन करण्यासाठीं दोन मंडळांची नेमणूकही करून टाकली. सर्वाधिकारी होताक्षणीं पहिलें काम त्यानें हें केलें. या मंडळाच्या बैठकी होऊन पुष्कळ चर्चा झाली. बैठकींमध्यें स्वतः नेपोलियनही भाग घेत असे. बऱ्याच दिवसांनंतर या मंडळांनीं एक कायदेसंग्रह तयार केला. आणि इ. स. १८०४ मध्यें तो पसंत होऊन अमलांत आला. त्याला नेपोलियनचा कायदे-संग्रह असें नांव आहे. क्रांतीच्या काळचे विचार किंवा आजकालची कसोटी यांच्या दृष्टीनें पाहिल्यास याच्यांतील कायदे फारसे सुधारलेले किंवा प्रगतिपर असे वाटणार नाहींत. परंतु त्या काळची जी परिस्थिति होती त्या मानानें पाहतां या कायद्यांमध्यें पुष्कळच पुढचें पाऊल टाकलेलें असून यानंतर सुमारें १०० वर्षेपर्यंत कांहीं कांहीं बाबतींत सर्व यूरप खंडामध्यें हा कायदेसंग्रह जवळजवळ एक सर्वस्वीं अनुकरणीय नमुनाच होऊन राहिला होता. याशिवाय त्यानें आणखी पुष्कळ रीतींनीं राज्यकारभारामध्यें साधेपणा आणि कार्यक्षमता हे गुण निर्माण केले. प्रत्येक लहानसहान गोष्टींतसुद्धां तो लक्ष देत असे आणि बारीकसारीक तपशीलसुद्धां लक्षांत ठेवण्याची त्याची शक्ति मोठी विलक्षण होती. त्याच्या स्वतःच्या अंगीं अचाट शक्ति आणि चापल्य असल्यामुळें तो आपल्या सहकाऱ्यांना आणि चिटणिसांना कामाखालीं अगदीं दमवीत असे. त्या काळच्या त्याच्या कामासंबंधीं त्याचा एक चिटणीस लिहितो, "राज्याचीं सूत्रें हालवावयाचीं, राज्यकारभाराकडे लक्ष पुरवावयाचें, वाटाघाटी करावयाच्या, या सर्व कामांमध्यें आपल्या अत्यंत सुव्यवस्थित अशा बुद्धीच्या साह्यानें हे दिवसाचे अठरा अठरा तास कामाचा पीट पाडतात. दुसऱ्या कितीक राजांना राज्याचीं सूत्रें चालवितांना जेवढें काम करावयाला शंभर शंभर वर्षें लागलीं असतीं, तेवढें काम त्यांनीं अवघ्या तीन वर्षांमध्यें पुरें केलें आहे." या विधानांत अर्थातच अतिशयोक्ति आहे. परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे. नेपोलियनच्या ठिकाणीं अकबराच्या-प्रमाणें असामान्य स्मरणशक्ति आणि अतिशयच सुव्यवस्थित असें बुद्धिसामर्थ्य होतें. त्यानें स्वतःच या बाबतींत लिहिलें आहे, "एखादी गोष्ट मला माझ्या मनांतून काढून टाकावयाची असली म्हणजे त्या गोष्टीचा कप्पा मी मिटवून टाकतों आणि दुसऱ्या एखाद्या गोष्टीचा कप्पा उघडतों. निरानिराळ्या कप्प्यांतील या गोष्टींची माझ्या मनामध्यें केव्हांही गल्लत होत नाहीं. त्यामुळें मला कधीं चिंता लागत नाहीं किंवा कधीं कंटाळा येत नाहीं. आणि मला झोंप हवी असली तर ! तर मग हे सगळे कप्पे मी मिटून टाकतों कीं लागलीच मग झोंप." यांत अतिशयोक्ति कांहीं नाहीं. कारण ऐन रणांगणांत युद्धाच्या धुमश्चक्रींत तेथल्या तेथेंच जमिनीवर पडून तो अर्धाएक तास झोंप घेत असे आणि मग पुन्हां खूप दीर्घ काळपर्यंत कसून काम करावयाला सज्ज होत असे ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

दहा वर्षांच्या मुदतीनें त्याला पहिला कॉन्सल म्हणून नेमण्यांत आलें होतें. त्यानंतर तीन वर्षांनीं या सत्तेच्या शिडीची आणखी एक पायरी तो इ. स. १८०२

मध्यें चढला. त्या वेळीं त्यानें आपली नेमणूक आयुष्य-अखेरपर्यंत करून घेतली आणि आपल्या अधिकारामध्येंही वाढ करून घेतली. प्रजासत्ताक राज्य या सुमारास जवळ-जवळ नष्टच झालेलें होतें. आणि नेपोलियन हा नांवाला जरी नाहीं तरी व्यवहारांत खरोखर स्वतः राजाच झालेला होता. आणि अखेरीस लोकांचेंच मत घेऊन १८०४ मध्यें त्यानें आपल्याला बादशहा म्हणून जाहीरही करून घेतलेंच. असें होणें हें आतां-पर्यंतच्या क्रमाप्रमाणें पाहतां अपरिहार्य होतें. आतां फ्रान्समध्यें सर्व सत्ता त्याच्या एकट्याच्या हातीं आणि अगदीं अनियंत्रित अशी होती; परंतु जुन्या काळच्या अनियंत्रित सत्ता धारण करणाऱ्या राजेलोकांमध्यें आणि त्याच्यामध्यें फार मोठा फरक होता. आपली सत्ता एखाद्या परंपरेच्या किंवा दैवी अधिकाराच्या पायावर टिकविणें त्याला शक्य नव्हतें. आपल्या सत्तेचें षूड टिकविण्यासाठीं त्याला कार्य-क्षमता आणि आपली लोकप्रियता यांचाच आधार घ्यावा लागत होता; त्यांतही शेतकरी-वर्गांतील आपल्या लोकप्रियतेचा. या शेतकरी-वर्गाचा अगदीं प्रथमपासून अखेरपर्यंत अत्यंत निष्ठापूर्वक त्याला पाठिंबा होता. कारण त्यानें आपल्या जमिनी राखल्या अशी त्यांची समजूत होती. नेपोलियन स्वतःच एकदां म्हणाला, 'दिवाण-खान्यांतील मतें किंवा बडबड करणाऱ्या चळवळ्या लोकांचीं मतें यांची मला काय फिकीर आहे? मी फक्त एकच मत ओळखतों, तें म्हणजे शेतकऱ्यांचें." परंतु एक-सारखे कधींही न संपणाऱ्या युद्धासाठीं आपल्या मुलांना पाठविण्याचा या शेतकऱ्यांना अखेरीस कंटाळा आला. हा त्यांचा आधार जेव्हां निघाला तेव्हां नेपोलियननें त्यावर उभारलेली प्रचंड इमारत डळमळूं लागली.

नेपोलियन दहा वर्षेंपर्यंत बादशहा होता. एवढ्या दरम्यान त्यानें साऱ्या यूरप खंडभर धुमाकूळ घातला, कित्येक आश्चर्यकारक लष्करी स्वाऱ्या पार पाडल्या आणि संस्मरणीय अशा लढायांमध्यें विजय मिळविले. त्याचें नांव ऐकून साऱ्या यूरप खंडभर थरकांप उडत असे. साऱ्या यूरप खंडभर त्यानें जसा दरारा गाजवला, तसा दरारा त्याच्या पूर्वीं किंवा त्याच्यानंतर केव्हांही कोणींसुद्धां गाजविलेला नाहीं. त्यानें जेथें विजय मिळविले अशा सुप्रसिद्ध जमिनीवरील लढायांत, मॅरेंगो, (ही लढाई इ. स. १८०० मध्यें स्वित्झर्लंडमध्यें झाली. तेथें आपल्या सैन्यासह ग्रेट सेंट बर्नोड खिंड, ऐन हिंवाळ्यांत ती सगळीकडे बर्फानें आच्छादित होऊन गेलेली असतांना नेपोलियननें ओलांडली.) ऊल्म, ऑस्टर्‌लिट्झ, जेना, आइलौ, फ्रीड्लँड, वाग्राम, इत्यादि ठिकाणच्या लढायांचा समावेश होतो. ऑस्ट्रिया, प्रशिया, आणि रशिया हे सारे देश त्यापुढें पार गडगडले. स्पेन, इटली, नेदर्लँड्स, ऱ्हाइन नदीवरील संयुक्त राज्य या नांवानें प्रसिद्ध असलेल्या जर्मनीचा बराचसा मोठा भाग, आतां वॉरसाची डची या नांवानें असलेला पोलंडचा भाग हे सगळे देश त्याच्या अंकित बनले. जुनें प्राचीन रोमन साम्राज्य आतांपर्यंत निदान नांवाला तरी जीव धरून होतें. त्याचीही आतां इतिश्री झाली.

यूरपमधील मुख्य राज्यसत्तांपैकीं इंग्लंडच तेवढें एकटें या विनाशाच्या झपाट्यांतून वांचलें. समुद्राचें कोडें नेपोलियनला अखेरपर्यंत केव्हांच उलगडलें नाहीं. नेमकें या समुद्रानेंच इंग्लंडचें रक्षण केलें. तसेंच समुद्रामुळें प्राप्त झालेल्या या सुरक्षित-पणाच्या बळावर इंग्लंड देश हाच त्याचा सर्वांत मोठा आणि अत्यंत कट्टा असा शत्रु झाला. नेपोलियनच्या जीवनक्रमाच्या अगदीं सुरुवातीलाच नेल्सननें नाईल नदीवरच्या लढाईंत नेपोलियनचें आरमार कसें नष्ट केलें हें मीं तुला सांगितलेंच आहे. १८०५च्या ऑक्टोबर महिन्याच्या २१ तारखेस नेल्सननें फ्रेंच आणि स्पॅनिश आरमाराच्या जोडगोळीविरुद्ध लढून स्पेनच्या दक्षिण किनाऱ्यावरील ट्रॅफल्गार बंदराच्या समोरच्या बाजूला नेपोलियनवर पूर्वीपेक्षां आणखीच मोठा विजय मिळाविला. याच आरमारी लढाईची अगदीं सुरुवात होण्याच्या क्षणाला नेल्सननें आपल्या आरमाराला आपला पुढील सुप्रसिद्ध संदेश दिला : “ प्रत्येक व्यक्तीनें आपलें कर्तव्य करावें अशी इंग्लंड देशाची अपेक्षा आहे.” विजयाच्या ऐन क्षणाला नेल्सन मरण पावला ; परंतु ज्या त्याच्या या विजयाची स्मृति इंग्लिश लोक मोठ्या अभिमानानें बाळगतात आणि ज्यासाठीं त्यांनीं लंडन शहरांत ट्राफल्गार चौक आणि नेल्सनस्तंभ यांची उभारणी केलेली आहे, त्या विजयामुळें नेपोलियनचें इंग्लंडवर हल्ला करण्याचें सुखस्वप्न नष्ट केलें.

या पराजयाला उलट उत्तर म्हणून नेपोलियननें यूरप खंडांतील सर्व बंदरें इंग्लंडला बंद करण्याबद्दल हुकूम काढला. इंग्लंडशीं कोणत्याही प्रकारचा संबंध कोणीं ठेवावयाचा नाहीं आणि अशा रीतीनें या “ दुकानदारांच्या, बनियांच्या राष्ट्राला ” शरण आणावयाचें असा नेपोलियनचा मनसुबा होता. इंग्लंडनें आपल्या बाजूनेंही या सर्व बंदरांची कोंडी केली आणि अमेरिका आणि इतर देश यांचा नेपोलियनच्या साम्राज्याशीं व्यापार होणार नाहीं अशी व्यवस्था केली. त्याशिवाय यूरप खंडांत अनेक प्रकारचीं कारस्थानें रचून आणि त्याच्या शत्रूंना आणि तटस्थ देशांना पैशाची नुसती खैरात करून इंग्लंड देश त्याच्या विरुद्ध लढाई चालवीतच होता. या कामांत इंग्लंडला यूरप खंडांतील मोठमोठ्या सावकारी पेढ्यांची, विशेषतः रॅाथचाइल्ड्सच्या[1] घराण्याच्या पेठांची फार मदत झाली.

याशिवाय आणखी एक साधन इंग्लंडनें नेपोलियनच्या विरुद्ध जें उपयोगांत आणलें तें म्हणजे प्रचारकार्याचें. त्या काळीं युद्धकार्यातील मोहिमेचें हें एक अगदीं नवीन प्रकारचें अंग होतें. पण आतां तें अगदीं सर्वांच्या रोजच्या परिचयाचें झालेलें आहे. फ्रान्सविरुद्ध, विशेषतः नेपोलियनच्या विरुद्ध, एक मोठी वर्तमानपत्राची मोहीम सुरू करण्यांत आली. नाना तऱ्हेचे लेख, चोपडीं, बातमीपत्रें, बादशहाची टिंगल करणारीं व्यंगचित्रें, खोट्यानाट्या बनावट आठवणी इत्यादि साधनें लंडनमध्यें छापून तयार करून त्यांचा आडमार्गानें फ्रान्समध्यें चोरटा शिरकाव करून देण्यात येऊं लागला. आजकाल खोट्या प्रचाराचीं वर्तमानपत्रांची मोहीम हा आधुनिक युद्ध-तंत्रांतील एक मोठा भाग आहे. १९१४ ते १९१८ च्या लढाईमध्यें युद्धांत पडलेल्या

सर्वच राष्ट्रांनीं अगदीं निर्लज्जपणें वाटेल त्या विलक्षण खोट्यानाट्या गोष्टींचा प्रसार केला आणि या खोट्यानाट्या गोष्टी निर्माण करण्यामध्यें व त्यांचा प्रसार करण्यामध्यें ब्रिटिश सरकार इतर कोणापेक्षांही पुष्कळच प्रमाणांत वरचढ ठरून त्याचा पहिला नंबर लागला! नेपोलियनच्या वेळेपासून शंभर वर्षांच्या दीर्घ मुदतींतील अनुभव आणि शिक्षण त्यांना होतें ना! आपल्या देशासंबंधींच्या खऱ्या गोष्टी दडपून टाकून किती अचाट खोट्या गोष्टी या देशांत आणि इंग्लंडमध्यें प्रसृत करण्यांत येत असतात, हें तर आपणां हिंदुस्थानांतील लोकांना चांगलेंच माहीत आहे.

## १०५

## पुन्हां एकवार नेपोलियन

६ नोव्हेंबर, १९३२

गेल्या पत्रांत नेपोलियनची गोष्ट जेथें आपण सोडली, तेथून ती या पत्रांत आपणांला पुढें चालू केली पाहिजे.

जेथें जेथें नेपोलियन जाई, तेथें तेथें त्याच्या बरोबर फ्रेंच राज्यक्रांतीचें थोडेंफार तरी वातावरण जात असे. त्यामुळें तो जे देश जिंकी, त्यांमधील लोकसमाज त्याच्या आगमनाला सर्वस्वीं प्रतिकूल नसे. त्यांच्या डोक्यावर अवजडपणें पाय रोवून राहिलेले त्यांचे ते निःसत्त्व आणि अर्धवट जमीनदारी-सरंजामशाही युगांतले राजे या लोकांना आतां अगदीं नकोसे झालेले होते. नेपोलियनच्या आगमनामुळें खास करून जर्मनीमध्यें सरंजामशाहीस पार खो मिळाला. स्पेनमध्यें त्यानें इन्क्विझिशनच्या न्यायासनाची इतिश्री केली; परंतु हें करीत असतांना अजाणतेपणें तो जी एकराष्ट्रीयत्वाची—राष्ट्रवादाची—भावना या देशांमधून निर्माण करीत गेला, तोच राष्ट्रवाद पुढें त्याचा शत्रु म्हणून उभा राहिला आणि त्यानेंच त्याचा पराभव केला. त्या तेथील जुन्या राजेमहाराजांचा तो पाडाव करूं शकला; परंतु सबंधच्या सबंध जनता जेव्हां त्याच्याविरुद्ध उभ्या राहूं लागल्या, तेव्हां त्यांच्यापुढें त्याचें कांहीं चालेना. अशा रीतीनें त्याच्या विरुद्ध उठलेल्या लोकांत स्पॅनिश लोक होते. हे लोक कितीक वेळपर्यंत त्याच्याशीं लढत राहिले आणि त्याची शक्ति व साधनें यांचा त्यांनीं फार नाश केला. जर्मन लोकांनींही बॅरन व्हॉन स्टीन या आपल्या महान् देशभक्ताच्या नेतृत्वाखालीं आपली संघटना केली. हा व्हॉन स्टीन तर नेपोलियनचा अतिशय कट्टा शत्रु होऊन राहिला. जर्मन लोकांनीं तर नेपोलियनशीं स्वातंत्र्यासाठीं युद्धच केलें. अशा रीतीनें त्यानेंच उदयाला आणलेला राष्ट्रवाद आणि एक आरमारी सत्ता यांचा संगम होऊन दोघांनीं

मिळून नेपोलियनचा पराभव केला. अर्थात् कांहीं झालें तरी सबंधच्या सबंध यूरप खंडानें सतत एका सर्वाधिकाऱ्याचा अम्मल सहन करावा हीही गोष्ट कठिणच होती किंवा कदाचित् स्वतः नेपोलियनच पुढें एकदां जें म्हणाला कीं, "माझ्या पाडावाबद्दल इतर कोणाला दोष न देतां तो दोष माझा मलाच दिला पाहिजे. मीच माझा मोठा शत्रु झालों. मीच माझ्या अपेशी, संकटमय भवितव्यतेचें कारण झालों!" तेंही खरें असण्याचा संभव आहे.

हा मनुष्य प्रतिभावान् असूनही त्याच्या ठिकाणीं फारच असामान्य दोष होते. हलक्या कुळामध्यें जन्माला येऊन उपटसुंभाप्रमाणें श्रेष्ठ स्थानीं आलेल्या माणसांच्या प्रवृत्तीची कांहींशी छटा त्याच्या ठिकाणींही होती. जुन्या आणि निःसत्त्व झालेल्या अशा का होईना, पण सगळे राजेमहाराजांनीं आपल्याला बरोबरीच्या नात्यानें वागवावें अशी कांहीं एक चमत्कारिक भावना त्याच्या मनांत एकसारखी दृढ होऊन राहिलेली असे. त्याचीं बहीणभावंडें जरी सर्वतोपरी नादान होतीं, तरी त्यांना वाटेल तशा मोठमोठ्या जागा किंवा अधिकार मिळवून देण्याचा चमत्कारिकपणा त्यानें केला. १७९९ च्या राजसत्ता उलथण्याच्या घालमेलींत ज्यानें त्याला मदत केली तो त्याचा भाऊ ल्यूसियन हा तेवढा शाहणा होता; परंतु पुढें त्याचें नेपोलियनशीं न पटल्यामुळें त्यानें राजकारण सोडून ल्यूसिअन इटलींत जाऊन स्वस्थ राहिला. त्याचे इतर भाऊ मोठे घमेंडखोर आणि मूर्ख होते. त्यांना नेपोलियननें राजे केले किंवा मोठमोठे अधिकारी केले. आपल्या कुटुंबांतल्या लोकांना मोठेपणा मिळवून द्यावा अशी नेपोलियनला मोठीच चमत्कारिक आणि ग्राम्य लोकांना शोभणारी अशी हांव होती; परंतु त्यांच्यापैकीं जवळजवळ प्रत्येकजणानें त्याच्याशीं विश्वासघात केला आणि त्याच्या ऐन अडचणीच्या वेळीं ते सगळेजण त्याला सोडून गेले! त्याचप्रमाणें आपला स्वतःचा राजवंश स्थापन करावा अशीही नेपोलियनला फार तीव्र इच्छा होती. त्याच्या चरित्रक्रमाच्या सुरुवातीलाच, इटलींत मोहीम घेऊन जाऊन त्यानें कीर्ति मिळविली त्याच्या आधींच, त्यानें जोसेफाईन डि बोहार्नाइ नांवाच्या स्त्रीशीं लग्न केलेलें होतें. ही स्त्री सुंदर होती; परंतु जरा चंचल स्वभावाची होती. तिच्यापासून त्याला मूल न झाल्यामुळें नेपोलियनची फारच भयंकर निराशा झाली. कारण त्याचें चित्त तर राजवंश स्थापन करण्यावर लागलें होतें. तेव्हां जोसेफाइनवर जरी त्याचें प्रेम होतें तरी तिच्याशीं घटस्फोट करून दुसरें लग्न करावयाचें, असा त्यानें विचार केला. रशियन राजघराण्यातल्या एका स्त्रीशीं लग्न करण्याची त्याची इच्छा होती. नेपोलियन हा त्या वेळीं जवळजवळ साऱ्या यूरप खंडाचा मालक होता. तरीपण रशियन बादशहाच्या घरांतील स्त्रीशीं लग्न करण्याची आकांक्षा त्यानें धरावी हा प्रकार झारला मोठा धृष्टपणाचा वाटला! त्यामुळें झारनें त्या गोष्टीला संमति दिली नाहीं. त्यानंतर नेपोलियननें जवळजवळ सक्तीनें ऑस्ट्रियाच्या हॅप्स्बर्ग घराण्यांतल्या बादशहाला स्वतःच्या मुलीचें लग्न आपल्याशीं करण्यास भाग पाडलें. त्या मुलीचें नांव मेरी लुईसी. तिच्यापासून त्याला एक मुलगा

झाला; परंतु मेरी मात्र स्वतः अगदींच मंद आणि बुद्धिहीन होती. नेपोलियन तिला मुळींच आवडत नसे. ही बायको कांहीं त्याला सुखाची झाली नाहीं. त्याच्यावर जेव्हां संकटाचा प्रसंग ओढवला त्या वेळीं तिनें त्याला सोडून दिलें आणि पुढें त्याचें तिनें कधीं नांवसुद्धां घेतलें नाहीं.

आपल्या सबंध पिढीच्या लोकांमध्यें कितीक बाबतींत श्रेष्ठ स्थानीं शोभणारा हा मनुष्य प्राचीन राजविषयक कल्पनांच्या पोकळ लखलखाटाच्या मोहाला एवढा बळी पडावा, ही फारच विलक्षण गोष्ट आहे. असें होतें तरीसुद्धा मधूनमधून ही स्वारी क्रांतीच्याही गप्पा मारीत असे आणि या निःसत्त्व राजेलोकांची टिंगलही करीत असे. एकीकडे क्रांति आणि नव्या पद्धतीची समाजरचना यांच्याकडे त्यानें जाणूनबुजून पाठ फिरविलेली होती; तर दुसरीकडे जुन्या जमान्याच्या लोकांनाही तो नकोसाच होता. या दोन परस्परविरोधी वृत्तींत त्याचा चक्काचूर झाला.

हळूहळू अगदीं अपरिहार्यपणें त्याच्या त्या सगळ्या लष्करी वैभवाचा व यशाचा जो व्हायचा तोच अंत घडून आलेला दिसतो. त्याच्या मंत्र्यांपैकींच कांहींजण त्याच्याशीं बेइमान होऊन त्याच्याविरुद्ध कारस्थानें रचूं लागतात. उदाहरणार्थ, टॅलेरांड हा रशियाच्या झारबरोबर कट करूं लागतो, तर फौशे हा इंग्लंडशीं संधान जुळवूं लागतो. या त्यांच्या विश्वासघातकी चाळ्यांत नेपोलियन त्यांना पकडतोही. पण काय चमत्कार पाहा, तो त्यांची नुसती खरडपट्टी काढतो आणि त्यांना मंत्रिपदांवर मात्र राहूं देतो. त्याचा एक सेनापति बर्नाडॉट हा त्याच्या विरुद्ध उलटून त्याचा कट्टा शत्रु होतो. एक त्याची आई आणि भाऊ ल्यूसियन हीं दोघें सोडलीं, तर त्याच्या कुटुंबांतील सर्वच मंडळी एकसारख्या भलभलत्या गैर गोष्टी करीत राहतात आणि त्याच्या विरुद्ध खटपटी करतात. प्रत्यक्ष फ्रान्स देशांतसुद्धां असंतोषाचें प्रमाण वाढूं लागतें. त्याच्या सर्वाधिकारशाहीचा अम्मल अधिकाधिक कडक आणि निर्दयपणाचा होऊं लागतो. खटला वगैरे न भरताच कित्येक लोकांना बंदिवास सोसावा लागतो. त्याचा भाग्यसूर्य आतां निश्चितपणें अस्ताचलाकडे झुकूं लागतो आणि पुढच्या नाशाची आगाऊ कल्पना येऊन कितीक उंदीर त्याच्या राज्यसंसाराचें जहाज सोडून पळून जातात. शारीरिक दृष्ट्या आणि मानसिक दृष्टीनेंही, त्याचें वय तसें फारसें मोठें नसूनसुद्धां, तो एक प्रकारें क्षीण होऊं लागतो. लढाईच्या अगदीं ऐन गर्दीत त्यानें असावें आणि अशा वेळीं त्याच्या आंतड्यांत तीव्र वेदना सुरू व्हाव्या असें आतां घडूं लागतें. सत्तेच्या उपभोगामुळेंही त्याच्या शक्तींचा ऱ्हास होत जातो. त्याचें मूळचें कार्यकौशल्य अर्थातच अजून शिल्लक राहिलेलें आहे; पण पूर्वींहून त्याच्या हालचाली आतां कमी वेगानें होऊं लागतात. कित्येकदां तो आतां कचरत असलेला किंवा संशयांत पडलेला दिसूं लागतो. त्याच्या सैन्यामध्येंही अधिकाधिक अवजडपणा येऊं लागतो.

इ. स. १८१२ मध्यें आपलें प्रचंड मोठें सैन्य घेऊन (या सैन्याला Grand

Armée असें म्हटलें जातें ) तो रशियावर चाल करून जातो. पहिल्या धडाक्याला तो रशियन सैन्याचा पराभव करतो आणि मग पुढें त्याची प्रगति विशेषसा विरोध न होतां होत राहते. रशियन सैन्य आपलें एकसारखें माघारच घेत राहतें. लढाईला तें उभेंच राहत नाहीं. या सैन्याला कोठें तरी गांठून, रोखून धरून त्याच्याशीं लढाई देण्यासाठीं ग्रँड आर्मीचा खूप प्रयत्न चालू असतो. पण त्यांत त्यांना यश येत नाहीं. अशा पाठलागामध्यें नेपोलियनचें सैन्य मॉस्कोमध्यें जाऊन पोहोंचतें. आतां शरण जावें असाच झारचा कल होत जातो. परंतु त्यापासून दोन गृहस्थांनीं त्याला परावृत्त केलें असें दिसतें. त्यांपैकीं खुद्द एक फ्रेंच होता. तो म्हणजे नेपोलियनचा मूळचा सहकारी आणि सेनापति बर्नाडॉट आणि दुसरा नेपोलियननें ज्याला फरारी आणि न्याय-बहिष्कृत म्हणून जाहीर केलें होतें तो जर्मन राष्ट्रवादी पुढारी बॅरन व्हॉन स्टीन हा होता. शत्रूला पळवून लावण्याच्या उद्देशानें रशियन लोकांनीं आपल्या हातानें आपल्या प्रिय मॉस्को शहराला आग लावून दिली. मॉस्कोला आग लावल्याची ही बातमी सेंट पीटर्सबर्ग येथें स्टीन याला तो जेवायला बसलेला असतांना कळते; त्यासरशीं दारूचा ग्लास वर उचलून तो ओरडतो, "आतापर्यंत तीन किंवा चार वेळां माझें सर्वस्व नाहींसें झालेलें आहे. असल्या वस्तू फेंकून देण्याची संवय झालेली असली पाहिजे. केव्हां तरी मरण यावयाचेंच हें जर ठरलेलें आहे, तर मग वीर होऊन तरी मरूं या!"

आतां हिंवाळ्याला सुरुवात झालेली आहे. जळतें मॉस्को शहर सोडून फ्रान्सला जावें असा विचार नेपोलियन करतो. म्हणून मग ग्रँड आर्मी, त्याचें तें प्रचंड लष्कर, हळूहळू मोठ्या कष्टानें माघार घेऊं लागतें. प्रवास सगळा रशियांतील बर्फावरचा आणि त्यांतच दोन्ही बाजूंनीं आणि पाठीमागूनही रशियाच्या कोसाक टोळ्यांचा ससेमिरा. केव्हां त्यांचा छुपा हल्ला यावा, केव्हां त्यांनीं आगी लावाव्या किंवा नुसतीच हूल दाखवावी आणि एकटादुकटा मागें राहिलेला कोणी सांपडला कीं त्याला कापून काढावें, असा नुसता भुंगा या लोकांचा सुरू होतो. एका बाजूला अत्यंत गार बर्फ आणि दुसऱ्या बाजूला हे कोसाक सैनिक यांच्यांत मिळून त्याच्या हजारों लोकांचा बळी घेतला जातो आणि त्या प्रचंड सैन्याची ती यात्रा अगदींच केविलवाणी आणि भुतासारखी होऊन जाते; सगळेजण पायीं चाललेले, अंगावरचे कपडे फाटले-तुटलेले, अनवाणी चालून चालून पायाला फोड आलेले, बर्फानें पायांची चामडी सोलून निघालेली अशा स्थितींत बिचारे कशीं तरी पावलें पुढें टाकीत असतात एवढेंच. आपल्या तोफखान्याच्या पथकासंगतीं नेपोलियनही स्वतः पुढें पायींच चालत असतो. या भयंकर हृदयविदारक यात्रेमध्यें त्याचें सैन्य रोजच्या रोज कमी कमी होत जातें आणि शेवटीं जवळजवळ मुळींच शिल्लक राहिलें नाहींसें होऊन जातें. काय थोडेसे मूठभर लोक घरीं जाऊन पोंचतात तेवढेच.

ही रशियन मोहीम म्हणजे नेपोलियनला फारच मोठा फटका होऊन गेला. त्यामुळें फ्रान्सचें मनुष्यबळ सर्वस्वीं संपून गेलें. त्यापेक्षां अधिक म्हणजे नेपोलियनवर

म्हातारपणाची कळा आली. तो चिंताग्रस्त होऊन गेला आणि लढाईच्या धकाधकीचा त्याला कंटाळा येऊन गेला; पण त्याला आतां शांतपणें राहावयाला मिळावयाचें नव्हतें. लगेच त्याच्या शत्रूंनीं चोहोंकडून त्याला घेरलें; अजूनही त्याच्या ठिकाणचें तें पूर्वीचें सेनानायकाचें अद्भुत कौशल्य जरी कायम होतें आणि त्यास जयच मिळत जात होते, तरीही शत्रूचें तें कडें नित्य अधिकाधिक आंवळतच गेलें. टॅलेरॉंडचीं गुप्त कारस्थानें वाढत गेलीं आणि नेपोलियनचे अगदीं पूर्ण विश्वासांतले असे कांहीं सेनापतीच त्याच्या-वर उलटले. त्यामुळें थकून जाऊन आणि या सगळ्या विश्वासघातकी वातावरणाचा वीट येऊन १८१४ च्या एप्रिल महिन्यांत त्यानें राज्यत्याग केला.

आता नेपोलियनचा कांटा वाटेंतून दूर झाल्यामुळें यूरप खंडांतील देशाच्या पुनः नवीन सरहद्दी ठरविण्यासाठीं म्हणून यूरपीय राज्यांची एक मोठी परिषद् व्हिएन्ना येथें भरविण्यांत आली. नेपोलियनची रवानगी भूमध्य समुद्रावरील एल्बा नांवाच्या बेटावर करून देण्यांत आली. बोर्बोन घराण्यांतीलच आणखी एक लुई, ज्याचा गिलोटीनखालीं वध झाला त्या लुईचा भाऊ, त्याला तो जेथें कोठें एकांतवासांत जाऊन दडून राहिला होता तेथून शोधून काढून फ्रान्समध्यें आणण्यांत आलें आणि अठरावा लुई म्हणून त्याची गादीवर स्थापना करण्यांत आली. अशा तऱ्हेनें पुन्हां एकदां बोर्बोन घराण्याचा अम्मल सुरू झाला आणि त्याबरोबरच पूर्वीची ती जुलूम-जबरदस्तीपण सुरू झाली. म्हणजे बॅस्टील पडल्यानंतर पंचवीस वर्षेंपर्यंत जी कांहीं शौर्य-धैर्याची कामगिरी करण्यांत आलेली होती, तिचा हा अशा रीतीनें पुरा अंत करण्यांत आला. व्हिएन्ना येथें जमलेले हे राजे लोक आणि त्यांचे मंत्री अधूनमधून आपसांत चर्चा करीत किंवा वर्दळीवर येत आणि दरम्यानच्या बाकीच्या काळांत जिवाची मौज करून घेत. आतां कसें त्यांना अतिशय ओझें उतरून हलकें झाल्या-सारखें वाटत होतें. त्यांच्या मानगुटीला बसलेलें केवढें तरी संकट दूर होऊन त्यांना आतां जरा मोकळेपणीं श्वास घ्यायला सवड मिळाली होती. नेपोलियनचा विश्वास-घात करणारा देशद्रोही मंत्री टॅलेरॉंड याची या राजांमध्यें आणि प्रधानांमध्यें फारच चहा आणि चलती होती. या परिषदेंत त्यानें पुष्कळच महत्त्वाचें कार्य केलें. या परिषदेंतील आणखी एक प्रसिद्ध मुत्सद्दी ऑस्ट्रियाचा परराष्ट्रमंत्री मेटरनिक् हा होता.

एका वर्षाच्या आंतच नेपोलियन एल्याला कंटाळला आणि फ्रान्सलाही बोर्बोन घराण्याची कारकीर्द पुरेशी झाली. एका छोट्याशा होडक्यामध्यें बसून नेपोलियन एल्बा बेटांतून निसटला आणि इ. स. १८१५ च्या फेब्रुवारी महिन्याच्या सव्विसाव्या तारखेस रिव्हिएराच्या आसपासच्या कॅने बंदरांत तो उतरला. शेतकरी लोकांनीं त्याचें मोठ्याच उत्साहानें स्वागत केलें. त्याच्याविरुद्ध लढाई देण्यासाठीं म्हणून जें सैन्य पाठविलें होतें, त्यानें आपला जुना सेनानायक असा तो 'छोटा नाईक' पाहतांच त्या सैनिकांनीं 'बादशहा दीर्घयुषी असोत' अशी आरोळी ठोकली आणि ते त्यालाच जाऊन मिळाले. अशा रीतीनें विजयी होऊन मोठ्या दिमाखानें तो

पॅरिसमध्यें येऊन पोंहोंचला आणि बोर्बोन घराण्यांतलि राजा पळून गेला; परंतु यामुळें यूरप खंडांतील इतर सर्व राजधान्यांमध्यें मात्र जिकडे तिकडे भयंकर भीति आणि घाबरगुंडी उडून गेली. व्हिएन्नामध्यें ती जी परिषद् चालली होती, नाचरंग आणि मेजवान्या यांची जी लयलूट चालू होती ती सर्व एकदम बंद झाली आणि सगळ्या राजांना आणि प्रधानांना एकच एक भीति असल्यामुळें आपलीं खाजगी भांडणें आणि कुरबूर विसरून जाऊन ते सगळेजण पुन्हां एकदां नेपोलियनचा पुरा पाडाव करण्याच्या बाबतीपुरते पूर्ण एकचित्त झाले. अशा रीतीनें सर्व यूरप खंड फ्रान्सवर चालून आलें; परंतु फ्रान्स देश खरोखर आतां लढाईला कंटाळलेला होता. नेपोलियनचें वय जरी या वेळीं फक्त शेहेचाळीस वर्षांचें होतें, तरी तोही आतां म्हातारा आणि थकलाभागलेला असा झाला होता. त्याची बायको मेरी लुईसी हीही त्याचा त्याग करून निघून गेली होती. या नव्या युद्धात कांहीं लढायांत त्यानें विजय संपादन केले; परंतु अखेरीस ब्रुसेल्स शहराजवळच्या वॉटर्लूच्या मैदानावर वेलिंग्टन आणि ब्लूचर यांच्या आधिपत्याखालील इंग्रज आणि प्राशियन सैन्याकडून तो परत आल्यापासून बरोबर शंभर दिवसांनीं त्याचा पराभव झाला. यासाठीं त्याच्या परत येण्याच्या या काळाला "ते शंभर दिवस" असें इतिहासामध्यें नांव देण्यांत आलें आहे. वॉटर्लू येथील लढाई ही कांहीं खरोखर अगदीं शर्थीची अशी लढाई झालीच नाहीं. शेवटल्या क्षणापर्यंत अमक्याच पक्षाला जय मिळेल अशी कांहींच खात्री नव्हती; परंतु नेपोलियन हा दुर्दैवी ठरला. ही लढाई कदाचित् त्याला जिंकतांही आली असती; परंतु ती जिंकूनसुद्धां कांहीं काळानंतर त्याला यूरप खंडाच्या एकत्र झालेल्या सैन्यापुढें एक वेळ नमावेंच लागलें असतें. आतां त्याचा पराभव झाला असें दिसून येतांच त्याच्या पाठीराख्यांपैकींच पुष्कळसे लोक त्यावर उलटले आणि अशा रीतीनें त्यांनीं आपल्या स्वतःचा बचाव करण्याचा प्रयत्न केला. अशा स्थितींत आणखी झगडा करीत राहून कांहींच उपयोग नव्हता. म्हणून पुन्हां एकदां त्यानें राज्यत्याग केला आणि फ्रेंच बंदरांत नांगरलेल्या एका इंग्रज जहाजावर जाऊन तेथील खलाश्यांच्या तो स्वाधीन झाला. 'माझ्या मनांतून आतां इंग्लंडमध्यें जाऊन शांतपणें काळ कंठावा असें आहे' अशी इच्छा त्यांच्याजवळ त्यानें व्यक्त केली.

आपल्याला इंग्लंडकडून किंवा यूरप खंडाकडूनही उदारपणानें किंवा सभ्यपणानें वागविलें जाईल अशी खरोखरच जर नेपोलियनची समजूत असली, तर त्यांत त्याची फारच मोठी चूक होती. हे सगळे लोक त्याला इतके भयंकर भीत होते कीं त्यामुळें आणि तो नुकताच एल्बांतून निसटून आलेला असल्यामुळें त्याला कोठें तरी दूर नेऊन अगदीं चांगल्या खड्या पाहऱ्यामध्यें ठेवलें पाहिजे, याबद्दल त्यांच्या मनामध्यें तिळमात्र सुद्धां संशय राहिलेला नव्हता. म्हणून त्यानें केलेली कोणतीही तक्रार न ऐकतां त्याला त्यांनीं कैद केल्याचें जाहीर केलें आणि बरोबर थोडेसे लोक बोलण्याचालण्यासाठीं किंवा सेवेसाठीं म्हणून देऊन दक्षिण अॅटलांटिक महासागरांतील सेंट हेलेना या

अत्यंत दूरच्या एका बेटावर त्यांनीं त्याची रवानगी केली. सगळ्या यूरप खंडाचा तो कैदी समजला जात असे. त्यामुळें पुष्कळशीं राज्यें आपापला प्रतिनिधि तेथें त्याच्यावर नजर ठेवण्याकरिता म्हणून पाठवीत असत. तथापि त्याच्यावर पाहरा करून त्याला सांभाळण्याची खरी जबाबदारी इंग्लंडवरच होती. हें बेट जगापासून जरी इतकें दूर होतें, जगाशीं त्याचा कांहींएक संबंध येत नव्हता, तरीसुद्धां नेपोलियनवर देखरेख ठेवण्यासाठीं इंग्रजांनीं भलें मोठें सैन्य तेथें नेऊन ठेवलें होतें. सेंट हेलेनाच्या एकाकी खडकाचें वर्णन त्याच वेळीं तेथें गेलेला रशियाचा प्रतिनिधि काउंट बालमेन यानें पुढीलप्रमाणें केलें आहे : "ही जागा साऱ्या जगामध्यें जास्तींत जास्त निरुत्साह उत्पन्न करणारी, सगळ्यांत अधिक एकांतवासाची; तेथें जाऊन पोंचण्याला सगळ्यांत अधिक कठिण ; संरक्षण करण्याला सर्वांत अधिक सोपी, हल्ला करण्याला सर्वांत अधिक अडचणीची; माणसाच्या वस्तीला–समाजाला–सर्वांत अधिक प्रतिकूल अशी आहे." इंग्रजांनीं त्या बेटाचा गव्हर्नर जो नेमला होता, तो अगदींच विलक्षण, जगावेगळा माणुसघाण्या आणि रानवट मनुष्य होता. त्यानें नेपोलियनला फारच हलकटपणानें वागविलें. याही बेटावर एका जास्तींत जास्त घाण जागीं एका मोडक्या गचाळ घरांत त्याला ठेवण्यांत आलें होतें आणि त्याच्यावर व त्याच्या सोबत्यांवर नानाविध अपमानकारक निर्बंध घालण्यांत आले होते. कित्येकदां तर त्याला धड पोटभर चांगलें, रुचकर व पथ्यकारक अन्नसुद्धां खायला मिळत नसे. त्याला आपल्या यूरपमधील मित्रमंडळींशीं पत्रव्यवहार करावयाला मोकळीक नव्हती. तो राज्यावर असतांना आपल्या लहान मुलाला त्यानें 'इटालीचा राजा' ही पदवी दिलेली होती. त्या त्याच्या लहान मुलाशींसुद्धा त्याला पत्रव्यवहार करायला येत नसे. एवढेंच नव्हे, तर त्याच्या मुलाची हालचालसुद्धां त्याला कळूं दिली जात नसे.

नेपोलियनला इतक्या वाईट रीतीनें वागविण्यांत आल्याचें पाहून मोठें आश्चर्य वाटतें ! परंतु सेंट हेलेना बेटाचा गव्हर्नर काय, बिचारा आपल्या सरकारचा एक हस्तक मात्र होता. तेव्हां आपल्या या कैद्याला अशा रीतीनें वाईट वागविण्याचें आणि त्याचा अपमान करण्याचें धोरणच इंग्रज सरकारचें जाणूनबुजून ठरलेलें असावें. यूरप खंडांतील इतर राज्यकर्त्यांचीही या गोष्टीला संमति असल्यामुळें त्यांच्यावरही यातली जबाबदारी येते. नेपोलियनची आई इतक्या म्हातारपणींसुद्धा सेंट हेलेनामध्यें जाऊन राहावें असें म्हणत होती; पण यूरप खंडाच्या मोठ्या देशांनीं तिला परवानगी दिली नाहीं. नेपोलियनचे सारे पंख आतां तोडून टाकण्यांत आले होते आणि एका दूरच्या बेटावर अगदीं सत्ताहीन होऊन तो बसला होता. तरीसुद्धां त्याला इतक्या हलकट रीतीनें वागवण्यांत येत होतें. यावरून साऱ्या यूरप खंडभर त्याची भीति किती मोठ्या प्रमाणांत बसलेली होती याचा अंदाज येण्यासारखा आहे.

सेंट हेलेना बेटावर अशा रीतीनें हें जीवंत मरण नेपोलियननें साडेपांच वर्षेंपर्यंत सहन केलें. इतकी मोठी शक्ति व उत्साह असणारा आणि एवढा मोठा महत्त्वा-

कांक्षी, अशा या मनुष्यावर जेव्हां एका लहानशा खडकाळ बेटावर कोंडून पडण्याचा प्रसंग आला आणि त्यांतही रोजच्या रोज क्षुद्र लोकांनीं केलेले अपमान सहन करावे लागूं लागले, तेव्हां त्याच्या मनाला केवढ्या यातना झाल्या असतील याची कल्पना करणें कांहीं कठिण नाहीं. १८२१ च्या मे महिन्यांत तो मरण पावला; परंतु मृत्युनंतर-सुद्धां त्याच्या गव्हर्नरच्या द्वेषानें त्याची पाठ सोडली नाहीं आणि त्याच्या प्रेतावर एक भिकारडें थडगें उभारण्यांत आलें. नेपोलियनला कशा वाईट रीतीनें वागविण्यांत आलें, त्याचा छळ कसा करण्यांत आला याची बातमी हळूहळू जशी यूरपमध्यें येऊन पोंचली (या बातम्या पोंचावयाला त्या काळीं फारच उशीर लागत असे), तसा त्याविरुद्ध इंग्लंडसुद्धां पुष्कळ देशांत फारच आरडाओरडा सुरू झाला. या वाईट वागणुकीची प्रत्यक्ष जबाबदारी मुख्यतः ज्याच्यावर होती तो कॅसलरा हा इंग्लंडचा त्या वेळचा परराष्ट्रमंत्री त्यामुळें लोकांमध्यें फारच अप्रिय झाला; या अप्रियतेला त्याच स्थानिक कठोरतेचें धोरणही कारण होतेंच. लोकांमधील या तिटकाऱ्याचें त्याला इतकें वाईट वाटलें, कीं त्यानें त्यावरून आत्महत्या केली.

श्रेष्ठ आणि अलौकिक मनुष्यांबद्दल बऱ्यावाईटपणाचा निर्णय देणें हें फारच कठिण काम आहे आणि नेपोलियन हा असा श्रेष्ठ आणि अलौकिक पुरुष होता या-बद्दल कांहींच संशय असणें शक्य नाहीं. वारा व पाऊस यांच्यासारख्या निसर्गांतील महान् शक्तीप्रमाणें त्याची शक्ति फारच प्रचंड आणि अप्रतिहत होती. त्याच्या ठिकाणीं नवनव्या विचारांचें स्फुरण होत होतें; त्याची कल्पनाशक्ति मोठी समर्थ होती; परंतु उच्च ध्येयांची आणि स्वार्थरहित हेतूंची किंमत ओळखण्याची ताकद त्याच्या ठिकाणीं नव्हती. लोकांना वैभव आणि संपत्ति देऊं करून त्यांच्यावर आपली छाप टाकण्याचा व त्यांना आपणांकडे वळविण्याचा त्याचा नेहमीं प्रयत्न असे. त्यामुळें त्याच्या वैभवाचा आणि सत्तेचा सांठा जसा संपुष्टांत येऊं लागला, तेव्हां ज्या लोकांना त्यानें पुढें आणलें होतें त्यांच्यामध्यें त्याच्याशीं ज्यासाठीं त्यांनीं एकनिष्ठ राहावें असे कोणतेच उच्च ध्येयात्मक हेतू राहिले नाहींत आणि म्हणून पुष्कळांनीं हलकटपणानें त्याला सोडूनही दिलें. धर्माचें बंधन असेल म्हणावें, तर त्याच्या दृष्टीनें धर्म म्हणजे गरीब आणि दलित लोकांना आपल्या प्राप्त अवस्थेबद्दल संतुष्ट राखण्याचें एक साधन किंवा मार्ग मात्र होता. ख्रिश्चन धर्माबद्दल एकदां तो म्हणाला, "ज्या धर्माप्रमाणें प्लेटो किंवा साक्रेटीस हे नरकांत जाण्यास पात्र असे पापी ठरतात, तो धर्म मी कसा स्वीकारूं?" इजिप्तमध्यें असतांना त्यानें इस्लाम धर्माविषयीं आपल्या मनाचा थोडा अनुकूल ग्रह व्यक्त केला, तो तरी असें केल्यानें तेथील लोकांचें प्रेम आपल्याबद्दल निर्माण करतां येईल अशी त्याची कल्पना होती म्हणून, यांत कांहींच संशय नाहीं. तो स्वतः सर्वस्वीं अधार्मिक होता. तरीपण धर्माला त्याचा नेहमीं पाठिंबा असे. कारण धर्म हा प्रचलित समाजव्यवस्थेचा मोठाच आधारस्तंभ आहे अशा प्रकारची त्याची भावना होती. तो म्हणे, "धर्मानें समतेच्या कल्पनेचें

अस्तित्व फक्त स्वर्गाच्या ठिकाणीं, परमेश्वराच्या ठिकाणीं काल्पित केलेलें आहे. त्यामुळें गरिबांकडून श्रीमंतांची कत्तल होण्याचें टळतें. रोगप्रतिबंधक लशीचा जो उपयोग तसाच धर्माचा आहे. मनुष्याच्या ठिकाणीं अद्भुततेबद्दल जी एक स्वाभाविक अभिरुचि आहे तिचा संतोष धर्मामुळें साधतो आणि त्या पायीं, कदाचित् आपण जे भोंदू किंवा किमयागारांच्या नादीं लागण्याचा संभव असतो, त्यापासून आपण वांचतों. मालमत्तेच्या बाबतींत विषमता असल्याशिवाय समाज टिकणारच नाहीं. आपल्या शेजारचा मनुष्य पक्वान्नावर ताव मारीत आहे असें दिसत असतां, ज्या माणसावर उपासमारीनें मरण्याची पाळी येईल तो मनुष्य धर्मावर जर त्याची अढळ निष्ठा असेल आणि परलोकामध्यें याहून निराळ्या प्रकारची संपत्तीची वांटणी होऊन आपलें दैन्य संपेल या विचाराचा त्याला आधार असेल, तरच मात्र जगून राहूं शकेल." त्याला आपल्या सामर्थ्याचा इतका अभिमान होता, कीं त्या ताठ्यांत तो एकदां म्हणाला होता म्हणतात कीं, "वरचें आभाळ जर आपल्यावर कोसळून पडणारच असेल, तर आम्ही आपल्या भाल्यांच्या टोंकांवर तें वर उचलून धरूं."

श्रेष्ठ पुरुषांच्या ठिकाणीं दुसऱ्याला मोहनी घालण्याचें जें सामर्थ्य असतें, तें त्याच्या ठिकाणीं होतें. त्यामुळें पुष्कळांची अत्यंत भक्तियुक्त मैत्री त्यानें संपादन केली. अकबराप्रमाणें त्याच्याही दृष्टींत जादूसारखी आकर्षकता होती. तो एकदां म्हणाला होता कीं, "मीं माझी तलवार म्यानांतून क्वचितच बाहेर काढली असेल. मी लढाया डोळ्यांनीं जिंकीत असतों, हत्यारांनीं नव्हे!" साऱ्या यूरप खंडाला ज्यानें युद्धाच्या खाईत लोटलें अशा माणसाच्या तोंडीं केवढी ही विचित्र भाषा! पुढच्या काळामध्यें तो हद्दपारीमध्यें असतांना एकदां म्हणाला, "बळ किंवा शक्ति हा कांहीं उपाय नव्हे; तलवारीपेक्षां मनुष्याची अंतःशक्ति, मन, हें अधिक श्रेष्ठ आहे." तो एकदां असेंही म्हणाला, "मला सगळ्यांत अधिक अचंबा कशाचा वाटतो, ठाऊक आहे तुम्हांला? कोणतीही गोष्ट घडवून आणण्याचें सामर्थ्य शक्तीच्या, सत्तेच्या ठिकाणीं असत नाहीं या गोष्टीचा. जगामध्यें दोन गोष्टींच्या ठिकाणीं सत्तेचें अस्तित्व आहे. एक मन आणि दुसरी तरवार! पण अखेरीस नेहमीं मनाचा तरवारीवर विजय व्हावयाचा हें ठरलेलें!" परंतु अशी अखेर साधण्यापर्यंत दीर्घ काळ वाट पाहत राहण्याला नेपोलियनला सवड नव्हती. त्याला सर्व प्रकरण अगदीं झटपट उरकणें जरूर होतें. म्हणून आपल्या चरित्रक्रमाच्या सुरुवातीलाच त्यानें तरवारीचा मार्ग पत्करला होता. तरवारीच्या बळावरच त्याचा विजय झाला आणि तरवारीच्या बळावरच त्याचा पाडाव झाला! पुन्हा एका ठिकाणीं तो म्हणतो, "युद्ध हें एक कालविपर्यासाचें उदाहरण आहे. (या काळाला योग्य नसलेलें असें तें एक साधन आहे.) एक काळ असा खास येईल कीं त्या वेळीं मनुष्याला तोफेच्या गोळ्यावांचून आणि संगिनीवांचून यश-जय मिळवतां येईल." परंतु त्याच्यापुढची सारी परिस्थिति या प्रकारच्या प्रयत्नाला विसंगत, त्याच्या आटोक्याबाहेरची होती. त्याची अवखळ व सदा पुढें पुढें उड्या मारणारी महत्त्वाकांक्षा,

युद्धामध्यें त्याला विनायास मिळत गेलेला विजय, यूरपमधील राज्यकर्त्यांना या उपटसुंभ मनुष्याविषयीं वाटणारा तिटकारा आणि भीति, या कारणांमुळें नेपोलियनला शांततेनें स्थिरस्थावर होण्याला अवसरच मिळाला नाहीं. युद्धांमध्यें सैनिकांच्या प्राणांची आहुती देण्यास तो यत्किंचित् मागें-पुढें पाहत नसे; परंतु कोणाच्याही यातना पाहिल्या म्हणजे त्याच्या अंतःकरणाची फारच तळमळ होत असे असें म्हणतात.

आपल्या वैयक्तिक जीवनांत त्याची राहणी अतिशय साधी होती. कोणत्याही गोष्टीचा त्यानें अतिरेक केला नाहीं; एक कामाचा तेवढा त्यानें अतिरेक केला तो सोडून. त्याचें असें म्हणणें असे कीं, "मनुष्यानें कितीही कमी खायचें म्हटलें तरीही त्याच्या पोटांत जरुरीपेक्षां जास्त अन्न जातेंच. फाजिल खाण्यामुळें मनुष्य आजारी पडूं शकेल; परंतु कमी खाण्यामुळें माणूस केव्हांही आजारी पडूं शकणार नाहीं." त्याच्या या साध्या राहणीमुळें त्याची प्रकृति फारच उत्कृष्ट राहिली आणि प्रचंड सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालें. मनांत आलें की त्याला झोंप लागूं शकत असे आणि कितीही थोडी झोंप घ्यायची म्हटली तरी तेवढी घेऊन तो उठत असे. सकाळीं आणि संध्याकाळीं मिळून शंभर मैल घोड्यावरून फेरफटका करणें ही कांहीं त्याच्या बाबतींत विशेष अलौकिक अशी गोष्ट नव्हती.

महत्त्वाकांक्षेच्या भरीं भरून नेपोलियननें सारें यूरपखंड पायांखालीं तुडविलें होतें. त्यामुळें त्याच्या मनापुढें साऱ्या यूरपखंडाचें एकच राज्य असावें अशी कल्पना निर्माण झाली होती. "राज्य एक, त्यांतील कायदे सर्व ठिकाणीं सारखे, राज्यव्यवस्थाही एकाच प्रकारची," असा त्याचा विचार होता. "या सगळया राष्ट्रांना मी एका राष्ट्रामध्यें विलीन करीन" असें तो म्हणे. पुढें सेंट हेलेनामध्यें हद्दपारींत असताना त्याच्या ठिकाणीं विचारीपणा जेव्हां अधिक वाढला, तेव्हां हा वरचा विचार त्याच्या मनांत पुन्हां एकदां जागृत झाला. परंतु या वेळीं त्यांत त्याच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेचा संपर्क नव्हता. तो या वेळीं म्हणतो, "केव्हां ना केव्हां तरी परिस्थितीच्या जोरामुळेंच असें हें ऐक्य (यूरपीय राष्ट्रांचें) घडून येईलच येईल! या बाबतींतील पहिली प्रेरणा मीं दिली आहे आणि मीं जी पद्धत घालून दिलेली आहे ती नाहींशी झाल्यानंतर, मला तर असें वाटतें, कीं यूरपमध्यें शांतता आणि स्वास्थ्य प्रस्थापित होण्याचा एकच फक्त मार्ग शिल्लक राहील. तो म्हणजे सर्वांचा मिळून एक राष्ट्रसंघ स्थापण्याचा!" या गोष्टीला १०० वर्षें होऊन गेलीं, तरीपण यूरप खंड अजून राष्ट्रसंघाचा प्रयोग करीत अंधारांतच चांचपडत आहे.

*त्यानें अखेरचें जें एक मृत्युपत्र लिहून ठेवलें आहे, त्यामध्यें त्यानें आपल्या अल्पवयी* मुलाला एक संदेश लिहून ठेवला आहे. त्याच मुलाला त्यानें रोमचा बादशहा म्हणून जाहीर केलें होतें आणि त्याच्याचबद्दल कसलीही बातमी नेपोलियनला न कळूं देण्याचा दुष्ट निर्दयपणा केला जात होता. त्याला अशी आशा होती, कीं आपला मुलगा केव्हां तरी राजा होईल. म्हणून त्यानें शांततेनें राज्यकारभार करावा, सक्तीचा

किंवा जुलुमाचा त्यानें अवलंब करूं नये असा त्याचा उपदेश होता. त्यानें लिहिलें आहे "यूरप खंडामध्यें माझा दरारा बसण्यासाठीं मला शस्त्रांचा उपयोग करावा लागला; परंतु सध्यांच्या काळचा मार्ग बुद्धिवादानें लोकांचीं मनें वळविणें हा आहे." परंतु या मुलाच्या नशिबांत राज्यपद भोगण्याचें नव्हतें. बापानंतर अकरा वर्षांनींच आपल्या अगदीं ऐन तारुण्यांत व्हिएन्ना येथें तो मरण पावला.

पण हे सगळे विचार हद्दपारीमध्यें असतांना आणि त्याची वृत्ति पुष्कळशी विचारी आणि मृदु झाली असतांना नेपोलियनच्या मनामध्यें आले. त्याचप्रमाणें आपल्या पुढच्या पिढ्यांची आपल्याविषयीं अनुकूल मतें व्हावीं या बुद्धीनेंही हें सारें त्यानें लिहिलें असेल. त्याच्या श्रेष्ठपणाच्या काळांत त्याचा सारा वेळ कामाच्या धकाधकींत इतका जात होता कीं तत्त्वज्ञाप्रमाणें विचार करायाला त्याला फुरसतही नव्हती. त्या वेळीं त्याची सारी पूजाअर्चा सत्तादेवीच्या पायांशीं चाललेली होती. त्याचें खरें आणि एकच प्रेम कशावर असलेंच तर तें सत्तेवर होतें. मात्र त्याचें हें प्रेम कलावंताच्या हृदयांतलें होतें. एखाद्या रानगटासारखें तें नव्हतें. तो म्हणतो, "माझें सत्तेवर प्रेम आहे ; होय, आहे माझें प्रेम सत्तेवर ; पण कलावंताचें आपल्या कलेच्या ठिकाणीं ज्या प्रकारचें प्रेम असतें त्या प्रकारचें तें आहे. फिडल वाजविणाराचें आपल्या फिडलवर कशासाठीं प्रेम असतें? तर आपल्या जादूच्या स्पर्शानें त्याच्या तारांमधून स्वर, लकेरी आणि मधुर संगीताची लय उत्पन्न करण्यासाठीं ! तसेंच माझ्याही सत्ताप्रेमाचें आहे." हें सगळें जरी खरें असलें, तरी वारंवार सत्तेच्या पाठीमागें लागणें ही गोष्ट धोक्याचीच असते. आज ना उद्यां अशा सत्तेच्या मागें लागणाऱ्या व्यक्तींचा काय किंवा राष्ट्रांचा काय, ऱ्हास आणि नाश हा व्हावयाचाच ! अशाच न्यायानें नेपोलियनचा पाडाव झाला आणि तो झाला हेंही बरेंच झालें.

त्याच्या मागून इकडे फ्रान्समध्यें पुन्हां बोर्बोन घराण्याची कारकीर्द सुरू झाली; परंतु कोणीं तरी म्हटलें आहे, कीं या बोर्बोन घराण्यांतील लोकांना नवीन कांहीं शिकण्याची किंवा पूर्वीचें शिकलेलें विसरून जाण्याची अक्कलच नव्हती. नेपोलियनच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांच्या आंतच फ्रान्स देश या राजांना कंटाळला आणि तेथील लोकांनीं त्यांना उलथून टाकलें. त्यानंतर दुसरें एक राजघराणें स्थापन झालें आणि नेपोलियनबद्दल देशामध्यें आतां पुन्हां एकदां सद्भाव जागृत झाला होता, याचें निदर्शक म्हणून वेंडोम या श्रेष्ठतम फ्रेंच सेनापतीच्या नांवानें उभारलेल्या विजयी सेनापतीच्या स्तंभाच्या शिखरावरून त्याचा पुतळा काढून टाकण्यात आला होता, तो पुन्हां तेथें बसविण्यात आला.

या सुमारास त्याची आई वृद्धपणामुळें आंधळी झालेली होती; तरीपण त्या दुःखी-कष्टी मातेनें या वेळीं उद्गार काढले, *"बादशहा आज पुन्हां पॅरिसमध्यें आला !"*

## १०६

# एकवार सर्व जगाची संकलित पाहणी

१९ नोव्हेंबर, १९३२

जगाच्या रंगभूमीवर इतका काळ दणका गाजविल्यानंतर अशा रीतीनें अखेरीस नेपोलियन तेथून निघून गेला. तेव्हांपासून आतां शंभरांहून अधिक वर्षें होऊन गेलीं आहेत आणि त्याच्यासंबंधीं मतामतांचें उठलेलें वादळ आतां बहुतेक शमलेलें आहे. तरीपण मीं मागें म्हटल्याप्रमाणें अद्यापिही निरनिराळ्या लोकांचीं त्याच्याविषयीं निरनिराळीं मतें आहेत. संभव असा वाटतो, कीं नेपोलियन जर दुसऱ्या एखाद्या जास्त शांततेच्या काळीं जन्माला आला असता, तर तो एक अत्यंत कर्तबगार आणि बुद्धिवान् सेनापति म्हणून चमकला असता; याहून कांहीं विशेष नाहीं आणि मग त्याची लोकांमध्यें एवढी चहा आणि स्मृति पण राहिली नसती; परंतु क्रांति आणि बदलतें कालमान यांमुळें त्याला पुढें सरकण्याची संधि मिळाली आणि ती त्यानें चांगली साधली. त्याचा पाडाव होऊन यूरपीय राजकारणांतून तो नाहींसा झाला यामुळें यूरप खंडांतील लोकांना फार हायसें वाटलें असेल. कारण ते सगळेजण आतां युद्धाला कंटाळलेले होते. एका सबंध पिढीला शांततेचा काळ असा माहीतच नव्हता आणि शांततेसाठीं लोकांचीं मनें अगदीं आसावलेलीं होतीं. नेपोलियन गेल्यानें यूरप खंडांतील राजे आणि महाराजे लोकांना जितकें हायसें वाटलें, तितकें तर दुसऱ्या कोणालाही वाटलें नसेल. कारण आज किती वर्षें नेपोलियनच्या नुसत्या नांवानें त्यांच्या हृदयांत धडकी भरून राहत आली होती.

आतांपर्यंत फ्रान्समध्यें आणि यूरपमध्यें आपण फारच वेळ घालविला आहे. शिवाय आतां आपण एकोणिसाव्या शतकांतही बराचसा शिरकाव केलेला आहे. तेव्हां येथें जरा थांबून एकदां सगळ्या जगाचें आपण निरीक्षण करूं या आणि नेपोलियनच्या पाडावाच्या वेळीं जगाची अवस्था कशी काय होती हें पाहूं या.

यूरपमध्यें सगळे जुने राजे आणि त्यांचे मंत्री यांची एक परिषद् व्हिएन्ना येथें भरलेली होती, हें तुला आठवत असेल. त्यांच्या पुढचा बागुलबुवा आतां नाहींसा झालेला होता. तेव्हां आतां आपला तो पूर्वीचा खेळ करायला आणि आपल्या लहरीप्रमाणें आणि मर्जीप्रमाणें कोट्यवधि लोकांचें भवितव्य ठरवून टाकायला त्यांना आतां कशाचीच हरकत नव्हती. लोकांच्या इच्छा काय होत्या, हा त्यांच्यापुढें विचार नव्हता किंवा देशांच्या निसर्गसिद्ध आणि भाषावार सरहद्दी कशा काय होत्या याचीही त्यांना फिकीर करावयाची नव्हती. तेथें जमलेल्यांमध्यें रशियाचा झार, इंग्लंड (कॅसलरा हा इंग्लंडचा प्रतिनिधि होता), ऑस्ट्रिया (प्रतिनिधि मेटरनिक्) आणि प्रशिया अशीं चार प्रमुख राष्ट्रें होतीं. पांचवा अर्थात् टॅलेरॉंड हा होताच. हा हुषार,

चतुर, बुद्धिमान् आणि लोकप्रिय माणूस प्रथम नेपोलियनचा मंत्री होता आणि आतां फ्रान्सच्या बोर्बोन घराण्यांतील राजांचा मंत्री झालेला होता. नाच-गाणीं आणि मेजवान्या यांच्या दरम्यान जो कांहीं वेळ मिळेल त्यांत या लोकांनीं यूरपचा नकाशा नेपोलियननें जो अगदींच इतका मोठा बदलून टाकला होता, तो पुन्हां एकदां ठाकठीक केला.

फ्रान्सच्या डोक्यावर बोर्बोन घराण्यांतील अठराव्या लुईला लादण्यांत आलें. स्पेनमध्यें इन्क्विझिशनच्या न्यायासनाचीसुद्धां पुन्हां स्थापना करण्यांत आली. या परिषदेस जमलेल्या राजेलोकांना प्रजासत्ताक राज्यपद्धति मुळींच रुचणारी नव्हती. त्यामुळें त्यांनीं हॉलंडमध्यें पहिलें जें प्रजासत्ताक राज्य होतें त्याऐवजीं हॉलंड आणि बेल्जम् यांची नेदर्लंड म्हणून एका ठिकाणीं गठडी करून तेथें एका राजाचें राज्य प्रस्थापित केलें. या लोकांनीं पुन्हां एकदां स्वतंत्र देश म्हणून पोलंडचा कोणताच भाग शिल्लक ठेवला नाहीं. हा देश ऑस्ट्रिया, प्रशिया व विशेषतः रशिया यांनीं गिळंकृत करून टाकला. व्हेनिस आणि उत्तर-इटली हा प्रांत फ्रान्सकडे देण्यांत आला. थोडासा इटलीचा तुकडा आणि स्वित्झर्लंड व रिव्हिएरा यांच्या दरम्यानचा फ्रान्सचा एक तुकडा असे दोन तुकडे मिळून सार्डिनिया नांवाचें नवीनच एक राज्य प्रस्थापित करण्यांत आलें. मध्य यूरपमध्यें जर्मन संघराज्य ( confederation ) आहे अशा प्रकारची कांहींशी चमत्कारिक आणि अंधुक कल्पना ठरविण्यात आली ; परंतु त्यामध्यें खरीं प्रमुख अशीं दोनच राज्यें होतीं. एक प्रशियाचें आणि दुसरें ऑस्ट्रियाचें. आणखी-ही पुष्कळच फेरबदल परिषदेकडून करण्यांत आले. अशा रीतीनें व्हिएन्ना येथें जमा झालेल्या या बुद्रुक शाहण्या लोकांनीं आपल्या मनाप्रमाणें आपल्या जगाची व्यवस्था लावतांना, लोकांना त्यांच्या इच्छेविरुद्ध या राज्यांतून त्या राज्यांत घातलें, आपली मूळची मायभाषा जी नव्हे अशी भाषा शिकण्याची सक्तीनें त्यांच्यावर पाळी आणली आणि भविष्यकाळाच्या कटकटी आणि युद्धें यांची तयारीच सामान्यपणें करून ठेवली !

१८१४-१५ या सालांमध्यें भरलेल्या व्हिएन्ना येथील परिषदेपुढें मुख्य काळजीचा विषय कोणता असेल, तर राजेलोकांचें खूड कायमचें स्थिर कसें करावयाचें हा. फ्रेंच राज्यक्रांतीमुळें भयभीत होऊन त्यांच्या जिवांत जीव म्हणून राहिलेला नव्हता आणि वेड्यासारखी त्यांची अशी कल्पना होती, कीं क्रांतीच्या कल्पनांचा प्रसार होण्याला आपण प्रतिबंध करूं शकूं. रशियाचा झार, ऑस्ट्रियाचा बादशहा आणि प्रशियाचा राजा या तिघांनीं तर आपलें आणि इतर राजांचें संरक्षण करण्याच्या उद्देशानें Holy Alliance पवित्र मित्रसंघ म्हणून एक संघही स्थापन केला होता. कांहीं काळ आतां आपण पुन्हां चौदाव्या आणि पंधराव्या लुईच्या काळामध्यें आल्यासारखी त्यांची अवस्था होऊन गेली. यूरप खंडांत सगळीकडे, इंग्लडमध्येंसुद्धां सर्व प्रकारच्या उदारमतवादित्वाची गळचेपी करण्यांत आली. फ्रेंच राज्यक्रांतीच्या जन्मानिमित्त

जनतेनें सोसलेल्या सर्व वेदना आणि यातना अशा रीतीनें सर्वथा व्यर्थ झालेल्या पाहून यूरपमधील प्रगतिशील लोकांचें अंतःकरण निराशेनें किती करपून गेलें असेल !

इकडे यूरपच्या पूर्वेला तुर्कस्थान देश फारच क्षीण झालेला होता. हळूहळू त्याची ऱ्हास होण्याची क्रिया सुरू झालेली होती. इजिप्त देश हा तुर्कस्थानच्याच साम्राज्याचा भाग, अशी आपली नुसती समजूत मात्र होती. वास्तविक तो एक अर्धवट स्वतंत्रच देश झालेला होता. १८२१ मध्यें ग्रीसनें तुर्कस्थानच्या अधिराज्याविरुद्ध बंड केलें आणि आठ वर्षें युद्ध करून इंग्लंड, फ्रान्स आणि रशिया यांच्या साहाय्यानें त्यानें आपलें स्वातंत्र्य परत मिळविलें. याच युद्धामध्यें प्रसिद्ध इंग्रज कवि बायरन हा ग्रीसच्या वतीनें स्वयंसेवक म्हणून लढत असतां मरण पावला. त्यानें ग्रीसबद्दल अत्यंत सुंदर अशी छोटीशी कविता लिहिलेली आहे. तुझ्या वाचनांत ती आलेली असेलच.

यूरपमध्यें १८३० सालीं आणखी जे दोन राजकारणी फेरबदल झाले, त्यांचीही माहिती याच ठिकाणीं तुला सांगून टाकलेली बरी. बोर्बोन घराण्याच्या जुलुमाला आणि दडपशाहीला फ्रान्स देश कंटाळून गेला आणि पुन्हां एकदां तेथील लोकांनीं या घराण्याची हकालपट्टी केली; परंतु त्यांनीं प्रजासत्ताक राज्य स्थापन न करतां पुन्हां एकदां एका नवीनच राजाची स्थापना केली. या नव्या राजाचें नांव लुई फिलिप असें होतें. हा मागच्या राजाहून जरा चांगला वागला. सामान्यतः राज्यघटनेप्रमाणें मर्यादित हक्क असलेल्या राजाप्रमाणें त्यानें कारभार केला. कसेंबसें १८४८ पर्यंत त्यानें राज्य चालविलें; पण या वेळीं मात्र फ्रान्समध्यें आणखी एक आणि पहिल्यापेक्षां पुष्कळ मोठा असा स्फोट झाला. इकडे बेल्जम्‌मध्यें १८३० मध्येंच एक बंड झालें. त्याचा परिणाम म्हणजे बेल्जम् व हॉलंड हे देश वेगळे झाले. यूरपमध्यें जीं मोठीं राज्यें होतीं त्यांना अर्थातच प्रजासत्ताक राज्याचें अतिशयच वावडें होतें. तेव्हां त्यांनीं एक जर्मन संस्थानिक बेल्जम्‌ला बहाल करून त्याला तेथें राजा केलें. अशाच दुसऱ्या एका जर्मन संस्थानिकाला ग्रीसचा राजा करण्यांत आलें. जर्मनींत जीं अनेक राज्यें होतीं, त्यांमध्यें अशा संस्थानिकांचा मोठा सुकाळ होता असें दिसतें. कुठलीही गादी रिकामी पडला कीं त्यांच्यापैकीं कोणाला तरी एकाला उचलावें आणि तेथें नेऊन बसवावें. आ वतच असेल तुला, कीं आजच्या क्षणाला इंग्लंडमध्यें जें राजघराणें चालू आहे त्याचें त. ो मूळ जर्मनींतील हॅनोव्हर या छोट्या संस्थानांतलेंच आहे.

१८३० साल यूरपमध्यें आणखीही इतर ठिकाणीं झालेल्या बंडांसाठीं प्रसिद्ध आहे. हीं बंडें जर्मनींत, इटलींत आणि विशेषतः पोलंडमध्यें झालीं. तेथल्या राजांनीं हीं बंडें पार मोडून काढलीं. रशियन राज्यकर्त्यांनीं पोलंडमध्यें फारच मोठ्या प्रमाणांत दडपशाही केली. पोलिश भाषेमध्यें व्यवहार करायलादेखील तेथें त्यांनीं बंदी केली. पुढें १८४८ साल यूरपमध्यें क्रांतीचें साल म्हणून गाजणार आहे हें आपल्याला दिसेलच. त्या १८४८ ची नांदीच जणुं हें १८३० साल होतें म्हणावयाचें.

ही झाली यूरप खंडाची हकिकत. तिकडे अ‍ॅटलांटिक महासागराच्या पलीकडे

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांची वाढ पश्चिमेच्या बाजूस हळूहळू चालूच होती. यूरप खंडांतील आपसांतील स्पर्धा आणि लढाया यांपासून हीं संस्थानें फारच दूर आणि मुक्त होतीं. त्याचप्रमाणें त्यांच्या हाताशीं अमाप जमीन होती. त्यामुळें त्यांची प्रगति फार झपाट्यानें होत जाऊन तीं संस्थानें यूरपला येऊन गांठण्याच्या बेतांत होतीं. दक्षिण अमेरिकेंत मात्र दरम्यान फारच मोठ्या घडामोडी घडून येत होत्या. या सर्व घडामोडींस नेपोलियन हाच अप्रत्यक्षतः कारण होता. नेपोलियननें स्पेन देश जिंकून जेव्हां तेथील गादीवर आपल्या एका भाच्याची स्थापना केली, तेव्हां स्पेनच्या दाक्षिण अमेरिकेंतील वसाहतींनीं बंड केलें. अशा रीतीनें या वसाहतवाल्यांची स्पेनच्या जुन्या घराण्याबद्दल जी निष्ठा होती तिच्यामुळेंच उलट त्यांना स्वातंत्र्य प्राप्त होण्याची विलक्षण घटना घडली. अर्थात् हें आपलें एक आयत्या वेळचें आणि थोडेंसें आगंतुक कारण होतें एवढेंच. आज ना उद्यां या वसाहती मायदेशापासून फुटून निघाल्याच असत्या. कारण साऱ्या दक्षिण अमेरिकाभर स्वातंत्र्याची भावना प्रज्वलित झालेली होती. दक्षिण अमेरिकेंतील स्वातंत्र्याच्या प्रवृत्तीचा महान् नेता सायमन् बोलिव्हार ह्या नांवाचा गृहस्थ होता. त्याला त्याच्या भाषेंत El Libertador स्वातंत्र्यदाता असें म्हणतात. दक्षिण अमेरिकेंतील बोलिव्हियाच्या प्रजासत्ताक राज्याचें नांव त्याच्याच नांवावरून ठेवलेलें आहे. अशा प्रकारें नेपोलियनचा जेव्हां पाडाव झाला, त्या वेळीं स्पेनच्या अमेरिकेंतील वसाहती स्पेनपासून फुटून निघालेल्या असून त्यांनीं स्वातंत्र्यासाठीं युद्ध चालविलें होतें. नेपोलियन गादीवरून दूर झाला म्हणून त्यांच्या लढ्याच्या बाबतींत कांहींच फरक झाला नाहीं; स्पेनच्या नव्या राजाविरुद्धही तें बंड तसेंच आणखी पुष्कळ वर्षें-पर्यंत चालू राहिलें. यूरपमधील कांहीं राजांच्या मनातून आपल्या स्पेनमधील राजबंधूला अमेरिकेंतील या क्रांतिकारक वसाहतींना चिरडून टाकण्यासाठीं साहाय्य करावें असें होतें; परंतु अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या अध्यक्षानें या ढवळाढवळीला कायमचा पायबंद घातला. मनरो हा त्या वेळीं या संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष होता. त्यानें यरप खंडांतील या सत्ताधिशांना असें बजाविलें, कीं त्यांच्यापैकीं कोणी जर अमेरिकेंत, ‹ग ती उत्तर अमेरिका असो वा दाक्षिण अमेरिका असो, कोठेंही ढवळाढवळ केली, तर त्यांना अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांशीं लढावें लागेल. या धमकीनें यूरपमधील सत्ताधीश घाबरून गेले आणि तेव्हांपासून बहुतेक त्यांच्यापैकीं कोणीही दाक्षिण अमेरिकेंत ढवळाढवळ केली नाहीं. अध्यक्ष मनरो याची ही धमकी इतिहासांत "मनरो डॉक्ट्रिन्" मनरोचें तत्त्व, या नांवानें प्रसिद्ध आहे. यूरपच्या लोभीपणापासून या धमकीनें दक्षिण अमेरिकेचें पुष्कळ काळपर्यंत संरक्षण केलें आणि अशा रीतीनें तिकडील देशांची वाढ होण्यास चांगली संधि सांपडली. यूरपपासून त्यांचें संरक्षण झालें खरें; परंतु त्यांच्या संरक्षकापासून–संयुक्त संस्थानांपासून–त्यांचें रक्षण करण्याला दुसरें कोणीच नव्हतें! आज संयुक्त संस्थानांचेंच वर्चस्व त्यांच्यावर आहे आणि तिकडील छोटीं छोटीं संस्थानें तर सर्वस्वीं संयुक्त संस्थानांच्याच पूर्ण कह्यांत आहेत.

दक्षिण अमेरिकेंतील ब्राझील या विशाल देशामध्यें पोर्तुगालची वसाहत होती. अमेरिकेंतील स्पेनच्या वसाहती स्वतंत्र झाल्या त्याच सुमारास ही वसाहत पण स्वतंत्र झाली. अशा तऱ्हेनें १८३० पर्यंत सर्वच दक्षिण अमेरिका खंड यूरपीय राज्यांच्या अमलापासून वेगळें झाल्याचें आढळतें. उत्तर अमेरिकेंत तेवढी इंग्लंडची कॅनडा ही वसाहत मात्र होती.

त्यानंतर आतां आपण आशियाकडे येऊं. हिंदुस्थानांत आतां इंग्रज लोकांचें प्रभुत्व निश्चितपणें प्रस्थापित झालेलें होतें. तिकडे यूरपमध्यें नेपोलियनचीं युद्धें चालू होतीं, त्या वेळीं इंग्लंडनें आपली परिस्थिति सगळीकडेच मजबूत करून ठेवली होती. याच काळांत इंग्लंडनें जावाचाही ताबा मिळविला होता. त्याचप्रमाणें म्हैसूरच्या टिपू सुलतानाचा पराभव त्यांनीं करून नंतर १८१९ मध्यें मराठ्यांचाही अखेरचा पाडाव केला होता. पंजाबांत मात्र अजून शिखांचें राज्य रणजितसिंहाच्या अमलाखालीं चालू होतें. बाकी सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांनीं आपले हातपाय न कळत अगदीं झपाट्यानें पसरीत चालवले होते. पूर्वेकडे त्यांनीं आसाम प्रांत खालसा केला. त्यानंतर आराकानचा प्रांत व ब्रह्मदेश यांचा फक्त एक घांस करून टाकायचा तेवढा शिल्लक राहिलेला होता.

अशा रीतीनें इकडे ब्रिटनचें राज्य हिंदुस्थानांत वाढत होतें, तर तिकडे रशिया मध्य आशियांत हातपाय पसरीत होता. पूर्वेस त्यानें याच्या पूर्वी केव्हांच पॅसिफिकचा किनारा आणि चीनची सरहद्द गांठलेली होती. त्यानंतर आतां इकडे खालीं त्याचा रूळ मध्य आशियांतलि छोटीं छोटीं राज्यें दडपून अफगाणिस्तानच्या सरहद्दीशीं येऊन भिडला होता. आपल्या सरहद्दीपासून जवळजवळ येणाऱ्या या राक्षसाचें इंग्रजांच्या मनांत फारच भय उत्पन्न झालें आणि भीतीच्या पायींच त्यांनीं आपण होऊन अफगाणिस्तानशीं युद्ध उकरून काढलें; पण त्यांत त्यांचा हात चांगलाच भाजून निघाला.

चीनमध्यें अजून मांचू घराण्याचीच राजवट चालू होती. त्या ठिकाणीं व्यापाराच्या किंवा धर्माच्या नांवावर जाणाऱ्या लोकांबद्दल या सुमारास बराचसा संशय सकारणच उत्पन्न झालेला होता आणि त्यामुळें अशा लोकांना आपल्या देशापासून बाहेर ठेवण्याची खटपट तेथें चालू होती; परंतु हे परदेशचे लोक चीनच्या दाराशीं धक्के देतच होते, आरडाओरड करीतच होते आणि केव्हां केव्हां दंगलही माजवीत होते. विशेषतः त्या देशांत अफूचा व्यापार वाढविण्याचे मोठे प्रयत्न या लोकांचे सुरू होते. ब्रिटिश लोकांचा चीनमधील व्यापाराचा सगळा मक्ता ईस्ट इंडिया कंपनीकडे होता. चीनच्या बादशहानें अफू चीनमध्यें आणण्यास कायद्यानें प्रतिबंध ठेवला होता; परंतु चोरूनमारून अफू चीनमध्यें जातच होती. अशा रीतीनें या परकीयांनीं त्या ठिकाणीं अफूचा व्यापार बेकायदेशीरपणें चालविला होता. यामधून स्वाभाविकच चीनचें इंग्लंडशीं युद्ध उद्भवलें. या युद्धाला 'अफूचें युद्ध' असें अगदीं

यथार्थ नांव देण्यात आलेलें आहे. या युद्धांत ब्रिटननें चीनला सक्तीनें आपल्या देशांत अफू येऊं देण्याला भाग पाडलें.

जपाननें तर आपली स्वतःची कोंडी इ. स. १६३४ मध्यें करून घेतली हें पुष्कळ पूर्वी मी तुला सांगितलेंच आहे. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत जपानचे दरवाजे अगदीं असेच सर्व परकीयांना बंद होते; परंतु अशा रीतीनें सरहद्दी कोंडून घेतल्यामुळें परकीयांचा शिरकाव जरी बंद झालेला होता, तरी आंतमध्यें शोगुनशाहीची सत्ता हळूहळू दुर्बल होत चाललेली होती. अशी नवीन परिस्थिति उत्पन्न होत होती, कीं तिच्यामुळें जपानच्या आजपर्यंतच्या साऱ्या जुन्या परंपरेला एकदम अजिबात खो बसणार होता. जपानच्या खालच्या बाजूला आशियाच्या आग्नेय भागांत यूरपीय राष्ट्रें आपल्या कबजांत अधिकाधिक मुलूख आणीत होतीं. फिलिपाइन बेटें स्पॅनिश लोकांच्याच अजून ताब्यांत होतीं. पोर्तुगीजांना इंग्रजांनीं व डच लोकांनीं हांकलून दिलें होतें. व्हिएन्ना येथील परिषदेनंतर डच लोकांना जावा आणि त्याच्या आसपासचीं इतर बेटें हीं पुन्हां परत मिळालीं. इकडे इंग्रज सिंगापूर बंदरापर्यंत आणि मॅले द्वीपकल्पामध्यें हातपाय पसरीत होते. सयाम आणि ब्रह्मदेश हे देश अद्यापि स्वतंत्रच होते. अर्थात् मधून मधून चीनच्या बादशहाला हे देश खंडणी देत असत हें वेगळें.

वॉटर्लूच्या लढाईपासून १८३० पर्यंत साऱ्या जगाची अगदीं स्थूल दृष्टीनें पाहतां ही अशा प्रकारची राजकीय अवस्था होती. हळूहळू यूरप खंडाचें स्वामित्व साऱ्या जगावर प्रस्थापित होण्याचा अगदीं निश्चित रंग दिसूं लागलेला होता आणि खुद्द यूरपमध्यें प्रतिगामी प्रवृत्तीचा पूर्ण विजय झालेला होता. तेथील महाराजांना आणि राजांना, एवढेंच नव्हे, इंग्लंडमधील प्रतिगामी पार्लमेंटलासुद्धा असें वाटत होतें, कीं स्वातंत्र्य वगैरे राजकीय उदार वृत्तीच्या कल्पना आपण अगदीं पार कायमच्या गाडून टाकल्या. बाटलींत या कल्पना बूच लावून बंद करून ठेवण्याचा त्यांचा विचार होता. अर्थातच या बाबतींत त्यांचा प्रयत्न अजिबात फसला आणि जिकडे तिकडे या पुढच्या काळांत एकसारखीं बंडें एकामागून एक उद्भवत राहिलीं.

अशा रीतीनें या राजकीय घडामोडींनीं व फेरबदलांनींच विश्वेतिहासाची रंगभूमि सगळी अडवून टाकल्यासारखी दिसते; परंतु इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीच्या पाठोपाठ उत्पादनाच्या पद्धतीमध्यें जी क्रांति झाली, पदार्थांच्या विनिमयाच्या बाबतींत आणि प्रवासाच्या साधनांमध्येंही जी क्रांति झाली, ती क्रांति या सर्व राजकीय फेरबदलापेक्षां किती तरी अधिक महत्त्वाची होती. ही क्रांति कसलाही गाजावाजा न करतां परंतु अगदीं अनिर्बंधपणें सगळ्या यूरप खंडाला आणि उत्तर अमेरिकेला व्यापीत चालली होती. तिच्यामुळें कोट्यवधि लोकांची प्रवृत्ति आणि संवयी बदलून जात होत्या. समाजामधील निरनिराळ्या वर्गांमधील संबंध बदलून जात होते. यंत्राच्या या

खणखणाटांतून नवीन कल्पना निर्माण होत होत्या आणि जगाला एक नवीनच स्वरूप प्राप्त होत होतें. यूरप खंड अधिकाधिक कार्यक्षम होत चाललें होतें. तसेंच तें अधिकाधिक लोभी, अधिकाधिक साम्राज्यवादी आणि न्यायान्यायाविषयीं अधिकाधिक बेपर्वा होत चाललें होतें. नेपोलियनचा स्वभाव आणि प्रवृत्तीच साऱ्या यूरप खंडाला जणुं व्यापून टाकीत होती. परंतु याच वेळीं यूरप खंडांत अशाही कांहीं कल्पना जन्मास येत होत्या, कीं ज्या पुढें साम्राज्यवादाला खास गाडून टाकणार होत्या.

या काळचें साहित्य, काव्य, संगीत हेंही मोठें चित्तवेधक आहे; परंतु अशा रीतीनें लेखणी धांवूं देतां उपयोगी नाहीं. आज तिचें झालें तेवढें काम पुरें आहे.

## १०७

## महायुद्धापूर्वीचीं जगाचीं शंभर वर्षें

२२ नोव्हेंबर, १९३२

नेपोलियनचा पाडाव इ. स. १८१४ मध्यें झाला. त्याच्या पुढच्या वर्षी तो एल्बाहून परत आला आणि त्या वेळीं त्याचा पुन्हा एकदां पराभव झाला हें खरें; परंतु त्याची सगळी संघटना १८१४ सालींच खरोखर कोसळून पडली होती. त्यानंतर बरोबर शंभर वर्षांनीं १९१४ मध्यें महायुद्ध सुरू झालें. हें महायुद्ध चार वर्षेंपर्यंत चालून जवळजवळ साऱ्या जगभर पसरलें आणि त्यापासून भयंकर नाश झाला आणि लोकांना फार यातना सोसाव्या लागल्या. या शंभर वर्षांच्या काळाचा विचार आपल्याला जरा जास्त तपशीलवार करणें जरूर होणार आहे. हा काळ सुरू झाला त्या सुमारास जगाची रचना सामान्यतः कशा प्रकारची होती, याची थोडीशी स्थूल अशी कल्पना मीं तुला गेल्या पत्रांत करून दिलीच आहे. आतां या शतकाचा निरनिराळा देशवार विचार करण्यापूर्वी एकदां सबंध शतकाचा साकल्यानें एका ठिकाणीं थोडासा आढावा घेतला तर पुष्कळसें सोयीचें होईल. त्यामुळें या शंभर वर्षांतील एकंदर निरनिराळ्या प्रवाहांचें स्वरूप काय होतें, याची आपल्याला जास्त चांगली कल्पना येईल आणि सबंध अरण्य आणि त्यांतील वेगळीं वेगळीं झाडें यांचें सम्यक् दर्शन आपल्याला करून घेतां येईल.

१८१४ ते १९१४ हीं वर्षें पुष्कळशा प्रमाणांत एकोणिसाव्या शतकांत पडतात हें तुझें तुलासुद्धां दिसून येईल. म्हणून या सगळ्याच शंभर वर्षांना एकोणिसावें शतक म्हणून संबोधणें हें कांटेकोरपणानें बरोबर नसलें, तरी सोयीसाठीं आपण तसें म्हणूं या.

एकोणिसाव्या शतकाचा काळ हा मोठा मनोवेधक काळ आहे; परंतु त्याचा अभ्यास करणें ही गोष्ट मात्र आपल्याला सोपी नाहीं. मुळांतच हा काळ म्हणजे अनेक चित्रांचें मिळून झालेलें एक प्रचंड चित्र आहे. महान् विश्वदर्शनच आहे जणुं. शिवाय

हा काळ आपल्या अगदीं जवळचा असल्यामुळें त्याच्या आधींच्या शतकापेक्षां तो आपल्याला अधिक मोठा वाटतो. हें त्याचें प्रचंडपण आणि त्याच्यांतील विविधता यांमुळें ज्या हजारों तंतूंचा मिळून हा कालचित्रपट विणला गेलेला आहे, ते सर्व धागे उलगडून पाहत असतांना केव्हां केव्हां आपण दडपून जाण्याचा संभव आहे.

अचाट यांत्रिक प्रगतीचें हें शतक आहे. औद्योगिक क्रांतीच्या पाठोपाठ स्वाभाविकपणेंच यांत्रिक क्रांति घडून आली आणि मनुष्याच्या जीवनांत यंत्रांना अधिकाधिक महत्त्व चढत चाललें. पूर्वीं जीं कामें माणसाला करावीं लागत, त्यांपैकीं बहुतेक आतां यंत्रांकरवीं होऊं लागलीं. त्यामुळें माणसाचे कष्ट कमी झाले. सृष्टींतील शक्तींवर त्याला पूर्वीइतकें अवलंबून रहाणें जरूर पडत नाहींसें झालें; आणि यंत्रा-पासून त्याच्याजवळ संपत्ति निर्माण होऊं लागली. शास्त्रीय संशोधनाचा या कामीं त्याला फार मोठा उपयोग झाला. प्रवास आणि मालवाहतूक रोजच्या रोज अधिकाधिक जलद होऊं लागली. आगगाडी निर्माण होऊन तिनें घोड्याच्या गाड्या बंद केल्या. आगबोटींनीं वाऱ्यावर चालणाऱ्या जहाजांची जागा घेतली आणि त्यानंतर महासागरां-तून डौलानें या खंडांतून त्या खंडापर्यंत अतिशय जलद गतीनें आणि नियमितपणें जाणाऱ्या प्रचंड, मोठ्या आणि बळकट अशाही आगबोटी निघाल्या. या शतकाच्या अखेरीला तेलावर चालणाऱ्या छोटया इंजिनांच्या मोटारगाड्याही जगभर धांवूं लागल्या. शेवटीं विमान आलें. हें सगळें होत असतांना माणसाचा ताबा एका अजब शक्तीवर सुरू होऊन तिचा–विजेचा–तो आपल्या कामीं उपयोग करून घेऊं लागला. यापासून तारायंत्र आणि टेलिफोन यांची सुरुवात झाली. या सर्व गोष्टींमुळें जगाच्या स्वरूपांत फारच प्रचंड फरक घडून आला. दळणवळणाचीं साधनें वाढून लोकांचा प्रवास जास्त जास्त जलद होऊं लागला, तसतसा जगाचा आकार जणुं कमी होत जाऊन तें लहान लहान भासूं लागलें. आज आपल्याला या साऱ्या गोष्टी अगदीं नित्याच्या परिचयाच्या झाल्या असून त्यांचा विशेषसा विचारसुद्धां आपल्या मनामध्यें येत नाहीं; परंतु हे सर्व फेरबदल जगामधील अगदीं ताजे पाहुणे आहेत. गेल्या शंभरएक वर्षांतच त्यांनीं जगामध्यें पाऊल ठेवलेलें आहे.

त्याचप्रमाणें हें शतक म्हणजे एका अर्थीं यूरप खंडाचें शतक आहे अथवा खरें म्हटलें म्हणजे पश्चिम यूरप खंडाचें आणि त्यांतही विशेषतः इंग्लंडचें हें शतक आहे असें म्हणा. औद्योगिक आणि यांत्रिक अशा या दोन्ही क्रांत्या सुरू झाल्या इंग्लंड-मध्येंच आणि त्यांची वाढही झाली तेथेंच. त्यांच्यापासून पश्चिम यूरप खंडाचा लाभही फार मोठा झाला. कांहीं काळ इंग्लंड समुद्रावर आणि औद्योगिक क्षेत्रांत फारच प्रमुख असें राष्ट्र होतें; परंतु हळूहळू पश्चिम यूरप खंडामधल्या इतरही राष्ट्रांनीं त्याच्या जवळ-जवळ पल्ला गांठला. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांनींही या नवीन यांत्रिक शोधांच्या साहाय्यानें जोरानें दौड मारण्यास सुरुवात केली. आगगाडीच्या रुळाचे रस्ते बांधून हीं संस्थानें पश्चिमेस थेट पॅसिफिकपर्यंत जाऊन भिडलीं आणि त्या विशाल प्रदेशाचें

त्यांनीं एक राष्ट्र बनविलें. ही प्रदेशवाढ आणि त्यांचे स्थानिक प्रश्न यांमध्यें हीं संस्थानें इतकीं गुंगून गेलेलीं होतीं, कीं यूरपमध्यें किंवा इतर जगांत कांहीं भानगडी करावयाला त्यांना फुरसद नव्हती. परंतु यूरप खंडांतील कोणीं जर त्यांच्या क्षेत्रांत कांहीं ढवळाढवळ केली तर तिजबद्दल निषेध करून ती ढवळाढवळ थांबविण्याची शक्ति मात्र आतां त्यांच्या ठिकाणीं निर्माण झालेली होती. गेल्या पत्रांत मनरोचें तत्त्व म्हणून मीं तुला सांगितलेंच आहे. त्यामुळेंच दक्षिण अमेरिकेची यूरप खंडाच्या लोभी नजरेपासून सुटका झाली. दक्षिण अमेरिकेंतील या प्रजासत्ताक राज्यांना लॅटिन प्रजासत्ताक राज्यें असें म्हणण्याची वहिवाट आहे. कारण तेथील वसाहती स्पेन व पोर्तुगाल या देशांनीं स्थापन केलेल्या होत्या. स्पेन व पोर्तुगाल त्याचप्रमाणें इटली व फ्रान्स या देशांना लॅटिन देश असें मुळापासून नांव आहे. यूरपमधील त्यांच्या उत्तरेकडील देशांना मात्र ट्यूटन वंशीयांचे देश म्हटलें जातें. इंग्लंड देश हाही ट्यूटन वंशापैकीं अँग्लो सॅक्सन गटाचा देश आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील लोक मूळचे या अँग्लो सॅक्सन गटांतून गेलेले; अर्थात् त्यांच्या मागून तेथें नाना देशांचें आणि वंशांचे लोक गेलेले आहेत हें तर खरेंच.

याशिवाय बाकीचें जग मात्र औद्योगिक क्षेत्रांत आणि यंत्रांच्या क्षेत्रांत मागासलेलें होतें. त्यामुळें पाश्चिमेकडील या यांत्रिक सुधारणेला तोंड देणें त्याला शक्य झालें नाहीं. यूरप खंडांतील नवीन यंत्रावर चालणाऱ्या कारखान्यांमध्यें मालाचें उत्पादन पूर्वींच्या घरगुती धंद्यांच्या मानानें फारच जलद आणि अतिशय मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें; पण एवढा हा माल तयार करावयाचा म्हणजे त्याला कच्चा माल पाहिजे. असा पुष्कळसा कच्चा माल पाश्चिम यूरपमध्यें मिळण्यासारखा नव्हता. बरें, एवढा माल तयार झाला म्हणजे तो विकला पाहिजे; म्हणजे त्याच्यासाठीं बाजारपेठा हव्यात; म्हणून ज्या देशांत असा कच्चा माल मिळेल आणि जेथें आपला पक्का माल विकत घेतला जाईल असे देश शोधून काढण्याची खटपट पाश्चिम यूरपनें सुरू केली. आशिया आणि आफ्रिका हीं दोन्ही खंडें त्या वेळीं दुबळीं होतीं. म्हणून शिकाऱ्याप्रमाणें या औद्योगिक राष्ट्रांनीं त्यांच्यावर झडप घातली. या साम्राज्यवर्धनाच्या शर्यतींत इंग्लंड सहजच सगळ्यांच्यापेक्षां फारच मोठ्या प्रमाणांत यशस्वी झालें. कारण इंग्लंडजवळ दर्यावर्दी सामर्थ्य होतें. औद्योगिक क्षेत्रांतही त्यानें इतरांपेक्षां अधिक आघाडी आधींपासून मारलेली होती.

यूरपीयन लोक हे प्रथम हिंदुस्थानमध्यें आणि पूर्वेकडे आले ते त्यांच्या तिकडे यूरप खंडात मागणी असलेल्या मसाल्याच्या पदार्थांची खरेदी करण्याच्या हेतूनें आले. अशा तऱ्हेनें पूर्वेचा माल पाश्चिमेकडे जाऊं लागला. त्यामध्यें पूर्वेकडील हातमागावर तयार झालेला कापडमालही असे. परंतु आतां यंत्रांची वाढ होतांच हें गाडें उलटें झालें. पाश्चिम यूरपांत तयार झालेला स्वस्त माल आतां पूर्वेकडे जाऊं लागला आणि इंग्लंडचा माल खपण्यास मदत करण्यासाठीं म्हणून ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानमधील घरगुती धंदे जाणूनबुजून बुडवून टाकले.

अशा रीतीनें आशियारूपी राक्षसाच्या अंगावर यूरप खंड स्वार झालें. उत्तरेकडे रशियाचें साम्राज्य या खंडाच्या पश्चिम टोंकापासून पूर्व टोंकापर्यंत पसरलें. दक्षिणेकडे इंग्लंडनें या खंडांतील सर्वांत अधिक किंमतवान् असा गठ्ठा—हिंदुस्थान देश—आपल्या मुठींत घट्ट पकडून ठेवलेला होता. पश्चिमेकडे तुर्कस्तानच्या साम्राज्याचे तुकडे तुकडे होऊं लागून तुर्कस्तानला लोक आतां "यूरप खंडातील दुखणाईत म्हातारा" असें म्हणूं लागले होते. इराण देश नांवाला अजून स्वतंत्र होता; परंतु त्याच्यावर इंग्लंड आणि रशिया यांचें वर्चस्व होतें. साराच्या सारा दक्षिण आशिया खंडाचा प्रदेश म्हणजे ब्रह्मदेश, इंडोचायना, मॅले, जावा, सुमात्रा, बोर्निओ, फिलिपाइन्स वगैरे वगैरे हे सारे देश, एक सयामचा तेवढा लहानसा तुकडा सोडून, यूरप खंडानें व्यापलेले होते. अतिपूर्वेकडे चीन देशाला यूरपीय राज्यांनीं हळूहळू कुरतडावयाला सुरुवात केलेली होती आणि चीनकडून हा देश जबरदस्तीनें रोज नव्या सवलती मिळवीत होता. एक जपान देश मात्र अजून मान वर ताठ करून यूरप खंडाच्या बरोबरीनें म्हणून उभा होता. आपल्या एकांतवासांतून हा देश आतां बाहेर आला होता आणि जगातील बदललेली परिस्थिति त्यानें अलौकिक जलद रीतीनें आत्मसात् करून घेतली होती.

एक ईजिप्त देश सोडला तर आफ्रिका खंड या सुमारास फारच मागासलेलें होतें. यूरपशीं म्हणण्यासारखा सामना देण्याची त्याची मुळींच ताकद नव्हती. त्यामुळें यूरप खंडातील देशांनीं आपल्या साम्राज्यवर्धनाच्या माथेफिरू शर्यतीमध्यें आफ्रिका खंडावरही धाड घातली आणि तें प्रचंड खंड आपल्यामध्यें वांटून घेतलें. त्यात इंग्लंडनें ईजिप्त देश आपल्या वाट्याला घेतला. कारण हा देश हिंदुस्थानच्या अगदीं वाटेवर होता आणि इंग्लंडचें यापुढील सर्व धोरण हिंदुस्थान देश कायमचा आपल्या हातांत ठेवावयाचा या उद्देशानें आंखलें जात होतें. इ. स. १८६९ मध्यें सुवेजचा कालवा खोदण्यांत आला. यामुळें यूरप खंडाहून हिंदुस्थानचा प्रवास पूर्वींपेक्षां पुष्कळच कमी दिवसांचा झाला. त्यामुळेंही इंग्लंडला ईजिप्त देश फारच मोलाचा झाला. कारण ईजिप्तचा हात या कालव्यावर चालण्यासारखा असल्यामुळें एक प्रकारें त्यामुळें हिंदुस्थानकडे जाण्याचा मार्ग इंग्लंडला आपल्या कबजांत ठेवतां येत होता.

तेव्हां यांत्रिक क्रांतीचा परिणाम म्हणजे भांडवलशाही सुधारणा साऱ्या जगभर पसरली आणि जिकडे तिकडे यूरप खंडाचें प्रभुत्व प्रस्थापित झालें. या भांडवलशाहींतूनच साम्राज्यशाहीचा उद्भव झाला. तेव्हां या एकोणिसाव्या शतकाला साम्राज्यशाहीचें शतक असेंही नांव आपणांला देतां येईल. पूर्वींच्या काळींही रोम, चीन, हिंदुस्थान, आरब लोक, मंगोलियन लोक वगैरेंच्या साम्राज्यशाहींचीं युगें होऊन गेलेलीं होतीं; पण त्यापेक्षां हें नवें साम्राज्यशाहीचें युग फारच वेगळ्या प्रकारचें होतें. आतां निर्माण झालेलें साम्राज्य हें अगदीं निराळ्याच स्वरूपाचें होतें. त्याच्या पोटांत कच्चा माल आणि बाजारपेठा यांच्या भुकेची आग पेटलेली होती. हा नवा साम्राज्य-

वाद नव्या औद्योगिक युगामधून स्वाभाविकच उत्पन्न झाला. " आधीं निशाण, मागोमाग व्यापार " अशी एक म्हण आहे ; परंतु पुष्कळदां " आधीं बायबल आणि मग त्याच्या पाठोपाठ निशाण " असाच क्रम झालेला आढळून येतो. धर्म, शास्त्रीय संशोधन, स्वतःच्या देशाविषयींचें प्रेम या सर्व गोष्टी एकच उद्देश साधण्यासाठीं राबविण्यांत येत होत्या. तो उद्देश म्हणजे यंत्रांचे मोठे मोठे मालक—सरदारच म्हणा—उद्योगधंद्यांचे जणुं राजे यांना अधिकाधिक श्रीमान् व्हावयास सांपडावें यासाठीं जगामधील दुर्बल आणि मागासलेल्या लोकांची पिळवणूक करावयाची हा. खिस्ती मिशनरी जायचे सत्य आणि प्रेम याची जपमाळ घेऊन ; पण बहुतेक प्रसंगीं ते असावयाचे साम्राज्याचे टेहळे शिपाई आणि त्यांना कोठून कांहीं त्रास झाला, कीं त्यांच्या देशानीं ती सबब करून नवीन प्रदेश काबीज करावयाचा आणि नवीन सवलती मिळवून घ्यावयाच्या.

उद्योगधंदे आणि समाजरचना यांची उभारणी भांडवलशाहीपद्धतीवरच झाल्यामुळें त्यातून साम्राज्यशाहीचा उद्भव होणें हें अगदीं अपरिहार्यच होतें. याखेरीज भांडवलशाहीमुळें कट्टर राष्ट्रवादाची वाढ होण्यासही मदत झाली. हा राष्ट्रवाद म्हणजे नुसत्या स्वतःच्या देशावर प्रेम करून थांबणारा नव्हता, तर त्यामध्यें बाकीच्या सर्वांचा द्वेष करण्याची भर पडलेली होती. अशा रीतीनें जगांतील आपल्या लहानशा तुकड्याला अगदीं देव बनवायचें आणि बाकीच्या सगळयांची अवहेलना आणि निंदा करावयाची या प्रकाराच्या नव्या राष्ट्रवादांतून निरनिराळया देशात कटकटी आणि झगडे निर्माण होणार हें निश्चित होतें. त्यांतच औद्योगिक आणि साम्राज्यशाहीच्या क्षेत्रांतील यूरप खंडामधील निरनिराळया राष्ट्रांच्या स्पर्धेची भर पडून प्रकरण अधिकच चिघळत गेलें. व्हिएन्ना येथील यूरपीय राष्ट्रांच्या परिषदेनें यूरपचा जो नकाशा आंखला होता, त्यामुळेंही असंतोष निर्माण होण्याचें एक साधन आणखी निर्माण झालेलें होतें. या वांटणीमुळें कित्येक राष्ट्रीय जमातींना दडपून टाकून सक्तीनें दुसऱ्या लोकांच्या राज्याखालीं ढकलण्यांत आलें होतें. पोलंड देश तर एक राष्ट्र म्हणून अस्तित्वांतच राहिलेला नव्हता. ऑस्ट्रिया-हंगेरीचे साम्राज्य म्हणजे एकमेकांचा तिरस्कार करणाऱ्या अनेक जमातींची नुसती खिचडी होऊन गेलेली होती. यूरपच्या आग्नेयीला तुर्कस्तानच्या साम्राज्यामध्यें बाल्कन देशांतील तुर्की नसलेले किती तरी लोक समाविष्ट झालेले होते. इटलीचे पुष्कळ तुकडे करून स्वतंत्र राज्यें निर्माण करण्यात आलीं होतीं आणि त्याचा कांहीं भाग ऑस्ट्रियाच्या अमलाखालीं देण्यांत आलेला होता. असा हा जो यूरप खंडाचा नकाशा आंखण्यांत आलेला होता, तो बदलून घेण्यासाठीं वारंवार युद्धें आणि क्रांत्या यांच्या मार्गानें प्रयत्न होत होते. व्हिएन्ना येथील वांटणी झाल्यानंतर लगेच जीं कांहीं अशीं बंडें झालीं, त्यांचा उल्लेख मीं मागच्या पत्रांत केलाच आहे. एकोणिसाव्या शतकाच्या इटलीच्या उत्तरेकडील ऑस्ट्रियाचें आणि मध्यभागांतील पोपचें जोखड उखडून टाकण्यांत यश आलें आणि नंतर सगळ्या इटलीचें असें एक राष्ट्र निर्माण झालें. त्याच्या पाठोपाठ

प्रशियाच्या नेतृत्वाखालीं जर्मन राष्ट्रांचेंही एकीकरण झालें. या जर्मनीनें फ्रान्सचा पराभव करून त्याला नमविलें आणि आल्सेस आणि लोरेन हे फ्रान्सचे दोन सरहद्दीवरचे प्रांत त्यांनीं फ्रान्सकडून हिरावून घेतले. तेव्हांपासून फ्रान्सच्या मनांत सूडाची भावना जागृत होऊन राहिली आणि पन्नास वर्षांच्या आंतच रक्ताचे पाट वाहवून भयंकर असा सूड फ्रान्सनें घेतला.

इंग्लंड देश हा पहिल्यापासून औद्योगीकरण व यंत्रीकरण यांमध्यें सगळ्याच्या पुढें असल्यानें सर्व यूरपीय राष्ट्रांत अधिक भाग्यवान् असा हा देश ठरला. जगांतील फायदेशीर अशा सर्व गोष्टी इंग्लंडच्या वांट्याला आल्या आणि एकंदरींत मिळालेल्या परिस्थितीवर इंग्लंड देश मोठा खुष होऊन गेला. नवीन पद्धतीच्या साम्राज्यशाहीचा हिंदुस्थान हा एक नमुनाच होता; या सुसंपन्न अशा देशाच्या पिळवणुकींतून इंग्लंडमध्यें सोन्याचा मोठा प्रवाह अखंडपणें वाहूं लागला. बाकीचे जे इतर साम्राज्यशाही प्रस्थापित करूं पाहणारे देश होते, त्यांना हिंदुस्थान देश इंग्लंडच्या ताब्यांत असावा, या गोष्टीचा मोठा हेवा वाटे. म्हणून त्यांनीं हिंदुस्थानच्या धर्तीवर जगाच्या इतर भागांत आपलीं साम्राज्यें स्थापण्याचा उद्योग सुरू केला. फ्रेंचांना या बाबतींत थोड्या प्रमाणांत यशही आलें. जर्मन लोकांनीं या क्षेत्रांत जरा उशीरां प्रवेश केला. त्यामुळें त्यांना या कामासाठीं फारसा प्रदेशच शिल्लक राहिलेला नव्हता. त्यामुळें जरा उशीरांच यूरपांतील या सर्व मोठ्या राज्यांचे राजकीय संबंध अगदीं नित्य अणीवर येऊन ठेपल्यासारखे होऊन गेले. त्यांपैकीं प्रत्येकजण आपापल्या परीनें अधिकाधिक प्रदेशाचा कबजा करण्यासाठीं धडपडत होता आणि त्या कामीं त्यांच्यामध्यें तंटे उपस्थित होत होते. इंग्लंड आणि रशिया यांच्यामध्यें तर विशेषच तंटा सदैव चालू राहिला. कारण मध्य आशियांतून खालीं येऊन रशिया इंग्लंडच्या हिंदुस्थानांतील मिराशीवर धाड घालूं पाहत होता. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला रशियानें तुर्कस्तानचा पराभव केला आणि कॉन्स्टांटिनोपलबद्दल रशियाच्या तोंडाला पाणी सुटलें. त्या वेळीं इंग्लंड देश तुर्कांच्या बाजूला धांवून आला आणि त्यानें रशियाला मार्गे हटविलें. इंग्लंडनें हें काम कांहीं तुर्कस्तानच्या प्रेमामुळें केलें नाहीं, तर रशियाच्या भीतीमुळें व हिंदुस्थान हातचा जाईल अशी धास्ती वाटल्यामुळें केवळ ही मदत तुर्कांना इंग्लंडनें केली.

इंग्लंडनें औद्योगिक क्षेत्रांत इतरांच्या पुढें मारलेली मजल आतां कमी कमी अंतराची होऊन, जर्मनी आणि फ्रान्स आणि अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें हे देश आतां मागून इंग्लंडच्या बरोबरीला येऊं लागले. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला ही शर्यत बरीच हातघाईवर आली. एवढेंसें हें जग यूरपीय राष्ट्रांच्या या प्रचंड महत्त्वाकांक्षेला पुरें कसें पडावें? यामुळें ज्याला त्याला दुसऱ्याची भीति, द्वेष आणि मत्सर वाटूं लागला. त्या भीतीमुळें व मत्सरामुळें ज्यानीं त्यांनीं आपापलीं सैन्यें आणि आरमारें वाढविण्यास सुरुवात केली. या लोकक्षयकारक यंत्रांच्या व साधनांच्या

वाढीमध्यें स्पर्धेची धामधूम व काहिली माजली. निरनिराळ्या देशांमध्यें इतरांशीं लढण्यासाठीं म्हणून मैत्रीचे करार व तह होऊं लागले आणि अखेरीस यूरप खंडामध्यें असे दोन मित्रसंघ एकमेकांवर तुटून पडण्यासाठीं सिद्ध होऊन राहिले. त्यांपैकीं एका संघाचें प्रमुखपण फ्रान्सकडे होतें. गुप्तपणें इंग्लंड देशही याच संघांत सामील होता आणि दुसरा संघ जर्मनीच्या नेतृत्वाखालीं होता. यूरप खंड म्हणजे एक मोठा लष्करी तळच होऊन राहिला आणि रोजच्या रोज उद्योगधंदे, व्यापार आणि शस्त्रास्त्रें यांमधील स्पर्धा अधिकाधिकच भयंकर वाढत चालली. पश्चिमेंतील प्रत्येक देशांत संकुचित राष्ट्रवादाची प्रवृत्ति मुद्दाम जोरकस करण्यांत आली. हेतु असा, कीं सामान्य जनतेची दिशाभूल होऊन तिनें इतर देशांतील आपल्या शेजाऱ्यांचा द्वेष करूं लागावें आणि लढाईसाठीं सदैव सिद्ध होऊन राहावें.

अशा रीतीनें एक प्रकारचा आंधळा राष्ट्रवाद साऱ्या यूरप खंडभर प्रभावी होऊन राहिला. एकीकडे वाहतुकीचीं साधनें अधिक जलद होत गेल्यानें निरनिराळे देश एकमेकांना अधिकाधिक जवळ येत होते आणि एकमेकांच्या देशांत पूर्वीहून किती तरी अधिक लोक प्रवास करीत होते. असें असूनही अशा प्रकारच्या राष्ट्रवादाची निर्मिति व्हावी ही मोठीच विलक्षण गोष्ट आहे. कोणाचीही अशी समजूत होण्यासारखी होती, कीं प्रवासामुळें व इतरही कारणांमुळें परस्पर शेजारी लोकांची एकमेकांना अधिक माहिती होईल, त्यामुळें एकमेकांबद्दलचे दूषित पूर्वग्रह दूर होतील आणि मनाचा संकुचितपणा जाऊन त्या ठिकाणीं जास्त उदारवृत्ति निर्माण होईल. थोड्याफार अंशीं असा परिणाम झालाही आहे; परंतु नवीन औद्योगिक भांडवलशाहीखालची समाजरचना अशा तऱ्हेची निपजली, कीं तिच्यामध्यें राष्ट्र विरुद्ध राष्ट्र, वर्ग विरुद्ध वर्ग आणि व्यक्ति विरुद्ध व्यक्ति असे झगडेच अधिक निर्माण झाले.

पूर्वेकडेही राष्ट्रवादाची वाढ झाली. त्या ठिकाणीं राष्ट्रवादाला आपल्या देशावर प्रभुत्व गाजविणाऱ्या आणि आपल्या देशाची पिळवणूक करणाऱ्या परकीयांशीं झगडा करावयाचा हें स्वरूप आलें. अगदीं सुरुवातीला या परकीय वर्चस्वाला विरोध राहिल्यासाहिल्या जमीनदारवर्गानें केला. कारण त्यांना आपल्या अगदीं प्राणावरच बेतल्यासारखें होऊन गेलें होतें; परंतु त्यांचा पराभव झाला आणि तसा तो होणें हेंच अपरिहार्य होतें. त्यानंतर कांहींशी धार्मिक प्रवृत्तीची छटा असलेला नवीनच एक प्रकारचा राष्ट्रवाद जागृत झाला. हळूहळू त्यामधील धार्मिक दृष्टीची छटा मावळत गेली आणि नवीन पाश्चात्य पद्धतीच्या राष्ट्रवादानें वर डोकें काढलें. जपानमध्येंही परकीय वर्चस्व टाळण्यांत आलें आणि अर्धवट सरंजामदारी प्रवृत्तीचा अत्यंत कट्टर राष्ट्रवाद त्या ठिकाणीं दृढ करण्यांत आला.

यूरपियन राष्ट्रांच्या आक्रमणाला विरोध करण्याला आशिया खंडानें अगदीं प्रथमपासूनच सुरुवात केलेली होती; परंतु यूरपीय राष्ट्रांच्याजवळ असणाऱ्या नव्या शस्त्रांचें सामर्थ्य आणि प्रभाव यांची जसजशी जास्त जास्त जाणीव होत चालली, तसतसा

विरोधांतील दम ओसरूं लागला. यूरपमधील शास्त्रीय संशोधनाची वाढ आणि यांत्रिक प्रगति यांमुळें त्या काळच्या पूर्वेकडील कोणत्याही देशापेक्षां यूरपीय राज्यांचीं सैन्यें किती तरी अधिक बलवान् झालेलीं होतीं. पूर्वेकडील देश त्यामुळें या देशांपुढें अगदींच हतबल होऊन गेले, त्यांच्यापुढें त्यांचें कांहींच चालेनासें झालें आणि अखेरीस त्या परकीयांपुढें मान वांकविण्यावांचून त्यांना मार्गच राहिला नाहीं. कांहीं लोक म्हणतात, कीं पूर्वेकडील लोकांची प्रवृत्ति आध्यात्मिक आहे तर पश्चिमेकडील लोकांची भौतिक आहे. हीं अशा तऱ्हेचीं विधानें मोठीं फसगत करणारीं असतात. अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांत यूरप खंडाचें जेव्हां आशियामध्यें आक्रमण सुरू झालें त्या वेळीं आशिया आणि यूरप यांच्यामध्यें खरा फरक असला तर एवढाच होता, कीं पूर्वेकडे अद्यापि मध्ययुगीन लोकस्थिति कायम होती, तर पश्चिमेकडे औद्योगिक आणि यांत्रिक प्रगति झालेली होती. हिंदुस्थानचे आणि इतर पूर्वेकडील देशांचे डोळे पश्चिमेकडील देशांच्या लष्करी कार्यक्षमतेमुळें तर दिपलेच होते; परंतु त्यांच्या शास्त्रीय आणि यांत्रिक प्रगतीमुळेंही ते तितकेच दिपले होते. या सगळयाचा परिणाम असा झाला, कीं पाश्चिमात्यांपेक्षां लष्करी आणि यांत्रिक बाबतींत आपण कांहीं तरी कमी दर्जाचे लोक आहोंत, अशी भावना इकडच्या लोकांमध्यें निर्माण झाली. असें जरी होतें तरी राष्ट्रवाद मात्र वाढतच गेला आणि परकीय आक्रमण करणारांशीं झगडा करून त्यांना आपल्या देशांतून हांकलून लावावें हीही इच्छा वाढत गेली. विसाव्या शतकाच्या प्रारंभीं असा एक प्रसंग घडला, कीं त्यामुळें आशिया खंडांतील लोकांच्या मनावर फारच मोठा परिणाम झाला. हा प्रसंग म्हणजे जपाननें झारच्या रशियाचा केलेला पराभव. एवढ्याशा जपाननें यूरपमधील सर्वांत मोठ्या आणि सर्वांत बलिष्ठ अशा सत्तेचा पराभव करावा ही गोष्ट सर्वांनाच मोठी आश्चर्यकारक वाटली आणि आशियांत या आश्चर्यकारक घटनेमुळें विशेषच आनंद निर्माण झाला.

जपान म्हणजे पाश्चिमात्यांच्या पूर्वेवरील आक्रमणाविरुद्ध लढणारा आशिया खंडाचा प्रतिनिधीच अशी इकडच्या लोकांची जपानबद्दल भावना झाली आणि त्यामुळें त्या काळीं तरी निदान पूर्वेकडे सगळीकडे जपान मोठा लोकप्रिय देश होऊन राहिला. अर्थात् जपान देश अशा रीतीनें आशिया खंडाचा प्रतिनिधि वगैरे मुळीच नव्हता आणि त्यानें लढाई केली, ती यूरप खंडांतल्या इतर कोणाही राष्ट्रानें जशी केली असती तशी, केवळ आपल्या स्वतःच्या डावासाठींच केलेली होती; परंतु जपानच्या विजयाच्या बातम्या येत असत त्या वेळीं मला सुद्धां केवढें उत्साहाचें वारें भरत असे हें मला चांगलें आठवतें. त्या वेळीं मी जवळजवळ तुझ्याएवढाच होतों.

तात्पर्य, पश्चिमेकडील साम्राज्यशाही जसजशी अधिकाधिक आक्रमक होऊं लागली, तसतशी तिला तोंड देऊन तिच्याशीं लढण्यासाठीं म्हणून पूर्वेकडेही राष्ट्रवादाची वाढ होऊं लागली. आशिया खंडांत सगळीकडे, पश्चिमेकडील आरबी राष्ट्रापासून तों अतिपूर्वेकडील मंगोलियन राष्ट्रापर्यंत जिकडे तिकडे राष्ट्रीय चळवळींना आकार येऊं

लागला. प्रथम प्रथम या चळवळी मोठ्या सावधपणानें आणि नेमस्तपणानें चालल्या आणि मग हळूहळू त्यांच्या मागण्या जास्त जास्त तीव्र किंवा जहाल होऊं लागल्या. याच शतकांत हिंदुस्थानात हिंदी राष्ट्रीय सभेचा जन्म होऊन तिचें प्रारंभींचें कांहीं वर्षांचें कार्यही तेथें झालें. अशा रीतीनें आशिया खंडांतील बंडाची सुरुवात या शतकामध्यें झाली. इतकें झालें तरी आपली एकोणिसाव्या शतकाची पाहणी अजून पुष्कळच बाकी आहे; परंतु हें पत्र आतांच पुष्कळ लांब झाल्यामुळें तें आतां संपविलेंच पाहिजे.

## १०८

## एकोणिसावें शतक पुढें चालू

२४ नोव्हेंबर, १९३२

गेल्या पत्रामध्यें मी तुला एकोणिसाव्या शतकाचे कांहीं विशेष सांगितले. त्याच-प्रमाणें मोठीं यंत्रें उपयोगांत येऊं लागल्यानंतर पश्चिम यूरप खंडामध्यें जी औद्योगिक भांडवलशाही निर्माण झाली व तिचे जे अनेक परिणाम झाले तेही मी तुला सांगितले. पश्चिम यूरप खंडाचेंच पाऊल या कामीं इतरांपेक्षां आधीं पडलें आणि त्यानें मजलही इतरांपेक्षां अधिक मारली. याचें एक कारण त्या देशांत लोखंडाची आणि कोळशाची उत्पत्ति होण्याजोगी नैसर्गिक साधनसंपत्ति होती हें होय. मोठीं यंत्रें तयार करण्याला आणि चालू ठेवण्यालाही कोळसा आणि लोखंड यांची फारच आवश्यकता होती. त्या-वांचून हें काम होणेंच शक्य नव्हतें.

या भांडवलशाहींतून साम्राज्यशाही आणि राष्ट्रवाद यांचा उदय झाला हेंही आपण पाहिलें. राष्ट्रवाद हा कांहीं कुठला नवीन प्रकार नव्हता. पूर्वींपासून तो अस्तित्वात होताच; पण आतां तो अधिक तीव्र झाला आणि संकुचित स्वरूपाचा झाला. या राष्ट्र-वादामुळें एकाच वेळीं ऐक्य आणि भेदभाव यांची वाढ झाली. एका राष्ट्रीय गटांतले लोक पूर्वीपेक्षां एकमेकांच्या अधिक जवळ आले आणि दुसऱ्या राष्ट्रीय गटांतील लोकांपासून मात्र ते अधिकाधिक बाजूस पडत चालले. प्रत्येक देशामध्यें राष्ट्रभक्तीची वाढ होऊं लागली; पण तिच्याच जोडीला परकीयांबद्दलचा तिटकारा आणि अविश्वास यांचीही वाढ होत गेली. यूरपमध्यें तर औद्योगिक दृष्ट्या पुढारलेले देश एकमेकां-कडे जणुं कांहीं हिंस्र पशूंप्रमाणें आपले डोळे लाल करून टवकारून पाहूं लागले. जगांतल्या लुटीचा पुष्कळसा हिस्सा इंग्लंडच्या वांटणीला आलेला होता आणि तो आपल्याच हातीं राहावा अशी इंग्लंडची स्वाभाविकच इच्छा होती; पण इतर देशांना, विशेषतः जर्मनीला, अशी चीड येई, कीं जेथें जावें तेथें आपलें इंग्लंड आहेच. यामुळें

कटकटी वाढत गेल्या आणि शेवटीं त्यांतून उघड लढाया सुरू झाल्या. औद्योगिक भांडवलशाहीची सगळी रचना आणि तिच्यांतून निघालेलें हें साम्राज्यशाहीचें शेपटें यांमधून या घासाघाशी आणि झगडे निर्माण होतात. या दोन्हींमध्यें परस्पर-विरोधी अशा कांहीं गोष्टी आढळतात, कीं ज्यांचा समन्वय करणेंच अशक्य आहे; कारण भांडवलशाही आणि साम्राज्यशाही या दोहोंचाही पायाच मुळीं झगडा, स्पर्धा आणि पिळवणूक यांच्यावर आहे. त्यामुळें पूर्वेकडे या साम्राज्यशाहींतून जो राष्ट्रवाद निर्माण झाला, तोच या साम्राज्यशाहीचा अगदीं कट्टा शत्रु बनून राहिला आहे.

भांडवलशाही सुधारणेमध्यें असे जरी पुष्कळ अंतर्विरोध असले, तरी या सुधारणे-पासून जगाला नवीन उपयुक्त गोष्टीही शिकावयास मिळाल्या. पहिली गोष्ट म्हणजे या-पासून संघटनेचा मोठा धडा मिळाला; कारण मोठालीं यंत्रें चालवावयाचीं आणि प्रचंड प्रमाणावरील औद्योगिक उत्पादनाचा कारभार चालवावयाचा म्हणजे त्यासाठीं फार मोठ्या संघटनेची गरज लागते. त्याचप्रमाणें यामुळें मोठमोठ्या व्यवहारांत आणि कार्यांत सहकार्य कसें करावें ही गोष्ट लोक शिकले. कार्यकौशल्य आणि नियमितपणा यांचीही शिकवण यांतूनच मिळाली. हे गुण अस्तित्वांत असल्याखेरीज मोठमोठे कारखाने आणि आगगाडीचीं जाळीं चालणेंच शक्य नाहीं. केव्हां केव्हां असें म्हटलें जातें, कीं हे सारे गुण पाश्चिमात्य लोकांचे खास स्वभावविशेष असून पौर्वात्यांच्या ठिकाणीं या गुणाचा लेशही नाहीं. या बाबतींत आणि इतरही पुष्कळ बाबतींत खरा प्रश्न पूर्व आणि पश्चिम असा नाहीं. हे गुण औद्योगीकरणामुळें उत्पन्न होऊन वाढलेले आहेत. पश्चिमेकडे औद्योगीकरण झालें म्हणून तिकडील लोकांच्या अंगीं ते गुण आले. पूर्वेकडील लोक अजून शेतकीप्रधान आहेत, धंदेप्रधान नाहींत. यामुळें त्यांच्या ठिकाणीं हे गुण नाहींत.

औद्योगिक भांडवलशाहीनें जगावर आणखी एक उपकार केला. यांत्रिक शक्तीच्या उत्पादनापासून म्हणजे मोठीं यंत्रें, कोळसा आणि वाफ यांच्या साहाय्यानें संपत्ति कशी निर्माण करावी हें तिनें जगाला शिकविलें. जुन्या काळीं अशी एक भीति वाटत असे कीं जगांतील सर्व लोकांचे समाधान करतां येईल इतकी साधन-संपत्ति निसर्गांतच नाहीं. त्यामुळें जगांत पुष्कळशा लोकांना गरिबींत राहणें प्राप्त आहे. परंतु ही भीति आतां निराधार ठरली. शास्त्रें आणि यंत्रें यांच्या साहाय्यानें आतां जगांतल्या सर्व लोकांच्यासाठीं पुरेसें अन्न, वस्त्र आणि इतरही जरुरीच्या वस्तू निर्माण करणें आतां शक्य झालें. अशा रीतीनें निदान तत्त्वतः तरी उत्पादनाच्या अडचणींचा प्रश्न मिटून गेला. पण गाडी येथपर्यंत येऊनच थांबली. संपत्ति निर्माण होऊं लागली अगदीं भरपूर; परंतु गरीब हे गरीबच राहिले अथवा खरें म्हटलें तर अधिकच गरीब झाले. पूर्वेकडील देशांत आणि आफ्रिका खंडांत यूरपीय लोकांच्या अमलाखालीं अगदीं हवी तशी लूट आणि पिळवणूक सर्वस्वीं निर्लज्जपणानें आणि बेछूटपणानें सुरू झाली. त्या ठिकाणच्या बिचाऱ्या दीनदुबळ्या लोकांच्या सुखाची काळजी

घ्यायला कोणी उभें नव्हतें; पण इकडे पश्चिम यूरप खंडामध्येंसुद्धां दारिद्य कांहीं कमी झालें नाहीं. तें शिल्लक तर राहिलेंच; पण उलट अधिकाधिक स्पष्टपणें दिसून मात्र येऊं लागलें. कांहीं काळपर्यंत बाकीच्या जगाच्या पिळवणुकींतून पश्चिम यूरपांत संपत्तीचा ओघ येत राहिला. यापैकीं बहुतेक सारी संपत्ति वरवरच्या मूठभर लोकांच्याच हातीं राहावयाची. अर्थात् त्यांतली थोडीशी झिरपून खालच्या गरिबांपर्यंत पोंचत होती आणि त्यामुळें त्यांच्या राहणीचें मानही थोडें वाढत जात होतें. याचाच परिणाम म्हणजे लोकसंख्याही फारच वेगानें वाढत होती.

पण ही बहुतेक सारी संपत्ति आणि राहणीचें वाढतें मान या गोष्टी आशिया, आफ्रिका आणि इतर औद्योगीकरण न झालेले देश यांच्यामधील लोकांच्या पिळवणुकीच्या जिवावर चालू होत्या. या पिळणुकीमुळें संपत्तीचा जो ओघ वाहत होता, त्यामुळें कांहीं काळ भांडवलशाहीमधील अंतर्विरोध दडून राहिले; ते लोकांना दिसून आले नाहींत. तरी पण श्रीमंत आणि गरीब यांच्यामधील अंतर मात्र वाढतच गेलें. दोहोंमध्यें फार मोठा फरक दिसून येऊं लागला. दोन वेगळे वेगळे वर्ग, दोन वेगळीं वेगळीं राष्ट्रेंच जणुं अस्तित्वांत आलीं. एकोणिसाव्या शतकांतील एक मोठा इंग्रज मुत्सद्दी बेंजामिन् डिझरायली यानें या दोन भिन्न राष्ट्रांचें पुढीलप्रमाणें वर्णन केलेलें आहे:—

"दोन राष्ट्रें; त्यांच्यामध्यें परस्परांशीं कांहीं व्यवहार किंवा संबंध नाहीं; परस्परांबद्दल जिव्हाळाही नाहीं; एकमेकांच्या राहणीबद्दल, सवयींबद्दल, विचारांबद्दल, भावनांबद्दल एकमेकांना इतकें अज्ञान आहे कीं जणुं कांहीं हे लोक जगाच्या कुठल्या दूरदूरच्या विभागांत, नाहीं तर वेगवेगळ्या ग्रहांवर राहणारे असावेत! या दोन्ही राष्ट्रांना मिळणारें शिक्षण आणि संवर्धन वेगळें आहे. त्यांचें खाण्याचें अन्न भिन्न आहे. त्यांना कोणतीही गोष्ट करण्यासाठीं हुकूम देण्याच्या पद्धती निराळ्या आहेत. या दोन राष्ट्रांचे कायदेसुद्धां एक नाहींत; अशीं हीं श्रीमंत आणि गरीब यांचीं दोन राष्ट्रें आहेत."

औद्योगीकरणाच्या या नव्या परिस्थितीमुळें मोठमोठ्या कारखान्यामध्यें काम करणाऱ्यांची संख्या फारच मोठी वाढली आणि अशा रीतीनें त्यांच्यापासून समाजामध्यें एक नवाच वर्ग—गिरणीकामगारांचा वर्ग—निर्माण झाला. हे लोक शेतकऱ्यांपेक्षां किंवा शेतकाम करणाऱ्या मजुरांपेक्षां पुष्कळच बाबतींत निराळे होते. शेतकऱ्याला ऋतुमान आणि पाऊस यांच्यावरच पुष्कळसें अवलंबून राहावें लागतें. या दोहोंवर त्याचा कांहींच ताबा चालत नाहीं. यामुळें आपल्या हालअपेष्टा आणि दारिद्य याचें मूळ काहीं तरी अमानुष आहे असें त्याला वाटूं लागतें. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं अंधश्रद्धा उत्पन्न होते. आर्थिक कार्यकारणभावाकडे तो पाहत नाहींसा होतो. निरुत्साहानें आणि निराशेनें कसा तरी तो संसार करीत राहतो. आपल्या दुर्दैवाचा फेरा आपल्याला तर कांहीं बदलतां येत नाहीं. तेव्हां येईल त्या परिस्थितीचा बोजा सहन केलाच पाहिजे असें म्हणून कसलीही धडपड न करतां कसे तरी तो दिवस काढतो. उलट,

गिरणी-कामगाराला रोज काम पडतें यंत्राशीं, म्हणजे मनुष्यानेंच तयार केलेल्या वस्तूशीं. आपल्या मालाचें उत्पादन करीत असतांना त्याला ऋतुमान किंवा पाऊस याची कांहींच फिकीर करावी लागत नाहीं. तो स्वतःच्या हातानें संपत्ति निर्माण करतो; पण ती त्याच्या हातीं न राहतां दुसऱ्याच्या हातीं जाते आणि आपण स्वतः पहिल्यासारखेच कफल्लक राहिलों असें त्याला आढळून येतें; म्हणजे थोड्या प्रमाणांत त्याला आर्थिक नियमांचें कार्य कसें चालू असतें हें पाहावयास मिळतें. त्यामुळें अतिमानुष कार्यकारण-भावाचा विचार त्याच्या मनांत येत नाहीं किंवा शेतकऱ्याइतका तो अंधश्रद्ध बनत नाहीं. आपल्या दारिद्र्याचें खापर तो परमेश्वराच्या किंवा देवदेवतांच्या माथ्यांवर फोडीत नाहीं. त्याबद्दल तो समाजाला किंवा समाजपद्धतीला दोष देतो. विशेषतः आपल्या कारखान्याचा मालक जो भांडवलदार त्याला तो अधिक दोष देतो; कारण आपल्या श्रमाचा फार मोठा फायदा हा कारखानदार घेत असतो हें त्याला दिसत असतें. यामुळें त्याच्या ठिकाणीं वर्गभावना जागृत होते आणि जगांत वेगवेगळे वर्ग असून वरिष्ठ वर्ग आपल्या वर्गावर चरत असतात हें त्याच्या ध्यानांत येऊं लागतें. अर्थातच त्याच्या मनांतील असंतोषाची ही पहिली खुसखुस अगदींच अंधुक आणि मंद अशी असते. पहिल्या-पहिल्यांदां कामगारांची उठावणी होते ती अविचारीपणाची असते; असंघटित असते. तिच्यांत दमदारपणा नसल्यानें राज्यकर्ते ती सहज मोडून काढूं शकतात. कारण आतां त्या काळच्या राज्यसत्ता, सर्वस्वीं हे नवीन मोठमोठे कारखाने आणि तदनुषंगिक उद्योग यांचें चालकत्व ज्यांच्या हातीं असतें अशा मध्यमवर्गाच्या हितसंबंधाच्याच रक्षणकर्त्या बनून गेलेल्या आहेत; परंतु उपासमारीचें दुःख असें पुष्कळ काळपर्यंत दडपून टाकलें जाणें शक्य नाहीं. लवकरच गिरणी-कामगाराला असें समजून येतें, कीं आपली खरी शक्ति आपल्याच कामगार-बांधवांच्या ऐक्यांत आणि संघटनेंत आहे. त्यामुळें कामगारांच्या हिताचें संरक्षण करण्यासाठीं आणि त्यांच्या हक्कांकरितां झगडण्यासाठीं मग कामगार-संघ, ट्रेड यूनियन्स निघतात. सुरुवातीला या सर्व संस्था गुप्तपणें काम करीत होत्या. कारण मजुरांना स्वतःची संघटना करूं देण्यालासुद्धां राज्यकर्त्यांची तयारी नव्हती. हळूहळू हें स्पष्ट होत जातें, कीं राज्यसत्ता या एका विशिष्ट वर्गाच्याच असून आपल्या वर्गाच्या हिताचें संरक्षण करण्यासाठीं केवळ त्या चंग बांधून तयार आहेत. कायदे पाहिले तरी ते सुद्धां विशिष्ट वर्गाच्या बाजूचेच. तथापि हळूहळू कामगारांचें सामर्थ्य वाढत जातें. त्याच्या ट्रेड यूनियन्स या मोठ्या बलिष्ठ संस्था होऊन जातात. निरनिराळ्या धंद्यांतील कामगारांना हें समजून येतें, कीं हातीं सत्ता असणारा, आपली पिळणूक करणारा वर्ग हा आपल्या सगळ्यांचा एकच समान शत्रु असून त्याच्या विरुद्ध आपले सगळ्यांचे हितसंबंध अगदीं एकाच स्वरूपाचे आहेत. त्यामुळें निरनिराळ्या धंद्यांमधील कामगारसंघ एकमेकांशीं सहकार्य करूं लागतात आणि अशा रीतीनें एका देशांतील सगळ्या कारखानदारी मजुरांचा एक संघटित गट तयार होतो. याच्या पुढची पायरी म्हणजे निरनिराळ्या देशांतील

अशा गटांनीं एकत्रित होण्याची; कारण त्या सर्वांनाच आढळून येतें, कीं आपल्या सर्वांचेच हितसंबंध एक असून सर्वांचा शत्रूही एक आहे. त्यामुळें मग "जगांतील सर्व कामगार लोकहो, एक व्हा" ही घोषणा निर्माण होते आणि कामगारांच्या जागतिक संघटना होऊं लागतात. दरम्यान भांडवलशाही कारखानदारीचीही वाढ होतां होतां तिलाही आंतरराष्ट्रीय स्वरूप येऊं लागतें आणि अशा रीतीनें जेथें जेथें ही औद्योगिक भांडवलशाही वाढते, तेथें तेथें तिचा मजुरांशीं सामना सुरू होतो.

परंतु ही मी पुढच्या काळांत फार मोठी धांव घेतों आहें. म्हणून आतां परत मागें गेलें पाहिजे. या एकोणिसाव्या शतकांत निरनिराळ्या परस्पर-विरोधी अशा कितीएक प्रवृत्तींची अशी कांहीं खिचडी होऊन राहिलेली आहे कीं त्या सर्व प्रवृत्ती एकाच वेळीं योग्य प्रमाणांत नजरेसमोर ठेवणें मोठें कठिण काम आहे. हा जो मीं भांडवलशाही आणि साम्राज्यशाही, राष्ट्रवाद आणि आंतरराष्ट्रीयवाद, संपत्ति आणि दारिद्य यांचा विलक्षण गोंधळ तुझ्यापुढें उभा केला आहे, त्यातून तुला काय बोध होणार आहे कोण जाणे! पण मी तरी काय करणार? जीवन म्हणजे ही अशा भिन्न प्रवृत्तींची विलक्षण गुंतागुंत आहे! जीवन जसें आहे तसेंच आपण घेतलें पाहिजे, तें समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे आणि त्याच्यात सुधारणा करण्यासाठीं झटलें पाहिजे.

परस्परांशीं न जुळणाऱ्या या भिन्न भिन्न प्रवृत्तींच्या खिचडीमुळें यूरप खंडांत आणि अमेरिकेंत पुष्कळ लोकांच्या विचाराला चालना मिळाली. या शतकाच्या प्रारंभीं नेपोलियनचा पाडाव झाल्यानंतर कोणत्याही यूरपीय राष्ट्रामध्यें स्वातंत्र्य कांहीं फारसें शिल्लक राहिलें नव्हतें. कांहीं देशांत राजांची अनियंत्रित सत्ता चालू होती; तर इंग्लंड-सारख्या कांहीं देशांमध्यें मूठभर वरिष्ठवर्गीय आणि धनिकांच्या वर्गाची सत्ता चालू होती. मागच्या पत्रांत मीं तुला सांगितल्याप्रमाणें सर्व ठिकाणीं स्वातंत्र्याच्या किंवा उदारमतवादित्वाच्या कल्पनांचे पुरस्कर्ते दडपून टाकण्यांत आले होते. असें असूनही अमेरिकन राज्यक्रांति व फ्रेंच राज्यक्रांति यामुळें लोकशाही व राजकीय स्वातंत्र्य या कल्पना विचारवंतांना परिचित होऊं लागल्या होत्या आणि प्रियही होऊं लागल्या होत्या. राज्याच्या आणि समाजाच्या सर्व अडचणी आणि कटकटी व दुःखें दूर करण्या-साठीं लोकशाही हा फार परिणामकारक उपाय आहे अशीच उलट पुष्कळांची कल्पना होत चालली. लोकशाहीचें ध्येय काय होतें? तर कोणासही कसलेही खास अधिकार असतां कामा नयेत. राज्याच्या कारभारांत प्रत्येक व्यक्तीला राजकीय आणि सामाजिक दृष्टीनें पूर्ण समान दर्जानें वागविण्यांत आलें पाहिजे. हें कबूल, कीं व्यक्तीव्यक्तीमध्यें पुष्कळच प्रकारची भिन्नता असते. कोणी शक्तीनें जास्त असतात, कोणी बुद्धीनें मोठे असतात, कोणाच्या ठिकाणीं स्वार्थबुद्धि कमी असते; परंतु लोकशाहीवर श्रद्धा ठेवणारे लोक म्हणत, कीं हे असे फरक असले तरीसुद्धां लोकांचा राजकीय दर्जा समान असला पाहिजे. आणि हा समान दर्जा प्रस्थापित करण्याचा मार्ग त्यांनीं काढला; तो म्हणजे प्रत्येक व्यक्तीला मतदानाचा अधिकार द्यावयाचा.

प्रगतिशील, विचारवंत आणि उदार मनाच्या लोकाची लोकशाहीच्या चांगुलपणाविषयीं अतिशय अंतःकरणपूर्वक निष्ठा व भक्ति होती. म्हणूनच लोकशाहीची प्रस्थापना करण्यासाठीं त्यांनीं प्रयत्न केले. पुराणमतवादी आणि प्रतिगामी लोकांनीं त्यांना विरोध केला. त्यामुळें जिकडे तिकडे मोठे झगडे निर्माण झाले. कांहीं देशांत क्रांत्या झाल्या. इंग्लंडमध्यें तर मतदानाचा हक्क विस्तृत होण्यापूर्वीं, म्हणजे पूर्वींपेक्षां थोड्या अधिक लोकांना पार्लमेंटचे सभासद निवडून देण्याचा हक्क मिळण्यापूर्वीं, जवळजवळ यादवीच्या युद्धाची पाळी आली होती. तथापि हळूहळू बहुतेक सर्व ठिकाणीं लोकशाहीचा विजय झाला आणि या शतकाच्या अखेरीस पूर्व यूरपमध्यें आणि अमेरिकेंत, निदान पुरुषांपैकीं तरी बहुतेक सर्वांना मताधिकार मिळाला. लोकशाही हें एकोणिसाव्या शतकांतलें एक मोठेंच ध्येय होतें. इतकें कीं या शतकाला लोकशाहीचें शतक असें सुद्धां नांव देण्याला हरकत नाहीं. अखेरीस लोकशाहीचा असा विजय झाला; परंतु हा अखेरचा विजय जों मिळतो आहे, तोंच लोकांची लोकशाहीवरील श्रद्धा कमी होऊं लागली. लोकांना असें आढळून आलें, कीं लोकशाहीमुळें दारिद्र्य व हालअपेष्टा यांचा किंवा भांडवलशाही समाजपद्धतींतील अंतर्विरोधाचा कांहीं निरास झाला नाहीं. उपासमारीनें मरत असलेल्या मनुष्याला तुमच्या या मताधिकारांचा काय उपयोग? आणि एका वेळच्या जेवणाच्या किंमतीला जर त्याचें हें मत किंवा त्याचे श्रम विकत घेतां येणें शक्य असेल, तर त्याला मिळालेल्या स्वातंत्र्याची तरी एवढी मोठी मातब्बरी ती काय? त्यामुळें लोकशाहीबद्दल वाद उत्पन्न झाला किंवा जास्त बिनचूक बोलावयाचें तर राजकीय लोकशाहीबद्दलची अनुकूलता नाहींशी होत चालली; परंतु हा विषय एकोणिसाव्या शतकाच्या बाहेरचा आहे.

लोकशाहीचा संबंध फक्त स्वातंत्र्याच्या राजकीय बाजूशींच तेवढा आला. एकतंत्री कारभार किंवा अनियंत्रित राजसत्ता यांच्याविरुद्ध जें लोकमत झालें, त्यांतून लोकशाहीचा जन्म झालेला होता. औद्योगिक क्षेत्रात जे नवीन प्रश्न उपस्थित होऊं लागले होते त्यांवर किंवा दारिद्र्यावर किंवा वर्गविग्रहावर खास उपाय शोधून काढण्याचें या लोकशाहीपुढें ध्येयच नव्हतें. या लोकशाहीनें प्रत्येक व्यक्तीला आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीप्रमाणें काम करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे या तत्त्वावर तेवढा भर दिला; कल्पना अशा, कीं अशा रीतीनें प्रत्येक व्यक्ति स्वार्थसाधनासाठीं स्वतःची हरएक मार्गानें उन्नति करण्याचा प्रयत्न करील, आणि व्यक्तीची अशी उन्नति झाली, कीं सर्व समाजाची आपोआपच प्रगति होईल. यालाच Laissez faire चें, व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व म्हणतात. मागें एका पत्रांत मला वाटतें, याबद्दल मी तुला सांगितलें आहे. परंतु व्यक्तिस्वातंत्र्याचा हा सिद्धांत निरुपयोगी ठरला; कारण ज्याला रोजमजुरीवर काम करण्यावांचून गत्यंतर नाहीं, त्या मनुष्याला स्वतंत्र म्हणतांच येत नाहीं.

औद्योगिक भांडवलशाहीच्या समाजपद्धतींत सर्वांत मोठा अडचणीचा प्रश्न

उपस्थित झाला तो असा : जे खरोखर काम करून समाजाची सेवा करीत, त्यांना वेतन किंवा मोबदला अगदींच बेताचा मिळावयाचा आणि धंद्यांतील सगळे खरें लोणी जे कोणी काम करीत नाहींत त्यांच्या पदरांत पडावयाचें हा तो प्रश्न होता. यामुळें श्रम आणि नफा यांची सांगड राहिली नाहीं; त्यांचा घटस्फोट झाला. त्याचा परिणाम एका बाजूला जे श्रम करणारे ते दरिद्री आणि हीन होण्यात झाला, तर दुसऱ्या बाजूला असा एक वर्ग उत्पन्न झाला कीं जो स्वतः कांहीं काम न करतां अथवा उद्योगधंद्याच्या साधन-संपत्तींत स्वतःच्या श्रमानीं कांहींही भर न घालतां उद्योगधंद्यावर आपली उपजीविका करूं लागला. अथवा खरें म्हणजे उद्योगधंद्यांचें जळूसारखें शोषण करूं लागला. म्हणजे शेतकऱ्यानेंच शेतांत काम करावयाचें आणि जमीनदारानें जमिनींत कांहीं श्रम न करतां शेतकऱ्याच्या श्रमावर गबर व्हावयाचें हा जसा शेतींत प्रकार, तसाच कांहींसा प्रकार औद्योगिक क्षेत्रांतही झाला. श्रमाच्या फळाची ही वांटणी उघड उघड अन्यायाची होती; पण यांत फरक मात्र असा होता, कीं कामगार आतां कांहीं दीर्घ काळ दुःखच सोशीत राहणाऱ्या शेतकऱ्यासारखा राहिलेला नव्हता. हा अन्याय होतो आहे याची त्याला जाणीव झालेली होती आणि त्या अन्यायावर तो चिडून गेलेला होता. त्याची ही चीड जसजसा काळ जात चालला, तसतशी अधिकच वाढत गेली. पश्चिमेकडील औद्योगीकरण झालेल्या सर्व देशांत हे भेद अधिकाधिक डोळ्यांवर येऊं लागले. आणि या गुंतागुंतींतून कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे, म्हणून विचारवंत आणि कळकळीच्या लोकांनीं खटपटही सुरू केली. अशा रीतीनें जिला आज समाजवाद म्हणून म्हणतात, ती विचारपरंपरा उत्पन्न झाली. ही निघाली भांडवलशाहीमधूनच. पण भांडवलशाहीचा हा शत्रु असून बहुधा तिला उखडून काढण्यासाठीं तो जन्माला आलेला आहे असें दिसतें. इंग्लंडमध्यें समाजवादाचें स्वरूप थोडेंसें सौम्य झालें; फ्रान्स आणि जर्मनी-मध्यें त्याचें स्वरूप जास्त क्रांतिकारक झालें. तिकडे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानामध्यें देश फारच प्रचंड आणि लोकसंख्या त्या मानानें थोडी; त्यामुळें तेथें साधनसंपत्तीच्या वाढीला क्षेत्र फार मोठें असल्यामुळें पश्चिम यूरप खंडामध्यें भांडवलशाहीमुळें जे अन्याय आणि ज्या हालअपेष्टा उद्भवल्या, त्या पुष्कळ काळपर्यंत तितक्या मोठ्या प्रमाणांत संयुक्त संस्थानांत दिसून आल्या नाहींत.

जो पुढच्या काळांत समाजवादाचा प्रवर्तक ऋषि होणार होता आणि आज कम्युनिझम् म्हणून जें समाजवादाचें रूप प्रसिद्ध आहे, त्याचा जनक असा एक गृहस्थ जर्मनींत या एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला उदयास आला. हा गृहस्थ म्हणजे कार्ल मार्क्स्. हा कांहीं निव्वळ तात्त्विक सिद्धांताची बौद्धिक चर्चा करणारा कोणी नुसता गूढवादी तत्त्वज्ञ किंवा पंडित-प्राध्यापक नव्हता. तो तत्त्वज्ञ तर होताच. पण तो व्यवहारकुशल कार्यकर्ताही होता. त्याची विशेष पद्धति म्हणजे शास्त्रीय संशोधनाचें तंत्र राजकीय, आर्थिक प्रश्नांचा विचार करतांनाही उपयोगात आणावयाचें आणि जगांतील दुःखावर त्या रीतीनें उपाय शोधून काढावयाचे. तो म्हणतो, "आज-

पर्यंत तत्त्वज्ञानानें फक्त जग हें कशा प्रकारचें आहे एवढें सागण्याचा खटाटोप कलला आहे. कम्युनिस्ट तत्त्वज्ञानानें तें बदलण्याचें कार्य हातीं घेतलें पाहिजे.'' तो आणि दुसरा एक एंगल्स नांवाचा गृहस्थ अशा दोघांनीं मिळून "कम्युनिस्ट मॅनिफेस्टो" 'कम्युनिस्ट पक्षाचा जाहीरनामा' प्रसिद्ध केला. त्यामध्यें कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाची रूपरेखा दिलेली आहे. त्यानंतर पुढें त्यानें जर्मन भाषेंत Das Capital किंवा इंग्रजींत कॅपिटल (भाडवल) म्हणून प्रसिद्ध असलेला प्रचंड ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. या ग्रंथांत त्यानें सगळ्या जगाच्या इतिहासाचें शास्त्रीय संशोधनाच्या नियमानुसार निरीक्षण केलें आणि समाज कोणत्या दिशेनें वाढत आला आहे व त्याची ही वाढ कशी याहूनही जलद करतां येईल हें दाखवून दिलें. मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा खुलासा करण्याचा प्रयत्न मला या ठिकाणीं करावयाचा नाहीं; परंतु मार्क्सच्या या महान् ग्रंथाचा समाजवादाच्या वाढीला फार मोठा उपयोग झाला असून कम्युनिस्ट रशियांत या ग्रंथाला आज बायबलचें स्थान प्राप्त झालेलें आहे, एवढें मात्र तूं या प्रसंगीं ध्यानांत ठेवावेंस अशी माझी इच्छा आहे.

इंग्लंडमध्यें एकोणिसाव्या शतकाच्या मध्यालाच प्रसिद्ध झालेला आणखी एक सुप्रसिद्ध ग्रंथ म्हणजे डार्विनचा Origin of Species हा होय. यानें त्या काळीं मोठीच धामधूम माजवून सोडली. डार्विन हा निसर्गशास्त्रज्ञ होता. म्हणजे तो निसर्गाचा, त्यांतही वृक्ष आणि पशू यांचा अभ्यासक होता. वृक्ष आणि पशू यांची निसर्गामध्यें वाढ कससशी होत गेलेली आहे हें त्यानें प्रत्यक्ष नमुने घेऊन त्यावरून दाखविलें. एक प्रकारच्या नैसर्गिक निवडीच्या नियमानुसार एक जात बदलून तिच्या ठिकाणीं दुसरी जात (कोटी) कशी निर्माण होते, मुळांत साधें असलेलें शरीर पुढें जास्त जास्त संकुल किंवा गुंतागुंतीचें कसें होत जातें, हें त्यानें दिग्दर्शित केलें. अशा प्रकारचा हा शास्त्रीय बुद्धिवाद, हा तर्कावर आधारलेला सिद्धांत, हा सृष्टीच्या आणि मनुष्य व पशु याच्या उत्पत्तीसंबंधीं खिस्ती धर्माची जी शिकवण होती, तिच्या अगदीं थेट विरुद्ध होता. त्यामुळें यानंतर हे शास्त्रज्ञ आणि धर्माच्या शिकवणीवर श्रद्धा असणारे लोक यांच्यामध्यें एक फार मोठा वाद झाला. प्रत्यक्ष वस्तुस्थिति काय आहे यासंबंधीं फारसा वाद नव्हता; तर जीवनविषयक दृष्टि काय असावी याबद्दलचा हा वाद होता. धर्माची जीवनविषयक दृष्टि अगदींच संकुचित असून भीति, अतिमानुष चमत्कार आणि अंधश्रद्धा यांनीं ती व्यापलेली होती. बुद्धिवाद किंवा तर्कशास्त्र यांना अवसर द्यायला धर्म तयार नव्हता. लोकांनीं जें काय सांगितलें जाईल त्यावर श्रद्धा ठेवावी, काय, कसें असले प्रश्न विचारूं नयेत अशी धर्माची प्रवृत्ति होती. कित्येक विषयांच्यावर धर्मानें पावित्र्य आणि दैवीपण, शुद्धता वगैरेंचें असें कांहीं एक प्रगूढ आवरण घातलेलें होतें, कीं तें कधीं कोणीं काढावयाचा प्रयत्न करावयाचा नाहीं कीं त्याला कोणीं हात लावावयाचा नाहीं. शास्त्राची प्रवृत्ति आणि मार्ग यांहून अगदींच वेगळ्या प्रकारचे

होते. कारण मुख्य म्हणजे शास्त्रांत प्रत्येक गोष्टीचें सत्य स्वरूप समजून घेण्याचा उद्योग करावयाचा होता. ‘ बाबावाक्यं प्रमाणं ’ म्हणून शास्त्र कोणतीही गोष्ट गृहीत धरावयाला तयार नव्हतें. किंवा एखाद्या विषयाच्या ठिकाणीं कांहीं विशेष पावित्र्य आहे अशा कल्पनेनें भिऊन त्या विषयाच्या संशोधनापासून शास्त्र कधीं माघार घेणारें नव्हतें. प्रत्येक गोष्टींत शास्त्र अगदीं खोलवर जाऊन संशोधन करणार; अंधश्रद्धेला थारा देणार नाहीं. ज्या ज्या गोष्टी प्रत्यक्ष प्रयोगानें किंवा तर्कशुद्ध अनुमानानें सिद्ध होतील तेवढ्याच शास्त्र खऱ्या मानणार.

शास्त्रीय प्रवृत्तीचा हा जुन्यापुराण्या वठलेल्या धार्मिक दृष्टीशीं झगडा झाला त्यांत शास्त्रीय दृष्टीचा जय झाला. या सर्व विषयासंबंधीं जे कोणी विचार करणारे होते ते तर याच्या पूर्वीच किती तरी काळ, अठराव्या शतकापासूनच बुद्धिवादी बनलेले होते. फ्रान्समध्यें क्रांतीच्या पूर्वी तात्त्विक विचारांची एक लाट उसळली होती, असें मीं मागें सांगितलें तें आठवत असेल तुला. पण आतां या विचारांचा फेरबदल समाजांत फार खोलवर जाऊन पोंचला. सर्वसामान्य शिकलेल्या माणसाच्या प्रवृत्तीवरही आतां शास्त्रीय प्रगतीचा परिणाम झालेला दिसूं लागला. प्रत्येक सामान्य मनुष्य या सर्व बाबतींत म्हणजे स्वतः अगदीं खोल विचार करीत होता, किंवा त्याला म्हणजे शास्त्राचें बरेंच मोठें ज्ञान होतें असा कांहीं अर्थ नव्हे. परंतु निरनिराळे शोध आणि शास्त्रीय संशोधन यांचा त्याच्या दृष्टीसमोर जो विशाल आविष्कार घडून येत होता त्याच्या दर्शनामुळें त्याचें मन आदरानें भरून जावें हें अगदींच स्वाभाविक होतें. आगगाडी, वीज, तारायंत्र, टेलिफोन, फोनोग्राफ या आणि अशा किती तरी गोष्टी एकामागून एक माणसापुढें आल्या; या सर्व गोष्टी शास्त्रीय संशोधनाच्या मार्गांतूनच उत्पन्न झालेल्या होत्या. हा पाहा शास्त्राचा निसर्गावरील विजय, असा त्यांचा जयजयकार होत होता. शास्त्रामुळें माणसाचें नुसतें ज्ञानच वाढून थांबत नाहीं, तर त्यामुळें माणसाचा निसर्गावर ताबा वाढत जातो असें लोकांना दिसून येऊं लागलें. तेव्हां धर्माविरुद्ध शास्त्राचा जय झाला आणि लोक शास्त्राला एक प्रकारें सर्वशक्तिमान् असा देव समजून त्याच्या पुढें मस्तक नम्र करूं लागले यांत कांहीं आश्चर्य नाहीं. विशेष म्हणजे एकोणिसाव्या शतकांतील शास्त्रज्ञसुद्धां मोठे कृतकृत्य झाल्यासारखे झाले; आपली चूक म्हणून कधीं होणारच नाहीं अशी त्यांची भावना झाली आणि त्यांचीं मतें अत्यंत निश्चित अशीं होऊन गेलीं. अर्ध्या शतकाच्या पूर्वीच्या या काळापेक्षां सध्यां शास्त्राची फारच प्रचंड प्रगति झालेली आहे; परंतु आजच्या शास्त्रज्ञांची प्रवृत्ति त्या काळच्या या धन्यतेच्या किंवा बिनचूकपणाबद्दलच्या खात्रीपेक्षां अगदींच भिन्न आहे. आजच्या खऱ्या शास्त्रज्ञाला अशी जाणीव असते, कीं ज्ञानसमुद्र अपार, अनंत आणि फारच विशाल आहे आणि या समुद्राचा प्रवास करायला निघालेला असला तरी आजचा शास्त्रज्ञ पूर्वकालीन शास्त्रज्ञापेक्षां पुष्कळच नम्र भावनेनें आणि थोडासा कचरतच मार्ग आक्रमीत आहे.

एकोणिसाव्या शतकाचा आणखी एक विशेष म्हणजे सामान्य जनतेमधील शिक्षणाची पश्चिमेंत झालेली फार मोठी प्रगति. सत्ताधारी वर्गापैकीं पुष्कळ गृहस्थांनीं शिक्षणाच्या या वाढीला फार मोठ्या जोरानें विरोध केला होता. त्यांचें म्हणणें असें होतें, कीं अशा शिक्षणानें सामान्य मनुष्य हा असंतुष्ट, राजद्रोही, उद्धट आणि अधार्मिक (ख्रिस्ती धर्मविरोधी) होईल. या प्रतिपादनाचा अर्थ असा होतो, कीं ख्रिस्ती धर्म म्हणजे अज्ञान आणि श्रीमान् व सत्ताधारी यांच्या आज्ञांचें बिनतक्रार पालन यांनींच भरलेला आहे. असा हा विरोध होऊनही प्राथमिक शिक्षणाच्या शाळा उघडल्या गेल्या आणि सामान्य जनतेचें शिक्षण वाढत गेलें. एकोणिसाव्या शतकांतील दुसऱ्या कित्येक विशेषांमध्यें हा विशेषही औद्योगीकरणाचाच परिणाम होता. कारण मोठीं यंत्रें आणि मोठे कारखाने यांच्यामध्यें कारागिरांच्या ठिकाणीं कार्यक्षमता, कुशलता व कार्यतत्परता असणें आवश्यक होतें. आणि अशी कार्यक्षमता फक्त शिक्षणानेंच उत्पन्न होण्याजोगी होती. त्या काळच्या समाजात हरएक प्रकारच्या शिकलेल्या निष्णात कामगारांची गरज होती. ही गरज सामान्य समाजांत शिक्षणाची वाढ झाल्यामुळें भागली.

अशा रीतीनें शिक्षणाचें क्षेत्र फार विस्तृत झाल्यामुळें साक्षर लोकांचा वर्ग फार मोठा वाढला. या लोकांना सुशिक्षित म्हणण्याची कांहीं सोय नाहीं; पण त्याना लिहितां-वाचतां येत असल्यामुळें वर्तमानपत्र वाचण्याची त्यांची संवय वाढत चालली. त्यामुळें स्वस्त वर्तमानपत्रें निघूं लागून त्यांचा प्रचंड खप होऊं लागला. या वर्तमानपत्रांच्या लिहिण्याचा लोकांच्या मनावर मोठा विलक्षण परिणाम होऊं लागला. हें खरें कीं हीं वर्तमानपत्रें पुष्कळदां लोकांची दिशाभूल करून शेजारच्या देशांविषयीं लोकांचीं मनें भडकावीत आणि त्यापासून युद्धें निर्माण होत. तें कांहीं म्हटले, तरी यापुढें प्रेस म्हणजे वर्तमानपत्रें हीं समाजांत जिच्याविषयीं विचार करून वागलें पाहिजे अशा प्रकारची शक्तीच झाली.

या पत्रांत मीं जें कांहीं लिहिलें आहे, तें बहुतेक सगळें यूरप खंडाला व त्यांतही विशेष म्हणजे पश्चिम यूरप खंडाला लागू आहे. उत्तर अमेरिकेलाही तें कांहीं प्रमाणांत लागू पडतें. बाकीच्या सर्व जगामध्यें म्हणजे जपान वगळून आशिया खंडामध्यें आणि आफ्रिका खंडामध्यें स्वतःचें कर्तृत्व कांहींच दिसून येत नव्हतें; यूरपमध्यें जें काय घडत होतें त्याचे परिणाम तेवढे या देशांतील लोकांना सोसावे लागत होते. म्हणूनच मागें मीं म्हटलें कीं एकोणिसावें शतक म्हणजे यूरप खंडाचें शतक. जगाच्या चित्रांत सगळीच जागा यूरपनें अडविल्यासारखी झाली; जगाच्या रंगभूमीवर सगळेंच काम एकट्या यूरप खंडाचें होत राहिलें. भूतकाळीं असे कित्येक कालखंड होऊन गेले, कीं ज्या वेळीं आशिया खंडाचें यूरप खंडावर वर्चस्व होतें. असेही पुष्कळ काळ होऊन गेले, कीं ज्या वेळीं सुधारणा, संस्कृति, प्रगति यांचें माहेरघर ईजिप्त, इराक, हिंदुस्थान, चीन, ग्रीस, रोम किंवा अरबस्तान यांपैकींच कोणत्या ना कोणत्या तरी देशांत नांदत होतें. पण या देशांतील सुधारणा म्हाताऱ्या झाल्या आणि क्षीण होऊन गेल्या; वठल्या,

दगडासारख्या निश्चल आणि निष्क्रिय झाल्या; त्यांच्यावर गंज चढला. त्यांच्यामधील परिस्थितीप्रमाणें बदलण्याची व प्रगति करण्याची जिवंतपणाची शक्ति नाहींशी झाली आणि ती इतर देशांच्या ठिकाणीं जाऊन भराला आली. या बाबतींत आतां यूरप खंडाची पाळी आली. याच वेळीं दळणवळणाचीं साधनें वाढून जगांतील या भागाचें दुसऱ्या भागांशीं दळणवळण अतिशय सुलभतेनें व जलदीनें ठेवण्याची सोय झालेली होती. यामुळें यूरप खंडाचें तर पूर्वींच्या कोणत्याही संस्कृतिसंपन्न देशापेक्षां किती तरी अधिक वर्चस्व वाढलें.

एकोणिसावें शतक हें यूरपीय संस्कृतीच्या वृक्षाच्या बहराचें शतक होऊन गेलें. या संस्कृतीला बुर्झ्वा म्हणजे धनिक मध्यमवर्गीय संस्कृति असें नांव आहे. कारण औद्योगिक भांडवलशाहीमधून निर्माण झालेले जे धनिक वर्ग त्यांचा या संस्कृतीवर पगडा आहे. या संस्कृतीमधील पुष्कळसे अंतर्विरोध आणि दोषस्थळें मीं सांगितलींच तुला. आपणां हिंदी लोकांच्या, आपणां पूर्वेकडील लोकांच्या नजरेस हे दोष विशेष रीतीनें पडले आणि याच लोकांना या दोषांचा परिणामही भोगावा लागला; परंतु अंगीं महत्त्वाला चढण्याजोगें खरोखर कांहीं तरी असल्याशिवाय कोणताही देश किंवा कोणताही समाज मोठेपणाला चढूं शकत नाहीं. पश्चिम यूरपच्या ठिकाणीं असें कांहीं तरी खास होतें आणि यूरपची प्रतिष्ठा ही खरोखर यूरपच्या लष्करी शक्तीवर आधारलेली नसून ज्या विशिष्ट गुणांमुळें यूरपला मोठेंपण प्राप्त झालें त्या गुणांवर ती प्रतिष्ठा आधारलेली आहे, हेंच खोल विचार करूं गेल्यास शेवटीं स्पष्ट होतें. या काळीं यूरप खंडांत जिकडे तिकडे विशेष जिवंतपणा, विशेष जोमदारपणा आणि नवनिर्मितीची शक्ति भरपूर प्रमाणांत आढळून आली. महान् कवी आणि ग्रंथकार, तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ, कलावंत आणि यंत्रशास्त्रज्ञ आणि मोठे कर्तबगार लोक या काळांत यूरप खंडांत होऊन गेले. शिवाय पश्चिम यूरपमधील सामान्य माणसाची परिस्थितिसुद्धां तशी पाहिली तर पूर्वीपेक्षा किती तरी जास्त चांगली झालेली होती. तिकडचीं मोठमोठीं राजधानीचीं शहरें–लंडन, पॅरिस, बर्लिन, न्यूयॉर्क हीं शहरें–एकसारखीं मोठमोठीं होत गेलीं. त्यांच्यांतील इमारती उंच उंच होत जणुं आकाशाला भिडूं लागल्या; तेथील विलासभोग वाढत गेले आणि शास्त्रीय संशोधनामधून मानवी श्रम, हमालीचे कष्ट, दगदग कमी करण्याचे आणि जीवनातील सुखसोयी वाढविण्याचे मार्ग निघत गेले. सुखवस्तु लोकांचें जीवन अत्यंत परिपक्व, मधुर आणि सुसंस्कृत झालें. त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारची कृतकृत्यता, स्वयंतृप्तता, किंचित् सुस्तता उत्पन्न झाली. त्यांचें तें जीवन म्हणजे संस्कृतीच्या दिवसाच्या तिसऱ्या प्रहरच्या अथवा संध्याकाळच्या अवस्थेप्रमाणें मधुर अथवा कालिदासानें म्हटल्याप्रमाणें परम रमणीय होऊन गेलें.

अशा रीतीनें एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत यूरपचें स्वरूप एकंदरींत मोठें मधुर आणि ऐश्वर्यसंपन्न असें झालें आणि वर वर पाहतांना तरी असें वाटूं लागलें, कीं ही परिपक्व सुधारणा आणि संस्कृति अशीच कायम राहून तिला पुढच्या काळांत यश-

मागून यश मिळत जाऊन तिची सारखी प्रगतीच होत जाणार; परंतु वरचें हें आवरण दूर करून जरा आंत डोकावून पाहशील, तर खालीं तुला किती तरी विलक्षण खळबळ आणि पुष्कळसे उद्वेगकारक देखावे आढळून येतील. कारण हें सारें ऐश्वर्य, सुधारणा आणि संस्कृति या गोष्टी यूरप खंडाच्या वरिष्ठवर्गीयांपुरत्याच निर्माण झालेल्या होत्या आणि त्यांचा सगळा आधार बरेचसे देश आणि बरेच लोकसमाज यांच्या पिळणुकीवर होता. आंतल्या बाजूला मीं मागें उल्लेख केलेले अंतर्विरोध तुला आढळतील. राष्ट्रीय देशभावना आणि साम्राज्यशाहीचा उग्र आणि क्रूर चेहरा यांचें तेथें तुला दर्शन होईल. मग कांहीं या एकोणिसाव्या शतकाच्या सौंदर्याबद्दल किंवा चिरंतनपणाबद्दल तुला इतकीशी खात्री वाटणार नाहीं. या संस्कृतीचें बाह्य शरीर चांगलें साफ किंवा सुरेख होतें. पण आंत तिच्या हृदयात कीड लागलेली होती. निरोगीपणा आणि प्रगति यांबद्दल तिची एकीकडे वाहवा होत असतांना दुसरीकडे या धनिकशाही संस्कृतीच्या प्राणस्थानीं ऱ्हासाची सुरुवात झालेली होती.

शेवटीं तिचा अखेरचा चक्काचूर होण्याजोगा धक्का १९१४ मध्यें बसला. साडेचार वर्षांच्या युद्धानंतरही यूरप खंड धडपणीं या धक्क्यांतून बाहेर पडलें खरें; परंतु त्या वेळीं त्याला ज्या भयंकर जखमा झाल्या त्या अजूनही बऱ्या झालेल्या नाहींत; परंतु त्यासंबंधीं आतां पुन्हां केव्हां तरी सांगितलें पाहिजे तुला.

## १०९
## हिंदुस्थानांतील युद्धें आणि बंडें

२७ नोव्हेंबर, १९३२

एकोणिसाव्या शतकाचें आपलें हें निरीक्षण चांगलेंच लांबलचक झालें. आतां जगांतल्या कांहीं कांहीं भागांची जरा जवळून आणि सूक्ष्म पाहणी आपण करूं या. हिंदुस्थानापासून आपण सुरुवात करूं.

कांहीं दिवसांपूर्वीं मीं तुला ब्रिटिशांना हिंदुस्थानमध्यें आपल्या प्रतिस्पर्ध्यांविरुद्ध जय कसा मिळाला हें सांगितलें. नेपोलियनच्या विरुद्ध झालेल्या लढायांच्या काळांत फ्रेंच लोक हिंदुस्थानांतून पारच नाहींसे झाल्यासारखे होते. मराठे लोक, म्हैसूरमध्यें टिपू सुलतान आणि उत्तरेकडे शीख लोक यांनीं कांहीं काळपर्यंत इंग्रजांना रोखून धरलेलें होतें; परंतु त्यांनाही इंग्रजांचा प्रतिकार फार काळपर्यंत करतां आला नाहीं. या सर्व राज्यांमध्यें ब्रिटिश सत्ता ही अधिक सामर्थ्यवान् आणि साधनसामुग्रीनें अधिक सज्ज होती. त्यांच्याजवळ शस्त्रें चांगलीं होतीं, त्यांचा संघटितपणा चांगला होता आणि

सगळ्याहून विशेष म्हणजे कसल्याही अडचणीच्या प्रसंगीं जिचा आश्रय व मदत घ्यावी अशी आरमारी सत्ता त्यांच्यापाशीं होती. त्यांचा कांहीं पराभव झालाच नाहीं असें नव्हे; पुष्कळदां झाला; परंतु पराभव झाला तरी त्यांचा नायनाट झाला नाहीं. कारण समुद्रावरील मार्गांवर त्यांचें वर्चस्व असल्यामुळें येथली त्यांची साधनसामुग्री नष्ट झाली तरी ती दुसरीकडून त्यांना पैदा करतां येत असे. याच्या उलट, स्थानिक राज्यांना पराभव म्हटला कीं जवळजवळ सत्यानाशच होण्याची पाळी; त्याच्यावर मग कांहीं उपाय जणुं राह्यचा नाहीं. ब्रिटिश लोकांजवळ लढाईची साधनसामुग्री अधिक चांगली होती आणि त्यांची संघटनकुशलता अधिक होती, एवढ्यावरच संपलें नाहीं. आपल्या एतद्देशीय प्रतिस्पर्ध्यांपेक्षां ते फारच अधिक चतुर होते. त्यामुळें ते तेथील राज्यांच्या आपसांतील वैरांचा अतिशय चांगला फायदा करून घेत. अशा रीतीनें ब्रिटिश सत्ता अनिवार्यपणें पसरत चालली. आपल्या प्रतिस्पर्ध्यांना एकामागून एक ब्रिटिशांनीं जमिनीवर लोळविलें. त्यातही एकाला लोळविण्याकरितां आज दुसऱ्याची मदत घ्यावयाची आणि उद्यां त्या दुसऱ्यावर तीच पाळी यावयाची, असा क्रम त्यांनीं आचरिला. त्या काळचे हे सरंजामशाहीपद्धतीचे राजे आणि सरदार इतके अदूरदृष्टि कसे होते याचें मोठें आश्चर्य वाटतें. या परकीय शत्रूंविरुद्ध सर्वांनीं मिळून एक होण्याचा विचार त्यांनीं कधींही मनांत आणला नाहीं. प्रत्येकजण आपला एकेकटा लढला आणि पडला. पडणें हेंच केव्हांही अशा स्थितींत न्यायाचें व स्वाभाविक होतें.

ब्रिटिश सत्तेचें सामर्थ्य जसजसें वाढत गेलें, तसतशी तिच्या ठिकाणीं अधिक आक्रमणाची प्रवृत्ति उत्पन्न झाली. ते लोक अधिकाधिक आक्रमणशील, चढाईखोर आणि निर्दयही बनले. कांहीं कारण असो वा नसो, त्यांनीं लोकांशीं युद्धें करायला सुरुवात केली. अशीं युद्धें किती तरी झालीं. त्या सगळ्यांच्याच हकिकती देऊन मी तुला कंटाळवूं इच्छीत नाहीं. युद्धें हा कांहीं लिहायला मोठासा आनंददायक विषय नाहीं. इतिहासामध्यें त्यांना उगीचच फार फाजील महत्त्व दिलें जात असतें. तरी पण या युद्धांसंबंधीं थोडी थोडी हकिकत तुला सांगावयालाच हवी; नाहीं तर एकंदर चित्र थोडेंसें अपुरें भासेल.

म्हैसूरचा हैदरअल्ली आणि ब्रिटिश लोक यांच्यामधील दोन युद्धांबद्दल यापूर्वी मीं तुला सांगितलेंच आहे. या दोन लढायांत हैदरअल्लीचाच मोठ्या प्रमाणांत जय झाला होता. त्याचा मुलगा टिपू सुलतान हा ब्रिटिशांचा अगदीं कट्टा वैरी होता. त्याला नामोहरम करण्यासाठीं ब्रिटिशांना त्याच्याशीं १७९० ते १७९२ मध्यें एक व १७९९ मध्यें एक अशीं दोन युद्धें करावीं लागलीं. टिपू सुलतान लढतां लढतां मेला. म्हैसूर शहराजवळच अजूनही त्याची राजधानी जें श्रीरंगपट्टण शहर त्याचे अवशेष तुला पाहायला मिळतील. तेथें त्याची कबर आहे.

त्यानंतर आतां ब्रिटिशांच्या वर्चस्वाला विरोध करायला मराठे तेवढे उरले होते. पश्चिम हिंदुस्थानांत पेशवे होते आणि त्याच्या वरच्या बाजूला ग्वाल्हेरचे शिंदे, इंदूरचे

होळकर आणि इतर कांहीं सरदार होते ; परंतु मराठ्यांचे दोन मोठे मुत्सद्दी, ग्वाल्हेरचा महादजी शिंदे आणि पेशव्यांचा मंत्री नाना फडणीस हे अनुक्रमें १७९४ आणि १८०० या सालांत मरण पावल्यानंतर मराठ्यांच्या सत्तेचा डोलाराही कोसळून पडला. तरीही मराठ्यांना पुरेसें जमीनदोस्त करायला इंग्रजांना आणखी बराच काळ लागला. अखेरीस त्यांचा १८१९ मध्यें पूर्ण पाडाव झाला खरा; परंतु त्यापूर्वी आपल्या पडत्या काळांतही त्यांनीं ब्रिटिशाचा कांहीं कांहीं ठिकाणीं पराभव केला होता. ब्रिटिशांनीं या मराठे राजांना एकएकटे लढवून पराभूत केलें. एकाशीं ब्रिटिश लोक लढत असतां, बाकीच्यांनीं मदत न करतां नुसतें पाहत राहायचें असा प्रकार त्यांच्या-मध्यें झाला. शिंदे आणि होळकर यांनीं ब्रिटिशांचें अधिराज्य मान्य केलें आणि ते स्वतंत्र राजे बनले. बडोद्याच्या गायकवाडांनीं तर त्यांच्या पूर्वींच या परकी सत्तेशीं तह करून टाकला होता.

मराठ्यांची रजा घेण्यापूर्वीं मला मध्य हिंदुस्थानांत अत्यंत प्रसिद्धीस आलेल्या अशा एका नांवाचा उल्लेख करावयाचा आहे. तें नांव म्हणजे अहल्याबाईचें. ही स्त्री १७६५ पासून १७९५ पर्यंत ३० वर्षें इंदूर संस्थानच्या गादीवर होती. ती गादीवर आली तेव्हां अवघी ३० वर्षांची अल्पवयी आणि विधवा होती. आपल्या राज्याचा कारभार तिनें विशेषच चांगल्या रीतीनें केला. अर्थातच ही स्त्री पडदा पाळीत नव्हती. मराठे लोकांत पडद्याची ही चाल तशी केव्हांच नव्हती. राज्याच्या सगळ्या कारभारांत ती स्वतः आपलें लक्ष घालीत असे. उघड दरबारांत ती बसत असे. इंदूर हें मुळांत लहानसें खेडें होतें. त्याचें तिनें सुसंपन्न असें शहर बनविलें. तिनें कोणत्याही युद्धांत पडण्याचें टाळलें आणि आपल्या संस्थानामध्यें शांतता राखून आपलें संस्थान चांगलें भरभराटीला आणलें. आणि याच काळांत बहुतेक सगळ्या हिंदुस्थानांत दुसरी-कडे नुसता धुमाकूळ माजलेला होता. त्यामुळें मध्य हिंदुस्थानांत तिला अजून संत समजतात आणि लोक तिच्याविषयीं भक्ति बाळगतात यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

मराठ्यांशीं ब्रिटिशांचें अखेरचें युद्ध झालें, त्याच्या थोडें आधीं १८१४ ते १८१६ पर्यंत ब्रिटिशांचें नेपाळशीं युद्ध झालें. या डोंगराळ लढाईत ब्रिटिशांना फार हाल सोसावे लागले; परंतु अखेरीस त्यांचा जय झाला आणि ज्या या जिल्ह्याच्या तुरुंगांत बसून हें पत्र मी लिहितों आहें, तो डेहराडून जिल्हा आणि कुमाऊन व नैनीताल हीं ठिकाणें ब्रिटिशांच्या अमलाखालीं आलीं. मागें चीनसंबंधींच्या एका पत्रांत मीं सांगितलेलें आठवत असेल तुला, कीं एकदां एका चिनी सैन्यानें अचाट साहसी पराक्रम करून तिबेटचा प्रदेश ओलांडला; हिमालयही ओलांडला आणि गुरख्यांचा पराभव थेट त्यांच्या घरीं नेपाळमध्यें येऊन केला. ब्रिटिशांचें नेपाळशीं जें हें वर सांगितलेलें युद्ध झालें त्याच्या पूर्वीं बावीसच वर्षांचा हा प्रसंग. तेव्हांपासून नांवाला का होईना पण नेपाळचें राज्य चीनचें अधिराज्य मानीत असे ; परंतु मला वाटतें हल्लीं कांहीं तें तसें मानीत नाहीं. हा एक मोठा विचित्र देश आहे. अतिशयच मागासलेला,

सगळ्या जगापासून अगदींच तुटून राहिलेला असा आहे. तरीपण त्याचें एकंदर वर्णन पाहतां, त्याची नैसर्गिक रचना मोठीच सुंदर आणि मनोहर आहे आणि तेथें नैसर्गिक संपत्तीही विपुल आहे. काश्मीर किंवा हैद्राबाद यांच्यासारखें हें परतंत्र संस्थान नाहीं. या राज्याला स्वतंत्र म्हणून समजतात मात्र; परंतु कांहीं एका मर्यादेच्या बाहेर त्याचें हें स्वातंत्र्य हातपाय पसरणार नाहीं, याबद्दल ब्रिटिश लोक नेहमीं दक्ष असतात आणि या नेपाळच्या शूर आणि लढाऊ लोकांना, गुरख्यांना, हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या सैन्यांत दाखल करून घेण्यांत येऊन त्यांचा उपयोग हिंदी लोकांना दडपून टाकण्यास्तव केला जातो.

हिंदुस्थानच्या पूर्व दिशेला ब्रह्मदेशाचें राज्य थेट आसामपर्यंत पसरलेलें आहे. त्यामुळें नित्य सगळीकडे आपले हातपाय पसरीत चाललेल्या ब्रिटिश लोकांचा ब्रह्मी लोकांशीं झगडा होणें अपरिहार्य होतें. त्यांचीं ब्रह्मदेशाशीं तीन युद्धें झालीं. या प्रत्येक युद्धात ब्रिटिशांनीं नवीन मुलूख आपल्या राज्यांत सामील केला. पहिली लढाई १८२४ ते २६ पर्यंत झाली; तिच्यात आसाम प्रांत ब्रिटिशांच्या कबजांत आला. दुसरें युद्ध १८५२ मध्यें झालें. त्यांत दक्षिण ब्रह्मदेश ताब्यांत आल्यामुळें उत्तर ब्रह्मदेश आणि त्याची मंडालेजवळील आवा येथील राजधानी यांचा समुद्राशीं अजिबात संबंध तुटला आणि कसलाच कोठें आधार किंवा संबंध न राहून त्यांना ब्रिटिशांच्या तोंडाकडे पाहण्याची वेळ आली. अखेरीस १८८५ मध्यें तिसरें युद्ध होऊन हा सगळा ग्रंथ आटोपला आणि सगळा ब्रह्मदेश काबीज करून ब्रिटिशांनीं तो आपल्या साम्राज्यांत सामील करून टाकला. तत्त्वतः ब्रह्मदेश हा चीनच्या अधिराज्याखालचा देश होता; एवढेंच नव्हे, तर येथून चीनला नियमित खंडणीसुद्धां पाठविण्यांत येत असे. हा एक चमत्कार लक्षांत ठेवण्यासारखा आहे, कीं ब्रह्मदेश आपल्या राज्यांत सामील करून घेतांना ही खंडणी चीनला देण्याविषयीं ब्रिटिशांनीं मान्यता दिली. चीनचा हात आपल्या स्वतःच्याच इतर भानगडींत फार गुंतलेला असल्यामुळें आपला मांडलिक असा जो ब्रह्मदेश त्याच्यावर स्वारी झाली त्या वेळीं त्याच्या मदतीला कांहीं चीनला येतां आलें नाहीं असें यावरून दिसतें. १८८५ नंतर ब्रिटिशांनीं एक वेळ ही खंडणी दिली, पण पुढें ती देण्याचें बंद करून टाकलें. यावरून हें स्पष्ट आहे, कीं थेट १८८५ सालींसुद्धां ब्रिटिशांना चीनच्या सामर्थ्याचा दबदबा वाटत होता.

या ब्रह्मदेशच्या लढायांतून आपण १८८५ पर्यंत आलों. कारण या तिन्ही लढायांचा एकदम विचार मला करावयाचा होता; पण आतां पुन्हां एकदां आपल्याला उत्तर हिंदुस्थान आणि या शतकाच्या थोड्या प्रारंभींच्या काळांत गेलें पाहिजे. पंजाबमध्यें या काळीं शिखांचें एक मोठें राज्य स्थापन झालेलें असून रणजितसिंग हा तेथील राजा होता. या शतकाच्या अगदीं सुरुवातीलाच रणजितसिंगानें अमृतसर शहराचा ताबा मिळविला होता. इ. स. १८२० पर्यंत तो जवळजवळ सबंध पंजाब प्रांत व काश्मीरचा प्रदेश यांचा मालक झालेला होता. तो १८३९

मध्यें मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर शिखांचें राज्य दुर्बल होत गेलें. त्यांच्यांत फाटाफूट झाली. संकटकाळांत मनुष्य वर चढत जातो आणि यश मिळाल्यानंतर मनुष्य खालीं खालीं येतो, अशा अर्थाची जी एक जुनी म्हण आहे, तिचें शिखांचें हें राज्य म्हणजे एक उत्तम उदाहरण आहे. शिखांची संख्या जेव्हां अगदींच मोजकी होती आणि मोंगलांची सत्ता त्यांच्या हात धुऊन पाठीस लागलेली होती, त्या वेळीं-सुद्धां पुढच्या पुढच्या मोंगल राज्यकर्त्यांना शिखांची सत्ता दडपून टाकतां आली नाहीं; परंतु राजकीय दृष्टया शिखांना यश प्राप्त झाल्यानंतर मात्र ज्या पायावर हें यश उभारलेलें होतें त्या पायाचीच दृढता कमी होत चालली. ब्रिटिशांचीं आणि शिखांचीं दोन युद्धें झालीं. पहिलें १८४५-४६ मध्यें आणि दुसरें १८४८-४९ मध्यें. दुसऱ्या युद्धांत ब्रिटिशांचा चिलियनवाला येथें फार भयंकर पराभव झाला. तरी पण अखेरीस ब्रिटिशांचाच संपूर्ण विजय झाला आणि पंजाब प्रांत खालसा करण्यांत आला. तूं स्वतः काश्मिरी आहेस. त्यामुळें या ब्रिटिश लोकांनीं जम्मूच्या कोणा एका राजा गुलाबसिंग नांवाच्या गृहस्थाला काश्मीर प्रांत पंचाहत्तर लक्ष रुपयांस विकून टाकला, हें ऐकून तुला मोठीच मौज वाटेल. गुलाबसिंगाला केवढा लग्गा मिळाला म्हणायचा हा! या खरेदी-विक्रीच्या व्यवहारांत काश्मीरच्या गरीब बिचाऱ्या प्रजेला उभयपक्षीं कोणीच कांहीं विचारलें नाहीं. हें काश्मीरचें संस्थान आतां ब्रिटिशांच्या अधिराज्या-खालचें एक संस्थान असून तेथील हल्लींचा महाराजा हा या गुलाबसिंगाच्याच वंशांतला आहे.

पंजाबच्या पलीकडे आणखी उत्तरेला, किंवा खरोखर वायव्येला म्हणा, अफगाणस्तान देश आहे आणि पलीकडच्या बाजूला अफगाणिस्तानपासून जवळच रशियन लोकांचें राज्य होतें. मध्य आशियांत रशियाचें साम्राज्य वाढत चाललेलें पाहून ब्रिटिश लोकांच्या अंतःकरणांत धडकी भरलेली होती. रशिया कदाचित् हिंदुस्थानवरही हल्ला करील अशी त्यांना भीति वाटत होती. जवळ जवळ साऱ्या एकोणिसाव्या शतकभर या "रशियन संकटा"ची भाषा बोलली जात होती. त्यामुळें १८३९ मध्येंच हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याच्या लोकांनीं अफगाणिस्तानाकडून कांहींही कारण घडलेलें नसतांना अफगाणिस्तानावर हल्ला केला. त्या वेळीं अफगाणिस्तानची सरहद्द ब्रिटिशांच्या राज्यापासून फार दूर होती आणि या दोन राज्यांमध्यें पंजाब प्रांतांतील शिखांचें राज्य होतें; तरीपण शिखांशीं मैत्रीचा करार करून ब्रिटिश लोक काबूलवर चालून गेले; परंतु अफगाण लोकांनीं ब्रिटिशांना चांगलाच इंगा दाखविला. अफगाण लोक हे इतर पुष्कळ बाबतींत कितीही मागासलेले असले तरी त्यांना स्वातंत्र्यप्रेम आहे आणि त्यासाठीं ते लढायला तयार असतात. त्यामुळें ज्या कोणा परकी सैन्यानें अफगाणिस्तानावर हल्ला केला, त्यांना नेहमींच गांधीलमाशीच्या जाळ्यांत सांपडल्यासारखें होत आलेलें आहे. ब्रिटिशांनीं मारे काबूलचा आणि अफगाणिस्तानच्या पुष्कळशा प्रदेशाचा कबजा केलेला होता; परंतु एकाएकीं जिकडे-

तिकडे बंडें उसळलीं, ब्रिटिश लोकांना मागें रेटण्यांत आलें आणि ब्रिटिशांच्या एका सबंध सैन्याचा पूर्ण निःपात झाला. या नुकसानीचा सूड घेण्यासाठीं पुढें पुन्हां एक स्वारी ब्रिटिशांनीं अफगाणिस्तानवर केली. याही वेळीं ब्रिटिशांनीं काबूल शहर काबीज केलें आणि तेथील आच्छादित असा बाजार त्यांनीं जाळून टाकला. ब्रिटिश शिपायांनीं शहरांत पुष्कळ लूटमार केली आणि पुष्कळ भागांत आगी पेटविल्या. परंतु सतत लढत राहिल्याशिवाय सहजासहजीं अफगाणिस्तान देश स्वतःच्या कबजांत ठेवणें शक्य नाहीं हें ब्रिटिशांना लवकरच कळून चुकलें; त्यामुळें ते तेथून निघून आले.

यानंतर सुमारें चाळीस वर्षांनीं १८७८ मध्यें अफगाणिस्तानच्या अमीरानें रशियाची मैत्री संपादन केल्यामुळें हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या अंतःकरणांत पुन्हां एकदां धडकी भरली. पुन्हां पुष्कळशा प्रमाणावर मागच्याच इतिहासाची पुनरावृत्ति घडून आली. पुन्हां एक युद्ध झालें. ब्रिटिशांनीं अफगाणिस्तानावर स्वारी केली; तिच्यांत यश आल्या-सारखेंही झालें. अशा स्थितींत शेवटीं तेथील ब्रिटिश प्रतिनिधि आणि त्यांचा परिवार यांची अफगाण लोकांनीं कत्तल केली आणि ब्रिटिश सैन्याचा पराभव केला. त्याबद्दलच ब्रिटिशांनीं त्यांना शासन व्हावें म्हणून कांहीं अत्याचार केले आणि पुन्हां एकदां ते या 'गांधीलमाशांच्या मोहळांतून' माघार घेऊन परत आले. यानंतर पुष्कळ वर्षेंपर्यंत अफगाणिस्तानची परिस्थिति मोठीच विचित्र होती. ब्रिटिश लोक अफगाणिस्तानच्या अमीराला इतर कोणाही परकीय देशाशीं मैत्री ठेवूं देत नसत आणि त्याच वेळीं स्वतः मात्र अमीराला दरसाल भली मोठी रक्कम (खंडणी म्हणून) देत असत. तेरा वर्षांपूर्वीं १९१९ मध्यें तिसरें अफगाणयुद्ध झालें. त्यामध्यें अफगाणिस्तान देश संपूर्ण स्वतंत्र झाला; परंतु आपण ज्या काळचा सध्यां विचार करतों आहों, त्याच्या बाहेरची ही गोष्ट आहे.

याशिवाय आणखीही पुष्कळ लहान लहान युद्धें झालीं. त्यांपैकीं सिंधमध्यें जें युद्ध १८४३ मध्यें उकरून काढण्यांत आलें, त्यांत तर निर्लज्जपणाची कमालच झाली. तेथें जो ब्रिटिशांचा हस्तक होता त्यानें सिंधी लोकांना धाकदपटशा दाखवून लढाई-मध्यें जवळजवळ पराणी लावून खेंचलें आणि मग स्वतःच त्यांच्यावर हल्ला करून त्यानें त्याना उधळून लावून सिंध प्रांत आपल्या राज्यांत सामील केला आणि हा एक त्यांच्या रोजच्या नोकरीबाहेरचा जोडधंदाच झाला असें समजून या सत्कार्याबद्दल ब्रिटिश अमलदारांना बक्षिसाच्या रकमा वांटण्यांत आल्या. त्यांत ब्रिटिशांचा हस्तक—एजंट—सर चार्लस नेपिअर याच्या वांटणीस सात लाख रुपये आले! तेव्हां ब्रिटिशांच्या-मधील नीतीची चाड नसणारे धाडसी आणि लुटारू लोक या आमच्या हिंदुस्थानकडे आकर्षित होत राहिले यांत आश्चर्य तें काय आहे?

अयोध्या प्रांतही १८५६ मध्यें ब्रिटिश राज्यांत सामील करण्यांत आला. या प्रांतांत त्या वेळीं राज्यकारभारामध्यें अत्यंत भयंकर अंदाधुंदी माजलेली होती. तेथील राजे

अलीकडे कांहीं काळ ज्यांना नबाबवझीर म्हणत असत ते होत. मुळांत दिल्लीच्या बादशहाकडून या नबाबवझीराची नेमणूक अयोध्या प्रांताचा कारभारी, गव्हर्नर म्हणून होत असे; परंतु मोंगल राज्याचा ऱ्हास झाल्यावर अयोध्या प्रांत स्वतंत्र झाला; पण त्याचें हें स्वातंत्र्य थोडाच काळ टिकलें; पुढचे पुढचे नबाबवझीर हे सर्वथा नालायक आणि दुर्बुद्धीचे व दुराचारी निघाले आणि आपल्या प्रांताचें कांहीं कल्याण करावें अशी जरी त्यांची मोठी इच्छा असली, तरीही ईस्ट इंडिया कंपनीनें त्याच्या राज्यांत ढवळाढवळ सुरू केल्यानें तसें करणें त्यांना अशक्यच होतें. त्यांच्या स्वतःच्या हातांत खरी सत्ता अशी कांहींच नव्हती आणि ब्रिटिशांना अयोध्या प्रांताच्या अंतर्गत कारभाराशीं कांहींही कर्तव्य नव्हतें. त्यामुळें अयोध्या प्रांताचें राज्य गडगडलें आणि मग तें ब्रिटिश राज्यांत सामील होण्यावांचून गत्यंतरच राहिलें नाहीं.

या लढायांबद्दल आणि त्यांतून खालसा झालेल्या मुलखाबद्दल आतांपर्यंत मी हें जें तुला सांगत आलों तें मला वाटतें पुरेसें आहे; नव्हे, हवें त्याहून तें अधिकच आहे. परंतु हिंदुस्थानांत जी एक नवीन घडण घडून आली होती आणि जिची पुढें पुढें प्रगति होणें अनिवार्य होतें त्या घडणीचें एक बाह्य चिन्ह म्हणजे हीं सगळीं युद्धें वगैरे प्रकार होत. इंग्लिश लोक हिंदुस्थानमध्यें आले त्या वेळेपासूनच हिंदुस्थानांतील जुनी आर्थिक व्यवस्था मोडकळीस आलेली होती. सरंजामशाहीची इमारत दुभंगूं लागली होती. त्या सुमारास हिंदुस्थानांत जे परदेशचे लोक आले ते जरी आले नसते तरीसुद्धां ही सरंजामशाही फार काळ टिकून राहिली नसती. यूरपांतल्याप्रमाणें येथेंही ती जाऊन तिच्या जागीं नवीन उत्पादन करणाऱ्या वर्गांना जिच्यांत अधिक सत्ता आहे अशी व्यवस्था येथेंही अमलांत आली असती; परंतु असा हा खांदेपालट होण्यापूर्वींच, सरंजामशाहीच्या तटाची मोडतोड होण्याला नुकतीच कोठें सुरुवात होते न होते तोंच, त्यामध्यें पडलेल्या भगदाडांत ब्रिटिश लोक येऊन उभे राहिले. हिंदुस्थानांतील ज्या राज्यकर्त्यांशीं त्यांनीं युद्धें केलीं आणि ज्यांना त्यांनीं पराभूत केलें, ते सगळे जुन्या अस्तास चाललेल्या काळांतील लोक होते. भविष्यकाळची त्यांना आतां खरोखर कांहीं आशा राहिलेली नव्हती. अशा स्थितींत ब्रिटिशांना यश येणार हें अगदीं उघड होतें. त्यांनीं केलें काय, तर हिंदुस्थानांतील सरंजामशाहीचा अंत अधिक लवकर घडवून आणला. परंतु चमत्कार मात्र असा कीं याच इंग्रज लोकांनीं पुढच्या काळांत बाह्यतः का होईना, पण याच सरंजामशाहीला उभी राखण्याचा यत्न केला आणि अशा रीतीनें हिंदुस्थानच्या नवीन जागतिक रचनेच्या मार्गावरील प्रवासांत अडथळा उत्पन्न केला. पुढें आपल्याला दिसून येईलच हें.

अशा रीतीनें ज्या घडणीमुळें हिंदुस्थानांतील सरंजामशाही जाऊन तिच्या जागीं एक प्रकारची औद्योगिक भांडवलशाहीप्रधान राज्यव्यवस्था हिंदुस्थानांत स्थापन व्हावयाची होती, त्या ऐतिहासिक घडणीचे मदतनीसच जणुं ब्रिटिश लोक झाले. त्यांची त्यांनासुद्धां आपण हा बदल घडवून आणणारे हस्तक आहों याची जाणीव

नव्हती आणि त्याच्याशीं लढणारे जे अनेक हिंदी राजेरजवाडे होते, त्यांना तर या गोष्टींची एवढीसुद्धां कल्पना नव्हती. मरूं घातलेल्या संस्थेला किंवा परंपरेला काळाचा ओघ सहसा उमगत नाहीं. आपलें कार्य आणि उद्देश आतां पूर्ण झालेले असून सर्वशक्तिमान् अशा काळाच्या ओघानें येऊन आपल्याला जबरदस्तीनें व अपमानास्पद रीतीनें हांकलून लावण्याऐवजीं, गचांडी देण्याऐवजीं, आतां आपण मोठेपणानें बाजूस सरलें पाहिजे ही गोष्ट सहसा त्यांच्या ध्यानीं येत नाहीं. इतिहासापासून ते केव्हांच शहाणपणा शिकत नाहींत आणि जग एकसारखें पुढें पुढें जात चाललें असून कोणींसें म्हटल्याप्रमाणें काळ आपल्याला पाठीमागें " इतिहासाच्या केराच्या टोपलींत " टाकून जाणार आहे हें त्यांना केव्हांच पटत नाहीं. याच न्यायाला अनुसरून हिंदुस्थानांतील सरंजामशाहीलाही यांपैकीं कशाची कल्पना आली नाहीं आणि त्यानें ब्रिटिशांशीं जो लढा केला तो सर्वस्वीं निरर्थक ठरला. अगदीं याच न्यायाप्रमाणें आज हिंदुस्थानांतील आणि पूर्वेकडील इतर प्रदेशांमधील ब्रिटिश लोकांना आतां आपले दिवस संपले, साम्राज्याची सद्दी संपली हें, आणि जग निर्दयपणें ब्रिटिश साम्राज्याला ' इतिहासाच्या केराच्या टोपलींत ' टाकून पुढें मार्ग आक्रमण करणार आहे, ही गोष्टही लक्षांत येत नाहीं.

परंतु ब्रिटिश लोक हिंदुस्थानात हातपाय पसरूं लागले त्या वेळीं या देशांत जी सरंजामशाही प्रचलित होती, तिनें आणखी एक अखेरचा प्रयत्न, सत्ता आपल्या हातीं मिळविण्यासाठीं आणि परकी सत्तेला देशांतून हांकलून लावण्यासाठीं केला. हा प्रयत्न म्हणजे १८५७ सालचें प्रचंड बंड. या सुमारास सर्वच देशभर ब्रिटिशांच्या विरुद्ध फार मोठ्या प्रमाणात असमाधान आणि असंतोष पसरलेला होता. ईस्ट इंडिया कंपनीचें धोरण एकच एक होतें. तें म्हणजे पैसा कमवायचा ; दुसरेंतिसरें कांहीं नाहीं. आधीं हें धोरण आणि त्याच्या जोडीला कंपनीच्या अमलदारांचें या देशाविषयीं अज्ञान आणि लुटारूपणा यामुळें सर्व देशभर लोकांच्या हालअपेष्टा फार वाढल्या होत्या. त्याचा परिणाम ब्रिटिशांच्या प्रत्यक्ष हिंदी सैन्यावरसुद्धां झाला होता आणि त्याच्यामध्यें छोटीं छोटीं बंडें होऊं लागलीं होतीं. राजे आणि रजवाडे व सरंजामदार जे लोक होते, त्यांतले पुष्कळसे स्वतः व अशांचे वंशज स्वाभाविकच या नवीन अधिराज्यावर अत्यंत जळतच होते. त्यामुळें गुप्तपणें बंडाची तयारी होऊं लागली. ही बंडाची संघटना विशेषेंकरून संयुक्त-प्रांताच्या आसपास आणि मध्य हिंदुस्थानांत पसरली होती. परंतु हिंदुस्थानातील लोक काय करतात आणि त्यांच्या मनांत कोणते विचार चालत असतात यांकडे ब्रिटिशांचें पहिल्यापासूनच इतकें दुर्लक्ष होत आलेलें आहे, कीं बंडाच्या या एवढ्या तयारीची ब्रिटिशांना काडीचीसुद्धां कल्पना नव्हती. सगळीकडे बंड एकाच वेळीं सुरू व्हावें म्हणून बंडाच्या सुरुवातीचा दिवस सुद्धां नक्की केलेला होता असें दिसतें. परंतु मीरत येथील कांहीं हिंदी सैनिकांच्या तुकड्यांनीं जरा जास्त घाई केली आणि १० मे १८५७ या दिवशींच त्यांनीं बंड पुकारलें. ठरलेल्या वेळेच्या




आधींच अवेळीं झालेल्या या स्फोटामुळें पुढारी लोकांचा सर्वच कार्यक्रम विसकटला. कारण यामुळें ब्रिटिश राज्यकर्ते आतां सावध झाले. तथापि हें बंड सारा संयुक्त प्रांत, दिल्ली, मध्य हिंदुस्थानचा कांहीं भाग आणि बिहार या सर्व प्रदेशांमध्यें पेटलें. हें केवळ लष्करी सैनिकांचेंच तेवढें बंड नव्हतें; तर त्या त्या प्रदेशांतील सामान्य लोकांचेंही हें ब्रिटिशांविरुद्ध बंड होतें. बहादुरशहा नांवाचा एक दुबळा म्हातारा कवि मोंगलांच्या वंशांतला अखेरचा पुरुष म्हणून शिल्लक होता. त्यालाच कांहीं लोकांनीं बादशहा म्हणून जाहीर केलें. हें बंड वाढून त्याला, लोकाच्या मनांत ज्यांच्या-विरुद्ध तीव्र द्वेषभावना निर्माण झाली होती अशा परकीयांविरुद्ध स्वातंत्र्याकरितां युद्ध असें स्वरूप प्राप्त झालें. परंतु हें स्वातंत्र्य म्हणजे पूर्वीच्या सरंजामशाहीच्या समाज-पद्धतीचें. त्यांत वर अनियंत्रित सत्ताधीश अशा बादशहाचें लोढणें राहावयाचेंच होतें. सामान्य जनतेच्या स्वातंत्र्याला त्यांत काहींएक वाव नव्हता. तरीही सामान्य जनते-मधील पुष्कळसे लोक या बंडामध्यें सामील झालेले होते. कारण एक तर आपली ही

सगळी दैन्यावस्था ब्रिटिश लोक येथें आल्यामुळें झाली, असें त्यांना वाटत होतें आणि दुसरें, कित्येक ठिकाणीं मोठ्या जमीनदारांचें त्यांच्यावर दडपण होतें. धार्मिक द्वेषामुळेंही कित्येकजण लढण्यास प्रवृत्त झालेले होते. हिंदु आणि मुसलमान या दोन्ही जमातींनीं या युद्धांत भरपूर भाग घेतला होता.

कितीक महिनेपर्यंत उत्तर हिंदुस्थान आणि मध्य हिंदुस्थान यांमध्यें ब्रिटिश राजसत्तेचा अगदीं शेवटचा तंतु तुटायचा प्रसंग आलेला होता ; परंतु या बंडाचेंही भवितव्य हिंदी लोकांनींच आपल्या हातांनीं निश्चित केलें. शिखांनीं व गुरख्यांनीं ब्रिटिश लोकांना मदत केली. दाक्षिणेंत निजाम व उत्तरेंत शिंदे यांनीं आणि इतरही पुष्कळ हिंदी संस्थानिकांनीं इंग्रजांचा पक्ष धरला. अशा रीतीनें झालेली ही फाटाफूट जमेस न धरतां सुद्धा बंडाच्या अंतर्गत व्यवस्थेंतच अपेशाचीं बीजें होतीं. एक तर ज्या कार्याला यापुढें यश येणें अशक्य अशा कार्यासाठीं म्हणजे सरंजामशाही चिरस्थायी करण्यासाठीं हें बंड होतें. दुसरें, या बंडाला चांगले पुढारी लाभले नव्हते. त्यांची संघटनाही व्यवस्थितपणें झालेली नव्हती आणि बंडखोरांत आपापसांत पहिल्यापासून शेवटपर्यंत मतभेद आणि भांडणें सुरू होतीं. बंडखोरांपैकीं काहीं लोकांनीं तर उगीचच क्रूरपणें ब्रिटिशांचीं कत्तल करून आपल्या कार्याला कालिमा आणला. या असल्या रानटी वागणुकीमुळें हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोकांची प्रवृत्ति ताठर मात्र झाली आणि त्यांनीं या कत्तलीचा सूड अगदीं त्याच रूपांत परंतु शेंकडों-हजारों पट अधिक प्रमाणांत घेतला. पेशव्यांचा वंशज नानासाहेब यानें कानपूरमधील इंग्रज लोकांना सुरक्षिततेची हमी दिली होती असें म्हणतात. त्यानंतरही विश्वासघात करून तेथील इंग्रज स्त्रीपुरुष आणि मुलेंबाळें यांची कत्तल करण्यांत आली. त्यामुळें इंग्रज लोक विशेषच चिडून गेले. या भयंकर अत्याचाराचें स्मारक म्हणून कानपूरमध्यें एक विहीर खडी आहे.

आडबाजूच्या कित्येक ठिकाणीं इंग्रज लोक जमावामध्यें वेढले गेले. कांहीं ठिकाणीं त्याना चांगल्या रीतीनें वागविण्यांत आलें, तर बऱ्याच ठिकाणीं वाईट रीतीनें. परिस्थिति अत्यंत बिकट असतांना आणि विरोधी पक्ष फार प्रबल असतांही इंग्रज लोक मोठ्या शौर्यानें लढले. लखनौचा वेढा हा इंग्रजांच्या धैर्याचें आणि सहनशक्तीचें मोठें उठावदार उदाहरण आहे. या वेढ्याशींच औटरॅम आणि हॅवलॉक या दोन शूर इंग्रज वीरांचीं नांवें सलग्न झालेलीं आहेत. सप्टेंबरमध्यें दिल्ली शहराला वेढा पडून त्याचा पाडाव झाला आणि तेव्हांपासूनच बंडाच्या यशाचें पारडें फिरलें. या दिवसापासून आणि पुढें कित्येक महिनेपर्यंत ब्रिटिश लोक बंडखोरांचा बीमोड करीत राहिले. तसें करतांना त्यांनीं जिकडे तिकडे हत्याकांड करून लोकांच्या मनांत भीतीनें नुसता थरकांप उडवून दिला. कित्येक लोकांना गोळया घालून जागच्या जागीं निर्घृणपणें ठार करण्यांत आलें. पुष्कळशा लोकांना तोफेच्या गोळयानीं एकदम मारून टाकण्यांत आलें. हजारों लोकांना रस्त्याच्या बाजूच्या झाडांना टांगून मारण्यांत आलें. नील नांवाचा एक इंग्रज सेनापति अलाहाबादेहून कानपूरपर्यंत कूच करीत गेला, तेव्हां वाटेंत सारा रस्ताभर

त्यानें इतकीं माणसें टांगून मारलीं, कीं रस्त्याच्या दोन्ही कडांना एकही झाड असें शिल्लक राहिलें नाहीं म्हणतात, कीं ज्यावर कोणी ना कोणी मनुष्य टांगलेला नाहीं. पुष्कळ भरभराटलेलीं खेडींच्या खेडीं त्यानें मोडून तोडून उध्वस्त करून टाकलीं. ही सगळीच कथा अतिशयच हृदयद्रावक आणि अंगावर शहारे आणणारी असून तिच्यांतील प्रत्येक कठोर आणि विदारक सत्य तुझ्यासारख्या मुलीला सांगायला माझें मन धजत नाहीं. नानासाहेब पेशव्यानें विश्वासघात आणि रानटीपणा केला असें जरी मानलें, तरी कितीएक इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्यापेक्षां शतपट रानटीपणा केला. दोन्ही पक्षांच्या बऱ्यावाईटपणाची चर्चा करण्याचा माझा उद्देश नाहीं. दोन्ही पक्षांकडून या कामांत पुष्कळच वाईट प्रकार घडलेले आहेत; परंतु होतें काय कीं कितीएक दुर्बुद्धीचे इतिहासकार आपल्याला फक्त हिंदी पक्षानें विश्वासघात आणि क्रूरपणा कसा केला याचेंच तेवढें भलें मोठें पुराण सांगतात आणि दुसऱ्या पक्षाच्या असल्याच कृत्यांचा दुरूनसुद्धां उल्लेख करीत नाहींत. असंघटित अशा गर्दीच्या जमावाकडून होणारीं क्रूर कृत्यें हीं, संघटित असें राज्ययंत्रच जेव्हां अशा गर्दीतील जमावाप्रमाणें वागूं लागतें तेव्हां त्याच्याकडून घडणाऱ्या क्रूर कृत्यांच्या मानानें दर्यामें खसखस इतकीं कमी असतात, हेंही यांत लक्षांत ठेवलें पाहिजे. अगदीं आजच्या घटकेला जरी तूं आपल्या प्रांतांतील खेड्यांमध्यें जाशील तर तुला आढळून येईल, कीं बंड मोडून काढतांना जे अत्याचार त्यांच्यावर करण्यांत आले व ज्या भयंकर हालअपेष्टा त्यांना सोसाव्या लागल्या, त्याचें मूर्तिमंत आणि राक्षसी चित्र अद्यापि लोकांच्या डोळ्यांपुढचें हाललेलें नाहीं.

या बंडामध्यें आणि तें दडपतांना, दोन्ही वेळीं जे अनन्वित प्रकार घडून आले त्यांच्या काळ्याकुट्ट पार्श्वभूमीवर एक नांव, एक तेजस्वी बिंदु फारच उठून दिसतो. तें नांव म्हणजे झांशीच्या राणी लक्ष्मीबाईचें. अवघ्या वीस वर्षांची ही तरुण विधवा पुरुषाचा वेष धारण करून आपल्या लोकांना घेऊन ब्रिटिशांच्या विरुद्ध चालून आली. तिच्या तेजस्वीपणाबद्दल, कर्तबगारपणाबद्दल आणि अभेद्य धैर्याबद्दल अनेक कथा प्रचलित आहेत. तिच्या विरुद्ध लढलेल्या इंग्रज सेनापतीनें सुद्धां बंडखोरांच्या पुढाऱ्यांपैकीं 'सर्वांत श्रेष्ठ आणि सर्वांत शूर' असें तिचें वर्णन केलें आहे. लढतां लढतां रणांगणावरच तिनें प्राण सोडला.

१८५७–५८ सालचें हें बंड म्हणजे हिंदुस्थानांतील सरंजामशाहीच्या ज्योतीची ही शेवटची लुकलुक होती. या बंडानें पुष्कळ गोष्टींची इतिश्री केली. त्यानें मोंगलांच्या वंशाची अखेर केली. कारण बंडामध्यें बहादुरशहाचे दोन मुलगे आणि एक नातू यांना त्यांनीं स्वतः कांहींही अपराध केलेला नसतांना किंवा कोणाला कांहीं चिडविलें नसतांनाही एका इंग्रज सेनापतीनें—हडसन यानें—दिल्लीहून घेऊन जात असतांना वाटेंतच गोळ्या घालून निर्दयपणें ठार केलें. अशा रीतीनें तैमूरलंग, बाबर आणि अकबर यांच्यासारख्यांच्या वंशाची अतिशय अपमानास्पद अशी अखेर झाली!

बंडानें हिंदुस्थानांतील ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्याचीही इतिश्री केली. या

राज्याचीं सूत्रें आता प्रत्यक्ष ब्रिटिश राज्यसत्तेनें आपल्या हातीं घेतलीं आणि आतांपर्यंत ब्रिटिशांचा गव्हर्नर जनरल म्हणून जो होता त्याचेंच रूपांतर व्हाइसरॉय, राजप्रतिनिधि असें करण्यांत आलें. त्यानंतर एकोणीस वर्षांनीं म्हणजे १८७७ मध्यें इंग्रजांच्या व्हिक्टोरिया राणीनें कैसर-इ-हिंद ही पदवी धारण केली. हा किताब मूळचा रोमच्या सीझर लोकांचा आणि बायझांटियन साम्राज्यांतील बादशहांचा होता. त्याचेंच हें हिंदुस्थानला जुळेलसें रूपांतर करण्यांत आलें. आतां मोंगल राजवंश नाहींसा झाला; पण त्या बादशाहीमधील प्रवृत्ति, तिच्या अनियंत्रित-पणाच्या खाणाखुणा या मात्र अजून शिल्लकच राहिल्या आणि दुसराच एक महान् मोंगल बादशहा, मुगल-ए-आझम, हिंदुस्थानवर आतां इंग्लंडमध्यें बसून राज्य करूं लागला.

## ११०

# हिंदी कारागिरांची गळचेपी

*१ डिसेंबर, १९३२*

हिंदुस्थानांतील एकोणिसाव्या शतकातील लढायांची हकिकत अशा रीतीनें सांगून झाली. सुटलों एकदांचा मी, असें त्यामुळें मला वाटलें. आतां आपणांला या शतकामध्येंच हिंदुस्थानमध्यें दुसऱ्या कांहीं याहून महत्त्वाच्या घटना घडल्या, त्याचा विचार करायला हरकत नाहीं. तरी पण, एक गोष्ट आणखी लक्षांत ठेवायला हवी तुला, कीं या ज्या सगळ्या लढाया इंग्लंडच्या हितासाठीं झाल्या त्यांचा खर्च मात्र सर्व हिंदुस्थानच्या पैशांतून करण्यांत आला. इंग्रज लोकांकडून आपल्याला जिंकून घेण्यासाठीं होणारा सगळा खर्च स्वतःच हिंदी लोकांनीं पुरवावा, ही पद्धति इंग्रज लोकांनीं येथें फारच यशस्वीपणानें अमलांत आणली! याशिवाय ज्या लोकांशीं हिंदी लोकांचें स्वतःचें कधीं भांडणतंडण नव्हतें, अशा आपल्या शेजाऱ्यांना, ब्रह्मी आणि अफगाण लोकांनाही जिंकून घेण्यासाठीं इंग्रज लोकांना हिंदी लोकांनीं आपलें रक्त आणि खजिना उपयोगात आणूं दिला. युद्ध म्हटलें कीं संपत्तीचा नाश व्हावयाचा हें ठरलेलेंच. त्यामुळें या युद्धांनीं हिंदुस्थानही कांहीं प्रमाणांत दरिद्री झाला. युद्ध म्हणजे जेत्यांना बक्षिसांच्या रकमांची पर्वणी हेंही ठरलेलें. याचें उदाहरण सिंधच्या बाबतींत आपण पाहिलेंच आहे. या आणि इतरही कारणांनीं हिंदुस्थानचें दारिद्य वाढत चाललेलें होतें. तरीसुद्धां ईस्ट इंडिया कंपनीकडे येथून सोन्याचांदीचा एवढा मोठा प्रवाह अजून चालूच होता, कीं कंपनी आपल्या भागीदारांना भला लठ्ठ नफा बांटीतच होती.

हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजसत्तेचे प्रारंभींचे दिवस म्हणजे व्यापारी लुटारूंचे दिवस होते हें मीं मागें तुला सांगितलेंच आहे. व्यापाराच्या जोरावर आणि मिषावर त्यांनीं हवी तशी नुसती लूटच चालविली होती. अशा रीतीनें ईस्ट इंडिया कंपनीनें आणि तिच्या येथील प्रतिनिधींनीं हिंदुस्थानांतील संचित संपत्तीपैकीं प्रचंड भाग धुऊन नेला. अर्थात् या बाबतींत मोबदला म्हणून हिंदुस्थानला जवळजवळ कांहींसुद्धां मिळालें नाहीं. सर्व-सामान्य व्यापार पाहिला तर त्यांत कांहीं तरी देवघेव असावी लागते ; परंतु अठराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें प्लासीच्या लढाईनंतर द्रव्याचा ओघ सगळा एकाच बाजूला वाहत गेला ; हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्यें. अशा रीतीनें हिंदुस्थानची फार प्रचंड प्राचीन संपत्ति हिरावून नेण्यांत आली आणि तिकडे एका मोठ्याच चैतन्यो-त्पादक फेरबदलाच्या वेळीं, औद्योगिक वाढीसाठीं, इंग्लंडला या संपत्तीचा फार मोठा उपयोग झाला. व्यापार आणि अगदीं नागवी लूटमार यांच्यावर आधारलेल्या ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील राजसत्तेचा हा पहिला खंड अठराव्या शतकाच्या अखेरीस संपला.

त्यानंतरचा दुसरा खंड सबंध एकोणिसाव्या शतकभर चालला. या काळांत हिंदुस्थानचा मुख्य उपयोग म्हणजे इंग्लंडच्या कारखान्याकरितां पाठवाव्या लागणाऱ्या कच्च्या मालाची खाण आणि ब्रिटिशांच्या पक्क्या मालाची बाजारपेठ अशा रीतीनें करण्यांत आला. अर्थात् असें करतांना हिंदुस्थानची प्रगति आणि आर्थिक वाढ यांची गळचेपीच करण्यांत आली. या शतकाच्या पूर्वार्धांत तर हिंदुस्थानांत राज्यच ईस्ट इंडिया कंपनीचें म्हणजे मुळांतच व्यापार करून पैसा मिळविण्यासाठीं स्थापन झालेल्या मंडळीचें होतें ; परंतु याही काळांत ब्रिटिश पार्लमेंट येथील कारभारांत थोडें थोडें जास्त जास्त लक्ष घालूं लागलेंच होतें. पुढें १८५७-'५८ सालीं बंड झाल्यानंतर ब्रिटिश सरकारनें प्रत्यक्ष सगळा राज्यकारभारच आपल्या हातीं घेतला, हें आपण मागच्या पत्रांत पाहिलेंच आहे. परंतु यामुळें राज्यकारभाराच्या मूलभूत धोरणामध्यें कांहीं मूलभूत महत्त्वाचा फरक घडला नाहीं. कारण ब्रिटिशांचें सरकार झालें, तरी ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार ज्यांच्या हातांत होता त्या वर्गाच्याच हातचें तें बाहुलें होतें.

इंग्लंडचे आर्थिक हितसंबंध आणि हिंदुस्थानचे आर्थिक हितसंबंध यांमध्यें उघडच विरोध होता ; परंतु या विरोधांत कोणतीही गोष्ट ठरावयाची ती अखेरीस इंग्लंडच्या हिताच्या दृष्टीनें ; कारण सत्ता पडली सगळीच इंग्लंडच्या हातांत ! इंग्लंडमध्यें औद्योगीकरण होण्याच्या पूर्वींच एका प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकारानें हिंदुस्थानां-तील ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्याचा परिणाम किती घातक होईल हें दाखवून दिलेलें होतें. हा ग्रंथकार म्हणजे अॅडाम स्मिथ. त्याला अर्थशास्त्राचा जनक म्हणून मानीत असतात. The Wealth of Nations 'राष्ट्रांची संपत्ति' या १७७६ च्या प्रारंभीं

प्रसिद्ध झालेल्या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथामध्यें ईस्ट इंडिया कंपनीला उद्देशून त्यानें लिहिलें आहे :

"कोणताही देश जरी घेतला तरी त्यामध्यें सुद्धां निव्वळ व्यापाऱ्यांच्या एका कंपनीच्या राज्याइतकें दुसरें कोणतेंही राज्य वाईट असूं शकणार नाहीं. राज्यकर्ते या दृष्टीनें पाहिलें तर ईस्ट इंडिया कंपनीचें हित आणि कर्तव्य कशांत आहे? तर यूरपमधून जो माल त्यांच्या हिंदी राज्यांत नेला जातो, तो त्यांच्या राज्यांत शक्य तितक्या कमी किंमतीला विकला जावा आणि हिंदुस्थानांतील जो माल इकडे बाहेरदेशांत पाठविला जातो त्या मालाला त्या बाहेरदेशांत अधिकांत अधिक किंमत परकीयांकडून मिळावी; परंतु व्यापारी दृष्टीनें पाहिलें म्हणजे मात्र ईस्ट इंडिया कंपनीचें हित याच्या अगदीं विरुद्ध प्रकारामध्यें आहे. राज्यकर्ते या दृष्टीनें पाहिलें म्हणजे ज्या देशावर त्यांचें राज्य आहे त्या देशाचें जें हित तेंच त्यांचेंहि हित; उलट, व्यापारी दृष्टीनें त्यांचें हित म्हणजे या देशाच्या हिताशीं अगदीं विरुद्ध असणार!"

ब्रिटिश लोक हिंदुस्थानमध्यें आले त्या सुमारास सरंजामशाही समाजव्यवस्था मोडकळीस आलेली होती, हें मीं तुला सांगितलें आहे. मोंगल साम्राज्याचा ऱ्हास झाल्यामुळें हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांमध्यें राजकीय अंदाधुंदी आणि बंडाळी माजलेली होती. असें असूनही रमेशचंद्र दत्त या हिंदी अर्थशास्त्रज्ञानें म्हटल्याप्रमाणें अठराव्या शतकांत हिंदुस्थान देश हा फार मोठा उद्योगधंदेवाला आणि फार मोठा शेतकीवाला देशही होता. माझ्या या पत्रांमध्यें हिंदुस्थानचें परदेशच्या बाजारपेठांवर कसें वर्चस्व होतें, हें पुष्कळदां मीं तुला दाखवून दिलेलें आहे. ईजिप्तच्या त्या चार हजार वर्षांपूर्वीच्या प्राचीन मर्मींच्यावर आच्छादनार्थ घातलेलें कापड सुद्धां हिंदुस्थानांतील तलम रेशमी मझलिनचें—मलमलीचें होतें. हिंदी कारागिरांचें कौशल्य पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे फार नाणावलेलें होतें. राजकीय दृष्ट्या हलाखीचे जरी दिवस आले, तरी हिंदी कारागीर कांहीं अजून आपल्या हातांतील कसबाला पारखे झालेले नव्हते. इंग्रज किंवा इतर जे परदेशचे व्यापारी या देशांत प्रथम व्यापारधंदा शोधण्यासाठीं म्हणून आले ते कांहीं आपल्याजवळचा कोठला माल या ठिकाणीं विकण्यासाठीं आलेले नव्हते. तर येथें तयार होणाऱ्या सुंदर आणि नाजुक वस्तू खरेदी करून त्या यूरपमध्यें नेऊन पुष्कळ नफा घेऊन विकणें हाच त्यांचा येथें येण्याचा उद्देश होता. तेव्हां या यूरपीय व्यापाऱ्यांची दृष्टि प्रथम जी इकडे वळली ती येथील कच्च्या मालाच्या मोहानें मुळींच नव्हे; तर हिंदुस्थानांतील पक्क्या मालाचें त्यांना आकर्षण वाटलें म्हणून. ईस्ट इंडिया कंपनी ही, हिंदुस्थानांत तिचें राज्य स्थापन होण्यापूर्वीं, हिंदुस्थानांत तयार झालेलें सुती, लोंकरीचें किंवा रेशमी कापड आणि जरीचा माल विकूनच मोठा फायदेशीर धंदा चालवीत होती. विशेष म्हणजे हिंदुस्थानमध्यें सूत, लोंकर आणि रेशीम यांचें कापड विणण्याच्या कलेंत आणि उद्योगांत फारच मोठा कसबीपणा साध्य करण्यांत आलेला होता. रमेशचंद्र दत्तांनीं म्हटलें आहे, "कापड विणणें हा या

देशांतील लोकांचा राष्ट्रीय उद्योग होता आणि सूत काढण्याचा उद्योग या देशांतील कोट्यवधि स्त्रिया करीत होत्या." हिंदी कापडमाल इंग्लंड आणि यूरपमधील देश, चीन, जपान, ब्रह्मदेश, अरबस्तान, इराण आणि आफ्रिकेंतील कांहीं भाग या सर्व ठिकाणीं जात असे.

स्वतः क्लाइव्हनें १७५७ सालीं बंगालमधील मुर्शिदाबाद या शहराचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे. "हें शहर विस्तार, लोकसंख्या आणि संपन्नता या बाबतींत लंडनच्या तोडीचें आहे. मात्र यांत फरक असा आहे, कीं या शहरांतील एकेका व्यक्ती-जवळ लंडनमधील एकेका व्यक्तीपेक्षां किती तरी प्रचंड प्रमाणावर अधिक संपत्ति आहे." याच वर्षीं प्लासीची लढाई जिंकून ब्रिटिश लोकांनीं बंगालमध्यें आपले पाय कायमचे रोवले. प्रत्यक्ष याही राजकीय पाडावाच्या वेळेला, बंगाल देश हरएक प्रकारच्या उद्योगधंद्यांनीं समृद्ध होता, व आपल्या प्रांतांतील सुंदर तलम कापडमाल जगांत निरनिराळ्या ठिकाणीं पाठवीत होता. डाक्क्याची तर तलम कापडासाठीं विशेषच प्रख्याति होती आणि तेथें या प्रकारच्या कापडाचा फारच प्रचंड निर्यात व्यापार चालू होता.

तात्पर्य, या काळच्या सुमारास हिंदुस्थान देश निव्वळ सर्वस्वीं शेतकीप्रधान आणि ग्रामीण जीवनप्रधान देश राहिलेला नसून त्यापुढें त्याची पुष्कळच प्रगति झालेली होती. अर्थात् हिंदुस्थान त्या वेळींही फार मोठ्या प्रमाणात आणि प्रामुख्यानें शेतकीप्रधान देश होता. आजही तो तसा आहे आणि यापुढेंही पुष्कळ काळपर्यंत तसाच राहणार आहे; परंतु शेतीप्रधान ग्रामीण जीवनाबरोबरच येथें शहरी अथवा नागरी जीवनाची वाढ या काळीं जरूर झालेली होती. या शहरांमध्यें फार दीर्घ काळपर्यंत कलावंत आणि कारागीर जमा झालेले असत आणि एक प्रकारें सांघिक उत्पादन या ठिकाणीं होत असे. म्हणजे काय, तर या शहरांतून ज्यामध्यें शंभर किंवा अधिकही कलावंत-कारागीर काम करीत अशा प्रकारचे कारखाने असत. अर्थात् यानंतरचें जें यंत्रयुग आलें त्या यंत्रयुगाच्या काळच्या प्रचंड कारखान्यांशीं कांहीं हिंदुस्थानांतल्या या कारखान्यांची तुलना करतां येणार नाहीं. परंतु औद्योगीकरणापूर्वी मात्र पश्चिम यूरपमध्यें, विशेषतः नेदरलंडमध्यें, अशा तऱ्हेचे पुष्कळसे कारखाने असत.

या सुमारास हिंदुस्थान एका अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत प्रवेश करण्याच्या अगदीं सीमेवर होतें. हिंदुस्थान हा कारखानदारीचा देश झालेलाच होता आणि येथील शहरांत धनिक मध्यमवर्ग, भांडवलदारवर्गही निर्माण होऊं लागला होता. या कारखान्यांचे हे मालक भांडवलदार असून ते या कारागिरांना कच्चा माल पुरवीत असत. कालांतरानें हाच भांडवलदारवर्ग वाढून यूरपमधल्याप्रमाणेंच सरंजामदारशाहीला दडपून टाकून त्यांच्या सत्तेचें स्थान बळकाविण्याइतका समर्थ झाला असता; पण नेमक्या याच क्षणाला ब्रिटिशांचा हात येथें शिरकला आणि या गोष्टीचा हिंदी उद्योगधंद्यावर अगदींच घातक परिणाम झाला.

सुरुवातीला ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदी उद्योगधंद्यांना उत्तेजन दिलें. कारण त्या-

पासून कंपनीचा फायदा होत होता. हिंदी माल परकी देशांत विकून या देशामध्यें कंपनीजवळ सोनें आणि चांदी जमा होत होती. इंग्लंडमधले जे कारखानदार होते त्यांना हिंदी मालाची ही स्पर्धा नको होती. म्हणून अठराव्या शतकाच्या प्रारंभींच आपल्या सरकारावर वजन आणून त्याच्याकडून इंग्लंडमध्यें हिंदुस्थानांतून येणारा जो माल त्यावर त्यांनीं कर बसविला. कांहीं कांहीं हिंदी मालाला तर इंग्लंडमध्यें जाऊं देण्यालाच बंदी करण्यांत आली आणि कांहीं कांहीं हिंदी वस्तू घराच्या बाहेर वापरणें हा गुन्हा ठरविण्यांत आला होता, अशी माझी समजूत आहे. या लोकांना आपला हा बहिष्कार कायद्याच्या साह्यानें अमलांत आणतां येत होता. आणि येथें हिंदुस्थानांत बहिष्काराचा नुसता शब्द काढला तरी माणसाची तुरुंगांत रवानगी होते. इंग्लंडनें जें हें हिंदी मालावर बहिष्कार घालण्याचें धोरण सुरू केलें तेवढ्यानें कांहीं मोठेंसें नुकसान झालें नसतें. कारण एक इंग्लंड नाहीं तरी दुसऱ्या पुष्कळ बाजारपेठा हिंदी मालाला मोकळ्या होत्या; परंतु ईस्ट इंडिया कंपनीच्या मार्फत इंग्लंडचा या वेळीं हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशावर अंमल चालू होता आणि इंग्लंडनें तर हिंदी उद्योगधंद्यांचा बळी देऊन इंग्लंडच्या उद्योगधंद्यांना पुढें लोटावयाचें असें धोरण जाणूनबुजून सुरू केलें होतें. इंग्लंडचा माल हिंदुस्थानामध्यें येई. त्यावर कांहींसुद्धां कर द्यावा लागत नसे. तसेंच हिंदुस्थानांतील कलावंतांचा व कारागिरांचा छळ करून त्यांना ईस्ट इंडिया कंपनीच्याच कारखान्यांत काम करावयास भाग पाडलें जाई. देशांतला अंतर्गत व्यापारसुद्धां, वाहतुकीवर कांहीं प्रकारचे कर बसवून, मोडकळीस आणला गेला. म्हणजे काय, तर देशांतल्या देशांत माल इकडून तिकडे न्यायचा झाला तरी त्यावर कांहीं कर द्यावा लागावयाचा.

तरी पण हिंदी कापड विणण्याचा धंदा इतका कसबी आणि कार्यक्षम झालेला होता, कीं नवीनच उदयास येणाऱ्या यांत्रिक कारखानदारीलासुद्धां या धंद्याला तोंड देणें शक्य होईना. यामुळें हिंदी कापडमालावर ८० टक्के कर लादून या यांत्रिक कारखान्यांना संरक्षण देणें भाग पडलें. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला हिंदुस्थानांतील कांहीं कांहीं प्रकारचें रेशमी आणि सुती कापड इंग्लंडमध्यें तशा प्रकारच्या स्थानिक तयार होणाऱ्या कापडा-पेक्षां पुष्कळच कमी किंमतीला विकतां येत असे. पण हिंदुस्थानमध्यें सत्ताधीश झाल्यानंतर हिंदी उद्योगधंदे बुडवून टाकण्याचेंच धोरण जेव्हां इंग्लंडनें स्वीकारलें, तेव्हां ही बरच्यासारखीच परिस्थिति फार दिवस टिकून राहणें शक्य नव्हतें. शिवाय कांहीं झालें तरी यांत्रिक उद्योगधंद्यांची जसजशी सुधारणा व वाढ होत गेली, तस-तशी त्यांच्याशीं स्पर्धा करणें हें हिंदुस्थानांतील घरगुती धंद्यांना फार काळपर्यंत कांहीं शक्य होणारच नव्हतें. कारण यांत्रिक उत्पादन हें मोठ्या प्रमाणावर माल निर्माण करण्याचें मोठें उत्कृष्ट साधन असून असा माल घरगुती धंद्यांपेक्षां पुष्कळच स्वस्त किंमतींतही तयार होतो. तरी पण हें जें कालांतरानें घडलेंच असतें, तें इंग्लंडनें जबरदस्तीनें लौकरच घडवून आणलें आणि कदाचित् बदलत्या परिस्थितीशीं अधिक

समरस होण्याचा जो हळूहळू प्रयत्न करतां आला असता, तो प्रयत्न करणें इंग्लंडनें हिंदुस्थानला अशक्य केलें.

अशा रीतीनें जो हिंदुस्थान देश शेंकडों वर्षेंपर्यंत पूर्वेकडील लँकेशायर म्हणून संबोधिला जावा अशा अवस्थेंत होता, अठराव्या शतकांत जो हिंदुस्थान कापडमाल फार मोठ्या प्रमाणांत यूरप खंडामध्यें पाठवीत होता, तोच हिंदुस्थान आतां कारखानदार देश म्हणून शिल्लक न राहतां ब्रिटिशांच्या पक्क्या मालाचें गिऱ्हाईक मात्र बनून गेला! इतिहासाचा क्रम सरळपणें चालत राहिला असता तर या देशांतही यंत्राचा उपक्रम झाला असता. तो अशा रीतीनें झाला नाहीं. उलट यंत्रावर तयार झालेला माल मात्र बाहेरून हिंदुस्थानांत येऊं लागला. पूर्वीचा प्रवाह असा होता कीं हिंदुस्थानातील माल इंग्लंड वगैरे परकीय देशांत जावयाचा आणि तेथून सोनें-चांदी हिंदुस्थानांत यावयाची; हा प्रवाह आतां अगदीं उलट्या क्रमानें वाहूं लागला. यापुढें आतां परकीय देशांतून पक्का माल हिंदुस्थानांत येऊं लागला आणि सोनें, चांदी येथून बाहेर देशांत जाऊं लागली.

या हल्ल्यामुळें हिंदुस्थानांतील कापड विणण्याचा धंदा सर्वांत आधीं कोलमडून पडला. इंग्लंडमध्यें यांत्रिक उद्योगधंदे जसजसे वाढत गेले, तसतशी हिंदुस्थानांतील इतर धंद्यांनींही कापडधंद्याचीच वाट धरली. सामान्यतः कोणत्याही देशाच्या सरकारचें कर्तव्य त्या देशाच्या उद्योगधंद्यांचें संरक्षण करणें आणि त्या उद्योगधंद्यांना उत्तेजन देणें हें आहे. पण या देशांतील धंद्यांना उत्तेजन किंवा संरक्षण देणें तर दूरच; पण उलट ब्रिटिश उद्योगधंद्याना अडचण उत्पन्न करील असा येथील प्रत्येक उद्योगधंदा पार उखडून टाकण्याचाच क्रम ईस्ट इंडिया कंपनीनें अमलांत आणला. यामुळें हिंदुस्थानांतील जहाजें बांधण्याचा धंदा बुडाला; धातूंच्या कारागिरांना काम चालविणें अशक्य झालें आणि कांच व कागद तयार करणाऱ्या कारखानदारांचा धंदाही हळूहळू विलयाला गेला.

पहिल्यापहिल्यांदां परकीय मालाचा प्रसार बंदरें आणि त्यांच्या आसपासचा प्रदेश एवढ्यांतच होत असे. पुढें रस्ते बांधण्यांत आले. आगगाडीचे रूळ टाकण्यांत आले. त्यामुळें परकीय मालाचा प्रसार अधिकाधिक लांबवर व अंतरावर होत चालला आणि हिंदी कारागिरांची खेडेगांवांतूनसुद्धां उचलबांगडी झाली. पुढें सुवेजचा कालवा खोदण्यांत आला आणि इंग्लंड-हिंदुस्थानमधील अंतर कमी झालें. त्यामुळें हिंदुस्थानांत इंग्लंडमधून माल आणण्यास पूर्वीपेक्षां कमी खर्च पडूं लागला. त्यामुळें यंत्रांवर तयार झालेला आणखीआणखीच पक्का माल येऊं लागून तो अगदीं आंतआंतल्या खेडेगांवांपर्यंतसुद्धां जाऊन पोहोंचूं लागला. सबंध एकोणिसाव्या शतकभर हा प्रकार चालू होता आणि आजसुद्धां कांहीं प्रमाणांत तो चालूच आहे. गेल्या कांहीं वर्षांमध्यें मात्र त्याला कोठें कोठें अटकाव होऊं लागला आहे; पण त्याबद्दल आपण पुढें बोलूं.

ब्रिटिश मालाच्या, विशेषतः कापडाच्या, या हळूहळू नकळत वाढत्या प्रसारामुळें हिंदुस्थानांतील हस्तव्यवसायांचें मरण ओढवलें. पण या गोष्टीची आणखी एक

याहूनही भयंकर बाजू होती. ती म्हणजे लाखों बेकार झालेल्या कारागिरांनीं आतां पुढें काय करावयाचें ? किती तरी विणकर आणि इतर कामगार यांना आतां काम उरलें नाहीं. त्यांचें पुढें काय होणार ? इंग्लंडमध्येंसुद्धां मोठाले कारखाने जेव्हां सुरू झाले, तेव्हां हस्तव्यवसायी कारागीर असेच बेकार पडले होते. त्यांचेही पुष्कळच हाल झाले; परंतु या नव्या नव्या कारखान्यांतून त्यांना काम मिळत गेलें आणि कालांतरानें या बदललेल्या परिस्थितीशीं ते समरस होऊन गेले. हिंदुस्थानांत असा कांहीं उपाय होण्याला सवडच नव्हती. येथें असे मोठे कारखानेच नव्हते, कीं ज्यांमध्यें या बेकार कारागिरांनीं ( कामकऱ्यांनीं ) जावें. ब्रिटिश लोकांची इच्छाच नव्हती, कीं हिंदुस्थाननें एक आधुनिक पद्धतीचें औद्योगिक राष्ट्र व्हावें. म्हणून येथें कारखाने उत्पन्न होण्याला त्यांनीं उत्तेजन दिलें नाहीं. त्यामुळें घर नाहीं, काम नाहीं, उपासमार होते, अशा या गरीब-बिचाऱ्या कारागिरांना एक शेत-जमिनीवांचून दुसरा आसराच राहिला नाहीं; पण जमीन झाली तरी त्यांना कशी आणि कोठून आसरा देणार ? आधींच जमिनीवर किती तरी जास्त लोक जगत होते आणि नवीन मंडळींना कसायला मिळावी अशी मोकळी जमीनच नव्हती. धंदा मोडून पडलेल्या कांहीं थोड्या कामगारांना अशी जमीन मिळून शेतमालक होण्याचें साधलें; पण बहुतेक सगळ्यांना जमीन वगैरे कांहीं नसलेले, नुसतें मजूर होऊन कोठें काम मिळतें का म्हणून पाहात हिंडावें लागलें. किती तरी लोकांना तर उपासमारीनें मरावेंच लागलें असलें पाहिजे. १८३४ मध्यें हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरलनें कंपनी-कडे अहवाल पाठवितांना कळविलें होतें म्हणतात, कीं उद्योगधंदा व व्यापार यांच्या इतिहासांत या लोकांच्या दैन्यावस्थेला, दुर्दशेला कोठेंच तोड सांपडणें दुरापास्त आहे. विणकर लोक इतके नाश पावले आहेत कीं, " हिंदुस्थानची काळीकुळकुळीत भूमि आजकाल विणकरांच्या हाडांमुळें पांढरीसफेत दिसूं लागली आहे."

हे सारे विणकर आणि इतर कारागीर बहुतेक मोठ्या गांवांतून किंवा शहरांमध्यें राहत असत. आतां त्यांचा धंदा गेला तेव्हां ते पुन्हां शेतीकडे आणि खेडेगांवांकडे परतले. त्यामुळें शहरांमधील लोकसंख्या रोडावली आणि खेडेगांवची लोकसंख्या वाढत गेली. याचाच अर्थ हिंदुस्थानच्या जीवनांतील नागरभाग कमी होऊन त्या-मधील ग्रामीणता वाढली. साऱ्या एकोणिसाव्या शतकभर ही ग्रामीणता वाढतच गेली आणि अजूनही तिची वाढ संपली आहे असें नव्हे. हिंदुस्थानच्या परिस्थितींतला हा या काळचा प्रकार म्हणजे खरोखरच एक चमत्कार आहे. सगळ्या जगामध्यें यांत्रिक उद्योगधंदे आणि औद्योगीकरण यांचा परिणाम म्हणजे खेडेगांवांतून लोक निघून शहरांत जमा होऊं लागले. हिंदुस्थानांत मात्र अगदीं याच्या उलट प्रवृत्ति उद्भवली. शहरें आणि मोठमोठीं नगरें लहान झालीं आणि मृत्युपंथाला लागलीं आणि रोज जास्त जास्त लोक शेतीवर अवलंबून राहिल्यामुळें अन्नालाही ते मोताद होत चालले.

मोठमोठे धंदे जसे बसले तसे त्यांच्यावर अवलंबून असणारे किंवा त्यांना पोषक

असे जे दुसरे पुष्कळसे दुय्यम धंदे तेही नाहींसे होत चालले. कापूस पिंजणें, रंगकाम, खडी काढणें हे धंदे कमी कमी होत गेले. हातसुताचा धंदा तर अजिबात बसला आणि लाखों घरांतून चरखा नाहींसा झाला. याचा अर्थ असा, कीं शेतकीच्या भरीला थोडें उत्पन्न मिळण्याचें जें शेतकऱ्याला साधन असे तें त्याचें नाहींसें झालें. कारण घरांतील मंडळी सूत काढून शेतकऱ्याच्या शेतीच्या उत्पन्नात बरीच भर टाकूं शकत असत. यंत्रांचा उदय झाला तेव्हां हा सगळा प्रकार पश्चिम यूरपमध्येंही अगदीं असाच घडला होता; परंतु तेथें हा जो समाजपरंपरेंत फरक झाला तो स्वाभाविक क्रमानें घडून आलेला होता आणि एकीकडे एक आर्थिक रचना मरून पडली, तर तिची जागा घेण्यासाठीं दुसरी रचना तेथें तयार होती. हिंदुस्थानांत हा फेरबदल जबरदस्तीनें घडवून आणला गेला. जुनी घरगुती कारखानदारीची पद्धति मारून टाकण्यांत आली, पण तिच्या जागीं दुसरी पद्धति जन्माला आली नाहीं; नव्हे, ब्रिटिश उद्योगधंद्यांच्या हितासाठीं ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं अशा पद्धतीचा जन्मच येथें होऊं दिला नाहीं.

ब्रिटिशांच्या हातीं या देशांतील राज्यसत्ता आली, त्या वेळीं हिंदुस्थान हा एक भरभराटीस आलेला कारखानदार देश होता, हें आपण पाहिलेंच आहे. सरळ क्रमाप्रमाणें पाहतां याच्या पुढची पायरी म्हणजे या देशाचें औद्योगीकरण करावयाचें आणि तेथें मोठ्या यंत्रांचा उपयोग सुरू करावयाचा; परंतु ब्रिटिशांच्या धोरणामुळें हिंदुस्थानला अशा रीतीनें पुढें जाण्याऐवजीं मागेंच यावें लागलें. पूर्वी हा देश थोडाफार कारखानदारी स्वरूपाचा होता, तें त्याचें स्वरूपसुद्धां नाहींसें झालें आणि पूर्वीपेक्षांही पुष्कळ अधिक प्रमाणांत हा देश शेतीप्रधान होऊन गेला.

या रीतीनें गरीब बिचाऱ्या शेतीवर या इतक्या थोरल्या कारागिराच्या आणि इतराच्या बेकार समूहांना पोसण्याचा प्रसंग आला. त्यामुळें जमिनीवरील भार फार वाढला आणि एकसारखा तो वाढताच राहिला. हिंदुस्थानच्या दारिद्र्याच्या प्रश्नाच्या मुळाशीं आणि पायाशीं ही मुख्य गोष्ट आहे. ब्रिटिशांच्या या धोरणापासून आमचीं सगळीं दुःखें निर्माण झालेलीं आहेत आणि हा मूलभूत प्रश्न जोंपर्यंत सोडविलेला नाहीं, तोंपर्यंत हिंदी शेतकरी आणि खेड्यांतील जनता यांचें दारिद्र्य आणि हाल-अपेष्टा यांचा निरास होणें शक्य नाहीं.

शेतीशिवाय ज्यांना उद्योगच उरला नाहीं अशांची संख्या वाजवीपेक्षां अधिक झाली आणि मग हे लोक जमिनीचे वाटणीच्या रूपानें अगदीं लहान लहान तुकडे करून त्यांना चिकटून कसाबसा जीव धरून राहण्याचा प्रयत्न करूं लागले. आणखी नवीन जमीन तर कांहीं कोठून मिळण्याची सोयच नव्हती; परंतु प्रत्येक कुटुंबाच्या वांटणीला जी थोडीशी जमीन यावयाची तिच्यांत तर शेतकऱ्यांच्या कुटुंबाचा धड निर्वाह होणेंही अशक्य असावयाचें. अगदीं उत्तम पीक आलें असलें तरीही उपासमार किंवा अर्धवट उपासमार त्यांच्यापुढें नेहमीं उभी असायचीच आणि पुष्कळदां असें उत्तम पीक येण्याऐवजीं मध्यम पिकाचा किंवा नापिकाचाच काळ असावयाचा. कारण

शेत पिकणें न पिकणें हें निव्वळ अनुमान, निसर्गाची लहर आणि पाऊसकाळ यांवर अवलंबून असावयाचें. याचा परिणाम म्हणजे मोठमोठे दुष्काळ पडूं लागले. भयंकर सांथीचे रोग पसरले आणि त्यांत लक्षावधि लोक मरण पावले. शेतकऱ्यानें गांवचा सावकार जो वाणी त्याच्याकडे जावें, उपजीविकेसाठीं कर्ज काढावें आणि तें कर्ज वाढत वाढत इतकें मोठें व्हावें, कीं तें परत करण्याची सगळी शक्यता आणि आशाही नष्ट व्हावी आणि शेतकऱ्याला जीवसुद्धां नकोसा व्हावा, अशी स्थिति निर्माण झाली. ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील एकोणिसाव्या शतकांतील शंभर वर्षांच्या राज्यानंतर हिंदुस्थानांतील रहिवाशांपैकीं फारच मोठ्या संख्येची ही अशी दशा होऊन गेली.

## १११

## हिंदुस्थानांतील खेडीं, शेतकरी आणि जमीनदार

*२ डिसेंबर, १९३२*

गेल्या पत्रांत मीं तुला ब्रिटिशांच्या धोरणामुळें हिंदुस्थानांतले घरगुती उद्योगधंदे कसे मरण पावले आणि कारागीर लोकांवर शेती आणि खेडेगाव यांचा आश्रय घेण्याची पाळी कशी आली हें सांगितलें. त्यांना दुसरा कांहीं धंदा न उरल्यामुळें शेतजमिनीवर वाजवीहून अधिक संख्येचें ओझें निर्माण झालेलें आहे व हिंदुस्थानचा आजचा खरा मोठा प्रश्न हा आहे हेंही मीं दाखवून दिलें. या गोष्टीमुळेंच मुख्यतः हिंदुस्थान देश दरिद्री झालेला आहे. या अधिक लोकांना जर जमिनीवरून काढून घेतां आलें आणि त्यांना जर इतर द्रव्योत्पादनाचे धंदे देतां आले, तर त्यामुळें हे लोक एक तर देशाच्या संपत्तींत भर घालतील आणि शिवाय त्यामुळें शेतजमिनीवरील गैरवाजवी ओझें कमी होऊन शेतीची भरभराट होईल.

पुष्कळदां असें सांगितलें जातें, कीं शेतीवर जें हें अधिक संख्येचें ओझें वाढलेलें आहे त्याचें कारण हिंदुस्थानची वाढती लोकसंख्या हें असून ब्रिटिशांचें धोरण हें कांहीं तसें विशेष याचें कारण नाहीं; परंतु हा मुद्दा बरोबर नाहीं. गेल्या शंभर वर्षांत हिंदुस्थानची लोकसंख्या वाढली आहे हें खरें आहे; पण इतर देशांमध्येंही अशाच लोकसंख्या वाढल्या आहेत. खरें पाहिलें तर लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण यूरप खंडात, विशेषतः इंग्लंड, बेल्जम, हॉलंड आणि जर्मनी या देशांमध्यें, किती तरी पटींनें अधिक आहे. कोणताही एखादा देश किंवा सारें जग यांमधील लोकसंख्येची होणारी वाढ व या वाढीच्या गरजा भागवावयाच्या कशा, जरूर पडल्यास या लोकसंख्येची वाढ कमी करावयाची कशी हा एकंदर प्रश्न फारच महत्त्वाचा आहे. तरीसुद्धां मला ही गोष्ट स्पष्ट करून सांगावयाची आहे, कीं हिंदुस्थानांत जमिनीवर जें अधिक लोकांचें

ओझें पडलें आहे, त्याचें कारण या लोकांना दुसरे उद्योगधंदे नाहींत हें आहे, वाढलेली लोकसंख्या हें नाहीं. हिंदुस्थानची लोकसंख्या सध्यां जी आहे ती हिंदुस्थानच्या मानानें अधिक मुळींच नाहीं आणि शेतीशिवाय इतर धंदे आणि कारखाने या ठिकाणीं काढतां आले, तर एवढी संख्या या देशांत सहज राहून चांगले दिवस उपभोगूं शकेल. मग पुष्कळ कालानंतर कदाचित् आम्हांला या लोकसंख्येच्या वाढीचाही प्रश्न हातांत घ्यावा लागेल.

आतां आपण ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील धोरणाचा आणखी कांहीं अंगानीं विचार करूं. प्रथम आपण खेडेगावांत जाऊन पाहूं या.

हिंदुस्थानांतील ग्रामपंचायतींसंबंधीं आणि बाहेरचे हल्ले झाले, स्वाऱ्या झाल्या, राजसत्ता पालटल्या तरीही पंचायतीची पद्धति कशी टिकून राहिली, यासंबंधीं मी तुला वारंवार सांगत आलों आहें. अगदीं अलीकडे, १८३० मध्यें हिंदुस्थानांतील एक ब्रिटिश गव्हर्नर सर चार्लस मेटकाफ यानें या ग्रामसंघांचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे :

" या ग्रामपंचायती किंवा गांवगंगा म्हणजे छोटीं छोटीं प्रजासत्ताक राज्यें आहेत. त्यांना हव्या असणाऱ्या सर्व वस्तू जवळजवळ त्यांना आपल्याच पंचायतीच्या हद्दींत मिळूं शकतात. बाहेरच्या जगाशीं जवळजवळ त्यांना कांहीं संबंध ठेवावा लागत नाहीं. इतर आणखी कशाचाही नाश झाला, तरी यांचा मात्र कधींच नाश होत नाहीं असें दिसतें. अशा रीतीनें ग्रामीण जमातींचें हें एकीकरण, प्रत्येक गांवाचें मिळून होणारें एक प्रकारचें हें छोटेंसें प्रजासत्ताक राज्य हें त्यांना फारच मोठें सुखावह होतें. त्यामुळें त्यांना स्वराज्य आणि स्वतंत्रता यांचा फार मोठ्या प्रमाणांत लाभ होतो."

हें वर्णन आपल्या जुन्या काळच्या ग्रामपद्धतीची फारच स्तुति करणारें आहे. त्यामध्यें एक प्रकारच्या मोठ्याच स्वर्गीय लोकस्थितीचें चित्र रेखाटलें आहे. या खेडेगांवांमध्यें या लोकांना जें पुष्कळसें स्थानिक स्वराज्य आणि व्यक्तिस्वातंत्र्य उपभोगावयाला मिळत होतें, तें निःसंशय त्यांना सुखकारकच होतें. याशिवाय या पद्धतींत आणखीही कांहीं हितावह गोष्टी होत्या. तथापि या पद्धतींत काहीं दोष, अहितकारक गोष्टीही होत्या. त्यांच्याकडे आपण डोळेझांक करून चालणार नाहीं. साऱ्या जगापासून पार संबंध तोडून टाकून एकेका खेडेगांवानें आपापल्यापुरतें स्वयंपूर्ण असें जीवन आंखून राहावयाचें, अशी ही पद्धति कोणत्याच बाबतींत प्रगतीला अनकूल नव्हती. वाढ आणि प्रगति यांचें मूळ नेहमीं अधिकाधिक मोठ्या अशा मनुष्यसमाजाचें परस्पर सहकार्य होत जाण्यांत असतें. जों जों कोणी एक व्यक्ति किंवा एक गट अगर समाज आपापल्यापुरताच पाहून राहूं लागतो, तों तों तो आत्मनिष्ठ, स्वार्थी आणि संकुचित बुद्धीचा होत जाण्याचा अधिकाधिक धोका असतो. खेडेगांवचीं माणसें हीं शहरांतील माणसांशीं तुलना करतां बहुशः अधिक संकुचित बुद्धीचीं आणि अंधश्रद्धाळू आढळून येतात. त्यामुळें आमच्या या ग्रामीण जनसंघामध्यें

चांगल्या गोष्टी पुष्कळच होत्या हें जरी खरें आहे, तरीपण त्यांच्या ठिकाणीं प्रगतीचें मूळ रुजूं शकण्यासारखें नव्हतें. हीं खेडीं व त्यांतील समाज त्या मानानें फारच प्राथमिक अवस्थेंत आणि मागासलेल्या स्थितींत होता. हस्तव्यवसाय आणि कारखाने हे सुद्धां त्यांच्या ऐवजीं मुख्यतः शहरांतच भरभराटीस आले होते. एक गोष्ट मात्र खरी, कीं विणकरांची फार मोठी संख्या तेवढी खेड्यापाड्यांतून विखुरलेली होती.

हे ग्रामीण जनसंघ एकमेकांशीं फारसा संबंध न येतां आपापल्यापुरतेंच स्वयंपूर्ण जीवन चालवीत असत. याचें खरें कारण म्हणजे दळणवळणाच्या साधनांचा अभाव होता हें होय. खेडेगांवांना जोडणारे असे चांगले रस्ते देशांत फारच थोडे होते. खरें म्हटलें म्हणजे असे हे चांगले रस्ते फारच थोडे होते याचमुळें मध्यवर्ती राज्यसत्तेला खेडेगांवांच्या कारभारामध्यें पुष्कळसा हात घालतां येणें कठिण पडे. जीं शहरें आणि खेडीं मोठमोठ्या नद्यांच्या कांठीं किंवा आसपास असत, त्यांचें मात्र होड्यांच्या किंवा जहाजांच्या साहाय्यानें एकमेकांशीं दळणवळण चालू शके; परंतु अशा प्रकारचा ज्यांचा उपयोग होईल अशा नद्याही फारशा नव्हत्या. ही जी वाहतुकीच्या सुलभतेची अडचण तिच्यामुळें अंतर्गत व्यापारालासुद्धां अटकाव होत असे.

ईस्ट इंडिया कंपनीचा किती वर्षेंपर्यंत एकच एक उद्देश या देशामध्यें होता. मिळेल तेवढा खूप पैसा मिळवावयाचा आणि आपल्या भागीदारांना नफा वांटावयाचा. त्यांनीं रस्ते बांधण्याकडे फारच थोडा खर्च केला आणि सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य, शिक्षण किंवा रुग्णालयें या किंवा अशा कार्यांवर तर मुळींच खर्च केला नाहीं; परंतु पुढें ब्रिटिशांचें धोरण बदलून ते या देशांतून कच्चा माल खरेदी करण्यावर आणि आपला पक्का माल या देशांत विकण्यावर जेव्हां आपलें सगळें लक्ष पुरवूं लागले, तेव्हां मात्र त्यांनीं दळणवळणाच्या साधनांच्या बाबतींत निराळें धोरण अमलांत आणलें. या परदेशीय व्यापाराच्या व्यवस्थेसाठीं हिंदुस्थानच्या समुद्रकिनाऱ्यावर आतां मोठीं शहरें उभीं राहिलीं. मुंबई, कलकत्ता, मद्रास आणि नंतर पुढच्या काळांत कराची यांसारखीं हीं मोठीं शहरें कापूस वगैरे कच्चा माल सगळा आपल्या तेथें जमा करीत आणि तेथून परदेशीं पाठवीत; परदेशांतून—विशेषतः इंग्लंडमधून—यंत्रांवर तयार झालेला मालही याच शहरांमध्यें येई आणि तेथून हिंदुस्थानांत सगळीकडे तो विक्री-साठीं जाई. याच सुमारास पश्चिमेकडे लिव्हरपूल, मँचेस्टर, बर्मिंगहॅम्, शेफील्ड यांसारखीं जीं शहरें मोठ्या प्रमाणांत वाढत होतीं, त्या शहरांत आणि हिंदुस्थानामधील या शहरांत फारच फरक होता. यूरपांतील शहरें कारखानदारी उत्पादनाचीं केंद्रें होतीं. तेथें यंत्रावर तयार होणाऱ्या मालाच्या मोठमोठ्या गिरण्याही होत्या आणि माल परदेशीं पाठविण्याचें कामही हीं शहरें करीत. हिंदुस्थानांतील या नव्या शहरांत मालाचें उत्पादन कांहींच होत नसे. हीं शहरें म्हणजे परदेशी मालाच्या नुसत्या वखारी होत्या. परदेशी सत्तेचे हे जणुं खुणेचे दगडच होते.

मीं तुला याच्या आधीं काय सांगितलें, कीं ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील धोरणा-

मुळें हिंदुस्थानांतील ग्रामीण जीवन जास्त वाढत गेलें आणि जास्त जास्त लोक शहरें सोडून खेडेगांवांत जाऊन शेतीचा आश्रय करूं लागले. असें असून सुद्धां आणि हा जो प्रवाह सुरू झाला होता त्यामध्यें कांहीं खंडही न पडतांच, समुद्रकांठीं हिंदुस्थानामध्यें हीं नवीं शहरें उदयास आलीं. या शहरांमुळें धक्का कोणास बसला असेल तर तो जीं छोटींमोठीं शहरें आणि नगरें हिंदुस्थानांत होतीं त्यांना. खेडेगांवांना मुळींच नव्हे. खेडेगांवांची वाढ होण्याची सर्वसामान्य क्रिया जी सुरू झाली होती, ती तशीच चालू राहिली.

कच्चा माल या शहरांत जमा करावयाचा आणि पक्का माल येथून आंतमध्यें पाठवावयाचा या कामासाठीं या शहरांचें देशांच्या आंतल्या भागांशीं दळणवळण सुरू करणें ही गोष्ट आतां जरुरीची झाली. याशिवाय आणखीही कांहीं शहरें प्रांतोप्रांतींच्या राजधान्या म्हणून किंवा राज्यकारभाराच्या सोयीसाठीं म्हणून निर्माण झालेलीं होतीं. त्यामुळें दळणवळणाच्या चांगल्या साधनांची गरज व निकड वाढत्याच प्रमाणावर होती. त्यामुळें साधे रस्ते आणि आगगाडीचे रस्ते बांधण्यास सुरुवात झाली. पहिला आगगाडीचा रस्ता मुंबई प्रांतांत १८५३ मध्यें बांधण्यांत आला.

हिंदी उद्योगधंद्यांचा नाश झाल्यामुळें परिस्थितींत जो फेरबदल होत होता, त्याच्याशीं आपली घडी जुळवून घेणें ही गोष्ट या जुन्या ग्रामव्यवस्थेला फारच कठिण गेली; परंतु जास्त जास्त चांगले रस्ते आणि आगगाडीचे मार्ग यांचा उदय होऊन ते जेव्हां साऱ्या देशभर पसरले, तेव्हां तर इतका काळपर्यंत जीव धरून बसलेल्या या ग्रामव्यवस्थेला जगून राहणेंही अशक्य झालें. शेवटीं ती मोडून पडली आणि नष्टच झाली. जगच जेव्हां दाराशीं येऊन ठोठावूं लागलें तेव्हां या छोटेखानी प्रजासत्ताक राज्यांना जगापासून स्वतःला कोंडून घेऊन राहणें हें अशक्यच झालें. आतां एका खेडेगांवांतील पदार्थांच्या किंमतीचा दुसऱ्या खेडेगांवांतील पदार्थांच्या किंमतीवर ताबडतोब परिणाम होऊं लागला. कारण एका खेडेगांवांतून पदार्थ दुसऱ्या खेडेगांवाला सहज पाठवितां येणें सुलभ झालें. हें कशाला? जगामधलीं दळणवळणाचीं साधनें जशीं वाढत गेलीं, तसतसा आतां कॅनडांतील अथवा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांमधील गव्हाच्या किंमतीचा सुद्धां हिंदुस्थानांतील गव्हाच्या किंमतीवर परिणाम होऊं लागला आहे. अशा रीतीनें परिस्थितीच्या दडपणामुळें आमची हिंदी ग्रामव्यवस्था जागतिक किंमतीच्या चक्रामध्यें ओढली गेली. त्यामुळें खेडेगांवांतील ती जुनी आर्थिक रचना पार कोलमडून पडली आणि बिचाऱ्या शेतकऱ्याला आपल्यावर एक नवीनच प्रकारची आर्थिक व्यवस्था लादली गेलेली पाहून आश्चर्यानें गोंधळून गेल्यासारखें झालें. आजपर्यंत तो खाद्यपदार्थ आणि इतर वस्तू निर्माण करीत असे, त्या केवळ आपल्या खेडेगांवच्या बाजारापुरत्या. त्याऐवजीं तो आतां जगाच्या बाजारासाठीं वस्तू निर्माण करूं लागला. जागतिक उत्पादन आणि जागतिक किंमती यांच्या दादळ्याच्या सोसाट्यांत सांपडून बिचारा हिंदी शेतकरी जास्त जास्तच खालीं

जात चालला. याच्या पूर्वी सुद्धां पीक बुडालें म्हणजे हिंदुस्थानांतही दुष्काळ पडत असत. लोकांजवळ अशा वेळीं उपयोगी पडेल असा सांठा नसे आणि देशाच्या इतर भागांतून खाद्यपदार्थ मागविण्यासारखीं सोयीचीं साधनें नसत. अशा रीतीनें अन्नाचे दुष्काळ यापूर्वी या देशांत पडत असत; पण आतां एक प्रकार घडून आला तो मात्र मोठा विलक्षण! पिकाचा सुकाळ असतांना, खाद्यपदार्थ मिळण्याची सोय असतांना, लोकांची आतां या देशांत उपासमार होऊं लागली! केव्हां केव्हां एखाद्या ठिकाणीं धान्य कमी पडलें तरी दुसरीकडून तें आगगाडीनें किंवा अशाच जलद वाहनांच्या साहाय्यानें आणणें आतां शक्य झालेलें होतें. अशा स्थितींत आतां अन्नाचा तुटवडा नव्हता, तर तें विकत घेण्याला पैशाचा तुटवडा पडूं लागला होता. तेव्हां आतां देशामध्यें अन्नाचे नव्हेत, तर पैशाचे दुष्काळ पडूं लागले आणि याहूनही विशेष आश्चर्याची गोष्ट ही, कीं पीक अतिशय बहारीचें येऊनही शेतकरीवर्गाच्या वांट्याला उलट त्याच्यामुळें हालअपेष्टाच आल्या; हा प्रकार कसा झाला हें आपण गेल्या तीन वर्षांच्या मंदीमध्यें पाहत आलोंच आहों.

तात्पर्य, जुनी ग्रामव्यवस्था मोडून पडली आणि पंचायतीची पद्धत नाहींशी झाली त्याबद्दल आपल्याला कांहीं फारसें वाईट वाटून घेण्याचें कारण नाहीं. कारण, नाहीं तरी ही पद्धत आतां जुनाट झालेली असून आधुनिक काळच्या स्थितीशीं ती मुळींच जुळण्यासारखी नव्हती; परंतु ह्याही ठिकाणीं पुन्हां असाच प्रकार घडला, कीं जुनी ग्रामव्यवस्था मोडून पडली; परंतु त्या ठिकाणीं आधुनिक परिस्थितीशीं जुळती अशी नवीन ग्रामव्यवस्था कांहीं जन्माला आली नाहीं. अशी नवीन ग्रामव्यवस्था निर्माण करून तिची जोपासना करण्याचें काम आतां आपल्याला करावयाचें आहे.

आतांपर्यंत ब्रिटिशांच्या हिंदुस्थानांतील धोरणाचे शेतजमिनीवर आणि शेतकऱ्यावर अप्रत्यक्षपणें काय काय परिणाम झाले याचा आपण विचार केला. आतां ईस्ट इंडिया कंपनीचें प्रत्यक्ष धोरण काय होतें, म्हणजे शेतकरी आणि शेतजमिनीशीं संबंध येणारे सर्व लोक यांच्या बाबतींत कंपनी प्रत्यक्ष काय काय गोष्टी करीत होती, हें आपण पाहूं या. हें प्रकरण फारच गुंतागुंतीचें आहे आणि कदाचित् मला वाटतें तें कंटाळवाणेंही होईल; परंतु आपल्या देशांत या शेतकाम करणारांचीच बहुतेक सगळी वसति आहे. तेव्हां त्यांचीं दुःखें कोणतीं आहेत, त्यांची सेवा आपल्याला कशा प्रकारें करतां येईल आणि त्यांची परिस्थिति कशी सुधारतां येईल, या गोष्टी समजून घेण्याचा थोडाफार प्रयत्न आपण केला पाहिजे.

जमीनदार आणि तालुकदार व त्यांचीं कुळें हे शब्द आपल्या नेहमीं कानांवर येतात. या कुळांमध्येंही पुष्कळ प्रकार आहेत. कांहीं कांहीं लोक पोटकुळें म्हणजे कुळांचीं कुळें असतात. या सगळ्या तपशिलाच्या गोंधळांत मी तुला नेणार नाहीं. सामान्य दृष्टीनें, स्थूल मानानें पाहिल्यास आजचे हे जमीनदार म्हणजे मध्यस्थ किंवा दलाल आहेत; म्हणजे काय तर प्रत्यक्ष जमीन कसणारा आणि सरकार यांच्यामधला ते एक दुवा

आहेत. शेत जो कसतो तो या जमीनदारांचें कूळ म्हटला जातो. तो जी जमीन कसतो ती जमीनदाराच्या मालकीची समजली जाते; त्या जमिनीचा उपयोग केल्याबद्दल कर किंवा भाडें म्हणून तो जमीनदाराला खंड देतो. या खंडामधून जमीनदार कांहीं भाग आपल्या जमिनीवरील कर म्हणून सरकारला देतो. अशा रीतीनें शेतांत होणाऱ्या उत्पन्नाचे तीन विभाग पडतात. एक भाग जमीनदाराला जातो, एक भाग सरकारला जातो आणि राहिलेला तिसरा जमीन कसणाऱ्या कुळाला मिळतो. पण हे विभाग सारख्या किंमतीचे असतात असें मात्र समजूं नकोस हो. शेतामध्यें काम करीत असतो शेतकरी. त्याच्या श्रमामुळें नांगरट, पेरणी आणि दहावीस आणखी प्रकार तो करीत राहतो. त्यामुळें जमिनींत जें काय पिकायचें तें पिकतें. आपल्या या श्रमांचें फळ शेतकऱ्याला मिळावें हेंच खरोखर रास्त आहे. सरकारला सर्व समाजाचा प्रतिनिधि या नात्यानें सर्व प्रजेच्या हितार्थ पुष्कळच महत्त्वाचीं कामें करावयाचीं असतात; उदाहरणार्थ, देशांतील सर्व मुलांना शिक्षण देणें, चांगले रस्ते बांधणें आणि इतरही वाहतुकीचीं चांगलीं साधनें निर्माण करणें, रुग्णालयें आणि आरोग्यवर्धक संस्था चालविणें, पदार्थसंग्रहालयें, विश्रांतिस्थानें यांची व्यवस्था करणें, या आणि इतर आणखी किती तरी गोष्टी करणें, हें सरकारचें कर्तव्य असतें. यासाठीं सरकारला पैशांची आवश्यकता असते. तेव्हां जमिनींतील उत्पन्नापैकीं कांहीं हिस्सा सरकारला द्यावा हेंही रास्त आहे. आतां हा भाग किती असावा हा अगदीं निराळा प्रश्न आहे. शेतकरी सरकारला जें कांहीं देतो तें रस्ते, शिक्षण, आरोग्यसंपादन वगैरे निरनिराळ्या कार्यांच्या स्वरूपांत त्याला परत मिळत असतें, किंवा मिळालेंच पाहिजे असें म्हणा. सध्यांच्या काळीं हिंदुस्थानांत अस्तित्वांत असलेलें सरकार हें परकीय लोकांच्या हातांतील सरकार आहे. तेव्हां त्याच्याबद्दल आपल्याला तिटकारा वाटतो हें ठीक आहे; परंतु स्वतंत्र आणि चांगल्या रीतीनें संघटित अशा देशांत लोक आणि सरकार हीं कांहीं कोणी निरनिराळीं नसतात; तेथें लोकांचाच राज्यकारभार असतो.

अशा रीतीनें शेतजमिनींतील उत्पन्नापैकीं दोन भागांची ही व्यवस्था आपण लाविली. एक भाग शेतकऱ्याला आणि एक भाग सरकारला; पण आणखी एक तिसरा हिस्सा यांत पडतो आणि तो जमीनदाराच्या किंवा मध्यस्थ दलालाच्या वांट्याला जातो हें आपण पाहिलेंच आहे. त्याला तो मिळावा किंवा तो मिळण्याला त्याची पात्रता आहे असें आपण मानावें, यासाठीं हा जमीनदार काय करीत असतो? कांहीं नाहीं; जवळजवळ कांहीं सुद्धां नाहीं. शेतांतील उत्पन्न काढण्याच्या कामामध्यें कांहींसुद्धां श्रम न करतां हा गृहस्थ आपला उगीचच्या उगीच उत्पन्नापैकीं भला मोठा हिस्सा खंड म्हणून घेत असतो. म्हणजे अशा रीतीनें गाडीला एक पांचवें चाक असावें ना, तशी त्याची अवस्था होते. खरोखर उपयोग असा कांहीं नाहींच; पण उलट अडगळ मात्र जास्त. जमिनीवर एक निष्कारण बोजा. अर्थात् या अनावश्यक बोजापासून कोणाला सगळ्यांत अधिक नुकसान सोसावें लागत असेल तर तें

शेतकऱ्यालाच ! कारण त्याला आपल्या मिळकतींतला हिस्सा काढून या जमीनदाराला द्यावा लागत असतो. यामुळेंच पुष्कळ लोकांचें असें मत आहे, कीं हा जमीनदार किंवा तालुकदार मध्यस्थ, दलाल या दृष्टीनें आम्हांला मुळींच नको ; ही जमीनदारी पद्धतीच वाईट आहे आणि ती बदलून हा मध्यस्थ–दलाल–नाहींसा होईल अशी व्यवस्था केली पाहिजे. सध्यां हिंदुस्थानामध्यें ही जमीनदारी मुख्यतः बंगाल, बिहार आणि संयुक्त-प्रांत या तीन प्रांतांत आहे.

बाकीच्या प्रांतांत सामान्यतः शेतमालकच आपली जमीन कसतात आणि सरकारलाच थेट स्वतः शेतावरील कर भरतात ; त्या ठिकाणीं असा मध्यस्थ, दलाल नाहीं. कोठें कोठें या लोकांना शेतमालक, किसान असें म्हणतात ; तर कोठें कोठें, उदाहरणार्थ, पंजाबमध्यें, त्यांना जमीनदार म्हणतात ; पण हे जमीनदार बंगाल, बिहार आणि संयुक्त प्रांत यांमधील जमीनदारांपेक्षां फार निराळे.

एवढा हा भला लांबलचक खुलासा केल्यानंतर आतां मी तुला सांगणार आहें, कीं आज जी ही जमीनदारी पद्धति बंगाल, बिहार आणि संयुक्त प्रांत यांमध्यें जोरांत चालू आहे आणि जिच्याबद्दल नेहमीं पुष्कळ वाद चाललेले आपण पाहतों, ती पद्धति हिंदुस्थानला अगदींच नवी आहे. ही ब्रिटिशांनीं उत्पन्न केलेली पद्धति आहे. ते लोक इकडे येण्यापूर्वीं आपल्या देशांत ही पद्धति अस्तित्वांत नव्हती.

जुन्या काळीं–प्राचीन काळीं–असे हे जमीनदार किंवा जमीनमालक अथवा मध्यस्थ दलाल मुळींच नव्हते. शेत कसणारे लोक जमिनीच्या उत्पन्नापैकीं कांहीं भाग थेट सरकारलाच देत असत. कधीं कधीं ग्रामपंचायत शेतकऱ्याच्या तर्फे अथवा गांवच्या तर्फे हें काम करीत असे. अकबराच्या वेळीं त्याचा सुप्रसिद्ध अर्थसचिव राजा तोडरमल्ल यानें सगळ्या शेतजमिनींची मोठ्या काळजीपूर्वक पाहणी करविली. राज्यकर्त्यांना म्हणजेच सरकारला शेतीच्या उत्पन्नापैकीं तिसरा हिस्सा शेत कसणाराकडून मिळे. ज्याला इच्छा असेल त्याला प्रत्यक्ष माल देण्याऐवजीं त्याची किंमतही सरकारांत देतां येत असे. करांचें एकंदर प्रमाण अवजड नव्हतें. त्यांच्यांत वाढ जी व्हावयाची तीही अतिशयच सावकाश करण्यांत येई. असा हा प्रकार चालू असतांनाच मोंगल साम्राज्याचा डोलारा कोसळला. मध्यवर्ती सत्ता दुबळी झाली आणि तिला कर नीटपणें वसूल करणें अशक्य झालें. अशा वेळीं कर वसूल करण्याची नवीनच एक पद्धति निर्माण झाली. आतां जे कर वसूल करणारे नेमण्यांत आले त्यांना पगार देण्याचें बंद करून त्यांना गुमास्ते बनविण्यांत आलें. त्यांनीं कर वसूल करून द्यावा आणि त्या कामासाठीं त्यांनीं वसूल झालेल्या कराच्या रकमांतून एकदशांश हिस्सा वटाव म्हणून कापून घ्यावा अशी पद्धति सुरू झाली. त्यांना शेतीवरील कराचे लिलांवदार ( खोत ) म्हणूं लागले ; केव्हां केव्हां त्यांना जमीनदार किंवा तालुकदारसुद्धां म्हणत ; पण त्या शब्दांना आजच्याप्रमाणें त्या वेळीं अर्थ नव्हता हें मात्र ध्यानांत ठेव.

मध्यवर्ती सत्ता जसजशी अधिकाधिक दुर्बळ होत गेली तसतशी ही पद्धति अधिकाधिक वाईट होत गेली. शेवटीं एवढ्यावर पाळी आली, कीं एकेका विभागाच्या करवसुलीचे लिलांव होऊं लागले आणि जो सगळयांत जास्त लिलांव बोले त्याला त्या विभागाचें करवसुलीचें काम मिळूं लागलें. याचा अर्थ असा, कीं ज्याला हें काम मिळे त्याला मग आपल्या विभागांत बिचाऱ्या शेतकऱ्यांकडून जेवढा पैसा उकळतां येईल तेवढा उकळण्याला मोकळीक, आणि या गोष्टीचा फायदा घेण्याला हे लोक बिलकुल मागेंपुढें पाहत नसत. हळूहळू हे करवसूलदार वंशपरंपराच होऊन गेले. कारण दुर्बल मध्यवर्ती राजसत्तेला हे लोक काढून टाकणें अशक्य होऊन गेलें.

खरी वस्तुस्थिति तर अशी आहे, कीं ईस्ट इंडिया कंपनीलासुद्धां बंगालमध्यें जो कांहीं तथाकथित कायदेशीर म्हणून पाय रोंवावयाला हक्क मिळाला, तो केवळ मोंगल बादशहाच्या वतीनें शेतसारा वसूल करण्याचा. हा हक्क म्हणजेच १७६५ मध्यें कंपनीला मिळालेली **दिवाणीची सनद !** म्हणजे अशा रीतीनें कंपनीला दिल्लीच्या मोंगल बादशहाचे दिवाण करण्यात आलें. अर्थात् हें एक नुसतें नाटक मात्र होतें. १७५७ मधील प्लासीच्या लढाईनंतर बंगालमध्यें ब्रिटिश लोकांचीच खरोखर मालकी असून गरीब बिचाऱ्या मोंगल बादशहाला तेथें कोठेंही कसली सत्ता नव्हती.

ईस्ट इंडिया कंपनी आणि तिचे अंमलदार हे अतिशयच भयंकर लोभी लोक होते. मागें मीं सांगितलेंच आहे तुला, कीं त्यांनीं सारा बंगालचा खजिना रिता केला आणि जिथें मिळेल तिथें हात टाकून जबरदस्तीनें पैसा उकळला. बंगाल आणि बिहार प्रांत अगदीं पिळून काढून जितका जास्ती कर वसूल करतां येईल तितका वसूल करण्याचा क्रम त्यांनीं चालविला. आपल्या पोटांत त्यांनीं लहान लहान कर वसूल करणारे निर्माण केले आणि मग त्यांच्याकडून कंपनीनें असह्य अशी जबरदस्त कराची वसुली करण्यास सुरुवात केली. थोडक्याच वेळांत शेतीवरील कराची रक्कम मूळच्याहून दुप्पट करण्यांत आली आणि अगदीं निर्दयपणें ती वसूलही करण्यांत येऊं लागली. जो कोणी वेळेवर कर देणार नाहीं त्याला करवसुलीच्या कामावरून हुसकावून लावून देण्यांत येऊं लागलें. हे जे कर वसूल करणारे होते तेही कांहीं कमी नव्हते. आपल्या परीनें तेही शेत कसणारांशीं अगदीं निर्दयपणें, लुटारूसारखे वागत. त्यांचा जवळजवळ सगळा माल कर वा खंड म्हणून वसूल करीत; नाहीं तर त्यांना जमिनीवरून हांकलून लावीत. प्लासीच्या लढाईपासून बारा वर्षांच्या आंत, दिवाणीची सनद मिळाल्यापासून चार वर्षांच्या आंत, ईस्ट इंडिया कंपनीचें हें धोरण आणि त्याच्या जोडीला अवर्षण यांमुळें बंगाल आणि बिहार या प्रांतांत भयंकर दुष्काळ पडून एकंदर लोकसंख्येपैकीं एकतृतीयांश लोक मरण पावले. मागच्या एका पत्रांत १७६९–७० मधील या दुष्काळाचा उल्लेख मीं केलेला आहे आणि तरीसुद्धां ईस्ट इंडिया कंपनीनें आपली कराची सर्वच्या सर्व रक्कम वसूल केल्याचेंही तुला सांगितलें आहे. या बाबतींत कंपनीच्या अंमलदारांनीं जी खास कार्यक्षमता दाखविली तिचा

मुद्दाम उल्लेख केला पाहिजे! कोट्यवधि स्त्री, पुरुष, मुलें मृत्युमुखीं पडलीं; परंतु हे अंमलदार प्रेतापासूनसुद्धां कर वसूल करूं शकत होते आणि त्यापासून इंग्लंडमधील श्रीमान् लोकांना नफा वांटीत होते!

असा हा प्रकार आणखी वीसएक वर्षें चालू राहिला आणि दुष्काळ वगैरेंची बिलकुल पर्वा न करतां कर वसूल करण्याचा प्रयत्न कंपनीनें चालू ठेवला. अशा रीतीनें सुंदर अशा बंगाल प्रांताचा सगळा नाश करून टाकण्यांत आला. मोठमोठे जे कर वसूल करणारे होते ते सुद्धां भिकेला लागले. यावरून गरीब बिचाऱ्या शेत कसणाऱ्याच्या हालअपेष्टा व दुरवस्था कशा प्रकारची असेल याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल. शेवटीं ही परिस्थिति इतकी भयंकर वाईट झाली, कीं अखेरीस ईस्ट इंडिया कंपनीचे सुद्धां डोळे उघडले आणि या बाबतींत थोडी सुधारणा करण्याचा कंपनीनें प्रयत्न केला. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवॉलीस हा इंग्लंडमधील एक मोठा जमीनदार होता आणि ब्रिटिश पद्धतीचे जमीनदार हिंदुस्थानांत निर्माण करावे अशी त्याची कल्पना होती. अलीकडे कांहीं वर्षें हे कर वसूल करणारे लोक स्वतःच जमीनदाराप्रमाणें वागावयाला लागले होते. म्हणून कॉर्नवॉलिसनें त्यांच्याशीं एक प्रकारचा करार केला आणि या लोकांना जमीनदारांप्रमाणें वागविण्यास सुरुवात केली. याचा परिणाम असा झाला, कीं हिंदुस्थानमध्यें अगदीं पहिल्याप्रथम हा मध्यस्थ–दलाल–अस्तित्वांत आला आणि शेत कसणारे जे होते, त्या बिचाऱ्यांना कुळाचा हीन दर्जा प्राप्त झाला. ब्रिटिश राज्यकर्ते हे या जमीन धारण करणारांशीं म्हणजेच जमीनदारांशीं तेवढा प्रत्यक्ष संबंध राखीत आणि त्यांना आपल्या कूळवर्गाशीं वाटेल तसें वागायला मुभा देत. गरीब बिचाऱ्या कुळाला आपल्या जमीनमालकाच्या लोभीपणापासून संरक्षण मिळावयाला मात्र कांहींच साधन नव्हतें.

कॉर्नवॉलिसनें १७९३ मध्यें बंगाल व बिहार या प्रांतांतील जमीनदारांशीं हा जो करार केला, त्याला कायमधारा-आकारणीची पद्धति हें नांव आहे. आकारणी करणें म्हणजे कोणत्या जमीनदारानें किती धारा द्यावयाचा हें ठरविणें. बंगाल आणि बिहारमध्यें ही आकारणी एकदांच एक कायमची करून टाकण्यांत आली. त्यांत पुढें पुन्हां बदल करावयाचा नाहीं असें ठरलें. पुढें ब्रिटिशांचा अंमल, विस्तार वाढून, आग्रा आणि अयोध्या या प्रांतांमध्यें जेव्हां आला तेव्हां हें धोरण पालटलें. या प्रांतांतील जमीनदारांची आकारणी ही बंगालप्रमाणें कायमची झाली नाहीं; तर तात्पुरती झाली. विशिष्ट मुदतीनंतर, सामान्यतः तीस वर्षांनीं या आकारणीची फेरपाहणी होऊन त्या पुढें किती कर द्यावयाचा तें पुन्हां ठरविलें जावयाचें, हें त्या तात्पुरत्या आकारणीचें मुख्य स्वरूप. या फेरपाहणींत दर तीस वर्षांनीं बहुतेक नेहमीं ही आकारणी वाढतच आलेली आहे.

दक्षिणेंत, मद्रास इलाख्यांत आणि आजुबाजूच्या भागांत ही जमीनदारीची पद्धति अस्तित्वांत नव्हती. त्या ठिकाणीं शेत कसणारे शेतकरी हेच जमिनीचे

मालक होते. त्यामुळें मध्यस्थाच्या भानगडींत न पडतां प्रत्यक्ष वेगवेगळ्या शेतकऱ्यांच्याच शेतसाऱ्याची आकारणी ईस्ट इंडिया कंपनीनें केली; परंतु तेथेंच नव्हे, तर सगळीकडेच कंपनीच्या अंमलदारांचा लोभ इतका कळसास पोंचला होता, कीं त्यांनीं हा शेतसाऱ्याचा आंकडा फारच अवजड ठरविला आणि सगळा सारा ते अगदीं क्रूरपणानें वसूल करूं लागले. कर दिला नाहीं कीं ताबडतोब जमिनींतून हकालपट्टी व्हावयाची असा कायदा झाला; पण जमीन सोडून बिचाऱ्या शेतकऱ्यानें जावें तरी कोठें? जमिनीवर अवलंबून राहणारी संख्या भलतीच वाढल्यामुळें जमिनीला मागणी फारच होती. त्यामुळें उपासमारीमुळें वाटेल त्या अटीवर जमीन पत्करणारे लोक पुष्कळच मिळण्यासारखे होते; तरी पण दीर्घ काळपर्यंत हालअपेष्टा सहन करीत राहिलेल्या या शेतकऱ्यालासुद्धां दुःख सोसणें अगदींच अशक्य झालें, म्हणजे त्याच्याकडूनसुद्धां बंडें आणि उठावण्या होत असत. क्वचित् एखाद्यादुसऱ्या वेळीं नव्हे, तर तर मधूनमधून वारंवार.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला बंगालमध्यें आणखी एक जुलूम सुरू झाला. कांहीं इंग्रज लोक निळीचा व्यापार करण्यासाठीं म्हणून स्वतःच जमीनदारी मिळवून राहूं लागले. निळीचें पीक लावण्यासाठीं म्हणून त्यांनीं कुळांकडे ज्या जमिनी दिल्या त्याबाबत त्यांनीं कुळांवर फारच कठिण आणि अवजड अटी घातल्या. कुळांनीं आपल्या वहिवाटीस असलेल्या जमिनींपैकीं कांहीं क्षेत्रांत सक्तीनें निळीचें पीक केलेंच पाहिजे आणि नंतर तें पीक ठराविक दरानें या जमीनदारांना म्हणजे मळेवाल्यांना ठराविक दरानें विकलें पाहिजे, असे करार त्यांनीं त्यांच्यावर लादले. या पद्धतीला मळेवाल्यांची लागणीची पद्धति असें म्हणतात. या कुळांवर लादलेल्या अटी इतक्या अवघड होत्या, कीं त्या पुऱ्या करणें त्या बिचाऱ्यांना फारच कठिण होतें. या अटी जेव्हां पुऱ्या होईनात तेव्हां ब्रिटिश सरकार मळेवाल्यांच्या मदतीला धांवलें आणि याच अटीवर नीळ लावणें कुळांना भाग पडावें यासाठीं त्यांनीं कायदे केले. हे कायदे आणि त्यांत निर्माण केलेल्या शिक्षा या पाहिल्या, म्हणजे या मळ्यांमधील हीं कुळें कांहीं अंशीं या मळेवाल्यांचे भूदास आणि गुलाम बनून गेले असें म्हणावें लागतें. या निळीच्या मळ्यांवर जे कारभारी नेमलेले असत, ते या कुळांच्यावर हवा तो जुलूम किंवा अत्याचार करीत असत. कारण या देशी किंवा विदेशी वहिवाटदारांना आपल्याला सरकारी संरक्षण आहे याबद्दल पूर्ण खात्री होती. कित्येकदां निळीची किंमत इतकी कमी येऊं लागे, कीं तिच्याऐवजीं इतर कांहींही, भात वगैरे पीक काढणें कुळाला अधिक फायदेशीर असे; परंतु तसें करायला त्याला मुभा नसे. अशा रीतीनें बिचाऱ्या शेतकऱ्याची कुचंबणा होऊन त्याच्या हालअपेष्टा इतक्या भयंकर वाढत गेल्या, कीं त्या असह्य होऊन चिडून जाऊन तो दुर्बल जीवसुद्धां उलटला. शेतकऱ्यांनीं मळेवाल्यांविरुद्ध बंड केलें आणि एक निळीचा कारखाना त्यांनीं लुटला; परंतु त्यांना दडपून टाकून पुन्हां पूर्वस्थितीवर नेण्यांत आलें.

या पत्रामध्यें एकोणिसाव्या शतकामधील हिंदुस्थानांतल्या शेतकऱ्यांचें चित्र तुझ्यापुढें रेखाटण्याचा जरा प्रयत्न मीं केला आहे. मला वाटतें, हें वर्णन पुष्कळच लांबल्यासारखें झालेलें आहे. हळूहळू हिंदी शेतकऱ्यांची अवस्था अधिकाधिक वाईट कशी होत गेली, त्यांच्याशीं ज्याचा ज्याचा संबंध आला—मग तो कर वसूल करणारा असो, जमीनदार असो, वाणी, सावकार असो, मळेवाला असो, त्याचा वहिवाटदार असो किंवा हिंदुस्थानामधील सर्वांत मोठा वाणी-सावकार, म्हणजे स्वतः ब्रिटिश सरकार, ईस्ट इंडिया कंपनीमार्फत राज्य करतांना किंवा स्वतः राज्य करतांना असो, सर्वांनींच त्यांची पिळणूक कशी केली हें मीं तुला सांगितलें. ही सर्व पिळणूक होण्याचें कारण म्हणजे तिच्या बुडाशीं असलेलें हिंदुस्थानांतील ब्रिटिशांनीं जाणूनबुजून चालविलेलें धोरण हें होतें. कोणतें हें धोरण? तर येथील घरगुती धंदे पार नष्ट करून टाकावयाचे; परंतु त्यांच्या जागीं दुसरे कसलेही उद्योगधंदे येऊं द्यावयाचे नाहींत. त्यामुळें बेकार कारागिरांनीं खेडेगांवांत जावयाचें आणि त्यामुळें जमिनीवर अवलंबून राहणारांची संख्या वाजवीहून फाजिल व्हावयाची. याच्या जोडीला नवीन निर्माण करण्यांत आलेली जमीनदारी पद्धति; त्यानंतरची मळेवाल्यांची लागणीची पद्धति. जमिनीवर लादलेला भयंकर अवजड शेतसारा; त्यामुळें वाढलेलें खंडाचें प्रचंड प्रमाण, तें वसूल करण्यासाठीं जुलूम-जबरदस्ती; शेतकऱ्यांनीं निरुपाय होऊन वाणी-सावकारांकडे कर्ज काढण्यासाठीं जाणें आणि त्यांच्या कचाट्यांत कायमचें सांपडणें; खंड किंवा शेतसारा वेळेवर देण्यास असमर्थ झाल्यामुळें जमिनींतून अगणित लोकांची हकालपट्टी होणें आणि या सगळ्यापेक्षांही अधिक भयंकर म्हणजे पोलीस व कर वसूल करणाऱ्या जमीनदारांचे आणि निळीच्या मळेवाल्यांचे वहिवाटदार, हे करीत असलेला रोजचा भयंकर जुलूम, कीं ज्यामुळें बिचाऱ्या शेतकऱ्याच्या ठिकाणची असेल नसेल ती माणुसकी, तेजस्विता आणि ताकद नाहींशी व्हावी. हा एकंदर ब्रिटिशांनीं पत्करलेल्या धोरणामुळें घडून आलेल्या परिस्थितीचा आढावा. या सगळ्याचा परिणाम म्हणजे अतिशय भयंकर आणि खेदकारक अवस्था आणि मरणप्राय महासंकट यांहून दुसरा काय होणार?

दुष्काळ एवढे भयंकर पडले, कीं त्यांत लाखों लोक मरण पावले. तरीपण चमत्कार असा, कीं अन्नाचा पुरवठा कमी पडल्यामुळें लोक इकडे उपासमारीमुळें मरत होते अशा वेळींच इकडून गहूं आणि इतर धान्यें, श्रीमान् व्यापाऱ्यांना नफा व्हावा यासाठीं, परदेशांत पाठविण्यांत येत होतीं! परंतु खाद्यपदार्थ कमी होते हें मुळीं खरें संकट नव्हतेंच. कारण आगगाडींतून देशाच्या इतर भागांतून खाद्यपदार्थ आणण्यासारखे होते; पण हे खाद्यपदार्थ खरेदी करायला लोकांजवळ पैसा नव्हता हें खरें संकट होतें. इ. स. १८६१ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत, विशेषतः आपल्याच प्रांतांत फार मोठा दुष्काळ पडला होता. त्या वेळीं दुष्काळी भागांत एकूण साडेआठ टक्क्यांहून अधिक लोक मरण पावले असें लिहिलें आहे. त्यानंतर पंधरा वर्षांनीं १८७६ च्या सुमारास

उत्तर हिंदुस्थानांत, मध्य हिंदुस्थानांत आणि दक्षिण हिंदुस्थानांतही दोन वर्षेंपर्यंत पुन्हां एकदां फारच मोठा दुष्काळ पडला. यामध्येंही आपला संयुक्तप्रांत, मध्यप्रांत आणि पंजाबचा कांहीं भाग यांनाच सर्वांत अधिक ताण सहन करावा लागला. त्यामध्यें सुमारें एक कोटी लोक या दुष्काळामुळें मेले. पुन्हां वीस वर्षांनीं म्हणजे १८९६ मध्यें जवळजवळ याच प्रदेशांत आणखी तिसरा दुष्काळ पडला. हा हिंदुस्थानच्या एकंदर इतिहासामध्यें सर्वांत जास्त भयंकर दुष्काळ होय. या भयंकर निसर्गकोपामुळें उत्तर हिंदुस्थान आणि मध्य हिंदुस्थान जणुं पार धुळीस मिळून निःसत्त्व झाला. यानंतर १९०० सालीं पुन्हां आणखी एक दुष्काळ पडला.

चाळीस वर्षांच्या अवधींत चार जे मोठमोठे दुष्काळ या देशांत पडले, त्याची एका छोट्या परिच्छेदांत मीं तुला ओळख करून दिली. या दुष्काळांच्या हृदय-विदारक अशा हकिकतींचें भयाण स्वरूप आणि त्यांतील यातना यांचें वर्णन मी करूं शकत नाहीं आणि या गोष्टींची या वयांत नीटशी जाणीव तुला होऊंही नये असेंच माझ्या मनांत आहे. कारण तशी ती जाणीव झाली, कीं तुझ्या मनाचा संताप होईल आणि तुझ्या ठिकाणीं फार प्रचंड कडवटपणा निर्माण होईल. एवढ्या या लहान वयांत तुझ्या ठिकाणीं असा कडवटपणा उत्पन्न व्हावा असें मला वाटत नाहीं.

लढाईमध्यें जखमी होणारांची व्यवस्थित शुश्रूषा व्हावी यासाठीं जिनें प्रथम संघटना केली त्या शूर इंग्रज स्त्रीचें, फ्लॉरेन्स नाइटिंगेलचें नांव तूं ऐकलेलें असशील. फार पूर्वीं १८७८ सालींच तिनें लिहिलेलें आहे, "साऱ्या पूर्व प्रदेशांत, नव्हे साऱ्या जगांत, कोणती एखादी गोष्ट पाहून मनाला जास्तींत जास्त दुःख होत असेल तर ती म्हणजे आमच्या पूर्वेकडील साम्राज्यामधील शेतकरी!" "आमच्या कायद्याचा परिणाम" काय झाला हें सांगतांना तिनें लिहिलें आहे, "त्यामुळें जगांतील सर्वांत अधिक पिकाऊ अशा देशांत, ज्या ठिकाणीं आपण दुष्काळ म्हणून म्हणतों तसा दुष्काळ नसूनही लोकांच्या कपाळीं नित्याची भाजून, पिचून काढणारी अर्धवट उपासमार आलेली आहे!"

खरें आहे. आमचा शेतकरी, त्याचे ते खोल गेलेले डोळे आणि त्यांमधील बावरलेली, भेदरलेली, निराश नजर या दृश्याइतकें दुःखद दृश्य पृथ्वीवर क्वचितच कोठें असेल! आज किती तरी वर्षेंपर्यंत आमचा शेतकरी केवढें हें भयंकर ओझें सहन करीत आला आहे! आणखी आपण हें विसरतां कामा नये, कीं आम्ही जे थोडेसे लोक त्यांतल्या त्यांत बऱ्या स्थितीला आलों आहों, त्यांचीही भरती शेतकऱ्यांच्या डोक्यांवरील या ओझ्यांत आहेच. आम्ही सगळेजण, हिंदी आणि परके लोक, गरीब बिचाऱ्या दीर्घकाल खचलेल्या शेतकऱ्याच्या पाठीवर स्वार होऊन त्याला आमच्या-साठीं घाम गाळायला लावतों आहों!

परंतु इतक्या दिवसांनंतर कां होईना, अखेरीस आशेचा अंधुक किरण, भावी काळाच्या चांगल्या दिवसाची आणि ओझें हलकें होण्याची थोडीशी गुजगुज यांचा सुखद

अनुभव त्याला आतां येऊं लागला आहे. थोड्याच दिवसांपूर्वी एक लहानसा मनुष्य येऊन त्यानें थेट त्याच्या डोळ्यांशीं डोळा लावून आंत खोलवर त्याच्या दडपून गेलेल्या हृदया-मध्यें नजर टाकली आणि त्याच्या दीर्घकालीन दुःखाचा चांगलाच ठाव घेतला. त्याच्या त्या नजरेंत एक प्रकारची जादू त्या शेतकऱ्याला आढळली. त्याच्या त्या स्पर्शांत एक प्रकारचा आगीसारखा उत्साह त्याच्या प्रत्ययाला आला आणि त्याच्या बोलण्यांत त्याला आपल्या दुःखाची खरीखुरी जाणीव, आपल्याविषयींचा अत्यंत खोल कळवळा, विपुल प्रेम आणि प्राण गेला तरी तुमची पाठ मी सोडणार नाहीं असा विश्वास, यांचा अनुभव त्याला आला. आणि या शेतकऱ्यांनीं, कामगारांनीं आणि इतरांनींही त्याचें बोलणें ऐकलें तेव्हां त्यांच्या अंतःकरणांत नवीनच जिवंतपणा निर्माण होऊन तीं थरारूं लागलीं. त्यांच्या अंतरंगांत कांहीं विलक्षण आशेचा उदय झाला आणि आनंदानें त्यांनीं गजर केला, "महात्मा गांधी की जय!" आणि आपल्या दुःखाच्या खोल दरींतून बाहेर पडण्यासाठीं त्यांनीं कमरा बांधल्या. परंतु तें जें जुनें यंत्र इतके दिवस त्यांना दडपून ठेवीत आलें होतें, तें काय त्यांना असें सहजासहजीं निसटून जाऊं देणार? त्यांना दडपून टाकण्यासाठीं आणि नवीन शृंखला त्यांना बांधून ठेवण्यासाठीं निघाल्या आणि पुढें? पण तो माझ्या गोष्टीचा किंवा इतिहासाचा विषय नव्हे. तो अजून उद्यांचा विषय आहे. उद्यांची जेव्हां आज घडून येईल, तेव्हां त्याच्या पुढें काय हें कळेलच आपल्याला; पण काय होणार आहे याचा संशय आहे कोणाला?

## ११२

## ब्रिटननें हिंदुस्थानचा कारभार कसा केला?

*५ डिसेंबर, १९३२*

आतांपर्यंत मीं तुला एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानबद्दल तीन भलीं लांब पत्रें लिहिलीं. हा इतिहास खरोखरच मोठा आहे आणि त्या काळांतील आमच्या देशांतील दुःखाची कहाणीही चांगली लांबलचक आहे. म्हणून ती वाजवीपेक्षां थोडक्यांत सांगायला गेलों तर मला वाटतें, आहे यापेक्षांही तुला ती कळायला कठिण पडेल. इतर देशांपेक्षां किंवा जगांतील इतर निरनिराळ्या कालखंडांपेक्षां हिंदुस्थानच्या या कालखंडाकडे कदाचित् मी अधिक लक्ष पुरवितों आहें असें होत असेल. मी स्वतः हिंदी असल्यानें मला हा विषय अधिक आपलासा वाटतो आणि त्याच्याबद्दल मला अधिक माहिती असल्यानें लिहावयालाही सांपडतें पुष्कळ तपशीलवार. शिवाय, या कालखंडाकडे निव्वळ एक ऐतिहासिक काळ म्हणून नव्हे, तर दुसऱ्याही कांहीं विशेष कारणाकारणांनीं त्याच्याकडे आपलें लक्ष वेधतें. आजचा जो कांहीं मोडका-

तोडका आधुनिक बनलेला हिंदुस्थान आपल्या डोळ्यांपुढें उभा आहे, त्याचा जन्म एकोणिसाव्या शतकाच्या या वेदनांतूनच होऊन तो रंगरूपास चढला आहे. आजचा हिंदुस्थान कसा आहे याचें यथार्थ स्वरूप आपल्याला पहावयाचें असेल, तर ज्या कारणांमुळें त्याचें स्वरूप बनलें किंवा बिघडलें त्या कारणांची आपण थोडीफार माहिती करून घेतली पाहिजे. असें केलें तरच आपल्याला आपल्या देशाची सेवा शहाणपणानें करतां येईल. त्यासाठीं आपण काय करावें, कोणता मार्ग पत्करावा, हें ठरवितां येईल.

अजून कांहीं या कालखंडाबद्दलचें माझें लिहिण्याचें संपलेलें नाहीं. अजून पुष्कळच सांगावयाचें आहे मला. या पत्रांत मी काय करीत असतों, तर एका पत्रांत एक विशिष्ट गोष्ट किंवा बाजू स्वतंत्रपणें घेतों आणि तेवढ्याबद्दलच चर्चा करितों. तुला कळायला सोपें पडावें या हेतूनें या निरनिराळ्या बाजूंचा किंवा निरनिराळ्या अंगांचा असा मी स्वतंत्रपणें विचार करतों; पण आतांपर्यंत ज्या सगळ्या घडामोडींबद्दल आणि फेरबदलांबद्दल मी तुला सांगत आलों आणि ज्याबद्दल यापुढें मी तुला सांगणार आहें त्या सगळ्या घडामोडी सामान्यतः एकाच वेळीं घडून आल्या. त्यांपैकीं परस्परांचा परस्परांवर परिणाम होत आला आणि त्या सर्वांचा परिणाम होऊन एकोणिसाव्या शतकांतला हा हिंदुस्थान जो तयार झाला तो झाला, हें तुलाच पुढें-मागें समजून येईल.

आतांपर्यंत हिंदुस्थानांतील ब्रिटिशांचें योग्यायोग्य वर्तन जें मीं तुला सांगितलें, तें वाचून केव्हां केव्हां ब्रिटिशांचें हें धोरण आणि त्यामुळें या देशामध्यें चोहोंकडे पसरलेलें हें दैन्य यांबद्दल तुला ब्रिटिशांचा फार राग आला असेल; पण अशा रीतीनें आपल्या देशावर जर या हालअपेष्टा कोसळल्या असतील तर त्यांचा दोष कोणाकडे जातो? हें सगळें जें झालें तें आम्ही दुर्बल आणि अडाणी होतों म्हणूनच नाहीं का झालें? दुर्बलपणा आणि मूर्खपणा अंगीं असणें म्हणजे दुसऱ्याला आपल्यावर जुलूम गाजवायला बोलावणेंच करण्यासारखें आहे! आमच्यामधील परस्पर भांडणांमुळें ब्रिटिशांचा फायदा होत असेल, तर आम्हीं आपसामध्यें भांडतों याचा तो दोष आहे. ते आमच्यामध्यें भेद उत्पन्न करतात आणि त्यामुळें आमची शक्ति कमजोर ठरते. आमच्यामधील निरनिराळ्या गटांचा ते वेळोवेळीं एकमेकांच्या विरुद्ध उपयोग करतात. पण आम्ही त्यांना हें सारें करूं देतों, याचाच अर्थ ब्रिटिश लोक हे आमच्यापेक्षां अधिक शहाणे आणि श्रेष्ठ आहेत असा होतो. तेव्हां तुला रागवावयाचें असेल, तर आमचा दुर्बलपणा, अज्ञान आणि आपसांतील भांडणें यांच्यावर तूं राग कर. कारण आमच्या सर्व दुःखांचें मूळ केवळ या गोष्टी आहेत.

आपण शब्द काय वापरतों? तर ब्रिटिशांचा जुलूम; परंतु खरें पाहिलें तर हा जुलूम कोण करीत असतें? सगळाच्या सगळा ब्रिटिश समाज खास नव्हे. कारण त्यांच्यापैकींच लाखों लोक स्वतः आमच्याप्रमाणें जुलुमाखालीं भरडले जात आहेत

आणि हालअपेक्षा भोगीत आहेत. त्याचप्रमाणें ब्रिटिशांनीं जी ही हिंदुस्थानची पिळणूक चालविलेली आहे तिच्यामुळें ज्यांचा थोडाबहुत फायदा झालेला आहे असे कांहीं हिंदी लोकांचे लहान गट किंवा वर्ग आपल्या देशांतच आहेत. तेव्हां अमुक लोक जुलूम करणारे आणि अमुक लोकांवर जुलूम होतो अशी ही विभागणीची रेषा कशी काय काढायची ? खरी गोष्ट अशी आहे, कीं यांत कांहीं व्यक्तींचा अथवा लोकांचा प्रश्न नसून यांत एका विशिष्ट समाजपद्धतीचा प्रश्न आहे. आपल्याला असें म्हटलें पाहिजे, कीं आपल्या डोक्यावर एक भलें मोठें यंत्र उभें करण्यांत आलेलें असून त्या यंत्राखालीं लाखों हिंदी लोकांची पिळणूक होऊन ते भरडले जात आहेत. हें यंत्र म्हणजे औद्योगिक भांडवलशाहीमधून जन्माला आलेलें नवीन प्रकारचें साम्राज्यशाहीचें यंत्र आहे. या यंत्रामुळें जी पिळणूक होते, तिचा सगळा फायदा इंग्लंडमध्यें जातो खरा ; पण तेथेंही हा फायदा केवळ विशिष्ट वर्गाच्याच खिशांमध्यें जातो. या पिळणुकीच्या फायद्यापैकीं कांहीं भाग हिंदुस्थानांतही राहतो आणि कांहीं वर्गांना त्यापासून लाभ होतो हें खरें आहे. म्हणून कांहीं ब्रिटिश व्यक्तींवर अथवा सर्वंच ब्रिटिश समाजावर-सुद्धां आपण राग करणें हें मूर्खपणाचें आहे. जर एखादी समाजपद्धति चुकीची असेल आणि तिच्यापासून आपल्याला नुकसान पोंहचत असेल, तर ती पद्धति बदलून टाकली पाहिजे. ही पद्धति चालविणाऱ्या व्यक्तींवर तिचा बरा-वाईट परिणाम कांहीं-सुद्धां अवलंबून नाहीं. समाजपद्धति वाईट असेल तर चांगलीं माणसेंसुद्धां तिच्यामध्यें कोणाचें कांहीं कल्याण करूं शकत नाहींत. तुमची अगदीं कितीही मोठी इच्छा असली तरीसुद्धां दगडमाती कितीही शिजव-शिजव शिजवून त्यांमधून तुम्हांला कांहीं खाण्याजोगा पदार्थ का बनवितां येणार आहे ? अगदीं हाच न्याय या साम्राज्यशाही आणि भांडवलशाही यांना लागू आहे. यांच्यामध्यें कसलीही सुधारणा करतां येणें शक्य नाहीं. त्यांची खरी सुधारणा करण्याचा फक्त एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे त्यांना संपूर्ण उखडून टाकणें हा. अर्थात् असें हें माझें मत आहे. कांहीं लोकांचें मत याहून वेगळें असेल. तेव्हां कोणी कांहीं सांगतो म्हणून कांहीं तूं तें खरें मानूं नकोस. योग्य वेळीं तुझा तूंच काय तो निर्णय ठरव. एका गोष्टीबद्दल बहुतेक एकूणएक सगळ्या लोकांचें एकमत आहे, ती म्हणजे दोष आहे तो पद्धतीचा आहे. व्यक्तीबद्दल मनांत रोष धरण्यामध्यें कांहीं हंशील नाहीं. आपल्याला कांहीं फेरबदल घडवून आणावयाचे असतील तर आपण या पद्धतीवर हल्ला करून ती बदलून टाकली पाहिजे. या पद्धतीचे कांहीं कांहीं दुष्परिणाम जे हिंदुस्थानामध्यें झालेले आहेत, ते आपण पाहिलेच आहेत. पुढें चीन, ईजिप्त या किंवा इतर कांहीं देशांचा इतिहास जेव्हां आपण पाहूं त्या वेळीं त्या त्या ठिकाणच्या लोकांनाही ही पद्धति, हेंच भांडवलशाहीचें साम्राज्यवादाचें यंत्र, पिळीत असलेलें, भरडीत असलेलें आपल्याला आढळेल.

आतां पुन्हां आपल्या चालू हकिकतीकडे वळूं या. मी तुला सांगितलें कीं ब्रिटिश लोक हिंदुस्थानांत आले, त्या वेळीं हिंदी घरगुती धंद्यांची पुष्कळच चांगली

प्रगति झालेली होती. उत्पादनाच्या पद्धतींत प्रगति जर स्वाभाविकपणें होत राहिली असती, बाहेरून कोणीं येऊन जर कांहीं ढवळाढवळ केली नसती, तर केव्हां ना केव्हां तरी यांत्रिक उद्योगधंदे हिंदुस्थानांत सुरू झाले असते असा संभव होता पुष्कळसा. आपल्या देशांतही लोखंड होतें आणि कोळसा होता. इंग्लंडमध्यें आपण पाहिलेंच, कीं या पदार्थांच्या अस्तित्वामुळें औद्योगीकरण होण्याला फार मोठें साहाय्य झालें. किंबहुना, कांहीं अंशीं त्यामुळेंच औद्योगीकरण घडून आलें असें म्हटलें तरी चालेल. हिंदुस्थानांतही अखेरीस हीच गोष्ट केव्हां तरी घडून आली असती. आपल्या देशांत राजकीय अंदाधुंदी बरीच माजलेली असल्यामुळें कदाचित् हें घडून येण्याला बराच अधिक काळ लागला असता एवढेंच; परंतु मध्येंच इंग्रज लोकांनीं येथें आपला हात शिरकविला. या इंग्रज लोकांचा देश आणि समाज यांनीं यापूर्वीच नवीन पद्धतीच्या प्रचंड यांत्रिक उत्पादनाच्या क्षेत्रांत प्रवेश केलेला होता. तेव्हां कुणाला असें वाटण्याचा संभव होता, कीं या देशाच्या उत्पादनांतही ते असेंच यंत्रीकरण घडवून आणतील आणि तें घडवून आणण्याच्या कामीं ज्या वर्गांचा त्यांना जास्तींत जास्त उपयोग होण्याजोगा होता, त्याच वर्गाला ते हातीं धरतील. त्यांनीं असें तर कांहीं केलेंच नाहीं; नव्हे, जें कांहीं केलें तें नेमकें याच्या उलट केलें. हिंदुस्थान हा पुढेंमागें आपला प्रतिस्पर्धी होण्याची त्यांना भीति वाटून त्या दृष्टीनें येथें त्यांनीं वर्तन केलें. येथील होते ते धंदे त्यांनीं पार मोडून काढले आणि यांत्रिक उद्योगधंदे येथें निर्माण होण्याला प्रत्यक्ष विरोध केला.

त्यामुळें हिंदुस्थानमध्यें आपल्याला एक मोठीच चमत्कारिक अवस्था निर्माण झाल्याचें आढळून येतें. आपण असें पाहतों, कीं त्या काळीं साऱ्या यूरप खंडांत जास्तींत जास्त सुधारलेल्या अशा या ब्रिटिश लोकांनीं या देशांत सख्य कोणाशीं केलें ? तर येथील सर्वांत अधिक मागासलेल्या आणि प्रतिगामी, पुराणप्रिय अशा वर्गाशीं. मरायला टेकलेल्या सरंजामदारवर्गाला त्यांनीं आपला टेकू देऊन उभें केलें; त्यांनीं नवीन जमीनदार निर्माण केले आणि येथें जे शेंकडों मांडलिक संस्थानिक होते त्यांचीं अर्धवट सरंजामशाही राज्यें टिकवून धरून त्यांना त्यांनीं पाठिंबा दिला. म्हणजे सरंजामशाहीचें धूड हिंदुस्थानांत त्यांनीं उलट प्रत्यक्ष जड केलें आणि असें करणारे हे ब्रिटिश लोक स्वतः कोण होते, तर मध्यमवर्गाच्या किंवा धनिकशाहीच्या क्रांतीचे हे मूळ प्रवर्तक होते. त्याचप्रमाणें ज्या औद्योगिक क्रांतीमधून साऱ्या जगांत औद्योगिक भांडवलशाहीचा प्रवेश झाला, त्या औद्योगिक क्रांतीचेही जनक हेच लोक होते. या बाबतींत त्यांनीं आघाडी मारली होती, म्हणून तर या लोकांनीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या पुढें फार मोठा पल्ला गांठला आणि प्रचंड मोठें साम्राज्य निर्माण केलें.

ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत हें असें कां केलें हें समजणें कांहीं कठिण नाहीं. भांडवलशाहीचा सगळा पायाच मुळीं जीवघेणी स्पर्धा आणि पिळणूक यांच्यावर असून साम्राज्यशाही म्हणजे याच प्रकाराचें आणखी पुढचें पाऊल आहे. त्यामुळें ब्रिटिशांनीं

हातांत सत्ता असल्यामुळें जे कोणी प्रत्यक्ष प्रतिस्पर्धी होते त्यांना मारून टाकलें आणि दुसरे कोणी प्रतिस्पर्धी उत्पन्न होऊं नयेत असा बंदोबस्त केला. या बाबतींत येथील सामान्य जनतेची दोस्ती संपादन करून त्यांना कांहीं उपयोग नव्हता. कारण हिंदुस्थानांत त्यांना जें राहावयाचें होतें तेंच मुळीं या सामान्य जनतेची पिळणूक करण्याच्या एकमेव हेतूनें. पिळणूक करणारा आणि ज्याची पिळणूक व्हावयाची ते, यांचे हित-संबंध एकच असणें केव्हांही शक्य नाहीं. यासाठीं या ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत त्या वेळीं जे कांहीं सरंजामशाहीचे अवशेष शिल्लक होते त्यांच्या हातांत हात घातला. ब्रिटिश लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां या अवशेषांमध्यें स्वतःच्या अंगचा असा कांहीं दम शिल्लक राहिलेला नव्हता ; परंतु ब्रिटिशांनीं त्यांना आपला टेकू दिला आणि या देशाच्या पिळणुकींतून होणाऱ्या फायद्यांत त्यांना थोडासा हिस्सा दिला ; परंतु जो वर्ग आतां जुनाट झालेला होता, ज्याचा आतां समाजाला कांहीं उपयोग राहिलेला नव्हता. त्या वर्गाला असा टेकू दिल्यानें इंग्रजांना फारतर तात्पुरता आधार मिळालेला होता, हा टेकू काढून घेतला तर हा वर्ग कोणाकडून तरी पडणार किंवा नव्या परिस्थितीशीं त्याला जमवून घ्यावें लागणार हें निश्चित होतें. ब्रिटिशांच्या मर्जीवर अवलंबून असलेलीं लहान-मोठीं सातशें संस्थानें हिंदुस्थानमध्यें होतीं. यांपैकीं कांहीं मोठ्या संस्थानांचीं नांवें तुला माहीत आहेत. उदाहरणार्थ, हैदराबाद, काश्मीर, म्हैसूर बडोदा, ग्वाल्हेर वगैरे. पण चमत्कार असा, कीं या हिंदी संस्थानिकांपैकीं बहुतेक कोणीही हिंदुस्थानांतील प्राचीन सरंजामदारांच्या राजघराण्यांतील नाहींत. मागें सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थानांतल्या जमीनदारांच्या मागें जशी कांहीं मोठीशी प्राचीन परंपरा नाहीं, तशीच यांच्या मागें फारशी प्राचीन परंपरा नाहीं. एक उदेपूरचा महाराणा मात्र असा आहे, कीं जो सूर्यवंशी रजपूत असून त्याच्या वंशाचा धागा अगदीं इतिहासपूर्व काळापर्यंत जाऊन पोंचतो. या बाबतींत त्याच्याशीं स्पर्धा करूं शकेल अशी जगांत फक्त एकच व्यक्ति अस्तित्वांत आहे असें म्हणतां येईल. ती व्यक्ति म्हणजे जपानचा मिकॅडो.

ब्रिटिशांनीं सरंजामशाही टिकविली त्याचप्रमाणें ब्रिटिशांच्या राज्यामुळें धार्मिक पुराणमतवाद–प्रतिगामीपणा–यालाही फार साहाय्य झालें. ब्रिटिश लोक हे स्वतः ख्रिस्ती धर्माचे असूनही त्यांच्या येण्यामुळें हिंदुधर्म आणि इस्लामधर्म यांची प्रथा अधिकच कडक झाली. हें पाहून मोठें विचित्र वाटतें नव्हे ! कांहीं अंशीं हा जो परिणाम झाला तो स्वाभाविकच होता ; कारण परकीय हल्ला झाला म्हणजे स्थानिक धर्म व संस्कृति यांचीं बंधनें अधिक कडक करून त्यांचें रक्षण करण्याकडे हल्ला झालेल्या देशाचें वळण जात असतें. मुसलमानांच्या स्वाऱ्या येऊं लागल्यानंतर हिंदुधर्माचीं बंधनें याचमुळें कडक झालीं होतीं आणि जातिनिर्बंधांचा फैलाव झाला होता. आतां नेमका हाच परिणाम हिंदुधर्म आणि मुसलमानधर्म या दोहोंवरही झाला. हा झाला स्वाभाविक परिणाम ; परंतु त्याशिवाय हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यानें जाणूनबुजून आणि अजाणतां अशा दोन्ही रीतींनीं या दोन्ही धर्मांमधील पुराणमतवादी, प्रतिगामी

वर्गांना प्रत्यक्ष मदत केली. ब्रिटिश लोकांचें धर्माकडे, धर्मपरिवर्तनाकडे, बाटविण्याकडे विशेषसें लक्ष नव्हतें. ते येथें आले होते ते पैसा मिळविण्यासाठीं. तेव्हां लोकांच्या धार्मिक बाबतींत कोणत्याही प्रकारचा हात घालण्याला ते धजत नव्हते. कारण त्याना वाटे कीं त्यामुळें लोक संतप्त होऊन कदाचित् बंड करावयाचे. त्यामुळें आपण धर्माच्या बाबतींत ढवळाढवळ करतों असा दुरूनसुद्धां संशय कोणाच्या मनांत येऊं नये, या उद्देशानें या लोकांनीं येथील धर्माला किंवा धर्माच्या बाह्य अवडंबराला मदत करण्या-इतकी मजल गांठली; पण याचा परिणाम पुष्कळदां असा झाला कीं धर्माचें बाह्य स्वरूप तेवढें कायम राहिलें. आंत पाहावें तों मात्र कांहींच नाहीं.

जुन्या मताचे लोक चिडतील या भीतीमुळें समाज-सुधारणेच्या बाबतींतही सरकार या जुन्या लोकांच्याच बाजूला राहिलें. त्यामुळें समाजसुधारणेच्या कार्याला अडथळा उत्पन्न झाला. परकीय सरकार म्हटलें कीं सामाजिक सुधारणेची कोणतीही गोष्ट करणें अशक्यच म्हटलें पाहिजे. कारण त्यानें कांहीं बदल करावयाचा म्हटला कीं लोक त्याबद्दल नाखूषच असणार. हिंदुधर्म आणि हिंदु-कायदा यांच्यामध्यें पुष्कळ बाबतींत फेरबदल आणि प्रगति नेहमींच होत आलेली होती ; मात्र हें खरें कीं ही प्रगति अलीकडच्या कांहीं शतकांत फारच मंदपणें होत होती. हिंदु-कायदा हा बहुतेक सारा रूढीवर आधारलेला आहे आणि रूढी तर बदलून नव्या नव्या प्रस्थापित होत असतात. हिंदु-कायद्याच्या ठिकाणीं हा जो लवचिकपणा होता, तो ब्रिटिशांच्या अमलांत अजिबात नाहींसा झाला आणि त्या ठिकाणीं आतां अगदीं अतिशय जुनाट मतांच्या लोकांच्या सल्लयावरून निश्चित केलेले असे सहजासहजीं न बदलणारे असे कायदेकानू प्रस्थापित झाले. यामुळें हिंदुसमाजाची जी काय मंद कां होईना पण प्रगति होत होती, तीही आतां बंद झाली. मुसलमान लोकांना तर या नवीन परिस्थितीचा याहून अधिक तिटकारा वाटून त्यांनीं आपल्याला आपल्या धर्माच्या चौकटींत अधिकच कोंडून घेतलें.

सतीची चाल—मृत पतीबरोबर स्वतःला जिवंत जाळून घेण्याची प्रथा—आपण बंद केली याबद्दल ब्रिटिश लोक मोठी बढाई मारीत असतात. या बाबतींत कांहीं थोडेंसें श्रेय त्यांना देणें योग्य आहे हें खरें ; परंतु खरी गोष्ट अशी आहे कीं या बाबतींतसुद्धां राजा राममोहनराय यांच्यासारख्या सुधारकांनीं पुष्कळ वर्षे चळवळ आणि प्रचार केल्यानंतर मग ब्रिटिश सरकारनें या बाबतींत कायदा केला. त्यांच्या पूर्वी इतरही राजकर्त्यांनीं—विशेषतः मराठ्यांनीं—या चालीला प्रतिबंध केलेला होता. पोर्तुगीजांचा गव्हर्नर अल्बुकर्क यानें गोव्यामध्यें ही चाल बंद केलेली होती, ती हिंदी लोकांच्या आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांमुळें. मला आठवतें त्याप्रमाणें पाहतां म्हणण्या-सारखी एखादी समाजसुधारणा ब्रिटिश सरकारनें या देशांत घडवून आणली असेल, तर तीही एवढीच.

तात्पर्य, ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांतील सर्व मागासलेल्या आणि पुराणप्रिय वर्गांची

बाजू उचलून धरली आणि हिंदुस्थान हा केवळ शेती करणारा देश होऊन त्यानें आपल्या कारखान्यासाठीं लागणारा कच्चा माल निर्माण करावा अशासाठीं सर्व प्रयत्न केले. हिंदुस्थानमध्यें यांत्रिक कारखाने होऊं नयेत या हेतूनें त्यानीं हिंदुस्थानांत बाहेरून येणाऱ्या यंत्रसामग्रीवर जकात बसविली. इतर देश आपल्या देशांत नवीन उद्योगधंद्यांना उत्तेजन देत होते. जपाननें तर देशाचें औद्योगीकरण करण्याच्या बाबतींत नुसती घोडदौड चालविली होती हें लौकरच आपणांला दिसून येईल; पण हिंदुस्थानांत मात्र ब्रिटिश सरकारनें उद्योगधंदे पायांखालीं तुडवून टाकले. यंत्रसामग्रीवरील ही जकात इ. स. १८६० पर्यंत कायम होती. या जकातीमुळें हिंदुस्थानांत कारखाने उभारावयाला इंग्लंडांतल्यापेक्षा चौपट खर्च येई आणि तरीसुद्धां हिंदुस्थानांत मजुरीचे दर किती तरी स्वस्त होते. पण अशा या अडवणुकीच्या धोरणानें, जें व्हावयाचें होतें त्याला फक्त उशीर लागला एवढेंच; त्या धोरणामुळें काळाचा अपरिहार्य ओघ थोडाच थांबणार होता? एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास यांत्रिक कारखाने हिंदुस्थानमध्यें उत्पन्न होऊन वाढण्यास सुरुवात झालीच. बंगालमध्यें प्रथम ब्रिटिशांच्याच भांडवलावर जूटचे कारखाने सुरू झाले; पुढें आगगाडीचे रस्ते झाल्यामुळें असे उद्योगधंदे वाढण्यास मदत झाली आणि १८८० नंतर बहुतांशीं हिंदी लोकांच्या भांडवलावर अहमदाबाद व मुंबई येथें सुती कापडाच्या गिरण्या निघाल्या. त्यानंतर खाणींचा उद्योग सुरू झाला. एक कापडाच्या गिरण्या सोडल्या, तर अत्यंत मंद गतीनें हें औद्योगीकरणसुद्धां बहुतेक सर्व ब्रिटिश भांडवलाच्या बळावर होत होतें आणि जें होत होतें तें सर्व, सरकारची मदत तर दूरच, परंतु सरकारचा विरोधच सहन करून होत होतें. सरकारचें म्हणणें आम्हीं Laissez Faire चें—व्यक्तिस्वातंत्र्याचें धोरण अंगीकारलेलें आहे. आम्ही होऊन कशांत हस्तक्षेप करणार नाहीं; या सगळया गोष्टी स्वाभाविकपणें जशा घडतील तशा घडूं द्याव्या, कोणाही व्यक्तीच्या प्रयत्नांत ढवळाढवळ करूं नये असें आमचें धोरण आहे. पण अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांमध्यें हिंदुस्थानच्या व्यापाराची स्पर्धा ज्या वेळीं इंग्लंडला जाणवत होती, तेव्हां हिंदी मालाच्या इंग्लंडमधील व्यापारावर निरनिराळे प्रतिबंध किंवा कर लादून त्या व्यापाराच्या कामीं ढवळाढवळ करायला मात्र ब्रिटिश सरकारनें कमी केलें नव्हतें. आतां त्यांचें सगळें कांहीं साधलें होतें; त्यांना स्पर्धेचें भय उरलें नव्हतें; तेव्हां आतां व्यक्तिस्वातंत्र्याचे गोडवे गायला त्यांना कांहींच हरकत नव्हती; परंतु तोंडानें असें बोलत असूनसुद्धां त्यांची कृति मात्र सर्वस्वीं निःपक्षपातीपणाची किंवा त्रयस्थपणाची नव्हती; तर उलट, हें सरकार हिंदी धंद्यांच्या वाढीला, विशेषतः मुंबई, अहमदाबादच्या कापडगिरण्यांच्या उद्योगाला प्रतिबंध होईल अशाच गोष्टी करीत आलें. या गिरण्यांत तयार होणाऱ्या मालावर या सरकारनें एक कर बसविला आणि त्याला कापडावरील एक्साइजचा कर असें नांव दिलें. या कराचा हेतु लँकेशायरमध्यें तयार होणारा

ब्रिटिशांचा कापडमाल हिंदी कापडाच्या मानानें महाग पडूं नये एवढाच होता. इतर बहुतेक सर्व देशांत काय पद्धति आहे ? तर आपल्या देशांमधील उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्यासाठीं किंवा उत्पन्न वाढविण्यासाठीं म्हणून परदेशाच्या मालावर आयात-कर बसवितात; पण इंग्रजांनीं या देशांत एक मोठाच अपूर्व चमत्कार करून दाखविला. त्यांनीं हिंदुस्थानांत तयार होऊन हिंदुस्थानांत खपणाऱ्या मालावरच कर लादला! हिंदी लोकांनीं या कापडावरील अंतर्गत कराबद्दल पुष्कळ चळवळ केली, तरीपण तिला न जुमानतां अगदीं अलीकडेपर्यंत हा कर चालूच होता.

अशा रीतीनें सरकारी विरोध सहन करूनही हिंदुस्थानांत आधुनिक उद्योगधंदे हळूहळू वाढत होते. हिंदुस्थानच्या धनिकवर्गाची एकसारखी ओरड सुरू होती कीं हिंदुस्थानची औद्योगिक वाढ झाली पाहिजे. परंतु अगदीं अलीकडे, मला वाटतें १९०५ मध्यें काय तें एकदांचें सरकारनें व्यापार आणि उद्योगधंदे यांच्यासाठीं आपल्या कारभारांत एक खातें उघडलें; परंतु तरीही पहिलें महायुद्ध सुरू होईपर्यंत या खात्यानें कांहींसुद्धां काम केलें नाहीं. उद्योगधंदे जसे वाढूं लागले, तशी शहरांतील कारखान्यांतून काम करणाऱ्या गिरणीमजुरांची संख्या वाढत चालली. जमिनीवर अवलंबून राहणारांची संख्या फारच वाढलेली होती हें मीं तुला सांगितलेंच आहे. त्यामुळें आणि खेडेगांवांमध्यें नित्यच सोसाव्या लागणाऱ्या अर्धवट उपासमारीमुळें खेडेगांवचे पुष्कळसे लोक या गिरण्यांतून किंवा बंगाल आणि आसाममध्यें वाढत चाललेल्या मोठमोठ्या मळयांतून कामावर दाखल झाले. शेतीवरील या दडपणामुळें पुष्कळसे लोक आपला देश सोडून मजुरीसाठीं परदेशींसुद्धां गेले; कारण तेथें गेल्यावर पुष्कळ मोठी मजुरी मिळेल असें आमिष या लोकांना दाखविण्यांत आलेलें होतें. हे मजूर विशेषतः दक्षिण आफ्रिका, फिजी, मॉरिशस आणि सिलोन या प्रांतांमध्यें गेले. यांपैकीं कित्येक देशांमध्यें या हिंदी मजुरांना जवळजवळ गुलामांप्रमाणें वागविण्यांत येत असे. इकडे आसामच्या चहाच्या मळयांतही त्यांची तीच अवस्था होती. त्यामुळें निराश आणि निरुत्साह होऊन मळे सोडून कांहीं दिवसांनीं हे लोक आपल्या मूळ गांवीं परत जाण्याचा प्रयत्न करूं लागले. पण तेथें तरी त्यांना आसरा कोठला मिळणार ? खेडेगांवीं राहिलेल्या लोकांना पुरून यांना आणखी देण्याजोगी जमीन खेडेगांवांमधून होतीच कोठें ?

बरें, इकडे गिरण्यांतून जे मजूर गेले त्यांनाही लौकरच आढळून आलें, कीं घरच्यापेक्षां येथें जरी थोडीफार अधिक मजुरी मिळाली तरी तेवढ्यानें कांहीं आपलें भागत नाहीं. कारण लंकेंत सोन्याच्या विटा! शहरांत काय सर्वच गोष्टी महाग. खेडेगांवच्या मानानें तेथील सर्व राहणी एकंदरीनें अधिक खर्चाची. बरें, त्यांना राहण्याच्या जागा मिळायच्या त्या म्हणजे घाणेरडया, दमट, अंधेऱ्या, रोगट अशा गचाळ लहान-लहान खोल्या. कारखान्यांतही कामाची व्यवस्था आणि पद्धति वाईटच. खेडेगांवांत या लोकांना रोज बहुतेक अर्धपोटीं राहावें लागत होतें हें खरें; पण तेथें त्यांना

पोटभर सूर्यप्रकाश आणि ताजी हवा या गोष्टी तरी मिळत होत्या. येथें या गिरणी-कामगाराला ताजी हवा तर मुळींच नाहीं आणि सूर्यप्रकाश असून नसल्यासारखाच. शिवाय अधिक खर्चाची राहणी. पुरेशी मजुरी पण त्याला मिळायची नाहीं, त्यामुळें त्याच्या घरच्या बायकांना आणि मुलांनासुद्धां रोज पुष्कळसे तास राबणें भाग पडत होतें. मग तान्ह्या मुलांना अफू देणें हें क्रमप्राप्तच झालें. नाहीं तर त्यांना जागें ठेवून रोजचें कारखान्यांतलें काम कसें होणार ? अशा तऱ्हेच्या हालअपेष्टा सहन करीत गिरणी-मजुरांना कारखान्यांतून राबण्याचा प्रसंग आला. स्वाभाविकच यामुळें दुःखभार वाढत जाऊन त्यांच्यामध्यें असंतोष निर्माण झाला. त्यामुळें मधूनमधून निव्वळ निराशेला बळी पडून ते संप करूं लागले, म्हणजे काम करण्याचेंच बंद करूं लागले. परंतु हे मजूर दुबळे, असंघटित असल्यामुळें त्यांचे धनिक मालक त्यांचे संप तेव्हांच मोडून काढीत. बरें, या कामीं नेहमीं सरकारची मदत या मालकांनाच असावयाची. पुष्कळ काळानंतर आणि अत्यंत कटु अनुभवानें शाहणे झाल्यावर एकट्या-दुकट्यानें हें काम न करतां असे प्रयत्न सर्वांनीं मिळून संघटितपणें करणें अवश्य आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. मग त्यांनीं आपले संघ स्थापण्यास सुरुवात केली.

तुला वाटेल कदाचित्, कीं हें वर्णन सगळें कुठलें पूर्वींच्या काळचें आहे. अलीकडे हिंदुस्थानांतील मजुरांच्या परिस्थितींत थोडीशी सुधारणा झालेली आहे हें खरें; कांहीं कायदे करून गरीब बिचाऱ्या कामगाराला थोडेंसें संरक्षण देण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. परंतु अजूनसुद्धां तूं जर कानपूरला किंवा मुंबईला किंवा गिरण्या अगर कारखाने असणारीं दुसरीं जीं कित्येक शहरें आहेत त्यांपैकीं एखाद्या ठिकाणीं गेलीस आणि तिथलीं मजुरांचीं घरें पाहिलींस, तर तुला किळस येऊन तुझ्या अंगावर शहारे उभे राहतील.

या आणि दुसऱ्याही पत्रांत मी हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोक किंवा हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकार असा शब्दप्रयोग करीत आलों आहें; पण या सरकारचें स्वरूप तरी कसें काय होतें ? त्याचा कारभार कोणाकरवीं आणि कोणत्या पद्धतीनें चालू होता ? अगदीं सुरुवातीलाच येथें कारभार ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं होता. परंतु कंपनीच्या मागें ब्रिटिश पार्लमेंट होतेंच. त्या प्रचंड बंडानंतर १८५८ मध्यें सर्व कारभार ब्रिटिश पार्लमेंटनें खास स्वतःच्या हातीं घेतला. पुढें इंग्रज राजांनीं ( अथवा राणीनें म्हणा ; कारण त्या वेळीं इंग्लंडमध्यें राणीचें राज्य होतें. ) कैसर-ई-हिंद हा किताब धारण केला. हिंदुस्थानांत सर्वांत वरिष्ठ राज्याधिकार गव्हर्नर जनरलकडे असतो. यालाच आतां व्हाइसरॉय, राजप्रतिनिधि ही पदवी मिळाली. त्याच्या हाताखालीं पुष्कळसे इतर अधिकारी असावयाचे. त्या वेळीं हिंदुस्थानचे कांहीं मोठे मोठे प्रांत पडलेले होते आणि कांहीं संस्थानांमध्यें बाकीचा मुलूख होता. ही विभागणी आजही जवळजवळ जशीच्या तशी कायम आहे. संस्थानें जीं होतीं, त्यांत राज्यकारभार हिंदी राजांच्या हातीं

होता. या संस्थानांना म्हणायचें मात्र स्वतंत्र; परंतु हीं सगळीं संस्थानें ब्रिटिशांवरच अवलंबून होतीं. ब्रिटिशांचीच त्यांच्यावर सत्ता होती. या प्रत्येक संस्थानावर ब्रिटिशांचा एक रेसिडेंट म्हणून अधिकारी असावयाचा आणि त्याचाच ताबा बहुतेक साऱ्या राज्यकारभारावर तेथें चालावयाचा. अंतर्गत सामाजिक सुधारणेशीं या अधिकाऱ्याला कांहींएक कर्तव्य नव्हतें. संस्थानचें राज्य कितीही वाईट असलें किंवा जुनाट पद्धतीचें असलें, तरी त्याला त्याची कांहीं पर्वा नव्हती. त्याचें काम फक्त एक होतें. तें म्हणजे संस्थानामध्यें ब्रिटिशांच्या सत्तेची पकड अधिकाधिक दृढ करावयाची.

हिंदुस्थानचा जवळजवळ तिसरा हिस्सा या संस्थानांमध्यें सामावलेला होता. उरलेला दोनतृतीयांश प्रदेश खास ब्रिटिशांच्या अमलाखालीं होता. म्हणून या दोनतृतीयांश प्रदेशाला ब्रिटिश हिंदुस्थान असें म्हणूं लागले. ब्रिटिश हिंदुस्थानांतील एकूण एक आधिकारी ब्रिटिशच असत. अलीकडे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीअखेरीला थोड्याशा हिंदी लोकांचा त्यांच्या राखीव रानांत प्रवेश झाला. तरीपण सगळी सत्ता, सगळा अधिकार ब्रिटिशांच्या हातांमध्यें होता आणि आजही तो तसाच त्यांच्या हातीं आहे. हे सर्व वरिष्ठ अधिकारी, अर्थात् लष्करी अधिकारी सोडून, हिंदी सिव्हिल सर्व्हिसचे सभासद असावयाचे. अशा रीतीनें हिंदुस्थानचा सारा राज्यकारभार या हिंदी सिव्हिल सर्व्हिसच्या, आय्. सी. एस्.च्या ताब्यांत आहे. या अधिकाऱ्यांची नेमणूक करावयाची ती त्याची त्यांनींच आपापसांत आणि त्यांच्या कारभाराबद्दल ते जबाबदारही स्वतःचे स्वतःला. लोकांच्या बाबतींत वाटेल तें त्यांनीं केलें तरी ते लोकांना त्याबद्दल जबाबदार नाहींत. अशा सर्वस्वीं अधिकाऱ्यांच्या हातीं असलेल्या या राज्यव्यवस्थेला ब्यूरॉक्रसी हें इंग्रजी नांव पडलेलें आहे. कारण ब्यूरो म्हणजे कचेरी. हिंदी भाषेंत त्याचें रूपांतर आपण नोकरशाही असें करतों.

हिंदुस्थानांत या आय्. सी. एस्. लोकांबद्दल जिथें तिथें आपल्याला मोठ्या शिफारशी ऐकायला मिळत असतात. हे लोक म्हणजे कुठल्या तरी मोठ्या अलौकिक जातीचे लोक दिसतात. बऱ्याच दृष्टींनीं हे लोक मोठे कार्यक्षम असतात हें निश्चित. या लोकांनीं या देशातील राज्यकारभार सुरळीत केला; ब्रिटिश राज्याचा पाया येथें दृढ केला आणि यांतून स्वतःचाही खूप लाभ करून घेतला. ब्रिटिशांच्या राज्याच्या पाया वाढवणारीं आणि कर वसूल करणारीं एकूणएक खातीं या लोकांनीं अत्यंत सुव्यवस्थितपणें चालविलीं. बाकीच्या खात्यांकडे त्यांनीं दुर्लक्षच केलें. या बाकीच्या खात्यांचा संबंध बहुतांशीं लोकांच्या हिताशीं असे; परंतु आय्. सी. एस्. मधल्या या लोकांची नेमणूक लोकांनीं केलेली नव्हती किंवा लोकांना ते जबाबदारही नव्हते. तेव्हां अशा त्या खात्यांकडे आय्. सी. एस्. लोकांनीं कां म्हणून लक्ष द्यावें ? अशा स्थितींत स्वाभाविकपणेंच हे लोक सामान्य प्रजेशीं उद्धटपणानें, अहंमन्यतेनें आणि अवहेलनेनें वागूं लागले. त्यांच्या मतांची त्यांना काडीचीही किंमत वाटेनाशी झाली. स्वतःचें ज्ञान आणि दृष्टिकोन अगदीं संकुचित आणि मर्यादित असूनही हे लोक स्वतःला जगांतील

सर्वांत शहाणे समजूं लागले. हिंदुस्थानचें हित म्हणजे मुख्यतः त्यांच्या सिव्हिल सर्व्हिसचें, नोकरशाहीचें हित असें ते मानूं लागले. त्यांचा सगळयांचा मिळून एक परस्पर प्रशंसक संघच निर्माण होऊन एकमेकांचे गोडवे गाण्याचा धंदा त्यांनीं चालू केला. अनियंत्रित सत्ता आणि अधिकार यांचा हा असा परिणाम स्वाभाविकपणेंच झाला आणि हिंदी सिव्हिल सर्व्हिस हीच खरोखर सगळया हिंदी लोकांची व देशाची मालक झाल्यासारखी झाली. ब्रिटिश पार्लमेंट पडलें येथून इतकें दूर कीं या नोकरशाहीच्या कारभारांत ढवळाढवळ करणें त्याला अशक्यच झालें. आणखी शिवाय ही नोकरशाही पार्लमेंटचें आणि ब्रिटिश उद्योगधंद्यांचें हितरक्षण होईल अशाच पद्धतीनें वागत असल्यामुळें तिच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा पार्लमेंटला प्रसंगच पडण्याचें कारण नव्हतें. हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें मात्र या नोकरशाहीवर कांहीं विशेष दडपण आणण्याची कसलीच सोय नव्हती. हे लोक इतके चढून गेलेले होते, कीं त्यांच्या कामाबद्दल एवढीशी नेमस्त टीका केलेलीसुद्धां त्यांना खपत नव्हती.

असें असलें तरी व्यक्तिशः पाहिलें तर या हिंदी सिव्हिल सर्व्हिसमध्यें पुष्कळ सज्जन, प्रामाणिक आणि कार्यक्षम, कर्तबगार माणसें होती; परंतु ज्या धोरणाच्या प्रवाहांत सांपडून हिंदुस्थान देश असहायपणें वाहत चालला होता, तो प्रवाह वळविण्याचें किंवा त्या धोरणांत कांहीं फरक करण्याचें सामर्थ्य अशा व्यक्तींच्या अंगीं नव्हतें. कारण कांहीं म्हटलें तरी आय्. सी. एस्. चे हे सगळे लोक म्हणजे इंग्लंडमधील औद्योगिक धनिकवर्गाचे नुसते गुमास्ते होते. या वर्गाचा हिंदुस्थानची पिळणूक करावयाची हाच मुख्यतः उद्देश होता.

स्वतःच्या हिताच्या किंवा ब्रिटिश उद्योगधंदेवाल्यांच्या हिताचा प्रश्न असला, म्हणजे हें नोकरशाही सरकार अगदीं डोळयांत तेल घालून काम करायला तयार असावयाचें; परंतु शिक्षण, आरोग्य, रुग्णालयें हीं आणि अशीं जीं देशाचें सुख, स्वास्थ्य आणि सुधारणा वाढवणारीं इतर कार्यें, त्यांच्याकडे या नोकरशाहीचें लक्ष नसे. किती तरी वर्षेंपर्यंत हीं कार्यें करण्याचा विचारसुद्धां कधीं या नोकरशाहीच्या मनांत आला नाहीं. इकडे जुन्या ज्या गांवठी शाळा होत्या त्या मरून गेल्या. त्यानंतर मग अतिशय सावकाश आणि मोठ्या नाखुषीनें थोडीशी शिक्षणाची सुरुवात करण्यांत आली. ही शिक्षणाची सुरुवात सुद्धां नोकरशाहीनें स्वतःच्याच गरजेकरितां म्हणून केली. सगळ्या मोठमोठ्या अधिकारांच्या जागांवर ब्रिटिश लोक भरलेले होते; परंतु लहान अधिकारांच्या जागांवर आणि कारकुनीच्या जागांवर नेमायला ब्रिटिश माणसें आणणें तर शक्य नव्हतें आणि कारकुनांची तर जरुरीच होती. तेव्हां असे हे कारकून तयार करण्यासाठीं ब्रिटिशांनीं प्रथम शाळा आणि कॉलेजें हिंदुस्थानांत सुरू केलीं. तेव्हांपासून आतांपर्यंत हिंदुस्थानांतील शिक्षणाचा हाच मोठा उद्देश राखण्यात आलेला आहे. या शिक्षणांतून तयार होणारा बहुतेक सारा माल फक्त कारकून होण्याच्या लायकीचा तयार होत असतो. परंतु थोड्याच वेळांत सरकारी किंवा इतर

कचेऱ्यात जरूर होती तीपेक्षा या कारकुनांचें उत्पादन जास्त होऊं लागलें आणि त्यांतून देशांत सुशिक्षित बेकारांचा एक नवाच वर्ग निर्माण झाला.

या नवीन इंग्रजी शिक्षणाच्या बाबतींत बंगाल प्रांतानें पहिलें पाऊल टाकलें. त्यामुळें पहिल्या-पहिल्या काळांत कारकुनांच्या पुरवठ्यांत बंगाली लोकांचा भरणा अधिक असे. १८५७ मध्यें तीन युनिव्हर्सिट्या स्थापन करण्यांत आल्या. कलकत्ता, मुंबई आणि मद्रास. येथें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं मुसलमान लोकांनीं कांहीं या नविन शिक्षणाचा विशेषसा स्वीकार केला नाहीं. त्यांचें कांहीं या शिक्षणपद्धतीशीं सूत जमलें नाहीं. त्यामुळें या कारकुनी पेशाच्या आणि सरकारी नोकरीच्या शर्यतींत मुसलमान लोक मागें पडले. पुढच्या काळांत त्यांची ही एक मोठी तक्रार होऊन राहिली.

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. सरकारनें जरी या शिक्षणाच्या कार्याला सुरुवात केली, तरी मुलींच्या शिक्षणाकडे त्यानें पूर्ण दुर्लक्ष केलें. यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. शिक्षण जें दिलें जात होतें तें कारकून तयार होण्यासाठीं, आणि कारकुनीच्या कामासाठीं हवे होते पुरुष. शिवाय सामाजिक चालीरीती त्या काळीं फारच मागासलेल्या असल्यानें कारकुनीच्या कामासाठीं पुरुषच काय ते मिळण्या-सारखे होते. त्यामुळें मुलींच्या शिक्षणाचा कोणीं विचारच मनांत आणला नाहीं. पुढें या बाबतींत थोडीफार सुरुवात होऊं लागण्यापूर्वीं मध्यंतरीं केवढा मोठा काळ जावा लागला.

## ११३

# हिंदुस्थानची पुनर्जागृति

७ डिसेंबर, १९३२

ब्रिटिशांचें राज्य हिंदुस्थानमध्यें दृढ पायावर संघटित कसें होऊन गेलें आणि ब्रिटिशांच्या धोरणामुळें आमच्या लोकांना दारिद्र्य आणि दैन्य सोसण्याची पाळी कशी आली हें मीं तुला सांगितलें. या राजवटीमुळें देशांत शांतता प्रस्थापित झाली यांत मुळींच वाद नाहीं. त्याचप्रमाणें सुरळीत राज्यव्यवस्थाही या देशांत स्थापन झाली. मोंगलांचें राज्य विस्कळित झाल्यावेळेपासून या देशांत जी अंदाधुंदी माजली होती तिच्यानंतर ही नवीन शांतता आणि सुव्यवस्था थोडीशी हवीशीच वाटण्याजोगी होती. लुटारू आणि दरोडेखोर यांच्या चांगल्या चांगल्या सुसंघटित टोळ्या देशांत जो धुमाकूळ घालीत असत तोही आतां बंद झाला; परंतु शेतांत किंवा कारखान्यांत काम करणारा जो मजूर या नव्या सत्तेच्या जड जात्याखालीं भरडून आणि चिरडून निघत

होता, त्याला या शांततेची आणि सुव्यवस्थेची काय मोठीशी किंमत होती? तरी पण पुन्हां एकदां मला सांगावयाचें आहे तुला, कीं याबद्दल कोणत्याही एका देशावर किंवा समाजावर, ब्रिटनवर किंवा ब्रिटिश लोकांवर रागावणें हें मूर्खपणाचें आहे. आपल्याप्रमाणें तेही प्राप्त परिस्थितीच्या तडाख्यांत सांपडून वागत होते. आपण आतांपर्यंत हा जो इतिहासाचा अभ्यास केला त्यावरून आपल्याला दिसून आलें आहे, कीं जीवन म्हणजे कांहीं पुष्पशय्या नाहीं. जीवन, संसार, हा पुष्कळशा प्रसंगीं मोठा क्रूर आणि निर्घृण अशाच स्वरूपाचा आढळतो. त्याबद्दल डोकें भडकावून घेणें किंवा कोणाला तरी नुसत्या शिव्या देणें हें मूर्खपणाचें असून त्याचा उपयोग कांहीं नाहीं. त्यापेक्षां हें दारिद्र्य, दैन्य आणि पिळणूक यांचीं कारणें समजून घेणें आणि तीं दूर करण्याचा प्रयत्न करणें हेंच अधिक समंजसपणाचें आहे. ही गोष्ट आपण जर केली नाहीं आणि काळाच्या पुढच्या दौडींत आपण जर मागें पडलों, तर आपल्याला हालअपेष्टा सोसाव्या लागणें अनिवार्य आहे. हिंदुस्थान देश अशा रीतीनें काळाच्या ओघांत मागें पडला. तो कांहींसा निर्जीव हाडांच्या सांपळ्यासारखा झाला होता. येथील समाज आपल्या प्राचीन परंपरांच्या चौकटींत अगदीं कायमचा दगडासारखा कठिण बनून गेल्यासारखा झाला होता. त्याच्यांतलि जोम आणि शक्ति पार नाहीशीं होऊन तो कुजून जाऊं लागला होता. अशा स्थितींत त्याच्या कपाळीं हालअपेष्टा आल्या तर त्यांत आश्चर्य कांहींच नाहीं. या हालअपेष्टा आम्हांला भोगावयाला लावण्याचें कार्य ब्रिटिशांच्या हातून घडलें; पण ते तेथें आले नसते तर आणखी कोणी तरी येऊन आम्हांला असेंच वागविलें असतें बहुधा.

परंतु ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानवर एक मोठा उपकार केला. त्यांच्यांतील नव्या आणि जोमदार जीवनाचा हा जो हिंदुस्थानवर तडाखाच जणुं बसला, त्यानें हिंदुस्थान खळबळून निघाला आणि त्याच्यामध्यें एक प्रकारची राजकीय ऐक्याची आणि राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण झाली. हा जो धक्का बसला त्यानें देशाचे हाल फारच झाले खरे; तरी पण असा एक धक्का आपला प्राचीन देश आणि समाज पुन्हां एकदां जोमदार व्हावा या दृष्टीनें हवाच होता. इंग्रजी शिक्षण सुरू झालें कारकून तयार करण्यासाठीं; पण त्यामुळें हिंदी लोकांचा पाश्चात्यांच्या विचारप्रवाहाशीं परिचय होत गेला. इंग्रजी शिकलेल्यांचा एक नवीनच वर्ग देशांत निर्माण झाला. हा वर्ग फारच लहान होता आणि सामान्य जनतेपासून त्याचे संबंध तुटलेले असत. तथापि याच वर्गाच्या हातून नव्या राष्ट्रीय चळवळींचा पुढाकार घेतला जावयाचा होता. पहिल्या-पहिल्यांदां हा वर्ग इंग्लंडवर आणि इंग्रजांच्या स्वातंत्र्याच्या कल्पनांवर अगदीं मोहित होऊन गेला होता. अगदीं याच सुमारास इंग्लंडमध्यें स्वातंत्र्य आणि लोकशाही यांच्या चर्चेला मोठा भर आलेला होता. अर्थात् हे सर्व विचार अगदींच अस्पष्ट, अंधुक अशा स्वरूपाचे होते आणि हिंदुस्थानात तर इंग्लंड केवळ आपल्या स्वतःच्या फायद्यासाठीं अगदींच अनियंत्रित कारभार करीत होतें; परंतु योग्य वेळ

येतांच इंग्लंड हिंदुस्थानला स्वातंत्र्य बहाल करील, अशी थोडी आशाळभूतपणाची या वर्गाची कल्पना होती.

पाश्चिमात्य विचारांचा हा जो जोरदार धक्का हिंदुस्थानला बसला त्याचा परिणाम कांहीं प्रमाणांत हिंदु धर्मावरही झाला. या विचारांचा परिणाम सामान्य जनतेवर कांहींच झाला नाहीं आणि सनातनी—पुराणप्रिय—लोकांना तर त्यांच्या जुनाटपणांत ब्रिटिश सरकारनें मदतच केली हें मीं तुला सांगितलेंच आहे; परंतु सरकारी नोकरांचा आणि वकील, डॉक्टर, शिक्षक या किंवा अशाच इतर बुद्धिजीवी लोकांचा जो एक नवाच मध्यम वर्ग निर्माण होत होता, त्याच्यावर या पाश्चात्य विचारांचा परिणाम झाला. एकोणिसाव्या शतकाच्या अगदीं सुरुवातीलाच हिंदु धर्मामध्यें पाश्चात्य धर्तीवर सुधारणा करण्याचा एक प्रयत्न बंगालमध्यें झाला. अर्थात् यापूर्वीही हिंदु धर्मामध्यें किती तरी धर्मसुधारक होऊन गेलेले होते. माझ्या पत्रात वेळोवेळीं मीं तुला त्याचीं नांवें सांगत आलोंच आहें. पण हा जो नवा प्रयत्न झाला त्याची प्रेरणा बाहेरून ख्रिस्ती धर्मामधून आणि पाश्चात्य विचारांमधून निश्चितपणें मिळालेली होती. हा प्रयत्न करणारे गृहस्थ म्हणजे राजा राममोहन रॉय. यांचें नांव मागें सतीची चाल बंद करण्याच्या संबंधांत आपल्यापुढें आलेलें आहे. हे एक मोठे विद्वान् आणि श्रेष्ठ पुरुष होते. संस्कृत, आरबी या आणि इतर पुष्कळ भाषा त्यांना फार चांगल्या प्रकारें येत असत आणि निरनिराळ्या धर्मांचा त्यांनीं खोल अभ्यास केलेला होता. धार्मिक कर्मकांड, पूजाअर्चा यांना त्यांचा विरोध होता. समाजसुधारणा आणि स्त्री-शिक्षण यांबद्दल त्यांचा मोठा आग्रह होता. त्यांनीं जी एक संस्था स्थापन केली तिचेंच नांव ब्रह्मोसमाज. संख्येच्या दृष्टीनें हा समाज फारच लहान होता आणि आजलाही तो लहानच राहिला आहे. बंगालमधील इंग्रजी शिकलेल्या लोकांमध्येंच काय तो थोडाबहुत त्याचा प्रसार आहे; परंतु बंगालमधील सामाजिक जीवनावर मात्र या समाजाचा फार मोठा परिणाम झाला. टागोरांचें सर्वच घराणें या समाजामध्यें सामील झालें आणि रवींद्रनाथ टागोरांचे वडील हे पुष्कळ काळपर्यंत ब्रह्मोसमाजाचे मोठेच आधारस्तंभ होते. या समाजातील आणखी एक प्रमुख गृहस्थ म्हणजे केशवचंद्र सेन.

याच शतकाच्या उत्तरार्धांत पुढें आणखी एक धर्मसुधारणेची चळवळ घडून आली. ही निर्माण झाली पंजाबमध्यें. स्वामी दयानंद सरस्वती हे या चळवळीचे प्रवर्तक. यांनीं एक आर्यसमाज म्हणून नवाच समाज स्थापन केला. अलीकडील काळांत हिंदु धर्मांत ज्या पुष्कळ कर्मकांडाच्या वगैरे नवीन गोष्टी निर्माण झालेल्या होत्या, त्या या समाजानें अमान्य केल्या आणि जातिभेदालाही विरोध सुरू केला. "वेदांकडे परत चला" हें त्यांचें सूत्रवाक्य. मुसलमानी धर्म आणि ख्रिस्ती धर्म यांच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम होऊन सुरू करण्यांत आलेली ही एक नवीन धर्म व समाज-सुधारणेची चळवळ होती हें खरें; तथापि स्वभावतःच ही एक खरोखर लढाऊ

वृत्तीची, आक्रमक स्वरूपाची चळवळ होती. असें जरी होतें तरी चमत्कार असा झाला, कीं हिंदु धर्मामधील अनेक पंथांपैकीं आर्यसमाजपंथ इस्लाम धर्माच्या तत्त्वज्ञानाला सर्वांत अधिक जवळचा असूनही इस्लामधर्माचा तो प्रतिस्पर्धी आणि विरोधक झाला. या समाजाचा उद्देश हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन करणें हा होता. या चळवळीला बळ चढण्याचें एक मुख्य कारण म्हणजे तिला एक प्रकारचा राष्ट्रीयत्वाचा रंग होता. या रूपानें हिंदु राष्ट्रीयत्वच डोकें वर काढीत होतें अशी वस्तुस्थिति आहे. परंतु ही चळवळ केवळ हिंदु राष्ट्रीयत्वाची असल्यामुळें तिला हिंदी राष्ट्रीयत्वाचें स्वरूप प्राप्त होऊं शकलें नाहीं.

ब्राह्मोसमाजापेक्षां आर्यसमाजाचा प्रसार फारच मोठ्या प्रमाणावर झाला. विशेषतः पंजाब प्रांतामध्यें; परंतु हा प्रसारही मुख्यतः मध्यमवर्गापुरताच मर्यादित होता. आर्यसमाजानें शिक्षणाचें मोठें कार्य केलेलें आहे. मुलांमुलींसाठीं या समाजानें पुष्कळच शाळा आणि कॉलेजें चालविलेलीं आहेत.

याच शतकांतील आणखी एक लक्षांत ठेवण्याजोगे मोठे धार्मिक गृहस्थ म्हणजे रामकृष्ण परमहंस. आतांपर्यंत या पत्रांत ज्या धर्मसुधारकांचीं नांवें मीं सांगितलीं त्यांच्याहून हे फारच निराळ्या प्रकारचे गृहस्थ होते. धर्मसुधारणेसाठीं चढाऊ धोरणाची कसलीही संस्था त्यांनीं स्थापन केली नाहीं. त्यांचा सगळा भर मनुष्यजातीच्या सेवेवर होता आणि आज देशामध्यें ठिकठिकाणीं "रामकृष्ण सेवाश्रम" स्थापन झालेले असून ते दरिद्री आणि दीनदुबळ्यांची, रंजल्या-गांजलेल्यांची सेवा करण्याची रामकृष्णांची परंपरा चालवीत आहेत. रामकृष्णांचे एक सुप्रसिद्ध शिष्य म्हणजे स्वामी विवेकानंद. यांनीं मोठ्या जोरदारपणें आणि वक्तृत्वपूर्ण वाणीनें राष्ट्रीयत्वाचा पुरस्कार केला. त्यांच्या उपदेशांत मुसलमानविरोध नव्हता; या उपदेशांत कोणाबद्दलच विरोधभावना नव्हती. आर्यसमाजाच्या कांहीं अंशीं संकुचित अशा राष्ट्रवादासारखा विवेकानंदांचा राष्ट्रवाद संकुचित नव्हता. तरीही त्यांचा हा राष्ट्रवाद हिंदु राष्ट्रवादच असून त्याचीं पाळेंमुळें हिंदु धर्म आणि संस्कृति यांच्यामध्येंच होतीं.

तेव्हां ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे, कीं हिंदुस्थानांत अगदीं प्रारंभीं ज्या राष्ट्रीयत्वाच्या लाटा उपस्थित झाल्या त्या धार्मिक स्वरूपाच्या आणि हिंदु धर्मांतर्गत होत्या. या हिंदु राष्ट्रवादामध्यें मुसलमान लोकांनीं भाग घेणें हें यामुळें अर्थातच शक्य नव्हतें. त्यामुळें ते त्यापासून दूर राहिले. शिवाय इंग्रजी शिक्षणापासूनही ते अलग राहिले. तेव्हां या नवविचारांचा त्यांच्यावर फारच थोडा परिणाम झाला आणि त्यांच्यामध्यें विचारांची खळबळही कमी झाली. पांचपन्नास वर्षांनंतर ते आपल्याभोंवतींचें कवच फोडून बाहेर पडले आणि त्या वेळीं हिंदूंच्याप्रमाणें त्यांच्याही राष्ट्रवादाला मुसलमानी राष्ट्रवादाचें स्वरूप प्राप्त झालें. त्यांचीही दृष्टि प्राचीन इस्लामी संस्कृति आणि परंपरा यांच्याकडे वळली आणि हिंदु लोक हे बहुसंख्य असल्यामुळें

या आपल्या संस्कृतीवर व परंपरेवर गदा येईल अशी भीति त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली; परंतु ही मुसलमानांची चळवळ फार पुढच्या काळांत, एकोणिसाव्या शतकाच्या अखेरी-अखेरीला पुढें येऊं लागली. हिंदु धर्म आणि मुसलमान धर्म या दोन्हींमध्यें या ज्या सुधारणेच्या प्रगतिकारक चळवळी झाल्या, त्यांच्याविषयीं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या दोन्ही चळवळींमध्यें आपल्या जुन्या धार्मिक कल्पना आणि आचार या गोष्टींशीं पश्चिमेकडून आलेल्या शास्त्रीय आणि राजकीय कल्पना शक्य तितक्या जुळत्या करून घेण्याचा प्रयत्न करण्यांत येत होता. या आपल्या जुन्या कल्पना व जुने आचार यांची निर्भयपणें तपासणी करण्याचें आणि जरूर तर त्या अमान्य करण्याचें धैर्य ही चळवळ करणारांच्या अंगीं नव्हतें. तरी पण त्यांच्यापुढें शास्त्रांनीं उभें केलेलें जगाचें नवें स्वरूप आणि त्याच्या आजूबाजूस सर्वत्र वावरणाऱ्या राजकीय आणि सामाजिक कल्पना यांच्याकडेही त्याना डोळेझांक करतां येत नव्हती. म्हणून या सर्व आधुनिक कल्पना व ही सर्व आधुनिक प्रगति यांचें मूळ आमच्या प्राचीन धर्मग्रंथांतच आहे असें दाखवून त्या जुन्या-नव्यांचा समन्वय करण्याचा, त्यांतील विरोध नष्ट करण्याचा खटाटोप या लोकानीं सुरू केला. अर्थात् या प्रयत्नांत या लोकाना अपयश येणार हें ठरलेलेंच होतें. याचा परिणाम लोकांना सरळ विचार करण्यापासून परावृत्त करण्याकडे मात्र झाला. जगाचें सगळें रूप पालटून टाकणाऱ्या या नव्या शक्ती आणि कल्पना यांचें स्वरूप समजावून घेऊन निर्भयपणें स्वतंत्र विचार करण्याऐवजीं, लोक प्राचीन आचार आणि परंपरा यांच्या दडपणाखालीं यामुळें जखडून, दडपून राहिले. पुढें पाहून प्रगतिपथावर कूच करण्याऐवजीं सगळ्यांची नजर चोरटेपणानें मागच्या दिशेला खिळून राहिली. माणसाचें डोकें एकसारखें मागेंच वळून राहत असलें आणि दृष्टि मागेंच पाहत राहणार असली, तर अशा माणसाचें पाऊल पुढें पडणें कठिण आहे.

इंग्रजी शिकणारांचा वर्ग शहरांमधून वाढत गेला आणि त्याबरोबरच बुद्धिजीवी लोकांचा म्हणजे वकील, डॉक्टर या व अशा लोकांचा आणि व्यापाऱ्यांचा व धंदेवाइकांचा एक नवीनच मध्यमवर्गही वाढत चालला. पूर्वीसुद्धां हिंदुस्थानांत एक मध्यमवर्ग होताच; पण ब्रिटिशांच्या प्रारंभींच्या धोरणामुळें तो पार भरडून निघालेला होता. आतां जो नवीन मध्यमवर्ग निर्माण झाला तो खास ब्रिटिश अमला-मधून निर्माण झालेला होता. एक प्रकारें या मध्यमवर्गीयांचें सगळें जीवन या ब्रिटि-शांच्या अमलावर अवलंबून होतें. ब्रिटिशांचाच हा सगळा जणुं परिवार होता. ब्रिटिश लोकांनीं सामान्य जनतेची पिळणूक चालविलेली होती, तिच्यांतील कांहीं थोडासा फायदा या लोकांच्या वांट्याला येत होता. ब्रिटिश राजकर्त्या लोकांच्या पंचपक्वान्नांनीं भरलेल्या ताटाभोंवतीं जीं काय चार शितें शिल्लक राहतील, तीं हे लोक जमा करीत होते. त्यांच्या-मध्यें कांहीं लोक ब्रिटिशांचा या देशांतील कारभार चालविण्याला हातभार लावणारे छोटे सरकारी नोकर होते; पुष्कळसे वकील होते. हे लोक कायदे–कोर्टाच्या कामात

मदत करीत आणि लोकांमधील भांडखोरीवर श्रीमंत होत. तसेंच कांहींजण व्यापारी होते; त्यांचें काम ब्रिटिश व्यापार आणि उद्योगधंदे यांचें कुंटणपण करावयाचें. कमिशन आणि नफा घेऊन हे लोक ब्रिटिश माल या देशांत विकीत.

या नवीन धनिक मध्यमवर्गापैकीं फार मोठी संख्या हिंदु लोकांची होती. त्याला कारण एक तर मुसलमानांच्या मानानें हिंदूंची आर्थिक परिस्थिति अधिक चांगली होती हें आणि हिंदु लोकांनीं इंग्रजी शिक्षणाचा फायदा घेतला हें दुसरें. इंग्रजी शिक्षणानेंच सरकारी नोकरी आणि वकिली, डॉक्टरी वगैरे धंदे यांमध्यें प्रवेश मिळण्याचें महाद्वार खोललें जात होतें. मुसलमान लोक हे सामान्यतः हिंदूंहून पुष्कळच गरीब होते. ब्रिटिशांनीं हिंदी उद्योगधंदे बुडविल्यामुळें ज्याना जगांत कोठें तोंड काढावयाला, पाय ठेवायला जागा राहिली नव्हती असे जे विणकर होते ते बहुतेक सर्वच मुसलमान होते. हिंदुस्थानांतील सगळ्या प्रांतांमध्यें मुसलमानांची लोकसंख्या बंगाल प्रांतामध्यें अधिक; पण या प्रांतामध्यें हे लोक बिचारे गरीब, छोटे शेतमालक किंवा शेतीचीं कुळें होते. या कुळांचा जमीनमालक बहुधा हिंदु असावयाचा. त्याचप्रमाणें गांवचा वाणी हाही हिंदूच असावयाचा. त्याच्याचकडून लोकांना कर्जवाम मिळावयाचें आणि गांवच्या सगळ्या गरजा भागविणाऱ्या दुकानाचा बहुधा तोच मालक असावयाचा. अशा रीतीनें जमीनदार आणि हा वाणी यांच्या हातीं कुळांवर जुलूम करण्याची आणि त्यांची पिळणूक करण्याची शक्ति असे आणि या परिस्थितीचा हे लोक भरपूर फायदाही घेत, ही गोष्ट मुद्दाम चांगली ध्यानांत ठेवली पाहिजे. कारण या गोष्टीमध्येंच हिंदु आणि मुसलमान जमातींमधील तेढीचें मूळ आहे.

याच प्रकारें उच्च वर्णीय हिंदू, विशेषतः दाक्षिण हिंदुस्थानमध्यें, अस्पृश्य म्हटल्या जाणाऱ्या समाजाची पिळणूक, गांजणूक करीत असत. यांच्यांपैकीं पुष्कळसे लोक शेतीवर मजुरी करणारेच असत. हा अस्पृश्यांचा प्रश्न अलीकडे आपल्यापुढें बराच आलेला आहे. बापूंच्या उपासापासून तर विशेषच. या अस्पृश्यतेवर आज देशांत चोहोंकडून हल्ला होत आहे. शेंकडों मंदिरें आणि इतर स्थानें त्यांच्यासाठीं खुलीं करण्यांत आलीं आहेत; पण खरोखर याही प्रश्नाच्या अगदीं मुळाशीं ही आर्थिक पिळणूक आहे. जोंपर्यंत ती चालू आहे तोंपर्यंत अस्पृश्य समाज हा आजच्यासारखाच दलित राहणार. हे अस्पृश्य लोक म्हणजे आपल्याकडील एक प्रकारचे भूदासच आहेत. यांना पूर्वी स्वतःच्या मालकीची जमीन करण्याला अधिकार नसे. याशिवायही कांहीं सामाजिक बंधनें आणि उणेपणाचे प्रकार त्यांच्या बाबतींत असत.

सामान्य दृष्टीनें पाहतां सबंध हिंदुस्थान देश आणि त्यामधील सामान्य जनता ही जरी दिवसेंदिवस अधिकाधिक दरिद्री होत जात होती, तरी हे जे मूठभर धनिक मध्यमवर्गीय होते त्यांची मात्र चांगली चलती चालू होती. कारण देशाची जी पिळणूक चाललेली होती तिच्यांतून त्यांच्या खिशांत थोडी थोडी भरती होत होती. त्यामुळें वकील आणि इतर बुद्धिजीवी लोक व व्यापारी यांच्याजवळ थोडाफार पैसा जमूं

लागला. या पैशावर चांगलें व्याज पडावें म्हणून त्याना कोठें तरी तो गुंतवायला हवा होता ; म्हणून त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं दरिद्रावस्थेला पोंचलेल्या जमीनदारांकडून शेतजमिनी विकत घेतल्या आणि त्यांच्या जागीं ते आपण स्वतःच जमीनदार होऊन बसले. दुसऱ्या कांहीं लोकांचे डोळे उद्योगधंद्यांमधील इंग्रजांची प्रचंड भरभराट पाहून दिपलेले होते. तेव्हां त्यांनीं हिंदुस्थानमध्यें कारखाने उभारण्याकडे पैसा घालण्याचा विचार केला. अशा रीतीनें हिंदी भांडवल या मोठ्या यांत्रिक कारखान्यांच्या कामीं उपयोगांत आलें आणि हिंदी औद्योगिक भांडवलदारवर्ग निर्माण झाला. या गोष्टीची सुरुवात सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं १८८० सालानंतर झाली.

ही धनिकशाही जशी वाढत गेली तसतसा तिचा लोभही वाढत चालला. खूप व्याप वाढवावा, जास्त जास्त संपत्ति मिळवावी, सरकारी नोकऱ्यांमध्यें अधिकाधिक प्रवेश व्हावा, कारखाने सुरू करण्यासाठीं अधिकाधिक सवलती मिळाव्या अशी त्यांची खटपट चालू होती ; पण या बाबतींत प्रत्येक पावलागणिक ब्रिटिश लोक आड येतात असें त्यांना आढळून आलें. सरकारी नोकरींतील सर्वच जागा ब्रिटिश लोकांनीं बळकावलेल्या होत्या. उद्योगधंदे, कारखाने जे कांहीं होते, ते सर्व ब्रिटिश लोकांच्या फायद्यासाठीं चाललेले होते. त्यामुळें या प्रकाराविरुद्ध या धनिक मध्यमवर्गानें चळवळ करण्यास सुरुवात केली. आपल्या देशांतील नवीन राष्ट्रीय चळवळीचें मूळ हें असें आहे. १८५७ च्या बंडाचा अत्यंत क्रूरपणें बीमोड करण्यांत आला, तेव्हां लोकांचा धीर इतका खचून गेला होता, कीं मग कसलाही प्रचार किंवा चढाऊ चळवळ करण्याची ताकद त्यांच्या ठिकाणीं उरलेली नव्हती. अशा प्रकारच्या चळवळीची थोडीशी धुगधुगी त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होण्यालासुद्धां मध्यें बराचसा काळ जावा लागला.

या राष्ट्रीय कल्पनांचा लौकरच प्रसार होऊं लागला. या बाबतींत पुढारीपण बंगालनें स्वीकारलें. बंगाली भाषेंत नवीन ग्रंथरचना होऊं लागली. या ग्रंथांचा जसा बंगाली भाषेवर पुष्कळ मोठा परिणाम झाला, त्याचप्रमाणें बंगालमधील राष्ट्रीयत्वाच्या वाढीलाही त्यांचा फार उपयोग झाला. या ग्रंथांपैकींच एकामध्यें, बंकिमचंद्रांच्या आनंदमठ या कादंबरीमध्यें आपलें सुप्रसिद्ध **वन्दे मातरम्** हें गीत आहे. 'नीलदर्पण' अथवा 'निळीचा आरसा' या बंगाली काव्यानें तर बंगालमध्यें मोठी खळबळ उडवून दिली. मळेवाल्यांच्या जमीन-लागणीच्या पद्धतींत बंगाली शेतकरीवर्गाला ज्या हालअपेष्टा सोसाव्या लागत होत्या म्हणून नुकतेंच एका पत्रांत मीं तुला सांगितलें, त्यासंबंधींची मोठी हृदयद्रावक हकिकत या काव्यांत वर्णन केलेली आहे.

दरम्यान इकडे हिंदी भांडवलशाहीची शक्तीही वाढत्या प्रमाणांत होती. तिलाही थोडी हातपाय पसरायला आजूबाजूला जागा हवी होती. म्हणून अखेरीस १८८५ मध्यें नवीन मध्यमवर्गामधील या सगळ्या निरनिराळ्या घटकांनीं आपल्या उद्दिष्टाची मागणी व प्रचार करण्यासाठीं एक संस्था काढण्याचें ठरविलें

आणि अशा रीतीनें १८८५ सालीं हिंदी राष्ट्रीय सभेची प्रस्थापना झाली. ही संस्था आतां अलीकडच्या काळांत, गेल्या कांहीं वर्षांत फार मोठी आणि सामर्थ्यवान् झाली असून हिंदुस्थानांतल्या तुझ्यासारख्या प्रत्येक लहान मुलांमुलींनाही ती माहीत झालेली आहे. या कॉंग्रेसनें जनतेची बाजू उचलून धरली आणि कांहीं अंशीं या जनतेची ती लढाऊ, पुढारी, नायक बनली. ब्रिटिशांच्या या देशांतील सत्तेचा मूळ पायाच उखडण्यासाठीं ही संस्था छाती ठोकून उभी राहिली आणि या सत्तेविरुद्ध मोठमोठ्या चळवळी तिनें चालविल्या. तिनें स्वातंत्र्याचें निशाण उभारलें आणि त्यासाठीं मोठ्या शौर्यानें तिनें लढा केला. आजही तो लढा तिनें चालविलेलाच आहे; पण हा सगळा पुढचा इतिहास आहे. ही राष्ट्रीय सभा प्रथम जेव्हां स्थापन झाली, तेव्हां ती एक अतिशय मवाळ आणि भित्री अशी संस्था होती. ब्रिटिशांशीं राजनिष्ठा व्यक्त करून त्यांच्यापाशीं मोठ्या नम्रपणानें कांहीं छोट्याछोट्या सुधारणांची याचना ही संस्था करीत असे. धनिक मध्यमवर्गाची प्रतिनिधि अशी ही संस्था होती. मध्यम वर्गांतील गरीब लोकांचासुद्धां तिच्यामध्यें समावेश नव्हता. सामान्य जनतेचा, शेतकऱ्यांचा आणि कामगारांचा तर तिच्याशीं दुरूनसुद्धां कांहीं संबंध नव्हता. मुख्यतः इंग्रजी शिकलेल्या लोकांचें तें एक चळवळीचें साधन होतें आणि या सावत्र मायभाषेंतच–इंग्रजींतच–या संस्थेचें सगळें काम चाले. जमीनदार लोक, भांडवलदार लोक आणि नोकऱ्या मिळविण्यासाठीं धडपडणारे सुशिक्षित लोक यांच्या ज्या मागण्या होत्या, त्याच ह्या राष्ट्रीय सभेच्या मागण्या असावयाच्या. गरीब लोकांना भरडून काढणारें दारिद्य किंवा त्यांच्या गरजा याकडे क्वचितच या संस्थेचें लक्ष असावयाचें. या वेळची त्यांची एक मागणी म्हणजे नोकऱ्यांचें हिंदीकरण अशी असे. हिचा अर्थ काय, तर इंग्रज माणसांच्याऐवजीं सरकारी नोकरींत अधिकाधिक हिंदी लोकांचा भरणा व्हावा. हिंदुस्थानचें खरें दुखणें कोणतें असेल, तर या ठिकाणीं नवीन प्रस्थापित झालेलें राज्य-यंत्र होय. तें यंत्र चालविण्याचें काम हिंदी किंवा परकीय अशा कोणीही केलें, तरी त्याचा त्या वेळीं होत होता तोच परिणाम पुढें होत राहणार ही गोष्ट कांहीं या संस्थेच्या त्या वेळीं लक्षांत आलेली नव्हती. कॉंग्रेसची आणखी एक तक्रार अशी होती, कीं लष्करांतील आणि इतरही नोकऱ्यांमधील इंग्रज अधिकाऱ्यांवर खर्च फारच प्रचंड होतो; त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतून सोनें व चांदी यांचा ओघ–गळती–सारखा इंग्लंडमध्यें वाहतो आहे अशीही आणखी एक तक्रार कॉंग्रेसची होती.

सुरुवातीच्या काळीं कॉंग्रेस ही मवाळवृत्तीची कशी होती हें जें वर्णन मी करतों आहें, त्यांत कॉंग्रेसवर टीका करण्याचा किंवा तिचा कमीपणा दाखविण्याचा माझा हेतु आहे, अशी समजूत करून घेऊं नकोस. तसा माझा हेतु नाहीं. कारण त्या काळच्या कॉंग्रेसनें आणि तिच्या पुढाऱ्यांनीं मोठें काम केलें अशीच माझी श्रद्धा आहे. पुढें पुढें हिंदी राजकारणांतील कठोर वस्तुस्थितीमुळेंच जवळजवळ नाइलाजानें क्रमाक्रमानें अधिकाधिक तीव्र आणि जहाल अशी भूमिका कॉंग्रेसला पत्करीत जावें लागलें;

परंतु प्रारंभींच्या काळांत तिचें जें स्वरूप होतें त्याहून निराळें स्वरूप तिला येणेंच शक्य नव्हतें. त्या काळांत कॉंग्रेसच्या प्रवर्तकांनीं जें पाऊल पुढें टाकलें, तेवढेंच टाकावयालासुद्धां केवढ्या मोठ्या धैर्याची आवश्यकता होती! सारा लोकसमाज आपल्या पाठीशीं उभा राहून आपली वाहवा करायला तयार असतांना मोठ्या धीटपणानें स्वातंत्र्याच्या गप्पा मारण्याचें काम सोपें आहे; परंतु कोणत्याही मोठ्या कार्याची मुहूर्तमेढ रोवून त्याची प्रारंभींच्या काळांत जोपासना करणें, पहिला प्रवर्तक होणें हें फार कठिण काम आहे.

राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन १८८५ मध्यें मुंबई येथें भरलें. उमेशचंद्र बानर्जी हे बंगाली गृहस्थ तिचे पहिले अध्यक्ष. त्या काळचे इतर प्रमुख गृहस्थ म्हणजे सुरेंद्रनाथ बानर्जी, बद्रुद्दीन तय्यबजी, फेरोजशहा मेथा हे होत. पण या सर्वांत मेरुमणी म्हणून चमकणारें नांव म्हणजे दादाभाई नौरोजींचें. यांना हिंदुस्थानचे 'ग्रँड ओल्ड मॅन' म्हणजे आजोबा, पितामह म्हणतात. यानींच प्रथम हिंदुस्थानचें ध्येय म्हणून "स्वराज्य" हा शब्द उच्चारला. आणखी एक नांव सांगणार आहें मी तुला. त्या काळच्या कॉंग्रेसच्या पाइकांपैकीं आज हे गृहस्थ एकटेच हयात आहेत. तुझी त्यांची चांगलीच ओळख आहे. ते म्हणजे पंडित मदन मोहन मालवीय. पन्नासांहून अधिक वर्षें देशकार्यासाठीं ते परिश्रम करीत आलेले आहेत आणि आतां उतारवयामुळें आणि काळजीमुळें शरीर विव्हल झालेलें असतांही, तरुणपणीं त्यांनीं हिंदुस्थानच्या भवितव्याचें जें गोड स्वप्न अनुभवलें, तें स्वप्न सत्यसृष्टींत यावें म्हणून आजही त्यांची धडपड चालू आहे.

कॉंग्रेसचीं हीं अधिवेशनें अशींच दरसाल होत गेलीं आणि तिची शक्ति वाढत चालली. तिच्या पूर्वीच्या हिंदू राष्ट्रवादाप्रमाणें हिंदी राष्ट्रसभेला कोणत्याही एका विशिष्ट गटाची उठावणी करण्याचें संकुचित कार्य करावयाचें नव्हतें. तरी पण ही संस्था मुख्यतः हिंदु लोकांचीच होती. कांहीं प्रमुख मुसलमान तिला मिळालेले होते; कांहीं कांहीं जण तर तिचे अध्यक्षही झाले; परंतु सामान्यतः मुसलमान समाज पाहिला, तर तो तिच्यापासून अलिप्तच राहिला. त्या काळचे एक श्रेष्ठ मुसलमान पुढारी म्हणजे सर सुलतान अहमद हे होत. शिक्षणाच्या अभावामुळें, विशेषतः आधुनिक शिक्षणाच्या अभावामुळें मुसलमान समाजाचें फार मोठें अहित झालें, त्यामुळेंच हा समाज मागें पडलेला आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली होती. त्यामुळेंच मुसलमान समाजानें राजकारणांत लुडबूड करण्यापूर्वीं त्यांनीं प्रथम या शिक्षणाचा स्वीकार केला पाहिजे आणि त्यावरच सगळा भर दिला पाहिजे, अशी मुसलमान समाजाची भूमिका बनविणें आपलें कर्तव्य आहे असें त्यांच्या मनानें घेतलें. म्हणून मुसलमानाना त्यांनीं कॉंग्रेसपासून दूर राहण्याचा सल्ला दिला आणि सरकारशीं सहकार्य करून त्यांनीं अलिगढ येथें एक छानदार कॉलेज प्रस्थापित केलें. आज या कॉलेजांतूनच तेथें एक युनिव्हर्सिटी स्थापन झालेली आहे. मुसलमान समाजांतील फार मोठ्या बहुसंख्य लोकांनीं सर सुलतान

अहमद यांचा उपदेश ऐकला आणि ते कॉंग्रेसला मिळाले नाहींत. तरी पण मुसलमानांतील एक लहानसा अल्पसंख्य गट राष्ट्रसभेमध्यें प्रथमपासून राहत आलेला आहे. मात्र एक गोष्ट लक्षांत ठेव. मी जेव्हां हे बहुसंख्य आणि अल्पसंख्य असे शब्द वापरतों, तेव्हां त्याचा अर्थ मुसलमानांतील काय किंवा हिंदूंमधील काय, वरिष्ठ मध्यमवर्गीतील इंग्रजी शिकलेल्या लोकांमधील बहुसंख्य आणि अल्पसंख्य लोक असाच फक्त आहे. त्या दिवसांत सामान्य जनतेचा, मग ती हिंदु असो किंवा मुसलमान असो, कॉंग्रेसशीं कांहीं संबंध नव्हता. त्यांनीं तिचें नावसुद्धां ऐकलेलें नव्हतें. फार कशाला? कनिष्ठ मध्यमवर्गावरसुद्धा कॉंग्रेसचा त्या काळीं तसा कांहीं परिणाम झालेला नव्हता.

कॉंग्रेसची वाढ तर होतच होती; परंतु तिच्यापेक्षांही राष्ट्रीयत्वाच्या कल्पना आणि स्वातंत्र्याची इच्छा यांची वाढ फारच जास्त वेगानें होत गेली. कॉंग्रेसच्या प्रचाराचा परिणाम होत होता तो अगदींच मर्यादित अशा क्षेत्रांत. ही गोष्ट अनिवार्यच होती. कारण कॉंग्रेसचा प्रचार फक्त इंग्रजी जाणणारांपुरताच होता. अर्थात् कांहीं अंशीं या प्रचारामुळें निरनिराळे प्रांत एकमेकाच्या अगदीं जवळ आले आणि त्या सगळ्यांची मिळून एक सामान्य भूमिकाही वृद्धिंगत झाली. परंतु या सगळ्या प्रचाराचा प्रवेश खोलवर सामान्य जनतेंत झालेला नसल्यामुळें त्यांच्यामध्यें किंवा कॉंग्रेसमध्यें अजून तसा म्हणण्यासारखा जोरदारपणा उत्पन्न होत नव्हता. मागच्या पत्रांत मीं तुला ज्या एका घटनेनें साऱ्या आशिया खंडांत खळबळ माजून गेली, त्या घटनेबद्दल सांगितलें आहे. ती घटना म्हणजे जपाननें १९०४–०५ मध्यें रशियासारख्या राक्षसी धुडाविरुद्ध मिळविलेला विजय. आशियांतील इतर देशांप्रमाणेंच हिंदुस्थानवरही या घटनेचा फार मोठा परिणाम झाला. हिंदुस्थानवर परिणाम झाला म्हणजे काय? तर तेथील सुशिक्षित मध्यमवर्गाच्या मनावर त्याचा विशेष परिणाम होऊन त्याचा आत्मविश्वास वाढला. यूरपांतल्या एका मोठ्या सामर्थ्यवान् राष्ट्रावर जर जपानसुद्धां कडी करूं शकतो, तर मग हिंदुस्थानलाच ती तशी कां करतां येणार नाहीं, असा विचार त्यांना सहजच स्फुरूं लागला. आतांपर्यंत हिंदी लोक ब्रिटिशांच्यापुढें आपण कांहींसे कमी आहोंत अशा भावनेनें वांकून वागत होते. ब्रिटिशांचें या देशावरील दीर्घकालीन प्रभुत्व आणि १८५७ सालचें बंड मोडून काढतांना इंग्रजांनीं केलेला निर्दयपणा यांमुळें हिंदी लोक अगदींच भेदरून गेले होते, निर्माल्यवत् झालेले होते. हत्याराचा कायदा करून या लोकांना हत्यारेंही वापरण्याची बंदी करण्यांत आलेली होती. हिंदुस्थानांत घडणाऱ्या एकूण एक गोष्टींमध्यें हिंदी लोक हे जित लोक आहेत, सामाजिक दृष्ट्या कमी दर्जाचे लोक आहेत, असाच धक्का त्यांना नित्य बसत होता. त्यांना जें शिक्षण देण्यांत येत होतें त्यामधूनसुद्धां त्यांच्या मनांवर स्वतःच्या हीनपणाची ही भावना बिंबविली जात होती. त्यांना जो इतिहास शिकविला जाई, तो सगळा खोटा आणि विपरीत अशा स्वरूपाच्या असे. त्यातून त्यांना शिकवण्यांत येई, कीं हिंदुस्थानदेशांत

नेहमींच अराजकता माजून राहिलेली होती. हिंदू आणि मुसलमान हे नित्य एक-मेकांचे गळे कापीत होते. शेवटीं ब्रिटिश लोक आले तेव्हां त्यांनीं या देशाची या दीन दशेमधून सुटका केली आणि या देशाला शातता आणि उत्कर्ष यांची जोड करून दिली. एवढेंच नव्हे, तर वस्तुस्थिति किंवा इतिहास याची कांहींच फिकीर न बाळगतां हे यूरपीय लोक मानीत आणि जगाला जाहीरही करीत, कीं सगळेंच आशिया खंड म्हणजे अगदींच मागासलेलें आणि म्हणून तें यूरपीय लोकांच्या वर्चस्वाखालींच राहिलें पाहिजे.

यामुळें जपानचा हा विजय म्हणजे साऱ्या आशिया खंडांत एक प्रकारच्या उत्साहजनक पेयासारखा झाला. आमच्याकडील बहुतेक साऱ्या लोकांच्या अंतःकरणांत स्वतःच्या कमीपणाबद्दलची भावना जी ठाणें देऊन राहिलेली होती, ती यामुळें कमी झाली. साऱ्याच हिंदुस्थानांत, विशेषतः बंगाल आणि महाराष्ट्र या प्रांतांत,. राष्ट्रीय कल्पनांचा प्रसार यानंतर फारच झपाट्यानें झाला. याच सुमारास हिंदुस्थानांत अशी एक घटना घडून आली, कीं तिच्यामुळें सारा बंगाल प्रांत खालपासून वरपर्यंत उसळून उठला आणि हिंदुस्थानांतही सर्वत्र खळबळ माजली. ब्रिटिश सरकारनें त्या वेळचा मोठाथोरला बंगाल ( त्या वेळीं बिहार प्रांत बंगालमध्यें होता ) विभागून त्याचे दोन प्रांत केले आणि त्यांपैकीं एकाला पूर्व बंगाल हें नांव दिलें. बंगालमध्यें या वेळीं धनिकवर्गामध्यें जो राष्ट्रवाद निर्माण झालेला होता त्याच्या दृष्टीनें त्यांना ही विभागणी चिलकुल मान्य नव्हती. त्यांचा तिला तीव्र विरोध निर्माण झाला. अशा रीतीनें आपल्या प्रांताचे दोन भाग करून आपली शक्ति कमी करण्याचा ब्रिटिश सरकारचा डाव आहे असा त्यांना संशय वाटला. पूर्व बंगालमध्यें बहुसंख्य लोक मुसलमान होते. तेव्हां या विभागणीमुळें हिंदु-मुसलमानांचा प्रश्नही उपस्थित झाला. यांतून ब्रिटिशविरोधी अशी एक चळवळ बंगालमध्यें उभी राहिली. या चळवळींत बहुतेक सारे जमीनदार सामील झाले. त्याचप्रमाणें हिंदी भांडवलदारही तींत मिळाले. स्वदेशीची घोषणा प्रथम या चळवळींत करण्यात आली. त्याचप्रमाणें ब्रिटिश माला-वरच्या बहिष्काराचीही घोषणा करण्यांत आली. या गोष्टीचा हिंदी उद्योगधंदे आणि भांडवलदार यांना अर्थातच उपयोग झाला. ही चळवळ कांहीं अंशीं सामान्य जनते-पर्यंत जाऊन पोंचली; काहीं अंशीं हिंदु धर्माच्या संघटनेंतूनही या चळवळीला स्फूर्ति मिळाली. या चळवळीच्या जोडीनेंच बंगालमध्यें अत्याचारी चळवळीचा एक प्रवाह सुरू झाला आणि हिंदी राजकारणांत बॉंबनें प्रथम प्रवेश केला. बंगालच्या फाळणी-विरुद्ध झालेल्या चळवळींत अरविंद घोष हे एक तेजस्वी नेते होते. परंतु आज पुष्कळ वर्षें पांडेचरी येथें ते एकांतवासांत काळ घालवीत आहेत. पांडेचरी हें हिंदुस्थानांतलें फ्रेंचांचें ठिकाण आहे.

पश्चिम हिंदुस्थानमध्यें महाराष्ट्र प्रांतांतही या वेळीं पुष्कळच खळबळ माजली होती आणि चढाऊ राष्ट्रवादाचें पुनरुज्जीवन झालें होतें. अर्थात् त्यातही हिंदुत्वा-

भिमानाची छटा थोडीशी होतीच. त्या ठिकाणीं एक महान् पुढारी उदयास आले. ते म्हणजे बाळ गंगाधर टिळक. सारें हिंदुस्थान त्यांना 'लोकमान्य' या नांवानें ओळखतें. टिळक हे फार विद्वान् गृहस्थ होते. ते पूर्वेकडील प्राचीन ज्ञान आणि पश्चिमेकडील आधुनिक ज्ञान या दोहोंतही पारंगत असे गृहस्थ होते. टिळक हे महान् राजकारणी पुरुषही होते; पण त्याहूनही विशेष म्हणजे ते एक श्रेष्ठ दर्जाचे जनतेचे नेते होते. आतांपर्यंतचे हिंदी राष्ट्रीय सभेचे पुढारी प्रचार करीत तो फक्त इंग्रजी शिकलेल्या हिंदी लोकांमध्यें; सामान्य जनतेला त्यांची जवळजवळ ओळख-सुद्धां नव्हती. आधुनिक भारतांतील टिळक हेच पहिले पुढारी असे, कीं जे जनतेंत जाऊन पोहोंचले आणि त्या जनतेंतूनच त्यांनीं आपल्या ठिकाणीं शक्तीचा झरा निर्माण केला. त्याच्या ठिकाणच्या दुर्दम्य आणि चढाऊखोर अशा वीरवृत्तीमुळें हिंदी राजकारणामध्यें एक प्रकारची नवीनच शक्ति आणि दुर्दम्य धैर्य हीं निर्माण झालीं आणि त्यांतच बंगालमधील नवीन राष्ट्रीय आणि त्यागाच्या वृत्तीची भर पडून हिंदी राजकारणाचें सारें स्वरूपच पालटून गेलें.

या १९०६ आणि १९०७-०८ सालच्या खळबळीच्या काळांत हिंदी राष्ट्रीय सभा काय बरें करीत होती? राष्ट्रीय भावनेच्या जागृतीच्या या काळांत कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं राष्ट्राचें नेतृत्व केलें नाहीं. त्याऐवजीं ते बाजूला नुसते बघतच राहिले. त्यांनीं पाय मागें घेतला. त्यांना संवय होती याहून थंड अशा राजकारणाची; त्यांच्या राजकारणामध्यें सामान्य जनतेची लुडबूड नव्हती. बंगालमधील हा प्रज्वलित उत्साहाचा भर त्यांना रुचण्यासारखा नव्हता आणि टिळकांच्या रूपानें मूर्तिमंत पुढें उभें राहिलेलें महाराष्ट्राचें हें दुर्दम्य तेजही त्यांच्या प्रवृत्तीला मानवण्यासारखें नव्हतें. स्वदेशीची हे लोक स्तुति करीत; परंतु ब्रिटिश मालाच्या बहिष्काराला मान्यता देण्याला कांकूं करीत. तेव्हांपासून कॉंग्रेसमध्यें दोन पक्ष निर्माण झाले. एक टिळक आणि बंगालमधील कांहीं पुढारी यांचा आणि एक कॉंग्रेसमधील जुन्या पुढाऱ्यांचा. तथापि जुन्या कॉंग्रेसवाल्याच्या मवाळपक्षाचे पुढारी जे गृहस्थ होते, ते मात्र एक अगदींच तरुण गृहस्थ होते. ते म्हणजे गोपाल कृष्ण गोखले. हे एक मोठे कर्तबगार गृहस्थ असून त्यांनीं आपलें सर्व आयुष्य देशसेवेसाठीं वाहिलेलें होतें. गोखले हेही महाराष्ट्रीयच होते. आपापल्या पक्षांतर्फे टिळक आणि गोखले एक-मेकांचे प्रतिस्पर्धी म्हणून नांदूं लागले. शेवटीं याचा जो अपरिहार्य तोच परिणाम झाला आणि १९०७ मध्यें कॉंग्रेस दुभंगली. कॉंग्रेसचा ताबा मवाळांच्या हातामध्येंच राहिला; जहाल लोक तिच्यांतून हांकलले गेले. कॉंग्रेसमध्यें मवाळांचा जय झाला खरा; परंतु त्यासाठीं त्यांना लोकांमधील प्रेमाला मात्र मुकावें लागलें. कारण लोकांना टिळकांचाच पक्ष अधिक प्रिय वाटत होता. यामुळें कॉंग्रेसचा जोर कमी झाला आणि पुढें कांहीं वर्षें तिला विशेष असें कांहींच महत्त्व राहिलें नाहीं.

आणि या सगळ्या काळात सरकार काय करीत होतें? हिंदी राष्ट्रवादाच्या

उदयाचा सरकारावर काय परिणाम झाला? आपल्याला नको असलेला मुद्दा किंवा मागणी यांच्यावर राज्यकर्त्यांपाशीं फक्त एकच उत्तर असतें; तें म्हणजे दंडा. त्यामुळें येथील सरकारनें भरपूर जुलूम-जबरदस्तीचा खेळ सुरू केला. लोकांना तुरुंगांत डांबलें, कायदे करून वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी केली आणि आपल्याला आवडत नाहीं अशा माणसांच्या हालचालीवर पाळत ठेवण्यासाठीं गुप्तपोलिसांचे आणि हेरांचे तांडेच्या तांडे उभे केले. या काळापासून सी. आय्. डी. मधील माणसें म्हणजे प्रमुख हिंदी नेत्यांचीं कायमचीं सोबती बनलेलीं आहेत. बंगालच्या पुष्कळशा पुढाऱ्यांना कैदेची शिक्षा झाली. या वेळच्या खटल्यांतील सर्वांत महत्त्वाचा आणि गाजलेला खटला म्हणजे लोकमान्य टिळकांचा! त्यांत त्यांना सहा वर्षांची कैदेची शिक्षा झाली. या आपल्या कारागृहवासांत त्यांनीं गीता-रहस्य हा एक सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला. याच वेळीं लाला लजपतराय यांनाही ब्रह्मदेशांत हद्दपार करण्यांत आलें.

पण दडपशाहीनें बंगाल प्रांताला नामोहरम करतां आलें नाहीं. तेव्हां देशांतील कांहीं थोड्या लोकांना तरी खूष करावें, या बुद्धीनें घाईघाईनें राजकीय सुधारणांचा एक कायदा पास करण्यात आला. तेव्हांपासून आतांपर्यंत एकच एक धोरण अनुसरलें जात आहे. तें म्हणजे राष्ट्राभिमानी लोकांत फूट पाडावयाची. मवाळ लोकांना आपल्या बाजूला वळवावयाचें आणि जहालांना दडपून किंवा चिरडून टाकावयाचें. म्हणून १९०८ सालीं मोर्ले-मिंटो सुधारणा म्हणून प्रसिद्ध असलेल्या राजकीय सुधारणा जाहीर करण्यांत आल्या. त्यामुळें मवाळ लोक खूष झाले आणि त्यांना आपल्याकडे वळविण्यांत सरकारला यश आलें. जहालांचे पुढारी तुरुंगांत होते; त्यामुळें त्या पक्षाची दाणादाण आणि पांगापांग झालेली होती आणि राष्ट्रीय चळवळ कमजोर झालेली होती. बंगालमध्यें मात्र फाळणीविरुद्ध चळवळ चालूच राहिली आणि शेवटीं ती यशस्वी ठरली. १९११ सालीं ब्रिटिश सरकारनें बंगालची फाळणी रद्द केली. या यशामुळें बंगाली लोकांमध्यें आणखीच उत्साह उत्पन्न झाला; परंतु १९०७ च्या चळवळींतला जोम आतां नाहींसा झालेला होता आणि हिंदुस्थानमध्यें आतां एक प्रकारची राजकीय अनास्था नांदूं लागली होती.

१९११ सालामध्येंच दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी म्हणून जाहीर करण्यांत आली. याच दिल्लीशहरांत किती तरी साम्राज्यांचीं सिंहासनें नांदत आलीं आणि कित्येकांचें दहन वा दफन याच दिल्ली शहरांत झालेलें आहे.

१९१४ सालीं यूरपांत महायुद्ध पेटलें आणि हें शंभर वर्षांचें एक युग संपलें. त्या वेळीं हिंदुस्थानची अवस्था ही अशी होती. या महायुद्धाचाही हिंदुस्थानवर फारच प्रचंड परिणाम झाला; पण त्यासंबंधीं पुढें केव्हां तरी बोलायला हवें मला.

अशा रीतीनें इतक्या पत्रांनंतर कां होईना, एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानच्या हकिकतीच्या अखेरीला मी येऊन पोंचलों आहें. तेव्हां आतां थोडा वेळ हिंदुस्थानला सोडून आपण पुढच्या पत्रांत चीनमध्यें गेलें पाहिजे आणि साम्राज्यशाही पिळणुकीचा आणखी एक नमुना पाहिला पाहिजे.

## ११४

# ब्रिटन चीनच्या गळ्यांत अफू बांधतें

*१४ डिसेंबर, १९३२*

औद्योगिक क्रांति आणि यांत्रिक क्रांति यांचे हिंदुस्थानवर कोणकोणते परिणाम झाले आणि त्यांमुळें हिंदुस्थानांत साम्राज्यशाहीचें कार्य कशा रीतीनें घडत गेलें, यासंबंधीं आतांपर्यंत पुष्कळच विस्तारानें मीं तुला सांगितलें. मी हिंदी असल्यानें हिंदी पक्षाचा मी अभिमानी आहें आणि म्हणून थोडीशी पक्षपाती अशी माझी भूमिका झाली असणें अनिवार्य आहे, असें मला वाटतें. तथापि या सर्व प्रश्नांचा विचार, शास्त्रज्ञ आपल्यापुढील गोष्टींचा जसा अगदीं निःपक्षपातीपणें विचार करतो, त्याप्रमाणेंच आपण करावा, केवळ आपलीच बाजू खरी आहे असें समर्थन करणाऱ्या राष्ट्रवादी माणसाप्रमाणें करूं नये, असा प्रयत्न मात्र मी करीत आलों आहें आणि तूंही असाच प्रयत्न करावास असें मला वाटतें. कांहीं विशिष्ट प्रसंगीं राष्ट्रवादाचाही अर्थात् फार उपयोग आहे; परंतु नेहमींचा सोबती म्हणून तो पत्करल्यास फसगत होण्याचा संभव आहे; आणि इतिहासकाराची भूमिका राष्ट्रवादाला देणें तर धोक्याचेंच आहे. राष्ट्रवादामुळें पुष्कळशा गोष्टी आपल्याला दिसेनाशाच होतात; सत्याचा अपलाप होतो; प्रश्न जेव्हां आपल्या स्वतःचा किंवा आपल्या स्वतःच्या देशाचा असेल तेव्हां तर असें विशेषच होतें. म्हणून हिंदुस्थानच्या अलीकडच्या इतिहासाचा विचार करतांना आपण सावध राहिलें पाहिजे. नाहीं तर आपल्या सगळ्या दुर्दशेचें खापर आपण ब्रिटिशांच्या माथ्यावर फोडून मोकळें होण्याची भीति आहे.

ब्रिटनमधील भांडवलदारांनीं आणि कारखानदारांनीं एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थानची पिळणूक कशी केली हें आतांपर्यंत आपण पाहिलें. आतां आपण आशिया खंडांतील दुसऱ्या एका मोठ्या देशांत जाऊं या. हा देश म्हणजे हिंदुस्थानचा प्राचीन काळापासून मित्र आणि सगळ्या जगाचा जणुं दादा, असा चीन देश. या देशांत पश्चिमेकडील साम्राज्यशाही पिळणुकीची एक निराळीच तऱ्हा आढळून येईल. हिंदुस्थानाप्रमाणें चीनमध्यें कोणाही यूरपियन राष्ट्राची वसाहत किंवा राजकीय वर्चस्व प्रस्थापित झालें नाहीं. या देशांत एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत सगळ्या देशाला एकत्र ठेवून सांभाळण्याला पुरेसें समर्थ असें एक मध्यवर्ती राज्ययंत्र होतें. त्यामुळें वरच्यासारख्या संकटांतून चीन देश निभावला होता. हिंदुस्थानांत याच्यापूर्वींच शंभर वर्षें मोंगलांच्या साम्राज्याचा ऱ्हास झाला होता आणि त्यामुळें साऱ्या देशांत फाटाफूट आणि अव्यवस्था माजून राहिलेली होती. एकोणिसाव्या शतकांत चीनचेंही सामर्थ्य कमी होत गेलें; परंतु तरीही अखेरपर्यंत चीननें कसाबसा टिकाव धरला. त्यांतच परकी

राज्यांच्या आपसांतील चुरशीमुळे त्यांच्यापैकीं कोणालाही एकाला चीनच्या दुर्बलतेचा फायदा घेतां आला नाहीं.

चीनसंबंधींच्या माझ्या यापूर्वींच्या पत्रांत (९४ वें पत्र) मीं तुला ब्रिटिश लोकांनीं चीनमध्यें आपला व्यापार वाढविण्याचा प्रयत्न कसा केला हें सांगितलें. इंग्लंडचा राजा तिसरा जॉर्ज यानें लिहिलेल्या पत्राला उत्तर म्हणून मांचू घराण्यांतील चीनचा बादशहा चीन लुंग यानें जें मोठें बडेजावीचें आणि चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याचा आव असलेलें असें पत्र लिहिलें, त्यांतील एक मोठा उताराही मीं तुला दिला. ही हकिकत इ. स. १७९२ सालची. हें साल पाहतांच त्या वेळीं यूरपमध्यें चाललेल्या भयंकर धामधुमीच्या तुफानी काळाची तुला आठवण होईल. कारण हा फ्रेंच राज्यक्रांतीचा काळ होता. त्यानंतर नेपोलियन आला आणि त्याच्या त्या लढाया झाल्या. या सर्व काळामध्यें इंग्लंडचे हात सर्वस्वीं त्या बाजूला गुंतले होते. इंग्लंड त्या काळांत नेपोलियनशीं मोठ्या हिरीरीनें लढण्यांत गुंतलेलें होतें. त्यामुळें नेपोलियनचा पाडाव होऊन इंग्लंडला जरा शांतपणें श्वास घ्यायला फुरसत मिळेपर्यंत चीनमधील व्यापार वाढविण्याच्या कामाकडे इंग्लंडचें लक्ष जाणेंच शक्य नव्हतें. त्यानंतर मात्र लगेच १८१६ मध्यें आणखी एक ब्रिटिश वकीलमंडळ चीनमध्यें पाठविण्यांत आलें. परंतु चीनमध्यें गेल्यानंतर या वकीलमंडळानें जे कांहीं शिष्टाचार पाळणें चीन देशाच्या रिवाजाप्रमाणें आवश्यक होते, ते शिष्टाचार पाळण्याच्या बाबतींत कांहीं तरी भानगड होऊन चीनच्या बादशहानें ब्रिटिशांचा वकील लॉर्ड ॲम्हर्स्ट याची भेट घेण्याचें नाकारलें आणि त्याला परत जाण्याचा हुकूम केला. या शिष्टाचाराला तिकडे कोटो म्हणतात. जमिनीवर साष्टांग नमस्कार घालण्यासारखा कांहींसा हा प्रकार आहे. त्यावरून तयार झालेला इंग्रजींतला कोटोइंग म्हणजे कोटो करणें हा शब्द तुझ्या कानांवर कदाचित् आलेला असेल.

त्यामुळें त्या वेळींही कांहींच पुढें पाऊल पडलें नाहीं. दरम्यान चीनमध्यें एक नवीन व्यापार फार झपाट्यानें वाढत होता. हा व्यापार म्हणजे अफूचा व्यापार. या व्यापाराला नवीन व्यापार म्हणणें हें कांहीं तितकेंसें बरोबर नाहीं म्हणा; कारण हिंदुस्थानांतून चीनमध्यें अफूची आयात यापूर्वीं किती तरी आधींपासून म्हणजे पंधराव्या शतकापासून सुरू झालेली होती. अफूशीच काय, दुसरे पुष्कळ चांगले पदार्थही हिंदुस्थानांतून चीनमध्यें पूर्वींपासून जात असत. अफू हा मात्र हिंदुस्थानांतील चीनमध्यें पाठविला जाणारा खरोखरीचा वाईट जिन्नस होता. परंतु हा जुना अफूचा व्यापार अगदींच मर्यादित स्वरूपाचा होता. एकोणिसाव्या शतकांत मात्र यूरपीय लोकांच्यामुळें, विशेषतः ईस्ट इंडिया कंपनीच्यामुळें, हा व्यापार वाढला. असें म्हणतात, कीं पूर्वेकडे राहणारे डच लोक हिंवतापाला प्रतिबंधक म्हणून ही अफू तंबाखूंत मिसळून मग ती तंबाखू ओढीत असत. त्यांच्यामार्फत अफू ओढण्याची पद्धति चीनमध्यें गेली; पण तेथें ही पद्धति आणखीच वाईट थराला गेली. कारण

चिनी लोक नुसती अफूच ओढूं लागले. या संवयीचा लोकांवर फार वाईट परिणाम होत होता म्हणून आणि या अफूच्या व्यापारामुळें देशातून पैसा बाहेर जाई यासाठीं ही संवय बंद करावी असा चिनी सरकारचा विचार होता.

इ. स. १८०० सालीं चिनी सरकारनें एक आज्ञापत्र म्हणजे हुकूम काढून कोणत्याही कारणास्तव चीनमध्यें अफूची आयात करावयाची नाहीं असा निर्बंध घातला; परंतु परकी लोकांना तर या व्यापारापासून फारच मोठा फायदा होत होता. म्हणून चोरून चीनमध्यें अफू आणावयाची आणि तिकडे कानाडोळा करण्यासाठीं चिनी अधिकाऱ्यांना लांच द्यावयाची हा क्रम या व्यापाऱ्यांनीं चालू ठेवला. त्यावर चिनी सरकारनें नियम केला, कीं आपल्या अधिकाऱ्यांनीं कोणाही परदेशी व्यापाऱ्याची भेट घ्यावयाची नाहीं. त्याचप्रमाणें कोणाही परदेशी व्यापाऱ्याला चिनी किंवा मांचू भाषा शिकविणें या मोठा गुन्हा समजून त्याला फार कडक शिक्षा ठरविण्यांत आली. पण या सगळ्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अफूचा व्यापार चालूच राहिला आणि पूर्वीपेक्षांही अधिक प्रमाणावर प्रचंड लांचलुचपतीचे प्रकार चालू झाले. पुढें १८३४ सालीं ब्रिटिश सरकारनें ईस्ट इंडिया कंपनीची चीनच्या व्यापारासंबंधीं मक्तेदारी नष्ट केली आणि सर्वांना हें व्यापाराचें क्षेत्र खुलें केलें. त्यानंतर तर ही परिस्थिति अधिकच बिघडली.

यानंतर एकदम अफूचा चोरटा व्यापार पुष्कळच वाढला. तेव्हां हा चोरटा व्यापार बंद करून टाकण्यासाठीं कडक उपाययोजना करण्याचें चीनच्या सरकारनें ठरविलें. या कामावर त्यांनीं एका श्रेष्ठ मनुष्याची योजना केली. त्याचें नांव लिन-चे श्री. चोरटा व्यापार दडपून टाकण्यासाठीं अधिकारी म्हणून याची नेमणूक करण्यांत आली. त्यानें मोठ्या उत्साहानें आणि झटपट उपाययोजना करण्यास सुरुवात केली. या सगळ्या बेकायदेशीर व्यापाराचें केंद्र चीनच्या दक्षिण किनाऱ्या-वरील कँटन हें बंदर होतें. त्या बंदरांत तो गेला आणि तेथील परदेशी व्यापाऱ्यांना त्यानें त्यांच्या जवळचा असेल तो सगळा अफूचा सांठा सरकारच्या हवालीं करण्याचा हुकूम दिला. सुरुवातीला व्यापाऱ्यांनीं हा हुकूम मानण्याचें नाकारलें. त्यावर लीननें सक्तीनें त्यांना तो हुकूम पाळण्यास लावलें. त्यानें या व्यापाऱ्यांना त्यांच्या त्यांच्या वखारींत कोंडून ठेवून बाहेरच्या जगाशीं त्यांचा संबंध तोडून टाकला; त्यांचे जे चिनी कामगार आणि नोकर होते त्यांना तेथून पळवून लावलें आणि बाहेरून वखारींत अन्न मुळींच जाणार नाहीं अशी व्यवस्था केली. अशा रीतीनें लीनचा हा जोरदारपणा आणि तिळभर कोठें मोकळें न सोडण्याची त्याची वृत्ति पाहून हे सर्व व्यापारी लीनला शरण आले आणि त्यांनीं आपल्याजवळील अफूचीं २०,००० खोकीं त्याच्या हवालीं केलीं. ही एवढी प्रचंड अफू चीनमध्यें चोरून विकली जावयाची होती ही गोष्ट उघडच आहे. लीननें ती सगळीच्या सगळी अफू नष्ट करून टाकली आणि कोणत्याही जहाजाच्या कप्तानानें आपण बंदरांतून अफू आणणार नाहीं अशी हमी दिली तरच




त्याच्या जहाजाला कँटन बंदरांत प्रवेश करूं दिला जाईल, नाहीं तर नाहीं; कप्तानानें ही हमी जर मोडली तर चिनी सरकार असें जहाज त्यावरील सर्व मालासह जप्त करील, असेंही लीननें त्या परदेशी व्यापाऱ्यांना बजाविलें. अफू-अंमलदार लीन हा आपल्या कामांत एवढेंसें सुद्धां न्यून ठेवणारा मनुष्य नव्हता. आपल्यावर सोंपविलेलें काम त्यानें अगदीं चोखपणें पार पाडलें; परंतु त्याच गोष्टीचा मोठा कठिण परिणाम चीनला सोसावा लागणार होता हें त्या बिचाऱ्याला ठाऊक नव्हतें.

तो परिणाम म्हणजे हा : यांतून ब्रिटनशीं युद्ध उद्भवलें; त्यांत चीनचा पराभव झाला; चीनला ब्रिटनशीं अपमानास्पद तह करावा लागला आणि जी अफू आपल्या देशांत येऊं नये म्हणून चिनी सरकारची ही सगळी खटपट होती, ती अफू त्यांच्या घशांत कोंबण्यांत आली. चिनी लोकांमध्यें अफूचें व्यसन असणें घातक आहे कीं हिताचें आहे या गोष्टीला यामध्यें काडीचें महत्त्व देण्यांत आलें नाहीं. या बाबतींत

चीनच्या सरकारचा काय करण्याचा उद्देश होता याचीही फारशी फिकीर करण्यांत आली नाहीं. महत्त्व जें कांहीं होतें तें फक्त एका गोष्टीला; ती म्हणजे चीनमध्यें चोरून अफू आणून विकण्यापासून ब्रिटिश व्यापाऱ्यांचे खिसे चांगलेच गरम होत होते ही होय, आणि या आपल्या लोकांच्या उत्पन्नाचें नुकसान व्हावें ही गोष्ट सहन करावयाला ब्रिटन तयार नव्हतें. अफू-अंमलदार लीन यानें नष्ट केलेली बहुतेक सगळी अफू ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या मालकीची होती. म्हणून राष्ट्रीय इज्जतीच्या नांवावर ब्रिटननें १८४० सालीं चीनशीं युद्ध सुरू केलें. या युद्धाला इतिहासात 'अफूचें युद्ध' हें नाव दिलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. कारण हें युद्ध लढून, जिंकून ब्रिटननें मिळवलें काय, तर चीनच्या घशांत त्याच्या इच्छेविरुद्ध अफू कोंबण्याचा हक्क !

ब्रिटिशांच्या आरमारी काफिल्यांनीं या युद्धांत कँटन बंदराची आणि इतरही ठिकाणांची कोंडी केली. तिचा चीनला कांहींच प्रतिकार करतां आला नाहीं. दोन वर्षें लढल्यानंतर चीनला नमावें लागून १८४२ सालीं नॉनकिंग येथें ब्रिटनशीं तह करावा लागला. या तहाप्रमाणें परदेशीय व्यापारासाठीं चीनचीं पांच बंदरें खुलीं करण्यांत आलीं, परदेशीय व्यापार म्हणजे खरोखर मुख्यतः अफूचा व्यापार होता; हीं पांच बंदरें म्हणजे. कँटन, शांघाय, अमॉय, निंगपो आणि फूंचौ हीं होत. या बंदरांना पुढें ट्रीटी पोर्ट्स—तहांतील बंदरें—असें नाव पडलें. कँटनजवळच हांगकाँग हें एक छोटेंसें बेट आहे. त्याचाही ब्रिटननें या तहाप्रमाणें कबजा केला आणि नष्ट केलेल्या अफूबद्दल व चीनवर ब्रिटननेंच ही जी लढाई लादली तिच्या खर्चाबद्दल म्हणून चीनकडून भली मोठी रक्कमही या तहाप्रमाणें ब्रिटननें उकळली.

अशा रीतीनें ब्रिटननें अफूच्या बाबतींत विजय मिळाविला. त्या वेळीं व्हिक्टोरिया राणीचें इंग्लंडमध्यें राज्य होतें. व्यक्तिशः तिच्याकडे एक खास खलिता लिहून चीनच्या बादशहानें अतिशय सौजन्यपूर्ण रीतीनें दाखविण्याचा यत्न केला, कीं हा जो अफूचा व्यापार चीनवर अशा रीतीनें लादण्यांत येतो आहे त्याचा चीनवर फारच भयंकर परिणाम होत आलेला आहे; परंतु व्हिक्टोरिया राणीनें या खलित्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. या बादशहाच्या मागचाच बादशहा चीन लुंग यानें अवघ्या पन्नास वर्षांपूर्वींच किती निराळ्या पद्धतीचें पत्र इंग्लंडच्या राजाला लिहिलें होतें !

अशा रीतीनें पश्चिमेकडील साम्राज्यशाही राष्ट्रांशीं कटकटी होण्याला सुरुवात झाली. आतांपर्यंत चीन देश जगाच्या या संघर्षापासून अलिप्त राहिला होता, तो काळ आतां संपला. आपल्या इच्छेविरुद्ध चीनला आता परदेशी व्यापाराचा स्वीकार करावा लागला; आणखी त्याच्या जोडीला ख्रिस्ती मिशनऱ्यांनाही आतां देशांत वाव द्यावा लागला. साम्राज्यशाहीच्या बिनीचें पथक या नात्यानें या मिशनरी लोकांनीं फारच महत्त्वाची कामगिरी बजावली. चीनला पुढल्या काळांत जे संकटाचे प्रसंग आले, त्या सर्वांच्या बुडाशीं या मिशनरी लोकांचें कांहीं ना कांहीं राजकारण होतेंच.

पुष्कळदां यांचें वर्तन अतिशय उर्मटपणाचें आणि चीड आणण्यासारखें, डोकें फिरवून टाकण्यासारखें असे. परंतु परदेशीयांवर चिनी न्यायकोर्टांत खटले करतां येत नव्हते; कारण नव्या तहांतील शर्तींप्रमाणें चिनी कायदा किंवा चिनी न्यायासन यांची त्यांच्यावर हुकमत चालत नव्हती. त्यांचे खटले फक्त त्याच्या स्वतःच्याच कोर्टांत चालावयाचे. याच हक्काला आणि पद्धतीला प्रादेशिकातीतत्व (Extra Territoriality) असें म्हटलें जातें. आजही परदेशीयांचा हा हक्क त्या ठिकाणीं चालू असून चिनी लोकांना या गोष्टीबद्दल फारच संताप वाटत असतो. विशेष म्हणजे हे मिशनरी लोक ज्यांना बाटवीत, ते नवे ख्रिस्ती लोकही या प्रादेशिकातीतत्वाच्या हक्काबद्दल आपला अधिकार सांगूं लागले. खरें पाहिलें असतां अशा प्रकारचा अधिकार न्यायानें त्यांना कोणत्याही प्रकारें नव्हता; पण अशा न्यायान्यायाची त्यांना थोडीच फिकीर होती! कारण एका मोठ्या साम्राज्यशाहीचा प्रतिनिधि असा मिशनरी या लोकांच्या पाठीशीं उभा होता. हे लोक खेड्यांचे आपापसांत तंटे लावीत आणि या गोष्टी कळून आल्या असतां संतापानें डोकीं फिरलीं म्हणजे हे खेडेगांवचे लोक किंवा इतरही लोक मिशनरी लोकांवर हल्ला करीत आणि केव्हां केव्हां त्यांना ठारही करीत. असें झालें कीं या मिशनऱ्यांसाठीं त्यांच्या मागची साम्राज्यशाही सत्ता या लोकांवर झडप घालावयाची आणि तिनें या कृत्याबद्दल लोकांचा सूड घ्यावयाचा. चीनमधल्या या मिशनऱ्यांच्या खुनाइतकी फायद्याची गोष्ट या यूरपीय साम्राज्यशाही राष्ट्रांना दुसरी कोणती क्वचितच झाली असेल! कारण असा प्रत्येक खून म्हणजे या लोकांना अधिकाधिक खास अधिकार मागण्याची आणि उकळण्याची महापर्वणीच!

चीनमध्यें या सुमारास एक अत्यंत भयंकर आणि अत्याचारमय असें बंड झालें; तेंही बाटून ख्रिस्ती झालेल्या एका इसमानेंच सुरू केलें. हें बंड म्हणजे तैपिंग बंड म्हणून इतिहासांत ज्याला म्हणतात तें. हुंग शी चुआन नांवाच्या अर्धवट वेड्या अशा गृहस्थानें हें बंड १८५० सालीं सुरू केलें. धर्मोपायीं डोकें फिरलेल्या या गृहस्थाला या कामांत यश मिळालें आणि "मूर्तिपूजकांना ठार करा!" ही त्याची घोषणा जिकडे तिकडे घुमूं लागली. या सत्रांत फारच लोक मारले गेले. या बंडानें जवळजवळ अर्धा चीन वैराण करून टाकला. सुमारें बाराएक वर्षांत या बंडांत कमींत कमी दोन कोटी लोक मारले गेले असा अंदाज आहे. या बंडाच्या उठावणीच्या बाबतींत किंवा त्यामध्यें झालेल्या या कत्तलीबद्दल ख्रिस्ती मिशनरी किंवा परकी राजसत्ता यांना जबाबदार धरणें हें मात्र मुळींच रास्त नाहीं. सुरवातीसुरवातीला या बंडाला मिशनऱ्यांचा पाठिंबा होता असें दिसतें, परंतु पुढें त्यांनीं हुंगचा व आपला कांहीं संबंध नाहीं हें जाहीर केलें. तथापि चीनच्या सरकारची अशी कायमची समजूत होऊन गेली, कीं या बंडाला जबाबदार हे ख्रिस्ती मिशनरी होत; ही जी त्यांची श्रद्धा, तिच्यावरून त्या काळीं आणि नंतरही मिशनऱ्यांच्या कामाचा चिनी लोकांना किती

तिटकारा वाटत असला पाहिजे याची आपल्याला कल्पना येईल. ख्रिस्ती मिशनरी म्हणजे धर्माचा आणि सद्भावनेचा संदेश आणणारा मनुष्य, असें त्यांना कधींच वाटलें नाहीं. ख्रिस्ती मिशनरी म्हणजे त्यांच्या दृष्टीनें साम्राज्यशाहीचा हस्तक. एका इंग्रज ग्रंथकारानें याबद्दल म्हटलें आहे, कीं "प्रथम मिशनरी, त्याच्या मागून वर तोफा असलेलें जहाज आणि त्याच्या मागून जमिनीची लूट–चिनी लोकांच्या मनांत ही इतिहास-परंपरा कायम ठसून गेलेली आहे." ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे. कारण चीनच्या भानगडींत या मिशनऱ्यांचा संबंध वारंवार आलेला आढळून येतो.

एका माथेफिरू, धर्मवेड्या माणसाच्या नेतृत्वाखालीं चाललेलें हें बंड पुरें मोडलें जाण्यापूर्वी त्याला इतका धुमाकूळ घालायला सांपडावा ही खरोखर अलौकिक गोष्ट आहे. हें असें होऊं शकलें याचें खरें कारण म्हणजे चीनमधील जुनी समाजपद्धति आतां अगदीं मोडकळीस आलेली होती हें आहे. मला वाटतें, माझ्या चीनवरच्या मागच्याच पत्रांत मीं तुला चीनमधील करांचें अवजड ओझें, बदलती आर्थिक परिस्थिति आणि लोकांमधील वाढता असंतोष यांविषयीं लिहिलेलें आहे. मांचु घराण्याच्या राज्या-विरुद्ध जागोजाग गुप्त मंडळ्या स्थापन होऊं लागल्या होत्या आणि वातावरणांत बंडाचें वारें उठूं लागलें होतें. परदेशी मालाचा व्यापार म्हणजे अफू वगैरे मालांचा व्यापार सुरू होऊन त्यामुळें ही परिस्थिति अधिकच बिघडली. चीनमध्यें यापूर्वीच्या काळांतही परदेशी मालाचा व्यापार होतच होता; नाहीं असें नाहीं. परंतु आतांची त्यासंबंधींची परिस्थिति बदललेली होती. पश्चिमेकडील देशांत मोठ्या यंत्रांवर चालणाऱ्या कारखान्यांत माल फारच जलद निर्माण होत होता आणि हा सगळाच माल घरच्या घरीं खपविणें अशक्य होतें. त्यामुळें या लोकांना बाहेर बाजारपेठा मिळविणें हें आवश्यक होऊन बसलें होतें. हिंदुस्थानांत आणि त्याचप्रमाणें चीनमध्येंही आपल्या मालाला पेठ मिळावी म्हणून जी खटपट झाली तिच्या पाठीमागची खरी प्रेरणा ही या प्रकारची होती; पण या मालाच्या व्यापारामुळें, विशेषतः अफूच्या व्यापारामुळें, जुन्या ज्या परंपरा होत्या त्या सर्व गड-गडल्या आणि त्यामुळें आर्थिक गोंधळ अधिकच माजला. हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच चीनमध्येंही आतां वस्तूंच्या किंमतींवर जागतिक किंमतींचा परिणाम होऊं लागला. या सर्व प्रकारामुळें लोकांच्या असंतोषांत आणि दुर्दशेंत भरच पडली आणि त्यामुळें तैपिंग बंडाला जोर चढला.

पाश्चात्य राष्ट्रांचा उर्मटपणा चीनमध्यें वाढतच चालला होता आणि तेथील राजकारणांत त्यांचा हात अधिकाधिक घुसूं लागला होता; अशा त्या काळांत चीनची अवस्था ही अशा प्रकारची होती. त्यामुळे या पाश्चात्य राष्ट्रांच्या मागण्यांना विरोध दर्शविण्यासाठीं किंवा अटकाव करण्यासाठीं चीनला विशेष कांहीं करतां आलें नाहीं, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. चीनमधील अंतर्गत गोंधळ आणि अडीअडचणी यांचा फायदा घेऊन या यूरपीय राज्यांनीं आणि पुढच्या काळांत जपाननेंही चीनपासून कित्येक खास हक्क आणि प्रदेशही सक्तीनें कसे मिळविले तें आतां यापुढें आपल्याला दिसेलच. परकी

सत्तांमध्यें आपसांत चुरस नसती, एकमेकांबद्दल त्यांच्यांत हेवादावा नसता, तर चीनची दशाही हिंदुस्थानसारखीच व्हायची होती. तो देशही जपान आणि पाश्चात्य राजसत्तांपैकीं एक-दोन राजसत्ता यांचा गुलाम देश घेऊन राहता.

एकोणिसाव्या शतकांतील चीनमधील घडामोडींच्या मागची ही सामान्य भूमिका, आर्थिक बजबजपुरी, तैपिंग बंड, मिशनरी लोक आणि परकयानीं केलेलें आक्रमण यांविषयीं सांगतां सांगतां माझ्या गोष्टीचें मुख्य सूत्र सोडून मी जरा दूर भटकल्या-सारखा झालों आहें; परंतु हें सगळें थोडें थोडें माहीत असल्याशिवाय काय काय प्रसंग घडले याची नुसतीच हकिकत नीटपणें मनांत ठसणार नाहीं. इतिहासांतील निरनिराळ्या घटनांची संगति चांगली ध्यानांत येण्यासाठींसुद्धां या गोष्टी थोड्या थोड्या माहीत असणें आवश्यक आहे. कारण इतिहासांतील घटना म्हणजे कांहीं उगीच कांहीं तरी अलौकिक चमत्कार नसतात. त्या घडून येण्यासाठीं आधीं किती तरी कारणपरंपरा लागून राहिलेली असते. आतां हें खरें, कीं पुष्कळदा हीं कारणें अगदींच पाहतांक्षणीं ध्यानांत येत नाहींत. वर वर ज्या गोष्टी आपणांला दिसतात, त्यांच्याखालीं खोल हीं कारणें दडलेलीं असतात कितीकदां. चीनचें मांचू घराण्यांतील राज्यकर्त्यांचें उदाहरणच पहा. परवांपरवांपर्यंत आपण एवढे सामर्थ्यवान् आणि श्रेष्ठ दर्जाचे होतों आणि एकाएकीं आपलें भाग्यचक्र हें असें फिरलें तरी कसें, याचा त्यांना केवढा तरी अचंबा वाटला असेल! या घटनेचा अर्थच त्यांना समजला नाहीं. परंतु या घटनेचीं बीजें आणि मुळवा आपल्याच पूर्व इतिहासांत आहेत ही गोष्ट बहुधा त्यांच्या ध्यानांत आली नसावी. पाश्चिमात्य देशांतील औद्योगिक प्रगति आणि तिच्या परिणामामुळें चीनच्या आर्थिक व्यवस्थेची उडालेली दाणादाण ही कार्यकारणसंगति त्यांना उमगलीच नाहीं. म्हणून या रानटी परकीय लोकांची ही आगंतुक ढवळाढवळ त्यांना संतापजनक वाटली. या ढवळाढवळीला उद्देशून त्या काळच्या चीनच्या बादशहानें एका गोड जुन्या चिनी म्हणीचा उपयोग केला. तो म्हणाला, " माझ्या अंथरुणाशेजारीं मी कोणाला घोरूं देणार नाहीं! " चिनी लोकांच्या प्राचीन पवित्र ग्रंथांतील दूरदृष्टि, चातुर्य आणि विनोदबुद्धि यांमुळें चिनी लोकांच्या ठिकाणीं एक प्रकारचा गंभीर आत्मविश्वास आणि कसल्याही संकटाच्या प्रसंगीं टिकून राहणारें विशाल धैर्य, हीं पुष्कळ निर्माण झालीं होतीं खरीं; पण या गोष्टी परकी लोकांना पिटाळून लावण्याला पुरेशा नव्हत्या.

नानकिंगच्या तहानें ब्रिटनला चीनचा दरवाजा खुला झाला; परंतु हा लोण्याचा गोळा कांहीं एकट्या ब्रिटनच्या वांट्याला येणार नव्हता. फ्रान्स आणि अमेरिका यांनींही येथें प्रवेश करून चीनशीं व्यापारी तहनामे केले. चीनला नाइलाजानें हे तहनामे करणें भागच होतें. त्याचा निरुपायच होता. पण अशा रीतीनें स्वतःवर जबर-दस्ती करणाऱ्या परकी लोकांबद्दल चीनला आदर किंवा आपलेपणा वाटणें अशक्य होतें. आपल्या देशाला या रानटी लोकांचा पाय लागावा ही गोष्टच मुळीं चिनी लोकांना संतापजनक होती. इकडे या परकी लोकांचें मात्र झालें एवढ्यावर मुळींच समाधान नव्हतें.

चीनची पिळवणूक करण्याचा त्यांचा लोभ वाढत्याच प्रमाणावर होता. या बाबतींतही पहिलें पाऊल पुन्हां ब्रिटननेंच टाकलें.

चीन देश तैपिंग बंड मोडून काढण्यांत गुंतलेला; त्यामुळें परकी लोकांना आपले हातपाय पसरायला हा मोठा अनकूल काल होता. कारण चीनजवळ त्यांना प्रतिकार करण्याची ताकद नव्हती. तेव्हां युद्धासाठीं कांहीं निमित्त शोधून काढायला ब्रिटिश लोकांनीं सुरुवात केली. १८५६ मध्यें कँटनमधील चिनी राजप्रतिनिधीनें एका जहाजावरील चिनी खलाश्यांना चाचेगिरीच्या गुन्ह्याबाबत अटक केली. हें जहाज चिनी लोकांच्याच मालकीचें होतें. त्यांत कोणाही परदेशी लोकाचा संबंध नव्हता; परंतु हाँगकाँग येथें ब्रिटिशांचें जें राज्य होतें, त्या राज्याचा या जहाजाला आपल्या बंदरांत व्यापारासाठीं जाण्याचा परवाना होता. त्या परवान्याचें निदर्शक म्हणून ब्रिटिशांचेंही एक निशाण या जहाजावर होतें. खरी गोष्ट तर अशी होती, कीं या अटकेच्या वेळीं परवान्याची मुदतही संपून गेलेली होती. तरी पण "तूं नाहीं तर तुझ्या बापानें" असें त्या कोंकराला म्हणालेल्या लांडग्याची गोष्ट आहे ना? त्या लांडग्याप्रमाणें ब्रिटिश सरकारनें युद्धाला हें निमित्त केलें.

इंग्लंडमधून चीनकडे सैन्य पाठविण्यांत आलें. याच वेळीं १८५७ चें हिंदी लोकांचें बंड उद्भवलें. त्यामुळें हें सगळें सैन्य चीनऐवजीं हिंदुस्थानांत आणावें लागलें. बंड मोडून टाकीपर्यंत चीनचें युद्ध तहकूब करावें लागलें. म्हणून चीनशीं दुसरें युद्ध १८५८ मध्यें सुरू झालें. या युद्धांत भाग घेण्यासाठीं फ्रान्सलाही या वेळपर्यंत एक निमित्त सांपडले होतें. कारण म्हणे चीनमध्यें कोठें तरी एका फ्रेंच मिशनऱ्याचा खून झाला होता. तेव्हां इंग्रज आणि फ्रेंच, दोघांनीं मिळून चिनी लोकांवर झडप घातली. चिनी लोक बिचारे तैपिंग बंड मोडून काढण्यात सर्वस्वीं गुंतून गेलेले होते. ब्रिटिश आणि फ्रेंच सरकारांनीं या युद्धांत येऊन मिळण्याबद्दल अमेरिका आणि रशिया यांनाही बळविण्याची खटपट केली; पण हे देश या गोष्टीला कबूल झाले नाहींत. तथापि युद्धांत आणि नंतर जी लूट मिळेल तिच्यांत मात्र भागीदारी करायला या राष्ट्रांची पूर्ण तयारी होती. या युद्धांत प्रत्यक्ष हातघाईची लढाई अशी झालीच नाहीं आणि या चारही राष्ट्रांशीं चीनला नवीन तहनामे करावे लागून त्यांत या राष्ट्रांनीं चीनपासून आणखी कांहीं खास हक्क लुबाडून घेतले. परदेशाच्या व्यापारासाठीं चीनचीं आणखी कांहीं बंदरें खुलीं करण्यात आलीं.

पण चीनच्या दुसऱ्या युद्धाची गोष्ट एवढ्यानें संपली नाहीं. या नाटकाचा अजून एक अंक व्हायचा होता आणि त्याचा परिणाम अधिकच भयंकर दुःखद झाला. दोन पक्षांत वाटाघाटीमध्यें ठरून तहनाम्यावर परस्परांचे प्रतिनिधी जेव्हां सह्या करतात तेव्हां अशीच समजूत असते, कीं त्या त्या देशांच्या सरकारांकडून तहनाम्याला मान्यता ही मिळायचीच. तेव्हां या नव्या तहनाम्याच्या अखेरच्या शिक्कामोर्तबाचें हें काम एका वर्षाच्या आंत पेकिंग येथेंच व्हावें असें ठरलें. या प्रसंगाची वेळ जशी

आली, तसा रशियाचा वकील जमीनमार्गानेंच पेकिंग येथें येऊन दाखल झाला. बाकीच्या तीन राष्ट्रांचे प्रतिनिधी जलमार्गानें आले आणि आपलींच जहाजें पै नदींतून थेट पेकिंगपर्यंत आणावीं असा त्यांचा विचार होता. पेकिंग शहरावर याच वेळीं तैपिंग बंडवाल्या लोकांकडून हल्ला होण्याची भीति उत्पन्न झालेली होती आणि म्हणून पै नदी-वर मोर्चे वगैरे बांधून कडेकोट बंदोबस्त करण्यात आलेला होता. म्हणून चिनी सरकारनें या ब्रिटिश, अमेरिकन आणि फ्रेंच वकिलांना नदीमार्गानें न येतां, नदीच्या उत्तर अंगच्या जमीनमार्गानेंच येण्याची विनंति केली.

ही विनंति कोणत्याही प्रकारें अयोग्य नव्हती. अमेरिकन वकिलानें ती विनंति मान्यही केली. परंतु ब्रिटिश आणि फ्रेंच वकिलांना मात्र ही साधी सरळ गोष्ट पटली नाहीं. नदीवरील मोर्चेबंदीची पर्वा न करतां या वकिलांनीं जबरदस्तीनें नदींतून प्रवास करण्याचा प्रयत्न केला. चिनी लोकांनीं त्यांच्यावर गोळीबार केला आणि त्यांचें फार मोठें नुकसान करून त्यांना मागें परतविलें.

पण उद्धटपणानें आणि फाजील अहंभावानें पिसाटलेलीं हीं राष्ट्रें ज्या ठिकाणीं केवळ प्रवासाचा मार्ग बदलण्याची साधीशी चिनी सरकारची विनंति मान्य करावयास तयार नव्हतीं, तीं काय हा प्रकार सहन करणार ? त्यांनीं त्याचा सूड घेण्यासाठीं आणखी सैन्य पाठविलें. १८६० सालीं हीं सैन्यें प्राचीन पेकिंग शहरावर चालून गेलीं आणि या शहरांतील एका साऱ्या जगामधील अत्यंत अलौकिक अशा इमारतीचा नाश करून जाळून, लुटून त्यांनीं आपल्या सूडाची भावना शांत केली. ही इमारत म्हणजे बादशहा चीन लुंग याच्या कारकीर्दींत बांधलेला युआन-मिंग-युआन या नांवाचा बादशहाच्या ग्रीष्म ऋतूंतील निवासस्थानाचा प्रासाद होय. चीन देशांतील अत्युत्कृष्ट आणि अत्यंत दुर्मीळ अशा वाङ्मयरत्नांचा आणि कलाकौशल्याचा खजिनाच जणुं या प्रासादामध्यें सांठविलेला होता. तांब्याचीं अत्यंत सुंदर अशीं प्राचीन काळचीं भांडीं त्या ठिकाणीं होतीं. मन थक्क करून टाकण्यासारखीं मोहक चिनी मातीचीं भांडीं, अत्यंत दुर्मीळ असे हस्तलिखित ग्रंथ, चित्रें, आणि आज हजार वर्षें चीन देश ज्याकरितां प्रसिद्ध आहे अशा अनेक प्रकारच्या चमत्कारिक खेळांच्या वस्तू आणि कौशल्याचे पदार्थ त्या वाड्यामध्यें ठेवलेले होते. इंग्रज आणि फ्रेंच सैनिक हे तर पडले नुसते अडाणी, रानटी फोड-तोड करणारे लोक! त्यांनीं हा कलाकौशल्याचा खजिना लुटला, आणि त्यातील वस्तू मोडूनतोडून त्यांच्या प्रचंड होळ्या कितीक दिवसपर्यंत पेटत्या ठेवल्या! अशा स्थितींत हजारों वर्षें उच्च संस्कृतीमध्यें मुरलेल्या चिनी लोकांना ही सगळी फोडाफोड आणि रानदांडगेपणा पाहून अंतःकरणांत अत्यंत तीव्र दुःख झालें आणि हे अडाणी मोडतोड करणारे लोक निव्वळ मोडतोड करण्याचीच अक्कल असलेले रानटी लोक आहेत असें त्यांना वाटलें, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. या लोकांना पाहून प्राचीन काळच्या मोड-तोड करणाऱ्या हूण आणि मंगोलियन आणि इतर रानटी लोकांची, आठवण त्यांना झाली असल्यास नवल कसलें!

परंतु चिनी लोकांना आपल्याबद्दल काय वाटेल याबद्दल या रानटी लोकांना काडीचीसुद्धां पर्वा नव्हती. आपल्या बोटींवर असलेल्या तोफा आणि आपलीं आधुनिक शस्त्रास्त्रें यांच्या जोरावर त्यांना कोणाच्या रागालोभाची भीति वाटत नव्हती. तेव्हा शेंकडों वर्षेंपर्यंत जमा केलेली अशी दुर्मीळ कलाकौशल्याची मौल्यवान् संपत्ति पार नष्ट झाली तरी त्यांना त्याचें काय होतें? चिनी लोकांच्या कलेची आणि संस्कृतीची त्यांना काय किंमत? ते म्हणत :—

कशाचीही अम्हां नाहीं पर्वा जों जवळी असे
बंदूक मॅक्झिमाची ही, जी त्यांच्याजवळी नसे !

## ११५
## अडचणींत सांपडलेला चीन देश

२४ डिसेंबर, १९३२

मागच्या पत्रामध्यें मीं तुला ब्रिटिश आणि फ्रेंच लोकांनीं १८६० मध्यें पेकिंग येथील चिनी बादशहाचा अपूर्व सुंदर असा ग्रीष्मऋतूंत राहण्यासाठीं बांधलेला राजवाडा कसा नष्ट करून टाकला हें सांगितलें. हा नाश कशासाठीं केला, तर म्हणे चिनी लोकांनीं युद्धतहकुबीच्या निशाणाचा तहकुबी मोडून अपमान केला म्हणून. असें धरून चालूं या, कीं कांहीं चिनी लोकांनीं अशा रीतीनें युद्ध-तहकुबीचा भंग करण्याचा अपराध केला; परंतु तेवढ्यासाठीं ब्रिटिश आणि फ्रेंच लोकांनीं एवढें प्रचंड नास-धुसीचें काम अगदीं जाणूनबुजून करावें ही खरोखर माणसाच्या कल्पनेला आकलन न होणारी अशी गोष्ट आहे. बरें, हा प्रकार कांहीं कोणा अडाणी शिपायांच्या हातून अवचित घडला असेंही नव्हे. तर अगदीं अधिकारी लोकांकडून हें काम करण्यांत आलें. अशा या गोष्टी कां बरें घडत असाव्यात? इंग्रज आणि फ्रेंच लोक तर चांगले सुधारलेले आणि सुसंस्कृत असे आहेत. आधुनिक मानवी सुधारणेचे तर ते पुढारी आहेत. आणि तरीसुद्धां खाजगी जीवनांत मोठे सदाचरणी आणि सुबुद्धीनें वागणारे हे लोक सार्वजनिक व्यवहारांत किंवा इतरांशीं होणाऱ्या झगड्यांत मात्र आपली सर्व सुधारणा आणि सदाचरणप्रवृत्ति पार विसरून जातांना दिसतात. व्यक्तीव्यक्तींतील परस्परांची खाजगी वागणूक आणि राष्ट्राराष्ट्रांतील परस्पर-व्यवहार यांमध्यें जो फरक दिसून येतो, तो खरोखरच मोठा चमत्कारिक आहे. लहान मुलांमुलींना रोज शिकवलें काय जातें, तर फाजील स्वार्थी होऊं नका; दुसऱ्याच्या हिताची नेहमीं जाणीव ठेवा; कोणाशींही सरळ वर्तन करा. साऱ्या आपल्या शिक्षणाचें धोरण आपल्या मनावर हा धडा बिंबविण्याचें आहे. आणि थोड्याशा प्रमाणांत आपल्या आंगवळणीं हा धडा पडतोही;

परंतु एकदां युद्ध सुरू होऊं द्या, कीं मग हा लहानपणापासून शिकलेला धडा आम्ही पार विसरून जातों, आणि आमच्या ठिकाणची पशुवृत्ति डोकें वर काढते. तात्पर्य, या स्थितींत चांगले सदाचरणी असणारे लोकसुद्धां पशूंसारखें वागूं लागतात.

खरें, हा प्रकार परस्परांशीं संबंध नसलेल्या परकी देशांशींच युद्धें चालू असतांना होतो असें कांहीं नव्हे. फ्रेंच आणि जर्मन राष्ट्रें हीं तर मूळचीं एकाच वंशाच्या लोकांचीं; परस्परांच्या लाग्याबांध्याचीं; परंतु त्यांच्यामध्येंही लढाईच्या वेळीं हीच पाशवी वृत्ति आढळून येते. अर्थात्, भिन्न भिन्न वंशांत लढाईचा प्रसंग असतो तेव्हां तर या वृत्तीचा फारच कटु अनुभव येतो. उदाहरणार्थ, यूरपीयन लोकांचा आशिया आणि आफ्रिका खंडांतील मानववंशांशीं सामन्याचा जेव्हा जेव्हां प्रसंग येतो तेव्हां. एक तर या भिन्न भिन्न वंशांच्या लोकांना एकमेकांची नीटशी ओळख नसते; कारण दोघांचेही व्यवहार एकमेकांना कधीं पहायला मिळालेले नसतात. आणि जेथें परस्परांबद्दल अज्ञान आहे त्या ठिकाणीं परस्परांबद्दल बंधुभावना निर्माण होणें अशक्य आहे. अशा स्थितींत वांशिक द्वेषभावना आणि कटुता हीं उलट वाढतच जातात आणि अशा दोन वंशांत जेव्हां झगडा उत्पन्न होतो, त्या वेळीं हें युद्ध नुसत्या राजकीय स्वरूपाचें राहत नाहीं, तर त्यांत वांशिक विरोधाचें मोठें भूत उत्पन्न होतें. हें लक्षांत घेतलें म्हणजे १८५७ सालच्या हिंदी बंडातील भयंकर अत्याचार आणि यूरपमधील बलिष्ठ राज्यांनीं आशिया आणि आफ्रिका खंडात केलेली वृथा नासधूस आणि क्रूर कृत्यें यांचें कारण थोडेंफार समजूं शकतें.

हा सगळा प्रकार किती खेदकारक आणि मूर्खपणाचा वाटतो! पण एका राष्ट्राची दुसऱ्या राष्ट्रावर, एका समाजाची दुसऱ्या समाजावर, एका वर्गाची दुसऱ्या वर्गावर सत्ता चालू असली म्हणजे असंतोष, घासाघीस आणि बंडें निर्माण होणें आणि ज्यांची पिळणूक होते अशा राष्ट्रांनीं, समाजांनीं अथवा वर्गांनीं पिळणूक करणाराला उखडून लावण्याचा प्रयत्न करणें ही अपरिहार्य गोष्ट आहे. परंतु एकानें दुसऱ्याची पिळणूक करायची हा तर आजच्या आमच्या समाजाचा प्रत्यक्ष पायाच आहे. यालाच भांडवल-शाही हें नांव असून तिच्यांतूनच साम्राज्यशाहीचा उदय झालेला आहे.

एकोणिसाव्या शतकामध्यें मोठीं यंत्रें आणि औद्योगिक प्रगति यांमुळें पश्चिम यूरप खंडांतील राष्ट्रें आणि अमेरिका हे देश सधन आणि सामर्थ्यवान् झालेले होते. त्यामुळें त्यांना वाटूं लागलें, कीं आपण म्हणजे साऱ्या पृथ्वीचे मालक असून जगांतील बाकी सगळे वंश आपल्याहून कमी दर्जाचे आहेत; आणि म्हणून त्यांनीं आपल्यासाठीं जग मोकळें करून दिलें पाहिजे. निसर्गांतील कांहीं कांहीं शक्तींवर त्यांनीं ताबा मिळविल्यामुळें हे लोक इतरांशीं उद्दामपणानें आणि अपमानकारक रीतीनें वागूं लागले होते. सुधारलेल्या माणसानें निसर्गशक्तीवर ताबा मिळविला म्हणजे त्याचें काम संपत नाहीं. त्यानें आपल्या स्वतःच्या प्रवृत्तीवरही असाच ताबा मिळविणें आवश्यक आहे, ही गोष्ट हे लोक विसरून गेले, आणि याचमुळें एकोणिसाव्या शतकामध्यें आपण पाहतों कीं

चांगले पुढारलेले मानववंश, पुष्कळच बाबतींत इतरांपेक्षां किती तरी पुढचा पल्ला गांठलेले लोक, पुष्कळदां मागासलेल्या वन्य जातींना लाज वाटावी अशा रीतीनें वागले. तेव्हां यूरपमधील लोक, आशिया आणि आफ्रिका खंडांतील लोकांशीं गेल्या शतकांतच केवळ नव्हे, तर आजच्या घटकेलाही असे कां वागतात, हें एवढ्यावरून आतां कदाचित् थोडेंसें तुझ्या लक्षांत आलें असेल.

मात्र, यूरपीयन लोकांची आपल्या लोकांशीं किंवा इतर कोणा लोकांशीं तुलना करून त्यांच्यापेक्षां आम्ही लोक कोणी मोठे अधिक चांगले लोक आहोंत, असें दाखविण्यासाठीं मी हें लिहितों आहें असें मात्र समजूं नकोस. माझा तसा तिळमात्र उद्देश नाहीं. जगांतील सर्व लोकांच्या ठिकाणीं असे मान खालीं घालायला लावण्याजोगे प्रकार असतात. आमच्या ठिकाणचे हे प्रकार तर विशेषच वाईट आहेत; तसें नसतें तर आज ज्या हीन दशेला आम्ही जाऊन पोहोंचलों आहोंत, इतक्या हीन दशेला आम्ही आलोंच नसतों.

आतां पुन्हां चीनकडे आपण जाऊं या. चीनच्या बादशहाचा ग्रीष्मप्रासाद नष्ट करून इंग्रज आणि फ्रेंच लोकांनीं आपल्या सामर्थ्याची चुणूक चीनला दाखविलीच होती. आतां या गोष्टीचा फायदा घेऊन चीनला यापूर्वीं झालेले सर्व तहनामे मान्य करावयाला तर त्यांनीं भाग पाडलेंच; पण आणखीही कांहीं खास सवलती चीनकडून त्यांनीं सक्तीनें उकळल्या. आतां त्या तहाप्रमाणें शांघाय बंदरांतील चिनी जकातखात्याचा सगळा कारभार चिनी सरकारला परकीय अधिकाऱ्यांच्या हातांत द्यावा लागला; या खात्याला Imperial Maritime Customs बादशाही जलमार्ग-जकातखातें असें नांव देण्यांत आलें.

दरम्यान ज्या तैपिंग बंडामुळें चीनचें सामर्थ्य खची झालें होतें आणि ज्यानें परकी लोकांना चीनमध्यें हातपाय पसरायला संधि मिळवून दिली होती, तें तैपिंग बंड अद्यापि रखडत रखडत पण चालूच होतें. अखेरीस १८६४ मध्यें लि हुंग चँग नांवाच्या एका प्रांताधिकाऱ्यानें हें बंड कायमचें निकालांत काढलें. हा पुढें चीनचा एक प्रमुख मुत्सद्दी म्हणून उदयास आला.

अशा रीतीनें फ्रान्स आणि इंग्लंड देश चीनकडून अत्याचारी मार्गानें असे खास हक्क आणि सवलती उकळीत होते, अशा वेळीं उत्तरेकडे रशियानें शांततेच्या मार्गानें मोठा नांव घेण्यासारखा लग्गा साधला. थोड्याच वर्षांपूर्वीं कॉन्स्टान्टिनोपलचा कबजा मिळविण्याच्या लोभानें रशियानें यूरप खंडांतच तुर्कस्तानवर स्वारी केली होती. रशियाच्या वाढत्या सामर्थ्याची भीति वाटून इंग्लंड आणि फ्रान्स देश हे त्या वेळीं तुर्कस्तानला मिळाले होते आणि त्यांनीं मिळून क्रीमियन युद्ध या नांवानें प्रसिद्ध असलेल्या इ. स. १८५४ ते ५६ मधील युद्धांत रशियाचा पराभव केला होता. पश्चिमेच्या बाजूला असा पराभव झाल्यामुळें रशियानें आपली नजर पूर्वेच्या बाजूला वळविली आणि या बाजूस रशियाला चांगलेंच यश मिळालें. रशियानें शांततेच्या

मार्गानेंच चीनचें मन वळवून ईशान्येकडील कोपऱ्यांतील समुद्रालगतचा एक प्रांत चीनकडून आपल्या स्वाधीन करून घेतला. याच प्रातात व्हाडिवोस्टोक हें शहर आणि बंदर होतें. रशियाला हा जो मोठाच फायदेशीर लग्गा साधला त्याचें श्रेय मुरावीफ नावाच्या एका तरुण रशियन अंमलदाराकडे होतें. अशा रीतीनें तीन वर्षेपर्यंत युद्ध करून आणि नासधूस करून इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं जें कांहीं मिळविलें, त्यापेक्षां कितीतरी अधिक रशियानें निव्वळ सलोख्याच्या मार्गानें मिळविलें.

१८६० मध्यें अशी ही परिस्थिति होती. ज्या मांचू घराण्याच्या बादशहाचें वर्चस्व अठराव्या शतकाच्या अखेरीस जवळजवळ अर्ध्या आशिया खंडभर पसरून गाजत होतें, त्याला आतां अवनत आणि हीन दशा प्राप्त झाली. एकीकडे बाहेरून लांबहून आलेल्या पश्चिमेकडील यूरपीय राजसत्तांनीं या साम्राज्याचा पराभव करून त्याला आपल्यापुढें वांकविलें; तर इकडे आंतल्या बाजूनें बंडामुळें हें सगळें साम्राज्यच उलथून पडण्याच्या बेताला आलें होतें. यामुळें साऱ्या चीन देशभर खालपासून वरपर्यंत फार मोठी खळबळ माजली. होतो आहे हा प्रकार कांहीं एकंदरीनें ठीक नव्हे हें सर्वांनाच कळून चुकलें आणि बदलती परिस्थिति व परकीय आक्रमणाचें संकट या दोन्ही दृष्टींनीं देशाची नवी घडी बसविण्याच्या हेतूनें थोडाफार प्रयत्न सुरू झाला. तेव्हां हें १८६० साल म्हणजे चीनमधील एका नवीन युगाच्या प्रारंभींचें साल म्हटलें पाहिजे. कारण एव्हांपासून परकीय आक्रमणाला विरोध करून अटकाव करण्याची तयारी चीननें सुरू केली. चीनचा शेजारी जपान देश हाही याच सुमारास नेमका याच कामांत गुंतलेला होता. त्याचेंही उदाहरण चीनपुढें कित्ता गिरविण्यासाठीं म्हणून होतेंच. जपान देश चीनपेक्षां फारच मोठ्या प्रमाणांत या कामांत यशस्वी झाला; परंतु चीननेंही कांहीं काळपर्यंत या परकीय सत्तांना थोपवून धरलें.

प्रथम चीननें बार्लिंगेम नांवाच्या एका अमेरिकन गृहस्थाच्या नेतृत्वाखालीं एक वकीलमंडळ या तहनाम्यांतील प्रतिस्पर्धी राष्ट्रांकडे पाठविलें. हा बार्लिंगेम चीनचा मोठा कळकळीचा मित्र होता. त्यानें या परकी राष्ट्रांकडून तहनाम्यांतील अटी थोड्याशा सौम्य करून घेतल्या. १८६८ मध्यें चीन आणि अमेरिका यांच्यामध्यें एका नवीन तहनाम्यावर सह्या झाल्या. या तहामधील एक मोठी लक्षांत राहण्यासारखी गोष्ट म्हणजे चिनी सरकारनें अमेरिकन सरकारवर मेहेरबानी म्हणून चिनी मजुरांना परदेशीं अमेरिकेंत जाण्याला परवानगी देण्याची सवलत कबूल केली. अमेरिकेचें या वेळीं आपली पॅसिफिक समुद्राच्या किनाऱ्यावरील पश्चिमेकडील संस्थानें वाढवून समृद्ध करण्याचें कार्य चालू होतें. हें काम विशेषतः कॅलिफोर्नियामध्यें या सुमारास चालू झालें होतें. अमेरिकेंत या कामासाठीं मजुरांचा तुटवडा होता, म्हणून अमेरिकेनें चिनी मजुरांची आयात सुरू केली. परंतु यामधून नवीनच एक भानगड उपस्थित झाली. इतकी स्वस्त मजुरी पत्करून अमेरिकेंत काम करावयास येणारे चिनी कामगार तिकडे

आणण्याला अमेरिकन लोकच विरोध करूं लागले आणि त्यामुळें चिनी आणि अमेरिकन सरकारांत तक्रार उत्पन्न झाली.

पुढें तर अमेरिकन सरकारनें चिनी लोकांना अमेरिकेंत यावयाला बंदीच केली. चिनी लोकांना या अपमानास्पद वागणुकीचा राग येऊन त्यांनीं अमेरिकन मालावर बहिष्कार घालण्यास सुरुवात केली. पण ही सगळी हकिकत बरीच लांबलचक असून तिच्यांतून आपल्याला विसाव्या शतकांत प्रवेश करावा लागतो. म्हणून ती तशीच इथें सोडून देऊं या.

तैपिंग बंडाचा मोड होतो न होतो तोंच, माञ्चू घराण्याच्या राजाविरुद्ध एक बंड उद्भवलें. हें बंड प्रत्यक्ष चीनमध्यें नव्हतें; तर दूर तिकडे पश्चिमेस, आशियाच्या मध्यभागीं तुर्कस्तानांत झालेलें होतें. या भागांत वस्ती बहुतेक सर्व मुसलमानांची होती. या मुसलमान टोळ्यांनीं याकूब बेग नांवाच्या आपल्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं १८६३ सालीं बंड केलें व चिनी अधिकाऱ्यांना तेथून हांकलून लावलें. या केवळ एका स्थानिक बंडाचें महत्त्व आपल्या गोष्टींत दोन प्रकारांनीं आहे. एक तर या बंडाचा फायदा घेऊन रशियानें चीनचा कांहीं प्रदेश हस्तगत करण्याचा प्रयत्न केला. चीन देश अडचणींत सांपडलेला दिसला रे दिसला, कीं अशी कांहीं तरी धाड घालावयाची हा तर आतां यूरपियन राष्ट्रांचा नेहमींचा शिरस्ताच होऊन गेलेला होता. परंतु या वेळीं असा प्रदेश देण्याचें चीननें नाकारलें; एवढेंच नव्हे, तर थोडाफार जो मुलूख रशियानें बळकावला होता तोही चीननें रशियाला परत ओकावयाला लावला. यामुळें मात्र जगांत सगळ्यांनाच मोठें आश्चर्य वाटलें! हें सगळें चिनी सेनापति चो चुंग तंग यानें याकूब बेगविरुद्ध जी विचित्र पद्धतीची मोहीम केली तिच्यामुळें घडून आलें. या सेनापतीनें आपल्या मोहिमेचा कारभार सगळाच मोठा थंडपणानें चालविला. बंडखोरांपर्यंत जाऊन पोंचायला त्यानें कितीक वर्षें घालविलीं. दोनदां तर त्यानें आपल्या सैन्याचे भले लांब मुक्कामच टाकून शेतीची मेहनत-मशागत करून पेरणी केली आणि आपल्या सैन्याला रसद म्हणून धान्यसुद्धां पिकविलें! सैन्याच्या खाद्यपेयांची तजवीज करणें ही गोष्ट केव्हांही झाली तरी एक अतिशय जिकिरीची बाब असते. चो चुंग तंगच्या सैन्याला तर सगळें गोबीचें वैराण मैदान ओलांडून जावयाचें होतें. त्यामुळें त्याच्यापुढें तर हा रसदीचा प्रश्न फारच मोठा बिकट होता. हा प्रश्न या सेनापतीनें वरच्याप्रमाणें मोठ्या नवलाईनें सोडविला. त्यानंतर जाऊन मग त्यानें याकूब बेगचा पराभव केला आणि बंडाचा बीमोड करून टाकला. काशगर, तुरफान, यारकंद वगैरे भागांतील त्याची ही मोहीम लष्करी दृष्टीनें पाहतां फारच अलौकिक प्रकारची झाली असें मानलें जातें.

इकडे मध्य आशियांत रशियाचा असा बंदोबस्त झाला. तोंच लांबलांबच्या प्रांतांत पसरलेल्या पण आतां मोडकळीस येऊं लागलेल्या चीनच्या साम्राज्याच्या आणखी एका भागांत चिनी सरकारवर आणखी एक संकट उभें राहिलें. ही भानगड

चीनचें मांडलिक असें जें अनामचें राज्य होतें (वैतनाम) तेथें उपस्थित झाली. या राज्यावर फ्रान्सचा डोळा होता. त्यामुळें तेथें चीन आणि फ्रान्स यांमध्यें युद्ध झालें. येथेंही पुन्हां चीननें आपला प्रभाव चांगला दाखविला आणि फ्रान्स कांहीं चीनला दबवूं शकला नाहीं; हें पाहून सगळ्यांनाच मोठें आश्चर्य वाटलें. या दोन राष्ट्रांत १८८५ मध्यें उभयपक्षीं समाधानकारक असा तह झाला.

चीनच्या सामर्थ्याचीं हीं नवीन चिन्हें पाहून साम्राज्यशाही राष्ट्रें चांगलींच दबलीं. १८६० मध्यें किंवा त्यापूर्वीं चीनला आलेला दुबळेपणा आतां नाहींसा झाल्यासारखा दिसला. देशांत सुधारणा करण्याबद्दलची भाषाही बोलली जाऊं लागली आणि पुष्कळांना असें वाटलें, कीं चीनचे हालाचे दिवस संपले, चीन देश आतां मार्गाला लागला. त्यामुळेंच तर १८८६ सालीं ब्रह्मदेश खालसा करतांना ब्रिटननें वहिवाटीप्रमाणें दर दहा वर्षांनीं चीनला खंडणी पाठविण्याचें कबूल केलें.

परंतु चीनच्या कपाळींचे हाल अजून संपलेले नव्हते. चीनच्या वांट्याला अजून पुष्कळच अपमान, हालअपेष्टा आणि कापाकापी यायची होती. चीनजवळचें लष्कर आणि आरमार दुर्बल होतें एवढ्यावरच कांहीं चीनचा कमीपणा संपत नव्हता. त्याचें मूळ याहूनही पुष्कळच खोल होतें. चीनची सगळी सामाजिक आणि आर्थिक घडीच मोडकळीस आलेली होती. एकोणिसाव्या शतकापासून ही घडी बिघडूं लागली होती. आणि मांचू घराण्याच्या अमलाविरुद्ध पुष्कळच गुप्त मंडळ्या स्थापन होऊं लागल्या होत्या, हें मीं तुला यापूर्वींच सांगितलें आहे. परदेशीयांचा व्यापार आणि औद्योगीकरण झालेल्या राष्ट्रांशीं आलेला चीनचा संबंध यांमुळें ही परिस्थिति अधिकच बिघडली. इ. स. १८६० सालानंतर चीनची शक्ति पुन्हां एकदां परत आल्यासारखी भासली. परंतु तिच्यांत खरा दम नव्हता. खरी समाजसुधारणा त्यांत नव्हती. कोठें कोठें स्थानिक अंमलदारांच्या उत्साहामुळें कांहीं कांहीं स्थानिक स्वरूपाच्या सुधारणा घडून आल्या; विशेषतः लि ह्युंग चांग यानें या सुधारणा बऱ्याचशा घडवून आणल्या; पण हे सगळे प्रयत्न या प्रश्नाच्या मुळापर्यंत जाऊन पोंचू शकले नाहींत किंवा चीनच्या शक्तीचा ऱ्हास ज्या विकारामुळें होत होता, तो विकारही यामुळें बरा होऊं शकला नाहीं.

१८६० सालापासून पुढच्या या कांहीं वर्षांत बाह्यतः चीननें जी शक्ति दाखविली तिचें प्रमुख कारण या काळांत चीनच्या राज्यकारभाराचें प्रमुखत्व फारच समर्थ अशा एका नमुनेदार स्त्रीकडे होतें. ही स्त्री म्हणजे चिनी सम्राटाची माता त्सु शी ही होय. तिचें वय अवघें सव्वीस वर्षांचें होतें. तिचा लहान मुलगा हा नांवालाच बादशहा म्हणून होता. या राजमातेनें चीनचा कारभार मोठ्या जोमदारपणें सत्तेचाळीस वर्षेंपर्यंत केला. तिनें आपल्या हाताखालीं कार्यक्षम अशा अंमलदारांची निवड केली आणि त्यांच्या ठिकाणीं आपल्या ठिकाणच्या उत्साहाचें थोडें थोडें वारें उत्पन्न केलें. यापूर्वींच्या पुष्कळशा काळामध्यें चीननें दाखविलें नव्हतें

इतकें शौर्य जें या काळांत चीननें दाखविलें, त्याचें बहुतेक सर्व श्रेय या राजमातेकडे आणि तिनें चांगल्या अंमलदारांची जी निवड केली त्याकडे आहे.

याच काळांत दरम्यान इकडे जपाननें मोठया आश्चर्यकारक घडामोडी चालविल्या होत्या आणि ओळखूंसुद्धां येणार नाहीं इतकें त्याचें स्वरूप पालटत आलें होतें ; म्हणून आतां आपल्याला जपानात गेलें पाहिजे.

## ११६

## जपानची घोडदौड

२७ डिसेंबर, १९३२

जपानबद्दल मागचें पत्र मीं तुला लिहिलें त्याला आज पुष्कळ दिवस झाले. पांच महिन्यांपूर्वी एक्यायशीव्या पत्रांत जपाननें सतराव्या शतकांत सगळया जगापासून स्वतःला कोंडून घेण्याचा चमत्कारिकपणा कसा केला हें मीं तुला सांगितलें. अशा रीतीनें १६४१ पासून दोनशें वर्षेपर्यंत जपानच्या लोकांचा जगाशीं काडीमात्र संबंध नव्हता. या दोनशें वर्षांत यूरप खंडांत, आशियांत, अमेरिकेंत, नव्हे आफ्रिकेंतसुद्धां केवढाले मोठे फेरबदल घडून आलेले होते. या काळांत घडून आलेल्या खळबळ उडविणाऱ्या घटनांपैकीं कांहींचें वर्णन मीं तुझ्यासाठीं केलेलें आहे. पण या सर्व घडामोडींपैकीं कशाचीही बातमी या कोंडून घेतलेल्या देशांत एवढीसुद्धां पोंचत नव्हती. जपानच्या प्राचीन सरंजामशाही वातावरणांत बाहेरच्या वाऱ्याची एवढीशीसुद्धां झुळूक येऊन जरा सुद्धां हालचाल उठवीत नव्हती. इकडे काळाचा ओघ मात्र मोठ्या झपाट्यानें फोंफावून पुढें चालला होता ; पण जपानमधील चित्र जसेंच्या तसें कायम होतें. जपान देश अजून सरंजामशाही पद्धतीचाच राहिला होता. जमीनदार वर्गाच्या हातांतच सत्ता तेथें अद्यापि होती. बादशहा नांवाला होता, पण त्याच्या हातांत सत्ता नव्हती. खरी सत्ता शोगुनांच्या हातीं होती. शोगुनाचें घराणें हें जपानमधील एका मोठ्या वर्गाचें, समाजाचें पुढारी होतें. हिंदुस्थानांतील क्षत्रियांप्रमाणें जपानमध्यें सामुराई म्हणून एक वर्ग होता. जमीनदार, वतनदार आणि, सामुराई वर्ग यांच्या हातांत खरी सत्ता होती. या निरनिराळया जमीनदार-सरदारांमध्यें आणि इतर वर्गांमध्यें वारंवार तंटे उद्भवत असत ; परंतु शेतकऱ्यांना आणि इतरांना पिळून काढण्यामध्यें मात्र या सर्वांची एकजूट असे.

असें जरी होतें तरी एक खरें, कीं जपानमध्यें शांतता नांदत होती. पूर्वी फार दीर्घ कालपर्यंत जपानमध्यें यादवी माजली होती. तिच्यामध्यें जपानचा जणुं सारा दमच उखडल्यासारखा झाला होता. त्यामुळें त्यानंतरचा हा शांततेचा काळ जपानला फार उपयुक्त आणि सुखकारक झाला. या काळांत दाइम्योसारखे कांहीं कांहीं लढाया

उपस्थित करणारे सरदार दडपून टाकण्यांत आले. आपसांतील यादवीमुळें झालेलें नुकसान हळूहळू जपाननें भरून काढायला सुरुवात केली. लोकांची प्रवृत्ति उद्योगधंदे, कला, वाङ्मय, आणि धर्म यांच्याकडे अधिक वळत गेली. ख्रिस्ती धर्म दडपून टाकण्यांत आलेला होता. बुद्ध धर्माचें पुनरुज्जीवन झालेलें होतें. त्याचप्रमाणें शिंटो धर्मालाही पुढें पुनः उजळा चढला. पूर्वजपूजेवर आधारलेला हा एक जपानचा खास नमुन्याचा धर्मपंथ आहे. सामाजिक आचार आणि व्यवहार व नीतिमत्ता या बाबतींत लोक चीनचा ऋषि कॉन्फ्यूशिअस याला अतिशय मान देऊं लागून त्याच्या उपदेशाचा कित्ता आपल्या-पुढें ठेवूं लागले. राजदरबाराच्या मंडळांत आणि सरदारमंडळांत कलाकौशल्याला बराच बहर आला. मध्ययुगांत यूरप खंडाचें स्वरूप जशा प्रकारचें होतें, तशा प्रकारचें कांहींसें स्वरूप या शांततेच्या काळांत जपानचें झालें.

परंतु नवीन फेरबदल केव्हांच एवढेसुद्धां घडूं द्यावयाचे नाहींत, हा प्रयत्न खरोखर तितकासा सोपा नाहीं. जपाननें बाहेरचे संबंध जरी सर्वच्या सर्व बंद करून टाकलेले होते, तरी जपानमध्यें आंतल्या आंतच फेरबदल झाल्याशिवाय राहिले नाहींत. अर्थात् याहून वेगळ्या परिस्थितींत हे फेरबदल जितक्या वेगानें झाले असते, त्यापेक्षां ते जपानमध्यें या काळांत फारच मंद गतीनें घडून येत होते, हें खरें. इतर देशांतल्या-प्रमाणें येथेंही सरंजामशाही पद्धतींतून आर्थिक अनवस्था, घसरगुंडी उत्पन्न होण्याच्या मार्गाला लागलीच होती. असमाधान वाढत होतें आणि सगळ्या कारभाराचें प्रमुखत्व शोगूनच्या हातीं असल्यामुळें लोकांच्या असंतोषाचा रोख सहजच सगळा शोगूनच्या विरुद्ध वळत चालला होता. शिंटो पंथाच्या पूर्वज-पूजेच्या परंपरेतून लोकांच्या मनांत बादशहाच्याबद्दल अधिकाधिक आपलेपणा आणि आशा उत्पन्न होऊं लागली होती. कारण सर्वांच्याच मतानें बादशहा म्हणजे प्रत्यक्ष सूर्याचा वंशज. या वाढत्या असंतोषांतून यामुळें एक प्रकारची राष्ट्रीय भावना निर्माण झाली आणि ही राष्ट्रीय भावना तरी आर्थिक असंतोषावरच आधारलेली असल्यामुळें यांतून प्रचलित समाजव्यवस्था बदलणें व जपानचीं दारें जगाला खुलीं करणें या गोष्टी घडून येणें अपरिहार्यच होतें.

जपानचीं दारें उघडण्याचे प्रयत्न परकीय राज्यसत्तांनीं पुष्कळ केले होते या काळांत. पण ते सर्व फसले होते. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला जपानची कोंडी फोडण्याच्या या प्रश्नाकडे अमेरिकेनें विशेषच लक्ष घातलें. नुकतीच त्यांची पश्चिम अमेरिकेंतील वाढ कॅलिफोर्नियापर्यंत येऊन पोंचली होती आणि सॅन्फ्रॅन्सिस्को बंदराला पुष्कळच महत्त्व चढूं लागलें होतें. चीनशीं जी नुकतीच व्यापाराची संधि मिळाली होती ती तर फारच लाभकारक आणि म्हणून लोभ उत्पन्न करणारी होती. परंतु तेथपर्यंत पॅसिफिक महासागरांतील प्रवास हा फारच लांब होता. त्यामुळें जपानच्या एखाद्या बंदराला लागून या प्रवासांत मध्यें एक मुक्काम करावा आणि पाणी, कोळसा, अन्न वगैरे सामग्री पुन्हां जहाजावर घ्यायला मिळावी अशी अमेरिकन लोकांची इच्छा होती. जपानची कोंडी फोडण्याचे अमेरिकेनें जे वारंवार प्रयत्न केले त्याचें हें कारण होतें.

१८५३ मध्यें अमेरिकन जहाजाचा एक काफिला अमेरिकेच्या अध्यक्षाचें पत्र घेऊन जपानला आला. जपानच्या लोकांनीं या वेळीं प्रथम हीं वाफेवर चालणारीं जहाजें पाहिलीं. यानंतर एक वर्षानेंच शोगुननें दोन बंदरें खुलीं करण्याचें कबूल केलें. ब्रिटिश, रशियन आणि डच या लोकाना जेव्हां ही वार्ता समजली, तेव्हां हेही लोक तातडतोच इकडे आले आणि अशाच तऱ्हेचे तहनामे त्यांनीं शोगुनापाशीं केले. अशा रीतीनें २१३ वर्षांनंतर जपानचा जगाशीं पुन्हां एकदा संबंध चालू झाला.

परंतु यांतूनच पुढें गोंधळ उत्पन्न होणार होता. या सर्व परकी राज्यसत्तांना शोगुननें आपणच बादशहा आहोंत असें भासविलें होतें. परंतु या सुमारास शोगुन-बद्दल लोकांमध्यें मुळींच प्रेम उरलेलें नव्हतें. त्यामुळें त्याच्याविरुद्ध आणि त्यानें परकी लोकांशीं केलेल्या या तहांविरुद्ध एक मोठी चळवळ उत्पन्न झाली. या चळवळीमध्यें कांहीं परके लोक मारलेही गेले. तेव्हां या निमित्तानें या परकी राज्यसत्तांनीं जपानावर आरमारी हल्ला केला. शोगुनची परिस्थिति दिवसेंदिवस अधिकच बिकट होत गेली. शेवटीं लोकांच्या दडपणामुळें १८६७ सालीं शोगुननें अधिकारत्याग करावयाला संमति दिली. इ. स. १६०३ मध्यें इयेयासूपासून सुरू झालेली ही टाकूगावा शोगुनशाही (आतां ही गोष्ट तुला आठवत असेल किंवा नसेलही) अशा रीतीनें नष्ट झाली. नुसती शोगुनशाही नष्ट होऊन थांबली नाहीं. तर शोगुनशाहीबरोबर निर्माण झालेली व आज सातशें वर्षेपर्यंत चालत आलेली सगळी समाजपरंपराही तिच्याबरोबरच विलयाला गेली.

यानंतर जो नवा बादशहा झाला त्याच्या हातीं खरी सत्ता प्राप्त झाली. हा बादशहा म्हणजे बादशहा मुत्शीहिटो हा होय. हा या सुमारास नुकताच गादीवर आलेला असून या वेळीं त्याचें वय अवघें चौदा वर्षांचें होतें. १८६७ पासून १९१२ पर्यंत सत्तेचाळीस वर्षें या बादशहानें राज्य केलें. त्याच्या या अमलाला मैजी युग म्हणजे प्रबुद्ध-राज्य-युग म्हणतात. याच्या अमलांत जपाननें प्रगतिपथावर खूप आघाडी मारली आणि पाश्चात्य राष्ट्रांचा कित्ता गिरवून कितीएक बाबतींत त्यांची बरोबरी गांठली. एका पिढींत जपाननें जो हा प्रचंड फेरबदल घडवून आणला तो खरोखरच मोठा, कोणाच्याही डोळ्यांत भरण्यासारखा असून साऱ्या जगाच्या इतिहासांत त्याला तोड नाहीं. या काळांत जपान देश मोठा उद्योगप्रधान देश झाला आणि पाश्चात्य राष्ट्रांच्या नमुन्याबरहुकूम तो साम्राज्यवादी आणि लोकांच्या प्रदेशावर आणि आर्थिक व्यवहारा-वर धाड घालणारा देशही झाला. प्रगतीचीं जेवढीं म्हणून बाह्य चिन्हें म्हणावीं तेवढीं सगळीं जपानमध्यें दिसून येऊं लागलीं. उद्योगधंद्यांच्या बाबतींत तर जपाननें आपल्या गुरूवर ताण केली. जपानची लोकसंख्याही झपाट्यानें वाढली. जपानचीं जहाजें साऱ्या पृथ्वीवरील समुद्रांत संचार करूं लागलीं. जपानची राजकीय सत्ताही वाढली आणि जगांतील प्रमुख राज्यसत्तांमध्यें जपानला स्थान मिळूं लागून आंतरराष्ट्रीय व्यवहारांत जपानच्या म्हणण्याला जास्त मान मिळूं लागला. परंतु बाहेरचा हा जो सगळा

फेरबदल झाला, तो तसा कांहीं जपानी लोकांच्या अंतःकरणापर्यंत खोल जाऊन भिडला नाहीं. हे सगळे फेरबदल अगदींच वरवरचे होते असें म्हणणें बरोबर होणार नाहीं; त्याहून त्यांचा परिणाम पुष्कळच खोल गेलेला होता. तरी पण तेथील राज्य-कर्त्यांची भूमिका अद्यापि सरंजामशाही पद्धतीची राहिली होती आणि समाजव्यवस्थेतील मूलग्राही फेरबदलाशीं या प्राचीन पद्धतीच्या आवरणाची सांगड घालण्यासाठीं त्यांची धडपड चालू होती. या बाबतींत त्यांना पुष्कळच मोठ्या प्रमाणावर यशही आलें असें दिसूं लागलें.

जपानमध्यें हे सगळे मोठे फेरबदल घडवून आणण्याचें श्रेय सरदार-वर्गातील एका दूरदर्शी गटाला होतें. त्यांना वडील मुत्सद्दी असें तेथें नांव मिळालेलें आहे. जपानमध्यें परकीयांविरुद्ध दंगे झाले आणि त्या निमित्तानें परकीयांच्या लढाऊ जहाजांनीं जपानवर तोफा डागल्या. त्या वेळीं आपण किती दुर्बल आहोंत हें जपानला दिसून आलें आणि या अपमानाचें शल्य जपानी लोकांच्या हृदयांत फार खोल घुसून गेलें. परंतु दैवाला दोष लावून, स्वतःचेच केंस ओढीत कपाळावर हात मारून ते स्वस्थ बसले नाहींत; आपल्या पराभवांतून आणि अपमानांतून, हीन दशेंतूनच नवीन धडा शिकून गिर-विण्याचा त्यांनीं तात्काळ निश्चय केला. हे जे वडील मुत्सद्दी होते त्यांनीं त्याबद्दलचा कार्यक्रम आंखला आणि तो जागरूकपणें पारही पाडला.

या कार्यक्रमाप्रमाणें जुना जो दाइम्योंचा सरदारवर्ग होता तो अजीबात रद्द करून टाकण्यांत आला. बादशहाची राजधानी कियोटो येथून काढून येडो येथें नेण्यांत आली; या शहराला आतां टोकिओ असें नांव देण्यांत आलें. नवीन राज्यघटना जाहीर करण्यांत आली. या राज्यघटनेप्रमाणें दोन कायदेमंडळें स्थापन करण्यांत आलीं; त्यांपैकीं कनिष्ठ कायदेमंडळ लोकनियुक्त प्रतिनिधींचें असून वरिष्ठ कायदेमंडळांत सगळे सरकारनियुक्त सभासद असावयाचे अशी योजना होती. शिक्षणांत, कायद्यांत, उद्योगधंद्यांत, सगळीकडे पुष्कळच फेरबदल करण्यांत आले. कारखाने उभारण्यांत आले; आधुनिक पद्धतीचें लष्कर आणि आरमार तयार करण्यांत आलें; निरनिराळ्या कामासाठीं परदेशांहून तज्ज्ञ मंडळी आणविण्यांत आली आणि जपानी विद्यार्थ्यांना यूरप आणि अमेरिकेंत पाठविण्यांत आलें. हिंदी लोक आतांपर्यंत करीत आले त्याप्रमाणें हे विद्यार्थी बॅरिस्टर वगैरे होण्यासाठीं तिकडे पाठविले जात नव्हते, तर शास्त्रज्ञ आणि यंत्रकलानिपुण होण्यासाठीं.

वडील मुत्सद्यांनीं हें सगळें बादशहाच्या नांवानें केलें. कारण कायदेमंडळें वगैरे सगळें नाटक जरी केलेलें होतें, तरी कायद्याप्रमाणें जपानी साम्राज्यामध्यें बादशहालाच सर्वस्वीं अनियंत्रित सत्ता शिल्लक होती. शिवाय, एकीकडे या सगळ्या सुधारणा एकामागून एक धडाक्यानें घडवून आणीत असतांनाच या वडील मुत्सद्द्यांनीं बादशहाबद्दलचा निष्ठेचा एक पंथच प्रसृत करण्याचें कार्य चालविलें होतें. ही खरो-खरच मोठी विचित्र सांगड होती. एका बाजूला कारखाने, आधुनिक उद्योगधंदे

आणि लोकप्रतिनिधिसभांच्या राज्यकारभाराचें सोंग, तर दुसऱ्या बाजूला मध्ययुगाला साजेसें बादशहाचें देवासारखें पूजन! या दोन प्रकारांचें एकमेकांशीं क्षणभर तरी कसें पटून चालावें हाच मोठा प्रश्न होता; परंतु प्रत्यक्षांत या दोन्ही गोष्टींची सांगड ठीक चालू राहिली आणि आजच्या घटकेला ही सांगड तुटलेली नाहीं हें मात्र खरें. लोकांच्या ठिकाणीं बादशहाबद्दलची ही मोठीच पूज्यभावना होती; तिचा या वडील मुत्सद्द्यांनीं दोन प्रकारांनीं उपयोग करून घेतला; एक तर जुन्या प्रतिगामी आणि सरंजामशाही वर्गावर त्यांनीं सगळ्या सुधारणा जबरदस्तीनें लादल्या. हे वर्ग बादशहाच्या नांवाला देशांत जें वजन होतें, त्यामुळें दबून गेले होते. नाहीं तर सुधारणांना त्यांनीं खास विरोध केला असता. दुसऱ्या बाजूला याच बादशहांच्या विषयींच्या पूज्य भावनेच्या बळावरच या वडील मुत्सद्द्यांनीं, जे पुरोगामी लोक जलद प्रगति करून सरंजामशाहीच्या सगळ्या डोलाऱ्याचाच पुरा नाश करायला उद्युक्त झालेले होते, त्यांनाही रोखून धरलें.

या एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धामधील चीन आणि जपान यांच्यांतील फरक मोठा लक्षांत घेण्यासारखा आहे. जपाननें झपाट्यानें पाश्चात्य सुधारणा आत्मसात् करून टाकली; परंतु आपण पाहिलें आहे आणि यापुढेंही आणखी आपल्याला दिसून येणार आहे, कीं चीन देश अत्यंत लोकविलक्षण अडचणींत गुरफटला गेला; हें असें कां झालें असावें? चीनचा अत्यंत विशाल विस्तार, चीनची प्रचंड लोकसंख्या आणि क्षेत्र यांमुळेंच उलट चीनमध्यें नवीन फेरबदल होणें कठिण होऊन गेलें. पुष्कळ लोकसंख्या आणि मोठा प्रदेश या गोष्टी वर वर पाहतां सामर्थ्याच्या जनक अशा वाटतात; परंतु हिंदुस्थानलाही सामर्थ्याच्या जनक वाटणाऱ्या या गोष्टींमुळेंच यातना सोसाव्या लागत आलेल्या आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे चीनमध्यें प्रबल असें एकच एक मध्यवर्ती राज्य नव्हतें; म्हणजे काय तर चीनच्या निरनिराळ्या प्रांतांना पुष्कळशी स्थानिक स्वतंत्रता होती. त्यामुळें जपानमध्यें करतां आले त्याप्रमाणें चीनमध्यें मध्यवर्ती सरकारला सर्व सूत्रें हालवून मोठमोठे सामाजिक आणि आर्थिक फेरबदल घडवून आणणें शक्य नव्हतें. याशिवाय चीनची श्रेष्ठ संस्कृति चीनमध्यें आज हजारों वर्षांपासून नांदत आणि वाढत आलेली असून ती चीनच्या साम्राज्याच्या अंगीं इतकी मुरून गेलेली होती, कीं एकाएकीं ती दूर फेकून देणें हें सोपें काम नव्हतें; या बाबतींतही चीनचें हिंदुस्थानशीं साम्य आहे. उलटपक्षीं जपानची संस्कृति ही चीनपासून उसनी घेतलेली होती. त्यामुळें जपानला ती टाकून देऊन तिच्या जागीं दुसरीची स्थापना चीनपेक्षां सुलभतेनें करतां आली; चीनच्या अडचणींचें आणखी एक कारण म्हणजे चीनमध्यें यूरपीय राज्यांनीं चालविलेली एकसारखी ढवळाढवळ. बरें, चीन काय लहान देश होता? जवळजवळ एका मोठ्या खंडाएवढा देश! तो काय जपानच्या छोट्या बेटाप्रमाणें दारें-खिडक्या बंद करून कोंडून तरी टाकतां येणार होता? उत्तरेकडे आणि वायव्येकडे चीनच्या प्रदेशाला रशियाचें राज्य भिडलेलें होतें. नैर्ऋत्येला ब्रिटिशांचें साम्राज्य भिडलेलें होतें. दक्षिण दिशेकडून फ्रान्सचे हात थोडे

लांब केले कीं चीनला येऊन पोंचत होते. या यूरपीय राज्यांनीं नाना कारस्थानें करून चीनकडून महत्त्वाचे हक्क चीनमध्यें मिळविले होते. आणि तेथें त्यांचे फार मोठे व्यापारी हितसंबंध निर्माण झालेले होते. या हितसंबंधांमुळें चीनमध्यें ढवळाढवळ करावयाला त्यांना निमित्तांना कांहीं तोटाच नव्हता.

त्यामुळें जपान देश धूमधडाक्यानें पुढें जात चालला; तर इकडे चीन अजून आंधळ्यासारखा चांचपडत नवीन परिस्थितीशीं समरस होण्यासाठीं धडपड करीत होता. पण या धडपडींत त्याला यश कांहीं येत नव्हतें. तथापि यांत आणखी एक मोठीच चमत्कारिक गोष्ट पाहण्यासारखी आहे. जपाननें पाश्चात्यांची यंत्रसामग्री आणि उद्योगधंदे आपलेसे केले, आधुनिक पद्धतींचें लष्कर व आरमार उभारलें आणि अशा रीतीनें सुधारलेल्या औद्योगिक राज्यसत्तेचा वेष धारण केला. परंतु जपानला यूरपमधील तत्त्वज्ञान आणि नव्या कल्पना या कांहीं तितक्या सहज रीतीनें आपल्याशा करतां आल्या नाहींत. वैयक्तिक आणि सामाजिक स्वातंत्र्य, समाज आणि जीवन यांबद्दलचा शास्त्रीय दृष्टिकोण, या गोष्टी यूरपप्रमाणें जपानमध्यें उत्पन्न झाल्या नाहींत. मनांतून जपान देश अद्यापि सरंजामशाही प्रवृत्तीचा आणि एकतंत्री, जो-हुकमी राज्यपद्धतीचा अभिमानी असाच राहिला आणि जगानें कधींच फेकून दिलेल्या राजनिष्ठेच्या भावनेला जपान देश कांहीं विचित्रपणें चिकटून राहिला. जपानमध्यें जी तळमळीची आणि स्वार्थत्यागपूर्ण अशी देशप्रेमाची भावना जागृत झाली, ती या बादशहाच्या निष्ठेचीच एक निराळी प्रतिकृति होती एवढेंच. राष्ट्रभक्ति–राष्ट्रवाद आणि बादशहाची भक्ति या दोन्ही भावना जपानमध्यें हातांत हात घालून जोडीजोडीनेंच वावरत होत्या. उलटपक्षीं, चीनमध्यें मोठी यंत्रसामग्री आणि उद्योगधंदे याचा उदय चटकन् झाला नाहीं. परंतु चिनी लोकांनीं, निदान आधुनिक पिढीच्या चिनी लोकांनीं, पाश्चिमात्य कल्पना, तत्त्वज्ञान आणि शास्त्रीय दृष्टिकोण यांचा मात्र स्वीकार केला. या गोष्टी एकंदर त्यांच्या आजपर्यंतच्या प्रवृत्तीपासून फारशा निराळ्या नव्हत्याच. तात्पर्य, आपल्याला असें आढळून येतें, कीं चीननें पाश्चात्य संस्कृतीचा खरा गाभा ओळखून त्याचा अंगीकार केला, तर उलट जपाननें पाश्चात्य संस्कृतीच्या अंतरंग गुणांकडे दुर्लक्ष करून त्या संस्कृतीचें निव्वळ बाह्य चिलखत आणि शस्त्रास्त्रें मात्र चढविलीं आणि त्यांच्या जोरावर जपाननें चीनच्या पुढें आघाडी मारली. तसेंच जपाननें चढविलेलें हें चिलखत आणि शस्त्रास्त्रें चांगलींच मजबूत असल्यामुळें यूरपीय देश जपानची प्रशंसा करूं लागले आणि त्याला त्यांनीं आपल्या पंक्तींत सामील करून घेतलें. पण चीन राहिला दुर्बलच! त्याच्याजवळ मॅक्झिम् तोफा ( बंदुका ) किंवा इतर शस्त्रास्त्रें सज्ज झालीं नाहींत. आणि म्हणून हे देश चीनचा अपमान करूं लागले, चीनला मोठमोठा सदुपदेश करूं लागले, शहाणपण शिकवूं लागले, त्याची लूट करूं लागले. आणि असें करतांना चीनजवळही कांहीं तत्त्वविचार आणि जीवन-विषयक कल्पना असतील ही गोष्टसुद्धां त्यांनीं कधीं मनांत आणली नाहीं.




जपान देश यूरपीय राष्ट्राच्या औद्योगिक उत्पादनाच्या पद्धतींचेंच अनुकरण करून थांबला नाहीं. त्यांच्या साम्राज्यशाही आक्रमक धोरणाचेंही त्यानें अनुकरण केलें. यूरपियन राष्ट्रांचा हा शिष्य गुरूपेक्षांही जास्त कर्तबगार निघाला. त्यानें कित्येकदां गुरूवरही ताण करायला सुरुवात केली. जपानची खरी अडचण एकच होती; ती म्हणजे हें नवीन औद्योगीकरण आणि जुनी सरंजामशाही यांमधील मूलभूत असा विरोध. हे दोन्ही प्रकार देशांत प्रचलित ठेवण्याच्या प्रयत्नांत जपानला आपल्या समाजव्यवस्थेंत आर्थिक समतोलपणा साधतां आला नाहीं. करांचें ओझें अतिशयच अवजड लादावें लागल्यामुळें लोक तक्रार करूं लागले. देशांतल्या देशांत

लोकांनीं गडबड करूं नये म्हणून जपाननेंही युद्ध सुरू करावयाचें, बाहेरच्या देशात साम्राज्यशाही मोहीम सुरू करावयाची आणि अशा रीतीनें लोकांचें लक्ष अंतर्गत प्रश्नांवरून उडून तिकडे लागेल असें करावयाचें, हा नेहमींचा तोडगा उपयोगांत आणला. त्याचप्रमाणें जपानमध्यें जे नवीन उद्योगधंदे सुरू झाले होते, त्यांच्याकरितां कच्चा माल आणि बाजारपेठा शोधण्यासाठींही जपानला इतर देशांकडे नजर टाकावी लागत होती. यापूर्वीं औद्योगिक क्रांतीमुळें इंग्लंडला आणि नंतरच्या काळांत पश्चिम यूरपमधील इतर राष्ट्रांना असेच बाहेरच्या देशांत जाऊन प्रदेश जिंकावे लागले होते. जपानमध्येंही उत्पादन वाढलें आणि लोकसंख्येंत झपाट्यानें वाढ होत गेली; त्यामुळें अधिकाधिक अन्न आणि कच्चा माल यांची गरज उत्पन्न होत गेली. आतां या गोष्टी मिळवावयाच्या कोठून असा प्रश्न उभा राहिला. जपानच्या अगदीं शेजारचे देश म्हणजे चीन आणि कोरिया. चीनमध्यें व्यापाराला क्षेत्र चांगलें होतें; पण या देशांत आधींच लोकवस्ती दाट होती. परंतु चिनी साम्राज्याच्या वायव्य दिशेकडील एक मोठा भाग असा जो मांचुरिया प्रांत त्याच्यामध्यें आपली लोकसंख्या नेऊन वसाहत करायला आणि साधनसंपत्तीची वाढ करायला अजून थोडाफार अवकाश होता. म्हणून माचुरिया आणि कोरिया यांच्यावर जपानची लोभी दृष्टि वळली.

त्याचप्रमाणें यूरपीय राष्ट्रें चीनकडून हक्कामागून हक्क मिळवीत चाललीं होतीं आणि चीनचा कांहीं कांहीं प्रदेशही आपल्या घशाखालीं घालीत होतीं. हाही एक जपानच्या काळजीचा विषय होता. त्यांचें हें आक्रमण जपानला मुळींच रुचण्यासारखें नव्हतें. आपल्यासमोरच्या एका मोठ्या देशाच्या भूमीवर जर या परकी राष्ट्रांनीं पक्के पाय रोवले, तर आपल्या स्वतःच्या सुरक्षितपणालाच मोठा धोका उत्पन्न होण्याचा संभव आहे, निदान आशिया खंडांतील आपल्या वाढीला तर त्यामुळें पायबंद खासच बसेल, हें जपानला दिसत होतें.

तेव्हां आपल्या देशाची कोंडी मोडून बाहेरच्या जगाशीं संबंध सुरू केल्यानंतर वीस वर्षांच्या आंतच जपाननें चीनवर आक्रमण करायला सुरुवात केली. थोडेसे मच्छीमारी लोक जहाज बुडाल्यामुळें चीनच्या किनाऱ्याला कोठेंसे लागले, वा त्यांचा कायसा खून झाला; एवढ्याबद्दलच्या क्षुद्र भांडणांतून जपानला चीनकडून नुकसानभरपाई मागण्याची सवड सांपडली. प्रथम अर्थातच चीननें अशी नुकसानभरपाई देण्याचें नाकारलें; परंतु जपाननें युद्धाची धमकी दिली. त्या वेळीं चीनचे हात अनाम प्रांतांत (वैतनाम) फ्रेंचांशीं लढण्यांत गुंतलेले होते. त्यामुळें चीनला जपानपुढें नमतें घ्यावें लागलें. ही १८७४ मधली हकिकत. या विजयानें धुंद होऊन आणखी कोठें प्रदेश मिळवितां येतात का, हें पाहण्याच्या खटपटीला जपान देश लागला. समोर कोरियाचें राज्य पाहून तोंडाला पाणी सुटल्यासारखेंच होतें; म्हणून कांहीं तरी एक क्षुल्लक निमित्त काढून जपाननें कोरियावर स्वारी करून कांहीं खंडणी वसूल केली आणि जपानी व्यापारासाठीं कांहीं बंदरें खुलीं करण्यास त्याला जपाननें भाग पाडलें.

फार दिवसांपासून कोरियाचें राज्य चीन देशाचें मांडलिक होतें. म्हणून चीन-कडून मदत मिळते का यासाठीं कोरियानें खटपट करून पाहिली; परंतु त्याला मदत देण्याची चीनला शक्ति नव्हती. लढाई वगैरे केल्यास कोरियांत जपानचें प्रस्थ कदाचित् फारच माजेल या भीतीनें चिनी सरकारनें कोरियाला जपानपुढें तूर्त नमतें घेण्याचा सल्ला दिला आणि जपानला ग्रह पोंचविण्यासाठीं पाश्चात्य राष्ट्रांशीं तह करण्यास सुचविलें. अशा रीतीनें १८८२मध्यें कोरियाचें रान जगाला खुलें झालें. पण झालें एवढ्या-वरच जपानचें समाधान होण्यासारखें नव्हतें. तेव्हां चीनच्या अडचणीचा फायदा घेऊन जपाननें कोरियाचा प्रश्न पुन्हां एकदां उपस्थित केला आणि कोरियावर चीन व जपान अशा दोघांचें मिळून अधिराज्य सुरू करण्याला संमति देण्यास चीनला भाग पाडलें. म्हणजे गरीब बिचारा कोरिया देश आतां या दोन राष्ट्रांचा मांडलिक झाला. सगळयाच दृष्टीनें पाहतां ही परिस्थिति उघडच अत्यंत असमाधानकारक होती, यांतून तंटा उत्पन्न होणें अनिवार्य होतें. जपानला तर असा तंटा हवाच होता. म्हणून १८९४ मध्यें जपाननें चीनवर युद्ध लादलेंच.

१८९४–९५ चें हें चिनी-जपानी युद्ध म्हणजे जपानला जणुं एक पोरखेळच झाला. जपानचें आरमार आणि लष्कर हीं दोन्ही अगदीं अद्ययावत् सुसज्ज होतीं. चीनचें लष्कर आणि आरमार दोन्ही जुन्या पद्धतीचीं आणि गैरवाकबगार होतीं. त्यामुळें जिकडे तिकडे जपानचा विजय झाला आणि चीनला जपानशीं तह करणें भाग पडलें. आतांपर्यंत पाश्चात्य राष्ट्रांना चीनमध्यें जें स्थान होतें तें स्थान या तहाप्रमाणें आतां जपानला प्राप्त झालें. कोरिया देश या तहाप्रमाणें स्वतंत्र करण्यांत आला. परंतु हें नुसतें बाहेरचें सोंग होतें. कोरियावर खरा ताबा एकटया जपानचाच राहिला. याशिवाय या तहाप्रमाणें चीनला नाइलाजानें मांचुरियांतील लियौतुंग द्वीपकल्प आणि त्यामधील पोर्ट आर्थर हें बंदर आणि फोर्मोसा व इतर कांहीं बेटें एवढा प्रदेशही जपानच्या स्वाधीन करावा लागला.

चिमुकल्या जपाननें प्रचंड चीनचा हा एवढा भयंकर पराभव केलेला पाहून जगांत सगळयांनाच आश्चर्य वाटलें. अति पूर्वेकडे असा एक समर्थ देश पुढें येतो हें पाहून पाश्चात्य राष्ट्राना समाधान थोडेंच होणार होतें ! याच्या आधींच, चिनी–जपानी युद्ध सुरू असतांनाच जपानला विजय मिळण्याचा संभव दिसतांच या राष्ट्रांनीं जपानला असें बजावलें होतें, कीं जपाननें चीनच्या मुख्य प्रदेशांतील एखादा भाग घेतल्यास तें आम्हांला पसंत पडणार नाहीं. हें बजावणें न जुमानतांच जपाननें लियौतुंग द्वीपकल्प व त्यामधील पोर्ट आर्थरसारखें महत्त्वाचें बंदर हें स्वतःकडे घेण्याचें सोडलें नाहीं. परंतु हा प्रदेश जपानला पचूं दिला गेला नाहीं. रशिया, जर्मनी आणि फ्रान्स या तीन मोठ्या राष्ट्रांनीं जपाननें हा प्रदेश सोडून दिलाच पाहिजे असा आग्रह धरला आणि पुष्कळ चिडून आणि रागावून कांहीं उपयोग न होतां जपानला तो सोडावाच लागला. या तिन्ही राष्ट्राना मिळून तोंड देण्याची जपानची ताकद नव्हती.

परंतु आपला हा अपमान जपान कधीं विसरला नाहीं. हें अपमानाचें शल्य

सारखें टोंचत राहिल्यामुळें याहूनही अधिक मोठा लढा करण्यासाठीं जपाननें तयारी चालविली आणि नऊ वर्षांनंतर असा मोठा लढा जपानचा रशियाशीं झालाही.

दरम्यान चीनवरील या विजयामुळें अतिपूर्वेकडील सर्वांत अधिक सामर्थ्यवान् राजसत्ता म्हणून जपानचें स्थान कायम झालें. चीन देश सर्वच बाजूंनीं किती दुबळा आहे हें साऱ्या जगापुढें आतां उघडें झालें आणि त्याची जी भीति पाश्चात्य राज्य-सत्तांना वाटत होती ती आतां नाहींशी झाली. प्रेतावर किंवा मरूं घातलेल्या जीवाच्या शरीरावर गिधाडें जशी झडप घालतात, त्याप्रमाणें त्या सर्वांनीं एकदम चीनवर झडप घातली आणि जो तो आपल्या हातीं जें कांहीं लागेल तें लुबाडण्याची धडपड करूं लागला. फ्रान्स, जर्मनी, रशिया आणि इंग्लंड या सर्वांनींच चीनच्या किनाऱ्यावर बंदरें मिळविण्यासाठीं आणि खास हक्कांसाठीं मोठी गर्दी उसळविली. सवलती मिळविण्यासाठीं या राष्ट्रांनीं चीनशीं अगदींच अन्याय्य, पापी आणि हलकटपणाचीं भांडणें सुरू केलीं. एवढेंसें कांहीं झालें तरी तेंच या राष्ट्रांना अधिकाधिक हक्क आणि सवलती मागायला निमित्त म्हणून पुरेसें होऊं लागलें. एकदां दोन मिशनऱ्यांचा कोठें तरी वध झाला. तेवढ्यावरून जर्मनीनें पूर्वेकडील शांटुंग द्वीपकल्पामधील किऔचू हें बंदर चीनकडून हिसकावून घेतलें. जर्मनीनें हें बंदर घेतलें तेव्हां आम्हांलाही आमच्या हिश्शाची कांहीं लूट मिळाली पाहिजे असा इतर पाश्चात्य राष्ट्रांनीं हट्ट धरला. रशियानें पोर्ट आर्थर बंदर घेतलें. हेंच बंदर एका वर्षापूर्वी रशियानें जपानला सोडून द्यावयाला लावलें होतें. रशियानें पोर्ट आर्थर घेतलें तेव्हां त्याच्या तोडीस तोड म्हणून इंग्लंडनें वै-है-वै हें बंदर घेतलें. फ्रान्सनें अनामच्या राज्यांतील कांहीं मुलूख आणि एक बंदर घेतलें. याशिवाय रशियानें मांचुरियाच्या उत्तर भागांतून एक रेल्वे-रस्ता बांधण्याची परवानगी मिळविली. इकडून रशियाला ट्रॅन्स सायबेरियन रेल्वेचा फांटा पुढें वाढवावयाचा होता.

ही सगळी निर्लज्ज लुटालूट आणि गर्दी म्हणजे खरोखरच एक अत्यंत लोक-विलक्षण प्रकार होता. अर्थात् हे सगळे प्रदेश सोडतांना आणि या सवलती देतांना चीनला काय सुख थोडेंच होत होतें? प्रत्येक वेळीं आरमारी सामर्थ्याचें प्रदर्शन करून आणि तोफांच्या माऱ्याची धमकी दाखवून चीनवर या गोष्टींना संमति देण्यासाठीं जबरदस्ती करण्यांत आली होती. नाइलाजानें चीनला असें करावें लागलें होतें. या अत्यंत निंद्य वर्तनाला काय नांव देतां येईल बरें? भर रस्त्यावरील दरोडेखोरी? पेंढारीपणा? कांहीं नाहीं! साम्राज्यशाहीच्या व्यवहाराची ही रीतच आहे. कधीं कधीं साम्राज्यशाहीचा व्यवहार गुप्तपणानें चालू असतो. कधीं कधीं दुसऱ्याचें हित करण्यासाठीं लबाडीचें सोंग आणि मोठ्या पवित्र धर्मभावना यांच्या पांघरुणाखालीं साम्राज्यशाहीचा व्यवहार चालत असतो. परंतु चीनमध्यें १८९८ मधील साम्राज्यशाहीच्या या व्यवहारावर कसलेंही पांघरूण नव्हतें. कसलेंही आवरण नव्हतें. येथें साम्राज्यशाहीचा हा अत्यंत किळसवाणा व्यवहार साऱ्या जगापुढें अगदीं नागडा-उघडा उभा होता.

## ११७

# जपान रशियाचा पराभव करतो

२९ डिसेंबर, १९३२

अलीकडे मी तुला अतिपूर्वेकडील प्रदेशासंबंधीं लिहितों आहें आणि आजही तीच हाकिकत मी पुढें चालू करणार आहें. भूतकालचीं हीं भांडणें आणि युद्धें यांच्या अडगळीचें ओझें मी उगीचच तुझ्या मनावर कां लादतों, याचें तुला कोडें पडण्याचा संभव आहे. कारण एक तर त्या विषयांत माधुर्य असें कांहीं नाहीं आणि शिवाय, या सगळ्या आता झाल्या-गेल्या गोष्टी. मलाही या गोष्टींवर तसा विशेष भर देण्याची इच्छा नाहीं; परंतु अतिपूर्वेकडे आजकाल ज्या घटना घडत आहेत त्यांपैकीं बहुतेक सर्व घटनांचें मूळ खास याच भानगडींमध्यें आहे. म्हणून आधुनिक प्रश्नांचें नीट स्वरूप समजून येण्यासाठीं या भानगडींची थोडीफार माहिती असणें आवश्यक आहे. हिंदुस्थानाप्रमाणेंच चीन देश हाही आज एक मोठा जागतिक प्रश्न होऊन बसला आहे आणि येथें बसून मी हें लिहितों आहें त्याच क्षणाला, जपानच्या मांचुरिया जिंकून घेण्याच्या प्रयत्नाबाबत आज त्या बाजूला मोठा तीव्र झगडा सुरू आहे.

गेल्या पत्रामध्यें मीं तुला १८९८ सालीं पाश्चात्य राष्ट्रांची आरमारी जहाजांच्या पाठिंब्याच्या जोरावर चीनमध्यें सवलती उकळण्यासाठीं जी एक मोठी गर्दी माजली, तिजबद्दल लिहिलें. या वेळीं या राष्ट्रांनीं सगळीं चागलीं बंदरें आपल्या ताब्यांत घेतलीं आणि या बंदरांच्या आंतल्या भागांत खाणी खोदणें, आगगाडीचे रस्ते बांधणें वगैरे-सारखे अनेक प्रकारचे हक्क त्यांनीं संपादन केले. आणि तरीसुद्धां आणखी सवलतीं-साठीं चीनच्या पाठीमागची त्यांची मागणी सुरूच राहिली. हीं परकीं राज्यें आतां चीनमध्यें आपल्या वर्चस्वाचे प्रदेश असावे याबद्दलचें बोलणें काढूं लागलीं. एखाद्या देशाची आपल्यामध्यें वांटणी करण्याचा आधुनिक साम्राज्य-सरकारांचा हा एक नाजुक मार्ग आहे. कबजा आणि ताबा यांचे जगांत कांहीं कांहीं कमीअधिक प्रमाणांचे प्रकार आहेत. खालसा करणें म्हणजे अर्थातच अगदीं संपूर्ण कबजा घेणें होय; संरक्षणा-साठीं घेणें म्हणजे तरी कबजाच, परंतु थोडा कमी प्रमाणांत. वर्चस्वाचा प्रदेश करणें म्हणजे याहूनही थोडा कमी प्रमाणांत, परंतु अखेरीस कबजाच. प्रमाणाचा हा फरक असला, तरी या सगळ्या प्रकाराचें उद्दिष्ट एकच. यांतलें एक पाऊल पडलें कीं दुसरें त्यांतून आपोआप पडायचेंच. एवढेंच नव्हे, तर पुढें आपण यासंबंधीं अधिक चर्चा करूं तेव्हां आपल्याला दिसून येईल, कीं मुलूख खालसा करण्यानें उगीच राष्ट्रीय झगड्याच्या कटकटी पाठीमागें लागतात. म्हणून हा मार्ग आजकाल अगदींच जुनाट आणि जवळजवळ त्याज्य असा मानला जाऊं लागला आहे. त्यापेक्षां कोणत्याही देशावर

आर्थिक प्रभुत्व संपादन करावें आणि बाकीच्या भानगडींत पडूंच नये, हा मार्ग आजकाल सगळयांत किती तरी जास्त सोपा असा वाटूं लागला आहे.

तात्पर्य, या वर्चस्वाच्या प्रदेशांच्या तत्त्वाखालीं चीनची वांटणी होणार असा अगदीं रंग दिसूं लागला आणि त्यामुळें जपानच्या पोटांत भीतीचें काहूर माजलें. चीनवर विजय मिळविला खरोखर जपाननें. पण सगळें फळ पाश्चात्य राष्ट्रांना मिळाल्यासारखें झालें. चीनचे हे तुकडे होत असताना जिवाचा कितीही संताप झाला तरी कांहीं करतां न येऊन नुसते दांतओंठ चावीत पहात राहण्याचा हा प्रसंग जपानवर आला. जपानचा राग सगळयांत अधिक रशियावर होता. कारण रशियानेंच प्रथम जपानला पोर्ट आर्थरचा कबजा घेऊं दिला नाहीं व पुढें स्वतःच तें बंदर बळकावलें.

तथापि अद्यापि एक मोठें राष्ट्र असें शिल्लक होतें, कीं ज्यानें चीनमधल्या या सवलती उकळण्याच्या गर्दीत किंवा चीनची वांटणी करण्याच्या योजनेंत भाग घेतलेला नव्हता; तें राष्ट्र म्हणजे अमेरिका. इतर राष्ट्रांपेक्षां हें राष्ट्र मोठें पुण्यवान् किंवा सदाचरणी होतें, म्हणून तें आजपर्यंत या भानगडींत पडलें नव्हतें, असें कांहीं नव्हे; तर त्याचे हात आपल्या स्वतःच्या विशाल देशाची व्यवस्थित वाढ करण्याच्या कामांत गुंतलेले होते. तें आपलें राज्य पश्चिमेकडे वाढवीत चाललेलें होतें; त्या भागांतील केवढे तरी मोठमोठे प्रदेश त्याला वसाहतीला लायक असे करावयाचे होते; त्याच कामांत त्याला आपली सर्व शक्ति आणि संपत्ति ओतावी लागत होती. एवढेंच नव्हे, तर प्रत्यक्ष यूरपमधील सुद्धां किती तरी मोठें भांडवल अमेरिकेंत या कामांत गुंतलेलें होतें. तरीपण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला अमेरिकन लोकही आपला पैसा गुंतवायला बाहेरच्या देशांत कोठें जागा मिळते का, असा विचार करूं लागले होते. त्यामुळें त्यांची नजर चीनकडे वळली. तेथें यूरपमधील राष्ट्रें "वर्चस्वाचे प्रदेश" पाडून चीनची वांटणी करण्याच्या नादांत होतीं आणि यांतून अखेरीस हे प्रदेश खालसाच व्हावयाचे होते. हा प्रकार जेव्हां अमेरिकन लोकांच्या नजरेस आला तेव्हां स्वाभाविकच त्यांना तो आवडला नाहीं. कारण या वांटणींत अमेरिकेला कांहींच हिस्सा मिळत नव्हता! त्यामुळें अमेरिकेनें मुक्त व्यवहाराचें, "उघड्या दाराचें" धोरण म्हणून जें धोरण प्रसिद्ध आहे तें चीनमध्यें सर्वांनीं स्वीकारावें असा आग्रह धरला. या धोरणाचा अर्थ असा, कीं व्यापार आणि उद्योगधंदा यांसाठीं चीनमध्यें सर्वांना सारख्या सवलती असाव्या, या अमेरिकेच्या आग्रहाला बाकीच्या राष्ट्रांनीं संमति दिली.

एकसारखें सुरू असलेलें हें आक्रमण पाहून चिनी सरकारला सर्वतोपरि भीति उत्पन्न झाली आणि आपल्यामध्यें सुधारणा केली पाहिजे आणि पुनर्घटना केली पाहिजे अशी चिनी सरकारची खात्री पटली. त्यानें तसें करण्याचा प्रयत्नही केला; परंतु त्यांत यश मिळण्याला त्याला सवडच मिळाली नाहीं. कारण परकीय राष्ट्रांच्या आणखी आणखी नव्या सवलतींच्या मागण्यांचें सत्र चालूच होतें. अलीकडे कांहीं वर्षे राजमाता महाराज्ञी त्झू श्री ही कारभार सोडून एकांतांत काळ काढीत होती.

तिच्याकडून कदाचित् आपल्या देशाचें रक्षण होईल अशा बुद्धीनें चिनी लोकांची आशा आतां तिच्यावर खिळून राहिली. या बाबतींत कांहीं तरी कारस्थानाचा संशय येऊन, त्या वेळीं गादीवर असलेल्या बादशहानें तिला कैदेंत टाकावें असा विचार केला; परंतु या बाईनें त्याच्यावर कडी करून त्यालाच गादीवरून दूर केलें आणि सगळा कारभार आपल्या हातीं घेतला. जपाननें औद्योगिक वगैरे क्षेत्रांत जशा मूलभूत सुधारणा केल्या, तशा करण्याची भानगड या बाईनें केली नाहीं; तर चीनचें एक चांगलें प्रबळ लष्कर बनविण्याकडे तिनें आपली सगळी शक्ति खर्च केली. स्वातंत्र्य-रक्षणार्थ स्थानिक लष्करी संघ स्थापन करण्याला तिनें प्रोत्साहन दिलें. हे जे स्थानिक लष्करी संघ झाले त्यांनीं आपल्याला "ई हो तुआन"–"पवित्र ऐक्याचे संघ" असेंही नांव घेतलें होतें. कधीं कधीं त्यांना "पवित्र ऐक्याची मूठ"–"ई हो चुआन" असें म्हणत. हें नांव बंदरालगतच्या शहरांमधील यूरपीयन लोकांच्या कानांवर गेल्यानंतर त्यांनीं या नांवाचें भाषांतर बॉक्सर्स म्हणजे मुष्टियुद्ध खेळणारे असें केलें. चिनी भाषेंतील एका सुंदर वाक्संप्रदायाचें हें बेंगरूळ भाषांतर आहे.

परकीय आक्रमण आणि परकीयांनीं चीन आणि चिनी लोक यांचे केलेले असंख्य अपमान यांविरुद्ध चीनमध्यें जी राष्ट्रीयत्ववर्धक अशी प्रतिक्रिया झाली, ती म्हणजे ही बॉक्सर संघांची संघटना. परकी लोकांबद्दल बॉक्सर लोकांच्या मनांत मुळींच आपले-पणा नव्हता. हे परकी लोक म्हणजे त्यांना सगळ्या जगांतील पापाच्या मूर्तीच वाटत यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. मिशनरी लोकांचा तर त्यांना विशेष तिटकारा असे. कारण मिशनरी लोकांनीं प्रतापच तशा प्रकारचे गाजविले होते आणि जे चिनी लोक धर्मांतर करून ख्रिस्ती झालेले होते, त्यांना तर हे बॉक्सर लोक देशद्रोही मानीत. जगांत प्रस्थापित होऊं घातलेल्या नव्या घडीपासून आपलें संरक्षण करूं पहाणाऱ्या जुनाट चिनी समाजाचेच हे बॉक्सर लोक प्रतिनिधी होते. त्यामुळें त्याचा प्रयत्न नव्या जगांत कोणत्याही रीतीनें यशस्वी होण्यासारखा नव्हता.

एका बाजूला हे राष्ट्रप्रेमी, परकीयविरोधी, मिशनरीविरोधी, पुराणप्रिय असे लोक, आणि दुसऱ्या बाजूला पाश्चात्य लोक, यांच्यामध्यें विरोध उत्पन्न होणें अपरिहार्यच होतें. विरोधांतून झगडे निर्माण झाले. त्यांत एका इंग्रज मिशनऱ्याचा खून झाला. दुसरे कित्येक यूरपीय लोक आणि पुष्कळच धर्मांतरित चिनी ख्रिस्ती यांचे खून झाले. परकीय सरकारांनीं ही राष्ट्रभक्तिप्रेरित चळवळ दडपून टाकण्याबद्दल चिनी सरकार-कडे मागणी केली. प्रत्यक्ष मनुष्यवधाचा दोष ज्यांच्या हातून घडला होता, त्यांना चिनी सरकारनें शिक्षा केल्या. परंतु त्यांनीं स्वतःच ज्या या संघाला जन्म दिला होता, त्यालाच अजिबात नेस्तनाबूत करण्याचें काम हें सरकार कसें करणार? दरम्यान बॉक्सर लोकांची चळवळ झपाट्यानें वाढत चालली. परकी सरकारांचे जे प्रतिनिधी चीनमध्यें होते त्यांना या चळवळीची भीति वाटून, आपापल्या जहाजांवरील सैन्य त्यांनीं जमिनीवर बोलावून घेतलें आणि पुन्हां एकदां परकी स्वारी सुरू झाली,

असें चिनी लोकांना भय वाटूं लागलें. लौकरच हातघाईला सुरुवातही झाली. जर्मन सरकारच्या प्रतिनिधीचा त्यांत वध झाला आणि पेकिंग येथें ज्या परकी राष्ट्रांच्या वकिलाती होत्या त्यांना वेढा घालण्यात आला.

चीन देशाचा बराचसा भाग, बॉक्सर लोकांच्या राष्ट्रीय चळवळीशीं सहानुभूति असल्यामुळें, लढाईला उभा राहिला; परंतु कांहीं कांहीं प्रांतांचे मुख्याधिकारी, राजप्रतिनिधी तटस्थ राहिले आणि अशा रीतीनें त्यांनीं या परकी राज्यांना मदतच केली. राजमाता सम्राज्ञी झु शी हिची सहानुभूति बॉक्सर लोकांविषयीं निःसंशय होती; परंतु उघडपणें तिनें त्यांच्याशीं कधीं संबंध ठेवला नाहीं. परकी लोकांची एकंदर असें सिद्ध करण्याची इच्छा होती, कीं हे बॉक्सर लोक म्हणजे निव्वळ लुटारू पेंढारी लोक होत. परंतु बॉक्सर लोकांचें हें १९०० सालचें बंड म्हणजे चीनला परकी देशांच्या ढवळाढवळीपासून मुक्त करण्यासाठीं केलेला खरोखर एक प्रयत्नच होता. सर रॉबर्ट हार्ट या नांवाचा एक वरिष्ठ दर्जाचा इंग्रज अधिकारी त्या वेळीं तेथील जकातखात्याच इन्स्पेक्टर जनरल–सर्वांत मुख्य अधिकारी होता. परदेशी वकिलातीवर जो वेढा पडला होता, त्यांत हा अधिकारी सांपडलेला होता. त्यानें लिहिलें आहे कीं "चिनी लोकांच्या भावना ज्या इतक्या खवळल्या होत्या त्याचा दोष परकी लोकांकडेच, विशेषतः मिशनरी लोकांकडे होता; आणि हें बंड मुळांत राष्ट्रीय स्वरूपाचेंच होतें. त्याचे ब्रहुतेक हेतू अत्यंत न्याय्य होते यांत काडीचा संशय घेण्यासारखा नाहीं. किंबहुना हे हेतू असे होते याबद्दल लोकाना जितकें सांगावें तितकें थोडेंच होईल."

आपल्या'पायांखालीं चिरडलेल्या एखाद्या आळीनें आपल्यावर एकाएकीं अशा रीतीनें उलटावें हें पाहून पाश्चात्य राज्यसत्तांचा तिळपापड झाला. पेकिंग-वेढ्यांत सांपडलेल्या आपल्या लोकांना वांचविण्यासाठीं व त्यांच्या संरक्षणासाठीं या राष्ट्रांनीं ताबडतोब तिकडे आपलीं सैन्यें मोठ्या झपाट्यानें पाठविलीं. या कामासाठीं त्यांनीं सैन्य पाठविणें रास्तही होतें. एका जर्मन सेनापतीच्या आधिपत्याखालीं, एक आंतरराष्ट्रीय (अनेक राष्ट्रीय) सैन्य वकिलातीवरील संकट निवारण्याकरितां म्हणून पेकिंगवर कूच करून गेलें. जर्मनीच्या कैसरनें चीनमधील आपल्या सैन्याला हुकूम दिला कीं प्राचीन काळच्या हूण लोकांप्रमाणें तुम्ही चीनमध्यें वागा. बहुधा या हुकुमावरूनच गेल्या महायुद्धांत इंग्रज लोक जर्मनांना हूण म्हणून संबोधूं लागले असावे.

कैसरचा हा सल्ला केवळ त्याच्याच सैन्यानें नव्हे, तर बाकीच्याही सर्व परकीय सैन्यांनीं अमलांत आणला. पेकिंगकडे कूच करीत असतांना या लोकांनीं वाटेंत इतकें अत्याचारी वर्तन केलें, कीं त्यांच्या हातीं पडण्यापेक्षां आत्महत्या करणें बरें असें लोकांना होऊन गेलें. त्या काळीं चिनी स्त्रियांमध्यें आपलीं पावलें आंखूड करण्याची पद्धति होती. त्यामुळें त्यांना सहज पळूनही जातां येत नव्हतें. म्हणून, त्यांपैकीं पुष्कळांनीं आत्महत्या केल्या. अशा रीतीनें आपल्या पाठीमागें आत्महत्या, मृत्यु आणि

जळतीं खेडेगांवें याची काळीकुट्ट छाया ठेवीत हें सैन्य पुढें कूच करीत चाललें होतें. या दोस्त राष्ट्रांच्या सैन्याबरोबर असणारा एक लष्करी बातमीदार लिहितो,

" यांत कांहीं अशा गोष्टी आहेत, कीं त्या मला लिहूं दिल्या जाणार नाहींत, लिहिल्या तरी इंग्लंडमध्यें कोणी छापणार नाहींत किंवा छापूं दिल्या जाणार नाहींत. या गोष्टींवरून असें दिसतें, कीं आमची पाश्चात्य सुधारणा म्हणजे आमच्या अंगच्या रानटीपणावरचा, असंस्कृतपणावरचा निव्वळ मुलामा मात्र आहे. जगांतल्या कोणत्याच लढाईसंबंधीं जें जें घडलें तें तें जसेंच्या तसें, वस्तुसत्य, आजपर्यंत केव्हांच लिहिण्यांत आलेलें नाहीं. ही लढाई कांहीं या परंपरेला अपवाद नाहीं."

हीं सैन्यें पेकिंगला पोंचून त्यांनीं तेथील वकिलातीवरील संकटाचें निवारण केलें आणि त्यानंतर मग पेकिंग शहराची लूट करण्यांत आली. पिझारोच्या कालापासून इतिहासांत एवढी मोठी लूट दुसरी कोणतीच झाली नाहीं. कलाकौशल्यात्मक वस्तूंचे पेकिंगमधले संग्रह अगदींच अडाणी व असंस्कृत अशा लोकांच्या हातांमध्यें पडले. त्यांना या वस्तूंचें महत्त्व किंवा किंमतसुद्धां समजण्याची अक्कल नव्हती. अत्यंत खेद करण्यासारखी गोष्ट म्हणजे धर्माचें कुंकूं लावणाऱ्या मिशनऱ्यांनींसुद्धां या लुटालुटींत भाग घेतला. थोड्या थोड्या लोकांचे गट घरोघर जात आणि घरांवर एक पत्रक लावून जाहीर करीत, कीं हें घर आमच्या मालकीचें आहे. मग ते त्या घरांतील सर्व किंमती वस्तूंची विक्री करीत, आणि नंतर त्यापुढच्या मोठ्या घरांत हे लोक प्रवेश करीत ; अशी ही पद्धतशीर लूट होती.

याच वेळीं चीनची वांटणी होऊन जावयाची ; परंतु या पाश्चात्य राष्ट्रांमधील आपसांतील चुरस आणि कांहीं अंशीं अमेरिकन सरकारचें धोरण यांमुळें चीनवरील हें संकट टळलें ; परंतु अपमानाचा फार मोठा घोट गिळणें चीनला भाग पडलें. चीनवर इतक्या म्हणून अन्यायाच्या अटी लादण्यांत आल्या, कीं त्यांना जणुं अंतच नाहीं. उदाहरणार्थ, पेकिंगमध्यें एक आणि आगगाडीच्या रस्त्यांचें संरक्षण करण्यासाठीं म्हणून एक, परकी लोकांचें लष्कर चीनमध्यें कायमचें रहावयाचें; चीनमधील पुष्कळसे किल्ले नष्ट करून टाकावयाचे; परकीयविरोधी अशा कोणत्याही संस्थेचा सभासद होण्याबद्दल फांशीची शिक्षा, पूर्वीच्यापेक्षां किती तरी अधिक व्यापारी सवलती आणि नुकसानभरपाईदाखल भली मोठी रक्कम ; परंतु या सर्वांहूनही अत्यंत भयंकर तडाखा म्हणजे बॉक्सर चळवळींतील राष्ट्रभक्त पुढाऱ्यांना 'बंडखोर' म्हणून ठार करण्याला चिनी सरकारला भाग पाडण्यांत आलें. इतिहासांत 'पेकिंगच्या तहाचा मसुदा' म्हणून प्रसिद्ध असलेला मसुदा हा अशा स्वरूपाचा असून त्याच्यावर १९०१ सालीं सह्या झाल्या.

खास चीनमध्यें आणि विशेषतः पेकिंगच्या आसपास हा सगळा प्रकार चालू असतां या सगळ्या अंदाधुंदीच्या परिस्थितीचा फायदा घेऊन रशियन सरकारनें पुष्कळ मोठें सैन्य सैबेरियांतून मांचुरियामध्यें पाठविलें. चीनला तर याविरुद्ध कांहींच करण्याची ताकद नव्हती. जास्तींत जास्त म्हणजे निषेध व्यक्त करावयाचा एवढेंच चीनच्या

हातीं होतें. परंतु झालें काय, कीं रशियन सरकारनें चीनचा एवढा मोठा तुकडा आपल्या कबजांत घ्यावा ही गोष्ट बाकीच्या पाश्चात्य राष्ट्रांना अतिशयच नापसंत होती. या घटनेमुळें जपानी सरकारला तर फारच चिंता उत्पन्न झाली. त्याला ही गोष्ट धोक्याची वाटली. तेव्हां या सर्व राष्ट्रांनीं मिळून असा आग्रह धरला, कीं रशियानें मांचुरियांतून माघार घेतली पाहिजे. त्यावर लोकांनीं आपल्या सद्धेतूबद्दल असा संशय घ्यावा याबद्दल आपल्याला फार आश्चर्य वाटतें आणि आपल्या पवित्र मनाला त्यामुळें फार मोठें दुःख झालें, असा आविर्भाव रशियन सरकारनें आणून बाकीच्या राष्ट्रांना त्यानें आश्वासन देण्याचा यत्न केला, कीं चीनच्या सार्वभौमत्वाला किंवा राज्याधिकाराला यत्किंचित् धक्का लावण्याचा आपला हेतु नाहीं आणि मांचु-रियांतील रशियन रेल्वेवर जी गडबड माजली आहे ती शांत होतांच आपण आपलें सैन्य माघारें काढून घेणार आहोंत. झालें, एवढ्यावर सगळयांची समजी झाली आणि आपण किती स्वार्थरहित आणि पुण्यशील लोक आहोंत म्हणून या राष्ट्रांनीं परस्परांच्या पाठीही थोपटून घेतल्या असल्या पाहिजेत, हें निःसंशय. परंतु इतकें होऊनही रशियन सैन्य मांचुरियांत तर राहिलेंच; पण आणखी पुढें त्यानें कोरियाच्या सरहद्दीपर्यंतचा मुलूख व्यापला.

मांचुरियापासून कोरियापर्यंत रशियाचें हें पाऊल पुढें पडलेलें पाहून जपानच्या अंगाचा फार तिळपापड झाला; म्हणून जपाननें कोणाला कळूं न देतां अतिशयच कडेकोट लढाईची तयारी केली. १८९५ सालची आठवण तें राष्ट्र विसरलें नव्हतें. चीनच्या लढाईनंतर जपानच्या ताब्यांत आलेलें पोर्ट आर्थर बंदर तीन मोठ्या राष्ट्रांनीं एकत्र होऊन जपानला सोडून द्यावयाला लाविलें होतें. असा प्रकार पुन्हां होऊं नये अशी त्याची खटपट होती. जपानी लोकांनीं पाहिलें, कीं इंग्लंड हें एक असें राष्ट्र आहे, कीं त्याला रशियाच्या चाललेल्या वाढीची भीति वाटत होती आणि त्या वाढीला पायबंद घालावा असा त्याचा उद्देश होता. १९०२ सालीं जपान आणि इंग्लंड यांचा एक तहनामा झाला. अतिपूर्वेकडे या दोघांपैकीं कोणावरही दडपण आणण्यासाठीं इतर कोणीं राष्ट्रांनीं एकत्र होणें अशक्य व्हावें हा या तहाचा हेतु होता. जपानला आतां निर्धास्तपणा वाटून त्यानें रशियाशीं चढाईखोर धोरण अवलंबिण्यास सुरुवात केली. रशियानें मांचुरियांतून आपलें सैन्य मागें घेतलें पाहिजे असें जपानचें मागणें रशियाकडे गेलें; परंतु त्या काळच्या रशियन झारशाहीला मूर्खासारखें असें वाटत होतें, कीं जपान म्हणजे एक कःपदार्थ देश; तो म्हणजे आपल्याविरुद्ध लढाईस उभा राहील अशी त्यांची केव्हांच कल्पना झाली नाहीं.

१९०४ च्या सुरुवातीला या दोन देशांत युद्ध सुरू झालें. जपानची युद्धाची पुरी तयारीच होती आणि जपानी लोक त्यांच्या सरकारच्या प्रचारामुळें आणि त्यांच्यामधील राजपूजेच्या भावनेमुळें राष्ट्रप्रेमाच्या भरानें भडकून गेलेले होते. उलटपक्षीं रशियाची लढाईची तयारी मुळींच नव्हती आणि तेथील अनियंत्रित राजसत्तेला

आपला कारभार चालू ठेवण्यासाठीं लोकांवर एकसारखा जुलूम करीत रहावें लागत होतें. हें युद्ध दीड वर्षपर्यंत चालू राहिलें आणि सर्व आशिया खंड, यूरप खंड आणि अमेरिका यांच्या डोळ्यांसमोर जपाननें जमिनीवर आणि समुद्रावर विजयामागून विजय मिळविले. जपान्यांनीं अचंबा करण्यासारखीं त्यागाचीं कृत्यें करून आणि भयंकर कत्तली करून पोर्ट आर्थर बंदर सर केलें. रशियानें लढाऊ जहाजांचा एक मोठा काफिला समुद्रमार्गें इतक्या लांब अतिपूर्वेकडे पाठविला. अर्ध्या जगाचा दीर्घ प्रवास करून हजारों मैलांच्या प्रवासांत टक्केटोणपे खाऊन, भिजून, चिखल खाऊन हें आरमार जपानच्या समुद्रांत एकदांचें दाखल झालें आणि तेथें जपान आणि कोरिया याच्यामधील अरुंद सामुद्रधुनीमध्यें जपान्यांनीं तें बुडविलें आणि त्या काफिल्याच्या ॲड्मिरललाही समुद्रतळाशीं पोंचविलें.

रशियाला, म्हणजे झारशाहीखालच्या रशियाला, एकामागून एक पराभवाचे तडाखे खावे लागले. खरें पाहतां रशियाजवळ शक्तीचा भरपूर सांठा होता. याच रशियानें शंभर वर्षांपूर्वीं महान् नेपोलियनला खडे चारले नव्हते काय? पण त्या वेळीं खऱ्या रशियाला, रशियाच्या सामान्य जनतेच्या शब्दाला, मोल होतें.

या माझ्या पत्रांमध्यें मी सारखा रशिया, इंग्लंड, फ्रान्स, चीन, जपान अशा देशांचा, जणुं कांहीं यांपैकीं प्रत्येक देश एकेक स्वतंत्र व्यक्ति आहे असें भासावें, अशा प्रकारचा उल्लेख करीत आलों आहें. ही एक मला भलतीच वाईट खोड लागली आहे, पुस्तकें वाचून आणि वर्तमानपत्रें वाचून. खरोखर मला म्हणावयाचें असतें, त्या त्या काळचें रशियन सरकार, इंग्लिश सरकार वगैरे. यांपैकीं एखादें सरकार केवळ एखाद्या अगदींच लहान गटाच्या प्रतिनिधींचें असेल अथवा एखादें एखाद्या मोठ्या वर्गाचें प्रतिनिधि असेल; परंतु असें कोणतेंही सरकार खरोखर त्या त्या देशाच्या सर्व लोकांचें प्रतिनिधि असेल असें म्हणणें हें बरोबर नाहीं. एकोणिसाव्या शतकांतील इंग्लंडचें सरकार कोणाचें प्रतिनिधि होतें असें म्हणतां येईल? तर ज्यांचा पार्लमेंटवर ताबा चालत होता अशा जमीन-मालक आणि वरिष्ठ मध्यमवर्गीय सुखवस्तु लोकांच्या लहानशा एका गटाचें. देशांतील फार मोठ्या बहुसंख्य लोकांना राज्यकारभाराच्या बाबतींत शब्दही काढावयाचा अधिकार नव्हता. आज हिंदुस्थानांतसुद्धां आम्ही नाहीं का म्हटलेलें ऐकत, कीं अमुक गृहस्थांना म्हणे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून राष्ट्रसंघांत, नाहीं तर गोलमेज-परिषदेला, अथवा अशा अन्य ठिकाणीं पाठविलेलें आहे म्हणून? पण ही सगळी निरर्थक बडबड आहे. जे प्रतिनिधी म्हणून जात असतात, त्यांची निवड जोंपर्यंत हिंदुस्थानांतील लोकांकडून होत नाहीं, तोंपर्यंत हे लोक हिंदुस्थानचे प्रतिनिधी होऊं शकत नाहींत. आज ते लोक हिंदुस्थान सरकारनें नेमलेले लोकच आहेत. आणि हें हिंदुस्थान सरकारसुद्धां, नांव कांहींही असलें तरी ब्रिटिश राज्यसत्तेचें—सरकारचें—एक निव्वळ खातें मात्र आहे. रूसो-जपानी युद्धाच्या वेळीं रशियामध्यें अनियंत्रित राजसत्ता नांदत होती. रशियामध्यें समाविष्ट होणाऱ्या

एकूण एक प्रदेशावरील झार हा एक एकतंत्र राजा होता, बादशहा होता. आणि त्यात भर म्हणजे तो एक महामूर्ख सत्ताधीश होता. रशियांतील शेतकऱ्यांना आणि कामकऱ्यांना लष्कराच्या जोरावर दडपून टाकण्यांत आलेलें होतें. प्रत्यक्ष मध्यम वर्गांतील लोकांनाही राज्यकारभारामध्यें कांहीं बोलायला अधिकार नव्हता. या जुलुमाविरुद्ध डोकें वर करून हातपाय हालविण्याचा प्रयत्न पुष्कळ तरुण लोक करीत आले होते आणि आपल्या स्वातंत्र्यासाठीं त्यांनीं प्राणही अर्पण केले होते. यामध्यें अर्थात् तरुण मुलीही होत्या. तेव्हा मी जेव्हां रशियानें अमुक केलें, तमुक केलें, जपानशीं लढाई केली म्हणतों, तेव्हां माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं झारशाहीनें हें असें केलें; दुसरा कांहीं नाहीं.

या जपानच्या लढाईंत भयंकरच मार खावा लागल्यामुळें रशियांतील सामान्य जनतेच्या हालअपेष्टा आणखीच वाढल्या. सरकारवर दडपण आणण्यासाठीं म्हणून कारखान्यांतील मजूर वारंवार संप करूं लागले. २२ जानेवारी १९०५ सालीं कित्येक हजार शेतकऱ्यांची आणि कामगारांची एक अत्यंत शांततायुक्त मिरवणूक एका पाद्र्याच्या नेतृत्वाखालीं झारच्या विंटर पॅलेसकडे ‘हालअपेष्टांतून आम्हांला सोडवा’ म्हणून झारला विनंति करण्यासाठीं निघाली. झारनें या लोकांना जें काय बोलावयाचें होतें तें ऐकून न घेतां त्यांच्यावर गोळीबार केला. त्या भयंकर कत्तलीमध्यें २०० लोक मरण पावले आणि पीटर्सबर्ग शहरांतील थंडीच्या दिवसांतील तें बर्फ रक्तानें लाल होऊन गेलें! त्या दिवशीं रविवार होता. म्हणून तेव्हांपासून या दिवसाला “रक्ताळलेला रविवार” असें नांव पडलेलें आहे. या प्रसंगामुळें साऱ्या देशांत मोठीच खोलपर्यंत खळबळ माजली. कामगारांनीं संप केले आणि त्यांतूनच राज्यक्रांति करण्याचा एक नवा प्रयत्न निघाला. झारच्या सरकारनें हा क्रांतीचा प्रयत्न अत्यंत क्रूरपणें दडपून टाकला. या क्रांतीची हकिकत आपण आपल्या दृष्टीनें पुष्कळ कारणांसाठीं पाहाण्यासारखी आहे. पुढें बारा वर्षांनीं १९१७ मध्यें रशियाचें सारेंच स्वरूप पार पालटून टाकणारी जी महान् क्रांति झाली, तिची ही १९०५ ची क्रांति म्हणजे एक प्रकारची पूर्वतयारीच होती. या अयशस्वी क्रांतीच्या काळात क्रांतिकारक कार्यकर्त्यांनीं पुढच्या काळांत अतिशय प्रसिद्धीस आलेलीं जीं सोव्हिएट्स म्हणजे संघ त्यांची प्रस्थापना केली.

चीन-जपान आणि रूसो-जपानी युद्ध यांच्याविषयीं बोलतां बोलतां माझ्या नेहमींच्या खोडीप्रमाणें मी वाहत वाहत रशियांतील १९०५ च्या राज्यक्रांतींत येऊन दाखल झालों आहें; परंतु मांचुरियांतील या लढाईची पार्श्वभूमि तुला समजून सांगण्यासाठीं मला ही भानगड या ठिकाणीं थोडीशी सांगावी लागली. हा जो क्रांतीचा प्रयत्न झाला आणि त्यांत रशियांतील लोकांच्या असंतोषाचा जो पारा चढलेला दिसला, त्यामुळेंच मुख्यतः झारनें नमतें घेऊन जपानशीं तह केला.

सप्टेंबर १९०५ मध्यें पोर्टस्माउथ येथें तहावर सह्या होऊन हें रूसो-जपानी

युद्ध संपलें. हें पोर्टस्माउथ बंदर अमेरिकेंत आहे. या ठिकाणीं अमेरिकेच्या अध्यक्षांनीं दोन्ही पक्षांना बोलावून घेतलें होतें आणि तेथेंच तहाचें काम पुरें झालें. चीन-जपानच्या युद्धांत लिऔतुंगच्या द्वीपकल्पाचा प्रांत आणि पोर्ट आर्थर बंदर जपानला सोडून द्यावें लागलें होतें हें तुला आठवत असेल. आतां या तहामुळें हा प्रांत आणि हें बंदर अखेरीस जपानला मिळालें. रशियन लोकांनीं मांचुरियांत जो आगगाडीचा रस्ता बांधला होता त्याचाही बराचसा भाग आणखी वर जपानला मिळाला आणि जपानच्या उत्तरेकडील सखालीन बेटांतील अर्धा भाग जपानला मिळाला. त्याशिवाय रशियानें कोरियावर हक्क न सांगण्याचें कबूल केलें.

अशा रीतीनें जपानचा विजय झाला आणि आतां जगांतील श्रेष्ठ राजसत्तांच्या जादूनें भारलेल्या परिसरांत जपानचा प्रवेश झाला. जपान पडला आशिया खंडांतला देश. तेव्हां त्याच्या विजयामुळें आशिया खंडांतील सर्व देशांमध्यें फारच दूरगामी परिणाम झाले. मी लहान असतांना या विजयामुळें माझें डोकें कसें उत्साहानें भरून जात असे हें मीं तुला मागें सांगितलेंच आहे. आशिया खंडांतील किती तरी समजूं लागलेल्या मुलांमुलींच्या अंतःकरणांत असें हें उत्साहाचें वारें माझ्याप्रमाणेंच खेळूं लागलें होतें. या युद्धांत एका मोठ्या यूरपीय राष्ट्राचा पराभव झाला होता. तेव्हां प्राचीन काळीं ज्याप्रमाणें आशिया खंडानें यूरपचा पुष्कळदां पराभव केला होता, तसाच आशियाला तो अजूनही करतां येईल हें वाटणें त्या उत्साहाचें कारण आणि स्वरूप होतें. या युद्धानंतर पूर्वेकडील देशांत राष्ट्रवादाचें वारें झपाट्यानें वाढत गेलें आणि 'आशियांतील लोकांसाठीं आशिया खंड' अशा घोषणा होऊं लागल्या; परंतु हा जो नवा राष्ट्रवाद होता तो कांहीं केवळ भूतकाळाकडे परत जाणारा, जुन्या आचार-विचारांना चिकटून बसणारा नव्हता. जपाननें जय मिळविला याचें कारण जपाननें पाश्चिमात्यांची नवीन औद्योगिक उत्पादनपरंपरा उचलली, हें लोकांनीं ओळखलें होतें आणि या पाश्चिमात्यांच्या कल्पना आणि उत्पादनपरंपरा साऱ्या पौर्वात्य देशांत दिवसेंदिवस अधिकाधिक लोकप्रिय होत चालल्या होत्या.

## ११८

## चीनमध्यें प्रजासत्ताक राज्य स्थापन होतें

३० डिसेंबर, १९३२

जपानच्या रशियावरील विजयामुळें आशियांतील राष्ट्रांना आनंद होऊन मूठभर मांसच चढल्यासारखें कसें झालें हें आपण पाहिलें. त्याचा तावडतोबीचा परिणाम मात्र एवढाच झाला, कीं जगांत जीं मूठभर चढाऊ धोरणाची साम्राज्यशाही राष्ट्रें होतीं

त्यांच्यामध्यें आणखी एकाची भर पडली. या भरीचा पहिला तडाखा कोरियाला सहन करावा लागला. जपानचा उदय म्हणजेच कोरियाचें मरण ठरलें. जपाननें आपलीं द्वारें खुलीं करून जगाशीं संबंध जोडल्या दिवसापासून सबंध कोरिया आणि मांचुरियाचा कांहीं भाग आपला म्हणून खास हेरून ठेवलेला होता. अर्थातच चीनचें अखंडत्व आणि कोरियाचें स्वातंत्र्य याना धक्का लावण्याचा आपला हेतु नाहीं हें मात्र जपान देश वारंवार जाहीर करीतच होता. एखाद्याच्यावर दरवडा घालीत असतांनासुद्धां आपण हें तुझ्याविषयींच्या सद्भावनेनें आणि तुझ्या हितासाठींच करीत आहोंत अशी, किंवा एखाद्याचा प्रत्यक्ष प्राण घेत असतांही मनुष्यजीवनाचें पावित्र्य आपण केवढें मोठें मानतों अशाविषयींची, तोंडभर आश्वासनें देत राहण्याची साम्राज्यशाही राष्ट्रांची नेहमींची पद्धति असते. म्हणून जपाननें इकडे आपण कोरियामध्यें कांहीं ढवळाढवळ करणार नाहीं असें मोठें गंभीरपणानें आणि ऐटींत जाहीर केलें आणि त्याच वेळीं कोरियाचा कबजा मिळविण्याचें आपलें जुनें राजकारण पुढें चालूच ठेवलें. जपानचीं चीन व रशिया यांच्याशीं जीं युद्धें झालीं, त्यांचें तरी मूळ कारण आणि उद्दिष्ट कोरिया आणि मांचुरिया हेच प्रांत होते. एकेक पाऊल जपानचें आपल्या उद्दिष्ट मार्गानें पुढेंच पडत चाललें होतें आणि आतां चीन आणि रशिया यांचा पराभव झाल्यानंतर तर जपानचा मार्ग मोकळाच झाला होता.

आपलें साम्राज्यशाही धोरण चालविण्याच्या बाबतींत अमुक एक गोष्ट वाईट, ती कशी करावी, अशी शंका म्हणून कधीं जपानला शिवली नाहीं. जें हातीं लागलें तें उघड उघड गिळंकृत करण्याचा क्रम जपाननें चालू केला; आपल्या हेतूंवर किंवा कारस्थानांवर कांहीं पांघरूण घालावें असा मुळींसुद्धां विचार त्यानें केला नाहीं. पुष्कळ पूर्वी, १८९४ सालींच चीन-जपान युद्ध सुरू होण्यापूर्वीच, जपानी लोक कोरियाची राजधानी सेऊल येथील राजवाड्यांत जबरदस्तीनें घुसले होते आणि तेथील राणी त्यांचे हुकूम मानीना म्हणून त्यांनीं तिला राजवाड्यांतून उचलून, गादीवरून दूर करून, कैदेंत टाकलें होतें. आणि १९०५ ची रूसो-जपानी लढाई संपल्यानंतर तर जपानी सरकारनें कोरियाच्या राजाला आपल्या देशाचें स्वातंत्र्य नष्ट करून जपानचें अधिराज्य मान्य करण्याच्या करारावर सही करावयाला भाग पाडलें होतें. यानंतर पांच वर्षांच्या आंत या दुर्दैवी राजाला गादीवरून अजिबात काढून टाकण्यांत आलें आणि कोरिया देश खालसा करून जपानी साम्राज्यांत दाखल करण्यांत आला. १९१० सालची ही हकिकत. सुमारें तीन हजारांहून जास्त वर्षांच्या स्वातंत्र्याच्या दीर्घ कालानंतर अशा रीतीनें कोरियाचें स्वतंत्र राज्य म्हणून अस्तित्व नाहींसें झालें.

या वेळीं ज्या राजाला गादीवरून काढण्यांत आलें तो पांचशें वर्षांपूर्वी ज्या घराण्यानें कोरियांतून मंगोलियन लोकांना हांकलून दिलें त्यांचा वंशज होता. पुढें आपली वडील भगिनी जी चीनची संस्कृति तिच्याप्रमाणेंच कोरियाची संस्कृति पण

लांकडासारखी निर्जीव, निचरा नसलेल्या तलावांतील पाण्याप्रमाणें सडलेली अशी झाली आणि याबद्दलचें प्रायश्चित्त कोरियाला घ्यावें लागलें.

कोरियाला पुन्हां आतां त्याचें पहिलें चोसेन "उषःकालीन शांततेची भूमि" हें नांव देण्यांत आलें. जपान्यांनीं आपल्याबरोबर कांहीं काहीं आधुनिक सुधारणा आणल्या खऱ्या; परंतु कोरियामधील लोकांचें तेज आणि रंग हीं मात्र त्यांनीं अगदीं निर्दयपणें नष्ट करून टाकलीं. तेव्हांपासून पुष्कळ वर्षे कोरियन लोकांचा स्वातंत्र्याचा लढा चालूच राहिला; मधूनमधून बंडेंही झालीं. त्यांपैकीं १९१९ चें बंड हें सर्वांत महत्त्वाचें झालें. कोरियांतील लोक, विशेषतः तरुण स्त्रीपुरुष, मोठ्या शौर्यानें लढा करीत होते; परंतु शत्रु त्यांना फारच भारी होता. त्यांचा पक्ष अगदींच दुबळा होता. एका प्रसंगीं कोरियन लोकांच्या एका संस्थेनें आमचा देश स्वतंत्र झाला असा ठराव करून जपानची सत्ता झुगारून देण्याचें ठरविलें. असें सांगतात, कीं लगेच त्यांनीं पोलिसांना टेलिफोन करून, आपण काय काय केलें याची वर्दी त्याना दिली. अशा रीतीनें स्वातंत्र्याच्या ध्येयासाठीं जाणूनबुजून त्यांनीं आपले बळी दिले. कोरियन लोकांची स्वातंत्र्याची चळवळ जपाननें जी दडपून टाकली त्या घटनेची हकिकत म्हणजे इतिहासांतील एक अगदीं काळेंकुट्ट आणि दुःखकारक प्रकरण आहे. नुकत्याच कॉलेजमधून बाहेर पडलेल्या तरुण मुलींनीं या स्वातंत्र्याच्या लढ्यांत मोठा महत्त्वाचा भाग घेतला होता, हें वाचून तुला खास फार बरें वाटेल.

आतां आपण चीनकडे परत जाऊं या. बॉक्सर चळवळ दडपून टाकण्यांत आली आणि पेकिंगच्या मसुद्यावर सह्या झाल्या येथपर्यंत आपण आलों होतों आणि तेथेंच चीनला एकाएकीं सोडून आपण दुसरीकडे भटकलों. चीनची आता अगदींच दीन अवस्था होऊन गेली होती. त्याच्यामध्यें कांहींच त्राण उरलें नव्हतें. तेव्हां पुन्हां एकदां कांहीं तरी सुधारणा करावी असा प्रयत्न सुरू झाला. राजमाता सम्राज्ञी होती. तिला सुद्धां आता कांहीं तरी असें करणें जरूर आहे असें पटूं लागलें. रूसो-जपानी युद्धांत सगळी लढाई खुद्द चीनच्या राज्यांत, मांचुरियामध्यें चालली होती. परंतु चीन देश त्या लढाईंत अगदीं तटस्थ प्रेक्षक म्हणूनच राहिला. या लढाईंत जपानला जय मिळाल्यामुळें चीनमधील सुधारणावादी पक्षाला अधिक बळ चढलें. आतां चीनमध्यें शिक्षणाची आधुनिक पद्धति सुरू करण्यांत आली आणि पुष्कळसे विद्यार्थी यूरप, अमेरिका, जपान यांमध्यें शास्त्रांचें शिक्षण घेण्यासाठीं पाठविण्यांत येऊं लागले. पूर्वीची जी सरकारी नोकरींत प्रवेश करण्यासाठीं म्हणून साहित्याच्या परीक्षेची पद्धति होती ती आतां रद्द करण्यांत आली. खास चीनच्या ठेवणींतील ही मोठीच विलक्षण पद्धति चीनमध्यें सुरू होऊन राहिल्याला २००० वर्षें आतां होऊन गेलीं होतीं. हॅन वंशाच्या कारकीर्दीपासून ती जी अखंड चालू होती ती या वेळपर्यंत. खरें म्हणजे अलीकडे किती तरी काळपर्यंत ही पद्धति अगदीं निरुपयोगी झालेली होती. तिच्यामुळें चीन देश मागासलेला राहत होता. तेव्हां ती नष्ट करण्यांत

आली हें चांगलेंच झालें. तरी पण पुष्कळ काळपर्यंत याच पद्धतीचा मोठा विलक्षण उपकार चीनवर झाला यांत शंका नाहीं. ही पद्धति चीनच्या जीवनविषयक भूमिकेची बरोबर निदर्शक होती. आशियांतील बहुतेक इतर देशांत ही जीवनविषयक भूमिका एक तर सरंजामशाहीच्या किंवा भिक्षुकशाहीच्या धोरणाची असे. चीनची भूमिका सरंजामशाहीच्या धोरणाची नव्हती किंवा भिक्षुकशाहीच्याही धोरणाची नव्हती. चीनची भूमिका किंवा प्रवृत्ति बुद्धिप्रधान होती. साऱ्या जगांत चीनमध्यें धर्माची पकड लोकांच्या मनावर अतिशयच कमी; तरीपण नैतिक बंधनाची आणि आपसांतील सुरळीत व्यवहाराची त्यांची जी पद्धति आहे ती धार्मिक म्हणून गाजणाऱ्या कोणाही लोकापेक्षा चिनी लोक अधिक कसोशीनें पाळीत आलेले आहेत. श्रद्धेपेक्षां बुद्धीच्या पायावर आधारलेली समाजरचना असावी असा चिनी लोकांचा प्रयत्न होता. परंतु आपल्या बुद्धिवादाला सुद्धां त्यांनीं आपल्या प्राचीन पवित्र ग्रंथांतील शब्दांची मर्यादा घातल्यामुळें जीवनांत प्रगति होणें किंवा जरुरीप्रमाणें फेरबदल होणें या गोष्टींना प्रतिबंध झाला. अर्थातच त्यामुळें समाजांत सडकेपणा आणि निर्जीवपणा उत्पन्न झाला. चिनी लोकांच्या या बुद्धिप्रधानतेपासून आपणां हिंदुस्थानांतील लोकांना पुष्कळच शिकण्यासारखें आहे. कारण आपल्या मनावरचीं जातिबंधनें, शब्दप्रामाण्यावर आधारलेला अपरिवर्तनीय धर्म (आंधळी धर्मश्रद्धा), भिक्षुकशाही कर्मकांड आणि सरंजामशाही समाजपद्धतीच्या कल्पना यांची पकड ढिली झालेली नाहीं. चीनचा महान् ऋषि कान्फ्युशियस यानें आपल्या लोकांना जो एक इषारा दिला आहे तो आपण लक्षांत ठेवण्यासारखा आहे. जे लोक आपला अतिमानुष अशा कांहीं शक्तीशीं संबंध किंवा व्यवहार आहे म्हणून ढोंग करतात, अशा लोकांच्या वाऱ्यालासुद्धां कधीं उभे राहूं नका. तुम्ही आपल्या देशांत या अतिमानुषत्व किंवा अतींद्रियत्व यांच्यावरील श्रद्धेला जर का पाय रोवूं दिलांत, तर त्याचा परिणाम म्हणजे तुमच्या देशावर भयंकर संकट ओढवेल. दुर्दैवानें आमच्या देशांत आजही किती तरी लोक कोणी कोणी डोक्यावर नारदासारखी शेंडी ठेवून, कोणी कपाळावर चित्रविचित्र पट्टे ओढून, तर कोणी केशरी झगा परिधान करून, आपण त्या अतींद्रिय किंवा अमानुष शक्तीचे पृथ्वीवरील प्रतिनिधी आहों म्हणून आव आणीत असतात आणि सामान्य जनतेला लुबाडीत असतात.

परंतु चीनमध्यें प्राचीन काळापासून चालत आलेली अशी ही बुद्धिप्रधान आणि उच्च प्रकारची संस्कृति जरी होती, तरी वर्तमानकालीन काळाच्या ओघावर चीनला पकड मिळवितां आली नव्हती. आणि ऐन संकटाच्या प्रसंगीं चीनला आपल्या प्राचीन सामाजिक संस्था उपयोगाला येऊं शकल्या नाहींत. परंतु बदलत्या काळाबरोबर चीनच्या पुष्कळच तरुण मुलांमुलींत नवचैतन्याचें वारें खेळूं लागलेलें होतें आणि या जुन्या संस्था व परंपरांऐवजीं अन्य मार्गांनें सुखाचा शोध लावण्याचा अविरत

परिश्रम या मंडळींनीं सुरू केला होता. त्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं त्या म्हाताऱ्या राजमातेलासुद्धां खडबडून जागें केलें. तिलासुद्धां थोडी नवी दृष्टि आणून दिली. ही बाईसुद्धां मग आतां देशाला नवी राज्यघटना आणि स्वराज्य दिलें पाहिजे असें म्हणूं लागली आणि त्यासाठीं परदेशच्या राज्यसंघटनांचा अभ्यास करावा म्हणून तिनें एक प्रतिनिधिमंडळही पाठविलें.

अशा रीतीनें वृद्ध राजमातेच्या चिनी सरकारनें एकदांची हालचाल करायला सुरुवात केली; परंतु लोकांची हालचाल यापेक्षांही जलद सुरू झालेली होती. याच्या आधींच किती तरी वर्षें, १८९४ मध्येंच डॉ. सन्यत्सेन यांनीं 'चिनी पुनरुज्जीवन संघ' स्थापन केला होता आणि परकी राष्ट्रांनीं चीनवर हे जे अन्याय आणि एकतर्फी बोजांचे तह (त्या तहांना चिनी लोक असमान तह असें म्हणतात) जबरदस्तीनें लादले होते, त्या तहाचा निषेध म्हणून पुष्कळसे लोक सन्यत्सेन यांच्या संघाला जाऊन मिळालेले होते. या संघाची चांगली वाढ होत गेली. देशांतील तरुण लोकांचें मन त्याच्याकडे वेधत चाललें. १९११ मध्यें या संघानें आपलें नांव बदलून नवीन 'कुओ मिन् टांग' म्हणजे "जनतेचा राष्ट्रीय पक्ष" असें नवें नांव घेतलें. एव्हां-पासून हा चिनी पक्ष चिनी राज्यक्रांतीच्या प्रयत्नांचें केंद्रस्थान होऊन बसला. या चळवळीची प्रेरणा करणारे डॉ. सन्यत्सेन यांनीं राज्यघटनेसाठीं अमेरिकेचा नमुना आपल्यापुढें बाळगलेला होता. इंग्लंडमधल्याप्रमाणें मर्यादित राजसत्ता त्यांना नको होती. जपानच्याप्रमाणें बादशहाच्या पूजेचें, भक्तीचें स्तोम तर त्यांना मुळींच नको होतें; तर त्यांना प्रजासत्ताक राज्य प्रस्थापित करावयाचें होतें. एक तर चिनी लोकांनीं आजपर्यंत आपल्या बादशहाचें स्तोम असें केव्हांच माजविलें नव्हतें; आणखी सध्यांचें जें राजघराणें होतें तें मुळांत चीनचें होतेंच कोठे? हें घराणें होतें मांचूवंशाचें आणि चीनमध्यें तर सध्यां पुष्कळच मांचूवंशाचा द्वेष फैलावलेला होता. लोकांमध्यें ही जी अशी पुष्कळ खळबळ माजून राहिली होती तिचा परिणाम होऊन वृद्ध राजमाता कांहीं हालचाल करूं पाहत होती; परंतु चीनला नवीन राज्यघटना देणार म्हणून जाहीर केल्यावर ही वृद्ध राणी लौकरच मरण पावली. यांत आश्चर्याची गोष्ट अशी, कीं ही वृद्ध राणी आणि ज्या आपल्या पुतण्याला तिनें राजपदावरून दूर केलें होतें तो तिचा पुतण्या, माजी बादशहा, अशीं हीं दोन्ही माणसें १९०८ च्या नवंबर महिन्यांत एकमेकांपासून चोवीस तासांच्या आंत मरण पावलीं. आतां बादशहाच्या गादीवर एक पाळण्यांतलें पोर आलें.

या वेळीं लोकप्रतिनिधींचें कायदेमंडळ स्थापन करण्याबद्दल मोठ्या जोराजोरानें मागणी करण्यांत येऊं लागली आणि मांचू-विरोधी आणि राजपद-विरोधी अशा भावनांची तीव्रता वाढत गेली. क्रांतिकारकांच्या पक्षाला जोर चढूं लागला. त्यांना तोंड देण्याचें सामर्थ्य त्या वेळीं चीनमध्यें फक्त एकाच मनुष्याच्या ठिकाणीं होतें. तो म्हणजे युआन शी काई नांवाचा एक प्रांताधिपपदावर असलेला गृहस्थ. हा म्हातारा

मोठा कपटी कोल्हा होता; परंतु चीनमध्यें या वेळीं जें एकटें एकच आधुनिक पद्धतीचें आणि कर्तृत्ववान् असें " नमुनेदार सैन्य " या नांवानें प्रसिद्ध असलेलें लष्कर होतें, तें या वेळीं त्याच्या ताब्यांत होतें. मांचू राज्यकर्त्यांनीं एक अत्यंत मूर्खपणा केला; त्यांनीं युआनचा अपमान करून त्याला अधिकारावरून काढून टाकलें आणि त्या वेळीं, थोडा वेळ का होईना, पण त्यांना ज्यानें हात दिला असा जो एकटाच एक मनुष्य होता, त्याच्या मदतीचा संभव त्यांनीं अशा रीतीनें नाहींसा केला. १९११ च्या ऑक्टोबरमध्ये यांगत्सी नदीच्या खोऱ्यांत युद्धाला सुरुवात झाली आणि लौकरच मध्य आणि दक्षिण चीनचा बहुतेक सर्व भाग बंडांत सामील झाला. १९१२ च्या वर्षारंभाच्या दिवशीं बंडामध्यें सामील झालेल्या या प्रातांनीं एक प्रजासत्ताक राज्य स्थापन केल्याची घोषणा केली आणि नानकिंग येथें या राज्याची राजधानी केली. डॉ. सन्‌यत्‌सेन याना या प्रजासत्ताक राज्याचे अध्यक्ष निवडण्यात आलें.

दरम्यान युआन शी काइ बाजूला राहून हें नाटक पाहत होता आणि आपल्याला सोयीचें आणि फायदेशीर होईल अशा रीतीनें त्यांत हात घालण्याचा क्षण केव्हां येतो याची वाट पाहत टपून बसला होता. त्या वेळच्या बालराजाचा जो पालक होता त्यानें प्रथम या युआनला अधिकारावरून काढून टाकलें आणि त्याला पुढें परत बोलाविलें. यासंबंधींची हकिकत मोठी मनोरंजक आहे. चीनच्या जुन्या जमान्यांत कोणतीही गोष्ट करावयाची असली तरी ती मोठ्या शिष्टाचारपूर्वक आणि अतिशय नम्रपणानें करण्याची पद्धति आहे. युआनला अधिकारावरून दूर करण्याचें ठरलें तेव्हां असें जाहीर करण्यात आलें, कीं युआनला पायाचा कांहीं विशेष विकार झालेला आहे. अर्थात् लोकांना हें समजत होते कीं युआनच्या पायाला कांहींही झालेलें नसून त्याला कामावरून काढून टाकण्याची ही आपली एक परंपरागत पद्धति आहे; परंतु युआनला या गोष्टीचा सूड घेण्याला चांगली संधि सांपडली. १९११ मध्यें जेव्हां सरकाराविरुद्ध दंगे आणि बंडें सुरू झालीं, तेव्हां राजपालकानें या संकटाच्या भीतीनें गांगरून जाऊन युआनला परत कामावर बोलाविलें; परंतु आपल्या एकूण एक अटी मान्य करून घेतल्याशिवाय कामावर जाण्याची युआनची मुळींच तयारी नव्हती. म्हणून त्यानें राजपालकाला उत्तर दिलें, कीं या वेळीं घरांतून बाहेर पडण्याची मला शक्यता नाहीं याबद्दल मला फार दुःख होतें; कारण माझा पाय अजून प्रवासाला जाण्याइतका बरा झालेला नाहीं. परंतु पुढें एक महिन्यानें त्याच्या सर्व अटी मान्य झाल्या, तेव्हां त्याचा पाय किती थोड्या वेळात बरा झाला म्हणतां!

परंतु आतां क्रांतीला प्रतिबंध करण्याची संधि केव्हांच हातची निघून गेली होती. हा सगळा बैल गेला नि झोपा केला अशांतला प्रकार होता आतां. हे कळण्या-इतका आणि कोणत्याही एका पक्षाला मिळून आपलें पुढचें नुकसान न करून घेण्याइतका युआन हा चतुर होता. शेवटीं त्यानें मांचू घराण्यानें राज्यत्याग करावा असाच सल्ला दिला. समोरच्या बाजूला प्रजासत्ताक राज्याला तोंड देण्याचा प्रसंग आणि अशाच वेळीं

त्यांच्या सेनापतीनें त्यांचा पक्ष सोडलेला ; अशा स्थितींत मांचू राज्यकर्त्यांना राज्यत्याग करण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. १२ फेब्रुआरी १९१२ रोजीं राज्यत्यागाचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. अडीच शतकें संस्मरणीय अशी कारकीर्द चीनमध्यें गाजवून मांचू राजघराणें या दिवशीं अशा रीतीनें चीनच्या रंगभूमीवरून नाहींसें झालें. चीनमधल्या एका म्हणींतल्याप्रमाणें, "तें आलें वाघासारख्या डुरकाळ्या फोडीत व नाहींसें झालें सापाच्या शेपटीसारखें."

नानकिंग शहर हें ज्याप्रमाणें या नव्या प्रजासत्ताक राजधानीचें शहर म्हणून त्याचप्रमाणें मिंग घराण्यांतील पहिल्या बादशहाच्या कबरस्थानाचें ठिकाण म्हणूनही महत्त्वाचें आहे. या नानकिंग शहरामध्यें राज्यत्यागाचा जाहीरनामा ज्या दिवशीं प्रसिद्ध झाला त्याच १२ फेब्रुआरी या दिवशीं एक मोठा विलक्षण समारंभ घडून आला. या समारंभामध्यें जुन्या आणि नव्या संस्कृतीचें अगदीं भिन्न भिन्न स्वरूप एकाच ठिकाणीं लोकांच्या प्रत्ययाला आलें. प्रजासत्ताक राज्याचे अध्यक्ष सन्‌यत्‌सेन हे या दिवशीं आपल्या मंत्रिमंडळासह या कबरस्थानीं गेले आणि तेथें नैवेद्य वगैरे अर्पण करण्याचें जें कांहीं कार्य तें सर्व त्यांनीं अगदीं जुन्या पद्धतीप्रमाणें केलें. आणि नंतर लोकांच्या पुढें भाषण करतांना ते म्हणाले, "पूर्व आशियाला आपण प्रजासत्ताक राज्याचा आज धडा घालून देत आहोंत. प्रयत्न करणाराला यश मिळण्याला कमीअधिक वेळ लागतो; पण चांगलें काम करणाराला अखेरीस जय येणार, त्याच्या कामाचें फळ मिळणार, हें निश्चित असतें. अशा स्थितींत आपल्याला विजय मिळावयाला इतका दीर्घ काळ लागला याबद्दल आपण वाईट वाटून घेण्याचें काय कारण आहे?"

आपल्या मायदेशांत राहून अथवा हद्दपारीमध्यें राहून डॉ. सेन यांनीं चीनच्या स्वातंत्र्याकरितां फार परिश्रम केले होते. या सर्व परिश्रमाचें फळ हें आतां हातीं आलें असें दिसूं लागलें. परंतु स्वतंत्रता ही मोठीच चंचल मैत्रीण असून तिची प्राप्ति करून घेण्याला किंमतही भरपूर मोजावी लागते. यश मिळालें मिळालें अशी खोटी आशा लागून त्या कामीं पुष्कळदां आपली फसगत होते आणि खरोखरीची ती आपली होण्यापूर्वींच नाना तऱ्हेचीं संकटें आपल्यावर आणून ती आपली कसोटी पाहत असते. त्यामुळें येथपर्यंत येऊन पोंचल्यानें चीनचा किंवा डॉ. सेन यांचा स्वातंत्र्यसंपादनाचा शेवटचा टप्पा गांठून झाला होता असें नव्हे. त्यापासून अजून ते किती तरी दूर होते. किती तरी वर्षें या नूतन प्रजासत्ताक राज्याला जगण्यासाठीं झगडत रहावें लागलें आहे. आणि आज एकवीस वर्षांनंतर सुद्धां, वयांत येण्याच्या वेळेलाही, चीनचें भवितव्य अजून अनिश्चततेचे हेलकावेच खात आहे.

मांचू घराण्यानें राजत्याग केला खरा; पण युआनची अडचण अजून प्रजासत्ताक राज्याच्या मार्गांत उभीच होती. तो काय करणार याची कोणालाच कांहीं नीटशी कल्पना नव्हती. त्याच्या हातांत चीनचा उत्तर भाग होता. दक्षिण भाग प्रजासत्ताक राज्याच्या हातीं होता. देशांत शांतता राहावी, आपसांतील यादवीचा प्रसंग येऊं नये

यासाठीं डॉ. सन्यत्सेन यांनीं आपण होऊन स्वतः संपूर्ण अधिकारत्याग केला. अध्यक्षपदाच्या निवडणुकीला ते उभे राहिले नाहींत; आणि युआन शी काइ याला त्यांनीं अध्यक्ष म्हणून निवडून आणलें. पण युआन हा कांहीं प्रजासत्तावादी नव्हता. स्वतःला उच्च पद प्राप्त व्हावें यासाठीं सत्ता मिळविण्याची खटपट करणारा तो मनुष्य होता. ज्या प्रजासत्ताक राज्यानें अध्यक्ष करून त्याला एवढें गौरविलें, तेंच प्रजासत्ताक राज्य मोडून काढण्यासाठीं त्यानें परकी राष्ट्राकडून कर्ज काढलें, लोकप्रतिनिधींचें कायदे-मंडळ मोडलें, कुओ मिन् टांगच्या पक्षाचें विसर्जन केलें. त्यामुळें चीनमध्यें फूट होऊन दक्षिण चीनमध्यें डॉ. सेन यांच्या प्रमुखत्वाखालीं एक प्रतिस्पर्धी सरकार स्थापन करण्यांत आलें. काय वाटेल तें करून जी फूट टाळण्याचा डॉ. सेन यांनीं प्रयत्न केला होता ती फूट अखेर झालीच. त्यामुळें चीनमध्यें दोन राज्यें अस्तित्वांत आलीं. युआननें बादशहा होण्याचा यत्न केला; परंतु त्यांत त्याला यश न येतां तो लौकरच मरण पावला.

## ११९

# बृहद् भारत आणि ईस्ट इंडीज (पूर्वेकडील हिंदी बेटें)

*३१ डिसेंबर, १९३२*

आतां कांहीं वेळ आपलें अतिपूर्वेचें काम संपलें आहे असें म्हणायला हरकत नाहीं. त्याचप्रमाणें एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानचीही कांहीं कांहीं हकिकत आपली पाहून झाली आहे. तेव्हां आतां आपण पश्चिमेकडे कूच करून यूरप, अमेरिका, आफ्रिका यांच्याकडे जावें हें बरें. परंतु एवढा हा मोठा प्रवास करण्यापूर्वीं मला वाटतें, तूं एकदां आशिया खंडाच्या आग्नेय कोपऱ्याचें थोडेंसें ओझरतें दर्शन घ्यावेंस आणि तेथील हकिकत अगदीं आधुनिक काळापर्यंत आणून पोंचवावीस. या पूर्वीच्या माझ्या पत्रांत या भागाला मी कितीक निरनिराळीं—मॅलेशिया, इंडोनेशिया, ईस्ट इंडीज किंवा बृहद् भारत अशीं नांवें देत आलों आहें. हीं नांवें अगदींच मोंगळ आहेत व तीं तितकींशीं बरोबरही नाहींत. त्यांपैकीं कोणत्याही एका नावानें या सर्व प्रदेशाचा निर्देश करतां येतो असें मला वाटत नाहीं. परंतु जोंपर्यंत आपण कशाबद्दल बोलतों आहोंत याविषयीं आपल्या दोघांची बरोबर समजूत आहे, तोंपर्यंत नांवांत काय आहे?

एखादा नकाशा चटकन् मिळण्यासारखा असेल तर तो घेऊन पाहा. त्यामध्यें आशिया खंडाच्या आग्नेयीला तुला एक द्वीपकल्प आढळेल. या द्वीपकल्पांत ब्रह्मदेश, सयाम आणि ज्याला इंडोचायना म्हणतात तो असे देश आहेत. ब्रह्मदेश आणि

सयाम यांच्यामधून एक चिंचोळा फाटा आंत समुद्रांत दूरवर गेलेला आहे; टोंकाकडे मात्र तो थोडासा रुंद आणि सपाट झालेला आहे. हा फाटा म्हणजे मॅले द्वीपकल्प आणि त्याच्या अगदीं टोंकाला सिंगापूर शहर आहे. मॅलेपासून ऑस्ट्रेलियापर्यंत मध्यंतरीं अनेक लहान-मोठीं बेटें आहेत. त्यांचे आकारही मोठे चित्र-विचित्र आहेत. पूर्वी एखादा राक्षसी पूल आशिया आणि ऑस्ट्रेलिया यांना जोडणारा असावा आणि तो मोडून त्याचे हे अवशेष मध्यें मध्यें तसेच वर राहिले असावेत, असें हीं बेटें पाहिलीं म्हणजे वाटूं लागतें. या बेटांना ईस्ट इंडीज किंवा पूर्वेकडील हिंदी बेटें असें म्हणतात. त्यांच्या उत्तरेस फिलिपाइन बेटें आहेत. कोणताही एखादा नवीन नकाशा घेऊन तूं पाहा म्हणजे तुला आढळेल, कीं ब्रह्मदेश आणि मॅले द्वीपकल्प हे देश ब्रिटिशांच्या ताब्यांतले आहेत. इंडोचायना फ्रेंचांच्या ताब्यांत आहे आणि यांच्यामधला सयाम देश हा स्वतंत्र आहे. ईस्ट इंडीज म्हणजे मुख्यतः सुमात्रा, जावा, बोर्निओचा बराचसा भाग, सेलेबिस, मलाक्का आणि ज्यासाठीं समुद्रावरील हजारों मैलांचा संकटमय धोक्याचा प्रवास पत्करून सुद्धां इकडे आल्याशिवाय यूरपचे दर्यावर्दी लोक राहूं शकत नसत तीं मसाल्याचीं बेटें, अशीं हीं बेटें डच लोकांच्या ताब्यांत आहेत. फिलिपाइन बेटांवर अमेरिकेचें अधिराज्य आहे.

पूर्व समुद्रामधील या देशांची आजची अवस्था ही अशी आहे. परंतु मागें मीं सांगितलेलें आठवत असेल तुला, कीं आपल्याच या हिंदभूमीच्या लेंकरांनीं दोन हजार वर्षांपूर्वी इकडे जाऊन या देशांची वसाहत केली होती. मोठीं मोठीं साम्राज्यें या भागांत दीर्घ कालपर्यंत नांदलेलीं होतीं; या देशांमध्यें मोठीं मोठीं सुंदर शहरें असून त्यांतील इमारतीही असामान्य अशा प्रकारच्या असत; तेथें व्यापारधंदाही फारच चांगल्या प्रकारचा चाले आणि त्या ठिकाणीं हिंदी आणि चिनी संस्कृति व सुधारणा यांचें एक प्रकारें मिश्रण झालेलें होतें.

या देशांसंबंधीं याच्या आधींच माझ्या पत्रांत (पत्र ७९) मीं तुला सांगितलेलें आहे, कीं या प्रदेशांत स्थापन झालेल्या पोर्तुगीज साम्राज्याचा नाश होऊन पूर्वेकडील या व इतर प्रदेशांत ब्रिटिश आणि डच लोकांचें वर्चस्व निर्माण झालें व फिलिपाइन बेटांमध्यें स्पॅनिश लोकांचा ताबा शिल्लक राहिला.

ब्रिटिश आणि डच लोकांनीं मिळून एक होऊन पोर्तुगीज लोकांना हांकलून लाविलें होतें. दोघांना मिळून हें यश मिळालें होतें. परंतु या विजयी राष्ट्रांत एकमेकांत सख्य थोडेंच होतें? त्यामुळें त्यांच्यामध्येंही वारंवार तंटे होतच होते. एका प्रसंगीं, १६२३ मध्यें, मलाक्का बेटांतील अँबोइना येथील डच गव्हर्नरानें ईस्ट इंडिया कंपनीच्या सर्वच्या सर्व नोकरवर्गाला डच सरकारविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून पकडलें आणि त्यांचा वध केला. या सरसकट फांशीच्या कृत्याला अँबोइनांतील कत्तल असें इतिहासांत म्हटलें जातें.

एक गोष्ट तूं नीट ध्यानांत ठेवली पाहिजेस असें मला वाटतें. या पूर्वीच्या

पत्रात ती मीं तुला सांगितलेली आहे. या काळांत म्हणजे सतराव्या शतकांत, यूरप खंडांत अजून औद्योगीकरण झालेलें नव्हतें. बाहेरच्या प्रदेशांत पाठविण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर मालाचें उत्पादन अजून तेथें होऊं लागलेलें नव्हतें. मोठी यंत्रसामग्री आणि औद्योगिक क्रांति यांचा काळ यावयाला अजून फार अवधि होता. यूरपपेक्षां आशिया खंडांतच या काळीं अधिक कारखानदारी उत्पादन होत होतें आणि यूरपपेक्षां आशिया खंडांतूनच बाहेर देशांत अधिक माल निर्यात होत होता. हा आशियांतील माल जेव्हां म्हणून यूरपमध्यें जाई तेव्हां त्याची किंमत दोन रीतींनीं पुरी करण्यांत येई; एक यूरपमधलि माल मोबदला देऊन आणि भरीला स्पॅनिश अमेरिकेंतून आणलेली संपत्ति देऊन. आशिया आणि यूरप यांच्यामधील हा व्यापार म्हणजे एक फायदेशीर धंदा होता. पुष्कळ काळपर्यंत हा धंदा पोर्तुगीज लोकांच्या हातांत असून त्यावर ते चांगले श्रीमंत झालेले होते. या व्यापारांतला हिस्सा आपल्यालाही मिळावा या हेतूनेंच तर डच ईस्ट इंडिया कंपनी आणि ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनी या स्थापन झालेल्या होत्या. परंतु हें व्यापाराचें क्षेत्र म्हणजे आपलें खास राखीव कुरण आहे, अशी पोर्तुगीजांची कल्पना झालेली होती. त्यामुळें त्यांमध्यें इतर कोणाचा हात शिरकवूं देण्याची त्यांची इच्छा नव्हती. स्पॅनिश लोकांचें राज्य जरी फिलिपाइन बेटांत होतें, तरी पण स्पॅनिश लोकांचें लक्ष व्यापारापेक्षां धर्माकडे अधिक असल्यामुळें त्यांचा आणि पोर्तुगीज लोकांचा कधींच तंटा उद्भवला नव्हता. परंतु या दोन नव्या व्यापारी कंपन्यांच्या मार्फत हे जे ब्रिटिश आणि डच पेंढारी, साहसी उलाढाली करणारे लोक आतां इकडे आले होते, त्यांना धर्माबिर्माशीं कांहींएक कर्तव्य नव्हतें. त्यामुळें या नवीन राष्ट्रांमध्यें इकडे लौकरच तंटा उत्पन्न झाला.

पूर्वेकडे पोर्तुगीजांचें राज्य सुमारें सव्वाशें वर्षें चालू होतें. ज्यांच्यावर ते राज्य करीत होते त्या लोकांत पोर्तुगीजांविषयीं प्रेम तर मुळींच नव्हतें, उलट असंतोषच होता. इंग्लंड आणि हॉलंड यांच्या या दोन व्यापारी कंपन्यांनीं या असंतोषाचा फायदा घेतला आणि पोर्तुगीजांचें राज्य उखडून काढण्यासाठीं त्यांनीं तद्देशीय लोकांना मदत केली; परंतु पोर्तुगीजांचें राज्य संपतांक्षणींच, त्यांनीं मोकळ्या केलेल्या राज्याचा ताबा ताबडतोब या कंपन्यांनीं मिळविला. हिंदुस्थानचे आणि ईस्ट इंडीज बेटांचे राज्यकर्ते या नात्यानें या कंपन्यांनीं पुष्कळसे अवजड कर वसूल करण्याचा किंवा अन्य मार्गानें पुष्कळच खंडणीसारखी रक्कम जमा करण्याचा क्रम सुरू केला. त्यामुळें यूरपवर विशेष भार न घालतां हा या भागांतील परदेशाशीं होणारा व्यापार ताब्यांत घेऊन चालविण्यास त्यांना फार उपयोग झाला. पूर्वेकडील माल आणविला तर त्याचा मोबदला कोठून द्यावयाचा ही जी मोठी अडचण यापूर्वी यूरप खंडामध्यें पडत असे ती यामुळें कमी झाली. असें असूनसुद्धां कायदेशीर प्रतिबंध घालून आणि भक्कम जकाती बसवून इंग्लंडनें हिंदी मालाचा आपल्या देशांत येणारा ओघ बंद करण्याचा प्रयत्न केला हें आपण पाहिलेंच आहे. औद्योगिक क्रांति होईपर्यंत अशी ही परिस्थिति चालू होती.


बृहद् भारत आणि पूर्वेकडील हिंदी बेटें
डच
फ्रेंच
ब्रिटिश
यु. एस. ए.
पोर्तुगीज
चीन
कँटन
हाँगकाँग (ब्रि.)
मनिला
फिलिपाइन बेटें
आनाम
सयाम
ब्रह्मदेश
काँबोज
मलाया द्वीपकल्प
सिंगापूर
बोर्निओ
जावा
सुमात्रा
मोलक्का
अँम्बॉइना
तिमोर
ऑस्ट्रेलिया

डच आणि ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपन्यांमधील हा तंटा ईस्ट इंडीजमध्यें कांहीं फार काळपर्यंत चालला नाहीं; कारण ब्रिटिशांनींच तेथून काढता पाय घेतला. हिंदुस्थानांत त्यांनीं बऱ्याचशा भानगडी उपस्थित केल्या होत्या; त्यांमध्येंच त्यांचे हात सर्वस्वीं गुंतून गेलेले होते. त्यामुळें हीं पूर्वेकडील हिंदी बेटें त्यांनीं सर्वस्वीं डच ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं राहूं दिलीं. अर्थात् याला अपवाद फिलिपाइन बेटांचा; तीं बेटें अजून स्पॅनिश लोकांच्याच ताब्यांत होतीं. स्पॅनिश लोकांना व्यापारउदीमाची कांहींच फिकीर नव्हती. त्यामुळें त्यांचा कांहीं आणखी प्रदेश जिंकण्याच्या भानगडींत पडण्याचा विचार नव्हता. तेव्हां या प्रदेशांत डच लोकांना प्रतिस्पर्धी असा कोणी राहिला नाहीं.

हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें केलें, त्याप्रमाणें या डच ईस्ट इंडिया कंपनीनेंही जितका म्हणून पैसा मिळवितां येईल तितका मिळविण्याचा सपाटा सुरू केला. सुमारें दीडशें वर्षें या कंपनीचा या बेटांवर अंमल चालू होता. परंतु तेथील लोकांच्या सुखसोयींकडे डच लोकांनीं काडीचेंसुद्धां लक्ष दिलें नाहीं. त्या लोकांवर जुलूम करून जितकी उकळता येईल तितकी रक्कम त्यांच्याकडून डच लोक उकळीत राहिले. अशा रीतीनें नजराणा, खंडणी किंवा कर म्हणून पैसा उकळणें सोपें पडूं लागलें, तेव्हां व्यापार ही दुय्यम बाब ठरून तिकडे डच लोकांचें दुर्लक्ष होऊं लागलें. म्हणून व्यापार मंदावत गेला. कंपनीचा कारभार सर्वस्वीं नालायक लोकांच्या हातांमध्यें होता आणि या बाहेरच्या देशांत कंपनीची नोकरी करायला आलेले जे डच लोक होते, ते हिंदुस्थानांतील ब्रिटिश कंपनीचे वखारवाले किंवा गुमास्ते जसे होते, तसेच अगदीं पाजी, लुटारू, उलाढाल्या करणारे लोक होते. बऱ्या असो किंवा वाईट असो, कोणत्याही मार्गानें पैसा उकळणें हा त्यांचा मुख्य विचार होता. हिंदुस्थानमध्यें साधनसंपत्तीचा–द्रव्याचा झराच इतका प्रचंड होता, कीं राज्यकारभार आणि व्यापार-व्यवहार कितीही गैरशिस्तपणें केला, तरी मोठीशी उघडीक होण्यासारखी नव्हती. खेरीज हिंदुस्थानांत ब्रिटिशांचे गव्हर्नर म्हणून जे लोक आले, त्यांपैकीं पुष्कळसे कर्तबगार निघाले. त्यांनीं वरवरचा कारभार तरी चांगला पद्धतशीर ठेवला होता. तरी पण खालीं तळाशीं लोक जुलमाखालीं भरडले जातच होते. पुढें १८५७ सालच्या बंडानें ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचें हिंदुस्थानांतील राज्य संपुष्टांत आलें, हें तुला आठवत असेलच.

डच ईस्ट इंडिया कंपनीचें गाडें एकसारखें खालीं खालींच खचत गेलें आणि अखेरीस १७९८ मध्येंच नेदरलंडच्या सरकारनें या पूर्वेकडील बेटांचा कारभार प्रत्यक्ष आपल्या हातामध्यें घेतला. त्यानंतर लौकरच यूरपमध्यें नेपोलियनचीं युद्धें होऊन हॉलंड देशच नेपोलियनच्या साम्राज्यांत सामील झाला. त्या वेळीं ब्रिटिश सरकारनें हीं बेटें आपल्या कबजांत घेतलीं. पांच वर्षेंपर्यंत त्यांना हिंदुस्थान देशाचा एक भाग असें समजलें जात होतें. या काळांत तेथें पुष्कळशा सुधारणा करण्यांत आल्या. पुढें

नेपोलियनचा पाडाव झाल्यानंतर हीं ईस्ट इंडीज बेटें पुन्हां हॉलंडकडे परत देण्यांत आलीं. या पांच वर्षांत जावाचा संबंध जेव्हां हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारकडे होता, तेव्हां जावाचा लेफ्टनंट गव्हर्नर म्हणून टॉमस स्टॅम्फर्ड रॅफल्स् नांवाचा एक कर्तबगार इंग्रज गृहस्थ काम करीत होता. रॅफल्स्नें सादर केलेल्या अहवालांत म्हटलें आहे, कीं डचांच्या या वसाहतींच्या कारभाराचा इतिहास विश्वासघात, लांच-लुचपत, कत्तली आणि पाजीपणा यांबद्दल अत्यंत लोकविलक्षण हकिकतींनीं भरलेला आहे. डच लोकांच्या येथील दुष्ट कृत्यांमध्यें एक प्रकार असा होता, कीं सेलिबिस बेटांतून लोक पळवून नेऊन जावा बेटांत गुलाम म्हणून काम करण्यासाठीं त्यांची भरती करावयाची. डच अधिकाऱ्यांनीं माणसें पळविण्याचा हा एक धंदाच व्यवस्थितपणानें बनविलेला होता. या माणसें पळविण्याच्या जोडीला मालमत्तेची नासधूस आणि मनुष्यवध या गोष्टी स्वाभाविकच घडून यावयाच्या.

पुढें खुद्द नेदर्लंडच्या सरकारचा अंमल सुरू झाला; परंतु तो म्हणजे कंपनीच्या अमलापेक्षां चांगला होता असें मुळींच नव्हतें. बंगालमधील निळीच्या मळ्यांच्या लावणीची पद्धति आणि तिच्यामुळें झालेली शेतकऱ्यांची भयंकर दैन्यावस्था याबद्दलची मागें जी हकिकत मीं तुला सांगितली, ती बहुतेक तुझ्या ध्यानांत असेल. अशीच, परंतु याहूनही वाईट अशी पद्धति जावामध्यें आणि इतरत्र सुरू करण्यांत आली. कंपनीच्या दिवसांत लोकांकडून सक्तीनें प्रत्यक्ष मालच घेण्यांत येत असे. आतां नवीन एक कल्चर सिस्टिम ( शेतलागणीची पद्धति ) म्हणून सुरू करण्यांत आली. या पद्धती-प्रमाणें येथील लोकांना वर्षांतून कांहीं काळ सरकारसाठीं काम करण्याची सक्ती करण्यांत आली. साधारणपणें शेतकऱ्याच्या एकूण कामाच्या वेळापैकीं तिसरा किंवा चौथा हिस्सा वेळ त्याच्याकडून असें काम घ्यावयाचें अशी कल्पना होती; परंतु प्रत्यक्ष मात्र शेतकऱ्याचा बहुतेक वेळ या कामांत सक्तीनें घेतला जाई. डच सरकार आपलीं सर्व कामें कंत्राटदाराकडून घेत असे. या कंत्राटदारांना सरकार या कामासाठीं कर्जाऊ रक्कम बिनव्याजीं देत असे. मग या वर सांगितलेल्या सक्तीच्या मजुरीच्या साहाय्यानें हे कंत्राटदार जमिनीची लागवड करीत असत. जमिनींत जें उत्पन्न व्हावयाचें त्याची कांहीं एका प्रमाणांत डच सरकार, कंत्राटदार, आणि प्रत्यक्ष जमीन कसणारा शेतकरी यांच्यामध्यें वांटणी व्हावयाची अशी कल्पना होती. त्यांत गरीब बिचाऱ्या शेतकऱ्याचा हिस्सा बहुतेक सर्वांत कमीच असणार; परंतु त्याला नक्की किती हिस्सा मिळत होता या योजनेमध्यें, हें मला कांहीं माहीत नाहीं. सरकारनें असाही एक नियम केला होता, कीं वाहतुकीला आणलेल्या क्षेत्रापैकीं कांहीं विशिष्ट भागामध्यें—युरपमध्यें ज्या मालाची गरज असे असा माल उत्पन्न केलाच पाहिजे. या मालामध्यें नीळ, चहा, कॉफी, साखर इत्यादि पदार्थ असत. बंगालमधील निळीच्या लागवडीप्रमाणेंच हा माल उत्पन्न करून इतर मालापेक्षां जरी कमी फायदा झाला तरी तो उत्पन्न केलाच पाहिजे अशी सक्ती होती.

या पद्धतीनें डच सरकारनें प्रचंड नफा मिळविण्याला सुरुवात केली. कंत्राट-दारांचीही मोठीच भरभराट झाली. शेतकरी मात्र उपासमारींत आणि हालअपेष्टांत पिचत राहिले. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला या भागांत फारच भयंकर दुष्काळ पडला आणि पुष्कळच लोक त्यांत मेले. तेव्हां मग बिचाऱ्या हालांत पिचणाऱ्या शेतकऱ्यांसाठीं कांहीं तरी करणें जरूर आहे असें सरकारला वाटूं लागलें. हळूहळू शेतकऱ्यांची परिस्थिति सुधारण्यांत आली; तरीपण अगदीं अलीकडे म्हणजे १९१६ पर्यंत, इकडे सक्तीच्या मजुरीची ही पद्धति अस्तित्वांत होतीच.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत डच लोकांनीं इकडे शिक्षणांत आणि इतर बाबतींतही पुष्कळच सुधारणा अमलांत आणल्या. आतां तेथेंही एक नवीन मध्यमवर्ग निर्माण झालेला असून स्वातंत्र्याची मागणी करणारी राष्ट्रीय चळवळही तेथें सुरू झालेली आहे. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें या बाबतींत तेथेंही कचरत कचरत थोडेंसें पुढें पाऊल टाकण्यांत आलेलें आहे आणि लोकप्रतिनिधींची, विशेषशी खरी सत्ता हातीं नसलेलीं, दुबळीं कायदेमंडळेंही तेथें स्थापन करण्यांत आलेलीं आहेत. सुमारें पांच वर्षांपूर्वीं डच ईस्ट इंडीजमध्यें एक क्रांतीचा प्रयत्न झाला; परंतु तो अत्यंत क्रूरपणें दडपण्यांत आला. तथापि जावामध्यें आणि इतर बेटांमध्यें जी ही स्वातंत्र्याची भावना निर्माण झालेली आहे, ती कितीही क्रूरपणा केला किंवा जुलूम केला, तरी कांहीं मारली जाणार नाहीं.

डच ईस्ट इंडीज बेटांना आतां नेदरलंडचें हिंदुस्थान असें नांव देण्यांत आलें. दर पंधरवड्याला हॉलंडमधून विमानांची फेरी हॉलंडपासून भला मोठा प्रवास करून यूरप आणि आशिया खंड ओलांडून जावामधील बटेव्हिया शहरापर्यंत येत असते.

पूर्वेकडील हिंदी बेटांच्या हकिकतींची जेवढी रूपरेखा मला सांगावयाची होती ती सांगून झालेली असल्यामुळें आतां माझ्या मनांतून समुद्र सोडून इकडे वर आशिया खंडाच्या भूप्रदेशाकडे यावें असें आहे. त्या बाजूला ब्रह्मदेशाबद्दल अधिक कांहीं सांगण्यासारखें नाहीं. या देशाचे दक्षिण आणि उत्तर ब्रह्मदेश असे बहुतेक नेहमीं तट पडलेले असत आणि त्यांमध्यें बहुतेक नेहमीं झटापटी चालू असत. जेव्हां एखादा राजा विशेष प्रबळ असे, तेव्हां तो हीं दोन्ही राज्यें एकत्र करून शेजारच्या सयामवर स्वारी करण्याची खटपट करीत असे. असें होतां होतां एकोणिसाव्या शतकांत ब्रह्मी लोकांच्यावर ब्रिटिशांशीं लढण्याचा प्रसंग आला. ब्रह्मी राजाला आपल्या सामर्थ्याबद्दल फाजील विश्वास होता; म्हणून त्यानें आसामवर स्वारी करून तो मुलूख आपल्या राज्यांत सामील करून टाकला. त्यानंतर हिंदु-स्थानांतील ब्रिटिश लोकांनीं पहिलें ब्रह्मी युद्ध केलें आणि त्यामध्यें आसाम ब्रिटिशांकडे आला. या युद्धांत ब्रिटिशांना कळून चुकलें, कीं ब्रह्मी सरकार आणि ब्रह्मी लष्कर या दोहोंतही कांहीं विशेष दम नाहीं; त्यामुळें हा सगळा देश जिंकून खालसा करून टाकावा अशी त्यांच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. कांहीं तरी क्षुद्र, पोंचट सबबी

काढून दुसरें आणि तिसरें अशीं आणखी दोन युद्धें करण्यांत आलीं. आणि १८८५ मध्यें सगळें ब्रह्मी राज्य खालसा करून ब्रिटिशांच्या हिंदी साम्राज्याला तें जोडून टाकण्यांत आलें. तेव्हांपासून ब्रह्मदेशचें भवितव्य हिंदुस्थानच्या भवितव्याशीं गांठवलेलें आहे.

ब्रह्मदेशच्या दक्षिणेला ब्रिटिशांनीं मॅले द्वीपकल्पामध्येंही हातपाय पसरले होते. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीलाच त्यांनीं सिंगापूरचा ताबा घेतला. सिंगापूरची जागा चांगली मान्याची आणि सोयीस्कर असल्यामुळें लौकरच त्या ठिकाणीं एक मोठें व्यापारी शहर उदयास आलें आणि सिंगापूरच्या बंदरांत अतिपूर्वेकडे जाणारीं सर्व जहाजें मुक्कामासाठीं लागूं लागलीं. या द्वीपकल्पामधील पलीकडे वरच्या बाजूवें जें प्राचीन मलाक्का बंदर त्याचें महत्त्व आतां कमी होऊं लागलें. सिंगापूरपासून ब्रिटिशांनीं उत्तरेकडे आक्रमण करण्याला सुरुवात केली.

मॅलेच्या द्वीपकल्पांत पुष्कळच छोटीं छोटीं मांडलिक संस्थानें असून तीं सर्व सयामच्या अधिराज्याखालीं होतीं. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत हीं सर्व राज्यें ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं आलीं. त्या सर्वांचा मिळून एक संघ करण्यांत आला आणि त्याला मॅलेचीं संयुक्त राज्यें असें नांव देण्यांत आलें. यांपैकीं कांहीं राज्यांत सयामला जे हक्क होते, ते सर्व इंग्लंडला देऊन टाकणें सयामला भाग पडलें.

अशा रीतीनें सयामला चारी बाजूंनीं युरपीय राष्ट्रांचा वेढा पडूं लागला होता. पश्चिमेला आणि दक्षिणेला ब्रह्मदेशांत आणि मॅले द्वीपकल्पांत ब्रिटिशांचा पूर्ण अंमल होता. पूर्वेकडे फ्रान्सचें आक्रमण चालू असून अनामचें ( वैतनामचें ) राज्य गिळंकृत करण्याचा क्रम फ्रान्सनें सुरू केलेला होता. अनामचें राज्य होतें चीनचें मांडलिक. परंतु चीन स्वतःच अडचणींत सांपडल्यामुळें चीनच्या अधिराज्याचा अनामला कांहींच उपयोग नव्हता. फ्रेंचांनीं अनामवर स्वारी केल्यामुळें चीन आणि फ्रान्समध्यें युद्ध सुरू झालें. याचा उल्लेख अलीकडेच एका पत्रामध्यें मीं केलेला आठवत असेल तुला. परंतु त्यामुळें फ्रान्सला अगदींच अप्रतिबंधपणें पुढें सरकतां आलें नाहीं. थोडा वेळ, पण अगदींच थोडा वेळ, त्याला अटकाव झाला इतकेंच. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत फ्रान्सनें अनाम आणि कँबोडिया या दोन देशांची मिळून एक मोठी वसाहत स्वतःची म्हणून तयार केली. आणि तिलाच फ्रेंच इंडोचायना हें नांव मिळालें. या कँबोडियामध्यें एका वेळीं विशाल अंकोरचें साम्राज्य नांदलेलें होतें. तो कँबोडिया देश या वेळीं सयामचा मांडलिक होता. फ्रान्सनें सयामला युद्धाची धमकी देऊन कँबोडियावर आपला ताबा बसविला. या देशांतील फ्रेंचांचीं पहिलीं सगळीं कारस्थानें फ्रेंच मिशनरी लोकांनीं केलेलीं होतीं हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या मिशनऱ्यांपैकीं एकाला कांहीं तरी गुन्हयावरून देहांताची शिक्षा या देशांत देण्यांत आली होती. त्याबद्दल नुकसानभरपाई करून घेण्यासाठीं म्हणून पहिलें फ्रेंच लष्कर १८५० मध्यें या भागांतील मोहिमेवर पाठविण्यांत आलें. या लष्करानें प्रथम दक्षिणेकडील

सायगांव बंदर काबीज केलें आणि तेथून मग फ्रेंचांचा ताबा उत्तरेकडे वाढत गेला.

आशिया खंडांतील साम्राज्यशाहीच्या विस्ताराच्या या किळसवाण्या हकिकती-मध्यें पुष्कळशी त्याच त्या गोष्टींची पुनरावृत्ति होत असावीसें वाटतें मला. कारण सर्व ठिकाणीं या विस्ताराकरितां जे मार्ग अनुसरण्यांत आले ते एकाच प्रकारचे होते आणि बहुतेक सर्व ठिकाणीं याच मार्गांना यश आलें. देशामागून देशाची हकिकत मी तुला सांगत आलों आणि कोणत्याही हकिकतीचा निदान तात्पुरता तरी शेवट व्हायचा म्हणजे तो देश कोणा तरी यूरपीय राष्ट्राच्या ताब्यांत गेला असें सांगून. आग्नेय आशिया खंडांतील फक्त एकच राष्ट्र कालचक्राच्या या फेऱ्यांतून बचावून राहिलें. तें म्हणजे सयाम.

एका बाजूला ब्रह्मदेशांत ब्रिटिश लोक आणि इंडोचायनांत दुसऱ्या बाजूला फ्रेंच लोक यांच्या कचाट्यामध्यें सांपडूनसुद्धां सयाम अशा रीतीनें वांचलें, हें केवळ त्याचें सुदैव म्हटलें पाहिजे. कदाचित् असें असेल, कीं सयामच्या दोन्ही बाजूंना हीं दोन प्रतिस्पर्धी राष्ट्रें होतीं म्हणूनच तें वांचलें असेल. सयामच्या या सुदैवाचें आणखीही एक कारण होतें. तें म्हणजे सयामची राज्यव्यवस्था त्या मानानें पुष्कळच चांगल्या प्रकारची होती आणि इतर पुष्कळ देशांतल्याप्रमाणें सयाममध्यें अंतर्गत असंतोष आणि गडबड नव्हती. बाकी, कोठेंही कितीही राज्य चांगलें असलें म्हणजे परकी राष्ट्रें त्या ठिकाणीं आक्रमण करायला जाऊं शकत नव्हतीं, अशी कांहीं खात्री नव्हती ; पण झालें होतें काय, कीं इंग्लंडचे हात हिंदुस्थान आणि चीन यांमध्यें गुंतलेले होते आणि फ्रान्सचे इंडोचायनामध्यें गुंतलेले होते. शिवाय हीं दोन्ही राष्ट्रें सयामच्या सरहद्दीशीं जवळजवळ एकोणिसावें शतक संपतां संपतां पोंचलीं. त्या वेळीं देश खालसा करण्याचें युग जवळजवळ संपत आलेलें होतें. पूर्वेकडे आक्रमणाला विरोध करण्याची प्रवृत्ति वाढूं लागली होती आणि वसाहतींमध्यें व परतंत्र राष्ट्रांमध्यें राष्ट्रीय चळवळी सुरू होऊं लागल्या होत्या. मध्यें एकदां कँबोडियाच्या बाबतींत सयाम आणि फ्रान्स यांच्यामध्यें युद्ध उत्पन्न होण्याची भीति वाटत होती ; परंतु सयामनें नमतें घेतलें आणि फ्रान्सशीं झगडा होण्याचा प्रसंग टाळला. इकडे पश्चिमेकडे सयामच्या सरहद्दीवर एक मजबूत पर्वताची संरक्षक भिंत उभी असल्यामुळें ब्रह्मदेशांतील ब्रिटिशांचें संकट सयामला भोंवूं शकलें नाहीं.

मीं तुला सांगितलेंच आहे, कीं यापूर्वीच्या काळांत ब्रह्मदेशच्या राजांनीं निदान दोनदां तरी सयामवर हल्ला करून तो देश खालसा केला होता. त्यांतील शेवटची स्वारी १७६७ मध्यें झाली. त्या वेळीं सयामची राजधानी आयुथ्या ऊर्फ आयुध्या, (या ठिकाणीं हिंदी नांवें कशीं वारंवार येतात पहा) हिचा नाश करण्यांत आला. परंतु त्यानंतर लौकरच लोकांचें बंड होऊन ब्रह्मी लोकांना हांकलून देण्यांत आलें आणि एका नवीन राजघराण्याचा अंमल तेथें १७८२ पासून सुरू झाला. या घराण्यांतील

पहिल्या राजाचें नांव 'पहिला राम' असें होतें. दीडशें वर्षांनंतर अगदीं आजच्या घटकेला सुद्धां तेथें याच घराण्याचें राज्य चालू असून त्यामधील प्रत्येक राजाचें नांव राम हेंच असतें असें दिसतें. या घराण्याच्या कारकीर्दींत सयामची राज्यव्यवस्था चांगल्या प्रकारें चालत आलेली आहे. लोकांना त्यांत हात घालायला मात्र जागा कमी असून वडिलांनीं प्रेमानें लहान मुलाची काळजी घ्यावी असा थोडासा परावलंबनाचा दोष मात्र तींत आहे. तथापि या राज्यकर्त्यांनीं एक गोष्ट शहाणपणाची केली, कीं परकी सत्ताधीश राष्ट्रांशीं संबंध सख्यत्वाचे ठेवले. परकी व्यापारासाठीं बंदरें खुलीं ठेवलीं. कांहीं कांहीं परकी राष्ट्रांशीं व्यापाराबाबत तहनामे केले आणि राज्य-कारभारांत कांहीं सुधारणाही केल्या. नवीन राजधानी बँकॉक या शहरीं ठेवण्यांत आली. तरी पण एवढ्यानें साम्राज्यवादी लांडग्यांचे हात दूर थोडेच राहणार होते? इंग्लंडनें मॅले द्वीपकल्पांत हातपाय पसरून तेथील सयामचा मुलूख घशाखालीं घातलाच. फ्रान्सनें कँबोडिया आणि सयामचा पूर्वेकडील कांहीं प्रदेश घेतला. १८९६ मध्यें तर सयामच्या प्रश्नावर इंग्लंड आणि फ्रान्समध्यें प्रकरण अगदीं हातघाईवर आलें होतें. परंतु मग साम्राज्यशाही नीतीच्या नेहमींच्या परंपरेला अनुसरून या दोन्ही राष्ट्रांनीं सयामच्या अखंडत्वाला आणि स्वातंत्र्याला धक्का लावावयाचा नाहीं, अशी परस्परांना हमी दिली. आणि त्याच वेळीं सयामच्या प्रदेशाचे त्यांनीं तीन "वर्चस्वाचे विभाग" करून टाकले. पूर्वेकडील भाग फ्रेंचांच्या वर्चस्वाचा, पश्चिमेकडील भाग ब्रिटिशांच्या वर्चस्वाचा, आणि मध्यें जो कांहीं तटस्थ भाग राहिला त्यांत या दोघांनींही आपापल्या मनाप्रमाणें जें मिळेल तें घशांत घालायला कांहीं हरकत नाहीं. अशा रीतीनें सयामच्या अखंडत्वाची व स्वतंत्रतेची हमी घेतल्यानंतर, कांहीं वर्षांनीं फ्रान्सनें सयामचा पूर्वेकडील आणखी कांहीं भाग आपल्या ताब्यांत घेतला. मग इंग्लंड तरी बिचारें काय करणार? या प्रदेशाला तोडीला तोड म्हणून सयामचा दक्षिणेकडील भाग मग आपल्या ताब्यांत घेतल्यावांचून इंग्लंडला गत्यंतरच राहिलें नाहीं!

तथापि इतकें सगळें होत जाऊनही यूरपीय साम्राज्याच्या कचाट्यांतून सुटून राहिलेला असा अजूनही सयामचा कांहीं प्रदेश आहे; आशिया खंडांत या भागात असा सुटलेला हा एवढा एकच प्रदेश आहे. यूरपीय लोकांच्या आक्रमणाच्या ओघाळा आतां बांध बसलेला असून, आता आशियातील यूरपीय लोकांना आणखी प्रदेश मिळण्याचा संभव मुळींच नाहीं. एवढेंच नव्हे, तर आतां असा काळ अगदीं जवळ येऊं पाहात आहे कीं जेव्हां या यूरपीय राष्ट्रांना आशियांतील आपलें चंबूगवाळें आटोपून आपल्या घरचा रस्ता सुधारावा लागेल.

सयाममध्यें अगदीं अलीकडेपर्यंत राजाचा एकतंत्री राज्यकारभार चालू होता. आणि राज्यकारभारांत जरी कांहीं थोड्या थोड्या सुधारणा केलेल्या असल्या, तरी तेथील समाजपद्धति व राज्यव्यवस्था एकंदरींत सर्वतोपरि सरंजामशाही पद्धतीची होती. गेल्या कांहीं महिन्यांपूर्वीं सयाममध्यें एक राज्यक्रांति—शांततापूर्वक अशी

राज्यक्रांति झाली. आणि तिच्यामध्यें वरिष्ठ मध्यमवर्गाचे लोक पुढें आले. एक प्रकारच लोकनियुक्त कायदेमंडळही तेथें प्रस्थापित करण्यांत आलें आहे. पहिल्या रामाच्य घराण्यांतील हल्लींच्या राजानें या फेरबदलाला मान्यता दिलेली आहे. त्यामुळें राजघराणें मात्र अस्तित्वांत राहिलेलें आहे. तेव्हां सयाममध्यें सध्यां मर्यादित राजसत्ता आहे.

आशियांतील आग्नेयीकडील आणखी एका देशाचा आपल्याला विचार करावयाचा आहे. तो म्हणजे फिलिपाइन बेटांचा. त्यांच्याबद्दलही याच पत्रांत लिहावें असा माझा हेतु होता. परंतु आता उशीर झाला असून मी दमलेलाही आहें. शिवाय हें पत्रही बरेंच लांबलेलें आहे. या वर्षी–१९३२ सालीं–मी तुला लिहीत असलेलें हें अखेरचें पत्र आहे. कारण हें वर्ष आतां अगदीं शेवटच्या घटकेला पोंचलेलें असून, त्याचा शेवटचा श्वास अगदीं जायच्या बेतांत आलेला आहे. आणखी तीनच तासांत त्याची यात्रा संपून जाईल आणि तें भूतकाळच्या आठवणींत जमा होऊन राहील.

## १२०
## आणखी एक वर्षारंभदिन

*वर्षारंभदिन, १९३३*

आज नव्या वर्षाचा पहिला दिवस आहे. पृथ्वीनें सूर्याभोंवतीचें आपलें आणखी एक भ्रमण पुरें केलें आहे. पृथ्वीच्या या भ्रमणांत पृथ्वीला कसलेही खास उत्सवाचे दिवस किंवा सण वगैरे कांहींसुद्धां ठाऊक नसतात, आणि आपल्या पृष्ठभागावर वावरणाऱ्या असंख्य जीवजंतूंत नरनारींची एक मनुष्यजात म्हणून आहे, या जातीच्या प्राण्यांचीं आपसामध्यें भांडणें चालू असतात. त्यांना मूर्खांसारखा असा अहंकार वाटत असतो, कीं आपण आहों म्हणून ही पृथ्वी चाललेली आहे, पृथ्वीच्या रथाचा आपण जणुं कणाच आहों, आपण नसलों तर पृथ्वीचें सगळें जीवन नीरस आणि आळणी होऊन जाईल, या गोष्टीची किंवा या असंख्य क्षुद्र जीवांच्या हालचालींची पृथ्वीला आपल्या भ्रमणामध्यें काडीचीसुद्धां किंमत नसते. परंतु पृथ्वीला जरी आपल्या अपत्यांची काळजी नसली, तरी आपण स्वतः आपल्याबद्दल काळजी न करून चालणार नाहीं. म्हणून आपल्यापैकीं पुष्कळांची अशी पद्धति पडून गेलेली आहे, कीं नव्या वर्षाच्या पहिल्या दिवशीं आपल्या जीवनाच्या प्रवासांत थोडासा मुक्काम करून विश्रांति घ्यावयाची; मार्गे टाकलेल्या मार्गावर जरा थोडी नजर टाकावयाची; गतगोष्टींची थोडीशी आठवण करावयाची आणि मग पुढच्या आक्रमण करावयाच्या असलेल्या मार्गावर नजर टाकून पुढें पाऊल टाकायला मनाला धीर द्यावयाचा. तेव्हां मलाही आज मागच्या आठवणी करीत बसावें असें वाटतें आहे. तुरुंगांतला माझा हा एका पाठोपाठचा

तिसरा नव्या वर्षाचा आरंभदिन ; अर्थात् हीं सगळींच तीन वर्षें मीं तुरुंगांत घालविलेलीं नाहींत. तर अधून मधून कांहीं महिने बाहेरच्या विशाल जगांत काढायला सांपडलें मला. यांतून मी मागें जाऊन पाहूं लागलों तेव्हां मला दिसून आलें, कीं गेल्या अकरा वर्षांत मीं पांच वर्षारंभदिन तुरुंगांत काढले आहेत आणि असे हे किती वर्षारंभदिन आणि असेच दुसरे सणाचे दिवस आणखी कितीदां मला अशा रीतीनें तुरुंगांत काढावे लागणार आहेत कोण जाणे!

परंतु तुरुंगाच्या भाषेंत मी आतां हॅबिच्युअल म्हणजे 'काळा टोपी' झालों आहें. एकदां नव्हे, तर किती तरी खेपांचा काळा टोपी ! त्यामुळें तुरुंगाचें जीवन आतां माझ्या आंगवळणीं पडलें आहे. बाहेरच्या माझ्या जीवनांत किती काम, किती चळवळ, केवढाल्या मोठ्या सभा, किती सार्वजनिक भाषणें, या ठिकाणाहून त्या ठिकाणीं किती धांवपळ, अशी नुसती धांदल असते. या बाहेरच्या जीवनाच्या मानानें माझें येथील जीवन किती विरुद्ध टोंकाचें आहे ! येथें प्रत्येक गोष्ट बाहेरच्याहून वेगळी आहे. येथें सगळें कसें शांत आहे. हालचाल, चळवळ अशी मुळीं नाहीं. किती तरी वेळ मी नुसता बसून असतों आणि तासन् तास मी तोंडांतून शब्दही काढीत नाहीं. दिवस, आठवडे, महिने एकामागून एक निघून जात असतात. त्यांत हा दिवस कोणता, हा महिना कोणता, असा कांहीं फरक सुद्धां दिसत नाहींसा होतो. सगळे दिवस सारखे आणि सगळेच महिने सारखे. बरें, येथें घालवलेल्या दिवसांतील घडामोडींचें चित्र डोळ्यांपुढें आणावें म्हटलें, तर त्या चित्रांत कांहीं स्पष्टपणें दिसत नाहीं. कांहीं तरी नुसती बरबटलेली अंधुकशी आकृति डोळ्यांपुढें उभी राहिल्यासारखी तेवढी होते. कालचा दिवस म्हणून मनांत विचार आणला, कीं ज्या दिवशीं आपल्याला पकडलें तो दिवस डोळ्यांपुढें उभा राहतो. कारण मधला सगळा काळ म्हणजे कोरा करकरीत काळ असून मनावर त्याचा ठसा जणुं कांहींच उमटलेला नसतो. या काळांतलें माणसाचें जीवन म्हणजे एकाच ठिकाणीं मूळ धरून वाढत राहिलेल्या वनस्पतीसारखें ; कसली कुरबुर नाहीं, सांगणेंसवरणें नाहीं, वादविवाद नाहींत. मुकाट्यानें, इकडे तिकडे कसली हालचाल न करतां, एका जागीं दिवस कंठावयाचे ! कांहीं वेळां तर तुरुंगामध्यें माणसाला बाहेरच्या जगांतील सगळा व्यवहार-सुद्धां अगदींच चमत्कारिक, अनोळखी असा भासूं लागतो. त्याचा त्याला नीटसा उमगच पडेनासा होतो. बाहेरच्याही सगळ्या गोष्टी त्याला आपल्यापासून किती तरी दूर भासूं लागतात ; त्यांत कांहीं तथ्यच नाहीं असें वाटूं लागतें. त्या आहेत कीं नाहींत असाच संशय उत्पन्न होतो. तो एखादा नजरबंदीचा खेळच असावा, अशी भावना होते. अशा रीतीनें येथें माणसाच्या ठिकाणीं एक प्रकारें दुहेरी वृत्ति निर्माण होते ; एक सक्रिय आणि एक निष्क्रिय. मनुष्याचें वागणेंसुद्धां दोन प्रकारचें होऊं लागतें. एकाच शरीरांत दोन माणसें जणुं वास करूं लागतात ! रॉबर्ट लुई स्टीव्हन्सनच्या डॉ. जेकिल आणि मि. हाईड यांच्याप्रमाणें ! वाचली आहेस का तूं ती गोष्ट ?

काळानें सर्व कांहीं माणसाच्या आंगवळणीं पडतें. तुरुंगांतील रेखीव नित्यक्रम आणि तोच तोपणासुद्धां. मग येथील विश्रांति शरीराच्या दृष्टीनें चांगली ठरते ; येथील शांतताही मनाला, बुद्धीला हितकारक ठरते ; कारण त्यामुळें माणसाला विचार करायला सवड मिळते. ही माझी अवस्था तूं लक्षांत आणलीस म्हणजे मग कदाचित् तुला हीं जीं पत्रें मी लिहितों त्यांचें माझ्या येथील जीवनांत केवढें मोठें महत्त्व आहे, हें समजेल. तुला तीं वाचतांना अगदींच नीरस वाटतील कदाचित्. तीं कंटाळवाणीं वाटतात, उगीच त्यांत नुसती लांबण लावलेली आहे, असें सुद्धां तूं म्हणशील ; परंतु माझें तुरुंगांतील जीवन सुनें सुनें न वाटायला या पत्रांची केवढी मदत झालेली आहे ! त्यामुळें मला येथें एक केवढें मोठें काम मिळालें आहे आणि या कामामुळें मला केवढा मोठा आनंदाचा ठेवा प्राप्त झालेला आहे ! नैनी तुरुंगांत हीं पत्रें लिहावयाला मीं सुरुवात केली, त्याला आज दोन वर्षें झालीं. त्या दिवशींही वर्षारंभदिन होता. बाहेरून पुन्हां तुरुंगांत आल्यावर पुन्हां हीं पत्रें अशींच मी लिहीत आलों आहें. कधीं कधीं आठवडेच्या आठवडे मीं कांहीं लिहिलें नाहीं; तर कधीं कधीं, रोज अगदीं मुळींच खंड न पाडतां मी लिहीत आलों. एकदां लिहिण्याच्या स्फूर्तीनें मी भारला गेलों आणि दऊत-टांक घेऊन लिहावयाला बसलों, कीं मग मी निराळयाच जगांत वावरायला लागत होतों. त्या जगांत तूं माझ्या शेजारीं गोड सोबतीला असावयाचीस आणि तुरुंग आणि त्यातली ती सारी भानगड पार विसरून जावयाची. अशा रीतीनें हीं पत्रें तुरुंगाच्या वातावरणांतून निसटून जाण्याचें मला एक मोठेंच साधन झालें आहे.

आज जें मी हें पत्र लिहितों आहें तें १२० वें आहे. हे क्रमांक घालण्याची सुरुवात नुकती नऊ महिन्यांपूर्वीं बरेलीच्या तुरुंगांत मीं केली. एवढ्यांत एवढें थोरलें मीं लिहिलें, हें पाहून माझा मलाच अचंबा वाटतो आणि या पत्रांच्या राशींचा डोंगरच्या डोंगर जेव्हां एकदम तुझ्या डोक्यावर पडेल तेव्हा तूं काय म्हणशील कोण जाणे, असा विचार माझ्या मनांत येतो. पण तुरुंगाच्या वातावरणांतून निसटून बाहेरच्या जगांत प्रवास करण्याची ही जी संधि त्यामुळें मला मिळते, ती मला मिळूं नये असें तुला कसें बरें वाटेल ? आज सात महिने झाले तुझी-माझी भेट झाली नाहीं ; केवढा मोठा काळ आहे बरं हा !

माझ्या पत्रामधील ही गोष्ट तशी कांहीं म्हणण्यासारखी गोड नाहीं. इतिहास असा गोड नाहींच मुळांत. मनुष्यानें पुष्कळ मोठी प्रगति केल्याबद्दल कितीही नगारे वाजविले, तरी मनुष्यप्राणी हा अजून अतिशयच दुःखदायक आणि स्वार्थी असाच राहिलला आहे. परंतु मनुष्याचा स्वार्थीपणा, भांडखोरपणा आणि अमानुषपणा यांच्या या दीर्घकालीन व मन खट्टू करणाऱ्या इतिहासाच्या काळयाकुट्ट वातावरणांत पहिल्यापासून थेट आतापर्यंत प्रगतीच्या किरणाची एक तरी रेषा सारखी धांवत आलेली आपणांस आढळून येते. मी जात्या थोडा आशावादी मनुष्य आहें आणि एकंदर

जीवनाकडे मी मोठ्या कौतुकानें आणि सदिच्छेनेंच पाहत असतों; परंतु या आशावादित्वामुळें आपल्या भोंवतीं व आपल्यामध्यें जे कांहीं खोल काळे खड्डे किंवा धोक्याच्या जागा आहेत त्यांकडे आपण दुर्लक्ष करतां कामा नये किंवा अविवेकी आशावादीपणानें भलत्याच ठिकाणाहून चांगलें होण्याची अपेक्षा करण्याची चूक करून नुकसानीत सांपडण्यापासूनही आपण सावध राहिलें पाहिजे. कारण जगाची आतांपर्यंत जी अवस्था होत आली आणि जी होत आहे, तिच्यांत आशावादित्वाला खरोखरच फार थोडीच जागा आहे. ध्येयवादी मनुष्य किंवा कोणतीही गोष्ट निव्वळ श्रद्धेच्या जोरावर गृहीत न समजणारा मनुष्य यांच्यापुढें हें जग म्हणजे एक कठिण कोडें आहे. अशा माणसाच्या मनांत नाना तऱ्हेचे प्रश्न उद्भवतात; परंतु जगांत त्याचें त्याला साधें सरळ उत्तर सांपडत नाहीं. नाना तऱ्हेचे संशय निर्माण होतात आणि ते मग सहजासहजीं नाहींसे होत नाहींत. जगामध्यें इतका अविवेकीपणा आणि इतकें दुःख कां असावें, हा त्यांतला एक प्रश्न आहे. हा प्रश्न प्राचीन काळापासूनचा असून, आपल्या देशांत २५०० वर्षांपूर्वी राजकुमार सिद्धार्थ यालाही हाच प्रश्न पडला होता. अशी कथा आहे, कीं त्याला ज्ञानदर्शन होईपर्यंत किंवा जगाचा बोध होईपर्यंत एकसारखा तो याच प्रश्नाचा जप करीत राहिला आणि ज्ञानदर्शन झाल्यावर तो बुद्ध झाला. तो स्वतःलाच असा प्रश्न करी म्हणतात कीं:

"ब्रह्म स्वतःच हें जग निर्माण करतें आणि त्यालाच तें दुःखांत ठेवतें, असें कसें घडेल! कारण ब्रह्म जर सर्वशक्तिमान् असेल आणि तरीही जगाला तें दुःखांत ठेवीत असेल, तर मग तें चांगलें नसलें पाहिजे, आणि तें सर्वशक्तिमान् नसेल, तर मग तें परमेश्वर नसलें पाहिजे."

आजची आपल्या देशाची अवस्था पाहा ना. इकडे स्वातंत्र्याचा झगडा सुरू आहे, तर आमच्या देशबांधवांपैकीं पुष्कळसे लोक तिकडे कांहींच लक्ष देत नाहींत. आपापसांत वाद घालीत आणि तंटे करीत बसतात आणि आपल्या धर्मांचीच फक्त काळजी करीत बसून सर्वसामान्य अशा देशहिताचा प्रश्नच अजिबात विसरून जातात आणि कांहीं कांहींनीं तर स्वातंत्र्याकडे कानाडोळा करून,

"जुलमी लोकांशीं संगनमत केलेलें आहे आणि सर्कशीच्या पाळीव जनावरांप्रमाणें ते वागूं लागले आहेत; आपले टाकून दिलेले जुने मुकुट घालायला त्यांनीं सुरुवात केलेली आहे आणि सांदीकोंपऱ्यांत पडलेल्या धर्ममतांचा आश्रय करायचा त्यांनीं आव आणलेला आहे. आपले जुने धर्मग्रंथ (!), पोथ्या, आपले जुने फाटके पुन्हां रंगवून स्वच्छ केलेले झगेही वापरायला त्यांनीं सुरुवात केली आहे."

कायदा आणि सुव्यवस्था यांच्या नांवाखालीं देशांत जुलमाचा धुमाकूळ चालला आहे आणि जुलमापुढें मान न वांकविणारांना पार दडपून टाकलें जात आहे. जो कायदा किंवा जो राज्यकारभार दुर्बलांचें आणि दलितांचें आश्रयस्थान व्हावा, तोच असा जुलूम करणारांच्या हातचें एक शस्त्र होऊन राहावा, ही किती विचित्र घटना

आहे! या पत्रात आतांपर्यंत मी पुष्कळ उतारे दिलेले आहेत. तरी पण आणखी एक उतारा मी देणारच. मला तो फारच आवडतो आणि आपल्या देशाच्या आजच्या स्थितीशीं तो अत्यंत जुळताही आहे. अठराव्या शतकांतील एक फ्रेंच तत्त्वज्ञ मॉंटेस्क्यू याच्या ग्रंथामधील हा उतारा आहे. मागच्या एका पत्रांत मीं त्याबद्दलचा उल्लेख केलेला आहे. तो म्हणतो:

"दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून अगदीं बुडून मरण्याच्या बेतात असलेल्या माणसाला भर समुद्रांत एखादी फळी सांपडावी व तिच्या आश्रयानें त्यानें आपला जीव कसा तरी वांचविलेला असावा. अशा प्रसंगांत त्याचें तें जीव वांचविण्याचें साधनच बुडवून टाकणें किंवा त्यालाच बुडवून टाकणें याच्याहून अधिक निर्दय अत्याचार असूंच शकणार नाहीं; मग त्याच्यावर भले कायद्याची किंवा न्यायमंदिराच्या निकालाची वाटेल तितकी रंगसफेती देण्याचा प्रयत्न करा."

वर्षारंभाच्या आनंदकारक दिवसाच्या दृष्टीनें माझें हें पत्र जरासें निरुत्साहकारक झालें आहे. आजच्या दिवसाच्या दृष्टीनें माझें हें करणें अगदीं अप्रशस्त आहे; परंतु खरोखर मी निरुत्साह झालेलों नाहीं आणि निरुत्साही होण्याचें आपल्याला कारण तरी काय आहे? एका मोठ्या कार्यासाठीं आपण काम करतों आहों आणि झगडतों आहों हा आनंद आम्हांला आहे. आमचा पुढारी श्रेष्ठ आहे; आमचा तो प्रिय मित्र आणि मार्गदर्शक आहे. त्याच्या दर्शनानें आमच्या ठिकाणीं शक्ति निर्माण होते आणि स्पर्शानें आमचा उत्साह जागृत होतो आणि आमची पक्की खात्री आहे, कीं यश हें आम्हांला मिळावयाचें आहे, आज ना उद्यां आम्ही तें मिळविणारच. अशा स्थितींत वाटेंत ज्या अडचणी आम्हांला ओलांडावयाच्या आहेत आणि ज्या लढाया लढून जय मिळवायचे आहेत, त्या अडचणी आणि त्या लढाया जर आमच्या जीवनामध्यें असणार नाहींत, तर त्याविना तें जीवन अगदींच नीरस आणि कंटाळवाणें होईल.

आणि बाळे, तूं तर आतां कोठें जीवनाच्या उंबरठ्याशीं उभी आहेस. तुला जीवनांतील काळ्या आणि भीतिदायक, निरुत्साहकारक अशा भागाकडे पाहण्याचें एव्हांच कांहीं कारण नाहीं. पुढें वेळ येईल तेव्हां तूं तुझ्या जीवनाचा आणि त्यांत जें काय घडेल त्याचा आनंदी आणि निर्विकार चेहऱ्यानें स्वीकार करशील आणि खुशाल ज्या कांहीं अडचणी यायच्या असतील त्या तरूनच पुढें जाण्यांत आनंद आहे, अशा धडाडीनें तूं वागशील, यांत मला मुळींच संशय नाहीं आणि तसें लौकरच घडून येवो!

तेव्हां लाडके, आतां आपली पुन्हां गाठ होईपर्यंत नमस्ते!—लौकरच येऊं दे तो भेटीचा दिवस!

# १२१
# फिलिपाइन्स आणि अमेरिका

३ जानेवारी, १९३३

नूतन वर्षारंभाच्या दिवशीं आपण थोडें विषयांतर केलें. आतां पुन्हां आपली गोष्ट चालू करूं या. आज आपण फिलिपाइन बेटांचा विचार करूं. म्हणजे आशिया खंडांतील पूर्व भागाचें चित्रण पुरें होऊन जाईल. या बेटांकडे इतकें खास लक्ष आपण द्यावें असें त्यांमध्यें काय आहे एवढें ! आशिया खंडांत आणि इतरत्रही आणखी दुसरीं कितीतरी बेटें अशीं आहेत, कीं त्यांचा या पत्रांमध्यें मीं नुसता नांवानेंसुद्धा उल्लेख केलेला नाहीं. आशिया खंडांत साम्राज्यशाहीची वाढ कशी झाली आणि या वाढीचे प्राचीन सुधारणांच्यावर कोणते परिणाम झाले, हें पाहण्याचा आपण प्रयत्न करतों आहों. या आपल्या अभ्यासाप्रीत्यर्थ हिंदुस्थानांतील साम्राज्य हें एक अत्यंत नमुनेदार उदाहरण आहे. चीनमध्यें औद्योगिक साम्राज्यशाहीच्या विस्ताराचा आणखी एक निराळाच नमुना दृष्टीस पडतो; तोही अतिशयच महत्त्वाचा आहे. ईस्ट इंडीज बेटें, इंडोचायना वगैरे बेटांपासूनही या बाबतींत आपल्याला थोडें थोडें ज्ञान मिळण्यासारखें आहे. फिलिपाइन बेटाचा वृत्तांतही आपल्याला याच दृष्टीनें पाहण्यासारखा आहे. त्यांतल्या त्यांत या देशांत आणखी एका नवीन राष्ट्राचा कारभार आपणांस पाहावयास सांपडतो. यामुळें त्याचा विचार जास्तच बोधप्रद होण्याचा संभव आहे. हें नवीन राष्ट्र म्हणजे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें. त्याचा आपण नुसता अमेरिका असा सुट-सुटीत निर्देश यापुढें करीत जाऊं.

आपण पाहिलेंच आहे, कीं चीनमध्यें कांहीं अमेरिकेचें धोरण बाकीच्या राष्ट्रां-इतकें चढाऊपणाचें किंवा आक्रमक नव्हतें. उलटपक्षीं, बाकीच्या साम्राज्यशाही राष्ट्रांना अमेरिकेनें कांहीं प्रसंगीं थोडें खेंचून धरल्यामुळें चीनचा थोडाबहुत फायदाच झाला. अमेरिकन लोकांना साम्राज्यवादाची आवड नव्हती, किंवा चीनबद्दल त्यांना विशेष आपलेपणा होता, म्हणून अमेरिकन लोकांनीं असें केलें असें मुळींच नव्हे, तर असें होण्याचें कारण अमेरिका देशांतील कांहीं अंतर्गत परिस्थिति ही होती. तिच्यामुळें बाकीच्या राष्ट्रांच्या आणि अमेरिकेच्या धोरणांत फरक पडत होता. युरोपियन राष्ट्रें हीं जीं होतीं, तीं एक तर एका लहानशा युरप खंडांत खच्चून दाबून भरल्यासारखीं झालेलीं होतीं. तिकडे त्यांची लोकसंख्या इतकी दाट झालेली होती, कीं कोणालाही इकडेतिकडे थोडेंसें हलायला सवड राहिलेली नव्हती. त्यामुळें युरपमध्यें नेहमीं धासाधीस आणि झगडे चालू असत. पुढें औद्योगीकरण सुरू झालें; त्या-बरोबर तर या देशांची लोकसंख्या आणखीच झपाट्यानें वाढत चालली. तसेंच त्यांच्यामध्यें जास्त मालाचें उत्पादन होऊन तो माल त्या देशांत खपणें अशक्य

झालें. वाढत्या लोकसंख्येसाठीं खाद्य पदार्थांची गरज होती. तयार मालासाठीं बाजारपेठ हवी होती आणि कारखान्यांना कच्चा माल हवा होता. सर्व उणीवा पुऱ्या करण्याची ही जी आर्थिक स्वरूपाची आवश्यकता होती, तिच्यासाठीं या राष्ट्रांतील लोकांना दूरदूरचे देश धुंडावे लागले आणि साम्राज्यासाठीं एकमेकांमध्यें युद्धें करावीं लागलीं.

अमेरिकेला यांपैकीं कोणताच प्रश्न उपस्थित होणारा नव्हता. त्यांचा देशच मुळांत जवळ जवळ यूरप खंडाएवढा मोठा होता आणि त्याची लोकसंख्या अगदींच थोडी होती. येथील लोकाना या ठिकाणीं राहायला वाटेल तेवढी जागा होती. या देशांतील वाहतुकीस न आलेले विशाल प्रदेशही वाहतुकीला आणून त्यांच्यातील साधनसंपत्तीची वाढ करण्याच्या कामांत आपली असेल नसेल ती सारी शक्ति खर्च करण्याला तेथील लोकांना सवड होती. त्यांचे आगगाडीचे रस्ते जसजसे बांधून होत गेले, तसतसा त्यांचा विस्तार पश्चिम दिशेला होत गेला आणि पुष्कळ काळानंतर अखेरीस त्यांनीं पॅसिफिक महासागर गांठला. आपल्या स्वतःच्या देशामधल्याच या सगळ्या कामांत अमेरिकन लोक सर्वस्वीं गुंतून गेलेले असल्यामुळें वसाहती मिळविण्यासाठीं धडपडी करण्याला त्यांना वेळही नव्हता आणि तिकडे त्यांची प्रवृत्तीही वळली नाहीं. एवढेंच नव्हे, तर मागें मीं सांगितलेलें आठवत असेल तुला, कीं अमेरिकेंत कामगार कमी पडल्यामुळे उत्तर अमेरिकेलाच चीनमधून कॅलिफोर्नियाच्या किनाऱ्यावरील प्रदेशांत काम करण्यासाठीं कामगार आणावे लागले होते. अमेरिकेच्या विनंतीप्रमाणें चीननें कामगार पुरविण्याची व्यवस्थाही केली आणि यांतूनच पुढें या दोन देशांमध्यें एक प्रकारची कटुता निर्माण झाली. तेव्हां अशा प्रकारें अमेरिकन लोकांचें सर्व लक्ष स्वतःच्या देशामध्येंच गुंतलेलें असल्यामुळें हे लोक यूरप खंडांतील राज्यकर्त्यांनीं जी साम्राज्यवर्धनाची चुरशीची धामधूम चालविली होती, तिच्यापासून अलिप्त राहिले. चीनमध्येंसुद्धां आपण आपला हात शिरकवलाच पाहिजे, तसें केलें नाहीं तर हीं बाकीचीं राष्ट्रें चीनची आपआपल्यामध्यें वाटणी करून मोकळीं होतील, असें जेव्हां दिसून आलें तेव्हांच अमेरिकेनें चीनच्या राजकारणांत लक्ष घातलें.

फिलिपाइन बेटात मात्र प्रत्यक्ष अमेरिकेचें राज्यच सुरू झालें. या बेटांवरून आपल्याला अमेरिकेच्या साम्राज्यवादाची चांगली कल्पना येते. म्हणून त्या बेटांचा इतिहास आपल्याला पाहण्यासारखा आहे; परंतु अमेरिकेचें साम्राज्य फिलिपाइन बेटांपुरतेंच मर्यादित आहे, अशी मात्र समजूत करून घेऊं नको. बाहेरून पाहिलें तर आज त्याचें साम्राज्य असें या फिलिपाइन बेटांतच आहे असें दिसतें खरें; परंतु बाकीच्या साम्राज्यशाही राष्ट्रांना जे अनुभव आले आणि ज्या अडचणी सोसाव्या लागल्या त्यांवरून योग्य तो धडा घेऊन अमेरिकेनें साम्राज्यस्थापनेच्या जुन्या पद्धतींत थोडी सुधारणा केलेली आहे. इंग्लंडनें पूर्वीं हिंदुस्थान देशच सबंध ताब्यांत घेतला, तसा आतां कोणताही देश ताब्यांत घेण्याच्या भानगडींत अमेरिकन लोक पडत नाहींत. त्यांचा सगळा उद्देश काय, तर पैसा मिळविण्याचा. तेव्हां कोणत्याही देशाच्या संपत्तीवर

ताबा मिळविण्याचें धोरण त्यांनीं धरलेलें आहे. या चतुर युक्तीला आर्थिक साम्राज्यवाद असें म्हणतात. नकाशांत पाहूं गेलीस तर तुला तो कोठेंच आढळणार नाहीं. भूगोलाचें पुस्तक पाहतां किंवा नकाशावरून असें आढळेल कीं अमुक देश ना, अगदीं स्वतंत्र आहे; परंतु वरचा पडदा दूर करून जर आंतल्या बाजूला पाहायला गेलीस, तर तुला आढळेल कीं हा देश दुसऱ्या एका देशाच्या पकडींत सांपडलेला आहे. दुसऱ्या देशाच्या म्हणण्यापेक्षां अशा दुसऱ्या देशातील पेढीवाल्यांच्या आणि मोठमोठ्या उद्योग-धंद्यांच्या मालकांच्या तावडींत, असें म्हटलें असतां अधिक बरें होईल. तेव्हां अमेरिकेच्या ताब्यांत असें हें अदृश्य साम्राज्य आहे आणि हिंदुस्थान काय किंवा इतर कोठें काय, ब्रिटन जेव्हां बाह्यतः त्या त्या देशांतील राजकीय यंत्राचा ताबा त्या त्या देशाच्या लोकांच्या हातीं देऊं करतें त्या त्या वेळीं तेथें हें अदृश्य साम्राज्य; परंतु पहिल्या दृश्य साम्राज्याइतकेंच लाभदायक असें आपलें साम्राज्य, कायम टिकविण्यासाठीं तर ब्रिटनची धडपड चालू असते. ही एक अत्यंत धोक्याची गोष्ट आहे आणि तिच्याबद्दल आपण सावध असलें पाहिजे.

परंतु या अदृश्य आर्थिक साम्राज्याचा याहून अधिक खोल विचार करण्याचें आतांच आपल्याला कारण नाहीं. कारण फिलिपाइन बेटें हीं दृश्य साम्राज्याचाच एक भाग आहेत.

फिलिपाइन बेटांच्या इतिहासाकडे आपलें लक्ष जाण्याला आणखी एक भावनात्मक कारण आहे. आज या बेटांवर सगळी स्पेन आणि अमेरिकेच्या संस्कृतीची छाया पडलेली दिसत असली, तरी त्यांच्या सर्व संस्कृतीची पार्श्वभूमि किंवा मूळ म्हणा हिंदुस्थानांतूनच तिकडे गेलेलें आहे. हिंदी संस्कृतीचा प्रवेश, फिलिपाइन-मध्यें सुमात्रा आणि जावा यांच्यामधून झाला आणि तिचा परिणाम तेथील सामाजिक, धार्मिक, राजकीय, एकूण एक सर्व जीवनावर झाला. आमच्या प्राचीन हिंदी पुराण-कथा आणि आमचें कांहीं वाङ्मय यांचाही तेथें प्रवेश झाला होता. तेथील भाषांमध्यें किती तरी संस्कृत शब्द आढळतात. त्यांच्या कलेवरही हिंदी कलेचा परिणाम झालेला आहे, तसाच त्यांच्या कायदेकानूंवर आणि हस्तव्यवसायांवरही. कपडे आणि दाग-दागिने यांच्यावरसुद्धां हिंदुस्थानची छाप या देशांत पडलेली आढळून येते. अर्थात् स्पॅनिश लोकांनीं आपल्या तीनशें वर्षांच्या अमदानींत प्राचीन हिंदी संस्कृतीच्या या सर्व खुणा नाहींशा करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें आज त्यांपैकीं फार थोड्यांचे अवशेष येथें दृष्टीस पडतात.

स्पॅनिश लोकांनीं फिलिपाइन बेटें व्यापण्याला सुरुवात फारच पूर्वीं म्हणजे १५६५ पासून केली. अशा रीतीनें यूरपीय लोकांचा आशिया खंडामध्यें अगदीं प्रथम पाय जो रोंवला गेला तो या फिलिपाइन बेटांमध्यें. पोर्तुगीज, ब्रिटिश किंवा डच लोकांच्या वसा-हतींतल्यापेक्षां येथील कारभार स्पॅनिश लोकांनीं निराळ्या पद्धतीनें चालविलेला दिसतो. या ठिकाणीं व्यापारवाढ करण्याकडे मुळींच लक्ष देण्यांत आलें नाहीं. राज्य-

कारभाराची सर्व भूमिका धार्मिक स्वरूपाची होती. बहुतेक सगळे अधिकारी लोक हे मिशनरी किंवा पाद्री लोकांपैकीं असत. म्हणून इतिहासांत या साम्राज्याला "मिशनऱ्यांचें साम्राज्य" असें नांव मिळालेलें आहे. स्थानिक लोकांची परिस्थिति सुधारण्याचा एवढासुद्धां प्रयत्न करण्यांत आला नाहीं. राज्यकारभार अगदींच अंदाधुंदीचा असे. जुलूम पुष्कळ होत असे. करांचें ओझें खूप जबरदस्त लादलेलें होतें आणि जबरदस्तीनें लोकांना बाटवून ख्रिस्ती करण्यांत येई. या परिस्थितीनें पुष्कळदां बंडें झालीं. पुष्कळसे चिनी लोक या बेटांवर व्यापाराकरितां म्हणून या वेळीं आले; परंतु त्यांनीं ख्रिस्ती होण्याचें नाकारलें म्हणून त्यांच्या पद्धतशीरपणें कत्तली करण्यांत आल्या. इंग्रज आणि डच व्यापाऱ्यांना या बेटांवर येऊंच दिलें जात नव्हतें. याचें एक कारण या देशांत आणि स्पेनमध्यें पुष्कळदां युद्धेंच चालू असत आणि दुसरें कारण म्हणजे त्या देशांतील ख्रिस्ती लोक हे प्रॉटेस्टंट पंथाचे असत. रोमन कॅथॉलिक पंथाच्या स्पॅनिश लोकांच्या दृष्टीनें हे लोक म्हणजे धर्मभ्रष्ट, पाखंडी असे होते.

या अमलाखालीं बेटांची अवस्था खालावत चालली; परंतु या गोष्टीचा एक चांगला परिणाम झाला. या बेटांमधील निरनिराळ्या विभागांमध्यें आणि गटांमध्यें ऐक्य प्रस्थापित होऊन एकोणिसाव्या शतकामध्यें त्यांच्यांत एक प्रकारची राष्ट्रीय जागृतीही झाली. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला हीं बेटें इतर देशांनाही व्यापारासाठीं खुलीं करण्यांत आलीं. त्यामुळें शिक्षणांत आणि इतरही जीवनांगांत कांहीं सुधारणा अमलात आल्या आणि व्यापारउदीम वाढला. फिलिपिनोंचा एक मध्यम वर्गही येथें निर्माण झाला. फिलिपिनो लोक आणि स्पॅनिश लोक यांच्यामध्यें परस्परात लग्नें होत असत. त्यामुळें पुष्कळ फिलिपिनोंच्या शरीरांत स्पॅनिश रक्ताचा अंतर्भाव असे. स्पेन म्हणजे आपला जणुं मायदेश अशीही थोडीशी भावना जागृत झालेली होती आणि स्पॅनिश विचारांचाही प्रसार झालेला होता. तरीपण एक प्रकारची राष्ट्रीय प्रवृत्ति वाढतच होती आणि राज्यकर्त्यांकडून ही प्रवृत्ति दडपून टाकण्याचे प्रयत्न झाल्यामुळें तिला स्वाभाविकच क्रांतिकारक वळण लागलें. प्रथम कांहीं स्पेनपासून फुटून निघण्याची कल्पना फिलीपिनोंच्या मनांत नव्हती. स्थानिक स्वतंत्र राज्य, स्वायत्तता आणि स्पेनच्या दुबळ्या आणि कर्तृत्वशून्य अशा पार्लमेंटमध्यें (त्यालाच कोर्टेझ असें नांव आहे) प्रतिनिधी पाठविण्याचा एक प्रकारचा हक्क एवढ्याच त्यांच्या सुरुवातीला मागण्या होत्या. सर्वच ठिकाणीं राष्ट्रीय चळवळी सुरुवातीला अगदीं नेमस्त स्वरूपाच्या कशा असतात, मग हळूहळू त्या तीव्र होत जातात आणि शेवटीं त्यांचें ध्येय साम्राज्यशाहीपासून अजिबात फुटून जाऊन पूर्ण स्वातंत्र्य असें कसें होतें, ही गोष्ट या उदाहरणावरून थोडीशी पाहण्यासारखी आहे. स्वातंत्र्यासाठीं केलेली मागणी प्रथम जर दडपून टाकली, तर पुढेंमागें ती चक्रवाढव्याजासहित पुरी करावी लागते. तेव्हां फिलिपाइन बेटांतही ही मागणी अशीच वाढत गेली. ती पुरी करून घेण्यासाठीं म्हणून राष्ट्रीय संस्था

प्रस्थापित झाल्या. त्यांनच गुप्त संस्थाही सर्वत्र पसरल्या. " तरुण फिलीपिनोंचा पक्ष " म्हणून जो एक डॉ. जोस रिझाल यांच्या नेतृत्वाखालीं पक्ष होता, त्यानें या राष्ट्रीय आंदोलनात चांगली महत्त्वाची कामगिरी बजाविली. ही सगळी चळवळ दडपून टाकायला स्पॅनिश सरकारलाही इतर सर्वच सरकारांप्रमाणें एकच हत्यार तेवढें माहीत होतें. तें म्हणजे भयंकर दडपशाही आणि जुलूम अथवा हत्याकांड. यामध्यें रिझाल आणि इतरही पुष्कळ पुढाऱ्यांना १८९६ सालीं फांशीं देण्यांत आलें.

हा स्पॅनिश सरकारच्या पापाच्या घड्यांतील शेवटचा बिंदु ठरला. यानंतर फिलीपिनो लोकांनीं स्पॅनिश सरकाराविरुद्ध उघड उघड बंड पुकारलें व आपला " स्वातंत्र्याचा जाहीरनामा " प्रसिद्ध केला. सबंध वर्षभर हा झगडा चालला; परंतु स्पॅनिश लोकांना कांहीं हें बंड मोडून काढतां आलें नाहीं. मग त्यांनीं भरपूर राजकीय सुधारणा करण्याचें वचन दिलें. तेव्हां बंड तात्पुरतें बंद करण्यांत आलें; परंतु वचन दिल्या-प्रमाणें स्पेननें कांहींसुद्धां केलें नाहीं. त्यामुळें १८९८ मध्यें बंड पुन्हां पेटलें.

या दरम्यान अमेरिकन सरकारचा स्पेनशीं दुसऱ्या कांहीं एका बाबीवरून तंटा होऊन या दोन देशांमध्यें युद्ध जाहीर झालें होतें. म्हणून अमेरिकेच्या एका लष्करी काफिल्यानें १८९८ मध्यें एप्रिल महिन्यांत फिलिपाइन बेटांवर हल्ला केला. बंडखोर फिलीपिनोंना मोठी आशा वाटली, कीं एवढें मोठें हें अमेरिकेचें प्रजासत्ताक राज्य, तें आपल्या स्वातंत्र्याला पाठिंबा देईल. म्हणून या लोकांनीं त्या युद्धांत अमे-रिकेला मदत केली. पुन्हा एकदां आपलें स्वातंत्र्य जाहीर करून फिलिपिनो लोकांनीं एक प्रकारच्या प्रजासत्ताक राज्याची आंखणी केली. १८९८ च्या सप्टेंबर महिन्यात फिलिपिनो कॉंग्रेसची बैठक सुरू होऊन नवंबरच्या अखेरीला नवीन घटना मंजूरही करण्यांत आली; परंतु इकडे ही कॉंग्रेस नव्या घटनेची चर्चा करीत होती, तेव्हां दुसरीकडे स्पेनचा पराभव करण्याचें अमेरिकेचें काम चाललें होतें. स्पेन अगदींच दुर्बल देश; वर्षअखेरीच्या आंतच त्यानें पराभव झाल्याचें कबूल केलें आणि हें युद्ध संपलें. तहाच्या शर्तींप्रमाणें स्पेननें फिलिपाइन बेटें अमेरिकेच्या हवालीं केलीं. स्पेननें अमेरिकेला हा जो प्रचंड नजराणा दिला, त्यांत स्पेनचें कांहींच नुकसान झालें नाहीं. कारण फिलिपिनो बंडवाल्यांनीं फिलिपाइनमधील स्पॅनिश सत्तेला कधींच खो दिलेला होता.

त्यानंतर आतां अमेरिकेनेंच फिलिपाइन बेटांचा ताबा आपणांकडे घेण्याचा उपक्रम सुरू केला. या गोष्टीचा फिलिपिनो लोकांनीं निषेध केला. त्यांनीं असेंही दाखवून दिलें, कीं स्पेनला हीं बेटें दुसऱ्या कोणाला देण्याचा हक्क राहिलेला नव्हता. कारण त्या वेळीं स्पेनची देण्याजोगी सत्ताच फिलिपाइनवर शिल्लक नव्हती. परंतु त्यांचा सगळा निषेध फुकट गेला आणि ज्या क्षणाला ते लोक आपण नवीनच जिंकून घेतलेल्या स्वातंत्र्याबद्दल आनंदोत्सव करण्याच्या हुरूपामध्यें होते, त्याच क्षणाला त्यांना पुन्हां आणखी एक झगडा करण्याची पाळी आली! आणि आतां हा

झगडा स्पेनपेक्षां किती तरी प्रचंड समर्थ अशा राज्यसत्तेशीं घ्यावयाचा होता. तरीपण त्या शूर लोकांनीं हा झगडा तेजस्वीपणानें साडेतीन वर्षेंपर्यंत चालविला. कांहीं दिवस त्यांचा हा लढा त्या देशाचें सुसंघटित सरकार या नात्यानें होता. पुढें मात्र त्याना लपून छपून गनिमी काव्याचा लढा करणें प्राप्त झालें.

अखेरीस हें बंड पूर्ण दडपून टाकण्यांत आलें आणि अमेरिकेचें राज्य फिलिपाइन बेटांवर प्रस्थापित करण्यांत आलें. त्यानंतर तेथें पुष्कळच मोठ्या सुधारणा करण्यांत आल्या. शिक्षणामध्यें तर विशेषच. तरीपण फिलिपिनोंची स्वातंत्र्याची मागणी चालूच होती. १९१६ सालीं अमेरिकेनें "जोन्सचें बिल" या नांवानें प्रसिद्ध असलेला एक कायदा पास करून राज्यकारभाराचे कांहीं हक्क लोकनियुक्त कायदेमंडळाच्या हवालीं केले परंतु या कारभारांत हस्तक्षेप करण्याचा अधिकार अमेरिकेच्या गव्हर्नर जनरलला आहे आणि त्यानें तो वारंवार बजावलेलाही आहे.

अमेरिकेच्या फिलिपाइन बेटांवरील अधिकाऱ्यांविरुद्ध आतांपर्यंत बंडें मुळींच झालेलीं नाहींत; परंतु फिलिपिनो लोक आहे ती राज्यव्यवस्था मान्य करून स्वस्थ मात्र बसलेले नाहींत. त्यांची स्वातंत्र्याची मागणी चालूच आहे. साम्राज्यशाही लोकांना अगदीं पूर्ण शोभेल अशा रीतीनें अमेरिकन लोक फिलिपिनो लोकांना वारंवार आश्वासनें देत आलेले आहेत, कीं आम्ही जे तुमच्या बेटांमध्यें आलों आहोंत ते केवळ तुम्हां लोकांचें कल्याण व्हावें याच बुद्धीने आणि तुमचे तुम्ही राज्यकारभार करायला समर्थ झालांत रे झालांत कीं लगेच आम्ही हें बेट सोडून जाऊं. १९१६ च्या जोन्सच्या बिलांतसुद्धां नमूद केलें आहे कीं, "फिलिपाइन बेटांमध्यें स्थिर अशा स्वरूपाची राज्यव्यवस्था स्थापन करण्याजोगी परिस्थिति उत्पन्न होतांच या बेटांचें स्वातंत्र्य मान्य करावें आणि आपला अधिकार काढून घ्यावा असाच हेतु अमेरिकन लोकांचा फार पूर्वींपासून आहे." असें असूनही फिलिपाइन बेटांच्या स्वातंत्र्याचे कट्टे विरोधक असे लोक आज अमेरिकेंत किती तरी आहेत.

हें मी लिहीत असतांना अशी बातमी आली आहे, कीं अमेरिकन सरकारनें एक ठराव करून, जाहीरनामा काढून फिलिपाइन बेटांना आणखी दहा वर्षांच्या आंत पूर्ण स्वातंत्र्य दिलें जाईल असें आश्वासन दिलें आहे.

अमेरिकेचे फिलिपाइनमध्यें कांहीं आर्थिक हितसंबंध असून, त्यांचें रक्षण करण्यासाठीं अमेरिकन सरकार विशेष आतुर आहे. या बेटांतील रबराच्या लागवडीवर त्यांचें विशेष लक्ष आहे. कारण त्यांच्या देशांत त्याना उपलब्ध नसलेली अशी ही एक अत्यावश्यक वस्तु आहे. तरीपण हीं बेटें आपल्या हातांत ठेवण्याचें त्याचें मुख्य कारण त्यांना जपानची भीति वाटते हें आहे, असें मला वाटतें. जपान फिलिपाइन बेटांपासून फार नजीक आहे. आणि जपानची वाढती लोकसंख्या आता जपानमध्यें मावेनाशी होऊन बाहेर ओसंडूं लागली आहे. तेव्हां जपानी सरकारची लोभी नजर या बेटावर असणें संभवनीय आहे. अमेरिकन सरकार आणि जपानी सरकार यांचें

परस्परांशीं विशेषसें सूत नाहीं. त्यामुळें पॅसिफिक महासागरांतील या दोन मोठ्या राज्यसत्ता आणि त्यांच्यामधील परस्परसंबंध या फार मोठ्या प्रश्नाशीं फिलिपाइनच्या प्रश्नाची, सांगड पडल्यासारखी झाली आहे.

# १२२

# तीन खंडांच्या संगमाच्या ठिकाणीं

१६ जानेवारी, १९३३

पंधरा दिवसांपूर्वी, नव्या वर्षाच्या पहिल्या दिवशीं लिहिलेल्या पत्रांत मीं जी इच्छा प्रदर्शित केली होती, ती इतक्या लौकर पुरी होईल अशी त्या वेळीं कांहीं माझी कल्पना नव्हती. कित्येक दिवस वाट पाहतां पाहतां अगदीं एकाएकीं अखेरीस तुझी माझी भेट झाली आणि तुझें दर्शन एकदांचें मला झालें! तुला आणि बाकीच्यांना भेटायला मिळाल्यामुळें आनंदाची जी खळबळ माझ्या अंतःकरणांत माजली, तिच्यांत आज कित्येक दिवस मी रंगून गेलों आहें. त्यामुळें माझा रोजचा कार्यक्रम बिघडून गेलेला असून माझ्या कामाकडेही माझें दुर्लक्ष होत आहे. सुटीच्या दिवसांत असावी ना, तशी माझ्या मनाची अवस्था झालेली आहे. चार दिवस झाले आपली भेट झाली; परंतु किती तरी दिवस होऊन गेले असावेत असें मला वाटतें आहे. एवढ्यांतच याच्या पुढच्या भेटीकडे माझे डोळे लागलेले आहेत आणि ती केव्हां होईल, कोठें होईल याचीं स्वप्नें अनुभवण्यांत माझें मन दंग आहे.

पण भेटीला तुरुंगाच्या नियमांचें बंधन असलें, तरी माझ्या या तुझ्याशीं पत्ररूपी संवादाच्या सोंगाला तर कोठले तुरुंगाचे नियम आड येऊं शकत नाहींत! म्हणून पुन्हां हीं पत्रें चालू करण्याचें मीं ठरविलें आहे.

गेले कांहीं दिवस मी तुला एकोणिसाव्या शतकाबद्दल लिहीत आलों आहें. या शतकाची म्हणजे नेपोलियनच्या पाडावानंतरच्या सामान्यतः शंभर वर्षांच्या या काळाची सामान्य रूपरेखा तुला सांगण्याचा प्रयत्न मीं केला. नंतर मग आपण कांहीं कांहीं देशांचा थोडा तपशीलवार अभ्यास करूं लागलों. हिंदुस्थानचें आपण चांगलें यथास्थित वर्णन केलें. नंतर मग चीनचें आणि जपानचें आणि शेवटीं आपण बृहद् भारत आणि पूर्वेकडील हिंदी बेटें इकडे नजर टाकली. आतांपर्यंतच्या या काळातील तपशीलवार अशा आपल्या या पाहणीमध्यें आपण फक्त आशिया खंडाच्या कांहीं भागांचा तेवढा विचार केला आहे. बाकीचें जग अजून तसेंच बाकी आहे. ही सगळी हकिकत फारच मोठी आहे आणि तिचा धागा सरळ, स्पष्ट व एकसूत्री असा नाहीं. खंडामागून खंड असें वेगळेगळें घेऊन मला त्याच्याबद्दल

बोलावें लागतें. एका देशाचा वृत्तांत या शतकाच्या अखेरीस आणून पोंचवावा, तों पुन्हां मला परत फिरावें लागतें आणि दुसऱ्या एका देशाचा याच काळाचा वृत्तांत सांगावा लागतो. वारंवार असें हें करावें लागतें आहे. त्यामुळें ऐकणाराचा थोडासा गोंधळ होणें साहजिक आहे. तरीपण एकोणिसाव्या शतकांतले निरनिराळ्या देशांतले निरनिराळे हे जे प्रसंग मी सांगतों आहें, ते सगळे या सर्व देशांत मिळून एकाच वेळीं घडत होते, ही कल्पना तूं डोळ्यांपुढें ठेवण्याचा नित्य प्रयत्न करायला हवा. नुसतें एकाच वेळीं घडत होते असें नव्हे, तर त्यांचे एकमेकांवर परिणामही घडत होते. असें असल्यामुळेंच कोणत्याही एकाच देशाच्या इतिहासाचा अभ्यास करणें हें भ्रमोत्पादक होत असतें. निरनिराळे प्रसंग आणि दडपणें यांच्यामुळें भूतकाळांतील परिस्थितीचा बनाव कसा कसा बनत गेला आणि त्यांतून आजची वर्तमानकालीन परिस्थिति कशी निर्माण होत गली हें व त्या त्या प्रसंगाचें महत्त्व ध्यानांत येण्यासाठीं अखिल जगाच्या इतिहासाचा अभ्यास करणें हेंच आवश्यक आहे. या पत्रांतून असा जागतिक इतिहास मी तुला सांगतों आहें असा आव मला मुळींच आणावयाचा नाहीं. तें काम माझ्या आवांक्याबाहेरचें आहे आणि त्यासंबंधीं तुला काय हवीं तितकीं पुस्तकें वाचायला मिळूं शकतील. या पत्रांमध्यें मीं जें काय करण्याचा प्रयत्न केला आहे, तें म्हणजे जागतिक इतिहासाबद्दलची जिज्ञासा तुझ्या मनात जागृत करावयाची; त्या इतिहासाचीं कांहीं विशेष अंगें तुझ्या नजरेसमोर आणावयाचीं आणि मानवी व्यवहाराचीं कांहीं सूत्रें अगदीं प्राचीन काळापासून आजपर्यंत कशीं चालत आलीं आहेत, हें तुझ्या ध्यानांत आणून द्यावयाचें. हा माझा प्रयत्न साधणार आहे कितपत हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. कदाचित् माझ्या या सगळ्या परिश्रमांतून तुझ्यापुढें एक काहीं तरी खिचडी उभी राहून त्यामुळें जगाविषयींची नीटशी चांगली खरी कल्पना येण्या-ऐवजीं तुझा सगळा गोंधळ उडून जाण्याचा संभव आहे, असें मला पुन्हां पुन्हां वाटतें.

एकोणिसाव्या शतकांतील कालौघाला पुढें रेटण्याचें सगळें कार्य यूरप खंडानें चालविलेलें होतें. यूरप खंडांत या वेळीं राष्ट्रवादाचा पूर्ण अम्मल होता; तसाच या खंडांत औद्योगीकरणाचा विस्तार होत होता; त्याची छाया किंवा परिणाम म्हणा, जगाच्या दूरदूरच्या कोपऱ्यांपर्यंत जाऊन पोंचत होता आणि पुष्कळदां यामधून साम्राज्यशाहीचाही उदय होत होता. एकोणिसाव्या शतकाची अगदीं प्रथम जी आपण संक्षिप्त रूपरेखा पाहिली, त्या वेळीं आपण ही गोष्ट बघितली आहे आणि या साम्राज्यशाहीचे परिणाम काय झाले याचें थोडेंसें तपशीलवार वर्णन आपण हिंदुस्थाना-मध्यें आणि पूर्वेकडील हिंदी प्रदेशांमध्यें जाऊन केलें आहे. आतां आपल्याला यूरप खंडामध्यें जाऊन तेथलें जरा जवळून जास्त खोल निरीक्षण करावयाचें आहे; पण त्यापूर्वी आपण एकदां जरा थोडा वेळ पश्चिम आशियामध्यें जाऊन येऊं या. पुष्कळ काळपर्यंत या भागाच्या इतिहासाकडे मीं दुर्लक्षच केलें आहे. याचें खरें कारण म्हणजे या भागाच्या पुढच्या काळच्या इतिहासाची मला नीटशी माहिती नाहीं.

या पश्चिम आशियाची गोष्ट हिंदुस्थान आणि त्याच्या पूर्वेकडील प्रदेश यांच्याहून फारच निराळी आहे. हें खरें, कीं फार फार पूर्वीच्या काळीं मध्य आशियांतील आणि पूर्व आशियांतील कित्येक टोळ्यांनीं जाऊन हा प्रदेश व्यापलेला होता. तुर्क लोक तरी त्या ठिकाणीं असे इकडूनच गेले होते. ख्रिस्ती शक सुरू होण्यापूर्वी बुद्ध धर्माचा सुद्धां थेट आशियामायनरपर्यंत प्रसार झाला होता; परंतु त्याचें मूळ तेथें धरलेलें दिसत नाहीं. एकंदरींत पश्चिम आशियाचा संबंध अगदीं प्राचीन काळापासून आशियापेक्षां किंवा पूर्वेपेक्षां यूरप खंडाशीं अधिक जुळत आलेला दिसतो. किंवा एकपक्षीं यूरप खंडांतील वारे आंत घेण्याची आशिया खंडाची ही एक जणुं खिडकीच आहे म्हणावयाची. इकडे आशिया खंडाच्या कितीक भागांत पुढें इस्लाम धर्माचा प्रसार वाढला; परंतु त्याचा सुद्धां या भागांतील पाश्चात्य वाऱ्यावर, भूमिकेवर, तिकडे वळलेल्या तोंडावर कांहीं परिणाम झालेला नाहीं म्हणण्यासारखा.

हिंदुस्थान, चीन आणि त्याच्या आसपासचे प्रदेश यांचा यूरप खंडाशीं अशा प्रकारचा संबंध कधींच नव्हता. ते प्रदेश सर्वथा आशिया खंडाशींच समरस झालेले होते. आशिया खंडाच्या बाहेर त्याची नजरच नव्हती. अर्थात् चीन आणि हिंदुस्थान या दोन देशांच्यामध्यें फारच मोठा फरक आहे. त्याच्यामधील मनुष्यवंश, जीवन-विषयक भूमिका आणि संस्कृति यांमध्यें कांहीं सुद्धां साम्य नाहीं. चीन देश कोणत्याही काळीं धर्माचा गुलाम बनून गेलेला नाहीं; तसेच तेथें भिक्षुकशाहीचा अधिकार कधीं प्रस्थापित झालेला नाहीं; तर हिंदुस्थानला पहिल्यापासून मोठा अभिमान आपल्या धर्माचा आहे आणि हिंदुस्थानच्या समाजावर भिक्षुकशाहीचा फारच मोठा वरबसेपणा चालत आलेला आहे. लोकांच्या मानगुटीवर बसलेल्या या बागुलबोवाला हुसकावून लावण्याचा बुद्धानें केवढा मोठा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग न होतां, अजूनही तो या देशाची पकड सोडीत नाहीं. चीन आणि हिंदुस्थान यांमध्यें अजूनही आणखी किती तरी फरक आहे आणि असें असूनही हिंदुस्थान आणि पूर्व आशिया आणि पूर्व आशियाचा आग्नेयीकडील भाग यांच्यामध्यें एक प्रकारची ऐक्यभावना नांदत आलेली आहे. बुद्धाच्या कथेच्या सूत्रानें हे सगळे लोक एका ठिकाणीं गोवल्यासारखे झालेले आहेत आणि या सूत्रामुळें या लोकांच्या वाङ्मयांत, कलेत, संगीतांत आणि लोकगीतांतही एका समान ध्येयाची गुंफण केलेली आहे. यामुळें ही आश्चर्य-कारक ऐक्यभावना या देशांमध्यें उत्पन्न झालेली आहे.

पश्चिम आशियांतील संस्कृतीचा थोडासा धागा इस्लाम धर्मानें हिंदुस्थानमध्यें आणला. ही संस्कृति हिंदी संस्कृतीहून अगदींच निराळी होती. जीवनाबद्दल हा दृष्टिकोनही अगदींच वेगळा होता. परंतु पश्चिम आशियाचा हा दृष्टिकोन हिंदुस्थानांत परस्पर किंवा जसाच्या तसा येऊन पोंचला नव्हता. आरब लोकांनीं हिंदुस्थान देश जिंकला असता, तर हा दृष्टिकोन असा पूर्ण स्वाभाविक स्वरूपांत येथें आला असता. तो हिंदुस्थानांत आला, तो किती तरी पुढच्या काळामध्यें आला आणि ज्या मध्य

आशियांतील मानववंशांनीं तो इकडे आणला, ते तो इकडे आणण्याच्या खऱ्या पात्रतेचे लोक नव्हते ! तथापि इस्लामधर्मीयांच्यामुळें हिंदुस्थानचा पश्चिम आशियाशीं संबंध जुळून आला आणि अशा रीतीनें हिंदुस्थान ही या दोन महान् संस्कृतींची एक संयोगभूमि झाली. इस्लामधर्माचा प्रवेश चीनमध्येंही झाला. त्या ठिकाणीं त्या धर्माचा स्वीकारही पुष्कळ लोकांनीं केला; पण त्याला तेथें चीनच्या प्राचीन संस्कृतीला केव्हांच धक्का लावतां आला नाहीं. हिंदुस्थानांत मात्र येथील संस्कृतीला असा धक्का देण्याचा प्रयत्न या संस्कृतीनें चांगलाच केला. कारण फार काळपर्यंत येथील राज्य-कर्त्यांचा धर्म इस्लाम होता. त्यामुळें हिंदुस्थान देशांत या दोन संस्कृतींचा एकमेकांशीं सामना झाला. त्याबद्दल आणि या अवघड घटनेचा परिहार करण्यासाठीं म्हणून या दोन्ही संस्कृतींचा समन्वय करण्याचेही जे कित्येक प्रयत्न झाले, त्याच्याबद्दल मीं पूर्वी तुला लिहिलें आहे. या प्रयत्नांत यश येण्याचाही संभव दिसूं लागला होता. इतक्यात ब्रिटिशांनीं हा देश जिंकला. हें विघ्न या प्रयत्नाच्या मार्गांत उभें राहून तो प्रयत्न पुढें चालू राहणें अशक्य होऊन बसलें. प्राचीन काळीं या दोन्ही संस्कृतींना जो कांहीं अर्थ होता, तोही आज आतां शिल्लक उरलेला नाहीं. राष्ट्रवाद आणि औद्योगीकरण यांच्या योगानें जगाचें सगळें रूपच पालटून गेलेलें आहे आणि या प्राचीन संस्कृतींचा जेवढ्या प्रमाणांत जगाच्या बदललेल्या आर्थिक परिस्थितीशीं मेळ बसण्यासारखा असेल, तेवढ्याच प्रमाणांत त्या संस्कृती यापुढें जगूं शकतील. आज त्यांचें बाहेरचें पोकळ आवरण तेवढें शिल्लक राहिलेलें आहे. त्यांच्यांतील खरें सत्त्व, खरा अर्थ आज नाहींसा झालेला आहे. पश्चिम आशियामध्यें, इस्लाम धर्माच्या प्रत्यक्ष मायदेशांत केवढाले प्रचंड फेरबदल आज होऊन राहिलेले आहेत. चीनमध्यें आणि अतिपूर्वेमध्यें एकसारखी अखंड खळबळ माजून राहिलेली आहे ! हिंदुस्थानांत काय घडलें आहे, हें तर आपण प्रत्यक्षच पाहतों आहों.

अलीकडे या पश्चिम आशियासंबंधीं लिहिण्याचें सोडून दिल्याला मला इतके दिवस होऊन गेले आहेत, कीं चटकन् मला तो गोष्टीचा धागा नीटसा पकडतां येईनासा झाला आहे. अरबांचें तें बगदाद येथील साम्राज्य अखेरीस तुर्कांच्या—उस्मानी तुर्कांच्या नव्हे, तर सेल्जुक तुर्कांच्या मार्‍यापुढें घाईला कसें आलें आणि अखेरीस चेंगीजखानाच्या मंगोलियन लोकांनीं तें पार नष्ट कसें केलें, हें मीं सांगितल्याचें तुला आठवत असेल. याच मंगोलियन लोकांनीं इराणसह मध्य आशियामध्यें पसरलेलें ख्वाराजम अथवा खिवाचें, ख्वारिज पंथीयांचें साम्राज्यही नाहींसें करून टाकलें. त्यानंतर तैमूरलंगाचा कांहीं काळपर्यंत लष्करी विजय झाला. त्यानें पुष्कळशा कत्तली केल्या आणि एवढ्यावर त्याचा कारभार आटोपला. परंतु पश्चिम आशियांत त्याच्या आधीं जें एक साम्राज्य स्थापन झालेलें होतें तें मात्र, तैमूरलंगानें एकदां जरी त्याचा पराभव केला तरीही, वाढतच गेलें. हें उस्मानी तुर्कांचें साम्राज्य. या तुर्कांनीं इराणच्या पूर्वेकडील आशिया खंडाचा सर्व प्रदेश, ईजिप्त आणि युरपच्या आग्नेय कोपऱ्यांतील पुष्कळसा भाग,


१६ व्या व १७ व्या
शतकांतील
उस्मानी साम्राज्य
इराण
बगदाद
मेसापोटेमिया
आर्मिनिया
काळा समुद्र
अनातोलिया
सायप्रस
कैरो
ईजिप्त
क्रीट
स्मर्ना
ग्रीस
अल्बेनिया
रुमानिया
बल्गेरिया
सर्व्हिया
हंगेरी
बुडापेस्ट
वालाशिया
मोल्डाव्हिया
बेसारेबिया
क्रिमिया

एवढ्या भागांवर आपला अंमल बसविला होता. कित्येक पिढ्यांपर्यंत साऱ्या यूरपला या तुर्कांचा फार मोठा दरारा वाटत होता आणि मध्ययुगाच्या श्रद्धेच्या वातावरणांतून नुकत्याच बाहेर पडलेल्या धर्मभोळ्या आणि श्रद्धाळू यूरपियन लोकांना पापी लोकांचें पारिपत्य करण्यासाठीं परमेश्वरानेंच आपला हा कोरडा आपल्यावर उगारला आहे, असें वाटूं लागलें होतें.

उस्मानी तुर्कांच्या अमलाखालीं आल्यानंतर पश्चिम आशिया खंड इतिहासांतून जणुं उठल्यासारखें होतें; जगाच्या जीवनाच्या ओघापासून तुटून बाजूला पडलेलें एक सांचलेल्या पाण्याचें ठिकाण अशी त्याची अवस्था होऊन गेली! कित्येक शतकें, नव्हे, कित्येक हजारों वर्षेंपर्यंत हा प्रदेश म्हणजे यूरप आणि आशिया यांना सांधणारा मोठा राजमार्ग होता. असंख्य उंटांचे तांडे या प्रदेशातील शहरांवरून आणि निर्जन मैदानांतून माल घेऊन या खंडांतून त्या खंडांत जात असत; परंतु हे तुर्क लोक व्यापाराला फारसे उत्तेजन देणारे लोक नव्हते आणि त्यांनीं असें उत्तेजन दिलें असतें, तरी जगांत या सुमारास जी एक नवीनच गोष्ट घडून आली होती तिच्यापुढें त्यांचा कांहीं उपाय चालण्यासारखा नव्हता. ही गोष्ट म्हणजे यूरप आणि आशिया यांच्यामधील जलमार्गांची वाढ. आतां समुद्रावरूनच राजरस्ता प्रस्थापित झाला. आणि निर्जन मैदानांतील उंटाची जागा समुद्रावरील जहाजानें पटकावली. या वाहतुकीच्या साधनांतील फरकामुळें जगापासून हा प्रदेश तुटून आतां वेगळा झाला. पुढें एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला सुएजचा कालवा उघडण्यांत आला. तेव्हांपासून तर जलमार्गाचें महत्त्व फारच वाढलें. पूर्व आणि पश्चिम यांना जोडणारा अत्यंत मोठा असा राजमार्गच हा कालवा बनून गेला आणि त्याच्यामुळें पूर्व आणि पश्चिम यांच्यामधील अंतर फारच कमी झालें.

त्यानंतर विसाव्या शतकांत आणखी एक फेरबदल खास आपल्या डोळ्यांसमोर घडून येत आहे आणि प्राचीन काळापासून चालत आलेल्या जमीन आणि पाणी यांच्यामधील चुरशीमध्यें पृथ्वीवरील वाहतुकीचा राजमार्ग, हमरस्ता, या नात्यानें जमिनीचा विजय होत असून–पाणी–समुद्र मागें पडत आहे. मोटारगाडीनें हा मोठा फेरबदल घडवून आणला असून त्यांत विमानानें आणखी भर टाकलेली आहे. प्राचीन काळचे वाहतुकीचे जे मार्ग आतांपर्यंत सांदीकोपऱ्यांत पडल्यासारखे झाले होते–निर्मनुष्य झाले होते, त्यांवर आतां रहदारीची गर्दी सुरू होत आहे; परंतु पूर्वीप्रमाणें मुक्काम दरमुक्काम करीत जाणाऱ्या उंटांची ही रहदारी नसून, आतां तेथें मोटारगाड्या खालीं जमिनीवर वेगानें धांवत आहेत आणि वरून आभाळांतून विमानें घरघर करीत उड्डाण करीत आहेत.

उस्मानी तुर्कांच्या साम्राज्यांत तीन खंडांचा संगम झालेला होता; आशिया, आफ्रिका आणि यूरप यांचा. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वींच किती तरी काळ हें साम्राज्य दुर्बळ होत आलेलें होतें आणि एकोणिसाव्या शतकामध्यें तें पारच मोडूनतोडून

गेलें. पूर्वी त्याला परमेश्वराचा कोरडा ( शाप ) म्हणत, तर आतां त्यालाच " यूरपचा दुखणाईत माणूस " असें म्हणूं लागले. १९१४ ते १८ च्या महायुद्धांत हें साम्राज्य अजीबातच नाहींसें झालें; परतु त्याच्या राखेंतून एक नवीनच स्वावलंबी, समर्थ, पुरोगामी असा तुर्कस्तान देश निर्माण झाला. आणि दुसरींही कांहीं नवीन राष्ट्रें अस्तित्वांत आलीं.

मीं मागें म्हटलें, कीं हा पश्चिम आशियाचा भाग आशिया खंडाची यूरपच्या बाजूची खिडकी आहे. आशिया, यूरप आणि आफ्रिका या तीन खंडांना वेगळें करणारा, आणि त्यांना जोडणाराही पण, असा जो भूमध्य समुद्र तोच या प्रांताची सरहद्द आहे. तीन खंडांना जोडणारा हा भूमध्य समुद्राचा दुवा एका काळीं फारच प्रबल असा होता आणि त्याच्या कांठावर असणाऱ्या राष्ट्रांमध्ये पुष्कळच सारखेपणा होता. यूरपीय संस्कृतीचा प्रारंभ भूमध्य समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांतच झाला. या तिन्ही खंडांना लागून असणाऱ्या या समुद्राच्या कांठावर सगळीकडे प्राचीन ग्रीसच्या म्हणजेच हेलासच्या वसाहती जिकडे तिकडे ठिपक्यासारख्या विखुरलेल्या होत्या ; रोमचें साम्राज्यही या समुद्राच्याच सभोंवतीं होतें. खिस्ती धर्माला त्याच्या प्राथमिक अवस्थेत आश्रयस्थान या समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांतच मिळालें होतें. आरबी लोकांनीं आपली संस्कृति या समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावरून सिसिली बेटांत नेली आणि सगळा आफ्रिकेचा किनारा ओलांडून त्यांनीं ती पश्चिमेस थेट स्पेनमध्यें नेली आणि त्या ठिकाणीं तिचा अंमल ७०० वर्षेंपर्यंत चालू राहिला.

तेव्हां भूमध्य समुद्राला लागून असलेल्या आशिया खंडांतील देशांचा दक्षिण यूरप खंड आणि उत्तर आफ्रिका यांच्याशीं किती निकट संबंध आहे, हें यावरून आपल्याला दिसून येतें. अशा रीतीनें पूर्वीच्या काळीं आशिया खंड आणि हीं दोन खंडें यांच्यामधील दुवा हा स्वाभाविकपणेंच पूर्व आशियाचा भाग होता हें आपल्या ध्यानांत येतें ; परंतु आपण पाहूंच गेलों तर असे हे निरनिराळे भाग जोडणारे, एकत्र आणणारे दुवे आपणांस जगभर सगळीकडे दिसून येतील. आपल्या ठिकाणच्या कोत्या राष्ट्रीय प्रवृत्तीमुळें जगांतले देश आपल्याला वेगवेगळे असे भासतात आणि जग खरोखर एक आहे, या जगामधल्या वेगवेगळ्या देशांचे सर्वसामान्य असेच खरेखुरे हितसंबंध आहेत, याकडे आपली डोळेझांक होते.

# १२३
# सिंहावलोकन

१९ जानेवारी, १९३३

अलीकडे दोन पुस्तकें मीं वाचलीं. तीं मला फारच आवडलीं. हीं पुस्तकें तुझ्या-बरोबर बसून वाचायला मिळतीं तर किती मजा आली असती. हीं दोन्ही पुस्तकें रेनी ग्रूझे नांवाच्या एका फ्रेंच गृहस्थानें लिहिलेलीं असून तो पॅरिस येथील म्यूझे गाइमे या संग्रहालयाचा संचालक किंवा संरक्षक आहे. हिंदी आणि विशेषतः बुद्धधर्मीय कलाकौशल्याच्या वस्तूंच्या या संग्रहालयांत तूं जाऊन आलेली आहेस का कधीं? मला कांहीं तुला तेथें घेऊन गेल्याचें आठवत नाहीं. ग्रूझे यांनीं चार ग्रंथांत मिळून पौर्वात्य, म्हणजेच आशिया खंडांतील संस्कृतींची एक प्रकारची पाहणी केलेली आहे. या एकेका ग्रंथांत हिंदुस्थान, मध्यपूर्व ( म्हणजेच पश्चिम आशिया आणि इराण ), चीन आणि जपान अशा चार प्रदेशांचा स्वतंत्रपणें विचार केलेला आहे. त्यांचा आवडीचा विषय कला हा असल्यानें, त्यांनीं आपल्या विषयाचें विवेचन त्या त्या देशांत भिन्न भिन्न कलाविषयक कार्यप्रवृत्ति कशा कशा प्रकारची बनत चालली हें लक्षांत घेऊन केलेलें आहे आणि आपल्या ग्रंथामध्यें पुष्कळशीं सुंदर चित्रें त्यांनीं दिलेलीं आहेत. युद्धें, लढाया, राजे लोकांचीं कारस्थानें यांच्यामधून इतिहासाचें अवलोकन करण्यापेक्षां या तऱ्हेनें इतिहासाचा अभ्यास करणें ही मोठी मनोरंजक गोष्ट वाटते.

आतांपर्यंत ग्रूझे यांचे दोनच ग्रंथ माझ्या वाचण्यांत आले आहेत. ते म्हणजे हिंदुस्थान आणि मध्य आशिया यांच्याबद्दलचे. ते दोन्ही ग्रंथ वाचून मला फार फार आनंद वाटला. सुंदर इमारती, भव्य पुतळे, अलौकिक कोरकाम आणि चित्रकला यांचीं या ग्रंथांत दिलेलीं चित्रें पाहून, मी डेहराडूनच्या तुरुंगांत नसून तिकडे त्या दूरच्या प्रदेशांत आणि प्राचीन काळांतच वावरतों आहें, अशी माझी वृत्ति होऊन गेली.

वायव्य हिंदुस्थानांतील सिंधु नदीच्या खोऱ्यांतील मोहेंजोदारो व हरप्पा येथें सांपडलेल्या या देशांत पांच हजार वर्षांपूर्वी भरभराटींत असलेल्या प्राचीन संस्कृतीच्या अवशेषांबद्दल पुष्कळ दिवसांपूर्वी मीं तुला लिहिलें आहे. या अत्यंत प्राचीन काळीं, मोहेंजोदारोमध्यें जेव्हां या जुन्या संस्कृतींतील माणसें प्रत्यक्ष नांदत होतीं, आपले नित्यक्रम आचरीत होतीं, कामधाम करीत होतीं, खेळ आणि क्रीडा यांत रममाण होत होतीं त्या वेळीं, मोहेंजोदारोप्रमाणेंच आणखीही पुष्कळ ठिकाणीं सुधारणा व संस्कृति यांची केंद्रें होतीं. आज त्यासंबंधींची आपली माहिती अगदींच कोती आहे. आशिया खंडांत आणि ईजिप्तमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं जे कांहीं जुने मोडतोड झालेले अवशेष सांपडले आहेत, तेवढ्यापुरतीच प्रत्यक्ष अशी कांहीं माहिती आज आपल्याला

आहे. असेंच आणखी खूप उत्खनन जर केलें आणि तेंही एखाद्या दुसऱ्या ठिकाणीं नव्हे, तर जागोजाग केलें, तर आपल्याला असे आणखी किती तरी अवशेष सांपडण्याचा संभव आहे. परंतु जेवढे अवशेष सांपडले आहेत तेवढ्यांवरूनसुद्धां, प्राचीन काळीं पुढील ठिकाणीं फार उच्च दर्जाला पोंचलेली सुधारणा नांदत होती असें आपल्याला आढळून येतें. ईजिप्तमध्यें नाईल नदीच्या खोऱ्यांत, खाल्डियामध्यें म्हणजे हल्लीं ज्याला मेसॉपोटेमिया म्हणतात तेथें ( या ठिकाणीं इस्लामचें राज्य असून मुसा येथें त्याची राजधानी होती ), पूर्व इराणमध्यें पर्सिपॉलिस येथें, मध्य आशिया खंडांत तुर्कस्तानमध्यें आणि चीनमध्यें होआंगहो म्हणजे पीत नदीच्या आसपास.

हा काळ म्हणजे घडीव दगडांचे पदार्थ टाकून देऊन मनुष्य तांब्याच्या वस्तु वापरूं लागला होता, तो काळ होय. ईजिप्तपासून चीनपर्यंत पसरलेला या सगळ्या विशाल प्रदेशांत सुधारणेची वाढ सामान्यतः एकाच पातळींत झालेली आढळून येते. किंबहुना, आशिया खंडांत या टोकापासून त्या टोकापर्यंत अगदीं एकच सुधारणा नांदत असावी अशाबद्दलचे सुद्धां कांहीं पुरावे सांपडतात हें पाहून मोठें नवल वाटतें. त्यावरून एवढें खास कीं हीं निरनिराळीं केंद्रें एकमेकांपासून विलग नव्हतीं ; तर त्यांचे एकमेकांशीं संबंध होते. या ठिकाणीं शेतीचा उदय झालेला होता. पाळीव जनावरें ठेवण्याची पद्धति होती आणि थोडाफार व्यापारधंदाही होता. लिहिण्याची कलाही सुरू झालेली होती ; पण त्या वेळची ही चित्रलिपि अजून कोणाला वाचतां आलेली नाहीं. एकमेकांपासून किती तरी दूर दूर असलेल्या प्रदेशांमध्यें हत्यारें-अवजारें अगदीं एकाच प्रकारचीं असलेलीं आढळतात आणि त्या त्या ठिकाणच्या कलाकौशल्याच्या वस्तूंमध्येंही विशेष लक्षांत भरण्यासारखें साम्य आढळतें. मातीकाम, हरतऱ्हेचें सुंदर नक्षीकाम आणि चित्रें, रंगविलेलीं सुंदर सुंदर भांडीं, या सर्व गोष्टी त्या सर्व ठिकाणीं विशेष नजरेंत भरतात. हें मातीकाम या काळच्या या अवशेषांत इतकें विपुल आढळतें कीं या काळाला ‘ रंगीत नक्षीदार मातीकामाच्या सुधारणेचा काळ ’ असें नांव देण्यांत आलें आहे. सोन्या-चांदीचे दागदागिनेही त्या काळीं होते असें दिसतें. त्याचप्रमाणें ॲलाबॅस्टर म्हणजे एका जातीच्या चुनखडी-सारख्या पांढऱ्या दगडाची आणि संगमरवरी दगडाचीं भांडींही त्या वेळीं आढळतात. विशेष म्हणजे सुताचें विणलेलें कापडही या काळीं आढळून येतें. ईजिप्तपासून तों सिंधु नदीपर्यंत आणि थेट चीनपर्यंत ठिकठिकाणीं नांदणाऱ्या या प्रत्येक सुधारणेमध्यें स्वतःचें इतरांपासून निराळेपणा दाखविणारें कांहीं तरी वैशिष्ट्य होतेंच ; त्यांत स्वतंत्रपणें त्या त्या ठिकाणचें कसब प्रत्ययाला येई ; तथापि त्या सर्वांच्यामध्यें एका सर्वसामान्य आणि सर्वांशीं संबद्ध अशा सुधारणेचेंही एक सूत्र गुंफलेलें आढळून येतें.

हा काळ सामान्यतः पांच हजार वर्षांपूर्वींचा ; परंतु हें उघडच आहे, कीं या सर्व सुधारणा कांहीं त्या त्या ठिकाणीं कोठून आभाळांतून पडल्या नाहींत आयत्या तयार होऊन. इतर आजुबाजूची परिस्थिति हळूहळू जसजशी बदलत गेली, तसतसा

हळूहळू क्रमानेंच त्यांचाही विकास झाला असला पाहिजे आणि या अवशेषांत त्यांचें जें स्वरूप आढळतें, तितक्या अवस्थेला पोंचायला त्यांना आधीं कितीक हजार वर्षे जावीं लागलीं असतील. नाईल नदीच्या खोऱ्यांतील आणि खाल्डियांतील सुधारणेचा धागा, आहेत त्या अवशेषांवरून आणखी निदान दोन हजार वर्षे तरी मागें नेतां येतो; आणि बहुधा बाकीच्या केंद्रांतील सुधारणाही इतक्या प्राचीन असल्या पाहिजेत.

प्राचीन ताम्रयुगाच्या सुरुवातीला, ख्रिस्ती शकाच्या पूर्वी सुमारें ३००० वर्षांच्या वेळीं मोहेंजोदारो येथें सुधारणा चांगली नांदत होती. त्या काळीं जी एक अशा प्रकारची, मोठ्या विशाल प्रदेशांवर पसरलेली, सर्वसामान्य अशी एक सुधारणा होती, तिच्यांतूनच पौर्वात्य सुधारणेचे चार मोठमोठे ओघ वेगळे वेगळे निघाले आणि पुढें ते दूर दूर वाहत जाऊन स्वतंत्रपणें मोठे झाले. हे चार ओघ म्हणजे ईजिप्त, मेसापोटेमिया, हिंदुस्थान आणि चीन यांमधील चार वेगवेगळ्या सुधारणांचे ओघ होत. याच काळांत ईजिप्तमध्यें ते महान् पिरॅमिड बांधले गेले. आणि गिझे येथील महान् स्फिन्क्सचा पुतळा उभारण्यांत आला. यानंतर बऱ्याच काळानें ईजिप्तमध्यें थीबीज किंवा थीब्ज येथील राजघराण्याचा काळ ( ईजिप्तमधील अकरावें राजघराणें ) उदित झाला. हा काळ म्हणजे सुमारें ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांचा काळ होता. त्याही वेळीं मोठे अलौकिक पुतळे आणि नक्षीकाम ईजिप्तमध्यें होऊन गेलें. कलेच्या पुनरुज्जीवनाचा मोठाच उत्कर्षाचा काळ होता हा ईजिप्तमध्यें. लुक्सोर येथील तें प्रचंड देवालयही याच सुमारास बांधलें गेलें. आजकाल तुतानखामेनचें नांव मात्र ज्याच्या त्याच्या तोंडीं झालेलें आहे; पण त्याच्याबद्दल खरोखर माहिती असेल क्वचितच कोणाला. असा हा तुतानखामेन थीबन लोकांच्या साम्राज्यांतील एक फॅरोहा म्हणजे बादशहा होता.

खाल्डियामध्यें दोन ठिकाणीं बलिष्ठ आणि सुसंघटित अशीं राज्यें उदयाला आलीं होतीं; एक सुमेर येथें आणि दुसरें अक्कड येथें. खाल्डियन लोकांच्या ऊर या सुप्रसिद्ध शहरांत मोहेंजोदारो येथील संस्कृतीच्या नांदत्या काळाइतक्या प्राचीन काळींसुद्धां कलाकौशल्याचे अत्युकृष्ट नमुने बाहेर पडूं लागले होते. ऊर शहराचें महत्त्व खाल्डियामध्यें सुमारें ७०० वर्षेपर्यंत गाजलें. त्यानंतर त्याचा पाडाव झाला. या सुमारास सेमेटिक वंशाचे ( म्हणजे ज्यू किंवा आरबांच्या जातीचे ) बॅबिलोनियन लोक हे सीरियांतून खाल्डियांत आले, आणि त्यांनीं आपलें राज्य तेथें स्थापन केलें. त्यांचें बॅबिलॉन हें शहर आतां त्यांच्या नव्या साम्राज्याचें केंद्रस्थान बनलें. बायबलमध्यें या शहराचा वारंवार उल्लेख येतो. या काळामध्यें वाङ्मयाला मोठी भरती आली आणि महाकाव्यें लिहिण्यांत येऊं लागलीं आणि त्यांचें जागोजाग गायन होऊं लागलें. जगाची सुरुवात कशी झाली आणि एक प्रचंड जलप्रलय कसा झाला, वगैरे संबंधींचीं वर्णनें करणाऱ्या ज्या कथा या महाकाव्यामध्यें गायिल्या जात होत्या, त्याभोंवतींच बायबलमधल्या पहिल्या पहिल्या प्रकरणांची गुंफण करण्यांत आलेली आहे.

पुढें बॅबिलॉनचाही पाडाव झाला. त्यापुढें शेंकडों वर्षांनंतर ख्रिस्ती शकापूर्वी

सुमारें एक हजार वर्षे आणि त्यानंतरचा काळ असीरियन लोक रंगभूमीवर अवतीर्ण झालेले आढळतात. त्यांनींही एक साम्राज्य स्थापलें आणि निनेव्हे येथें आपली राजधानी केली. हे मोठे लोकविलक्षण लोक होते. ते कमालीचे पशुवृत्तीचे आणि क्रूर होते. त्यांची सगळी राज्यपद्धति हिंसेवर आणि मारझोडीवर आधारलेली होती. कत्तली आणि नासधूस यांच्या जोरावर त्यांनीं सगळ्या मध्य पूर्वेत आपलें साम्राज्य स्थापन केलें. हे त्या काळचे साम्राज्यवादी लोक होत. तरी पण कांहीं काहीं बाबतींत हे लोक मोठे विशेष सुधारलेले होते. निनेव्हे येथें त्यांनीं एक प्रचंड ग्रंथसंग्रहालय निर्माण केलें होतें. त्यांत तत्कालीन प्रचलित अशा सर्व ज्ञानाचा संग्रह करण्यांत आला होता. त्या वेळचें हें ग्रंथसंग्रहालय आजच्यासारखें कागदी नव्हतें हें कांहीं मीं तुला सांगायला नको. आतां. आजच्यासारखीं पुस्तकेंही त्या वेळीं नव्हतीं. त्या काळचे ग्रंथ दगडांवर, शिलांवर कोरून लिहिलेले होते. निनेव्हेच्या त्या प्रचंड ग्रंथालयांतील अशा हजारों शिला आज लंडनमध्यें ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. त्यांपैकीं कांहींवरील मजकूर वाचून अंगावर शहारे येतात. आपल्या शत्रूंना आपण कसें क्रूरपणें वागविलें, याचें राजानें त्यांत तपशीलवार वर्णन केलेलें असून त्यामुळें आपल्याला फार सुख होत आहे, असें त्यानें म्हटलें आहे.

आर्य लोक हिंदुस्थानांत मोहेंजोदारोच्या सुधारणेच्या काळानंतर आले. त्यांच्या प्रारंभींच्या काळचे कसलेही अवशेष किंवा पुतळे वगैरे अजूनपर्यंत आढळलेले नाहींत; परंतु या लोकांचें अत्युत्कृष्ट स्मारक म्हणजे त्यांचे वेद आणि इतर प्राचीन ग्रंथ होत. हिंदुस्थानच्या मैदानांत उतरलेल्या या आनंदी आणि सुखी वीरांच्या अंतरंगाची या ग्रंथांवरून आपल्याला चांगलीच ओळख पटते. या ग्रंथांमध्यें मोठें प्रभावी निसर्गकाव्य ओतप्रोत भरलेलें आहे. 'त्यांचे सगळे देव जे वर्णिलेले आहेत, ते म्हणजे निसर्गांतील वेगवेगळ्या शक्तीच आहेत. कलेचा जसजसा माणसाच्या ठिकाणीं विकास होऊं लागला, तसतसा त्याच्या कलाविलासांत या निसर्गप्रेमाच्या पुष्कळसा प्रभाव पडावा हें स्वाभाविकच आहे. आर्यांचे अगदीं जुने असे जे कांहीं अवशेष आतांपर्यंत सांपडले आहेत, त्यांत सांची शहराच्या वेशींचा समावेश होतो. बुद्ध धर्माच्या प्रारंभींच्या काळापासूनच्या या वेशी आहेत. त्यांच्यावर जीं फुलें, पानें आणि निरनिराळ्या प्राण्यांच्या आकृती सुंदर रीतीनें कोरलेल्या आहेत, त्यावरून हीं चित्रें काढणारांच्या ठिकाणीं निसर्गप्रीति कोणत्या प्रकारची होती आणि निसर्गाच्या अंतर्बाह्य स्वरूपाचें ज्ञान त्यांना किती चांगलें झालेलें होतें, याचा प्रत्यय येतो.

यानंतर इकडच्या संस्कृतीवर वायव्येकडून ग्रीक लोकांची छाप येऊन पडली. कारण अलेक्झांडरच्या स्वारीनंतर हेलेनिकांचीं म्हणजे ग्रीकांचीं साम्राज्यें थेट हिंदुस्थानच्या सरहद्दीला येऊन भिडलीं होतीं. आणि त्यानंतर हिंदुस्थानच्या सरहद्दीवर जें कुशानांचें साम्राज्य स्थापन झालें त्याच्यावरही हेलेनिक सुधारणेची छाप होती, या गोष्टी तुझ्या लक्षांत असतीलच. यापूर्वीच हिंदुस्थानांत बुद्धानें आपलें कार्य सुरू केलें होतें. बुद्ध हा

मूर्तिपूजेचा विरोधक होता. तो आपल्याला स्वतःला परमेश्वर म्हणवीत नसे किंवा आपली पूजाही कोणाकडून करवीत नसे. भिक्षुकशाहीमुळें ज्या दुष्ट रूढी निर्माण झालेल्या होत्या, समाजांत जी घाण सांचली होती, ती सर्व नाहींशी करण्यासाठीं त्याची धडपड चालू होती. दलितांचा आणि दुःखी लोकांचा उद्धार करण्यासाठीं झटणारा तो एक समाजसुधारक होता. बनारस जवळच इसिपट्टन ऊर्फ सारनाथ येथें त्यानें जें अगदीं पहिलें प्रवचन केलें त्यांत तो म्हणाला, " जे अज्ञानी आहेत त्यांना ज्ञान देऊन त्यांचें समाधान करण्यासाठीं मी आलों आहें. पूर्णावस्थेला गेलेला माणूस जर आपलें जीवन प्राणिमात्राच्या उपयोगार्थ खर्च करणार नाहीं, आणि समाजांतून जे पतित झालेले आहेत त्यांना जर तो समाधान प्राप्त करून देणार नाहीं, तर त्याची पूर्णावस्था असून-नसून सारखीच. माझें तत्त्व, माझा उपदेश हा दयेचा, करुणेचा उपदेश आहे. म्हणूनच जे सुखी आहेत त्यांना माझा उपदेश कठिण वाटतो. मोक्षाचा मार्ग हा सर्वांनाच खुला आहे. जो ब्राह्मण चांडाळाला मुक्तीच्या मार्गावर प्रतिबंध करतो, त्याला मुक्तीचा मार्ग मोकळा नाहीं असें ठरवितो, तो ब्राह्मण तरी स्त्रीच्या योनींतूनच जन्माला आलेला आहे ना? हत्ती ज्याप्रमाणें बांबूंची झोपडी पार उधळून लावतो, त्याप्रमाणें तुम्ही आपले विकार अजिबात मारून टाका...पापाच्या दुःखाच्या विरुद्ध मार्ग फक्त एकच आहे. तो म्हणजे बुद्धिपूर्वक सत्याचा आश्रय करणें हा." बुद्धानें अशा रीतीनें सदाचरणाचा आणि जीवनमार्गाचा उपदेश केला, आपल्या शिष्यवर्गाला ही शिकवण दिली; परंतु गुरूच्या उपदेशाचें खरें रहस्य न समजलेल्या मूर्ख शिष्यांच्या सनातन पद्धतीप्रमाणें बुद्धाचे पुष्कळसे शिष्य त्यानें घालून दिलेले बाह्य आचाराचे नियम मात्र पाळीत राहिले. परंतु त्यांच्या पाठीमागील खरें तत्त्व त्यांना केव्हांच समजलें नाहीं. त्याचा तत्त्वोपदेश आचरणांत आणण्याऐवजीं ते बुद्धाचें नुसतें भजनपूजनच करूं लागले. तरी पण एवढें बरें कीं बुद्धाचे पुतळे त्यांनीं उभारले नाहींत किंवा त्याच्या मूर्ती कोठें स्थापन केल्या नाहींत.

त्यानंतर मग ग्रीस आणि इतरही हेलनिक सुधारणेची छाप असणारे देश यांच्यातील विचारपरंपरांचा प्रवेश या देशांत झाला. ग्रीस वगैरे देशांमध्यें देवतांच्या सुंदर मूर्ती—पुतळे—घडविण्याची आणि त्यांचें भजनपूजन करण्याची पद्धति अस्तित्वांत होती. हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर, गांधार देशांत या हेलनिक संस्कृतीची छाप सगळ्यांत अधिक होती. त्या ठिकाणीं बुद्धाचा बाल्यावस्थेंतील पुतळा—मूर्ति—प्रथम घडविण्यात आला. हेलनिक लोकांचा स्वतःचा देव जो मदन तोही असाच ते बालस्वरूपांत दाखवीत असत. पुढच्या काळांत खिस्ताची प्रतिमाही "सॅक्रो बॅंबिनो" "बालदेव" म्हणून ज्याला इटालियन लोक म्हणत असत, अशा पवित्र बालकाचीच करण्यांत आली. त्याचप्रमाणें बालबुद्धाची प्रतिमा इकडे सुरू झाली. अशा रीतीनें बुद्धधर्मामध्यें मूर्तिपूजेचा, प्रतिमापूजनाचा प्रवेश झाला आणि तो पुढें इतका वाढला, कीं बुद्धाचे पुतळे मग प्रत्येक बुद्धमंदिरामध्यें आढळून येऊं लागले.

हिंदी कलाकौशल्यावर इराणी संस्कृतीचीही छाया पडलेली आहे. बुद्धाच्या कथा

आणि हिंदूंचीं भलीं मोठीं पुराणें यांच्यामध्यें हिंदी कलावंतांना विषयांना कांहींच तुटवडा पडण्यासारखा नव्हता. आंध्र देशांत, अमरावती येथें, मुंबईजवळ घारापुरीच्या लेण्यांमध्यें, अजंठा येथें आणि वेरूळ येथें आणि इतरही पुष्कळ ठिकाणीं या पुराण-कथा आणि प्राचीन दंतकथा, तुला दगड आणि रंग यांच्या साहाय्यानें चित्रित केलेल्या आढळतील. हीं सर्व ठिकाणें खरोखरच अलौकिक प्रेक्षणीय आहेत आणि शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक मुलामुलीला यांतलीं कांहीं ना कांहीं स्थळें पाह्यला मिळतील, तर किती सुंदर होईल असें मला नेहमीं वाटतें.

या हिंदी दंतकथा किंवा लोककथा समुद्र ओलांडून पलीकडे बृहद् भारतांतही जाऊन पोंहोचल्या होत्या. जावा बेटांत बोरो बुदोर येथें अलौकिक अशा दगडी कोर-कामांत बुद्धाची सर्वच्या सर्व कथा चित्रित करण्यांत आली आहे. अंकोरवाट येथें जे अवशेष आहेत तेथें अद्यापिही कांहीं सुंदर मूर्ती आहेत. त्यावरून पूर्व आशियामध्यें शानदार ( वैभवशाली ) अंकोर म्हणून प्रसिद्ध असलेल्या अंकोरचें ८०० वर्षांपूर्वीचें स्वरूप आपल्या दृष्टीसमोर उभें राहतें. या मूर्तींचे चेहरे मोठे सौजन्ययुक्त आणि तेजस्वी चैतन्यानें मुसमुसणारे आहेत. त्यांच्या ओठांवर असें एक विलक्षण मोहक आणि तरल स्मित विलसतें आहे, कीं त्या स्मिताला खास "अंकोरचें स्मित" असें नांव कलाक्षेत्रांत प्राप्त झालेलें आहे. या मूर्तींमध्यें भिन्न भिन्न मानववंशांचे चेहरे आढळतात. तरी त्या सर्वांच्या ठिकाणीं हें स्मित आढळून येतें आणि तरीही प्रत्येक ठिकाणीं त्याच्यांमध्यें कांहीं नवें सौंदर्य प्रत्ययाला येऊन तें स्मित कंटाळवाणें केव्हांच होत नाहीं.

कोणत्याही काळच्या सुधारणेचें किंवा जीवनाचें खरेंखुरें, बिनफसवें प्रतिबिंब कोठें पाह्यला मिळत असेल तर तें कलेमध्यें. कला ही त्यांच्यापुढें धरलेला जणुं आरसाच आहे. भारतीय संस्कृति जेव्हां आपल्या भरामध्यें होती तेव्हां त्या संस्कृतीमध्यें किती एक सुंदर सुंदर गोष्टी निर्माण झाल्या आणि कलेची एवढी भरभराट झाली, कीं तिचें स्तुतिस्तोत्र दूरदूरच्या देशांपर्यंत जाऊन थडकलें. परंतु तुला आतां माहीत झालें आहे, कीं कालांतरानें या संस्कृतीमध्यें ऱ्हास होण्याला सुरुवात झाली. ओघ बंद होऊन पाणी गढूळ होण्याला सुरुवात झाली आणि पुढें सगळ्या देशाचाच डोलारा जेव्हां ढांसळला, तेव्हां त्याच्याच बरोबर कलांची इमारतही खालीं आली. कलांमधील जिवंतपणा आणि जोमदारपणा, नवीन कांहीं तरी निर्माण अगर व्यक्त करण्याचें सामर्थ्य नष्ट झालें. मग त्यांत नुसताच कांतीवकोरीवपणा वाढत चालला आणि कांहीं वेळीं तर या कांतीवकोरीवपणाचा, नक्षीचा किंवा अलंकाराचा अतिरेक होऊन सौंदर्यापेक्षां बोजडपणा मात्र त्यांत दिसून येऊं लागला. यानंतर मुसलमान आले तेव्हां हिंदी कलापरंपरेला आणखी एक धक्का बसला. तिच्यावर आणखी कांहीं नवीनच परंपरांची छाप पडली आणि हिंदी कलाप्रांतांत नुसतेंच अलंकारिकतेचें आणि कांतीव-कोरीवपणाचें जें खूळ माजलेलें होतें आणि ज्यामुळें हिंदी कलेला एक प्रकारचा हीन-पणा आलेला होता, तें खूळ हिंदी कलाक्षेत्रांतून त्यामुळें नाहींसें झालें. प्राचीन हिंदी

आदर्शाची भूमिका कांहीं सुटली नाहीं ; ती कायमच राहिली. परंतु तेंच प्राचीन आदर्श-मय सौंदर्य आतां अरबस्तानांतून आणि इराणमधून आलेल्या साध्या आणि मोहक पेहरावांत व्यक्त होऊं लागलें. पूर्वीच्या काळीं हजारों हिंदी कारागीर, शिल्पकार वगैरे हिंदुस्थानांतून मध्य आशियांत जात असत. आतां कारागीर आणि चित्रकार पश्चिम आशियामधून हिंदुस्थानांत येऊं लागले. या काळच्या सुमारास मध्य आशिया आणि इराण या प्रदेशांत कलांचें पुनरुज्जीवन होऊन त्यांना मोठा बहर आलेला होता. कॉन्स्टान्टि-नोपलमध्यें याच कालांत महान् शिल्पी व कारागीर भव्य प्रासाद उभे करीत होते. इटली-मध्येंही याच सुमारास ज्ञान व कला यांच्या पुनरुज्जीवनाला प्रारंभ झालेला होता आणि श्रेष्ठ कलावंतांचा एक समुदायच्या समुदाय त्या ठिकाणीं सुंदर मूर्ती घडवीत होता आणि चित्रें रंगवीत होता.

तुर्कस्थानांत त्या काळीं सिनान हा प्रख्यात शिल्पी व कारागीर होऊन गेला. बाबरनें त्याचा मुलगा युसूफ याला आपल्याकडे बोलावून घेतलें होतें. इराणमध्यें बिहजाद नांवाचा एक महान् चित्रकार होऊन गेला. अकबरानें याचे कित्येक शिष्य आपल्याकडे बोलावून घेऊन त्यांना दरबारचे चित्रकार म्हणून आपल्या पदरीं ठेवलें होतें. अशा रीतीनें इमारतींचें बांधकाम आणि चित्रकला, दोन्हींमध्यें इराणची छाप चांगलीच बसून गेली. मोगलांच्या अमदानींत हिंदुस्थानांत या संयुक्त हिंदु-मुसलमानी कलाकौशल्यानें युक्त अशा ज्या कांहीं मोठ्या इमारतींचें बांधकाम झालें, त्याबद्दल मागच्या पत्रांत मीं तुला एकदां लिहिलेलें आहे. त्यांपैकीं पुष्कळशा इमारती तूं पाहिलेल्याही आहेस. हिंदी-इराणी कलाकौशल्यांच्या संगमाचें या देशांमधील सर्वोत्कृष्ठ उदाहरण म्हणजे ताजमहाल होय. हा ताजमहाल तयार करण्यासाठीं किती तरी श्रेष्ठ कलावंतांचे श्रम खर्ची पडलेले आहेत. असें म्हणतात, कीं या बांधकामाच्या वेळचा प्रमुख शिल्पी उस्ताद ईसा या नांवाचा कोणी एक तुर्की किंवा इराणी गृहस्थ होता* आणि त्याला कित्येक हिंदी शिल्पी मदतनीस म्हणून होते. आंतील नकासकामावर कांहीं यूरपमधील कलावंत, विशेषतः एक इटालियन कलावंत होता असें म्हणतात. असे निर-निराळ्या देशांचे, निरनिराळ्या परंपरांचे कारागीर, कलावंत, शिल्पी या ठिकाणीं काम करीत असून त्यांच्या सौंदर्यसाधनांत कसलाही विसंवादीपणा किंवा परस्पर-विरोधी भाव आढळून येत नाहीं. या एकूण एक कलाप्रवृत्तींचा या इमारतींत कांहीं अपूर्व तऱ्हेनें संगम होऊन त्यांची अनिर्वचनीय अशी एकजीवता साधलेली आहे. ताजमहाल घडविण्यांत पुष्कळांचा जरी हात असला, तरी त्यामध्यें प्रामुख्यानें ज्या दोन कलाप्रवृत्तींचा आविष्कार झालेला आहे, त्या म्हणजे इराणी आणि हिंदी कला-प्रवृत्ती होत. त्याला उद्देशून ग्रूझे यांनीं म्हटलें आहे कीं, "येथें हिंदी शरीरामध्यें इराणचा आत्माच मूर्तिमंत अवतीर्ण झालेला आहे."

---

* परंतु इलस्ट्रेटेड वीकलीचे मार्च १९४३ मधील ता. २० व २७ चे अंक पहा. त्यांमध्यें याबद्दलच्या हकिकतीचें उर्दू हस्तलिखितांतील वर्णन आहे

## १२४

# इराणची प्राचीन चिवट संस्कृति

२० जानेवारी, १९३३.

ज्या इराण देशाचा आत्मा हिंदुस्थानात आला आणि येथें वस्ती करून राहिला व ताजमहालासारखें सुंदर शरीर त्याला उपलब्ध झालें, असें म्हटलें जातें, त्या इराण देशांत आतां आपण जाऊं या. इराणी कलेची परंपरा विशेष नजरेंत भरण्यासारखी आहे. ही परंपरा चिवटपणानें दोन हजार वर्षे टिकून राहिलेली आहे; म्हणजे असीरियन लोकांच्या काळापासून. या दरम्यानच्या काळांत इराणमध्यें राज्यव्यवस्थेंत आणि राजघराण्यांत बदल झाले; धर्मातही बदल झाले. देशांत कधीं स्वदेशी राज्यकर्त्यांचें राज्य, तर कधीं परक्यांचें राज्य असेही प्रकार झाले. इस्लाम धर्मानें तेथें प्रवेश करून तेथील जीवनांत पुष्कळच क्रांति करून टाकली आहे. इतकें सगळें होऊनही इराणी कलेची ही परंपरा टिकून राहिलेली आहे. या एवढ्या बदलत्या युगामध्यें तिच्यामध्यें पुष्कळ बदल झालेला आहे आणि विकासही पुष्कळ झालेला आहे, हें अर्थातच खरें आहे. हा जो टिकाऊपणा या कलेच्या परंपरेंत आलेला आहे याचें कारण इराणची भूमि आणि निसर्गशोभा यांच्याशीं इराणी कलेचा जो घनिष्ठ संबंध आहे, त्यांत आहे असें म्हणतात.

मागच्या पत्रांत मीं तुला निनेव्हे येथील असीरियन लोकांच्या साम्राज्याबद्दल सांगितलें. इराणचा अंतर्भाव या साम्राज्यांत होत होता. हे इराणी लोक आर्य वंशाचे होते. खिस्तापूर्वी सहाशें-सातशें वर्षे त्यांनीं निनेव्हे शहर काबीज केलें आणि असीरियन साम्राज्याचा नाश केला. नंतर या इराणी आर्यांनीं थेट सिंधु नदीच्या तीरापासून तों ईजिप्तपर्यंत पसरलेलें असें स्वतःचेंच एक साम्राज्य स्थापन केलें. प्राचीन काळच्या जगांत त्यांनीं आपला दरारा सगळीकडे प्रस्थापित केलेला होता. ग्रीक लोकांनीं लिहिलेल्या त्या काळच्या वृत्तांतामध्यें त्यांच्या राजाचा उल्लेख राजाधिराज, राजश्रेष्ठ, असा केलेला आढळतो. या महान् राजांमध्यें सायरस दारियस, क्सार्क्सिस यांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. या दारियस आणि क्सार्क्सिस राजांनीं ग्रीस जिंकावयाचा प्रयत्न केला आणि त्यांत त्यांना मार खावा लागला, हें तुझ्या ध्यानांत असेलच. या राजांच्या वंशाला अकिमेनी किंवा हखामनी वंश असें नांव आहे. त्यांनीं २२० वर्षेपर्यंत एका प्रचंड साम्राज्यावर आपला अम्मल चालविला. अखेरीस मॅसिडानच्या अलेक्झांडर दि ग्रेटनें येऊन त्यांचें साम्राज्य नष्ट केलें.

असीरियन आणि बॅबिलोनियन लोकांच्या पाठीमागून आलेला हा इराणी लोकांचा अंमल लोकांना किती तरी सुखाचा वाटला असेल. हेंही साम्राज्य जनतेचें मालक म्हणूनच अम्मल गाजवीत होतें खरें. पण तें चालविणारे लोक सुधारलेले होते

आणि धर्मवेडे नव्हते. निरनिराळ्या धर्मांना आणि संस्कृतींना नांदूं देण्याला त्यांची तयारी होती. त्यांच्या सगळ्या प्रचंड साम्राज्याची व्यवस्था त्यांनीं फारच उत्तम ठेवली होती आणि निरनिराळ्या प्रदेशांचा परस्परांशीं चांगला संबंध राहावा अशा तऱ्हेचे चांगले रस्ते त्यांच्या साम्राज्यांत होते. हिंदुस्थानांत आलेल्या हिंदी अथवा भारतीय आर्यांशीं या इराणी लोकांचे फारच घनिष्ठ संबंध होते. त्यांचा जो झोरोआस्टरचा म्हणजेच झरतुष्ट्राचा धर्म त्याचा प्राचीन वैदिक धर्माशीं पुष्कळच संबंध आहे. आर्यांचें मूळ वसतिस्थान कोठें असेल तें असो, पण त्या ठिकाणीं प्रथम केव्हां ना केव्हां तरी हे दोन्ही लोक एकत्र राहत असले पाहिजेत हें अगदीं स्पष्ट दिसतें.

अकिमेनी घराण्यांतील या राजांना इमारती बांधण्याचा मोठा शोक होता. आपल्या पॅर्सिपॉलीस राजधानींत त्यांनीं प्रचंड राजवाडे बांधले. यांनीं देवालयें बांधलीं नाहींत हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. या राजवाड्यांत मोठमोठाले दिवाणखाने असून त्यांत अगणित खांब असत. या प्रचंड बांधकामाची कल्पना आजही जे कांहीं मोडके अवशेष पाहावयाला मिळतात त्यांवरून करतां येते. या अकिमेनी राजांच्या काळच्या इराणी कलेचा मौर्यांच्या काळांतील (म्हणजे अशोक वगैरेंच्या) हिंदी कलेशीं संबंध कायम होता आणि या हिंदी कलेवर तिची छापही होती.

अलेक्झांडरनें महान् राजा (राजश्रेष्ठ) दारियस याचा पराभव करून अकिमेनी घराणें नष्ट करून टाकलें. त्यानंतर इराणांत कांहीं थोडा काळ अलेक्झांडरचा सेनापति सेल्युकस याचा व त्याच्या वंशजांचा अम्मल चालला आणि त्यानंतर अर्धवट परकी अशा राजांच्या अमलाखालीं ही हेलनिक म्हणजे ग्रीक संस्कृतीची छाप इराणवर पुष्कळ काळपर्यंत चालू राहिली. हिंदुस्थानच्या सरहद्दीवर ठाणें मांडून बसलेले कुशान लोक, ज्यांचें राज्य दक्षिणेस बनारसपर्यंत आणि उत्तरेस मध्य आशियापर्यंत पसरलेलें होतें, ते या इराणमधील अर्धवट परकी राजांशीं समकालीन असून यांच्यावरही हेलनिक संस्कृतीची छाप होतीच. अशा रीतीनें हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील आशिया खंडाचा सर्वच मोठा भाग अलेक्झांडरनंतर पांचशें वर्षेपर्यंत, म्हणजे ख्रिस्तानंतर थेट तिसऱ्या शतकापर्यंत, ग्रीक संस्कृतीच्या छायेखालीं होता. अर्थात् ही सगळी छाप मुख्यतः कलेच्या क्षेत्रामध्यें होती. तिचा इराणच्या धर्मावर कांहीं परिणाम झाला नाहीं; झरतुष्ट्राचा धर्मच तेथें जसाच्या तसा या काळांत चालू राहिला.

तिसऱ्या शतकांत इराणमध्यें एक प्रकारचें राष्ट्रीय पुनरुज्जीवन झालें आणि एका नवीनच राजवंशाचा अम्मल तेथें सुरू झाला. हाच तो सासानी राजवंश. हे लोक आपल्याला प्राचीन अकिमेनी घराण्याचे वारसदार म्हणवीत आणि त्यांचें धोरण चढाऊ राष्ट्रीय वृत्तीचें होतें. चढाऊ राष्ट्रीय धोरण म्हटलें, कीं तें संकुचित, कडवें आणि असहिष्णु असावयाचें हें ठरलेलेंच आहे. त्या नियमाला कांहीं या सासानी राजांचें धोरण अपवाद नव्हतें. शिवाय, पश्चिमेकडे रोमचें साम्राज्य आणि कॉन्स्टान्टिनोपल येथील बायझांटियन साम्राज्य आणि पूर्वेस पुढें पुढें सरकत असलेल्या

तुर्कीच्या टोळ्या यांच्या कचाट्यांत त्यांचें राज्य सांपडलेलें असल्यामुळें त्याचें धोरण असें होणें हें स्वाभाविकही होतें. या दोन्ही बाजूंकडच्या कचाट्यांत सांपडलेलें असूनही त्यांनीं आपलें राज्य ४०० वर्षेपर्यंत, इस्लाम धर्मीय लोक तिकडे येईपर्यंत, टिकवून धरलें. सासानी राजांच्या कारकीर्दीत झरतुष्ट्राच्या धर्माच्या भिक्षुकशाहीचें सर्वांत अधिक प्रस्थ माजून राहिलेलें होतें. त्यांच्या धर्मपीठाचेंच राज्यकारभारावरही वर्चस्व चालत होतें आणि कोणाचा एवढाही विरोध सहन करण्याला तें धर्मपीठ तयार नव्हतें. याच काळांत त्यांचा पवित्र धर्मग्रंथ जो 'अवेस्ता' त्याची अखेरची आवृत्ति तयार झाली असें म्हणतात.

हिंदुस्थानांत या काळामध्यें गुप्तांचें साम्राज्य नांदत होतें. बुद्धाचा काळ आणि कुशानांच्या साम्राज्याचा उदय यांच्या मागून हिंदुस्थानांतही जें एक राष्ट्रीय पुनरुज्जीवन झालें त्याचें निदर्शक असेंच हें गुप्तांचें राज्य होतें. या काळीं हिंदुस्थानांत कला आणि वाङ्मय याना मोठा बहर आला होता. कालिदासासारखे श्रेष्ठ संस्कृत ग्रंथकार याच काळांत उदयास आले. सासानी राजांच्या काळांतील इराणचा, गुप्तांच्या काळांतील हिंदुस्थानशीं कलेच्या क्षेत्रांत पुष्कळ संबंध होता, असें दाखविणाऱ्या पुष्कळ गोष्टी आढळून येतात. सासानींच्या काळचीं अगदींच थोडीं चित्रें आणि मूर्तींचीं कामें आजच्या आपल्या काळांत शिल्लक राहिलेलीं आहेत; परंतु जीं कांहीं आहेत त्यांत कलावंतांनीं जिवंतपणा आणि चलनवलनाची शक्ति निर्माण केलेली आहे असें दिसून येतें. त्यामध्यें प्राण्यांचे जे नमुने आहेत ते अजंठा येथील भिंतींवरील चित्रांतल्या प्राण्यांसारखेच आहेत. सासानीकालीन कलावंतांची छाप थेट चीनपर्यंत आणि गोबीच्या मैदानापर्यंत पसरलेली होती असें दिसतें.

आपल्या दीर्घकालीन कारकीर्दीच्या अखेरीअखेरीस सासानी राजे दुर्बळ होत गेले आणि इराणमधील परिस्थिति बिघडत गेली असें दिसतें. त्यांचें आणि बायझांटियन साम्राज्याचें पुष्कळ काळपर्यंत युद्ध चालू राहून त्यांत दोन्ही पक्ष पार थकून गेले होते. आरबांचीं जीं सैन्यें इराण काबीज करायला आलेलीं होतीं, तीं आपल्या नव्या धर्मावरील निष्ठेनें भारलेलीं होतीं. त्यामुळें त्यांना इराण काबीज करणें मुळींच कठिण पडलें नाहीं. सातव्या शतकाच्या मध्याला, महंमद पैगंबराच्या मृत्यूनंतर दहा वर्षांच्या आंत, इराण देश खलिफाच्या अमलाखालीं आला. आरबांचीं सैन्यें मध्य आशिया आणि उत्तर आफ्रिका यांमधील प्रदेशामागून प्रदेश व्यापीत गेली. तेव्हां त्यांनीं आपल्या बरोबर आपला नवा धर्म तर नेलाच; परंतु त्यांच्याबरोबर त्यांची ताज्या दमाची आणि विकासाच्या भरांत असलेली संस्कृतीही त्यांनीं नेली. सीरिया, मेसापोटेमिया, ईजिप्त हे देश आरबी संस्कृतीनें संपूर्ण व्यापून टाकिले. त्या प्रांतांची भाषासुद्धां त्यांच्यामुळें आरबी हीच झाली. आणि वांशिक दृष्ट्यासुद्धां आरबी लोकांशीं या प्रदेशांतील लोक सरमिसळ होऊन गेले. बगदाद, दमास्कस, कैरो हीं शहरें आतां आरबी संस्कृतीचीं माहेरघरें बनलीं आणि या नवीन सुधारणेच्या भरांत या प्रदेशांत नव्या पुष्कळ इमारतींचें

बांधकाम झालें. आजच्या घटकेलासुद्धां हे सर्व देश आरबी संस्कृतीचेच देश असून एकमेकांपासून ते जरी विलग पडलेले असले, तरी आपण सगळे एकच आहोंत व होऊंही ही भावना त्यांच्यामध्यें अजूनही जागृत आहे.

या देशांप्रमाणेंच आरबांनीं इराण देशही जिंकला. परंतु सीरिया किंवा ईजिप्त-मधल्याप्रमाणें येथील लोक आरबाना आपल्यांत एकजीव किंवा संमिश्रित करून घेतां आले नाहींत. इराणांतील मानववंश हा मूळचा आर्यांच्या वंशांतील असल्यामुळें त्यांच्यांत आणि या सेमेटिक वंशाच्या आरबी लोकांमध्यें फारच अंतर होतें. इराणी लोकांची भाषा हीसुद्धां आर्य भाषाच होती. तात्पर्य, इराणी लोकांचा वंश आरबांनीं त्यांना जिंकल्यानंतरही आरबांपासून वेगळा राहिला आणि त्यांची भाषाही पहिल्या-प्रमाणेंच त्यांच्या देशांत नांदती राहिली. धर्माच्या क्षेत्रांत मात्र इस्लामधर्माचा प्रसार फारच झपाट्यानें झाला आणि त्यानें झरतुष्ट्राच्या धर्माला तेथून हुसकून लावलें; अखेरीस या धर्माला हिंदुस्थानांत आसरा पाहावा लागला; परंतु इस्लामी धर्माच्या बाबतींतसुद्धां या इराणी लोकांनीं आपला एक निराळाच स्वतंत्र मार्ग काढला. इस्लाम धर्मीयांत फूट होऊन दोन पक्ष झाले व त्यांतून इस्लामधर्माचे शिया आणि सुनी असे दोन पंथ निर्माण झाले. इराणनें शिया पंथाचा स्वीकार केला. आजही तेथें मुख्यतः शिया पंथाचेंच वर्चस्व आहे आणि बाकीच्या जगांत सर्वत्र बहुतेक सुनी पंथच चालू आहे.

अशा रीतीनें आरबी संस्कृतीला इराणी संस्कृति आपल्याशीं एकजीव करून घेतां आली नाहीं. तरी तिचा इराणी संस्कृतीवर परिणाम अर्थातच फार प्रबळ झाला आणि हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच येथेंही इस्लामधर्माच्या आगमनानें कलाकौशल्यांत एक नवचैतन्य निर्माण झालें. आरबी कला आणि संस्कृति यांच्यावरही इराणी कला व संस्कृति यांच्यामधील उच्च नमुन्यांचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. निर्जन मैदानांत जन्मून वाढलेल्या त्या साध्याभोळ्या लोकांच्या घरीं इराणी विलासोपभोगांचा शिरकाव झाला आणि आरबांच्या खलिफांच्या दरबारांतील डामडौल आणि ऐश्वर्य हें आजपर्यंत होऊन गेलेल्या कोणत्याही सम्राटाच्या दरबारांतील ऐश्वर्याशीं तोडीस तोड अशा प्रकारचें झालें. साम्राज्याची राजधानी बगदाद शहर हें त्या काळच्या जगांतील सर्वश्रेष्ठ शहर होऊन गेलें. बगदादच्या उत्तरेला तैग्रीस नदीच्या कांठीं समारा येथें खलिफांनीं आपल्यासाठीं एक अत्यंत मोठी मशीद बांधली आणि राजवाडा उभारला. त्यांचे कांहीं मोडकेतोडके अवशेष आजही अस्तित्वांत आहेत. या मशिदींत फारच विशाल अशीं दालनें होतीं आणि तिच्या आसपासच्या प्रांगणांतून कारंजीं होतीं. राजवाडा लंबचौकोनी असून त्याची एक बाजू सुमारें $\frac{3}{4}$ मैलाहून अधिक लांब होती.

या बगदादच्या साम्राज्याचा नवव्या शतकांत ऱ्हास होऊन त्याच्यांतून पुष्कळ वेगळीं वेगळीं स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं. इराण देश स्वतंत्र झाला. पूर्वेकडील तुर्कांच्या टोळ्यांनींही आपलीं स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं. पुढें या तुर्कांनीं इराणही जिंकून

घेतला आणि बगदाद येथें नुसत्या नांवापुरता जो खलिफा उरलेला होता, त्याच्यावर त्यांनीं वर्चस्व गाजविण्याला सुरुवात केली. त्यापुढें अकराव्या शतकाच्या सुरुवातीला गझनीचा महमूद उदयास आला. त्यानें हिंदुस्थानवर स्वाऱ्या करून लूटमार केली. खलिफावरही गंडांतर आणलें आणि स्वतःचें एक साम्राज्य अल्प काळपर्यंत स्थापन केलें. पुढें तें एका तुर्कांच्याच टोळीनें म्हणजे सेल्जुक तुर्कांनीं नष्ट केलें. क्रूसेडवाल्या ख्रिस्ती लोकांशीं या सेल्जुक तुर्कांनीं पुष्कळ काळपर्यंत सामना केला आणि त्या दीर्घकालीन युद्धांत त्यांनीं यशही मिळविलें. यांचें साम्राज्य १५० वर्षें टिकलें. बाराव्या शतकाच्या अखेरीस तुर्कांच्याच आणखी एका टोळीनें येऊन इराणमधून सेल्जुक तुर्कांना हांकून लावलें आणि तेथें ख्वारीजमचें किंवा खिवाचें राज्य म्हणून प्रसिद्ध असलेलें राज्य स्थापन केलें. पण हें फारच थोडा काळपर्यंत टिकलें. कारण ख्वारीजमच्या शहानें आपल्या वकिलाचा केलेला अपमान सहन न होऊन चेंगीजखानानें आपल्या मोंगल सैन्यानिशीं इराणवर स्वारी केली आणि इराणच्या भूमीचा आणि लोकांचा धुव्वा उडविला.

एवढ्याशा लहानशा परिच्छेदांत मी तुला किती तरी घडामोडींची आणि साम्राज्यांची ही माहिती सांगतों आहें. त्यामुळें तुझा खूप गोंधळ उडून गेला असला पाहिजे. हे निरनिराळे राजवंश आणि मानववंश यांचे हे उदयास्त जे मी तुला सांगतों आहें, ते तुझ्या स्मरणशक्तीवर त्यांचें उगीच कांहीं तरी जड ओझें घालावें या बुद्धीनें नव्हे, तर मला मुद्दाम एक गोष्ट ठसठशीतपणें तुझ्या नजरेस आणावयाची आहे, कीं इतक्या सगळ्या मोठमोठ्या घडामोडी होत असतांनाही त्यामुळें इराणची कलांची परंपरा आणि जीवनप्रवृत्ति यांच्यामध्यें कांहींसुद्धां फरक पडला नाहीं. पूर्वेकडून तुर्कांच्या टोळ्यांमागून टोळ्या आल्या. परंतु त्या सर्वच्या सर्व बुखारापासून इराण-पर्यंत प्रभुत्व गाजवीत असलेल्या आरबी-इराणी मिश्र संस्कृतीच्या आहारीं गेल्या. इराणपासून दूर अशा आशियामायनर देशांत जे तुर्क गेले त्यांनीं मात्र आपलेच आचार-विचार कायम ठेवले. आरबी संस्कृतीला त्यांनीं कांहीं दाद दिली नाहीं. आशिया-मायनरचें स्वरूप त्यांनीं आपला मायदेश जो तुर्कस्तान, त्याच्यासारखें जवळजवळ करून टाकलें. परंतु इराणमध्यें आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशांत मात्र प्राचीन इराणी संस्कृतीचें बळ इतकें मोठें होतें कीं तुर्कांनाच ती मान्य करावी लागली आणि आपले आचार-विचार तिच्याशीं जुळते करून घ्यावे लागले. इराणमध्यें पुष्कळ निरनिराळ्या तुर्की टोळ्यांचा अम्मल होत आला. पण त्या सर्व अमलाखालीं इराणी कला आणि वाङ्मय यांचा चांगला उत्कर्ष होत राहिला. गझनीच्या सुलतान महमुदाच्या काळींच इराणचा कवि फिर्दोसी हा होऊन गेला, हें मला वाटतें मागें मीं तुला सांगितलें आहे. महमुदाच्या विनंती-वरून त्यानें 'शहानामा' नांवाचें एक इराणचें राष्ट्रीय महाकाव्य लिहिलें. त्यांत वर्णन केलेले प्रसंग इस्लाम धर्माच्या उदयाच्या पूर्वीच्या काळामधील असून त्यांतील नायकाचें नांव रुस्तुम असें आहे. त्यावरून इराणी वाङ्मय आणि कला हीं इराणच्या

प्राचीन राष्ट्रीय आणि पारंपारिक (ऐतिहासिक) प्रवृत्तींशीं किती निगडित होती, हें दिसून येतें. इराणमधील मोठमोठ्या चित्रांचे आणि छोट्या सुंदर मूर्तींचे सगळे विषय या शहानाम्यामधून घेतलेले आहेत.

ख्रिस्ती कालगणनेंतील पहिल्या हजार वर्षांच्या युगाची अखेर होऊन दुसरें हजार वर्षांचें युग सुरू होण्याच्या सुमारास, तसेंच एक शतक संपून दुसऱ्या शतकाची सुरुवात होणाच्या सुमारास फिर्दोसी कवि हा उदयास आला. त्याचा काल इ. सन ९३२ पासून १०२१ पर्यंत आहे. त्याच्यानंतर लौकरच आणखी एक कवि झाला. त्याचें नांव पर्शियन भाषेंतल्याप्रमाणें इंग्रजी भाषेंतही फारच विख्यात आहे. तो म्हणजे इराणमधील निशापूर येथील उमर खय्याम हा खगोलशास्त्रज्ञ आणि कवि होय. उमरच्या मागून शिराज येथील शेख सादी हा कवि झाला. हा इराणचा एक सर्वश्रेष्ठ कवि होय. त्याचीं गुलिस्तान आणि बुस्तान हीं काव्यें कित्येक पिढ्या हिंदुस्थानांतील मक्तबांमध्यें (पाठशाळांमध्यें) शिकणाऱ्या मुलांमुलींना तोंडपाठ करावीं लागत.

पूर्वीच्या काळच्या श्रेष्ठ श्रेष्ठ अशा कांहीं थोड्या लोकांचींच नांवें मी तुला सांगतों आहें. उगीच नांवांची लांबच लांब यादी देण्यामध्यें कांहीं मुद्दा नाहीं; पण मला एक गोष्ट तुझ्या ध्यानांत आणून द्यावयाची आहे ती ही, कीं इराणी कलाकौशल्य आणि वाङ्मय यांचा हा दीप इराणपासून तो मध्य आशियांतील ट्रॅन्सोक्शियानापर्यंत शतकानुशतकें एकसारखा तेवत होता. इराणांतल्या शहरांशीं कलात्मक आणि वाङ्मयात्मक अशा सौंदर्याच्या बाबतींत तोडीस तोड अशीं बुखारा व बलख यांसारखीं महान् शहरें ट्रॅन्सोक्शियामधील होतीं. आरबांतील सर्वांत अधिक सुविख्यात असा तत्त्वज्ञ जो इब्न सिना ऊर्फ अविसेना हा दहाव्या शतकाच्या अखेरीस बुखारा येथेंच जन्माला आला होता. त्यानंतर २०० वर्षांनीं जलालुद्दिन रूमी नांवाचा आणखी एक श्रेष्ठ इराणी फारसी कवि हाही बलख येथेंच जन्माला आला होता. त्याला मोठा सिद्ध पुरुष समजतात. त्यानेंच नाचणाऱ्या दरवेशांचा पंथ स्थापन केला.

तात्पर्य, तंटेबखेडे, युद्धें आणि राज्यव्यवस्थेंतील घडामोडी या सर्व गोष्टी चालू असूनही आरबी-इराणी मिश्र कला आणि संस्कृति यांची परंपरा एकसारखी जागती चालू राहिली आणि वाङ्मय, चित्रकला आणि शिल्पकला आणि स्थापत्य यांचे अत्युत्कृष्ट नमुने या प्रदेशांत उत्पन्न होत राहिले. त्यानंतर मात्र या संस्कृतीचें जणुं मरणच ओढवलें. तेराव्या शतकांत (१२२० च्या सुमारास) चेंगीजखानानें तुफानी स्वारी करून ख्वारीजम आणि इराण यांच्या राज्यांचा नाश केला; त्यानंतर हुलगूनें कांहीं वर्षांनीं बगदाद शहराचा नाश केला आणि या दोन स्वाऱ्यांतील नासधुशीमध्यें या देशांमधील आज शेंकडों वर्षेंपर्यंत नांदत आलेल्या उच्च संस्कृतींतील सर्व कांहीं उत्तमोत्तम संचय आणि संपत्ति ही पार धुऊन गेली. मंगोलियन लोकांनीं मध्य आशियाचें नुसतें वैराण रान कसें बनविलें आणि तेथील मोठमोठीं नगरें ओसाड होऊन तेथें औषधालासुद्धां माणसाचें दर्शन कसें मिळेनासें झालें, ही हकिकत मागें

एका पत्रामध्यें मीं तुला सांगितलेली आहे. या संकटाच्या तडाख्यांतून मध्य आशियानें संपूर्णपणें केव्हांच डोकें वर काढलें नाहीं. पण ज्या प्रमाणांत मध्य आशियानें आपली परिस्थिति सांवरली तें प्रमाणसुद्धां पुष्कळच आश्चर्यकारक आहे. चेंगीजखानाच्या मृत्यूनंतर त्याच्या साम्राज्याच्या वांटण्या झाल्या ही गोष्ट तुला आठवत असेल. या साम्राज्याचा इराणचा व त्याच्या आसपासचा मुलूख हुलगूच्या ताब्यांत गेला होता. पहिल्यापहिल्यानें पोटभर नासधूस केल्यानंतर आता तो मोठा शांततावादी, सहनशील, उदारबुद्धीचा असा राज्यकर्ता निवटला होता. त्यानें आपला इल्खानांचा म्हणून राजवंश चालू केला. हे इल्खान लोक कांहीं काळपर्यंत मंगोलियन लोकांचा जुना आकाशपूजेचा धर्मच पाळीत होते. नंतर धर्मांतर करून ते मुसलमान धर्मांत घेतले गेले. धर्मांतराच्या आधीं आणि त्यानंतरही इतर धर्मांशीं त्यांनीं केव्हांच वांकडेपणा धरला नाहीं. ते त्यांच्याशीं सर्वथा सहिष्णु वृत्तीनें वागत असत. त्याच्या चुलत घराण्यांतील लोक, चीनमधील बडा खान आणि त्याचे कुटुंबीय लोक, हे बुद्धधर्मानुयायी होते. त्यांच्याशीं इल्खानांचे अतिशयच गोड संबंध होते. पुष्कळदां ते लोक इतक्या दूर चीनमधून आपल्यासाठीं वधू सुद्धां आणवून घेत असत.

इराण व चीन या दोन ठिकाणच्या मंगोलियन लोकांच्या दोन शाखांचे एकमेकांशीं हे जे निगडित संबंध होते, त्यांचा त्याच्या कलेवर फार मोठा परिणाम झाला. चिनी संस्कृतीची छाप नकळत इराणमध्यें पडली आणि तेथील चित्रकलेंत आरबी, इराणी आणि चिनी परंपरांचा कांहीं एक विलक्षण संगम दिसून येऊं लागला. तरी पण इतक्या सगळ्या धामधुमींतून आणि संकटांतून जाऊन सुद्धां मूळच्या इराणी कलापरंपरेनें पुन्हां डोकें वर काढलें आणि ती विजयी झाली. चौदाव्या शतकामध्यें इराणमध्यें हाफीज नांवाचा आणखी एक श्रेष्ठ कवि उदयाला आला. आजही हिंदुस्थानमध्येंसुद्धां हा कवि लोकप्रिय आहे.

या मंगोलियन इल्खानाचें राज्य कांहीं फार काळ टिकलें नाहीं. ट्रॅन्सोक्शियानामधील समरकंद येथील तैमुरलंगानें त्यांचे राहिलेसाहिले जे कोणी लोक होते, त्या सर्वांचा नाश करून टाकला. या अत्यंत भयंकर आणि अत्यंत क्रूर अशा रानटी माणसाविषयीं मागें तुला सांगितलेंच आहे. तरीपण हा माणूस कलांचा मोठाच आश्रयदाता होता. आणि त्याच्या काळचा तो मोठा विद्याविभूषित मनुष्य समजला जात असे. त्याच्या कलेच्या प्रेमाची मुख्य रीत ही दिसते, कीं दिल्ली, शिराज, बगदाद, दमास्कस यांसारखीं मोठमोठीं शहरें लुटून त्यांच्यामधील लूट आपलें राजधानीचें शहर जें समरकंद तें सजविण्यासाठीं आणावयाची. तथापि, समरकंद येथील अत्यंत अलौकिक आणि भव्य असें बांधकाम म्हटलें म्हणजे गुरअमीर या नांवाचें स्वतः तैमुरलंगाचें कबरस्तान होय. त्याची ही कबर त्याला खरोखरच शोभण्यासारखी आहे. कारण त्याची दुसऱ्यावर छाप टाकणारी भव्य शरीरयष्टी, त्याचें सामर्थ्य आणि त्याच्या आंगचें भयंकर तेज या सर्व गोष्टींचा प्रत्यय या बांधकामाच्या उदात्त उभारणीमध्यें कांहीं अंशीं येतो.

तैमुरलंगानें केवढा तरी प्रचंड मुलूख काबीज केला होता. पण तो मेल्यावर यापैकीं पुष्कळसा मुलूख त्याच्या वंशजांच्या हातून निसटून गेला. त्यापैकीं ट्रॅन्सोक्शियाना व इराण वगैरेंचें मिळून एक छोटेंसें राज्य तेवढें त्यांच्या ताब्यांत राहिलें. पुरीं शंभर वर्षेंपर्यंत, सगळ्या पंधराव्या शतकभर, या तिमुरी म्हणून प्रसिद्ध असलेल्या लोकांनीं इराण, बुखारा आणि हिरात या प्रदेशावर अंमल चालविला. आश्चर्याची गोष्ट ही, कीं तैमूरसारख्या निर्दय विजेत्याचे हे वंशज औदार्य, दयाबुद्धी यासाठीं आणि कलांना त्यांनीं दिलेल्या उत्तेजनासाठीं प्रसिद्धीस आले. त्यामध्यें तैमूरचा प्रत्यक्ष मुलगा शहा रूख हा सर्वश्रेष्ठ. आपली राजधानी हिरात येथें त्यानें एक प्रचंड ग्रंथसंग्रहालय उभारलें; त्या ठिकाणीं वाङ्मयप्रेमी लोकांची नुसती गर्दी उसळलेली असे.

तिमुरी लोकांची ही शंभर वर्षांची कारकीर्द कलात्मक आणि वाङ्मयीन कर्तृत्वासाठीं इतकी प्रसिद्ध आहे, कीं त्या काळाला 'तिमुरी ज्ञानयुग' असें नांव मिळालेलें आहे. या काळांत पर्शियन वाङ्मय चांगलेंच सुसमृद्ध झालें आणि पुष्कळच सुंदर चित्रें रंगविलीं गेलीं. बिझाद नांवाचा एक श्रेष्ठ चित्रकार या काळीं होऊन गेला; त्याच्या चित्रकलेची एक विशिष्ट परंपराच निर्माण झाली. एक गोष्ट पाहून मौज वाटते, कीं या तिमुरी काळांतील वाङ्मयसेवकांमध्यें फारशी वाङ्मयाच्या जोडीनेंच तुर्की वाङ्मयाची वाढ झाली. याच काळांत इटलींतही ज्ञानयुगाचा उदय झालेला होता, ही गोष्टही तुला पुन्हां एकदां सांगावीशी वाटते.

हे तिमुरी लोक मूळचे तुर्क होते. पण ते बहुतांशीं इराणी संस्कृतीच्या आहारीं गेलेले होते. तुर्की आणि मंगोलियन लोकांनीं इराणचें राज्य जिंकलें. परंतु या विजेत्यांवर इराणनें आपली संस्कृति लादली. अर्थात् हें करीत असतां आपलें राजकीय स्वातंत्र्य परत मिळविण्याचाही इराणचा प्रयत्न चालूच होता. हळूहळू त्यांनीं तिमुरी लोकांना पूर्वेकडे लोटीत नेलें आणि अखेरीस तिमुरी लोकांचें एक छोटेंसें राज्य फक्त ट्रॅन्सोक्शियानाच्या सभोंवार तेवढें शिल्लक राहिलें. सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला इराणमधील राष्ट्रीय प्रवृत्तीचा विजय झाला आणि तिमुरी लोकांना इराणमधून कायमचें हांकलून देण्यांत आलें. त्यानंतर सुफी अथवा सफावी नांवाचें स्वतः इराणमधीलच एक राष्ट्रीय प्रवृत्तीचें राजघराणें तेथें राज्य करूं लागलें. या घराण्यांतील दुसरा राजा तम्हास्प यानेंच शेरखानाच्या वेळीं हुमायून पळून गेला तेव्हां त्याला आसरा दिला.

या सफावी घराण्याची कारकीर्द १५०२ पासून १७२२ पर्यंत २२० वर्षें चालली. या काळाला इराणी कलेचें सुवर्णयुग समजतात. या राज्याची राजधानी जें इस्पहान शहर तेथें सुंदर सुंदर भव्य इमारतींना मोठाच भर आला, आणि तें एक कलांचें, विशेषतः चित्रकलेचें विख्यात माहेरघर बनलें. शहा अब्बास हा या घराण्यांतील सर्वांत नामांकित राजा; एवढेंच नव्हे, तर इराणच्या सर्वच राज्यकर्त्यांत तो जास्त श्रेष्ठ प्रतीचा राजा होऊन गेला असें मानतात. इतका चांगला

श्रेष्ठ राज्यकर्ता दुसरा कोणीच झालेला नाहीं असें समजतात. एका बाजूनें उझबेक लोकांनीं आणि दुसऱ्या बाजूनें उस्मानी तुर्क लोकांनीं त्याला चेपून टाकण्याचा प्रयत्न चालविलेला होता. त्यानें या दोन्ही लोकांना पिटाळून लावून एक चांगलें बलिष्ठ राज्य निर्माण केलें; पश्चिमेकडील आणि इतर ठिकाणच्याही राज्यकर्त्यांशीं संबंध जोडले आणि आपल्या राजधानीचें सौंदर्य वाढविण्यासाठीं त्यानें फारच तळमळीनें खटपट केली. शहा अब्बास यानें इस्पहानमध्यें आपल्या नगराची जी रचना केली, तिच्यामध्यें विशुद्ध अभिजातत्व आणि श्रेष्ठ अभिरुचि यांचा अत्युत्कृष्ट नमुना दिसून येतो, असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. येथील इमारती तर स्वतः चांगल्याच सुंदर आणि श्रृंगारलेल्या, उत्तम सजावटीच्या होत्या यांत शंकाच नाहीं. परंतु त्यांच्या आजुबाजूला जी सुंदर रचना केलेली असे तिच्यामुळें त्यांचा उठावदारपणा अधिकच वाढत असे. या काळांत इराणमध्यें जाऊन युरपीय प्रवाशांनीं यासंबंधींचीं मोठीं बहारीचीं रसाळ वर्णनें लिहून ठेवलेलीं आहेत.

शिल्पकला, वाङ्मय, भिंतीवरील मोटीं मोठीं कोरीव किंवा रंगीत चित्रें आणि छोटीं छोटीं हातांत बाळगण्याजोगीं चित्रें या दोन्ही प्रकारची चित्रकला, सुंदर गालिच्यांचें विणकाम, मातीचीं भांडीं आणि इतर पदार्थ बनविण्याची कला, दगडां-विटांचें नक्षीकाम या सर्वांना इराणी कलेच्या या सुवर्णयुगांत पुष्कळच बहर आला होता. या काळचीं भिंतीवरील कांहीं चित्रें आणि कांहीं छोट्या मूर्ती यांचे नमुने खरोखरच अलौकिक सुंदर आहेत. कला ही राष्ट्रीय बंधनें पाळीत नसते आणि तिनें तीं पाळूं नयेतही. त्यामुळें सोळाव्या व सतराव्या शतकांतील इराणच्या या कलेवर दुसरीकडील कितीएक कलांची छाप पडून ती अधिक समृद्ध आणि सुसंपन्न झाली असेल असा संभव आहे. तिच्यामध्यें इटालियन कलेची छाप उघड आहे असें म्हणतात. या सर्वांच्या पाठीमागें आज २००० वर्षें टिकून राहिलेली जी प्राचीन इराणी कलेची परंपरा ती सतत खडी आहे. दुसरी गोष्ट म्हणजे या इराणी संस्कृतीचें क्षेत्र केवळ इराणपुरेंतच मर्यादित राहिलें नाहीं. पश्चिमेला तुर्कस्तान आणि पूर्वेला हिंदुस्थान येथपर्यंतच्या सर्व विशाल प्रदेशावर ही संस्कृति पसरलेली होती. हिंदुस्थानांतील मोंगलांच्या दरबारांतसुद्धां संस्कृतिसंपन्न, सुसंकृत, लोकांची भाषा फारशी ही होती. त्याचप्रमाणें सामान्यतः पश्चिम आशियांतही सगळीकडे असाच प्रकार होता. युरपमध्यें फ्रेंच भाषेला जें स्थान होतें, तें इकडे फारशी भाषेला प्राप्त झालेलें होतें. प्राचीन इराणी कलेंतील सगळ्या सुंदर प्रवृत्तींचें अमर प्रतीक आज आग्रा येथील ताजमहालमध्यें खडें आहे आपल्या समोर. अगदीं अशाच रीतीनें या कलेचा परिणाम पश्चिमेस दूर कॉन्स्टान्टिनोपलमध्येंही उस्मानी तुर्कांच्या कलेवर झाला आणि त्याही ठिकाणीं इराणी कलेची छाप असलेल्या पुष्कळ विख्यात इमारती उभारल्या गेल्या.

इराणमधील हें सफावी राजघराणें हिंदुस्थानांतील महान् मोंगल बादशहांशीं

जवळजवळ समकालीन होते. हिंदुस्थानांतील मोंगलांच्या राजघराण्यांतील पहिला बादशहा बाबर हा समरकंद येथील तिमुरी राजघराण्यापैकीं होता. इराणी लोकांचें बळ जसें वाढत गेलें तसें त्यांनीं तिमुरी लोकांना इराणमधून घालवून दिलें होतें आणि ट्रॅन्सोक्शियानाचे कांहीं प्रदेश आणि अफगाणिस्तान एवढाच भाग तिमुरी वंशाच्या निरानिराळ्या छोट्या राजांच्या अमलाखालीं शिल्लक राहिलेला होता. बाबर याला बाराव्या वर्षापासून या छोट्या राजांपाशींच लढावें लागलें. या लढायांत त्याला यश येऊन तो काबूलचा राजा झाला आणि नंतर तो हिंदुस्थानांत आला. तिमुरी लोकांची संस्कृति किती उच्च दर्जाची होती याचें प्रत्यंतर आपल्याला बाबरवरून मिळतें. त्याच्या आत्मचरित्रामधून–रोजानिशीमधून कांहीं उतारे मागच्या एका पत्रांत मीं तुला दिले आहेत. सफावी राजघराण्यांतील सर्वश्रेष्ठ राजा जो शहा अब्बास, तो अकबर आणि जहांगीर यांचा समकालीन होता. या दोन देशामध्यें त्या काळीं पुष्कळच काळ-पर्यंत फारच निकट संबंध असला पाहिजे. कारण अफगाणिस्तान हा देश त्या काळीं मोंगलांच्या हिंदी साम्राज्याचाच एक भाग असल्यामुळें या दोन्ही राज्यांची सरहद्द एकमेकांना भिडलेलीच होती.

## १२५

# इराणमधील साम्राज्यशाही आणि राष्ट्रवाद

२१ जानेवारी, १९३३

माझ्याविरुद्ध तक्रार करायला तुला जागा आहे. इतिहासाच्या निरनिराळ्या अरुंद रस्त्यांवरून एकदा मागें, एकदां पुढें, अशी चाललेली माझी धांवपळ पाहून तुला खरोखरच खूप खूप चिडचिडल्यासारखें झालें असेल. निरानिराळ्या रस्त्यांनीं प्रवास करीत करीत मी चांगला एकोणिसाव्या शतकापर्यंत येऊन ठेपलों होतों, तोंच एका-एकीं मी तुला पांच-सहा हजार वर्षें मागें घेऊन गेलों आणि ईजिप्तपासून हिंदुस्थान, चीन आणि इराणपर्यंत इकडेतिकडे उड्या मारावयाला सुरुवात केली. काय हा गोंधळ आणि धांगडधिंगा असें तुला होऊन गेलें असेल! त्याबद्दलची तुझी तक्रार जणुं प्रत्यक्ष तूंच येऊन माझ्या कानांवर घालते आहेस, असें भासतें आहे मला; पण त्या तक्रारीला चांगलेंसें उत्तर माझ्याजवळ मुळींच नाहीं. रेनी ग्रूझेचे ते ग्रंथ अलीकडे मीं वाचले ना, त्याच्यामुळें माझ्या डोक्यांत विचारांचे प्रवाह वाहूं लागले आणि मग तुला त्यांच्यामधलें थोडें थोडें कांहीं सांगितल्याशिवाय माझ्याच्यानें राहवेना. शिवाय, माझ्या या पत्रांत इराणकडे माझें थोडेंसें दुर्लक्ष झालेलें आहे, असें मला वाटतच होतें.

५०

म्हणून या निमित्तानें ती उणीव भरून काढावी असाही एक विचार मीं केला. आतां आपण इराणबद्दल बोलणें चालविलेंच आहे, तर इराणचाच इतिहास आधुनिक काळापर्यंत आपण आणून पोंचवूं या झालें.

इराणी संस्कृतीच्या प्राचीन परंपरा आणि त्या संस्कृतीनें केलेलें उच्च व महान् कार्य यांच्याबद्दल, इराणी कलेच्या सुवर्णयुगाबद्दल, या आणि अशाच कांहीं कांहीं गोष्टींबद्दल आतांपर्यंत मी तुला सांगत आलों. त्यासंबंधींचीं माझीं विधानें मीं पुन्हां जेव्हां वाचून पाहिलीं, तेव्हां त्यांतील भाषा जरा फाजिल अलंकारिक झालेली असून त्यामुळें कदाचित् थोडासा गैरसमज होण्यासारखा आहे असें मला आढळून आलें. त्यावरून वाचणाराची अशी गैरसमजूत होण्याचा संभव आहे, कीं इराणच्या सर्वच जनतेच्या वांट्याला खरोखर असें हें सुवर्णयुग आलें होतें आणि आपण देशोदेशींच्या अद्‌भुत लोककथांच्या शेवटीं पाहतों त्याप्रमाणें खरोखरच या लोकांच्या हालअपेष्टा संपल्या होत्या आणि ते सुखानें राहूं लागले होते. अर्थातच अशी गोष्ट मुळींच घडून आलेली नव्हती. संस्कृति आणि कला या गोष्टींचा त्या काळीं आणि पुष्कळशा प्रमाणांत आजच्या काळींसुद्धां, सर्व मक्ता कांहीं थोड्या लोकांकडेच फक्त होता. जनतेचा, सर्वसामान्य माणसाचा त्यांच्याशीं कांहीं सुद्धां संबंध नव्हता. खरें पाहिलें तर अगदीं प्राचीन इतिहासकाळापासून सामान्य जनतेचें सगळें आयुष्य अन्नासाठीं आणि संसारोपयोगी वस्तूंसाठीं झगडण्यांत खर्च होत आलेलें आहे. पशूंच्या जीवनांत आणि या लोकांच्या जीवनांत विशेषसा फरक केव्हांच पडलेला नाहीं. दुसऱ्या कशासाठीं त्यांना वेळ किंवा रिकामपण केव्हाच नव्हतें. सारा दिवसभर या अन्नपाण्याची कटकट एकसारखी त्यांच्या राशीस पुजलेली होती; नव्हे, त्यासाठीं दिवसभराचे श्रमसुद्धां अपुरेच पडत होते. अशा स्थितींत कला आणि संस्कृति यांचा लोक विचार तरी केव्हां करणार आणि त्याचा आस्वाद तरी कसा घेणार? इराण, हिंदुस्थान, चीन, इटली या किंवा इतर देशांत कलेची जी भरभराट झाली, ती राजदरबाराच्या आणि श्रीमंत, सुखवस्तु आणि रिकामटेकड्या लोकांच्या करमणुकीचें एक साधन या नात्यानें. धर्माच्या क्षेत्रांत कलेचा जो काय संबंध येत असे, त्याचें लोण तेवढें मात्र कांहीं अंशीं सामान्य जनतेपर्यंत जाऊन पोंचत असे.

परंतु राजदरबारांत कला मोठी बहरलेली असली, म्हणजे तेथील राज्यकारभार सुव्यवस्थित किंवा हितकारक असतो असें कांहीं नव्हे. कला आणि साहित्य याचे मोठे आश्रयदाते म्हणून अभिमान बाळगणारे राज्यकर्ते हे पुष्कळदां राज्यकारभाराच्या दृष्टीनें अगदींच कुचकामाचे आणि दुष्ट असत. त्या काळची इराणची समाजरचना, त्या वेळच्या इतर बहुतेक सर्व देशांतल्याप्रमाणेंच थोड्याफार फरकानें सरंजामदारी पद्धतीचीच होती. एखादा राजा बलिष्ठ असला म्हणजे तो, हे सरंजामदार लोक कायदेशीर कराखेरीज आणखी ज्या कांहीं कित्येक छोट्या छोटया बाबी कुळांकडून उकळीत असत, त्यांना प्रतिबंध करीत असे. असा राजा लोकप्रिय होत असे. असे

हे त्या मानानें चांगल्या राज्यव्यवस्थेचे काळ अधूनमधून जसे येत, त्याचप्रमाणें कांहीं कांहीं काळीं राज्यव्यवस्था अतिशय हीन अवस्थेला जाऊन पोंचे.

इकडे हिंदुस्थानांत मोंगलांच्या साम्राज्याची अगदीं शेवटची घटका भरत आली होती, त्याच सुमारास १७२५ मध्यें सफावी घराण्याची राजवट इराणमध्यें संपुष्टांत आली. इतिहासाच्या नित्य क्रमाला अनुसरून या घराण्याचें इतिहासाच्या रंगभूमीवरील काम आतां संपलें होतें. देशांतील सरंजामशाही हळूहळू मोडकळीला येत चालली होती आणि देशांत जे नवीन आर्थिक फेरबदल घडून येत होते, त्यांमुळें जुनी समाजरचना उखडली जात होती. त्यांतच अवजड करांच्या ओझ्याची भर पडली आणि लोकांमध्यें असंतोष वाढत गेला. अफगाण लोक हे त्या काळीं सफाई घराण्याच्या अमलाखालीं होते. ते बंड करून उठले. त्यांनीं आपल्या स्वतःच्या देशांत तर जय संपादन केलाच, परंतु त्यांनीं इस्पहान राजधानीही काबीज केली; आणि इराणच्या शहाला पदच्युत केलें. पुढें लौकरच इराणमधील एक सरदार नादीरशहा यानें इराणमधून या अफगाण लोकांना हांकलून लावलें. आणि नंतर त्यानें स्वतःच इराणचा राजमुकुट धारण केला. याच नादीरशहानें मोंगल साम्राज्याच्या अखेरच्या काळांतील दुर्बळ बादशहांच्या काळांत हिंदुस्थानावर धाड घातली, दिल्लींतील लोकांची कत्तल केली आणि इकडून प्रचंड संपत्ति त्यानें आपल्याबरोबर नेली; त्यातच शहाजहान बादशहाचें मयूरसिंहासनही त्यानें नेलें. यापुढील अठराव्या शतकांतील इराणचा इतिहास म्हणजे आपसांतील यादवी आणि आज जरा बरी राज्यव्यवस्था असावी तर उद्यां अगदींच गैरव्यवस्था माजावी, अशा घालमेलीचा निरुत्साहकारक वृत्तांत आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या बरोबर नवीनच आणखी संकटें आलीं. आतां इराणचा यूरप खंडाच्या वाढत्या आणि चढाऊ साम्राज्यवादाशीं संबंध येऊं लागला. उत्तरेकडून रशियाचें एकसारखें दडपण चालू झालें आणि ब्रिटिशांनीं इराणच्या आखाता-कडून पुढें सरकण्यास सुरवात केली. हिंदुस्थानपासून इराण कांहीं फारसा दूर नव्हता. त्यांच्या सरहद्दी एकमेकांना हळूहळू भिडावयाला येऊं लागल्या होत्या आणि आजच्या घटकेला या दोन्ही देशांची सरहद्द एक झाली सुद्धां आहे. यूरपमधून हिंदुस्थान-कडे जो सरळ मार्ग होता, त्या मार्गाच्या बाजूला इराण देश असून त्या मार्गावर इराणचा थोडासा वरचष्मा चालूं शकत असे. ब्रिटिशांचें या भागामधील सर्व धोरण हिंदी साम्राज्य आणि त्याकडे जाणारे मार्ग यांचें संरक्षण करावयाचें या गोष्टीवर आधारलेलें होतें. तेव्हां रशियानें इराण व्यापून या आपल्या मार्गावर पसरून राहावें आणि तेथून आपली लोभी नजर हिंदुस्थानावर टाकावी, ही गोष्ट इंग्लंडला केव्हांही सहन होण्यासारखी नव्हती. यामुळें इंग्लंड आणि रशिया या दोन्ही राष्ट्रांचें लक्ष इराण-कडे विशेष लागून राहिलें आणि दोघांनीं मिळून त्या बिचाऱ्या लहानशा देशाचा छळच आरंभला. या काळचे इराणचे शहाही अगदींच नालायक आणि मूर्ख होते. ते भलत्याच वेळीं या दोन देशांपैकीं कोणाशीं तरी लढाई उपस्थित करीत, नाहीं तर


रशिया व इराण
एकोणिसाव्या शतकांतील रशियाचें मध्य आशियांत पुढें पाऊल
र शि या
एल बाल्काश
कास्पियन समुद्र
कॉकेशस
तुर्कस्तान
ताश्कंद
समरकंद
बुखारा
ऑक्सस
पामीर
चिनी तुर्कस्तान
अफगाणिस्तान
काश्मीर
सिंधु
इराण
तेहरान
इस्पहान
इराक

आपल्याच प्रजेविरुद्ध तरी हत्यार उपशीत आणि त्यामुळें ते या देशाच्या कचाटयांत सांपडत. रशिया आणि इंग्लंड या दोन मोठ्या राज्यसत्तांमध्यें आपसांतील चुरस नसती, तर ईजिप्तप्रमाणें इराणही यापूर्वी केव्हांच रशिया किंवा इंग्लंड यांपैकीं कोणीं तरी आपल्या साम्राज्यांत सामील करून घेतला असता.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीला आणखी एका कारणासाठीं इराणचा लोभ या राष्ट्रांना सुटला. इराणमध्यें तेलाचा म्हणजे पेट्रोलचा शोध लागला. आणि पेट्रोल तर फारच किंमतीची वस्तु होती. त्या वेळच्या म्हाताऱ्या शहाचें मन वळवून डार्सी नांवाच्या एका ब्रिटिश नागरिकानें इराणमधील तेलाच्या खाणींतील तेल काढून विकण्याचा मक्ता मोठ्याच सवलतीच्या अटीवर १९०१ सालीं मिळविला. या कराराची मुदत भली मोठी म्हणजे साठ वर्षांची होती. तीनंतर या खाणींचा उद्योग करण्याकरितां म्हणून अँग्लो-पर्शियन ऑइल कंपनी या नांवाची एक ब्रिटिश कंपनी स्थापन झाली. तेव्हांपासून या कंपनीचा तेलाचा उद्योगधंदा इराणमध्यें चालत आला असून त्यापासून या कंपनीला प्रचंड फायदा होत आलेला आहे. या फायद्यापैकीं कांहीं थोडा भाग इराणी सरकारच्या वांटयाला येतो; परंतु बाकीचा सर्व प्रचंड हिस्सा देशाबाहेर कंपनीच्या भागीदारांच्या वांट्याला जातो. या भागीदारांमध्यें ब्रिटिश सरकार हें सर्वांत मोठा भागीदार आहे. हल्लींचें इराण सरकार हें मोठें कट्टे राष्ट्रवादी असून परकी लोकांनीं आपल्या देशाची अशी लूट करावी, या गोष्टीला त्या सरकारचा कट्टर विरोध आहे. १९०१ सालीं साठ वर्षांचा जो करार डार्सी याच्यापाशीं झाला, त्याच्याच आधारावर या अँग्लो-पर्शियन कंपनीचें काम चालू होतें. हा करारच इराण सरकारनें रद्द केला हें पाहून ब्रिटिश सरकारचा तर तीळपापडच झाला आणि त्यानें इराणी सरकारला धमकी देण्याचा आणि दमदाटी करण्याचा प्रयत्न करून पाहिला.* ब्रिटिश सरकारला आठवण नाहीं राहिली, कीं आतां काळ बदलला असून आशियांतील लोकांना अशी दमदाटी देऊन आपलें काम करून घेण्याचा काळ आतां उरलेला नाहीं.

पण या साऱ्या पुढच्या काळांतल्या गोष्टी मी तुला आधींच सांगून टाकूं लागलों. साम्राज्यशाहीची काळी छाया इराणवर जशी अधिकाधिक पडूं लागली आणि इराणचा शहा साम्राज्यवाद्यांच्या हातचें जसें बाहुलें बनत चालला, तसतसा इराणमध्यें राष्ट्रीय भावनेचा विकास होत गेला. तेथें एक राष्ट्रीय पक्ष स्थापन झाला. या पक्षाला परकी हस्तक्षेपाचाही तिटकारा होता आणि शहाच्या अनियंत्रित राज्यसत्तेलाही त्याचा तितकाच तीव्र विरोध होता. त्यांनीं लोकशाहीप्रधान राज्यघटना आणि आधुनिक पद्धतीच्या सुधारणा यांची मागणी सुरू केली. या वेळीं इराणची राज्यव्यवस्था अयोग्य प्रकारची होती आणि करांचें ओझें अवजड झालेलें होतें; त्यांतच ब्रिटिश आणि रशियन लोकांची देशांत नित्य कांहीं तरी ढवळाढवळ चालूच होती. प्रतिगामी

* अगदीं अलीकडे इराण सरकारच्या दृष्टीनें कांहींसा फायद्याचा असा एक नवा करार आतां अखेरीस ब्रिटिश सरकार आणि तेल-कंपनी यांच्यामध्यें करण्यांत आला आहे.

वृत्तीच्या शहाचें या परकी सरकाराशीं अधिक चांगलें सूत जमे; तसें तें थोडेंसें स्वातंत्र्य मागणाऱ्या आपल्या प्रजेशीं जमत नसे. पुढें १८०४ मध्यें झारच्या रशियाविरुद्ध जपाननें जय मिळविला; त्या जयानें इराणच्या राष्ट्रवादी लोकांना अतिशयच स्फुरण चढलें. कारण एक तर हा एका पौर्वात्य राष्ट्राचा पाश्चात्य राष्ट्रावर विजय होता आणि झारचा रशिया हा इराणावर रोज आक्रमण करूं पाहणारा मोठाच त्रासदायक असा इराणचा शेजारी होता. पुढें १९०५ मध्यें रशियांत राज्यक्रांतीचा प्रयत्न झाला. तो फसला आणि अत्यंत निर्दयपणें त्यांत क्रांतिकारकांना झोडपून काढण्यांत आलें. तरी पण त्यामुळेंही इराणच्या राष्ट्रवादी लोकांच्या उत्साहांत आणि कांहीं तरी प्रत्यक्ष प्रयत्न करण्याच्या विचारांत भरच पडली. त्यांनीं शहावर एवढें मोठें दडपण आणलें, कीं शेवटीं शहानें मोठ्या नाखुशीनें लोकशाहीप्रधान राज्यघटनेला १९०६ मध्यें मान्यता दिली. मजलिस या नांवाचें त्यांचें राष्ट्रीय कायदेमंडळ प्रस्थापित झालें, आणि इराणी राज्यक्रांतीच्या प्रयत्नाला यश आलेंसें वाटूं लागलें.

परंतु एवढ्यावर इराणचें नष्टचर्य संपलेलें नव्हतें. शहाच्या मनांतून आपली सत्ता नाहींशी व्हावी असें मुळींच नव्हतें. आणि रशियन किंवा ब्रिटिश लोकांनाही इराण हें एक लोकशाही राष्ट्र व्हावें ही गोष्ट आवडण्यासारखी नव्हती. कारण त्यामुळें इराणचें सामर्थ्य वाढून त्याची या दोन राष्ट्रांच्या धोरणांत एक अडचण निर्माण होण्याची भीति होती. शहा आणि मजलीस यांच्यामध्यें यामुळें एक झगडा उत्पन्न झाला. त्या वेळीं शहानें स्वतःच्याच लोकप्रतिनिधिसभेवर गोळीबार केला. परंतु लोक-समाज आणि लष्कर हें मजलीस आणि राष्ट्रीय पक्ष यांच्या बाजूला राहिलें आणि शहाची गादी वांचवायला मदत फक्त रशियन सैन्याचीच झाली. कोणत्या ना कोणत्या सबबीवर—सामान्यतः आपल्या नागरिकांचें संरक्षण करणें ही एक नेहमींची कायमचीच सबब असे—रशिया आणि ब्रिटन यांनीं आपलें सैन्य इराणमध्यें आणून ठेवलेलेंच असे नेहमीं. रशियन लोकांचे सगळ्यांच्या हृदयांत धडकी भरविणारे कोसॅक बहाद्दर इराण-मध्यें होते आणि इराणी लोकांशीं वस्तुतः हिंदी लोकांचा कांहींही हेवादावा नसतांना ब्रिटिश लोक हिंदी सैन्य ठेवून त्याच्या जोरावर इराणी लोकांशीं दमदाटी करीत असत.

या संकटांत इराणची अवस्था फारच कठिण झाली. इराणच्या राज्याजवळ पैसा मुळींच नव्हता आणि लोकांची परिस्थिति अतिशयच केंविलवाणी झालेली होती. इराणी मजलिसनें ही परिस्थिति सुधारण्याची आपली शिकस्त केली; परंतु रशियन लोकांच्या, किंवा ब्रिटिशांच्या विरोधामुळें, अथवा कधीं कधीं या दोघांच्याही मिळून एकत्र विरोधामुळें त्यांचे बहुतेक सारे प्रयत्न व्यर्थ गेले. अखेरीस अमेरिकेकडून कांहीं मदत मिळावी अशी त्यांनीं खटपट केली आणि एका कर्तबगार अमेरिकन गृहस्थानें, (त्याचें नांव मॉर्गन शूस्टर) या कामांत प्रयत्नांची शिकस्त केली. पण प्रत्येक वेळीं त्याला रशियन किंवा ब्रिटिश विरोधाच्या प्रबळ भिंतीवर टक्कर खाण्याचा मात्र प्रसंग आला. या प्रकाराची किळस येऊन, निराश आणि निरुत्साह होऊन त्यानें इराण

सोडून आपल्या मायदेशाची वाट धरली. त्यानंतर शूस्टरनें एक पुस्तक लिहिलें आणि त्यांत ब्रिटिश आणि रशियन साम्राज्यशाही इराणचें रक्तशोषण करून इराण देशाला धुळीला कसे मिळवीत आहेत याची हकिकत वर्णन केली. त्याच्या पुस्तकाचें नांवसुद्धां किती यथार्थ आहे. '**इराणची धडपड**' हें त्याच्या पुस्तकाचें नांव. त्यांत इराणचा त्या वेळचा सर्व इतिहास सांगितलेला आहे.

आतां इराण स्वतंत्र देश म्हणून टिकून राहणें शक्य नाहीं, हें जणुं निश्चितच झालें. इंग्लंड आणि रशिया यांनीं आपसांत या देशाची विभागणी करून तेथें आपले वर्चस्वाचे भाग ज्या दिवशीं ठरवून घेतले, त्या दिवशींच स्वतंत्र इराणच्या गळ्याशीं मृत्यूचे पाश आवळण्यास सुरुवात झाली. त्या वेळेपासून, महत्त्वाचीं नाक्याचीं ठिकाणें या दोन परकीय देशांच्या शिपायांनीं व्यापलीं; तेलाच्या सगळ्या खाणींचा उद्योग केवळ ब्रिटिश कंपनीच्या पूर्णपणें कबजांत आला. त्यामुळें इराणची चमत्कारिक केविलवाणी अवस्था झाली. या परकी राष्ट्रांपैकीं कोणीं तरी इराणची सर्वच राज्यव्यवस्था आपल्या हातीं घेऊन तो देश त्यानें आपल्या साम्राज्यांतच प्रत्यक्ष सामील करून टाकला असता तरी त्याहून बरें झालें असतें. कारण त्यामुळें मग या साम्राज्यावर कांहीं तरी जबाबदारी या देशांतील लोकांच्या सुस्थितीबद्दल राहिली असती. अशी इराणची अवस्था असतांना १९१४ च्या महायुद्धाचा भडका उडाला.

इराणनें आपण या युद्धांत तटस्थ आहोंत असें जाहीर केलें. परंतु दुर्बलांच्या अशा जाहीरनाम्यांना प्रबळ लोक भीक घालीत नसतात. युद्धांत पडलेल्या सर्वच राष्ट्रांनीं इराणच्या तटस्थपणाची कसलीच पर्वा केली नाहीं; आणि इराणच्या सरकारचें मत काय आहे आणि काय नाहीं याची कांहीं विचारपूस न करतां परकी सैन्यें येऊन इराणमध्यें एकमेकांशीं लढत राहिलीं. इराणच्या सभोंवार युद्धयमान राष्ट्रांचें कडेंच झालें होतें. इंग्लंड आणि रशिया हे दोस्त होऊन एका बाजूला होते. तुर्कस्तान हा त्या वेळीं जर्मनीचा दोस्त असून इराक आणि अरबस्तान यांमध्यें त्या वेळीं तुर्कस्तानचें राज्य होतें. महायुद्धामध्यें अखेरीस १९१८ सालीं इंग्लंड, फ्रान्स आणि त्यांचे दोस्त यांचा जय झाला; त्या वेळीं इराण देश सर्वस्वीं ब्रिटिश सैन्यानें व्यापलेला होता. इराणला आपल्या संरक्षणाखालचें राज्य म्हणून जाहीर करण्याच्या अगदीं बेतांत इंग्लंड होतें; मुलूख साम्राज्यांत सामील करून घेण्याचीच ही जरा एक नाजूक पद्धति होती. मध्य आशियांत भूमध्य समुद्रापासून तों बलुचिस्तान आणि हिंदुस्थान यांच्या सरहद्दी-पर्यंत एक मोठें ब्रिटिश साम्राज्य स्थापन करण्याचीं स्वप्नेंही कांहींजणांच्या मनांत घोळूं लागलीं होतीं; पण हीं स्वप्नें खरीं ठरलीं नाहींत. ब्रिटनच्या दुर्दैवानें या सुमाराला रशियांतील झारशाही नष्ट झालेली होती आणि तिच्या ठिकाणीं आतां सोव्हिएट रशियाचें राज्य उभें होतें. त्याचप्रमाणें ब्रिटनची तुर्कस्तानांतीलही सगळीं कारस्थानें फसलीं होतीं आणि या वेळीं तेथेंही कमालपाशानें, आपला देश दोस्तांच्या जवळजवळ घशाखालीं गेला होता, तो ओढून बाहेर काढला होता.

या सर्व घटनेचा इराणच्या राष्ट्रीय पक्षाला फायदा झाला. इराण देश नांवाला का होईना, पण स्वतंत्र राहिला. पुढें १९२१ सालीं एका लष्करी उलथापालथीच्या प्रसंगानें रिझाखान नांवाचा एक शिपाई महत्त्वाला चढला. त्यानें लष्करावर आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें आणि नंतर तो मुख्य प्रधान झाला. १९२५ मध्यें जुन्या शहाला पदच्युत करून एका घटनासमितीनें रिझाखानाला इराणचा नवा शहा म्हणून निवडलें. त्यानें रिझा शहा पहलवी असें नांव धारण केलें.

अशा रीतीनें रिझा शहानें शांततेच्या मार्गानें आणि बाह्यतः तरी लोकशाहीच्या तंत्राप्रमाणें वागून गादी प्राप्त करून घेतली. इराणची मजलिस त्याच्या कारकीर्दीत चालू असून हा नवा शहा आपल्या हातीं सगळीं अनियंत्रित सत्ता आहे किंवा असावी अशा भानगडींत कधीं पडत नाहीं. तरी पण तो एक समर्थ माणूस असून इराणच्या राज्यकारभाराचें सुकाणूं त्याच्याच हातांमध्यें आहे ही गोष्ट अगदीं उघड आहे. गेल्या कांहीं वर्षांत इराणच्या स्वरूपांत फारच फेरबदल घडून आलेला आहे आणि आपल्या देशाला पूर्ण आधुनिक बनविण्याच्या दृष्टीनें इराणमध्यें पुष्कळ सुधारणा घडवून आणण्याचा रिझा शहानें निश्चय केला आहे. देशांत मोठीच राष्ट्रीय जागृतीची लाट उसळली आहे आणि इराणमध्यें परदेशी लोकांचे जे हितसंबंध आहेत, त्या सर्वांच्या बाबतींत चढाईचें धोरण स्वीकारावें अशा तऱ्हेची राष्ट्रवादाची भूमिका होत आहे.

यामध्यें एक गोष्ट विशेष लक्षांत येण्यासारखी अशी आहे, कीं ही राष्ट्रीय जागृति इराणमध्यें आज २००० वर्षें जी संस्कृतीची परंपरा आहे तिच्याशीं सर्वस्वीं निगडित अशी आहे. मधला इस्लामचा काळ सोडून त्या पूर्वींच्या इराणच्या श्रेष्ठत्वाच्या काळाशीं या राष्ट्रीय जागृतीनें आपलें नातें प्रस्थापित केलेलें असून, त्या जुन्या काळच्या इतिहासांतून लोकांच्या ठिकाणीं स्फूर्ति निर्माण करण्याचा या जागृतींत प्रयत्न आहे. रिझा शहानें पहलवी–'पल्हवी'–हें जें आपल्या घराण्याचें म्हणून नवीन नांव धारण केलेलें आहे, त्यानेंसुद्धां डोळ्यांपुढें प्राचीन काळच उभा राहतो. इराणमधील लोकसमाजाचा धर्म इस्लाम–शियापंथी–आहे ही गोष्ट स्पष्टच आहे. परंतु त्यांच्या देशाच्या दृष्टीनें–राजकीय दृष्टीनें–पाहतां धर्मापेक्षां राष्ट्रीय प्रवृत्तीचाच येथें अधिक प्रभाव आहे. सर्व आशिया खंडभर हाच प्रकार घडून येतो आहे. यूरप खंडांत ही गोष्ट यापूर्वींच शंभर वर्षांपूर्वी एकोणिसाव्या शतकांत घडून आली; परंतु तिकडे आज पुष्कळ लोक राष्ट्रवादाचें तत्त्व हें निरुपयोगी झालेलें आहे असें मानूं लागलेले असून प्रचलित परिस्थितीला जास्त जुळण्यासारखीं अशीं कांहीं नवीन तत्त्वें आणि ध्येयें शोधून काढण्याच्या मार्गाला लोक लागलेले आहेत.

इराण हें नांव आता रीतसरपणें या देशाच्या सर्व कारभारांत मंजूर झालेलें आहे. रिझा शहानें असा हुकूम काढलेला आहे, कीं पर्शिया हें नांव यापुढें वापरतां कामा नये.

---